# महाराष्ट्र–सारस्वत

## पुरवणीसह

लेखक

**कै. विनायक लक्ष्मण भावे**

पुरवणी लेखक

**शं. गो. तुळपुळे,**

एम्.ए., पीएच्. डी.

मराठीचे अध्यापक, पुणें विद्यापीठ.



आवृत्ति चवथी




शके १८७६

किंमत २० रुपये

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना



यांत माझें असें कांहींच नाहीं. या सर्व साधुसंतांच्या उष्ट्या पत्रावळी गोळा करून हें ताट तयार केलें आहे. महाराष्ट्र-भाषेच्या आदि—उगमापासूनचा इतिहास थोडक्यांत सांगण्याचा यांत यत्न केला आहे. ज्यांस आपल्या भाषेच्या इतिहासाचें केवळ विहंगम दृष्टीनेंच अवलोकन करावयाचें असेल त्यांस पुढील निबंधापासून थोडासा उपयोग होईलसें वाटतें. परंतु यापेक्षां खोल पाण्यांत शिरणारांस यांत कांहीं सांपडावयाचें नाहीं; व अशा विद्वानांसाठीं हा प्रयत्नहि नव्हे. हा निबंध लिहिण्यापूर्वी आपल्या कवींसंबंधीं कालानुक्रमानें माहिती सांगणारे एका ' कवी चरित्रा 'खेरीज दुसरें साधन असल्याचें माहीत नव्हतें. कवीचरित्र हें पुस्तक आतां अगदीं दुर्मिळ झाल्यासारखें आहे व त्यांतील माहितीहि पुष्कळ ठिकाणीं चुकीची आहेसें वाटतें. करितां पुन्हां माहिती मिळवून एक लहानसा निबंध लिहावा, असें मनांत आणिलें. यांत मिळाली तेवढी माहिती मिळवून कवींचा काळ व त्यांचे ग्रंथ याविषयीं लिहिलें आहे. तरीदेखील त्यांत अनेक तऱ्हेच्या चुका राहण्याचा संभव आहे. शुद्धाशुद्धासारख्या सहज लक्षांत येणाऱ्या चुका यांत पुष्कळच आहेत. पण आतां त्यास इलाज नाहीं. त्या सर्वांबद्दलचा दोष मजकडे आहे, इतकें म्हटलें म्हणजे पुरें. यांतील दाखल केलेल्या माहितीसंबंधीं चुका व आणखी कवींची माहिती कोणी मजला कळविल्यास मी फारफार उपकारी होईन. वास्तविक पाहतां एक मोठा विस्तृत निबंध या विषयासंबंधीं असणें फार जरूर आहे. परंतु त्यास योग्य व अवश्य अशी बुद्धिमत्ता व फुरसत हीं दोन्हीं साधनें मजजवळ नाहींत. असा लेख कुणी

विद्वानानें लिहिल्यास त्याचे भाषेवर अनंत उपकार होतील, यांत शंका नाहीं. हा निबंध लिहितांना ज्या माझ्या मित्रांनीं मजला मदत केली, त्यांचा मी फार आभारी आहें.

आतां ग्रंथमालेच्या चालकांस व आश्रयदात्यांस धन्यावाद देऊन महाराष्ट्र-भाषेचा इतिहास लिहिण्याची प्रेरणा कोणा विद्वानास तो बुद्धीचा प्रेरक सविता करो, एवढीच प्रार्थना करितों.

वि. ल. भावे

## दुसऱ्या आवृत्तीची

# प्रस्तावना



यांत माझें असें कांहींच नाहीं, हें मी वीस वर्षांपूर्वीच सांगितलें होतें; आणि आजहि फिरून तेंच सांगतों, कीं यांत माझें असें कांहीं नाहीं. जें माझे पूर्वीं दुसऱ्यांनीं लिहिलें होतें त्याची मी नकल केली, व जें मला दुसऱ्यांनीं तोंडानें सांगितलें, तें मी कागदावर टिपून घेतलें आणि अशा रीतिनें 'भिक्षांदेहि' करून हें मधुकरीचें पवित्र ताट मीं सिद्ध केलें.

विशेष बुद्धीसामर्थ्यानें खोल पाण्यांत बुडी मारणारांना आणि स्वतःच पाकनिष्पत्ति करणारांना, त्यांचीं तहानभूक हरेल, असें येथें कांहीं सांपडावयाचें नाहीं. पूर्वीं सात–आठशें वर्षें महाराष्ट्राची लेखणी कशावर चालली, हें येथें थोडेसें सांगूं; आणि या आपल्या सरस्वतीचा उगम कोठें झाला, व पुढें ही वाक्तरंगिणी स्वराज्याच्या सीमेपर्यंत कशी कशी वाहत गेली, याचें किंचित मात्र दिग्दर्शन करण्याचा यांत यत्न करूं; तुमचे बरोबर येऊन या ज्ञानगंगेच्या कांठचीं देऊळें आणि मठ हीं आम्हीं दाखवून देऊं. वाटेवरच असतील त्यांचें दर्शन घडवूं व जरा पलीकडे असतील त्यांच्या कळसांना व गोपुरांनांच दुरून नमस्कार करूं. पण एकाद्या देवळाचे आंत जाऊन बसून तेथल्या अपूर्व नक्षीकामाची शोभा व कुसरीचा थाट कोणास नीट पहावयाचा असेल तर तो ज्याचा त्यानेंच सवडीनुसार मागाहून पाहिला पाहिजे. यात्रेंत इतका वेळ सांपडणार नाहीं. तेथले देखावे मात्र दुरून दाखवून देऊं.

तसेंच ही वाट चालत असतां, बाजूबाजूंनीं उगवलेल्या हिरव्यागार शेवाळी आणि लहान मोठे ल्ऱ्हाळ्यांचे पुंजकेहि तुम्हांला जरजरा दिसतील. त्यांतच या मंदाकिनीच्या कांठच्या राजहंसांचीं घरटींहि थोडींफार आम्हीं

दाखवूं. आणि या नदीच्या जलौघांत कोण–कोण सुस्नात झाले, व कोणी कोठें विहार केले याचाहि थोडासा पत्ता आम्हीं लावून देऊं. वाटेंत कोठें कोठें या ज्ञानरसतरंगिणीचे पाट फोडून त्यानें ओलावलेल्या जमिनींत कल्पनांच्या फुलांनीं फुललेल्या आणि प्रमेयांच्या घोसांनीं लहडलेल्या काव्यलतांचे सुंदर ताटवे केलेले आढळतील, त्यांतून कांहीं कळ्याहि तुम्हांस खुडून देऊं. तृषा उत्पन्न झाल्यास ती भागविण्याकरितां थोडेसें आचमनहि करवूं. फार तर शब्दपल्लवांच्या द्रोणांत या दिव्य गंगेचें थोडेंसें पाणीहि क्वचित् प्रसंगीं आणून देऊं. पण या पलीकडे येथें कांहीं नाहीं.

ज्यास खरी मजा हवी असेल, ज्यास काव्यजलविहाराचें पूर्ण सौख्य अनुभवावयाचें असेल, त्यानें स्वतःच कंबर बांधून या सारस्वततरंगिणींत उतरलें पाहिजे, व आंत बुड्या मारून त्यांतील भोंवऱ्यांशीं दोन हांत स्वतःच केले पाहिजेत. उपाध्यायामार्फत किंवा भिक्षुक–द्वारा तें साधणार नाहीं. कदाचित् त्या त्या ठिकाणांचा पत्ता लावून, ठिकाणें धुंडण्याचे श्रम न पाडतां, ठिकाणांचा मेजका मार्ग दाखवावयाचें, व क्वचित प्रसंगीं त्या ठिकाणीं नेऊन सोडण्याचें काम, उपाध्यांय करील. पण पुढचें मज्जन ज्याचें त्यानेंच केलें पाहिजे. मात्र वाट दाखविण्याची ही सेवा-चाकरी करीत असतां, मार्गश्रमपरिहारार्थ भिक्षुकस्वभावानुसा थोड्या फार गप्पा गोष्टी करण्याची मुभा असावी. त्या लक्ष देऊन ऐकल्याच पाहिजेत, अशी अट नाहीं; इतकेंच नव्हे तर, त्या माझ्यापासून ऐकून घेऊन मग चार चौघांत आपल्या स्वतःच्या म्हणून कोणी झोंकून दिल्या तरीहि माझी त्याला हरकत नाहीं.

सोनखारा : बेलापूर<br>गणेशचतुर्थी, शके १८४१

**विनायक लक्ष्मण भावे.**

# खाजगी दोन शब्द

शके १८४४-च्या आश्विनांत दीपोत्सवाच्या सुमारास एके दिवशीं (११-१०-२२) मी सहल करीत असतां माझी गाडी भरदाव धावत होती. शेपट्या वर करून बैल बेफामपणानें पळत होते. या वेळीं गाडी रस्त्याच्या अगदीं कडेला गेली. रस्ता अरुंद असून त्याच्या दोन्ही अंगांला खालीं नजर पोंचत नाहीं, असे खोल कडे तुटलेले होते व तळाला एक मोठी दरी होती. या दरींत कैक प्राणी आजपर्यंत पडले; पण त्यांतून एकहि परत वर जिवंत आला नाहीं, हें मला माहीत होतें; व माझे गाडीचा वेग तर कांहीं केल्या आवरेना. यामुळें तर मी फारच घाबरलों, आणि माझी बोबडी वळली. आणखी थोडा वेळ जाता तर मी पार गेलोंच होतों. पण इतक्यांत माझे वर्ध्याचे रा. गोपाळराव देशमुख हे तेथें आले. त्यांनीं हां हां म्हणतां बैल चुचकारून गाडी चकारींत आणली. गो-पाळरावच ते, त्यांची केवढी करामत! त्यांनीं कैकवेळां अशा पडत्या गाड्या आवरून कैकांचे प्राण वांचविले असतील. या प्रसंगीं माझे प्राण वांचले खरे; पण घाव माझ्या असे वर्मीं लागले कीं, मी जन्माचा लुला झालों. यानंतर साधारण बरा झाल्यावर महिन्या-दोन महिन्यांनीं माझे कांहीं स्नेही मला भेटण्यास आले. त्यावेळीं मला अगदीं अपरिचित अशा शब्दांनीं माझ्या महाराष्ट्र-सारस्वताची त्यांनीं फार स्तुति केली व माझाहि फार गौरव केला. आणि 'पुन्हा एकदां' हा ग्रंथ छापावा, असें पुनः पुन्हा आग्रहानें सांगितलें. कांहीं केल्या ते ऐकतनात, एकच हट्ट धरून बसले व आणखी आणखी माझे गोडवेच गाऊं लागले. ते इतके कीं, मी डोंगराएवढा फुगलों; आणि त्यांचें तें 'वन्समोअर' म्हणजे 'पुन्हा एकदा' हा ग्रंथ छापावा, हें म्हणणें मी कबूल केलें व त्यांस तसें वचन दिलें.

दूसरेच दिवशीं मी सुरुवात केली व अंगांत ताकद नसतां मेंदूला बळेंच तणावा देऊन या आवृत्तीचें कामास कसून लागलों. माझें हें करणें पाहून माझ्या कांहीं आप्तेष्टांनीं फार निषेध केला. एका संयुक्त पदवीधरानें तर 'ही बळेंच ओढवून घेतलेली यातना (selfimposed torture) तुम्ही करूं नका' असें निक्षून बजाविलें. पण या कामांत मला पुष्कळांची मदत होईल व हातभार देऊन माझी कावड माझे इष्टमित्र पलुयास पोंहोंचवितील, अशी खात्री वाटून मी त्यांचे म्हणण्याकडे काणाडोळाच करीत गेलों. शिवाय मी शब्दांतहि गुंतलों होतों, म्हणून काम तसेंच रेटूं लागलों. त्या वेळीं माझे ध्यानांत आलें नाहीं कीं, नाटकांत थट्टेखोर मंडळी बदसूर गाणाऱ्या पात्राला 'वन्समोअर', 'वन्समोअर' करून पद पुन्हां म्हणण्यास लावतात; व टवाळी साधून तें भाबडें नाटकी पोर फसलें म्हणजे त्यांतच आनंद मानतात. अशांतलाच हाहि प्रकार असेल, हें आम्हां गांवढळांच्या कशाचें लक्ष्यांत येणार! त्यांत मी तर सबंध हयातींत पांच नाटकेंहि पाहिलेलीं नाहींत. तो मी तेव्हांच चकलों व काय दुर्बुद्धी झाली तो मी आपला कामासच पुन्हां जडलों. पण पुढें मात्र माझे पूर्ण अनुभवास आलें कीं, हें 'वन्स-मोअर' ऐकण्यांत माझी चुकी झाली; तें खरोखर 'नो मोअर', 'नो मोअर' असेंच होतें. आशाळभूत कानांनीं मला भलतेंच ऐकविलें व भाबड्या मनानें मला ठकवून गोत्यांत आणलें. पण जें झालें तें झालें. मी असा फसून नादास लागलों. काम करतांना थकावें, आजारी पडावें, अपशकुनहि पहावे, पण माझ्या वेड्या मनानें तो छंद म्हणून सोडूं नये, असें होत होत हातचें काम बऱ्याच पलुयाला आलें पण मला थकवा मात्र फार येऊं लागला. तरी ठाणें, मुंबई, पुणें वगैरे ठिकाणच्या माझ्या स्नेह्यांच्या मदतीवर माझा फार दम होता व त्या सर्वांच्या मदतीचा मला पाठिंबाहि मोठाच होता; आणि हें मी आल्या-गेल्याजवळ वारंवार बोलूनहि दाखवी. एक दिवस चार स्नेही बसले असतां मी हें असेंच बोललों. तें ऐकून एकानें तोंडातली सिगार जरा दूर सारून थोडें

खोचून म्हटलें 'तुम्हांला स्नेह्यांचा फार मोठा भरवसा बोवा. पण संभाळाहो, नाहीं तर भरवशाच्या म्हशीला टोणगा! हे स्नेही लोक तुम्हांला मदत कबूल करतील आणि मग पाय काढून फशी पाडतील.' कांहीं वेळ अशीच थट्टामस्करी चालली व जो तो आपले अनुभव तिखटमीठ लावून रंगवून सांगूं लागला. इतक्यांत माझ्या फारशा परिचयाचे नव्हत, असे एका मित्राबरोबर आलेले एक गृहस्थ जरा उठून बसले राहिले व विडा तोंडांत कोंबून, तळहातावर तंबाखू-चुन्याचा रवडा करून तो बार तोंडांत ठासून म्हणाले, 'अहो, तुम्ही अगदींच दुधखुळे दिसतां. या पुणेंकिणेकरांना तुम्ही नीटसे ओळखलेंच नाहींत. ते म्हणजे कसले खोंचदार! किती हिकमती! त्यांना वाटतें कीं, आम्हीं झुलवावें व इतरांनीं झुलावें. पुण्यानें फंड काढावे आणि इतर प्रांतांनीं वर्गण्या द्याव्या. पुण्यानें संस्था काढाव्या व इतरांनीं मदतीचे आंकडे भरावे, आणि अशी मदत देखील तुम्ही एखाद्या संस्थेला दिलीत तरी त्याचें त्यांना मोठेंसें कांहीं वाटणार नाहीं. अडल्या वेळीं मदत देऊं केलीत आणि जरी ती त्यांनीं मोठ्या आभारपूर्वक स्वीकारली, तरी पुढें कोणी दुसरा मोठा दाता भेटला, कीं ते तुमच्या मदतीला आणि तुम्हांला लाथाडून टाकायला कमी करणार नाहींत. त्यांत आपण कांहीं गैर करतों असें त्यांना मुळींच वाटणार नाहीं. बुद्धीच्या कसरतीनें शब्दांची चाळवाचाळव करून ते त्यांतूनहि वाट काढतील आणि पुन्हा नाक फेंदारून तुमचीच टवाळी करतील! बडे मादरबखत आणि कावेबाज ते!' असें बोलून पुन्हा एकदा राजश्रींनीं बार ठासून आणि जवळच्या तस्तांत पचक् थू–हें थुंकणें पुणेकरांच्या कृत्यांवर नसून केवळ बोलण्याच्या आवेशांत मुखरसाचा प्रसाद कोणावर उडू नये म्हणून होतें– असें थुंकून ते आणखी म्हणाले, 'अहो! हे असा नजरबंदीचा तमाशा करतील, कीं तुम्हांला नुसता संशयहि येणार नाहीं. सहज पुस्तक वाचायला दिलें तर त्यांतील मुद्याचीं पानें तेवढींच काढून ठेवतील. नुसती एखाद्या लेखाची तुमचे करितां नक्कल केली तर त्यांतहि महत्त्वा-

च्या बाबी तेवढ्याच गाळतील आणि संशय येऊं नये म्हणून नीट बांधून सहीशिक्के करून ती खोडसाळ नक्कल तुमचे स्वाधीन करतील, असले हे खोल दगलबाज पाताळयंत्री आहेत. पहा बुवा!' असें बोलत स्वारीनें पुन्हा तस्ताला हात लावला. इतका वेळ बोलण्याची संधि मी पाहत होतों; पण त्याच्या आवेशाच्या झपाट्यांत मला अवसरच मिळाला नाहीं. आतां या निमित्तानें तो मिळाल्यामुळें याच्या चारगटपणाचा वीट वाटून तो बंद करण्याच्या उद्देशानें मीं म्हटलें, 'अहो राव, तुम्ही बोलता काय? थोडे शुद्धीवर या. मी कांहीं नवखा नाहीं. मी पुणेकरांना चांगलें ओळखतों. माझा अनुभव तुमचे अगदीं उलट आहे. ते किती साळसूद आणि सरळ आहेत. अहो, त्यांची बुद्धिमत्ता तरी किती अलोट! त्यांनीं मेहनत करून या संस्था काढल्या नसत्या तर आज महाराष्ट्र किती मागें राहता! ते संस्था न काढते तर सूर्य—खरा नव्हे—ज्ञानसूर्य उगवता ना! आणि चंद्र मावळता ना! सभा, वादविवाद, मार्मिक भाषणें आणि चुरचुरीत लेख या पुण्याबाहेर आज कोठें आहेत? पुणें हा प्राण आहे आणि महाराष्ट्र हें कलेवर आहे. माझा अनुभव येथील लोकांविषयीं तुमचेहून फार निराळा आहे. मी त्यांना मनापासून चहातों. माझें कामांत त्यांचेकडून वारंवार प्रोत्साहन व उत्तेजनच मिळत गेलें आहे. मी तर त्यांचा फार ऋणी आहें. मला त्यांचें थोरपण नित्य अनुभवास येतें व मी त्यांना नेहमीं धन्यवाद देतों. तुमचा हा भलता अनुभव पाहिजे तर दुसरीकडे सांगा. माझ्या येथें तर असलें बोलणें बिलकूल खपणार नाहीं. काय ही दुनिया उलटी झाली कीं हो! कागदांना सोनें-हिऱ्यांचें मोल देतात आणि हिरा व कोळसा एकच आहे असें प्रतिपादतात हे वर.' हे शेवटचे शब्द मीं जोरानेंच उच्चारिले आणि मला राग आला होता यामुळें माझें बोलणें त्याच्या काळजालाच लागलें; व तो जरा फिदाफिदी हसत घड्याळाकडे पाहून हळूच उठून निघून गेला. स्वारी मोठी खमंग खरी. पण मला बरेंच वाटलें. कारण मग तेव्हां व त्यापुढें मीं या

ग्रंथाची नवी आवृत्ति काढण्याचे भानगडींत पडूं नये, असें मला कोणींहि सांगितलें नाहीं व माझा उद्योग अव्याहत चालू राहिला. थोडेच दिवसांत बरेंच काम झालें व शके १८४९-चे गुढीपाडव्याचे दिवशीं मीं आपली हस्तलिखित प्रत छापण्याकरितां रवाना केली.

माझी प्रत कांहीं मीं लिहिलेली व कांहीं इतरांकडून लिहविलेली असल्यामुळें अगदीं वाईटच होती. आधीं माझें मराठी शिक्षण तें किती! तिसऱ्या पुस्तकांतला ' मुला, मी कोण ? आणि माझें नांव काय ?' हा धडा मी शिकलों आणि शाळा सोडली. तो पुढें एकदम इंग्रजी चौथे इयत्तेंत वगवशिल्यानें बसलों. एकदा ही माझी आणि मराठीची फारकत झाली तिचा शेवटीं कसेंबसें पास होण्याकरितां मॅट्रिकमध्यें मीं थोडासा समेट केला आणि पुढें कायमचा रामराम ठोकला. तेव्हां मला कसली वाक्यरचना आणि कोठचें शुद्धलेखन ! व्यापारांत पडेपर्यंत मोडीची ओळ वाचतां येत नसे. आणि अजून सहीच्या नांवानें शून्यच. बरें, व्यवसाय अगदींच निराळे. पिढीजात उद्योग शेतीभातीचा. ल्हापणापासून छंद कबुतरें, बुलबुल, मैना, चिमण्या, मांजरें, मुंगूस, ससे वगैरे पाळण्याचा. कॉलेजांत शिक्षण शास्त्रीय विषयांचें, पुढें व्यवसाय मीठ विकण्याचा. नंतर धंदा व्यापाराचा; असें सगळेंच माझें तिरपगडें ! पण थोडीबहुत वाचनाची हौस व नादी स्वभाव यांमुळें काव्येतिहासाच्या जाळ्यांत मी गुरफटलों आणि एकदा गुरफटलों तों तेथेंहि जखडून राहिलों. यामुळें माझे हातचा लेख म्हणजे शुद्ध बलिहरण ! एकदा लिहिलें म्हणजे तें पुन्हां वाचून पाहण्याचा अत्यंत तिटकारा; ती कधीं हाताला सवयच नाहीं. तेव्हां अशुद्धें आणि चुका यांना काय तोटा ! आणि आतां तर यावेळीं मजकूर कसाबसा लिहिलेला आणि लिहविलेला. याकरितां मी हा ग्रंथ शुद्ध करण्यासाठीं वे० शा० सं० रा० मुकुंदशास्त्री मिरजकरांना विनंती केली व ती त्यांनीं दर फर्म्याला चार रुपयांचा मोबदला घेऊन मान्य केली; आणि कृपाळूपणानें या ग्रंथाचे तेहतीस फार्म म्हणजे २६४ पृष्ठें, वगैरे तपासून आपल्या देखरेखीखालीं छापून घेतलीं. यापुढील पृष्ठें

काहीं एक न घेतां माझे आप्त व स्नेही प्रो० तुळपुळे यांनीं तपासून दिलीं. तेव्हां प्रुफें वगैरे पाहण्याचें सर्व काम परस्परच झालें. ती दगदग मला लवमात्र पडली नाहीं. आणि काम करणारे पुण्याचे कसलेले छापखानदार; यामुळें हें काम इतपत उतरलें.

श्रीमंत सरदार मेहेंदळे व रा० कुळकर्णी यांनीं या आवृत्तीचे वेळीं मला चांगली मदत केली. रा० कुळकर्णी, वास्तव्य आळंदी, यांनीं मनापासून केलेल्या मदतीमुळें मला चार भावडांचा भाग पुन्हां लिहितां आला. या मित्रमंडळीप्रमाणेंच भारत-इतिहास-मंडळाची मला थोडीफार मदत मिळती, तरी फार चांगलें होतें. पण दुर्दैवानें तो लाभ मला घडला नाहीं. तरीपण यावेळीं महानुभाव साधुसंतांची मदत मला फारच झाली. दत्तराज महंत, हरिराजबावा वगैरे अनेक संन्यासी मंडळींनीं माझे येथें येऊन व कांहीं महिने माझें येथें राहून मला आपले अमोल ग्रंथ दाखविले व इतर मठाधिपतींनीं मीं सांगितलेले ग्रंथ पाठवून, पत्रद्वारें अनेक शंका विचारून व येतां जातां प्रत्यक्ष मैत्रीचा लाभ देऊन मला साह्य केलें. हें त्यांचें थोरपण मी केव्हांहि विसरणार नाहीं. जे ग्रंथ आज सहासातशें वर्षांत महानुभाव लोकांनीं कोणाच्या नजरेसहि पडूं दिले नाहींत ते त्यांनीं खुशालपणें माझ्या हवालीं केले, हें त्यांचे केवळ थोरपण आहे. माझी ते ग्रंथ पाहण्याची कितीहि योग्यता असली तरी ती प्रो० डॉ० भांडारकरांच्या इतकी थोडीच असणार! माझी स्वभाषेवर प्रीति केवढीहि असली तरी काय लोकमान्य टिळकांच्या प्रीतिइतकी जाज्वल्य असणार? त्या महात्म्यांच्या पासंगाला माझी भाषाप्रीति येणार नाहीं. माझें लिहिणें गोड आहे असें क्षणभर गृहीत धरलें तरी तें काय हरिभाऊ आपटयांसारखें मिष्टास असणार? तेव्हां अशा थोर माणसांकडूनदेखील ज्यांनीं ठेवा चोरून ठेविला त्यांनीं तो आपण होऊन माझें स्वाधीन केला, हें त्या थोरांचें केवढें थोरपण! सरकारालाहि ज्यांनीं आपलें लिहिणें दाखविलें नाहीं व दाद दिली नाहीं त्यांनीं मला मी नुसतें विचारतांच सर्व झाडा देऊन आपलें भांडार उघड केलें हें त्यांचें

केवढें प्रेम! धनी दुधाला बसला तर वेळेस गाय त्याला लाथ झाडते आणि पान्हा चोरते; पण आपले जिव्हाळ्याचें वत्स दृष्टीस पडतांच त्याची वाटहि न पाहतां आपण होऊन खडबडून उठते आणि दुधाच्या धारा सोडूं लागते, तशांतला हाहि प्रकार झाला. आणि या सर्व साधुसंतांच्या कृपासलिलानें माझें हें सारस्वताचें रोपटें पालवून त्याला फुलोरे आले. या फुलांना असावा तसा वासहि नाहीं व रंगहि नाहीं. तरीदेखील हीं माझ्या सारस्वतवल्लीचीं फुलें मी मनोभावानें आपणास अर्पण करितों. आपणहि एक वेळ हीं आपल्या डोळ्यांच्या ओंजळींत घेऊन मनानें त्यांचें अवघ्राण करावें व मला लेकराला आशिर्वाद द्यावे, म्हणजे मी धन्य होईन. हीं वाक्यपुष्पें मी माझ्या महाराष्ट्रांतल्या प्रेमीजनांपुढें ठेवितों. पण ज्यांना महाराष्ट्रीय कवींपेक्षा परकी व परधर्मी कवी श्रेष्ठ वाटतात व तेथेंच ज्यांचें मन रमतें त्या द्विपादांनीं याचेकडे न पांहता दुरूनच जावें हें बरें. देव दगडाचे खरे, तरी त्यांचीं देवालयेंदेखील सर्वांना पूज्य असतात, पण कावळे त्यांच्या कळसावर बसून विष्ठेनें घाण करितात म्हणून कळसांना कोणीं कांटें बांधले आहेत काय? पण कावळ्यांनीं आपली खोड टाकावी, अशी इच्छा धरणें यांत कांहीं वावगें नाहीं. बाकी कावळे थोडेच मानणार! त्यांना देवळांचे कळस तेथें बसून यथेच्छ मळमूत्र टाकण्यास आयते मिळतात. तद्वतच हा माझे बोलांचा मळा टीकाकारांच्या नजरेपुढें आल्यावर त्यांस भाषाप्रभुत्वाचें प्रदर्शन करण्यास आणि खेळ खेळण्यास पुष्कळच उपयोगी पडेल यांत संशय नाहीं. असें झालें तरी त्यांत आनंदच आहे. कारण तितका तरी मी त्यांचे उपयोगी पडलों, असें होईल. त्यांचें लक्ष इतकेंहि मजकडे ओढलें व रागानें किंवा अनुरागानें त्यांचे पाय मला लाभले तरीहि माझे भाग्य मोठेंच थोर असें मी मानीन.

असो. या ग्रंथाचें हें पुढील काम पुरें झाल्यावर पुन्हा ता. ११ आक्टोबर १९२४ रोजीं म्हणजे पहिल्या खेपेच्याच तारखेस व त्याच

वेळीं, रवि बरोबर त्याच ठिकाणीं आला असतां, मला माझ्या दुखण्यानें पूर्ववत् गांठलें; व माझी पूर्ववत् अवस्था केली. पण या वेळींहि डॉ. गोपाळराव देशमुख, F. R. C. S., M. D. यांनीं कृपाळूपणानें येऊन पुन्हा मला मृत्यूच्या दाढेंतून ओढून काढलें; व मी फूल नाहीं फूलाची पाकळी देत असतां तीहि न घेऊन आपल्या मैत्रिकीच्या प्रेमरज्जूंनीं मला आणखी घट्ट बांधून टाकिलें. आतां माझी शेवटीं एकच उत्कट इच्छा आहे ती ही कीं, यापुढें ग्रंथरचनेची बुद्धि देवानें मला देऊं नये; व एकदा हा पसरलेला पसारा आटोपून सर्व इष्टमित्रांच्या मांडीवर मी लडिवाळपणें लोळत असतां त्यांचें समक्ष हा नश्वर देह ज्याचा त्याचे स्वाधीन करावा आणि आपण हा लोक सोडून पुढील पंथास लागावें.

सोनखार,
मिती पौष शुद्ध एकादशी
शके १८४६

**विनायक लक्ष्मण भावे.**

# विनायक लक्ष्मण भावे



रा. विनायक लक्ष्मण भावे यांचें घराणें पनवेलनजीक पळस्पें गांवचें होय. हें कुटुंब मूळचें श्रीवर्धनचें. तेथून रा. विनायकरावजींचे पणजोबा पळस्पें येथें रहावयास आले असावे असें वाटतें. रा. विनायकरावजींचे वडील लक्ष्मण बल्लाळ उर्फ कोंडोपंत भावे हे ठाणें येथें वकिली करीत. विनायकरावांच्या आईचें नाव सरस्वतीबाई असें होतें. रा. विनायक-रावांचा जन्म मु. पळस्पें येथें सन १८७१-त झाला. त्याच सुमारास त्यांचे वडील ठाण्यास वकिली करूं लागले. अर्थात् रा. विनायकरावहि अगदीं लहानपणापासूनच ठाण्यास आले. त्यांचे वडील करारी व हुशार होते आणि फौजदारी कामाकडे त्यांचें विशेष लक्ष असे. त्यांनीं आपल्या धंद्यांत ठाणें येथें चांगला लौकिक संपादन केला होता. विनायकराव दहा अकरा वर्षांचे असतांना त्यांची आई वारली व त्यामुळें त्यांस फार दिवस मातृसुख लाभलें नाहीं. लहानपणी त्यांची प्रकृति अगदीं अशक्त असे.

रा. विनायकराव यांचें मराठी व इंग्रजी शिक्षण ठाण्यासच झालें. मराठी शाळेंत तीन चार वर्षें काढल्यावर त्यांनीं मराठी शाळेस रामराम ठोकला व पुढें ते एकदम इंग्रजी शाळेंतील चवथ्या ईयत्तेंत प्रविष्ट झाले. शाळेंतील अभ्यासाकडे प्रय: त्यांचें लक्ष नसल्यामुळें शाळेंतील इंग्रजी शिक्षण पुरें करण्यास त्यांस जास्त वेळ लागला व आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी ते मॅट्रिक झाले. पुष्कळसा उनाडपणा करावा, लोखंडी मोठें चाक घेऊन तें वेळीं अवेळीं शहरांतील रस्त्यामध्यें फिरवित असावें, कबूतरें बाळगून आणि तीं खिशांत घालून खाडीकांठीं फिरावयास जावें व तेथें तीं हवेंत उडवून त्यांची मजा पहावी असल्या उद्योगांत त्यांचें मन लहानपणीं गढलेलें असे. अर्थात् त्यांचा शाळेंतील अभ्यास होऊं नये व बहुतेक वर्गांत ते खालचीं बाकें धरून असावे या गोष्टीचें

आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. पण जरी शाळेच्या अभ्यासांत त्यांचें लक्ष नसलें व जरी त्यांनीं त्या वयांत फार उनाडपणा केला असला तरी त्यांच्या मनाची वाढ त्या वेळीं नीट झाली नाहीं असें मात्र नाहीं. त्यांस मासिकें, वर्तमानपत्रें वाचण्याची गोडी फार असे व तसल्या वाचनांत ते लहानपणीं फार वेळ घालवीत. अगदीं लहानपणापासून शेवट-पर्यंत रा. भावे यांचा स्वभाव (चांगल्या अर्थानें) नादिष्ट असा होता. एकादी गोष्ट नादानें हातीं घ्यावी व तिचा पिच्छा पुरवावा व दुसरी गोष्ट अगदी हाताशीं असली तरी तिच्याकडे मुळींच लक्ष देऊं नये अशी त्यांची अखेरपर्यंत वृत्ति होती. लहानपणीं अभ्यासांत त्यांचें मुळींच लक्ष नव्हतें. आज या डोंगरावर फिरावयास जावें, उद्यां त्या डोंगरावर फिरावयास जावें, पाखरें धरावीं आणि तीं पाळावीं, रानांतून निरनिराळ्या चिजा घरीं आणाव्या अशा प्रकारचे त्यांचे खटाटोप असत. असल्या उद्योगांनीं त्यांच्या मनांत स्वतंत्र बाणा, सृष्टीचें अवलोकन, प्रत्यक्ष प्रयोग इत्यादिकांची आवड उत्पन्न झाली. पुढें विद्याव्यासंगाचा, मराठी भाषेचा व इतिहास-संशोधनाचा त्यांस मोठाच नाद लागल्यावर आपल्या विद्यार्थीदशेंतील चरित्राकडे पाहून त्यांचें त्यांसच आश्चर्य वाटे. विद्यार्थी अभ्यास करीत नाहीं हा दोष शिक्षकाचा आणि प्रचलित शिक्षण पद्धतीचा आहे. असें ते नेहमीं प्रतिपादीत. "माझ्या सारख्या विद्याव्यासंगांत रममाण होणाऱ्या उत्साही व हौशी माणसाच्याही मनांत ज्याअर्थी त्याकाळीं कोणत्याहि शिक्षकाच्या हातून विद्याप्रेमाचें बीजारोपण झालें नाहीं त्याअर्थी हा दोष माझा नसून शिक्षकांचा व शिक्षण पद्ध-तीचा आहे" असें ते स्पष्ट म्हणत.

शाळेंत असतांना जरी विनायकराव अभ्यासाकडे असें फारसें लक्ष देत नसत तरी त्यांना वाचनाची फार गोडी लागली होती; ती इतकी कीं घरीं ते तासचे तास वाचनांत गुंग असत. शाळेंत शिकविल्या जाणाऱ्या नवनीतांतील कविता वाचण्याचा नाद त्यांस फार असे. त्यांच्या लहानपणीं ठाण्यास अरुणोदय, जगत्समाचार, हिंदुपंच वगैरे

दोन तीन वर्तमानपत्रें निघत व त्यांतील बातमीपत्रें, व विविध विषयांवर आलेली चर्चाहि ते वाचीत व त्यांत त्यांचें मन रमे. रा. भावे यांचा स्वभाव लहानपणापासून विनोदी व थट्टेखोर होता, त्यामुळें हिंदुपंचांतील हास्यरसोत्पादक लेख त्यांस फारच आवडत. त्या वेळचे हिंदुपंचाचे मालक कोणी दाबके या नांवाचे गृहस्थ होते. त्यांची ओळख झाली व त्यामुळें ते हिंदुपंच ऑफिसमध्यें जाऊन बसत व तेथें येणारीं निरनिराळीं वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें ते तासचे तास वाचीत बसत व पुढें पुढें ते त्यांत लेखहि लिहूं लागले. अशा रीतीनें त्यांस मराठींतच गोडी लागली.

विनायकरावजींस सुदैवानें फारच चांगले हेडमास्तर मिळाले होते. कै. जनार्दन बाळाजी मोडक यांचें चरित्र मोठें अनुकरणीय होतें व तें इतरत्र वेगळें प्रसिद्धहि आहे. ते सच्छील, उद्योगी व विद्याव्यासंगी असत. त्यांना प्राचीन कवी व कविता यांचा फार नाद असे हें त्यानीं चालविलेल्या ' काव्येतीहाससंग्रहा ' वरून व ' काव्यसंग्रहा ' वरून सहज कळून येण्यासारखें आहे. अशा गुरूस विनायकरावांसारखा नादी शिष्य मिळाला व त्यानें गुरुजींचें आवडतें काम हातीं घेतलें. ते काव्यसंग्रहांतील जुन्या कविता वाचूं लागले. त्यामुळें त्यांस मराठी काव्यें वाचण्याची गोडी लागून साहाजीक शाळेंतील अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊन चार वर्षांत संपणारा हायस्कूलांतील अभ्यास क्रम संपविण्यास विनायकरावजींस ७।८ वर्षें लागलीं. हायस्कूलमध्यें असल्यापासूनच मराठी कवींच्या काव्यांबद्दल व त्यांच्या चरित्रांबद्दल ते बारीक बारीक निबंध लिहूं लागले होते व अशा रितीनें त्यांचा मराठी वाङ्मयावरील व्यासंग वाढत वाढत गेला.

पुष्कळ प्रतिभावान् माणसांच्या चरित्रांत असें आढळतें कीं लहानपणीं त्यांच्या अंगीं कोणतेच अलौकिक गुण नसतात; पण वयाच्या एका विशिष्ट काळीं, त्यांच्या अंतरंगांत मोठा फरक होतो. मनांत जणूं एक क्रांति होते व त्यामुळें त्यांच्या चरित्रास एक नवीनच वळण लागतें. इंग्रजी

शाळा सुटून विल्सन कॉलेजांत गेल्यावर विनायकरावांच्या अंतरंगांत असें मोठें स्थित्यंतर झालें. अभ्यासाविषयींचा बेफिकिरपणा तेथें मावळला व त्यांचा नैसर्गिक नादिष्टपणा त्या शिक्षणांतच प्रगट होऊं लागला. कॉलेजमध्यें प्रोफेसर अलेक्झँडर नांवाचे एक शिक्षक त्यांस लाभले व प्राणीशास्त्र व वनस्पतीशास्त्र हे विषय विनायकराव त्यांचेपाशीं शिकूं लागले. प्रो. अलेक्झँडरच्या हाताखालीं विद्येची व विशेषत: या शास्त्रांची त्यांस इतकी गोडी लागली कीं तीस सर्वजण वेडच म्हणूं लागलीं. ठाण्याच्या आसपास वेळ अवेळ न जाणतां कितितरी मैल हवें तितकें फिरावें, निरनिराळे प्राणी व निरनिराळ्या वनस्पती बारकाईनें पहाव्या याचा त्यास मोठा नाद लागला. हा नाद कमी अधिक प्रमाणांत त्यांस अखेरपर्यंत होता. या शास्त्रासंबंधीं उत्तर वयांत त्यांनीं अनेक निबंध लिहिले असून व्याख्यानेंहि दिलीं आहेत. या नादामुळें शास्त्रीय सृष्टिनिरीक्षणासाठीं इतस्तत: फिरण्याची त्यांस त्यावेळीं संवय लागली व पूर्वीचा शाळेंतील हूडपणा या दिशेनें व्यक्त होऊं लागला. कॉलेजमध्यें अभ्यास करून आपण परिक्षेंत वर यावें असा त्यांचा मुळींच प्रयत्न नसे. शिकवलेल्या विषयाची गोडी लागून त्यांतच दंग व्हावें ही त्यांची वृत्ति असल्यामुळें परिक्षांचा विचार करण्यास त्यांच्या मनास फुरसत नसे. साष्टी तालुक्यांत ते या नादाच्या पायीं इतकें हिंडलेले होते कीं एखादि वनस्पती किंवा एकादें झाड कोठें सांपडेल असा प्रश्न निघाला असतां तें नक्की अमुक ठिकाणीं आहे असें ते घरबसल्या सांगत. निरनिराळे प्राणी व कीटक बाळगावे व त्यांचा जीवनवृत्तांत प्रत्यक्ष पाहून तो रोजनिशींत संगतवार लिहावा असेंहि ते अनेकवार करीत. अलीकडच्या शिक्षणांत पूर्वींपेक्षां शास्त्रीय शिक्षण अधिक येऊं पहात आहे; पण त्यांत असला नादीपणा उत्पन्न करण्याचा प्रयत्न शिक्षक कधींही करीत नाहींत. जोंवर हा नादिष्टपणा विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न झालेला नाहीं तोंवर हें हल्लींचें शास्त्रीय शिक्षण नीरस, अतएव फोल होईल असें रा. विनायकराव नेहमीं म्हणत असत. शास्त्रीय शिक्षणाबरोबर मराठीचा व्यासंगहि विनायकराव यांनीं

कॉलेजमध्यें ठेविलेला होता. कॉलेजमध्यें आपल्या खोलींत मित्रमंडळीस जमवून महिपती, श्रीधर, मुक्तेश्वर, अमृतराय वगैरे कवींचे उतारे वाचण्याचा त्यांस नाद असे व जुनी मराठी पुस्तकें गोळा करणें, जुन्या बाजारांत जाऊन जुन्या मराठी मासिकांचे अंक विकत घेणें हे उद्योग ते वारंवार करीत. कॉलेजांत असतांनाच " महाराष्ट्र-सारस्वत " ग्रंथाची प्रथमावृत्ति त्यांनी लिहिली आणि मराठी ग्रंथसंग्रहालय नांवाची संस्था त्यांनीं ठाणें येथें शके १८१५ (सन १८९३) मध्यें स्थापिली. या दोन्ही उद्योगांची माहिती पुढें येणारच आहे.

रा. विनायकरावांच्या शिक्षणाकडे त्यांच्या वडिलांनीं फारसें लक्ष दिलेलें नव्हतें. ते ठाण्यास वकील होते. त्यांस फौजदारी प्रॅक्टिस बरीच असे. आपल्या धंद्यांत ते निष्णात आहेत असा त्यांचा लौकिक होता. पण ते फक्त मराठी वकील होते. त्यांचीं मतें व स्वभाव जुन्या वळणाची होती. पैशाच्या दृष्टीनें ते बरेच चिकट असत. मुलास घरीं शिकविण्यास शिक्षक ठेविला तर त्यास वेतन देतांना त्यांस मोठें कठीण वाटे. ते खाऊन पिऊन सुखी होते, पण फारसे श्रीमंत नव्हते. त्यांच्या स्वभावांत एक प्रकारचा हट्टी-पणा होता व त्याचा त्रास विनायकरावांस शिक्षणाच्या बाबतींत अनेकवार होई. रा. विनायकराव कॉलेजांत गेले ते वडिलांच्या संमतीनें गेले; पण ही वडिलांची संमति शिकण्याविषयींची होती, फी देण्याविषयींची नव्हती. वडिलांपाशीं फी मागावयास गेले म्हणजे कॉलेज-मधून नांव काढ असें ते त्यांस सांगत. अर्थात् अशा अडचणीमुळें विनायकराव यांस आपली फी अनेक हप्त्यांनीं भरण्याचा प्रसंग येई. रा. विनायकराव यांचे वडील जरी जुन्या समजुतीचे व कांहींसे आग्रही आणि चिकट असले तरी ते आपल्या कुटुंबाची व्यवस्था नीटपणानें पहात. सर्व कुटुंबाची रहाणी चांगल्या प्रकारची असे व घरच्या मुला-बाळांस सुखही असे. सन १८९८ सालीं ठाणें येथें प्लेग झाला व विनायकरावांच्या घरीं उंदीर मरूं लागले. त्यांचे वडील हट्टीपणानें

दुसरीकडे रहावयास जाईनात. तेव्हां विनायकरावांस एकटेंच दुसरीकडे रहावयास जाणें भाग पडलें. त्यावेळीं वडिलांस प्लेग होऊन त्या आजारांतच ते वारले. त्यावेळीं एकंदर कुटुंबाची सांपत्तिक स्थिति विशेष चांगली नव्हती व विशेष वाईटहि नव्हती. घरीं रोख असा पैसा फारसा नव्हता. इस्टेट बरीच होती, पण तीव्र कर्जाचा बोजाहि होता. अशा स्थितींत एल्एल्. बी. होऊन वडिलांचा वकिलीचा धंदा पुढें चालवावा असें त्यांस वाटूं लागलें. वडील हयात असतांना त्यांनीं कायद्याच्या अभ्यासास थोडी सुरवातहि केलेली होती. ज्या सावकारांनीं त्यांचे वडिलांस इस्टेटीवर कर्ज दिलें होतें ते वडिलांच्या मागें पैशाचे तगादे लावूं लागले. त्यांच्या वडिलांनीं ठाण्याहून बारा मैलांवर बेलापूरजवळ सोनखार नांवाचा एक मोठा मिठागर विकत घेतला होता. या मिठागराच्या खरेदीपायीं त्यांना सुमारें तीसपस्तीस हजार कर्ज काढावें लागलें होतें. सावकारांचा डोळा या मिठागरावर आहे, व तो मिठागर हातीं यावा यासाठीं मुद्दाम अडचणींत घालून सावकार पैशाचा तगादा लावीत आहेत हें विनायकरावांच्या लक्षांत आलें. मिठाचा व्यापार यशस्वीपणें करून पैसे मिळवावे व अशा रीतीनें आपला मिठागर आपल्या मुठींत घट्ट ठेवावा याची अक्कल या पुस्तकें शिकलेल्या ब्राह्मणाच्या मुलांत नाहीं, अर्थातच पैशाच्या तगाद्यानें हें मिठागर आपल्या ताब्यांत सहजच येईल अशी सावकारांची अपेक्षा होती. पण याच गोष्टीनें विनायकराव इरेस चढले व एक दिवस पूर्ण विचार करून त्यांनीं वकिलीचा अभ्यास सोडून दिला व ते मिठाच्या व्यापारांत पडले. यावेळीं त्यांनीं आपलीं कायद्याच्या अभ्यासाचीं पुस्तकें हट्टानें जाळून टाकिलीं असें त्यांचे सहाध्यायी सांगतात. आपण जातीनें ब्राह्मण असलों व जरी आपणांस व्यापाराचा अनुभव नसला तरी ब्राह्मणाची अक्कल व्यापारांतहि चालते हें आपण सिद्ध करावें अशा ईर्षेनें त्यांनीं व्यापार सुरू केला. प्रारंभीं त्यांस कोणत्याच गोष्टीची अनकूलता नव्हती. मिठागराच्या व्यवस्थेची माहिती नाहीं, मिठाच्या व्यापाराशीं परिचय नाहीं, पैशाचीं ऊब नाहीं,

व्यापारांत आपणास सहाय्य करण्यास कोणी इष्टमित्र नाहींत अशा स्थितींत आपल्या व्यापाराची नीट घडी बसविणें त्यांस प्रारंभीं अत्यंत कठीण गेलें. प्रारंभीं या व्यापारांत अष्टौ प्रहर खपावें लागे. पहांटे उठावें रात्रीं उशीरा यावें, पोटभर जेवण मिळाल्यासहि ठीक, न मिळाल्यासहि ठीक अशा प्रकारच्या सक्त मेहनतींत त्यांस प्रारंभींचा काळ घालवावा लागला. मग कांहीं वर्षांनीं त्यांच्या धंद्याचा जम ठीक बसला. पत वाढली व हळूहळू घरीं बसूनहि आपला व्यापार त्यांस नीटपणें चालविण्याची व्यवस्था करितां आली.

मिठाच्या व्यापाराकरितां रा. भावे यांस मद्रास, कोचीन, अहमदनगर, राहुरी वगैरे अनेक ठिकाणीं पेढया काढाव्या लागल्या. त्यांस त्या ठिकाणीं नेहमीं जावें लागे. या प्रवासाचा त्यांनीं आपल्या वाङ्मयविषयक आवडीच्या कामीं पुष्कळ उपयोग करून घेतला. नगर जिल्हा व निजामाचें राज्य यांत पैठण, आपेगांव, देवगिरी, औरंगाबाद वगैरे ऐतिहासिक दृष्ट्या पुष्कळ महत्वाचीं ठिकाणें आहेत. या ठिकाणीं तसेंच देहू आळंदी, पंढरपूर वगैरे ठिकाणीं ते आपला व्यापार चालू असतां प्रवास करीत व महाराष्ट्रीय संताविषयींची माहिती व त्यांच्या अप्रसिद्ध ग्रंथांचीं बाडें ते मिळवीत. मिठाचा व्यापार सबंध वर्षभर चालत नाहीं. पावसाळ्यांत तें काम बंद असते. या वेळीं ते प्रवास करीत. निरनिराळ्या संतांच्या गांवीं जाऊन त्यांच्या वंशजांच्या गांठी घेत आणि माहिती मिळवीत. उद्योगाची चिकाटी आणि बुद्धिमत्ता यांस नशिबाची जोड मिळून कालगत्या विनायकरावांस व्यापारांत बरकत आली; मग त्यांनीं व्यापाराचें प्रमाणहि वाढविलें. आणि सुमारें दहा वर्षांत त्यांस चांगली श्रीमंती प्राप्त झाली.

रा. विनायकराव कॉलेजमध्यें असतांना त्यांच्या सभोंवतीं ठाण्यास एक मित्रमंडळीचा संघ जमत चालला होता. सार्वजनिक कामाची हौस या सर्व मित्रमंडळीमध्यें असे व या हौसेमुळेंच त्यातील माणसें एकमेकांकडे आकर्षिलेलीं असत. या संघांत निरनिराळ्या मनोवृत्तींची व भिन्नभिन्न

योग्यतेचीं अनेक माणसें होतीं. ही मंडळी परस्पराशीं मनमुराद गप्पा मारीत बसत व विचारविनिमय करीत. या मंडळींत बरीच माणसें बेताच्याच बुद्धीचीं व कर्तबगारीचीं होतीं. सरकारी कचेऱ्यांत बहुतेकजण नोकरी करून असत. जरी या मंडळीमध्यें बुद्धीची विशेष चमक नसली, कर्तव्यशक्ती यथातथाच असली, नवीन कल्पना काढण्याची योग्यता फारशी दिसत नसली, तरी त्या सर्वांस परस्परांविषयी ओढ वाटे व आपण कांहींतरी करावें अशी अंधुक पण जोराची हौस वाटे. या सर्व मंडळींत चिकाटी होती व पडेल त्या गोष्टी आवडीनें हीं माणसें करीत. या संघांत विशेष महत्वाच्या दोन व्यक्ति होत्या. पैकीं पहिले विनायकराव भावे व दुसरे विष्णु भास्कर उर्फ बाबा पटवर्धन. हीं दोन्हीं माणसें अनेक बाबतींत असामान्य होतीं. प्रखर बुद्धीमत्ता, जबर नाद, कर्तृत्वशक्ति हे गुण विनायकराव यांचे अंगीं चांगलेच होते, व पैशाचीहि अनुकूलता हा आणखी एक विशेष गुण त्यांचेमध्यें नंतर आला. पटवर्धन हे बुद्धीमत्ता व उत्साह या बाबतींत विनायकरावांपेक्षां तिळमात्र कमी नव्हते. उद्योगाची चिकाटी, वैयक्तिक प्रेमळपणा, नैतिक ध्येयनिष्ठा, जवळ ओढलेल्या माणसास कायमचें आपलेसें करण्याची हातोटी, दुसऱ्या माणसास हरएक बाबतींत सहाय्य करण्याची तत्परता या गुणांत ते विनायकरावांपेक्षां वरचढ होते. पण त्यांचें शिक्षण फक्त मॅट्रिकपर्यंत झालेलें असून घरची स्थिति गरीबीची व अडचणीची होती. ज्या व्यक्तींशी त्यांचा संबंध आला त्या सर्वांस जरी त्यांची योग्यता कमी अधिक प्रमाणांत जाणवली तरी अनुकूलतेच्या अभावीं त्यांच्या कर्तबगारीस फारसा वाव मिळाला नाहीं. पटवर्धन व विनायकराव यांची लहानपणींच मैत्री झाली व परस्परांच्या अनेक गुणांमुळें ती अत्यंत दृढ होऊन त्या दोघांस आपणांसभोंवती ठाणें येथें फार चांगला असा उत्साही माणसांचा गट बनवितां आला.

या संघाच्या मदतीनें रा. विनायकराव यांनीं १८९३ सालीं म्हणजे आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षीं ठाणें येथें मराठी ग्रंथसंग्रहालय स्थापन

केलें. ग्रंथसंग्रहालय स्थापन करणें ही गोष्ट आज आपणांस विशेषशी मोठी वाटत नाहीं. पण सुमारें पन्नास वर्षांपूर्वींची स्थिति अगदीं वेगळीं होती. निव्वळ मराठी पुस्तकांचें संग्रहालय त्यावेळीं महाराष्ट्रांत कोठेंहि अस्तित्वांत नव्हतें. मराठी व इंग्रजी पुस्तकांचीं वाचनालयें त्यावेळीं असत, पण अशा संस्था इंग्रजी पुस्तकें खरेदी करण्यांतच बहुतेक सर्व पैसा खर्च करीत व मराठी ग्रंथांकडे फारसें कोणाचें लक्ष नसे. मराठी ग्रंथसंग्रहालय काढण्यांत विनायकराव यांचे दोन हेतु होते. एक महाराष्ट्रीय जनतेमध्यें मराठी भाषेची अभिरुचि वाढवून तीविषयीं प्रेम व अभिमान उत्पन्न करणें, व दुसरा म्हणजे मराठी ग्रंथ व मासिकें प्रसिद्ध झाल्यावर दुर्मिळ होऊन शेवटीं नामशेष होतात, यासाठीं सर्व ग्रंथांचा संग्रह करून त्यांस चिरस्थायी करणें. या दोन्ही हेतूनें प्रेरित झाल्यामुळें ग्रंथसंग्रहालयाच्या 'वाचनालय' व 'संग्रहालय' अशा दोन शाखा करण्यांत आल्या. पहिल्या शखेंतील पुस्तकें वाचकांस वाचावयास मिळतात. दुसऱ्या शाखेंतील मिळत नाहींत. सर्व पुस्तकाचा संग्रह करून वाङ्मयसंशोधक व ग्रंथकार यांस त्यांचा उपयोग व्हावा म्हणून हे ग्रंथ चिरकाल टिकविणें हें कार्य या दुसऱ्या शाखेचें आहे. पुष्कळ जुने व दुर्मिळ ग्रंथ या शाखेंत आहेत. लोकमान्य टिळकांस चिरोल केसच्या वेळीं एका दुर्मिळ ग्रंथाची जरूरी लागली. तो इतरत्र मिळेना, पण तो त्यांस संग्रहालयानें दिला. त्या वेळीं संग्रहालय स्थापण्याच्या बाबतींत विनायकराव व त्यांचे स्नेही यांस बराच उपहास सोसावा लागला, व पुष्कळ अडचणीहि आल्या. पण ग्रंथसंग्रहालयाची उपयुक्तता थोड्याच काळानें लोकांच्या ध्यांनात आली. ठाण्याचें अनुकरण लवकरच मुंबईनें केलें. यथाकाल इतर ठिकाणींहि तशा संस्था महाराष्ट्रभर आज स्थापण्यांत आल्या आहेतच.

पुढें १९०३ सालीं रा. विनायकराव यांनीं ग्रंथसंग्रहालयाचें म्हणून एक 'महाराष्ट्र कवि' नांवाचें मासिक काढलें. तें सुमारें चार साडेचार वर्षे चाललें. इंग्रजी अमदानीच्या पूर्वी होऊन गेलेल्या मराठी कवींची

अप्रकाशित कविता प्रसिद्ध करणें हा या मासिकाचा हेतु होता, व जोंपर्यंत हें मासिक चाललें होतें तोंपर्यंत या दिशेनें मासिकानें उत्कृष्ट वाङ्मयसेवा केलेली आहे. वाङ्मयेतिहासाच्या व भाषेच्या दृष्टीनें महत्वाचे असे अनेक ग्रंथ या मासिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. महाराष्ट्रकवि व ग्रंथसंग्रहालय या दोन्ही संस्थांतील बुद्धिमत्तेचीं कामें रा. विनायकराव करीत. इतर आवश्यक कामें इतर मित्रमंडळी करीत. प्रवास करून व जुन्या कवींच्या विद्यमान वंशजांकडे खेपा घालून जुनें वाङ्मय मिळविणें, वांचून त्यांतील महत्वाच्या गोष्टींचा अभ्यास करणें, हे ग्रंथ मासिकांत प्रसिद्ध करतांना त्यांच्या प्रस्तावना लिहिणें, संग्रहालयांत सभा भरवून वादविवाद करणें, संस्थेचे रिपोर्ट लिहिणें हीं कामें विनायकराव करीत असत. संग्रहालयाचे वर्गणीदार वाढविणें, संस्थेचा हिशेब ठेवणें, पुस्तकें देणें, घेणें, जुन्या पोथ्यांच्या नकला करणें, मुद्रितें तपासणें, छापखान्यांत जाणें करणें वगैरे कामें त्यांची मित्रमंडळी करीत. विनायकरावांस असलीं कामें करण्याचा मनापासून कंटाळा असे. फक्त बुद्धिप्रधान गोष्टींकडे त्यांचा ओढा असे. त्यांच्या इतर मित्रमंडळीस त्या गोष्टींत तितकें गम्य नव्हतें, पण काम करण्याची खरी हौस त्यांस असल्यामुळें मासिक व संग्रहालय या संस्थांतील इतर सर्व आवश्यक पण जिकिरीचीं कामें ही मंडळी आस्थेनें करीत. हा श्रमविभाग निसर्गप्राप्तच होता व तो सुमारें पंधरा वर्षें अव्याहत चालला. पण पुढें जसजशा विनायकरावांच्या स्नेह्यांच्या नोकरीच्या निमित्तानें बदल्या होऊन पांगापांग झाली तसतशा नव्या अडचणी उत्पन्न झाल्या. रा. विनायकरावांच्या विशेष परिचयाचीं नाहींत अशीं माणसें स्वयंसेवक म्हणून संग्रहालयांत कामास येऊं लागलीं. त्यांचें लक्ष ग्रंथसंग्रहालय टापटीप व व्यवस्थेनें चालवावें, त्याचे वर्गणीदार वाढवावे, त्यास स्वतःची इमारत असावी असल्या गोष्टींकडे अधिक असे. नवीन वाङ्मय संस्थेनें छापावें, वाङ्मय संशोधन व इतिहास संशोधन या बाबी तिनें प्रमुखपणानें हातीं घ्याव्यात, त्यासाठीं

सर्व पैसे खर्च करावेत, त्या दिशेनें अभ्यास करणारांचा संग्रहालयांत एक गट असावा असें विनायकराव यांस वाटे. या दोन्ही गोष्टींचें तारतम्य ठेवून या दोन्ही विचारांच्या मंडळीस एकत्र सांधणारा दुवा म्हणजे रा. पटवर्धन ही व्यक्ति होती. पण पटवर्धन वारल्यानंतर हा दोन्ही प्रवाहांतला दुवा गेल्यामुळें रा. विनायकराव व ग्रंथसंग्रहालय यांमधील निकटपणा कमी झाला, इतकेंच नव्हे तर त्यांत कांहीं खासगी गोष्टींची भर पडल्यामुळें ग्रंथसंग्रहालय व विनायकराव यांचे मध्यें कांहीं द्विधा-भावहि उत्पन्न झाला.

या सर्व कारणांमुळें रा. विनायकराव हे सुमारें १९१० सालापासून वाङ्मयाभिरुचीच्या व तसल्या उद्योगांच्या बाबतींत ठाण्यास बऱ्याच अंशानें एकटे पडल्यासारखे झाले होते. ठाणें शहर लोकसंख्येनें फारसें मोठें नाहीं. तेथील बरीच पांढरपेशी माणसें सकाळीं नऊच्या गाडीनें पोटासाठीं मुंबईस जावयाचीं व रात्रीं सात आठ वाजतां परत यावयाचीं. पोटापाण्यापलिकडे पाहण्याची आवड फारच थोड्या लोकांस. अशा प्रतिकूल परिस्थितीमुळें रा. विनायकरावांसभोंवतीं प्रथम जमलेल्या माणसाचा गट विस्कळित झाल्यावर तसा दुसरा गट जमणें कठिण होतें. तसा जमविण्याचा प्रयत्न त्यांनीं करून पाहिला पण तो यशस्वी झाला नाहीं. माणसें गोळा करण्यास जशी मनोवृत्ती जरूर असते तशी विनायकरावांची नव्हती. वाङ्मय-संशोधन, इतिहास-संशोधन यांत जो मनुष्य हुशार असेल, किंवा इतरत्र ज्याची बुद्धिमत्ता कुशाग्र असेल अशाच माणसाशीं ते बरोबरीच्या नात्यानें बोलत, वाद-विवाद करीत. अशांची प्रतिकुल टीका आवडीनें ऐकत. पण सामान्य प्रतीच्या माणसाशीं बरोबरीनें व प्रेमानें वागणें त्यांस जड जाई. ज्ञानाच्या भट्टींत पक्क्या भाजलेल्या मडक्यास ते चटकन् ओळखीत व त्याचें आघात आपणावर झाले तरी त्यांस त्यापासून आनंद वाटे. पण कच्चें भाजलेलें मडकें पक्कें भाजण्यासाठीं स्वतःजवळ ठेवून घेण्याची कला त्यांचे स्वभावांत नव्हती. ते पुढें पुढें बरेच श्रीमंत झाले.

बोलण्यांत ते स्पष्ट, जरूरीपेक्षांहि अधिक स्पष्ट असत. म्हणून बहुतेक सर्व तरुण माणसें त्यांच्या स्पष्टवक्तेपणास भिऊन त्यांच्यापासून दोन पावलें दूर रहात. यामुळें त्यांच्या वाङ्मय-सेवेंत त्यांस मदत करणारीं, निदान त्यांस प्रोत्साहन देणारीं फारशीं माणसें त्यांस ठाण्यास भेटलीं नाहींत, उलट कित्येक स्नेही त्यांस या व्यवसायाबद्दल हंसतही असत !

विनायकराव यांची कामाची पद्धत कित्येक बाबतींत अगदीं गबाळ-पणाची असे. त्यांची आरंभापासूनची संवय अशी असे कीं पहिल्याप्रथम उद्दिष्ट विषयावर सारखा विचार करावयाचा, इतका कीं दुसऱ्या कोणत्याही विषयास त्यावेळीं थारा मिळूं नये. डोकें जणू फुटेल इतका ते विचार करीत. अशा रीतीनें सामुग्रीची व विचाराची जुळवाजुळव, विषयाची मांडणी, वगैरेचा पक्का नकाशा ते आपल्या मनांत सबंध आखीत. मग त्या मनांतील संग्रहास तोंड फुटे व ते लिहिण्यास प्रारंभ करीत. एकदां त्यांनीं लिहिण्यास प्रारंभ केला म्हणजे त्यावेळीं दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीस त्यांच्या डोक्यांत वाव नसे. ते लिहावयास बसले म्हणजे दिवस, रात्र, जेवणखाण, वेळअवेळ यांची त्यास फारशी शुद्ध नसे. ते होतां होईल तों लिहावयास बसावयाचे नाहींत व एकदां बसले म्हणजे उठावयाचे नाहींत. असें त्यांचें लेखन अपरात्रींहि होई. त्यास ताळतंत्र मुळींच नसे. अमुक वेळ अमक्या कामाचा असा त्यांचा नियमच नव्हता. ते लिहित तें स्फूर्तीनें लिहित, व एकदां लिहूं लागले म्हणजे हवें तितकें लिहित, झटक्यासरसें आणि भराभर लिहित आणि एकदां लिहिण्यांत कांहीं कारणानें खंड पडला म्हणजे नंतर लेखणी उचला-वयाचाहि ते कंटाळा करीत. पुढें पुढें श्रीमंती आल्यावर व त्यांची पत्नी घरांत कर्ती झाल्यावर त्यांच्या घरीं टापटीप व व्यवस्था हीं दिसूं लागली, व घरास नामरूपहि आलें. पण पूर्वी त्यांच्या घरांत सर्वत्र गोंधळ असे. घरांतील एकादी त्यांची जिन्नस शोधावयाची असली तर महाराष्ट्र-संतांच्या घरीं जसलें संशोधन त्यांस करावें लागलें होतें तसलें त्यांच्या स्नेह्यांस त्यांच्या घरीं करावें लागे. पुष्कळदां जूनीं हस्तलिखितें आणि

पुस्तकें रॅकेलच्या सुवासित खोक्यांत भरून ठेवलेलीं असत व एकादें पुस्तक लागलें तर तो खोका सबंध पालथा घालावा लागे. टाक व शाई या जिनसा घरांत नेहमीं असतच असें नाहीं; असल्या तरी कधींकधीं त्या सांपडत नसत. पुढें त्यांच्या पत्नीच्या व घरांतील इतर माणसांच्या प्रयत्नांमुळें या बाबतींत बरीच सुधारणा झालेली होती.

रा. विनायकराव यांचें वाचन मराठी भाषेच्या पलीकडे पुष्कळच असे. वर्तमानपत्रें व कादंबऱ्या यांची त्यास आवड नसे. शास्त्रीय विषय ते हौसेनें वाचीत. इंग्रजी वाङ्मय व काव्य पुष्कळ वाचीत. जुनें मराठी काव्य व जुन्या बखरी यांची त्यास फार अभिरुची होती. इतकी कीं त्यांच्या भाषेस तें वळण लागलेलें आहे. मराठी आधुनिक कविताहि ते वाचीत. पण अलीकडच्या मराठी कवींविषयीं त्यांचें मत तितकें चांगलें नव्हतें. आधुनिक कवींच्या कृति हलक्या आहेत असें ते म्हणत असत. त्यांचा त्यांवर असा आक्षेप असे कीं हे आधुनिक कवी फार थोडें लिहितात. ते म्हणत कीं थोडेंच लिहावयाचें असेल तर अगदीं सामान्य माणसालाहि त्यांत काव्य आणितां येईल. जुन्या काळचे कवी भरजरी पितांबर विणतात व हल्लींचे कवी अरुंद लंगोटी विणतात, असें त्यांचें बोलणें असे. मराठी कवीतेइतका त्यांस इंग्रजी कवितेचा नाद नव्हता. संस्कृत कवितेचा तर सर्वांत कमी होता. त्यांनीं मराठी काव्य इतक्या अभिरुचीनें वाचलेलें होतें कीं त्यांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत त्यांतील शब्दयोजना सहज प्रकट होत असत. मनास करमेनासें झालें म्हणजे ते मराठी काव्य वाचीत किंवा कुटुंबांतल्या मंडळीकडून मोठ्यानें वाचवून घेत.

पाश्चात्यांच्या ऐतिहासिक पुरुषांमध्यें त्यांस नेपोलियनची फार हौस होती. एके वेळीं प्रस्तुत लेखकाशीं गप्पा मारीत असतांना नेपोलियन एल्बाहून पॅरिसला कसा गेला व वाटेंत आपल्याविरुद्ध आसलेल्या सैन्यासमोर त्यानें आपली छाती उघडी करून कशी दाखविली व कोणाहि सैनिकानें कशी त्याच्यावर गोळी मारली नाहीं; इतकेंच नव्हे तर तें सर्व

शत्रुसैन्य नेपोलियनला कसें येऊन मिळालें याची हकीगत मोठ्या हौसेनें व आवेशानें सांगत होते. त्या वेळीं प्रस्तुत लेखकानें त्यांस नेपोलियनचें चरित्र मराठींत लिहिण्याचा आग्रह केला व या आग्रहाची दोनचारदा पुनरावृत्ति केली. शेवटीं त्यानीं १९१५ सालीं दसऱ्याच्या दिवशीं नेपोलियनचें मराठी चरित्र लिहिण्याची सुरवात केली व तें चरित्र १९१७ सालीं प्रसिद्ध झालें. त्याची दुसरी आवृत्ति १९२१ सालीं निघाली.

त्यांचें नेपोलियनचें चरित्र बऱ्याच परिश्रमानें लिहिण्यांत आलेलें आहे, व महाराष्ट्रीय लोकांस ज्या प्रकारचें चरित्र पाहिजे त्याच प्रकारचें तें आहे. नेपोलियनच्या काळीं सुशिक्षित माणसें आपापल्या रोजनिशा लिहीत असत. नेपोलियनच्या सभोंवतीं असणाऱ्या माणसांच्या रोजनिशा प्रसिद्ध आहेत. मुख्यतः त्या गोळा करून त्यांच्या आधारानें विनायकराव यांनीं " चक्रवर्ती नेपोलियन " हें आपलें पुस्तक लिहिलें. मराठी भाषेंत जे चरित्रग्रंथ झाले आहेत त्यांमधील उत्कृष्ट ग्रंथांत तें मोडण्याजोगें आहे. नेपोलियन कोणत्या परिस्थितींतून वर आला, त्यानें काय काय गोष्टी केल्या, त्याच्या अडचणी काय होत्या, त्याचा स्वभाव व संवयी कोणत्या प्रकारच्या होत्या, त्यानें कोणकोणत्या दिशांनीं कसकसे प्रयत्न केले या गोष्टी या पुस्तकांत विस्तारानें सांगण्यांत आल्या आहेत आणि त्यामुळें पुस्तक फार सरस व हृदयंगम झालें आहे. पुस्तकाची मांडणी आणि भाषा बखरीवजा आहे. भाषेंत संस्कृत शब्द फारसे नाहींत व अस्सल मराठी व शाहिरी थाट त्यांत आहे. भाषापारंगत् व सुसंस्कृत अशा ब्राम्हणास शोभणारी भाषा त्यांच्या ह्या पुस्तकांत फारशी नाहीं. जवानमर्द ब्राम्हणभाई माणसानें जसें लिहावें, शिवाजी आणि पेशवे यांच्या इतिहासाच्या अभिमान्यानें जसें लिहावें, तशा प्रकारचें हें पुस्तक उतरलें आहे. त्यांत भाषेचा डौल संस्कृत--भाषेचा नव्हे तर मराठी भाषेचा डौल--आणि मराठी भाषेचा जोर हीं अधिक आहेत आणि त्यामुळें इतर अनेक चांगल्या ग्रंथकारांचीं पुस्तकें वाचतांना न वाटणारा आपलेपणा

वाचकांस वाटतो. या पुस्तकाचें महत्त्व मराठी वाचकांस नीटपणें जाणवलें आहेसें आम्हांस वाटत नाहीं. माझी पुस्तकें मी वृत्तपत्रकारांकडे आणि इतर शिष्ट लोकांकडे अभिप्रायार्थ पाठवून चांगला अभिप्राय देण्याविषयीं त्यांची मी विनवणी करीत नाहीं आणि त्यामुळें माझ्या पुस्तकांचा लोकांमध्यें बोलबाला होत नाहीं असें रा. विनायकराव वारंवार म्हणत असत. त्यांची सांपत्तिक स्थिति उत्कृष्ट असल्यामुळें आपल्या पुस्तकांपासून त्यांनीं पैचीहि आशा धरली नव्हती आणि त्यांचा स्वभाव मानी असल्यामुळें आपल्या पुस्तकांवर चांगले अभिप्राय वर्तमानपत्रांनीं द्यावे यासाठीं खटपट करणें हें त्यांस अर्थातच कमीपणाचें वाटे. इतर सर्व लेखकांस जर असेंच वाटूं लागेल तर मराठी वाङ्मयांतील सरस-नीरस भागांची निवड करणें जनतेस सुलभ होत जाईल, याविषयीं संशय नको.

या पुस्तकापेक्षां त्यांचा अधिक महत्वाचा ग्रंथ म्हणजे 'महाराष्ट्र-सारस्वत' हा होय. चक्रवर्ती नेपोलियन लिहितांना रा. भावे यांस नवीन संशोधन असें कांहींच करावें लागलें नाहीं. महाराष्ट्र-सारस्वतांत भाषासंशोधक व इतिहाससंशोधक या नात्यानें बरेंच कार्य त्यांस करणें भाग पडलें. हा ग्रंथ पहिल्यानें अगदीं लहान प्रमणांत त्यांनीं एकोणीस–शेंच्या पूर्वीं लिहून तो कै. प्रो. विजापूरकर यांच्या ग्रंथमालेंत निबंध रूपानें प्रसिद्ध केला. तो सुमारें शंभरसव्वाशें पानांचा असेल. तेव्हां-पासून मराठी वाङ्मयाचा संगतवार इतिहास लिहिण्याची त्यांची महत्वा-कांक्षा होती. पण संगतवार इतिहास लिहिण्यास सामग्रीची पूर्व तयारी अवश्य आहे. १८९५-च्या सुमारास ती फारच तुटपुंजी होती. ती सामग्री गोळा करण्याचें काम रा. भावे यांनीं बऱ्याच मोठ्या प्रमाणावर केलें. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील इतर इतिहाससंशोधकांनींहि सन १८९५ पासून पुष्कळ काम केलेलें असून नंतरहि सामग्री बरीच जमलेली आहे. या वाढत्या सामग्रीचा पूर्ण उपयोग करून रा. भावे यांनीं आपला महाराष्ट्र–सारस्वत हा ग्रंथ पुनः लिहिला. मराठी भाषेचा

आमूलाग्र इतिहास संगतवार देणारा हा मराठी भाषेंत त्यावेळीं एकच ग्रंथ होता. तो लिहिण्यास त्यांस कालहि बराच लागला. वीसपंचवीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या निबंधाचें हें द्वितीय संस्करण विस्तारानें त्याच्या चारपांचपट मोठें झालें आहे. हा ग्रंथ १९१९ सालीं पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें प्रसिद्ध केला. महाराष्ट्रवाङ्मयाच्या सामग्रींत रोज नवी भर पडतच आहे. १९१९ सालीं आपला ग्रंथ प्रसिद्ध झाल्या-नंतरहि रा. भावे हे या संशोधनकार्यांत नेहमी गुंतलेले असत व ते स्वतःहि अनेक प्रकारची सामग्री गोळा करीत असून या विषयाचें त्यांचें चिंतन एकसारखें चाललेलें असे. पुढें लवकरच पुष्कळ नवी माहिती उपलब्ध झाल्यानें त्यांस पुनः या पुस्तकाची नवीन आवृत्ति काढण्याची जरूर भासूं लागली. पण रा. भावे यांची प्रकृति त्यानंतर बरीच बिघडली व सर्व ग्रंथाची पुनरावृत्ति आपल्या हातानें काढिलेली आपणांस पाहतां येईल कीं काय याविषयीं त्यांच्या मनांत शंका वाटूं लागली. म्हणून त्यांनीं या विषयाचा अर्धाच भाग १९२४ सालीं प्रसिद्ध केला. पुढें रा. भावे १९२६ सालीं वारले. त्यांनीं पुढील भागाची कांहीं टिपणें तयार करून ठेविलीं होतीं, त्यांवरून १९२८ सालीं महाराष्ट्र-सारस्वताचा दुसरा भाग त्यांच्या चिरंजिवांनीं प्रसिद्ध केला.

मराठी भाषेस इतिहासाच्या सूत्रांत व्यवस्थेशीर ओंवण्याचा हा एकच प्रयत्न मराठी वाङ्मयांत व तोहि उत्कृष्ट प्रकारचा असल्यामुळें त्यांच्या ' महाराष्ट्र-सारस्वता 'स विशेष प्रकारचा मान मराठी वाङ्मयांत मिळणें आवश्यक आहे. मराठी भाषेच्या इतिहासाची व त्यांतील मोठमोठ्या कर्त्यांच्या कामगिरीची समग्र कल्पना येते. चक्रवर्ती नेपोलियन लिहिण्यास ज्या गुणांची जरूरी होती त्यांपेक्षां निराळे गुण या पुस्तकांत व्यक्त झालेले वाचकांच्या दृष्टीस पडतील. पुस्तकाचा प्रकारच वेगळा असल्यामुळें चक्रवर्ती नेपोलियनमधील बखरीच्या वळणाची भाषा क्षणभर विसरून भारदस्त व विवेचक अशा भाषेचा रा. भावे यांनीं हें पुस्तक लिहितांना अंगिकार केला आहे. चक्रवर्ती नेपोलियनमधील इतिहास–

लेखकाचा पेशा किंचित् बाजूस सारून इतिहाससंशोधकाचा पेशा त्यांनीं येथें धारण केला आहे. अर्थात् त्यांस निरनिराळ्या वादग्रस्त गोष्टींवर आपलीं मतें या ग्रंथांत नमूद करावीं लागलीं आहेत. तीं कितपत बरोबर वा चुकीचीं आहेत हें ठरविणें आम्हीं तज्ज्ञावर सोंपवितों. तशा दृष्टीनें या ग्रंथांवर मत देण्याचा आमचा अधिकार नाहीं.

हा ग्रंथ रा. भावे यांनीं विवेचक दृष्टीनें लिहिलेला आहे. भाविक दृष्टिनें लिहिलेला नाहीं. रा. भावे यांच्या मनाची वृत्तिहि जात्या विवेचक होती, भाविक नव्हती. संतांच्या वाणीचा त्यांस इतका परिचय होता कीं, त्यांची वाणी त्यांच्या जिव्हाग्रीं सदैव असे. पण संतांचा भाव मात्र त्यांच्या स्वभावांत मुळींच नव्हता. ते स्वतः 'फ्री थिंकर' होते असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति नाहीं. महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व अलिकडचीं बुद्धि-प्रधान माणसें मनांतून 'फ्री थिंकर'च आहेत असें म्हटलें तर त्यांतहि अतिशयोक्ति नाहीं. हिंदुधर्म व संतांचें वाङ्मय आपलें आहे, आपल्या पूर्वजांचें आहे या अभिमानबुध्दिनेंच अनेक महाराष्ट्रीयांचे आपल्या धर्मावर व वाङ्मयावर प्रेम असतें. विठ्ठलावर भक्तीभाव ठेवणारे, पंढरीची वारी करणें उपयुक्त आहे असें निदान म्हणणारे, अध्यात्मशास्त्र शिकण्यास गुरुमुखाची आवश्यकता आहे असें मानणारे, व उत्साहानें व हौसेनें अध्यात्मशास्त्र शिकणारे सुशिक्षित लोक आज महाराष्ट्रांत फार नाहींत; पण संतांवर श्रध्दा नसली तरी त्यांचा अभिमान बाळगणारे, व त्यांची वाणी सत्य नसली तरी ती सुंदर आहे असें म्हणणारे सुशिक्षित लोक महाराष्ट्रांत सर्वत्र आहेत. रा. भावे हे देखील या मंडळींतच मोडत. रामदास, तुकाराम, मोरोपंत, ज्ञानेश्वर यांच्या शद्ब-माधुर्यानें ते स्वतः मोहित होत व दुसऱ्यांना मोहित करीत. कंटाळा आला म्हणजे हें वाङ्मय दुसऱ्यास मोठ्यानें वाचावयास सांगावें व शांत वृत्तिनें आपण ऐकावें असें ते वारंवार करीत; पण या वाङ्मयावर त्यांचें प्रेम असलें तरी त्यांची त्यावर श्रद्धा नव्हती, मग हा गुण असो

वा दोष असो. महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व सुशिक्षित माणसांप्रमाणें तो गुण वा दोष त्यांच्यांत होता हें त्यांचें 'महाराष्ट्रसारस्वत' वाचतांना सर्वांनींच लक्षांत ठेविलें पाहिजे. रामदास व तुकाराम यामधील तुलना, तुकारामाचें स्वर्गारोहण, ज्ञानेश्वराची मनोरचना वगैरे गोष्टींविषयींचीं त्यांचीं मतें या पुस्तकांतून वाचतांना भावे यांची मनोवृत्ति कशी होती तें विसरून चालावयाचें नाहीं.

'महाराष्ट्र-सारस्वता'च्या तिसऱ्या आवृत्तीचा जो पहिला भाग प्रसिद्ध झाला त्यांतील महानुभावपंथाविषयींची बहुतेक सर्व माहिती नवीन आहे. या सर्व संशोधनाविषयींची खटपट रा. भावे यांनीं स्वतःच केलेली आहे. महानुभावपंथाविषयीं विश्वसनीय अशी फारशी माहिती अगोदर उपलब्ध नव्हती. ज्ञानेश्वर—मुकुंदराजांच्या पूर्वी मराठी भाषेंत ग्रंथरचना झाली किंवा नाहीं याविषयीं सर्व अंधारच होता. महानुभाव-पंथाचें महत्त्व काय, त्या पंथाचें वाङ्मय किती आहे, त्याचें मराठी वाङ्मयांत स्थान कोणतें, ज्ञानेश्वराच्या पूर्वी त्या वाङ्मयानें कोणती कामगिरी केली या प्रश्नांस उत्तरें मिळत नव्हतीं. महाराष्ट्रीयांच्या मनांत महानुभावपंथाविषयीं अनेक शतकें एक अढी बसलेली आहे. तो पूर्वग्रह सोडून रा. भावे यांनीं महानुभावपंथाच्या पुढाऱ्यांशीं स्नेह संपादिला. या पंथाचे लोक आपलें वाङ्मय दुसऱ्यांस दाखवीत नाहींत इतकेंच नव्हे तर तें लोकांस समजूं नये यासाठीं तें सांकेतिक भाषेंत लिहिलेलें असतें. भावे यांनीं महानुभावपंथांतील कांहीं पुढाऱ्यांचा इतका स्नेह संपादिला कीं तीं माणसें आपली अनेक शतकांची जुनी परंपरा सोडून देऊन त्यांस आपले ग्रंथ दाखविण्यास तयार झालीं. या संशोधनांत त्यांनीं ठाणें येथें बरेच महिने खर्च केले. प्रस्तुत लेखक त्या वेळीं त्यांचेकडे वारंवार जात येत असत. त्यावरून ह्या त्यांच्या उद्योगाची प्रत्यक्ष माहिती त्यांस झालेली आहे. त्या पंथाच्या माणसांचे सहाय्य घेऊन त्यांचे संकेतग्रंथ वाचले व पंथाची माहिती मिळविली. या विषया-संबंधानें त्यांनीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयासमोर एक निबंध वाचल

होता व त्या पंथाच्या वाङ्मयाविषयींची एक यादीही प्रसिद्ध केली होती. या वाङ्मयाची ग्रंथसंख्या ६–७ हजार म्हणजे केवढी मोठी आहे याची वाचकांस कल्पना येईल. या पंथांतील 'वच्छहरण' नांवाचा एक ग्रंथ त्यांनीं प्रसिध्द केला असून दुसराहि प्रसिध्द झाला आहे. डॉ. भांडारकर व लोकमान्य टिळक यांनीं या वाङ्मयाचें संशोधन करण्याचा प्रयत्न केला होता; पण त्या पंथाचीं माणसें आपलें गुप्त वाङ्मय त्यांस दाखविण्यास तयार झालीं नाहींत असें ऐकतों. संशोधनाच्या दृष्टीनें रा. भावे यांचीं ही कामगिरी अत्यंत प्रशंसनिय होय हें कोणीहि कबूल करील.

रा. भावे यांच्या मनांत बरींच वर्षें शिवाजीमहाराजांचें चरित्र लिहिण्याचें होतें. मराठींत व इंग्रजीत शिवाजीचें चांगलें चरित्र नाही. मराठींतील चरित्रें ऐतिहासिक पुराव्याच्या भरभक्कम आधाराशिवाय लीहिलेलीं आहेत. रा. भावे म्हणत असत कीं शिवाजीच्या वेळचे थोडेच अस्सल कागदपत्र आज उपलब्ध आहेत. फक्त या कागदपत्रांचा आधार घेऊन त्यांवरून सर्वथा विश्वसनीय असें शिवाजीमहाराजांचें चरित्र लिहिण्याचें त्यांच्या मनांत होतें. या चरित्राची जुळवाजुळव ते बरेच दिवस करीत होते. सर्व अस्सल कागदपत्रांचें पौर्वापर्य लक्षांत ठेवून त्यांनीं एक विस्तृत तक्ता स्वतःच्या अभ्यासाकरितां तयार केलेला होता व शिवाजीमहाराजांच्या चरित्रांतील कित्येक प्रसंगांची माहिती ते जुळवीत होते. ही जुळवाजुळव करीत असतानांच त्या त्या प्रसंगांचे कांहीं निबंध त्यांनीं कित्येक मासिकांच्या संपादकांस (त्यांनीं आग्रह केल्यावरून) प्रसिद्धीकरितां दिले होते. शिवाजीमहाराजाच्या चरित्राविषयीं त्यांचें घरीं प्रो. यदुनाथ सरकार जेव्हां जेव्हां येत तेव्हां तेव्हां भावे व सरकार यांमध्यें बरीच चर्चा होई. त्या चर्चेवरून भावे यांच्या विचारांत आपणास समजून घेण्यासारखा बराच भाग आहे असें प्रो. सरकार यांसहि दिसून आलेलें होतें. प्रो. सरकार त्यांस शिवाजीमहाराजांचें चरित्र लिहिण्याचा पत्रद्वारेंहि पुष्कळ आग्रह करीत असत.

" आपली आवड आपल्या मुलास नसते, यासाठीं तें चरित्र लवकर हातानिराळें करून टाकावें, नाहीं तर तुमची माहिती तुमचेबरोबर ल्यास जाईल " असेंहि ते त्यांस सुचवीत.

भाषासंशोधनाबरोबर इतिहाससंशोधनाविषयींहि रा. भावे यांनीं बराच उद्योग केलेला होता. भारत-इतिहासमंडळाच्या सभेमध्यें त्यांनीं कधीं कधीं निबंध वाचलेले आहेत. खेरीज 'मराठी दप्तर' या पुस्तकमालेची प्राणप्रतिष्ठा करून त्या मालेंत कांहीं ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध केलेले आहेत. असल्या वाङ्मयाची व असल्या उद्योगाची किंमत किती हें सांगण्यास त्या विषयाचा अभ्यास केलेलीं तज्ज्ञ माणसें लागत असतात. प्रस्तुत लेखक हे त्या विषयांतील तज्ञ नाहींत आणि म्हणूनच त्यांस रा. विनायकरावांच्या या उद्योगाच्या बाबतींत कांहींच मत प्रकट करतां येत नाहीं. शेवटचे बाजीराव पेशवे यांजवर मराठी राज्य बुडविण्याची जबाबदारी किती या प्रश्नाची सामान्यतः जनतेस माहीत नसणारी बाजू त्यांनीं मोठ्या कौशल्यानें या पुस्तकांपैकीं एकाची प्रस्तावना लिहितांना महाराष्ट्रासमोर मांडिली आहे. ती प्रस्तुत लेखकास विचार करण्यासारखी वाटली आणि इतर अनेक जिज्ञासूंस तशीच वाटेल अशी त्याची समजूत आहे.

रा. विनायकराव भावे यांनीं मिठाचा व्यापार १९००-च्या सुमारास सुरू केला व १९१८ सालीं तो अजिबात सोडला. या अवधींत त्यांस व्यापारांत पुष्कळ पैसा मिळाला व असा मुबलक पैसा आणखी पुढें मिळण्याची जवळजवळ खात्री असतांहि व्यापाराचा कंटाळा येऊन आणि वाङ्मयसेवेस आपण स्वतःस पूर्ण वाहून घ्यावें अशा बुद्धीनें त्यांनीं व्यापार कायमचा सोडला. ज्या धंद्यांत आपणांस चांगले पैसे मिळतात तो धंदा देहास वृद्धत्व येण्याच्या पूर्वीं आणि दुसऱ्या गोष्टी करण्यास मुभा पाहिजे म्हणून मुद्दाम सोडून देणारीं माणसें जगांत फारशीं सांपडत नाहींत; पण ही असामान्य गोष्ट त्यांनीं केली. आणि व्यापाराची दगदग व जबाबदारी आपणास नको म्हणून ती जबाबदारी

आपण होऊन आपल्या शिरावरून त्यांनीं उतरून खालीं ठेविली. रा. विनायकराव भावे पैशाच्या बाबतींत फार चिकट असत असा जनापवाद आहे. तो अगदींच खोटा नसला तरी ज्या अर्थानें तो खरा आहे असें लोक म्हणतात त्या अर्थानें तो खोटा ठरल्याचीं अनेक उदाहरणें त्यांच्या चरित्रांत घडलीं आहेत. व्यापार चालविण्याची योग्यता, वाढलेली पत व तो आणखी चालविल्यास पैसे मुबलक मिळतील ही खात्री, या तिन्ही गोष्टी एकत्र अशा पुष्कळ ठिकाणीं येत नाहींत, व त्या आल्या असताहि 'व्यापार आतां पुरे झाला, स्वतःस आतां स्वातंत्र्य पाहिजे' असें म्हणून चालता व्यापार बंद करणारा माणूस अत्यंत दुर्मिळ असतो. आपणांस एखादी गोष्ट पटली किंवा एखाद्या गोष्टीची हौस वाटली म्हणजे रा. भावे मुबलक पैसा खर्च करीत व पैसा मुक्तहस्तानें देत. पण आपणांस एखादी गोष्ट आवडली नाहीं तर कपर्दिकहि देत नसत. त्यांच्या आवडीहि जगावेगळ्या असत. त्यांच्या आवडीनावडी कधीं लहरीवरहि अवलंबून असत. जें सामान्य वृत्तीच्या माणसास आवडतें तें त्यांस अप्रिय असावें असें वारंवार होई. त्यांस त्यांच्या मित्रमंडळींकडून 'चिकट' असें जें विशेषण लावण्यांत येई त्याचें अर्धें कारण या गोष्टींत असे. प्रो. कर्वे यांच्या पुण्याच्या महिलाविद्यापीठास पैसे पाहिजे होते व त्यासाठीं प्रस्तुत लेखकास घेऊन ते त्यांच्याकडे गेले होते. कर्व्यांची जास्तींत जास्ती मागणी एक हजाराची होती. त्यावेळीं रा. भावे यांनीं प्रो. अण्णासाहेब कर्वे यांस कोणतीहि घासाघीस न करतां एकदम पन्नास हजारांचे बाँड देऊं केले. त्यावेळीं कर्व्यांस अत्यंत आनंद झाला व दक्षिणी लोकांत इतकी मोठी रक्कम देणारा हाच गृहस्थ मला भेटला व ह्या दानानें माझ्या कार्याचें चीज झालें असें रा. कर्व्यांनीं प्रस्तुत लेखकापाशीं उद्गारहि काढले. चिरोल केसच्या वेळीं रा. भावे यांनीं लोकमान्य टिळकांस एक लाख रुपये एकरकमीं उसने दिले होते हें सर्वांस माहीत आहेच.

रा. भावे यांचा स्वभाव विनोदी असे. त्यांचे भाषण स्पष्ट व निर्भीड

असे. क्वचित त्यांचा हा निर्भीडपणा व विनोदही लोकांस आनंददायक न होतां त्रासदायक होत असे. थट्टामस्करी व विनोद करण्यांत ते अत्यंत पटाईत असत. दुसऱ्या कोणी त्यांची थट्टामस्करी केली तर त्याच्यावर त्यांचा राग नसे. पण ते बोलण्यांत इतके कुशल असत कीं विनोदाच्या बाबतींत ते कोणासहि सहज चारीमुंड्या चीत करीत. यामुळें कधीं कधीं त्यांच्याशीं बोलणाऱ्या माणसास आपण नामोहरम झालोंसें वाटे व म्हणून पुष्कळ स्नेह्यांचें मन विरस होऊन ते त्यांच्याकडे जाण्याचा कधीं कधीं कंटाळाहि करीत. गोरक्षणाच्या चळवळीसंबंधानें रा. भावे यांच्या मनांत फारशी सहानुभूति नव्हती. जुन्या आचारविचारांसंबंधानें त्यांस फारशी आवड नसे. एके वेळीं त्यांचीं इच्छा नसतांना एका मित्रानें फार गळ घातल्यावरून ते गोरक्षणाच्या एका सभेस अध्यक्ष म्हणून गेले. ते दिवस सहकारिता असहकारिता याविषयीच्या राजकीय वावटळीचे होते. त्यावेळीं सभेंत भावे हे अध्यक्ष या नात्यानें बोलले, " अलीकडच्या काळीं गाय व ब्राह्मण यांनीं सहकारिता केली आहे व ब्राह्मणाचें शेण गाईनें खावें व गाईचें शेण ब्राह्मणानें खावें अशा प्रकारची ती सहकारीता आहे. " हें व्याख्यान ऐकून गोरक्षणाच्या प्रचारकांस काय वाटलें असेल!

तात्पर्य रा० विनायकराव भावे हे एक चतुरस्र बुद्धीचे गृहस्थ असून त्यांची प्रतिभा काव्य संशोधन, चरित्रलेखन, सृष्टिनिरीक्षण, व्यापार अशा बहुविध क्षेत्रांत चमकली. त्यांचें देहावसान पुणें मुक्कामीं ता. १२ सप्टेंबर १९२६ रोजीं झालें. मरणसमयीं त्यांचें वय ५५ वर्षांचें होतें.



# पुरवणीकाराचें मनोगत

‘ महाराष्ट्र-सारस्वता ’ सारख्या श्रेष्ठ ग्रंथास पुरवणी जोडण्याचा अधिकार माझा नाहीं. सारस्वतकारांचे चिरंजीव आणि माझे आप्तस्नेही श्री. राजाभाऊ भावे यांच्या मजवरील लोभानेंच हें कठिण काम हातीं घेणें मला भाग पाडलें. शिवाय आणखीहि एक दोन विचार मनांत होते. महाराष्ट्र-सारस्वत हा ग्रंथ कितीहि थोर असला तरी गेल्या पांच-पंचवीस वर्षांत त्याचें संस्करण न झाल्यानें अलीकडे तो कांहींसा जुना वाटूं लागून त्याची उपयुक्तताहि थोडी कमी झाली होती. बरें, सारस्वतकारांसारखा दुसरा कोणी शिल्पकार पुढें येईल आणि महाराष्ट्र-सारस्वताची ही सृष्टि कांहीं नवीन दृष्टि ठेऊन पुन: एकवार उभारून दाखवील ही आशाहि अद्यापि केवळ आशाच राहिली. बारा मजली इमला रचण्याचे मनोरथ मध्यंतरीं अनेकांनीं बाळगले, परंतु राजकारणाच्या धुमाळींत ते कोठच्या कोठें नाहींसे होऊन आज पांचशें विटांचें साधें झोपडें बांधण्यासहि जोगवा मागावा लागत आहे. तेव्हां, ‘ महाराष्ट्र-सारस्वत हा ग्रंथ अजून तरी अद्वितीय असून त्याची उपयुक्तता वाढविणें निकडीचें होतें ही गोष्ट निर्विवाद आहे. अशा महत्वाच्या कामास आपला हातभार लागत असेल तर तो लावण्यास मराठीचा कोणताहि प्रेमी आनंदानें कबूल होईल. तसेंच ‘ महाराष्ट्र-सारस्वता ’ स आपलें नांव जोडलें जात आहे या कल्पनेचा मोह टाळणेंहि कठिण होतें. या व इतर कांहीं कारणांनीं मी या कामास उद्युक्त झालों.

कामास उद्युक्त झाल्यावर त्यांतील अडचणी लक्ष्यांत येऊं लागल्या. सारस्वताची प्रस्तुत चतुर्थ आवृत्ति ही ज्या आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे ती तृतीय आवृत्ति तयार करतांना स्वत: ग्रंथकारानें द्वितीयावृत्तीस जोडलेल्या परिशिष्टांतील कांहीं महत्वाचा भाग गाळला गेल्याचें दिसून आलें. साहजिकच सारस्वताची द्वितीय आवृत्ति, तिचें परिशिष्ट व

तृतीय आवृत्ति अशी त्रिस्थळी करणें भाग पडलें. दुसरी अडचण साधनांची. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचीं साधनें महत्वाचीं अशीं पुणें, धुळें व तंजावर अशा तीन ठिकाणीं विखुरलेलीं आहेत. पैकीं पुण्यांतील संग्रह भारत इतिहास संशोधक मंडळांत असून त्याची वयानवार यादी उपलब्ध नसल्यानें त्याचा उपयोग करून घेणें दुष्करच होतें. तरीपण मंडळाचीं वार्षिक इतिवृत्तें, संमेलनवृत्तें व त्रैमासिकें यांतून आलेलें वाङ्मयीन संशोधन पुरवणीच्या कामीं लावणें शक्य होतें व तें काम मीं यथामति केलें आहे. धुळ्यांतील संग्रह प्रचंड खरा, परंतु पुण्यांत राहून त्याचा उपयोग करून घेणें जवळजवळ अशक्यच होतें. जवळजवळ म्हणण्याचें कारण धुळें येथील संग्रहाची तपशीलवार यादी समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांनीं 'रामदासी संशोधन' या नांवानें दोन खंडांत परिश्रमपूर्वक प्रसिद्ध केली असून तिचा उपयोग या पुरवणीच्या कामीं यावत्‌शक्य करून घेतला आहे. तंजावर येथील सरस्वति-महालांतील हस्तलिखितांचा उपयोग त्या मानानें अधिक करून घेतां आला. सुमारें पांच वर्षांपूर्वी मी एक महिनाभर तंजावरीं होतों व त्या मुक्कामांत तेथील बहुतेक सर्व ग्रंथ चाळून केलेलीं कांहीं टिपणें मजपाशीं होतीं. या टिपणांचा उपयोग विशेषतः 'दक्षिण हिंदुस्थानांतील कवि' हें प्रकरण सजविण्याचें कामीं फार झाला. असो. तिसरी अडचण होती ती कामाच्या पद्धतीविषयीं. सारस्वतास पुरवणी कशी जोडावी यासंबंधीं तज्ज्ञांचा सल्ला घेतां असें दिसून आलें, कीं या कामीं मतैक्य होणें फार कठिण आहे. कोणी मूळ ग्रंथास परिशिष्टें जोडावीं असें सुचवी, तर कोणी म्हणे, कीं त्या त्या ठिकाणीं तळटीपा देऊन जरूर ती दुरुस्ती करावी अगर पुस्ती जोडावी. कोणाच्या मतें तर हे दोन्ही मार्ग चुकीचे असून हा ग्रंथ आमूलाग्र पुन्हां लिहून काढावा असें होतें. तेंहि करणें शक्य असलें, तरी इष्ट नव्हतें. कारण मग तो ग्रंथ सारस्वतकारांचा राहिला नसता. शेवटीं विचारान्तीं प्रकरणशः पुरवणी जोडण्याचा मार्ग मीं मनाशीं ठरविला व त्याप्रमाणें वाटचाल करीत आज मुक्कामास येऊन पोंचलों आहे.

वाटेंत कांहीं सांडलें हरवलें असल्यास मागाहून येणारांनीं तें मजकडे आणून न देतां 'महाराष्ट्र-सारस्वत' या पत्यावर कृपा करून पोंचतें करावें. कारण मी काय, आज आहे, उद्यां नाहीं. 'महाराष्ट्र-सारस्वत' मात्र चिरकाल टिकणार आहे.

असो. ही पुरवणी जोडतांना सारस्वतकारांचें कविकाव्यविषयक मतांस शक्यतों कोठें धक्का लावलेला नाहीं. त्यांच्या ग्रंथाची उपयुक्तता वाढावी व गेल्या पंचवीस वर्षांतील संशोधनाची जोड त्यास करून द्यावी एवढ्याच बुद्धीनें व हेतूनें ही पुरवणी लिहिली आहे. जरूर तेथें पुस्ती-दुरुस्तीचेंहि काम केलें आहे. या कामीं मुख्य ऋण इतिहासाचार्य राजवाडे, पांडोबा पटवर्धन, सरदार मेहेंदळे, समर्थभक्त देव, चांदोरकर, महामहोपाध्याय पोतदार, कानोले, देशपांडे, नेने, कोलते इत्यादि जुन्यानव्या संशोधकांचें. त्यांनीं पायपिटी करून काळाच्या मुखीं फार झपाट्यानें पडत चाललेलें हें साहित्यधन थोडेंफार मिळवून दिलें नसतें तर ही पुरवणी लिहिणें सर्वथा अशक्य होतें. अभ्यासकांस निरंतर जागविणाऱ्या या संशोधकांचे उपकार कोंठवर म्हणून वर्णावे? त्यांचे परिश्रम पाहून वाटतें, कीं मराठी वाङ्मयाचा इतिहास रचण्याचें कार्य अद्यापि दूर असून त्यासाठीं जरूर त्या साधनांची जुळवाजुळव करण्यांतच एक जन्म घालवावा लागेल. ही पुरवणी म्हणजे साधनांची जुळवाजुळव करण्याच्या कामांतील पहिला टप्पा असें कोणी समजतील तर त्यासहि माझी हरकत नाहीं. बाकी श्री. राजाभाऊ भावे यांनीं हें काम माझ्याकडे सोपविलें खरें; पण तें पार पाडतांना त्यांच्या वडिलांच्या ग्रंथरूपी भरजरी शालजोडीस ठिगळ जोडण्याचा उद्योग मीं केला असा आक्षेप मजवर न येवो म्हणजे झालें!

गणेशखिंड, पुणें ७.
विजयादशमी, शके १८७३.

शं. गो. तुळपुळे.

## चतुर्थ आवृत्तीची प्रस्तावना

गेल्या पांच सहा वर्षांपासून सारस्वताच्या प्रति अगदी थोड्या शिल्लक राहिल्या होत्या व नवीन आवृत्ति काढणें अवश्य झालें होतें. जरा स्वस्ताई झाली कीं आवृत्ति काढावी असा विचार करून शिल्लक होत्या त्या प्रति फक्त कॉलेजचे विद्यार्थी व ग्रंथालयें यांनाच देत होतों. पण शेवटीं ह्या भलत्या महागाईचे काळांतच आवृत्ति काढणें भाग पडलें.

नवी आवृत्ती काढण्यापूर्वी ह्या पुस्तकाचे उपयुक्ततेबद्दल जाणत्यांचे जवळ चौकशी केली तेव्हां पुस्तकाची अजून जरूर आहे व तावडतोब छापावें असाच सर्वांचा सल्ला मिळाला. मात्र नवीन उपलब्ध झालेली माहिती पुरवणी म्हणून दिल्यास अभ्यासकांना फार सोईचें होईल असें त्यांनीं सुचविलें व माझे आप्त आणि मित्र श्री. शं. गो. तुळपुळे यांनीं उत्साहानें व आपुलकीनें हें काम करण्याचें कबूल केलें. "पांच संतकवी"-चा लेखक 'सारस्वता' ची पुरवणी लिहावयास लाभला हा सुयोगच म्हणावयाचा. त्यांनीं फार परिश्रमानें पुरवणी लिहिली आहे व तिचा अभ्यासकांना फार उपयोग होईल अशी माझी खात्री आहे.

ह्या इतक्या अडचणीचे दिवसांत आवृत्ति काढणें म्हणजे फार दगदगीचें काम. पण माझे आप्त श्री. राजाभाऊ माटे ह्यांनीं हें सर्व काम फार हौशीनें केलें. पुस्तक सर्व परीनें उत्तम निघावें अशी त्यांची तळमळ व त्यासाठीं शक्य तितका उत्तम कागद मिळविण्यापासून तो सारस्वताची सूची श्री. करंदीकर यांचेकडे तयार आहे ही माहिती मिळवून ती हस्तगत करण्यापर्यंत हरतऱ्हेची सर्व मेहनत त्यांनीं फार उत्साहानें केली. त्यांच्या मदतीशिवाय हें काम करणें मला फार कठिण झालें असतें. वर उल्लेख केल्याप्रमाणें ह्या ग्रंथाची सूची श्री. करंदीकर व त्यांच्या पत्नी सौ. शैलजाबाई यांनीं आधींच तयार केलेली होती. ती त्यांनीं

कांहींहि आढेवेढे न घेतां या आवृत्तीसाठीं दिली हें खरोखर विशेष आहे. मी त्यांचा आभारी आहें.

तसेंच पुणें विद्यापीठाचे मराठी विभागांतील रीसर्च फेलो श्री. नरेश कवडी, एम्. ए. यांनीं पुरवणीची सूचि तयार करून ती मूळ सूचींत समाविष्ट करून देण्याचें कामीं जें साहाय्य केलें त्याबद्दल मीं त्यांचा आभारी आहें. श्री. मंगरूळकर यांनींहि प्रुफें तपासण्याचें किचकट काम आत्मीयतेनें केलें. पुढेंपुढें कामामुळें त्यांना पुढील प्रुफें तपासण्यास वेळ झाला नाहीं. पण त्यांनीं ज्या आत्मीयतेनें हें काम केलें त्याबद्दल मला आनंद वाटला.

ह्या आवृत्तींत श्री. दत्तराज महंत व हरिराजबावा महानुभाव यांचा फोटो दिला आहे. हें दोघे इ. स. १९२३ सालीं सतत सात महिने आपल्या सर्व पोथ्या घेऊन माझ्या वडिलांकडे येऊन राहिले होते व त्यामुळेंच महानुभाव वाङ्मयाचें अज्ञात दालन खुलें होणें शक्य झालें.

मु. ठाणें,
विजयादशमी, शके १८७३.

**लक्ष्मण विनायक भावे**

# अनुक्रमणिका.




| प्रकरण | | पृष्ठ | पुरवणी पृष्ठ |
|---|---|---|---|
| मराठी भाषेची मूळ पीठिका | .... | १ | ८३१ |
| ग्रंथकर्तृत्वाची सुरुवात | .... | २६ | ८४४ |
| श्रीचक्रधर व महानुभाव-पंथ | .... | ६३ | ८५२ |
| महानुभाव आद्य ग्रंथ | .... | ९५ | ८६५ |
| चार भावंडें | .... | १३० | ८८८ |
| नामदेव | .... | १६१ | ९०२ |
| तेराव्या शतकांतील कांहीं ग्रंथकार | .... | १८६ | ९०९ |
| चौदावें शतक | .... | २११ | ९१८ |
| एकनाथ | .... | २५० | ९२६ |
| एकनाथ—पंचक | .... | २८३ | ९३० |
| एकनाथांच्या वेळचे कांहीं इतर कवि | .... | ३०८ | ९३३ |
| मुक्तेश्वर | .... | ३२५ | ९४० |
| सोळाव्या शतकांतील आणखी कांहीं कवि | | ३५३ | ९४४ |
| तुकाराम व आणखी कांहीं संत | .... | ३६३ | ९५८ |
| रामदास | .... | ४०४ | ९६६ |
| दासपंचायतन | .... | ४३४ | ९७१ |
| कांहीं कवयित्री | .... | ४४५ | ९७६ |
| वामन पंडित | .... | ४५७ | ९७९ |
| नागेश व विठ्ठल | .... | ४८५ | ९८४ |
| देवदास, शिवराम वगैरे कवि | .... | ५०२ | ९८५ |
| दक्षिण हिंदुस्थानांतले कवि | .... | ५१५ | ९९२ |

| | | | |
|---|---|---|---|
| शाहू महाराजांच्या वेळचे कांहीं कवि | .... | ५३२ | १००७ |
| कृष्णदयार्णव व श्रीधर | .... | ५४८ | १०१४ |
| महाराष्ट्रांतील एक मोठी परंपरा | .... | ५८१ | १०२४ |
| मध्वमुनि, अमृतराय वगैरे | .... | ५९३ | १०२८ |
| महीपती व इतर चरित्रकार | .... | ६१३ | १०३० |
| मयूरपंडित | .... | ६३७ | १०३३ |
| पंतसमकालीन कविमंडळ | .... | ६७९ | १०३७ |
| शाहीर | .... | ७१० | १०४७ |
| गद्य सारस्वत | .... | ७६९ | १०५२ |
| पेशवाई अखेरील कवि | .... | ८०३ | १०६१ |
| उपसंहार | .... | ८२२ | .... |
| थोडी दुरुस्ती, थोडी पुरवणी | .... | .... | १०७२ |
| सूचि | .... | १०८१ | .... |

# महाराष्ट्र-सारस्वत

## मराठी भाषेची मूळपीठिका

या आपल्या दक्षिण प्रांतांत मनुष्यप्राण्याची वस्ती सर्वांत अगोदर झाली असावी, असा अनेक विद्वानांचा तर्क आहे. तसेंच, भाषेला येणारी स्थिरता, व जिव्हेनें केलेले उच्चार हातांनीं चिन्हांच्या द्वारें मांडून दाखविण्याची युक्ति किंवा लिहिण्याची कला याहि गोष्टी इकडे फार पूर्वीपासून चालू झाल्या असाव्यात, असें विद्वान् लोक समजतात. ज्याला आपण 'महाराष्ट्र' म्हणतों त्या देशांतले अतिप्राचीन व मूळचे रहिवासी राक्षस[1], यक्ष, कातकरी, भिल्ल, कोळी वगैरे लोक असावेत. हे अगदीं रानटी स्थितींत राहत असून 'श्वपच' म्हणजे कुत्रे, कोल्हे, लांडगे वगैरे प्राण्यांचें मांस भक्षण करणारे होते; व यांचा बहुतेक उदर-निर्वाह रानच्या कंदफळांवर व शिकारीवर होत असे. येथील लोक अशा स्थितींत असतां इकडे आर्यसंस्कृतीचे कांहीं लोक आले. ते या प्रांताला 'देश' अथवा 'प्रांत' असें न म्हणतां केवळ 'अरण्य' म्हणूनच उल्लेखूं लागले. त्यांच्या दृष्टीनें असें म्हणण्याइतकी या प्रांताची रानटी अवस्था होती.

बाहेरून आलेले हे लोक जात्याच बुद्धिमान् व संस्कृतीनें श्रेष्ठ दर्जाचे असल्यामुळें त्यांची या प्रांतांतली वसाहत जोरानें फैलावत जाऊन त्यांस येथें सुस्थिति प्राप्त झाली. येथील मूळच्या रहिवाशांस मारून न टाकतां किंवा अन्य तऱ्हेनें त्यांचा समूळ नाश न करतां आर्यांनीं त्यांस आपल्याजवळच राहूं दिलें व आपल्या एकंदर वसाहतींत त्यांनाहि जागा

१ राक्षसभुवन, राक्षसतागडी, जाखिणवाडी, जाखमाता वगैरे शब्द प्रसिद्ध आहेत.

करून देऊन आपल्या कार्यास लावून घेतलें, असें दिसतें. आर्यांच्या गांवगाड्यांत मूळ अनार्यांचाहि शिरकाव व समावेश झाला. हे दोघे अशा रीतीनें एकमेकांसंनिध आल्यानें दोघांचाहि एकमेकांवर परिणाम झाला.

जे लोक इकडे प्रथम उत्तरेकडून आले ते प्रायः ' नाग ' लोक असावेत. यांची मूळची संस्कृति कायम होती. पण यांनीं कांहीं थोडी-फार संस्कृति व भाषा मात्र आर्यांपासून उचलली. इकडे येऊन त्यांनीं अनेक गांवें वसविलीं. नागोठणें, पनवेल ( < पन्नग–पल्ली ), नागपूर, नागांव, ( < नागगांव ), नागपाडा वगैरे नागांचीं दर्शक नांवें असणारीं गांवें अजूनहि आहेत. यांची संस्कृति येथील श्वपचांपेक्षां बरीच वरच्या दर्जाची परन्तु आर्यांपेक्षां कमी दर्जाची अशी होती. हे लोक भारतीय युद्धानंतर जनमेजयाच्या पश्चात् आले असावे, असा ध्वनि ह्या कथेवरून निघतो.

यापुढें पाणिनीनंतर शकपूर्व सहाशें–सातशेंचे सुमारास राष्ट्रिक, वैराष्ट्रिक व महाराष्ट्रिक असे तीन संघ किंवा लोक इकडे आले; व नंतर यांच्या संमेलनानें येथें 'महरट्ट' किंवा 'मराठा' हे लोक झाले असावे.

नागलोक हे वैदिक अपभ्रंश बोलत व महाराष्ट्रिक हे महाराष्ट्री भाषा बोलत आणि मग पुढें या दोघांच्या मिश्रणानें मराठी भाषा सिद्ध झाली, असें अनुमान निघतें. नाग व महाराष्ट्रिक अशा दोन भिन्न-भिन्न मानवकुलांच्या सम्मेलनांत मराठी भाषेचा उगम झाला असला पाहिजे, यांत संशय नाहीं. पण हा उगम व याचा पुढील विस्तार कसकसा होत गेला आणि त्याला शेवटचें स्वरूप कसें प्राप्त झालें, त्या सर्व पायऱ्यांचा क्रम निश्चितपणें सांगण्यासारखा पुरावा आज उपलब्ध नाहीं.

ज्या प्रांताला आपण हल्लीं 'मथुरामंडळ' म्हणतों त्या प्रांताला पूर्वी 'सूरसेन' म्हणत असत. या प्रांतांतल्या लोकांच्या मूळच्या

भाषेला 'शौरसेनी' भाषा असें स्वतंत्र व निराळें नांव लोक योजूं लागले. त्याचप्रमाणें गयेच्या आसपासचा जो मुलूख त्याला 'मगध' देश अशी संज्ञा होती. या प्रांतांतल्या भाषेला 'मागधी' असें म्हणत. 'बुखारा', 'पंजाब' वगैरे प्रदेशांतल्या लोकांस 'बाल्हीक' असें म्हणत; व हे 'बाल्हीक' लोक पिशाचांची संतति होय, असें महाभारताच्या कर्ण-पर्वांत सांगितलें आहे. म्हणजे या प्रदेशाला प्राचीन काळीं 'पैशाच देश' असें म्हणत, हें उघड होतें. या प्रदेशाची राजधानी 'पैशाचपूर' उर्फ 'पेशावर' ही होती.[1] पैशाच देशाच्या राजधानीच्या शहरांत व त्याचेभोंवतीं जी भाषा किंवा संस्कृत भाषेचें जें स्वरूप शिष्टांच्या भाषणांत येई त्याला 'पैशाची' भाषा असें म्हणूं लागले आणि त्याप्रमाणेंच 'महाराष्ट्र' या नांवानें समजल्या जाणाऱ्या प्रांतांत जी भाषा लोक वापरूं लागले किंवा संस्कृताचें जें रूप शिष्ट लोक आपल्या व्यवहारांत योजूं लागले तें रूप ही 'महाराष्ट्री' भाषा होय.

वर सांगितलेल्या सर्व भाषा एके काळीं या हिंदुस्थान देशांत चालू होत्या. परंतु इतर बाबींप्रमाणें देशकालपरत्वें नित्यव्यवहाराच्या भाषेंतहि फेरबदल होऊं लागतो. ती 'स्थिर' किंवा 'कायमची' अशी केव्हांहि जिवंत राहूं शकत नाहीं. या नियमानुसार 'शौरसेनी', 'मागधी', 'पैशाची' व 'महाराष्ट्री' या सर्व भाषांत निरनिराळे फरक झाले व मूळ भाषेच्या रूपाहून भिन्न अशीं नवीं नवीं रूपें या भाषांस प्राप्त झालीं. या नवीन व भिन रूपांस त्या त्या भाषेचा 'अपभ्रंश' असें म्हणूं लागले; म्हणजे 'शौरसेनी', 'मागधी', 'पैशाची' व 'महाराष्ट्री' या चारी भाषांपासून 'शौरसेनी–अपभ्रंश', 'मागधी–अपभ्रंश', 'पैशाची–अपभ्रंश' 'महाराष्ट्री–अपभ्रंश' असे चार अपभ्रंश सिद्ध झाले.

हे 'अपभ्रंश' किंवा या 'अपभ्रंश–भाषा' कालान्तरानें शिष्टत्व पावून त्या प्रदेशाची मूळ भाषा म्हणून मानल्या जाऊं लागल्या; आणि

---

१. कांहीं ग्रंथकारांच्या मतें पेशावर ही प्राचीन राजधानी नसून तें शहर याहून अगदीं भिन्न होतें.

हें झालें तेव्हां मूळ भाषांचा लोप होऊन गेला. त्या जनपदलोकांतून अगदीं नाहींतशा झाल्या या चार अपभ्रंशांपैकीं महाराष्ट्रीच्या अपभ्रंशापासून म्हणजेच महाराष्ट्र–अपभ्रंशापासून आपली आजची 'मराठी' भाषा उत्पन्न होऊं लागली. हळूहळू 'महाराष्ट्री–अपभ्रंशा'चा लोप होऊन त्याची जागा 'मराठी'नें घेतली; व जनपदलोक जास्त जास्त वापरूं लागल्यामुळें आणि अनेक बुद्धिमान् ग्रंथकारांनीं तिचा आदर केल्यामुळें ती शिष्टसंमत असें भिन्न व नवें रूप पावून 'मराठी' या नांवानें प्रसिद्ध झाली. याच भाषेला मराठी ग्रंथकार 'प्राकृत'[1] आणि 'देशी'[2] अशीं आणखी दोन नांवें देतात.

हें महाराष्ट्र पूर्वीं अगदीं दाट जंगल होतें. यास दिलेलें 'दंडकारण्य' हें नांव सार्थ होतें; व ज्या वेळीं आर्य लोक येथें रहावयास आले, त्या वेळीं हा सव प्रदेश जवळ-जवळ ओसाड असून यांत कोणाचीच नीटशी वस्ती नव्हती. ज्यांना येथील मूळ लोक समजतात, ते भिल्ल, कोळी, कातकरी वगैरे लोकहि तेव्हां येथें वसलेले नव्हते. ते येथें असलेच तर अशा स्थितींत होते कीं, एके जागीं वर्षानुवर्षें राहून गांवाची वसाहत करण्याइतकी संस्कृति त्यांच्यांत झालेली नव्हती. तेव्हां यदाकदाचित् साधारण प्रगतीचीं कांहीं मानवकुळें या दंडकारण्यांत राहत असलीं तरी त्या तसल्या लोकांपासून भाषा घेऊन ती श्रेष्ठ आर्य संस्कृतीचे बाहेरून आलेले लोक आपल्या उपयोगांत आणतील, हें फारसें संभवनीय वाटत नाहीं. स्वभाषेसंबंधानें आर्य लोक तर इतके जपत असत कीं, शब्दांचा केलेला वेडावांकडा उच्चारहि त्यांना खपत नसे.

आर्य किंवा आर्यसंस्कृतीचे जे लोक येथें वसाहत करण्यास आले त्यांच्यांत तेव्हांच 'वैदिक' व 'अपभ्रंश' प्रचारांत चालू होते व पुढें 'महाराष्ट्री' भाषा उत्पन्न होऊन तीहि बोली प्रचारांत आली व पुढें हिचीच आजची 'मराठी' बनली गेली.

---

१ ज्ञानेश्वरी अ. ११ ओ. २२. २. ज्ञानेश्वरी अ. १० ओ.४४, ४६; अ. १२ ओ. १२.

ठोकळ मानानें असें म्हणतां येईल कीं—

शकपूर्व ३१००-पासून शकपूर्व १०००-पर्यंत नाग लोक येथें होते. शकपूर्व १०००-पासून शके ४००-पर्यंत यांचें व महाराष्ट्रिकांचें संमेलन झालें. शके ४००-पासून शके ६००-पर्यंत मराठी भाषा बोलण्यांत आली; व शके ६००-पासून शके १०००-पर्यंत ती अक्षरसंनिविष्ट आणि सरस्वती-संस्कृत होऊं लागली आणि यापुढें पांचपन्नास वर्षांत तिच्यांत ग्रंथरचनेस सुरुवात झाली.

सारांश, मराठी व संस्कृत यांचा वंशवृक्ष पुढीलप्रमाणें मांडण्यास हरकत नाहीं—




वैदिक संस्कृत उर्फ आर्ष भाषा ( संहिता वगैरे ), पौराणिक संस्कृत ( आरण्यकें, ब्राह्मणें, उपनिषदें, पुराणांतील जुना भाग ) आणि संस्कृत (पाणिनि इत्यादींचे ग्रंथ) या सर्व भाषा ग्रंथसंनिविष्ट आहेत व हे ग्रंथ हल्लींहि उपलब्ध आहेत; त्याप्रमाणें महाराष्ट्रींतहि गाथासप्तशती, रावणवहो, गउडवहो वगैरे ग्रंथ रचिलेले हल्लीं उपलब्ध आहेत. पण महाराष्ट्री—अपभ्रंशांतील मात्र एकहि ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहीं. हा उपलब्ध होईपर्यंत महाराष्ट्री व मराठी यांचा मधला दुवा थोडासा लेचापेचाच राहणार, हें उघड आहे. पण अपभ्रंश-मराठीच्या पुढील जी 'मराठी', तींत रचिलेले मात्र अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत; व या स्थळीं आपणांस त्याच (मराठी) ग्रंथांची ओळख करून घ्यावयाची आहे.

गेल्या पिढींतल्या कांहीं विद्वान् लोकांचें मत याहून थोडें निराळें आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें येथील मूळ रहिवाशी मांग, भिल्ल, कोळी

वगैरे अडाणी व रानटी असे लोक होते, हें खरें. शिवाय ते म्हणतात कीं, या देशांत फार प्राचीन म्हणजे आजच्या इतिहासाच्या किंवा इतिहासकारांच्या कल्पनेच्याहि आटोक्यापलीकडे या देशांत या मूळ रहिवाशांची वस्ती होती. परस्थ आर्य लोक यांच्या प्रदेशाला 'दण्डकारण्य' असें कांहींहि नांव देवोत; परंतु या प्रदेशांत हे लोक आपापले सर्व व्यवहार नीट संभाळून संतोषानें नांदत होते. लहानसहान प्राण्यांनाहि भाषा असते. तेव्हां या मूळ रहिवाशांना त्यांची म्हणून स्वतंत्र अशी कांहीं तरी भाषा होती. वाणीच्या उच्चारानें विचारांचें प्रदर्शन त्यांस करितां येत होतें, याविषयीं अगदीं शंका घेण्याचें कारण नाहीं, त्यांच्यांत लिपि होती किंवा नव्हती हें जाणण्यास उपलब्ध पुरावा नाहीं, हें खरें; पण बाहेरून आलेल्या आर्यांची व येथील मूळ रहिवासी अनार्यांची किंवा राक्षसांचीं भांडणें किंवा युद्धें होत असत व अनेक वेळां अनेक तऱ्हेच्या युक्त्या-प्रयुक्त्या योजून त्यांस अडविणें आर्यांना भाग पडे, असें मानण्यास जागा आहे. तेव्हां आर्यांच्याइतक्या उच्च दर्जाची नसली तरी कांहीं तरी विशिष्ट प्रकारची एक संस्कृती येथील मूळ रहिवाशांत असली पाहिजे, हें उघड आहे. अशा मूळ लोकांस आर्यांनीं जिंकून त्यांच्या प्रांतांत जेव्हां त्यांनीं आपल्या वसाहती केल्या तेव्हां मूळ अनार्यांच्या राहणीवर व तसाच भाषेवरहि आर्यांच्या सान्निध्याचा व वर्चस्वाचा सहज परिणाम झाला. मूळ अनार्य लोक आपल्या भाषेंत आर्यांच्या भाषेंतले शब्द खुशालपणें येऊं देऊं लागले व आपली वाक्य-रचनाहि आर्यांच्या भाषेच्या भरावर करूं लागले असले पाहिजेत. हें लिहिणें बऱ्याच अंशीं काल्पनिक आहे. याला जुन्या लेखांचा किंवा चांगल्याशा प्रमाणांचा आधार नाहीं. तेव्हां हें या लोकांचें म्हणणें चांगल्या आधारांनीं प्रस्थापित होईपर्यंत तूर्त तरी मानतां येण्यासारखें नाहीं.

याप्रमाणेंच कांहीं लोकांचें म्हणणे असें पडतें कीं, संस्कृत भाषा ही मूळची आर्यांची अस्सल भाषाच नव्हे. भाषेचें नांव प्राय: ती भाषा

ज्या प्रांतात बोलतात त्या प्रांतावरून व जे लोक ती वापरतात त्या लोकांवरून पडतें. जसें ग्रीसवरून ग्रीक, फ्रान्सवरून फ्रेंच, जर्मनीवरून जर्मन इत्यादि. परन्तु 'संस्कृत' या शब्दाशीं साम्य पावणारा असा एकहि देश हल्लीं नाहीं व पूर्वींहि कधीं नव्हता. इतकेंच नव्हे, तर 'संस्कृत' या शब्दावरूनच कोणत्या तरी इतर भाषेवर 'संस्कार' घडवून व सुधारून ही संस्कृत भाषाहि नवी केली असली पाहिजे, असें सहज मनांत येतें. वेदांत व पाणिनीचे ग्रंथांतहि 'संस्कृत' असा भाषावाचक शब्द नाहीं. तेव्हां जी एक नवी भाषा येथें मूळभाषेची झाली तिलाच 'संस्कृत' हें नवें नांवहि दिलें. या नवीन भाषेचा किंवा तिच्यांत आणखी अपभ्रंश झाल्यावर त्या अपभ्रंशाचा महाराष्ट्र-देशांतील भाषेशीं विशेष संबंध आला. 'महाराष्ट्र' या शब्दावरूनच असें दिसतें कीं, या देशांत एक 'महा' म्हणजे मोठें 'राष्ट्र' नांदत होतें. 'महाराष्ट्र' शब्दाची ही व्युत्पत्ति कोणी कोणी मान्य करीत नाहींत. हा शब्द अनेक प्रकारांनीं व्युत्पादण्याचा विद्वानांनीं यत्न केलेला आढळतो. 'मृत+हर' म्हणजे केवळ प्रेतवाहक असे महार, त्यांचें म्हणजे महारांचें (महार+राष्ट्र) राष्ट्र म्हणून 'महाराष्ट्र' ही व्युत्पत्ति बालिश म्हणून टाकून दिली तरी 'महारथ' उर्फ 'महारठ' या लोकांचें राष्ट्र तें 'महाराष्ट्र', ही व्युत्पत्ति लक्षांत घेण्याजोगी आहे. कोणी असेंहि समजतात कीं, येथें फार प्राचीन काळीं 'रट्ट' नांवाचे लोक राज्य करीत होते. या 'रट्ट' शब्दाचें संस्कृतांत 'राष्ट्र' असें रूपांतर केलें, व यांच्या प्रांताला 'महाराष्ट्र' असें म्हणूं लागले; आणि या राष्ट्राची जी मूळची भाषा तिचा आर्यांच्या भाषेशीं संबंध येऊन हळूहळू 'मराठी' किंवा 'देशी' ही भाषा बनूं लागली. ही मूळ भाषा अस्सल या प्रांताची आहे असें सांगतांना देशी पक्षाचे विद्वान् असें म्हणतात कीं, अजून मराठी भाषेंत असे पुष्कळ शब्द आहेत कीं, ज्याचा संबंध संस्कृताशीं जोडतां येणें कठीण आहे. उदाहरणार्थः—डोळा, पोट, हाड, बाढ, आई, बाप, दोरी, थेंब, गवत इ. इ. तसेंच 'दिंडी, आवी' वगैरे छंदहि अस्सल देशी आहेत. ते

मूळचे येथलेच जन्मलेले, येथल्या मूळच्या लोकांच्या तोंडचे दिसतात. त्यांचा उगम संस्कृताशीं लावितां येणार नाहीं. या व असल्या अनेक कारणांवरून 'मराठी' ही भाषा स्वतंत्रपणें मूळची येथील, व या भाषेचें बीज याच जमिनींतले, असें ते मानितात. वडाचें लहानशा कणाएवढें मूळ बीं असून त्यावर हवा, पाणी आणि जमीन यांचा पूर्ण संस्कार घडून जसा त्याचा प्रचंड वटवृक्ष होतो आणि मग त्याचें आदिकारण लहानशा मुंगीच्या डोक्याएवढें बीं असेल हें जसें चमत्कारिक भासतें, तसेंच मराठी भाषेचें झालें आहे. तिचें मूळ बीज काय व कोणकोणत्या इतर संस्कारानें आणि कशाच्या परिणामानें ती आजच्या रूपाप्रत पावली, हें सांगणें फार कठीण आहे. फार तर इतकें म्हणतां येईल कीं, महाराष्ट्री-अपभ्रंश जाऊन जींत आजच्या मराठीची स्पष्ट ओळख पटेल असें स्पष्टपणें भिन्न रूप अदमासानें दहाव्या-अकराव्या शतकांत तयार झालें असावें.

हा अदमास बांधण्याचें धोरण साधारणपणें पुढीलप्रमाणें आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या शिलालेखांपैकीं सर्वांत जुना असा पळसदेवाचा शिलालेख आणि त्यानंतर जवळजवळ दोनशें वर्षांनीं लिहिलेली ज्ञानेश्वरी या दोहोंतील भाषासरणी स्पष्टपणें भिन्न आहे. त्याचप्रमाणें ज्ञाननाथाची ज्ञानेश्वरी आणि एकनाथी ग्रंथ यांच्याहि भाषा अगदीं भिन्न आहेत. आणि यापुढेंहि एकनाथी भाषा व शिवनाथ उर्फ शिवदिन केसरी यांची भाषा यांतहि असाच स्पष्ट फरक नजरेस पडतो. म्हणजे एकाच नाथ-संप्रदायांतील दोनदोनशें वर्षांच्या अंतरांतले ग्रंथ घेतले तर त्यांच्या भाषेचे स्वरूप इतक्या अवधींत स्पष्टपणें भिन्नत्व आणि विशिष्टत्व पावतें. आनंद-संप्रदायांतील ग्रंथकारांतहि हाच प्रकार आढळेल. तुकाराम आणि महीपति या गुरुशिष्यांच्या जोडींतहि जवळ-जवळ दोन शतकांचेंच अंतर आहे, व यांच्या भाषेंतहि असाच फरक पडलेला दिसतो. म्हणजे साधारण मानानें दर दोनशें वर्षांनीं भाषेंत ओळखण्याइतका स्पष्ट फरक पडतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पहाट आणि सकाळ, किंवा सायंकाळ आणि रात्र यांत पहाटेची सकाळ, व सायंकाळची रात्र इतक्या हळूहळू

होते कीं, अमुक एका क्षणीं एक संपून दुसरीस प्रारंभ झाला, असें कळत नाहीं. पण क्षणोक्षणीं पडत जाणारा फरक दोन घटकांच्या अवधींत इतका स्पष्ट होतो कीं, त्यांत कोणाचीहि चूक होण्याचा संभव राहत नाहीं. हाच प्रकार भाषेचाहि आहे. जिवंत किंवा बोलती भाषा दरसाल हळूहळू सूक्ष्मपणानें पालटत असते. पण हा सूक्ष्म पालट होतां होतां दोनशें वर्षांच्या अवधींत चांगलाच पालट पडतो; व हा दोनशें वर्षांत झालेला पालट स्पष्ट अशी भिन्नता पावून स्वतंत्र रूप प्रकट करतो. हाच क्रम आपण मागें नेऊन लावून ज्ञानेश्वरीमागें दोनशें वर्षें ज्ञानेश्वरी भाषेस प्रथम सुरवात झाली असावी, असें सहज म्हणू शकूं.

शौरसेनी, मागधी, पैशाची व महाराष्ट्री या स्वतंत्र भाषांत साधारणपणें शके ८००-मध्यें ग्रंथ रचिले जात असत. राजशेखरानें लिहिलेल्या 'कर्पूरमंजरी' या नाटकांत 'महाराष्ट्री' भाषा आहे. या ग्रंथांत नेहमीं ज्यांच्या तोंडीं संस्कृत भाषा असावयाची अशा वरच्या दर्जाच्या पात्रांच्या तोंडींहि राजशेखरानें प्राकृत भाषाच घातली आहे. यावरून याच्या काळीं ( सुमारें–८५० शक ) प्राकृत ( महाराष्ट्री व दाक्षिणात्य ) भाषा ही सरसहा प्रचारांत असली पाहिजे, असें दिसतें. वर उल्लेखिलेल्या चारी भाषा या वेळीं प्रचारांत होत्या. यापुढें दोनशें वर्षांनीं या भाषाचे 'अपभ्रंश' प्रकार सिद्ध झाले असल्याचें दिसून येतें. म्हणजे महाराष्ट्री–अपभ्रंश हा सुमारें शके १०००-मध्यें प्रचारांत असला पाहिजे, असें होतें.

'अपभ्रंश' हा शब्द 'उत्क्रान्त' या शब्दाप्रमाणेंच थोडा घोटाळा उत्पन्न करणारा आहे. 'अपभ्रंश' हा शब्द संस्कृत आहे, व तो संस्कृताच्या दृष्टीनेंच लावलेला आहे. संस्कृतापासून भिन्नत्व पावणें म्हणजेच अपभ्रंश पावणें, भ्रष्ट होणें, असा अर्थ होतो. वास्तविक पाहतां परिस्थितिपरिणामानें व कालमानानें सुधारत जाऊन बदल होणें यालाच 'अपभ्रंश' तयार होणें असें म्हणतात. तेव्हां भाषेंत कालमानानें फरक व सुधारणा होऊन भिन्न स्वरूप दिसूं लागणें किंवा 'अपभ्रंश' होणें याला दोन शतकांचा अवधि पुरा होतो. अपभ्रंशाचा आणखी अपभ्रंश होण्यालाहि आणखी इतकाच अवधि

लोटावा लागेल, हें म्हणणें आतां ओघानेंच आलें. शके ८००-मध्यें महाराष्ट्री प्रचारांत होती व शके १२००-मध्यें मराठी प्रचारांत होती, या दोन्ही गोष्टी सिद्ध आहेत. तेव्हां दोहोंच्या मधली पायरी जी महाराष्ट्री–अपभ्रंश ती शके १०००-मध्यें किंवा त्या सुमारास प्रचारांत असली पाहिजे, असा तर्क बांधण्यास कांहींच हरकत नाहीं.

आतां शौरसेनी, मागधी, आणि पैशाची यांचे अपभ्रंश ग्रंथांत स्पष्टपणें आहेत, व ते तेथें सांपडतात. तसा महाराष्ट्रीचा अपभ्रंश ( महाराष्ट्री–अपभ्रंश ) स्पष्टपणें असा ग्रंथांत अजून कोठें सांपडलेला नाहीं. तरी तो होता, याबद्दल लवमात्र संशय घेतां येत नाहीं. महाराष्ट्री–अपभ्रंश होता इतकेंच नव्हे, तर मराठी ग्रंथकारांस तो माहीतहि होता. संतोषमुनि[1] या नांवाचा एक ग्रंथकार पंधराव्या शतकांत होऊन गेला. हा आपल्या ग्रंथांत म्हणतो :—

मागां व्यासादिक महामुनी । कथा बोलिले संस्कृत वाणी ।
तें आतां महाराष्ट्रभाषा करोनि । वानीजतायें ॥
मागधी आणि शौरसेनी । पिशाच अपभ्रंश जाणी ।
संस्कृत प्राकृत या षट्वाणी । आणिकं छपन्न भाषा ॥
या भाषांचे पाकविस्तार । करावेया 'मराठी' एक चतुर ।
तियेचेनि प्रसादें जाणिजेत विचार । षट् भाषांचे ॥
म्हणोनि संस्कृताची टीका । महाराष्ट्री म्हणिजताये आइकां ।
जैसी हेमाची मुद्रिका । वरी गरूड पाचू ॥

मराठी ग्रंथकारांस अपभ्रंश माहीत होता, पण महाराष्ट्री–अपभ्रंशांतली रचना आपणांस हल्लीं उपलब्ध नाहीं. तरी महाराष्ट्री–अपभ्रंशाचा काल शके १०००-च्या आसपासचा धरून चालण्यास

---

१. या ग्रंथकारानें संस्कृत हें मराठीपुढें केवळ पोर आहे, असें सांगतांना एक गमतीची कोटी केली आहे. तो म्हणतो, "माझे श्रोते विचारतील कीं–संस्कृत तर देव वाणी । तरी तियेसि उपमा कांरे सानी ? यास उत्तर असें कीं–महाराष्ट्री स्त्री लिंगवाक्य । आणि संस्कृत तंव नपूंसक । म्हणोनि बालकत्व आईक । तेयासचि साजे ॥"

कांहीं एक हरकत दिसत नाहीं, आणि महाराष्ट्री–अपभ्रंशाचा पूर्णावस्थाकाल १००० शक मानला तर मराठीचा उगमकालहि शके १००० हा मानावा लागतो. यापुढें शें-दोनशें वर्षांच्या अवधींत महाराष्ट्री–अपभ्रंश नामशेष होऊन, मराठींत ग्रंथरचनेचा झपाटा सुरू होणें अवश्य होतें, असें वरील सरणीनें म्हणावें लागतें; व हा असा झपाटा शके १२००-मध्यें सुरू होता, हें निःसंशय आहे.

कालाचा निर्णय असा लावल्यावर स्थलासंबंधींचा विचार करणें थोडेंसें अवश्य आहे. मराठी भाषा जेथें वावरते त्या प्रांताच्या सीमा पुढीलप्रमाणें आहेत.

दक्षिण–उत्तरकानडा जिल्हा.

उत्तर–सातपुडा व विंध्य.

पूर्व–छोटानागपूर व आंध्रप्रांत.

पश्चिम–आरबी समुद्र.

या सीमांच्या आंतील प्रांतांत मराठी भाषा आपल्या पूर्णवैभवानें नांदतांना दिसते. तेव्हां तिचें राहण्याचें मूळ माहेरघरहि याच प्रांतांत कोठें तरी असलें पाहिजे.

साठीलक्ष देश महाराष्ट्रू । तेथिंचे राये शिहाणे सुभटू ।
वेद–शास्त्र चातुर्याचो पेठू । भरैली तिये देशीं ॥
ऐसे ते महाराष्ट्रराये सुंदरू । वरी महाराष्ट्र भाषाचतुरू ।
तेहीं वसविलें गंगातीरू । क्षेत्र त्र्यंबकूवेन्हीं ॥
पश्चिमे त्र्यंबकू पूर्वे सागर वेन्हीं । द्वादश योजने उभय गंगातीरीं ।
ऐसें तें गंगातट महाराष्ट्रीं । वसिजें पुण्यातन ॥
तियें महाराष्ट्रीं गंगातीरीं महंतु । तेथ सदां ईश्वरावतारू क्रीडतु ।

असें लिहिलेलें आढळतें. पश्चिम दिशेला समुद्रतीरावर सांवतवाडीखालीं प्रांतांत कोंकणी मराठी बोलतात. ही मराठी म्हणजे मिश्र व रूपांतर पावलेली मराठी होय. वरचे अंगाला म्हणजे पूर्वेकडे छोटानागपूरपलीकडे अशीच रूप पालटून मिश्र वेषांतली मराठी दिसते. पश्चिम समुद्राच्या दक्षिण बाजूला जशी सांवताची वाडी, तशीच उत्तर बाजूला डहाणू–

उंबरगांव ही शीव समजण्यास हरकत नाहीं. पूर्व समुद्राकडे वाईनगंगेची रेषा गोदेपलीकडे वाढविली असतां जी सीमा येते ती, म्हणजे आंध्रदेशाच्या अलीकडचा प्रांत ही पूर्वबाजूची सीमा मानण्यास हरकत नाहीं. या चार सीमांचे आंत मराठीचें माहेर कोठें तरी असलें पाहिजे आणि या सीमेच्या आंतील गोदावरीच्या तीरीं वैदर्भांत तें ठिकाण असावें, असें वाटतें. गोदेचे दोन्ही कांठ, पैठण व वऱ्हाड ( वर्धातट ) हीं या भाषेच्या बालपणांतलीं क्रीडास्थानें निःसंशय होत. तिचें तान्हें रूपडें येथेंच पहावयास सांपडेल व तिचें उत्पत्तिस्थानहि येथेंच नजरेस पडेल, असा तर्क होतो.

कोणत्याहि भाषेचा नक्की जन्मकाळ सांगणें हें शक्य नाहीं. त्याच-प्रमाणें मराठी भाषेची सुरुवात कधीं झाली, हेंहि अगदीं निश्चितपणें सांगतां येण्यासारखें नाहीं. फारच विरळा आढळणारा एखादुसरा शब्द किंवा शब्दाचें एखादें रूप सोडून दिलें, तर शालिवाहन शकाच्या नवव्या किंवा दहाव्या शतकापर्यंत निव्वळ मराठी असा एकहि लेख आपणांस हल्लीं उपलब्ध नाहीं. शालिवाहन शके ९०५-चे सुमारास कोरलेला असा एक शिलालेख उपलब्ध आहे; याला लेख असें म्हणणेंहि फारसें शोभणार नाहीं; कारण हें एक केवळ लहानसें वाक्य आहे. हें वाक्य असें:—

**श्री चावुण्डराजें करवियलें**

राचमल्ल गंग नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत एक अतिशय अवाढव्य

---

१. हें वाक्य श्रीगोमतेश्वराच्या पुजाऱ्यानें 'श्रीरावणरायें करवियलें' असें मला वाचून दाखविलें; व हा पुतळा रामाच्या वेळचा आहे, असें मोठ्या आग्रहानें सांगितलें. हा लेख शके १०३८ इ. सन १११६ मध्यें कोरला, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. पण ही चूक दिसते. हा लेख शके ९०५-मध्येंच लिहिला गेला, असें अनेक पुराव्यांवरून दिसतें. फार तर याचे खालीं 'गंगरायें सुत्तालें करवियलें' हें वाक्य कांहीं वर्षें मागाहून लिहिलें गेलें असेल. हीं दोन्ही वाक्यें निरनिराळ्या काळीं कोरलीं गेलीं आहेत, असें तेथें जाऊन तीं प्रत्यक्ष पाहिलीं असतां दिसतें.

असा बाहुबलजी ऊर्फ गोमतेश्वराचा प्रचंड दगडी पुतळा उभारल्यानंतर हा पुतळा त्या राजाचा प्रधान जो चावुण्डराय त्यानें करविला, हें त्या काळच्या सर्व लोकांना व पुढील पिढ्यांना जाहीर करण्याच्या हेतूनें त्या पुतळ्याखालीं निरनिराळ्या प्रचलित भाषांत या अर्थाचीं वाक्यें कोरविलीं. शके ९०५-च्या सुमारास हा शिलालेख किंवा हें वाक्य कोरविलें गेलें असलें पाहिजे. यावरून इतकें स्पष्ट होतें कीं, त्या वेळीं मराठी भाषा बोलणारे व शिष्ट समजून ती प्रचारांत वापरणारे बरेच लोक त्या प्रांतीं असले पाहिजेत; व सबंध वाक्य रचिलें आणि लिहिलें जाण्याइतकी मराठी भाषा इतर भाषांपासून त्या काळीं अलग होती.

या कालानंतर सुमारें दीडशें वर्षांनंतर म्हणजे शके १०५१-मध्यें चालुक्य-वंशांतल्या सोमेश्वर या राजानें रचिलेला एक ग्रंथ आहे. याचें नांव 'मानसोल्लास' अथवा 'अभिलषितार्थ–चिंतामणि'. या ग्रंथांत मराठी रूपें व मराठी शब्द तर ठिकठिकाणीं आले आहेतच, पण या ग्रंथाच्या एका भागांत कांहीं मराठी पद्येंहि आलीं आहेत. यांपैकीं मराठी पद्यें त्या ग्रंथाच्या भांडारकर इन्स्टिटयूटमधील जुन्या पोथीवरून उतरून देतों.

(१) जेणे रसातळ उणु मत्स्यरुपें वेद आणियले
मनु शिवक वाणियले तौ संसार सायर तारण मोहंतो
रावो नारायणु जो गीची

अर्थ:—ज्यानें रसातलांतून मत्स्यरूपानें वेद आणिले, मनु-शिव वर्णिले (स्तविले) तो संसारसागर तारक मो(ह)हंता राजा नारायण

(२) जो गीची जाणे गाइजे बहुपरिरुपे निर्हांगो मय सैंक: शेशनले
सुलघु शशजन मान वंकसे

याचा अर्थ नीट लागत नाहीं.

सोमेश्वरानें आपल्या ग्रंथांत निरनिराळ्या रागतालांची माहिती सांगतांना हें पद्य दिलें आहे; व महाराष्ट्रांतील बायका कांडतांना ओव्या म्हणतात असेंहि त्यांत लिहिलें आहे. यावरून या वेळीं (शके १०५१-मध्यें) मराठींत अनेक प्रकारचीं पद्यें रचिलीं जात असत व मराठी

भाषेंतला अत्यंत प्रचलित असा ओवीछंद तोहि या वेळीं चांगला प्रचारांत येऊन घरांतल्या बायकांच्या दळणकांडणापर्यंत जाऊन शिरला होता, असें म्हणतां येतें.

यानंतरचा अठ्ठावीस वर्षांचा म्हणजे शके १०७९-मधील एक शिलालेख येथें देतों:—

**श्री चंगदेव दंडनाकें विष्णुगृह केलें । ईश्वर**
**संवछंरी नीफजले । प्रासादी बस व ण स व**
**गा तेहाचे पुत्त भाउया । स्तंभा**
**निष्कृती सोनेया साहस्त्रु एकु १००० प्रासादी अस कर**
**वातोत्तरे भूमी १०० दाउ पसाउ बाहिरा । सकु १०७९**
**मंगल मह श्री ।**

हा शिलालेख गारदौंडापासून सुमारें सहा मैलांवर पळसदेव म्हणून गांव आहे तेथील एका देवळाचे खांबावर आहे. पळसदेव हें गांव भीमेच्या कांठीं असून हजार–बाराशें वर्षांपूर्वी फार भरभराटीचें ठिकाण होतें, असा पुरावा या ठिकाणीं सर्वत्र नजरेस पडतो. गांवांत अनेक सुंदर देवळें असून नदीला घाट व पायऱ्या बांधलेल्या आहेत. गांवापासून सुमारें पाऊण मैलावर थोडेंसें जंगलांत असें हें देऊळ आहे. शिलालेखांतील मजकुरावरून हें देऊळ प्रथम 'विष्णुगृह' म्हणजे श्रीविष्णूचें मंदिर होतें. पण पुढें केव्हांतरी—मुसुलमानी राजवटींत (?)— यांतील मूर्तीचा विध्वंस झाल्यावर त्या ठिकाणीं हल्लींच्या नवीन मूर्तीची स्थापना झाली. हल्लीं या देवळाला श्रीसरडेश्वराचें देऊळ असें म्हणतात. नहुष म्हणून राजा शापामुळें सरड झाला तेव्हां या ठिकाणीं तो पडला म्हणून या देवळाला सरडेश्वराचें देऊळ म्हणतात, अशी एक कथा त्या प्रांतांत प्रचलित आहे. हें देऊळ चालुक्यवंशांतले राजे राज्य करीत असतां त्यांच्या कोण्या एखाद्या मांडलिकानें बांधलें असावें.

देऊळ जुन्या चालुक्य-मांडणीचें आहे; व एकाच प्राकारांत एका-

सारखीं एक अशीं हीं दोन देवळें आहेत. दक्षिणेंत दोन-दोन किंवा तीन-तीन देवळें अशीं एका प्राकारांत बांधलेलीं अनेक टिकाणीं आढळतात. पळसदेव येथील या जोड-देवळापैकीं एका देवळाच्या खांबावर लहानसा चौकटीसारखा भाग दाखवून त्यावर हा शिलालेख कोरला आहे. शिलालेखाच्या दोन ओळी आहेत; व त्यांची लांबी १९ इंच असून रुंदी १ इंच आहे. अक्षरांच्या आकाराचें प्रमाण सोबत दिलेल्या छाया-चित्रावरून ध्यानांत येईलच. शिलालेख एका लांब कागदावर वठवून घेऊन तीं अक्षरें दुसऱ्या कागदावर ट्रेस करून घेतलीं व मग पुस्तकांत देतां येण्याकरितां सोयीचे तुकडे पाडून त्यांचें हें छाया-चित्र दिलें आहे.

ज्यांवर शक संवत्सर दिला आहे अशा प्रसिद्ध झालेल्या सर्व शिलालेखांपेक्षां हा जुना आहे. जाधवांच्या राजवटीपूर्वींचा असा शिलालेख आपणांस नीट माहीत नव्हता. आतां हा त्यांच्या पूर्वींच्या म्हणजे राष्ट्रकूटांच्या राजवटींतला शिलालेख सांपडला. यावरून राष्ट्र-कूटांच्या राजवटींत मराठी भाषा चांगली प्रचलित होती, असें स्पष्टपणें मानण्यास व म्हणण्यास हरकत नाहीं.

शिलालेखांतील अक्षरांचें वळण फार जुनें आहे. यांतील 'ई', 'उ', 'ण' वगैरे अक्षरें तर विशेष चिंतनीय आहेत. दुसरी एक महत्त्वाची लक्षांत धरण्यासारखी बाब अशी कीं, या सबंध शिलालेखांत एकहि पृष्ठमात्रा नाहीं. यावरून सुमारें आठशें वर्षांपूर्वीं पृष्ठमात्रा देणें आणि ती न देणें हे दोन्ही प्रकार महाराष्ट्रांत चालू होते, असें म्हणणें भाग पडतें. पृष्ठमात्रेची वहिवाट प्रथम कां व कशी पडली, हें कळत नाहीं. कदाचित् ताडपत्रावर डोक्यावरील मात्रेची तिरपी रेघ काढणें जरा कठीण असल्यामुळें त्याऐवजीं पाठीमागें उभी रेघ देऊन मात्रेचें चिन्ह दाखविण्याची योजना अमलांत आली असावी; व पुढें ताडपत्र जाऊन कागदाचा उपयोग होऊं लागल्यानंतर तीच वहिवाट कांहीं दिवस राहिली असावी. शके चौदाशेंनंतर ही वहिवाट बंद झाली. शके चौदाशेंनंतर

लिहिलेला एकहि लेख ज्यांत पृष्ठमात्रा आहे असा उपलब्ध नाहीं.

या काळापुढला आणखी तीस वर्षांनंतरचा म्हणजे शके ११०९-मधला एक शिलालेख प्रसिद्ध आहे. हा शिलालेख परळ येथील बंगला हल्लीं ज्यांत " रिसर्च लॅबोरेटरी " म्ह. वैद्यकाचें संशोधनगृह आहे ती इमारत बांधीत असतांना त्या ठिकाणीं पायांत सांपडला.

यांत कोंकणाच्या अपरादित्य नांवाच्या एका राजानें तीर्थांत स्नान करून श्रीवैद्यनाथ देवास पंचोपचार पूजेसाठीं 'षट्षष्टि' म्हणजे हल्लींची 'साष्टी' यांतील माहुलीजवळील एका जमिनीचें उत्पन्नापैकीं २४ द्राम उत्पन्न दिल्याचें नमूद केलें आहे. शिलालेखाच्या साडेचोवीस ओळी असून त्यांपैकीं साडेएकवीस ओळींची म्हणजे पूजाअर्चेसाठीं ही देणगी दिल्याचा ज्यांत उल्लेख आहे त्या मजकुराची भाषा संस्कृत आहे. पुढील सुमारें दोन ओळींची भाषा मराठी आहे.

॥ अथ तु जो कोणु हवि ए शासन लो
पीतया श्री वैद्यनाथदेवाची भाल सकुडुंबिआ पडे ॥ तेहाची
माय गाढवें झविजे ॥

तर्जुमा :—

(२२) ॥ अथ तु जो कोणु हवि ए शासन लो

(२३) पी तेया श्री वैद्यनाथदेवाची भाल सकुटुंबोआ पडे ॥ तेहाची

(२४) माय गाढवें झविजे ॥

अर्थ—आतां जो कोणी होऊन हें शासन मोडील त्याला श्री वैद्यनाथ देवाची शपथ. तो सहकुटुंब पतन पावेल. त्याचे आईला गाढव लागेल.

लेखांत प्रारंभींची व मूळ मजकुराची सर्व भाषा संस्कृत असून

---

१. या लेखांतील 'भाल' या शब्दाचा अर्थ 'शपथ', हें माहीत नसल्या-मुळें डॉ. भाऊदाजी वगैरे सर्व मंडळींनीं वाक्यार्थ कांहीं तरी जमविला आहे.

[पृष्ठ १७ पहा.]

शेवटली 'भाल' किंवा शपथ तेवढी मराठी लिहिली होती. यावरून एक गोष्ट उघड दिसते कीं, या वेळीं दरबारी शिष्ट लोक संस्कृत भाषेचा आश्रय करीत, पण एकंदर जनसमाजांत मराठी भाषेचा प्रचार सडकून चालू होता. लोक ती नेहमीं बोलत व संस्कृतापेक्षां ती बोललेली जास्त समजत. जो मजकूर सर्वांना समजेल व कळेल अशा रीतीनें जाहीर करणें असेल तो संस्कृताचा शिष्टाचार बाजूस गुंडाळून ठेवून मराठींत सांगणें शके ११०९-मध्यें अवश्य होतें. म्हणजे या वेळीं ही भाषा सर्वत्र उपयोगांत येत असे, हें उघड आहे. यानंतरचे शिलाहार-वंशांतल्या भोज राजाच्या काळचे असे अनेक ताम्रपट उपलब्ध आहेत. यांपैकीं चार ताम्रपट 'भारत–इतिहास–संशोधक–मंडळा'नें प्रसिद्ध केले आहेत. या ताम्रपटावर ताम्रपटांचा काल 'सालिवान शके ४१०' असा दिलेला आढळतो. परंतु ४१० ही कालगणना सालिवान शकाची नसून इतर–बहुतकरून 'शिलाहार'–राजांची असल्यामुळें हे लेख बरेच अलीकडले असावे, असें त्यांत दिलेल्या संवछर, तीथ, वार वगैरे बाबींवरून म्हणतां येतें.

---

[पृष्ठ १६-वरून ]
हा शके ११०९-मधला शिलालेख हल्लीं जेथें वैद्यक–संशोधन–मंदिर आहे तेथें सांपडला. कांहीं दिवसांपूर्वीं मी तेथें गेलों असतां माझे मित्र श्री. डॉ. ज्ञानेश्वर आत्माराम तर्खडकर M. B. B. S.–प्रसिद्ध व्याकरणकर्ते कै. दादोबा पांडुरंग यांचे पुतणे– यांनीं मला सांगितलें कीं, या मंदिराचे ठिकाणीं फार वर्षांपूर्वीं एक देऊळ (शिवालय) होतें. पुढें कालांतरानें ख्रिस्ती लोक या प्रांतांत आले, त्यांनीं हें देऊळ मोडून याचें ख्रिस्ती धर्माचें देवालय (चॅपेल) केलें. नंतर हें इंग्रजांचे ताब्यांत आलें आणि यांत कांहीं दुरुस्ती करून हें त्यांनीं गव्हर्नराचें राहण्याचें ठिकाण केलें. प्रसिद्ध 'एल्फिन्स्टन्' साहेब येथेंच राहत असत. अलीकडे इ. स. १९१३-चे सुमारास या इमारतीचा कांहीं जुना भाग पाडीत असतां, या पडक्या भिंतींत धुपाचा मुरलेला वास दरवळत होता. त्याच वेळेस येथें खणीत असतां कांही ठिकाणीं जमिनींत मनुष्यांचीं हाडें सांपडलीं. त्यांतच हातांतल्या काळ्या व हिरव्या बांगड्यांचे तुकडे वगैरेहि सांपडले. हीं हाडें व बांगड्यांचे तुकडे वगैरे डॉक्टर-मजकुरांनीं जपून ठेविले आहेत.

या ताम्रपटांचा काल शालिवाहन शके ११२६ हा असावा, असें वाटतें[1]. कोणी कोणी तर हे ताम्रपट अगदींच अविश्वसनीय समजतात.

१. शके ४१०-मधील म्हणून समजला गेलेला ताम्रपट. मुळांत ओळी कशा तोडल्या आहेत हें पुढें अक्षरावर । अशी रेघ देऊन दाखविलें आहे:–

राम रमा
रामचंद्र
माता सहि
त नाम
मामतं



स्री स्वहसते सक।, स्री साळिवान स।क वरस चारस। ४१० नाम सवछर। वीभव मास सराव।ण नक्षत्र आनृदा दी।न सोमवार तदिनी श्री।ती पत्र ळीहीळ न्रुपत्र।रा राजा भोज राजे करीता। श्रीती पत्र ळीहीळ रायेबाग सीहया। सन स्रेी गावीच दव म्हादव साक्ष सी। दस्वर साक्ष म्हालक्षुमी काळीक। भवानी साक्ष क्षत्रपांळ भईर।व सक्ष। समसत दव साक्ष कळ पाडवाराचा। कळावासी दतराम स्री गावीचा पाडवाराच श्रीतीपत्र लीहीळ स। मसत बईसानी पाटील राय भा। रदन मगळ मटी भट समसत। पाटील कानोजी। कुळकरणी लक्षमन। सटी गुरव जयरामी सुतार ना। गणा कुवार लक्षीमान मडीवाळ। रानु न्हावी गगु व सीताप्पा तरा।ळ कोळीमान समसत बईसानी। पाडवाराच श्रीतीपत्र लीहीळ स्री। गावीचा मगळ मठ मठाचे। म्हाकाल काम नाईक म्हणउनु। यासी साक्ष कला सीरगावीचा पा।डवार गग नाईक हाच पाडवा।र आपुली मुषमुद्रा गा व मळ। द गण नाग पासा यास नीक्षो। पीळा आस पाडवाराच श्रीतीभोग। ण व श्री सत पाव सानारा सोम। णच इसतकी पत्र घडवीळ यासी। आसत मानीती तर लक्षी पानकी। होती चद्रसुरीया सा दरतरी साक्ष। पा।डवार म्हाकाल काम-नाक यास

भोज

[ पान १९ पहा. ]

यानंतर शक ११३०-च्या सुमारचा एक चांगला शिलालेख हल्लीं प्रसिद्ध आहे. या शिलालेखाच्या एकंदर २६ ओळी असून त्यांपैकीं शेवटच्या पांच मात्र मराठींत आहेत. बाकी लेख संस्कृतांत आहे. तरी काल दर्शविणारी २१-वी व मराठी भाषेच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा पुढील पांच मिळून २१ ते २६-पर्यंत सहा ओळींतील उतारा बर्जेस आणि फ्लीट यांनीं आपल्या प्राचीन लेखसंग्रहांच्या पुस्तकांत दिलेल्या ठशावरून पुढें देतों.[1]

१ स्वस्तिश्रीशाके ११२८ प्रभवसंवत्सरे श्रावणमासे पौ
र्णमास्यां चंद्रग्रहणसमये श्रीसा इदेवेन - - - - - - -

॥ड यापाटएंगीऊके पेंड पदे तेहाना असिआउळेराऊळा
रेंता ग्राहका पासी तीसटादी ऊळा। ग्राहाणा ऊति कनेया
पासी व्रह्मान्तर ते ब्राह्मणें दीड्लें॥ ग्राह

कापासी दामा ताडी सोवा सूपाठीनगरें दीड्ला॥ तल्दाइ
यावैलां सिद्धावे॥ घाडीगिला आसू पाठीग्रि धवें ग्राहका
पासी॥ पांठ पोफ ली ग्राहका पासी॥ पटि

ले ग्रापाणे प्रा दाणा वीलोाटि मठा दीड्ली॥ ऊतीपाणे
वांहतिते तीळाप्रातेपलीपलीतला॥ एघ नेमविड़े तम
टीतेन मापे भवावेका पाऊम ठाउई॥ अई
मापठारी रूपावे सूकातधान्य सिः॥ वतराघाट विरेइ

[ पान १८ वरून ]

"भोज" हीं अक्षरें गुजराती आहेत. बाकीं अक्षरें बालबोध आहेत. हा ताम्रपट अस्सल नाहीं, हें उघड आहे.

१. खानदेशांतील पाटण येथील या शिलालेखाच्या कांहीं भागाचा उतारा तेलकागदानें अक्षरें फोटोवरून छापून घेऊन वर दिला आहे. सदरहू

[पान २० पहा.]

२१ स्वस्ति[1] श्री शाके ११२८ प्रभवसंवत्सरे श्रावणमासे पौर्णमास्यां चंद्रग्रहणसमये श्री सोइदेवेन सर्वजनसंनिद्धौ हस्तोदकपूर्व्वकं निजगुरुरचितमठायायस्थानं ।

२२ दत्तं ॥ तद्यथा ॥ इयां पाटणीं जें केणें उघटे तेहाचा असि आऊं[2] जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दीन्हला ॥ ब्राह्मणां जें विकतेयापासीं ब्रह्मोत्तर तें ब्राह्मणी दिन्हलें ॥ ग्राह

२३ कापासीं दामाचा वीसोवा आसूपाठी गनरें दीन्हला ॥ तुलदाइयां बैलां सिद्धवै ॥ बाहीरिला आसूपाठी गिधवें ग्राहकापासीं । पांच पोफली ग्राहकापासीं ॥ पहि

२४ लेआ घाणे आदाणाची लोटि मठा दीन्हली ॥ जेती घाणे वांहति तेतीयां प्रति पली पली तेला ॥ एथ जे मविजे तें मढीचेन मापें मवावें मापाउ मढा अर्द्धं ॥ अर्द्धं

---

[ पान १९-वरून ]

उताऱ्यांत एकदोन अक्षरें मुळींच उठलीं नाहींत; व काढलेलीं अक्षरें स्पष्ट दिसण्याकरितां त्या काळच्या लिपीशीं परिचय नाहीं अशा अजाण माणसानें घोटाळा केल्यामुळें कांहीं अक्षरांच्या वळणांत थोडा फेरफार झाला आहे. तरीदेखील त्या काळीं अक्षरांचें वळण कसें होतें, पृष्ठमात्रा कशी काढीत वगैरे बाबी नीट समजण्यास ह्याचा उपयोग होईल, असें वाटतें. मूळ शिलेवर एकच एक लांबलचक ओळ आहे. त्याच्या बदली या पुस्तकाच्या आकारांत बसण्यासाठीं तुकडे पाडून निराळ्या ओळी केल्या आहेत. मूळ ओळीचा प्रारंभ व शेवट कळण्यासाठीं दर ओळीस परिच्छेद तोडला आहे.

१. हा शिलालेख प्रथम डॉ. भाऊदाजी यांनीं, नंतर डॉ. किलहॉर्न यांनीं व नंतर रा. राजवाडे यांनीं लावून छापला आहे. या तिघांनीं दिलेल्या उताऱ्यांच्या मदतीनें मीं हा ठसा लावला आहे. या सर्वांत रा. राजवाडे यांनीं दिलेला उतारा उत्तम आहे. तिघांपैकीं डॉ. भाऊदाजी व रा. राजवाडे या दोघांनींच या मराठी भागाचा अर्थ लावण्याचा यत्न केला आहे. डॉ. भाऊदाजींना लेखच नीट लागला नाहीं. तेव्हां त्याच्या अर्थाबद्दल नांवच नको. राजवाड्यांनीं अर्थ ठीक बसविला आहे. पण त्यानेंहि नीट समाधान होत नाहीं. राजवाड्यांनीं लाविलेल्या अर्थाचाच 'प्रभात' मासिकांतला तर्जुमा पुढें मीं दिला आहे.

२. ठशांत 'ड' दिसतो. राजवाडे मूळलेखांत 'इ'च आहे, असें म्हणतात.

२५ मापहारी । रूपाचें सूंक। तथा भूमिः ॥ चतुराघाट विशुद्ध ॐ डुग्रामु पषड बालेआ कामता मध्यें चहवंटा ॥ एकल वंटा ॥ पंडितांचा कामतु ॥ श्रीतेग्रा ॥

२६ मीं चाउरा ॥ घामोजीचीअ सोंढिआं ॥

या शिलालेखामध्यें आलेल्या मराठी वाक्यांचा आजच्या मराठी भाषेंत पुढीलप्रमाणें तर्जुमा होतो :—

२१ श्री शके[1] ११२८-मध्यें प्रभव–संवत्सरीं श्रावण महिन्यांत पौर्णिमेचे तिथीस चंद्रग्रहण–समयीं श्री सोइदेवानें सर्वजनां-समक्ष हस्तोदकपूर्वक आपल्या गुरूनें स्थापिलेल्या मठास

२२ दिलें तें असें कीं ॥ या पाटणांत जें द्रव्य उत्पन्न होईल, त्यावरील राजानें घ्यावयाचा जो कर तो मठास दिला। माल विकणाऱ्यापासून जें ब्रह्मोत्तर घ्यावयाचें तेंहि ब्राह्मणांनीं मठास दिलें । गिन्हा- ( केणें=द्रव्य )

२३ इकांपासून म्हणजे माल घेणाऱ्यापासून, दर आसूमागें दामाचा विसावा भाग नगरानें ( घ्यावयाचा तो नगरातर्फे ) मठास दिला। पाण्याचे बैल तयार ठेवावे ॥ ( नगरांतल्या बाजारा-) बाहेरल्या दर घोड्यामागें ( आसू=सोन्याचें नाणें. उ. चौधरी आसू )

२४ पहिल्या घाण्याला ( तेलाच्या ) घाण्याची (एक ) लोटी मठाला दिली. नंतर जितके घाणे निघतील तितक्यां प्रत्येकाबद्दल ( एक-एक ) पळी पळी तेल ॥ एथें जें मापावयाचें तें मठाच्या मापानें मापावें. मापाऊ म्हणजे ( मापण्याबद्दल व मापपात्राबद्दलचें घेणें तें ) अर्धें मठाचें व अर्धें

१. श्री. राजवाडे यांनीं लाविलेला तर्जुमा पुढें देतों–तुपावरील सूंक वांवाचा कर मठाला दिला आहे. त्याचप्रमाणें खालील चतु:सीमांतर्गत जमीन मठाला दिली. एका बाजूला ओढेगांव पश्चिमेस बाल्या कामताची जमीन व वटवृक्षाचा बुंधा. पूकल वृक्ष, पंडितांचा कामतु; चीतेग्रामी एक चावर भूमि; आणि घामोजी पर्वताच्या सोंडा.

२५ मापाऱ्याचें. ( यापुढील अक्षरें ठशावर नीट लागत नाहींत; व इतरांनीं जीं लाविलीं आहेत त्यापासून काढलेला अर्थ नीट पटत नाहीं. ) कामत् = कामछा = बसण्याचें ठिकाण, उ. लोहार-कामठा. सुतार-कामठा.

वरील शिलालेखांत चांगदेवाच्या मठास दिलेलें दान नमूद केलेलें आहे. चांगदेव हा यादव उर्फ जाधव वंशांतील सिंघण राजाच्या पदरीं ज्योतिषी होता. यानें आपला आजा जो प्रसिद्ध भास्कराचार्य, 'लीलावती'चा जनक, त्याचे व त्याच्या पूर्वीच्याहि आपल्या पूर्वजांचे ग्रंथ पढविण्यासाठीं एक मठ किंवा विद्यापीठ स्थापिलें. या विद्यापीठास यादवांचे मांडलिक जे निकुंभ वंशांतले राजे त्यांपैकीं सोइदेव व हेमाड्दिेव यांनीं दान दिलें होतें. हें दान या शिलालेखांत नोंदलें आहे. हा शिलालेख कोरविला त्या वेळीं श्री सोइदेव हा वैकुंठवासी झाला होता, असें या लेखांतील संस्कृत भागांत म्हटलें आहे. दुसरी बाब अशी कीं, लेखांत सांगितलेलें दानाचें उदक शके ११२८ सालीं, प्रभव-संवत्सरीं, श्रावण शुद्ध पौर्णिमेला चंद्रग्रहणाचे पर्वणीस सोडलें, असें त्यांत म्हटलें आहे. परंतु शके ११२८-त श्रावणी पौर्णिमेला चंद्रग्रहण नव्हतें. शके ११२९-चे श्रावण पौर्णिमेला पाटण शहरीं दिसूं शकेल असें एक चंद्रग्रहण लागलें होतें, असें डॉ. किलहॉर्न म्हणतो. यावरून हा लेख साक्षात् कांहीं वर्षें मागाहून म्हणजे अजमासें शके ११३२-चे सुमारास कोरला गेला असावा, असें डॉक्टर-महाशय लिहितात.

या लेखांत शके ११२९-चे सुमारची वाक्यरचना, व्याकरणाचीं अनेक रूपें वगैरे पुष्कळ उपयोगी माहिती आपणांस मिळण्यासारखी आहे. मठ बांधणाऱ्या चांगदेवानें आपल्या नऊ पिढ्यांची माहिती त्यांत दिली आहे. शके ८३०-मध्यें विद्यमान असलेल्या आपल्या त्रिविक्रम नांवाच्या पूर्वजापासून ( १ ) कविचक्रवर्ती त्रिविक्रम—( २ ) विद्यापती भास्करभट्ट —( ३ ) गोविंद सर्वज्ञ—(४) प्रभाकर— (५) मनोरथ— ( ६ ) कवीश्वर महेश्वराचार्य —( ७ ) भास्कराचार्य ('लीलावती'कार)

ज्योतिषी– (८) लक्ष्मीधर—आणि (९) चांगदेव, अशी पुत्रपरंपरा यांत दिलेली आहे. या कुटुंबांत नऊ पिढ्या विद्वत्ता उत्तम तऱ्हेनें सारखी नांदत होती, हें पाहून मोठें कौतुक वाटतें. चांगदेवाच्या पुढील पिढ्यांतहि या घराण्यांत अनेक विद्वान् पुरुष होऊन गेले. असें सांगतात कीं, या वंशास श्रीमंत पेशव्यांचाहि आश्रय चांगला होता; व शेवटले रावबाजी ऊर्फ बाबासाहेब यांच्या पदरीं मुख्य ज्योतिषी याच वंशांतील पुरुष होता.

यानंतरचा 'श्री सकु ११९६ भावनाम संवत्छरे पुष सुदि १० सोमे'चा श्रीमंत 'प्रौढप्रताप चक्रवर्ति श्रीरामचंद्रदेव' याचा एक मराठी शिलालेख ठाणें येथें सांपडला आहे. लेखाच्या ओळी ११ असून शिलेचा मधला भाग फार झिजून गेलेला आहे. शिलेवर वरच्या कोपऱ्यांत सूर्यचंद्र काढले असून मध्यें एक चित्र आहे. चित्र अगदीं अस्पष्ट आहे. लेख लहानच पण महत्त्वाचा आहे.

शके ११९६-तल्या या शिलालेखानंतरचा दुसरा मोठा शिलालेख म्हटला म्हणजे श्री पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या शिलेवरील लेख होय. या शिलेला पाठ लावली असतां चौऱ्यायशी लक्ष योनि हिंडण्याचा प्रसंग टळतो, अशा समजुतीनें या शिलेला ८४-ची शिला असे पंढरपुरांतले भाविक लोक म्हणतात. या शिलेवर ज्या ज्या थोर व धार्मिक लोकांनीं श्री पंढरपूरच्या देवालयास द्रव्य दिलें त्यांचीं नांवें देणगीचा नामनिर्देश करून कोरलीं आहेत. अशा देणग्या देऊन परलोकीं पुण्य व इहलोकीं कीर्ति व लौकिक साधण्याची वहिवाट अजूनहि सर्वत्र आढळते; त्याच-प्रमाणें ती तेव्हांहि होती. या लेखांतील प्रशस्तिश्लोक झाल्यानंतर पुढें—

**स्वस्ती श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपूर श्री विठ्ठलदेव रायासि तिसा सिति फुलें दांडे आचंद्रार्क चालावेआ नाना भक्त मालीआं दत्त पैकाचा विवरु ॥**

म्हणजे :—"स्वस्ति श्री शके ११९५ श्रीमुख संवत्सरीं फागनिपूर येथील श्री विठ्ठलदेवास ++++ फुलें दांडे वाहणें सूर्य-चंद्र आहेत तोपर्यंत

नेहमीं चालविण्यास अनेक भक्तांनीं दिलेल्या पैक्याचा तपशील" असा मथळा लिहून त्याखालीं आठ रकाने काढून नांवें व दिलेल्या दानांची यादी दिली आहे. या यादींत त्या वेळच्या अनेक व्यक्तींचीं व गांवांचीं नांवें, तसेंच त्या काळच्या चलनी नाण्यांचा उल्लेख आला असल्यामुळें ती यादी विशेष उपयोगी आहे. या यादींत शके ११९८।११९९-मधील देणग्यांचाहि उल्लेख आहे. यावरून हा लेख निरनिराळ्या वेळीं, पैका आला तसतसा, वेळोवेळीं कोरला गेला असावा; किंवा सर्व पैका जमा झाल्यावर पुढें केव्हां तरी तो कोरला गेला असावा—पहिल्यापेक्षां दुसरेंच अनुमान जास्त संभवनीय दिसतें. याच यादींत यादवांचा हुशार व सर्वप्रसिद्ध कारभारी किंवा प्रधान जो सोडवीकर (मौजे सोडवी येथें राहणारा) हेमाडपंत, त्या हेमाडपंडितानें सकु ११९८ धाता संवत्सरे माघ वदि तृतीयेस वर्गणी दिल्याचा उल्लेख आहे; व पुढें यादव ऊर्फ जाधव वंशांतील 'सकलकलां निवासु। न्यायातें पोखणाऱ्या' श्रीरामदेवरायाच्या देणगीचा उल्लेख मोठ्या अदबीनें नमूद केला आहे.

श्री सकु ११९९ ईश्वर संवत्सरे मार्गसिर सुदि १५ सुक्रे ॥ श्री विठ्ठल देवरायासि पांढरी-फड-मुख्य समंताद्भाग आचंदार्क श्री जादव नारायण प्रौढ प्रताप चक्रवर्ति श्री रामचंद्र-देव राएं द।

हीं अक्षरें इतर अक्षरांच्या मानानें थोडीं मोठीं व स्पष्ट काढून या राजासंबंधीं लेखकानें आपला आदर व पूज्यभाव व्यक्त केला आहे. मागें उल्लेखिलेल्या सर्व शिलालेखांपेक्षां हा लेख जास्त मोठा आहे.

शके १२००-पूर्वींचे शंभर वर्षांतले आज उपलब्ध असलेले लेख पुढीलप्रमाणें आहेत:—

शके १०३०-मधला श्रवण-बेलगोला येथील गौतमेश्वराचा शिलालेख.

शके १०५१ सोमेश्वराच्या मानसोल्लासांतील पद्य.

---

१. शके ४१०-मध्यें कोरला असें वाटलेला मंगळवेढ्याचा ताम्रपट व शके ६५८-मध्यें कोरला असा चिकर्डीचा ताम्रपट वादग्रस्त असल्यामुळें येथें ते जमेस धरिले नाहींत.

शके १०७९ पळसदेवाचा शिलालेख.

शके ११०९ परळ येथील शिलालेख.

शके ११२८ पाटण येथील शिलालेख.

शके ११९६ ठाणें येथील शिलालेख.

शके ११९५ ते ११९९ पंढरपूर येथील शिलालेख.

याप्रमाणें शके १२००-पर्यंतच्या उपलब्ध लेखांची यादी आहे. आणि येथून शिलालेखांच्या लहान-सहान लेखांतून येत येत आपण ग्रंथरचनेच्या विस्तीर्ण प्रांतांत येऊन पोहोंचतों. यापुढले नागांव वगैरे प्रांतांतले आणखीहि शिलालेख उपलब्ध आहेत; पण आतां या काळापासूनचे प्रत्यक्ष ग्रंथ सडकून उपलब्ध असल्यामुळें शिलालेखांचे उतारे येथें दिले नाहींत.



# ग्रंथकर्तृत्वाची सुरुवात

मराठी भाषेंतील आद्य ग्रंथकर्तृत्वाचा मान आजपर्यंत मुकुंदराज किंवा ज्ञानेश्वर या दोघांपैकीं एकास दिला जात असे. याचा अर्थ इतकाच कीं, इतके दिवसपर्यंत मराठींत लिहिलेले जे ग्रंथ महाराष्ट्रियांस माहीत होते, त्यांत मुकुंदराजाचा 'विवेकसिंधु' किंवा ज्ञानेश्वरांची 'ज्ञानदेवी' हे किंवा या दोहोंपैकीं कोणता तरी एक ग्रंथ सर्वांत प्राचीन होय. या दोहोंपेक्षां प्राचीन असा ग्रंथ मराठींत झालाच नाहीं, व मुकुंदराज किंवा ज्ञानेश्वर या ग्रंथकारांच्या पूर्वी कोणाहि महाराष्ट्र-पुरुषास या भाषेंत ग्रंथलेखनाची आवश्यकताहि वाटली नाहीं, अ..णे तसा कोणीं यत्नहि केला नाहीं, हें मानणें अगदीं अप्रशस्त होय. ज्ञानेश्वर-महाराजांपूर्वी मराठी भाषा अगदीं कमकुवत होती व ग्रंथरचनेचा भार तिला पेलण्यासारखा नव्हता, असेंहि पुष्कळ लोक समजतात. पण हाहि त्यांचा समज चुकीचा होय. जगांत कोणताहि ग्रंथकार किंवा कोणताहि योद्धा किंवा कोणताहि असामान्य व अद्वितीय पुरुष एकदम निर्माण झाला, असें केव्हांहि होत नाहीं. त्या त्या काळांत एकापेक्षां एक असे वरचढ पुरुष निर्माण होतात, बुद्धिमत्ता पायरीपायरीनें वाढत जाते, कर्तृत्वाचीं निरनिराळीं अंगें निरनिराळ्या व्यक्तींत बनत जातात व मग त्यांतच त्या सर्वांपेक्षां अधिक श्रेष्ठ असा पुरुष किंवा ग्रंथ निर्माण होतो. मामाथसारखें प्रचंड जनावर किंवा शंभर-शंभर हात ज्याचा देह असला अवाढव्य पक्षी किंवा मोरासारखा अतिसुंदर प्राणी केव्हांहि एकदम होऊं शकत नाहीं. हळूहळू पायरीपायरीनेंच सुधारणा व वाढ होत जाते; व मग त्यांत त्या सर्वांपेक्षां थोडा श्रेष्ठ व अधिक दर्जाचा असा फरक घडून वरील चमत्कार उत्पन्न करणारे प्राणी निर्माण होऊं शकतात; आणि हीच गोष्ट ग्रंथकर्तृत्वाचीहि आहे.

कोणताहि मोठा व प्रतिभासंपन्न ग्रंथ एकदम किंवा प्रथमच निर्माण

होऊन तेथून भाषेंतील ग्रंथरचनेला सुरुवात झाली, असें केव्हांहि घडूं शकणार नाहीं. उलट तो ग्रंथ म्हणजे त्या काळच्या भाषेची व एकंदर ग्रंथकर्तृत्वाची एक उत्तम निशाणी किंवा अत्युच्च मर्यादा आहे, असेंच समजलें पाहिजे. पराक्रमी पुरुषाच्या पराक्रमाचा प्रारंभ ज्याप्रमाणें साम्राज्यस्थापना हा कधींहि असूं शकणार नाहीं, त्याप्रमाणेंच 'ज्ञानदेवी 'सारखा अमोलिक व सर्वांगसुंदर ग्रंथ केव्हांहि भाषेंतील ग्रंथरचनेचा प्रारंभ असूं शकणार नाहीं. साम्राज्यस्थापना व प्रतिभासंपन्न ग्रंथ हे दोन्हीं त्या त्या दिशेंतील यत्नांचे, परंपरेच्या मार्गानें वाढत्या कार्यभागानें तयार झालेले पूर्ण कळस होत. शिवाजी किंवा नेपोलियन या पुरुषांचे राज्याभिषेक हे जसे त्या पुरुषांच्या कृत्यांचे प्रारंभ नसून, त्या त्या पुरुषांच्या सामर्थ्याचें, त्या काळच्या लोकांच्या मनोवृत्तीचें व त्या त्या राष्ट्राच्या तरतरीचें, किंवा जोमाचें पूर्ण रूप किंवा मर्यादरेषा दाखवितात, त्याप्रमाणेंच 'ज्ञानदेवी 'सारखे ग्रंथ त्या वेळच्या ग्रंथकर्तृत्वाची प्रथम पायरी नसून मराठी भाषेच्या दर्जाची व लोकांच्या संस्कृतीची मर्यादरेषा दाखवितात. 'ज्ञानदेवी 'त आढळणारी कमावलेली भाषा व रेशमापेक्षांहि मृदु आणि सुखकर अशी शब्दरचना, तसेंच त्या ग्रंथांत आलेले दृष्टांत व ते मौजेनें प्रकट करण्याची भाषेची शक्ति, हीं सर्व प्रारंभींचीं चिन्हें नसून त्या काळच्या एकंदर संस्कृतीचें व भाषेचें उच्च रूप दाखविणारीं चिन्हें आहेत, याविषयीं संशय नाहीं.

हें सर्व सांगण्याचा उद्देश असा कीं, ज्ञानेश्वरांची 'ज्ञानदेवी' किंवा मुकुंदराजाचा 'विवेकसिंधु' हे आद्य ग्रंथ नसून यांच्या पूर्वीं अनेक शतकें मराठींत ग्रंथ होत असले पाहिजेत. नुसते कांहीं ग्रंथ होत असले पाहिजेत इतकेंच नव्हें, तर हजारों-हजार ग्रंथ त्या काळीं निर्माण करण्याची ताकद मराठी भाषेंत व महाराष्ट्र-लेखकांच्या लेखणींत निःसंशय आलेली असली पाहिजे. आतां कदाचित् असें होणें अगदीं संभवनीय आहे कीं, विशेष बुद्धिमान् लोक आपल्या ग्रंथाची रचना मराठीसारख्या घरगुती भाषेंत न करतां संस्कृत भाषेंत करीत असतील. आपल्या

ग्रंथाला एक तऱ्हेचा अधिकार किंवा भारदस्तपणा यावा व शिष्टांत मान्यता मिळावी, या आशेनें विद्वान् लोक साध्या पण एकंदर जनसमाजाला न समजेल अशा संस्कृतासारख्या भाषेंत ग्रंथ रचीतहि असतील. सर्वांना न समजेल अशा एखाद्या जुन्या भाषेंत ग्रंथ लिहावा व तसेंच बोलण्यांतहि नेहमीं जुने शब्द योजावे, हें खूळ सर्व देशांत प्राचीन काळीं होतें; आणि तेंच वारें येथेंहि वाहत असण्याचा संभव आहे. कोणच्याहि भाषेंत सारस्वत किंवा वाङ्मय निर्माण होऊं लागतें, तें अगदीं साधारण लोकांकडून तयार होऊन मग परंपरेनें वरवरच्या लोकांत तें वाढीस लागतें. व्यवसायांतले काबाडकष्टाचे श्रम हलके वाटण्याकरितां किंवा सोप्या शब्दांनीं साधी प्रार्थना करण्याकरितां किंवा अशाच इतर कांहीं कारणाकरितां प्रायः कांहीं आखीव रचना प्रथम करण्यास सुरुवात होते. आपल्या महाराष्ट्रसमाजांत या वेळीं अनार्यांचीं दैवतें, आर्यांचीं दैवतें, गांवांतील, रानांतील, डोंगरांतील दैवतें, तसेंच सूर्य, चंद्र, समुद्र, नद्या, पर्जन्य, ग्रहणें वगैरे मनुष्यप्राण्याचें चित्त वेधून त्यांत भक्तिभाव उत्पन्न करणारे देखावेहि त्यांच्या डोळ्यांसमोर नित्य दिसत होते. तेव्हां यांचीं स्तुतिस्तोत्रें व प्रार्थना हींहि वाङ्मयाचे व सारस्वताचे प्रथम विषय असले पाहिजेत. तसेंच प्रथम कहाण्यां-प्रमाणें अत्यंत सुलभ गोष्टी व पुढें पौराणिक कथा, नंतर संगतवार पुराणें याप्रमाणें भक्तिमार्ग परंपरेनें चोखळतां येईल, असें वाङ्मय निर्माण होत जातें. शृंगार आणि वीर हे दोन्ही रस मनुष्यमात्राच्या देहांत सदैव असणारच; मग तो मनुष्य कोणत्याहि स्थितींत असो. यामुळें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेलीं मर्दुमकीचीं कृत्यें, त्यांच्या आठवणी आणि स्वतः अनुभविलेला शृंगार व त्यांचीं कल्पनेनें काढिलेलीं चित्रें हींहि प्रत्येक समाजाच्या अगदीं प्रारंभींच्या वाङ्मयांत असलींच पाहिजेत. सारांश, भक्ति, ज्ञान, वैराग्य, काम, अर्थ व शौर्य यांचें कीर्तन करणारी रचना ही कोणत्याहि समाजांत प्रथम निर्माण झालीच पाहिजे. शंकर, गणपति, राम, कृष्ण, दत्त, देवी, वगैरे सर्व देव दहाव्या-अकराव्या शतकांतल्या

महाराष्ट्राच्या परिचयाचे होते. सूर्य, चंद्र, पर्जन्य यांच्या कृपादृष्टीची मनुष्यसमाजाला आवश्यकता आहे व ती प्रार्थनेनें मिळवितां येईल अशी जाणीव त्यांना स्पष्ट होती; यामुळें त्यांवरील सर्वांचीं स्तुतिस्तोत्रें व प्रार्थना प्रारंभींच वाङ्मयप्रांतांत निर्माण होऊन राहिल्या पाहिजेत; मग या सर्व कदाचित् लेखनिविष्ट असतील किंवा नसतील. याप्रमाणें अनुभवी व थोर लोकांच्या तोंडचीं वाक्यें, म्हणी यांचाहि संग्रह भाषेंत लवकरच होऊं लागतो; आणि या अनुभवसिद्ध ज्ञानावर रचिलेल्या पंचतंत्र, सिंहासनबत्तिशी, शुकबाहत्तरी यांसारख्या सोप्या कथांचें वाङ्मय स्त्रिया, शूद्र व मुलें यांचेकरितां निर्माण होऊन लेखनिविष्ट होऊं लागतें. नित्याचीं अनुमानें बांधण्यासाठीं व रोजच्या अडचणींतून व संकटांतून वाट काढण्यासाठीं ज्योतिष—फल व ग्रह—आणि वैद्यक यांचीं टांचणें, बाडें व ग्रंथवजा निरूपणें तयार होण्यास लौकरच आरंभ होतो; आणि या सर्वांची गति वाढून या वाङ्मयाला त्या समाजाच्या संस्कृतीच्या व वाढीच्या मानानें नागररूप प्राप्त होऊं लागतें; आणि शेवटीं समाजांतील शिष्ट व संपन्न लोक आणि मांडलिक किंवा राजे हे या ग्रंथांचा परामर्श घ्यावयास लागून या ग्रंथकारांना राजसभेंत मान मिळूं लागतो; व उत्तरोत्तर नवें नवें, जास्त-जास्त सुंदर सारस्वत निर्माण होऊं लागतें.

ठोकळ मानानें भाषेंतील वाङ्मयवृद्धीच्या या अशा पायऱ्या आहेत; व त्या ती भाषा बोलणाऱ्या, जाणणाऱ्या व लिहिणाऱ्या लोकांच्या परिस्थितीप्रमाणें व संस्कृतीप्रमाणें चढत जातात. म्हणजे भाषा बोलणाऱ्या लोकांची संस्कृति व परिस्थिति आणि त्या भाषेंतील ग्रंथसंपत्ति या दोहोंचा निकट संबंध आहे; व एकीवरून दुसरीचा अदमास बांधतां येण्यास हरकत नाहीं, असा निष्कर्ष निघतो; व यांपैकीं एकासंबंधीं म्हणजे वाङ्मयासंबंधीं बोलतांना दुसऱ्याची म्हणजे समाजस्थितीची व संस्कृतीची थोडीशीतरी ओळख असणें अवश्य भासूं लागतें.

महाराष्ट्र-समाज हा आर्यसंस्कृतीचे उच्च लोक, नागलोक, येथील मूळचे लोक, गोंड, भिल्ल, कातकरी, ठाकूर, कोळी वगैरे अगदीं

प्रथमावस्थेंत राहणारे अनेक लोक अशा भिन्न-भिन्न लोकांचा बनलेला होता; व या सर्वांची समाजानें आपल्या पोटांत व्यवस्था लावून, गांव-गाडयांत प्रत्येकाला नीट नांदता यावें अशी योजना करून दिली होती. या व्यवस्थेंत निरनिराळ्या वंशांनीं आपापल्या इच्छेनुसार कर्तबगारीप्रमाणें निरनिराळे धंदे उचलले होते. ब्राह्मण, सुवर्णकार, कासार, लोहार, साळी, कोष्टी, शिंपी, सुतार, कुंभार, न्हावी, महार, चांभार वगैरे सर्वांचा या मराठ्यांच्या गांवगाडयांत समावेश होई व ते सर्व आपापल्या धंद्यानें इतरांच्या उपयोगी पडत व समाजसेवा करीत. हा समाज ज्यांचा बनला होता त्यांपैकीं अगदीं वरच्या संस्कृतीचे असे जे ब्राह्मण लोक ते प्रायः संस्कृत भाषेचा आश्रय करीत. ही भाषा इतरांना येत नसल्या-मुळें अर्धवट संस्कृत, किंवा मिश्र प्राकृत किंवा स्वच्छ प्राकृत भाषेचा त्यांना आश्रय करावा लागे. विद्वान् ब्राह्मण जरी संस्कृत उत्तम जाणीत, तरी घरांतील स्त्रियांशीं व इतर ग्रामजनांशीं त्यांना मराठींतच बोलावें लागे. वाणी-उदमी, अलुते-बलुते, कामकरी-शेतकरी, तसेंच शूद्र-अतिशूद्र वगैरेंच्या बरोबर मराठी भाषेचाच त्यांना व्यवहारांत आश्रय करावा लागे. ब्राह्मणांच्या अगदीं जवळचे क्षत्रिय व मराठे हे थोडें-बहुत संस्कृत जाणीत असण्याचा संभव आहे. पण ती भाषा नीट अवगत नसल्यामुळें त्यांपैकीं बहुतेकांना देशी भाषेचाच उपयोग करणें भाग पडे; व क्षत्रियांपेक्षांहि कमी संस्कृतीचे शूद्र व अतिशूद्र या लोकांना तर संस्कृताचा गंधहि नव्हता, यामुळें त्यांच्या प्रचारांत एक मराठी भाषाच काय ती येई. ब्राह्मणांतदेखील साधारण मानानें बहुतेक स्त्रिया केवळ शूद्रवत् होत्या. उपभोग्य वस्तूप्रमाणेंच त्यांची जवळ-जवळ अवस्था होती. याला कांहीं अपवाद असतील. पण साधारणपणें सरसहा ब्राह्मण स्त्रियांची स्थिति अशीच दिसते. तेव्हां यांच्या व्यवहारांत संस्कृताचा उपयोग फारसा होत नसून मराठींतच काम चाले. अनुलोम-प्रतिलोम संकरामुळें, त्या त्या स्त्रियांची व त्यांच्या संततीची राहणी सुधारत जाई, व भाषाहि संस्कृतमिश्रित अशी होई. मराठी शब्दांना संस्कृत पेहराव चढविण्याची

तऱ्हा योजिली जाई; व संस्कृत शब्द मराठी रंग चढवून यांच्या तोंडांत वावरूं लागत. अशा या सरमिसळीमुळें महाराष्ट्रसमाज हा दुभाषी अथवा दुतोंडया होऊन राहिला होता. विचारांचें व विकारांचें प्रदर्शन संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषांत होई. ग्रंथलेखनहि असें दोन तऱ्हांनीं करणें भाग पडे. महाराष्ट्र-लोकांचा फैलावहि बराच असल्या-मुळें या दोन्ही तऱ्हा सर्वभर फैलावल्या गेल्या; व जसजसे दुसऱ्या वर्गांतले लोक श्रेष्ठत्व पावूं लागले, तसतसा विचारप्रदर्शनाचा दुसरा—म्हणजे मराठीच्या द्वाराचा मार्ग अधिक-अधिक वाढूं लागला. पण त्यांत एक गोम राहिली. ती अशी कीं, या दुसऱ्या म्हणजे असंस्कृतज्ञ लोकांना ज्या ज्या विषयाची गोडी किंवा आवश्यकता वाटत असे, तेवढ्याच विषयांचें लिखाण मराठी भाषेंत होऊं लागलें. पण जे विषय जाणण्याची व पचविण्याची ऐपत या लोकांत नव्हती, व ज्यांची माहिती असणें या असंस्कृतज्ञ लोकांना व स्त्रियांना अवश्य पडलें नाहीं, किंवा वाटलें नाहीं, त्या विषयांसंबंधीं सर्व ग्रंथ निवळ संस्कृतांतच रचिले गेले.

मागें शिलालेख वगैरे दिलेले आहेत, त्यांचा विचार केला असतां दहाव्या-अकराव्या शतकांत महाराष्ट्र-भाषा जाणणारा समाज किती फैलावला होता, याचा अदमास चांगला होतो.

शके ९३०-मधील **म्हैसूर**जवळील **श्रवण-बेळगोळा** येथील चामुंडरायाचा शिलालेख, शके १०७९-मधील **गारदौंडा**जवळील पळसदेवाचा शिलालेख, शके ११०९-मधील परळचा शिलालेख, शके ११२८-मधील खानदेशांतील **पाटण** येथील चांगदेवाचा शिलालेख व शके ११९५-मधील पंढरपूरचा शिलालेख—या शिला-लेखांचीं ठिकाणें मनांत आणिलीं म्हणजे केवढा मोठा विस्तीर्ण प्रांत मराठी बोलणाऱ्या लोकांनीं अकराव्या-बाराव्या शतकांत व्यापिला होता, याची चांगली कल्पना होते. एवढा मोठा प्रांत व्यापणारे लोक अगदींच मूढ होते किंवा बाव्न मातृकांचें ज्ञानहि त्यांना नव्हतें, असें कोणालाहि म्हणतां येणार नाहीं. यांपैकीं विद्वान् संस्कृतज्ञ ब्राह्मण होते ते तर उत्तम

प्रकारची प्रतिभासंपन्न ग्रंथरचना करीत असत.

भवभूतीसारखा नाट्याचार्य, आपल्या लेखणीच्या पुंगीनें समाजाच्या मनोदेवतेला असा डोलविणारा कीं, ज्याची ती गोड भाषा लहानपणीं वाचलेली म्हातारपणींहि कानांत गुणगुणत राहते; तसेंच भास्कराचार्य, गणेश दैवज्ञ हे केवढाले ज्योतिषी !! भास्कराचार्य तर केवळ अद्वितीय गणिती. याची बुद्धिमत्ता व गणितशास्त्र-पारंगतता अशी गाढी कीं, ती पाहून सर्व जगानें तोंडांत बोट घालून थक्क व्हावें. असा हा विद्वान् महाराष्ट्र-ब्राह्मण साक्षात् मराठी बोलणारा होता. याचे संस्कृत गणित-ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याच्या रिक्तहस्ते[1] मुलीच्या नांवानें लिहिलेल्या ‘लीलावती’चीं अनेक भाषांतरें उपलब्ध आहेत. तीं पाहिलीं असतां असें मनांत येतें कीं, यानें स्वतः किंवा याच्याच काळीं दुसऱ्या कोणीं केलेला ‘लीलावती’चा मराठी तर्जुमा तरी शोध केला असतां अवश्य सांपडेल. याचा नातू जो चांगदेव यानें विद्याप्रसारार्थ व आपल्या आजाचे ग्रंथ लोकांस पढविण्याच्या उद्देशानें स्थापिलेल्या विद्यापीठांत बसविलेल्या शिला-लेखांत मराठी मजकूर कोरलेला पाहून तर या वरील तर्काला चांगलीच बळकटी येते; व या नातवाच्या आजानें कांहींतरी ग्रंथरचना मराठींत केली असलीच पाहिजे, असें शतदा मनांत येतें. या भास्कराचार्याप्रमाणेंच श्रीपति व ब्रह्मदेव हेहि हुशार ज्योतिषी होते. यांच्या ग्रंथांचीं फार प्राचीन काळींच मराठी भाषांतरें झालीं होतीं, हें त्यांच्या अर्वाचीकृत प्रती हल्लीं उपलब्ध असलेल्या पाहिल्या असतां स्पष्ट दिसून येतें. यावरून असले जाडे विद्वान् या महाराष्ट्रसमाजांत असून यांचा सहवास समाजाला नित्य लाभत होता. या असल्या ग्रंथकारांवरून तत्कालीन महाराष्ट्र-समाजांतील कांहीं लोकतरी विद्वत्तेच्या व संस्कृतीच्या किती उंच टप्प्यावर गेले होते, हें स्पष्ट आहे. काव्यमीमांसाकर्ता राजशेखर हाहि महाराष्ट्र-ब्राह्मण होता. याची मराठी रचना नाहीं, पण प्राकृत रचना उपलब्ध आहे. यानें आपल्या ग्रंथांत एका राजसभेचें वर्णन केलेलें आहे. त्यांत महाराष्ट्रीय

---

१. विधवा.

लोकांचें स्थान दिलें आहे. त्यावरून संस्कृत न जाणणारे व महाराष्ट्री बोलणारे महाराष्ट्र-लोक राजसभेंत प्रवेश होण्याइतके संपन्न व सुसंस्कृत होते, असें सिद्ध आहे.

तसेंच १०५१ -मधल्या सोमेश्वराच्या ग्रंथावरून महाराष्ट्रस्त्रिया मराठींत गाणीं रचून गात असत व हीं गाणीं केवळ कांहीं विशेष प्रसंगापुरतीं नसून घरांतल्या दळणकांडणाच्या नित्यकृत्यांतहि हमेश गाइलीं जात, असें दिसतें. हल्लीं ज्याप्रमाणें जनाबाईचे अभंग सकाळच्या प्रहरीं जात्यावर दळतांना गोड स्वरानें गाइलेले ऐकूं येतात, तशींच तेव्हां तीं गाणीं येत असत. म्हणजे आकराव्या शतकांत मराठींत चांगलीं गाणीं रचिलीं जाऊन तीं बायकांच्या नित्यकृत्यांपर्यंत जाऊन पोहोंचलीं होतीं. तसेंच या काळचे चक्रवर्ती राजे, मांडलिक व संस्थानिक हेहि मराठी भाषा जाणणारे व बोलणारे होते आणि त्यांच्या राज्यांत ही भाषा चांगलीच प्रचारांत होती, असेंहि मागें दिलेल्या शिला-लेखांवरून म्हणतां येतें. श्रवण—बेळगोळ्याचा गोमतेश्वराचा कारागीर व धोंडजवळील पळसदेवाचें सुंदर देऊळ बांधणारा शिल्पज्ञ संस्कृत वाक्य न योजितां आपली कृति मराठींत जाहीर करितात. यावरून त्या त्या प्रांतांत मराठी भाषा चालू होती, याबद्दल संशय राहत नाहीं. शके ११२८-मध्यें सोइदेव नांवाचा राजा आपल्या गुरूनें बांधिलेल्या मठाला दिलेलें दान मराठींत जाहीर करितो, व ११०९-मध्यें अपरादित्य राजा आपण दिलेलें दानशासन कोणींहि मोडूं नये, अशी शपथ मराठींत घालतो, याचा अर्थ काय? एका राजानें दिलेलें दान दुसऱ्या राजा-शिवाय कोण नष्ट करणार? तेव्हां त्या वेळीं दान देण्याची व तें नष्ट करण्याची शक्ति ज्यांच्या ठिकाणीं नांदत होती अशा राजांना आश्रित विद्वानांचे मदतीशिवाय स्वतःच समजेल अशा भाषेंत व समजावी अशा हेतूनें ही शपथ व धमकी त्यांच्या प्रचारांतल्या मराठी भाषेंत कोरली गेली. यावरून तत्कालीन राजकुळांत मराठी भाषा समजली व वापरली जात असे, याबद्दल संशय मानण्यास जागा राहत नाहीं. ११९५-

मधल्या पंढरपूरच्या शिलालेखावरूनहि हाच बोध होतो. त्यांत तत्कालीन राजशिरोमणि चक्रवर्ती रामदेवरावाचा व विद्वच्छिरोमणि कार्यधुरंधर जो हेमाद्रि त्याचा आणि त्याबरोबरच अनेक श्रीमंत सावकार, व्यापारी, शूद्र, स्त्रिया व पुरुष यांचा उल्लेख आलेला आहे. मागील शिलालेखांत कांहीं-तरी भाग संस्कृत आहेत, पण या पंढरपूरच्या एवढ्या मोठ्या शिलालेखांत एकहि ओळ किंवा वाक्य संस्कृतांत नाहीं. यावरून जाधवांच्या राजवटींत मराठी भाषा राजवाड्यांत, राजसभांत, राजाश्रितांत, शेठसावकारांत, क्षत्रियांत, शूद्रांत व अतिशूद्रांतहि सर्रास चालू होती. या काळीं संस्कृताशिवाय इतर भाषा बोलूं नये, संस्कृत शब्दांचे उच्चारहि परकीयां-प्रमाणें न करतां स्पष्ट व शुद्ध करावे, असा दंडक घालून देणाऱ्या ऋषींचे वंशज जे अकराव्या शतकांतले ब्राह्मण ते ही आज्ञा मोडून खुशालपणें मराठी बोलत व पुराणप्रिय अशा त्यांच्या अभिमानी स्त्रिया तर व्यवहार मराठी भाषेंतच चालवीत; अशी स्थिति या वेळीं महाराष्ट्र-समाजाला प्राप्त झाली होती. बाहेरचे आघात किंवा आंतली परिस्थिति किंवा इतर कोणत्याहि एक किंवा अनेक कारणांनीं ही स्थिति कशी आली असेल ती येवो पण अकराव्या-बाराव्या शतकांत महाराष्ट्र-समाजाची भाषेसंबंधांत स्थिति ही अशी होती.

ही स्थिति दर्शविणारी एक आख्यायिका येथें देतों –

**कुंडी राजेयां दर्शन कथनु ॥ कुंडी राजेया दर्शनु ॥ यांसी लोनार कुंडी भैरवीं आसनु असें: ऐसां एकु दी सोमवतीअे: कान्हरदेओ लोणारां आला: तंवं राणेनी: अेथीचे सौंदर्य लावण्यू रायापुढां सांघितिलें: तंव राऊ कुंडा आला सरीसीं कुमरावली: तैं महादेऊ राऊ सरिसा होता: बरुषां कां सोळांचा रायासवें कुमरीं: राणीवसा: कुंडी स्नान दानु करौनि अष्टतीर्थियां केलियां तंवं धारातीर्थी यांचे दर्शनू जालें: सरिसा बडवा असें: तेनें भणतिलें: राजे हो: हेंची ईश्वर पुरुषु: तैंसाची कान्हरदेऊ साउमां आला: अंजुळीं एकीं आसुआं पुढा ठेवोनियां: मग हडपिआतें आसूची वारवारी मागितैली: तिआं पुढां रिचऊनी श्रीचणीवरी माथां ठेविला: अेने भणतिले राजे हो उठार:**

मग कर पुढां जोडौनि सेवकां वृत्ती उभया ठाकीनिला: अने बैसका दीन्हला: तंवं भाटीं आसोला: भणतिलें: देऊ हो: घेयां घेयां: सिंघणाचा कान्ह तुम्हा प्रसन्नु जाला: असें: भाटू अधिकेंचि गर्जो लागीनिले: तंह वेळीं: राओ भणतिलें: सरारे परौतां: यांसीं राऊ तैसा रंकू सिंघणाचा कान्ह तो तम्हासी कीं: यांसीं सुवर्णु तैसी मात्ती। द्रव्यु पाषणु या समरसेंची: धाकुटा महादेराऊ तें पांतु उभा होता: राऊ नावेकु बैसोनो मग नमस्कारौनी निगांला: पुन तो कमळजेचेंया वटां तळीं एठिचे दर्शनु जाले: साजुळी भरी आसु पुढा ठेविलियां:.........राये दिठीचेनी मानें राखणाइतुं ठेविलें: हे गेलयां राखणाइते: वारवारी आसु तथा दोनि अंजुळां असुं गेऊनि गले: राओ भणतिलें पुरुष विरक्तु: परी हें द्रव्यु चंडीशु: संकल्पीतू राजा परमधार्मीकु: आस्तिकु तो द्रव्या भांडारी घलाचिना: मग तीसरां दी कुमारेश्वरांचा देउळीं दर्शना आला: याते विणविलें: जी जी द्रव्या काई करोओ: अणे भणतिलें कुमारेश्वराची पौळी। धारेचा घाटू कमळजओचा मंडपू करा: राये तैसेचो केलें ॥ ३९ ॥

या वेळीं रामदेवराव लहान वयाचा असून अजून गादीवर बसला नव्हता. सिंघण राजा राज्य करीत होता. म्हणजे रामदेवराजाचे पूर्वी सिंघण राजाचे वेळीं ही हकीकत घडली व ती घडली तशीच लिहून ठेविली गेली. यांतील शब्द व वाक्यें वाचलीं असतां ही हकीगत प्रत्यक्ष पाहणारानेंच लिहून ठेविली आहे, असें मनांत येतें. शिवाय आज इतकीं वर्षें नक्कल करूनहि यांतील रूपें निःसंशय जुनीं अशींच आहेत यावरूनहि वरील म्हणण्यास बळकटी येते. रामदेव जाधवाच्या सभेंत मराठी प्रबंध वाचले व ऐकले जात; व हे प्रबंध कवीनें आपल्या नांवावर रचावे, ते आपल्यास अर्पण करावे व त्यांत आपलें नांव घालावें, अशी हौस त्यास होती. एवंच जाधवांच्या राजवटींत—निदान त्यांतील शेवटल्या दोन-तीन पुरुषांच्या अमलांत—त्यांच्या राज्यांत व महाराष्ट्रांतील इतर लहानसहान राजांच्या आणि मांडलिकांच्या सभांत व प्रांतांत मराठी भाषा वापरली जात असे.

वापरली जात असे, याचा अर्थ ती भाषा जानपद लोक बोलत. तींत

लेख लिहिले जात. तींत रचनाहि होत असे. गद्य व पद्य दोन्ही प्रकारचें वाङ्मय बाराव्या शतकांत मराठींत निर्माण होऊं लागलें होतें. या मराठी सारस्वताचे प्रायः तीन प्रकार असत. ( १ ) लहान मुलांना वाचण्याकरितां नीतिकथा. उदाहरण – पंचतंत्र वगैरे गद्य व पद्य मिळून दहापेक्षां जास्त पंचतंत्रें दृष्टीस पडतात. बाराव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत हीं निरनिराळ्या काळीं रचिलेलीं आहेत. ( २ ) स्त्रियांकरितां गाणीं वगैरे. उदाहरण—सोमेश्वरानें दिलेलीं पद्यें, महानुभावांचे गुढे वगैरे. ( ३ ) वैश्य शूद्र वगैरेंकरितां रचिलेलीं पौराणिक कथानकें. उदाहरण—रसाळ कवीचें रामायण, कृष्णचरित्र वगैरे. खालील तीन वर्गांकरितां हे ग्रंथ रचण्यांत त्यांना भक्तिप्रवण व प्रवीण करून हिंदुधर्मांत सुखानें राहतां यावें व सभोंवतालच्या बुद्ध, जैन वगैरे धर्मांत जाण्याची त्यांची प्रवृत्ति होऊं नये, हा हेतु असला पाहिजे. ( ४ ) असंस्कृतज्ञ व साधारण बुद्धीच्या ब्राह्मणांकरितां ज्योतिष, वैद्यक, वगैरे शास्त्रांसंबंधीं सुलभ रचना. उदाहरण– श्रीपतीच्या ‘ रत्नमाले’सारखे ज्योतिषग्रंथ किंवा त्यांचीं भाषांतरें. विठ्ठल गलंडूसारखे वैद्यग्रंथ. (५) धर्मसंस्थापकांचीं वर्णनचरित्रें व आख्यायिका. उदाहरण – लीलाचरित्र, मूर्तिप्रकाश. ( ६ ) या जानपद लोकांकरितां लिहिलेल्या ग्रंथांखेरीज राजे व श्रीमंत या लोकांकरितांहि सरस प्रकारची ग्रंथरचना या काळीं होत असे. राजे, राजस्त्रिया व धनिक वगैरे मंडळी प्रायः असंस्कृतज्ञ असत व ते मराठी भाषा बोलत. त्यांचें मनोरंजन होईल व त्यांना आवडतील असे ग्रंथ रचणाराची व राजाची भेट होऊन त्याच्या कृतीचा आस्वाद राजास स्वतः घेतां येणें सोयीचें होतें. संस्कृतग्रंथ परीक्षणाला राजसभेंतील मंत्री, पुराणिक वगैरे सभासदांकडे धाडण्यापेक्षां मराठी ग्रंथांचें प्रत्यक्ष राजालाच परीक्षण होई. यामुळें ग्रंथकाराचा गौरव सहज होई. याकरितां सरस ग्रंथरचना होऊन ती राजसभेंत अगर राजगृहीं वाचिली जाई. उदाहरण—नलदमयंती-आख्यान, रामायणकथा, रुक्मिणीस्वयंवर वगैरे. तसेंच राजा जरा बुद्धिमान् व धार्मिक वृत्तीचा असल्यास त्याचेकरितां धर्ममतें व

वेदांतासारख्या विषयांवरील सुबोध ग्रंथहि राजाज्ञेनें किंवा राजकृपाभिलाषानें त्याच्या गुरूस किंवा आश्रित विद्वानांस लिहिणें भाग पडे. हे केवळ सुबोध व लहान असेच ग्रंथ असत. पण याच्या पलीकडे असल्या विद्वानांची ग्रंथरचनेची मजल फारशी जात नसे. कारण उपनिषदें, संहिता, न्याय, मीमांसा, व्याकरण वगैरे विषय राजांना किंवा स्त्रिया, क्षत्रिय, वैश्य, शूद्र वगैरेंना समजण्यासारखे नव्हते. यामुळें त्यांच्या मेंदूला पेलणार नाहीं असले सिद्धान्तविवेचनाचे भारदस्त ग्रंथ मराठींत लिहिण्याचें प्रयोजन नव्हतें व ते लिहिले जात नसत. या शास्त्रांचा मक्ता झाडून ब्राह्मणांकडेच असे; व क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांपैकीं कोणीहि त्यांचे वाटेस जात नसे. वरील वेदांतविषयक सुलभ ग्रंथरचनेचें उत्तम उदाहरण 'विवेकसिंधू' हें होय.

'विवेकसिंधू' हा ग्रंथ शके १११०-मध्यें मुकुंदराज कवीनें शारंगधर नांवाचा कोणी राजा राज्य करीत असतां जयंतपाळ किंवा जैत्रपाळ या नांवाच्या एखाद्या धनवान् पुरुषाच्या विनतीवरून रचिला. या ग्रंथाच्या उत्तरार्धांत अकराव्या अध्यायाच्या शेवटीं मुकुंदराज म्हणतो[1] —

"शके अकरा दाहोत्तरू। साधारण संवत्सरू । राजा शारंगधरू । राज्य करी ॥ १ ॥ ऐसा समयो सर्वोत्तमू । तेथ मुकुंद द्विजोत्तमू । विवेकसिंधु मनोरमू । निर्मिता झाला ॥ २ ॥"

व पुढें ग्रंथसमाप्तीचे वेळीं मुकुंदराज आणखी असेंहि सांगतो कीं,

" नृसिंहाचा बल्लाळ । तेयाचा कुमरु जयंतपाळ । तेणें करविला हा रोळ । ग्रंथरचनेचा ॥ १ ॥ "

यावरून ज्याचे आश्रयाला हा मुकुंदराज कवि होता त्या थोर पुरुषाचें नांव जयंतपाळ ऊर्फ जैत्रपाळ होतें. या ग्रंथांत उल्लेखिलेल्या

---

१. भारत इ.सं. मंडळ—ग्रंथसंग्रह व रा. दिवेकर यांचे संग्रहांतील पोथ्या. छापील पोथ्यांत हा उल्लेख आढळत नाहीं. शके १११०-त साधारण-संवत्सर पडत नाहीं; पण बार्हस्पत्य गणनेवरून पाहतां तो शके १११२-त पडतो. तेव्हां मुकुंदराजाची गणना बार्हस्पत्य असावी, असें दिसतें.

'मनोहर अंबानगरी' या हरिनाथाच्या स्थानामुळें विपर्यास होऊन पुष्कळ गैरसमज झालेला आहे. हा उल्लेख मोमिनाबाद ऊर्फ जोगाईचें आंबें या स्थळाचा असावा असें वाटून जयंतपाळ हा देवगिरीवर जाधवांच्या वंशांतील कोणी पुरुष होता, अशी समज महाराष्ट्रांत सर्वत्र दिसते; पण ही चूक आहे. ही नृसिंह, बल्लाळ व जयंत अशी त्रयी देवगिरीकर जाधवांत नाहीं. डॉ. भाऊ दाजी म्हणतात कीं, यांपैकीं बल्लाळ हाच निःसंशय भिल्लम होय; व दुसरे एक विद्वान् संशोधक, ही त्रयी म्हैसूरकडील **होयसाळ** वंशांतल्या राजपुरुषांची असून त्यांचे राजगुरु मुकुंदराज होते, असें सांगतात. पण हाहि समज चुकीचा आहे. होयसाळांची राजधानी हळेबीड व बेद्धर या ठिकाणीं जाऊन मीं याचा शोध केला; तेव्हां या वंशांत ही त्रयी नाहीं व याचा आणि मुकुंदराजाचा कोणत्याहि प्रकारें संबंध नाहीं, असें मला दिसून आलें. होयसाळ हे मूळ जैन होते. पुढें रामानुजाचार्यांच्या उपदेशामुळें ते वैष्णव झाले व विष्णूची उपासना आणि देवळें त्यांनीं राज्यांत सुरू केलीं. तसेंच होयसाळांच्या राज्यांत शके ११००-मध्यें कानडी भाषा सर्वभर प्रचारांत होती. मराठीचा तेथें गंधहि नव्हता.

या विवेकसिंधूची रचना मुकुंदराजानें आपल्या वयाच्या उत्तरावस्थेंत व शरिराच्या अशक्त स्थितींत जेव्हां 'श्वासोन्मेषाचाही श्रम वाटे' अशा वेळीं फार कष्ट घेऊन केली. 'उपजीविका तेणें बाळू । तया मुखीं मिष्टान्न कवळू । जननी जेवीं अति कृपाळू । अपत्य विषईं ॥ तैसें उपनिषदांचें मंथन । करोनि केला ग्रंथ निर्माण ।' आणि इतके श्रम घेण्याचें कारण इतकेंच कीं, या ग्रंथगंगेनें 'विश्व सुस्नात होऊन सुखी व्हावें.' या आपल्या महशूर ग्रंथांत मुकुंदराजानें आपली गुरुपरंपरा व आपल्या आजेगुरूची व गुरूची थोडीशी माहितीहि दिली आहे. मुकुंदराज म्हणतो—

"आद्य श्रीगुरुनाथु । तेथोनि श्रीहरिनाथू । तयाचा शिष्य श्रीरघुनाथू । ज्ञानगुणसमुद्र ॥ १ ॥" आणि यांपैकीं आपला आजेगुरु जो श्रीहरि-

नाथ त्याचें जन्मस्थान 'बाण[1] गंगेचिया तीरीं। मनोहर अंबा नगरीं। तेथ प्रगटला श्रीहरी ।। ' असें सांगितलें आहे. हा हरिनाथ वेदशास्त्रपारंगत असून यानें परम गहन अनुष्ठान आरंभिलें व शेवटीं महाकुंडांत हवन करीत असतां ' झाली होमाची समाप्ती । मग आदरली पूर्णाहुती । तेथ प्रगटली स्वयंज्योति । घृतधारे सरिसी ।। ते ज्वाळे आंतु । श्रीशंभु प्रगटले ना भी म्हणतु । भक्तांचे वेळाईतु। करुणासिंधु ' ।। त्या वेळीं सदाशिव श्रीहरिनाथास 'वर माग' असें म्हणाले. शंकर प्रसन्न होऊन वर देतात, असें पाहून श्रीहरी म्हणाला, ' प्रेम देई आपुलें । कैवल्यदानी ।। ...... ..... बुडाले जीव संसाराब्धि । ते नेणती आयशुद्धी । जी स्वामी करुणनिधी । तारावें जी ।। ' हें ऐकून महेशें ' हास्य केलें ' व असा वर दिला कीं, ' हें होईल. ' आणखी असेंहि सांगितलें कीं, ' माझें तेज प्रगटेल। तैं तुझिया वदनीं प्रवेशैल । तें शिष्यदेहीं संक्रमैल । गुरुवाक्यद्वारें ।। १ ।। यानंतर मुकुंदराज म्हणतो कीं,— हरी निपचेत पडला व त्याची सर्व चेतना स्थिर झाली आणि त्याची समाधि लागली. ही स्थिति बावीस दिवस अशीच होती. नंतर 'दीन बाविसां । हरीसी झाली सुलीन दशा। मग तो समाधी उत्थान आपैसा । पावता जाला ।। १ ।।' नंतर "जडचर्या वर्तपू । पिशाच-चर्ये खेळतू । निजानंदसागरीं चुबकळतु। श्रीहरी योगिराज ।। २ ।। डुल्लत चालणें । विसरत बोलणें। नेणो कांई हास्य करणें। श्रीहरिनाथासी ।। ३ ।। कर्मवासना सरली। जीवि चिकित्सा निमाली । पूर्ण दृष्टि झाली । म्हणौनियां ।। ४ ।। परापेक्षा स्नान भोजन। परापेक्षा वस्त्रपरिधान । कवणासी गोष्टी संनिधान । करणें आथीचि ना ।। ५ ।। " असें आपल्या आजेगुरूचें वर्णन देऊन पुढें मुकुंदराज म्हणतो कीं,–' हरीनें अनेक शिष्य प्रबोधले. ' परंतु त्या सर्वांत त्याची विशेष कृपा 'रामचंद्रा'वर झाली. त्या वेळीं रामचंद्राची किंवा ' रघुनाथा'चीहि अठरा दिवसांपर्यंत समाधि लागली व ती उतरल्यावर तो 'रघुनाथ' आपला शिष्यसंप्रदाय वाढवूं लागला. त्यानें

---

१. 'बाण गंगा' असा पाठ बहुतेक सर्व छापील प्रतींत आहे. पण लेखी पोथ्यांतून 'वेणु गंगा' 'वैन गंगा' असेहि पाठ आढळतात. 'कथा-कल्पतरू'चे पोथींत 'येळू गंगा' असें नांव आढळतें. प्रसिद्ध कवि अमृतराय याचा शिष्य भोजराज विश्वंभर याचे हातची 'विवेकसिंधू'ची एक प्रत आहे, तींत या नदीचें नांव 'वैण्य गंगा' असें लिहिलें आहे.

'अनेक शिष्य प्रबोधिले । ब्रह्मसुखीं आनंदविलें । ब्रह्मविद्येचें आवारू केलें । सकळ जीवासीं ॥ १ ॥' या रघुनाथाचा शिष्य मुकुंदराज स्वामी होय आपला गुरु व आजेगुरु या दोहोंपैकीं कोणींहि ग्रंथरचना केल्याचा उल्लेख मुकुंदराज करीत नाहीं.

मुकुंदराज हा देवगिरीकर जाधवांचा राजगुरु नसून त्या राजघराण्याशीं त्याचा संबंध नाहीं, असें म्हटलें आहे. पण जोगाईच्या आंब्याशीं मुकुंदराजाचा संबंध थोडासा लागतो. जोगाईच्या आंब्यास गांवाबाहेर डोंगरांत एका रम्य ठिकाणीं मुकुंदराजाची 'समाधि' लोक अजून दाखवितात; व या प्रांतांत मुकुंदराजाचे ग्रंथहि आढळतात. परंपरागत माहिती अशी आहे कीं, मुकुंदराज येथेंच होऊन गेले. यावरून या ठिकाणाचा मुकुंदराजाशीं कांहींतरी संबंध असावा, हें निश्चित दिसतें. मग ते स्वतः येथें वास्तव्य करून असोत किंवा त्यांचा कोणी पट्टशिष्य येथें राहत असून त्यानें भक्तिभावानें प्रेरित होऊन आपल्या गुरूच्या पादुका आणून तेथें समाधि बांधली असो[1].

मुकुंदराजाची आणखी एक समाधि नागपूर प्रांतांत बैतुलजवळ खेडलें या गांवीं जुन्या पडक्या किल्ल्यांत दाखवितात आणि 'खेडलें' हेंच ठिकाण मुकुंदराजाच्या समाधीचें होय, असें तेथील लोक सांगतात. मुकुंदराजानें आपल्या आजेगुरूचे संबंधीं उल्लेखिलेली 'वैन्यगंगेच्या तीरीं मनोहर अंबा नाम नगरीं' हीहि याच प्रांतांत आहे. येथें भंडाऱ्याजवळ वैनगंगा' नदी असून तिच्या कांठचे 'अंभोर'[2] हें गांव हीच अंबानगरी. या ठिकाणीं हरिनाथाची समाधि आहे. रघुनाथाचीहि समाधि त्याच प्रांतांत छिंदवाड्यांत आहे. यावरूनहि मुकुंदराज हा नागपूर प्रांतांत राहणारा होता, असें स्पष्ट होतें.

---

१ अशाच प्रकाराची वाईजवळ पांडववाडीस वामनस्वामीची समाधि असल्याचें प्रसिद्ध आहे.

२ अंभोरें हा गांव भंडाऱ्याजवळ आहे. येथें आम, जाम, कन्हान व वैनगंगा या नद्यांचा संगम आहे.

मुकुंदराजाच्या या 'विवेकासिंधु' ग्रंथासंबंधीं आणखी एक बाब अशी आहे कीं, या ग्रंथाची एक संस्कृत प्रत उपलब्ध आहे. यावरून हा ग्रंथ मुकुंदराजानें संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही भाषांत रचिला असावा, असा तर्क करण्यास जागा होती. पण हल्लीं आणखी एक-दोन प्रती मिळाल्या आहेत, त्यांत 'मराठी' व 'संस्कृत' या दोन्ही भाषांत हा ग्रंथ लिहिलेला आहे. यांपैकीं एका पोथींत — 'श्रीमुद्गल-समाख्यस्य पितुः पादाम्बुजद्वयम्॥ नत्वा तनोति गोपालो विवेकामृतमादरात् ॥ २ ॥' असें म्हटलें आहे. म्हणजे मूळ मराठीचें संस्कृत रूप गोपाल यानें केलें, असें आतां स्पष्ट होतें. याच पोथींत पूर्वार्धाचे शेवटीं पुढील श्लोक आहेत — लम्बोपनाम्ना ख्यातेन श्रीमत्केशवसूनुना ॥ रघुनाथेति नाम्नायं कारितः श्लोकगुम्फकः ॥ ५३ ॥ भगीरथस्य दैवेन विश्वं भूयात तथा सुखि ॥ इतर ठिकाणीं आढळणारी 'नृसिंहाचा बल्लाळ । तेयाचा कुमर जैतपाळ ।' इत्यादिहि माहिती यांत नाहीं. या पोथीवरून 'विवेकासिंधु' मुकुंदराजानें मराठींत रचिला व त्याचें संस्कृत भाषांतर गोपाळ मुद्गल यानें केलें, असें झालें.

विवेकसिंधूच्या धांचे शेवटीं मुकुंदराज म्हणतो, 'श्री शांकरोक्ती बरी । मी बोलिलों मराठी वैखरी । म्हणूनि येथ धरावी चतुरीं । शास्त्र-बुद्धि ॥ १ ॥ म्हणजे आपण भाषा जरी मराठी योजिली आहे तरी आपल्या म्हणण्याला शंकराचार्यांचा थोर पाठिंबा आहे, असें मुकुंदराज बजावून सांगत आहे आणि हें सांगणें त्याला अवश्य वाटलें आहे. या काळच्या असंस्कृतज्ञांना आचार्यमत ऐकण्याची इच्छा झाली व ती तृप्त करण्याच्या हेतूनें मुकुंदराजानें हा ग्रंथरचनेचा गदारोळ केला; व ज्यांना संस्कृत कळत नाहीं त्यांना मुकुंदराजानें आचार्यांच्या म्हणण्याचें सार समजावून सांगितलें, असें झालें.

'विवेकसिंधु' खेरीज 'परमामृत', 'पवनविजय', 'मूलस्तंभ', 'पंचीकरण' वगैरे ग्रंथ मुकुंदराजाचे म्हणून प्रसिद्ध आहेत. या सर्वांत वेदान्त विषय आला आहे. यांपैकीं 'पवनविजय' व 'मूलस्तंभ' हे

ग्रंथ शिवपार्वतीसंवादरूपानें सांगितले आहेत. पवनविजयांत 'हा ग्रंथ पवनविजय। सर्व कामनेचा करी जय। विवेकसिंधूचा अन्वय। सारांश येथे कथियेला[1]॥' असें शेवटीं म्हटलें आहे. यावरून हा 'विवेकसिंधू'चें सार किंवा टिप्पणी असावी, असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण ग्रंथ पाहतां त्यांतील विषयाचा 'विवेकसिंधू'तील विषयाशीं कांहींच संबंध दिसत नाहीं. 'पवनविजयां'त पुष्कळसा भाग 'स्वरोदया'वरून घेतलेला दिसतो व हें त्याच्या नांवाला सहज शोभण्यासारखें आहे. याची ओवीसंख्या सुमारें साडेचारशें आहे. 'मूलस्तंभ' हा तर निव्वळ दुसऱ्या कोणाचा असावा, असें उघड दिसतें. यांत पिंडब्रह्मांडाची स्थिति वर्णून विश्वोत्पत्तीसंबंधीं कांहीं मजकूर आला आहे व पुढें आधानकालापासून जन्मकालापर्यंत पिंडवृद्धि कशी होते व संततीस निरनिराळे गुण कां प्राप्त होतात, हें सांगितलें आहे. या दोन्ही ग्रंथांपेक्षां 'परमामृत' हा ग्रंथ श्रेष्ठ दर्जाचा आहे. पण यांतील ओवीची बांधणी 'विवेकसिंधू'तील ओवीच्या बांधणी-पेक्षां निराळी आहे. या ग्रंथाचे शेवटीं ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे कीं, 'हें ब्रह्मगौप्य गुप्त ठेवणें। अनुभव कोणा न सांगणें। देवतांचें गुप्त राहणें। स्वस्वभावें करोनियां ॥ १ ॥ हें ब्रह्मगौप्य मूढाशी। सांगूं नको अलभ्य त्याशी। गुज ऐकोनी चाहाटळपणाशी। वृथा मूर्ख उठवूं नको॥ २ ॥

'परमामृत' ग्रंथ 'विवेकसिंधु'कार मुकुंदराजाचा नसावा, असा कांहीं विद्वानांचा तर्क आहे.

मुकुंदराजानें दिलेल्या आपल्या गुरुपरंपरेवरून व त्यांच्या हकीकती-वरून तो शिवभक्त असून नाथसंप्रदायी असावा, असें दिसतें. शके ११००-चे सुमारास नाथसंप्रदाय आपल्या महाराष्ट्रांत पुष्कळ पसरलेला होता. या संप्रदायांसंबंधें व त्याच्यांतील ग्रंथसंपत्तीसंबंधें अजून फारशी माहिती आपणांस नाहीं. पण या संप्रदायांत या काळीं मराठी भाषेंत

---

१. कांहीं पोथ्यांत या ओवीऐवजीं "हा पवनविजय ग्रंथ। संस्कृतावरूनी प्राकृत। जे नित्य पाहोनि अनुभवित। सर्व काम पूर्ण होती॥" अशी ओवी आहे.

बरीच ग्रंथरचना झाली असावी, असें वाटतें.

या संप्रदायापैकीं मच्छींद्रनाथ, गोरक्षनाथ, गैनीनाथ, ही परंपरा मात्र आपल्या कांहींशी परिचयाची आहे. या परंपरेंतील पहिले ऐतिहासिक पुरुष मच्छींद्रनाथ हे होत. यांचा एकहि ग्रंथ प्रसिद्ध नाहीं. या मच्छींद्र-नाथाचा शिष्य गोरक्षनाथ ऊर्फ गोरखनाथ. गोरखनाथाचीं देवळें व मठ हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं आहेत, व याची समाधि नेवाशाजवळील एका डोंगरांत दाखवितात. या गोरक्षाच्या अनेक निरनिराळ्या आख्यायिका प्रसिद्ध आहेत. हा दहाव्या किंवा अकराव्या शतकांत होऊन गेला असावा. याचे पंथांतील लोक आपल्या कानांस भोकें पाडून त्यांत मोठालीं कुंडलें घालतात. यावरून यांस आपले इकडे 'कानफाटे' असें म्हणतात. हे अंगाला राख फासून हातांत कोका घेऊन तोंडानें 'गोपीचंद-मैनावती'चीं गाणीं गात भिक्षा मागतांना नेहमीं आढळतात. या परंपरेंतले बहुतेक मोठे संत योगाभ्यासी असून हठयोग करितात. गोरखनाथाचे 'गोरक्ष-किमयागर' वगैरे अनेक संस्कृत व हिंदी ग्रंथ आहेत. मराठींत कांहीं पदें व 'गोरक्ष-अमर-संवाद' व 'गोरक्षगीत' हीं दोन प्रकरणें याचे नांवानें प्रसिद्ध आहेत. गोरक्षनाथाचें एक पद असें:—

> पाषाणाचीं देऊळें। पाषाणाचा देवो। पाषाणाची पाऊली। तेथ न फिटे संदेहो ॥ कैसें बोलों पंडितो। देवो कवणें ठाईं। निजलिंग न्याहाळितां। आम्ही तुम्ही नाहीं ॥ गंगेचे उदकें। स्नान पैं कीजे। बाहिर पखाळितां। भीतर केंवि भीजे ॥ सजिवें तोडुनि बाबु। निर्जिवें पूजिती। कर्में करुनि प्राणी। केंबि उद्धरती ॥ येहि विधि हें जग। पडियेलें धांदा। आत्मलिंग हृदयीं। कोई न बुझती अंधा ॥

---

१. काठेवाडांत 'गोरखथडी', हरिद्वाराजवळ 'गोरखपूर' इ.

२. नवनाथभक्तिसार, संतलीलामृत.

३. सातव्यापासून तेराव्या शतकापर्यंत निरनिराळ्या शतकांत निर-निराळे ग्रंथकार याचा काळ मानतात.

वदंति गोरखरायें । सद्‌गुरु वाणी आम्ही । निर्जलिग न्याहाळुनि ।
संसारा दिल्हे पाणि ॥

गोरक्षनाथांनीं रचिलेला 'अमरनाथ-संवाद' या नांवाचा एक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. ग्रंथ योगमार्गपर आहे. यांतून एक उतारा देतों:—

वृक्षाची पानें झडति । आणि माघौति नीगति । परि तेंचि म्हणुं नयेति किं । दिवेयापासौनि निघालिया काजळी । त्याचा पोटि काई आणिकी षाणि असे: । मग निगालीये नदी उदके अनित्यें । परि प्रवाही नित्य जाणावी किं ॥ तैसा दृश्यु प्रपंचु पदार्थु अनित्यु॥ परि त्या प्रवाहो नित्य जाणावा। केळिचा गाभा उकलितां काई लाभु असे। आणि फळपानिचें निकें पिकलें । पिकतयाचा ॐडौचि पाहतां बरवा दिसे । स्वप्निचें सुख स्वप्नींचि बरवें । मग निर्धारितां तेथें कांहीं असे: तें संसारिचे सुष दिसे निके ॥ सेंषी सुरस नव्हे ॥ एसें ज्ञानें जाणावें । आकाश कुसुमी जरि परिमळु भे( टे ) । नातरि नाथलीये वंझेचे लेंकरु त्रिभुवन भोगी: ससेंचेया सींगे । तिषटें हें बोलणेंचि लटिकें ॥ तैसा दृश्यु प्रपंचु: असत्यचि लटिका असें: । मृगजल जळीं नाहीं: परि मृगासि जळभ्रमु असे । कुसुम माळेचा नाथिला भोगिया आभासे: शुक्तिचां ठांई रजाबुद्धि लटिकी: तैसा दृश्यु प्रपंचु लटिकाचि: परि दिसत( ता ) असे: हा संसारु दुःखरूप ऐसा: त्याची जया आपुली ॐळषो नाहि: हें साकार पंचधा म्हणत खेॐ: तिये गोडीचीए रुचि: सांडौनि काई तिपट होती असे: हा उष्ठ वांकुडा दिसे: परि त्याचा रसु गोडिचीए सोए न संडित: वांकुडपणी परि रसीं नाहीं[२] ' : कि हे कस्तुरी काळी

१. ही पोथी कै. चांदोरकर यांचे जवळ होती. हींत जुनीं रूपें, पृष्ठ-मात्रा वगैरे सर्व ११-व्या शतकांतले लेखनप्रकार आहेत. यांवरून हा ग्रंथ निःसंशय बाराव्या शतकांतला किंवा त्यापूर्वींचा दिसतो.

भा. इ. मं. पु. ११ पृ. ३२

२. जिये पेरी दिसती उसीं । तिये लाभती कीं रसीं । अमृ. ९/७
आणि वांकुडेनि वोघेसी । गंगा हे उजूचि जैसी । कां पुटीं वलला उसीं । गोडी जेवी । ८/३/१

दिसे: परि तिचिया परिमळाचें सौरभ्यपण अणलेंकि। एवढीये सृष्टीचे अढाल: जेयाचेनि चालें: त्याते अळखे: तो या संसारा आतु सुख दु:खी लिपेना: जैसे पद्मिणीचें पत्र उदकां भितरि आसौनि अलिपत ( अलिप्त ) तया जन्माचें आणि कर्म्मभक्तिचें फळ तें किः ज आत्मज्ञान जाणिजे: ॥ ७ ॥ श्री गोरक्षनाथ विरचिते अमरनाथ ( संवादे ) आत्मज्ञान कथंति निजविचारें। छ। ११ ॥

यांतील दृष्टांत व प्रमेयें हीं ज्ञानेश्वरींत आढळणाऱ्या दृष्टांतांशीं व प्रमेयांशीं इतकीं जुळतात कीं, या ग्रंथाचा लेखक आणि ज्ञानेश्वर हे एकाच परंपरेंतले असून या दोहींतलें पाणी मूळ एकाच झऱ्याचें आहे, असें मनांत येतें. आणि हा ग्रंथ दिसतो असा व इतका जुना असेल, तर याचा लेखक जो गोरक्षनाथ त्याच्या शिकवणीचें प्रतिबिंब आणि त्याच्या वाङ्मयाची छाया ज्ञाननाथाच्या शिकवणींत व वाङ्मयांत निःसंशय आपल्या दृष्टीस पडती. वरील उताऱ्यांतील पहिली व दुसरी या ओव्या 'ज्ञानेश्वरी'तील अध्याय १५-मधील १३१ व १३२ या ओव्यांशीं ताडून पाहतां, तसेंच यांतील चौथी व पांचवी या ओव्या 'अमृतानुभवां'तील प्र. ७-मधील ८१ व ८२ या ओव्यांशीं लावून पाहिल्या असतां यांतील प्रतिपादन किती एकरूप आहे, हें पाहून वरील म्हणणें आणखी जास्त पटतें व दोन्ही पुरुष एकाच पाठांतले आहेत, याबद्दल मुळींच संशय राहत नाहीं.

याशिवाय 'गोरक्षगीता' या नांवाचें एक प्रकरण याच्या नांवावर मोडतें, हें वर सांगितलेंच आहे. 'हे गोरक्षगीता। गहिनीनाथ संवादू॥' असें यांत प्रारंभींच म्हटलें आहे. यांतील मजकुरावरून पाहतां गोरक्षनाथानें केलेला उपदेश त्याचा शिष्य गैनीनाथ यानें आपल्या शिष्य-मंडळीकरितां लिहून ठेवलेला यांत दिलेला दिसतो. म्हणजे याचें कर्तृत्व गोरक्षनाथापेक्षां गैनीनाथाकडेच देतें. मीं पाहिलेल्या पोथींतील भाषा, रूपें वगैरे अगदीं अलीकडील दिसतात. यांत योगाभ्यासाचें व त्यांत येणाऱ्या अनुभवांचें वर्णन केलेलें आहे. थोड्याशा मासल्यासाठीं

यांतून कांहीं ओव्या देतों. या ओव्या ज्ञानेश्वरींतील त्याच प्रकारच्या ओव्यांशीं गमतीनें ताडून पहाव्या.

तेणें काम शक्ति खुंटली। मग वायूतें उर्ध्व गति जाली। आला मणि पुरा जवळीं। देखिली बाळी कुंडली ।। प्रणायाम करितां नेटें। तै कुंडलिनी चिमुटे। वेळे उकलुनी सुसाटे। गगन मार्गे ।। गो. गी. साधिष्ठाना वरिली कांठीं। नाभिस्थाना तळवटीं। बंधु पडे किरीटी ओडियाणो तो ।। २१० ।। तैसी सुबद्ध आडली। पुटी होती दाटली। ते वज्रासनें चिमुटली। सावध होये ।। २२५ ।। ज्ञा. अ. ६

आपान माघौता मुरडला। स्वाधिष्ठाना वरी चालिला। क्षोभोनिया माजला झुंजे मणिपुरेसी ।। वाहाटुळी धाविली त्वरे। कोठयामाजी संचरे। कफ पित्तादिकांचे थारे। मोडोनि टाकी ।। ५१ ।। गो. गी. वेढे येकायेकी उकली। बहुतां दिवसांची असें भुकेली। ऊर्ध्व होऊनी मुखें गिळी। वाहाटुळी गा ।। ५४ ।। इडा पिंगळा येक मेळी। तिन्हि नाडीची ग्रंथी सुटली। षट चक्राचे पदर मोकळी। करिती झाली ।। गो. गी.

जो मूळ बंधें अडला। अपानु माघौता मुरडला। तो सर्वेचि वरि सांकडला फांकु धरी ।। २१४ ।। क्षोभलेपणें माजे। उवायिला ठाइं गाजे। मणि फुलेसि जूंझे। राहूनिया ।। २१५ ।। भीतरी बली न धरे। कोठेआं माझी संचरे। कफपित्ताचे थारे उरो नेदी ।। २१७ ।। साहाजे बहुवां दिआंची भूक। वरि चे व विली तें होये मीख। मग आवेसे पसरी मुख। ऊर्ध्वां उजू ।। २२८ ।। इडा पिंगला एकवट थि। गांठी तिन्हीं सूटति। साही पदर फूटती। चक्रांचे ।। २४४ ।।
ज्ञा. राजवाडे प्रत अ. ६

या 'गोरक्षगीते'चा लेखक गैनीनाथ हा ज्ञानेश्वराचा गुरु होता, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. या गैनीनाथाचा व ज्ञानेश्वराचा आजा गोविंदपंत यांचा विशेष ऋणानुबंध होता असें नामदेवाच्या आदींत (आवटे—नामदेवगाथा अ. ६७१, ६७९,) प्रारंभींच नामदेवानें लिहिलें आहे.

या ज्ञानेश्वराच्या घराण्यांतील ज्ञानेश्वरापूर्वींच दोन-तीन पिढ्यांचा

संबंध नाथसंप्रदायाशीं फार दृढ होता, हें नामदेवाचें म्हणणें या नाथ-संप्रदायांतील ग्रंथावरूनहि आणखी सिद्ध होतें.

हा नाथपंथ महाराष्ट्रांत उत्तरेकडून आलेला दिसतो. उत्तरेकडील शैव-संप्रदायी लोकांपैकीं कांहींनीं योगाभ्यास नीट करून तो मार्ग आपल्या शिष्यमंडळीस शिकविला. हा योगाभ्यास प्रत्यक्ष अनुभवानें समजून घेऊन कृतीनें आचरणारे जे लोक झाले त्यांपैकींच नाथसंप्रदायी हे होत. मच्छींद्र, गोरक्ष, गैनी यांपासून तों थेट परवांपर्यंतच्या महीपति, नरहरी ऊर्फ ढोलीबुवापर्यंतचे सर्व नाथपंथी योगाचा अभ्यास करीत, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें; व हे आपल्या परंपरेंत योगाभ्यासाचें शिक्षण प्रत्यक्ष शिकवीत. मराठी भाषेंत योगासंबंधानें जे थोडेसे ग्रंथ आढळतात व योगांतील अनुभव अधूनमधून जे ऐकूं येतात, ते सर्व किंवा बहुतेक या नाथसंप्रदायाच्या प्रसारामुळेंच होत. परंतु हे ग्रंथ साधारण जानपद लोकांकरितां किंवा अज्ञजनांना सरसहा ज्ञानपंथाची वाट दाखविण्या-करितांच लिहिलेले नसतात; तर हे फक्त त्या पंथांतल्या आपल्या शिष्य-परिवाराला आपली कुलपरंपरा समजावून देऊन त्यांत तरबेज करण्या-करितांच लिहिलेले असतात. फक्त त्या पंथांतल्या आंतील कड्यांमधल्या लोकांना मराठी भाषा संस्कृतापेक्षां समजण्यास सोपी पडे म्हणूनच ही रचना त्यांनीं मराठींत केली, असें मुकुंदराजासारखा सर्वजनांसाठीं ग्रंथ-रचना करणारा महासाधुपुरुषहि आपल्या ग्रंथाचे शेवटीं बजावून सांगतो. ज्ञानेश्वर-महाराजहि या योगाच्या गोष्टी वाटेल त्याला सांगत सुटण्याच्या नव्हत, असेंच सुचवितात. पण अशा त्या सांगत न सुटण्याचें कारण ते असें देतात कीं, या गोष्टी अथवा हें ज्ञान वाचेनें सांगतां येण्यासारखें नाहीं. तें वाचेच्या प्रांतापलीकडलें आहे. वाचेनें कितीहि आटोकाट कसरत केली तरी हें ज्ञान तिच्याकडून स्पष्टपणें होणें अशक्य आहे. याला प्रत्यक्ष अभ्यास आणि अनुभवच पाहिजे. याकरितां ते म्हणतात....

**तेथचि मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचेआ गांवा आंतु ।**

पैठी कीज ॥ उ६११.

मुकुंदराजानंतर या काळच्या लेखकांपैकीं हेमाडपंत किंवा हेमाद्रि-पंडित व चांगदेव हीं दोन नांवें आपल्या परिचयाचीं आहेत. यांपैकीं हेमाडपंत हा बाराव्या शतकांत विद्यमान होता. पंढरपूर चौऱ्यायशीच्या शिलालेखांत विठ्ठलाच्या देवाल्याला अनेक भक्तजनांनीं पैका दिला त्यांची यादी आहे, तींत हेमाद्रीचें ऊर्फ 'हेमाडी पंडिता'चें नांव आहे. यावरून हा विद्वान् व कार्यकर्ता असून विठ्ठलाचा प्रेमळ भक्त होता, असें दिसतें[1]. हा वत्स-गोत्री माध्यंदिन-शाखेचा पंचप्रवरी ब्राह्मण होय. देवगिरीकर जाधवांच्या वंशांतला पांचवा पुरुष जो महादेव व सहावा पुरुष महादेवाचा पुतण्या जो रामदेवराव[2] त्यांच्या कारकीर्दींत हेमाडपंत हा मुख्य कारभारी होता. याची पदवी 'श्रीकरणाधिप' अशी होती. हा फार कर्तृत्ववान् व बुद्धिमान् होता. परंपरागत माहितीवरून असें सांगतात कीं, यानें दक्षिणेंत तीन गोष्टी अगदीं नव्या आणिल्या. खाण्यांत बाजरी, राहण्यांत बिनचुन्याच्या इमारती व लिहिण्यांत मोडी लिपी.

---

१ संतमालिकांतील 'हेमाडपंत गणेशभक्त । पिशाच्च चैतन्याचे लिखित' अशा उल्लेखांवरून हा गाणपत्य असावा, असें होतें.

२ रामदेवराव जाधवासंबंधें एका जुन्या पोथीवर पुढील श्लोक दिलेला आढळला–

"शाके सप्तु शशि द्वि भू परिमिते संवछरे मन्मथ । मासे फाल्गुनके तिथौ प्रतिपदे शुक्ले च मंदे[७] दिने[१] ॥[२१] म्लेच्छे शास्त अल्लावदीन रिपुणा भद्रो गृहीता तथा ॥ श्रीमत् देवगिरौ स्थितस्य नृपते रामस्य राज्यं गतम् ॥

तसेंच, काशीकर पराडकरांच्या एका वहीवर हाच काल रा. राजवाडे यांस पुढीलप्रमाणें लिहिलेला आढळला–

"इतुकिया नंतर तुरकान जाले. तै सकु १६
मन्मथ संवछरे फाल्गुनमास सुधपक्ष अष्ठमी शनीवार ॥
रामदेरायाचें राज्य गेले पाहाले घटिका ४"

अर्थात् यांत १६ ही चूक दिसतें. १७ पाहिजे. म्हणजे शके १२१७ मन्मथ संवछरीं फाल्गुनांत रामदेवराव जाधवाचें राज्य गलें.

अंबरनाथ वगैरे अनेक भव्य व सुंदर देवळें हेमाडपंती म्हणून प्रसिद्ध आहेत. यावरून असें दिसतें कीं, शिल्पशास्त्रांत कांहीं एक प्रकारची नवीन शिस्त लावून हेमाद्रीनें बांधकामाचा अगदीं नवा प्रकार सुरू केला; व तो सर्वमान्य होऊन हिंदुस्थानांत तेव्हांपासून अनेक ठिकाणीं प्रचलित झाला. तसेंच, अनेक प्रकारच्या नवीन धान्यांचीहि लागवड या देशांत हेमाडपंतानें करविली असावी.

या दोहोंपेक्षां तिसरी गोष्ट, म्हणजे मोडी लिपीचा प्रसार, ही भाषेच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. या लिपीस लौकिकांत 'पिशाच्च'-लिपी अशी संज्ञा असून ही हेमाडपंतानें लंकेंतून किंवा दक्षिणेंतून इकडे आणिली, असा समज सर्वत्र आहे; व तो आज अनेक शतकें सर्वांच्या तोंडीं आहे. पूर्वींच्या जुन्या 'पुस्तकांत'देखील हे लिपी विद्या सरस्वती। अगा झाली कैसी प्राप्ती। कृपा करून हेमाडपंतीं। जगा भातुकें दीधली' अशासारखे अनेक उल्लेख आढळतात.

आपल्या इकडील सर्व ग्रंथ देवनागरी ऊर्फ बालबोध लिपींतच लिहिलेले आहेत. याला एखाद-दुसरा अपवादहि आढळतो. लेख मराठी भाषेंत असून लिपी मात्र कानडी आहे; क्वचित् लिपी व्रज व भाषा मराठी हाहि प्रकार आढळतो; लिपी फारशी व भाषा मराठी असेंहि कांहीं लेखांत आढळतें; रोमन लिपींत मराठी भाषा लिहावी, हा प्रघात हल्लींच्या अमलांत पाडण्याचा यत्न चालू आहे. युरोपियन लोकांना वाचण्यास सोपें जावें म्हणून मोडी लिपीच्या ऐवजीं बालबोध लिपी सरकारी कागदपत्रांत योजिली पाहिजे, हा कायदा जर नीट चालला असता तर त्याचें पर्यवसान भाषा मराठी चालेल पण ती रोमन लिपींत लिहावी, असें निःसंशय झालें असतें. ही लिपी परंपरेनें अगदीं प्राचीन अशा ब्राह्मीपासून निघालेली आहे. कोणत्याहि परक्या देशांतील लिपीपासून आर्यावर्तातील लिपी निघाली नसून इकडील लिपी याच देशांतील लोकांनीं कल्पून बसविली व प्रचारांत सुरू केली, यांत संशय नाहीं. इकडील सर्व लिपींत 'ब्राह्मी' लिपी ही फार प्राचीन काळीं प्रचारांत

होती. शकपूर्वी २००-मधलें गिरनार पर्वतावरील कोरलेलें अशोकाचें शासन याच लिपींत आहे. हिलाच 'अशोकी' असें म्हणतात. याच लिपींत कालान्तरानें पुढें बदल होऊन तिला निरनिराळीं रूपें प्राप्त झालेलीं दिसतात. या शकपूर्व २००-मधील अक्षरवटिकेपेक्षां शके २५० पांचशेंच्या सुमारापासूनचे गुप्तवंशीय लेखांची लिपी भिन्न आहे. पण ही निःसंशय ब्राह्मीचीच दुसरी आवृत्ति आहे. हिला 'गुप्त' लिपी म्हणतात. हिजपासून शक ८००-मधील 'कुटिल'-लिपी निघाली; व या कुटिल लिपीचेंच रूपांतर देवनागरी लिपींत झालें. शके ११०-चे सुमारास तर मराठी भाषेंतील लेख लिहिण्यास देवनागरी लिपीचाच उपयोग होत असे. म्हणजे ब्राह्मी ऊर्फ अशोकी → गुप्त-कुटिल → देवनागरी अशा परंपरेनें देवनागरी किंवा 'बालबोध' ही लिपी सिद्ध झाली. अर्थात् यामुळें देवनागरी ऊर्फ बालबोध लिपींत अशोक-लिपीचें पुसट रूप नीट नजरेस पडतें. अकराव्या-बाराव्या शतकांतल्या महाराष्ट्रीय लेखकवर्गास त्यापूर्वीच्या चार-पांचशें वर्षें सडकून प्रचारांत असलेल्या 'अशोक'-लिपीच्या निरनिराळ्या आवृत्तींतलीं रूपें तर फार चांगलीं माहीत असलीं पाहिजेत. बाराव्या शतकांतल्या मराठी लेखांत एकच अक्षर निरनिराळ्या दोन-दोन, तीन-तीन तऱ्हांनीं काढिलेलें आपल्या डोळ्यांसमोर आहे. यावरून एकाच अक्षराचीं हीं निरनिराळीं रूपें निरनिराळ्या प्रांतीं एके वेळीं चांगलीं प्रचारांत होतीं; व हे प्रांत एका छत्राखालीं आल्यावर त्या अमलांत हे निरनिराळे प्रकार एकजीव होऊन एकाच लेखांत योजिले जाऊं लागले. केव्हां-केव्हां जुनें रूप पूर्णपणें मागें न पडतां त्याचें नवें रूप प्रचारांत येऊन दोन्ही रूपें कांहीं काळ वापरण्यांत येत असत. या अशा कारणामुळें बाराव्या शतकांतल्या लेखांत एकेका अक्षराचीं अनेक रूपें प्रचलित असलेलीं आपल्या नजरेस पडतात.

पण या अक्षरवटिकेला या सुमारास अगदीं नवीन वळण देण्यांत आलें. जुन्या वळणांत अक्षरें सुटीं असत. त्यांना एकमेकांशीं

चिकटविण्याची सोय त्यांत नव्हती. यामुळें प्रत्येक अक्षर सुटें लिहावें लागे. अनेक अक्षरें एकदम एकटांकानें लिहिणें जड जाई. ताडपत्र, भूर्जपत्र, वगैरेंसारख्या साधनांवर लिहितांना हें एकटांकी लिहिणें अशक्यच होतें. कारण ताडपत्रावर तर अक्षरांच्या रेघा कोराव्याच लागत. त्यामुळें पानांच्या रेषा किंवा शिरा असतील त्या मानानें लिहिणें भाग होतें. भूर्जपत्रावरहि हीच अडचण अनुभवास येते. या दोहोंतहि अक्षरांना ओळ सारखी काढीत जाणें निर्भय नसतें. सबंध अक्षरें तर एका लांबलचक काढिलेल्या ओळीच्या दांडीवर टांगून देणें हें विशेषच धोक्याचें असे. कारण एखादे वेळीं या ओळी ताडाच्या, भूर्जपत्राच्या किंवा दुसऱ्या एखाद्या पानाच्या समांतर शिरांवर सारख्या आल्या तर पानाच्या त्या जागीं चिरफळ्या होऊन लेख फाटण्याचा संभव फार असणार, हें सहज लक्षांत येतें. तेव्हां लेख लिहिण्यांत पानापेक्षां दुसरी एखादी वस्तु किंवा साधन चांगलें उपयोगांत आल्यावर एकटांकी लिहिण्याचें काम सुकर व मान्य होणें साहजिक आहे. तेव्हां कागदाच्या प्रसाराबरोबर लेखनसुधारणाहि अमलांत आणण्याची ही प्रवृत्ति होत गेली असावी, असें मानण्यास हरकत नाहीं.

ही लेखनकलेंतली, एकटांकीं लिहितां येण्यासारखें वळण अक्षरांना देण्याची सुधारणा, हेमाडपंतानें घडवून आणिली. देवनागरी अक्षरांना एक तऱ्हेची मोड किंवा लपेट देऊन त्यानें हा सुलभपणा साधिला. देवनागरींत अक्षरांचें वळण वरून खालीं असतें. त्यामुळें एक अक्षर संपतांच दुसरें अक्षर सुरू करण्यासाठीं, लेखणी उचलून पुन्हां वर न्यावी लागते. ही अडचण जाणून हेमाडपंतानें अक्षरांना मोड देतांना प्रत्येक अक्षर साधेल तोंपर्यंत खालीं पुरें न करतां वर शेंड्याजवळ नेऊन पुरें करण्याचें योजिलें; व असें केल्यावर फिरून नवें अक्षर तेथेंच सुरू करणें सोयीचें झालें. असें करण्याकरितां खोंच होती तेथें गांठ दिली. उभ्या रेघांना लपेट देऊन वर नेल्या, असे अनेक प्रकार केले.

दौलताबाद किंवा देवगिरी हें चांगले कागद करण्याचें ठिकाण प्रसिद्ध आहे. येथले कागद सातआठशें वर्षें महाराष्ट्रांत फार प्रचारांत असत. यांवर मषीच्या काळ्या शाईनें लिहिलेला लेख वज्रलेप होतो. या प्रकारें लिहिलेले चारशेंपाचशें वर्षांवरचे लेख आजहि अगदीं स्पष्ट दिसतात. त्यांवरची शाई बिलकूल उडालेली नाहीं; व कागदावरहि तिचा परिणाम लवमात्र झालेला नाहीं. हल्लींच्या कोणत्याहि शाईपेक्षां या शाईंत दुसरा विशेष असा आहे कीं, तिनें लेखणी गंजत नाहीं, कीं खराब होत नाहीं, कीं कागद फाटत नाहीं. या संबंधांत एक जरा गमतीची गोष्ट येथें सांगावीशी वाटते. ती अशी कीं, लॉर्ड कार्नवालिस, सर जॉर्ज बारलो वगैरेंचीं शेंकडों अस्सल पत्रें आहेत. त्यांतील सर्व मजकूर मषीच्या शाईनें लिहिला आहे. पण सही मात्र इंग्रजी शाईनें केलेली आहे. सबंध मजकूर नीट शाबूत आहे; पण सहीची जागा पिवळी पडून कागद कसरींनीं खाल्ला आहे.

अक्षरांना गांठी, लपेटी, वळणें वगैरे देऊन सोयीस्कर लिपी करितांना एका देवनागरीशिवाय अशोकी वगैरेंसारख्या दुसऱ्या लिपीहि हेमाद्रीच्या डोळ्यांपुढें असण्याचा संभव आहे; व यांतून एखादें सोयीचें वळण त्यानें घेतलें असल्यास त्यांत नवल नाहीं. पण त्यानें प्राय: त्या वेळीं प्रचलित असलेल्या देवनागरी ऊर्फ बालबोध यांचा संबंध दाखवितांना आजचीं आपलीं बालबोध अक्षरें घेऊन त्यापासून आजचीं मोडी अक्षरें कशीं निघालीं असावीं, हें दाखविण्याचा मी यत्न करितों. पण हें करणें अशास्त्र आहे. हेमाडपंतानें बाराव्या शतकांत मोडी वळणें बसविलीं या गोष्टीचा विचार करितांना तत्कालीन बाराव्या शतकांतलीं देवनागरी ऊर्फ बालबोध अक्षरें घेऊन त्यांचीं तत्कालीन म्हणजे बाराव्या शतकांतील मोडीशीं तुलना करून संबंध कसा जडतो, हें पाहिलें पाहिजे. हल्लीं आपल्याला जुन्यांत जुना म्हटला म्हणजे शके १४१०-मधील एक लेख उपलब्ध आहे. याच्या पूर्वीं तब्बल दोनशें वर्षें मोडीचा प्रचार चालू होता. तेव्हां या लेखामागचे निदान शंभर-दीडशें वर्षांचे

लेख मिळविले पाहिजेत. त्यावांचून या बाबीवर स्पष्ट प्रकाश पडणार नाहीं. बाकी हजारों जुने कागद पाहून कोणाचेंहि असें मत होईल कीं, मोडी लिपी ही निःसंशय बालबोध लिपींतल्या अक्षरांना मोड देऊनच निर्माण करण्यांत आली असावी. प्रथम हेमाद्रीनें दिलेलीं वळणें पुढें थोडीं-फार बदलत जाऊन व नंतर अनेक कलम-बहादरांनीं आप-आपल्या सोयीप्रमाणें नव्यानव्या लपेटी देऊन ही आजची मोडी लिपी निर्माण झाली, हें खास आहे. या मोडी अक्षरांत चार-दोन अक्षरें, देवनागरींतील त्या त्या अक्षरांपेक्षां दुसऱ्या एखाद्या लिपींतील त्या त्या अक्षरांशीं थोडें-फार जास्त साम्य पावत असलीं तरी तेवढ्यावरून मोडी लिपी ही त्या दुसऱ्या लिपीपासून निघाली,असा मनाचा ग्रह करून घेणें आपण सोडलें पाहिजे. हल्लींच्या लिपींत छत्तीस वर्णांपैकीं ग, घ, ङ, च, छ, झ, ञ, ड, ढ, ण, त, र, ष, स, ळ, क्ष हे सोळा बालबोध वर्ण मोडी वर्णांसारखेच आहेत. बाकी राहिलेल्या वीस वर्णांपैकीं फ, ट, ठ, न, भ, म, ह या वर्णांचीं कांहीं रूपें मोडी वर्णांशीं पुष्कळच साम्य पावतात. आणि हे भिन्न दिसणारे वर्णहि मोडी वर्णांशीं जुळवितां येतात. मोडी हा शब्द, 'मौर्य—मौर्यी—मोरी—मोडी' अशा परंपरेनें सिद्ध झाला असें मानून ही लिपी मौर्य राजा चंद्रगुप्त व त्याचा नातू अशोक यांचे कारकीर्दींत बनली किंवा बनविली, असें कांहीं लोक सुचवितात; पण सर्व बाजूंचा विचार करितां हें म्हणणें पटत नाहीं. निदान असें मानण्याला असावा तितका भक्कम पुरावा अजून पुढें आलेला नाहीं. मोडी लिपी ही लिहिण्यास सोयीची व सोपी आहे, तींतील अक्षरांचें वळण बहुधा वर असल्यामुळें ती एकटांकानें लिहितां येते, या गोष्टी सर्वसंमत आहेत. ही अशी सुलभ व सोयीची लिपी आपल्या इकडे चालू असलेल्या अनेक लिपींपैकीं इतर कोणत्याहि लिपीस न लाभतां, लेखनकलेंतील या सुधारणेचा फायदा एकट्या मराठीसच घडवून दिला, हेंहि कार्य कांहीं लहान नव्हे; आणि या कामगिरीबद्दलच हेमाद्रीचे

महाराष्ट्रावर फार उपकार आहेत.[१]

लेखनकलेंतील ही एकच सुधारणा काय, पण लेखनासंबंधीं अनेक बाबी यादवांच्या या सर्वश्रेष्ठ 'करणाधिपा'नें ऊर्फ फडनविसानें महाराष्ट्रांत अमलांत आणिल्या होत्या. यादवांच्या मोठ्या थोरल्या राज्यविस्तारांतील अनेक बाबींसंबंधें लिखाण कसें असावें, राज्याचा सर्व जमाखर्च कोणत्या शिस्तीनें ठेविला जावा, तसेंच साधारणपणें एकंदर जनसमाजांत लिहिण्याची, पत्रव्यवहाराची वगैरे पद्धत कशी असावी, हें सर्व ठरवून त्यासंबंधीं नमुने किंवा नियम ठरवून हेमाद्रीनें त्या शिस्तींचा ग्रंथ तयार केला असावा, असें दिसतें.

सुमारें सहासष्ट वर्षांपूर्वीं म्हणजे इ. स. १८५३, शके १७७४-मध्यें मनशी गणपतराव यांनीं मूळ ग्रंथावरून तपासून 'हेमाद्रिकृत लेखनकल्पतरु' या नांवाचा एक ग्रंथ मुंबईंत प्रसिद्ध केला आहे. याच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे कीं, 'महाराष्ट्र-देशांतील लोकांस आपलें वडिलोपार्जित जें लेखन चालत आलें आहे, त्याची रीति पुरातन स्वदेशीय कवींनीं काय योजली व सप्रमाण लेखन कोणतें, हें कळलें पाहिजे, म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध केला जात आहे.' यावरून प्रकाशक हा ग्रंथ अस्सल हेमाद्रीचाच समजत होते, असें स्पष्ट दिसतें. या ग्रंथाची रचना अनेक-वृत्तात्मक श्लोकबद्ध असून त्या श्लोकांवर पुढें गद्य टीका दिली आहे. यांत शुद्ध, सात्त्विक, रहस्य अशा लिहिण्याच्या तीन रीति कल्पिल्या आहेत. ज्यांत ज्या पत्राचें उत्तर लिहावयाचें त्यांतील मजकूर एकदम जमेस धरून त्याचें उत्तर लिहावयाचें ती शुद्ध रीति. ज्यांत

---

१. 'अर्वाचीन कोशकार' यांनीं हेमाद्रिकृत 'लेखनपद्धति' या नांवाचा एक ग्रंथ सांगितला आहे, तो हाच असावा.

२. शके ११६ (?) विक्रमसंवत् १२८८-मध्यें रचिलेला 'लेख-पंचाशिका' या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहे. यांत अनेक तऱ्हेचे मायने व मसुदे दिले आहेत. ग्रंथांत कर्त्याचें नांव नाहीं. पण यावरून या म्हणजे हेमाद्रीच्या काळीं असल्या तऱ्हेचे ग्रंथ रचिले जात होते, हें अगदीं निश्चित ठरतें.

कलमवारीनें अथवा प्रकरणवारीनें मजकूर जमेस धरून त्याचे खालीं कलमवार उत्तर लिहावयाचें ती सात्त्विक रीति; व ज्यांत केवळ विस्तार न करितां थोडक्यांत लिहावयाचें ती रहस्य उर्फ ऱ्हस्व रीति, असें ग्रंथकार म्हणतो. यांचीं उदाहरणें देऊन मग पुढें यांत सुमारें शंभर-सवाशें मायने दिले आहेत. यांत निरनिराळे सरकार, कामगार व साधुपुरुष वगैरेंचे मायने दिले असून लहानथोर, धनी-नोकर, गुरु-शिष्य, नवरा-बायको, ऋत्विज्-यजमान वगैरेंनींहि एकमेकांस लिहितांना काय काय मायने योजावेत, हें सांगितलें आहे. उदाहरणार्थ,—

**श्रीमंत स्वप्रभुला, श्रीया मंडित दिवाणलोकांस।**

**श्रीया विराजित असें प्रभुच्या सर्वांहि बंधुवर्गास॥**

हे शब्द यजमानास व त्यांचे दिवाणास व बंधुवर्गास लिहिण्यास सांगून आपल्या आप्तवर्गास लिहितांना—

**स्वपित्यास तीर्थरुप हें, स्वरूप गुरुमातुलासि चुलत्यास।**

**स्वाग्रज वृद्ध स्वजनां याहुनि लिहिणें कदा न भलत्यास॥१॥**

लिहावें, असें सांगितलें आहे. श्वशुराला **श्रीतीर्थस्वरूप** असा मायना दिला आहे. स्त्रीपुरुषांनीं एकमेकांस लिहितांना साधारणपणें नेहमीं—

**"चरणारविंदि मस्तक ठेवुन विज्ञप्ति" पत्निनें लिहावी।**

**"आशिर्वाद उपरि" हें भर्त्यानें योग्य रीति जाणावी॥**

असें ग्रंथकार म्हणतो. परंतु यापेक्षां गौरवून लिहिणें असल्यास—

**श्रीमंता, सुगुणेश्वरा, नरवरा, चातुर्यरत्नाकरा,।**

**मद्भर्त्या, मधुरोत्तरा, श्रमहरा, सौंदर्यविद्याधरा,॥**

**शास्त्रज्ञा, सुखसागरा, शुभतरा, सौभाग्यभाग्याकरा।**

**माझ्या पूज्यसुरा, सदा प्रियकरा, भर्तार प्राणेश्वरा॥१॥**

हे शब्द लिहिण्यास सुचविलें आहे. स्वस्त्रीस 'आशिर्वाद' लिहिण्यास सांगितलें आहे. पण नाटकशाळेस 'आशिर्वाद' नाहीं. कवि म्हणतो—

'**आज्ञा करितों कीं**' हें प्रारंभीं तूं लिही स्वरक्षेला.'

या ग्रंथाचे निरनिराळे 'अंक' किंवा भाग केले आहेत. पहिल्यांत

वरीलप्रमाणें मायने सांगून पुढें दुसऱ्यांत लेखांतील इतर मजकूर कसा असावा, याविषयीं आणखी दिग्दर्शन केलें आहे. तिसऱ्या अंकांत किंवा भागांत लिहिण्याचे प्रकट, गुप्त, प्रगल्भ वगैरे भेद सांगितले आहेत. यांत लिहिलेला मजकूर नीट गद्यांत लिहिला असून, योग्य ठिकाणीं यति दिला असतां व भाग पाडिले असतां तोच मजकूर श्लोक, अभंग, आर्या गीति वगैरे वृत्तांत वाचतां यावा, अशीं उदाहरणें दिलीं आहेत. ही चित्ररचना थोडी चमत्कृतिजनक वाटल्यावरून त्यांतील एक दोन अवतरणें देतों:—

> विनंती विशेष। आपणाकारणें। पक्व आंबे दाणे। एक शत। चांगल्या झाडांचे। बहु नामांकित। गोडीस बहुत। योग्य ऐसे।आणोनि सारे। बहुत माफजाती। करून गडचाहातीं। पाठविले। आहेत. हे घ्यावे। व उत्तर द्यावें.। बहु काय लिहावें'। हे विनंती.

हा मजकूर गद्य असून ओळींवर खुणा केल्याप्रमाणें अभंग वृत्तांतहि वाचतां येतो. तसेंच—

> विज्ञापना अशी कीं, राजश्री देवरावदादानीं। मजला विनंति केली कीं 'आमच्या सर्व भाऊबंधांनीं। दीक्षित यांचा आश्रय करुनी समाइक इनाम जें आहे। तें क्षेत्र पितृसंपादित, तेव्हां भागिलें असावें; हें। विहित असून, विभाग न वेतां, उत्पन्न तेच घेतात.'। यास्तव आलों आहों. त्यास कृपा करूनि (न), त्या इनामांत। आम्हांस भाग येईल असें दीक्षित यांस स्नेहितकी।चें एक पत्र द्यावें. याकरितां लेखनांत येतें कीं, । देवराव यांणीं जो मजकूर कळविला आहे, । तो जर खरा आहे, तर स्नेहाला योग्य तें करालच. हें। आपण करावें, म्हणोन लिहिणें नको. कृपा व्याप्ती। प्रतिदिनिं विशेष व्हावी. एवं श्रुत होय, हीच विज्ञाप्ती.।

हा मजकूर गद्य असून ओळींवर खुणा केल्याप्रमाणें गीतिवृत्तांतहि वाचतां येतो. त्याचप्रमाणें:—

> बहुत दिवस झाले पत्रिका येत नाहीं। म्हणुनि सतत माझें चित्त चिंताप्रवाहीं। पडत असुन याचे हेतुचा मी विचार। अनुदिन

करित आहे. यामुळें हा प्रकार [1] त्यजून अतिकृपेनें पत्रिका येत जावी; व परम ममतेची वृद्धि होण्यांत यावी.

या ओळी गद्य असून मालिनी छंदांतहि सहज वाचतां येण्याजोग्या आहेत.

या ग्रंथांत पुढें यवनी राज्यांतल्या चाली देऊन शेवटीं कर्जखत, जामीनखत, काजीस अर्जी, सरनामे वगैरे दिले आहेत. पण एक नशीब कीं, पुढील या मजकुरास आधार म्हणून हेमाद्रीचे श्लोक दिले नाहींत. असो. या 'लेखनकल्पतरू'शिवाय निरनिराळीं अनेक 'मेस्तकें' किंवा जमाखर्चाच्या वगैरे पद्धति, हेमाद्रिकृत म्हणून लिहिलेल्या आढळतात. हे ग्रंथ प्रत्यक्ष हेमाद्रीनें रचिले नाहींत, हें उघड आहे. पण हे सर्व ज्या अर्थीं एका हेमाद्रीच्या ऊर्फ हेमाडपंताच्याच नांवावर विकले जातात त्या अर्थीं या ग्रंथरचनेशीं हेमाद्रीचा कांहींतरी विशेष प्रकारचा संबंध असला पाहिजे. तर्कानें असें अनुमान बांधितां येतें कीं, हे असले ग्रंथ किंवा राज्यांतील शिस्तीसंबंधाचा शासनग्रंथ या फडनविसानें आपल्या अधिकारयुक्त लेखणीनें लिहिला असावा. पुढें देवगिरीकर जाधवांचें राज्य नाहींसें झाल्यावर मुसुलमान पादशहातींत मुसुलमान लोकांनीं हेमाद्रीचे शिरस्त्याप्रमाणेंच माजी राज्यांतील प्रकार सुरू ठेविले; परंतु हळूहळू त्या शिरस्त्यांत हेमाद्रीच्या शब्दांचीं मुसुलमानी रूपांतरें बदलून घालून किंवा कांहीं ठिकाणीं अगदीं नवे शब्द घालून शिरस्त्यास थोडा नवा म्हणजे मुसुलमानी पेहराव चढविला. शिवाजीनें रघुनाथ-पंडिताच्या साह्यानें राजव्यवहारकोश तयार करवून मुसुलमानी शब्दांचे ऐवजीं जसे मराठी किंवा संस्कृत नवे शब्द योजिले, तसेच पूर्वीं हेमाड-पंताच्या शब्दांचे ऐवजीं मुसुलमानांनीं नवे फारशी शब्द योजिले असावे. परंतु 'पद्धत' किंवा 'शिरस्ता' मूळ हेमाडपंताचाच असल्यामुळें त्या ग्रंथाचें म्हणजे ग्रंथकर्त्याचें नांव मात्र जुनेंच कायम राहिलें. पुढें स्वराज्यांत त्या काळाला अनुसरून आणखीहि कांहीं थोडेफार बदल झाले असतील. तरीहि ग्रंथकाराचें नांव तेंच कायम ठेवण्यांत आलें; व

'मेस्तक' किंवा 'लिखनपद्धति' म्हटली म्हणजे हेमाडपंताची असेंच म्हणण्याचा परिपाठ कायम चालला.

हेमाडपंताचा अस्सल ग्रंथ आज आपणांस उपलब्ध नाहीं. परंतु या मेस्तकलेखकांपैकीं कांहींनीं तरी तो ग्रंथ किंवा त्यांतील कांहीं भाग पाहिला असावा, असें त्यांच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून वाटतें. गोविंद कवि या नांवाच्या एका लेखकानें एक मेस्तक लिहिलेलें आहे. त्यास तो 'शेणवाईपणाचें मेस्तक' असें म्हणतो. या मेस्तकांत तो लिहितो कीं—

"पूर्वीं तया देवगिरिसी। रामदेवराव राजयापासीं। असतां हेमाड–पंतासी। युक्त असे आठवली॥ मोडी लिपी लंकेहूनि आणिली। त्यावरी स्वमती युक्त रचिली। आणि कामराजासी आज्ञा दिधली। 'शेणवाई पद्धत[1]' रचावया॥ हेमाडपंताचें आज्ञेसरिसें। कामराजें स्वमतिप्रकाशें। कामराजें 'मेस्तक' केलें ऐसें। श्रवणें ऐकत होतों॥ त्या ग्रंथासी बहुत प्रेत्न केला। परंतु ग्रंथ हातासि नाहीं आला। तेथील वेंचा प्राप्त झाला। ओंविया चाळिस॥ त्यासी अन्वय लावुनी। गोविंदें स्वयुक्ति करुनी। इतकें किंचित विस्तारुनी। सांगितलें असें॥"

यावरून हेमाडपंताच्या आज्ञेवरून कामराजानें असा एखादा ग्रंथ रचिला होता व तो 'ओवियां'त असल्यामुळें मराठींतच असावा, असें दिसतें. पुढें-मागें हा ग्रंथ सांपडल्यास प्राचीन अस्सल मराठी राज्यांतील भाषेचें व त्यांतील व्यवहाराचें स्वरूप कळण्यास याचा फार उपयोग होईल आणि त्या काळच्या लोकस्थितीवर यापासून बराच प्रकाश पडेल, हें उघड आहे.

याखेरीज हेमाद्रीच्या नांवावर 'हेमाद्रिकृत नीतिबोध' या नांवाचा

---

१. या ग्रंथाचें नांव 'शेणवाई पद्धत' असें आहे खरें; पण आंतील मजकूर इतर हेमाडपंती मेस्तकांप्रमाणेंच आहे.

२. एका 'कामराज' कवीनें रचिलेला 'सुदर्शन-चरित्र' या नांवाचा एक ग्रंथ मीं पाहिला आहे. पण त्या पोथीवरून तिचा लेखक जो 'कामराज' तो हाच असावा कीं काय, हें कळण्यासारखें नाहीं.

एक लहानसा लेख आहे; परंतु ज्या रूपांत हा लेख हल्लीं प्रसिद्ध आहे त्या रूपावरून या लेखाशीं हेमाद्रीचा कांहीं एक संबंध असेल, असें वाटत नाहीं. तरी असा एखादा ग्रंथ हेमाद्रीनें कदाचित् रचिला असेल, इतकेंच फार तर यावरून म्हणतां येईल. वर दिलेल्या हकीकतीवरून हेमाद्रि हा कोणत्या दर्जाचा मनुष्य होता, त्याची संस्कृति किती उच्च पदवीची होती; व त्याची बुद्धिमत्ता व उद्योग किती श्रेष्ठ असावेत, याचा अंदाज सहज होण्यासारखा आहे. धर्मशास्त्रांतील मतें व तत्कालीन रूढ पद्धति यांच्या संबंधानें अधिकारानें लिहिलेला 'चतुर्वर्गचिंतामणि' व 'आयुर्वेदरसायणा'सारख्या वैद्यकग्रंथावरील टीका, तसेंच इतर अनेक ग्रंथ हे सर्व एक-एक विषयावर कांहीं लहानसहान ग्रंथ नव्हेत. ज्यांचा राज्यकारभाराशीं संबंध पोहोंचत नाहीं अशा विषयांवर लोकमान्य ग्रंथ निर्माण करितां यावे, इमारती बांधण्याच्या नव्या पद्धति कल्पून त्या अमलांत आणितां याव्या, व त्या लोकांना पसंत पडून त्याप्रमाणें जिकडे-तिकडे मंदिरेंहि उभारिलीं जावीं, राज्यांत शिस्त लागून सर्व काम एका पद्धतीनें सर्वत्र चालेल अशासाठीं 'लेखनकल्पतरू'सारखे किंवा 'मेस्तका'-सारखे ग्रंथ लिहावे, राज्यांत नवीन नवीन धान्यें आणून त्यांची लागवड करवावी, लोकांच्या लिपीला सुखकर असें नवीन वळण लावावें आणि तें लोकांना इतकें आवडावें कीं, अनेक राज्यक्रांत्यांच्या वावटळींतूनदेखील तें तसेंच कायम टिकावें, व आपल्या मागून हजार-पांचशें वर्षांनींदेखील कोणी राजमंत्री तें काढून टाकूं लागला तर एकंदर महाराष्ट्राला तें न खपून त्याबद्दल सर्वांनीं मोठा गिल्ला करावा, यांपैकीं कोणतीहि एकच गोष्ट जरी एखाद्या प्रधानानें केली तरीदेखील तो स्तुतीस पात्र होईल. मग ज्यानें जाधवांचें त्या वेळचें एवढें मोठें राज्य संभाळून या इतक्या निरनिराळ्या बाबींकडे लक्ष पुरविलें व या सर्व बाबींत सुधारणा करून त्यांवर स्वतःचा छाप मारिला तो अधिकारी आज सहासातशें वर्षें महाराष्ट्रानें आठवण ठेवावी, इतक्या योग्यतेचा खास असला पाहिजे. नाना फडनविसासारखा बुद्धिमान् फडनवीस मरण पावल्यानंतर अठराव्या

शतकांतील मराठ्यांची सत्ता जशी त्याचे मागोमाग लयास गेली त्याच-प्रमाणें हा बुद्धिमान् 'श्रीकरणाधिप' ऊर्फ फडनवीस मरण पावल्यानंतर तेराव्या शतकांतील मराठ्यांची सत्ताहि त्याचे मागें लयास गेली. असो. याच्या कृतीची आठवण मात्र महाराष्ट्रानें मोठ्या आदरानें ठेविली आहे. परंतु यानें मराठींत लिहिलेला किंवा लिहविलेला असा साक्षात् एकहि मराठी ग्रंथ हल्लीं आपणांस उपलब्ध नाहीं.

हेमाद्रीनें रचिलेला असा ग्रंथ उपलब्ध नसला, तरी हेमाद्रि हा मराठी ग्रंथकारांस उत्तेजन देत असे, असा पुरावा महानुभाव-ग्रंथांत आढळतो. रामदेवराव जाधवाच्या पूर्वी दोनतीन राजवटींत मराठी भाषा राजसभेंत चालू होती व राजघराण्यांतले व्यवहारहि याच भाषेंत चालत. स्वतः रामदेवराव मराठी भाषेचा मोठा चाहता होता. मराठी ग्रंथकारांना त्याच्या सभेंत चांगला मान मिळे. इतकेंच नव्हे, तर ग्रंथकारांनीं मराठी ग्रंथ रचावा व त्यांत शेवटीं आपलें नांव घालावें, याची त्याला मना-पासून आवड होती. किंबहुना मराठी ग्रंथकारांनीं त्याची राजसभा गजबजलेली असे. या काळच्या मराठी ग्रंथांपैकीं महानुभाव-पंथाचे ग्रंथ बरेच उपलब्ध आहेत आणि हे अजूनपर्यंत राहिले आहेत. याचें एक कारण असें आहे कीं, या पंथाची धर्मभाषा मराठी होती, संस्कृत नव्हती. म्हणजे महानुभावांचीं धर्मतत्त्वें, त्यांच्या श्रुति, स्मृति, त्यांचीं पुराणें हीं सर्व संस्कृताचे धर्तीवर मराठींतच रचिलीं गेलीं. यामुळें त्या पंथांतील लोकांनीं हे सर्व ग्रंथ अत्यंत काळजीनें व आदरानें जपून ठेविले. संस्कृतांत मूळ रचना न झाल्यामुळें त्यांची महाराष्ट्र-ग्रंथांवर अव्यभिचारी भक्ति राहिली. त्यांचा मूळ पंथ-प्रवर्तक जो चक्रधर तो आपलीं व्याख्यानें, कीर्तनें, पूजा वगैरे सर्व मराठींत करीत असल्यामुळें त्याचे तोंडचे मराठी शब्द हे त्या पंथांतील लोकांना संस्कृतापेक्षां विशेष आदरणीय व पूज्य होऊन राहिले व ग्रंथकारांना ती सर्व संहिता मराठींतच उतरून ठेवणें भाग झालें. मूळ प्रवर्तकाचेच शब्द मराठी असल्यामुळें त्याचीं सूत्रवत् मानिलीं गेलेलीं वाक्यें सर्वश्रेष्ठ झालीं आणि पुढें या वाक्यांचे विवरणार्थ

व स्पष्टीकरणार्थ ज्या टीका लिहिल्या गेल्या त्याहि साहजिकपणें मराठींतच लिहिल्या गेल्या. आपल्या ग्रंथांतील ग्रंथसंपत्ती संस्कृतांतील ग्रंथसंपत्तीशीं तुलितां यावी व ती उणी पडूं नये, यासाठीं संस्कृतांतले धर्मग्रंथांचे सर्व प्रकार व एकंदर सोहळे या मंडळींनीं आपल्या ग्रंथांत योजिले. संस्कृत धर्मग्रंथांत ज्याप्रमाणें प्रथम सूत्रें असतात, व नंतर त्यांवर भाष्यरचना करितात त्याप्रमाणें यांनींहि आपल्या आद्य प्रवर्तकाच्या मुखांतून निघालेलीं कांहीं सूत्रवत् वाक्यें सूत्रें म्हणून निवडून काढिलीं व त्यांवर पुढें भाष्य-ग्रंथ रचिले. या भाष्यांनंतर महाभाष्येंहि रचिलीं व महाभाष्यांचे प्रचंड गद्यग्रंथ तयार केले. चक्रधराचे प्रारंभींचे शिष्य-उपशिष्य सर्व विद्वान् व कुशाग्रबुद्धीचे हुशार ब्राह्मण असल्यामुळें हे ग्रंथ करणें त्यांस जड गेलें नाहीं. याशिवाय व्याकरण, कोश वगैरेहि साधनें रचण्याचे त्यांनीं यत्न केलेच. संस्कृतांतलीं अक्षरगणवृत्तें व मात्रावृत्तें हींहि यांनीं प्रचारांत आणिलीं; व पुराणें, लौकिककथा, नीतिग्रंथ वगैरे रचना केल्या. या महानुभाव पंथांतील लोकांनीं अठराव्या शतकापर्यंत जी ग्रंथरचना केली ती अठराव्या शतकापर्यंतच्या आपल्या ग्रंथरचनेपेक्षां निःसंशय कमी नाहीं. पांच-सहाशें ग्रंथकार व त्यांचे हजारों ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत व याशिवाय आणखीहि कित्येक हजार ग्रंथ आजपर्यंत नष्ट झाले आहेत. औरंगजेबानें एके वेळीं यांचे अनेक ग्रंथ लुटवून आणून ते जाळून त्यांवर आपल्या सैन्यांतील शिपायांस जेवण शिजविण्यास सांगितलें, असें मला त्यांच्यांतील एका गृहस्थानें सांगितलें. यांत थोडी जळ असली तरी एकंदर ग्रंथसंपत्तीची कल्पना बांधण्यास या आख्यायिकांची मदत होते; व हल्लीं उपलब्ध असलेल्या अवाढव्य ग्रंथसंपत्तीवरून ही कल्पना निश्चयाच्या प्रांतांत जाऊन पोहोंचते. यांत नवल असें कीं, आपल्या देशांत आपल्या भाषेंत, आपल्या शेजारीं वावरणाऱ्या लोकांजवळ एवढी ग्रंथसंपत्ती आहे, याचा थांग आज गेल्या सहाशें-सातशें वर्षांत आपणांपैकीं कोणासहि लागला नाहीं. या ग्रंथांची कल्पनाहि

कोणास झाली नाहीं, व आजपर्यंतच्या अनेक संशोधकांपासून हे ग्रंथ या मंडळींनीं त्यांची नजर चकवून लपवून ठेविले. इंग्रजी मंडळी तर इतकी चाणाक्ष व इतकी उद्योगी कीं, त्यांनीं आपणां हिंदूंच्या ग्रंथांची मोजणी-मापणी कधींच करून टाकिली. पण त्यांनाहि या मंडळींनीं दाद लागूं दिली नाहीं. सरकारी तवारिखा-लेखकांना तर ग्रंथच काय, पण आपल्या पंथांतील कोणत्याहि बाबीचा यांनीं नीट छडा लागूं दिला नाहीं; व मोठमोठ्या मी मी म्हणविणाऱ्या नामांकित प्राचीन-भाषा-कोविदांनाहि यांनीं बिलकूल दूर ठेविलें. हें पाहून मोठेंच आश्चर्य वाटतें. आणि हें सर्व मनांत आणिलें म्हणजे अजून कित्येक ग्रंथांतील लोकांनीं मराठींत ग्रंथरचना केली असून ती आपणांस अज्ञात असणें संभवनीय आहे, असें वाटूं लागतें; व निदान या एका पंथांतील ग्रंथांची ही माहिती तरी आपल्या आजच्या पिढीस प्राप्त झाली, याबद्दल आनंद वाटतो. असो. या अशा इतके दिवसांत आपणांपासून अज्ञातवासांत राहिलेल्या पंथाच्या संस्थापकाची व त्या पंथाची थोडीशी माहिती व त्या पंथांतील ग्रंथकारांची धूळभेट करून घेतली असतां अयोग्य होणार नाहीं, असें वाटतें. किंबहुना यांची धूळभेट करून घेण्याची जिज्ञासा प्रत्येक महाराष्ट्र-भाषाभिमानी पुरुषास होईल, असा भरवसा आहे.



# श्रीचक्रधर व महानुभाव-पंथ



सुमारें आठशें वर्षांपूर्वीं गुजरात देशामध्यें त्रिमल्लदेव नांवाचा राजा राज्य करीत होता. विशालदेव नांवाचा एक सामवेदी ब्राह्मण या राजाचा प्रधान होता. त्रिमल्लदेवास पुत्रसंतान नसल्यामुळें त्यानें आपलें सर्व राज्य विशालदेवास दिलें. या विशालदेवासहि फार दिवस संतान नव्हतें. परंतु पुढें श्रीदत्तात्रय-स्वामींच्या कृपेनें त्यास एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यानें हरपाळ असें ठेविलें. हरपाळ हा कुशाग्रबुद्धीचा व फार सात्त्विक स्वभावाचा होता. एके वेळीं हा आजारी पडून अगदीं मृत्यूच्या दाढेंत गेला असतां तेथूनहि वांचून परत आले, व नीट मोठा होऊन सुखानें राज्यकारभार पाहूं लागला. पण याला पुढें द्यूतक्रीडेचा नाद लागला व त्या वेडया नादानें हा इतका नादावला कीं, जवळ काय होतें नव्हतें तें सर्व तो गमावून बसला. त्याच्या जवळचा सर्व पैसा गेला पण त्याचा तो नाद गेला नाहीं, किंवा लवमात्र कमीहि झाला नाहीं. उलट अग्नींत इंधन टाकावें त्याप्रमाणें तो वाढत व बळावत गेला. तो इतका कीं, त्या अक्षक्रीडेपुढें याला कांहींच करमेनासें होऊन गेलें व त्याचें मनहि त्याच्या ताब्यांत राहिलें नाहीं. अखेर तो पुन्हां जुवा खेळण्यास इतका आतुर झाला कीं, आपली सुशील भार्या कमलादेवी हिजपाशीं तिचें द्रव्य होतें तेंहि मागूं लागला. जेथें स्वतःचें अपार द्रव्य पुरें पडलें नाहीं तेथें असें मागून उसनें घेतलेलें द्रव्य कितीसें पुरें पडणार !! कमलादेवीनें जें जें कांहीं दिलें तें तें सर्व या नादापायीं नाहींसें झालें व हरपाळदेव पुन्हा कफल्लक झाला ; आणि थोडे दिवस गेले नाहींत तोंच कमलादेवीच्या मागें

---

१. अनेक महानुभाव ग्रंथकार म्हणतात : हरपाळ मृत्यु पावला व त्याच्या देहांत श्रीचक्रधरानें 'परकायाप्रवेश–विद्येच्या' साहाय्यानें प्रवेश केला. ही गोष्ट शके १०७५ श्रीमुख संवछरीं भाद्रपद शु. २ ला घडली, असें ते लिहितात. वार देत नाहींत.

त्याचा पुन्हां ससेमिरा लागला आणि तिनें आपणास द्रव्य द्यावें यासाठीं तो तिच्या नानातऱ्हेनें विनवण्या करूं लागला. विनवण्यांनीं कार्य साधेना तेव्हां धाक-दपटशाहि झाला. तोहि फुकट गेला, तेव्हां रुसवे-फुगवे सुरू झाले. असे एक ना दोन अनेक प्रकार होऊं लागले. एके दिवशीं तर गोष्ट इतकी निकरावर आली कीं, हरपाळदेव फारच हट्ट धरून बसला व कांहीं केल्या ऐकेना. आपल्या नवऱ्याचा हा खुळा नाद पाहून कमलेला फार वाईट वाटे. तिनें पुष्कळ वेळां त्याचें म्हणणें ऐकिलें. पण या दिवशीं त्यास तिनें साफ झिडकारून लाविलें. तेव्हां तो बळेंच अंगलटीस जाऊन अंगावरचे दागिने घेईल, असा त्याचा रंग दिसूं लागला. हें पाहून कमलेनें त्याची निर्भर्त्सना केली व त्यास म्हटलें कीं, ‘ हे दागिने मला देतां येणार नाहींत व ते तुम्हीं घेणें पाप आहे. कारण त्यांजवर माझीहि सत्ता नाहीं व तुमचीहि नाहीं. हे दागिने माझे बापानें माझे अंगावर घातलेले आहेत. आतां माझ्या माहेरच्या माणसांच्या संमतीशिवाय मीं ते अंगावरून काढणें किंवा त्यांची कोणतीहि वाट लावणें हें फार अयोग्य आहे.’ हे असले कठोर शब्द आणि तेहि आपल्या बायकोचे तोंडून आलेले, तेव्हां ते ऐकून हरपाळ थोडया रागानें व थोडया त्रासानें म्हणाला कीं, ‘ देवी, तूं दागिने देणार नाहींस तर मीहि आण वाहून तुला सांगतों कीं, ते मी तुजजवळून घेईनच; आणि ते दागिने मला मिळाल्याशिवाय जर मी अन्नग्रहण करीन तर श्रीगोपालकृष्णाची शपथ आहे. पहा! हें मी तुला आज खरेंच निक्षून सांगतों.’ नवऱ्याची ती शपथक्रिया ऐकून एरव्हीं शांत असणारी कमलदेवी रागानें फणफणून गेली आणि त्यास म्हणाली कीं, ‘ तुम्ही इतकी शपथ वाहतां, तर मीहि आज तुम्हांस शपथ वाहून सांगतें कीं, ज्याची शपथ तुम्हांला, त्याच्याच पायांची शपथ मला. श्रीकृष्णाचे पायांची शपथ, मीहि हे दागिने तुम्हांस देणार नाहीं व तुम्हीं ते बळेंच घेतलेत तर मी अन्नत्याग करीन.’ नवराबायकोच्या या रुसवारुसवीचा व या आणाशपथांचा असा परिणाम झाला कीं, त्या दिवशीं दोघांनींहि अन्नग्रहण केलें नाहीं. अखेर ही गोष्ट घरांतील इतर माणसांस कळली व त्या

श्रीचक्रधराच्या मठांत, तो आपल्या पंथाच्या प्रसारासाठीं बाहेर प्रांतांत फिरतीवर असतांनाहि त्याची सर्व व्यवस्था नीट आंखलेली असे. दिनचर्येचीं नित्यकृत्यें निरनिराळ्या शिष्य-मंडळीस वांटून देऊन तीं त्यांचेकडे सोंपविलीं असत; व ते शिष्यहि तीं नियमानें बिनचूक करीत. उदाहरणार्थ, **नाथोबा**कडे पंचांग पाहून तीथ-वार सांगणें, नैमित्तिक कृत्यांची तयारी करणें, गंध वगैरे उगाळून नित्यपूजाअर्चेची सिद्धता ठेवणें हें काम होतें. आमंत्रणें देऊन बोलावणीं करणें, बाजारहाट पाहणें हें **नागदेवाचार्य** करी. सडासंमार्जन, स्वयंपाक, पूजासाहित्य वगैरेची तर्तूद करण्याचें काम **नागांबिके**कडे होतें. अशीं सर्व कामें वांटलेलीं असत.

स्वतः श्रीचक्रधरस्वामी आपल्या शिष्य-प्रशिष्यांकडून कांहींहि घेत नसे. आपली सर्व वृत्ति केवळ भिक्षेवरच तो चालवी; व महंताला आणि धर्मस्थापकाला साजेल अशीच त्याची राहणी असे. तो आपल्या शिष्यांना व्याख्यानें देई; निरनिराळे विषय समजावून सांगे व उपदेश करी. त्याचें आचरण फार कडक असे; व आपल्या पंथाविषयीं आदर, प्रेम आणि अभिमानहि त्याच्या ठिकाणीं फार उत्कट असे. पण इतर धर्मांचा किंवा पंथांचा उपहास तो करीत नसे; व तसा कोणींहि केलेला त्याला आवडत नसे.

गृहस्थाश्रम सोडून संन्यासदीक्षा घेतल्यावर तो धर्मोपदेश करीत सर्व देशभर संचार करी. दक्षिण हिंदुस्थानाकडे तो वळला नाहीं. उत्तरेकडील प्रांतांत संचार करून त्यानें आपल्या नवीन पंथाचा प्रसार केला; व तो पंथ दृढमूल केला; आणि हें करीत-करीत व हिंडत-हिंडत तो अखेर बदरिकाश्रमाकडे गेला. बरोबर कांहीं थोडी शिष्य-मंडळी होती. पण त्यांस तो ठिकठिकाणीं ठेवीत गेला. अखेर अगदीं हिमालय-पर्वतांतील प्रांतांत जात असतां त्याचे बरोबर त्याचा श्रेष्ठ शिष्य **नागार्जुन** मात्र होता. शेवटीं एके दिवशीं त्यासहि मागेंच ठेवून श्रीचक्रधरस्वामी निघून गेला. पुढें त्याचें काय झालें, किंवा त्यानें काय केलें याची प्रत्यक्ष माहिती कोणासहि नाहीं. हिमाचलाकडे प्रयाण करीत असतांना श्रीचक्रधरांनीं

नागदेवाचार्याला वर्तनक्रमाबद्दल केलेला उपदेश केशवराज सूरींनीं आपल्या 'मूर्तिप्रकाश' ग्रंथांत फार रसाळ शब्दांनीं सांगितला आहे. या ग्रंथाचा आठवा अध्याय या उपदेशानेंच व्यापला आहे. असो.

श्रीचक्रधरस्वामी निघून जाऊन नाहींतसे झाल्यावर नागार्जुनाला फार वाईट वाटलें व त्यानें फार शोक केला. केशवराज सूरी सांगतात:—

बीजें केलीया श्री चक्रधरां । डोळेयां सुटलिया धारां। आत्मेयाची गजबज थोरा । तें सांघों नेणिजे ॥ आंसूवीं कुहिजले लोंचन । दाही दिशां धावें मन। वाचेसी नये आन। श्री चक्रधरा वांचोनियां॥ मधुकरी अवसरीं दिगंतु। भिक्षेसी "श्री चक्रधर दया" भणितु॥ चैतन्य जाले दुश्चितु। दुःखास्तव ॥

अशी वेड्यासारखी अवस्था होऊन नागार्जुन एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणें त्या प्रांतांत हिंडूं लागला. अखेर तोहि कोठें दिसेना, तेव्हां त्याचा शोध करीत करीत महदंबा नांवाची कोणी एक म्हातारी तेथें आली.

ती 'दरें, दरकुटें, डोंगर। शिळातटें, वाळूवंटे, गिरिवर,। कपाटे, कोहरें अपार।

हिंडतु त्याचा शोध करी।

मार्गीं चालतां उल्लासें। ग्रामजनातें पुसे आवेशें। येथ कव्हणी वेडे पिसें। देखीले कीं?"॥

यावर लोक उत्तर देत

आई वेडें ऐसे दुश्चितें। जात देखिलें येणें पंथे। परि कोणा ठायीं गेलें हें निरुतें। आइको नाहीं॥ तेथुनी साउमी निघाली। वाट क्रमोनी डोंगरां आली। तंव गोपाळासीं भेटी जाली। अदृष्टहेतू॥ मग तया गोपाळासी पुसिले। आलेहो कव्हणी माणुस, नाहीं देखोले। तंवं तेंहीं ठाउकें सांगितले। सविवरू॥ पैल रुई पासील दरडी। तेथ पडली असे कोरडी। आम्ही निच कुरंधनें तोडीं। पिळीत असों॥ 'श्री चक्रधरु' हें वचन। बोले आपण या आपण। पर तें काह्मा न कवण। ऐसें जाणिजेना॥

हें उत्तर एकून ती महदंबा म्हातारी त्या दरडीकडे गेली; व पाहते तों तेथें निश्चेष्ट पडलेला असा नागदेवाचार्य तिच्या दृष्टीस पडला.

> त्याची 'जीवज्योति झिळिमिळीत दिसे क्षीण। हृदयीं प्रकटले पंच प्राण। बाहीर रिगावया।। अर्धांगीं वोळिबे लागले। ते हातें करौनि झाडिले। मग उचलौनि पोटासि धरिले। नागार्जुनातें।। ऐसी देखौनि आचार चर्या। सदगद वाचा बोलिली म्हतारिया। भणे 'नाग देया ' 'नाग देया'। तुज परमेश्वरु पाचारिताती।।

असें म्हणून तिनें त्याचे ओळिंबे झाडले, त्याला थोडें पाणी पाजलें, व हळूहळू शुद्धीवर आणून, पाठीवर घाढून ती त्यास एका गांवांत घेऊन गेली; वाटेंत या दोघांस पाहून

> ग्रामाचिया लोकां विस्मयो पडे। म्हणिती या वाटां गेलें हें वेडें। 'चक्रधर दया' म्हणे बापुडें। घरो घरीं।। तें ऐकून येरी भणे, "बा देवो सांडौनि गेला। म्हणौनि हा वेडा पिसा जाला। आपण यातें विसरला। कांही सांघावे ना'।।

अशा रीतीनें अनेक दिवस मार्ग क्रमीत क्रमीत तीं दोघें ऋद्धिपुरास आलीं; व त्यांनीं ही शोकदायी वार्ता सर्वांस सांगितली.

श्रीचक्रधरासंबंधें त्याच्या अनुयायांच्या मनामध्यें फार पूज्यभाव व नितान्त निष्ठा असे; व ते सर्व त्याला आपल्या प्रत्यक्ष पित्याप्रमाणें मानीत. त्याचें वचन त्यांना वेदवाक्यवत् वाटे. त्याची अनुज्ञा ते कधींहि उल्लंघीत नसत. श्रीचक्रधरहि आपल्या शिष्यमंडळींना फार प्रेमानें व कळवळ्यानें वागवी; आणि त्यांच्या कल्याणाची सदैव काळजी वाही. परंतु त्याची शिष्य-मंडळीला शिक्षाहि फार कडक होती. कोणी आगळीक केली असतां किंवा आपण घाढून दिलेल्या नियमांचें उल्लंघन केलें असतां तो त्यास अनेक प्रकारें शासन करी. एक सहस्रपर्यंत साष्टांग नमस्कार घालावयास लावणें ही तर नेहमींचीच शिक्षा असे. पण केव्हां-केव्हां पाण्यांत उभें करणें, उन्हांत उभें करणें याहि शिक्षा सुनावण्यांत येत. कधीं-कधीं तर स्वहस्तानें

ताडन करण्यापर्यंतहि मजल जाई. आपल्या शिष्यवर्गापैकीं कोणीहि दुसऱ्या पंथांतील पवित्र ठिकाणांची, तीर्थांची किंवा त्यांतील पूज्य मानिलेल्या पुरुषांची अवहेलना करावी किंवा थट्टा करावी, हें त्याला बिलकूल खपत नसे. अशा वेळीं तो त्या अपराध्यास कडक शासन करी; किंवा केव्हां-केव्हां तर तो त्याला आपल्याजवळून घालवूनहि देई.

एके वेळीं कोणी पद्मनाभी या नांवाचा एक शिष्य स्नानास गेला असतां तेथें त्यानें दुसऱ्या पंथांतील 'प्रमाणुअनुभव' नांवाच्या कोणा एका पुरुषाचा उपहास केला; व तो परत श्रीचक्रधरदेवाकडे आला. पुढें ही गोष्ट श्रीचक्रधरास समजली, तेव्हां त्यानें सांगितलें कीं—

"या पद्मनाभीयेसी भितरू रिघोनि देया: कवाडे घाला. भीतरी अवचटा येइल हो' तंव नागांबा भणतिलें: कां बाबा: सर्वज्ञे भणतिलें: बाई "हा प्राणियांचे: चैतन्यु पोळऊनि आला असें आतां एथौनि याचे मुखू न पाहिजे कीं" बाई हा महात्मा न होअे: महात्मेयां सकळ जनां सुखरूपा होआवे कीं: तरी हा तैसा न होए: तेहीं बाहीरी घातैला: आन पद्मनाभीसी आज्ञा देववीलि: अेतुकेंनि: तो थोरां शब्दा रडों लागिन्निला: सर्वज्ञे भणतिलें: बाई पोरू आतां दवडा: याचा शब्द अथिचा कानीं पडतांची यासीं निरोधूं होईलू: मग नागांबा अनुकुंपा उपन्नली: आन विणवित्ती शब्दीं: भणतिलें: बाबा: बापुडा रडतुसे: बापुडा बटकिरू अेकला कें जाईलू: अेऊ दीजो: कां बाबा: तंवं बाहीरीला कडौनि: नाथोबा आले: ते हीं नागांबा तें पूसिलें: बाई पद्मनाभी: कां रडतुसें: सर्वज्ञे भणतिलें: हा अेथौनि दवडा: तें आइकौनि पद्मनाभी थोर दुःख करों लागैला: सर्वज्ञे भणतिले तेयातें परौते नेया: ना अेथौनि दवडा: याचें शब्द अेथिचा कानीं पडतीं: तेणें निरोधे तर यांसीं थोरू अनिष्ठु होईल. पुनती नागांबा विणविलें: बाबा बापुडा रडतूंचि असें: तरी अेऊ देयावा पां: सर्वज्ञे भणतिलें बाई: हा महात्मेयांचा अपराधी: यासी अेसां विधी: जे तेयांचेयां ठायां जाऊनि: सेनामा तियां आंगु माखौनि: तेया आडपडौनि प्रायश्चित्त घेयावें: मग ते हीं होऊनि: अेथें नीरोवींति: आन तें भणतीं: आमुचा होति: आपुला सन्निधीं असों देया: तर अेथ असों दीजैलू: तंवं नाथोबाअे तेथ जाऊनि

सर्वांनीं या दोघांस आपला हट्ट सोडण्याची विनवणी केली; पण त्यांपैकीं कोणाच्याहि सांगण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर हरपाळाचा बाप विशालदेव व आई माल्हणदेवी हीं उभयतां तेथें आलीं व त्यांनीं हा हट्ट सोडण्याविषयीं त्या दोघांस पुष्कळ प्रकारें सांगितलें आणि अनेक यत्न करून पाहिले. अखेर आपला एकुलता एक मुलगा असा उपोषण करणार, त्यापेक्षां त्यास द्रव्य द्यावें हें बरें, असा विचार करून विशालदेवानें हरपाळास त्या दिवशीं द्रव्यहि दिलें व तो दिवस कसातरी निभावून नेला. पण यापुढें हरपाळाचे मनांत एक तऱ्हेची उद्विग्नता आली. त्याची ती आनंदी आणि हौसी वृत्ति जाऊन तो दिवसेंदिवस उदास दिसूं लागला व त्याचे मनांत बदल पडला.

पुढें एके वेळीं हरिपाळाचे मनांत रामटेक येथें यात्रेस जाऊन श्रीरामाचें दर्शन घ्यावें, असें आलें व त्यानें ही गोष्ट आपल्या आईस कळविली. आईनें उपाध्यायामार्फत प्रधानाची सल्ला घेतली. तेव्हां प्रधान म्हणाला, "तो देश पारिखा: कैसा पाठवो? भंवती राजके: सेजा जाधव राज्य करिती असेती:" तो आणखी असेंहि बोलला कीं, आपलें व जाधवांचें तर वैर असून युद्ध चालू आहे, तेव्हां अनायासें यादवांच्या हातीं हरिपाळदेव सांपडेल. तरी हें कसें घडेल? परंतु हरिपाळाचा तर फारच हट्ट पडला. तेव्हां आईनें अशी युक्ति सुचविली कीं, "जेऊ राउतें पाइकें जाती ऐसा सडाचि पाठवावा: कां दुधारी रजपुताचेया परि पाठवावा: अन्यत्र लोक जाती तेसनेयापरी हाही जाइलु," असें म्हणून व सर्व तयारी करून देऊन तिनें त्याची रवानगी केली. अशा रीतीनें यात्रेनिमित्त निघून चालला असतां वाटेंत त्याची व त्याच्या लोकांची चुकामूक झाली; आणि दोघे दोहीकडे होऊन हरिपाळदेव रामटेकचा रस्ता सोडून ऋद्धिपुराकडे वळला व तेथें जाऊन पोहोंचला. ( ही गोष्ट शके ११०७-मध्यें विश्वावसु-संवछरीं चैत्र शु. १५ मेस घडली. ) ऋद्धिपुरास गेल्यावर हरिपाळानें श्री गोविंद प्रभू नांवाच्या एका विद्वान् व सर्वसंगपरित्याग करून अयाचित वृत्तीनें राहणाऱ्या पंडिताची गांठ

घेतली; व तो त्याच्या जवळ राहिला. पुढें तेथें असतांनाच या गोविंद प्रभूनें त्यास मंत्रोपदेश देऊन त्याचें नांव 'चक्रधर' असें ठेविलें व त्यानेंहि आपलें 'हरिपाळ' हें नांव सोडून देऊन तो आपणास 'चक्रधर' असें म्हणवूं लागला.

अशी कांहीं वर्षें लोटल्यावर हरिपाळ ऊर्फ श्रीचक्रधर यानें आपला विवाह केला. औरंगल नांवाच्या एका शहरीं कमळ नाईक नांवाचा एक सामवेदी ब्राह्मण होता. त्याला हंसांबा नांवाची एक रूपवती विदुषी कन्या होती. तिच्या बापानें अनेक ठिकाणीं वरयोजना केली. पण त्यापैकीं कोणीहि पुरुष तिच्या मनास येईना; व यामुळें ती लग्नाला उपवर झाली होती, तरी तशीच राहिली होती. अखेर चक्रधराशीं लग्न लावण्यास हंसांबा कबूल झाली, व शके ११२२ रौद्रसंवच्छरीं ज्येष्ठ शु. सप्तमीस गोरज-मुहूर्तावर थाटानें यथाविधि विवाह होऊन हीं दोघें संसार-सुखाचा अनुभव घेऊं लागलीं.

अशीं कांहीं वर्षें लोटल्यावर चक्रधरानें वैराग्याचे भरांत एक दिवस तें गांव व तें घर सोडून दिलें आणि तो पुन्हां देशपर्यटनास व तीर्थ-यात्रेस निघाला.

देशपर्यटन करीत करीत व अनेक स्थळें पाहत पाहत श्रीचक्रधर अचळपुर (इलिचपुर) प्रांतीं आला. तेथें रामदेऊ॰राऊ॰ दरणा या नांवाचा स्वतंत्र बैसना (संस्थानिक) होता. त्यानें महादेवरावाच्या आग्रहानें झाडी-मंडळाचे राजावर स्वारी केली होती. परंतु झाडी-मंडळाच्या राजानें जाधवांकडे शिष्टाई करून ती स्वारी परतविली; व मग रामदेव दरणा हा आपल्या नगराकडे गेला. परत जातांना त्याची व श्रीचक्रधराची गांठ पडून त्यानें श्रीचक्रधरास प्रार्थना करून आपल्या नगरास नेलें; व कांहीं दिवस श्रीचक्रधरास तेथेंच आपल्या येथें ठेवून घेतलें.

एके दिवशीं रामदेऊ॰राऊ॰ दरणे यानें श्रीचक्रधरास विनंती करून म्हटलें कीं, 'महाराज, मला एक कन्यारत्न आहे. तें मी आपणांस देऊं

इच्छितों; तरी आपण त्याचा स्वीकार करावा.' परंतु हें राजाचें म्हणणें श्रीचक्रधरानें प्रथम मानिलें नाहीं. अखेर राजानें फार विनवण्या केल्या तेव्हां श्रीचक्रधर हा त्याचें म्हणणें मानण्यास व त्याच्या कन्यारत्नाचा स्वीकार करण्यास कबूल झाला; आणि राजानें मोठ्या थाटामाटानें चार दिवस महोत्सव करून वैशाख महिन्याच्या शुद्ध द्वितीयेस आपली कन्या उमादेवी हिचें श्रीचक्रधराशीं लग्न लाविलें. लग्नानंतर उमादेवीचें सासरचें नांव श्रीचक्रधरानें 'गौरी' असें ठेविलें; आणि मग तिच्यासह त्यानें गृहस्थाश्रमाचा अंगीकार केला. अशा रीतीनें तीन वर्षें क्रम चालविल्यावर श्रीचक्रधराचें मन गृहसंसाराकडून पुन्हां परत मुरडलें व तो उदास वृत्तीनें राहूं लागला. याकरितां गौरीदेवीनें त्याची समजूत घालण्याचा यत्न करून फार निषेध केला. पण श्रीचक्रधराच्या मनाची उदास वृत्ति जाईना व गौरीदेवीचें म्हणणेंहि त्याला मान्य होईना; व तिला टाकून देऊन दूर निघून जाणेंहि त्याच्यानें होईना. अशा प्रकारें श्रीचक्रधराचें एक मन दोन ठिकाणीं झालें. मनाच्या अशा स्थितींत असतां श्रीचक्रधर हा चंद्रभागा नदींत जलक्रीडा करण्यास गेला. त्या वेळीं चंद्रभागेला पूर आला असून नदी दुथडा तुडुंब भरून चालली होती. जलक्रीडेच्या नादांत श्रीचक्रधर हा खोल पाण्यांत गेला व पाहतां पाहतां दिसेनासा झाला. त्या वेळीं 'राऊळ (महाराज) बुडाले, हो बुडाले !' अशी नदीकांठच्या लोकांनीं ओरड केली. मोठा हाहाकार झाला. थोड्याच वेळांत ही बातमी राणी-वशांत गेली. ती ऐकतांच गौरीदेवीनें सभोंवतालच्या लोकांस 'हें खरें कां ? हें खरें कां ?' असें पुन्हां-पुन्हां विचारिलें, व त्यास 'हें सत्य', 'हें सत्य' असें जेव्हां लोकांनीं सांगितलें तेव्हां त्या उत्तराबरोबरच गौरीदेवीनें 'गे ! हाय रे भगवान !' असें म्हणून जमिनीवर धाडकन आंग टाकिलें, व ती स्तब्ध झाली ! चैतन्य विलयास गेलें ! व प्राण देहांतून नाहींतसे झाले. गौरीदेवीची ही अवस्था पाहून राणीवशांत एकच कोलाहल झाला. राजवाड्यांत असा आकांत चालला आहे इतक्यांत तिकडे श्रीचक्रधर नदीच्या धारेंतून कांठास

लागून नदीबाहेर आला. त्याला पाहून सर्वांना मोठा आनंद झाला आणि ते लोक गर्जना करीत आनंदाच्या भरांत नगरांत आले. राजमंदिरांतले स्त्रियांचे दुःखाचे आक्रोश आणि श्रीचक्रधराला पाहून आनंद पावलेल्या नागरिकांच्या हर्षाच्या गर्जना एकमेकांत मिसळून जातात तोंच गौरीदेवीचे प्राण निघून गेल्याची हृदयविदारक वार्ता श्रीचक्रधराच्या कानावर गेली. ती ऐकून तो अगदींच विरून गेला. पुढें गौरीदेवीचें त्यानें यथाविधि उत्तरकार्य केलें. पण मग त्यापुढें त्याच्या मनास तेथें बिलकूल करमेनासें झालें व तें स्थान त्याला स्मशानवत् भासूं लागलें. कांहीं महिने तेथें तसाच काळ कंठून श्रीचक्रधर तें स्थळ सोडून निघून गेला. तेथून निघून गेल्यावर त्यानें वैतागाच्या भरांत आपल्या अंगावरचीं बहुतेक सर्व वस्त्रें फाडून त्यांच्या चिंध्या केल्या; आणि त्या चिंध्यांची गोफण करून तो झाडांवर चढून दगड भिरकावूं लागला. अखेर त्या गोफणी आणि त्या राहिल्या-साहिल्या चिंध्याहि त्यानें गुराख्यांच्या मुलांस देऊन टाकिल्या; व कंबरेच्या आणि डोईच्या लहान पटकुराशिवाय सर्व फेकून देऊन तो वाट चालूं लागला. अशा विदेही स्थितींत मार्ग चालतां चालतां श्रीचक्रधर हा हिंडत-हिंडत कोणे एके वेळीं प्रत्यस्थानीं भोगावतीचे कांठीं आला व तेथें त्यास **श्रीदत्तात्रेयाचें** दर्शन घडलें. आणि याच ठिकाणीं त्यानें या वेळीं म्हणजे शके ११८५कार्तिक महिन्यांत गुरु सिंहराशीस असतां संन्यासदीक्षा धारण केली; व यानंतर तो शिष्यसंप्रदाय वाढवून उपदेश करीत हिंडूं लागला.

एका स्वतंत्र पंथाचा संस्थापक या दृष्टीनें पाहतां श्रीचक्रधराचें या पुढील चरित्र फार विचारणीय आहे व तें महानुभाव-पंथांतील ग्रंथकारांनीं मोठ्या आस्थेनें लिहून घेऊन जतन करून ठेविलें आहे[१].

---

१. एका हिंदुस्थानांतच काय, पण सर्व जगांतील कोणत्याहि धर्माच्या व कोणत्याहि पंथांतल्या कोणत्याहि लेखकांनीं आपल्या आदिपुरुषाच्या चरित्राची माहिती व दिनचर्येची टिप्पणी इतक्या आस्थेनें लिहून ठेविलेली आज उपलब्ध नाहीं; व अशी टिप्पणी पुढेंहि कधीं उपलब्ध होण्याचा संभव दिसत नाहीं.

अश्वेंचीं सांघातिलें: मग सेनां मातियां आंगमाखौनि : तेयां आडू पडौनि क्षमा विणेऊं लागीनिला: आण थोरां दुःखे रडों लागीनिला: इतुकेनसीं प्रमाणूअनुभव देयां : अनुकंपा उपन्नली: आन पद्मनाभी तें उठविलें: आन भणितिलें: ऐसे तें श्रीचक्रधर राऊळ नीकें असेति : तेयां चां ठाइं कांहीं कव्हणां विरोधू असें पा : आतां तुम्हीं आपुलेया गोसावियां सन्निधी जा : तवं पद्मनाभीं भणतिलें : तुम्हीं होऊंनि माते निरोवावें: तर मातें रीगौ देति तथा सन्निधीं असौं देति : येर्‍हवीं स्वामी माझे मुखू हीं न पांति : मग तेयांतें: सर्वज्ञा निकटीं घेऊंनि आलें: दंडवते करौनि विणविलें: जी जी : यासीं आमुचें होतेंनि दाश्या असौं देयावें : सर्वज्ञें भणतिलें : आतां तुमचा अेथौनि : स्वीकरीजतु असीजें आन राहौ दीजतू असीजे : परी इहीं अधुनां कव्हणां हीं रळी राभस्ये शब्दु नेदावा पां: हो कां जी नेदूंची भणौनि प्रायश्चित्तें सी दंडवतें करौनि श्रीचर्णांवरी वाढवेळू माथा ठेवीनिला : मग सर्वज्ञे प्रमाणू अनुभवदेयां : वीडा देऊंवीला : मग दंडवते करौनि तें तोषतू गेले : आन शिष्यां भणतीं : देखिलेसा: कैसे अविक्रियू ब्रह्मः ईश्वर पुरुषु व्यवस्छा निरौवीति असेति :" ॥

असें दिसतें कीं, श्रीचक्रधराच्या गोटांत जाण्यास कांहीं निर्बंध असत. वाटेल त्यानें उठावें, जानवें तोडून टाकावें, दाढी-डोई मुंडावी, काळीं, भगवीं किंवा आणखी कसलीं तरी वस्त्रें परिधान करावीं आणि शिष्य म्हणवून श्रीचक्रधराच्या सानिध्यांत रहावें, असें तेथें घडत नसे. मुमुक्षु शिष्यानें कांहीं नियम पाळावे लागत, व 'ते मी पाळीन' अशी एके तर्‍हेनें भाक द्यावी लागे. नागदेवाचार्य हा शिष्य होण्याच्या हेतूनें प्रथम आला, तेव्हां त्यास श्रीचक्रधरानें स्पष्टपणें बजाविलें कीं, आमच्या सन्निध येथें रहावयाचें असेल तर आम्ही "अेथिचेयां पाठवीलेयां जावें: पाचारीलेयां यावें" म्हणजे 'जा' म्हणतांच गेलें पाहिजे 'ये' म्हटल्यावर आलें पाहिजे. श्रीचक्रधरानें आणखीहि सांगितलें कीं, सर्व आप्तेष्टांचा संबंध सोडला पाहिजे; आपली ओळख कोणाला न होईल आणि दुसर्‍याच्या ओळखीची उपाधि आपणास न लागेल अशा रीतीनें

राहिलें पाहिजे. अशा पाच-पंचवीस गोष्टी[1] आणखीहि त्यानें बजावून सांगितल्या; व या सर्व बाबी सांगितल्यावर श्रीचक्रधर म्हणाला, 'हे सर्व तुम्हांस मान्य असेल तर प्रथम मान्यतेची सुपारी द्या, आणि मग येथें रहा.' श्रीचक्रधराचें बोलणें ऐकून आणि आपल्या मनाशीं थोडा वेळ विचार करून नागदेवानें आपल्या मनाचा निश्चय केला आणि ही लग्नघटिका साधून घ्यावी, असें चित्तांत आणून "भाकेचे पोफळ आसनांवरी ठेविले: आन साष्टांग दंडवते करौनि श्रीचरणांवरी माथां ठेविला." यानंतर श्रीचक्रधरानें नागदेवभट्टाच्या पाठीवर हात फिरविला आणि त्यास उठावयास सांगितलें; आणि एक चौकोनी वस्त्र आणवून त्यास गांठी देऊन त्याची झोळी केली व नागदेवाच्या हातीं ती देऊन आजन्म भिक्षावृत्तीनें राहण्यास, तसेंच सर्व नियम नीटपणें पाळण्यास सांगून श्रीचक्रधरानें त्यास आशीर्वाद दिला. अशा रीतीनें हा दीक्षाविधि पुरा झाला.

हातीं झोळी देऊन भिक्षावृत्तीनें राहण्याविषयीं श्रीचक्रधरस्वामींची सर्व शिष्यांस आज्ञा असे. भिक्षा केव्हां, कशी, कोठें व किती मागावी यासंबंधानेंहि त्यांनीं दंडक घालून दिलेले आहेत.

भिक्षा केव्हां मागावी ? याबद्दल चक्रधर सांगतात:-

**निर्धूम नगरु जालेया: भिक्षे रिगिजे : ॥ १ ॥ तिसरां पहारीं भिक्षा कीजे**

भिक्षा कशी करावी ? यासंबंधें ते म्हणतात:-

**मौन्यें भिक्षा कीजे : धर्मभिक्षा घेआवी : निरोधें भिक्षा नेघावी : क्षण एकू उभेआ असिजे ! मग जाऊं लागिजे : अेकीं कडौनि भिक्षे रिगिजे : अेकी काडौनि निगिजे: भिक्षा करितां पायाची वासु पाहावी: दाराची वासू न पाहावी: हाताची वासु न**

---

१. या सांगितलेल्या बाबींमध्यें एक बाब थोडी मौजेची आहे ती अशी कीं, "कानड देशा तेलंग देशां न वचावे महाराष्ट्रीं असावे." कन्नड व तेलंगण हे देश विषयी वृत्तींचे म्हणून वर्ज्य केले गेले.

पाहावी : झोळिएची वासू पाहावी : गोदोहनमात्रें उभया असिजे : भिक्षा करितां कव्हणांकडे न पाहावे.

भिक्षेस कोठें जावें ?

निर्हेतुक भिक्षा कीजे : घरें न निवडितु भिक्षा कीजे।

भिक्षेस कोठें जाऊं नये ?

तोरण मंडळाचिए द्वारां : भिक्षे न वचावें : स्त्री पुरुषाची सेवा करितां देखौनि भिक्षे न वचावें : डोइए जंतु शोधितां भिक्षे न वचावे : संपन्नाचेआ घरा भिक्षे न वचावे : ऊळखीचेआ घरा भिक्षे न वचावे : हिंसका निंदकाचेआ घरा भिक्षे न वचावे : कलहाचेआ घरा भिक्षे न वचावे :

भिक्षेंत वृत्ति कशी असावी ?

प्राणासी आहारू देआवा : इंद्रियां नेदावा : इंद्रियार्थरसू न सेवावा : धाए तवं खाइजे : पाहे तवं निजिजे तैसे नव्हे कीं : निरसे अन्नें सेविजे : रेंदेया चेंदेया दरु भरिजे : कव्हणाची कांजी भाजी न स्वीकारावी : जठरा प्राणाहुतीची पीडा हरे इतुके घेऊए :

भिक्षेचें काय करावें ?

भिक्षाविधी सारौनि : झोळी दृष्टपूतां करौनि : भिक्षान्नु सेविजें : भिक्षा मागौनि नदीतीरीं भोजन कीजे : झोळिए अंतरवृत्तें भोजन विधानु न करावे : भिक्षे उष्णु ए : शिळे ए : सदन्नु ए : कदन्नु ए : मग घेइजे :।। तुम्हां कदन्नु जेवितां घ्राणा त्यागु होआवा कुसकरोनि एरे एरी परते : जेवितां आवडी नावडी कां गोडी न होआवी : प्राणाहुति देऔनि क्षुधानिवृत्ती कीजे : भिक्षान्नु सांडावे ना : तथा कव्हणा सुआवे ना : आपणेया लागे तेतुलेचि मागावे :

हें झालें उदरनिर्वाहासंबंधीं. पण भिक्षान्न सेवून क्षुधानिवृत्ति झाल्यावर मग बसावें कोठें, हा प्रश्न येतोच. याचें उत्तर श्रीचक्रधर देतात:—

तुम्ही महात्मेकीं : महात्मेयां भूमी दृष्टीपूत करौनि : नाम स्मरणेनसी : पदीं पदीं पाऊ ठेविजे कीं : तुम्हां शयनीं : आसनीं

> भोजनीं : परमेश्वरू होआवा : विकल्पू स्फुरे अैसेया स्थानीं न बैसावें : हिंसा निंदा जिए स्थानीं वर्ते : तिए स्थानीं न बैसावें ॥ राजसें तामसें स्थानीं न बैसावें: अति असुरें स्थानीं न बैसावे : लेपाचा देउळीं न बैसावे: भोग स्थानीं न बैसावें : इंद्रि॰ मनातें संकोचौनि झाडांतळीं: कां एका निर्जनु स्थानीं गरुडासनीं कां कूर्मासनी : उत्तराभिमुखु बैसोनि नामस्मरणू कीजे :

हें सर्व झालें एकटें असल्यावर; पण चार लोकांत कसें असावें ? कसें वर्तावें ? :—

> महात्मेनि प्रियवक्तेया होआवे : महात्मेनि सत्यार्जवा होआवे : हासतांहि लटिकें न बोलिजे : आपणेआपसि ज्ञातां विरक्ताचा संगू कीजे : तुम्ही महात्मेकीं: तुम्ही चतुर्विध भूत ग्रामां अभयो देआवे कीं : राग क्रोध मद मत्सरु यांचा त्यागू याचि नांवें संन्यासू कीं ॥ अहंतेचे मूळ सकंदी उपडावे नाईं का : येरव्ही अंकुरू निगेती : मग शांतीची रोपें लावावीं : तुम्हां मारिता पूजिता : समानु होआवा कीं : मुक्तीची चाडू : तेणें मुंगिअे विसरून चितावें कीं : समुद्रा पासौनि थिल्लरा पर्यंतु : देवतां अभिमानु सारिखाचि: परमेश्वराची आर्ति होआवी मार्गाची आर्ति होआवी : विषयांची निवृत्ती होआवी : देहावरी अनास्था होआवी : ॥

श्रीचक्रधर सर्वज्ञ महाराजांनीं काढिलेल्या या पंथास 'महानुभाव' पंथ ऊर्फ '**महात्मा**' पंथ, ऊर्फ **जयकृष्णीय** पंथ ऊर्फ '**अच्युत**' पंथ अशीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आढळतात. चक्रधरानें शके ११०७-मध्यें गृहपरित्याग करून यात्रा-पर्यटनास सुरुवात केली, हें मागें सांगितलेंच आहे. त्याच्या यात्रापरिभ्रमणाची नोंद 'लीलाचरित्रांत' आहे. शके ११८५।८६-पासून या नोंदींत प्रायः प्रत्येक दिवसाची हकीकत उल्लेखिलेली आढळते. श्रीचक्रधर हा शके ११९४-मध्यें हा प्रांत सोडून बदरिकाश्रमीं गेला. तेथून पुढें याची हकीकत काय झाली, याचा उल्लेख

कोठेंहि आढळत नाहीं. ' श्रीचक्रधराच्या लीला ', तसेंच ' दृष्टांत ', 'सिद्धांत-सूत्रपाठ ' वगैरे अनेक महानुभावधर्मसंबंधीं ग्रंथ मराठी भाषेंत व बालबोधी लिपींत प्रथम लिहिले गेले; व त्यानंतर पुढें कांहीं म्हणजे अदमासें साठसत्तर वर्षांनीं हे ग्रंथ सांकेतिक लिपींत लिहिले गेले. ही लिपी प्रथम राघव उर्फ रवळव्यासानें कल्पून बसविली. या संकेत-लिपीस ' सकळी लिपी' असें म्हणतात. यानंतर पुढें अनेक वर्षांनीं दुसरेहि संकेत कल्पिले गेले; व सात-आठ तऱ्हेच्या लिपी निर्माण झाल्या. उदाहरणार्थ, १ सकळी लिपी, २ सुंदर लिपी, ३ पारमांडल्य लिपी, ४ अंक लिपी ५ शून्य लिपी, ६ सुभद्रा लिपी ७ श्री लिपी वगैरे. यांपैकीं सकळी, सुंदरी व पारमांडल्य या विशेष प्रचलित आहेत म्हणून यांची मोड व उतारे पुढें या भागाचे शेवटीं देऊं.

या नानाविध लिपी उपयोगांत आणण्याचें काय प्रयोजन पडलें, हें थोडें चिंतनीय आहे. प्रथम श्रीचक्रधरानें हा पंथ काढिला तेव्हां तो गुप्त रहावा असा आशय नसून तो सर्वांस जाहीर व सुगम व्हावा असाच पूर्ण हेतु निःसंशय होता. एके वेळीं केशवराज सूरी यानें श्रीचक्रधराच्या पट्टशिष्यास—नागदेवाचार्यास—म्हटलें कीं, ' मी ' उद्धरण, संसरण हीं प्रकरणें संस्कृतांत पद्यरूपानें लिहूं इच्छितों, तरी तसें करूं काय? तेव्हां नागदेवाचार्य म्हणाला—

" नको गा : केशव देया : येणें माझिये स्वामीचा सामान्यु परिवारू नागवैल की : परमेश्वरें तरी जीवाचेया संकोचिता आन अनेक व्यसना अयोग्यता जाणौनी : आन काठिण्यता चुकवोनी सकळांसी अल्पायासें ब्रह्म-विद्याचिये ठाये गिवसतां येवौनि परमेश्वर लाभुद्यमा वावु होआवा : म्हणौनिषो महाराष्ट्रीये निरोपिलें कीं गा : एरव्हीं सर्वज्ञा काई देववाणि निरोपू न लाहे कीं गा : भणौनि केशवा संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं कीं : (नागदेवाचार्यचरित्र [ परशरामकृत ] कथा ४७-बी)

अशी मूळ स्थिति असतां पुढें आपला धर्म व आपलीं धर्मपुस्तकें आत्मपंथीयांशिवाय इतरांस सुगम असूं नयेत, या बुद्धीनें गौप्यता सुरू

झाली; व संकेत-लिपी प्रचारांत आली. ज्याप्रमाणें वेदार्थ सुलभ व्हावा एतदर्थ त्यावर टीका, भाष्यें वगैरे झालीं. परंतु पुढें कालान्तरानें वेदाचें अक्षरहि कोणाचे कानावर जाऊं नये व वेदांचा अर्थ करणें हें पाप होय, असें मानण्यापर्यंत मजल जाऊन पोहोंचली, त्याप्रमाणें तोच प्रकार लहान प्रमाणावर कांहींसा येथेंहि झाला. संकेत-लिपींत ग्रंथ लिहिण्याचा भाषेच्या दृष्टीनें एक परिणाम असा झाला कीं, एकदा ग्रंथ लिपि-संकेतानें लिहिला म्हणजे त्यांत वाटेल त्याला फिरवाफिरव, किंवा अदलाबदल करतां येणें कठीण झालें. हे संकेत जाणणारांना मात्र तसें करणें शक्य होतें. हे संकेत जाणणारे लोक प्रायः सर्व महानुभाव पंथी भाविक विद्वान् असल्यामुळें त्यांना आपल्या धर्मग्रंथांचे बाबींत थोडादेखील बदल करणें अभाविकपणाचें व पापमूलक वाटूं लागलें. यामुळें यांचे ग्रंथांची भाषा, त्यांतील शब्द, शब्दांचीं रूपें वगैरे सर्व पुष्कळ अंशीं कायम राहिलीं. त्यांच्या निरनिराळ्या शतकांत अनेक लेखकांचे हातून शेकडों नकला झाल्या, पण अर्वाचीनकरणाचा संस्कार त्यांचेवर फारसा घडला नाहीं. 'फारसा' असें म्हणण्याचें कारण असें कीं, तो बिलकूल कोठेंच घडला नाहीं, असें नाहीं. साधारण पौराणिक कथा निरूपण करणाऱ्या ग्रंथांत त्यांच्या निरनिराळ्या पोथ्या बारकाईनें तपासून पाहिल्या असतां थोडासा फरक केल्याचें दिसून येतें; पण आदिधर्मप्रवर्तकांच्या-श्रीचक्रधरस्वामी, नागदेवाचार्य, महींद्रभट वगैरेंच्या संबंधांचे जे ग्रंथ आहेत त्यांमध्यें प्रायः फरक केले गेले नाहींत. जसा 'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ एका पंथाचा मुख्य ग्रंथ मानण्यांत आल्या-मुळें—त्याला 'आई' अशी संज्ञा मिळण्याच्या पायरीला तो गेल्यामुळें—त्यांत फारच अल्पस्वल्प फरक झाला, तसाच या पंथांतल्या मुख्य ग्रंथासंबंधेंहि प्रकार झाला; व यांपैकीं 'लीळाचरित्रा'सारखे किंवा भास्कराच्या 'श्रीकृष्णचरित्रा'सारखे ग्रंथ मूळ गद्यांत लिहिलेले असून-देखील तेहि जसेच्या तसेच नीट राहिले गेले. यामुळें तत्कालीन वाक्य-रचना, बोलण्याचे प्रकार, व्यावहारिक संबंधदर्शक गोष्टी आपणांस आजहि

मूळ स्वरूपांत कळणें सुलभ झालें. यांतहि आणखी एक विशेष असा आहे कीं, या पंथांतल्या आदिग्रंथांची व त्यानंतर कांहीं काळपर्यंतच्या ग्रंथांची रचना गद्यात्मकच जास्त आहे. श्रीचक्रधरस्वामी नित्य-नैमित्तिक कर्में आटोपून स्वस्थ बसले असतां त्यांच्या लोभांतील शिष्यशिष्यिणी त्यांच्या चरित्रांतील अनेक प्रसंगांची माहिती त्यांस विचारीत, किंवा अनेक वेळां चक्रधर आपण होऊन निरूपण करीत. अशा वेळीं श्रीचक्रधरस्वामी जे शब्द बोलतील ते जसेच्या तसेच त्यानंतर लौकरच आठवणीनें उतरून ठेवावे, असा क्रम महींद्रभटानें स्वीकारिला. यामुळें श्रीचक्रधरांचे शब्द किंवा निदान तत्कालीन भाषा जशी त्या वेळीं उपयोगांत असे, तशीच ती ग्रंथांत लिहिली गेली व पुढील मंडळीनेंहि भाविकपणानें ती त्याच स्वरूपांत कायम ठेविली.

चक्रधराचे वेळीं महाराष्ट्राच्या कांहीं भागांत तरी ताडपत्रावर लिहिण्याचा प्रघात असावा, असें या पंथांतील ग्रंथांतल्या कांहीं उल्लेखां-वरून वाटतें. या पंथांतील महदंबा नांवाच्या एका विदुषीनें कृष्णकथा-वर्णनपर कांहीं अभंग रचिले आहेत. यांपैकीं एका अभंगांत ती म्हणते, ‘ताडपत्र हातीः दिन्हला श्रीपती : लिखितु विनंती : भीमकीया ॥ महदंबेचे अभंग, हरिराज कर्सालांची पोथी ).

या महानुभाव-पंथांतील लोकांची व महाराष्ट्रांतील इतर लोकांची मनें एकमेकांविषयीं फारशीं शुद्ध होतीं, असें दिसत नाहीं. हें असें असण्याचें कारण काय, तें ठरविणें थोडें कठीण आहे; पण ही तेढ कोठेंतरी एकदा सुरू झाली व पुढें हरळीच्या मुळीप्रमाणें ती वाढत जाऊन तिनें फार मोठा प्रांत व्यापला असावा, असें दिसतें. जाधव ऊर्फ यादववंशीय राजांच्या अमदानींत, या पंथाचा शिरकाव हळूहळू यादवांच्या राज्यांत व प्रत्यक्ष राजघराण्यांत होऊं लागला, व पुढें-पुढें राजघराण्यांतील अगदीं निकट संबंधाच्या कुटुंबियांनीं या पंथाची दीक्षा स्वीकारण्यापर्यंत मजल जाऊन पोहोंचली. अर्थात् या पंथांतील लोकांची ही पकड इतर लोकांस आवडली नाहीं. यादवांचें राज्य

ल्यास गेल्यावर इकडे मुसुलमानी अंमल झाला आणि देशांतील मूर्ति नाहींतशा करण्याचा त्यांनीं क्रम आरंभिला. मूर्तिपूजकांबद्दल मुसुलमान राज्यकर्त्यांच्या मनांत अखंड वैषम्य होतें आणि ते मूर्तिपूजकांना तुच्छ व रानटी मानीत. अर्थात् जे मूर्तिपूजक नव्हते त्यांच्याविषयीं द्वेषाची तीव्रता तितकी कडक नव्हती. त्यांना ते नरमपणानें वागवून जवळ करीत. मुसुलमान राजवंशांतील एका राजाजवळून मुनिव्यास-पूर्वाश्रमींचे पंडित कमळाकर अयाचित कोठी—या उद्योगी व पाताळयंत्री पुरुषानें एक आज्ञापत्राचें फर्मान मिळविलें आणि या आज्ञापत्राच्या जोरावर त्यानें सर्व महाराष्ट्रभर महानुभाव-पंथाचे 'ओटे' ऊर्फ पूजास्थानें बांधिलीं. अनेक ठिकाणीं हे 'ओटे' महाराष्ट्रीय देवळांच्या आवारांत बीड, पैठण, आपेगांव, फलटण, त्र्यंबक, मढ, पिंपरी, अरणगांव, भिंगार, रामेश्वर ऊर्फ रामदरा, जोगेश्वरी, वेरूळ वगैरेसारख्या शहरांतून तर प्राचीन देवालयांत बांधणें त्यास अगत्याचें वाटलें. मुनिव्यासाचें हें करणें त्याच्या धर्मदृष्टीनें फार हिताचें असेल[1]; पण एकंदर व्यावहारिक दृष्टीनें तें अत्यंत अहिताचें झालें. महाराष्ट्राच्या मनांत आधींच धुमसत असलेला द्वेषाग्नि या कृत्यानें एकदम फार भडकला व त्याच्या ज्वालांनीं या पंथाविषयीं कोठें कोनाकोपऱ्यांत असलेलें थोडेंफार प्रेम होतें तें पार जाळून नाहींसें करून टाकिलें. साधारणपणें ज्याच्याविषयीं आपल्या मनांत द्वेष असतो त्याच्याशीं जो तितक्या द्वेषबुद्धीनें वागत नाहीं त्याच्या विषयीं एक तऱ्हेनें तें मन साशंक होतें. त्याच्या संबंधींचा आदर नाहींसा होतो व जरा वैषम्य वाटतें; आणि अशा इसमास, आपल्या द्वेषास पात्र असणाऱ्या राजाकडून थोडीफार सवलत मिळाली, तर मग वैषम्य अधिकच दुणावतें. असाच प्रकार व अशीच स्थिति महानुभावांसंबंधीं झाली असण्याचा संभव आहे. सर्वांना अप्रिय अशा औरंगजेबाच्या जेजियाची (डोईपट्टीची) महानुभवांस त्या बादशहाकडून माफी

---

१. कुमरें रेमाइसाचे मुनीव्यास त्याहीं उभये गंगातीरीं : स्थानमात्र ओटे घातले : ते रायाचेनि बळें : हा मार्गासी उपयोगू तेयांचा : (अन्वय स्थळ)

मिळाली होती. सर्व हिंदूंवर लादल्या गेलेल्या या कराची ज्यांच्यावर अंमलबजावणी झाली नाहीं व ज्यांना या हिंदूवरील जेजियांतून वगळले ते हिंदू नाहींत, अशी समजूत महाराष्ट्राची झाली असावी. समजूत इतकेंच नव्हे, तर या महानुभवांना ज्या सनदा मुसुलमानांकडून मिळाल्या आहेत, त्या सनदांत हे हिंदूंपेक्षां निराळे आहेत, असा स्पष्ट ध्वनि आहे; व तो त्या कालीं मान्य केला गेला आहे. असो. या द्वेषाग्नीचा विशेष प्रसार होण्याचें एक कारण मोठें चमत्कारिक घडलें. दोन्ही बाजूंच्या अगदीं खालच्या दर्जाच्या लोकांत हीं भांडणें शिरलीं व अव्वल इंग्रजींत पाद्री आणि हिंदू ज्या प्रकारच्या उखाळ्या-पाखाळ्या काढून वितंडूं लागले, तसलीच अचरट आणि तिरस्करणीय भाषा महानुभावपंथी व त्यांचे सामनेवाले महाराष्ट्रीय डफगाणीं गाणारे लोक सर्व काळ एकमेकांसंबंधें बेगुमानपणानें मोठ्या डौलानें उघडपणें वापरूं लागले; आणि ही शिवीगाळ अशिक्षित व अडाणी मंडळींना फार आवडती झाली. रस्त्यांत तणतणणाऱ्या शिंदळींचें कीर्तन ऐकण्याला जशी चौफेर गर्दी जमते तशीच या मंडळीभोंवतींहि गर्दी जमूं लागली व तेथलेच प्रकार येथेंहि घडूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, नसती निंदा व वृथा द्वेषभाव वाढून ज्यांस जवळ करावयाचें ते दूरदूर सरले.

कदाचित् महानुभाव संन्याशांची भिन्न राहणी, विटाळशी-चंडाळशीच्याहि अस्पृश्यतेचा अभाव, त्यांचा पेहराव व महाराष्ट्राच्या हाडींमासीं खिळून गेलेल्या अनेक चालीरीतींची टाळाटाळ, हीं कारणें या द्वेषभावास बऱ्याच अंशीं कारणीभूत झालीं असावींत, असें दिसतें.

सामान्य जनतेमध्यें आढळून येणाऱ्या महानुभावांच्या द्वेषभावाच्या मुळाशीं हीं वर दिलेलीं व अशींच इतर कारणें असावीं, असें वाटतें. पण हिंदुसमाजाच्या वरच्या वर्गांतील लोकांच्या मनांत अनादर उत्पन्न होण्याला यांपेक्षां निराळें कारण असलें पाहिजे. एकनाथासारखा हिंदु-समाजांतल्या अगदीं थोरापासून लहानापर्यंत, ब्राह्मणापासून शूद्रापर्यंत,

सर्वांस ममतेनें वागविणारा व भेदभाव न मानणारा सात्त्विक बुद्धीचा आणि विश्वकुटुंबीय वृत्तीचा महात्मा जेव्हां महानुभावांसंबंधें अनादर दाखवितो, तुकारामासारखा ब्रह्मानंदीं टाळी लावणारा महान् साधुपुरुष जेव्हां महानुभावांवर फटका उडविण्यांत आनंद मानतो, वामनासारखा काव्यानंदांत गुंगणारा पुरुषहि महानुभावांबद्दल जेव्हां टवाळी करतो, गिरधर वगैरेसारखे एकमार्गी लेखकहि तोच मार्ग स्वीकारितात, तेव्हां या द्वेषाच्या मुळाशीं तसेंच कांहीं बलवत्तर कारण असलें पाहिजे, असें वाटूं लागतें; आणि तें कारण महानुभावांनीं चातुर्वर्ण्यावर केलेला आघात हें असावें, असें मनांत येतें. हिंदुधर्माचा आणि हिंदुसमाजाचा अगदीं अंतरात्मा म्हणजे चातुर्वर्ण्य होय. चातुर्वर्ण्य हा आपल्या समाजाच्या काळजाचा कलिजा आहे. याला हात घातलेला आपणांस केव्हांहि रुचत नाहीं. बुद्ध वगैरे पंथप्रसारक तर राहोतच, पण महानुभाव, कबीरपंथ, दादुपंथ वगैरे पंथांपासून तों परवांच्या तीन दिवस माजलेल्या प्रार्थनासमाजापर्यंत चातुर्वर्ण्य साफ समूळ खणून टाकण्याचा एकहि यत्न फारसा सिद्धीस गेला नाहीं. प्रार्थनासमाज वगैरे पंथ तर हिंदुत्व कायम ठेवून चातुर्वर्ण्यालाच तेवढी मूठमाती देण्याच्या भानगडींत पडले; पण हिंदुत्वहि ज्यांनीं पार घालवलें अशा खिस्ती व महंमदी पंथांच्यानेंहि चातुर्वर्ण्याची आठवण साफ बुजविली गेली नाहीं. किरिस्ताव होऊन आज दोन-तीनशें वर्षें त्या धर्मांत राहिलेल्या व दहावीस पिढ्या लोटलेल्या ठाणें, वसईकडील किरिस्ताव लोकांच्या मनांतली चातुर्वर्ण्याची आठवण आणि प्रीति अजून गेली नाहीं. सोयरिकीचे वेळीं ते जातगोत अद्यापपर्यंत पाहतात. तसेंच, कुलाबा जिल्ह्यांतले महाडकडचे मुसुलमान लोकहि सोयरीक करितांना आपली जुनी जात मनांत आणून मग त्याप्रमाणें सोयरीक ठरवितात. पंढरीचे वारकरी चातुर्वर्ण्य टाकून शरीरसंबंध करीत नाहींत. पण ते चातुर्वर्ण्यासंबंधें तोंडानें बकबकहि करीत नाहींत. अलीकडले नवीन पंथांतले लोक थोरांपासून लहानांपर्यंत चातुर्वर्ण्याची टवाळी तोंडानें नेहमीं करतात. अविंध म्हटला म्हणजे तो जसा गोमांसावर

तुटून पडावयाचा, तसाच चातुर्वर्ण्याचें नांव काढिलें कीं, या नवीन पंथीयांना अगदीं चेव यावयाचा. भाषणांत त्यांची जीभ पाहिजे तशी लवेल, एखादे वेळीं चातुर्वर्ण्याविरुद्ध प्रदर्शन करण्याकरितां सहभोजनांतहि त्यांची जीभ लाळ घोटील, दुसऱ्याची जीभ भाषणें करीत सुटली, म्हणजेहि यांचे दोन्ही-दोन्ही हात जोरजोरानें टाळ्या पिटतील, पण प्रत्यक्ष शरीरसंबंधाची आणि कन्यादानाची वेळ आली म्हणजे मात्र त्याच जिभेची बोबडी वळेल, व तेच हात लुले पडून मागें सरतील. आणि 'हें नको', 'हें नको' अशा खुणा त्यांच्या माना करूं लागतील. या वेळीं दोनच काय, पण ते चतुर्भुजांचें सर्व बळ एकवटून हा प्रसंग दूर लोटतील, अशी या चातुर्वर्ण्याची हिंदुसमाजाला मगरमिठी पडलेली आहे, व त्या कल्पनेंत आणि श्रद्धेंत एक पराकाष्ठेची जादू भरून राहिली आहे. हें असलें चातुर्वर्ण्य जेव्हां महानुभावी महंत शब्दानें, लेखणीनें आणि प्रत्यक्ष कृतीनें नष्ट करूं लागले तेव्हां ती करणी हिंदुसमाजाला असह्य वाटली; व ही करणी करणारांसंबंधीं लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांना द्वेष आणि तिरस्कार वाटूं लागला. या तिरस्काराची तीव्रता इतकी वाढली कीं, तिजपुढें महानुभावांचें मातृभाषाप्रेम, त्यांची अलौकिक ग्रंथरचना, त्यांची मांसाहारपराङ्मुखता, त्यांची अढळ कृष्णभक्ति, यांपैकीं कशाचेंहि कौतुक कोणास राहिलें नाहीं. अजूनहि एखादा मांसभक्षक, हिंदुधर्म सोडून धर्मांतर केलेला कोणी परधर्मी आमच्या सभांना आणि संमेलनाला अध्यक्ष खपेल, व त्याच्या सटरफटर लेखांचें एक वेळ कोणी कौतुकदेखील करील, पण त्याच्यापेक्षां शतपट सुंदर ग्रंथरचना करणारा व आजन्म मद्यमांसापासून अलिप्त राहणारा मानभाव त्या ठिकाणीं खपणार नाहीं. इतकी ही द्वेषाची मुळी खोल गेली आहे. वास्तविक पाहतां ज्यांना चातुर्वर्ण्य नको, जातिभेद नको, ब्राह्मणांचें दर्शनहि नको, त्यांनीं नव्या पंथांच्या खटाटोपांत न पडतां, एकदम महानुभाव-पंथांत शिरून, तो पंथ स्वीकारिल्याबरोबर त्यांचे सर्व हेतु सहज साधण्यासारखे आहेत. पण हें असें केल्याचें आमच्या महाराष्ट्रांत-

तरी कोठें अजून ऐकिवांत नाहीं. याचा अर्थ इतकाच कीं, कोणीहि इसम आमचें चातुर्वर्ण्य टाकून देऊन व धर्महि सोडून बाहेर गेला तरी त्यांचें तें करणें महाराष्ट्र एक वेळ सहन करील; त्याची कींव करून त्याला क्षणभर क्षमाहि करील; व त्याच्याशीं गोडीनें वागेल. पण आमच्यांत राहून आमच्या चातुर्वर्ण्यावर कोणी आघात करील व करण्याचा यत्न करील तर तें मात्र महाराष्ट्राला खपणार नाहीं. अशी या महाराष्ट्र-समाजाची मनोरचना आहे; आणि ही याच्या वर्तनांत तशीच याच्या ग्रंथरचनेंत स्पष्ट दिसून येते. म्हणजे चातुर्वर्ण्यव्यवस्थाबद्ध समाजरचनेवर महाराष्ट्राचें प्रेम फार दृढ आहे. त्या व्यवस्थेंत उद्भवणारे मत्सरद्वेषादि हिणकस विकार महाराष्ट्राला मनापासून नकोत. ते काढून टाकण्याचा यत्न त्याला प्रिय आहे. पण ती कीड काढून टाकल्यावर राहिलेली वर्णव्यवस्था मात्र त्याला पाहिजे आहे. हें एवढें खुलासेवार येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, हें नीट ध्यानांत आणणें ही महाराष्ट्रग्रंथ उकलण्याची एक किल्ली आहे. या ठाणावरून ग्रंथांचें व ग्रंथकारांच्या मतांचें अवलोकन केलें असतां ग्रंथांचा, त्यांच्या लोकप्रियतेच्या व त्यांच्या प्रसाराचा नीट उलगडा होईल. महाराष्ट्राचें मन ममताळू आहे, तें धार्मिक आहे, श्रद्धावान् आहे, स्वाभिमानी आहे. तें कांहींसें भोळेंभाबडेंहि आहे, तें पुराणप्रिय आहे, तें क्षमाशील आहे, तें परधर्मसहिष्णु आहे, दुसऱ्यांच्या धर्मांत किंवा भानगडींत तें बोचकपणा करीत नाहीं. द्वेषाची आवड त्याला मूळची नाहीं. आणि या कारणामुळेंच इतर धर्मासंबंधीं चर्चा करणारे लोकप्रिय ग्रंथ मराठींत नाहींत. मराठी ग्रंथकारांनीं—हिंदु व महानुभाव यांपैकीं कोणींहि—दुसऱ्याच्या निंदेनें भरलेला ग्रंथ रचिला नाहीं व रचिला असल्यास तो लोकप्रिय होऊन राहिला नाहीं, याचेंहि कारण ही मनोवृत्तिच आहे. पण कोणीं त्याचे मनास झोंबणारें असें कृत्य केल्यास महाराष्ट्र त्याचा अव्हेर करतो. अनेक कारणांमुळें महानुभाव लोक व इतर महाराष्ट्र-लोक यांचे मनांत एकमेकांविषयीं प्रथमपासून थोडाफार द्वेषभाव

उत्पन्न झाला, हें खरें आहे. कारणें कांहींहि असोत, पण एके वेळीं द्वेषभाव उत्पन्न झाला आणि तो तसाच पुढें राहिला, हें कबूल करणें भाग आहे. नाहींपेक्षां महाराष्ट्रीयांना जे सर्व तऱ्हांनीं पारखे, हिंदुमात्रानें अत्यंत पूज्य मानलेल्या प्राण्यांचा वध करण्यांत ज्यांना पुण्य वाटतें व जे आपल्या धर्माची तरवारीच्या जोरानें इतरांवर बळजबरी करतात, त्यांच्यापेक्षांहि या लोकांवर महाराष्ट्रीयांचें प्रेम कमी असावें, हें नवल आहे. ज्यांनीं महाराष्ट्र-भाषेंत प्रचंड ग्रंथसंपत्ती निर्माण केली, ज्यांनीं दशावतारांपैकीं (एकाच कां होईना, पण त्या) अवताराचा लौकिक सर्वभर पसरविण्याविषयीं अत्यंत जोराचे करून यत्न केले, ज्यांनीं पंजाबासारख्या सर्वभर मांसाहार जारीनें चालू असणाऱ्या लोकांच्या शहरोंशहरांतील मध्यवस्तींत पूर्णपणें शाकाहारी संघ तयार केले आणि फार परिश्रमानें अनेक ठिकाणीं मठस्थापना केली, त्यांच्याविषयीं एक तऱ्हेचें कौतुक वाटावें, हेंच योग्य आहे. पण कौतुक तर राहिलेंच, नुसती सहानुभूतिहि या पंथांतील लोकांसंबंधीं कोठेंहि फारशी आढळत नाहीं. या महानुभाव-पंथाची स्थापना एका मातंगीशीं रममाण असणाऱ्या विद्वान् ब्राह्मणानें केली, अशी एक आख्यायिका प्रचलित आहे. ही आख्यायिका खरी किंवा खोटी आहे, याचा निर्णय योग्य ठिकाणीं होईलच. पण वादविवादासाठीं क्षणभर ही आख्यायिका आपण खरी धरली तरी काय झालें? ज्यांच्याविषयीं वेळोवेळीं आदर दाखविण्यांत येतो, अशा अनेक ऋषींच्या संबंधानें अशा किंवा याहूनहि कमी दर्जाच्या कुळकथा पुराणांत आहेत.

चाण्डाल, श्वपच व मृतमांस भक्षणाऱ्या व फार हीन दर्जाच्या आणि रानटी संस्कृतीच्या लोकांना अस्पृश्य मानणें हें गैर आहे, असें ज्या काळांत आपणांपैकीं बहुतेक विद्वान् म्हणूं लागले आहेत, त्या या आजच्या काळांत उण्या गोष्टी उकरून काढाव्या व अजाणत्यांच्या मनांत भलत्याच कल्पना वावरूं द्याव्यात, हें केव्हांहि रास्त होणार नाहीं. बरें, या महानुभावी लोकांच्या धर्मग्रंथांत असे कांहीं आचार

सांगितलेले आहेत कीं, जे अत्यंत तिरस्करणीय वाटावे, असें म्हणावें, तर ( मीं पाहिलेल्या यांच्या ग्रंथांवरून असें म्हणूं शकतों कीं, ) तसे कोणतेहि तिरस्करणीय आचार यांत सांगितले नाहींत. कोणी वितंड-वादासाठीं ते आहेत, असें म्हणेल तर त्याच्याशीं वाद न घालतां त्यास इतकेंच विचारणें रास्त होईल कीं, असले आचार ( यदाकदाचित असल्यास ) ते सोडविण्याविषयीं यत्न करणें इष्ट होईल, किंवा त्याच वर्मावर नसते डाग देत बसून इतक्या लोकांस पारखें करणें इष्ट होईल? बहिणाबाईचें कुळ शाक्तपंथी होतें, पण तिलाहि उपदेश देऊन तुकाराम-बुवांनीं तेथून परावृत्त करून आपल्या जवळ करून घेतलें. मग ज्यांना शाक्ताचाराचा अत्यंत तिटकारा, त्यांना आपण जवळ करावें कीं दूर करावें ? ज्यांनीं या पंथाचे धर्मग्रंथ लिहिले ते जाडे विद्वान् होते, संस्कृतांत आणि मराठींत ग्रंथरचना करण्याची त्यांना चांगली ऐपत होती, आपल्या ग्रंथांतून श्रुति, स्मृति आणि उपनिषदें यांतील निवडक वाक्यें त्यांनीं जवळ-जवळ जशींच्या तशींच घेतलेलीं आहेत; बुद्धधर्मांतल्या कल्पनाहि त्यांनीं उचलिल्या आहेत. अशा संस्कृतीचे अनेक विद्वान् लोक कोणचेहि तिरस्करणीय प्रकार मान्य करतील व तसा उपदेश करितील असें केव्हांहि होणार नाहीं, असें साहजिक वाटतें.

महानुभाव लोक अगदीं प्रथम मूर्तिपूजेपासून दूर होते, व मूर्तिपूजेची निंदाहि करीत, हें जरी खरें असलें तरी पुढें-पुढें त्यांनीं मूर्तिपूजा प्रचारांत येऊं दिली. मूर्तिपूजा ही विभूतिपूजेची बहीणच आहे. आणि एकीमागें दुसरी कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें जातेच. महानुभाव-ग्रंथांत विभूतिपूजा तर फारच पसरलेली आहे. अशा स्थितींत विभूति-पूजेमार्फत यांच्यांत मूर्तिपूजा शिरली, हें साहजिकच झालें. हल्लीं या या लोकांच्या पूजेंत श्रीकृष्णाची मूर्ति, शिवलिंगाची पिंडी वगैरे प्रकार पुष्कळ ठिकाणीं आढळतात. पण ते सांगतात कीं, या मूर्ति आम्ही वाटेल त्या दगडाच्या करीत नसून फक्त 'संबंधी' पाषाणाच्या तेवढ्याच करितों. 'संबंधी' पाषाण म्हणजे ज्या स्थळीं श्रीचक्रधर-

स्वामींचा स्पर्शसंबंध किंवा इतर प्रकारचा संबंध घडला होता ते पाषाण होत. अशा 'संबंधी पाषाणमय' मूर्तिच काय, पण जे 'संबंधी' नाहींत अशा पितळी किंवा पत्र्यांचे मुखवटे व मूर्ति यांच्या मंदिरांतील ओट्यांवर व पूजास्थानीं शोभेनिमित्त ठेवण्याचीहि सुरुवात झाली आहे; व त्यांतच पितळी उपकरणांचीहि मांडणी होत आहे. म्हणजे प्रथम दूर झुगारून दिलेली मूर्तिपूजा, एकंदर हिंदुसमाजाच्या मनाच्या वळणाप्रमाणें महानुभाव लोक कोणत्या ना कोणत्या मिषानें आपल्या आचारांत शिरू देऊं लागले आहेत व ती त्यांना हळूहळू आकर्षून चिकटूं पाहत आहे, असें दिसतें.

महानुभाव-पंथांतील लोकांचीं धर्मतत्त्वें हीं आपल्याशीं जुळवून पाहतां दोहोंत फारसें अंतर दिसत नाहीं. परमेश्वर हा निर्गुण, निराकार आहे पण कृपावशें तो साकार होतो; परमेश्वराहून अन्य दैवतें खालच्या पायरीचीं होत, असें ते म्हणतात. माया ही निर्गुणाला सगुणत्व आणते व जीवाला जीवत्व देते म्हणजे जीवाकडून सर्व व्यापार ती करविते, असें ते म्हणतात. या देहांत मनुष्य आपल्या पूर्वकर्मानुसार फळें भोगतो आणि कर्मानुसारच (स्वर्ग, नरक, कर्मभूमि व मोक्ष या) चतुर्विध कर्मफलांस पावतो.

महानुभाव-पंथी लोक दशावतार कबूल करितात, पण हे सर्व अवतार पूर्ण अंशाचे नसून त्यांपैकीं फक्त एकच म्हणजे श्रीकृष्णावतार हाच पूर्ण अवतार झाला, असें ते म्हणतात. म्हणजे परमेश्वराचे सर्व गुण व सर्व अंश फक्त श्रीकृष्णावताराच्या वेळीं एकवट झाले आणि याकरितां तोच एक सर्व प्रकारें अत्यन्त पूज्य आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. हेंच दृष्टान्तानें म्हणावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, सर्व अवतार हे त्याच चंद्राच्या निरनिराळ्या कला खऱ्या, पण त्यांपैकीं एक श्रीकृष्णावतार हीच पूर्णकला अथवा पौर्णिमा होय. हीच गोष्ट आणखी स्पष्ट करून सांगावयाची म्हणजे श्रीकृष्णावतार हा पूर्ण परमेश्वरावतार होय आणि बाकी अवतार हे विष्णूचे अवतार होत. म्हणजे विष्णु

या शब्दानें पूर्ण परमेश्वराचा बोध घ्यावयाचा नसून एक ईश्वरी दैवत, इतकाच बोध घ्यावयाचा व इतर अवतार हे त्या दैवताचे अवतार समजावयाचे, असें या पंथाचें निक्षून म्हणणें आहे.

मला या शब्दांच्या अवडंबरांत फारसा अर्थ दिसत नाहीं, व यासंबंधीं कोणी वितंडवाद करण्याचें कारण कळत नाहीं. प्रत्येक मनुष्याला निरनिराळा मनुष्य पूज्य व भरवशालायक वाटतो, त्यांतलेंच हें आहे. प्रत्येक पंथांतला मनुष्य आपल्या पंथांत आपण ज्यास भजतों तेंच दैवत खरें व त्यापुढें इतर सर्व दैवतें तुच्छ होत, असें म्हणतो. त्यांतलाच हा प्रकार आहे. तेव्हां जोपर्यंत हे लोक इतर देवतांची किंवा साधुपुरुषांची पूजा करण्यास प्रत्यक्ष मनाई करीत नाहींत, तोपर्यंत यांत रागावण्यासारखें कांहीं नाहीं. प्रत्येक दुकानदाराला इतर कोणाहिपेक्षां मी दाखवितों हाच माल श्रेष्ठ, असें ओरडून ओरडून सांगण्याचा हक्क आहे. मात्र तो बजावतांना त्यानें इतरांच्या वाटेस जातां कामा नये.

आतां या पंथातील संतमहंतांविषयीं थोडी माहिती देऊं. या पंथाची मूळ स्थापना श्रीचक्रधरांनीं केली, हें महशूर आहे. चक्रधरस्वामींचा शिष्य नामदेव व त्याचा कवीश्वर; आणि कवीश्वराचा परशुराम. इतक्या पिढ्यांपर्यंत परंपरा एकेक पुरुषाची झाली. परंतु परशुराम यानें कांहीं वैतागामुळें सर्व भानगडींतून व आचार्यपदाच्या व्यवहारांतून आपलें अंग एकदम काढून घेतलें. तेव्हां या पंथाच्या लोकांत थोडेंसें अराजक माजून निरनिराळ्या तेरा जणांची तेरा संस्थानें किंवा स्थानें उभीं राहिलीं. तेरा गाद्या स्थापिल्या गेल्या व या तेरांपैकीं प्रत्येक महंत आपल्याकडे सर्वश्रेष्ठत्वाचा मान घेऊं लागला. या तेरांचीं नांवें येणेंप्रमाणें:—१ कवीश्वर, २ उपाध्ये, ३ पारिमांडल्य, ४ अमृते, ५ मदालस, ६ कुमार, ७ यक्षदेव, ८ दामोदर, ९ हरिदेव, १० जयदेव, ११ शालकर, १२ दिवाकर आणि १३ महेस्वर. म्हणजे या तेरा कुळ्या प्रथम-प्रथम अस्तित्वांत आल्या; व त्यापुढें या प्रत्येक कुळींत जे जे संत, महंत व साधु पिढ्यानुपिढ्या होत गेले, ते सर्व

हींच कुलनांवें ( आम्नाय-नांवें ) लावीत गेले.

यांपैकीं कवीश्वराम्नाय दीक्षित कुळीपैकीं कृष्णमुनि यांनीं या पंथाचा प्रसार पंजाबांत संवत् सोळाशेंच्या सुमारास सुरू केला व तेव्हांपासून हा पंथ पंजाबांत झपाट्यानें पसरला. पंजाबी लोकांची मातृभाषा मराठी नसून केवळ ती आपल्या धर्माची किंवा पंथाची पवित्र भाषा म्हणून तिचा अभ्यास ते करितात; व तींतील अनेक गद्य आणि पद्य ग्रंथ धार्मिक श्रद्धाळूपणानें ते तोंडपाठ करितात. पंजाबी महानुभाव लोक क्वचित् मराठी भाषेंत थोडीफार ग्रंथरचनाहि करितात. या पंजाबांतील पंथप्रसाराचा भाषेच्या दृष्टीनें मराठीवर असा एक परिणाम झालेला दिसतो कीं, हिंदी, व्रज वगैरे अनेक छंद—कीं जे पंजाबी लोकांच्या अगदीं कानवळणीं पडले होते ते—त्यांनीं मराठी रचनेंत नवीन सुरू केले. तसेंच, तिकडील भाषेच्या लकबा व तद्देशीय कल्पनाहि त्यांच्या लिहिण्यांत सहजासहजीं आल्या. पण पंजाबी महानुभावांची ग्रंथरचना तितकी श्रेष्ठ दर्जाची न उतरल्यामुळें या लकबा व कल्पना, त्यांच्या ग्रंथांपलीकडे फारशा न जातां तेथेंच मुरून गेल्या. पण त्यांनीं उपयोगांत

---

१. ' पंजाबी वृद्धाचार ' या ग्रंथांत पुढील अभंग आहे:—

माधवराजाचा वंशी कृष्णराज। पंजाबी आत्मज प्रीय रूप।
पंजाब देशींचा, पंजाबी व्युत्पन्न। चातुर्य लावण्य ज्ञाता थोर॥
प्रज्ञा अति फार, कीर्ति वैभवाचा। पूर्वज आमचा कृष्णराज।
पंजाबीताम्ना पडली तेथून। आधार होऊन बहुतांसी।
तेथोनि पंजाबी येऊं जे लागले। आदि त्यानां झाले कृष्णराज।

कृष्णराज → मुरारमल्ल → राजधर → भास्कर → भानेराज → बल्लाल अशी यांची शिष्यपरंपरा यांत आढळते ( हरिराजबावांची पोथी व टिप्पणी. )

कृष्णराजाचा ' विधिचंद्रशर्मा ' नामक एक शिष्य होता. त्यानें आपल्या एका ग्रंथाचा समाप्तिकाल १६६२ संवत् ( म्हणजे शक १५२७) असा दिला आहे. यावरून कृष्णराजाचा काल अदमासानें काढावयाचा तर तो शके १५०० समजण्यास हरकत नाहीं.

आणिलेले नानाविध छंद मात्र तत्कालीन अनेक ग्रंथकर्त्यांनीं उचलिले, हें महानुभावी ग्रंथांवरून अगदीं स्पष्ट दिसतें.

| बालबोध. | सकळी. | सुंदरी. | पारमांडल्य. |
|---|---|---|---|
| अ | स | अ | त |
| आ | सा | आ | ता |
| इ | षि | उ | दि |
| ई | षी | ऊ | दी |
| उ | ह | इ | य |
| ऊ | हू | ई | थू |
| ऋ | , | ऌ | ळृ |
| ॠ | , | ॡ | ळॄ |
| ऌ | , | ऋ | हृ |
| ॡ | , | ॠ | हॄ |
| ए | , | अे | तं |
| ऐ | , | अै | तँ |
| ओ | सो | ए | तां |
| औ | सौ | ऐ | तां |
| अं | सं | अं | ते |
| अः | सः | अः | तः |
| क | य | न | १ |
| ख | र | य | V |
| ग | ळ | ज | ६ |
| घ | व | ह | २ |
| ङ | ० | ० | ० |
| च | प | झ | ० |
| छ | फ | ब | ० |

| बालबोध. | सकळी. | सुंदरी. | पारमांडल्य. |
|---|---|---|---|
| ट | त | ठ | ३ |
| ठ | थ | ट | ४ |
| ड | द | ढ | ५ |
| ढ | ध | ळ | ६ |
| ण | , | ष | न |
| त | ट | स | व |
| थ | ठ | छ | श्र |
| द | ड | ग | त्र |
| ध | ढ | भ | अ |
| न | , | ञ | ल |
| प | च | क | ८ |
| फ | छ | घ | द |
| ब | ज | श | ७ |
| भ | झ | ध | ९ |
| म | ञ | व | ट |
| य | क | र | ढ |
| र | श्र | य | ळ |
| ल | ग | च | ह |
| व | ध | म | स |
| श | , | द | ज |
| ष | , | ल | ब |
| स | म | त | × |
| ह | इ | ण | भ |

| बालबोध. | सकळी. | सुंदरी | पारमांडल्य. | बालबोध. | सकळी. | सुंदरी. | पारमांडल्य. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ज | ब | प | ८ | ळ | ल | ड | म |
| झ | भ | फ | रु | क्ष | उ | ज्ञ | झ |
| ञ | , | , | , | ज्ञ | , | क्ष | न |

वरील खुणांमध्यें महानुभावी अक्षरांवर डोक्यावर रेघ आहे. पण मूळ पोथ्यांत ही रेघ नसते. टैपांच्या सोयीकरितां रेघेचे टैप घातले आहेत. पारमांडल्य लिपींत ग, घ, झ या अक्षरांच्या खुणा येथें टैपाच्या अभावीं नीट दिल्या नाहींत. क, ख, ज या अक्षरांच्या खुणा वर दर्शविल्या आहेत तशाच जवळजवळ आहेत; बाकी खुणा नीट बरोबर आहेत. चौकस चिकित्सकांचे सोयीकरितां सकळी, सुंदर, पारमांडल्य, कवीश्वरी, अंक व शिरलिपी यांचे देवनागरी लिपींतील उतारे देतों; व त्या उताऱ्यांच्या मूळ पोथ्यांतील पानांचे ब्लॉक देतों. म्हणजे या उताऱ्यांच्या साह्यानें त्या त्या लिपीचा ब्लॉक वाचून स्वतःकरितां मोड ऊर्फ संकेत-खुणा चौकस जिज्ञासूंना सहज बसवितां येतील.

## सकळी लिपीचा उतारा

सर्वज्ञें भणितलें : अनंत शक्ति : परमेश्वरु : सकळांसींही निश्चयें व्यवस्था करिति : ॥ ० ॥ गावां हस्ती आला तै जात्यंध हस्तीतें पाहों गेले : एकें पावो देखिला : एकें सोंड देखिली : एकें कानू देखिला : एकें पाठी देखिली : एकें पोटु देखिलें : एकें पुंस देखिलें : मग एकुमेकेंसीं संवादति : हा रे तुंवां हस्ती देखिला : पावो देखिला तो भणे हस्ती खांबा सारिखा : ॥ : सोंड देखिली तो भणे हस्ती मुसळा सारिखा : कानु देखिला तो भण हस्ती सूंपा सारिखा : । पाठी देखिली तो भणे हस्ती भिंती सारिखा : । : पोट देखिलें तो भणे हस्ती कोथळेया सारिखा : । : पुंस देखिलें तो भणे हस्ती खराटेंया सारिखा : । : ऐसें एकोमेका उरोधीति : तेयां : मर्ध्यें डोळसू असे : । : तो भणे हा

हस्तीचा एकेकू अवयेवू होये : पर : हस्ती नोहे : एसां अवयेंवी युक्त तो हस्ती : ॥ : तैसे जेयांसी जे शक्ति प्रकाशली असे तो तिये शक्तितें : परमेश्वरु : भणे : ज्ञानिया असे तो भणे हे ईश्वराची एकेंकी शक्ति होय : पर : परमेश्वरु : नोहे : ऐस शक्तियुक्त तो : परमेश्वरु : ॥ ४३ ॥

## सुंदरी लिपीचा उतारा

॥ ॥ श्री चक्र धराये नम : ॥ ॥ श्री पंच कृष्णा–
ये नम : ॥ ॥ ज्ञानभक्ति वैराग्य अेकु मोचकु अे–
कु अमोचकु : अेसा त्रिविध बोधु : ते अन्य
व्यावृत्ति : भागजे ॥ १ ॥ सृष्टीमध्ये जेतुकें : जोव : करी : ते-
तुकेंनि काइसेन हीं न मुंचे अेक वांचौनि : भणऔनि : सृ-
ष्टी मध्यें : परमेश्वर : अशेषां : जीवांते : जाणवी : परि : तयांसि परमेश्वरीं
मोहरू नाहीं : भणऔनि : परमेश्वरांतें : कव्हणी चि नेनेति ॥ २ ॥
जीव : अज्ञानें अन्येथा ज्ञानें : परमेश्वर : दास्य : भणऔनि : जीव : जीवाचें
दास्य : आन : जडा पार्थिवाचें दास्य करी : तेणें : जीवांसि :
मोचक नव्हे : ॥ ३ ॥ नित्य [क] नैमित्तक काम्य : निषे—
ध असें चतुर्विध कर्म

## पारिमाण्डल्य लिपीचा उतारा

फोटोच्या शिरोभागींची ओळ कातरलेली असून दुसऱ्या ओळींत मागील अन्वय संपूर्ण झाला आहे; म्हणून तिसऱ्या ओळीपासून रूपांतर देतों.

अथ पूर्वान्वयो : तेन्हे पूर्णावतारे : जीव : स्थाना सि
हांव लोकणें अवलोकीलें : तवं : जीव : अधोमुख होत सां-
ते अधरि चि आपेक्षीत असति : मग : भणतिलें : यांचें भविष्य अ-
से ते हो : भणऔनि : प्रयोजक द्वारें सृष्टी व्यापार
तेन परंपरा दयाद्वारें : जीव स्थान शक्ती ते चेष्टवी-
लें : कां पां : तीसि जीवु : वसअसति : भणऔनि : येथ बांधिकारा
चा : दृष्टान्तः अंशत्वें जाणावाः तो कैसा : बंदिस्थाणी मुख्यां

तुल्याचा : जीवो : धरण व्यापारू : जीवो : धरुणि आदर-
ला : परि : उधरण व्यापरू न चले चि : भणऔनि : हे : जीवो : धरि
ले मेळा तदस्थानी : जीव पंचनगर स्थाणि जयांचे बंदी

## कवीश्वरी अंकलिपी

जाडी घेआ : मग : धेति ॥ ⊙ ॥ १५ ॥ चांगदेवो भट्टां खेळों जा म्हणें॥ सर्वज्ञ : उदियांचा पाहारू अेकु चालति : मग : वसतिचा गावीं राहजति : विहरना बोजें करीति : आसनु : होअे : चांगदेवो भट्टानें म्हनति : बटिका खेळोंजा : रामे : हे लीळा सिंगनापुरीं ॥ १६ ॥ वांकिअे पांडेश्वरीं वसति ॥ १७ ॥ धुगावी ऊर्वेश्वरीं वसति ॥ १८ ॥ तळवेली लिंगाचां देउळीं वसति ॥ १९ ॥ खैराळां उपाहानह त्यागु : ॥ : सर्वज्ञ: खैराळे आ बीजे केले : तवं साळेचा कवसु देखिला : सर्वज्ञे : उपाहनौ : फेडिलिया : सर्वज्ञें भणतिलें बटिका हे

घेआ : परमेश्वर : पुरः करा नमस्कारू : आपण दोहीं : श्रीकरे नमस्करिलें आणि चांगदेवो भट्टींहीं जअेकेंले : सर्वज्ञें भणतिलें : बटिका येथौनि जैसे कीजैल तैसेचि तुम्हीं कराल : हे : परमेश्वर पुर कैसें एथ श्रीप्रभु राज्य करीतु असति घाला २ : दंडवत : तेहीं : दंडवने : घातीलि : मग : श्रीप्रभुचा महिमा निरूपीत २ बीजेकरितु भणती

बटिका हें देखिलें : परमेश्वर : पुरः साळेचा

## शिरलिपीचा उतारा

कातरलेली ओळ सोडून दुसऱ्या ओळीपासून देतों. फोटो घेतलेल्या पानावर चुका फार आहेत; म्हणून प्रथमतः फोटोप्रमाणें रूपांतर देऊन त्याखालीं त्याचा शुद्ध पाठहि देतों.

धा मुरव्या तुल्या अंशा : रश्मि : अनुभू
मुल्या अचित्या : करुणा सप्तधा तु-
ल्या : जीउ : स्थान शक्ती पासौनि : न्ब

शा अचित्या : विश्वरूपा पासु
त पर्यंत बहुधा रश्मि शक्ति : तर :
काई काळें उपायें न नसे वज्रगिरी
बधा : भणजे : उंचे ची नीच नव्हे नी[1]



---

१. वर फोटो-ब्लॉकचा उतारा दिला आहे. परंतु ज्या पोथीवरून हा फोटो घेतला त्या पोथीचे मजकुरांत चुका आहेत. अर्थात् या चुका ब्लॉक-मध्यें व उताऱ्यामध्येंहि आल्या आहेत. याकरितां चुका दुरुस्त करून याचा शुद्ध व पूर्ण पाठ पुढें देतों.

पूर्ण शुद्ध पाठ:–धाः मुख्या तुल्या अंशा रश्मि मुख्यानुभूति : यांचा त्रिविधार्थु : मुख्या अचित्या करुणां सप्तधा : तुल्या जीऊं स्थान शक्ति पासौनि : अंशा अचित्या विश्वरूपा पासौनि मृत्तिकापर्यंत : बहुधा रश्मि शक्ती : तर कांई काळें उपाउें न नसे : वज्रगिरी सोपानवतां बद्धां : भणज उंचेची नीच नव्हे नीचेची उच्च नव्हे :

# महानुभाव आद्यग्रंथ



बाराव्या शतकामध्यें व कदाचित् त्या कालाच्या पूर्वींपासूनच महाराष्ट्रांत अनेक पंथ पसरलेले होते. वैदिक, बौद्ध, जैन, नाथसंप्रदाय, शांकरसंप्रदाय, कंथडी पंथ, जंगमजोगी, विष्णुस्वामी, वैष्णव, शाक्त, गाणपत्य, कलंकमार्गी, विठ्ठल, महानुभाव हे सर्व लोक आपापल्या मतांचा व पंथांचा प्रसार करूं पाहत होते; व यांपैकीं पुष्कळ असंकृतज्ञ अशा पुरुषांमध्यें व स्त्रियांमध्यें आपल्या पंथाचा शिरकाव करूं पाहत होते. कित्येकांनींतर ब्राह्मणवर्णापेक्षां ब्राह्मणेतर वर्णांतच आपलें कार्य विशेष झपाट्यानें चालविलें होतें. तेव्हां या काळीं यांपैकीं बहुतेक पंथांसंबंधींचे ग्रंथ मराठी भाषेंत निर्माण झाले असले पाहिजेत. परंतु यांपैकीं बहुतेकांचा पत्ता अद्याप आपणांस लागला नाहीं. महानुभाव पंथांतील ग्रंथसंपत्तीचा मात्र थोडाफार शोध लागत आहे. या पंथाचा प्रवर्तक श्रीचक्रधर हा होय. यानें आपल्या उत्तर-वयांत हा नवीन पंथ काढला व कांहीं वर्षें या आपल्या पंथाचा प्रसार करून हा शके ११९४-चे सुमारास बदरिकाश्रमीं निघून गेला. यानंतर पुढें तो या प्रांतांत आला नाहीं. त्यानें तिकडेच देहत्याग केला असावा, हें उघड आहे.

आपल्या पंथाचा उपदेश चक्रधरानें शिष्यवर्गास मराठी भाषेंत केला. यामुळें या पंथांतील बहुतेक सर्व ग्रंथांची रचना मराठी भाषेंतच झाली. श्रीचक्रधरांनीं प्रत्यक्ष रचिलेला असा एकहि ग्रंथ नाहीं. पण यांचीं 'आचार्य-सूत्रें' आहेत. ज्यांत हीं ग्रथित केली आहेत त्या ग्रंथाला 'सिद्धांतसूत्रपाठ' असें म्हणतात. श्रीचक्रधर-स्वामींच्या मुखांतून वेळोवेळीं जीं वाक्यें निघालीं तीं जशींच्या तशींच त्यांचे शिष्य महींद्रभट यांनीं लिहून ठेविलीं; व त्यांतून केशवराज सूरी या पुरुषानें कांहीं सूत्रें निवडून त्यांची स्वतंत्र ग्रंथबद्ध बांधणी केली. अशीं जमविलेलीं सूत्रमय वाक्यें ऊर्फ सूत्रें, या 'सिद्धांतसूत्रपाठां'त आहेत. हीं पूर्ण भक्तीनें सर्व

महानुभावपंथी लोक नित्य वाचतात. त्यांत एका शब्दाचा, अक्षराचा किंवा कान्हामात्रेचाहि बदल होऊं न देण्याविषयीं ते फार जपतात. ही आचार्य चक्रधरांची 'संहिता' त्यांनीं फार काळजीपूर्वक जशीच्या तशी संभाळली आहे. महानुभावी पंथाचा हा आदिग्रंथ .आहे. त्या पंथाचा हा मूळ पाया असून त्यापुढील सर्व धर्मग्रंथांची उभारणी या 'सूत्रपाठा'वर केलेली आहे. यांत एकंदर 'सोळाशें-नऊ' (१६०९) सूत्रें आहेत. या सूत्रपाठाचे अकरा भाग पाडले आहेत. त्यांचीं नांवें (१) अन्य व्यावृत्ती (२) युगधर्म (३) विद्यामार्ग (४) संहार (५) संसरण (६) महावाक्य (७) निर्वचन (८) उद्धरण (९) अस्तिपरि(१०) आचार व आचारमालिका आणि (११) विचार व विचारमालिका. यांच्याच तोडीचें 'दृष्टान्त' म्हणून आणखी एक बारावें प्रकरण आहे. याशिवाय 'पूर्वी' व 'पंचकृष्ण' अशीं दोन प्रकरणें आहेत. पण त्यांवर भाष्य नाहीं, सबब तीं न गणतां वरीलप्रमाणें बारा प्रकरणें गणतात. यांपैकीं 'आचार' प्रकरणाचीं 'प्रारंभसूत्रें' किंवा 'वचनें' येणेंप्रमाणें आहेत.

"स्वदेशु संबंधू त्याज्य : स्वग्रामु संबंधू त्याज्य : संबंधीं यांचां संबंधू : तो विशेषता त्याज्य ॥ १ ॥ संबंधीं अधिकारू नाहीं ॥ २ ॥ संबंधीं विकारू: विकारीं रसू : रसीं अभिमुखू : सेवा निवृत्ती ॥ ३ ॥ नावड तूं नावड तूं सेवी : तें चीं आवडौनि ठाकें : मग सांडिता हीं न संडे ॥ ४ ॥ ऐसा विषो बापुडा : जो सेवीतु सांतां । आपुलेया मोहरां न करी ॥ ५ ॥ विषयो संबंधू मात्रें : जोवू कांइं गा जातू असें : परि सेवोतु सांतां : तिए एकीं गडदरां घालीं : जेथ कांईसेनि हीं : उसंतु नाहीं ॥ ६ ॥ पुरुषू : जेतुलि जेतुलीं : विषय सेवा करी : तेतुल तेतुलां : धर्मीं निबळू जाणे ॥ ७ ॥ बाई पापु तरि नव्हे : परि धर्मा पासौनि : ऐसां निर्पाणि काढी : ॥ ८ ॥ स्त्री भणजे मत्तद्रव्यांचा राऊगा : आणिकें द्रव्यें : सेविलेआं माजवीति : स्त्री दर्शनुमात्रेंची माजवी ॥ ९ ॥ चित्रीचो हो स्त्री न पाहावी ॥ १० ॥ जिअें चा अेकू अवअेऊ : देखिलेआं : अलगाचिआं मुनें वरि घाली : पाठीं मरणांवरी : सर्वांबें देखें : परी आडपालऊ : ऊडऊनि जाअें : कां माजवितें : तें नाहीं ॥ ११ ॥ स्त्री दर्शनें माजवी : द्रव्यु अस्तित्वेंची । माजवी ॥ १२ ॥ जेणें संबंधें

विकारूं : उपजे : तेयांचा असंबंधू कीजे ।। १३ ।। विषयांची ॲं : ॲकासनीं : न बैसावें ।। १४ ।। विषयां साक्षी : न ठकावें ।। १५ ।। कोमल ज्ञानीं विषो विघ्नू ।। १६ ।। नव वीरूं आति : परि विषय वीरू नाति ।। १७ ।। धर्मनष्ट आति : परि विषय नष्ट नाति ।। १८ ।। पुरुषू जंवं जंवूं पळे : तंवं तंवूं विषो पाठीं लागे : पुरुषू जंवं जंवूं पाठीं लागें : तंवं तंवूं विषों पळें ।। १९ ।। तुष्टुलां जनूं : तरि विषो : संपादैलू : रूसैला तरीं : आणां घतैलु : भणऊनि : उभअेतां जनूं संबंधु त्याज्य ।। २० ।।

हीं श्रीचक्रधराच्या तोंडचीं वाक्यें महींद्रभटानें लिहून ठेविलीं, असें म्हटलें आहे. महींद्रभट हा सारोळा येथील एका श्रीमंत व विद्वान् ब्राह्मणाचा मुलगा. याची मुंज झाल्यावर याला याच्या मामाजवळ बापानें विद्याभ्यासासाठीं ठेविलें होतें. याच्या मामाचें नांव पंडित गणपति आपेया. कांहीं वर्षे विद्याभ्यास करून हा चांगला पंडित झाला. तेव्हां याची तीव्र बुद्धि पाहून गणपति आपया पंडितानें आपली कन्या देआंबा यास देऊन याचें लग्न करून दिलें व हा एकीकडून भाचा आणि एकीकडून जांवई झाला. विवाहानंतर हा दक्षिण-देशांत जाऊन राहिला व तेथून अनेक सभा जिंकून जयपत्रें मिळवीत हा स्वदेशीं परत आला. या वेळीं त्याला इतका अभिमान झाला कीं, तो दिवसां दिवटया उजळून चाले. 'आकाशांत प्रभाकर सूर्य व पृथ्वीवर मी विद्यासूर्य' असें तो म्हणे. हा त्याचा गर्व पाहून त्याच्या मामानें त्यास आपणाबरोबर देगांवीं[1] नेलें. तेथें जात असतां वाटेंत चक्रधराची व त्याची गांठ पडली. भेट झाल्यावर चक्रधराशीं त्यानें वाद केला. वादांत महींद्रभटाचा पराजय होऊन तो निरुत्तर झाला. तेव्हां त्यानें चक्रधराचे पाय धरले व त्याची उपदेशदीक्षा घेऊन तो त्याचे सन्निध राहूं लागला. पुढें या महींद्रभटानें आपल्या गुरूचें म्हणजे श्रीचक्रधराचें जीवनवृत्त लिहून काढलें. या जीवनचरित्रांत त्यानें आपल्या गुरूच्या अनेक गोष्टींचीं वर्णनें व कथा लिहिल्या आहेत. या कथांसच तो 'लीला' असें म्हणतो. आणि या चरित्रास त्यानें

---

१. या वेळीं देवगिरीकर जाधवांची कारभारी–कचेरी येथें असे.

'लीलाचरित्रे' असें नांव दिलें आहे. या चरित्रांत एकंदर १५०९ 'लीला' किंवा 'कथा' आल्या आहेत. या 'लीलाचरित्र' ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. यांपैकीं पूर्वार्धांतून एक लीला देतों. ( लीला ७२५-वी )

" सविता नागनाथी वस्ती ॥ इंद्रभट राज्यांतर शोधवणें प्रवेषू ॥ मग सर्वज्ञांस उदेयांचा पूजावसरू जालेयां अंनतरें : तैसेंचि विळिचेया पाहारां संवीतेयांसि निगालें : माहादेव पाटक गावां गेले : गोसावी : संवीतेया : बीजें केलें : ॥ तेथ गावांपश्चिमें नैरुत्य आश्राइत वीस्तीर्ण : पूर्वामुख नागनाथाची जगती : मंडपा तीन दारवठें : पूर्वीला दारवठां जगती आंतु साजें : मंडपासि भवंतीआं पवळी : ॥ छ ॥ तेथचौकीं : आसन : तंवं बाइसीं : इंद्रभट्टातें तेल आणु पाठवीलें : मग सर्वज्ञे माघौतें बाहीरि बीजें केलें : जगतीचेया दारवठाचिए उत्तरोली सोंडीएवरी : बाहिरि आसन : तथा उभे असेति ॥ छ ॥ तंवं इंद्रभट्ट तेल् घेवौनि आले : सर्वज्ञें भणीतिलें 'इंद्रे ॐ गावांतु वार्ता काई मातु' : 'जी कांहीं नाहीं जी' : सर्वज्ञें भणीतिलें 'वार्ता कैसी यां कांहीं नाहीं ? राज्यांतरू जालें : रामदेवो रावो राज्यीं बैसला : आमणदेवो खालि उतरीला : देवगीरि पालटीली ॥ तथा हा नव्हे लोकु पळतु असें : ॥ हा होए : जा वार्त्ता शोधा : तुमचे ए गावीं सोइरे असति : आनवार्त्ता कैसी नाहीं ॥ कैसें कांहीं नाहीं : एसणें राज्यांतर जालें : आमनदेयाचे डोळे काढीले : रामदेवो राजीं बैसला : ए नव्हें कीं : घायालें जातें असेति' : भणौनि सर्वज्ञें तया खाटारें श्रीकरें दाखवीलें : सर्वज्ञें भणितलें : 'एक वेळ शोधा पां जा' : ॥ छ ॥ हो कां जी भणौनि इंद्रभट मागुते गेले : शोधिले : एवोनि सर्वज्ञांपुढें सांघीतिलें : 'साच जी : हें काई हो अपूर्व' : तेही भणितलें : ह्राति सेहाणी मारिला : पाट्सेहाणीं भेदिला नरसिंह देउ॰ पळाला : आमण देआचे डोळे काढिले : रामदेऊ राउ॰ राजीं बैसला :

---

२. या 'लीलाचरित्राला'च कोणी 'लीलासंवाद' अथवा 'लीलासमुद्र' असें म्हणतात. पण हीं नांवें चुकीचीं आहेत. यांपैकीं कोणत्याहि नांवाचा ग्रंथ महानुभाववाङ्मयांत नाहीं, असें पट्टाधिष्ठित पातुरकर आणि श्री पाचरावूत महंत महानुभाव कळवितात. ( त्यांचें पत्र ).

अंसे शोधौनु आले : सर्वज्ञा पुढारां सविवरू सांघितलें : तंव लोकु घरां वेंधौनि पाहात असें : मग गोसावी देउळां तु बीजें केलें ॥ १२ ॥

( पोथीलेखन शक १५४४ )

चक्रधराचें चरित्र वर्णन केलें असल्यामुळें महींद्रभटाच्या ग्रंथाला एक तऱ्हेचा विशेष मान आहे हें खरें; पण ग्रंथकार या दृष्टीनें पाहतां महींद्रभटापेक्षांहि भास्कराचार्यांचे ग्रंथ श्रेष्ठ आहेत. हा भास्कराचार्य जसा सर्वांत श्रेष्ठ तसाच सर्वांत जुना ग्रंथकार आहे. या भास्कराचार्यालाच महानुभावपंथी लेखक कवीश्वराचार्य व भानुभट असें म्हणतात. याचा जन्म कासारबोरी ( निझाम इलाखा ) येथें झाला. याच्या बापाचें नांव अनंताचार्य. याचें शिक्षण पैठण एथें झालें; व पुढें हा काशीस गेला. तेथून परत येत असतां सरकारी अधिकाऱ्यांनीं यास उज्जनी येथें कारागृहवासांत ठेविलें. तेथून श्रीचक्रधराचे कृपेनें त्याची सुटका झाली; व मग यानें चक्रधराचें शिष्यत्व ग्रहण केलें. हा फार रूपवान् व बुद्धिमान् होता. असें सांगतात कीं, लिंबू वर उडवावें व तें खालीं येऊन झेलण्यापूर्वींच यानें नवा श्लोक रचून द्यावा. अशी याच्या बुद्धीची तीव्रता होती. नागदेवाचार्य हा याचा गुरुबंधु होता. या नागदेवाची नात, महेश्वराची कन्या एक नागांबा नांवाची होती. ही रिक्तहस्त म्हणजे विधवा झाली असतां हीस नागदेवाचार्याजवळ धर्मकथा श्रवण करण्यास ठेविली होती. पुढें हीहि फार उत्तम ज्ञानी झाली; व नंतर हिच्या आजानें म्हणजे नागदेवाचार्यानें हीस भास्कराचार्याकडून उपदेशदीक्षा देवविली.

या भास्कराचार्यानें जे ग्रंथ लिहिले आहेत ते सर्व चांगल्यापैकीं आहेत. त्यांपैकीं ' शिशुपालवध ' हा ग्रंथ त्यानें प्रथम लिहिला. याच्या १०८७ ओव्या आहेत. हा ग्रंथ रचिल्यावर त्यानें आपला गुरुबंधु जो **भावे देवव्यास** त्यास तो वाचून दाखविला. त्यानें तो ग्रंथ ऐकून भास्करास म्हटलें, " भट्टो, हा ग्रंथू निका जाला असे : परि निवृत्ताजोगा नव्हेचि : हा शृंगारियां प्रवृत्तांजोगा जाला असे. " तेव्हां तें ऐकून

यानें मग ' एकादशटीका ' लिहिली.

' शिशुपाळवध ' हा ग्रंथ खरोखरीच रसाळ आहे. शिशुपाळवधांत प्रारंभींच भास्कर म्हणतो,

" देखौनि महाकवींचा पंथू : मज होतसे मनोरथू : वर्णावेया यादवनाथू : श्रीकृष्णरावो ॥ मज नाहीं मतीचा वीकासू : केवीं वानू राणा परेशु : पर जीवा होतसे उल्हासू : स्तुती लागी ॥ साहित्याचेनि परिमळें : शृंगारचेनि मेळें : प्रबंध होती मातावळें : कविजनांचें ॥ येथें नाहीं नवल : वानितां परब्रह्म केवळ : कैसे दिसती बोल रसाळ : ते आइकावे ॥ मोतियांचे घोसे : राविले कुंकुमांचेनि रसें : तऱ्ही न येती करूं सरिसे : प्रबंधेसीं ॥ पातां प्रमेयांची गोडो : अमृताची उपजे नावडी : साखरेची कीजे कुरोंडी : कवितेसी ॥ साहित्याचिये सेजे : बोलाचा रंगू उपलविजे : तैसें काव्य कीजे : म्हणें कवो भास्करू ॥ साहित्याचिया खेडकुळिया : सुदेशिया बोलांचिया चिपुळिया : सिंपणे खेळती सावळीया : रसवृत्तीसी ॥ पुनवाचा रसाळा : गर्व सांडवीन कोकिळां : कलहंसा अवकळा : करीन मी ॥ ...... ' शिशुपाळ वधी कथा ' : जे भक्तिरसाची त्रिपथा : कीं सोनवें कैवल्यपथा : पाजळीसे ॥ कीं मुक्तिवनितेची दूतिका : ज्ञानांजनाची शलाका : कीं कैवल्य मदिराची पताका : झळाळितुसे ॥ ना तरी शांतिरसें सिंपितां : सासिन्नली ज्ञानलता : कीं विवेकाची सौभाग्यदेवता : मूर्त जाहली ॥ कीं प्रबोध वसंतीची कोकिळा: जीव चकोर संजीवनी चंद्रकळा : की निभाळेंवाटेची विश्रांतशाळा : आर्त जना लागीं ॥ ३३ ॥

याप्रमाणें मोठया आत्मविश्वासानें आपल्या ग्रंथास सुरुवात करून कवीनें कथानिरूपण करण्यास प्रारंभ केला आहे. पुढें कवि लिहितो कीं, कोणें एके वेळीं श्रीकृष्ण रुक्मिणीचे राउळीं महालांत गेले. तेव्हां ती रुसलेली होती. पण तेथें कृष्ण येतांचः—

चाउली पडली अंतःकरणी : तंव म्हणे रुक्मिणी : हा गे कवण आंगणी : चाहाळ काइसा ॥ तंवं सावासिणीं म्हणितलें : अवो अवो गोसावी आले : तंवं सखिजनीं उठविलें : झडकरुनि ॥ वालिपीचिआं बोली : पाइचीं नुपुरें

पांगुरविलीं : येरी कानीयां ठेली : वैदर्भी ते ।। चांदिणिया पासौनि कोंवळा :
मृणालसुतांचा पासवडा घातला : तेथ एकीकडे बैसला : यादव राॐ ।।
पाय घुणें लीलावती : वारा घाली कमळावती : तंवं उठवी प्रबोधवती :
भीमकीयेतें ।। " अैसे काइसे वो निर्दाळपण : सर; तुझें नवे कारण :" सामान
खेॐ राउळ आपण : बैसले असती ।। काह्या हाणताती करतळें : कायिसे
घाटे राऊळ काढले : कांहीं जाणशी ना " ।। तंवं म्हणे कमळावती :
"सांडौनी सत्यभामा पढयंती : येथ आलेया मान किती : वाढिन्नला ।। "
येरी म्हणे " जर तियेचा अनुरागु : तर येथ आलेया कवण उपेगु : आवडी-
वीण संभोगु विरसू होए ...।।" तंवं बोलिले दैत्यविभांडें : " आतां उशीर
होईल अपाडें : तरी याही आपुलिये चाडे : वावरूं नये ।। " येणें बोलें
सणानिली : तंव कें बैठी ठेली : जैशी शृंगाराची दाटी उठिली : मदनमंत्रें।।
लावण्य सरोवरीं : जेवी कमळाचें पातें थरारी : तेवी अधर कांपे भारी :
प्रणयकोपाचा ।। अनंगें वागरु चोरिली : ना तरी शृंगारें खिळणी बांधिली :
तेवी गांठी घातली : भ्रूल्लतांशी ।। आपुलेनि सिहाणपणें : आंगिचे सात्त्विक
लपाऊं जाणें : पुन : चोळी ताणताये जेणें : तो भाव लपेना ।। तेवेळीं
स्मितमुखी हासिन्नली : कामकळिकेशीं टाळी घातली : तंवं वैदर्भिया बोभा-
विली : सावासिनीते ।। " ऐसें काइसे वो हांसे : जे पुढलाचिया जीवा रुसे :
जवळिकें घेती सासे : वायाविण ।। ... आपुलें मन चोखडें : हें दावावें
जगापुढें : येरवी एवढी चाढ न पडे : कोणाची कीरूं " ।। तंव देव म्हणतो
" साच कीं : पुन कुडें केलें आम्हींच कीं : जे सळी पडिली वायांचि :
आपणेया आपण ।। आम्हां विषयाचा विटाळु सदा : कहीं न विसंबो ब्रह्मपदा
पर पडिलों फांदा : बहुत दिसां ।। स्वयंवरा आली उर्वशी : ती मागौती
धाडिली सायासी : कीं बुद्धि ठेली कैसी : जे हेचि वरावी ।। सुदैवें ब्राह्मणें :
बोक चढविलें वायांविणें : शेवटीं एकेहि गुणें : भुंजो न ये ।। ते ब्राह्मण एक
सांबडे : मानुषातें नेणें पुढें : येरवी अैसीं माकडें : आम्हां कां लागती " ।।
तंव भीमकी म्हणे " पहा ! हो पहा !! याचें बोलणें : मातें माकुडें केलें
येणें : या आपुली से नाहीं ।। हा वाढिन्नला गोकुळीं : म्हण कोण्हीं लेकी
नेदी आपुली : तेया 'उर्वशी स्वयंवरें आली ': म्हणतां लाज नाहीं ।। ताक
बिकितिया गौळणी : देजा वैकुंठ मानी : ऐसाही याची नेसवणी : कन्हणी

ने घे : तुजवेनि कवणें बोलें : आंगां आठवरपण आले : ते वेळीं नंदें लग्न लाविलें : तुळसीशीं ।। सेंवटीं तेणें झाडे काई होये : आपुलिया अवसान भुंजो न ये : ते वेळें गगनां हिंडता पाहे : गोळणीतें ।। या कूळ ना जाती : रूप ना संपत्ती : गाई राखेया परौतीं : आंगवण नाही ।। अैसेया अवघेया जाणता : गोत्रा कुटुंबा वारिता : कैसी कासोटेकारा भगवंता : वग्पडी जाहली ये वो ।। विचारौनि पातां : मिहाणा नाहीं दादोपरौता : किती मोडा केला या देनां : माझेनि लोभें ।।" तंव म्हणे हृषीकेषी : "हा ठावो वेन्ही तूं त्या पढियेशीं : तरी थोर चुकलीशी : तोचि वरावा ना कां : आम्ही कासोटेकार भिकारी : राजकुमरु तूं सुंदरी : दोघे नांदतां सेजारी : निकीं भासतां कीं ।।" तंव भीमकिया म्हणितलें : 'हें इया काई वो जालें : कैसी बोलताहे गरळें : काळकुटाची ।।' ... तंव देव तवकैले : मचेयावरुनी उठिले : कंठासिकां धरिले : निगत निगतां ।। तव रतिरसिकां म्हणितलें : अवो 'अवो मानबग्ळें : गोसावी निगाले वहिलें : गोसिये बुझावी तूं ' ।। तंवं बोलिलें : वैदर्भिया : 'जा तुम्ही एकी धापसिया : तुम्हां लागलिया गोमाशिया : तरी वारा जा ।। तंव भीमकी बोले आवेशो : सर तूंही एकी धापसी : नेणो तुज जोडला सायासी : तर खडाये जाये ।।' ... ते वेळीं ते नायका : म्हणे 'अवो याचिया कवतिका : मी या पायां लागेकां : काइसया लागीं ?' तंवं म्हणे रुमोदहांसिनी : 'नाहीं तुझेनि पाडे सिहाणी : हे चोळी गेली उतरौनि : तेव्हळीच जाणितलें मियां ।। कंपु लपविशी आंगिचा : स्वेदु पुसिसी कपोळिचा : अैसा ही भावो उचंबळला मनींचा : त्या तूं काई करिसी !!। सखियेचिया बोलां वर्मेली : ते वैदर्भीची बाळी : मग पायां लागली : प्राणेश्वराचेया ।। पढियंती पायां पडे : तेथ रसिकु शृंगारीं बुडे : पुण तो आत्मारामु म्हणौनि न पडे : तिये विळसा ।।

या प्रेमकलहाचा गोड शेवट सांगितल्यानंतर भास्कर कवीनें पुढील अनेक विलासांचीं वर्णनेंहि सुरेख केलीं आहेत. त्यानंतर क्रीडार्थ केलेल्या उपवनांत वसंतकाळीं मनुष्यांनाच काय, पण पशुपक्ष्यांना व वृक्षवेलींनाहि उन्माद येऊन, तेथलें 'जग पिसें जाहलें, व ते वृक्ष मदनाचा माज चढून 'पुष्पपरागांनीं धुळवाडी खेळूं लागले' हें सरस वर्णन आलें

आहे. यापुढें एका 'सरोवरा भंवताळीं। साणें केतकीची ताटी घातली' आहे आणि वर परागांचा मनोहर मांडव दिला आहे अशा कांठावर आपली झिरझिरीत वस्त्रें ठेवून त्या विलासिनी 'देव्हडिया वेणिया खोंविलिया। रुळतियां निरियां आखुडलिया। पोफळ गांठीं सेले नेसल्लिया। सौंदरी त्या ॥' आंतील स्वच्छ आणि शीतळ पाण्यांत उतरल्या व प्रसन्न मनानें नाना तऱ्हेचे जलविहार करूं लागल्या. कनक-कमळांचीं चिपोळीं। घेसाळां करीं घेतली। मग सिंपे वनमाळी। प्रेमपात्रांतें ॥ देउ दुरौनिची चिपोळ्या सिंपिती। ते तुषार आंगीं लागती। तंव तंव गुतखलिया होती। परम रसू दिसे॥ डोळां चैतन्यें चोरलीं। कामबाणीं अंगें विकळें गेलीं। आतां तंवकांचि जळ केली' त्या सर्वांनीं आनंदानें केली. यापुढें रुक्मिणीच्या विरहावस्थेचें वर्णन करतां करतां साडेआठशें ओव्या म्हणजे जवळ-जवळ चार-पंचमांश ग्रंथ पुरा झाला; व मग पुढें शेंदोनशें ओव्यांत अर्जुनशैल्ययुद्ध आणि शिशुपालसैन्याची दाणादाण व शिशुपालवधाची कथा उरकून घेतली आहे. वास्तविक पाहतां, शिशुपालवधाला यांत जेमतेम शंभर ओव्या खर्च केल्या आहेत; आणि तेवढ्यावरूनच या ग्रंथाला भास्कर कवीनें 'शिशुपालवध' असें नांव दिलें आहे. पण हा ग्रंथ नांवाप्रमाणें वीररसप्रधान नसून शृंगाररसप्रधान आहे.

शिशुपालवधाचे शेवटीं भास्करानें आपला ग्रंथरचनाकाळ ११९५ दिला आहे, तो असा :—हा शिशुपाळवधू : आइकतां तुटे भवबंधू : जीवा होए प्रबंधू : परमात्म्याचा ॥ शरांक रुद्र रोकडे : श्री मुख माधव चोकडें : श्री कृष्ण वर्णन तोकडें : वानिले मियां ॥ ऐसा नागार्जुनाचा दातारू : मियां वर्णिला श्रीचक्रधरू। तो जगा मंगळ करू : म्हणे **भास्कर** कवी ॥

या ग्रंथांत एकंदरीनें पाहतां शृंगाररसाची बूज बरीच राखली गेली आहे. हा ग्रंथ लिहून पुरा झाल्यावर भास्करानें आपल्या भावेव्यास या नांवाच्या गुरुबंधूस कौतुकानें वाचून दाखविला. तेव्हां त्यानें तो ग्रंथ ऐकून भास्करास म्हटलें :—'भट्टो, हा ग्रंथू निका जाला असे : परि निवृत्ताजोगा नव्हेचि : हा शृंगारियां प्रवृत्तांजोगा जाला असे' हें

ऐकून यानंतर भास्करानें ' श्रीमद्भागवत एकादशस्कंध ' टीका लिहिली. ही टीका फार गोड उतरली आहे व साधारणपणें सहज समजावी, अशाच तऱ्हेनें हींत मांडणी केली आहे. व्याख्यान करतांना यांत दाखल्यादाखल लहान-लहान गोष्टीहि कवीनें सांगितल्या आहेत. यांतून एक गोष्ट देतों.

मनुष्यानें संसारांत फार गढून जाऊं नये. कारण त्यापासून अंतीं दुःख ओढवतें, हें सांगतांना श्रीकृष्णाच्या तोंडून उद्धवास भास्कर कवि सांगतो कीं :-

परियेसी नर-नाथा !। तुज सांघैन पक्षिय एकाची कथा।
जिया निवर्ते संसार व्यथा। ग्रहस्ताश्रमींची ॥
जाणतां अतीशयेंसीं। स्नेंहो न करावा कव्हणेंसीं।
करितां दुःखानळें गिवसी। कपोत्या परी ॥
तो कपोता। सुऱ्हीत कांता। आरण्यी होतां। बहूत दीस ॥
त्या दोघांचें युगळ। जैसी अविद्येची वाट-सांखळ।
ना तर मद-मोहाचें डंबाळ। आदरिलें तें ॥
तें अहंकाराचें नांदण। कीं ममतेचें मेहूण।
कीं अभिलाषाचें तारण। मूर्ति झालें।
कीं तृष्णेचें साजणें। कीं लोभाचें नांदणें।
कीं अविवेका विषावणें। जोडलें तें ॥
तारुण्याचिया टकमका। हाव-भावाचिया चुळोबाळिकां।
सर्वांगें एकमेका। बांधती झालीं ॥
स्नेहाचें बिरडें। तयां पडिले गाढें।
म्हणौनि एकमेकांपुढें। पाऊल न घालिती ॥
एकां एकेंविण। नाहीं न्हाण जेवण।
तयां दोघांचे एकच प्राण। येर काई सांगो ! ॥
ती जे जे चाढ करी। तें तो पुरवी भलतियापरी।
स्त्रियें अधीन ये संसारी। कवण नव्हे ? ॥
नवेया तारुण्याचिया वोला। तें उरके आली फळां।
म्होणि पहिलियाच वेळा। बहुतवीनि झाली ॥

तयां बाळकांचा मुग्ध विलासीं । तिये दोघे झाली पिसीं ।।
बाप ! अज्ञानाची भूली कैसीं ? । कव्हना ओळखवेना ।।
तयांतें प्रतिपाळितां । कुडकुडा झाला कपोतां ।
हे जगीं कुटुंब-चिंता कवणांतें न बंधी ? ।।
कव्हणी एकी वेळीं । तियें सांडौनि बनस्थळीं ।
मग चराया निगाली । तिय दोघें जणें ।।
तंव पांगीत जाळांतें । चीरीत वागुरातें ।
पारधी एक तेथें । येता जाहला ।।
तेथें कुरवाळा करितें । पांखी झडपितें ।
कपोती खेळते । देखिली तेणें ।।
मग न वाजतां पाउली । न पडतां चाहुली ।
चाल पांगूण धरिली । एके वेळें ।।
तंव कपोता कपोती । चारा घेऊन आली मामौती ।
तंव देखिली आक्रंदती बाळकें तियें ।।
दृष्टें दृष्टी मीनली । तंव जिवनकळा उसासिली ।
तैशीच धागाइली । तियें एकें वेळें ।।
म्हणती आम्ही जातसो जवपंथा । मागुती न यों सर्वथा ।
सांगात सरला आतां । आमुचा तुमचा ।।
तंव आक्रंदत म्हणे पक्षिणी । मीं कां विसंबिलें? यें पापिणी ।
मीच झालीये सर्पिणी । या बाळकांसी ।।
ऐसें बोलोनी असासीत । पाठी धाविन्नली आक्रंदत ।
निडळें निडळ घासत । रिगाली जाळियांत ।।
तंव विहंगम करी दुःखातें । म्हणे सांडौनि मातें ।
कां जातेसी कांते !। एकली तूं ? ।।
न बोलतां मासीं । जात अससी बाळकेंसी ।
लेंकरुवे वांचून स्त्रियांसी । कव्हणी पढियेना ।।
आतां सुनीयें घरीं । एकला मी काय करी ! ।
कटकटा सदाशिवा हे संसारीं । मज कायीं केले ! ।।
ऐसे बोलौनि सहसा । जाळयांतूं रिघे आपैसा ।

बाप मोहाचा फांसा । कवणातें न बद्धी ?
तिये लाहोनि पक्षीकुळें । व्याधाचें मन संतोषलें ।
मग बांधौनि जाळें । निगाला तो ॥
सकुटुंबी कपोता । निमाला स्नेह करीतां ।
म्हौणी घरी असक्ता । यदू न होआवें तुवां ॥

या ग्रंथाचे शेवटीं कवीनें काळ दिला नाहीं. पण तो शके११९७-९८ यांत रचिला असावा. याचे शेवटीं 'पाहोनि तें तें प्रकरण । मियां बोलिलें ज्ञान । भक्ति वैराग्य लक्षण । तें पाहोत विचक्षण । ग्रंथवेळें ॥ एकादशेसी सरिसी । भाजोनि साहित्य देशी । मियां आवारू कला जगासी । ज्ञानामृताचा ॥ असें म्हटलें आहे खरें, पण येथेंच कवि भास्कर सांगतो कीं, 'श्रीकृष्णराव म्हणे उद्धवा । हा ज्ञानरत्नांचा ठेवा । भलत्या हातीं नेदावा । अधिकारें विण ॥ हें निरोपण न सांगावें नास्तिका । न बोलावें दांभिका । ऐकूं नेदावें निंदका । विशेषता ॥' महानुभाव-लोक आपले ग्रंथ पंथाबाहेर कोणास दाखवीत नाहींत, हें प्रसिद्ध आहे.

प्रारंभींच भास्करानें 'शिशुपाळवध' लिहिला खरा, पण त्यानंतर 'एकादशस्कंधटीका' रचून झाल्यावर पुढें केव्हांहि यानें पुनरपि शृंगार-रसप्रधान ग्रंथ लिहिला नाहीं. एकादशानंतर पूजा-अवसर, चौपद्या, ईश-स्तुति, विरहाष्टक असे पद्यग्रंथ व चक्रपाणिचरित्र, दत्तात्रयचरित्र, आणि गीताटीका हे गद्यग्रंथ यानें लिहिले. भास्कराची ईशस्तुति श्लोकबद्ध आहे. हे श्लोक निर्यमक आहेत. यांतून दोन श्लोक देतों:—

तें कें देखौन डोळां परतर सुफळा सृष्टि हें जीवितेसो
कैश्या जंघा सुरेषा उपर घणतरीं जन्मभूमी अनंगा ।
सेला मध्यें प्रदेशीं मिरवितु सजनी मालगंटीं पवेशा
वेठीला योगिराजें करवितु सहजे पारणे लोचनांसी ॥
नाभीस्थानीं सुखोली विकसितु भ्रमरीं सुंदरा रोमराजी

१. हा ग्रंथ भास्करानें रामदरा (?) या गांवीं पुरा केला, असें म्हणतात.

चापे गौरु सुवेशीं अळि उळ रमणा माळ कंठींचि तैसी ।
आडा ललाट पट्टीं मृगमद विलसत्पत्रवल्ली सुरेखी
पूजा बधी सुगंधी सकरुण विरजो लोचनीं पांतु मातें ॥

मराठी भाषेंतील अनेक वृत्तात्मक पद्य-श्लोक-रचनेचा आद्य मान यापुढें महानुभावपंथी ग्रंथकारांस देणें योग्य व अवश्य आहे; कारण हे श्लोक कोणत्याहि महाराष्ट्र–कवींपेक्षां उघड-उघड प्राचीन आहेत. ही निर्यमक श्लोकरचना सोडून देऊन हळूहळू कालान्तरानें महाराष्ट्र-कवि सयमक रचना करूं लागले.

या शके ११९५-मध्यें ग्रंथरचनेंत काळ घालविणाऱ्या भास्कर-कवीचे गद्यग्रंथहि अनेक आहेत. या सर्वांत याचा 'श्रीकृष्ण-चरित्र' हा ग्रंथ फार वाचला जातो. याकरितां त्या ग्रंथांतून एक लहानसा उतारा देतों. हा राजसूय यज्ञाच्या वेळचा आहे.

राजसूय अग्रपूजा प्रसंगें शिशुपाळवध कथन ॥ " एकुदीं : महदंबे : पुसिलें: जी जी श्रीकृष्ण अवतारें : शिशुपाळू कवणें प्रकारें वधिला : तें निरौपावें जी : सर्वज्ञें भणितिलें : बाई : युधिष्ठिरें रायें : राजसूय यज्ञ आरंभिला : दुर्योधनासि मूळ पाठविलें : दुर्योधनु परीवारेंसीं आला : मग : युधिष्ठिरें दुर्योधनासि जळस्थळें दाखवीलिं : तेथ राजपुत्रु जळ केली खेळतु असेति : अैसें देखौनी दुर्योधनें : जळ भणौनि उडीं घातुनैली : तेणें तेयाचें गुढगें कोंपरूं फुटौन्निलें : तें देखौनि भीतरीं रायें मुखा मुखा करौनि समस्तसैन्यें हांसींनलीं : मग कहवणी एकींठाइं : स्थळ म्हणौनि रिगौ बैसीन्निला : तंव उदकांतु उडी पडीली : वस्त्रें वोलीं जालीं : तंव द्रौपदी हासीन्नली : ऐसा दुर्योधनाचेया चातुर्याचा उपहासु जाला : थोरु लाजीन्निला : युधिष्ठिरें दुर्योधनासि संबोखिलें : मग युधिष्ठिरें ऋत्विजें पाचारौनि यज्ञु आरंभिला : मग : युधिष्ठिरें श्रीकृष्ण चक्रवर्त्तीसीं भणतिलें : जी जी : जेयांसी जो व्यापारू उचितु : तो तेंयांसीं देआवा : मज यज्ञदीक्षेचें कांकणु असें : तेणें मज यागा जवळौनि जावोनयेची : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ती अेकैकासि अेकेंकु उल्लिगु दीहनलें : आपण वाढावेयाचा उल्लिगु घेतलें : दुर्योधनासि द्रव्यु वेचावेंयाचे उल्लींगु दीन्हलें : मी दुर्योधन : धर्माचें द्रव्य भणौनि :

कवडा न लाहे तेंयांसि लक्ष वेन्हीं दें : अैसें दुर्योधनांसि द्रव्यु वेचितां न सरेंचि : अधिकांची वाढे : सुवर्णाचिया राशी जैसियां तैसियांचि : पडीनिलियां होतियां: दुर्योधनाचां हातीं: निधी होतां : तो जिए रासीसि हातुलावी : तर तेणें तो द्रव्ये वाढौचि लागे : तें तो नेणें : अैसेंयापरीं धर्मायेयां यागाची पूर्णाहुती जालीं : मग युधिष्ठिरें अग्रपूजा मांडीन्निली : तेथ अठ्यांसी सहस्र ऋषी : आन समस्त राये बैंसिन्नलें होति : आन समस्त कुळियांचें रायें : रायारायांचे कुमरु बैंसलें होति : युधिष्ठिरयें येवौनि हातु जोडौनि : पुढां उभा ठाकिन्निला : समस्तांतें भणितिलें : माझा यज्ञ सिद्धी पावला : आतां अग्रपूजा कवणासि करावी : तें आज्ञा दीजो : तेह्ववळि तेंहीं अवघां ऋषीं विचारिलें : शुकदेवो : ज्ञानियां होए : आन तपोवद्ध होए : तो पूजें योग्य होए : तेयासि अग्रपूजा करावी : तरि तो बोलावा पां : तेह्वेंळि : शुकदेवु लेंकुरुवांतु उभा ठाकौनि : श्रीचक्रवर्त्तीची लीळां चरित्रें पांतुचि होता : अवघां तेआतें बोलावो पाठवीलें : तैसाचि शुकदेवो आला : बैसकारु दिह्नला : अवघां शुकदेवात्तें भणितिलें : तुम्ही अग्रपूजा अंगीकरावी: तेह्ववळि शुकें भणतिले : हे काई : हें अवघें असतां : आमासीं : आग्रपूजा कांइसी : तेह्ववळीं: तेहीं अवघां : आपुलांली व्यवस्था सांघितैली: आपुलाली विवक्षा केली : जो बाळब्रह्मचारी : आन ज्ञानी असैल : तेयासि अग्रपूजा : आमां माजीं ववनी नाहीं : शुकदेवें भणतिलें : मीं ज्ञानियां : आन बाल ब्रह्मचारी : अैसें तुम्ही विचारिलें : तर मी ज्ञानिआं बाल ब्रह्मचारी न होएचि : अवघां म्हणितलें: हें अैसे काई : तर अग्रपूजा कवणासी देआवी : शुकदेवें भणितले : अवघां तुम्ही मज प्रमाणु मानिलें : तर मी निर्द्धारिनु : ते तुम्हीं अवघें मानालु : समस्तां भणतिलें अवश्यु : शुकदेवे भणतिलें : सकळ ज्ञानियां सिरोमणी : सकळ ज्ञानियांचा बापु : हा श्रीकृष्ण : असेंचि : तरी यांसि अग्रपूजा करा ना कां पां : मग समस्तां ऋषीं भणतिलें : तूंचि ज्ञानियां होसि : हे आईकौनि दुर्योधनादि कु क्षोभैलें : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्ती श्रीकरी : कनकांचें भाजनु घेवौनि ब्राह्मणां ऋषींसी क्षीरू वाढीत होते : इतुका श्रीकरू अन्नें माखीन्निलें होते : श्रीकरीचा अनुकारू : आंगींचियां बाहिआं वरौतिआ खोवोनिलियां होतियां : मोकळें केस कळापु : कटी प्रदेशी फूटा : युधिष्ठिरें श्रीकृष्ण चक्रवर्तीसी

बोलावों पाठविलें : तैसेंचि : श्रीकृष्णचक्रवर्त्ती : तेथें बीजें केलें : समस्त ऋषीं : श्रीकृष्णचक्रवर्त्तीनें भणतिलें : जी जी तुम्हीं अग्रपूजा आंगिकरावी जो : श्रीकृष्णचक्रवर्त्ती भणतिले तुम्ही अवघे ऋषीं असतां : अेथ अग्रपूजा काइसी : तेंहवेंळीं समस्ती ऋषीं अवघीं व्यवस्था सांगीतैनली : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ती निराकरिले : फूडा : समस्ता ऋषी प्रार्थौनि भणतिलें : आगा अें : श्री कृष्णा अवतारू : परमेश्वर पूर्णब्रह्म : आमुतें कांइसेयां झकवितासि : भणौनि समस्ती ऋषीं श्रीकृष्णचक्रवर्त्तीची स्तुतीं केली : मग श्रीकृष्ण-चक्रवर्त्तीसी : यज्ञमंडपी आसनु रचिलें : श्रीकृष्णांचे श्रीचरणु प्रक्षाळनु करौनि आसनी उपविष्ट होआवेयां प्रार्थिलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ती आसनीं उपविष्ट जाले : मग युधिष्ठिरे मंगल महाच्छाअेंनसीं श्रीचक्रवर्त्तीची अेथो-चितु अग्रपूजा केली : श्रीकृष्ण चक्रवर्ती यज्ञमंडपी : बैसौनि अग्रपूजा स्वीक-रीन्निली : मग युधिष्टिरें येथानुक्रमें ऋषीः मुनी : देव : दानव : राऐं पूजिले : अैसा समइं तेथ शिशुपाळु आला : तो श्रीकृष्णचक्रवर्तीसि सवियां देओ लागैला : तेअेवेळीं श्रीकृष्णचक्रवर्ती : तेयांचियां शतभरीं सवियां साहीनिलियां एकीं आगळी जाली : आन सुदर्शनुचक्रां प्रेसैनि शिशुपाळाचें सिर छेदिले : मां तें सिरकमळु यागी पडिले : आन तेयाचे देहो बाणवेन्ही : पीटौनि यागीं घातलें : आन हाहाःकारू प्रवर्तैला : रायां रायांची सैन्यें उठावीली : युद्धालागी राणे चालिलें : मग यादवीं पांडवीं : सकळ राजे पराभविन्नले : अैसा श्रीकृष्णचक्रवर्ती : धर्माचा यागु सिद्धो नेला : मग देवो ऋषीराजे आपुलेयां देशां गेलें : मग दुर्योधन आज्ञा घेवौनि आपुलेयां नगरासि गेला : श्रीकृष्णचक्रवर्ती : युधिष्ठिरा कुंतिअेतें पूसिले : पां हे आपुलेयां नगरासि जाईलू : शाल्वें महादेवो प्रसन्नु केला असे : तेणें द्वारका वेढिली असे : तेरां दी महा रंदौळी होतु असे : प्रद्युम्नु गावीं एकलाचि असें : अेथौनि जावेंचि लागैल : श्रीकृष्णचक्रवर्तीसि समस्तें बोळवीनुंचि निघाले : मग द्रौपदियां देवी : देवकियां देवीसि नमस्कारु केला : अेरीं सकळीं द्रौपदियेंसि नमस्कारु केला : मग श्रीकृष्णचक्रवर्ती सपरिवारें द्वारकेसी बीजें केलें : :

भास्कर कवीश्वर व्यास हा महानुभाव-पंथांतील सर्व उपलब्ध ग्रंथांपैकीं सर्वांत जुन्या ग्रंथाचा कर्ता होय, हें खरें आहे. पण महानुभावपंथी बहुश्रुत व जाणते लोक आद्यग्रंथकर्तृत्वाचा मान या भास्करास देत

नसून हा मान महींद्रव्यासास देतात. महींद्र व भास्कर हे दोघेहि फार प्राचीन व पूज्य लेखक होते; पण या दोहोंत 'कवि' या नात्यानें पाहतां भास्कर श्रेष्ठ ठरेल, यांत संशय नाहीं.

या भास्कराच्या उत्तम काव्यरचनेमुळें व भाषाशैलीमुळें महानुभाव यासच 'कवीश्वराचार्य' असें म्हणतात. या भास्करापेक्षांहि आपल्या कडकडीत वैराग्यामुळें व ज्ञानामुळें भावेव्यास हा त्यांच्या विशेष आदरास पात्र झाला. भावेदेवव्यासास श्रीचक्रधराच्या सर्व शिष्यसमुदायांत अग्रस्थानाचा मान मिळे; व याचेकडून वाहवा मिळवावी आणि बरें म्हणवून घ्यावें, ही हाव प्रत्येकाच्या मनाची असे. हा भावेव्यास गंगातीरावरील नेवासें प्रांतांतला राहणारा होता. तेथेंच यानें या पंथाचा स्वीकार करून मंत्रोपदेश घेतला. यानें रचिलेले १ प्रश्नावली, २ नामाचे ठाय, ३ पंचपुराचें ४ मूर्तिज्ञान व ५ पूजा-अवसर उर्फ श्रीचक्रधरांची दिनचर्या असे पांच ग्रंथ गद्य आहेत. त्या काळच्या गद्याचा मासला सर्वांस पाहतां यावा म्हणून या तिन्ही ग्रंथांतून तीन उतारे देतों. प्रथम पूजा-अवसरांतून पूजाविधि कसा होई व शिष्यमंडळाची मनोभावना कशी होती हें ज्यांत आहे असा मजकूर पाहूं :-

भावेदेवव्यासकृत पूजा-अवसर (नित्यदिनचर्या)–

श्रीचक्रधराय नमः ।। नीत्य दीनी लीला : कह्वणो कह्वणें ठाइं बोलेती : । कह्वणीं कह्वणें ठाइं बोलती : कह्वणी ठाइं कह्वनीं विशेखु : कह्वणी ठाइ कह्वणीं विशेखु । अेथ अवघें विशेखु : डोंमे ग्रामी असेती : । भणौनि : भावें देवोबासी (भावे देवव्यासी) नित्यदीनी लीला : डोंबे–ग्रामीं बोलेती : । डोंबेग्रामीं तीनि मठु : अेकु पूर्वाभिमुखू : अेकु उत्तराभिमुखू : अेकु दक्षोणाभिमुखू : तीअे दक्षीणाभिमुखें राजमठीं : सर्वज्ञास अवस्छानु : रीगं तां डावेया हातां : पश्चिमीली भींती सीं : उत्तर दक्षीण ओटा : तेआ ओटआ वरी : सर्वज्ञास : पहुडु होए : । : नागंबा उपाणही पालवें गुंडौनि : आपुला उसी सां : कां आडवांगीं ठेऊनि आपण ओटेयां खाली पाइतेआ कडे नीजेती : । : पश्यात् पाहारीं : सर्वज्ञां उपाहोडु होए : ओटेंआंवरी लोंबतां श्रीचरणीं आसनु होए : गोंसावी :

इरचीतु खांकरीती : तंवं नागांबा : सुजगरां होती : साउमीं अेती : सर्वज्ञाचेआ श्रीचरणा लागेती : श्रीचरणी उपाणहौ अ्ळगवीती : नागंबा पुढां जाऔनि कवाडाची खीळी फेडीती कवाडां उघडीती : सर्वज्ञ बीजे करीती : तंवं भट्टोबासु ( नामदेवाचार्य ) उंबरेआ उसीसें करौनि : वीसंवले असती । ते सिआळआंचे चाऱ्हीं मासु भीतरी नीजेती : ना उन्हाळां कां पाउसाळां : तर उंबरां उसीसें करौनि : बाहोरी नीजेती : सर्वज्ञ बीजे करौनि : श्रीचरणींची उपाणहौ फेडीती : दोन्हीं दारसंका श्रीकरी धरौनि भट्टांचे आं वक्षेस्छलावरी अेकु श्रीचरणु ठेवीती : दुसरा श्रीचरणु उंबरवंटा वरी ठेवीती : कां भट्टांचें जाड्य आलें असे : तर सर्वज्ञ : श्रीचरणीचेनि आंगुष्टेनि भट्टांचें वक्षेस्थल दाटीती : भट्ट जागें होती : श्रीचरणु हृदअेसीं धरीती : आळंगीती : ल्लाटा वरी ठेवीती : नमस्करीती : मोमें देक्ति ऐसें वेळासा करीती : तेणें भट्टोबासांसीं सुख थोरु होअे : तेआंसुखां परिमाण कक्णीचि नेणें : तें तेंचि जाणेती : श्रीचरणु कांहीं केलेआं सोडूं न सकेती : गोंसावी अेकाचि श्रीचरणां वरि वाढ वेळु उभें असतु. आज सर्वज्ञां परिश्रयाची प्रवृती : भणौनि सोडीती । : । कदाचितु : नागंबा : भणती : सोडि सोडि नागदेआ : बाबासी परिश्रेया उसीरू होत्तुसें : मग सोडीती :

भटो बासु अेती : दंडवतें घालीती : श्रीचरणां लागेती : सर्वज्ञां पासि बैसती : समस्त भत्तुजनें अेती : सर्वज्ञाचेया श्रीचरणां लागेती : सन्निधीं बैसती : सर्वज्ञांस नीरूपणाची प्रवृत्ति असें : तर नीरूपणु करोंती : नां रात्रि वडीलु असें : तर : पहुडु : स्वीकरीती : नां तर नात्रेकु निश्चलु. । होऔनि आसनीं उपविष्ट होती : । महदंबे प्रस्नु करीती : जी जी : आम्हीं सर्वज्ञातें : चींतु : सर्वज्ञ कांइ चींतीती : सर्वज्ञ भणती : बाई : हें सकळ जीवांतें चिंती : । : कदाचितु : नागंबें पुसेती : बाबा : आम्हीं बाबातें चिंतुं : बाबा कवणांतें चींतीती : सर्वज्ञ भणती : बाई : हें श्रीदत्तात्रेय प्रभुची थापु चींती : हें खांडणी पश्यात्तापाहारीं आठवी ॥

तंबं सूर्योदय होअे : नागंबा आदिलां दीसीं : सीलिका दोनि आणौनि ठेवीलीआ : असत : । : आंबेआं चीआ : कां जांबूळी चीआ : कदाचितु बोरी चीआं : तिआं दोन्हीं सीलीका : नागंबे सर्वज्ञाचां श्रीकरीं अ्ळगवीती :

गोसावी : अेकी सीलीका : जानु वरि ठेवीती : अेकी दंतधावन् करीती : दंत-धावनु करौं सरे : ते परीत्यजीती : दुसरी घेती : ते डावेनि श्रीकरें घेऊनि : अंगुष्टाचेनि नखें : दोनी फोडी करीती : अेकीं आंगुळियां मध्यें धरीती : एकीं धनुष्याकारें : जीव्हामळु आकरवीती : जीव्हामळु आकरवीं सरे : तै त्यजीती : मग दुसरी सीलीकु : धनुषाकृती करीती : जीव्हामळु फेडीती : फेडु सरे आन तेही परीत्यजीती : । : गोसावी श्रीमंता श्रीकरीं नागरा परी गुळणा करीती : श्रीमुख प्रक्षाळीती : श्रीकरां प्रक्षाळीती : । : नागंबें सर्वज्ञाचां श्रीकरीं सपूरु दाटना ऊळगवीती : तेणें गोसावी श्रीमुख परमार्जीती : श्रीकरू परमार्जीती नागंबें तें उदकु नेती : । : मागौतें : उस्नोदकाची तांबतौली : पालिमंडें घेऊनि अेती : सर्वज्ञाचा : श्रीचरणु प्रक्षाळीती : पालवें परमार्जीती : आसनावरी ठेवीती : तेआंचिपरी : दुसरा श्रीचरणु : चरणोदकु असे : तें भक्तिजनां प्रसादु होअे : । तेंथ उदकाचें बिंदु बिंदु पडिले असत : तें नागांबे पालवे परमार्जीती : तेथ दोंनि पद्मे रेखीती : मग वाहीरि जाती : हात पाअे धूती : तोंड धूती : सोविळें वस्त्र वेढीती : भट्टोबासु गोपीचंदनु उगाळीती : नागांबे सर्वज्ञांचां भालप्रदेशीं उर्धपौंड्र टीळा रेखीती : कोन्ही उपाधी स्थूल आलें आं : सर्वज्ञ आपुलिआ पवित्रांगुळिअे रेखोनी : दोन्हीरेखां सरिसियां-चि अेती : । : नागांबी आधीलां दीसीं पुष्पे : घागरी वोलां दाटणांगुंडौनि : ठेवीनिलीं असेंती : तेयां पुष्पांचा गळदंडा : श्रीकठीं : ऊळगवीती : श्री: मुकुटीं मुकुटमाळ : ऊळगवीती : मोकळेआं पुष्पांची पूजा करीती : श्रवणीं झळंबुके : बाहू भूषणें : कळिकांचे हातसरें : श्रीकरी पुष्पांचा स्तबकु ऊळगवीती : मग नागांबा धुपटाणां आंगारा आणीती : तेयां– वरी दशांग धूपु घालीती : पांचै वाती उजळीती : आरती पालिमांडां ठेवीती : सर्वज्ञां धूपार्ती : मंगलार्ती होअे : ।। जय तूं मंगळ मंगळा : परम मंगळरूपां ।। हें जतु ऊळमवीती : । : नागांबा आठै सात्त्वीकु प्रकटेती : ।। नागांबा हातीचें पालिमांडे : थरारीले देखौनि : गोसावी भणती : वानरेया नागांबाचिअे हातीचें पालिमांडें धरागा : भट्टो-बास बाइसाचिअे : हातिचे : पालिमंडें घेती : बाइसें हातांतु हातु सीरौनि नीरांजनु करीती : भट्टोबास पालिमंडें खाली ठेवीती पांचि दंडवतें घालीती : नागांवा रासू अेकु दंडवते : घालिते चि असेती :

नागांबा : सर्वज्ञासि फोडीं ओळगवीती : वीडियां करौनि देती : परी हातीचा कंपु जाओ ना। भट्टोबासु "सहस्र शीर्षा पुरुषः।" मंत्रावसरू (पुरूषसूक्त) भणती : सर्वज्ञ चुकी लावीती : सर्वज्ञें भणती : हांगा अेथ कोन्हीं सामग (साम गायकु) नाहीं : सामगु तें अेकी दोनि वेळां आवर्तिजेती कीं : जी जी :। नाथोबा तीथि वारू जाणवीती : या परी स पूजीतु सर्वज्ञ घटिका अेकीं आसनीं उपविष्ट असती : ॥ १ ॥

इति प्रातःपूजावसरू :। दुसरी खांडणी ॥ २ ॥

सर्वज्ञांसी उदेंआं चा पूजावसरू जालेआ अनंतरें : स पूजीतु आसनीं उपविष्ट असेनी : भट्टोबासु : गोसावियांची प्रवृत्ति जाणौनि : श्रीचरणीं उपाणहौ : ओळगवीती :। : सर्वज्ञें : रायांगणीं उभेयां ठाकेती : भट्टोबास : आंगीं टोपरें : सरासें करौनि घेऊनि अेती : दुनीचीअें आंगी चिर्यां बाहिआं : सरोसियां करौनि अेकें वेळें लेववीती : कसेआं गाठीं पाडीती : श्रीमुकुटीं टोपरें ओळगवीती : गोसावी फूटा प्रावर्णु करीती : उन्हाळें दी : तर : अेकु सोगा : अेकींकडें : अेकु सोगा अेकींकडें : नां सीआळें दीसु : तर : खोलिबुंथी घालीतो : कां पाउसाळां तर : चांदोवा धरीती : बाइस : कणीकु तीमीती : तांदुळें भीजौ घालीती : बीसदेऊ सेणि लावीती : पुडु वाटोवा घेती : (मध्यान पूजावसरानंतरें)

बाइसें : भीतरीला ओटेआंवरी : आसनु रचीती : आड कानवडा लावीती : ताट करीती : गोसावी भीतरीं बीजे करौनि : आसनीं उपविष्ट होती : बाइसें निबलोणु करीती : तंवं सर्वज्ञां आरोगणा होअे : पौळी तर चौतकोरु : मांडा तर दीढ : पुरी तर अेकि : तुप भातु कढी : दोंनि शाकवतिआ : पहितु घृतु : पाठी तक्रभातु सी : सर्वज्ञांची श्रीमंत सकुमारु आरोगणा होअे : मग गोसाविआसी गुळणा होअे : श्रीकर प्रक्षालन होअे : आन सर्वज्ञाचां श्रीकरीं चंदन ओळगवीती : चंदनें दोंनि श्रीकरें उलळीती : श्रीकरीं सपूरदाटवा ओळगवीती : श्रीकर परमार्जीती : श्रीमुख परमार्जीती : भट्ट : गोसाविआंचेआ श्रीकरीं सकर्पूरा फोडीं ओळगवीती : वीडिआं करौनि देती : गोसांवी भट्टाचां हातु धरौनि : आरोग्य वाउली शतपदीं वेढें करीती : बाइसें ओटा झाडीती : पद्मासनु असें तें शयनासनु रचीती : पुहुडु स्वीकरीती :

सर्वज्ञें भणती : काइं गा धर्मवार्त्ता करीतु होतेंती : इतुकेंनसी ते खालौतिआ मानां घालौनि : भूइं रेघां काढौ लागेती : गोंसावी भणती : मरा मरा पोरे हो : तुम्हां पसिवरि ढोरें चांगु : जें चिचरैती : तेंचि रोंवतीती : हां गा अेॐनि जाइजे : मां अेथचिआंचि कथा वार्त्ता कीजती कीं : मां अन्यवार्ता काइं : । " अन्य वार्ते पसि निद्रा चांगु : वर निद्रा कीजे : पर अन्यवार्ता न कीजे : ॥ १ ॥ सुखाश्रय शृंगारू : अे तिन्हीं नाहीं : तें कांइ गा गोष्टी : तें अरण्यरोदनु कीं ॥ २ ॥ " ऐसें सर्वज्ञ नीरोपणु करीती : अेणें नीरोपणेंसीं ते मागौते जाती : कदाचितु : गोसावी : तेथें बीजे करीती : तंवं तें उदेयांचे नीरोपणु सवादतु असेती : तेणें संभ्रमें तें सर्वज्ञातें आलेंआं हीं न देखेंती । : । गोंसावी भणती : हां गा हें तुम्हां विषयत्वेंचि लागौनि ठाकलें मां ।:। जी जी : भणौनि उठीती : दंडवतें घालीती : । श्रीचरणां लागीती : । : कदाचितु गोसाविआं नीरोपणु करितां भट्ट भणती : जी जी : हें मज धरे नां : सर्वज्ञ भणती " हें अध्रीत शास्त्रु कीं गा ॥ १ ॥ " कदाचितु तें संवादतु असती : तंवं गोसावी बीजे करीती । भक्तीजनु उठेंती : आसनु रचीती : गोसावी आसनीं उपविष्ट होती : ते दंडवते घालीती : श्रीचरणां लागीती : मग भणती : जी जी : आम्हीं अैसें भणो : भट्ट ऐसें भणती : गोंसावी : भणती : तुम्हीं भणतसा तें न होअे : वानरेखु भणती ते होअे : कदाचितु भक्तिजनांचें होअे : अैसें असिलेआं : सर्वज्ञ : भणती तुम्हीं भणतु असा तें होअे : वानरेखु : भणती : तें न होअे : । : कदाचितु सर्वज्ञ भणती : तुम्हीं भणतु असा तें न होअे : : वानरेखु भणती तें ही न होअे चि : ते अैसें होअे : भणौनि : नीरोपीती : आन पूसती कां गा परीसीलें : जी जी : पाॐ भणा : तें भणती : सर्वज्ञ भणती : परीसीलें अैसें वाटतु असें : पर : परीसा ना : पुढती नीरोपीती : पुढती पूसती : कां गा परीसीलें : जी जी : पाॐ : क्षणा : तें भणती : । : गोसावी : भणती : आइकीलि मातु सांघो नेणा : मां परीसालु काई : अेंसें त्रीशुद्धी नीरोपीती : त्रीशुद्धी पूसती : कां गा परिसीले : जी जी : पाॐमणा : तें भणती : गोसावी भणती : अैसें होअे : आतां परिसीलें गा : तंवं भीक्षा अवसरू होअे : गोसावी भणती : आतां भिक्षावारि जाली गा :

सर्वज्ञां आठां दीसां क्षौरू : चौ दीसां मादनें : गोसाविआं मर्दना मार्जनें

नागांबा गाडु ढाळीती : चोखटें दाटनेआ श्रीमूर्ती दाटीति : बहिरवासू ॐळगवीती : फूटा प्रावर्णु करीती : मठांतु आसनीं उपविष्ट होती : नागांबा श्री चरणु : पालवें परमार्जीती : भट्ट पुष्पाळकारु गुंफौनि आणौनि बाइसाचां हातीं देती : सर्वज्ञाचेआं : नागांबा : भाल प्रदेशीं कस्तुरीचां आडा रेखीतो : सर्वांगीं यक्षकर्दमाची भौरी : श्रीकंठीं गळदंडा ॐळगवीती: तेआं गळदंडेआ: तीनि भारवा : अेकी माळ तऱ्हीं गळदंडा : दोनि माळां तऱ्हीं गळदंडा: तीनि माळां तऱ्ही गळदंडाचि : सवंतेआ मोगरेआंची दाट माळा गुंफीती : माजी माजी वानु सारीती : तो गळदंडा श्रीकंठीं ॐळगवीती श्रीमुगुटीं मुकटमाळ : तथा मोकळेआं पुष्पांची पूजा करीती : श्रवणीं झळंबुकें : बाहू भूखणें : कळिकांचें हातसरु : श्रीकरीं पुष्पस्तबकु ( झेला ) वरी मोकळेआं : पुष्पांची पूजा : ॐळगवीती : नागांबा धुपटणा आंगारा आणीती : तेयां वरी दशागु धुपू घालीती : पांचै वाती उजळीती : धूपार्ती : मंगळार्ती करीती : " जयतु मंगळमंगळा परम मंगळरूपा " हे जति ॐळगवीती : नागांबा : आठै सात्वीकें प्रकटेती : बाइसांचिअें हातीचें पालिमांडे थरारिले देखौनि : सर्वज्ञ भणती : वानरेखा बाइसांचिअें हातीचें पालिमंडे धरा गा :।: भट्ट नागांबाचिअें हातींचें पालिमंडे धरीती : नागंबें हातांतु हातु सीरौनि निराजणु करीती : पालमंडा खाली ठेवीती : भट्टोबासु पांचें दंडवते घालीती : नागंबा रासी अेकु दंडवतें : घालीतें चि असेति : नागांबा : सर्वज्ञां तांबूळ ॐळगवीती : भक्तिजनां प्रसादु देती : सर्वज्ञें नगरजनां पाठवणी देती : मग ॐळग विसर्जे : निज कींकरुतें सेवें राहाती ॥ सायंकाळी-चेआं अवसरांची हे खांडणी ॥

मग आळीवां दुधांतु तूप भात साकर: अैसीं सर्वज्ञां विआंळी होअे : गुळळा होअे : श्रीकरप्रक्षाळनु होअे : नागांबा श्रीकरीं : सपूर दाटनां ॐळगवीती : गोसावी : श्रीमुख श्रीकर : परमार्जीती : बाइसें : श्रीकरीं चंदनु ॐळगवीती : गोंसावी चंदने श्रीकरु : उळळीती : श्रीचरण चारियां वेढें करीती: भट्ट सकर्पुरा फोडीं : ॐळगवीती : वीडिआं करौनि देती :

तंवं नागांबा ॐटां झाडीती : पद्मासनु असें : तें सयनासनु रचीती : गोसावी आसनीं उपविष्ट होती :

भावे देवव्यासाप्रमाणेंच नागदेवाचार्य हाहि एक श्रीचक्रधरांचा

फार प्रसिद्ध शिष्य होऊन गेला. याचा एकहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. पण याच्या मावशीची कांहीं थोडीशी रचना उपलब्ध आहे. हिचें नांव महदंबा. हिनें श्रीचक्रधराचा उपदेश घेतला होता; व ती उत्तर-वयांत नेहमीं त्यांचे संनिध राहून त्यांची सेवाचाकरी फार मनोभावें करी. एके वेळीं ऋद्धपूरकर गोविंदप्रभू यांनीं 'श्रीकृष्णविवाहोत्सव' केला. त्या वेळीं नवरदेव श्रीकृष्ण हे लग्नास तयार झाले आहेत अशी कल्पना करून आणि महदंबेस करवली समजून तिला गाणीं गाण्यास सांगितलें. त्या वेळीं प्रेमळ अंतःकरणानें महदंबेनें गीतें रचून गाइलीं. यांत तिनें सर्व कृष्णकथा गोविली आहे. या गीतांस 'ढवळे' असें म्हणतात. हे ढवळे (८५+६४=) एकंदर १४९ आहेत. या मराठींतील उपलब्ध अशा प्रथम-कृष्णकथेंतून अंबेची प्रेमळ रचना जाणतां यावी म्हणून दोन-चार गीतें (श्लोक) देतों:-

**श्री चक्रधरांचे सीरीं धरौनियां श्रीचरणां: मग धवळीं गाइनु गोविंदु राणां: जेणें रुकुमींणी हरीअेली: तेणें जगीं पवांडे केलें अतो बहुतू: पाविज परमागती: भक्तीं आइकीतां: श्रीकृष्णचरित्रं ॥१॥ भीमकी कुळीं रुकुमींनी केला अवतारू: रूपें च्यातुर्यें तीअें जींतिअेला संसारू: तंवं राऊ चींता करी कवणां देआवीं हे सुलक्षणा कुम(व)री: इयां त्रीभुवनां माझारी: रूपें सौंदरू वाखाणें मुरारी॥ २॥ जए जया प्रभुगोविंदा ॥धृ० ॥ द्वारकें हौनि कौंडन्यांसि आलें नागारीं: तें हीं सर्वेश्वरू वाखाणिले नानां परीं: कांळिआ कंसु निर्दाळौनि गोवर्धनु वामकरीं धरींअेला: परेशू परमात्मु: मां लाळवसें येदु कुळीं अवतरला॥ ३ ॥***

या महदंबेप्रमाणेंच लक्ष्मींद्रभट व गोपाळ पंडित हेहि ग्रंथकार फार प्रेमळ असून विरक्त होते. लक्ष्मींद्रभट हा इलिचपुराजवळ देऊळवाडा गांवचा राहणारा होता. यानें नागदेवाचा उपदेश घेतला होता. यानें

---

***प० श्री वाईदेशकर महानुभाव, मठ ऋद्धिपुर ई० महंत सायंराज आराध्ये शिष्यें मुकुंदराज, ठाकुरद्वारा जयकृष्णियां, चौक पासियांके अमृतसर (पंजाब) या दोघांच्या प्रतींवरून हा उतारा घेतला आहे.**

एक लहानशी गीताटीका[1] रचिली. ही हल्लीं उपलब्ध नाहीं. पण गोपाळ पंडिताचे पांच-सहा ग्रंथ उपलब्ध आहेत.

गोपाळ पंडित हा पैठण शहराजवळील वरखेड वाडेगांव येथील मूळ रहिवासी होता. याच्या बापाचें नांव चक्रपाणी. चक्रपाणी भटाला दोन पुत्र होते. थोरल्याचें नांव गोपाळ व धाकट्याचें केशव. गोपाळ हा सात महिन्यांचा उपजला. त्याचे डोळे उघडत ना, तेव्हां त्याच्या आईनें त्याला चक्रधराच्या स्वाधीन केलें. पुढें त्याचे डोळे उघडून त्याला नीट दिसूं लागलें. यावरून त्याला 'पार-मांडल्य' हें नांव चक्रधरानें दिलें. गोपाळ हा मोठेपणीं वरखेड सोडून देवनगरीस जाऊन राहिला. तेथें असतांना हा रामदेवराव जाधवाची धाकटी राणी कामाइसा किंवा कामाईदेवी हिचा पुराणिक व खासगी खजिनदार होता. कामाईदेवीनें याचे मार्फत पुढें नागदेवाचार्यांचा मंत्रोपदेश घेतला होता. गोपाळ पंडित हा नांवाजलेला विद्वान् असल्यामुळें त्याला राणीनें साहजिकपणें आपला आश्रय देऊन पुराण सांगण्यास ठेविलें. गोपाळ पंडितानें सहा ग्रंथ मराठींत लिहिलेले आहेत. यांपैकीं 'चौपद्या' व 'सुभाषितअंताक्षरी' हे दोन पद्यात्मक असून बाकी चार गद्य आहेत. 'सुभाषितअंताक्षरी'ची रचना नियमक श्लोकबद्ध आहे. पण या श्लोकांत जरा चमत्कृति आहे. श्लोकाच्या एका चरणाचें जें अंत्य अक्षर, तेंच त्याच्या पुढल्या चरणाचें आदि-अक्षर आहे व पहिल्या श्लोकाचे चौथ्या चरणाचें जें शेवटचें अक्षर, तेंच त्याच्या पुढील श्लोकाच्या प्रारंभींचें अक्षर आहे. म्हणजे यांतील सर्व श्लोकांच्या प्रत्येक चरणाचे दुवे एकमेकांत गुंफून ही एक सांखळी बनविली आहे.

---

१. या टीकेंतून यक्षदेवी नांवाच्या एका गीताटीकेच्या नक्कलकारानें आपली पोथी ज्या ठिकाणीं फाटली होती तेथें ती जागा भरून काढण्याकरितां ग्रंथपूरणार्थ कांही ओव्या घेतलेल्या उपलब्ध आहेत.

२. 'भद्रकार कामाइसे : तिये रामदे रायाची धाकुटी राणी : तिये सब्वाये लक्षाचा व्यापारू गोपाळ पंडित होता : कामाइसें सदा पुराण ऐकितें असती'. (नागदेवाचार्य चरित्र, कथा १६८. ऋद्धिपुरकर प. तळेगावकर महंत उरुफ सांबेराज पंजाबी यांचे संग्रहांतील पोथीवरून).

या गोपाळापेक्षां याचा भाऊ जो केशव तो वयानें लहान होता पण ज्ञानानें व ग्रंथकर्तृत्वानें हा फार मोठा होता. यास 'केशवराजसूरी' असें म्हणतात. यानें संस्कृत व मराठी मिळून बरीच रचना केली आहे. यानें रचिलेले पंधरा-सोळा मराठी ग्रंथ उपलब्ध आहेत. यांपैकीं 'मूर्तिप्रकाश' नांवाच्या ग्रंथांत यानें श्रीचक्रधराचें वर्णन व त्याचे संबंधाची माहिती फार आदरानें व प्रेमभावानें सांगितली आहे. यानें चक्रधराला प्रत्यक्ष पाहिलेलें असल्यामुळें या ग्रंथावरून चक्रधराच्या स्वरूपाचा अदमास बांधतां येतो. आपल्या इकडील एकंदर कवींप्रमाणें ग्रंथ अतिशयोक्तीनें भरलेला आहे. परंतु रचना व भाषाशैली फार चांगली आहे. या केशवाचा आत्मविश्वासहि दांडगा आहे. तो आपल्या ग्रंथारंभींच प्रतिज्ञा करून सांगतो कीं :—

वानितां श्रीचक्रधराचा मूर्तिमयंकु । आनंदें डुलवीन त्रिभुवनीचा लोकू ।
सुमना करीन संतोषु । सभेचिया ।।
जाणिवेचेनि रसें सुरांगें । शृंगारु शांतिक्षमेचि योगें ।
जळकेली खेळवीन ज्ञानगंगे । मनें महंतांचीं ।।
चातुर्याचेनि सौरसें । छेदीन महामूर्खाचें पिसें ।
कविता लते लावीन ( पा. भे. लेववीन ) घोसें । सारस्वत फळांचें ।।
जयासी जैसी भावना । तया तैसाचि भावो आणीन मना ।
जेंवी कल्पतरू पुरवी कल्पना । आपुलेनि आंगें ।।...
म्हणौनि वाखाणितां श्रीरंगू । न पडे श्रोतियांचा पंगू ।
साउमा सांघैन कथा प्रसंगू । मूर्तिज्ञानाचा ।।

केशवराजसूरीची उपमा देण्याची हातोटीहि फार सुंदर आहे. किंबहुना, या काळच्या सर्व चांगल्या कवींचे ग्रंथांत उपमा, उत्प्रेक्षादि अलंकारांचा केवळ पाऊस पाडलेला दिसतो. हा याच 'मूर्तिप्रकाश' ग्रंथासंबंधें म्हणतो कीं, हा माझा ग्रंथ म्हणजे केवळ

ब्रह्मविद्येची कसवटी । पाहाता सकळ शास्त्रातें दळवटी ।
कीं ज्ञानरत्नाची उघडली पेटी । सारग्राहकां लागी ।।...

कीं ते परब्रम्हची निजकीर्ती । जीव उद्धरावया आली व्यक्ती।
ती परावाचा ईश्वर प्रवृत्ती ।मूर्ति जाहली ॥
कीं भरौनि नित्य सुखाचां ताटी। मियां ठेविली ब्रह्मरसाची वाटी।
तें सुमनें लावोनि वोठी। पान करितु ॥
कीं कारुण्य शक्ति आपण। निफजविलें प्रेमाचें पक्वान्न।
तें आर्तीं करावें भोजन । आवडीपूर्वक ॥
कीं ते कृपेची कामधेनू ।सर्व सुखें जिया पासुनु।
तें ग्रंथवेषें अवतरौन । स्त्रवे षड्रसातें ॥
कीं ते आद्य लक्ष्या आद्या शक्ती। जियेची सांघातिनी वेंधवती।
ते रसफळांचा घड घेवोनि हातीं। कवतुकें क्रीडा करी ॥
कीं तो अनरागू आंगें आकारला । की उत्कंठेसो योगू पातला।
तो कवितामिषें प्रवर्तला। माझां हृदयीं ॥
कीं ते लावण्यलतेसी रसाळें। लागली शांतिक्षमे चीफळें।
कीं शृंगारू फुलला परिमळें। साहित्याचेनो ॥
कीं सौंदर्यसंगीत उल्हासलें । औदार्य तुळापुरुषीं बैसलें।
कीं सौभाग्यें हात सौरभ्यें वसिले। श्रोतयां लागी ॥
कीं ते शब्दब्रह्मीची देवता अधिष्ठात्री। जे अनादि सिद्ध असे निराकारी।
ते संदेह तोडावया मोहा खेचरी। प्रत्यक्ष झाली ॥

या ग्रंथाचे शेवटीं

" ऐसा श्री मूर्तिप्रकाश ग्रंथू। पुसी मासाअंतू।
तिथी शुद्ध पक्ष बीजे अंतू। संपूर्ण जाला ॥
वृषभ नाम संवत्सरीं। श्रवण नक्षत्र हरिण योगू गुरुवारीं।
संपूर्ण झाला चौथा प्रहरीं। हनुमंत ग्रामीं ॥

असा काल दिला आहे. दुसरे ठिकाणीं '१२०६ (१२१० खोडून कोणीं १२०६ केलें आहे) शक, विजय संवत्सर, फाल्गुन दशमी (शुद्ध कीं वद्य तें दिलें नाहीं) गुरुवार, अनुराधा नक्षत्र, सोभाग योग, बालवनाम करण ते दिवशीं केसोव्यासातें व्यवहारा धरौनि नेलें.' असा लेख आढळतो.

या गोपाळापेक्षां याचा भाऊ जो केशव तो वयानें ल्हान होता पण ज्ञानानें व ग्रंथकर्तृत्वानें हा फार मोठा होता. यास 'केशवराजसूरी' असें म्हणतात. यानें संस्कृत व मराठी मिळून बरीच रचना केली आहे. यानें रचिलेले पंधरा-सोळा मराठी ग्रंथ उपलब्ध आहेत. यांपैकीं 'मूर्तिप्रकाश' नांवाच्या ग्रंथांत यानें श्रीचक्रधराचें वर्णन व त्याचे संबंधाची माहिती फार आदरानें व प्रेमभावानें सांगितली आहे. यानें चक्रधराला प्रत्यक्ष पाहिलेलें असल्यामुळें या ग्रंथावरून चक्रधराच्या स्वरूपाचा अदमास बांधतां येतो. आपल्या इकडील एकंदर कवींप्रमाणें ग्रंथ अतिशयोक्तीनें भरलेला आहे. परंतु रचना व भाषाशैली फार चांगली आहे. या केशवाचा आत्मविश्वासहि दांडगा आहे. तो आपल्या ग्रंथारंभींच प्रतिज्ञा करून सांगतो कीं :—

> वानितां श्रीचक्रधराचा मूर्तिमयंकु । आनंदें डुलवीन त्रिभुवनीचा लोकू ।
> सुमना करीन संतोषु । सभेचिया ॥
> जाणिवेचेनि रसें सुरांगें । शृंगारु शांतिक्षमेचि योगें ।
> जळकेली खेळवीन ज्ञानगंगे । मनें महंतांचीं ॥
> चातुर्याचेनि सौरसें । छेदीन महामूर्खाचें पिसें ।
> कविता लते लावीन (पा. भे. लेववीन) घोसें । सारस्वत फळांचें ॥
> जयासीं जैसी भावना । तया तैसाचि भावो आणीन मना ।
> जेंवी कल्पतरू पुरवी कल्पना । आपुलेनि आंगें ॥...
> म्हणौनि वाखाणितां श्रीरंगू । न पडे श्रोतियांचा पंगू ।
> साउमा सांघैन कथा प्रसंगू । मूर्तिज्ञानाचा ॥

केशवराजसूरीची उपमा देण्याची हातोटीहि फार सुंदर आहे. किंबहुना, या काळच्या सर्व चांगल्या कवींचे ग्रंथांत उपमा, उत्प्रेक्षादि अलंकारांचा केवळ पाऊस पाडलेला दिसतो. हा याच 'मूर्तिप्रकाश' ग्रंथासंबंधें म्हणतो कीं, हा माझा ग्रंथ म्हणजे केवळ

> ब्रह्मविद्येची कसवटी । पाहाता सकळ शास्त्रातें दळवटी ।
> कीं ज्ञानरत्नाची उघडली पेटी । सारग्राहकां लागी ॥...

कीं ते परब्रम्हची निजकीर्ती । जीव उद्धरावया आली व्यक्ती ।
ती परावाचा ईश्वर प्रवृत्ती ।मूर्ति जाहली ॥
कीं भरौनि नित्य सुखाचां ताटी । मियां ठेविली ब्रह्मरसाची वाटी ।
तें सुमनें लावोनि वोठी । पान करितु ॥
कीं कारुण्य शक्ति आपण । निफजविलें प्रेमाचें पक्वान्न ।
तें आर्ती करावें भोजन । आवडीपूर्वक ॥
कीं ते कृपेची कामधेनू ।सर्व सुखें जिया पासुनु ।
तें ग्रंथवेषें अवतरौन । स्त्रवे षड्रसातें ॥
कीं ते आद्य लक्ष्या आद्या शक्ती । जियेची सांघातिनी वेंधवती ।
ते रसफळांचा घड घेवोनि हातीं । कवतुकें क्रीडा करी ॥
कीं तो अनरायू आंगें आकारला । की उत्कंठेसी योगू पातला ।
तो कवितामिषें प्रवर्तला । माझां हृदयीं ॥
कीं ते लावण्यलतेसी रसाळें । लागली शांतिक्षमे चीफळें ।
कीं शृंगारू फुलला परिमळें । साहित्याचेनी ॥
कीं सौंदर्यसंगीत उल्हासलें । औदार्य तुळापुरुषीं बैसलें ।
कीं सौभाग्यें हात सौरभ्यें वसिले । श्रोतयां लागी ॥
कीं ते शब्दब्रह्मीची देवता अधिष्ठात्री । जे अनादि सिद्ध असे निराकारी ।
ते संदेह तोडावया मोहा खेचरी । प्रत्यक्ष झाली ॥

या ग्रंथाचे शेवटीं

" ऐसा श्री मूर्तिप्रकाश ग्रंथू । पुसी मासाअंतू ।
तिथी शुद्ध पक्ष बीजे अंतू । संपूर्ण जाला ॥
वृषभ नाम संवत्सरीं । श्रवण नक्षत्र हरिण योगू गुरुवारीं ।
संपूर्ण झाला चौथा प्रहरीं । हनुमंत ग्रामीं ॥

असा काल दिला आहे. दुसरे ठिकाणीं '१२०६ ( १२१० खोडून कोणीं १२०६ केलें आहे ) शक, विजय संवत्सर, फाल्गुन दशमी ( शुद्ध कीं वद्य तें दिलें नाहीं ) गुरुवार, अनुराधा नक्षत्र, सोभाग योग, बालवनाम करण ते दिवशीं केसोव्यासातें व्यवहारा धरौनि नेलें.' असा लेख आढळतो.

यानें आपला गुरु जो नागदेवाचार्य त्यानें केलेला उपदेश मनांत आणून त्याचा मतलब 'गुढे' ग्रंथांत गद्य भाषेंत सांगितला आहे. या ग्रंथाच्या दरएक भागाला 'गुढा' असें म्हणतात. असे या ग्रंथांत बारा भाग किंवा 'गुढे' आहेत. तसेंच 'लापनिक' या ग्रंथांत यानें ११४ दृष्टांतांचा एकमेकांशीं असलेला संबंध जुळवून दाखविला आहे. हाहि ग्रंथ गद्य आहे, व दरएक दृष्टांतानंतर त्याचें 'तात्पर्य' शेवटीं यानें सांगितलें आहे, त्यास 'दृष्टांतिक' असें म्हणतात; म्हणजे एकंदर क्रम असा होतो:-प्रथम सूत्र, सूत्रावर दृष्टांत, आणि दृष्टांताच्या नंतर त्याचें तात्पर्य किंवा त्यापासून निघणारा 'सिद्धान्त.'

याच्या सर्व ग्रंथांत 'सिद्धांतसूत्रपाठ' हा अतिशय प्रसिद्ध आहे. हा सर्व ग्रंथ प्रत्येक महानुभावपंथी मनुष्य प्रथम पाठ करतो व ज्याला हा येतो तो त्याचा पाठ नित्य नियमानें करीत असतो. हा ग्रंथ म्हणजे यानें महींद्रभटाच्या ग्रंथांतून निवडलेलीं वाक्यें ऊर्फ 'सूत्रें' होत. या सूत्रांवर त्यांचे स्पष्टीकरणार्थ ११४ दृष्टांत केशवराजसूरीनें सांगितले आहेत. ज्यांत हे दृष्टांत दिले आहेत. त्या ग्रंथास 'दृष्टांतिक' असें म्हणतात. यांतून एक दृष्टांत पुढें देतों व मागें दिलेला क्रम स्पष्ट करतों:—

**(मळ सूत्र) " अनंतशक्ती : परमेश्वरु : सकळांसी हीं विषय वेवस्था करीति ॥ २२४ ॥" विच्यार : प्रकरण ११**

(या सूत्रावर 'दृष्टांत'–)

**सर्वज्ञें भणतिलें : अनंत शक्ति : परमेश्वरु सकळांसीं हीं विषय वेवस्छा करीति ॥ १ ॥ गांवां हस्ती आला तें आत्यंध हस्तीतें पाहों गेलें : एकें पावो देखिला : एकें सोंड देखिली : एकें कानु देखिला : एकें पाठि देखिली : एकें पोट देखिलें : एकें पूंस देखिलें : मग एकमेकेंसीं सवादति : हा रे तुवां हृस्ति देखिला : पावो देखिला तो म्हणे हृस्ति खांबा सारिखा : सोंड देखिली तो म्हणे हस्ति मूसळा सारिखा : । : कानु देखिला तो म्हणे हृस्ति सूपा सारिखा : । : पाठि देखिली तो म्हणे हृस्ति भींता सारिखा : । : पोटु देखिलें तो म्हणे हस्ति कोथळेया सारिखा : । : पूंस देखिलें तो म्हणे**

हस्ति खराटेया सारिखा :।: ऐसें एकमेका उरोधीति : तेयामध्यें डोळसू असे तो म्हणे हा हस्तीचा एकेकु अवयेवु होय : पर हस्ति नव्हे : ऐसां अवयेबी युक्त तो हस्ति :॥: (दृष्टांतिक)

तैसें जयासि जे शक्ति प्रकाशली असें : तो तिथे शक्तितें : परमेश्वरु : म्हणे : ज्ञानियां असें तो म्हणे हे ईश्वराची एकेकि शक्ति होय. पर : परमेश्वरु : नव्हे : ऐसा शक्तीं युक्त तो : परमेश्वरू ॥ ४३ ॥

केशवराजसूरीप्रमाणेंच दामोदर पंडित हाहि विद्वान् ब्राह्मण होता. यानें शके ११९४-मध्यें महानुभाव-पंथ स्वीकारिला. याच्या बायकोचें नांव हिरांबा. हीहि फार विदुषी स्त्री होती. उत्तर-वयांत या दोघांनीं संन्यासदीक्षा घेतली; व पुढें हीं दोघेंहि नागदेवाचार्याजवळ राहूं लागलीं. पंडित दामोदर हा जसा विद्वान् होता तसाच गायनपटुहि होता. यामुळें हा प्रेमळ स्वरगायनानें परमेश्वरास सारा वेळ आळवीत असे. पण त्यास आचार्यांनीं या 'गीतगायनीं निराकरण' केलें; तेव्हां उघडपणें गात बसणें यानें बंद केलें. पण तो लहानपणापासूनचाच नाद असल्यामुळें तितका सुटला नाहीं; व हा एकटाच असतां गोड आलाप घेऊन गीतें गाई. एके दिवशीं हा असा ईश्वरचरितगीतें मधुर कंठानें गात असतां आचार्य तेथें आले व याच्या मागें उभे राहिले. आचार्य आल्याचें याला भान नसल्यामुळें हा तसाच आलाप घेत परमेश्वराला आळवीत राहिला. याचें तें प्रेमळ गाणें ऐकून आचार्यांची तंद्री लागली, व ते सद्गदित होऊन त्यांच्या डोळ्यांवाटे प्रेमाश्रु वाहूं लागले. तेव्हां त्यांनीं पुढें होऊन दामोदर पंडिताची पाठ थोपटली व केलेली मनाई रद्द करून त्यांनीं त्यास याप्रमाणें ईश्वरगीतें गाण्याची आज्ञा केली. यास जरी गाण्याचा नाद होता तरी हा आचरणानें फारच शुद्ध असे. याचेप्रमाणें याची बायकोहि फार कडकडीत वृत्तीनें राही, व असेंच कडकडीत आचरण इतरांकडून ठेवविण्याविषयीं ती फार दक्ष असे. यामुळें तत्कालीन महानुभाव संन्याशांवर हिचा वचक चांगला होता. हिरांबाचा नवरा म्हणजे दामोदर पंडित हाहि आचरणानें अत्यंत शुद्ध होता. यानें

'वत्सहरणे' कथेवर सुंदर ग्रंथ लिहिलेला उपलब्ध आहे. दामोदर पंडित म्हणतो—

"जे अज्ञान तमाचा तरणी : कैवल्य पदाची निसाणी : ते श्री कृष्णकथा 'वत्सहरणी' : सांघिजैल ॥ जे जीवांतें चोखाळती : कां कामनातें नीववती : भक्तिभावातें पोषिती : श्रवणमात्रें ॥'

अशी ही माझी प्रबंधरचना कदंब-परिमळाप्रमाणें सर्वांस वेधून टाकील, पण

"जैसी कुलस्त्रियेची गुणसंपत्ती : भोगावी एकेचि पतीं : तैसीं हरिकथारसीं रती : भक्तांवाचौनि नाहीं."

अशा प्रेमळ भक्तजनांना कृष्णकथेंत नवरसांचा भोग नित्य अनुभविण्यास सांपडेल. याच ग्रंथांत कृष्णदर्शनामुळें सर्व प्राणिजात कसे प्रेमळ व सात्त्विक होऊन गेले तें सांगतांना कवि म्हणतो—

जें देॐ रासक्रीडा खेळिन्नला : तें मूर्त शृंगारु जाला : गौळणी विनोदें नाचवीला : तें हास्य रसू ॥ यशोदा भेडाविला : तें करुणा रसू उठेवला : विषारू काळिया जितिला : तें रुद्रू जाला. ॥ मातें श्रीमुख दाविलें : तें अद्‌भुता रूप जालें : विश्वरूप प्रगटिलें : तें भयानकू ॥ दैत्या करी संहारू : तैचि बिभत्सू आणि वीरू : शांतु तो निरंतरु तेथेंचि असे ॥ ५४ ॥

ऐसे नवरसू नाटक : देॐ खेळे जनमोहक : निजरूप तें ब्रम्हादिकां : ठाउकें नव्हे ॥ निर्गुण कां जाहलें सगुण ? : निराकारा साकारपण : निरभिमाना दैत्य निर्दाळण : हें कां घडे ? ॥ अरूपा रूप सुंदर : अमूर्ता मूर्ति मनोहर : अद्वैता अनंत अवतार : हें नवल देखा ॥ अनामेया सहस्र नामु : कुमरें अंतौरें आत्मयारामु : आश्रमधर्मी परब्रह्मा : हे विरुद्ध देखा ॥

या सर्वांचें उत्तरहि दामोदरानें आपल्या ग्रंथांत दिलें आहे. वत्सहरणाखेरीज याचे आणखीहि पांच-सहा मराठी ग्रंथ आहेत. याची मराठी-हिंदीमिश्रित, तशीच हिंदी व संस्कृत रचनाहि आहे.

---

१. या 'वत्सहरण' ग्रंथांत दामोदरानें 'केशव पंडिताचें' नांव घातलें आहे, व केशव पंडितानें केलेल्या 'रत्नमाला' स्तोत्रांत त्यानें दामोदर ंडिताचें नांव घातलें आहे. हे दोघेहि मोठे स्नेही होते.

दामोदर पंडिताप्रमाणेंच नरेंद्र पंडितहि कृष्णकथेचें निरूपण फार रसाळ वाणीनें करितो. हा नरेंद्र पंडितहि याच काळीं हयात होता. नरेंद्र पंडिताचें उपनांव अयाचित. हे तिघे भाऊ होते. नृसिंह, शैल्य आणि नरेंद्र. हे सर्व रामदेवराव जाधवाचे आश्रित असून त्याचे दरबारीं जात असत. यांपैकीं नृसिंहानें 'नलोपाख्यान' लिहिलें व शैल्यानें 'रामायण' लिहिलें; आणि या दोघांनींहि आपले ग्रंथ राजसभेंत नेऊन वाचून दाखविले. ते ऐकून नरेंद्रानें शैल्य कवीस म्हटलें—'याप्रमाणेंच श्रीकृष्णचरित्रपर ग्रंथ लिहिलात तरी तुमच्या जन्माचें सार्थक होईल.' जवळच रामदेवराव राजा बसला होता. तो हें ऐकून नरेंद्र पंडितास म्हणाला, 'पंडित, तुम्हींच एक असा ग्रंथ कां लिहीत नाहीं? तुम्हींहि ग्रंथ रचून दाखवावा.' हें राजाचें भाषण ऐकून नरेंद्र पंडितानें थोड्याच अवधींत 'रुक्मिणीस्वयंवर' नांवाचा सुमारें अठराशें (१८००)ओव्यांचा ग्रंथ रचिला व तो आपल्या दोन्ही भावांसह जाऊन राजसभेंत वाचून दाखविला. ग्रंथ वाचतां वाचतां 'देवांचेया दादुलेपणाचा उबारा: न साहेचि सातांही सागरां: भेणें वोसरोनि राजभरा: दिन्हली द्वारावती ॥ ३१२ ॥' या ओवीपर्यंत ग्रंथवाचन आलें असतां मध्येंच वाचन थांबवून राजा नरेंद्रकवीस म्हणाला, 'या ग्रंथाचे शेवटीं तुम्हीं आमचें नांव घालावें. ग्रंथांत जितक्या ओव्या आहेत तितकें सुवर्णद्रव्य तुम्हांस देऊं.' यावर कवीनें उत्तर दिलें, 'हें असें केलें असतां मला इतर कवि हसतील व नांवें ठेवितील. आमच्या कविकुळास बोल लागेल.' कवि संतोषानें आपलें म्हणणें मानीत नाहीं असें पाहून राजानें तोहि ग्रंथ त्याजपासून बलात्कारानें हिसकावून घेतला. हें पाहून नरेंद्रानें राजास म्हटलें, 'महाराज, या ग्रंथांत अजून कांहीं शोध घालावयाचे राहून गेले आहेत; तर आज हा ग्रंथ मजजवळ परत द्यावा. हा नीट संशोधून उदईक सकाळींच मी परत आणून देईन.' कवीचें म्हणणें ऐकून राजानें हेमाद्रिपंडितास विचारिलें.

१. नामदेवानें उल्लेखिलेला रसाळ रामायण लिहिणारा जो साळया रसाळ तोच हा शैल्य असावा, अशी शंका येते.

तेव्हां तो हेमाडपंत म्हणाला, ‘ आम्ही ब्राह्मणलोक. आम्हांस आपलाच राजाश्रय. तरी ग्रंथ आपण मागावा व आम्हीं तो आपणांस देऊं नये, मग तो कोणास द्यावा ? ’ असें राजास म्हणून हेमाडपंतानें नरेंद्रकवीकडे पाहिलें व त्यास विचारिलें, ‘ हे कवींद्र पंडित ! तुम्हांस राजाचें सांगणें मान्य आहे ना ? ’ यावर नरेंद्रानें उत्तर दिलें– ‘ आम्ही राजाचेच आहों. मग ग्रंथ देण्यास दोष कशाचा ? ‘ रामायण ’ व ‘ नलोपाख्यान ’ हे दोन्ही ग्रंथ नाहीं कां दिले ? तसेंच हें ‘ रुक्मिणीहरण’हि कां न देऊं ? यांत शेवटीं राजवर्णन केलें, तें काय उगाच केलें ? ’ असें म्हणून नरेंद्रानें तो भाग तेथें वाचून दाखविला. तो ऐकून राजा संतोष पावला; त्यानें कवीचा ग्रंथ कवीस परत दिला; व ग्रंथ सकाळीं लौकरच परत आणावा, असें पुन्हां एकदा बजावून सांगितलें. ग्रंथ हातीं पडल्यावर नरेंद्र घरीं आला व त्यानें आपल्या शैल्य आणि नृसिंह या दोन्ही बंधूंस म्हटलें, ‘ आपण तिघे मिळून रातोरात बसून ग्रंथ लिहून काढावा ! असा विचार करून तिघेहि लिहावयास बसले. सुमारें नऊशें ओव्या ग्रंथ लिहून झाला तोंच सकाळ झाली; व राजाचें ग्रंथ घेऊन येण्यास बोलावणें आलें. त्याबरोबर ग्रंथ घेऊन नरेंद्र रामदेवराव राजाकडे गेला, आणि तो त्यानें राजास दिला. बाह्यात्कारीं प्रसन्न मनानें ग्रंथ दिला खरा, पण आंतून मनापासून ही गोष्ट नरेंद्रास आवडली नाहीं. ग्रंथ देऊन तो तसाच खिन्न मनानें घरीं परत आला, व लगेच ग्रंथ नऊशें ओव्या-पर्यंतच पुरा केला. हें केलें तरी नरेंद्राचें चित्त स्थिरावलें नाहीं. मनाला जी एकदा संतापाची ज्वाला लागली, तिच्या योगानें त्याची संसारेच्छा सर्व होरपळून गेली. आणि मग त्याच्या मनानें वैराग्य-वृत्ति धारण केली. लौकरच तो राजा, तें राज्यैश्वर्य, ती त्याची राजसभा, तो लौकिक आणि सर्वांचें आदिमूळ जो गृहस्थाश्रम या सर्वांचा त्यानें त्याग केला. आणि तेथून निघून तो श्रीनागदेवाचार्यांकडे येऊन त्यानें संन्यासग्रहण करून महानुभावांचा पंथ स्वीकारिला. महानुभाव ग्रंथकार लिहितात कीं, अशा रीतीनें ‘ नरेंद्र ’ कवि महात्मा पंथांत आले आणि त्यांचा ग्रंथहि

आला. असें म्हणतात कीं, यापुढें संन्यासदीक्षा घेतल्यानंतर लोकांच्या आग्रहावरून तो ग्रंथ पुढें आणखी पुन्हां लिहिला व शके १२१३-मध्यें पुरा केला. या ग्रंथाची हल्लींची ओवीसंख्या तीन हजार आहे.

श्री प्रौढप्रताप चक्रवर्ती रामदेवराव महाराजास, जो ग्रंथ ऐकून त्यावर आपलें नांव असावें अशी लालसा उत्पन्न झाली अणि जी त्यानें सभेंत दर्शितहि केली, तो ग्रंथ कसा आहे हें जाणण्याची जिज्ञासा प्रत्येकाचे मनास साहजिकपणेंच होईल. ती कांहींशी तृप्त करितां यावी, म्हणून या ग्रंथाच्या प्रारंभींच्या व शेवटच्या कांहीं ओव्या येथें देतों.

उमे शंकराचा कुमरु । कीं सांघों गणांचा ईश्वरु ।
तो सेन्दुर साडंवरू । गोरा मेरू जैसा ।।
तेयांचा ठाई सिद्धिचें स्वर्ग । नानाविध वसताति भोग ।
तेणें आधारे देवो अन्यग । सुरवाडलें ।।
दान मंदाकिनीचेनि वोलें । विद्याचे नंदन वन पाल्हैले ।
दाताचेनि तेजें सूर्ये आटले । विघ्नतमु ।।
ते गणराजाचें उदार रूपडें । थोरपणें देवतें जिंतिलें होडें ।
कवीसी शब्दब्रह्माची राणीव कोडें । जेणे पाळिली ।।
गणेशे मनोरथ–मुद्रा दीधळी । कविता पीडिये शेष भरिली ।
तंव शारदा देखिली । सारस्वत काळेंसी ।।
ते देवी कवीकुळदीपकु । कीं साहित्य सृष्टीचा चाळकु ।
कीं सारस्वत गंगेचा त्र्यंबकु । कुमारीवेषें ।।
जियेचिये आंगाचिये वोपे । मोतियांचें लेणें हारपे ।
वाटोगरे याचा गवसनी घापे । पूजेचेनि मिषें ।।
ते विद्याधरी कवणा वाखाणें । जियेचिया रूपाचें चांदिणें ।
कवीस दाखवी वोपणें । प्रमेयाचें ।।

---

१. ऐसे रुक्मिणी स्वयंवरू बोलिलें । प्रत्यस्थान प्रांतीं कथिलें । गंगातटीं समाप्तो पावलें । यथा ग्रंथातें ।। मुद्गला उत्तरे प्रांतीं । ग्राम नामू वृषभराशी निरौति । तेथें पावविला निहविती । ग्रंथू मियां ।। शके द्वादशशतें त्रयो–दशोत्तरें । वृषभनाम संवछरे । ग्रंथ केला एकसरें । माघ वद्य चौथीशीं ।।

ही संपूर्ण केलेली अशी या ग्रंथाची एक प्रत कृष्णराजदादा लासूरकर यांचे ग्रंथसंग्रहांत आहे.

ते आदि कुमारी विनोदें । महाकवी नवरसाचें घउदे ।
येहे देउनि परीयेदें । अनुहत शब्दीं ॥
ते देवता तरी शब्द-ब्रह्माची । पण विद्यावंती राया भुराराची ।
तिये सलगी देवाचिये भाटिवेंची । दीधली सामग्री ॥
तिया संतोषें बाइला । अमृताचा अभि-शेकु केला ।
हातीं परिमेळु दीधला । रसफळांचा ॥
तिया आपुलिया कणवा महाकवी । नवरसाचे मेघ वोळवी ।
सावायाचे दीवसे खोलवी । कवितेपुढें ॥
कवी चालती तेणें उजियेडें । जरी गुरु कृपेचें आंजन जोडे ।
तैंचि ठेवें दीसती चोखडे । श्रीकृष्णकथेचे ॥
श्रीकृष्णाचा वाणिता कीर्तिचंद्रु । चढवीन सुखाचा समुद्रु ।
जलसन करीन म्हण नरेंद्रु । सभचे लोक ॥
कुंकुमाची वोली लांबी । तिया मुक्ताफळांचियां तुरंबी ।
तैसिया अक्षरांचियां लोंबी । कविता लते ॥
प्रबंधीचा झळके परिमळु । तेथ स्वाचना होये मळयानिळु ।
सरा उदेपदाचा ढाळु । कामिनी कटाक्षासी ॥......

याप्रमाणें सुरुवात करून रुक्मिणीहरणापर्यंतची सर्व कथा बावीस अध्यायांत २९९७ ओव्या रचून सांगितल्यावर शेवटच्या म्हणजे तेविसाव्या अध्यायास सुरुवात केली आहे. यांत श्रीकृष्ण रुक्मिणीला बरोबर घेऊन द्वारकेस परत आले तेव्हां त्यांचा लोकांनीं जयजयकार केला ती हकीकत सांगतांना शेवटीं हा नरेंद्र म्हणतो—

देव उतरले नगरा बाहे प्रदेशीं । तव रचना केली द्वारकेसी ।
गुढीया तोरणें मखरें कैशी । शोभताती ॥
गारे चांदिणें कामथीलें जैसे । मध्यें उरंग बालार्क बींबाची वान श्री दीसे ।
तेवी मखराची । उभणी मीरवतु असें कृष्ण मे–चु–ची ॥
आणि ओलेया चंदनाचीया डोळी । उंचा दीसती सरळी ।
तेथें अशोक पल्लवीची कोवळी । अल्लोहीते दिसती तोरणें ॥
आकाशाचिये पोकळी माझारी । झळफळीत दिसे सौदामिन्यांची लहरी ।
तैसीया गुढीया दिसती घरोघरी । एक सरें ॥

ठाई ठाई खनो खनी । होताती ना-ता रंभीची पेरवनी ।।
आणिक नगरीचिया सोवासनी । वोवाळू आलिया देवासी ।।
आणिक नगरीचे लोक पाळ । देवो पाहोवेया आले सकळ ।
शृंगार करूनियां धकुटीया आबलां । पाहावेया येती वहरातें ।।
तंवं आस्तगत जाला दिनकरू । आंधार प्रवर्तला थोरू ।
मग लाखैवेयाचा आपारू । उजियड पडे ।।
उपासिरी दिसताती लाखैवे । आणि गगनामाजी उजळले कुळिवें ।
जैसे आदित्य दिसती आघवे । तिये समई ।।
यापरी पळाला आंधारू । उजियेड पडला सविस्तरू ।
मग साउमा निगाला चतुरू । सत्वधानातें ।।
वाद्यांतरे वाजवित गजरें । साउमे आलें लोकपाळ एकसरें ।
मग भेटी देउनी श्रीचक्रधरें । पुरस्कारिलें समस्तासीं ।।
मग टीळे गंधाक्षता लाविती । कापूर निवंद्य विडे देती ।
बाहेर बैसविलें प्रस्तूती । हास्तिनी वरी ।
यरे वऱ्हाड चालें पूर्वा परी । दाटनी थोर जाली तिया अवसरी ।
मग परिवारू रिगें चौसटी द्वारीं । नगरामाजी ।।
मग वाजत गाजत राजबिदी । बाहेर मिरवताये घनदाट मांदी ।
चालता दिसे राजसा पदी । हळू हळू ।।
तेथ भाट पढती ब्रिदावळीं । बापू वैरी जींतिलें सर्व दळी ।
पाठी कन्यारत्न प्रणिलें तेव्हेलीं । भीमकाचे ।।
मग पातला राजमंदीराचा दारवठा । तेथे राहवीले सुभटां ।
तेव्हेंळी भीतरीं बाला पैठा । आपुलिये राजमंदिरीं ।।
तेथें पाट पासवडीला रत्न खचीतु । वरी नोवरा बैसवीला श्रीकृष्णनाथू ।
वामांगि रुक्मिणी सहितु । मीरवतु असें ।।
मग ओवाळिती चतुर्विधानारी। आक्षवानी नींबलोण करिती विद्याधरी ।
मग पाठवणी दीधली सपरिवारी । समस्ता रायासी ।
मग आरोगणा जाली वोहोरा । आणि सेवका पांतीकरा ।
कर्पूर नीवद्य अवघरा । वीडे दीघलें ।।

आधीचि विश्वकर्मेनी चतुरें। दामोदर रचिलें होतें सविस्तरें।
सत्तावीसा खनाचें श्रीचक्रधरें। आळंकरिलें होतें ॥
तेथ भवर पलकामाचेयावरी। वोहोर बैसविलें तीये अवसरी।
पुढा नरेंद्रकवि स्तुती करी। हात जोडौनीया ॥......
जये जये सकळ गणाधीपती। सेवक मी करित असें विनती।
देई आपुली नीज भक्ती। नरेंद्र म्हणे ॥
ऐसेया परि जालें रुक्मिणी स्वयेंवर। मग देवे आधीष्टीलें द्वारकापूर।
पाठी नमीले समस्त कवेश्वर। आदरेंसी॥
श्रीभागवत पद्मपुराणी। या कामधेनु दोनी। दोहीलीया आदुभणी।
मग केले रुक्मिणी। स्वयंवर॥
म्हणौनी उपसाहावें सकळ श्रोता। म्यां वर्णीली श्रीकृष्णकथा।
जे पूर्वि व्यासादिकासी कथीता। आली होती पुराणश्रुती॥
तोची मज लाधला होता प्रसादु। म्हणूनी हा केला नेणता प्रबंधु।
प्रिति पावो श्रीयेसहीत गोवींदु। स्वामी माझा॥
ऐसो बाग्पुष्पीमाला। वोवीया एकोणतीस शतें एकूणचाळीस सरळा।
पूजा केली श्रीचरणकमळा। देवरायासी॥
जेयासी परमेश्वर भक्तीची चाड। ते ऐकतू हे कथा अमर गोड।
तेयां कांहींची नाहीं अवघड। जन्म मरणाचें॥
हे पुण्य पावनमराठी। आइकती आदरें कर्णपुटी।
तेयासी कवन्ही न पडे कामाठी। संसाराची॥
ऐसी प्रबंध रचना वाणिता। संतोष मानीतू श्रोते आतां।
आर्पित पावो श्रीजगंनाथा। विनती माझी॥

हा ग्रंथ नरेंद्रानें महानुभाव-पंथ स्वीकारिल्यानंतर पुरा केला, अशी आख्यायिका वर दिली आहे; पण या आख्यायिकेसंबंधीं एक-दोन विचार सहजासहजीं मनांत येतात. प्रथम तर चक्रवर्ती रामदेवराव राजाच्या इच्छेनें व अनुज्ञेनें ज्यानें हा रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ रचिण्यास प्रारंभ केला व जो ग्रंथ सर्व प्रकारांनीं नृसिंहाच्या व शैल्याच्या ग्रंथांशीं तुलनेनें उणा न वाटतां सरसच वाटावा, ही ज्याच्या मनाची हाव होती, तो कवि आपला ग्रंथ संपूर्ण केल्याशिवाय राजसभेंत दाखविण्यास नेईल, असें

वाटत नाहीं. दुसरें, भंगलेली मूर्ति व अर्धा तुटका ग्रंथ कोणालाहि पूज्य होणार नाहीं. तशांत या कथनकांत कृष्णाचा पराजय किंवा कांहीं कमीपणा आणणारें पर्यवसान झालेलें असतें तर ती गोष्ट निराळी होती; पण तसें कांहींएक नसतां शेवटींच तर सर्व कथनकाचें सार आणि गम्मत आहे. तेव्हां अशा स्थितींत तो ग्रंथ पूर्णपणें संपविल्याशिवाय ग्रंथकार कोणासहि दाखविणार नाहीं. यावरून हा ग्रंथ नरेंद्रानें महानुभाव-पंथ स्वीकारण्यापूर्वींच सबंध रचून पुरा केला असावा, असें वाटतें. तसेंच, या ग्रंथाच्या प्रारंभीं व अंतींहि महानुभावपंथांतील ग्रंथांपेक्षां हिंदूंच्या इतर पंथांतील ग्रंथांप्रमाणेंच नमन, अर्पण वगैरे प्रकार आहेत. यावरून तर वरील संशय जास्तच दृढ होऊं पाहतो. आणखी एक बाब अशी कीं, या ग्रंथाचें पूर्वार्ध मात्र महानुभाव-पंथांतील ग्रंथ-संग्राहकांच्या संग्रहीं हमेश नजरेस पडतें; उत्तरार्ध अनुपलब्ध आहे, असाच त्यांपैकीं बहुतेकांचा समज आहे. मोठ्या प्रयासानें याची साग्र प्रत एकाच मठाधिपतींच्या संग्रहांत आढळली व तिजवरून त्यांच्या कृपेनें हा शेवटला उतारा मला येथें देतां आला. आतां महानुभाव लोक आपल्या पंथाबाहेर रचिलेल्या ग्रंथांचा संग्रह करीत नाहींत. ज्ञानेश्वरीचीदेखील एकहि प्रत त्यांच्या संग्रहांत व त्यांच्या लिपींत लिहिलेली मला अजून आढळली नाहीं. असा त्यांचा कडक निर्बंध असतां, नरेंद्राच्या ग्रंथाचा उत्तर-भाग त्यांच्यांत सर्वभर उतरलेला असूं नये, ही गोष्ट विचारणीय आहे. हा उत्तरार्ध पंथ स्वीकारिल्यानंतर मागाहून लिहिला असता तर ते त्याचा संग्रह व प्रसार अवश्य करण्यास चुकतेना. यावरूनहि हा साग्र ग्रंथ प्रथम लिहिला असावा, असेंच ठाम वाटूं लागतें. बाकी रचना केव्हां कां झालेली असेना, महाराष्ट्र-सारस्वतांच्या दृष्टीनें हा जुना व सुंदर ग्रंथ सर्व मराठी भाषाभिज्ञांच्या आदरास व कौतुकास योग्य आहे, यांत लवमात्र संशय नाहीं.



## चार भावंडँ

महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या अनेक परंपरांपैकीं नाथपरंपरा ही फार प्रसिद्ध आहे. या परंपरेचा आदिगुरु 'आदिनाथ' म्हणजे 'त्रिपुरारि' हा होय. ही गुरुपरंपरा श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या 'ज्ञानदेवी' ग्रंथांत पुढीलप्रमाणें सांगितली आहे.

क्षीरसिंधुपरिसरीं। शक्तिचां कर्णकुहरीं। तेथें कें श्रीत्रिपुरारी। सांघितलें जें ॥ तें क्षीरकल्लोला आंतु। मकरोदरिं गुपितु। होता तेयाचा हातु। पैठें जालें ॥ तो मछप्रसवसृंगी। भग्नावयव चौरंगी। भेटला तो सर्वांगि। संपूर्ण जाला ॥ मग समाधि अव्यया इया। भोगाचा वासनां इया। ते मुद्रा श्रीगोरखराया। दिधली मीनीं ॥ तेणें योगाब्जिनीसरोवरू। विषयविध्वंसैकवीरु। तिये पदीं कां सर्वेश्वरु। अभिषेकिला ॥ मग तेहीं शांभव। अद्वयानंदवैभव। संपादिलें सप्रभाव श्रीगायणिनाथीं ॥ तेणें कलिकलितभूतां। आला देखौनि निरुता। आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा। दीधली ऐसी ॥ अनादिगुरुशंकरा। पासौनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा सवंसरा। जाला आमतें ॥

म्हणजे यावरून ज्ञानेश्वरमहाराजांची परंपरा पुढीलप्रमाणें होते– आदिनाथ मच्छींद्रनाथ – गोरक्षनाथ – गैनीनाथ – निवृत्तिनाथ – ज्ञाननाथ ऊर्फ ज्ञानदेव.

या परंपरेंतील गैनीनाथापुढील शिष्य म्हणजे ज्ञानेश्वरादि चार भावंडें होत. या भावंडांचें घराणें यजुर्वेदी, वत्सगोत्री, वाजसनेय शाखेचें होतें. यांचे कोणी हरिहरपंत नांवाचे एक पूर्वज गोदावरीच्या तीरीं आपेगांवास राहत असत. हरिहरपंतापासून चौथा पुरुष (--हरिहर → रामचंद्र → गोपाळ → त्र्यंबक असा) त्र्यंबक याची समाधि आपेगांवीं आहे. यानें

---

१. भक्त त्र्यंबकपंत मूळपुरुष आधीं। तयाची समाधी। आपेगांवीं

मुक्ताबाई.

आपल्या उत्तर-वयांत संन्यास घेतला होता. या त्र्यंबकपंताच्या मुलाचें नांव गोविंदपंत. गोविंदपंतास कोणा देवकुळे उपनामक गृहस्थाची कन्या निराबाई ही केली होती. गोविंदपंत व निराबाई या दोघांचीहि गैनीनाथांशीं ओळख असून त्यांचा चांगला घरोबा होता. पुढें यांस पुत्र झाला. त्याचें नांव विठ्ठल असें ठेविलें. विठ्ठलाची मुंज झाल्यावर त्यानें शास्त्राभ्यासास सुरुवात केली. 'केलें वेदपठण। काव्य आणि व्याकरण। झालासे निपुण। शास्त्रवक्ता' असें नामदेव सांगतो. शास्त्राभ्यास पुरा झाल्यानंतर विठ्ठलपंत तीर्थयात्रेस निघाला. यात्रेंतच 'द्वारावती'स जाऊन त्यानें श्रीकृष्णमूर्तीचें दर्शन घेतलें. तेथून पिंडारक, सुदामपुरी वगैरे स्थळें हिंडत-हिंडत कृष्णानें जेथें रुक्मिणीस वरिलें तें ठिकाण पाहिलें. नंतर जेथें त्यानें अवतार-कृत्य संपविलें तें 'भालुका' तीर्थ पाहिलें; व मग प्रभास, सोरटी-सोमनाथ, मुचकुंदगुंफा, धवलपूर वगैरे तीर्थें करून तो त्र्यंबकेश्वरीं गेला. तेथें कुशावर्तांत स्नान करून गंगाद्वारावरून ब्रह्मगिरीला उजवें घालून भीमाशंकरावरून तो पुढें आळंदीस गेला. विठ्ठलपंत हा आळंदीस इंद्रायणीच्या कांठावर बसून स्नानसंध्या व देवपूजा करीत असतां त्याला कुळकर्णी सिद्धेश्वर ऊर्फ सिधोपंत यानें पाहिलें. त्याचें तें शुद्ध आचरण पाहून नमस्कार करून 'तुम्ही कोण ? कोठील ?' वगैरे हकीकत सिधोपंतानें त्यास विचारिली. '**विठ्ठल** हें नाम। **रामेश्वरीं** भाव

---

१. 'गोविंदा विश्रांति गैनिनाथ' 'निराबाईस प्रेम गैनीनाथीं'

२. नगर जिल्ह्यांत जामखेड तालुक्यांत चिचोली येथें गैनीनाथाचें देऊळ आहे. पूर्वीं हें देऊळ फार भव्य असून हेमाडपंती बांधणीचें होतें. तें औरंगजेबानें पाडलें. हल्लींचें देऊळ कोणी लमानराव फत्तेजंग या नांवाच्या पुरुषानें पुत्रप्राप्तीचा त्यानें गैनीनाथास केलेला नवस सफळ होऊन पुत्रप्राप्ति झाली, त्या उत्सवाप्रीत्यर्थ बांधिलें. त्यावर पुढील शिलालेख आहे—

श्रीगैबीवीर

"देवळ बांधले 'लमानराव सहानवे' फतेजंग बा 'दर मोकदम मौजे चिचोली चकले बाटवदे' मामलेबिड सके १६११ वीस्वर नाम संवछरे जैष्ट सुध त्रयोदसी सन ११६६" या देवालयांतील कबरीची पूजा हिंदु व मुसलमान दोघेहि करितात.

वृत्ति **आपेगांव** । गोदातिरीं ॥ मातापिता वृद्ध । वसताती तेथें । द्वारकादितीर्थें करुनी आलों ' असें त्यास विठ्ठलपंतानें उत्तर दिलें. आपल्या गांवांत असा अतिथि आलेला पाहून सिद्धोपंतानें त्यास प्रार्थून आपल्या घरीं नेलें; व त्याचा योग्य सत्कार केला. सिद्धोपंताचे पोटीं एक कन्या मात्र होती. तिला हा वर योग्य आहे, असें पाहून त्यानें विठ्ठलास तिचें पाणिग्रहण करण्याविषयीं विनंती केली;[1] व तिचा त्याच्याशीं योग्य मुहूर्त पाहून विवाह केला. विवाहानंतर व्यंकटाद्रि, अरुणाचल, दक्षिण मथुरा वगैरे तीर्थें करून ज्या ठिकाणीं त्याचा दृढ भाव होता त्या **श्रीरामेश्वर** क्षेत्रीं तो गेला; आणि याप्रमाणें दक्षिणयात्रा आटोपून गोकर्ण, कोल्हापूर करून तो कृष्णा आणि कोयना या नद्यांच्या पवित्र संगमावर स्नान करण्याकरितां कऱ्हाड क्षेत्रीं गेला; आणि तेथून पुन्हां माहुलीस कृष्णा आणि वेण्या या नद्यांच्या संगमावर जाऊन तो आळंदीस आला, व सिद्धोपंताचे घरीं उतरला. शास्त्राभ्यास आणि उत्तर-दक्षिण तीर्थयात्रा आटोपल्यावर तो आपल्या मातापितरांच्या भेटीकरितां घरीं आपेगांवीं जाण्यास निघाला. आपेगांवास जातांना त्याची स्त्री रुक्मिणीबाई व श्वशुर सिद्धोपंत हींहि त्याचेबरोबर निघालीं. आपेगांवीं गेल्यावर त्या पितापुत्रांची यथाविधि भेट झाली; व सिद्धोपंतांनीं आपली लेक त्या वृद्ध जोडप्याच्या पायांवर वाहिली. सून पाहून गोविंदपंतास आणि निराबाईस फार समाधान वाटलें व आनंद झाला. आणि 'चिरंजीव नांदा' असा त्यांनीं आशीर्वाद दिला. कालान्तरानें तीं वृद्ध मातापितरें वैकुंठास गेलीं व संसाराचा भार विठ्ठलपंतावर पडला. पण 'संसाराची चिंता नाहीं विठ्ठलासी।

---

१. या वेळीं मुली उपवर होत; आणि नवरे आपली स्त्री पसंत करीत, असें दिसतें. या काळच्या एका ग्रंथांत पुढील ओव्या आहेत:–

ब्राह्मण कुमारो । तें उपवर तोंवरी । कन्यार्थी अवसरी । पाहों आले ॥ घराचिया साकडी । मायबापा बाहिरिल हिंडी । म्हौणि नोंवरीच पाट पिढी । बैसो घाली ॥ तेथ बैसले वऱ्हाडी । नोवरी स्वरूपें उदंडी । तयेचिये शिहाणवेंची रूढी । मानली तया ॥ जाणौनि आपुला पती करू । तया कराघेया पाहुंनेरू करू आदरिला व्यापारू । घरा आंत ॥ इ. इ.

अखंड वृत्तीसी समाधान', अशी उदासीन वृत्ति पाहून सिद्धोपंतास जरा खेद वाटला व त्यानें त्या दोघांस आपल्या घरीं आळंदीसच रहावयास नेलें. कोठेंहि गेलें तरी पळसाला पानें तीनच. जी वृत्ति आपेगांवीं होती तीच वृत्ति आळंदीसहि विठ्ठलाची कायम राहिली; व तो सारा वेळ 'मी संन्यासदीक्षा घेतों' असें बायकोस म्हणूं लागला. यावर सिद्धोपंताच्या शिकवणीवरून 'पितृऋण फेडल्यावर मग तुमच्या चित्तास येईल तें करावें', असें उत्तर त्यास रुक्मिणीबाई देत असे. बराच काळ लोटला तरी पुत्रसंतति नाहीं, असें पाहून विठ्ठलपंत सारा वेळ तोच हट्ट घेऊन बायकोजवळ निरोप मागूं लागला. एके वेळीं रुक्मिणीबाई—

असतां दुश्चितपणें निरोप पुसिला । 'जा, जा' म्हणे दिधला अवसरू ।
जाउनि विठ्ठलें घेतला संन्यास । चिंता रखुमाईस पडली भारी ॥

विठ्ठलपंत आळंदीहून निघाला तो श्रीक्षेत्र काशी येथें जाऊन त्यानें श्रीपाद स्वामींचा उपदेश घेऊन त्यांच्या जवळूनच संन्यासदीक्षा घेतली. शिखासूत्राचा त्याग करवून श्रीपादांनीं त्याचें त्या आश्रमांतलें नांव '**चैतन्याश्रम**' असें ठेविलें व विठ्ठलपंत तेथेंच राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं श्रीपाद स्वामी रामेश्वरास जाण्याच्या उद्देशानें काशीहून निघाले ते वाटेंत अलकावतीस म्हणजे आळंदीस सिद्धेश्वराच्या दर्शनास आले. विठ्ठलपंत घरून गेल्या दिवसापासून रखुमाई व्रतें वैकल्यें यांचें कडकडीत आचरण करून व नित्य नियमानें गांवच्या देवळांत जाऊन अश्वत्थास प्रदक्षिणा घालीत असे. नित्याप्रमाणें ती एक दिवस अश्वत्थप्रदक्षिणेस गेली असतां तेथेंच कर्मधर्मसंयोगानें श्रीपाद स्वामी उतरले होते, त्यांस तिनें नमस्कार केला. बाईनें नमस्कार केल्यावर 'पुत्रवंती होई' असा तीस स्वामींनीं आशीर्वाद दिला. आशीर्वाद ऐकून रुक्मिणीबाई जरा गोंधळली व तिचें मन कालवलें. तें पाहून श्रीपाद स्वामींनीं कृपाळूपणानें सर्व चौकशी केली; व सिद्धोपंताच्या घरीं जाऊन त्यांनीं सर्व खाणाखुणा नीटपणें पुसल्या. तेव्हां विठ्ठलपंताची सर्व हकीकत त्यांच्या

लक्षांत आली. पितृऋणांतून मुक्त होण्यापूर्वीच रुक्मिणीबाई केवळ 'दुश्चित' असतां तिजजवळून पडत्या फळाची आज्ञा घेऊनच विठ्ठलपंतानें संन्यास घेतला, हें बरें केलें नाहीं, असें जाणून व बाईच्या दुःखास आपणहि अंशतः कारण आहों, असें मनांत आणून श्रीपाद स्वामी तसेच काशीस परत गेले ; व मठांत जाऊन 'चैतन्या'स म्हणजे पूर्वाश्रमींच्या विठ्ठलपंतास पाचारून त्यांनीं आज्ञा केली कीं, 'आतां त्वां परत जाऊन गृहस्थाश्रम पुरा करावा !'

अविधी कर्माचें न धरावें भय । यासी आहे साह्य जगदीश ॥
स्वदेशा जाऊनी करावा आश्रम । सुखरूप स्वधर्म चालवावा ॥

गुरूची आज्ञा ऐकून विठ्ठलपंत घरीं आले ; व त्यांनीं पूर्ववत् गृहस्थाश्रम पत्करिला. हें पंतांचें करणें पाहून —

हासिन्नले लोक, 'बरवा हा संन्यास । करिती उपहास दर्शनाचा ॥
द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेलें । शेखीं उपेक्षिलें आप्तवर्गीं ॥

अशीं दहा-बारा वर्षें लोटल्यावर विठ्ठलपंतास चार मुलें झालीं. त्यांचीं नांवें निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई[1] अशीं ठेविलीं. यांचे जन्म अनुक्रमें शके ११९०, शके ११९३, शके ११९६ व शके ११९९ असे तीन-तीन वर्षांच्या अंतरानें झाले[2]. योग्य काळ लोटल्यावर आपल्या मुलांच्या मुंजी कराव्या, असें विठ्ठलपंतास वाटलें. पण मुंजी लावण्यास

---

१. हीं नांवें पाळण्यांतलीं नांवें दिसत नाहींत. हीं उपदेशानंतरच्या नांवां-सारखीं भासतात. पण हीं पाळण्यांतलीं नांवें होत, असें सुचविण्याचा चरित्र-कारांचा इरादा दिसतो—नामदेव—म्हणतो, 'निवृत्ती ज्ञानेश्वर सोपान मुक्ताबाई । हांसती सकळही ऐकुनि नांवें.'

२. शालेवाहन शके अकराशे नव्वद । निवृत्ति आनंद प्रगटले ॥ त्र्याण्णवचे शकीं ज्ञानदेव प्रगटले । सोपान देखिलें । शाहाण्णवांत ॥ नव्याण्णव सालीं । मुक्ताई देखिली । जनी म्हणे केली । मात त्यांनीं ॥

( जनाबाई-अभंग )

या लेखांत 'ज्ञानेश्वर' व 'ज्ञानेश्वरी' असे शब्द वारंवार योजिले आहेत, परंतु जुन्या पोथ्यांत 'ज्ञानदेव' व 'ज्ञानदेवी' असे शब्द आढळतात.

कोणी कबूल होईना. लोक म्हणत, 'तुम्हांला व या मुलांना जाति, कुळ, वर्ण व अधिकार नाहीं. तुम्ही क्षत्रिय नाहीं; वैश्य नाहीं; शूद्रहि नाहीं. द्विज तर तुम्ही नाहींच नाहीं. कारण तुम्ही संन्यासी व हीं मुलें संन्याशाची संतति. ज्यानें संन्यास घेतला त्याची जात कोठें राहिली! आमच्या मतें तुम्हांला उपनयनाचा अधिकार पोहोंचत नाहीं; परंतु तुम्ही श्रीक्षेत्र पैठण येथें जा; व तेथून प्रायश्चित्त घेऊन आज्ञापत्र आणा. तें आम्ही वंद्य मानूं.' ब्राह्मणांचें हें म्हणणें ऐकून त्या पितपुत्रांस खेद वाटला.' मी प्रायश्चित्त घेईन, देह कर्वतीं घालीन; अनुतापानें तो दंडीन', असा निर्धार करून तेथून निवृत्तिनाथ निघाला. ज्ञानेश्वरानें त्यास सांगितलें कीं—

विधी वेद विरुद्ध संपर्क संबंध। नाहीं भेदाभेदा स्वस्वरूपीं ॥
अविधि आचरण परम दूषण। वेदोनारायण बोलियेला ॥
स्वधर्म अधिकार जाति परत्वें भेद। उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥
म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें। जनां दाखवावें वर्तोनीयां ॥
कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा। सर्वथा न करावा अनाचार ॥
प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां। पावन अवस्था जरी झाली ॥
ज्ञानदेव म्हणे ऐका जी निवृत्तीं। बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ॥

असो. याप्रमाणें हीं भावंडें प्रायश्चित्त घेऊन शुद्धिपत्र आणण्याच्या उद्देशानें पैठणास गेलीं. पैठणास असतांना एके दिवशीं एक पखालजी आपल्या रेड्यावर पाण्यानें भरलेली पखाल लादून त्याला फटके मारीत हाकाढून नेत होता. रेडा अशक्त असल्यामुळें त्याचे प्राण डोळ्यांत आले होते व त्याला पाय उचलत नव्हते. एकीकडे त्याचा धनी मारीतच होता. हे त्या रेड्याचे क्लेश पाहून ज्ञानेश्वरांच्या डोळ्यांस पाणी आलें. तेव्हां पैठण-करांनीं विचारिलें, 'बाबा, रेडा मार खातो आणि तूं कां रडतोस?' त्यावर ज्ञानेश्वर बोलले, 'महाराज, आत्मा सर्वांचा एकच आहे. त्याला मारल्याची कळ माझ्या अंतःकरणाला येते.' तेव्हां ब्राह्मण म्हणाले, 'बापा, हें कसें घडतें? यास प्रमाण काय? तूं पढलेला वेद रेड्यास म्हणतां

येईल काय?' यावर असें सांगतात कीं, ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या तोंडून वेद म्हणविला. हें पाहून त्या वेळच्या हेमाडपंतें, बोपदेव वगैरे विद्वानांनीं त्यांस शके १२०९-मध्यें सर्वजित् संवत्सरीं माघ शु. पंचमीस एक शुद्धिपत्र दिलें. शुद्धिपत्र दिल्यावर हीं भावंडें नेवासें येथें आलीं; व तेथेंच ज्ञानेश्वर महाराजांनीं आपली गीतेवरील टीका 'ज्ञानेश्वरी' ही लिहिली.[2] (दासो दिगंबरकृत संतविजय.) पसरत जाणाऱ्या साधुसंतांच्या मंडलाकृति सभेमध्यें निवृत्तिनाथ हे अग्रस्थानीं बसले आहेत, व त्यांच्यासमोर

---

१. हेमाद्रि हा संवत् ११४५ (शके १०१०)-मध्यें कार्तिक वद्य पौर्णिमेस जन्मला; व संवत् १२२९ (शके १०९४)-मध्यें ८४ वर्षांचा होऊन मेला, असें रॉयल ए. सोसायटी जर्नल (कॉलम ९ नं. २६ पृ. २२४)-मध्यें लिहिलें आहे. हें खरें असेल तर यानें शके १२०९-मध्यें शुद्धिपत्र लिहिलें, हें कसें? पण ही चूक दिसते. ठाणें येथील ११९४-मधील ताम्रपटांत हेमाद्रीनें आपल्याकडे सर्व करणाधिपत्व घेतल्याचें लिहिलें आहे. तसेच ८४-च्या शिलालेखांत 'सोडवीकार हेमाडपंतानें सकु ११९८ धाता संवत्सरीं वर्गणी दिल्याचा उल्लेख आहे.

२. याच ग्रंथाला 'भावार्थदीपिका' 'असेंहि म्हणतात. ज्ञानेश्वर स्वतः ग्रंथांत स्वतःचा 'ज्ञानदेव' असा उल्लेख करितात. ज्ञानेश्वर महाराजांनीं आपला ज्ञानेश्वरी हा ग्रंथ नेवाशास एका खांबावर लिहिला, अशी एक फार दिवसांची आख्यायिका चालत आलेली आहे व अजूनहि नेवाशास हा खांब लोक दाखवितात आणि सांगतात कीं, या खांबावर ज्ञानेश्वर कोळशानें ओव्या लिहीत व मग सच्चिदानंदबाबा त्यांची नक्कल करून ठेवी. वास्तविक प्रकार असा आहे कीं, खांब पूर्वी एका मोठ्या शंकराच्या देवालयाचा होता व या खांबाजवळ बसून ज्ञानेश्वरांनीं आपला ग्रंथ लिहिला. बरेच वर्षांपूर्वीं हा खांब जमिनींत गाडलेला असून सुमारें फूट दीड-फूट मात्र वर होता व तेव्हांहि यास 'ज्ञानेश्वरीचा खांब', असें नेवाशांत म्हणत असत. पुढें एका गृहस्थानें पूर्वीं तेथें राघोबादादा पेशव्यांचा वाडा होता त्याचीं लाकडें लिलावांत विकत घेऊन या खांबाभोवतीं एक देऊळ बांधिलें. कालगतीनें हेंहि देऊळ मोडकळीस आलें. तेव्हां थोड्या वर्षांपूर्वीं याचा जीर्णोद्धार नेवासें येथील वकील कै. रा. बापूसाहेब यांनीं केला. बापूसाहेबांनीं हें देऊळ दगडी बांधिलें आहे. देवळांतला खांब चौरस असून त्यावर पुढीलप्रमाणें अक्षरांच्या सात

[पान १३७ पहा.]

बसून सभोंवार बसलेल्या श्रोत्यांच्या पुढें श्रीमद्भगवंतांच्या गीतेवर आपण व्याख्यान करीत आहों, असें कल्पून ज्ञानेश्वरांनीं या ग्रंथाची उभारणी केली आहे. या ग्रंथाची भाषासरणी फार लोकोत्तर असून प्रेमळ आहे. ग्रंथांत ग्रंथकर्त्याची विद्वत्ता दिसतेच; परंतु प्रसाद म्हणून जो गुण कवितेंत अवश्य असावा लागतो, तो यांत पूर्णपणें भरला आहे. हा ग्रंथ फार जुना असल्यामुळें यांत प्राचीन व जुन्या शब्दांचा भरणा फार आहे; व त्या वेळच्या प्रयोगांमुळें हा ग्रंथ प्रथम दुर्बोध असा वाटतो. परंतु थोड्या परिचयाअंतीं फार गोड वाटूं लागतो. या व्याख्यानांत कवीनें आपल्या शब्दसृष्टीनें निर्माण केलेलें विनतोड चित्र पाहून वाचकाला एके तऱ्हेचा मोह पडतो; व या कल्पनातरंगांत तो डोलूं लागतो. यांत दृष्टांत व उपमा देण्याची कवीची धाटणी इतकी उत्कृष्ट व सरस आहे कीं, वाचकांच्या मनांत कवीच्या मनांतल्या कल्पना पूर्णपणें बिंबून जातात व विषयाशीं तादात्म्य पावून क्षणभर वाचक आपलें देहभान विसरून जातो. वाचकाच्या मनांत अर्थ बिंबविण्यासाठीं ज्ञानेश्वर उपमा देऊं लागले कीं, एक उपमा देऊन जेथें अर्थाची उणीव राहते, तेथेंच दुसरी, तेवढ्यानें पूर्तता नीट न झाल्यास तिसरी, अशा एकावर एक उपमा देऊन तो उपमांचा वर्षाव करितो. पण उगाच उपमांची माळ तो ओढीत बसत नाहीं. अर्थ आणि उपमा यांचा जडाव नीट जडला कीं मग लगेच थांबून तो पुढें जातो.

प्रारंभींच ज्ञानेश्वर म्हणतात, 'या मेजवानीच्या प्रसंगीं अर्जुनाच्या पंक्तीला बसण्याला योग्य असतील त्या संतांनीं कृपा करून येथें

---

[पान १३६-वरून]

ओळी आहेत--१ ॐ नमः ( ण ) वीरेश्वराय पिता २ महिनयत पूर्वं दत्तं षटकं जगद्गु(रो) ३ मखंडवर्ति तैलार्थं प्र ४ तिमा समन्वितं ( रूपका ) ५ णां षटकं संख्या देया आचंद्रसू ६ यंकं ( यः स्वी ) करोति दुष्टः ( सः ) तस्य ७ पूर्वे व्रजत्यन्वः ........; व चंद्रसूर्यांच्या आकृति आहेत. ही या खांबावर कोरलेली नंदादीपाची देणगी आहे. हल्लीं सरकारांतून ही देणगी ( वर्षी रुपये ३ ) मिळत असते.

अवधान द्यावें. मी हें सारस्वताचें गोड झाड लावतों आहें, तरी तुम्ही याचीं फळें प्रेमानें खुडून घ्या. हीं कृष्णार्जुनांच्या संवादांतल्या प्रमेयांचीं उद्यानें, या मराठियांच्या नगरांत लावून मी येथें ब्रह्मविद्येचा सुकाळ करीन. येथें संस्कृत आणि मराठी दोन्ही भाषांना मी एकाच सिंहासनावर बसवीन; इतकेंच नव्हे, तर

माझा मऱ्हाटाचि बोलु कौतुकें। परी अमृतातेंही पैजेसि जिंके। ऐसीं अक्षरेंचि रसिकें मेळवीन।... जेथ संपूर्ण पद उभारें। तेथ मनचि धावे बाहिरें। बोलु भुजांही आशेभरें। आलिंगावया॥ तैसे शब्दाचें व्यापक-पण। देखिजे असाधारण। पाठेयां भावज्ञां फावति गुण। चिंतामणिचे॥

ज्ञानेश्वराच्या या म्हणण्याचा अनुभव त्याच्या या ग्रंथांत पदोपदीं येतो. तत्त्वज्ञानाचे गूढ सिद्धांत उत्कृष्टपणें प्रतिपादन करणारा ग्रंथ, धार्मिक दृष्टीनेंहि सर्वांना पूज्य असावा, भाषेच्या दृष्टीनेंहि तो तेजःपुंज दिसावा, तो सर्व दर्जांच्या वाचकांना आवडून त्यांच्या आदराला पात्र व्हावा, इतकेंच नव्हे, तर श्रेष्ठ काव्याचे उत्तम नमुने त्यांत सर्वभर आढळावे, ही गोष्ट जगांतल्या इतर कोणत्याहि भाषेंतल्या कोणत्याहि ग्रंथकाराला इतकी पूर्णपणें साधली नाहीं. ही ज्ञानदेवाची कृति ज्ञाने-श्वरीहि आहे, वागीश्वरीहि आहे, इतकेंच नव्हे, तर ती धर्मक्षेत्र आहे व काव्यगंगाहि आहे. सर्वांचें आदिस्थान असा हा ग्रंथ वाचून, शास्त्राचा प्रांत निराळा व काव्याचा प्रांत निराळा, बुद्धीची प्रगल्भता व कल्पना-विकास यांचें एकाधिकरणत्व वस्तुगत्याच शक्य नाहीं, ज्ञानाचा आणि काव्याचा नेहमीं विरोध असतो, धार्मिक शिक्षण देणारा ग्रंथ काव्यमय होणार नाहीं, इत्यादि कल्पना सोडणें भाग पडतें. बुद्धीचा व ज्ञानाचा ज्यांत पूर्ण विकास दिसतो असे ज्ञानेश्वरींतील उतारे आपल्या कानांवर नेहमीं येतात. आतां ज्यांत ज्ञानाच्या सुवर्णानें बुद्धीच्या कोंदणांत बसलेले काव्याचे खडे प्रकाशत आहेत, असा एक उतारा येथें देतों.

मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु।
अद्वयाब्जिनीविकाशु। वंदुं आतां॥

जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानअज्ञानचांदणिया ।
जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥
जेणें बिवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीव पक्षी ॥
लिंगदेह कमळाचा । पोटीं वेंचतया चिद्भ्रमराचा ।
बंदि मोक्षु जयाचा । उदैला होय ॥
शब्दाचिया आसकडी । भेदनदीच्या दोहीं थडीं ।
आरडत विरहवेडीं । बुद्धि बोधु ॥
तेया चक्रवाकांचें मिथून । समरस्याचें समाधान ।
भोगवीं जो चिद्गगन । भुवन दिवा ॥
जेणें पाहालियें पाहांटे । भेदाची चोरवेळ फिटे ।
रिघती आत्मानुभव वाटे । पांथिक योगी ॥
जयाचेनि विवेक किरण संगे । उन्मेख सूर्यकांत स्फुल्लिंगे ।
दीपले जाळिती डांगे । संसाराची ॥
जेयाचा रश्मिपुंजू निबरु । होती स्वस्वरूप उबारी स्थिरु ।
इये महासिद्धीचा पूरू । मृगजळाचा ॥
जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचा मध्यान्ही आलिया ।
लपे आत्मभ्रांति छाया । आपणपां तळीं ॥
ते वेळी विश्वस्वप्ना सहितें । कोण अन्यथा मती निद्रेतें ।
सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥
म्हणौनि अद्वय बोध पाटणीं । तेथ महानंदाची दाटणी ।
मग सुखानुभूतीची घेणीं देणीं । मंदावों लागती ॥
किंबहुना ऐसें ऐसें । मुक्तातें कैवल्य सुदिसें ।
सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥
जो निजधाम व्योमींचा रावो । उदैलाचि उदैजत खेवो ।
फेडी पूर्वादि दिशांचा ठावो । उदो अस्तूचा ॥
न दिसणें दिसणेंनसी मावळवी । दोहीं झांकिले तें सेंघ पघलवी ।
काय बहु बोलों तें आघवी । उखाचि आनि ॥

तो अहोरात्रांचा पैलकडू । कोणें देखावा ज्ञानमार्तंडू ।
जो प्रकाश्येंवीण सुरवाडूं । प्रकाशाचा ॥
तेया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमोंचि म्हणों पुडत पुढती ।
जे बाधका येईजतसे स्तुती । बोलाचिया ॥

अ. १६, ओ. १–१७.

हें गोड स्तोत्र वाचल्यावर येथें शृंगाराच्या माथ्यावर शांतिरसानें पाय दिला आहे, हें सर्वांच्या नजरेस येईल. यांतील प्रत्येक अक्षर ज्ञानानें भरलेलें आहे; व दर शब्दागणिक कवित्व आणि उपमा यांची गर्दी करून दिली आहे.

अकराव्या अध्यायाच्या आरंभीं ज्ञानदेव म्हणतात कीं, 'आजि हा आवडतेया हि सुकाळु जाला । जें गीतार्थु हा आला । मऱ्हाटिया'. यावरून या ज्ञानेश्वरी टीकेच्या पूर्वीं मऱ्हाटींत गीतेवर चांगलीशी टीकाच झाली नाहीं, असें दिसतें; आणि ज्ञानेश्वरासारख्या ज्ञानियांच्या राजानेंच ही टीका केल्यामुळें मराठींत जणों पहिलीहि हीच, असें होऊन राहिलें आहे. 'मी बोलैन । बोली अरूपाचें रूप दावीन । अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरविं' ॥ असें प्रतिज्ञोत्तर सांगून त्यांनीं आपल्या म्हणण्याप्रमाणें जो विषय केवळ कल्पनेनेंच जाणावयाचा, त्याला शब्दांमध्यें बांधून टाकिलें आहे; आणि असें करितांना मऱ्हाटी भाषेला अमृताहूनहि गोड असें नवीन रूप आणून दिलें आहे. शब्द इतके रसाळ योजिले आहेत कीं, ज्यांच्या योगानें कानांनाहि जिभा फुटतील, व प्रत्यक्ष पिशाचाच्या मनालाहि सात्विकपणाचा उमाळा येईल! यांतील उत्तमोत्तम अलंकार पाहून डोळ्यांना आज आम्ही धन्य झालों असें वाटेल, व अलंकारशास्त्रालाहि आपणास नवे अलंकार प्राप्त झाल्याचा अभिमान उत्पन्न होईल, अशी या ग्रंथाची उभारणी केली आहे; आणि अशा आपल्या वाग्विलासाच्या विस्तरानें ज्ञानेश्वरांनीं विश्व गीतार्थानें भरून टाकिलें आहे; व जगाला आनंदाचें आवार घालून दिलें आहे. खरोखर या ज्ञानेश्वर महाराजांच्या भव्य कृतीची थोरवी कोठवर वर्णावी ? ज्यांनीं स्वर्गसंसाराची

कुरवंडी करून रात्रंदिवस आत्मबोधाच्या आवडीनें या ग्रंथाच्या पारायणांत काळ घालविला, अशांनाहि हिची गोडी पूर्णपणें कळली नाहीं. त्यांनादेखील हिचें नित्य नवें स्वरूप दिसून येईल, तेथें साधारण माणसांचा तो काय पाड! ज्याला यांतलें तत्त्वज्ञान अगदींच कळत नाहीं, असा मनुष्यदेखील या ग्रंथांतल्या शब्दांच्या सौंदर्यालाच भुलून गुंगून राहतो. ज्याला थोडेंसें कळलें, तो भावार्थाची ही उघडी खाण पाहून आपल्या स्वतांला धन्य मानून घेतो व ज्याला कांहीं अधिकार आहे, त्याला या गीतासृष्टीपुढें दुसरी सृष्टि तुच्छ वाटते. परंतु ज्याला या विषयांतलें खरें ज्ञान आहे तो या आपल्या कविवराच्या कल्पनातरंगिणींत एकदा उतरला म्हणजे तींतून बाहेर यावयाचें त्याला भानच राहत नाहीं. ही ज्ञानेश्वरांनीं आपल्या वाक्चातुर्यानें निर्माण केलेली अद्भुत शब्दसृष्टि पाहून ब्रह्मदेवानें निर्मिलेल्या सृष्टीचें आणि अहमहमिकेनें त्याच्याशीं स्पर्धा करून नवी सृष्टि निर्माण करणाऱ्या विश्वामित्राच्या सृष्टीचें तर हसूंच येतें. त्या दोघांनीं निर्मिलेल्या वस्तुजातांत जें एकदा निर्माण केलें त्याला जीर्णत्व आणि नाश हे आहेतच; पण या ज्ञानदेवाच्या सृष्टींत जें एकदा निर्माण झालें त्याला जीर्णत्वहि नाहीं व नाशहि नाहीं. तें वाईटहि होत नाहीं व लयहि पावत नाहीं. याच्या कल्पनावृक्षांच्या बागेंतलीं पुष्पें कधीं कोमेजत नाहींत, कीं कधीं त्यांचा परिमळ कमी होत नाहीं. अशा याच्या वाग्वल्लरींच्या शब्दवाटिका आहेत. त्यांच्या फुलांचा बहर सदा टवटवीत राहतो व त्यांचा दरवळ सदाकाल पसरतच राहतो. अशी ही वाग्वैजयंतीमाळा ज्ञानेश्वरानें महाराष्ट्राच्या गळ्यांत घातली आहे. ज्ञानेश्वर-महाराजांच्या अशा या अलौकिक ग्रंथानें आपल्या

---

१. प्रबंधु हा श्रवणी । लागत खे॰ समाधी आणि । आइकिलेया वाखाणीं । व्यसन न लवी ॥ हे स्वानंद भोगाची सेल । भलेतेयासिचि देईल । सर्वेंद्रियें पोसवील । श्रवणां करवीं ॥ तैसें अध्यात्म शास्त्रीं इये । एक अंतरंगचि अधिकारिये । येरि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ १८।१७२८.

महाराष्ट्रावर आपला अंमल आज सहा-सातशें वर्षें अव्याहत चालविला आहे. ज्या जाधवांच्या राज्यछत्राखालीं हा ग्रंथ रचिला गेला, तें राज्यच्छत्रहि लयास गेलें. परंतु या ग्रंथाचें छत्र महाराष्ट्रावर अक्षय्य आहे !

असो. मूळ गीतेप्रमाणेंच ज्ञानेश्वरीचे अठरा अध्याय आहेत; व या सर्वांं मिळून सुमारें ९००० ओव्या आहेत. परंतु हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व प्रती एकनाथांनीं ज्ञानेश्वरीप्रती शुद्ध केल्यानंतरच्या असल्यामुळें ज्ञानेश्वरांनीं मूळ लिहिलेल्या अस्सल ग्रंथाच्या ओव्या किती होत्या, हें आज नक्की कळण्यासारखें नाहीं. आजच्या सर्वांत जुन्या अशा पोथींत ओवीसंख्या ८८९६ आहे. आज इतकीं शतकें जो हा ग्रंथ केवळ अद्वितीय होऊन राहिला आहे, व ज्याची छाया तेव्हांपासून आतांपर्यंतच्या महाराष्ट्रांतील सर्व मोठमोठाल्या ग्रंथकारांच्या विचारांवर व ग्रंथांवर स्पष्ट उमटलेली दिसते तो हा ज्ञानेश्वरी ग्रंथ ज्ञानेश्वरांनीं शके १२१२[१]-मध्यें म्हणजे आपल्या वयाच्या केवळ पंधराव्या वर्षीं

---

१. ज्ञानेश्वराच्या परंपरेंतील उद्बोधनाथानें एका अभंगांत ज्ञानेश्वरचरित्र वर्णिलें आहे. तो अभंग असा : दुजा पद्मनाभ ज्ञानदेव मूर्ति । एक सहस्रवर्ति त्र्याणवीचे ।। श्रावणअष्टमी । कृष्णपक्ष बरा। नंदन वासरा । माजि जन्म ।। निवृत्तीप्रसाद तयावरी झाला । मार्गशीर्ष पूर्णा प्रमाथेसी ।। रवीशकशत एक तयावरी । शिक्षापट धरी । ज्ञाननाथ।। भानुशत भानु रची ज्ञानेश्वरी । विकृत संवत्सरीं ज्ञानरूप ।। याच शको रीपु म्हैसा वोलवीला । चालवी भितीला वस् माजी ।। लोकोत्तरापूर्व चमत्कार केले । समाधी भांधीलें योगबळें ।। कार्तिकाचो वद्य एकादशी पाहो ।। सूर्य अष्टदाहो शकशत ।। जगासी दुर्मुख म्हणोनी दुर्मुख । संवत्सर देख समाधीसि ।। प्रतिष्ठान आपेगावीं ज्याचा जन्म । समाधि अलंके उद्बोधांत ।।

ज्ञानेश्वरासंबंधें ऐतिहासिक कागदपत्रांत आलेला उल्लेख एका करीण्यांत आढळला तो असाः– यादी पुरसिसीचा करिणा ऐसाजे–आमच्या वडलानीं पैठणाहून येऊन दोन्ही महालांचे वतन मेळविलें तेव्हां शके बारासेवीसा पंचवीसाचा आमल होता. आळंदीस ज्ञानेश्वरानीं समाध घेऊन नुकतीच येक दोन वर्षे जाली होत्ती. आम्हा पूर्वीं जोसपणाच्या तंटयाचे कागद दोहीं महालचे जोसी गोलक होते. इ. इ.

रचून पुरा केला, हें केवढें आश्चर्य ! ! महाराष्ट्रांतल्या या लहान मुलानें ही रचना केली, या गोष्टीचें कौतुक कोणत्या महाराष्ट्रियाला वाटणार नाहीं ? तसेंच, सात्त्विक अभिमानानें कोणता मराठा फुगणार नाहीं ? आणि ज्या महाराष्ट्रांत असा अवतार जन्मास आला त्याच महाराष्ट्रांत मी जन्म पावलों, ज्या भाषेंत, हा ज्ञानेश्वर बोलला तीच माझी भाषा आणि मी ती बोलतों, अशा साभिमान कौतुकानें कोणता महाराष्ट्रदेह रोमांचित होणार नाहीं? असा कोणता करंटा मराठा सांपडेल कीं, जो ही ज्ञानेश्वरानें गौरविलेली मराठी भाषा टाकून दुसरी कोणतीहि बोली सर्व हिंदुस्थानभर बोलली जावी, सर्व हिंदुस्थानाची एकभाषा व्हावी, असें क्षणभर तरी म्हणेल किंवा कोणीं म्हटलेलें मानील व साहील ? ईश्वरी शक्तीनें मानवी देहांत शिरून कांहीं ग्रंथ असे निर्माण केले आहेत कीं, त्या एकेका ग्रंथाकरितांच ती ती भाषा अवश्य सर्वांनी शिकावी आणि अशा ग्रंथांपैकींच ज्ञानेश्वरी हा ग्रंथ निःसंशय आहे.

हा सर्व ग्रंथ तर महाराष्ट्राला प्रिय आहेच, परंतु त्यांतहि यांतील नवव्या अध्यायावर महाराष्ट्र-विद्वानांची प्रीति अत्यंत जडलेली दिसते आणि तो तसाच उतरलाहि आहे. यांत प्रारंभींच जमलेल्या श्रोत्यांकडे थोरपणा देऊन आपणाकडे लघुत्व घेतलें आहे व फार प्रेमानें, अत्यंत लोभानें श्रोत्यांना आळवीत त्यांना सावधान होण्यास विनंती केली आहे. हा प्रकार सर्व ग्रंथभर आहे पण या अध्यायारंभीं तो विशेष आहे. श्रोत्यांना म्हटलें आहे, ‘ प्रभो, आपण महेशाच्या मूर्ती आहां. मी लहान अज्ञ बालक बालपणानें कांहींतरी चावटी करितों, ती मान्य करा. माझे गेंगाणे शब्द गोड मानून स्वीकारा आणि नेणतें मूल बापाच्याच ताटांत रिघून बापासच जेववूं लागतें, तेव्हां त्यांतच कौतुक मानून बाप आपण होऊन संतोषानें तोंड पुढें करतो तसें तुम्हीं माझ्या व्याख्यानाकडे लक्ष द्या ! ’ कोण ही लीनता ! आणि ही कशाकरितां तर या मृत्युलोकीं धगधगीत इंगळांच्या अंथरुणावर निजून सुखनिद्रा घेऊं पाहणाऱ्या, विषाचे कांदे वाटून त्यांचा रस पिऊन

त्यापासून अमृताप्रमाणें अमरत्व मिळवूं पाहणाऱ्या लोकांच्या कानांवर भक्तिरसाचा प्रवाह जावा, त्यांच्या मनाला शांतिसुखाचा लाभ घडावा, मनाची तगमग जरा थांबावी व अविनाशी पदाला जाण्याचा सोपा मार्ग त्यांना दाखवून द्यावा, येवढ्याचकरतां. जणों भक्तीचें सौभाग्य, स्फूर्तिचंद्राची पौर्णिमा किंवा ज्ञानगंगेच्या महापुराचा लोंढाच असा हा अध्याय वाचतांना व मनन करितांना अनेक साधु-पुरुषांना दिवसाच्या घटकांचें प्रमाणहि कमी होऊन गेलें आहे. कित्येकांनीं तर हाच अध्याय पुढें ठेवून त्यांतील विषयाच्या चिंतनांत मग्न असतां, त्यांतील अमृताच्या वर्षावांत न्हातांना शरीर आणि मन ओलें चिंब झालें असतां, जिवंत समाधि घेऊन हा मर्त्य देह टाकून दिला ! इतका हा नववा अध्याय महाराष्ट्रांतील साधु-पुरुषांच्या प्रेमाचा विषय होता व अजूनहि आहे. या नवव्याप्रमाणेंच अठराव्या अध्ययाचाहि पाक फार उत्कृष्ट उतरला आहे. तो ज्ञानेश्वरीचाच काय, पण एकंदर महाराष्ट्र-वाङ्मयाचा कळस आहे, असें म्हणता येईल. या अध्यायाच्या शेवटीं म्हणजे 'ज्ञानेश्वरी'-ग्रंथाचे शेवटीं, हा आपला वाग्यज्ञ संपल्यावर अवभृथ स्नान करून त्या विश्वात्मक देवाजवळ 'पसायदान' मागितलें आहे.

यांत ज्ञानेश्वर महाराज मागतात :—

आतां विश्वात्मकें देवें । एणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज देयावें । पसायदान हें ॥ १७७२ ॥
जें खलांची वांकुडे मोडे । तेयां सत्संगीं रति वाढे ।
भूतां परस्परें पडे । मैत्र जीवांचें ॥ ७३ ॥
दुरिताचें तिमिर जाऊ । विश्वा स्वधर्मसूर्यो पाहो ।
वांछिल तें तें लाहो । प्राणिजात ॥ ७४ ॥
वर्षतें सर्वमंगलीं । ईश्वरनिष्ठांची मांदियली ।
अनुव्रत भूतलीं । भेटोतु भूतां ॥ ७५ ॥
चलां कल्पतरूचे आरव । चेतवा (? ना) चिंतामणिचे गांव ।
बोलते पां अर्णव । पीयूषांचे ॥ ७६ ॥

चंद्रमे जे आलंछन । मार्तंड जे तपहीन ।
ते सर्वां ही सदा सज्जन । सोयरे होंतु ॥ ७७ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होउनि तिंहि लोकिं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ ७८ ॥

यानंतर श्रीरामचंद्रनृपाच्या छत्राखालीं, महाराष्ट्रामध्यें गोदावरीनदीच्या दक्षिणतीरीं, जगाचें जीवनसूत्र महालया जेथें अक्षय्य वास्तव्य करीत आहे, अशा पंचक्रोशी क्षेत्रामध्यें मीं हा ग्रंथ केला—म्यां ज्ञानदेवें गीतादेवीला हें देशी भाषेचें लेणें चढविलें—असें म्हणून ग्रंथ पुरा केला आहे.

पुष्कळ प्रतींत अगदीं शेवटीं " शके **बाराशें बारोत्तरें** । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । **सच्चिदानंद** बावा आदरें । लेखकू जाला " ही ओवी मोठ्या आदरानें या ज्ञानदेवी ग्रंथाची प्रत लिहून झाल्यावर रचून घातली आहे. म्हणजे साधारणपणें प्रचारांत आढळणाऱ्या या पुष्कळशा प्रती ज्या एका मूळ पोथीवरून लिहिल्या गेल्या, ती मूळ प्रत सच्चिदानंद-बावानें उतरून ठेवली होती, असें दिसतें. या सच्चिदानंदबावाचे प्रतीखेरीज ज्यांत ही ओवी नाहीं, अशा इतर प्रतींवरून उतरलेल्याहि प्रती महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं आढळतात. ज्ञानेश्वरीच्या सर्व प्रतींत रा. राजवाडे यानीं संपादिलेली प्रत फार जुनी आहे. पण हीहि खुद्द ज्ञानेश्वरांचे वेळची व 'विवेकसिंधु'कार मुकुंदराजाची असेल, असें वाटत नाहीं. हींत तत्कालीन पद्धतीचीं रफारयुक्त अक्षरें द्वित्वयुक्त नाहींत, हींत पृष्ठमात्रा नाहीं व कांहीं ठिकाणीं अपूर्ण म्हणजे नीट न उतरलेली अशी आहे. उदाहरणार्थ, दहाव्या अध्यायांत 'मृत्युः सर्वहरश्चाहम्' या श्लोकावरील टीकेंत 'आतां स्त्रीगणाचा पैकीं । माझिया विभूति सात आणिकी । ते तो आइक कवतिकी' असें म्हणून सात जणींचा उल्लेख केला आहे. पण राजवाडेप्रतींत पांचांचाच काय तो उल्लेख आहे. 'वाचा' आणि 'स्मृति' या दोहींसंबधींचा उल्लेख ज्यांत आहे त्या ओव्या हींत नाहींत. अर्थात् नक्कलकाराच्या नजरचुकीनें त्या गळल्या आहेत, हें उघड आहे.

असो. या प्रतीशिवाय सोपानदेवाच्या मठांतील दप्तरांतला ज्ञानेश्वरीचा एक फक्त नववा अध्याय तेवढाच उपलब्ध आहे. या अध्यायांत पृष्ठमात्रा पुष्कळ ठिकाणीं आहेत. पण यांतील अक्षरांचें वळण मात्र अगदीं अलीकडलें आहे. यांतील पाठ कुंट्यांच्या प्रतीशीं बरेच जमतात. या नवव्या अध्यायाची प्रत कोणी लेखकानें, मूळ पृष्ठमात्रांनीं विभूषित अशा एखाद्या फार जुन्या पोथीवरून पृष्ठमात्रा तशाच कायम ठेवून उतरून घेतली असावी.

ज्ञानदेवी किंवा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ ज्ञानेश्वर-महाराजांना रचण्याचें प्रयोजन कां वाटलें, त्या ग्रंथाच्या रचनेचा विचार त्यांच्या मनाच्या कोणत्या स्थितींत उद्भवला व तो ग्रंथ रचण्यांत त्यांचा साध्य हेतु काय असावा, हें नीटसें कळत नाहीं. पण त्यांच्या एकंदर चरित्रा-वरून व त्यांच्यावर आलेल्या अनेक प्रसंगांवरून या संबंधींचा थोडासा तर्क बांधण्यास जागा होईल, असें वाटतें. श्रीपाद स्वामीसारख्यांचा अनुग्रह त्यांच्या पित्याला असतांना ती सर्वमान्य परंपरा सोडून कानफाटे किंवा नाथपंथीयांचा अनुग्रह या भावंडांनीं कां घेतला, त्या पंथांत हीं भावंडें कां शिरलीं असावीं, हा प्रश्न अनेक वेळां आपल्या मनापुढें उभा राहतो. श्रीपाद स्वामी कदाचित् पुढें भेटले नसतील, तरी यांच्या पित्यास—विठ्ठलपंतास— श्रीपाद स्वामींचा उपदेश होताच, व पुढें विठ्ठल-पंतांपासून उपदेश-मंत्र यांना मिळूं शकला असता. असें असतां असा मंत्रोपदेश यांनीं कां घेतला नाहीं, याचें मोठें गूढ वाटतें; व तें सोडविण्याकडे मन धाव घेऊं लागतें.

सहज बोलतांना रुक्मिणीबाईनें दिलेल्या अनुमोदनावरून घरांतून निघून जाऊन विठ्ठलपंतानें श्रीपाद स्वामींपासून संन्यासदीक्षा घेतली, व पुढें त्याच स्वामींच्या आज्ञेवरून संन्यास सोडून तो पुन्हां संसारांत पडून रुक्मिणीबाईसह गृहस्थाश्रम पत्करून राहिला; आणि या स्थितींत त्याला संततिहि झाली, या गोष्टीचा विठ्ठलपंतावर आणि त्याच्या संततीवर फारच कल्पनातीत परिणाम झाला. आपण संन्यासाश्रमांतून

गृहस्थाश्रमांत पुन्हां आलों, ही गोष्ट विठ्ठलपंताच्या मनाला सारखी डाचत राहिली; व त्याला आपलें जीवन निष्फल वाटूं लागलें. पुढें तत्कालीन ब्राह्मणांनीं त्या आश्रमांतराबद्दल प्रायश्चित्तहि दिलें. परंतु या प्रायश्चित्तानें त्याच्या मनाचें नीटसें समाधान झालें नाहीं. आपण आतां पतित झालों, व या एकाच काय पण पुढें येणाऱ्या अनेक जन्मांतहि हें पातक आपल्याला चिकटून राहील, ही मनाची टोचणी त्याला दुःसह झाली. असमाधान, तळमळ, पश्चात्ताप या अग्नित्रयांच्या ज्वाळांनीं तो होरपळून जाऊन त्यांचे चटके त्याला चैन पडूं देतनासे झाले. पाठीवर मारिलेले फटके मनोनिग्रहाच्या बळावर मनुष्य सहन करूं शकेल, पण आपल्याच मनानें दिलेले मार सहन करणें अशक्य आहे. अशा त्या नित्य-मारापेक्षां मृत्यु सहस्रपट बरा, अशी स्थिति विठ्ठलपंताची झाली. आणि मनाच्या या स्थितींत, आपल्या पातकाचें क्षालन फक्त गंगायमुना या नद्यांच्या संगमावर क्षेत्राच्या पुण्य ठिकाणीं जाऊन तेथें त्या पवित्र जलौघांत आपल्या या नश्वर व पतित देहाचा त्याग केला असतां होईल, असें त्याला वाटून त्यानें प्रयाग-क्षेत्रीं त्या पवित्र व पावन अशा गंगौघांत आपला देह सोडून देऊन जलसमाधि घेतली.

विठ्ठलपंतानें अशा रितीनें देहत्याग केल्यानंतर तर त्याच्या चार मुलांना हें जग अरण्यवत् होऊन गेलें. ब्राह्मणत्वापासून तर आपण पतित झालों, आपली मुंजच नाहीं, तेव्हां 'द्विज' हा शब्दहि आपल्यास पारखा झाला, ज्या मार्गानें देहाचें सार्थक करावयाचें तो मार्ग बंद झाला, व मोक्षसाधनाचा विचारहि दूर झाला, ही गोष्ट या चारी भावंडांच्या दृष्टीसमोर अधिक-अधिक स्पष्ट दिसूं लागली; व यांतून कांहींतरी मार्ग काढणें त्यांना अवश्य वाटूं लागलें. जेथें चातुर्वर्ण्याची कल्पना दृढमूल आहे तो प्रांत—म्हणजे तो समाज व ते लोक—त्यांना वर्ज्य होऊन गेले.

---

१. 'सितासिते सरिते यत्र संगथे तत्राप्लुतासो दिवमुत्पतन्ति । यो वै तन्वं विसृजन्ति धीराः । ते जनासो । सोऽमृतत्वं भजन्ते '॥
ऋग्वेद-परिशिष्ट.

मोक्षसाधनाची उत्कृष्ट जाणीव असून यांना तो गांठणें असाध्य झालें. त्या मोक्षप्राप्तीला अवश्य तें ज्ञान, ती भक्ति, तें वैराग्य हीं सर्व साधनें यांचे जवळ होतीं; पण गुरुमुखाचा, दीक्षामंत्राचा आधार मिळाल्या-शिवाय यांचा उपयोग होण्यासारखा नव्हता. तेव्हां हा आधार सांपडून आपणांस योग्य पाठिंबा मिळावा यासाठीं योग्य पुरुषाची सेवा करून उपदेश घेणें अवश्य झालें. निवृत्तिज्ञानेश्वरांच्या पूर्वी दोन पिढ्यांपर्यंत या पुरुषांचा नाथसंप्रदायांतील पुरुषांशीं चांगला स्नेहसंबंध होता. या परिचयामुळें त्या पुरुषांकडे व त्यांच्या पंथाकडे या चार भावंडांचें मन साहजिकपणें वळलें; आणि तो पंथ या भावंडांना सुगम व अनुसरणीय वाटला. मोक्षप्राप्तीची त्यांची कल्पना व त्यांचें मत यांच्या पूर्ण परिचयाचें होतें. शिवाय या नाथपंथांत चातुर्वर्ण्याची आडकाठी नसल्या-मुळें इतर ठिकाणीं येणारा अडथळा यांत आयताच दूर झालेला होता. याशिवाय आणखीहि अशा प्रायश्चित्तादिकांनीं फारतर निवृत्ति, ज्ञानदेव व सोपानदेव यांची इतर ठिकाणीं सोय लावून घेतां आली असती, पण त्यांची बहीण मुक्ताबाई हिची तर इतरत्र मुळींच सोय होण्याचा संभव नव्हता; व हिला कांहींतरी साधनमार्गाला लावून दिल्याशिवाय आपण आपली सोय लावणें हें या भावांच्या मनोवृत्तीला अशक्य होतें. तेव्हां ज्यांत आपल्याबरोबर हिलाहि घेतां येईल व हिच्याहि देहाचें सार्थक साधेल, असा हा नाथपंथच स्वीकारणें यांना अवश्य झालें. नाथपंथांत ही स्त्रियांची सोय होण्यासारखी होतीच. तेव्हां मुक्ताबाईचेंहि मन तिकडे साहजिकच वळलें, आणि या भावंडांपैकीं सर्वांत वडील जो निवृत्तिनाथ त्यानें आपल्या घराण्याच्या परिचयाचा व आपल्या सर्वांच्या माहितीच्या नाथपंथी गैनीनाथाचा मंत्रोपदेश घेतला; व मग तोच उपदेश त्याच्या द्वारें इतर भावंडांसहि मिळाला. या स्थितींत ही उपदेशदीक्षा ज्ञानेश्वरानें घेतली हें खरें, पण यापूर्वीच मोक्षप्राप्तीची कल्पना व त्या कल्पनेच्या सिद्धीच्या साधनांची जाणीव ज्ञानेश्वराला पूर्णपणें होती. म्हणजे या बाबीचीं त्याचीं मतें स्थिर होऊन बद्धमूल झालेलीं होतीं. हीं मतें नाथ-

पंथांत पूर्णपणें सांपडण्यासारखीं नव्हतीं. यामुळें या त्याच्या मतांची, व त्याच्या मनांत इतके दिवस ठाम होऊन राहिलेल्या सिद्धांतांची आणि नाथपंथांतल्या मतांची व सिद्धांतांची सांगड घालणें त्याला ओघानेंच प्राप्त झालें. ज्ञानेश्वराचें पूर्वशिक्षण व संस्कार शंकराचार्यांच्या मतांचे असल्यामुळें शंकराचार्यांचे सिद्धांत त्याला करतलामलकवत् होते. पण शंकराचार्यांच्या सृष्टींत स्त्रीशूद्रांस मोक्षाचा वाडा उघडा नव्हता; आणि कल्पित अविद्या घेऊन सजविलेल्या मायावादानें त्यांच्या सृष्टींत एक तऱ्हेचें औदासीन्य भरून नैराश्याचीं ढगें सवत्र पसरलेलीं होतीं. सर्व जगाला आनंदाचें आवारू घालूं पाहणाऱ्या ज्ञानेश्वराला या सृष्टींत आशेच्या किरणांचा प्रकाश पाडून त्यांत स्त्री-शूद्रादिकांना—म्हणजे चातुर्वर्ण्याचा भेदाभेद आड न येऊं देतां सर्वांनाच या प्रकाशांत मोक्षमार्ग स्पष्ट व सोपा करून दाखवावयाचा होता; व हा मोक्षाचा रस्ता चोखाळतांना चातुर्वर्ण्यविशिष्ट जो आपला समाज, त्याची जुनी घडी मोडून टाकून, त्यांतील चालत असलेली सर्व व्यवस्था मोडून चातुर्वर्ण्य झुगारून तो चोखाळावा, असा त्यांचा आशय मुळींच नव्हता. ती चाललेली वर्णव्यवस्था तशीच जोपासून सुरळीत चालू ठेवावी, समाज विस्वळित करूं नये, व नसती क्रांती होऊं देऊं नये, हें त्यांना वाटत असे. पण ही वर्णव्यवस्था मोक्षाच्या आड येऊं नये, देहसार्थकाच्या वाटाघाटींत तिचा ठाव पुसून जाऊन तिचें नुसतें नांव निघण्यासहि वाव राहूं नये, इतकीच त्यांची इच्छा व आवड होती.

तुम्हां वर्ण विशेष वसें। आम्हीं स्वधर्मू विहिली असे।
एयातें उपासा; मग आपैसे। काम पुरती॥
देखा स्वधर्मातें भजाल। तरी कामधेनू हा होईल।
येऱ्हवि प्रजा हाचि नाडिल। तुमतें सदा॥......
जैसे जलचरां जल सांडे। आणि तत्क्षणीं मरण घडे।
हा स्वधर्मु ही तेणें पाडें। विसंभो नये॥......
हे सकल लोक संस्था। रक्षणीय सर्वथा।

साधनाच्या साधारण भुकाळू जनांना हा भेद कोणत्याहि प्रकारें आड येण्यासारखा नव्हता. कोणत्याहि साधनानें मोक्षसाधनें प्राप्त झालें तरी त्यांची क्षुधा निवारण होऊन तृप्ति होण्यासारखी होती. पण ज्ञानेश्वरां-सारख्या कल्पनासृष्टींत वावरणाऱ्या व उंच स्थानावरून निरीक्षण करणाऱ्या चाणाक्ष पुरुषाला इतका व असलाहि प्रपंच पसंत पडला नाहीं. यासाठीं ज्या पांचरात-सिद्धांतावर रामानुजांच्या सिद्धान्तांची बैठक ठेविली आहे त्या पांचरात-सिद्धांताकडे ते वळले. पांचरातामध्यें निरनिराळ्या संहिता आहेत. या संहितांत 'सव्यूह' आणि 'निर्व्यूह' असे दोन प्रकार आहेत. सव्यूह हे 'वासुदेव', 'संकर्षण', 'प्रद्युम्न' व 'अनिरुद्ध' हीं पौराणिक कथांतलीं नांवें 'परमात्मा', 'जीव', 'मन' व 'अहंकार' या शब्दांचा अर्थ दाखवण्यासाठीं अनुक्रमें योजून हे एकापासून दुसरा अशा रितीनें निर्माण झाले, असें म्हणतात; व 'निर्व्यूह' हे, हे सर्व एकाचेच पर्यायप्रकार आहेत, असें म्हणतात. दूध, दहीं, लोणी, तूप हे पदार्थ दुधापासून दहीं, दह्यापासून लोणी व लोण्यापासून तूप अशा परंपरेनें सिद्ध झाले, असें सव्यूह म्हणतात; व दहीं, लोणी, तूप हे दुधाचेच पर्यायप्रकार होत, असें निर्व्यूह सांगतात. दुधापेक्षां पाण्याच्या उदाहरणानें समजूत नीट पटेल. बर्फ, पाणी, वाफ व ढग ही परंपरा बर्फापासून पाणी होतें, व पाण्याची वाफ होते, व वाफेचे ढग बनतात, हें सव्यूहांचें म्हणणें आणि बर्फ, पाणी, वाफ व ढग हीं सर्व एकच होत, हीं पाण्याचीं निरनिराळीं रूपें जाणावीं, असें निर्व्यूहांचें म्हणणें. याहिपेक्षां एका आणखी निराळ्या दृष्टांतानें हें सांगावयाचें तर असें म्हणूं कीं, उष्णता, उजेड, वीज आणि लोहचुंबकत्व हीं सर्व एकाच शक्तीचीं रूपें आहेत, असें निर्व्यूहांचें सांगणें; आणि उष्णतेपासून उजेडाची उत्पत्ति हें सव्यूहांचें म्हणणें. यांपैकीं एक दुसऱ्या-पासून झालें, असें म्हणणारांपेक्षां एक दुसऱ्याचें पर्यायरूप असें म्हणणारे ज्ञानेश्वराला जास्त पसंत वाटले; व त्यांचें म्हणणें त्यानें ग्राह्य केलें. पहिल्यांना म्हणजे सव्यूहांना जुन्या श्रुतिस्मृतींचा आधार नव्हता;

उलट विरोध होता. आणि दुसऱ्यांना श्रुतिस्मृतींचा विरोध नसून एक प्रकारानें पाठिंबाच होता. आणि ज्ञानेश्वराचें पाहणें असें होतें कीं, होतां होईतों, शक्य ते यत्न करून विरोधाच्या भानगडींत न पडतां, जें आपणास मिळतें असेल तितक्याचाच अंगीकार करून आपला रस्ता सुधारावा. असें केल्यानें भांडण टाळून आपलें मकाण सुलभपणानें गांठतां येतें. आणि हें असें करीत करीत त्यानें चातुर्वर्ण्याला आड येऊं न देतां, तें संभाळून मोक्षाची पायरी गांठण्याचा सर्वांना सोयीचा आणि सुलभ असा मार्ग दाखवून दिला. या कारणामुळेंच पांचरातांच्या 'सव्यूह' आणि 'निर्व्यूह' या दोन पंथांपैकीं अथवा मार्गांपैकीं दुसरा म्हणजे "निर्व्यूह" हा मार्ग ज्ञानेश्वराला जास्त पसंत पडला व पटला; आणि मग तो त्यानें स्वीकारिला. या पांचरात-सिद्धांतामध्यें दुसरी एक सोय अशी झाली कीं, रामानुजांच्या मतांत जी चातुर्वर्ण्याची थोडीशी छाया दिसत होती ती या पांचरातांत प्रायः पुष्कळशी नाहींशी झाली व त्या चातुर्वर्ण्यभेदाची जर कांहीं थोडीशी छटा एकंदर पांचरातांत अंधुक-अंधुक दिसत असली तर या पांचरात-सिद्धांतांच्या अलवार-साधूंनीं केलेल्या विवरणांत व प्रतिपादनांत तर या छटेचा मागमूसहि नव्हता. यासाठीं पांचरात-सिद्धांतांचें अलवार-साधूंचें व्याख्यान ज्ञानेश्वराला आणखी विशेषपणानें आवडलें व तेंच त्यानें आपल्या कार्याकरितां उचलिलें. या अलवारसाधूंच्या व्याख्यानाला आणि मताला काश्मिरी शैव-पथीयांचा दुजोरा होता. तो तसा असल्यामुळें काश्मिरी शैव सिद्धांत यांना आधिक्यानें ग्राह्य झाले; त्या सिद्धांतांचा पाठिंबा त्यानीं आपल्या प्रतिपादनास घेतला, व असें करून कोणालाहि असमाधानाला कोणतेंहि कारण न ठेवतां, डोळ्यांना परतत्त्व दाखवीत, मनाला सुखाचा सोहळा करीत, सर्व विश्वाला महाबोधाचा जेथें सुकाळ आहे अशा ठिकाणीं त्यानें नेऊन सोडलें; आणि तेथें त्यांच्यावर नवरसांचा वर्षाव करीत आत्मसुखांत

---

१. वेदु संपन्न होये ठाईं । परी कृपणू आन नाहीं । जे कानि लागला

[पान १५२ पहा.]

त्यांना गुंगत ठेविलें. या प्रकारानें जुन्या प्रचलित मतांत सभोवतालच्या इतर मतांचा गोड मिलाफ करून, पहिल्यांतला कमीपणा मी काढून टाकतों, असें दिसूं न देतां केवळ स्पष्टता करण्याच्या मिषानें तो सुधारून देऊन (बदल करीत असल्याचा किंवा केल्याचा सुगावाहि नीट लागूं न देतां) ज्ञानेश्वरांनीं आपल्या श्रोत्यांना मोक्षाचा सुखदायक व सर्वांस संतोषदायक असा मार्ग गीतेच्या आपल्या ज्ञानदेवी-टीकेंत दाखवून दिला.

ही ज्ञानेश्वरी टीका लिहितांना ज्ञानेश्वराला वरीलप्रमाणें अनेक धोरणें संभाळावयाचीं होतीं. आडपडद्यानें कोणाशींहि विरोध केल्याचा भासहि होऊं न देतां आपले ठरलेले ठाम सिद्धांत सांगावयाचे होते; व आपल्या औषधाला साखरेचें अनुपान सांगून रोग्याला रोगमुक्त करावयाचें होतें. अर्थात् साखरेच्या पाकांत हें मात्रेचें चाटण चाटवावयाचें होतें; व तें त्यानें चाटविलें.

पण असें करीत असतांना त्याच्या मनांत एक तऱ्हेची खळबळ होत होती. त्याच्या गीताटीकेंतल्या दहाव्या अध्यायांतील दुसऱ्या श्लोकावरील व्याख्यान वाचीत असतां ज्ञानेश्वराच्या मनांतली ही खळबळ थोडी दिसूं लागते; व पुढें चौदाव्या अध्यायांतल्या—

**जालेनि जगें मी झांकें । तरि जगत्वें कोणु फांके ।**
**किलेवरी माणिकें । लोपिजे काइ ॥**
**कां अलंकारत्व आलें । आणि सोनेपण काइ गेलें ।**
**कीं कमलत्व फांकले- । पणें जाये ॥**
**सांघ पां धनंजया । अवेवी अवेवीया ।**
**आछादिजे कीं तेया । तेंचि रूप ॥**

---

**[पान १५१-वरून]**

**तिहिं । वर्णांचाचि ॥ एरा भवव्यथा ठेलेयां स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनसवरू मांडुनियां । असे नव्हे ॥** ~~१८~~/१४४७.

**इया लागि मागिली कुटी । बिहाला वेदु गीतेचां पोटी । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥** ~~१८~~/१४५५.

विरूढलेयां जोन्हला । कणिसांचां निर्वाला ।
वेचला कीं आगला । दीसतसे ।।
म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नव्हे उखितें । आघवें चि मीं ।।
हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा ।
गांठि बांध पां वीरा । जीवाचिये ।।
आतां मियां मज दाविलां । शरीरीं वेगलालां ।
गुणीं मीं चि बांधिला । ऐसा आवडें ।। (अ. १४, ओ. १२२-१२८)
म्हणौनी विश्वपण जावें । मग मातें घेयावें ।
तैसा न्हवे आघवें । सकट चि मी ।।
ऐसेनि मातें जाणिजे । तें जाणिवभक्ति म्हणिजे ।
एथ भेदू कांहि देखिजे । व्यभिचारु तो ।।
येया कारणें भेदातें । सांडूनि अखंडें चित्तें ।
आपणेयां सकट मातें । जाणावें गा ।।
पार्था सोनेयां टीक । सोनां चि लागली देख ।
तैसें आपणपें आणिक । मानावें गा ।।
तेजाचा तेजौनि निगाला । परि तेजीं असे लागला ।
तेया रश्मी ऐसा भला । बोधु होआवा ।। (अ. १४, ओ. ३७७-३८१)

इत्यादि ओव्या डोळ्यांपुढें घेतल्या व नीट न्याहळल्या तर त्यांत एक खळबळाटाचा ध्वनि निघतो. आणि हा ध्वनि जेथें उत्पन्न झाला तें हृदय याहून आणखी कांहीं निराळें बोलूं इच्छीत आहे, असा संशय पुन्हां-पुन्हां येतो. हा संशय खरा आहे; व या ठिकाणींच पुढल्या 'अमृतानुभव' ग्रंथाचें बीजारोपण आहे.

हा पुढला ग्रंथ म्हणे 'अमृतानुभव'. हा ग्रंथ म्हणजे एक शुद्ध रसायन आहे. यांत शर्करा नाहीं आणि यास अनुपान नाहीं. येथें आपलें काय मत आहे हें स्वच्छपणें, थोडक्यांत मांडिलें आहे. हा ज्ञानेश्वरी-सिद्धांत—रसायनाचा शुद्ध व निर्मळ मेळा आहे. आणि इतर निर्भेळ व शुद्ध अर्काप्रमाणें हा जिभेला गोड लागत नाहीं; पण गुणाला मात्र तो उत्तमोत्तम

आहे. मात्र तो खातां आणि पचवितां आला पाहिजे. अमृतानुभव ज्ञानेश्वरीहून श्रेष्ठ असतां तो लोकप्रिय कां झाला नाहीं, ज्ञानेश्वरीप्रमाणें त्याचीं पारायणें नित्य कां होत नाहींत, असा प्रश्न वारंवार येतो. असें होण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, तो ग्रंथ फार कठीण आहे. त्यांत फक्त सिद्धांत, अपवाद व प्रत्यपवाद यांची सोपानपरंपरा रचिली असल्या-मुळें विशेष विद्वान् व बुद्धिमान् पंडितांशिवाय या ग्रंथाच्या वाटेस कोणी जात नाहीं. यांत मोठमोठ्या गहन सिद्धांतांशीं झटापट घेतली असल्या-मुळें त्या पाचपेचांचें मर्म जाणण्याची ताकद अंगांत असल्याशिवाय या ग्रंथाचे भानगडींत पडणें दुरापास्त आहे. शिवाय भाषेच्या दृष्टीनेंहि ज्ञानेश्वरींतली मौज यांत नाहीं. पहिल्याच प्रकरणांतल्या शिवशक्तीची अभिन्नता ज्यांत वर्णन केली आहे, अशासारख्या बहारीच्या ओव्या मधून-मधून आहेत; पण एकंदरीनें ज्ञानेश्वरींतला भाषेचा, वर्णनाचा व उठावाचा थाट यांत नाहीं.

या ग्रंथाचें प्रल्हाद बडवे वगैरेंनीं संस्कृतांत भाषांतर केलें असून याजवर शिवकल्याण, निरंजन, रघुनाथ, वीरेश्वर, हंसस्वामी वगैरे पंडितांनीं मराठींत टीका केल्या आहेत. यावर एकनाथाचीहि एक टीका असावी, असें म्हणण्यास आधार आहे. शिवाय सहजानंदाची यावर 'सहजानंदी' नांवाची एक संस्कृत टीका आहे.

या दोन मुख्य ग्रंथांशिवाय 'भक्तराज', 'स्वात्मानुभव' हेहि ग्रंथ ज्ञानेश्वर-महाराजांचे प्रसिद्ध आहेत. यांखेरीज 'चांगदेवपासष्टी', 'सच्चिदानंद-लखोटा', 'कल्याणपत्रिका', 'नमन', 'पंचीकरण', 'महावाक्य', 'हरिपाठ', 'शुकाष्टकटीका', 'गायत्रीरहस्य', 'अन्वयव्यतिरेक' वगैरे आणखीहि प्रकरणें ज्ञानेश्वरांचीं म्हणून समजलीं जातात; शिवाय यांचीं पदें व अभंगहि

[पान १५५ पहा.]

१. 'योगवासिष्ठ' हाहि ग्रंथ फार दिवस ज्ञानेश्वरांचाच समजला जात असे; पण हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नसून एका महानुभावपंथी ग्रंथकाराचा आहे.

२. यांपैकीं अनेक प्रकरणांचे शेवटीं त्यांचा समाप्तिकाल शके १२१२

प्रसिद्ध आहेत. ज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणेंच त्यांचीं इतर भावंडेंहि फार विद्वान् व विरक्त अशीं होतीं. या सर्वांनीं मराठींत ग्रंथरचना केली आहे. या सर्व भावंडांत निवृत्तिनाथ हे वडील. हे ज्ञानेश्वरांचे प्रत्यक्ष गुरु. यांचा 'हरिपाठ' प्रसिद्ध आहे. यांनीं 'निवृत्तिसार' नांवाचा एक ग्रंथ लिहिला असावा, असा समज आहे. याचा उल्लेख नामदेवांनीं "निवृत्तिनाथांनीं ग्रंथ केला 'सार'। ठेविला समोर। विठ्ठलाच्या॥" असा केलेला आढळतो. 'निवृत्तिदेवी' अथवा 'निवृत्तेश्वरी' या नांवाच्या जुन्या पोथ्या उपलब्ध व उल्लिखित आहेत. ज्ञानेश्वराहून सोपानदेव हे लहान. यांनींहि 'पंचीकरण', 'हरिपाठ', 'नमन' वगैरे प्रकरणें लिहिलीं असून शिवाययांनीं 'सोपानदेवी' या नांवाची गीतेवर एक समश्लोकी ओवीबद्ध टीका लिहिली आहे.

यांची वहीण मुक्ताबाई ही या सर्वांत धाकटी. हीहि आपल्या भावां-प्रमाणेंच विद्वान् असून त्यांच्याचप्रमाणें विरक्त वृत्तीनें राही. हिनें आजन्म कौमार्यव्रत पाळलें होतें. मरणसमयीं ही सोळा वर्षांची होती. हिचे अभंग, पदें, 'कल्याणपत्रिका' व 'हरिपाठ' अशी रचना प्रसिद्ध आहे. ही सर्वच रचना गोड आहे; व स्त्रियांच्या कोमलपणाची छटा तींत पसरली आहे. सूर्योदयापूर्वीं पक्षी किलबिल करूं लागले म्हणजे जो आनंद होतो तोच हिचे अभंग वाचतांना होतो. हिचे 'ताटीचे अभंग' तर विशेषच गोड आहेत. एक दिवस ज्ञानेश्वरांस पाहून कोणीं टवाळानें या संन्याशाच्या

---

[पान १५४-वरून.]

हाच दिलेला आढळतो. ही बाब जरा विशेष आहे.

**स्वात्मानुभव** :–शके बाराशें बारा। तें ग्रंथ केला उभारा। परिसावया चतुरा। म्हणे निवृत्तिदास॥

**भक्तराज**:–शके बाराशें बारोत्तरीं। अलकापुरी दिव्य नगरी। इंद्रायणीच्या तिरीं। ग्रंथ समाप्ती पावला॥ (समाधिस्त योगिया–अन्यपाठ).

**शुकाष्टकावरील** टीकेच्या शेवटीं समाप्तिकाल १२१६ दिला आहे:–
शके बाराशें सोळोत्तरीं। (परा?) जय नाम संवत्सरीं। कार्तिक शुद्ध द्वितीया इंद्रायणी तीरीं। ग्रंथ निर्धारीं संपला॥

पोराचें दर्शन घडलें, हा आपणास मोठा अपशकुन झाला, असें म्हटल्या-वरून, ज्ञानेश्वर आपल्या मनांत फार खिन्न होऊन खोलींत जाऊन बसले; व खोलीची ताटी किंवा दार उघडून मुक्ताबाईस आंत घेत ना. या वेळीं ताटी उघडून आपणास आंत घेण्याविषयीं मुक्ताबाईनें विनवणी केली. हेच अभंग हल्लीं 'ताटीचे अभंग' म्हणून प्रसिद्ध आहेत. नमुन्यासाठीं त्यांतील कांहीं ओळी पुढें देतों:—

**मजवरी दया करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।**
**संत जेणें व्हावें । जगबोलणें सोसावें ।।**
**तरी च आंगीं थोरपण । जया नाहीं अभिमान ।**
**थोरपण जेथें वसे । तेथ भूतदया असे ।।**
**रागें भरावें कवणाशीं । आपण ब्रह्म सर्व देशीं ।**
**ऐशी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।**
**योगी पावन मनाचा । साहे अपराध जनाचा ।**
**विश्व झालिया वन्ही । संतमुखें व्हावें पाणी ।।**
**शब्दशस्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ।**
**विश्व परब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।**
**लडिवाळ मुक्ताबाई । बीज मुद्दल ठायीं ठायीं ।**
**तुम्ही तरोन विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।**

मुक्ताबाईचे हे अभंग पाहिले म्हणजे मन अगदीं थक्क होऊन जातें. एवढीशी चवदापंधरा वर्षांच्या आंतली पोर, हिनें ही रचना केली कशी, ज्या वयांत पोरींचा अल्लडपणादेखील पुरा जात नाहीं, त्या वयांत हिला जगाचा वीट येण्यापुरतें ज्ञान प्राप्त झालें कसें, व हिच्या ठायीं अशी दांडगी भक्ति व इतकी धगधगीत विरक्ति आली कोठून, याचें राहून-राहून आश्चर्य वाटतें !

निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव आणि मुक्ताबाई हीं चारी भावंडें आपे-गांवास जन्मलीं. अगदीं लहान असतांच यांचीं आईबापें यांस तेथेंच टाकून दूरदेशीं निघून गेलीं. तेव्हां हीं पोरकीं पोरें, यांस संभाळणार कोण?

आणि तशांत हीं संन्याशाचीं मुलें! यामुळें तर हीं अगदींच उघडीं पडलीं. तेव्हां वडिलानें चार घरें भिक्षा मागून आणावी व तीवर सर्वांनीं दिवस काढावा, असा क्रम चालला. पुढें हीं भावंडें तेथून निघून श्रीक्षेत्र पैठण येथें आलीं. पैठणास आल्यापासून यांच्यासंबंधीं लोकांच्या मतांत बदल पडूं लागला. येथेंच यांच्या दिव्य ज्ञानाचा व अलोट तेजाचा प्रकाश फाकण्यास सुरुवात झाली. भक्तिमार्ग हा श्रेष्ठ आहे, सर्व जीवांचा आत्मा येथून-तेथून एकच आहे, सर्वांनीं एकमेकांतला भेदभाव व मत्सर सोडून देऊन अनन्यभावें त्या विश्वपित्यास शरण गेलें पाहिजे, असा उपदेश हीं भावंडें लहानापासून थोरापर्यंत सर्वांस एकसारखा करूं लागलीं; आणि त्यांनीं पुढें नेवाशास येऊन एक नवा मार्ग चोखाळून नव्या पंथाची उभारणी केली; आणि तेथेंच नवीन उपदेशानुसार नवीन व तेजःपूर्ण अशा ग्रंथांची रचनाहि केली. स्वतः चारी भावंडांचें उत्कृष्ट आचरण व उदाहरण आणि त्यांनीं केलेल्या ग्रंथरचनेचा उद्योग या सर्व गोष्टींमुळें यांस असंख्य चाहते व अनुयायीहि मिळाले. त्या काळच्या विठ्ठलभक्तमंडळांत यांस अग्रेसरत्व प्राप्त झालें व एका दृष्टीनें त्यांच्या अवताराचें कार्य पुष्कळ अंशांनीं तडीस गेल्यासारखें दिसूं लागलें. 'ज्ञानेश्वरी' आणि 'अमृतानुभव' यांसारख्या भव्य ग्रंथांची उभारणी केल्यावर ज्ञानेश्वर आपला ज्येष्ठ बंधु व गुरु जो निवृत्तिनाथ त्यासह इतर भक्त-मंडळास बरोबर घेऊन तीर्थयात्रेस निघाला. संतमंडळींचे संगतींत ह्या भावंडांनीं अनेक तीर्थांच्या यात्रा केल्या.

> टाळ मृदंग विणे सुस्वर। नादें दुमदुमलें अंबर।
> त्यांत ही टाळियांचा गजर। अपरंपार ओढवला॥

अशा थाटानें कीर्तन करीत हे अनेक ठिकाणीं गेले. ही तीर्थयात्रा करीत असतां या मंडळींनीं महाराष्ट्रांतल्या गांवोगांवीं व दारोदारीं आपल्या नवीन पंथाच्या वेलाचे रोपे लाविले; व यांनीं या वेळीं लावलेल्या त्या लहान पण जोमदार अशा रोप्यांचे ताणे लवकरच सर्वभर पसरून त्यांचे वेल गगनावर गेले; आणि सर्वभर या वेलांना कळ्यांचे अतिभार येऊन

हीं फुलें लोक वेचूं लागले. ‘अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन। तिन्ही लोक’ ही प्रतिज्ञा अशा या तीर्थयात्रांनीं त्यांनीं खरी केली, या तीर्थयात्रेचें वर्णन नामदेवांनीं फार प्रेमळ अभंगांत गाइलेलें आहे.

तीर्थयात्रा आटोपून ज्ञानेश्वरमहाराज शके १२१८-च्या कार्तिकमासीं श्रीक्षेत्र पंढरपूर येथें आले; आणि याच वेळीं ‘जगीं मान्यता वाढून उपाधि होते व ईश्वराराधनेंत व्यत्यय येतो’ याकरितां एकांतसुखाचा लाभ घेण्यासाठीं जिवंतसमाधि घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. कार्तिकीच्या वारीसाठीं संतमंडळ जमलें होतें, त्यास ज्ञानोबांचा हा विचार ऐकून फार वाईट वाटलें ; व ही मंडळी त्यांच्या बरोबर आळंदीस गेली. आळंदीस आल्यावर वद्यपक्षांत एकादशीस हरिजागार होऊन द्वादशीस बुधवारीं पारणें झालें. दुसरे दिवशीं म्हणजे गुरुवारीं त्रयोदशीस दुपारीं गांवाजवळ इंद्रायणी नदीचे कांठीं श्रीसिद्धेश्वराच्या देवळाच्या डाव्या बाजूस अजानवृक्षाखालीं एक समाधिस्थान तयार करविलें होतें. त्यांत श्रीज्ञानेश्वरमहाराज समाधि घेण्यास बसले. समाधीची जागा नामदेवाच्या मुलांनीं झाडून स्वच्छ केली व संतांनीं ज्ञानेश्वर-महाराजांच्या कपाळीं गंध लावून गळ्यांत माळा घातल्यावर तुळशीबेल हांतरून त्यावर मांडलेल्या दर्भासनावर सर्वांना नमन करून ज्ञानदेव समाधीस बसले व मग निवृत्तिनाथांनीं समाधिस्थानाच्या बाहेर येऊन समाधीशीं शिळा घातली. संतांनीं हरिनामाच्या गजरानें व टाळमृदंगांच्या आवाजानें दशदिशा दणाणून टाकिल्या ! ही गोष्ट शके १२१८ दुर्मुखनाम संवत्सरीं कार्तिक वद्य त्रयोदशीस गुरुवारीं दुपारीं घडली. ज्ञानेश्वरांच्या नंतर त्यांचीं इतर भावंडें या लोकीं फार दिवस राहिलीं नाहींत. मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीस सोपानदेव हे सासवड मुक्कामीं समाधिस्थ झाले. दोन भाऊ गेल्यानंतर आपली जन्मभूमि व आपले पणजे त्र्यंबकपंत यांची समाधि डोळांभर पहावी म्हणून निवृत्तिनाथ आणि मुक्ताबाई आपेगांवास गेलीं. ती लहानपणची जागा पाहून “तात आणि माता गेलीसे येथूनि। तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा” अशी आठवण होऊन त्यांस उमाळा आला; आणि

लहानपणीं निवृत्ति व ज्ञानेश्वर कोरान्नाची भिक्षा मागण्यास जात तेव्हां 'सांभाळी सोपान मज लागीं' अशा बाळपणाच्या एक-एक आठवणी मुक्ताबाईस होऊन ती खिन्न आणि उदास झाली. तिनें 'त्यागिले आहार अन्नपाणी सकळी' आणि पुढें थोडेच दिवसांनीं म्हणजे वैशाख वद्य द्वादशीस शके १२१९-त ती परलोकवासी झाली. हिची समाधि एदलाबादेजवळ माणगांव येथें आहे. भक्तमंडळ म्हणतें कीं, मुक्ताबाई आकाशांत विजेचा प्रचंड गडगडाट झाला त्यासरशीं सहजस्वरूपीं मिळून गेली. अर्थात् तिचा देह विजेच्या लोळासरसा नाहींसा झाला.

आपलीं सर्व भावंडें आपल्यादेखत गेल्यामुळें औदासीन्य उत्पन्न होऊन "ज्येष्ठाच्या हि आधीं कनिष्ठानें जाणें। केलें नारायणें उफराटें ॥ उफराटें फार वाटे माझें मनीं। वळचणीचें पाणि आढ्या गेलें ॥" असें निवृत्तिनाथांस वाटलें व त्यांनींहि सुमारें एक महिना उलटला नाहीं तोंच ज्येष्ठ वद्य द्वादशीस त्र्यंबकेश्वरीं देह ठेविला.

निवृत्तिनाथ हे आपल्या वयाच्या २६-व्या वर्षीं समाधिस्थ झाले. ज्ञानदेवांनीं तर २२-व्याच वर्षी हें जग सोडलें; आणि सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांनीं अनुक्रमें २०-व्या व १८-व्याच वर्षी इहलोक सोडला. तेव्हां या चार भावंडांनीं आपल्या अल्पायुष्यांत जीं कृत्यें केलीं त्याबद्दल कोणालाहि अभिमान वाटेल. या चारी भावंडांचे आपल्या भाषेवर अनंत उपकार आहेत. त्यांनीं हिचें खरें स्वरूप जगास प्रकट केलें. त्यांनींच या महाराष्ट्र-भाषेच्या पेठेंत ब्रह्मविद्येचा सुकाळ करून नवरसांचे समुद्र निर्माण केले आणि त्यांनींच आपल्या कौशल्यानें हिच्याकडून संस्कृतालाहि जिंकून प्रत्यक्ष साहित्यशास्त्राकरवीं हिला अलंकाराचें लेणें लेवविलें. ज्या मातेच्या पोटीं असलीं चार भावंडें जन्मास आलीं ती माता खरोखरीच मोठी भाग्याची असली पाहिजे. आणि ज्या काळांत हीं भावंडें उदयास आलीं व ज्यांना ज्यांना त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ घडला तो काळ व ते महापुरुष धन्य धन्य मानिले पाहिजेत! आधींच ब्राह्मणाचें कूळ आणि त्यांत विठ्ठलपंतासारखा वृत्तिवान्, प्रेमळ व हरिभक्त पिता. यामुळें

हीं मुलें जात्याच हुशार व विद्वान् निपजलीं आणि त्यांच्यावर आलेल्या संकटांमुळें खचून न जातां तीं अग्नींत तावलेल्या सुवर्णाप्रमाणें अधिकाधिक तेजास चढत गेलीं, हें या देशाचें केवढें भाग्य ! !

( १ ) विसोबा खेचर म्हणतातः—

अलंकापुरीं राहिली । श्रीगुरु ज्ञानाई माउली ।।
इंद्रायणी तीर । नांदे दैवत सिद्धेश्वर ।।
शके बाराशें आठरा । दुर्मुखनाम संवत्सरा ।।
गुरुवासर कार्तिकमासीं । कृष्णपक्ष त्रयोदशी ।।
माध्यान्हीं दिनकर । राहे क्षणमात्र स्थिर ।।
खेचर वंदी ज्ञानेश्वर । जोडोनिया दोन्ही कर ।।

( २ ) नामदेवराय म्हणतातः-

धन्य अलंकापूर इंद्रायणीतीर । देव सिद्धेश्वर नांदे तेथें ।।
पुण्यक्षेत्र ऐसें पाहूनीया आधीं । कृष्णा कार्तीकमास त्रयोदशी ।।
देव गुरुवार दुर्मुख संवत्सर । करिती सुरवर कुसुमवृष्टी ।।
नामा म्हणे ज्ञानराज ब्रह्म पूर्ण । समाधि निधान संजीवनी ।।

( ३ ) जनाबाई म्हणतातः-

धन्य सर्व काळ धन्य तो सुदिन । धन्य हा निधान ज्ञानदेव ।।
बाराशतें अठरा दुर्मुख संवत्सर । तिथी गुरुवासर त्रयोदशी ।।
शरदृतु कृष्ण पक्ष कार्तीक मास । बैसे समाधीस ज्ञानराजा ।।
नामयाची जनी लागते चरणीं । ज्ञानेश्वरा ध्यानीं जपतसे ।।

(४) चोखामेळा म्हणतात :-

ज्ञानेश्वर नामें धरिला अवतार । क्षेत्र अलंकापूर इंद्रायणी ।।
अद्वैतज्ञानाची करूनी उजरी । टीका ज्ञानेश्वरी ग्रंथ केला ।
अमृत अनुभवी गुरुगम्य ज्ञान । दाउनीया जन उद्धरीलें ।।
बाराशतें अठरा शक शालिवाहन । दुर्मुख अभिधान संवत्सर ।।
कृष्ण त्रयोदशी कार्तिक मास । बैसे समाधीस ज्ञानदेव ।।
जातिहीन चोखा विनवी जोडुनि कर । समाधी निर्धार संजीवनी ।।



# नामदेव

ज्ञानेश्वरादि चार भावंडांबरोबर जो भजन करीत आणि नव्या मार्गाचा उपदेश करीत फार हिंडला, तो नामदेव कवि जातीनें शिंपी होता. ज्ञानेश्वराच्या पूर्वींच्या पिढ्यांची, तसेंच त्यांच्या समाधीसंबंधाची जी कांहीं थोडीफार त्रोटक माहिती आपणांस मिळते तिजबद्दल आपण याचेच ऋणी आहों. यानें रचिलेलीं 'ज्ञानदेवाची 'आदि' तीर्थावळी' तसेंच 'ज्ञानेश्वर-महाराजांची समाधि' हीं प्रकरणें वाचतांना तितकीं जुनीं अशीं कानाला लागत नाहींत. हीं प्रकरणें अभंगात्मक असल्यामुळें व तीं वारंवार तोंडानें म्हटलीं जाऊन एका पिढीनें दुसऱ्या पिढीच्या स्वाधीन केल्यामुळें यांतील बहुतेक शब्द पालटले गेले आहेत. तुकाराम, रामदास, महीपती, श्रीधर वगैरेंची अस्सल किंवा अगदीं जवळजवळ अस्सल अशी संहिता आज आपल्याला उपलब्ध आहे. ती व हल्लीं प्रचारांत असलेली त्यांची रचना पाहिली असतां त्यांत किती फेरपालट झाला आहे, हें ध्यानांत येईल आणि हें असें ध्यानांत आणिलें म्हणजे याच्या पूर्वीं अनेक शतकें होऊन गेलेल्या लेखकांच्या तोंडानेंच पाठ म्हणण्यासारख्या वर उल्लेखिलेल्या लहान-सहान प्रकरणांत इतका फेर-पालट होऊन मूळरूप असें साफ कां पालटलें, याचा स्पष्ट उलगडा होतो. असा बदल झाला असतांहि आज सहासातशें वर्षांनंतरदेखील नामदेवाच्या अभंगांत 'वेळाइतु', 'अनारिसा', 'केउता', 'दारवंटा', 'साउमा', 'नाथिलें', 'पडिवाडें', 'वोरसु' हे व असले जुने शब्द आढळतात, ही या रचनेच्या पुराणत्वाची बिनचूक खूण आहे. याशिवाय दुसरी सहज मनांत येणारी गोष्ट अशी कीं. ज्ञानेश्वरानंतर पांच-दहा वर्षांतच एक मोठें अराजक झालें. सर्व महाराष्ट्र पायापासून हादरून टाकणारी राज्यक्रांति झाली. त्या वेळच्या सर्वसत्ताधीश चक्रवर्तींच्या नुसत्या नांवापलीकडे कांहींएक माहिती राहिली नाहीं. अशा धडामोडींत

ज्ञानेश्वराची व त्याच्या पूर्वजांची नवीन संशोधनानें व पुराव्यानें खरी खरी ठरणारी माहिती त्या वेळीं प्रत्यक्ष पाहून लिहून ठेवणाऱ्या इसमाशिवाय दुसऱ्या कोणाला असणार! ही ज्ञानेश्वराची व तत्कालीन इतर कवींची माहिती दुसऱ्या कोणीं तरी लिहून नामदेवाच्या तोंडीं घातली असावी, असें मनांत आणिलें तरी तें क्षणभरहि टिकत नाहीं; कारण या अलौकिक पुरुषासंबंधीं ज्याला यत्किंचित् तरी माहिती आहे तो ती स्वत:चेच नांवानें लिहील व प्रसिद्ध करील. यांत दुसऱ्याचें नांव काय म्हणून कोणी घालील! आणि घालणेंच, तर वेळेस सच्चिदानंदबावाचें घालील, गैहिनींचें घालील, निवृत्तीचें घालील. नामदेवाचें कोणी खोटें नांव बळेंच घालील, हें केवळ अशक्य आहे.

याशिवाय आणखी एक बाब मनांत येते ती अशी कीं, ज्ञानेश्वरानंतर लौकरच त्याच्या ग्रंथाचा लोप झाला होता. एकनाथासारख्यालाहि त्याचा तो अद्वितीय ग्रंथ मिळविण्याला फार खटपट करावी लागली. अशा स्थितींत ज्ञानेश्वराच्या कल्पना नामदेव बरोबर उचलतो व आपल्या कवित्वाच्या ओघांत त्या सहज बोलून जातो, हें नित्य-परिचयाशिवाय असंभवनीय दिसतें. ज्ञानेश्वर आपल्या दोन्ही - किंबहुना अभंगांशिवाय इतर कोणत्याहि—ग्रंथांत विठ्ठलाचें नांवहि काढीत नाहीं. याचें उघड कारण असें आहे कीं, अमुक एका दैवताची स्तुति करावी किंवा करवावी, हा ज्ञानेश्वराचा उद्देश नसून आपल्या पूर्वीच्या मार्गदर्शकांनीं मोक्षसाधनाचा जो मार्ग आंखून दिला, त्यापेक्षां नवा व सोपा मार्ग जनतेला दाखवून द्यावा, यांतच ज्ञानेश्वराच्या अवतारकृत्याचें इंगित आहे. बुद्ध, जैन, महानुभाव वगैरेंनीं चातुर्वर्ण्य-व्यवस्थेला जो धक्का देण्याचा यत्न केला होता व तत्कालीन हिंदुसमाजांत एका तऱ्हेची असंतुष्टता शिरून जो एक विस्कळितपणा येऊं पाहत होता, तो नाहींसा करून चातुर्वर्ण्याचा भेदभाव, मानवदेहाचें अंतिमसाध्य जें मोक्षसाधन तें साधण्यांत शंकराचार्य, रामानुज वगैरे महात्म्यांच्या निरूपणांत जो थोडासा भासत होता, तो साफ नाहींसा करून लवमात्र आड येत नाहीं, हें सांगण्यांत

ज्ञानेश्वराच्या मोठेपणाचें बीज आहे. ज्ञानेश्वरानें जें हें बीज पेरलें व ज्याची नामदेव, एकनाथ, तुकाराम, महीपती, हैबतराव, विष्णुबुवा, वगैरेंनीं जी जोपासना केली, त्याचा असा मोठा प्रचंड वृक्ष झाला आहे व त्याची पाळेंमुळें हिंदुसमाजांत इतकीं खोल शिरलीं आहेत कीं, आज गेलीं शंभर वर्षें निकराचे अनंत यत्न चालू असतांहि तो वृक्ष तसाच कायम आहे. ज्ञानेश्वरांनीं लाविलेला नंदादीप नामदेव-तुकारामादि महापुरुषांनीं तेल घालून व वात सारसारून आजपर्यंत असा तेवत ठेविला आहे कीं, त्यामुळें हा महाराष्ट्र हिंदुसमाज, स्वधर्म, स्वभाषा, स्वव्यवस्था स्पष्ट पाहूं शकतो; व अंधाराचा अंधुकपणा त्याच्या स्वधर्माच्या व भक्तीच्या गाभाऱ्यांत बिलकूल राहत नाहीं; आणि हा एवढा मोठा नंदादीप उजळून तो सारखा प्रकाशत ठेवणाऱ्या सर्व साधुसंतांची मुख्य करामत अशी कीं, त्यांनीं त्याला जळत ठेवण्यासाठीं कोणाचाहि देह जाळला नाहीं, कोणाचेंहि लहान बोटदेखील पोळलें नाहीं, कीं कोणाच्याहि मनाला अग्नीचा चटकाहि लाविला नाहीं. पृथ्वीच्या पाठीवरील इतर देशांतल्या साधुसंतांनीं नवा मार्ग काढतांना किंवा जुन्या धर्माला नवें रूप देतांना जी दिवटी पेटविली तिला त्यांनीं किती बळी दिले, ती जळत राहण्याकरितां मानवी देहांच्या किती आहुति दिल्या, किती शरिरांची जाळपोळ केली, हें क्षणभर मनांत आणिलें म्हणजे या ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकारामादि महाविभूतींचें मोठें कौतुक वाटतें; आणि त्यांची प्रत्येक ओळ, त्यांचा प्रत्येक शब्द कसा प्रेमानें थबथबलेला आहे, एखादा कडक स्वर असला तरी त्यांत वात्सल्य आणि कळकळ किती भरलेली आहे, हें लक्षांत येऊन त्यांच्या ग्रंथरचनेच्या थोरवीनें मन भरून येतें व त्यांच्या प्रत्येक ओळीचा अभ्यास अत्यंत काळजीपूर्वक करणें व त्यांच्या चरित्राची होईल तितकी ओळख करून घेणें किती अवश्य आहे, हें दिसून येतें. रोग बरा करण्यासाठीं मानवी देह चरचरा चिरणाऱ्या तबीबापेक्षां साधा काढा सतत देऊन रोगाचें बीज नाहींसें करणाऱ्या वैद्याची थोरवी काय थोडीच सांगावी लागते! धर्ममताच्या थोड्याशा

फरकाकरितां किंवा वीतभर जमीन शत्रूच्या हातांतून परत घेण्याकरितां शेकडों देहांचे जो बळी देतो, हजारों कुटुंबें धुळीस मिळवितो व लक्षावधि लोकांना अन्नान्नदशेला नेतो, तो कितीहि शूर असला तरी या संतांच्या तुलनेनें उणाच पडतो. प्रत्यक्ष सर्व समाजाचा नाश करणाऱ्या या शत्रू-पासून सर्वांचें रक्षण करतांना जे तलवारीला शिवत नाहींत, आपला अधिकारहि जे गाजवीत नाहींत, नुसत्या मऊ शब्दांपलीकडे दुसरें शस्त्रहि जे जाणीत नाहींत, बुद्धिवाद हेच ज्यांचे किल्ले आणि प्रेमळ उपदेश याच ज्यांच्या रणनौबदी, त्यांचें मोठेपण काय वर्णावें! त्यांची थोरवी काय गावी! आणि त्यांचें मोठेपण किंवा थोरवी गाण्या-वर्णण्यापेक्षां, त्यांनीं तें काम या शस्त्रांनीं कसें साधिलें, इतका मोठा शत्रु कसा हत-वीर्य केला, हें समाजारिष्ट कसें टाळलें, हा चातुर्वर्ण्यविशिष्ट समाज, बुद्धिभेद करून गिळून फडशा करून टाकणाऱ्या त्या प्रचंड लाटा उचंबळणारा, तो वर्णव्यवस्थेचा कल्पांत करणारा सागर कसा गिळला व त्याचें कोणत्या शब्दमंत्रांनीं आचमन केलें, हें त्यांच्या ग्रंथांवरून शिकणें हेंच त्यांचें खरें कौतुक आहे. आणि या दृष्टीनें साधु-संतांच्या संहितांचा योग्य अभ्यास व निदिध्यास केला असतां तो आपल्याला उपयोगी पडेल व संकटकाळीं हात देईल, यांत लवमात्र शंका नाहीं. पण बावळ्याप्रमाणें केवळ अंधश्रद्धेनें व भाबड्या भक्तीनें त्यांचे शब्द उच्चारीत राहिलें असतां अस्पष्ट शब्द उच्चारणाऱ्या मांत्रिकाची किंवा नुसते वाग्भटांतले श्लोक पाठ म्हणणाऱ्या यमराजसहोदराची जी गत होते तीच गत आपली होईल, यांतहि लवमात्र शंका नाहीं. तेव्हां भोळ्या भावापेक्षां कौतुकपूर्वक चिकित्सक बुद्धीनेंच यांचे ग्रंथ आणि त्यांतलें इंगित अभ्यासिलें पाहिजे. पण हें सर्वांनाच साधणार नाहीं. ज्ञाते, जाणते व मर्मज्ञ आहेत त्यांनीं हें सर्व आपल्या कुशाग्र बुद्धीनें स्वतः करावें व दुसऱ्यास सांगावें. ग्रंथ नुसते शोधून काढून पोथ्यांचे रुमाल दाखवून देणें इतकें जरी एखाद्या साध्या भिक्षुकानें केलें तरीहि तेवढेंच पुरे. तेवढ्याकरितांच तो दक्षिणेला पात्र आहे, हेंहि येथें सुचवून ठेवणें इष्ट

आहे. असो. तेव्हां कोणत्याहि रिकामटेकड्या कुत्सित कल्पनांनीं मन विटाळूं न देता ज्ञानेश्वराचा अनुयायी जो भगवद्भक्त महासाधु नामदेव त्याच्या अभंगांच्या पोथ्या चाळूं या. या पोथ्यांतील अभंगांवरून असें दिसतें कीं, नामदेव हा सोलापुराकडील (?) नरसी-ब्रह्मणी[1] या गांवच्या दामाशेट शिंप्याचा मुलगा होता. दामाशेटीच्या बायकोचें नांव गोणाई. गोणाई ही कल्याणीं[2] राहणार गोमा शिंपी याची मुलगी. दामाशेट व गोणाई यांना प्रथम आऊबाई नांवाची कन्या झाली; व पुढें ईश्वरकृपेनें तिच्या पाठीवर त्यांस एक पुत्र झाला त्याचें नांव त्यांनीं 'नामदेव' असें ठेविलें. दिवसें-दिवस नामदेव मोठा व जाणता झाला तेव्हां त्याचें लग्न केलें व त्याच्या बायकोचें नांव **राजाई** असें ठेविलें. लग्नानंतर नामदेवाला दुर्दैवानें जरा वाईट मैत्री लागली व तो चोर आणि डाकेखोरांच्या संगतींत शिरून वाटा मारूं लागला[3]. या बंडखोर लोकांच्या नादीं लागून त्यानें अनेक ब्राह्मण, गरीब यात्रेकरू, आणि भोळे पांथस्थ यांचे खून केले व त्यांचें द्रव्य लुटून घेतलें. असें चाललें असतां या मंडळीचा फार बोभाट झाला व त्यांना धरण्यासाठीं अधिकाऱ्यांनीं आपले राऊत त्यांचेवर रवाना केले. या राउतांची व नामदेवाची गांठ पडून झटापट झाली, त्यांत बरेच इसम मृत्यु पावले. नामदेव असा दरोडेखोराचा धंदा करी खरा, पण त्याचा एक नियम असे. तो हा कीं, तो आपल्या मोठ्या थोरल्या घोडीवर बसून आवंढ्या

---

१. नरसी-ब्रह्मणीचा । दामाशेट शिंपी । केशिराजरूपीं । मग्न असे ॥
त्याचिये स्त्रियेचें । नाम गोणाबाई । पोटीं पुत्र नाहीं । सेवा करी ॥

२. कल्याणींचा शिंपी । हरिभक्त गोमा । त्याची कांता उमा । नरहरी भजनीं ॥
सरिता सुकृताचि त्या पोटीं उत्पन्न । झाली संबोधन गोणाबाई ॥
गोणाई दामाशेटी । झालें पाणिग्रहण । संसारी असोनि । नरसी गांवी ॥
गोत्रसंज्ञा ऐका पूर्वजांची सहज । गाविज, भारद्वाज । दोन्ही कुळें ॥

३. दिवसें दिवस नामा । थोरचि जाहला । विवाह तो केला पितयानें ॥
प्राक्तनाचे योगें । भरलासे ओहटा । पाडितसे वाटा । चोरासंगें ॥
ब्राह्मण, कापडी । गरीब साबडी । केली प्राणघडी बहुतांची ॥

नागनाथास नित्य दर्शनास जाई. राउतांची झटापट होऊन राऊत मारले गेले. त्यानंतर नित्याप्रमाणें नामदेव एक दिवस नागनाथाचे दर्शनास आवंढ्यास गेला होता. ते वेळीं त्या देवालयांत ब्राह्मण पूजा, अभिषेक करीत होते. आरतीचे वेळीं कोणी एक गरीब शूद्र बाई तेथें कडेवर मूल घेऊन दर्शनास आली होती. नैवेद्याच्या ताटांतलें अन्न पाहून मुलानें त्यांतील अन्न दे, म्हणून आईजवळ छंद घेतला. मुलाचा हा भलताच हट्ट पाहून आईनें त्यास दरडाविलें, पण तो ऐकेना. तेव्हां ती त्यास मारूं लागली. मुलगा अन्नासाठीं रडतो व त्याची ती आई त्यास मारीत सुटते, हें पाहून नामदेवाचें मन कळवळलें व त्यानें 'तूं आपल्या लेंकरास कां मारतेस?' असें त्या बाईस विचारिलें. यावर त्या गरीब माउलीनें स्फुंदत स्फुंदत उत्तर दिलें, 'मारूं नको, तर आतां काय करूं? याच्यापुढें मी असें अन्न कोठून घालूं? माझा दादुला राऊत होता. तो नामदेवानें मारून टाकला.' असें सांगत असतां तिचा गळा दाटून आला; व एक दुःखाचा उसासा टाकून ती म्हणाली, 'हाय रे भगवान्! आतां मी या पोराचा लळा कशानें पुरवूं? याला अन्न कोठून देऊं? याचे पुढें मला आपलीं हाडें शिजवून घालतां येतीं तरी बरें होतें!' हे त्या दीन अनाथ आईचे शब्द ऐकून नामदेव मनांत फार खोचला व त्याला उपरति झाली आणि केल्या कृत्यांचा त्यास पश्चात्ताप होऊं लागला. तेथेंच त्यानें जवळ काय होतें नव्हतें तें सर्व त्या आपल्या मोठ्या घोडीसुद्धा वांटून टाकिलें आणि मग तो हातांत एक सुरी घेऊन देवळाच्या गाभाऱ्यांत शिरला व त्या शिवलिंगापुढें जाऊन उभा ठाकला आणि देवाकडे पाहून म्हणाला, 'आतां हा आघात सोसून मी आपल्याला दंडून घेईन.' असें म्हणून त्यानें ती हातातली सुरी डोक्यांत मारून घेतली व त्यासरशीं रक्ताची चिळकांडी उडाली. तिची धार त्यानें आपल्या त्या समोरील शिवलिंगावर धरिली; हें पाहून देवाचे पुजारी धावून पुढें आले व त्यांनीं नामदेवाच्या हातांतलें शस्त्र हिसकून घेतलें. नामदेव घायाळ होऊन

तेथेंच पडून राहिला. तेव्हां देवांनीं आणि भक्तांनीं त्याला तेथून पंढरीस जाण्यास सांगितलें. तीच आज्ञा मान्य करून आणि आपली जखम फडक्यानें घट्ट बांधून नामा तडक पंढरपुरास विठोबाच्या दर्शनास आला.

माशांची घोंगाणी। जनांची निंदणी। सोशी अंतःकरणीं। नामदेव ॥

जखमेंतून रक्त वाहिलें त्यावर माशा बसून त्रास देत आहेत, आणि भोंवतालचे लोक टवाळी करून अभद्र भाषणें बोलत आहेत, अशा शरिराच्या आणि मनाच्या दुहेरी त्रासानें नामदेव अग्नींत जळाल्या-प्रमाणें होरपळून गेला व त्याच्या मधलें किल्बिष जळून गेलें; व तो श्रीपंढरीनाथाच्या दर्शनास फारच आतुर झाला; पण अजून त्याचें प्राक्तन थोडें वांकडें राहिलें होतें. तो पंढरपुराजवळ आला तेव्हां भिंवरेला पूर आला होता व नदी भरून दुथडा वाहत असल्यामुळें माणसांना बिलकूल उतार नव्हता. हें पाहून देवाच्या दर्शनासाठीं उतावीळ झालेल्या नामदेवानें तेथूनच विठ्ठलास

'पतित पावन। ब्रीद सोडवीन आतां। तरीच पंढरीनाथा। दास तुझा ॥
गुण दोष माझे न धरावे मनीं।'

असें एक पत्र लिहून धाडिलें; व पुढें नदी ओसरल्यावर तो देवळांत जाऊन ईश्वरभजनांत गर्क होऊन गेला.

एकदा ईश्वरनामाचा छंद लागल्यावर नामदेवाचें मन तेथेंच रमलें; व त्यांतच रंगून गेलें. जुना संसार, जुने मित्र, जुने व्यवसाय, जुने

---

१. राजाईच्या म्हणण्यावरून त्यानें ती सुरी देवाला वाहिली, असें दिसतें. ती म्हणते—

'देवा सुरी वाहिली। तेंच दैना आली। उचितें राहिली। तेंहुनी ॥

तसेंच,

जन्मीं न देखे उपाये। याणें केलें अपाये। कोणा सांगो माये। सुखदुःख ॥
आमुच्या वडिलां शस्त्र। सुई आणि कातरी। हा बाण आणि सुरी। वागवीतसे ॥
एकांतें बोकिलें। रुदना करी त्याची नारी। वाहियेली सुरी। नागनाथीं ॥

राजाई.

विचार हे सर्व त्याच्या मनानें सोडून दिले आणि तो ईश्वरभक्ति करीत पंढरीसच राहिला. जुना चोर आणि दरोडेखोर नाम्या शिंपी आतां हरिभक्तिपरायण नामदेव साधू बनलेला पाहून लोक त्याची टवाळी करीत व त्याच्या जुन्या गोष्टी बोलून त्याला त्रास देत. पण हें सर्व तो सुखानें साही व जुन्या आठवणी आतां विसरून जाण्याविषयीं लोकांना विनंती करी. तो जों जों असें करी तों तों लोक त्याला अधिक हिणवीत आणि 'नाम्या डाकेखोर', 'नाम्या शिंपी' असें म्हणून पाठीस लागत. तो त्यांना पुन्हां पुन्हां सांगे कीं—

लोखंडाचा विळा । परिसासी लागला । मागलीया मोला । मागूं नये ।।
वेश्या होती तेची । पतिव्रता झाली । मागील ते बोली । बोलूं नये ।।
दासीचिया पुत्रा । राजपद आलें । उपमा मागील । देऊं नये ।।
गांवरस होता । गंगेसी मिळाला । वांचुनी गंगाजळा । मानूं नये ।।
विष्णुदास नामा । विठ्ठलीं मीनला । सिपीं सिपी । त्याला म्हणूं नये ।।

पण तरीदेखील त्याला पोरें त्रास देतच असत. हळूहळू त्याच्या मनाला त्याचें कांहीं वाटेनासें झालें.

सुख दुःखें दोन्ही । आम्हाशीं सारिखीं । प्रतीती पारखी । मना आली ।।
अंतर्बाह्य एक । ब्रह्मची कोंदलें । दुजेंपण गेलें । निपटोनी ।।

अशी त्याची स्थिति झाली. त्याच्यापासून लाभ मिळविणाऱ्या दायादांना हें आवडेनासें झालें; व ते त्याला त्रास देऊं लागले. हा नाद सोडून देण्याचा ते त्याला फार आग्रह करीत; सर्वच अवहेलना करीत. कोणी सुखाचा शब्दहि आतां त्याशीं बोलतनासे झाले.

नामदेव म्हणतो-

पुत्र कलत्र बंधू । सांगाती देहाचे । बांधले मोहाचे । वज्रपाशीं ।।
तिहीं माझें चित्त । केलें तडातोडी । नाहीं एक घडी । सुखलेश ।।
दुःखाचे डोंगर । पडिले मजवरी । धाव गा श्रीहरी । पांडुरंगा ।।
ऐसा सुख गोष्टी । न करिती मज । जहालों चक्रपाणी । परदेशी ।।
शिणलीया न म्हणती । बैस घे विश्रांती । आठवि या श्रीपति । पांडुरंगा ।।

सकळाचें दास्य । केलें थोर आशा । मानिला भरंवसा । होतील म्हणोनि ॥
तंव तीं भजती । आपुलीया हिता । न करिती माझी चिंता । परलोकींची ॥
ऐसा दुर्जनाचा । करूनी पातेरा । केला म्यां मातेरा । आयुष्याचा ॥
कुटुंबकावाडी । सदा कानकोंडा । जाहालों या ब्रह्मांडा । भूमिभार ॥

आप्तेष्टांच्या स्वार्थबुद्धीला कंटाळून, संसारांतील अनेक उपाधींनीं त्रस्त झाल्यामुळें नामदेवाचें चित्त परमेश्वराकडे साहजिकच वळलें आणि आपण भक्तिमार्गांत शिरावें, असें त्यास जास्त-जास्त वाटूं लागलें. नामदेवानें पुष्कळ साधुसंतांच्या गांठी घेतल्या; पण त्यांत गुरु करण्यास योग्य असा कोणीहि बरेच दिवस त्यास भेटला नाहीं. असा हिंडतां हिंडतां शिणल्यावर नामदेव विठोबासच शरण गेला. संसाराची आस सोडून नामदेव देवाला शरण गेला खरा, पण अजून वैराग्याच्या आचीनें त्याचें चित्त व्हावें तितकें शुद्ध झालें नव्हतें. अजून सर्व किल्मिष आणि हिणकस जळून खाक होऊन नाहींसें झालें नव्हतें. तो मनांत म्हणे कीं, "देवा !–

तुझा विष्णुदास । म्हणतातो जगीं । परि नाहीं अंगीं । प्रेमभावो ॥
तेणें थोर लाज । वाटे पंढरीराया । ये माझ्या हृदयां । एक वेळां ॥
द्वेषाद्वेष भाव । असे माझ्या ठायीं । अनुभव तुझा नाहीं । प्रेमसुख ॥
देखोवेखी बैसे । संतांचे संगती । नाहीं माझे चित्तीं । ध्यान तुझें ॥

आवटे–प्रत, अ. ३६८.

पण पुढें हळूहळू परमेश्वराचे चरणीं त्याचें मन अधिकाधिक दृढ होऊं लागलें; व सारा वेळ पंढरीस जाऊन विठोबाचें दर्शन घेण्याची उत्कंठा त्याला जास्त-जास्त वाटूं लागली. विठोबाचे दर्शनावांचून मनास खंती वाटूं लागली; व विठ्ठलाशिवाय आपलें कोणी नाहीं, असें त्यास होऊन गेलें. पुढें थोडेच दिवसांत विठोबाच्या प्रेरणेनें 'विसोबा खेचर' नांवाच्या साधुपुरुषास 'गुरु करावा' अशी त्याला स्फूर्ति झाली. विसोबा खेचर

१. दासो दिगंबर म्हणतात कीं–नामदेवाची मुलगी व राका कुंभाराची मुलगी अशा दोघी जणी एक दिवस नदीवर धुणीं धूत असतां एकीचे

[ पान १७० पहा. ]

हा आवंढ्यास राहत असे. तेव्हां 'चिंताग्रस्त नामा। आला आवंढ्यासी। पुढें देऊळासी। देखीयेलें'. देवळांत विसोबा आहे, असें कळल्यावर नामदेव त्याच्या दर्शनासाठीं आंत गेला. आंत शिरून पाहतो तों 'देवावरी पाय। ठेऊनी खेचर। निजला परिकर निवांतची ॥' पुढील हकीकत प्रसिद्धच आहे[1].

नामदेवानें विसोबा खेचराजवळून मंत्राचाच नुसता उपदेश घेतला नसून कवित्वहि करण्याची विद्या तो विसोबाजवळच पढला. या विसोबा खेचरानें सोपानदेवाचा उपदेश घेतला होता; व सोपानदेवास निवृत्तिनाथांनीं गुरुमंत्र दिला होता. म्हणजे नामदेवाची परंपरा अशी–

---

[पान १६९-वरून.]
धुण्याचे सितोडे दुसरीच्या धुण्यावर उडाले. तेव्हां आपलीं चिरगुटें विटाळलीं, असें जाणन तिनें पुन्हां पाण्यांत बुडवून आंघळून घेतलीं. मुलीची तक्रार बापाकडे गेली, तेव्हां ती ऐकून नामदेवाला राग आला. या वेळीं त्यास राकोबानें 'गुरु' करण्यास सांगितलें.

१. नामदेवाच्या गुरूपदेशासंबंधीं प्रचलित कथा अशी आहे कीं, विसोबा पिंडीवर पाय ठेवून निजले होते. त्यांचे पाय उचलून पिंडी नाहीं, अशा ठिकाणीं ठेवण्यासाठीं सभोंवती नामदेव पाहूं लागला, तों त्याला सर्वभर जिकडे-तिकडे पिंड्याच दिसूं लागल्या. तें पाहून नामदेवाची खात्रीच पटली कीं, परमेश्वर सर्वभर सारखाच पसरला आहे; त्याचे व्यतिरिक्त कोणतेंहि ठिकाण मोकळें नाहीं. हीच हकीकत तुकारामांनीं स्वदस्तुरनें लिहून ठेविलेल्या नामदेवाच्या अभंगांत थोडी निराळी दिली आहे. सदरहू अभंगाचा कांहीं भाग पुढें देतों :—

षेचरें षेचरीं : बुधी अगोचरी : नामा झडकरी : देवो केला :
गुरुसीस्ये जाले : येक तत्त्व देषीलें : देहीं देह नीमालें : नीज तत्त्वीं : ॥ ८ ॥
ॐ्हू सोहुं भाव : हारपल्या स्रुती : नामयाची त्रुप्ती : षेचरीं जालीं ॥
तंवं पाहे : भोंवतें तंवं लीग नाहीं तेथें : आतां जरण ते केउतें : कोठें देउं : ।
आपु आपणची : हे स्रुष्टी सीवाची : मग म्हणे वायांची : बोलीलों यासी : ॥९॥
छापील गाथेंत हा अभंग नाहीं.

२. अभंगाची कळा। कांहीं मी नेणत। त्वरा केली प्रीत। केशीराजें ॥
अक्षरांची संख्या। बोलिलों उदंड। मेरू तो प्रचंड। शर आदीं ॥
[पान १७१ पहा.]

निवृत्ति--सोपान - विसोबा खेचर--नामदेव.

विसोबा खेचराच्या उपदेशानंतर नामदेवाचें मन ईश्वराकडे पूर्णपणें वळलें, व तो सारा वेळ भजन-कीर्तन करूं लागला.

वीणा घेऊनीयां करी । उभा राऊळा भीतरीं ।।
ताहान भूक हारपली । छंद लागला विठ्ठलीं ।।
कन्या पुत्र बाप माये । त्यांची आठव ही नये ।।

अशी त्याची स्थिति झाली. सर्वभर परमेश्वर भरला आहे, असें त्याला भासूं लागलें. जिकडे-तिकडे त्याला विठ्ठलच दिसूं लागला. हळूहळू विठ्ठलाचें सांनिध्य त्याला इतकें गोड वाटूं लागलें कीं,

"तूं आकाश मी भूमिका । तूं लिंग मी शाळुंका । तूं समुद्र मी चंद्रिका । स्वयें दोन्हीं ।।
तूं वृन्दावन मी चिरी । तूं तूळशी मी मंजरी । तूं पावा मी मोहरी । स्वयें दोन्ही ।।
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मीणी । तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ।।
तू नदी मी थडी । तूं तारूं मी सांगडी । तूं धनुष्य मी भातडी । स्वयें दोन्ही ।।
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझीया प्रेमा । मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ।।"

असो. विठ्ठल हें याचें कुळदैवत होतें. सारा वेळ भजन करावें व

---

[पान १७०-वरून.]

सहा साडेतीन । चरण जाणावे ।। अक्षरें मोजावें । चौक चारी ।।
पहिल्या पासूनी । तीसऱ्या पर्यंत । अठरा गणीत । मेज आली ।।
चौक चारी आदी । बोलिलों मातृका । बाविसांची संख्या । शेवटील ।।
दीड चरणाची । दीर्घ तीं अक्षरें । मुमुक्ष विचारें । बोध केले ।।
नामा म्हणे एक । शून्य दिलें हरी । प्रीतीनें खेचरीं । आज्ञा केली ।। १७२ ।।

नामदेवाचे सहा अक्षरी अभंग फार आहेत, हें महशूर आहे.

१. मिराबाईचें असेंच एक गोड पद 'व्रज' भाषेंत आहे.

जो तुम तोडो प्रिया । मैं नहि तोडूं ।। तोडूं तोरा संग कृष्ण । कोन दुजा जोडूं ।।
तुम भये तरुवर । मैं भयी पंखिया ।। तुम भये सरोवर । मैं भयी मछिया ।।
तुम भये गिरिवर । मैं भये चारा ।। तुम भये चंदा । हम भये चकोरा ।।
तुम भये मोती । प्रभु हम भये धागा ।। तुम भये सोना । हम भये स्वागा ।।
**बाई मिरा** कहे । प्रभु व्रजके वासी ।। तुम मेरे ठाकोर । मैं तेरी दासी ।

तोंडानें विठ्ठलनामाचा घोष चालवावा, असा त्याचा उद्योग असे. याचे अभंग फार आहेत. ते रचण्याला याला प्रयास अगदींच पडत नसत. हा सहज बोलावें त्याप्रमाणें अभंग म्हणत जाई. घरीं, दारीं, बसतां, उठतां, सर्वकाळ हा भजन करी व तोंडानें याचा अभंगाचा सपाटा चालूच असे. विठ्ठलाच्या पायीं याची भक्ति इतकी दृढ झाली कीं, त्याजवांचून त्याला कांहीं सुचेनासें होऊन गेलें. त्या प्रेमामृतानें तो वेडा झाला. पायीं घागऱ्या बांधी, हातांत टाळ घेई व खांद्यावर विणा टाकून सारा वेळ देवळांत 'गोविंद' म्हणत नाचत राही[१]. तो घर तर विसरलाच; पण जेवण-खाणाचीहि त्याला आठवण होईनाशी झाली. एक दिवस घरीं जेवण तयार करून आई व बायको वाट पाहत बसली. मुलें भुकेनें व्याकूळ होऊन गेलीं, तरी नामदेवाचा ठिकाण नाहीं. तेव्हां क्षुधेनें अगदीं व्याकूळ होऊन गेलेली गोणाई मुलाला शोधीत

लवलाहें धांवत निघाली । महाद्वारा आली । पहावया ॥
तो तंव पांडुरंगा । सन्मुख देखिला । चित्रींचा लिहिला । पुतळा जैसा ॥
नाहीं चळण वळण । तटस्थ नयन ।

अशी त्याची अवस्था पाहून गोणाईला क्रोध आला; व तिनें 'क्रोधें आसुडिला । धरूनी हातीं' त्यासरसा तो 'प्रेताचिये परी । पडिला भूमीवरी'. असें झाल्यावर राग कोठून राहणार!!

उचलोनि ओसंगा धरिला पोटासीं । म्हणे कां रे रुसलासी सांग नाम्या ॥
निढळासी निढळ । मेळवूनि ती रडे । माझीये कान्हाडें । काय झालें ॥
होणार सारिखी । तुज रचिली बुद्धी । देव नव्हे त्रिशुद्धी । मारकु जगीं ॥
अन्नेंसि उपवासी । बैसलासि येथें । काय देईल तूतें । विठ्ठल हा ॥
मी आहें तंव । करीन तळमळ । मग तुझा सांभाळ । करील कोण ? ॥

(आईचें) गोणाईचें हें असें बोलणें ऐकून

नामा म्हणे माये । ऐक वो वचना । मी गेलों दर्शना । नागनाथा ॥
आवंढ्या देउळीं । जाला संसार । पारुषला धीर । या देहाचा ॥

---

१. हांसे नाचे प्रेमें फुंदतु डुल्लतु । अहर्निशी गातू नाम तुझें ॥
गोणाई अ. ४४ पृ. १७.

लौकिक व्यवहार । नाठवेचि कांहीं । कल्पना ते देहीं । आर्थीच ना ॥
तेंहूनि तूज मज । तुटला संबंधु । विठ्ठलाचा छंदु । घेतला जीवीं ॥

पण या उत्तरानें गोणाईचें समाधान कसें होणार ! तिचा तो एकुलता एक मुलगा, सगळ्या कुटुंबाचा आधार, आणि तो असा देवपिसा झाला. तिच्या सर्व आशा आणि तिच्या कुटुंबाच्या उड्या या एकट्याच्या जिवावर होत्या; आणि तो हे असले चार करूं लागला, तेव्हां तिचा आधार सुटून गेला. तिची एक खांबावरली द्वारका, आणि तो खांब असा डळमळूं लागला, तेव्हां तिचें मन कसें ठिकाणावर राहणार! दर्भाच्या दोरीच्या एका बंदानें ती या जगाला बांधली गेली होती; आणि तो बंद विठ्ठलभक्ति-मूषक नित्य कुरतडून तोडीत होता, हें पाहून ती अगदीं वैतागून गेली. आणि या सर्वांला कारण जो पंढरीचा विठोबा त्याच्या पायांशीं जाऊन तिनें धरणें धरिलें; व ती म्हणों लागली, 'तुझे द्वारीं बैसोनि उपवासू करीन' आणि 'जीव मी देईन। कीं नाम्यासि नेईनें.' 'देवा, माझें हें पाडस तूं असें फूस लावून व चुकवून आणलेंस, तें मला परत दे.' ती मोठ्या कळवळ्यानें त्रागा करून सांगे कीं, 'माझा नामा मज देई। जीव देईन तुझे पायीं॥' नाम्यानें संसाराचा ठाव पुसून विठ्ठलाच्या द्वारीं धरणें घेतल्यापासून त्या कुटुंबाची स्थिति खालावत गेली व आतां या वेळीं तर फारच निकृष्ट दशा येऊन ठेपली. एक मोडकें खोपट होतें त्याला कूडहि धड राहिले नाहींत. त्यांत वारा भरभराट येई; आणि मुलें थंडीनें काकडत. त्यांचे अंगावर टाकावयाला धडूतहि राहिलें नाहीं, कीं दुपारचे वेळीं त्यांचे पुढें ठेवायला दाणेहि उरले नाहींत. हें पाहून नामदेवाची बायको राजाई फार कष्टी होई[2]; आणि अगदीं वैतागून जाई.

---

१. अ. ३९ व अ. ६२.

२. सदैवाच्या स्त्रिया । अलंकारमंडित । मजघरीं नाहीं शीत । काय करूं ॥
दरिद्रें विश्रांति । घातली वो कैसी । सांगो कोणापाशीं । माउलीये ॥
एकी दिव्य वस्त्रें । तेथल्या परिकर । मज खंडें जर्जर । मिळालेंसे ॥
मोडकें खोपट । वारा येत भरभराट । बहु होति कष्ट । कोणा सांगों ॥

[पान १७४ पहा.]

एक दिवस तिनें पंढरीस जाऊन नवऱ्याला परत घरीं आणण्याचा व संसारास लावण्याचा निश्चय केला; आणि

अंगोळिये विठा । कडियेसि तारा । राजाई पंढरपुरा । चालियेली ॥
आणिलीं महाद्वारां । पुढें दे लेकुरां । विठोबा सामोरा । नामा आला ॥
'बाबा' 'बाबा' म्हणोनि । तारा धाविन्नला । नामा त्या बोलिला । 'परतें होई.'॥
देखोनि राजाईसी । गहिंवरू पैं आला । अरे बा विठ्ठला । काय केलें ! ॥
'बाळें सहित विष । घेईन मी आतां । पाहें पंढरीनाथा । बुडवीन घर.' ॥

पण नामदेव कसचा परत येतो ! अखेर नामदेव तेथेंच राहिला आणि मग मुलांना घेऊन राजाईहि तेथेंच राहिली. नवरा कसाहि असला तरी त्याला संकटावस्थेंत टाकून आपण दूर निघून जावें, हें हिंदू बायकोच्यानें कसें करवेल !

याप्रमाणें हळूहळू नामदेवाची आई, त्याची बायको, त्याचीं मुलें आणि त्याचा बाप असें हें सर्व कुटुंबच्या कुटुंब पंढरीस येऊन राहिलें; व तेथेच नांदूं लागलें. सर्वांना ईश्वराची भक्ति आवडूं लागली व विठ्ठलाविषयींचा त्यांच्या मनांतला राग नित्य-सहवासानें आणि संतांच्या परिचयानें कमी-कमी होत जाऊन अखेर नाहींसा झाला; व तीं सर्वजण भक्तिसुखाचा अनुभव घेऊं लागलीं. नामदेव तर अगदीं वेडाच झाला. तो सारा वेळ भजनपूजन व कथाकीर्तन यांतच मग्न होऊं लागला. 'सुंभाचा करतोडा, रकट्याची लंगोटी । नामा वाळुवंटीं कथा करी ॥' असें जनी लिहिते. 'खांदिये भोपळा गळां तुळसीमाळा । जपसी वेळवेळा । रामनाम' असें शब्दचित्र दामा आपल्या मुलाचें काढितो. 'लावोनि लंगोटी । झालेती गोसावी' असें राजाई म्हणते.

---

[पान १७३-वरून.]

कैंची कुसुमशेज । कैंचे पटकुळ । फाटकी वाकळ । अंथरुणा ॥
वस्त्र पात्र नाहीं ॥ खाया जेवायासी । नाचे अहर्निशी निर्लज्जसा ॥
चवदा मनुष्यें । आहेत माझ्या घरीं । हिंडतां दारोदारीं । अन्नासाठीं ॥
नसता विठोबा । नसती पंढरी । तरी हा सुखें घरीं । नांदता कीं ॥

नामदेवाला उपरति आवंढ्या नागनाथास झाली व पुढें त्यानें त्याच देवळांत विसोबा खेचरास शिवलिंगावर पाय ठेवून निजलेलें पाहिलें. आणि सर्वां भूतीं, सर्व ठिकाणीं ईश्वरच भरलेला आहे, अशी नामदेवाची खात्रीहि तेथेच पटली, हें मागें सांगितलेंच आहे. पुढें 'द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश' म्हणजे बार्शीस नामदेवानें विसोबाचा गुरूपदेश घेतला.

श्रवणीं सांगितली मात । मस्तकीं ठेवियला हात । पदपिंडा विवर्जित । केला नामा ॥
खेचरू विसा । प्रेमाचा पिसा । तेणें नामा कैसा । उपदेशिला ॥
तया सांगितलें गुज । दाखविलें निज । पाल्हाळीं हो तूज । काय चाड ॥
खेचरू म्हणे मज । ज्ञानराज हे गुरु । तेणें अगोचरु । नाम्या केला ॥

अशी गुरूपदेशाची हकीकत नामदेव देतो. म्हणजे सोपानदेवामार्फत किंवा प्रत्यक्ष ज्ञानेश्वरापासूनच विसोबाचे द्वारे गुरुमंत्राचें रहस्य नामदेवाला लाभलें; व समाधिधनाचा ठेवाहि त्याला ज्ञानेश्वरादि भावंडांच्या हातूनच मिळाला. नित्य-अभ्यासाचे धडेहि त्यानें या भावंडांकडून घेतलेले दिसतात. प्रथम तो निःसीम शिवभक्त होता. त्याचा गुरु विसोबाहि शैवच दिसतो; व उत्तरवयांत त्याला नाथपंथी आणि योगाभ्यासी चार भावंडांची संगति लाभली आणि त्यांच्या म्हणजे एके तऱ्हेनें ज्ञानेश्वराच्या मताचा पगडा त्याचे मनावर पूर्णपणें बसला. विठ्ठलापेक्षांहि रामनामाचा आणि शंकराचा ध्वनि नामदेवाच्या अभंगांत जोरानें ऐकूं येतो, याचें कारणहि हेंच आहे. रामपंथी लोक श्रीरामापासून, किंवा शैव श्रीशंकर आदिनाथापासून, दत्तसंप्रदायी दत्तापासून, किंवा वैष्णव विष्णूपासून आपली परंपरा लावितात, त्याप्रमाणें विठ्ठलाचे अत्यंत प्रसिद्ध भक्त जे ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, महीपती हे किंवा यांपैकीं कोणीहि आपली परंपरा विठ्ठलापासून लावीत नाहींत, ही एक विचार करण्या-सारखी बाब आहे. ज्ञानेश्वरींत विठ्ठलाच्या नांवाचा उल्लेखहि नाहीं. नामदेव, एकनाथ हे रामचरित्र प्रेमानें गातात, तुकोबा 'रामकृष्ण हरी' हा गुरुमंत्र उच्चारितात, याचा उलगडा या बाबीनें सहज होतो; व ही

विठ्ठलभक्त म्हणून नांवाजलेली मंडळी एका विठ्ठलपंथाची उपदिष्ट नसून ते सर्व केवळ एका मताचे होते म्हणूनच ते एका माळेंत गोविले जातात, असें म्हणणें प्राप्त होतें. हें मत ज्ञानेश्वरानें सांगितलेलें, प्रतिपादिलेलें व ज्ञानेश्वरीग्रंथांत कीर्तन करून पढविलेलें मत होय. हें ज्यांना पटलें, याचा ज्यांनीं अनुवाद केला, ते हे निरनिराळ्या दैवतांचे मंत्रोपदिष्ट, पंढरीचे भक्त म्हणून आपण नांवाजतों; व त्यांना एका पंथांत आणून गोवतों. देव सर्वां भूतीं आहे. समाजांत चातुर्वर्ण्य कायम ठेवून ईश्वरोपासना सर्व जातींत करितां येते; व चांडाळापासून ब्राह्मणापर्यंत स्त्रीपुरुषांसुद्धां सर्वांना भक्तिमार्गानें जाऊन मोक्षाची पेठ गांठतां येते, आणि तेथील मोक्षधन संपादितां येतें, हीं तत्त्वें यांना ज्ञानेश्वरांनीं पढविलीं ; व तीं ज्यांना मान्य झालीं ते सर्व या पंथांत म्हणजे वारकरी-पंथांत मोडले गेले, असें दिसतें. ही तत्त्वें म्हणजे ही ज्ञानेश्वरांची शिकवण या सगळ्यांच्या कवित्वांत पाहण्यास सांपडते; व ती त्यांच्या आचरणांतहि कमीजास्त प्रमाणानें दृष्टीस पडते.

ज्ञानेश्वराच्या शिकवणीची आणखी एक विशिष्ट गोष्ट अशी आहे कीं, ईश्वरप्राप्तीसाठीं किंवा मोक्षासाठीं अत्यंत दुर्गम, अत्यंत कष्टसाध्य, व अत्यंत क्लेशदायक अशा योगमार्गाची, किंवा केवळ फार मेहनतीनें अत्यंत कुशाग्रबुद्धीच्या पुरुषांस मात्र जाणतां येईल व आक्रमणें साधेल अशा ज्ञानमार्गाची आवश्यकता आहे, आणि त्यावांचून गत्यंतर नाहीं, असा असलेला एक समज ज्ञानेश्वरानें दूर करण्याचा यत्न केला; व संसारांत राहून, चातुर्वर्ण्य संभाळून, ईश्वरप्राप्ति करून घेतां येईल, असा हा नवा वारकरी-पंथ, हा नवा भक्तिमार्ग व भागवत-धर्म त्यानें जनतेस पढविला व साधारण बुद्धिमत्तेच्या अज्ञ भोळ्या-भाबड्या लोकांना ईश्वरप्राप्तीची सोपी वाट दाखवून दिली. ज्ञानेश्वर हा स्वतः नाथपंथी, योगाभ्यासी, अत्यंत कुशाग्रबुद्धीचा, संसारापासून पूर्णपणें अलिप्त असा असल्यामुळें त्याचे ग्रंथांत योग, ज्ञान वगैरेंचेंहि संकीर्तन केलें गेलें; पण तो गृहस्थाश्रमी नसल्यामुळें स्वतःच्या आचरणानें त्याला या

भागवत-धर्माचें, प्रत्यक्ष उदाहरण वागणुकींत दाखवितां आलें नाहीं. यामुळें कित्येक वेळां ज्ञानेश्वरानें पढविलें एक, आणि हे लोक पढले निराळेंच, असा प्रकार झाला. त्याचा पाठ गिरवितांना थोडासा अपपाठ झाला. मनादेवाचा प्रकार कांहींसा याच वळणावर गेला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यानें गृहस्थाश्रम सोडला नाहीं; पण या आश्रमाला अवश्य ती संसाराची काळजी मात्र त्याला घेतां आली नाहीं. त्याची भक्ति थोडीफार भोळी व खुळी झाली. आईवर लहानग्या मुलाची जी भक्ति, तशी त्याची भक्ति झाली. भक्तीला समजाची व ज्ञानाची जोड राहिली नाहीं. लहान अज्ञ मुलांना 'माझी आई' या भावनेंत जें प्रेम वाटतें, तेंच अंधळें प्रेम त्याचें ईश्वराच्या ठिकाणीं जडलें. ती भक्ति वात्सल्यरसानें भिजलेली अशी बालभक्ति होती. मुलाला जशी आई म्हणजे सर्वस्व, जगांत ती थोर, प्रत्यक्ष बापाचें गाऱ्हाणेंहि तिच्याकडे सांगावें, तसा प्रकार नामदेवाचा विठ्ठलाच्या ठिकाणीं होऊन गेला. आणि हें असें झालें म्हणूनच नामदेव हा भागवत-धर्मांतला व वारकरी-पंथांतला एक मोटा थोर संत झाला; आणि भक्तिमार्गांत भक्ति कशी करावी, याचा कित्ता होऊन राहिला.

नामदेवाचा बाप दामाशेटी हा प्रथमपासूनच ईश्वरभक्तिपरायण असावा; पण पुढें नामदेवाच्या संगतीनें याचें सगळें कुटुंब विठ्ठलाच्या भक्तींत निमग्न झालें, असें चरित्रकार सांगतात. नामदेवाच्या हातून विठ्ठलानें नैवेद्य खाल्ला, असें महीपती वगैरे अनेक चरित्रकार लिहितात. नामदेवाचा पुत्र आणि इतर संत या गोष्टीची साक्ष देतात. नामदेवाबरोबर त्याच्या कुटुंबांतलीं इतर माणसें विठ्ठलाचे चरणीं नामघोष करीत नाचूं लागल्यावर नामदेवामुळें त्यांनाहि कवित्वस्फूर्ति झाली. नामदेवाच्या कुटुंबांत त्याचे घरीं चौदा माणसें होतीं, असें त्याची बायको राजाई सांगते[१]. आणि हा आंकडा बरोबर दिसतो; कारण याच्या गणगोताची हकीकत सांगतांना जनी दासी म्हणते:—

१. आवटे-गाथा, अभंग ८५, पृ. ३०.

**गोणाई राजाई** । दोघी सासुसूना । **दामा नामा** जाणा । बापलेक ॥
**नारा महादा गोंदा** । **विठा** चौघे पुत्र । जन्मले पवित्र । त्याचे वंशीं ॥
**लाडाई गोडाई** । **येसा साखराई** । चौघी सुना पाही । नामयाच्या ॥
**लिंबाई** ती लेकी । **आऊबाई** बहीण । दासी वेडी **जनी** । नामयाची ॥

म्हणजे कुटुंबाचीं आप्त माणसें चौदा झालीं. दासी जैनी आप्त नाहीं, सबब ती या चौदांत येत नाहीं. या कुटुंबांतील हीं सर्व माणसें कवित्व करीत, असें म्हणतात; पण यांपैकीं कोणीं किती कवित्व केलें, याचे तपशीलवार आंकडे देतांना 'लिंबाई'चें नांव व आंकडा तुकाराम महाराज देत नाहींत[१]. तुकाराम महाराज म्हणतात:—

"पिता **दामाशेटी** । अभंग **दोन** कोटी । भक्तिभावें ताटीं । निवेदी देवा ॥
तीन कोटी अभंग । **गोणाईचा** वाद । स्वात्मसुखबोध । सुखाचा तो ॥
तीन कोटी अभंग । **नारोबाची** कविता । उगवी स्वात्महिता । दिवस रजनी ॥
तीन कोटी अभंग । **विठाचा** झगडा । प्रेमरस गोडा । प्रेमाचा तो ॥
**महादा** आणि **गोंदा** । अडीच अडीच कोटी । प्रेमरस पोटीं । प्रेमळ तो ॥
एक कोटी अभंग । लक्ष वरती सोळा । प्रेमरस जिव्हाळा । **आऊबाईचा** ॥
चौऱ्याण्णव लक्ष । **रंगाईची** वाणी । प्रेमें चक्रपाणी । आळवीलें ॥
दोन कोटी अभंग । **राजाईची** करुणा । प्रेमें नारायणा । आळवीलें ॥
**लाडाई गोडाई** । **येसा साखराई** । कवित्व हें पाही । दीड दीड कोटी ॥
एक कोटी देव । पन्नास लक्ष **रुक्मिणी** । कोटी दासी जनी । साडेबारा ॥
एकूणहत्तर लक्ष । चौपन्न कोटी । कविता गोमटी । **नामयाची**[२] ॥

पण या तुकाराम महाराजांनीं—किंवा त्यांच्या नांवानें इतर कोणीं—दिलेल्या वरील संख्येऐवजीं हल्लीं 'महादा' व 'लाडाई' यांचे एक-दोनच अभंग उपलब्ध आहेत. आऊबाईचे दोनच अभंग दिसतात. 'नारोबाचे'

---

१. या जनी दासीशिवाय 'नागी' या नांवाची दुसरी एक दासी होती, असें 'नामयाची दासी नागी दुसरी जनी' या गोंदाच्या उल्लेखावरून दिसतें.

२. यांत रंगाई हें नांव नवीन आहे. कदाचित् 'लींबाई'बद्दल हें नांव असावें व कदाचित् 'रंगाई' हें लिंबाईचें सासरचें नांवहि असेल. यांतील संख्येची बेरीज ९१ कोटी ७९ लक्ष होते, हेंहि लक्षांत येईलच.

तेग व गोंदाचे एकोणीस आढळतात. विठाच्या नांवावर मात्र ऐशी-नव्वद अभंग येतात. बाकी दामाशेटी, गोणाई, राजाई व श्रीविठ्ठल या चौघांच्या मिळून अभंगांची एकंदर बेरीज जेमतेम दोन-अडीशेंच्या घरांत जाईल. गोडाई, एसाई, साखराई यांपैकीं कोणाच्याहि नांवावर एकदेखील प्रसिद्ध नाहीं. राहतां राहिला नामदेव. याचे मात्र जवळ-जवळ दोन हजार अभंग आहेत. यांतहि सरमिसळ बरीच आहे. पण ती निवड आपण तूर्त बाजूला ठेवूं. या सर्वां मिळून दोन-अडीच हजार अभंगांपैकीं महादा, आऊबाई व लाडाई यांचे नांवावर एक-एक अभंग आहे. पण यांत लाडाईचा अभंग सर्व कुटुंबानें पंढरीनाथाचे पायाशीं देह ठेविला, अशा सर्वां मुखीं असलेल्या आख्यायिकेच्या विरुद्ध आहे. आणि भाषेच्या दृष्टीनें तरी या तिघांच्याहि वाणींत कांहीं विशेष दिसत नाहीं. नारा व गोंदा यांचाहि मासला जवळ-जवळ तोच. विठाचे अभंग कांहींसे बरे आहेत. यांत थोडा त्वेष दिसतो; पण बापाची खूण पटेल असें या लेकाच्या कवित्वांत कांहीं नाहीं. गोणाई व राजाई या सासू-सुनांच्या वाणींत मात्र तेज आहे. त्यांच्या अंतःकरणाला पडलेला पीळ त्यांच्या शब्दांत स्पष्ट दिसतो.

नामदेवाची आई गोणाई ही प्रेमानें भजन करी; पण ती संसार संभाळून असे. दामाशेट वृद्धापकाळामुळें परमार्थसाधनांत गुंतून गेलेले व विठ्ठलाच्या चरणीं वाहिलेले. एक मुलगा नाम्या; पण तो हा असा निघाला, हें पाहून गोणाईला वाईट वाटे. ती

> नाम्या सोडी देवपिसें । बळें घर कैसें । बुडविसी ॥
> जनाची लेकुरें । वर्तताती कैशी । तूं मज झालासी कूलदीपू ॥
> याची भक्ती कैसी । लौकिकावेगळी । संसाराची होळी । केली यानें ॥
> नाम्या हें रे नव्हे भलें । घर त्वां बुडविलें । कुळासहित ॥

असा त्याला उपदेश करी; पण त्याच्या उपड्या घड्यावर तें सगळें पाणी फुकट जाई. तरी ती माउली नाम्याला ताळ्यावर आणून संसाराकडे त्याचें मन वळविण्याचे सतत यत्न करतांना दृष्टीस पडते. नाम्या-

वर ती रागावते, त्याला छेडते, बोलते, पुन्हां पोटाशीं धरते. असे नाना प्रकार करिते. पुत्रवात्सल्यानें तिचें हळुवार झालेलें मन भरून आल्यावर ती जणों देहभान विसरून जाते. या सर्व दु:खाच्या मुळाशीं विठ्ठल आहे, हें पाहून ती विठ्ठलाला घटकेंत आळविते, घटकेंत त्याची करुणा भाकते आणि घटकेंत त्याला शिव्या-शाप देत सुटते. पुन्हां केव्हां, त्याच्या अवतारकृत्यांतलें उणें काढून बोलते, आणि केव्हां अगदीं वैतागून जाऊन त्याच्या पायांशीं धरणें धरून जीव द्यावयाला निघते. पुत्रमोहामुळें होरपळून गेलेल्या मनाचें प्रतिबिंब तिच्या वाचेंत स्पष्ट उमटलें आहे.

नाम्याची बायको राजाई, हीदेखील विठ्ठलभक्ति करी व अभंग रची. पण नवऱ्यानें सदा उठून टाळ कुटीत बसावें व संसारधंदा काडीमात्र पाहूं नये, हें तिला आवडत नसे. सारा वेळ घरीं इतर वारकरी येऊन भजन करीत. हें तिला खपेना. तिला याचें वाईट वाटे; पण ती घरची सासुरवासीण, यामुळें तिला कांहीं बोलतां येत नसे. तरी विठोबारखुमाई यांचे पायीं तिचाहि भाव दृढ होता. ती त्यांस आपले आईबाप समजे. शेवटीं नवऱ्याच्या या आचरणाला वैतागून तिनें

अहो रखमाबाई । विठोबासी सांगा । भ्रतारासी कां गा । वेडें केलें ॥ १ ॥
वस्त्रपात्र नाहीं । खायानेसायासी । नाचे अहर्निशीं । निर्लज्जसा ॥ २ ॥
मंत्र घेतलासे जैसा । घरीं संतांचा वोळसा ॥ ३ ॥
वोस या हरिदासा । गेले न येती मागुती ॥ ४ ॥
एकमेकांच्या पडती पायां । लौकिकांतुन गेले वायां ॥ ५ ॥
अवघे भांबरभुते होती । नाचताती आनंदें ॥ ६ ॥

असें आपलें गाऱ्हाणें एकांत पाहून रखुमाईच्या पायांपाशीं सांगितलें.[1] तिची कुलस्वामिनी 'मेसाई', तिलाहि तिनें विनवून पाहिलें पण

१. हें सांगतांना, आपल्या नवऱ्याची थोडीतरी कसूर आहे, असें तिचें मन तिला ग्वाही देत असावें; कारण ती रखमाईला म्हणते,

[पान १८१ पहा.]

कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर भीड सोडून तिनें विठ्ठलाशींहि वाद घातला. तरीहि तिच्या मनासारखें घडून आलें नाहीं. हें पाहून तिला वाईट वाटलें. पुढें सर्व उपाय थकलेसे पाहून स्त्रीधर्मानुसार नामदेवा-प्रमाणें तिनेंहि ईश्वरभक्तींत व भजनांत आपला काळ दवडण्यास सुरुवात केली. जें आपल्या नवऱ्याला आवडलें तेंच आपणहि आवडून घेतलें पाहिजे, इहलोकीं तोच आपला गुरु, तेंच आपलें तीर्थ, त्याच्यावांचून आपल्याला अन्य दैवत नाहीं, हा पतिव्रताधर्म तिनें पूर्णपणें स्वीकारिला. याप्रमाणें आपलीं मातापितरें विठ्ठलाच्या भजनांत रत झालेलीं पाहून पुढें त्यांची नारा, विठा, महादा, गोंदा हीं मुलें आणि त्यांच्या बायका अशीं कुटुंबांतलीं सर्वच माणसें भक्तिमार्गांत शिरलीं; आणि भजन-पूजन करूं लागलीं. त्यांना ज्ञानेश्वराच्या संगतीचा लाभ घडला, आणि तीं सर्व माणसें, तें सर्व कुटुंब, नामामृताचें यथेच्छ प्राशन करीत, ब्रह्मानंदाचा अनुभव अनुभवीत, सुखानें आणि तृप्तीनें राहूं लागलें.

ज्ञानदेवाच्या उपदेशाची छाप जशी नामदेवावर तशी त्याच्या सर्व कुटुंबावरहि पडली. इतकेंच नव्हे, तर त्याच्या घरची दासी जी जनाबाई तिच्यावरहि त्याची छाप पडून तिलाहि प्रेमाचे पाझर फुटूं लागले; व ती अभंगरचना करूं लागली. नामदेवाच्या सर्व कुटुंबांत, किंबहुना मराठी भाषेंतील सर्व भक्तमंडळींत, जनाबाईच्या वाणींत प्रेमळपणा विशेष भरलेला आढळतो. तिची प्रत्येक ओळ प्रेमानें आणि भक्तीनें थबथबलेली दिसते. 'अहो देवा हरिहर। उतरी आम्हां भवपार' असें म्हणत शंकराचा,

---

[पान १८०-वरून.]

"आमुच्या वडिलां शस्त्र। 'सुई' आणि 'कातरी'। हा 'बाण' आणि 'सुरी'। वागवीतसे ॥ १ ॥
एकांतें भोंकीलें। रुदना करी त्याची नारी। वाह्यियेली सूरी नागनाथीं ॥ २ ॥
...होणार होऊन गेलें। शिकवूं आतां काई। विनविते राजाई। रखुमाई" ॥ ३ ॥
आवटे-गाथा, अभंग ८८.

नामदेवाचा हा दोष राजाईला दिसला, पण पुत्रमोहामुळें गोणाईला तो तसा दिसला नाहीं.

'गजेंद्रासी उद्धरिलें। आम्ही तुझें काय केलें' असे म्हणत विष्णूचा, 'ये रे ये रे माझ्या रामा। मनमोहन मेघश्यामा' किंवा 'येईं जीवाचिया जीवा। रामा देवांचिया देवा' असें म्हणून रामाचा किंवा इतर कोणत्याहि देवाचा धावा करितांना ती अगदीं रंगून जाते. विठ्ठलाच्या ठिकाणीं तर तिची भक्ति विशेषच होती. यामुळें त्याला आळवितांना तर तिच्या वाणीला केवळ भरतेंच येतें.

येई येई विठाबाई। माझे पंढरीचे आई ॥
भीमा आणि चंद्रभागा। तुझ्या चरणींच्या गंगा।
इतुक्यासहित त्वां बा यावें। माझे रंगणीं नाचावें ॥
माझा रंग तुझिया गुणीं। म्हणे नामयाची जनी।

असें म्हणून ती विठ्ठलाचा धावा करूं लागलेली ऐकून आपलेहि डोळे विठ्ठलाच्या वाटेकडे लागतात. विठ्ठलाजवळ जनाबाई कांहीं विशेष मागत नव्हती. तिचें मागणें अगदीं साधें होतें. ती म्हणते—

हेंचि देई हृषीकेशी। तुझें नाम अहर्निशी ॥
रूप न्याहाळिन डोळां। पुढें नाचेन वेळोवेळां।
सर्वां ठायीं तुज पाहें। ऐसें देऊनि करीं साह्य ॥
धावा करितां रात्र झाली। दासी जनिसी भेटी दिली।

सारा वेळ जिवाला एकच तृष्णा, रात्रंदिवस मनाला एकच निदिध्यास आणि सर्वकाळ अंतःकरणाला एकच अट्टहास कीं, 'सर्वठायीं विठ्ठल दिसावा'—या स्थितींत एकाग्रचित्तानें धावा करितां करितां रात्र पडल्यावर त्या दमल्या-भागल्या मनाला जिकडे-तिकडे विठ्ठल दिसावा, त्या श्रांत देहाला विठ्ठलानें येऊन आपला शीणभाग उतरल्याचा अनुभव यावा आणि सदा-सर्वकाळ विठ्ठल आपल्या जवळच आहे असें वाटूं लागावें, हें अगदीं साहजिक आहे. हें असें वाटणें व अनुभवणें हेंच त्या साध्या पण पूर्ण भक्तिभावाचें उत्तम द्योतक आहे; व जनी दासीच्या त्या साध्या, प्रेमळ, हळुवार मनाला हें असें वाटत असे, यांत संशय नाहीं. तिला वाटे, माझा विठ्ठल कांहीं दूर नाहीं; तो सारा वेळ अगदीं माझ्याजवळ आहे. तोच माझी पाठ राखतो, तोच माझीं कामें करूं लागतो, तोच

माझें दळण दळतो, मला घाम आला तर शेल्यानें तोच पुसतो, आणि मला हातभारहि तोच लावतो.

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी ।।
साळी सडायास काढी । पुढें जाउनी उखळ झाडी ।
सांडुनियां थोरपण । करी दळण कांडण ।।
राना जाये शेणीसाठीं । वेचूं लागे विठोबा पाठीं ।
जनी जाई पाणियासी । मागें धावे हृषीकेशी ।।

असा आपल्या मनाचा अनुभव ती लिहून ठेविते. मनाला असें वाटूं लागावें व अंतःकरणाला असा अनुभव येऊं लागावा हीच भक्तिसुखाची अत्युच्च पायरी आहे; आणि भोळ्या-भाबडया जनीला ही पायरी लाभली होती. या भक्तीचा ओलावा तिच्या शब्दांत स्पष्टपणें दृष्टीस पडतो. तिनें हरिश्चंद्राख्यान, प्रल्हादचरित्र, कृष्णजन्म, बालक्रीडा वगैरे लिहिलेल्या सर्व आख्यानांत हा भक्तिभाव पूर्णपणें सांठवला आहे. तिचा ' थालीपाक ' तर या सर्वांत उत्कृष्ट आहे. त्यांत एक तऱ्हेचा साधेपणा आहे. तो इतर कोणाच्याहि रचनेंत नाहीं. शब्दांचा साधेपणा आणि मनाचा भोळा भाव हीं जुळीं भावंडें जनाबाईच्या वाणींत विशेषपणें आढळतात. एके दिवाळीचे सणांत या विठ्ठलभक्त कुटुंबानें देवळांतून देवास आपल्या घरीं आणून न्हाऊं घातलें आणि नाहण, भोजन करून आनंदानें सण साजरा केला. त्याची हकीकत जनाबाई लिहिते —

सण दिवाळीचा आला । नामा राउळासी गेला ।
हातीं धरोनि देवासी । चाले आपुल्या घरासी ।।
देव तेथूनी निघाले । नामयाच्या घरा आले ।
गोणाईनें उटणें केलें । दामाशेटीं न्हाणें केलें ।।
पदर माथ्याचा काढिला । बाळ नंदाचा पुशिला ।
हातीं आरती घेउनी । ओंवाळिती चक्रपाणी ।।
जेवोनिया तृप्त झाले । दासी जनीनें विडे दिले ।

नामदेव हा कधीं मृत्यु पावला, हें माहीत नाहीं[1], पण यानें उल्लेखिलेल्या पत्रिकेवरून याला ऐशी वर्षें आयुर्दाय होता असें दिसतें; व त्याची सून लाडाई हिचाहि याला मिळता असा एक अभंग आहे. लाडाई म्हणते—

प्रसूतीलागीं मज । आणिलें कल्याणा । अंतरला राणा । पंढरीचा ।।
ऐकला वृत्तान्त । सर्व जाहले गुप्त । माझें तें संचित । खोटें कसें ।
द्वादश बहात्तरी । कृष्ण त्रयोदशीं । आषाढ हे मासीं । देवद्वारीं ।।
सर्वांनीं देह । अर्पिला विठ्ठलीं । मज कां ठेविली । पापिणीसी ।
लाडाई म्हणे देह । अर्पीन विठ्ठला । म्हणोनि आदरिला । प्राणायाम ।।

शके १२७२-त आषाढ कृष्ण त्रयोदशीस नामदेवाच्या सर्व कुटुंबानें एकदम एकेच वेळीं देवद्वारीं श्रीविठ्ठलाचे पायरीपाशीं समाधि घेतली, असें म्हणतात व अजूनहि हें ठिकाण पंढरपुरास महाद्वारापाशीं दाखवितात; परंतु वरील अभंगावरून सर्वांनीं एकेच वेळीं देह टाकिला नाहीं, असें स्पष्ट दिसतें. लाडाईप्रमाणेंच नामदेवाचे पुत्र तरी त्याचे पश्चात् हयात होते, असें त्यांच्या अनेक अभंगांवरून वाटतें. सर्वांत धाकटा मुलगा 'विठा' हा देवाजवळ तक्रार करितो कीं —

आमुचा बाप आम्हां सांगे । भाक दिधली पांडुरंगें ।
तुमची पोशीन वंशावळी । करीन तळहात साऊली ।।
तुमचा भार माझे माथां । आण न विसंबे सर्वथा ।
विठा म्हणे विसरलासी । फुकाचा तूं न बोलसी ।।

यावरून नामदेवाचे पुत्र त्याचे मागें हयात असावे व ते विरक्त

---

१. शीखांच्या 'ग्रंथसाहेबां'त नामदेवाच्या आख्यायिका व अभंग आहेत. कमाल संताचें पुढील पत्र प्रसिद्ध आहेः—

वाही साही हजरत मौला खडा पंढरपूरवाला है।
दुबले भगत दोनो भये उनोसे करो बोलबाला है ।।
दखनस्थाने नामदरजी उनोका विठ्ठल बंदा है ।
और सेवा कछु न जाने अंदर भीतर केशव है ।।
उत्तर म्याने भयो कबीरा रामचरणका बंदा है ।
उनोका पूत कमाल दोनोका बोलबाला है ।।

वृत्तीनें राहून ईश्वरभक्तींत मग्न असावे, असें दिसतें. संसार ते नांवाला मात्र करीत पण संसाराची आस्था त्यांना मुळींच नसे व त्याची अवश्य तीहि खटपट ते करीत नसत. बालभक्तीचें प्रत्यक्ष उदाहरण या सर्व कुटुंबाच्या ठिकाणीं पाहण्यास सांपडतें. बरें होवो, वाईट होवो, सुख मिळो न मिळो, आपल्या आईचें सान्निध्य, तिचा नित्य-सहवास हीच जशी लहान मुलाच्या मनाची अपेक्षा असते, तशीच अपेक्षा नामदेवाची आणि त्याच्या कुटुंबाची होती. विठ्ठल माउलीपासून क्षणभरदेखील दूर राहूं नये, सदा-सर्वकाळ तिचा सहवास असावा; तिच्या पुढें सर्व कांहीं तुच्छ; ती बरी असो, ती वाईट असो; ती काळी असो, गोरी असो; ती माझी माउली, ती माझी आई, ती सर्वांत आवडती, सर्व जगांतल्या वस्तूंपेक्षां ती श्रेष्ठ, कल्पनेनें जाणल्या जाणाऱ्या सर्व गोष्टींपेक्षां ती थोर, तीच माझ्या प्रेमाला पात्र व ती एकच प्रेमाचें योग्य ठिकाण; ती गगनांत असली तरी तिचें मन एकट्या माझ्याकडे असतें; ती माझी आणि मी तिचा. अशा त्या आईच्या ठिकाणीं, त्या विठ्ठलमाउलीचे ठिकाणीं, नितांत प्रेमभावना होणें हाच भागवतधर्म, हाच भक्तिमार्ग आणि हेंच वारकरी-पंथाचें रहस्य होय. आणि हें रहस्य ज्ञानेश्वराचा सहवासी जो महान् भगवद्भक्त नामदेव त्याच्या, त्याच्या कुटुंबाच्या, त्याच्या दासी जनीच्या आणि त्याच्या शिष्यमंडळीच्या चरित्रांत इतकें उत्तम दिसत होतें कीं, आज पांचसहाशें वर्षें होऊन गेलीं, तरीहि त्याची आठवण महाराष्ट्र विसरला नाहीं. त्याचें चित्र महाराष्ट्राच्या डोळ्यांसमोर अजून उभें आहे.



# तेराव्या शतकांतील कांहीं ग्रंथकार



नामदेवाचे समकालीन अशा व त्याच सुमारच्या इतर ग्रंथकारांसंबंधानें लिहितांना नामदेवाचा गुरु जो विसा खेचर त्याचा उल्लेख प्रथमारंभीं करणें वावगें होणार नाहीं. **विसोबा खेचर** हा मूळ पैठणाजवळील भुंगी येथला राहणारा होता. 'विसोबा खेचर जाण । राहे भुंगीमाजी आपण। खिस्तीचा उदिम करून । काळक्रमण करीतसे ॥' असें दासो दिगंबर आपल्या 'भक्तविजयां'त लिहितो. हा पेशानें व्यापारी असल्यामुळें तत्कालीन व्यापाऱ्यांची सांकेतिक भाषा तो केव्हां-केव्हां योजितो. खेचराच्या अभंगाची बांधणीहि नामदेवाच्या अभंगासारखीच आहे.

मुळु वदनाचा । आंगळू हाताचा । उदाणू नेत्राचा । स्वामी माझा ॥
मुगुट जयाचा । केवल्या आगळे काटी । पवित्रु तळवटी । चरण ज्याचे ॥
शेलि हे भागले । पोकु वेडावले । आवारू कवच काटी । थकित जाहली ॥
सद्भावें शरण । आवारू जोडूनी । **विसा खेचर** चरणीं । विनटला ॥[1]

विसोबा हा व्यापारधंद्यांतला असल्यामुळें त्यानें महाराष्ट्रांत त्या काळीं व्यापाऱ्यांत चालू असलेल्या **नंद**भाषेची या अभंगांत योजना केली आहे. अभंग श्रीशंकरस्तुतिपर आहे. याच भाषेंत नामदेवाचे व तुकोबाचेहि कांहीं अभंग आहेत. या भाषेची असावी तितकी माहिती हल्लीं आपणांस नाहीं.

हा आपला गुरु सोपानदेव होय, असें सांगतो. 'जय जय आरती : जय सोपानदेवा ओवाळीं खेचरू विसा : जीवी चि जीवा' इत्यादि

---

१. या अभंगाचा अर्थ असा:– पांच तोंडांचा, दहा हातांचा, तीन नेत्रांचा असा माझा स्वामी आहे. याचें मस्तक एकवीस स्वर्गं उंच असून याचे चरण सप्त पाताळाइतके खोल आहेत. याचें वर्णन करितांना 'सहा' भागलीं, 'चारी' वेडे झाले व 'अठरा' थकून गेलीं. याला मी विसा खेचर हात जोडून सद्भावें शरण जातों.

याची सोपानदेवाची आरती अजूनहि वैराग, बार्शी प्रांतांत ऐकूं येते. या नामदेवाच्या गुरूचें एक 'हरिश्चंद्राख्यान' नांवाचें लहानसें प्रकरण, कांहीं अभंग व थोडींशीं पदें इतकीच कृति उपलब्ध आहे. याचें ज्यांत वर्णन केलेलें दिसतें असा एक अभंग पुढें देतों —

संन्यासी म्हणों तरी नाहीं स्नान मुंडण। तपिया म्हणो तरी दमन न करी देहा।।
योगी म्हणों तरी नाहीं विभूती कंथा। कापडी म्हणो तरी तीर्था न वचे कांहीं।।
म्हणों ब्राह्मण ब्रह्मचारी, तरी दिसे गृहाचारी। पाहतां निर्धारी नेम नाहीं।।
गृहस्थ म्हणों तरी नाहीं यज्ञाचार। षट्कर्मे विचार पारुषला।।
दिगंबर म्हणों तरी दिव्यांबरें नेसे। पिशाच्य म्हणो तरी न बरळ कांहीं।।
नष्ट म्हणों तरी चित्त परमेश्वरीं। असोनी चराचरीं अलिप्त कैसा।।
वैष्णव म्हणों तरी कीर्तन न करी। नाम न म्हणे धरी दर्शन एक।।

xxxxxxx xxxxxxx xxxxxxx

ऐसा तो ब्राह्मण, तयासि नाहीं वर्णावर्ण। वर्ण सांग पा कवण निरुता कानीं।।
न कळे याचा पंथ पंथाविरहीत। एका आत्मसिद्धांत वांचूनीया।।
अवघाचि होय परी कळों नेदी सोय। जेवीं गगनमार्ग होय पक्षीयाचा।।
अनुभवी जाणे अनुभवियाचें वर्म। जया परब्रह्म बिंबलेसें।।
जीवन्मुक्त पदीं खेचर विसा। उदकीं भानू जैसा विचरत।। १।।

हा शके १२३१-मध्यें श्रावण शु० एकादशीस समाधिस्थ झाला. याची समाधि बार्शीस आहे. हा साधुपुरुष ज्ञानेश्वरांच्या तीर्थयात्रेंत नामदेवादि मंडळीबरोबर हजर होता. या सुप्रसिद्ध यात्रेंत परसा भागवत, चोखामेळा, सांवता माळी वगैरे संतपुरुषहि होते. परसा भागवत व गोरा कुंभार हे दोघेहि नेहमीं नामदेवाबरोबर भजन करीत व एके ठिकाणीं नाचत, असें महीपतीबावा सांगतात. या दोघांचेहि अभंग प्रसिद्ध आहेत.

**परिसा भागवताच्या**

'बिंब उमटलें अंबरीं। गरुड झळके टकयावरी।।
पैल टका रे कोणाचा। नामा येतो केशवाचा।।
नामा येतो लोटांगणीं। परसा लागतो चरणीं।।'

या अभंगावरून नामदेवाचा व परसा भागवताचा स्नेह किती होता, हें चांगलें दिसतें.

ऐसे परउपकारीं। लोळावें त्यांचे द्वारीं ॥
तेंच केशवध्यान। येर लटिके संवसारी ॥
त्यांचे रंगणीची शीळा। देवा मज करी।
ते येतां जातां। चरण ठेवितील वरी ॥
ताहीं उधरिले माझे कवंटे। पूर्वजउधरण दिसे वैकुंठवाटे ॥
हरिदासांचे भार। मीरवताती गरूडटके गोमटे।
धन्य तप्तीतीरीं। बरवे वाळुवंट ॥
लाधलों समसुख कासीये जातां। विश्वनाथप्रेमाचिया संता ॥
बाणली वीरश्री पंढरीनाथा। जीकडे तीकडे देखे हरिदास गर्जतां ॥
निवृत्ती सोपान हे ज्ञानेश्वर। चांगदेव मुक्ताई वटेश्वरू ॥
आवघियां आवघा साक्षांतकारू ॥
त्यांचे चरणींचा रेणू हा नामदेव सिंपा। पहातां अनुभव सकळार्थ सोपा :
हे येकी च मूर्ती पाडले अशेखा। सकळा चरणीं हा परसा भागीवंता देखा ॥

या परसा भागवताच्या आरतीवरूनहि याचें नामदेवाच्या ठिकाणीं विशेष प्रेम होतें, असेंच दिसतें. परसा भागवताप्रमाणेंच **गोरा कुंभार** हाहि नामदेवाच्या प्रेमांतला दिसतो. हा तेरढोकी येथील राहणारा. या गांवीं याचें वतनी इनाम होतें. ह्याचा जन्म शके ११८९-तला असल्यामुळें, या संत-मंडळींत हा सर्वांत वडील होता व सर्वजण याला—गोरोबाला—काका म्हणत. जसा वयानें सर्वांत श्रेष्ठ, तसाच वैराग्यांतहि हा सर्वांत श्रेष्ठ असे. अवा घडण्याकरितां माती आणावी आणि ती मऊ करण्याकरितां तींत नाचतांना तोंडानें पंढरीनाथाचे भजनाचा सपाटा लावावा, व प्रेमाच्या भरांत येऊन आनंदानें डुलत रहावें, असा याचा नित्यक्रम असे.

'विठ्ठलाचें नाम स्मरे सर्वकाळ। नेत्रीं वाहे जळ सद्गदीत ॥
कुल्लाळाचे वंशीं जन्मले शरीर। तो गोरा कुंभार हरिभक्त ॥'

हा सदासर्वकाळ हरिभक्ति करून अभंगरचना करी. हा आपल्या

अभंगांत नामदेवाचा उल्लेख वारंवार प्रेमानें करितो—'म्हणे गोरा कुंभार अनुभवाचा ठेवा। प्रत्यक्ष नामदेवा भेटलासी'. गोरोबाप्रमाणेंच कुंभार-मंडळींत या वेळीं **राका** नांवाचा एक वैष्णववीर प्रसिद्ध होता. याच्या बायकोचें नांव बाका— 'राका' 'बाका' दोघी जण। होती स्त्रीपुरुष जाण। एक कन्या तया लागून। **देऊ**बाई नांव तीचें ॥ हें सर्व कुटुंब अभंगरचना करी व कडकडीत वैराग्यवृत्तीनें राही. एके दिवशीं हें सर्व कुटुंब रानांत वाळलेलीं लाकडें आणण्याकरितां गेलें असतां, एक सोन्याचें कडें वाटेंत पडलेलें राकोबाच्या नजरेस पडलें. तें पाहून राकोबांनीं विचार केला कीं, न जाणों मागून बायको येत आहे तिला याचा मोह पडेल आणि ती तें घेईल. असें मनांत आणून राकोबांनीं पायानें त्या कड्यावर माती लोटिली. आपल्या नवऱ्याचें हें कृत्य बाकाबाईनें दुरून पाहिलें व जवळ येऊन न्याहळते तों सोन्याच्या कड्यावर माती लोटिलेली तिच्या नजरेस पडली. हें पाहून तिनें नवऱ्यास विचारिलें, "हें काय केलें?" राकोबांनीं उत्तर दिलें, "न जाणों, बायकोची जात, सुवर्णाचा लोभ पडून पाशांत पडशील, म्हणून त्यावर माती लोटिली." हें उत्तर ऐकून तिनें नवऱ्याची निर्भर्त्सना केली व ती म्हणाली कीं, "विरक्त म्हणवितां आणि अजून हें सोनें आणि ही माती, हा भेद-भाव मनांत ठेविलाच आहे काय?"

कुंभारांत जसे गोरोबा व राकोबा तसेच इतर जातींतहि या वेळीं अनेक भगवद्भक्त होऊन गेले. माळ्यांत सांवता, सोनारांत नरहरी व तेल्यांत जोगा हे विशेष प्रसिद्ध होते. **सांवता माळी** हा अरणभेंडीस राहणारा. तेथें त्याचा मळा व विहीर अजूनहि दाखवितात.

**नरहरी सोनार** हा पंढरपूरचा राहणारा. याचा बाप दिनानाथ. हा पूर्वीं देवगिरीस चांगला धनिक असून सराफीचा धंदा करी; पण पुढें

१. 'वका' असें कांहीं ठिकाणीं आहे.

२. सांवता माळी हा शके १२१७-मध्यें आषाढ कृष्ण चतुर्दशीस मन्मथ सवत्सरीं मृत्यु पावला.

नरहरी पंढरीस येऊन राहिला व तेथें सोनारकाम करूं लागला. नरहरी हा मूळचा कट्टा शैव होता. हा विठोबाचें दर्शनदेखील कधीं घेत नसे, मग नमस्कार कोठचा करणार !

भोळा हा शंकर । पुढें नंदीश्वर । तेथें मी पामर । काय वानूं ॥
भूषण जयाचें । भूवना वेगळें । रुंडमाळा रुळे । गळ्यामध्यें ॥
कर्पूरगौर भोळा । हातीं तो त्रिशूळ । भूषण धवल । विभूतीचें ॥
माथां जटाभार । करीं श्वेत शंख । सांब सदाशीव । फूंकीतसे ॥
नाम घेतां ज्याचें । पाप ताप जाती । पापी उद्धरती । क्षणमात्रें ॥
नरहरी सोनार । भक्ति प्रियकर । पार्वती शंकर । हृदयीं ध्याता ॥

असें ध्यान धरून हा शंकराची उपासना करी. पण पुढें संतांच्या संगतीनें 'शिव' आणि 'विष्णु' हे भिन्न नाहींत, अशी याची खात्री होऊन 'एकचि भावना । उभयां चरणी । हो कां प्राणहानी । पालटेना ॥' अशी स्थिति झाली व हा विष्णुदास बनून यानें भागवतधर्माची दीक्षा घेतली. परमेश्वर तेथून एकच ; नांवें भिन्न घेतलीं तरी तो सर्व अनाथांचा नाथ भिन्न नाहीं ; सर्व संप्रदाय हे शेवटीं त्याच्याच चरणापाशीं जाऊन ठेपणारे निरनिराळे मार्ग आहेत, हा प्रकाश ज्ञानेश्वरांच्या आणि त्यांच्या भावंडादि संतमंडळाच्या उपदेशानें जसा नरहरी सोनारावर, तसाच त्या वेळच्या सर्व महाराष्ट्रावरहि पडला आणि या ज्ञानियांच्या म्हणजे जाणित्यांच्या ईश्वरानें आपल्या वाचेनें आणि कृतीनें जें महाराष्ट्रास पढविलें त्याचें सार हेंच आहे. नरहरी सोनार हा ज्ञानोबाच्या तीर्थयात्रेंत होता, व ज्ञानेश्वराच्या ठिकाणीं त्याचा भावहि फार दृढ होता. तो ह्मणतोः—

सवंगडे निवृत्ती । सोपान मुक्ताबाई ॥ ज्ञानदेवापायीं । भाव माझा ॥
धन्य ते वैष्णव । मिळाले सकळी ॥ जीव भाव मी ओवाळीं । तये चरणीं ॥
अखंड ध्यानीं ध्यातो । हृदयीं साचार ॥ नरहरी सोनार । कायामनें ॥

शंकरावांचून इतर देवतांचा आणि त्यांच्या उपासकांचा मनापासून तिटकारा मानणारा नरहरी सोनार सर्व द्वेष विसरला आणि

'शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा । सदोदित ॥
धन्य ते संसारी । नर आणि नारी । वाचें हर आणि हरी । उच्चारिती ॥
नाहीं पै भेद । अवघा मनीं अभेद । द्वेषाद्वेष संबंध । उरों नेदी ॥
सोनार नरहरी । न देखे द्वैत । अवघा मूर्तिमंत । एकरूप ॥'

अशी त्याची दृढ भावना होऊन गेली.

नरहरी सोनार हा शके १२३५-त प्रमादी संवत्सरीं माघ कृष्ण प्रतिपदेस समाधिस्थ झाला. याच्या मागें याच्या कुटुंबांतहि अनेक भक्त व कवि होऊन गेले.

**जोगा परमानंद** हा जातीनें शूद्र होता, असें महीपतीबावा म्हणतात. पण हा तेली होता, असाहि उल्लेख सांपडतो. याची जात कोणती, हें जरी निश्चित नाहीं तरी तो मोठा साधुपुरुष व बराच वरच्या दर्जाचा कवि होता, हें निःसंशय खरें आहे. या कवीचें नांव जोगा व परमानंद हा त्याचा गुरु.

रोमांच रवरवितु । स्वेदबिंदु ढळमळितु ।
पाहतां नेत्र उन्मळितु । मग मिटोत मागुते ॥
ऐसा हृदयों प्रकटसी । कै माझ्या नरहरी ।
तुज देखतां तनु कांपे । मन बुद्धी ही हारपे ॥
सकळ ही अहंभाव लोपे । एक तत्त्वची उरे ॥

अशी चिंता सारा वेळ लागून राहिल्यावर जोग्याला परमानंदाच्या भेटीचा लाभ झाला. आपल्या गुरूची भेट झाली त्या वेळीं जोगा म्हणतो —

मन निवालें निवालें । कैसें समाधान झालें ॥
संत अलिया अवसरीं । नवल आरतीयांची परी ।
आनंदले नर नारी । परमानंद प्रगटले ॥

---

१. शककर्ता शालिवाहन । बारा शतें पस्तीस जाण । प्रमादीनामें संवत्सर पूर्ण । माघ कृष्ण प्रतिपदा ॥ भूवैकुंठ पंढरीक्षेत्र । नरहरी सोनार परम पवित्र । माध्यान्हि येतां कुमुदिनीमित्र । देह अर्पिला तयानें ॥

याच्या एका अभंगांत 'गुरु गैबीनाथ । नरहरीदास ह्याचा अंकित ।' असें म्हटलें आहे. 'गैबीनाथा' बद्दल 'गैनीनाथ' असाहि पाठ आढळतो.

द्यावया आलिंगन । बाह्यां येतसे स्फूरण ।
सजळ झाले लोचन । जैसे मेघ वर्षती ।।
आजि सुदिन सोहळा । संत जिवनाची कळा ।
जोगा विनवितो सकळां । भेटी परमानंदेसी ।।

जोगा याची भक्ति फार कडकडींत असे. हा सर्व काळ भजनांत घालवी. सर्वां भूतीं परमेश्वर सारखाच आहे व सर्व प्राणिमात्र हे परमेश्वराचेच निरनिराळे अवतार आहेत, अशा दृढ समजुतीनें तो व्यवहारांत वागे. हा बार्शी येथें राहत असे. रोज भगवंताच्या देवळांत जातांना तोंडानें गीतेचा एक–एक श्लोक म्हणावा व एक-एक नमस्कार घालीत देवळास जावें, असा याचा क्रम होता. एके दिवशीं याच्या कृपेमुळें आपणांस पुत्र झाला, असें समजून याला एका सावकारानें भरजरी पितांबर नेसविला. ते दिवशीं तें नवें वस्त्र धुळींत मळेल म्हणून जोग्याचे नमस्कार जरा जपून होऊं लागले. त्यामुळें देवळांत पोहोंचण्यास थोडा उशीर झाला. आरतीची वेळ साधली नाहीं, हें पाहून जोगा मनांत फार खिन्न झाला, व या पितांबरानें मला मोहपाशांत बांधिलें आणि त्याचेमुळें भगवंताचे पाय अंतरले, असें म्हणून त्यानें पितांबर फाडून टाकिला व स्वतःस दंड लाविला. याची समाधि बार्शीस आहे व अजूनहि याचे पुण्यतिथीनिमित्त मार्गशीर्ष वद्य चतुर्थीस याचा उत्सव करितात. याचीं पदें, आरत्या व अभंग उपलब्ध आहेत.

---

१. नमुन्यासाठीं याचें एक पद देतों–
वसोनि संता घरीं हो । घेतली गुरगुडी ।। धृ. ।।
आधि ब्रह्मांड नारळ । मेरु सत्त्व तो आढळ ।
निर्मळ सत्रावीचें जळ । सोहं गुरगुडी : गुरुगोडी ।।
चिलमि त्रिगुण त्रिविध । मीपण खडा तो अभेद ।
तम तमाखू जाळून शुद्ध । वैराग्य विगळ धडधडी ।।
सावधान लावुनियां नळी । मीपण झुरका विरळा गिळी ।
जन्ममरणाची मुरकुंडी संभाळी । धूर विषयाचा सोडी ।।
हो घेतली गुरुगोडी ।। लागला गुरुगोडीचा छंद । त्याला प्रसन्न परमानंद ।
जोगा स्वामी तो अभंग । गुरुचरण न सोडी ।।
बैसोनि संता घरीं ही घेतली गुरगुडी ।। हो गुरुगोडी ।

बार्शीच्या पलीकडे मोंगलाई हद्द लागते. या प्रांतांत महाराष्ट्र-कवि व साधुपुरुष पुष्कळच होऊन गेले. या काळीं तिकडे **जगमित्र नागा** हा पुरुष विद्यमान होता. याचे चरित्रकार म्हणतात, 'जगमित्र राहे प्रतिष्ठानी । द्रव्याचा व्यवसाय करूनी'; इतकेंच नव्हे, तर तो 'लक्षाधिपती धनी' असें असून त्याचा बोलबाला फार चांगला होता. परंतु त्यास एकाएकीं विपरीत काळ आला व जवळ होतें तें सर्व कांहीं गेलें. द्रव्य गेल्यावर पत कसची राहणार ! ! संकटकाळीं तीहि निघून गेली. मित्र होते, ते अमित्र झाले व त्याला मऊ गादीवरून उठून धुराळ्यांत लोळण्याची पाळी आली. तेव्हां हा देशोधडीस लागला व संकटकाळीं सर्वांस समाधान देणारें व चित्तास शांत करणारें असें जें ईश्वरभजन त्यांत मग्न झाला. एकदा संसार सोडल्यावर हा फार विरक्त वृत्तीनें राही. हा पुढें नागस्वामी नांवाच्या पुरुषास शरण गेला व त्याचें नांव यानें आपल्या नांवापुढें लावून हा आपणास 'जगमित्र नागा' म्हणवूं लागला, असें याचे चरित्रकार सांगतात. पण जगमित्र किंवा जगमैत्र हें उपनांव असून या जगमैत्रांकडे मुठेखोऱ्यांतील मौजे पिरंगूट येथील कुळकर्णपण होतें; व अनेक शतकें हें जगमैत्रांचें कुटुंब महाराष्ट्रांत नांदत होतें.[1] ही गोष्ट लक्ष्यांत आणिली म्हणजे या कवीचें नांव नागेश व उपनांव जगमैत्र असावें, असें वाटतें. याचे कांहीं अभंग व कांहीं पदें मात्र उपलब्ध आहेत. याची बहुतेक कृति चमत्कृतिजनक आहे.[2]

---

१. या जगमैत्राच्या घराण्यांत शके १२८०-चे सुमारास पिरंगूटचे कुळकर्णपण होतें. शके १५००-नतर रंगभट जगमंत्र यानें हें आपलें वतन कोणी बाळाजी हरि मेंडजोगी या गृहस्थास विकलें.

२. याचा एक अभंग असा–

अग्नि जाळी तरी : न जळे प्रल्हादु : हृदयीं गोविंदु : म्हणोनियां ।।
अग्नि जाळी तरी : न जळती गोपाळू : हृदयीं देवकीबाळू : म्हणोनियां ।।
अग्नि जाळी तरी : न जळती पांडव : हृदयीं वासुदेव : म्हणोनियां ।।
अग्नि जाळी तरी : न जळे बिभीषणाचें घर : हृदयीं सीतावर : म्हणोनियां ।।
जगमित्र नागा न जळे : जरि अग्नि जाळी : हृदयीं वनमाळी : म्हणोनियां ।।

याचा समाधिकाळ शके १२५२, कार्तिक शु. ११ असा देतात. याची समाधि जोगाईच्या आंब्याजवळ परळी[1] येथें आहे.

आणखीहि अनेक संतकवि या शतकांत या सुमारास होऊन गेले. 'रसाळ रामायण' लिहिणारा **साळ्या रसाळ**[2], वाळवंटांत अकरा दिवसांचा सांपडलेला व पुढें संतसमागमांत वाढलेला **कूर्मदास** वगैरे सर्व मंडळी नामदेवाचीच समकालीन होत. यांपैकीं पुष्कळांची कविता अलौकिक आहे. ही सर्व कविता आपणांस हल्लीं उपलब्ध नाहीं. एकंदर रचिलेल्या कवितेच्या मानानें पाहतां जो भाग उपलब्ध आहे तो फारच अल्प आहे, व जो अल्प भाग आज उपलब्ध आहे तोहि आपल्या मूळ अस्सल स्वरूपांत नसून अनेक बाजूंनीं पालटलेला असा आहे. तरी मूळ कवीच्या रचनेचें स्वरूप, त्यांतील भाषासौरस्य व विचारसरणी हीं त्यांत आपणांस स्पष्टपणें पाहतां येतात. ही सर्व काव्यरचना भक्तिभावानें अगदीं ओथंबलेली आहे; आणि हिची भाषा येथून-तेथून मृदु व गोड अशीच आहे. ही अशी असण्याचें कारण ती लिहिणाऱ्या देहांची अत्यंत सात्त्विक मनोवृत्ति हेंच होय. ही साधु मंडळी प्रेमळपणाचा पाऊस जगभर पाडीत. एकमेकांतला

---

१. परळी वैजनाथ हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक असल्यामुळें यच्चयावत् हिंदुमात्राला तें अत्यंत पूज्य आहे. पूजाअर्चेनिमित्त पेशव्यांनीं येथील सुमारें पांच-हजार बिघे जमीन इनाम दिलेली आहे.

२. याचा उल्लेख रंगनाथ आपल्या भूपाळीमध्यें 'शक्तिदास साळया त्याची कविता पाल्हाळी' असा करितो.

वत्सऱ्याची रचना अशी–

शरीर विनटलें सेवे तुझे । ध्यानीं रंगलें मन माझें ।
शरीर विकलें चरणासीं । वाचा तुझोया नामासी ॥
ऐके पंढरपुरनिवासी । नयन तुझीया रूपासी ।
श्रवणीं कीर्तन गोविंदा । तुळघ्राण मकरंदा ॥
परिचर्या दंडपाणी । देह घालीन लोटांगणीं ।
चरणीं जेऊतें चालणें । तेऊती भेटी नारायणें ।
वत्सरा झाला संतसंगीं । कांहींच नुरे यमालागी ।

दुजाभाव पार नाहींसा होऊन त्यांच्या या अमृतसिंचनानें सर्वत्र प्रेमाचे मळे उगवूं लागले. तोंडानें हरिनामाचा गजर चालवावा, व नेहमीं समाधानवृत्तीनें राहून योगक्षेम संभाळावा, असा हे सर्वांस धडा देत व उपदेश करीत. कुटुंबासुद्धां ही सर्व मंडळी अभंग करी. हे कडकडीत वैष्णव वीर नेहमीं पंढरीची वारी करीत व सारा वेळ भजनांत घालवीत. अनेक वेळां हे क्षेत्रोक्षेत्रीं हिंडून तीर्थयात्राहि करीत. या यांच्या तीर्थयात्रा म्हणजे केवळ सदाचरणाचे प्रत्यक्ष धडेच होत. अलं दुनियेला नेत्रांच्या द्वारें शिक्षणाचे धडे तेथें मिळत व त्यांचा उद्धार होई. 'तीर्थमीसें केला जगाचा उद्धार' असें परिसा भागवत लिहितो; आणि तें खरें आहे. हे संत म्हणजे शुद्ध व सात्त्विक भावाच्या प्रत्यक्ष सजीव अशा चालत्या-बोलत्या मूर्तीच होत. यांचा राग अगदीं मेला होता. लोभमत्सरादिकांचा यांना विटाळहि नसे. हे एकमेकांच्या पायां पडत व एकत्रच पंढरीनाथाचें भजन करीत. वर्णसंकर करून जातिभेद न मोडतां आपण सर्व एकाच ईश्वराचीं लेकरें आहों, असें म्हणून नीट नांदावें, असें हे समजत व सांगत. ईश्वराचे घरीं भेदाभेद नाहीं, 'देंव भावाचा भुकेला। याति कूळ नाहीं त्याला। आहे भक्तांचा बांधला। अवतार घेतो त्यांसाठीं'॥ अशी यांना ज्ञानेश्वराची शिकवण होती. जसा ज्याचा भाव तसा त्याला तो पावतो, हा यांचा मुख्य उपदेश असे. यांच्या सर्व अभंगांत—सर्व रचनेंत—हेंच तत्त्व विशेष रीतीनें सांगितलेलें आहे. या सर्वांमध्यें ज्ञानेश्वर महाराज श्रेष्ठ असून त्यांनींच या पंथाचा पाया घातला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सर्व मराठी ग्रंथात जसा त्यांच्या ग्रंथांस जास्त मान आहे, तसाच सर्व पंथांत त्यांनीं घालून दिलेल्या या पंथास जास्त मान दिला जातो. या पंथांत उच्च-नीच हा फरक मुळींच नाहीं. जातीनें कोणी कितीहि निकृष्ट असला तरी उत्कृष्टपणा आणणारा भक्तिरूप परीस महाराष्ट्रांत सर्वांस सहज सांपडावा, असा ह्या महापंथाचा मुख्य हेतु दिसतो. किंबहुना, ज्ञानेश्वरी-अवतारहि याचकरितां होता, असें म्हटलें पाहिजे; व हा आपला हेतु नीट सिद्धीस जावा अशीच वाट ज्ञानेश्वरांनीं व त्यांच्या पंथांतल्या सर्व

साधु मंडळींनीं चोखाळून ठेविली आहे .या साधुसंतांचें आचरण फार चोख असे. यामुळें त्यांच्या वाणीची छापहि फार पडे. ' नाचूं कीर्तनाचे रंगीं। ज्ञानदीप लावूं जगीं ' असा निश्चय मनांत धरून हे सर्व संत महाराष्ट्रभर फिरत आणि या आपल्या नव्या पंथाचा आणि भागवतधर्माचा प्रसार मराठी भाषेंत करीत. यांच्या दिव्य प्रकाशानें लोक यांच्या पंथांत शिरत व भजन करूं लागत. ही मंडळी फिरती असल्यामुळें जिकडे-जिकडे हे जात तिकडे-तिकडे ज्ञानेश्वरांनीं पाजळलेली मशाल नेत. या मशालीची ज्योत जी एकदा ज्ञानेश्वरांनीं पाजळली ती पुन्हां कधीं विझली नाहीं. आपणां प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें भक्तीची मशाल ही आहेच; परंतु ती पाजळण्याइतकें तेज प्रत्येकामध्यें नसतें म्हणून ज्ञानेश्वरांसारख्या भगवद्भक्तांच्या समागमानें ती पाजळावी लागते. एकदा पाजळूं लागली म्हणजे ती कधीं विझत नाहीं व कधीं मंदहि होत नाहीं. उलट तिच्या प्रकाशाचें तेज त्या देहावर दिसूं लागतें. असे हे तेजस्वी पुरुष व भगवद्भक्त चोहोंकडे पसरल्यामुळें सर्व महाराष्ट्र यांच्या आवाजानें या काळीं दुमदुमून राहिलें. ब्राह्मणापासून तों अतिशूद्रापर्यंत स्त्री[1] व पुरुष सर्वांत शुद्ध भक्तिरसाचा ओघ सारखा वाहूं लागला. ब्राह्मणांत जसे ज्ञानदेव, सोपानदेव झाले किंवा शूद्रांत सांवता माळी, गोरा कुंभार हे झाले, तसेच अतिशूद्रांतहि चोखामेळ्यासारखे व बंकामहारासारखे विष्णुदास होऊन गेले. **चोखामेळा** हा मंगळवेढ्याचा राहणारा, जातीचा महार होता. हा सारा वेळ कामधंदा करीत असतांनाहि तोंडानें भजन करी. यांच्या बायकोचें नांव सोयरा. याला एक मुलगा होता. त्याचें नांव

---

१. कान्हुपात्रा ही स्त्री होतो, तोहि या संत-मंडळींत शिरून वारी, यात्रा, आणि अभंग करी:

उदारा पांडुरंगा धावे लवकरी । बुडते दुराचारी । डोहामध्यें ॥
माझी लाज राखा । येवोनि अनंता । निरवि चरणीं आतां । मन । माझें ॥
नको या उपाधी । तोडा कृपानिधी ॥ येवुनियां छेदी । काम क्रोध ॥
कान्हुपात्रा म्हणे ॥ विठोबा जिवलगा ॥ आलिंगने दे गा । सुख मातें ॥
अशी हिची रचना आहे.

'कर्मामेळा'. हें सर्व कुटुंब मंगळवेढ्यास राहत असे. त्यांचेच जवळ चोख्याची बहीण 'निर्मळा' हीहि राहून तेथेंच असे व आपला संसार चालवी. संसाराचे त्रासानें व त्यांतील अडचणींनें संसाराला चोख्याचें मन अगदीं कंटाळून गेलें होतें. तो म्हणतो —'एका पुढें एक पडती आघात। सारितां न सरत काय करूं?' अशा तापलेल्या मनाला शांति मिळावी व आराम वाटावा म्हणून चोख्यानें अनेक तीर्थयात्रा केल्या; पण कोठेंहि त्याचें मन रमलें नाहीं. तो म्हणतो —

'बहुत हिंडलों देश देशांतर। परी मन नाहीं स्थीर। झालें कोठें ॥
बहुत तीर्थें। फिरोनिया आलों। मनासवें झालों। वेडगलची ॥
बहुत प्रतिमा। ऐकिल्या पाहिल्या। मनाच्या राहिल्या। येरझारा ॥
चोखा म्हणे पहातां। पंढरी भूवैकुंठ। मनाचे हे कष्ट। दूर झाले ॥

तो आणखी सांगतो—

'विठ्ठल विठ्ठल गजरीं। अवघी दुमदुमली पंढरी ॥
होतो हरिनामाचा गजर। दिंड्या पताकांचे भार ॥
निवृत्ती ज्ञानदेव सोपाना। अपार वैष्णव ते जाणा ॥
हरी कीर्तनाची दाटी। तेथें चोखा घाली मिठी ॥

आणि एकदा मिठी पडून तेथली गोडी लागल्यावर चोखोबाला आणखी संतसमागमाची जोड मिळाली; व तो पंढरीस गेल्यावर 'हरिनामाची पेठ। भूवैकुंठ पंढरी। चंद्रभागा वाळुवंट। संत घनदाट नाचती ॥ टाळ मृदंग मोहरी। वैष्णव गजरी। आनंदें ॥' असें त्याला दिसलें. आणि हें पाहून 'चोखा जाई लोटांगणीं। घेत पायवणी संतांचें ॥' संतांच्या समागमाची, त्यांच्या अधिकारयुक्त वाणीची आणि गोड उपदेशाची चव मनाला कळल्यावर आपण आजपर्यंत संसाराच्या लिगाडांत व्यर्थ गुंतून पडलों आणि विनाकारण फजीती करून घेतली, असें त्याला झालें;[1] व लोक कांहीं म्हणोत, त्यांचेकडे लक्ष न देतां

---

१. आजवरी पडलों लिगाडाचे गुंतीं। तेणेंची फजिती झाली दिसे ॥
झाला दिसे मज मोकळा मोक्षमार्ग। धिक्कारोत जग मागें पुढें ॥
( चोखोबा )

मोक्षाचा मार्ग तो चोखाळूं लागला. यापुढें पंढरीची वारी त्यानें कधींहि चुकूं दिली नाहीं. तेथें जाऊन 'महाद्वारीं चोखामेळा । विठ्ठल पाहतसे डोळां ।' वारीचे वारकरी परत फिरले म्हणजे चोखाहि मंगळवेढ्यास परत जाई. पण पंढरीस काय आणि मंगळवेढ्यास काय, चोखोबा कोठेंहि असला तरी पंढरीचा विठोबा आणि पंढरीचे संत यांच्या ठिकाणीं त्याचें मन धाव घेत असे. पंढरीचे वारकरी जातां-येतांना पाहिले म्हणजे त्याचें मन उड्या घेऊं लागे व

कोणी पंढरीस, जाती वारकरी । तयांचे पायांवरी, भाळ माझें ॥
आनंदें तयासी, भेटेन आवडी । अंतरींची गोडी, घेईन सुख ।
ते माझे मायबाप, सोयरे सज्जन । तयांवरी तनुमन, ओंवाळीन ॥

असें त्याला सारा वेळ वाटे. जिवाचे मैत्र भेटले म्हणजे लहान मुलांना जो परमावधीचा आनंद वाटतो व त्या मैत्रिकीपुढें इतर सर्व गोष्टी जशा तुच्छ भासतात, तो आनंद व तसें अव्याज सुख चोखोबाला कोणी विठ्ठलाचा वारकरी भेटला म्हणजे होई[1]. चोखोबाची बायको सोयरा हीहि त्याच्या बरोबर भक्तिसुखाचें जेवण जेवून ढेकर देत समाधानवृत्तीनें संसार चालवून असे. ती शरिरानें संसाराचा गाडा ओढी खरा, पण तें अवश्य कर्तव्य करीत असतांनाहि त्यांतच गुरफटून न राहतां दृढ विश्वास धरून ती मनानें हरिभक्ति करी; व आपल्या इतर आया-बहिणींनाहि हाच उपदेश करी.

माझें माझें म्हणुनि । गुंतले हांवभरी । वायां या संसारीं । मृगजळीं ॥
आपुली आपण । करा आठवण । ससारबंधन । तोडा वेगीं ॥
नाम निज नौका । विठ्ठल हें तारूं । भवाचा सागरू । उतरिल ॥
हाचि विश्वास । धरावा अंतरीं । म्हणतसे महारी । चोखयाची ॥

चोखामेळाहि सर्वांना अशीच द्वंडी पिटतो—

---

१. आजि दिवस धन्य सोनियाचा । जिवलग विठोबाचा भेटलासे ॥
तेणें सुख समाधान जाहली विश्रांति । दुजें नाठवे चित्तीं कांहीं एक ॥
( चोखोबा )

टाळी वाजवावी । गुडी उभारावी । वाटही चालावी । पंढरीची ॥
पंढरीचा हाट । कैवल्याची पेठ । मिळाले संतुष्ट । वारकरि ॥
पताकांचे भार । मिळाले अपार । गर्जे भीमातीर । जयजयकारें ॥
खट नट यावें । शुद्ध होऊनिया जावें । दवंडी पिटी भावें । चोखामेळा ॥

चोखामेळा, त्याची बायको व त्याच्या कुटुंबांतील इतर मंडळी हीं सर्व अभंगरचना करीत. चोख्याचें 'विवेकदर्पण' म्हणून एक प्रकरण उपलब्ध आहे. चोखोबाच्या बायकोनें कृष्णचरित्रावर कांहीं कथा गाइल्या असाव्या. या दोघांचीहि वाणी रसाळ आहे. नामदेवाच्या व जनाबाईच्या अभंगांप्रमाणेंच यांच्या अभंगांतहि साधा प्रेमरस भरलेला दिसतो.

पुढें ठेवियलें पान, वाढी कुटुंबी भोजन ॥
तुम्हां योग्य नाही देवा, गोड करोनिया घेवा ।
द्रौपदीच्या पाना भूललेती नारायणा ॥
येथें नाहीं ऐसी परी । बोले चोखयाची नारी ॥

हा अभंग तिच्या साध्या व रसाळ वाणीची साक्ष कोणासहि पटवील.

संसारांत राहूनहि चोखामेळा सारा वेळ भजन करी व हरिनामाचा जयघोष चालवी. एके वेळीं मंगळवेढ्याच्या गांवकुसाचे कामावर हा काम करीत असतां तें कुसूं एकदम कडाडलें व कोसळून पडलें. त्याच्या खालीं सांपडून चोखामेळा हा शके १२६०-मध्यें वैशाख वद्य पंचमीस मृत्यु पावला[1]. येथून संतमंडळीनें त्याच्या अस्थि काढून पंढरीस नेल्या; व जेथें त्याचें मन आनंद पावून भक्तिरसांत मग्न होई अशा ठिकाणीं त्या पुरून ठेवल्या. हल्लीं याची समाधि पंढरीस नामदेवाच्या पायरीसमोर आपल्या दृष्टीस पडते.

---

१. मंगलवेढ्या भोंवतें कुसूं घालावया । महारांसी न्यावया दूत आले ॥
महारां समागमें चोखामेळा गेला । काम तें लागला करावया ॥
सर्वकाळ वाचे विठ्ठल नाम छंद । आठवी गोविंद वेळोवेळां ॥
चार महिने याचि रितीनें लोटले । कुसूं कडाडलें अकस्मात ॥
शालिवाहन शके बाराशतें साठ । बहुधान्य स्पष्ट संवत्सर ॥
वैशाख वद्य पंचमी दिवस सुदीन । शनिवारी प्रयाण करी चोखा ॥

चोखामेळ्यानंतर थोड्याच दिवसांत त्याची बायको व त्याचा मेहुणा बंका हीं दोघेंहि मृत्यु पावलीं, असें सांगतात. या कुटुंबाच्या अभंगांतील पुष्कळ अभंग गोड आहेत. यांतून बंकानें आपली गुरुपरंपरा ज्यांत दिली आहे तो अभंग देतों.

आदिनाथ गुरू सकळ सिद्धांचा । मच्छींद्र तयाचा मुख्य शिष्य ॥
मच्छींद्रानें बोध गोरक्षासी केला । गोरक्ष वळला गहिनी प्रती ॥
गहिनी प्रसादें निवृत्ती दातार । ज्ञानदेवा सार चोजविलें ॥
ज्ञानियाचा राजा ज्ञानेश्वर माउली । खेचरा वोळली कृपासिंधू ॥
ज्ञानदेवा चरणीं खेचर शरण । नामदेवा पूर्ण कृपा केली ॥
नामदेवें हात चोखयाचे शिरीं । विठ्ठल तीं अक्षरीं उपदेशिलें ॥
बंका म्हणे माझी चोखा गुरू माउली । तियेंचे पाउलीं लोटांगण ॥

पंढरीच्या संतमंडळीच्या या गुरुपरंपरा पाहिल्या, त्यांच्यांतला प्रेमळ भाऊपणा मनांत आणिला, व त्यांच्या निस्सीम भक्तीचा विचार केला म्हणजे यांच्याविषयीं आणि यांचा आदिगुरु जो ज्ञानेश्वर त्याच्याविषयीं मन आदरानें भरून जातें. ज्ञानेश्वराच्या उपदेशानें अणि पढवणीनें भक्तिमार्गाला नवें वळण लागलें; व त्यानें विठ्ठलभक्तीचा महिमा अपार वाढविला. भक्तिरहस्याच्या ज्ञानेश्वरीनिरूपणांचे तिळगूळ खाल्यावर हे सर्व संत गोडगोड बोलूं लागले; त्यांच्या वाङ्मोहिनीनें वाढलेलें अमृत ख्याल्यानंतर या सर्व संतांच्या मनाला प्रेमपाझर फुटले. जातीजातींचा भेदभाव आणि मत्सर, वगैरे मळ पार धुऊन जाऊन तें सत्त्वसमुद्रांत डुंबूं लागलें. जात कोणतीहि असो, विष्णुदास म्हटला म्हणजे सर्वजण त्याच्या पायांवर डोकें ठेवितात व मोठ्या प्रेमानें कडकडून आलिंगन देतात. आपण सर्वजण एकाच देवाचीं केलीं अशीं लेकरें आहोंत, हें ते नीट जाणतात; व याच भावनेला साजतील अशा कृतिहि ते करितात.

काठीच्या एका टोकाला ब्राह्मणाची श्रेष्ठ संस्कृति व दुसऱ्या टोकाला

---

१. ज्ञानेश्वराचे ग्रंथ सच्चिदानंदबावा लिही व चांगदेवाचे अभंग श्यामा कासार लिही.

श्वपचांची संस्कृति आहे किंवा जिन्याचे एका पायरीवर ब्राह्मण बसला आहे व दुसऱ्या कडेला पायरीवर अतिशूद्र आहे, अशा स्थितींतून या दोघांनाहि एका ठिकाणावर आणून सोडावें, हा ज्ञानेश्वरी-पंथांतल्या भागवतधर्माचा उदात्त हेतु आहे. पण हा साधितांना ब्राह्मणाच्या जागेवरून त्याला ओढून, ब्राह्मणानें संपादिलेल्या श्रेष्ठ संस्कृतीचा नाश करून किंवा ती कुसकरून फेकून देऊन, त्याला ढकलून अतिशूद्राच्या जागीं त्या पायरीवर नेऊन टाकावें, असला समाजसंस्कृतिनाशाचा मार्ग स्वीकारावयाचा नाहीं; तर श्रेष्ठ संस्कृतीचें ध्येय व उदाहरण कायम ठेवून तिची जोपासना करावयाची, व शूद्रातिशूद्र, अनार्य, श्वपच, हिंसक वगैरे मंडळींना (त्यांना झेपेल असा खुराक देऊन) हळूहळू बोट धरून त्यांच्याकडून श्रेष्ठ संस्कृतीचीं पाउलें टाकवीत ब्राह्मणाच्या पायरीवर आणून सोडावयाचें, हाच या पंथाचा मुख्य व इष्ट हेतु आहे. एकाच्या मनांतला अहंभाव व दुसऱ्याच्या मनांतला कमीपणा या दोहोंचाहि ठाव पुसून टाकावयाचा, हें यांतलें इंगित आहे. यांत द्वेषाला मुळींच जागा नाहीं. येथें सर्वभर प्रेम आहे; बंधुभाव आहे; सात्त्विकपणा आहे; चातुर्वर्ण्यांत निरनिराळ्या पेठा आहेत आणि या सर्वांच्या मध्यभागांत चौहाट्यावर कैवल्याचा बाजार भरला आहे. या बाजारांत सर्व पेठांच्या रस्त्यांनीं येतां येतें व मोक्षाचें सोनें लुटतां येतें. येथें सदासर्वकाळ दसराच आहे. वाटेल त्यानें यावें, मनसोक्त सोनें लुटावें; आणि त्या सोन्याची प्रेमानें देवघेव करावी व सुखासमाधानानें आपापल्या पेठेंत आपापल्या घरोघर परत जावें.

ही झाली वारकरीपंथ ऊर्फ विठ्ठलपंथ याची कथा. या वेळीं इतरहि पंथ महाराष्ट्रांत डोकावलेले होतेच. शके १०४० ते शके ११२०-पर्यंत हयात असलेले मध्वाचार्य हे सर्वभर अद्वैतमताचें खंडन करून द्वैतमत-स्थापना करीत होते. यांच्या द्वैतमताची छाया महाराष्ट्रांतहि पडली होती; व कर्नाटक आणि महाराष्ट्र यांच्या सीमेवर यांच्या मताचे महाराष्ट्रग्रंथहि झाले. जंगमांचा प्रसारहि या काळचाच दिसतो. शके १२००-पासून

शके १६०० - पर्यंत जंगमांचे यत्न इकडे सडकून झाले व पुढें कृष्णाप्पा, जयरामस्वामी वगैरेंनीं हा तंटा मिटवून जंगमांना आपल्या पोतडींत घालीपर्यंत यांचेहि लहानसहान ग्रंथ इकडे होत होते. या पंथाच्या प्रसाराची निशाणी अजूनहि जुन्या डोंगरांतील शिवालयांचे पुजारी जंगम आहेत, या बाबींत दिसून येते.

गाणपत्यांच्या ग्रंथांचीहि हल्लीं अशीच अनास्था आहे. ते अजून अज्ञातवासांत आहेत. 'गणेशवरेण्यसंवाद', 'गणपतिस्तोत्रें' वगैरे-सारखीं प्रकरणें मात्र अधून-मधून आढळतात. पण या सर्व पंथांपेक्षां मागें सांगितलेल्या 'महानुभाव'-पंथाचें या काळचें वाङ्मय उपलब्ध होऊं लागलें आहे. त्यांतील या तेराव्या शतकांतील कांहीं ग्रंथ-कारांकडे आतां आपण वळूं. पूर्वी नागदेवाचार्यांचा थोडासा उल्लेख आलेला आहेच.

हा **नागदेवाचार्य** चक्रधराचा आवडता शिष्य होता; व हा थोर आणि विद्वान् पंडित होता. या नागदेवाला एक पुत्र होता. त्याचें नांव **महेश्वर पंडित** या महेश्वर पंडितानें कांहीं मराठी रचना केलेली उपलब्ध आहे. याचीं 'निर्वेदस्तोत्र', 'संकटस्तोत्र' वगैरे स्तोत्रें महानुभाव म्हणतात; पण याचा विशेष प्रसिद्ध असा ग्रंथ 'ऋद्धिपूरवर्णन' हा होय. याचे आठ प्रसंग असून सुमारें सव्वा-आठशें ओव्या आहेत. याचा रचनाकाल १२२४ असा दिलेला आढळतो. वर्णन तत्कालीन पद्धती-प्रमाणें धार्मिक भावनेनें लिहिलेलें आहे. याच सुमारास मुरारीमल ऊर्फ यक्षदेव ऊर्फ निवृत्तदेव हा कवि होऊन गेला, असें म्हणतात. यानें 'यक्षदेवी' नांवाची एक गीताटीका आपल्या गुरूच्या आज्ञेवरून मराठी भाषेंत लिहिली आहे. हींत हा म्हणतो, नामदेवें गौरवें आज्ञापिलें कीं—

"माझेया महात्मेया निवृत्ता । गिर्वाण नुमटेल गा बोधिता । म्हौणि किजे महाराष्ट्रगीता । आज्ञा निरूपें ॥ गुरु आज्ञा प्रसाद शिरीं । पूज्य बुद्धी नमस्कारा । गीता बानिली वागेश्वरी । महाराष्ट्र भाषें ॥

या टीकेचा काळ शके १२२४ असा दिलेला आढळतो. याच यक्षदेवाच्या नांवावर आणखी एक 'श्रीमद्भगवद्गीताप्रकाशआर्या' नांवाचा ग्रंथ विकला जातो. ही टीका नांवाप्रमाणें आर्यावृत्तांत आहे; व हिच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं यक्षदेवाचें नांवहि आहे. हिच्या शेवटल्या अध्यायांतील शेवटल्या आर्या देतों.

राया पुण्य सुखद हा अद्भुत संवाद कृष्ण पार्थाचा ।
देहीं रोमें उठतीं स्मरणाठवती (थंवती ?) पुनः पुन्हा वाचां ॥
विश्वरूप अद्भुत प्रभुचें राया स्मरणेंचि हर्ष मेंदाटे ।
देहीं रोम पुनः पुन्हां, अति विस्मय सौख्य फार कोंदाटे ॥
योगेश्वर प्रभु जेथें पार्थ धनुर्धर वीर हा जिकडे ।
मन्मति लक्षमि विजयो निश्चल नीति संपदा तिकडे ॥
इति श्री भगवद्गीता उपनिषदुसार वेद ब्रह्ममय ।
संन्यास मोक्षवादू अष्टदशोध्याय यक्ष आम्नाय ॥

या मोरोपंती थाटाच्या आर्या वाचून पाहिल्या म्हणजे हा यक्षदेव १२२४-मध्यें विद्यमान असेल, असें वाटत नाहीं. कदाचित् यक्षदेव नांवाचे दोन भिन्न कवि अगदीं भिन्न काळीं होऊन गेले असावे व पुढें दोघांचे ग्रंथ एकाच्याच नांवावर विकले जात असावे.

गीताटीकाकारांमध्यें **पंडित विश्वनाथ** (बाळापूरकर) या नांवाचा एक ग्रंथकार या काळांत होऊन गेला. यानें पैठण येथील कमलाकर नांवाच्या सत्पुरुषाचा उपदेश गृहस्थाश्रमांत असतांनाच घेतला होता. हा लाडकामराज नांवाच्या एका श्रीमान् व्यापाऱ्याकडे कोशाध्यक्ष होता. लाडकामराजानें बेदरप्रांत खंडणीनें घेऊन त्याची व्यवस्था याजकडे सांगितली होती. ती सर्व व्यवस्था या विश्वनाथानें फार मेहनतीनें व इमानें-इतबारें केली. कांहीं दिवसांनीं विश्वनाथ हा कामराजाला चार बुद्धिवादाच्या गोष्टी सांगून बोध शिकवूं लागला. यामुळें कामराजास हें मोतीं नाकापेक्षां जड वाटूं लागलें; व पुढें तर ही तेढ इतकी वाढली कीं, कामराजानें विश्वनाथ पंडितास बंदींत टाकिलें. नोकरानें धन्यास हिताच्या गोष्टी

सुचवाव्या, त्याच्या बऱ्यास जपावें, पण आपली पायरी विसरूं नये, व सारा वेळ पांडित्याचें प्रदर्शन करूं नये हा साधा व्यवहार विद्वान् नोकर पुष्कळ वेळां विसरतात आणि मग नसते प्रसंग येतात. हीच गोष्ट विश्वनाथ पंडिताची झाली व कारागृहवास त्याच्या कपाळीं आला. या वेळीं कामराजाच्या मुक्ततेबद्दल अनेक गृहस्थांनीं अनेक तऱ्हेचे यत्न केले. शेवटीं कामराजाच्या स्त्रीनेंहि मध्यस्थी करून पंडिताची मुक्तता करण्याचा यत्न करून पाहिला; पण तें कांहींच जमेना. तेव्हां तिनें ही गोष्ट पैठण येथें कमलाकरास कळविली. ती ऐकून कमलाकरानें कामराजाचा गुरुबंधु शिवव्यास म्हणून होता त्यास विनंती करून विश्वनाथाची सुटका करविण्यासाठीं कामराजाकडे पाठविलें. आपला गुरुबंधु शिवव्यास हा आला, असें पाहून कामराजानें त्याचा चांगला आदरसत्कार केला; व त्यास आपल्या येथेंच आग्रहानें भोजनास राहवून घेतलें. भोजनसमयीं शिवव्यास प्रारंभ करीना. त्यानें हातांत घास घेतला; पण तो तो तोंडांत घालीना. त्या वेळेस कामराजानें त्यास म्हटलें कीं, "आपण असें खिन्न होऊन बसूं नये. माझी चूक झाली असेल तर क्षमा करावी; पण अन्नग्रहण करावें. कांहीं आज्ञा करणें असेल तर तीहि करावी. हा मी आपला दास उभा आहें". शिवव्यासानें हें ऐकून आपलें म्हणणें मान्य करण्याविषयीं कामराजाकडून तीन वेळ वचन घेऊन मग त्यास म्हटलें, "तुम्ही मी मागेन तें मला देणार म्हणतां, तर आज विश्वनाथ पंडिताच्या पंक्तीचा लाभ मला द्यावा." हें ऐकतांच कामराजानें पंडिताची मुक्तता करून त्यास भोजनास बोलावून आणिलें. भोजन झाल्यावर शिवव्यासाच्या इच्छेनुरूप विश्वनाथ पंडिताचा गौरव करून त्यास रजा दिली. कामराजानें विश्वनाथास याप्रमाणें ज्या दिवशीं सोडून दिलें, त्याच दिवशीं विश्वनाथानें गृहस्थाश्रम आणि संसार या दोहींवर पाणी सोडलें; शिवव्यासाजवळून मंत्रोपदेश घेऊन संन्यासदीक्षा घेतली; व मग तो पैठणास कमळाकराकडे[1] गेला. यापुढें त्यानें आपला काळ

---

१. कमलाकराच्या आरत्या, पदें वगैरे बरीच रचना आहे.

परमेश्वराच्या चिंतनांत व संकीर्तनांत घालविला. यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. 'ज्ञानचंद्रिका' या नांवाचा याचा एक गद्यग्रंथ आहे; त्याप्रमाणेंच 'ज्ञानप्रबोध' नांवाची गीतेंतील श्लोकांवर एक ओवीबद्ध टीका आहे. या टीकेंत अनेक गोड व्याख्यानें आहेत. त्यांतून 'अमानित्व' या शब्दावरचें याचें व्याख्यान नमुन्यादाखल देतों —

अमानित्व - तो केलिया वरी त्याग । बाणे देहीं सन्यास योग । तेणे सानुकूल जग । महत्तत्त्वें मानी ।। ऐसा सन्मान्यतेचें सुख पडे । तेणें विषोचि सेविले घडे । या लागीं चिन्हालागीं लपौनि दडे । दीनत्वा माजी ।। मग विषयमूळ मान्यता । तेथेंहि विरमता । भरोनि भावी चिंता । अमानत्वें ।। तों मानाचेनि भारें दडपे । पूजेतें भिऊनि कांपे । पुरस्करलिया वासिपें । वर्मे जेंवी ।। रुपकीर्तीचेनि नांवें । वोसावे श्रवणासवें । कोमाउनी जाय गौरवें । जीवें आंगे ।। जन अव्हेरांची करी आस । पाहे अवज्ञे ( श्ये ? ) येवूती वास । धिक्करणयाची बहुवस । चाड जेवीं ।। भणंग बुद्धी बोभाइले । ते वेळी ऐसे होते जाले । भणे अजि येणें संपादिलें । परम सुख ।। भणौनि रंकवृत्तीचिये खोपे । जो महिमाभेणें लपे । तें अमानित्व आरोपे । तेया अंगीं ।। आतां मान्यता बीजाचा कोंभू । तें निपटोनि मोडे दंभू । उपाधी त्यागारंभू । मांडीतसाता ।। अवाच्यतेचा कूपीं । अभ्यासली सामग्री लोपी । आथिले गूण निक्षेपी । अकर्तेपणा माजी ।। जडत्वाचीं आंग भूषणें ।

---

१. जैसी विऊनि अविद्यमान माये । ते तितुकेनी उवराई होये । मग विन्हळी वाढवी धाये । तोंडेचेनि घांसे ।। तैसे मुनि कमळाकरू । लावोनि गेला बोधांकुरू । तो पाळिला शिवराजें उपचरू । करौनियां ।।

असें विश्वनाथ आपल्या ग्रंथांत लिहितो. 'ज्ञानप्रबोध'चे शेवटीं हा पुन्हां म्हणतो कीं—

" आतां जे कां मज उपयोग । जेयां पासौनि दैव सभाग्य । ते नमस्कारूं जाले प्राप्ति योग्य । शिव कमलाकरू ।। तेयां उभयाचेनि वरद हस्तें । माझें जन्म सुफळवसते । म्हौणौनि विशेष भावें समस्तें । तेयां नमन पुन्हां पुन्हां ।। हे माझी सकौतुक मातू । प्रीति पावो श्री अनंतू । श्रोते मंगल पावितु । भणे विश्वनाथु ।। शके बाराशें त्रेपन्न ( १२५३ ) भीतरीं । प्रजापतीनाम संवछरी । माघे पंचमी प्रथम प्रहरीं । तें ग्रथन पूर्ण झालें ।।

वेडिवंतेची मिरवणें । उन्मत्तवत् बोलणें । विचरें पिशाच्यवत ॥ येरव्हीं तेयांचेनी पाडे । सिहाणा कुशल न जोडे । चातुर्य असौनि फुडे । क्रीडे बालवत ॥

या पंडित विश्वनाथाचे प्रारंभींचे गुरु कमळाकर, व नंतर पुढें दीक्षा-गुरु शिवव्यास हे होते. या दोन्ही गुरूंचे मार्फत विश्वनाथाची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें सिद्ध होते.




पंडित विश्वनाथाप्रमाणेंच **नारायण पंडित** व **राघवोपाध्ये** हे दोघे ग्रंथकार त्याच वेळीं होऊन गेले. यांपैकीं महानुभावपंथांत पहिल्यास 'बाहाळे नारो व्यास' व दुसऱ्यास 'रवळो व्यास' असें म्हणतात. पहिल्याच्या आरत्या पदें वगैरे असून 'ऋद्धिपूरवर्णन' या नांवाचा एक ग्रंथ आहे. दुसऱ्याचा म्हणजे राघवोपाध्याचाहि एक 'सह्याद्रिवर्णन' नांवाचा ग्रंथ आहे. हे स्थलवर्णनात्मक ग्रंथ केवळ भक्तिभावानें लिहिलेले असून त्यांत त्या त्या स्थळांचें धार्मिक माहात्म्य वर्णन केलेलें आहे. 'सह्याद्रि-वर्णनां'त श्रीदत्तात्रेयाचें लीलाचरित्र आलें आहे. दत्तात्रेयाचें स्वरूप-

वर्णन खरोखरच मनोरम साधलें आहे. राघव म्हणतो —

पातां दृष्टी खुपे आंगीं । मन स्पौनि न निघे वेगीं ।
असें मृदुत्व नाहीं जगीं । आन ठायीं ॥...
तिये चरणु रंगचोळे । रातले शक्तिचक्र मैळें ।
ते उपमेसि बरदळें । तिये कांई होती ! ॥
चरण तळे मवाळें कैसीं । दृष्टी खुपैल भणोनि मानसीं ।
योगिये चिंतिती अहर्निशीं । थोर यत्नें ॥
हृदय कमळांचा सेजेवरी । चित्ताचा अरुवारीं ।
ठेवोनि तेया आसनावरी । चरणु सेविताती ॥
अभावाचा उबारा होईल तरी । आनंद जलाचियां तुषारीं ।
नयनांचा चिपोळि चेन्हीं । सिंपिती देखा ॥
कंपादि भावांचा विजनुवारा । जाणवितीं निरंतरां ।
ते श्रीमूर्ति सकुमारा । कैसे बोलूं पा ॥

असा हा ग्रंथ सर्वभर याच सुरांत व अशाच भाषेंत ग्रंथकारानें लिहिला आहे. तो लिहितांना ग्रंथकाराचें मन भक्तिभावानें किती भरून गेलें असेल व त्याची लेखणी कशी वाहिली असेल, याची कल्पना ग्रंथांतल्या शब्दांवरून बांधण्यास हरकत नाहीं. या ग्रंथांत ठिकठिकाणीं हिरांबा या विदुषीचें नांव घातलें आहे; व हा ग्रंथ किंवा हें प्रकरण तिनें रचिलें असें सुचविलें आहे[1]. पण वास्तविक प्रकार असा आहे कीं, हिरांबा ही या राघवोपाध्याची गुरु; आणि गुरुभक्तीनें पूर्णपणें प्रेरित होऊन ग्रंथकारानें या ग्रंथाचें कर्तृत्व तिला दिलें आहे. हिरांबा आणि तिची गुरुमाउली कमला नांवाच्या एका विद्वान् बाईची उपदिष्ट शिष्यीण होती, व या दोघीहि गुरुशिष्यिणी फार विद्वान् व उत्तम लेखक होत्या. हिरांबानें किंवा हिराबाईनें अनेक शिष्यांना उपदेश दिला होता; पण त्या सर्वांत तिचें मन या राघवोपाध्यावर विशेष होतें; व याचीहि तिच्या

---

१. जेथ पराचकितु जाली । तेथ महाराष्ट्रियां काइसी बोली
परी माझी वाचा वालमैली । हिरांबिका म्हणे ॥ ओ०८ ॥

ठिकाणीं पूर्ण निष्ठा होती. या दृढ निष्ठेमुळेंच यानें ही रचना तिच्या नांवानें केली आहे. या प्रकरणाच्या ७२९ ओव्या असून त्याचा रचनाकाल शके १२५४ असा अनेक लेखकांनीं दिला आहे[1].

या विश्वनाथ पंडिताला जशी गीतेची आवड होती तशीच आवड **हयग्रीवाचार्य** पंडितालाहि होती. तो परम कृष्णभक्त होता. यालाच 'हिरण्यगर्भ पंडित' असें नांव होतें. या हिरण्यगर्भ पंडिताचा ऊर्फ हयग्रीवाचार्यांचा जन्म श्री गोदावरीचे कांठीं पांचाळेश्वराजवळ राक्षसभुवन गांवीं झाला. हा मूळ ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. राक्षसभुवन गांवीं राहणाऱ्या माधवभटाची स्त्री कावेरीबाई इच्या पोटीं याचा जन्म शके ११९७-मध्यें माघमासीं झाला. माधवभट स्वतः चांगला विद्वान् असल्यामुळें त्यानें आपल्या मुलाचा-हिरण्यगर्भाचा-सर्व विद्याभ्यास आपल्याजवळच करवून घेतला. पुढें हा मुलगा चांगला विद्वान्, बहुश्रुत व हुशार निपजला. याच्या मनाची प्रवृत्तिहि कृष्णभक्तीकडे विशेष होती. हा श्री भागवताच्या दशमस्कंधाचा पाठ केल्याखेरीज अन्नग्रहण करीत नसे. कोणे एके वेळीं आपण काशीयात्रेस जावें, असें याच्या मनांत आलें; आणि हा घर सोडून निघाला. वाटेंत कवीश्वराचार्यांची व याची गांठ पडली. दोघांचा वाद झाला. महानुभावचरित्रकार म्हणतात कीं, 'त्या वादांत कवीश्वराचार्यांचा जय झाला; व त्याचें शिष्यत्व हिरण्यगर्भानें पतकरिलें.' कवीश्वराचार्यांचा जय झाला खरा, व शिष्यत्वहि हिरण्यगर्भानें पतकरिलें खरें; पण त्याच्या निरूपणानें हिरण्यगर्भ पंडिताच्या मनाला समाधान झालें नाहीं. म्हणून हिरण्यगर्भ पुनः श्रीकाशीक्षेत्रीं जाण्यास निघाला. तेव्हां कवीश्वराचार्यानें त्यास सांगितलें कीं, 'तूं जाणार तर सुखें जा. पण जातांना पार्श्वनाथाचे शिवपुरास आमचे गुरुबंधु अनंतदेव म्हणून आहेत,

---

**१. ग्रंथसंख्या — नंदाक्षेतुरंगगणना । वोवियें आला ग्रंथ पूर्णा । स्मरोनि श्रीदत्तात्रेय चरणां । वाक्पुष्प चर्चिलें.**

**२ रचनाकाल — वेदबाणपक्षचंद्रशका । अंगिरा माधव मासुनिका । शुक्ल बाणेसि हिरांबिका । पूर्ण केलें ।**

त्यांची भेट घे, व मग पुढें जा'. हें कवीश्वराचार्याचें म्हणणें हिरण्यगर्भानें कबूल केलें; व शिवपुरास जाऊन तो अनंतदेवास भेटला. अनंतदेवासंनिध असतां त्याचें व्याख्यान व चर्चा ऐकून हिरण्यगर्भ फार समाधान पावला; व कांहीं दिवस तेथेंच राहिला. पुढें त्याचा सहवास सोडून काशीस जावें, हेंहि त्यास वाटेनासें झालें; व तो अनंतदेवाजवळ मंत्रोपदेश मागूं लागला. अनंतदेवानें तसें करण्याचें मान्य केलें नाहीं; व त्यास त्यानें ज्याचें प्रथम शिष्यत्व पत्करिलें होतें त्या कवीश्वराचार्याकडे जाण्यास सांगितलें. तेव्हां तो परत कवीश्वराचार्याकडे गेला; पण कवीश्वराचार्यानें त्यास म्हटलें, "तुम्ही तेयापाशीच जावें, कां पां परमेश्वरें जेयाचेंनि मुखें तुम्हां ज्ञान उमजविलें: आतां तेचि तुमचे गुरु." मग पुन्हां परत फिरून तो अनंतभटाकडे गेला; व झालेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन करून त्यानें अनंतदेवापासून मंत्रोपदेश घेतला. मंत्रोपदेशानंतर त्याचें नांव 'हयग्रीवाचार्य' असें ठेविलें. या हिरण्यगर्भाचें ऊर्फ हयग्रीवाचार्याचें 'गद्यराजस्तोत्र' हें प्रकरण फार नांवाजलें जातें. 'गद्यराजस्तोत्र' हें प्रकरण श्लोकबद्ध असून यांत कृष्णकथा वर्णिल्या आहेत; याचे २८० श्लोक आहेत; पण हे श्लोक संस्कृताप्रमाणें निर्यमक आहेत; तरी यांत गोडी चांगली आली आहे.

महानुभावपंथांत या वेळीं आणखीहि पुष्कळ ग्रंथकार होऊन गेले, व त्यांचे ग्रंथहि उपलब्ध आहेत. त्यांचा विस्तार इतका आहे कीं, त्यांचा योग्य परामर्श घेण्यास एक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. तेव्हां तूर्त त्या खटाटोपांत न पडतां साधारणपणें त्या पंथांतील वाङ्मयाची ओझरती ओळख करून घेण्यापलीकडे कांहीं करितां येत नाहीं. हें या पंथांतील वाङ्मय यापूर्वी अगदींच अज्ञात असल्यामुळें त्याचे ग्रंथांतून जरा जास्त उतारे देणें अवश्य आहे. यापुढेंहि त्यांची ओळख पटण्याकरितां व त्यांच्या परिश्रमाचा अंदाज आपणांस बांधितां यावा याकरितां जरा जास्त जागा अडली तरी ती अडवून त्यांतून उतारे देण्याचें योजिलें आहे. असें करण्यांत एक हेतु हा कीं, आमचें संशोधन अद्यापि किती कोतें

आहे, याची कल्पना होऊन नवीन संशोधकांस या व इतर पथांतील अज्ञात महाराष्ट्र-वाङ्मय शोधून काढण्याची इच्छा उत्पन्न व्हावी. गेलीं सहाशें वर्षें या महाराष्ट्रसारस्वताचा वृक्ष कसा फोफावला आहे, त्याच्या शाखा किती पसरल्या आहेत, त्याचीं पाळेंमुळें किती खोल गेलीं आहेत याचा आस्थेवाईक परिश्रमानें शोध लावणें, व त्यांचा परिचय महाराष्ट्रास करून देणें हें आपल्या पिढीचें एक अवश्य कर्तव्य आहे. आतांपर्यंत आपण तेराव्या शतकांत येऊन पडलों. आतां यापुढील म्हणजे चौदाव्या शतकांत या आपल्या सारस्वतवृक्षाची काय हालहवाल होती, तें पाहूं.



# चौदावें शतक

कोणत्याहि वाहत्या नदीचे कांठीं तिच्या ओघाकडे पाहत आपण उभे राहिलों तर साहजिकपणें आपल्या मनांत असा विचार येतो कीं, आज वर्षांनुवर्षें, पिढ्यानुपिढ्या आपण ही नदी अशी येथेंच आहे, असें म्हणत आलों; पण हिचें पाणी सारखें वाहत आहे. जें पाणी गेल्या सालीं होतें तें यंदा नाहीं. इतकेंच नव्हे, तर जें काल होतें तेंहि आज नाहीं. किंबहुना, एका क्षणापूर्वी जे जलबिंदु आपल्यापुढें होते, ते आपल्या डोळ्यां देखत वाहून निघून गेले आणि जे एकदा जातात, ते पुन्हां कधींहि परत येत नाहींत. म्हणजे नदीचे घटक जे जलबिंदु ते सारखे बदलत राहिले आहेत, तरीदेखील ही नदी बदलली असें आपण केव्हांहि मानीत नाहीं. नदीच्या कांठाकांठानें जरा पुढें गेलें तर असाहि चमत्कार नजरेस पडतो कीं, दुसरी एखादी नदी किंवा एखादा गढूळ पाण्याचा ओढा या नदीला येऊन मिळून जातो. तें मिळणारें नवें पाणी, ते बारके जलबिंदु एकदा या नदींत येऊन पडले म्हणजे हिच्याच प्रवाहाबरोबर तेहि वाहूं लागतात; व केव्हां-केव्हां तर या मूळ नदीच्या पाण्याचा रंगहि त्यांच्या मिश्रणानें साफ बदलून जातो, तरीदेखील आपण त्या ओघाला जुन्या नदीच्याच नांवानें संबोधितों व ओळखतों. आपली नदी बदलली, असें आपण म्हणत नाहीं व आपणांस तसें केव्हांहि वाटत नाहीं. हीच गोष्ट भाषातरंगिणीची आहे. तींतील शब्द नेहमीं बदलत जातात, पालटत जातात; जुने शब्द नाहींतसे होतात; नवे नवे प्रचारांत येतात. शब्दांचीं रूपेंहि बदलतात. तरी आपण भाषा बदलली, असें समजत नाहीं. एखाद्या परकी भाषेच्या संगतीनें व सांनिध्यानें परके शब्द हींत येतात व केव्हां-केव्हां तर ते इतके येतात कीं, मूळ भाषेचें जुनें रूप पार पालटून जातें. तरी आपण मूळ भाषा कायमच आहे, असें समजतों. शब्दांचीं रूपें,

क्रियापदांचीं रूपें, नामांचीं रूपें, हीं सर्व पालटलीं तरीहि आपण भाषा कायमच आहे, असें मानितों. आणि हाच प्रकार आपल्या मराठी भाषेच्या संबंधांत घडलेला आहे.

चौदावें शतक हें महाराष्ट्रांत विशेष घडामोडीचें झालें. साधारणपणें ज्या कारणांनीं नेहमीं फेरबदल होतो त्याखेरीज आणखी अनेक कारणें या शतकांत झालीं व अनेक प्रकार घडून आले. भाषेंतच काय, पण महाराष्ट्रीय लोकांच्या राहणींत, समाजव्यवस्थेंत, ग्रामव्यवस्थेंत, पेहरावांत, कल्पनांत, नेहमींच्या संवयींत, प्रायः अनेक महत्त्वाच्या बाबींत चौदाव्या शतकांत फार उलटापालट होऊन गेली. ही अशी उलटापालट साधारणपणें नेहमींच थोडीफार होत असते; पण या वेळीं कांहीं विशेष कारणामुळें ती विशेषत्वानें घडली; व नेहमींचें संथपणाचें पाऊल जाऊन एकदम मोठा धडाडीचा वेग उत्पन्न झाला आणि प्रचंड फरक पडला. चौदाव्या शतकापूर्वीं बरींच वर्षें महाराष्ट्रीयांना एकच क्रम लाभला होता; व एकेच तऱ्हेच्या राहणीची सवय झाली होती, पण तो सर्व मनू आतां पालटला आणि अगदीं कल्पनातीत असे नवे अनुभव येऊं लागले.

चौदाव्या शतकांत मराठी भाषेचें रूप कसें होतें, याची कल्पना ज्यांवरून बांधितां येईल, असे कांहीं लेख प्रसिद्ध आहेत. शके१३३५-मधील आंबवडे येथील श्रीनागनाथाचे देवालयांतला शिलालेख, शके-१३४७-मधील श्रीखंडेराव देवाच्या संबंधींचा कागद, 'श्रीसकु[1] १०३ वरूष दुर्मतीचा' शिखर शिंगणापूरचा ताम्रपट वगैरे लेखांतील भाषा चौदाव्या शतकांतील गद्य मराठी आहे. तळें घोसाळें येथील श्री. भटांकडला लेख पाहिला असतां या लेखांतील शब्दांत, शब्दांच्या रूपांत, वाक्यप्रयोगांत गेल्या दोनशें वर्षांत पडलेला फरक स्पष्टपणें दिसून येतो. दर दोनशें वर्षांनीं भाषेचें रूप फरक जाणण्याइतकें पालटतें, असें या लेखांवरूनहि दिसतें. भाषेंतील शब्दांत जसा फरक

१. हा शालिवाहन शक नसून दुसऱ्या कोणा राजपुरुषाचा शक आहे.

पडतो तसाच फरक लिपींतहि पडत जातो. पळसदेव, परळ, पाटण वगैरे ठिकाणच्या अकराव्या-बाराव्या शतकांतील शिलालेखांतली अक्षरवटिका व यावर उल्लेखिलेल्या लेखांची अक्षरवटिका या दोहोंत पुष्कळ फरक पडला. पळसदेवाच्या लेखांतील तीन शून्यांची ई, त्रिकोणी ए, तीन उभ्या रेघांचा ण, हीं अक्षरें तर आतां अगदींच मागें पडली. पृष्ठमात्रातर साफच नाहींशी झाली; व असाच इतरहि फेरबदल झाला.

असो. चौदाव्या शतकाचे सुमारास महाराष्ट्रांतील भाषा, रिवाज, राहणी, वगैरेमध्यें एकदम मोठी उलटापालट होण्यास जीं कारणें घडलीं व जी परिस्थिति कारणीभूत झाली, त्यांपैकीं दोन-तीन कारणांचा व बाबींचा प्रामुख्यानें उल्लेख करणें अवश्य आहे. या बाबी म्हटल्या म्हणजे सर्वव्यापी भयंकर दुष्काळ, परकीय सत्तेचा अंमल व समाजसंस्थांचा उच्छेद या होत.

चौदाव्या शतकांत महाराष्ट्रांत एक मोठें अराजक माजून राहिलें होतें. त्या वेळेपर्यंत कधींहि न अनुभविलेलीं अशीं अनेक संकटें आलीं होतीं. स्वकीयांची राजसत्ता उन्मळून गेली होती व परकीयांची राजसत्ता बळावत चालली होती. स्वराज्याबरोबरच स्वधर्म, स्वभाषा, स्वसंस्कृति यांनाहि उतरती कळा प्राप्त झाली व हळूहळू सर्वभर भयानक देखावा दिसूं लागला. स्वतंत्रतेनें आकाशांत संचार करणारा पक्षी कशाहि सुंदर पिंजऱ्यांत कोंडून ठेविला तरी त्याची चपळता नाहींशी होते, तेज फिकें पडतें, रंग मंद-मंद होतो व तो पूर्वींचा भरारीसरसा गगन गांठणारा विहंगम थोडया उंचीवरदेखील उडण्यास असमर्थ होतो. हाच अनुभव परराज्याच्या कचाटींत सांपडलेल्या राष्ट्रासंबंधीं दिसून येतो. याचकरितां उत्तम परकी अंमलापेक्षां हिणकस स्वराज्य बरें, असें राजकारणी लोक म्हणतात; आणि हाच अनुभव जाधवांचें राज्य नाहींसें झाल्यानंतर मुसुलमानी राजच्छत्राखालीं महाराष्ट्रास येऊं लागला. शिवाय संकटें एकदा येऊं लागलीं म्हणजे तीं एका मागोमाग अशीं एकसारखीं येतच रहावीं,

असेंहि झालें. तेराव्या शतकांत स्वराज्याचा नंदादीप विझून गेला; आणि लगेच चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धांतच महाराष्ट्रांत सर्वभर एक मोठा दुष्काळ पडला. हा एकसारखा बारा वर्षें चालू होता. आकाशानें पाऊस पाडण्याचें बंद केलें व जमिनीनें पिकें टाकिलीं. चांगलीं नांदतीं शहरें होतीं तीं उजाड पडलीं; व प्रांतच्या प्रांत ओसाड झाले. महाराष्ट्रांतल्या मोठमोठ्या नद्या होत्या त्यांत आचमनालाहि पाणी राहिलें नाहीं; आणि बावी व विहिरीतर साफच कोरड्या पडल्या. यामुळें वस्ती नाहींशी झाली. हजारों-हजार लोक हातांपायांना सूज येऊन अन्नान्न करून मरून गेले; व थोडेफार राहिले ते प्रांत सोडून निघून गेले. यामुळें महाराष्ट्राचें महारण्य झालें. पुढें पुन्हां जेव्हां पाऊस पडूं लागला, नद्यानाले वाहूं लागले, तेव्हां जमिनींत गवतरान झालें व ही जमीन चारणीच्या उपयोगांत येण्यासारखी झाली. महाराष्ट्राच्या मध्यभागांत दुष्काळ पडला त्या वेळीं तेथील लोक ज्यांना जिकडे वाट फुटली तिकडे गेले. मोंगलाई मुलखाकडचे लोक म्हणजे देवगिरी, जोगाईचें अंबें वगैरे प्रांतांतलीं अनेक कुटुंबें दर्याकिनारीं थोडाफार पाण्याचा ओलावा होता तिकडे जाऊन राहिलीं. मराठे, पाटणकर, वैसास, साठे, मंडलीक, पटवर्धन, काळे, भानू वगैरे आडनांवांचीं कुटुंबें वरघाटीं होतीं[1].

यासंबंधीं पुष्कळ गोष्टी विचारणीय आहेत. कोंकणस्थांपैकीं पुष्कळांची कुलस्वामिनी जोगाईची अंबा आहे. तसेंच व्यवहारांत तसा प्रचार नसतां सोडमुंजींत मामा आपली मुलगी देऊं करून मुलाला फिरवितो, वगैरे बाबी तर विशेष आहेत.

---

१. शके ११७१–मधील कन्हर यादवांचीं व शके ११८१–मधील चालुक्यांचीं वगैरे शासनें पहा. यांत कऱ्हाडे, कोंकणस्थ वगैरे ब्राह्मणांचीं आडनांवें आलीं आहेत. शके ११८१–तील शासनांत वासुदेव प्रभु नांवाच्या ब्राह्मणाला इतर ब्राह्मणांसह जमीन अग्रहार दिली आहे. यावरून 'प्रभू' हें उपनांव ब्राह्मणांत होतें, असें दिसतें. हल्लीं जीं कायस्थप्रभूंचीं उपनांवें आपण ऐकितों त्यांपैकीं दिघे, चित्रे, दोंदे, कर्णिक वगैरे बहुतेक सर्व उपनांवें ब्राह्मणांत असलेलीं दिसतात.

महानुभावांच्या पंथांत यांचे उल्लेख व यांचे ग्रंथ सडकून आढळतात. बाराव्या शतकांतल्या ताम्रपटांत व शासनांतूनहि यांना जमिनी दिल्याचें दाखले आहेत. हे लोक—म्हणजे या उपनांवांचीं कुटुंबें—कोंकणपट्टींत जाऊन तेथें त्यांनीं वसाहत केली, व हीं घाटावरून गेलेलीं कुटुंबें कोंकणस्थ म्हणून नांवाजलीं गेलीं. यांनीं अंगमेहनतीनें समुद्रकांठच्या खाजण जमिनी बांधबंदिस्त करून लागवडीला आणिल्या; व जेथें कांहीं नव्हतें तेथें गांवें आणि शहरें वसविलीं. या त्यांच्या कर्तबगारीमुळें देवानें समुद्र हटवून यांना जमीन करून दिली, असें लोक म्हणूं लागले. ज्यांना कोंकणस्थ म्हणतात त्यांचा कोंकणांतहि बाराव्या-तेराव्या शतकापूर्वीं थांग लागत नाहीं; व घाटावर त्यांच्या उपनांवाचा उल्लेख आढळतो. कऱ्हाडे ब्राह्मणांची वस्तीहि बाराव्या शतकापासूनच कोंकणांत आढळते. कोंकणांत कांहीं कुटुंबें जाऊन राहिलीं त्याप्रमाणेंच कांहीं कुटुंबें कर्नाटकाकडे, कांहीं पंजाबाकडे, कांहीं मथुरेकडे अशीं जाऊन राहिलीं; व इकडचा दुष्काळ सरल्यावर पुन्हां या महाराष्ट्रांत लोकांची आणि गांवांची वस्ती झाली. या वेळीं प्रथम चारण आलेले दिसतात. हे येत व परत जात; पण पुढें शके १४००-चे सुमारास लोक कायमचे येऊन राहूं लागले. महाराष्ट्रांतील पांच-चारशें कुटुंबांच्या वंशावळी पाहतां इकडे सुमारें पांचशें वर्षें अलीकडची हल्लींची वसाहत दिसते. इकडील जोसपण, कुळकर्णपण वगैरे वतनें प्रथम कासारांचीं असावीं. पुढें गोळक वतनदार झाले. नंतर यजुर्वेदी, नंतर देशस्थ व अगदीं शेवटीं शेवटीं कोंकणस्थ, असा क्रम प्रायः आढळतो. तशींच इकडचीं डोंगरांतलीं आणि खोऱ्यांतलीं जुनीं देवळें आहेत त्यांची वृत्ती मूळ जंगमांची आहे, जंगमांनंतर कोळ्यांना वतनें मिळालेलीं दिसतात; प्रथम लोक वसाहतीस येत, ते ‘पाटी’चे असे म्हणवीत; व पहिल्या ‘पाटी’ची दहा-पांच, दहा-पांच कुटुंबें असत. पुण्याची मूळ वस्ती बारा जणांची होती, हें प्रसिद्धच आहे; आणि हाच प्रकार इतरत्र आढळतो.

महाराष्ट्रांतून दुर्गादेवीच्या दुष्काळांत जे लोक महाराष्ट्राच्या

सीमेबाहेरील प्रांतांत गेले, त्यांनीं तेथली बोली उचलली; व ती ते बोलूं लागले. तसेंच दुष्काळानंतर परत आल्यावर या प्रांतांत जिकडून-जिकडून लोक आले तिकडील भाषा, शब्द, वाक्यप्रयोग, प्रचार, लौकिककथा, वगैरेंचा प्रवेश त्यांच्या बरोबर सहजासहजीं झाला. याचा परिणाम असा झाला कीं, मराठी भाषेला पंजाबी, व्रज, तेलगू वगैरे भाषांतले शब्द व लकबी मिळाल्या आणि मराठी भाषेंत अनेक भाषांचें मिश्रण झालें. मुलांचे खेळ, मुलींचे डाव, बायकांचीं गाणीं, लोकांच्या लौकिककथा या निरनिराळ्या प्रांतांतून येऊन इकडे शिरल्या. चेंडूफळीं-तील 'वकट लेंड मुंड' ही वटिका उघड-उघड दक्षिणेंतून आली[1]. 'औडक चौडक मायाड्ड', 'अडगुलें मडगुलें', 'आटक माटक चन्ने चाटक', वगैरे गाणीं कानडी आहेत. बायकांच्या नऊखऊच्या खेळांचा उल्लेख विष्णुवर्धनाच्या बाराव्या शतकांतील शासनांत स्पष्ट आहे. बुद्धि-बळें पंजाबाकडून आलीं; व त्यांतील शब्दांचें व वाक्यप्रयोगांचें मूळहि तिकडेच लागेल. गवयांचीं गाणीं व त्या सुरांत रचिलेलीं पद्यें हीं उत्तर-हिंदुस्थानांतून इकडे आलीं; आणि नाना छंदहि तिकडूनच आले. व्रज भाषेंतून राधाकृष्णांचीं गीतें व अनेक छंद तिकडून आलेल्या लोकांनीं आणले. उत्तरेकडून आलेल्या छंदांपैकीं बरेच छंद व वृत्तें पुढें राहिलीं नाहींत. कांहीं मात्र मराठी भाषेंत कायमचीं शिरलीं. महाराष्ट्र लोकांची—दाक्षिणात्यांची—अनेकभाषाकोविदत्वाबद्दल फार प्राचीन काळापासून प्रसिद्धि आहे व या दुष्काळामुळें पांगल्यानंतर तर महाराष्ट्रीयांना अनेक भाषा सहज परिचयाच्या झाल्या; व त्या ते बोलूं लागले आणि त्यांत ते रचनाहि करूं लागले. या वेळेपासून महाराष्ट्र अनेक भाषाद्वारें आपलें विचारप्रदर्शन करूं लागलें. म्हणजे भाषेच्या दृष्टीनें मराठे लोक अनेकतोंडे झाले. असे या मोठ्या दुष्काळाचे महाराष्ट्राच्या राहणीवर व

---

१. शके १२२१—मधील गोकुळाष्टमीचे दिवशीं दिलेल्या सोनारांच्या भांडणासंबंधींचा फोंडे येथील लेख रा. आपटे यांनीं प्रसिद्ध केला आहे. या लेखाची लिपी हळे कन्नड ( जुनी कानडी ) असून भाषा मराठी आहे.

भाषेवर अनेक तऱ्हेचे इष्टानिष्ट परिणाम झाले. या परिणामांचें योग्य मापन चौदाव्या शतकांतले ग्रंथ नीट संशोधून त्यांची छाननी केल्यावर चांगलें होईल.

याखेरीज दुसराहि एक मोठा आघात या वेळीं महाराष्ट्रावर कोसळला. त्यानें तर हा देश मुळापासून हादरून गेला. या आघाताला तेराव्या शतकांतच प्रारंभ झाला होता; पण त्याचे परिणाम चौदाव्या शतकांत पूर्ण स्वरूपानें दिसूं लागले. तेराव्या शतकापासूनच या देशावर मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या व अनेक राज्यें, संस्थानें व प्रांत मुसुलमानांच्या अमलांत तेव्हांपासून जाण्यास सुरुवात झाली. देवगिरीकर जाधवांच्या गादीला उतरती कळा लागत चालली व तेराव्या शतकाच्या अर्धांतच तें सिंहासन नष्ट झालें. मूळ वृक्ष उपटून पडल्यावर त्याच्या बारीक-सारीक मुळ्या नाहींतशा होण्यास फार वेळ लागला नाहीं. देवगिरीकरांनंतर कांहीं दिवस विजयनगरचें राज्य होतें, पण पुढें तेंहि गेलें; व सौभाग्य जाऊन या देशाच्या कपाळीं वैधव्य आलें. जोपर्यंत देवगिरीकरांची राजवट दणदणत होती, तोवर मराठ्यांच्या कर्तबगारीला तींत अवसर होता. त्यांच्या निशाणाच्या शीतल छत्राची सावली महाराष्ट्राला लाभली होती, तोपर्यंत मराठी भाषा व ग्रंथ यांची वाढ फार झपाट्यानें चालू होती; पण देवगिरीकरांच्या राज्याबरोबर महाराष्ट्राच्या एकंदर चरित्रक्रमाला उतरती कळा लागली; व या सर्व परिस्थितीचा परिणाम भाषेवर आणि ग्रंथकारांवरहि होऊं लागला. असें दिसतें कीं, मुसुलमानांची सत्ता इकडे सुरू झाल्यानंतर त्यांचा धर्म, त्यांची भाषा व त्यांचे रीतरिवाज हे सर्व ते इकडे जबरीनें पसरवूं लागले. आपला धर्म, आपली भाषा, आपले रीतरिवाज ही त्रयी जबरीनें पसरविण्याची मुसुलमानांची पद्धतच दिसते. ते जिकडे गेले तिकडे त्यांनीं दांडगाईच केलेली आढळते. केवळ लीलेसाठीं म्हणून पृथ्वीवरील हजारों ग्रंथांचा त्यांनीं नाश केला आहे. नुसतें जानवें पाहिलें कीं शरीर उभें दुभंगावें; देवालय —मग तें कसेंहि व केवढेंहि असो— जाळून, पाडून फस्त करावें व

त्या ठिकाणीं श्वेतवर्णाची मशीद उभी करावी; परधर्मी लोकांचे हालहाल करून त्यांना त्रास द्यावा व गांवचे गांव बायकांपोरांसुद्धां बाटवून टाकावें, असा ज्यांचा धर्म आणि अशी ज्यांची रीत त्या, एका हातांत कुराण आणि एका हातांत समशेर घेऊन सर्व देश महंमदी करूं पाहणाऱ्या क्रूर लोकांपुढें आमची सात्त्विक मंडळी बरीच मावळली, असें दिसतें. आणि एकंदर व्यवहारांत, लिखाणांत आणि भाषेंत बरीच उलटापालट झाली. राजसत्तेच्या आसपासचा रंग तर साफच बदलूं लागला. राजसत्ता मुसुलमानी असल्यामुळें सरकारदरबारांत फारशी भाषा सुरू झाली व हळूहळू सरकारकामासंबंधीं सर्व कागदपत्र फारशींत राहूं लागले. 'अर्ज'दारांच्या 'फिर्यादी' 'काजी'पुढें जाऊन त्यांचा 'फैसला' किंवा 'इनसाफ' होऊं लागला. अग्रवादी, पश्चिमवादी, व्यवहार वगैरे पूर्वापर धर्मग्रंथांत आढळणाऱ्या संज्ञा नाहींतशा झाल्या व त्यांच्या जागा मुसुलमानी शब्दांनीं घेतल्या. पत्रांबदली 'कागद' आले व त्यावर प्रमाणांकरतां 'गोही' होत असत त्या 'साक्षी' झाल्या. 'मोकदमां'चे 'अधिकारी' झाले आणि त्यांना प्रतिवर्षी मिळणाऱ्या 'वार्षिक वेतना'च्या ऐवजीं 'सालीना मुशाहिरा' मिळण्याचा 'सिलसिला' पडला. लोक स्वतःच्या बापाचें नांव पिते म्हणून न लिहितां 'विन' योजून लिहूं लागले. राजेलोकांच्या सभोंवतालच्या मंडळींततर साफच बदल झाला. राजसभेंत 'बैसणाईत' होते तेथें 'दरबारी' आले. राजाबरोबर स्वारींत 'सवैदळी'[1], 'दांडिवैसे'[2], 'हाडैपी'[3] 'बौरी'[4], 'सार्गोळिये'[5], 'चंवरधरू'[6], 'भांडारी', 'वेचकरू', 'देवहारू'[7] 'दिवटे', 'बडवे' वगैरे सेवक असत ते आतां दिसतनासे झाले. 'झुंजमल', 'अनुभीम', 'राईक', 'पाईक', 'मांडलिक', 'राऊत', 'रजपूत'. (शस्त्रधारी सैनिक किंवा शिपाई) वगैरे पदव्या आणि हुद्दे सैन्यांत ऐकूं न येतां 'जमादार', 'हवालदार', 'शिलेदार', 'सरदार',

---

१. शिपाई. २. पालखीचे भोई. ३. विडेकरी. ४. शागीर्द. ५. पाणिके. ६. चवऱ्या वारणारे. ७. पुजारी.

ह्या पदव्या आतां नव्यानें ऐकूं येऊं लागल्या. राज्यव्यवस्थेंत, जमा-खर्चांत किंवा इतर बाबींत मुसुलमानांनीं अगदीं नवीन कांहीं आणिलें, असें फारसें घडलें नाहीं. याचें कारण असें कीं, इकडील समाज संस्कृतीनें व ज्ञानानें पूर्वींपासूनच मुसुलमानांपेक्षां श्रेष्ठ होता. त्याला शिकण्यासारखें असें मुसुलमानांजवळ कांहींच नवीन नव्हतें. यामुळें इकडे अगदीं नवीन असें कांहीं न आणितां, जें येथें आढळलें त्यासच मुसुलमानांनीं आपला पेहराव चढविला. हेमाद्रि वगैरेंची व्यवस्था आणि पद्धत कायम ठेविली, पण शब्द मात्र जुने मराठी होते त्यांचे ऐवजीं आपले मुसुलमानी घातले. मतलब असा कीं, राज्यकारभारांतल्या बाबी आपल्या ध्यानांत सुलभतेनें याव्या. इंग्रजी अमलांत ' होय 'साहेबांच्या नमुन्यांचा जो प्रकार तोच प्रकार मुसुलमानी अमलाच्या आरंभीं तत्कालीन अंमलदाराचा होता. राज्यव्यवस्थेपलीकडे इतर बाबींतहि मुसुलमानी वळण पुष्कळच शिरलें.

एकदा स्वातंत्र्य जाऊन परतंत्रता आली म्हणजे जिंकलेल्यांना आपलें सर्व कांहीं कमी दर्जाचें वाटून जेत्यांचें सर्व उच्च दर्जाचें व चांगलें वाटूं लागावें, हा केवळ मनुष्यस्वभावाचा धर्म आहे. मराठ्यांनीं गुजरात जिंकल्याला पुष्कळ दिवस गेले पण अजूनहि दक्षिणी पागोटें घालणारे गुजराती पुष्कळ नजरेस पडतात; पण गुजराती पगडी कोणी दक्षिणी घालीत नाहीं. इंग्रजांसारख्यांच्या अमलांत प्रजाजनांनीं राज्यकर्त्यांचा पोशाक केलाच पाहिजे, अशी जबरीची सक्ती मुळींच नव्हती. उलट राज-दरबारी आपआपल्या जातीचे विवक्षित पोशाक घालावे, अशीच अनुज्ञा होती. तरीदेखील उंची जरीचीं, सुती किंवा रेशमी शिरोभूषणें टाकून अगदीं परकी देशांतलीं विचित्र भूषणें डोक्यांवर घालणारे अनेक लोक आढळत. उष्ण देशाला सुखकर असे पेहराव टाकून व शरिराला त्रास सोसून केवळ हौशीसाठीं राज्यकर्त्यांचे पोशाक करणारे लोकहि आपण पाहिले. लग्नकार्यांत किंवा मजलसींतच काय, पण आपल्या देवतांच्या मिरवणुकींत किंवा इतर धार्मिक प्रसंगीं देशी वाद्यांनीं मनाचें समाधान

न होतां आपल्या पूर्वींच्या जेत्यांचीं वाद्यें—एकप्रकारें—जणूं आपल्या पारतंत्र्याचा इतिहास मोठ्या हौशीनें वाजवीत सुटत. मराठीसारख्या मायावंत आणि इंग्रेजीसारख्या सहिष्णु राज्यांतदेखील अशी परिस्थिति उत्पन्न झालेली दृष्टीस पडे. मग परकीयांस बाटवून आपला धर्म, आपली भाषा व आपला रिवाज या त्रयीचा प्रसार करण्याचा ज्यांनीं विडाच उचलला होता त्यांच्या राज्यांत जित अशा मराठ्यांच्या एकंदर रीतिरिवाजांत फेरफार पडावा व त्यांच्या भाषेंत फेरबदल व्हावा, हें अगदीं साहजिक आहे. राज्यकर्त्यांची भाषा सफाईनें लिहिणें व बोलणें ही एक थोरपणाची व अभिमानाची गोष्ट वाटूं लागून वरच्या दर्जाचे लोक मुसुलमानी भाषेचा अभ्यास जारीनें करूं लागले. त्यांच्या खाजगी व्यवहारांत व घरांतल्या बोलण्यांतदेखील हळूहळू मुसुलमानी शब्दांचा शिरकाव जास्त जास्त होऊं लागला. यामुळें वाक्यांत फारशी शब्द शिरले; इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मराठी वाक्यांची रचना फारशी भाषेंतल्या वाक्यांच्या लकबीवर जाऊं लागली. चालुक्य राजांच्या अमदानींत विद्वान् लोकांचा ओढा संस्कृत भाषेकडे असल्यामुळें महाराष्ट्री भाषेंत ऊर्फ मराठींत जसे अनेक संस्कृत शब्द व प्रयोग शिरले, त्याचप्रमाणें या काळींहि सरकारदरबारीं लोकांचा ओढा फारशीकडे असल्यामुळें फारशी शब्द व फारशी प्रयोग मराठींत शिरूं लागले. या तुर्की किंवा फारशी भाषेची छाप इतकी दृढ पडण्याचें मुख्य कारण असें कीं, परकी अमलांत राज्ययंत्राचे चालक व परकी सत्तेचे नोकर स्वभाषेंतले साधे शब्द टाकून, त्यांचे ऐवजीं परकी भाषेंतले शब्द हौसेनें, खुशीनें किंवा जबरीनें योजूं लागतात; व बोलण्याचे ढंगहि परकी थाटावर नेतात. परकी राजकर्त्यांच्या सहवासाचा परिणाम जे लोक जेत्यांशीं विशेष परिचयानें असतात, त्यांच्या आचारावर व भाषेवर प्रथम होऊं लागतो. ज्यांना जेत्यांपासून कांहीं लाभाची अपेक्षा असते, जेत्यांच्या नोकरींत आपला देहविक्रय करितात, व ज्यांना ते जेते आधारवत् भासतात, असे जित लोक जेत्यांचे आचार, विचार, भाषा, राहणी, पोशाख वगैरेंची नक्कल करण्यास फार उत्सुक असतात. जुन्या

अमदानींतले शिष्टलोक प्राय: नवीन अमलापासून दूर राहतात. त्यांचा अभिमान त्यांना अलिप्त ठेवितो, व त्यांचे ऐवजी अगदीं साधारण दर्जाचे, अभिमानशून्य, बकाल, पोटभरू मात्र नवीन अमलांत चटकन सरसावतात, व पुढें येऊन त्यांच्यांत येऊन मिसळतात. यांना जुनें वळण फारसें नसतेंच, तेव्हां नवीन वळण ते सहजच लवकर उचलतात. दरबारांतून आणि लहानमोठ्या राजसभांतून, पोषाखाचें आणि भाषेचें येईल तसें वेडेंवांकडें अनुकरण करणें त्यांना जवळ-जवळ अपरिहार्य वाटूं लागतें, व मग त्यांची, त्यांच्या कुटुंबियांची आणि त्यांच्याशीं विशेष सलगीनें राहणाऱ्या जनसमूहाची राहणी व भाषा जेत्यांच्या वळणावर ते नेऊं लागतात; आणि प्रत्येक बाबतींत अंधळेपणानें ते जेत्यांचा कित्ता गिरवूं लागतात.

असें दिसून येतें कीं, या काळीं आपल्याकडील सर्व सृष्टि तुर्की पेहरावानें अविंधमय बनून गेली होती. हें खरें; पण राजकारणाशीं, राजपुरुषांशीं, व राजकीय बाबींशीं ज्यांच्या संबंध फार पोहोंचत नसे तेथें ही परकी छाया कमी पडली होती. शहरांपासून किंवा शिष्टलोकांपासून जितकें-जितकें अंतर जास्त, तितकें-तितकें अस्सल हिंदू वळण जास्त कायम टिकून राहिलें. सरकारसंबंधीं कागदपत्रांत, दरबारी लेखांत व शिष्टांच्या पत्रव्यवहारांत मुसुलमानी शब्दांचा व प्रयोगांचा सडकून भरणा असलेली भाषा रूढ झाली, तरी गोंधळ, कथा, कीर्तनें वगैरेसारख्या धार्मिक बाबींत व धर्मग्रंथांत मराठी बरीच स्वच्छ राहिली. मंत्रतंत्रें, जादूटोणे यासंबंधींचीं टांचणेंटिपणें व लहानसहान औषधोपचाराच्या नोंदी व तत्संबंधींचे खुलासे यांचीं बाडें ही अजून स्वच्छ व बऱ्याच निर्भेळ मराठी भाषेंत लिहिलीं जात. औषधी ग्रंथांत 'विठ्ठल गलांडू'च्या 'रसरत्न-

१. मंत्रासंबंधें एक गोष्ट माझे लक्षांत आली ती अशी. हें मंत्रांचे शब्द अनेक वेळां साधे शब्द गुप्त भाषेंत किंवा इतर प्रकारानें फिरवून म्हटलेले असतात. बरेच मंत्र केवळ महानुभावी गुप्त लिपींत लिहिलेलीं स्वच्छ मराठी वाक्यें आहेत.

दीपा'ची भाषा शुद्ध मराठी आहे. हा ग्रंथकार शके १४००-च्या सुमारचा असावा. यानें आपल्या ग्रंथांत औषधें करण्याच्या कृति व किमयेचे प्रयोग सांगितले आहेत. ग्रंथ बहुतेक गद्यच आहे. पण मध्येंच आठ-दहा ओव्या घातल्या आहेत. ओव्यांची बांधणी ज्ञानेश्वरी ओवी-प्रमाणेंच आहे. शकुनवंत्या किंवा पल्लिपतन, 'काक', 'पिंगल' वगैरेंच्या शब्दांच्या कारिका यांनाहि फारशीचा विटाळ फारसा झाला नाहीं. तसेंच पंढरपूर, जेजुरी, तुळजापूर वगैरे शुद्ध महाराष्ट्री स्थानें त्या त्या ठिकाणच्या वारकऱ्यांनीं, वाघ्यांनीं व गोंधळ्यांनीं भाषेच्या दृष्टीनें पुष्कळच शुद्ध ठेविलीं. घरांत व घराबाहेर पुरुषांचे ढंग कितीहि बोकाळले तरी परकी अंमल बायकांच्या राज्यप्रांतांत फारसा प्रवेश करूं शकला नाहीं. त्यांच्या अंगीं मुरलेल्या पुराणप्रियत्वामुळें व त्यांच्या विचारांशीं एकजीव झालेल्या धर्मसमजुतींमुळें त्यांच्या व्यवहारांत मराठी वळणाचें आणि मराठी भाषेचें स्वरूप बरेंच कायम राहिलें. या बाबींत मुसुलमानांचा गोषा मराठ्यांत शिरला तो बराच फायद्यावर पडला. बायकांनीं आपलीं गाणीं, आपल्या ओव्या, आपल्या कहाण्या, सकाळसंध्याकाळच्या भूपाळ्या व आरत्या यांना तुर्की पेहराव मुळींच चढविला नाहीं. स्त्रीसुधारणेचें खूळ त्या वेळीं निघतें तर तीनशें वर्षांच्या मुसुलमानी अमलांत हिंदुसमाजाच्या आचारविचाराच्या व स्थितीच्या झाल्या त्यापेक्षां शतपट हालअपेष्टा झाल्या असत्या. परकी अमलांत जित प्रजाजनांच्या जुन्या गोष्टी, जुने आचार, जुने विचार, जुन्या संस्था, पेहराव, भाषा, लिपी, रीती, समज वगैरे सर्व बाबी नामशेष व्हाव्या, किंबहुना त्यांची आठवणहि लोपून जावी, हें त्यांच्यांतलें स्वत्व नाहींसें करण्याच्या कामांत व जेत्यांबद्दलचा तिरस्कार कमी करण्याच्या कामांत फार फायदेशीर असतें, आणि जितांपैकीं शिष्ट म्हणविणारेच लोक आपण होऊन जर या बाबी किंवा स्वत्वाच्या खाणाखुणा निंद्य म्हणून टाकून देऊं लागले किंवा त्या सुधारण्याच्या मिषानें त्यांची जागा जेत्यांच्या त्या त्या बाबींना देऊं लागले तर त्यांचा साहजिकपणेंच जेत्यांकडून गौरव होऊं लागतो. असा गौरव करण्यांत

नेहमींच काहीं हेतु किंवा कावा असतो, असें नाहीं. कारण या नव्या बाबी जेत्यांच्या फार परिचयाच्या व पूर्णपणें अंगीं पडलेल्या असल्यामुळें त्यांना त्या साहजिकच श्रेष्ठ व चांगल्या वाटत असतात; पण हें नीट न समजून जित मात्र अनेक वेळां या गौरवाला फसून जातात. परंतु पुरुष जोपर्यंत आपल्या बरोबर आपल्या बायकांना अचरट चाळे लावीत नाहींत तोपर्यंत कधीं-काळीं तरी समाज ताळ्यावर येण्याचा मार्ग संभवनीय असतो. हीच स्थिति महाराष्ट्रीयांची चौदाव्या शतकांत व पुढेंहि एक-दोन शतकें कायम राहिली होती; आणि म्हणूनच त्यांच्यापैकीं अनेक आचार-विचार व त्यांच्या खेड्यापाड्यांतील वसतींतील आणि त्यांच्या अनेक लहानसहान धर्मकृत्यांतील भाषेचें रूप पुष्कळ निर्भेळ राहिलें. अगदीं लहानशी बाब म्हणजे कागदोपत्रीं मित्ती किंवा तारीख घालण्याची ती हिजरी चंद्र, म्हणजे मुसुलमानी तेरीख घालण्याचा प्रघात चालू झाला. लोक खासगी पत्रव्यवहारांतदेखील मित्ती आणि शक घालण्याचें विसरून गेले, किंबहुना तसें करणें त्यांना अशिष्टपणाचेंहि वाटूं लागले; पण धर्मकृत्यांतील अनेक विधींत शक, संवत्सर, तीथ वगैरे सर्व कायम राहिलीं. पुढें कालांतरानें हिजरी शक निघून जाऊं लागला व मूळचा शालिवाहन शक पुन्हां पुढें आला. सभोंवती सर्वभर तुर्की वारें वाहत असतां आमच्या धर्मग्रंथांची भाषा इतकीतरी निर्भेळ ठेविली व राजदरबारीं तिचें साफ उच्चाटण होऊं न देतां, पुसट-पुसट स्वरूपांत ती कायम राखिली व तिचा थोडासा अंकुर जिवंत ठेविला, याचें श्रेय त्या काळच्या विद्वानांस व लेखकांस आहे. आपल्या बायका-मुलांना शुद्ध मराठी भाषा परिचयाची असावी, याबद्दल तेव्हांहि कांहीं लोक जपत असत.

लेखकांच्या अंगची विद्वत्ता व त्या काळच्या मराठ्यांची संस्कृति हीहि मराठी भाषा थोडी नीट ठेवण्यास बऱ्याच अंशीं कारण झाली. मुसुलमान लोकांनीं जरी महाराष्ट्र जिंकिलें तरी, त्यांची एकंदर संस्कृति मराठ्यांपेक्षां कमी दर्जाची होती यामुळें व ते अगदीं परक्या देशचे असल्यामुळें,

राज्यव्यवस्थेचा पुष्कळसा मोठा भाग त्यांना मराठी लोकांवरच सोंपविणें भाग पडलें. खेरीज ते संख्येनें फार कमी असल्यामुळें कोणतीहि बाब पूर्ण व स्वतंत्रपणें त्यांना आपल्या हातांत घेतां आली नाहीं. पुढें कांहीं काळानें इकडील बरेच हिंदू लोक बाटविल्यानंतर या गोष्टी कांहींशा सुकर झाल्या. पुष्कळ कामें मुसुलमानांकडे पूर्णपणें सोंपविण्यासारखी स्थिति येऊं लागली. पण या बाटण्याच्या प्रघातांत एक नवेंच अरिष्ट उत्पन्न झालें. बाटलेले लोक अस्सल हिंदू असल्यामुळें त्यांच्यांतले हिंदू वळण गेलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर अस्सल मुसुलमानांवरहि हिंदुत्वाची सावली पडूं लागली. अविंधशाहीची सर्वव्यापी व सर्वभक्षक वावटळ ज्या जोरानें सुरू झाली तोच तिचा जोर पुढें टिकला नाहीं. सरसहा सर्वांस बाटवून मुसुलमान करण्याचा व आपल्या गोटांत ओढण्याचा क्रम फार झाल्यामुळें उलटपक्षीं हिंदूंच्या अनेक गोष्टींचा शिरकाव मुसुलमान समाजांत झाला. मुसुलमानांनीं हिंदु स्त्रिया बाटवून त्यांच्याशीं लग्नें लाविलीं. यामुळें त्यांच्या राणीवशांत ऊर्फ जनानखान्यांत हिंदू वळण शिरलें व त्याचा सप्रेम अंगीकार त्यांच्याकडून होऊं लागला; आणि असें हळूहळू होतां होतां हिंदूंची छाप मुसुलमानांवर पडली व अनेक मराठी शब्द त्या वेळच्या मुसुलमानांच्या बोलण्यालिहिण्यांत येऊं लागले.

जे लोक एकदा बाटून मुसुलमान झाले ते तर साफ उठून गेल्यासारखेच झाले. पण इसापनीतींतल्या गोष्टीप्रमाणें त्यांना त्या नवीन स्थितीचा एक नसता अभिमान उत्पन्न झाला; व ते इकडील धर्माची आणि समाजरचनेची अनेक तऱ्हांनीं हेटाळणी करूं लागले; व असें करण्याचे बाबतींत प्रत्यक्ष सूर्याच्या तापापेक्षां उसन्या उन्हानें तापलेल्या वाळूप्रमाणें मूळ अस्सल मुसुलमानापेक्षांहि त्यांना विशेष जोर चढला; आणि या असल्या कृत्यांचा आपल्या ग्रंथरचनेवर परिणाम होऊं लागला.

तेराव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत आपल्या इकडे मुसुलमानांचा शिरकाव फारसा झाला नव्हता. तेराव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत तर मराठी भाषेचा झरा सारखाच स्वच्छ वाहत होता. तें पाणी बाहेरच्या खळबळीनें

गढूळ झालें नाहीं. संस्कृत → महाराष्ट्री महाराष्ट्री अपभ्रंश → मराठी हे सर्व रंग आंतल्या आंत बदल होऊन चढत गेले. कठीणपणा जाऊन सौकर्य येत जाण्याच्या भाषांच्या स्वयंसिद्ध पद्धतीनेंच हे सर्व फरक झाले. द्विवचन नाहींसें होणें, शब्दांचीं रूपें साधीं होणें, विभक्तिप्रत्यय आणि वाक्यांची रचना सुलभ होत जाणें हे बदल सर्व भाषांत कालमानानें हळूहळू होत जातात, त्याचप्रमाणें ते महाराष्ट्रांतहि झाले, यांत नवल नाहीं. पण यापुढें मात्र मुसुलमानी अमलाचा शिरकाव झाल्यामुळें भाषेंत बदल होण्याला तें एक नवीन कारण उत्पन्न झालें. येथें असलेलें चातुर्वर्ण्य इतके दिवस नीट नांदूनहि त्यांतील तेढ नाहींशी झाली नाहीं. तेराव्या शतकापूर्वी व तेराव्या शतकानंतर आजपर्यंत चातुर्वर्ण्य नाहींसें करण्यासाठीं व सर्व जाती मोडून एकजीव असा महाराष्ट्र बनविण्यासाठीं अनेक यत्न झाले व जेव्हां-जेव्हां ज्यांच्यांत जातिसंस्था नाहीं असे परकी राजे येथें आले, तेव्हां-तेव्हां तर त्यांच्या अमलांत या यत्नांची पराकाष्ठा झाली. परकी राजे आणि त्यांच्या चष्म्यांतून पाहणारे एतद्देशीय लोक या वर्णव्यवस्थेला निंदून सर्व प्रकारच्या अरिष्टांचें खापर हें चातुर्वर्ण्य सुरू करणारांच्या माथीं मारूं लागले. किंबहुना, जाणतेपणानें किंवा नेणतेपणानें, हे लोक या चातुर्वर्ण्याच्या मुळाशीं प्रेमभाव नसून पूर्ण द्वेषभाव आहे व जातिसंस्था हा द्वेषभावाच्या जमिनींत लाविलेला, मत्सराच्या पाण्यानें शिंपलेला व विषारी फळांनीं लादलेला असा एक कांटेरी वृक्ष आहे, असेंच येथील जनतेला पढवूं लागले; व ही पढवणी तिचा नीट विचार न करितां, व चांगली छाननी करून ती चिकित्सक बुद्धीनें न तपासतां अनेक पोटार्थी शिष्टलोक पोपटाप्रमाणें आपणहि वारंवार पढूं लागले. मानववंशाच्या निरनिराळ्या टोळ्या या देशांत निरनिराळ्या वेळीं येऊन मिसळल्या; व त्यांतील सुसंस्कृत व संपन्न अशा प्रथम वसाहत केलेल्या टोळीनें सदय मनानें व बंधुभावानें त्या सर्व मानववंशांच्या टोळ्यांची तजवीज आपल्या समाजांत लावून दिली. त्यांना स्वतंत्रपणें सुखानें राहतां येईल अशीं स्थानें योजून दिलीं; त्यांना पेलतील असे आणि त्यांच्या पूर्वसंस्काराला व

त्यांच्या नित्यराहणीला योग्य असे निरनिराळे पेशे त्यांना बांधून दिले; व या सर्व मानववंशांचे दुवे एकमेकांत मोठ्या खुबीनें अडकवून देऊन त्या सर्वांची मिळून एक स्वतंत्र ग्रामरचना किंवा ग्रामव्यवस्था करून त्यांस एकमेकांवर विश्वासानें अवलंबून राहणें भाग पाडून एकमेकांच्या मदतीनें समाधानानें नांदतां येईल, अशी मांडणी मांडून दिली. हे सर्व लोक, निरनिराळ्या संस्कृतींचे आणि आचारांचे सर्व मानववंश, या उदार व व्यापक मनोवृत्तीनें उभारलेल्या ग्रामसंस्थेंत गोडीनें व प्रेमानें नांदूं लागले. यांच्या एकमेकांवरील प्रेमाचीं व यांच्या मनाच्या समाधानाचीं अनेक उदाहरणें महाराष्ट्र-वाङ्मयांत आढळतात. मोरोपंता-सारखा सोवळा ब्राह्मण काशींत गंगेची प्रार्थना करितांना कोणासहि विसरत नाहीं व मोठ्या प्रेमानें

> गंगे त्वां तारावे कुंभार, सुतार, परिट, लोहार।
> जोहार म्हणायाचा जो प्रभुचा होय देवि तो हार॥

असें म्हणून सर्वांस उद्धरण्याविषयीं प्रार्थना करितो. तसेंच आपल्या गांवच्या पाटलांचे जीव वांचविण्यासाठीं मडुड्याचा गोंदनाक महार स्वतःचा जीव समजून-उमजून बळी देतो व पाटलास पळून जाण्यास वाट देतो. ( खंड १५ ) राजपुत्र संभाजीचा जीव वांचविण्यासाठीं कृष्णराव त्याचे बरोबर अन्न खातो. या गोष्टी लक्ष वेधण्यासारख्या आहेत. ग्रामपंचायतींत हजर मजलसींत महार अवश्य लागतो. किंबहुना, असा एकहि निवाडयाचा महजर सांपडणार नाहीं कीं, ज्यांत महार हा पंचाइती इनसाफांत नाहीं. ब्राह्मणांच्या अनेक कुटुंबांत महार सवासणी जेवूं घालण्याची पद्धत अजूनहि आहे. याहिपेक्षां आणखी एक उदाहरण असें कीं, ब्राह्मण महारवाडयांत भिक्षा मागण्यास जातो. देवीच्या भक्तांस 'आराधी, भोपी किंवा भुते' असें म्हणतात; व यांच्या भिक्षेस 'जोगवा' असें म्हणतात. कांहीं कुटुंबांत अशी चाल आहे कीं, घरांतील कर्त्या पुरुषानें महारवाडयांत जोगवा मागितलाच पाहिजे. पण या सर्वांपेक्षां विशेष आश्चर्यकारक आणि चित्तांत बाळगण्याजोगीं अशीं उदाहरणें

दासोपंत, एकोपंत, दामाजीपंत वगैरेंचीं आहेत. दामाजीपंत मंगळवेढेकर हा कमाविसदार असतांना दुर्गादेवीचा दुष्काळ पडला. त्या काळांत आपल्या प्रांतांतील गायगरिबांच्या हालअपेष्टांनीं कळवळून जाऊन त्यानें सरकारी कोठारांतलें धान्य त्यांस देऊन त्यांचे जीव वांचविले. या त्याच्या कृत्याकरितां त्याला तोहमत येऊन बादशाही धरणें आलें. अशा या संकटांत दामाजीपंत सांपडला असतां त्याच्या गांवच्या विठ्या महारानें आपल्या जवळ होतें नव्हतें तेवढें सर्व द्रव्य सरकारांत भरून दामाजी-पंताच्या नांवची रसदीची पावती दिवाणांतून आणून दिली; आणि पंतमजकुरांचे प्राण व अब्रू यांचें रक्षण केलें. " पाच्छाव याच्या कोठींतील कोठड्या लुटल्या त्याजबद्दल तगादा दामाजीपंतास केला. ते वेळेस विठ्या महारानें पाछाव याची रसद पोहोंचती केली. दामाजीपंताचा पैका भरून विठ्या महारानें दिला. पाछाव यानें चौकशी केली, त्याजवरून विठ्या महार यास हकदर उपकार पोटास भाकरी व बसावयास जागा करून दिल्ही. धडुत पांघरूण कृपा करून दिल्हें. महाराचे बंदोबस्त करून दिल्हे; व याची सनद मुंगीपैठणी देवाचे राउळांत जाहली. या सनदेंत लिहिलें आहे कीं, ' हे देणें पाछावाचे. व दामाजीपंताचें हातचा कागद असे '[1] " या दामाजीपंताचें चरित्रभागांत कविकल्पनांचे रूपुस्त लावून महाराष्ट्रांतील अनेक कवींनीं या ऐतिहासिक गोष्टीवर काव्यें रचिलीं आहेत.

याप्रमाणें अनेक शतकेंपर्यंत महाराष्ट्रसमाज एका ठिकाणीं नांदत असतां तेराव्या शतकाच्या अखेरपासून त्याच्या राहणींत बदल होऊं लागला व असमाधान वृत्तीचें बीं त्यांतील कित्येकांच्या मनांत पेरलें जाऊं लागलें. ज्यांच्यांत चातुर्वर्ण्य-व्यवस्था नव्हती असे धर्मप्रचारक समाज हे तर पूर्वीपासून या उद्योगांत होते, परंतु आतां प्रत्यक्ष राजसत्तेचाहि त्यांना आधार मिळाला; व समाजांत फाटाफूट होऊं

---

१. हा महजर सातारकर महाराजांच्या दप्तरांत सांपडलेला कै. राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेला आहे.

लागण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. अनेक कारणांमुळें महाराष्ट्रलोक स्वधर्माचा त्याग करून परधर्माचा स्वीकार करूं लागले. कोणी जरबेनें, कोणी मोहानें, कोणी लोभानें, तर कोणी निव्वळ पोटासाठीं मुसुलमान होऊं लागले. येथें असणाऱ्या सर्वच वंशांची संस्कृति उच्च दर्जाची नव्हती. त्यांपैकीं पुष्कळांना तर आपल्या आर्यसंस्कृतीची नीटशी ओळखहि नव्हती व या संस्कृतीचा अभिमानहि नव्हता. यामुळें हे लोक शत्रूंच्या जाळ्यांत तेव्हांच सांपडत; आणि त्यांनीं वाजविलेल्या पुंगीच्या सुरावर चटकन नाचूं लागत. खरें इंगित त्यांस कळलेंच नाहीं.

मागें एकदा वर सांगितलेंच आहे कीं, महाराष्ट्रांत येऊन वसाहत केलेले मानववंश निरनिराळ्या संस्कृतीचे, निरनिराळ्या आचारांचे व निरनिराळ्या वळणांचे असे होते. त्यांच्या समजुती, त्यांचीं दैवतें, त्यांची राहणी, फार काय, पण त्यांचें खाणेंहि अगदीं निरनिराळें होतें. त्यांच्या अंगच्या कातडीचा रंगहि अगदीं भिन्न होता. यामुळें हे सर्व एकजीव होणें केव्हांहि शक्य नव्हतें व अजूनहि नाहीं. जोपर्यंत एकाची राहणी व अन्न दुसऱ्याहून अगदीं भिन्न आहे तोपर्यंत दोघेहि एकजीव होऊन जाणें जवळ-जवळ अशक्य आहे. एक पूर्णपणें शाकाहारी; कांदा, लसूण किळसवाणें मानणारा, दुसरा मांस भक्षण करणारा आणि तिसरा मेलेल्या प्राण्यांचीं शवें तोडतोडून, किळस न मानतां हौशीनें त्यांवर उपजीविका करणारा असे तीन संघ एके ठिकाणीं नांदणें फार दुर्घट आहे. आणि यांपैकीं कोणी तरी आपल्या अन्नाचा हट्ट सोडून दुसऱ्याची खाणीं स्वीकारूं लागेपर्यंत हें नीटसें साधणार नाहीं. तरीदेखील हें साधण्याची एक कल्पना बसवून ही जातिसंस्था येथें निर्माण करण्यांत आली. अमेरिका, आफ्रिका वगैरे खंडांत जेव्हां सुधारणेनें फार श्रेष्ठ व बुद्धीनें फार वरच्या दर्जाचे असे लोक जाऊन तेथें वसाहत करूं लागले तेव्हां तेथल्या मूळ रहिवाशांना या खंडांतूनच काय, पण या जगांतूनहि घालवून नामशेष करण्याचे अनेक यत्न व नानाविध क्लृप्त्या या नवीन वसाहतवाल्यांनीं योजिल्या. केव्हां-केव्हां मूळ वसाहतवाल्यांपेक्षां

श्रेष्ठ संस्कृतीचे आणखी नवे मानवी वंश त्या त्या खंडांत गेले तेव्हां त्यांचा आपल्या वसाहतींना व कार्यांना त्यांनीं बिनशर्त उपयोग करून घेतला; पण तो उपयोग होऊन गेल्यानंतर या नव्या आलेल्या मानव-वंशांच्या टोळ्यांसहि त्यांनीं आपणांस मिळवून घेतलें नाहीं. त्यांना नाहीं नाहीं त्या अडचणी घातल्या, अत्यंत अपमानकारक असे नियम त्यांना घालून दिले, आपण जाऊं त्या रस्त्यांनीं त्यांनीं जाऊं नये, आपण बसूं तेथें त्यांनीं बसूं नये, आपण पाहूं तें त्यांनीं पाहूं नये, आपण राहूं तेथें त्यांनीं राहूं नये, असे अमानुष प्रकार त्यांनीं सुरू केले; व आपल्या-शिवाय इतर सर्व निराळ्या मानववंशांची तळी तेथून उचलण्याची खटपट केली आणि या करण्यालाच ते उत्तम समजूं लागले. पांखराच्या पिल्लांची आई बंदुकीनें मारल्यावर, तिचीं तीं पिल्लें केविलवाणेपणानें चिंव-चिंव करून आक्रोश करीत असतां, अथवा त्यांचा बाप शोकमग्न झाला असतां केवळ उपकारासाठीं दयार्द्र बुद्धीनें म्हणून तीच बंदूक त्या मागें राहिलेल्या पक्ष्यांवर झाडून त्यांचे प्राण घ्यावे व वर या कृत्याला पुण्यकृत्य म्हणावें अशांतलाच हा प्रकार होय. हें असलें कांहीं न करितां येथें प्रथम बाहेरून आलेल्या मानववंशानें आपल्या पूर्वीच्या व आपल्या मागून आलेल्या वंशांत त्यांच्या त्यांच्या ऐपतीप्रमाणें व संस्कृतीप्रमाणें शिस्त लावून देऊन एक ठिकाणीं नांदविलें हेंच येथील अन्य ठिकाणीं न दिसणाऱ्या चातुर्वर्ण्याचें व जातिसंस्थेचें बीजरहस्य आहे; आणि हें येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, या मूळ कारणांमुळें येथील रहिवाशांच्या भाषेंत अनेक फरक फार झपाट्यानें पडत गेले हें नीट लक्षांत यावें. मराठी भाषेची ग्रंथसंपत्ती इतकी कां वाढली व ती अमुक तऱ्हेनेंच का विस्तारली याचें कारणहि यांतच आहे. नाहींपेक्षां वेदान्त, व्याकरण, न्याय, मीमांसा, ज्योतिष ( गणित व फल ), तर्क वगैरे अनेक श्रेष्ठ व गहन विषयांवर मराठी भाषेंत ग्रंथरचना न होतां, अनेक शतकें तींच तींच पौराणिक आख्यानें, त्याच त्याच कथा व तींच तीं चरित्रें यांचेच एकावर एक अनेक ग्रंथ कां निर्माण झाले या

चमत्काराचा स्पष्टपणें नीट निर्णय करितां येणार नाहीं. कोणत्याहि भार्षेतील वाङ्मय हें ती भाषा वापरणाऱ्या समाजाचें एक चित्र असतें. समाजाच्या विकारांचें व विचारांचें प्रदर्शन ज्या सारस्वतांत केलें जातें त्या सारस्वताच्या अंगांचा, विशेषांचा आणि वैगुण्यांचा नीट उलगडा त्या समाजाच्या परिस्थितीच्या व विशेषांच्या माहितीशिवाय होणार नाहीं. भाषा बोलणाऱ्या समाजाची स्थिति व संस्कृति आणि त्या भार्षेतील वाङ्मय, यांचा अतिनिकट संबंध असून हीं एकमेकांवर अवलंबून असतात.

आतां या वेळपर्यंतचें सर्व वाङ्मय स्वतंत्र नसून संस्कृतांतच होतें. त्यांत श्रेष्ठ दर्जाची व गहन रचना झाली नाहीं, व कोणीहि लेखक साधारण कथाभाग सांगावयाचा असे किंवा नित्य-व्यवहारोपयोगी टाचणें किंवा रचना तयार करावयाची असे, तेथपर्यंत मराठी भाषेचा आश्रय करी. पण यांपलीकडे जाऊन वेद, उपनिषदें, नाटकें वगैरे विशेष उच्च दर्जाचा ग्रंथ निर्माण करावयाचा म्हणजे मात्र तो लेखक संस्कृताकडे धाव ठोकी. हीहि गोष्ट मराठी भाषा बोलणारांच्या ऐपतीचा ठाव घेण्यास साधन होईल. आतां महानुभावपंथांतील अनेक ग्रंथकारांनीं आपले मराठी ग्रंथ संस्कृतांतील ग्रंथांबरहुकूम बनवावे असा यत्न केलेला दिसतो. तरीदेखील 'पंचवार्तिका'सारखें साधें व्याकरण व 'महाराष्ट्र-काव्यदीपिके' सारखा छंदःशास्त्रावर सुलभ ग्रंथ यांपलीकडे त्यांचीहि मजल फारशी गेली नाहीं. त्या पंथांतले अनेक ग्रंथकार त्या काळच्या उत्तम विद्वानांतले असल्यामुळें व त्यांच्या गुरूकडून संस्कृत ग्रंथ न करितां मराठींतच ग्रंथरचना करण्याविषयीं त्यांना आज्ञा होत गेल्यामुळें इतकीतरी मजल त्यांनीं गांठली, एरव्हीं हेंहि झालें नसतें.

आतां सभोंवतालीं असलेलें बौद्ध वातावरण व जैनमतप्रसार यांचा परिणाम निःसंशय मराठी ग्रंथकारांच्या ग्रंथरचनेवर झाला होता. या दोन्ही धर्मपंथांचे आचार, जातिभेद न मानण्याची त्यांची प्रवृत्ति, संसार सोडून सर्वत्याग करण्याची शिकवण, देहदंडाचा त्यांनीं घालून दिलेला

घडा याचाच थोडाबहुत परिणाम आपल्या इकडील विठ्ठलभक्तांत, कबीर-पंथीयांत, दादुपंथाच्या अनुयायांत नजरेस पडतो. सर्व जाती झुगारून देऊन एकच जात निर्माण करणें हें बुद्ध, जैन वगैरेंसारख्या अत्यंत कडकडीत शाकाहारी व मांसाहारद्वेष्ट्या धर्मीयांना साधण्यासारखें होतें; व ते तें साधून जातिरहित समाज करण्याच्या यत्नासहि झपाट्यानें लागले. पण हें जाति-संस्था हाडींमासीं खिळलेल्या महाराष्ट्रास नीटसें पटलें नाहीं. तरी अगदीं शेवटल्या वर्तुळांतल्या जातींतील लोकांचीं मनें या शिकवणीनें थोडींफार हुरळून जाऊं लागलेलीं दिसलीं. तेव्हां ती शिकवण कायम ठेवून आपला जुना धर्म व जुन्या संस्थाहि कायम ठेवण्याचा यत्न इतर पंथ काढून करणें भाग पडलें. दशावतारांपैकीं अनुकरणीय असे जे राम व कृष्ण त्या दोन अवतारांच्या चरित्रांतील निवडक चरित्रकथांचा सारखा वर्षाव सुरू केला. स्वातंत्र्यसिद्धि (भारतयुद्ध), पारतंत्र्यनिवारण (प्रल्हादचरित्र), सत्यप्रीति (हरिश्चंद्राख्यान), रणशौर्य (कर्णभीष्मकथा), मैत्री (सुदामचरित्र,) शरणागतक्लेशनिवारण (कपोताख्यान), उत्कट प्रेम (गोपीकथा) वगैरे योग्य अशीं कथानकें निवडून त्यांचे योगानें वर्णन केलें. ज्यांचेपुढें कथा सांगावयाच्या ते लोक शृंगारप्रिय असल्यामुळें राधाविलास, चंद्रावळी-वर्णन वगैरे शृंगारिक आख्यानेंहि गाणें त्यांना भाग पडलें; व तींहि त्यांनीं गाइलीं. ज्यांत महाराष्ट्रीयांच्या मनाला कांहीं आवडणार नाहीं व अज्ञ आणि कमी संस्कृतीच्या लोकांना निरुपयोगी होतील असे ग्रंथ रचण्याच्या भानगडींत हे ग्रंथकार फारसे पडलेले प्राय: दिसत नाहींत. गणपति हें सर्वांचें आदिदैवत असूनदेखील त्याचीं चरित्रपुराणें मराठींत क्वचितच आढळतात; आणि त्या वेळीं अनेक तऱ्हांचे शास्त्रग्रंथ संस्कृतांत लिहिण्याची ऐपत महाराष्ट्रीयांच्या अंगांत असतांहि, त्या प्रकारची ग्रंथरचना त्या वेळच्या मराठींत दिसत नाहीं याचेंहि कारण हेंच आहे. उलटपक्षीं पाहतां, ज्यांना असें कांहीं काम साधावयाचें नव्हतें व केवळ उत्तम ग्रंथरचनाच करावयाची होती अशा महानुभावांसारख्या ग्रंथकारांत संस्कृताप्रमाणेंच ग्रंथ रचिलेले दिसतात.

आपल्या पंथांतल्या शिष्ट व अशिष्ट या सर्वांसाठीं ते ग्रंथ रचीत होते, व त्यांनीं आपल्या पंथाची मुख्य भाषा मराठी ही ठरविली होती. यामुळें तींतील ग्रंथ तत्कालीन सर्वसंमत व सर्वमान्य अशा संस्कृत ग्रंथांच्या धर्तीवर व त्या तोडीचे असावे, हेंच ध्येय त्यांनीं पुढें ठेविलेलें दिसतें. महानुभावांत अशी अलोट ग्रंथसंपत्ती निर्माण झाली तशीच ती विजयानगरच्या रामराजाच्या दरबारांत झाली असावी, असा तर्क होतो. आणि त्या ग्रंथांत लिंगायत व जैनमताचा अनुवाद मराठी भाषेंत पुष्कळसा केला गेला असावा, असें वाटतें[1]. पेशवाई गेल्यानंतर महाराष्ट्रमंडळीनें ज्याप्रमाणें बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर वगैरे शहरें गांठलीं, व तेथील राजाश्रयानें ते राहिले त्याप्रमाणेंच पूर्वींहि रामदेवराव जाधवाचें राज्य गेल्यानंतर दक्षिणेकडे बरेच महाराष्ट्र लोक गेले. महाराष्ट्र हा मध्यवर्ती असून त्याच्या सीमांवर निरनिराळे प्रांत, निरनिराळे धर्म व निरनिराळीं राज्यें होतीं. तिकडे येथील लोकांचा ओघ साहजिकपणें वाहिला; व महाराष्ट्री लोक अनेक भाषा बोलूं लागले व अनेक धर्मपंथ स्वीकारूं लागले. यामुळें मराठींत निरनिराळ्या पंथांचे ग्रंथ होऊं लागले. प्राचीन मराठी ग्रंथकार पांच-चार भाषेंत सहज ग्रंथ रचीत. हिंदी, व्रज वगैरे दोन-चार भाषा तर प्रत्येकाला येतच; पण यांशिवाय बागलाणी, खानदेशी, पंजाबी, कोंकणी वगैरे भाषांचें, त्यांत रचना करण्याइतकें ज्ञान पुष्कळांना असे. म्हणजे आपल्या विचारांचें प्रदर्शन मराठी लेखक दहापांच भाषांत करीत, अशी त्यांची ऐपत होती. यांपैकीं केवळ एक-दोन भाषांतले व एकाच धर्मपंथांतले ग्रंथ आपणांस माहीत आहेत. यांपलीकडील इतर धर्मपंथांसंबंधीं मराठी भाषेंत झालेली रचना आपल्याला अगदीं अज्ञात आहे. एकट्या महानुभाव-पंथांतली हल्लीं

---

१. असें वाटण्याचें कारण एकतर त्या प्रांतांत जैनमताचा प्रसार फार होता व हा ‘ कानडा रामराजा छत्रपती जातीचा वाणी लिंगाइत ’ होता, असें लिहिलेलें आढळतें.

भारत इ. मंडळ, पु. ७, पृ. ३११ पहा.

उपलब्ध असलेल्या ग्रंथांची संख्या, आपल्या हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व ग्रंथांच्या संख्येपेक्षां जास्त आहे. याशिवाय माध्व, जंगम, जैन, लिंगायत, नाथपंथी वगैरे मराठी ग्रंथांची तर आपल्याला नुसती कल्पनाहि नाहीं. रामलिंग, लिंगदास, शिवलिंग हे सर्व ग्रंथकार जंगम आहेत; व त्यांनीं ग्रंथरचनाहि केली आहे. रामलिंगाचा **सुजात** नांवाचा एक शिष्य होता. त्याचीं पदें पुष्कळ आहेत:—

नवल देखिलें। मात डोळियांत। ...मुंगीचे माथां तळें।
त्या तळ्यांत पांच कमळें ॥
हिरवें, निळें, पिवळें। लाल आणि श्वेत। पांच कमळें पांच रंगीं।
येकच देंठ तयाचे आंगीं ॥
तीन मुळ्या तया लागीं। सात पाकळ्या। आतां असो परते नवल।
सांगतां फार बिस्तारेल ॥
सद्गुरु रामलिंग कोपेल। म्हण सुजात। नवल देखिलें। मात डोळियांत ॥

असा या सुजाताच्या रचनेचा नमुना आहे. जंगमांप्रमाणें नाथपंथी लोकांनीं योगमार्गासंबंधीं लिहिलेलीं प्रकरणें तर पुष्कळच झालेलीं आढळतात. पण तीं सर्व त्या त्या पंथांच्या अनुयायांपुरतींच लिहिलीं व त्या पंथांतच गुप्त ठेविलीं गेलीं. एकंदर महाराष्ट्र-समाजाचा त्यांच्याशीं संबंध आला नाहीं. यामुळें रानांतल्या कुंदांच्या फुलांप्रमाणें तीं निर्माण झालीं, उमललीं, कोनाकोपऱ्यांत दरवळलीं आणि जागच्या जागीं सुकून गेलीं. कांहीं योग्य लोकांना मात्र त्यांचा वास लागला. नाथपंथी लोकांची कृति अज्ञात असण्याचें कारण त्यांत प्रायः योगमार्गाचें व्याख्यान असतें; व ते आपली कृति आपल्या शिष्यमंडळीच्या—फार तर पंथीयांच्या—पलीकडे जाऊं देण्याचा यत्न मुळींच करीत नाहींत. जंगमांचे असें नाहीं. ते आपलीं कवनें थोडयाशा परिचयानें सहज म्हणून ऐकवितात. पण यांचे ग्रंथ फारसे लेखनिविष्ट नसतात. **कान्हो त्रिमलदासा**चा 'पाताळ-कांड' नांवाचा एक ग्रंथ आहे. यांत रामानें बिभीषणास लंकेचें राज्य दिल्याची रामकथेंतील हकीकत आली आहे. पण कान्हो जंगम असावा, असें

त्याच्या ग्रंथांतील उल्लेखावरून वाटतें. कान्हो चौदाव्या शतकाचे मध्य-कालांत होऊन गेला. या काळचे ग्रंथकार दशावतारांतील राम, कृष्ण वगैरेंच्या कथा घेऊन त्यांना आणखी सदर फरद जोड लावून आपल्या पंथांतल्या लोकांना सांगतांना वारंवार आढळतात. ऐकणारांना जुन्या परिचयाच्या राम, कृष्ण वगैरेंच्या नांवांची ओळख पटून ते त्या कथा प्रेमानें ऐकतात. पण ग्रंथकार जुन्या कथा पालटून नवीन ठिगळें देतो व आपल्या विशिष्ट पंथाची छाप त्यांवर मारतो, हें कोणाच्या फारसें लक्षांत येत नाहीं. कान्हो त्रिमलदासानें रामकथा बदलून सांगितली तशी याच काळीं झालेल्या **'नवरसनारायणा'** नें कृष्णकथा बदलून सांगितली आहे. या नवरसनारायणाचें महाभारत आहे. त्यानें यांत मूळ महाभारतांत नाहींत अशा अनेक गोष्टी नव्या घातल्या आहेत, व जुन्या तर पुष्कळ पालटून सांगितल्या आहेत. याची भाषा मात्र ठीक आहे. हा नवरस-नारायण महानुभाव होता. याचें खरें नांव शार्ङ्गधरपंडित व उपनांव भोजने; परंतु आपल्या ग्रंथांत हा आपणास 'नवरसनारायण' म्हणवितो[1]. या काळच्या महानुभाव ग्रंथकारांत या नवरसनारायणापेक्षां विशेष विद्वान् असे दोन ग्रंथकार होऊन गेले. एकाचें नांव **एल्हण** व दुसऱ्याचें नांव **चाल्हण** पंडित.

**एल्हण** कवि हा ब्रह्मविद्येच्या किंवा मोक्षसाधनाच्या नादीं फारसा न लागतां त्यानें कृष्णचरित्राचें प्रवचन केलें आहे. याचा 'अष्टविवाह' हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचें संपूर्ण नांव 'श्रीकृष्ण षोडशसहस्र विवाह अष्ट स्वयंवरवर्णन' असें आहे, पण याला 'अष्टविवाह' असें थोडक्यांत म्हणतात. याचे एकंदर १२ भाग किंवा प्रसंग आहेत.

---

१. तरी कोठें-कोठें हा खऱ्या नांवाचा उल्लेख करितो, जसें:—
श्रीकृष्ण धनुष्यनामा शार्ङ्गधरू । भोजनोपनाम्ना योगेश्वरू ।
ते या मुष्टीतु काव्य सुंदरू । म्हणे नवरसनारायणू ॥

'ऋषि कथांचेनि कथा विलासें। पुराण शरच्चंद्र उदैला पूर्णप्रकाशें।
तेथ गळतेनि श्रीकृष्ण कथामृतरसें। निर्भर भोंवरिये चकोरू ॥

असें पहिल्याच प्रसंगांत सांगून कवीनें अष्टस्वयंवर-वर्णनास सुरुवात केली आहे. पहिल्यांत रुक्मिणीचें हरण थोडया कृष्णकारस्थानानें श्रीकृष्णानें केल्याचें सांगितलें आहे. दुसऱ्यांत जांबुवंतीस्वयंवरवर्णन आहे. स्यमंतकमणि आणि सत्यभामेसारखें रत्न कसें मिळविलें हें तिसऱ्या, चौथ्या व पांचव्या प्रसंगांत सांगितलें आहे. यांत इतर उपाख्यानेंहि ओघानें आणिलीं आहेत. याप्रमाणेंच पुढें सुमित्रविंदा, लक्ष्मणा, भद्रा, कालिंदी वगैरेंच्या गोड कथा गोड भाषेनें सांगत सांगत कवीनें दहाव्या भागापर्यंत ग्रंथ आणून पोहोंचविला आहे. पुढें अकराव्या प्रसंगांत सोळा-सहस्र रूपें धारण करून या मदनसरोवरांतल्या राजहंसानें, सौंदर्यतरंगिणीकांठच्या अखंड राजहंसींच्या गळ्यांत मंगळसूत्रें बांधिल्याची हकीकत आहे. हे अकरा प्रसंग सरल्यावर वर्षाचे अकरा महिने सरून जसा शेवटला बारावा मास यावा, तसा कवीनेंहि आपल्या या ग्रंथाचा शेवटला बारावा प्रसंग योजिला आहे. या शेवटच्या प्रसंगांत या सर्व कांतांसह श्रीकृष्णानें वसंतक्रीडा केल्याचें वर्णन आहे; आणि या वसंतोत्सवांत कृष्णकथातरंगिणीला दोहीं बाजूंनीं शब्दरत्नांचे बंधारे घालून सुंदर अशा मणिगणांनीं घाट बांधून, त्यांतील जीवनांतल्या नवरसांच्या चढत्या लाटांवर शृंगाराच्या नौकेंत बसून यथेच्छ सुखाचे अनुभव घ्यावे, अशी सोय कवीनें केली आहे. हेमंत सरून जाऊन वसंताची झुळूक सुरू झाली आहे, निरभ्र आकाशांत वर सोमपौर्णिमेचा प्रकाश आणि भूतलावर कामपौर्णिमेचा प्रकाश पसरून राहिला आहे, अशा वेळीं तो मदनपिता श्रीकृष्ण द्वारकेबाहेरील समुद्रकाठीं क्रीडावनांत सर्व परिजनांसह——

वेगा संसरले राजकुळ : कुमरें अंतोरें सकळ ॥ कैसे सपरिवारित राजकुळ : चालिले वसंतक्रीडेसीं ॥ वारुवां आरुढला धूरांचा राणा : विन्हा मिरवे राउतैचिया आंगवना ॥ घोडा वर्णितां अश्वमुद्रेचिया खुणा : त्रिलोकीं

ठेंगणा तुरंग पेंकु ॥ तेथ राजगृहींचिया मांडुरनी : वारु मेळविती भामिनी भणति ' वेगुकरा कृष्णकामिनी : चक्रपाणी दुरी पातले ' ॥ वारा न साहे राजसा अंगा : भणौति एकी न बैसती तुरंगा : आरुढलियां सवें अंगलगा : चालती सावासिनी ॥ जेवीं उद्यान रचनेचिया आगरें : भरावया ऋतुसुखाचें देशा उरें : ते ग्रसरें चालिले वणजारे : द्वारके पेठेचे ॥ कीं तेथ ऋतुरायाचां विवाहकाळीं : वनश्री नोवरी केळावली ॥ तेयां वऱ्हाडिनी अफांवनी केली : राजगृहीच्यिां ॥ कीं अश्वगतीचें वारें सुटलें : तेणें बुंथिचें आभाळु वितुळले : आतुल गोरे रूपचंद्र झळकलें : लावण्यकळासीं ॥ कीं बुंथी राजरेवां दाटली : ते लाजेची रात्रि होय निवळली : तिये रूपीचीं नक्षत्रें झळाळलीं : तेजें लावण्याचीं ॥ असो हें तिये प्राचीदिशेचां चंद्रवनी : वसंते खेळावया लागौनि : मेलिकारु केला श्रीचक्रपाणी : सपरिवारित ॥ सोडुनी मकरंदाचिया पाखाला : भुमिके परिमळें पाणिढाळु केला : वरी पायवलिया मवाळा : पसरिलिया परागाच्या ॥ तेथ परमानंद बहाळी : वसंतु खेळताये वनमाळी : तें सौभाग्यें पातली वनस्थळी दिसे चहूंकडे ॥ खेळावया शेला सांवरिला कासे : अंगीचे अलंकार केले सरिसे : वेणी वीररगुंठी हात परिवसे : ओजावली मुकुटीं ॥ अष्टपाट मुख्या ललना : सोळासहस्र गौरांगना : नानाविध शृंगाररचना : करित्या जाल्या ॥ अति पातळा सुरंगा : कासे वेढिलिया पागा : परिवंट दाटणी रुळता सोगा : सोडिला पुढां ॥ सरिसीं सांवरुनि कुरळें : केंस माखिले जवादि परिमळें : माथ विंचुरले झळाळे : फणिया गजदंताचिया ॥ गुरुशुक्रा पासौनि निर्मळें : दांताचेनि तेजसूर्यं विवळे : वदनीं ढळढळित मुक्ताफळें : दिशा गगन काळिमेची ॥ मुखचंद्र उगवले दिसती शुभ्रपोरे : बरवले उद्यान दारिचें अंधारें : सुस्मित हास्याचें चांदिणे विखुरे ॥ आंगीचिया शृंगारांवरी ॥ पाईं रुळती नेपुरें : चालतां गाजती गंभीरें : तया नादाचेनि गजरें : गगन गज ॥ तेणें वनश्रीयें वानिवली हवाव : शृंगारा चढलें महागौरव : लज्जाछादिलें स्त्रीत्वाचे भाव : ते पडिले बाहिरे ॥ तियें उघडीं कामिनीरूपें बियाळें : देखौनि पक्षिये मदन मातावळे : झाडां उपजती डोहाळे : प्रमदासुखाचे ॥ तयां कामिनी रूपा झगटला : निऱ्हां मलयानिल दिसे मातलारजे न संभाळिती भुलला : झोंबे परिमळें फुलांचा ॥

सेथ सुघड कंठस्वराचे मांदळी : घुमत पारिवे घेत घुमाळी : अखंड श्रुतिभरते कहाळी : गुंगती मत्तभ्रमर ॥ संयोगाचिया लालसेपणा : वरी लावण्यें निरवावेयाची कामना : कैसिया सळें चालिल्या मृगनयना : त्रैलोक्यनाथावरी ॥ ते मदनमंडळीचे राणे : रतिविलासांचे आंगवणे : चालिले घालावेया घालणें : वीर वीर नायकावरी ॥ कीं तारुण्यजलें अती भरितां : विकारतरंगीं हेलावे देतां : तिया सौंदर्याचिया सरिता : लोटल्या सुख समुद्रावरी ॥ कीं तारुण्यरात्रिचिया अवसरां : उत्तान गंगेचिया तीरां : त्या लावण्य जळींचिया अप्सरा : निघाल्या खेळों ॥

इतक्या तयारीनंतर तो वसंतक्रीडेचा उत्सव कसा नयनमनोहर झाला, मदनानें मस्त होऊन इष्काचा कैफ चढलेल्या त्या सुंदर कामिनींच्या मनोगंगेचें धरण फुटून शृंगाराच्या लोंढ्यासरशा त्या वाहत जाऊन कामपौर्णिमेच्या विषयोद्यानांत रतिसागराला कशा मिळाल्या, हें सुंदर शब्दांनीं सांगत सांगत या एल्हणकवीनें ग्रंथ पुरा केला आहे.

या एल्हणपंडितापेक्षां **चाल्हणपंडित** हा विशेष विद्वान् असून त्याचा शिष्यसंप्रदाय मोठा होता. चक्रधर → नामदेव → कवीश्वर → नागंबा → कमळाकर → सीतांबा → चाल्हण अशी याची परंपरा दिसते. याचे ‘ सत्त्वानुवाद ’, ‘ ज्ञानप्रकाश ’ व ‘ शास्त्रसंबोधिनी टीका ’ असे तीन ग्रंथ आहेत. हा चाल्हणपंडित आपल्या स्वतःच्या ग्रंथरचनेपेक्षां आपला शिष्य जो **नृसिंह**, त्याच्याच ग्रंथामुळें विशेष प्रसिद्ध आहे. या चाल्हणानें—किंवा चाल्हणाच्या नांवावर त्याच्या नृसिंहशिष्यानें—रचिलेली एक श्रीमद्भगवद्गीताटीका आहे. हिला ‘ संकेतगीता ’ असें म्हणतात. या टीकेंत लेखकानें आपल्या पूर्वीच्या गीताटीकांचा उल्लेख केला आहे. प्राय: महानुभाव टीकाकार आपल्या पंथांतील टीकांशिवाय इतर मराठी टीकांचा उल्लेख करीत नाहींत. पण यांत यानें आपल्या पंथांतील व पंथाबाहेरील अनेक टीकांचा उल्लेख केला आहे. इतक्या इतर गीताटीका असतां ही नवी टीका कां लिहिली, हें सांगण्याच्या मिषानें कवि म्हणतो:—

भूषण कवी भास्करासारिखे : निवृत्ति सोपान ज्ञानदेवो निके : तयांची सरी केंवी ठाके : दैवहत : ।। शंकरभाष्य शंकरानुसारु : ज्ञानदेवो बोलिला अतिपसारू ।। तया अद्वैती भारू : भणौनि लाठा अर्थू : ।। श्रीधराचार्य पंडितश्रेष्ठु : पद व्याख्यानी स्पष्टु : परि पदार्थ-ज्ञानेंवीण द्रघष्टु : अर्थू केंवी सुचे : ।। लाडा रामेया भाऊ सुचला : परि तो आवरोनि बोलिला : गंगाधरें अर्थू केला : तो पदक्रमेंचि : ।। एवं टीकाकारा समस्तां : गीतार्थाची अपूर्णता : तो बिल्वकापुरी महिंद्र पंडिता : श्रीगुरू निरुपिते जाले : ।। परी तोहि नयेचि अर्थ : नाहीं प्रवृत्ती हेतु : नपुरेचि माझा मनोरथु : गीतार्थ विषयींचा : ।। ...... पहिलिया समस्ताहि टीका : परी शब्दार्थूचि नेटका : सिद्धांत भेटू आंवाका : तो दिसेचिना : ।।

असो. या गीताटीकेशिवाय नृसिंहाचा रुक्मिणीस्वयंवराच्या कथानकावर एक अडीच-हजार ओव्यांचा ग्रंथ आहे. या ग्रंथांचे शेवटीं नृसिंहानें ग्रंथलेखनकाल:— ' शरें पक्षें रामें चंद्रें सुभानु नामा । शकारंभा मधुराकोत्तमा ' असा दिला आहे. ' अङ्कानां वामतो गतिः ' या नियमानें शक १३२५ येतो व या शकाला सुभानु संवत्सरहि येतो. हा नृसिंहपंडित चिखली गांवचा राहणारा होता, असें यानें आपलें ग्रंथाचे शेवटीं आपली कांहीं माहिती दिली आहे तिजवरून होतें. याच काळीं **भीष्माचार्य** या नांवांचा एक विद्वान् ग्रंथकार ग्रंथरचनेंत निमग्न होता. भीष्माचार्य या नांवाचे दोन-तीन ग्रंथकार होऊन गेले. एक चौदाव्या शतकांत, दुसरा पंधराव्या शतकांत व तिसरा सोळाव्या शतकांत असे हे निरनिराळ्या तीन शतकांत हयात होते. यांपैकीं पहिल्यानें तीस-बत्तीस ग्रंथ लिहिले आहेत. याची ग्रंथरचना विविध आहे. आपल्या मार्गांतील सूत्रें वगैरेंवर याचे ग्रंथ आहेत. ब्रह्मविद्या, मायावाद यासंबंधींहि यानें लिहिलें आहे. नाममाला, स्मरणमाला, प्रसादमाला, मूर्तिज्ञान वगैरे भक्तिपर रचनाहि यानें केली आहे. यानें 'सुभाषितें' हि रचिलीं आहेत. पण याशिवाय यानें आपल्या पूर्वीच्या ग्रंथांवर टीकाहि लिहिल्या आहेत. याची ' धनंजय ' कोशावर एक टीका आहे.

'अंत्याक्षरी' वरहि याची टीका आहे. जयदेवकविकृत 'गीतगोविंदा'वर 'महाराष्ट्र-सुबोधिनी' नांवाची टीका यानें लिहिली आहे. यांत अन्वय, पदें पाडून शब्दार्थ व एकंदर अर्थ सांगितला आहे. ही टीका गद्य असणार, हें उघड आहे. याखेरीज विद्यार्थ्यांना व मराठी भाषेच्या भक्तांना उपयोगी पडतील असेहि ग्रंथ लिहिण्याची सुरुवात यानें केलेली आहे. 'नामविभक्ति' या ग्रंथांत व्याकरणासंबंधीं चांगलें विवेचन आहे. याप्रमाणेंच 'पंचवार्तिक' या नांवाचा भाषाशास्त्रावर एक ल्हानसा निबंध आहे. 'पंचवार्तिक' म्हणण्याचें कारण असें कीं, यांत (१) सूत्रलक्षण, (२) सूत्रप्रकृति, (३) सूत्रकारक, (४) सूत्रव्याख्यान, व (५) सूत्रस्वरूप अशीं प्रकरणें आहेत. यात भाषाशास्त्राच्या निरनिराळ्या भागांचे नियम सांगितले असून त्यांचीं उदाहरणें महानुभावी 'सूत्रग्रथां'तून दिलीं आहेत. पहिलें प्रकरण 'सूत्रलक्षण' हें आहे:— यांत सूत्राचे चार भेद सांगितले आहेत. (१) वचन, (२) वाक्य, (३) प्रकरण आणि (४) महावाक्य. प्रथम सूत्र म्हणजे काय? तर

'अध्याहारें कां पूर्वपदानुवृत्ति समवेत अल्पाक्षरें असंदिग्ध पदें असेति: तेंही पदीं करून जेणें प्रयोगें अर्थज्ञान सूत्रिजे म्हणजे मुद्रिजे, तया प्रयोगातें सूत्र म्हणिजे.'

आतां सूत्राचे चार भेद कैसे? तर सूत्राचे चार भेद (१) "वचन, (२) वाक्य, (३) प्रकरण, (४) महावाक्य." तें केवि? तर—

(१) वचनापासोनि अर्थ निफन्नला तो वचनार्थ: (२) वचनापासोनि वाक्य निफन्नलें: (३) वाक्यापासोनि प्रकरण निफन्नलें: (४) प्रकरणापासोनि महावाक्य निफन्नलें.

एकीं दोंशब्दीं आचार विचाराचा निर्वच तें निर्वचन बोलिजे: जेथें निर्वच नाहीं ते शब्द: लीळेचे दों चौं वचनांचा समुच्चय तें वाक्य: सातां पांचां वाक्यांचा मेळावा तें प्रकरण: साता पांचा प्रकरणांचा बांधा तें महावाक्य बोलिजे: आणि आवघेया महावाक्यांचा आंवाका तो पेंडी[1] बोलिजे: अवघेया

---

१. पुढें एके ठिकाणीं बारा-सोळा पेंड्यांचा समुच्चय तो 'भर' असें म्हटलें आहे. असे अनेक 'भर' मिळून ग्रंथ होतो.

निरूपणाचा आंवाका, अवघेया प्रकरणांचा समुच्चय यांते पेंडी बोलिजे[२].

यापुढें वचनकप्रण आहे. याला 'वचनप्रतिभिज्ञा' असें नांव दिलें आहे. यांत एक विशेष असा आहे कीं, द्विवचन वारंवार सांगितलें आहे. द्विवचनाला छाट चुकून एकदाहि दिली नाहीं. आपण संस्कृताप्रमाणें ग्रंथ लिहावा, या भावनेनें हें द्विवचन आलेलें दिसतें. कारण द्विवचनाचीं दिलेलीं उदाहरणें प्राय: अनेकवचनासारखींच आहेत. यापुढें लिंगप्रकरण आहे. अव्ययाला अलिंग म्हटलें आहे. जसें

"चो, आन, कीं, पर, मा, कें, का, एवमादि अव्यय : तियें लिंग रहितें म्हणोनि तयांतें 'अलिंग' बोलिजेति."

यापुढें 'सूत्रप्रकृति' म्हणून एक प्रकरण आहे. यांत सूत्राचा अर्थ-निर्णय तो कसा, हें सांगतांना म्हटलें आहे कीं:—

"निर्णय तीन प्रकाराचा. (१) शब्दाख्य, (२) संप्रदायाख्य, (३) रहस्याख्य भेदें त्रिविध जाणिजे. शब्दाख्य-निर्णय तो व्याकरणादिप्रधान. छंदोलंकार संगीतशास्त्रीं करून निर्धार : संप्रदायाख्य निर्णय तो श्रवण मनन निदिध्यासना करून निर्धारिजे : रहस्याख्य निर्णय तो सद्गुरुमुखें परसूत्रें निर्धारिजे:— यावीण वचनार्थाचें अज्ञान असे : म्हणोनि वचनार्थ अन्यथा उमटे? तेणें तो शास्त्रपतित होये : भट्टीं भणितलें अगा केशवदेया हें शास्त्र म्हणजे वचनरूप ईश्वर: तें वचन जें अन्यथा वाखाणिजे तर तो तया वचन-रूप परमेश्वराचा पतित बोलिजे। तेणें तो परमेश्वर दुखावला गा। वचनाचा यथार्थ उमटे। हें जैं नसे तैं वाकम दिगमाची परी होये म्हणोन सूत्रकारण बोलिजैल."

---

२. या प्रकरणांत व इतरत्र, यापूर्वी होऊन गेलेल्या भाषाशास्त्रग्रंथांचा उल्लेख आला आहे. उदाहरण, तयापासून ज्ञान व्हावया अणोबासी (अनो-व्यास या ग्रंथकारानें) लक्षण-रत्नाकर-प्रकरणीं सूत्रप्रकृतिभेद निरूपिले असे तियाचंप्रमाणें कवीश्वर महानुभावाच्या भाषाशास्त्रावरील ग्रंथाचा उल्लेख आहे. म्हणजे या पंचवार्तिकापूर्वी महाराष्ट्र-भाषाशास्त्रावर इतर ग्रंथ झाले होते, हें उघड दिसतें.

असें म्हणून यापुढल्या म्हणजे कारणप्रकरणास सुरुवात केली आहे. यांत सात विभक्ति व त्यांचे निरनिराळे अर्थ सांगितले आहेत. यांतच 'समासप्रकरण' गोविलें आहे. समासांचीं लक्षणें वगैरे आहेत. यांपैकीं एकदोन उदाहरणें देतों.

"प्रथमांतें पदें समासिजेति तो **कर्मधारय** समास जाणिजे : **यथा** : महंत जें राष्ट्र तें महाराष्ट्र: महंत जो पुरुष तो महापुरुष : **कर्मधारय** समासीं मध्यमपदाचा लोप आणिजे तै **मध्यमपदलोपी** बोलिजे : स्वसत्ता अधिष्ठित जो देश तो स्वदेश ...... आतां द्वंद्व : अनेक लिंगें प्रथमांतें एकत्र समासिजती तो 'द्वंद्व' समास जाणिजे,..."

यांत कांहीं नियम सांगितले आहेत. जसें—

"... द्वंद्व समासीं पूज्यपद पूर्वीं योजिजे. द्वंद्व समासीं इकारांत उकारांत जें पद तें पूर्वीं योजिजे : यथा ' हरिहर ' : द्वंद्व समासांत अल्पस्वर पूर्वीं योजिजे"... इ. इ.

या कवीचे हे ग्रंथ पाहिले असतां इंग्रजी अमलामुळें व अमलानंतर मराठी भाषेला कोश-व्याकरणादि संस्कार घडले, अशी समजूत साफ सोडून देणें भाग आहे.

असो. आतां या काळच्या आपल्या इकडे प्रसिद्ध असलेल्या कांहीं कवींचा निर्देश करून हें प्रकरण संपवूं. ज्ञानेश्वराची ती अनुपम गीताटीका सर्वभर झाल्यानंतर आपले कवि थोडे बुजून गेल्यासारखे झाले. ते गीतेवर टीका रचण्याच्या भानगडींत फारसे पडलेले दिसत नाहींत. त्यांचा बहुतेक भर भारतीय आख्यानांवर होता. या कवींत **बहिरा पिसा** याचा उल्लेख वारंवार केलेला आढळतो. बहिरा पिसा हाच **बहिरंभट** ऊर्फ **जातवेद** असावा. याचे एक चरित्रकार म्हणतात—

'बहिरोपंत राहे प्रतिष्ठानीं । गृहस्थव्यवहार करूनि ।
स्त्री कर्कशा तया लागुनी । तैसाच करी आश्रम ॥'

कांहीं दिवस असे काढिल्यावर एके दिवशीं तो बायकोवर रागावून घर सोडून गेला व पुढें त्यानें संन्यास घेतला.

'बहिरा जातवेद' आपल्या ग्रंथांत आपल्या गुरूचें नांव 'चिंतामणी' असें देतो[1] आणि आपली कुलस्वामिनी 'म्हाळसा' होय, असें सांगतो व 'कौंडिण्य' ऋषीच्या शुद्धवंशांत म्हणजे गोत्रांत जन्म पावल्यामुळें आपणास भक्तिवरदान मिळालें, असें म्हणतो. यानें केलेली श्रीभागवताच्या दशम स्कंधावरील टीका हल्लीं उपलब्ध आहे. प्रसिद्ध टीकाकार श्रीधरस्वामी यांच्या टीकेच्या आधारानें यानें आपली ही टीका लिहिली. या टीकेची ख्याति आज अनेक शतकें महाराष्ट्रांत चालली आहे. महीपतीबुवा या टीकेसंबंधीं म्हणतात—

श्रीभागवत दशम स्कन्ध देखा । त्यावरी केली महाराष्ट्रटीका ।
त्या सप्रेम ओव्या अमोलिका । ऐकतां भाविकां निजमुख ॥

आणि ही टीका वाचली असतां असें दिसतें कीं, हिजपासून भाविकांस तर सुख होईलच पण अभाविकांसहि ही वाचून आनंदसुखाचा लाभ मिळेल. मात्र तो वाचक सहृदय असला पाहिजे. जगज्जननी श्रीयशोदामाता पुत्रवंती झाली, त्या वेळीं अनेक लेकुरवाळ्या स्त्रिया 'पुत्रादाण' करिण्याकरतां बाळंतविडा घेऊन तेथें गेल्या त्या समयाचा एक उतारा या ग्रंथांतून देतों. यावरून कवीच्या कृतीचा आस्वाद मिळून पांच-सातशें वर्षांपूर्वी हा संस्कारसोहळा महाराष्ट्रांत कसा करीता हेंहि वाचकांस कळेल.

आतां गोपिकांची लाहा कीं । शृंगारू करिती येकीमेकी । चाला,
चाला, गे नवल कीं । यशोदेसि पुत्रु ॥ ... ... लौकरी चाला

---

१. महीपती व आणखीहि इतर चरित्रकार बहिरंभट्टाच्या गुरूचें नांव 'वडवाळसिद्ध जगनाथ' असें देतात. ते म्हणतात कीं, बायकोच्या वैतागानें त्रासून यानें घर सोडिलें व काजीकडे जाऊन हा मुसुलमान झाला, परंतु सुंता करून घेण्यास कबूल होईना. म्हणून मुसुलमान त्यास मुसुलमान म्हणत ना व हिंदू त्यास आपले जातींत परत घेत ना. पुढें हा वडवाळसिद्धाकडे गेला तेव्हां त्यानें यास सांगितलें कीं, विठोबाच्या येथें हिंदुमुसुलमान हा भेदाभेद नाहीं. तरी तूं त्यास शरण जाऊन त्याची भक्ति करावी. त्यानंतर तो भक्तिमार्गांत शिरला व पंढरीची वारी करूं लागला.

गे साजणीं । पुत्रेंसी वोवाळूं बाळंतिणी । शीघ्र ल्या ग लेणीं । तांतडी सारिखीं ॥ नेसलियां रुचीचीं वस्त्रें ।-वाणें परिचीं विचित्रें । आळंकारादि कर्णपत्रें । मोतिलगें ॥ नेत्रीं सूदलें आंजन । पाहावया यशवदेचें निधान । कैसे तांबोळें वदन । सुरंग दिसें ॥ नव कुंकुम पींजरी । तया चिरकुली सुंदरी । केशर चंदनेंसी अंबरीं । मळिवट शोभे ॥ थोर असे कटितट । चंचळ कुच घणवट । आवेव दिसती प्रगट । बुंथि जन्ही ॥ घेवोनि कनकताटें करीं । वाळांतणिविडा आंतरी । पुष्पें फळें हरिद्री । आणि वस्त्रें ॥ या कृष्णासीं बाळलेणें । विदुलीं जित्रती चरगभूषणें । सरी आंकुडे सुवर्णें । रत्नमंडीत ॥ आणि वस्त्रें नंदासी । वरि कृष्णाच्या अलंकारासीं । ऐश्या आल्या मंदिरासी । बाळांतिणीच्या ॥ पाटावरी बाळंतिणी । त्या बैसविती कामिणी । मग करिती आक्षवाणी । कृष्णें सहित ॥ गोपिका कृष्ण वोंवाळिती । वोवाळितां ऐसें मागती । चिरकाळ आमुतें श्रीपती । पाळिता होये ॥ मग अळंकार अर्पिले । पुर्णासी आंगुळें ल्वविलें । जसवंतिनंदा बैशविलें । पाटावरी ॥ मग वस्त्रें अर्पिती । मंगळतुरें वाजती । त्यांसह पुत्रा पडती । बोवाळणि ॥ हळदिस्नेहें मिश्रित । उदकयोगे सिंचन करित । तो सर्वद्रष्टा पाहात । टकमकित ॥

अशी ही गोड टीका पाळण-लक्ष आहे. शिवाय

> ‘ आणिक पदपदांतरें शेवटीं । काव्य रचिलें बहिरंभटीं ।
> दुरितें पळती उठाउठीं । कर्णसंपुटीं ऐकतां ॥ ’

यापैकींहि कांहीं थोडी रचना उपलब्ध आहे.

बहिरंभट्टानें आपला गुरु चिंतामणी म्हणून दिला असून महाराष्ट्रांत बहिरंभट्टाचा गुरु वडवाळसिद्ध नागेश होय, अशी फार दृढ समजूत आहे. यांचा मेळ नीटसा बसत नाहीं. कदाचित् त्याचा चिंतामणी हा प्रथमगुरु असून, मागाहून वर टीपेंत दिलेल्या हकीकतीनंतर तो नागेशाच्या चरणीं लागला असेल, हें संभवनीय आहे. कारण हा वडवाळ सिद्ध नागेश तशाच योग्यतेचा साधुपुरुष होता. नागेश हा बालेघाट्य-

कडील राहणारा. सदासर्वकाळ अयाचित वृत्तीनें जगांत वावरे. सर्व ठिकाणीं, म्हणजे सर्व प्राणिमात्रांत व सर्व वस्तुजाताचे ठायीं, परमेश्वर भरला असून त्यांत कोणताहि भेदाभेद नाहीं, असें तो मानी. जें मिळेल तें खावें व सांपडेल तें बरें किंवा घाणेरडें हा विकल्प मनांत न आणित, कसेंहि असेल तें पाणी प्यावें, आणि एखाद्या पिशाप्रमाणें काळ क्रमावा, अशी त्याची राहणी असे. मोरींतलें घाणेरडें पाणीहि तो गंगाजलाप्रमाणें शुद्ध व स्वच्छ मानून घटाघट पीई. कोणी रेड्याचें ओलें कातडें दिलें तरी तेंहि तो पांघरी, त्यासहि त्याची ना नसे. सर्व वस्तु मंगल आहेत कारण सर्वव्यापी परमेश्वराव्यतिरिक्त कांहीं रितें नाहीं, असें तो म्हणे व सर्वांस उपदेशहि असाच करी. याचीं कांहीं पदें व थोडेसे अभंगां आणि 'संकटहरणी शिवग्रंथे' नांवाचें एक लहानसें ( १४१ ओव्यांचें ) प्रकरण एवढीच कृति उपलब्ध आहे. याच्या कालासंबंधींहि नक्की माहिती सांगण्यासारखें साधन उपलब्ध नाहीं. हा ज्ञानेश्वरांचा समकालीन होता, अशी मात्र सर्वत्र समजूत आहे. याच्या शिष्यवर्गांत 'पाठक' मंडळीचा उल्लेख वारंवार करण्यांत येतो. पाठकांत तीन नांवें विशेषेंकरून प्रसिद्ध आहेत. एक **कान्हो पाठक,** दुसरें **नामा पाठक** व तिसरें **निर्मळ पाठक.** यांपैकीं **निर्मळ पाठका**चें एक ओवीबद्ध पंचतंत्र मात्र उपलब्ध आहे. याचे शेवटीं

'पूर्वीं प्रति होती मोकळी । ते वोवीबंधें संकळली ।
म्हा साक्षेपें निपजविली । म्हणे निर्मळ पाठकू ॥'

यावरून त्या काळीं प्रचलित असलेल्या जुन्या गद्यात्मक पंचतंत्रावरून यानें ओवीबद्ध रचना केली, हें उघड आहे. याशिवाय याची कोणतीहि कृति नाहीं. **नामा पाठका**ची बरीच कृति हल्लीं उपलब्ध आहे. 'नामरत्नमाला',

---

१. या ग्रंथांत पुढील ओवी आली आहे—
मिती मार्गेश्वर वद्य बीज । गुरुवारीं लिहिला सहज ।
लिहितां स्वात्मकार्य माझें । करी अज्ञाना ज्ञानसिद्धी ॥
शके तेरासे तेरा । (१३१३)

'भरतभेट', वगैरेंसारख्या लहान-सहान प्रकरणांशिवाय व पदांशिवाय याचा 'अश्वमेध' हा एक मोठा ग्रंथ आहे. हा आपला अश्वमेध ग्रंथ हें 'व्यासोच्छिष्ट अमृत' असून त्याच्या सेवनानें सर्व संकटें हरण पावतील, असें नामा पाठक वारंवार सांगतो. ग्रंथाचे ९५ प्रसंग असून ग्रंथ बराच मोठा आहे. याची भाषा व रचना अगदीं साधारण प्रतीची असल्यामुळें हा ग्रंथ फारसा प्रचारांत असलेला दिसत नाहीं. यानें आपल्या ग्रंथांत रामानें अश्व सोडला त्याची व पांडवांनीं अश्व सोडला त्याची अशा दोन्ही कथा दिल्या आहेत. हा ग्रंथ प्रचारांत नसण्याचें दुसरें कारण असें दिसतें कीं, याच कथेवर श्रीधरानेंहि एक अश्वमेध-ग्रंथ रचिला आहे. श्रीधराची वाणी विशेष गोड असल्यामुळें व त्याचे इतर ग्रंथहि पुष्कळच लोकप्रिय असल्यामुळें साहजिकपणें अश्वमेध वाचणारा श्रीधराचाच अश्वमेध वाचतो[1]. नामा पाठकानें सांगितलेली चंद्रहासाची कथा एकंदर ग्रंथाच्या मानानें पुष्कळ सरस उतरली आहे. नामा पाठकाचा उल्लेख एकनाथाच्या संतमाळेंत आहे. यावरून हा बराच प्राचीन

---

१. नामा पाठक व श्रीधरस्वामी यांखेरीज आणखीहि अनेकांनीं अश्व-मेधावर मराठी भाषेंत ग्रंथरचना केलेली आहे. तिसरा अश्वमेध कृष्णदास नांवाच्या एका कवीचा आहे. चौथा एक अश्वमेध 'दादोसुतमुद्गल' याचा आहे. याचे शेवटीं 'पंधराशें सत्तरी । सर्वधारीनाम संवत्सरीं' ग्रंथ पुरा झाला, असें म्हटलें आहे. पांचवा एक अश्वमेध 'नारायण विप्र' यानें लिहिलेला आहे. ग्रंथाचे शेवटीं यानें ग्रंथसमाप्तीचा काळ शार्वरी संवत्सर भाद्रपद षष्ठी असा दिला आहे. हा विप्रनारायण आपली परंपरा नागनाथ → दाबाजी ऊर्फ दामोदर → गोपीनाथ → विप्रनारायण अशी देतो. सहावा जगजीवनाचा. हा अगदीं साधारण व लहान ग्रंथ आहे. सातवा नामा विष्णुदासाचा. रामदासी परंपरेंतील माधवस्वामींनीं लिहिलेला व विठ्ठल-नाथांनीं लिहिलेला हे दोन्ही अश्वमेध बऱ्यापैकीं आहेत. म्हणजे एकंदर या कथानकावर नऊ ग्रंथ झाले. विठ्ठलनाथानें 'सद्गुरू माझा गणेशनाथ सारशांत राहतो । ऐका रसाळ अश्वमेध विठ्ठलनाथ गातो' असें गुरूचें नांव ग्रंथांत दिलें आहे. याशिवाय शिवकल्याणचाहि एक अश्वमेध आहे, असें म्हणतात.

कवि असावा, असें दिसतें.

या नामा पाठकाचा जो आजा तोच **कान्हो पाठक.** कान्हो पाठक → हरिपाठक → नामपाठक अशी यांची परंपरा आढळते. कान्हो पाठक हा केंदूरचा राहणारा. हा श्रीज्ञानेश्वर-महाराजांचा समकालीन असून त्यांच्या फार लोभांतला होता. हें जग सोडून जाते वेळेस ज्ञानेश्वर-महाराजांनीं आपली सर्व चीजवस्त कान्हो पाठकास दिली, असा वारकरी-मंडळींत समज आहे. अजूनहि ज्ञानेश्वरांच्या आरतीचे वेळीं विडाखिरापतीचा मान कान्हो पाठकाच्या वंशजांकडे आहे. कान्हो पाठकाचे कांहीं अभंग व 'गीतासार' या नांवाचें एक लहानसें प्रकरण हल्लीं उपलब्ध आहे, त्यांत

'गुरूपदेश नागनाथू। कान्हो पाठक विनवितु'

असें म्हटलें आहे. याचे अभंगांतहि 'हृदयीं धरीं नागेश। म्हणे कान्हो पाठक' अशासारखे उल्लेख आहेत. यावरून हा नागनाथाचा शिष्य असून नागनाथ हाहि ज्ञानेश्वरांचा समकालीन असावा, असें मानणें भाग होतें.

या सुमाराचा आणखी एक कवि आपणांस उपलब्ध आहे. याचें नांव **चोंभा.** रंगनाथस्वामी निगडीकर, शेखमहमद वगैरे कवींनीं आपल्या 'संतमालिकां'त याला नमन केलें आहे. याचें 'उखाहरण' नांवाचें काव्य उपलब्ध आहे; पण तें त्रुटित आहे. याचें कवन नेहमींच्या प्रचाराबाहेरचें आहे. आपल्या काव्यांत यानें ओवी-छंदाचा उपयोग केला आहे; पण याच्या ओवीचा प्रकार इतर कोणत्याहि कवीच्या ओवीपेक्षां अगदीं निराळा आहे. याच्या ओवीच्या चरणांपैकीं पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या चरणांच्या शेवटीं यमक असतें व मधलाच तिसरा चरण मात्र निर्यमक असतो. उदाहरणार्थ—

गीताचेन नादें। चरों विसरलीं स्वापदें।
हरणीं नोडविलें कर्णं। तीयें राहिलीं नादबोधें॥

राग‍ें व्यापिलें अंबर । पक्षिजाती नेघती चारा ।
विसरौनु येक जाले । पंचानन आणि कुंजर ॥
ठेलिया समुद्राचिया लता । बाहीं वीसरलिया सरिता ।
गगनीं वारा मंदु जाला । सैरा घडघडीतु होता ॥
रागध्वनी कानीं पडीला । सूर्याचा रथुची थांबला ।
नेणो चुकलें दीन मान । अरुणु हाकूं विसरला ॥

परंतु हाहि क्रम चोंभा नेहमीं पाळतोच, असें नाहीं. केव्हां-केव्हां पहिले दोनच चरण किंवा पहिला व चवथा असे दोन चरण सयमक करितो, आणि बाकीचे निर्यमक करितो. केव्हां-केव्हां तर सबंध ओवीच निर्यमक लिहितो. असा हा विचित्र कवि नक्की कधीं व कोठें होता, हें कांहीं कळण्यास मार्ग नाहीं. याच्या ग्रंथांतील भाषेवरून व शब्दांच्या रूपांवरून हा शके तेराशेंच्या सुमाराचा असावा, असें मानितात. अशा अनेक प्रकारच्या ओव्या चौदाव्या शतकाचे सुमारास लिहिल्या जात असत. ओव्यांचे अक्षरांवरून, चरणांवरून, यमकांवरून झालेले नानाविध प्रकार महानुभावग्रंथकारांनीं आपल्या 'काव्यमार्तंड', 'काव्यदीपिका', 'ज्ञानदर्पण' वगैरे साहित्यग्रंथांत सांगितलेले आहेत. यांपैकीं औटचरणी म्हणजे साडेतीन-चरणी, व साडेचार-चरणी व क्वचित् चार-चरणी ओव्यांचाच स्वीकार महाराष्ट्र-कवींनीं केलेला दिसतो.

चौदाव्या शतकांत व पंधराव्याच्या पूर्वार्धात मराठींत ग्रंथरचना झाली नाहीं, व त्या शेदीडशें वर्षांत मराठी लेखकांची लेखणी विश्रांति घेत पडली होती, असा फार दिवसांचा समज आहे. पण तो अगदीं चुकीचा आहे. पूर्वीप्रमाणें याहि काळांत महाराष्ट्रांत ग्रंथरचनेचा क्रम सारखा चालू होता. पण या काळांतील रचना एकतर फार गुप्त ठेवण्यांत आली व जी थोडीथोडी बाहेर उजेडांत आली तिचा परकी राजकर्त्यांनीं व कडव्या असहिष्णु धर्मवेड्यांनीं जाळपोळ करून अगदीं नाश करून टाकिला. मुसुलमानांनीं ग्रंथांचें काय केलें, याची कहाणी सर्वप्रसिद्धच आहे. पण दक्षिणेकडे समुद्रावरून आलेल्या ख्रिस्ती लोकांनीं तर या

बाबींत मुसुलमानांच्या वर ताण केली. त्यांनीं ग्रंथ जाळले, इतकेंच नव्हे, तर ते रचणारांनाहि शासन लाविलें. आणखी याचेहि पुढें जाऊन त्यांनीं एक जाहीरनामा काढून, एतद्देशीय लोकांनीं पोर्तुगीज भाषाच वापरली पाहिजे, अशी ताकीद दिली[१]. बरें, त्यानंतर आज दोन-अडीचशें वर्षांत यांपैकीं ग्रंथ मिळविण्याची कोणीं करावी तशी खटपट केली नाहीं किंवा जे मिळाले ते छापविण्याची तजवीज केली नाहीं. त्यामुळें तर कीटक आणि हवा या सर्वभक्षक शत्रूंनीं त्यांचा ठावच पुसून टाकिला; पण यांतहि आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. जुन्या ग्रंथसंपत्तीची पूर्ण अनास्था करणें हा आपला एक जन्मसिद्ध हक्कच आहे. जेथें दासोपंताच्या 'गीतार्णवा'सारख्या ग्रंथाची कोणी वास्तपुस्त घेत नाहीं, तुकारामाची सर्वांत जुनी संहिताहि धूळ खात पडते, मुक्तेश्वराचें नवें प्रकरण हातीं आलें तर तेंहि छापण्याची कोणी परवा करीत नाहीं, श्रीधराचीं शेंकडों प्रकरणें रुमालांत कुजत पडलीं आहेत, मोरोपंतांचे ग्रंथ त्यांच्या घरच्या पोथ्यांवरून छापणारांनाहि सावकारांच्या पाहिऱ्या झिजवून अखेर अप्रसिद्ध प्रकरणांचा भागहि प्रसिद्ध करणें दुरापास्त होतें, तेथें चौदाव्या शतकांतल्या साधारण कवींना कोण

---

१. In 1684 we are not a little surprised to see a Vice-regal Proclamation forbidding the use of Konkani insisting on the Natives of the Konkan speaking Portugese. Introduction to F. Stephen's Christian Puran. ख्रिस्ती इतिहासकार Cunha Rivara म्हणतो:—No primeiro fogo da conguista derruba ram—sa os pagodes esmigalharam—se todos os emblem as de culto gentilico equeimaram-se todos os livros eser itos na lingua vernacul acomo convictos ou suspeitos de conterem os preceitos de idolatria.

( " पोर्तुगीजांनीं मुलुखगिरीच्या पहिल्या भडिमारांत सारीं देवळें जमीनदोस्त करून टाकिलीं, हिंदुत्वाच्या खाणाखुणा असलेली प्रत्येक चीजवस्त धुळीला मिळविली आणि मूर्तिपूजेच्या संशयावरून देशी भाषांत लिहिलेले सर्व ग्रंथ जाळूनपोळन फस्त केले ! "

प्रमोद, वर्ष २, अं. ६

भीक घालणार ? आतां कदाचित् ते चौदाव्या शतकांतले सब्ब प्राचीन, कौतुकास्पद, भाषाशास्त्राच्या व सामाजिक इतिहासाच्या उपयोगी म्हणून कोणी त्यांना उजेडांत आणील म्हणावें तर तेंहि असंभवनीयच. चौदाव्या काय, पण याच्याहि आधींच्या ज्ञानदेव-समकालीन गद्य व पद्य ग्रंथांच्या प्रकाशनाला साधारण लोक काय, पण सरस्वतीचें आद्यपीठ असलेलें विद्यापीठ, तेंहि हातभार लावीना, तेथें काय बोलावें ? इतकें औदासीन्य, इतकी अनास्था आणि इतका आळस जेथें भरलेला आहे, तेथें काव्यगंगा प्रत्यक्ष प्रकट झाली तरी काय उपयोग ? 'गंगा आली आळशावरी, तर आळशी उठून पळे दुरी ?' अशी स्थिति आमच्या काव्यगंगेची आहे.



# एकनाथ

पंधराव्या शतकाच्या शेवटल्या पादांत जे पुरुष आपल्या ज्ञानानें व कर्तृत्वानें नांवाजले गेले त्या सर्वांत **नृसिंह सरस्वती** व **जनार्दनस्वामी** हे प्रमुख आहेत. नृसिंह सरस्वतींची कृति हल्लीं उपलब्ध नाहीं. पण त्यांच्या शिष्यवर्गांतला **सरस्वती गंगाधर** यानें रचिलेला 'गुरुचरित्र' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. सरस्वती गंगाधर हा कौंडिण्यगोत्री आपस्तंब ब्राह्मण. याचें उपनांव साखरे. यानें आपली पितृपरंपरा सायंदेव—नागनाथ—देवराव—गंगाधर अशी दिली आहे.[1] याच्या आईचें नांव चंपा. ही काश्यपगोत्री चौंडेश्वर नांवाच्या पुरुषाची मुलगी. या सरस्वती गंगाधरानें आपला ग्रंथ सिद्ध व नामधारक यांच्या संवादरूपानें सांगितला आहे. यांत श्रीदत्तात्रेयाच्या अवताराचें चरित्र वर्णन केलें आहे. या गुरुचरित्रांतील कित्येक ओव्या 'विवेकसिंधू'तील ओव्यांशीं इतक्या जुळतात कीं, त्या पाहून कवीनें या विवेकसिंधूतूनच घेतल्या असाव्या, असें कोणाच्याहि मनांत येईल. तसेंच, या ग्रंथांतलें संविधानक फार उत्कृष्ट आहे किंवा यांतली भाषा विशेष चांगली आहे, असें बिलकूल नाहीं. तरीदेखील महाराष्ट्रांत जे अत्यंत पूज्य असे ग्रंथ आहेत त्यांपैकींच हा एक आहे. याचें एक कारण असें आहे कीं, दत्तोपासकांना पारायण करण्याला योग्य असा याच्यासारखा दुसरा ग्रंथ आपल्या समाजांत नाहीं. महानुभावपंथांतील ग्रंथकारांनीं यापूर्वी अनेक दत्तात्रेयचरित्रें लिहिलेलीं आहेत; परंतु समजून-उमजून महानुभावी ग्रंथांचा पाठ कोणीहि करीत नाहीं. यामुळें ते ग्रंथ असून-नसून सारखेच झाले. तेव्हां आपल्या समाजांत

---

१. या सरस्वती गंगाधराचे वंशज गाणगापुराजवळ कडगंची या गांवीं अजून नांदत आहेत व मोडगांव येथें या ग्रंथाची एक फार जुनी प्रत आहे, असें कळतें.

नरहरभट बीन कृष्णंभट पुजारी यांचें पत्र.

वाचला जाईल, असा या दैवतांच्या आराधनेचा हाच ग्रंथ असल्या-मुळें या ग्रंथाचे संबंधानें लोकांत एके तऱ्हेचा भाव उत्पन्न झाला आहे, व या भाविक समजुतीमुळें सरस्वती गंगाधराचा हा ग्रंथ अगदीं अजरामर होऊन राहिला आहे. मराठींतल्या ज्या थोड्या ग्रंथांचें संस्कृतांत भाषांतर झालें आहे त्यांपैकीं हा एक होय. नृसिंहसरस्वतीचा काळ गुरुचरित्रांत—

"कन्यागत बृहस्पतीशीं । बहुधान्य नाम संवत्सराशीं ।
सूर्य चाले उत्तर गतीशीं । कुंभसंक्रांत परियेसा ॥
शिशिर ऋतु माघ मास । असित पक्ष प्रतिपदेस ।
शुक्रवार पुण्य दिवस । गुरू बैसले निजानंदीं ॥"

याच संबंधाचा दुसरा एक श्लोक रा. ब. चिं. वि. वैद्य यांना औदुंबर प्रांतीं नारायण बुवा वडगांवकर यांचे वाडयांत लिहिलेला आढळला तो असाः—

तेराशें ऐंशि शाकीं घटगर विना योग आहेत सारे ।
सिद्धें नामांकिता जें कथन गुरुचरित्रांत केले पहा रे ॥ इ. इ.

हे सर्व योग शके १३८०-मध्यें बरोबर येतात. नृसिंहसरस्वतींनीं बेदरच्या बादशहाच्या पायास आलेला फोड बरा केला म्हणून बादशहानें त्यांचा मोठा गौरव केला; व त्यांची फार थाटाची मिरवणूक काढिली, असें गुरुचरित्रांत म्हटलें आहे. हा बादशहा अल्लाउद्दीनशहा बहामनी असावा. नृसिंहसरस्वतीप्रमाणेंच **जनार्दनस्वामी** हाहि त्या काळचा फार थोर पुरुष होय. कोणी म्हणतात, हा नृसिंहसरस्वतींचा शिष्य. कोणी म्हणतात कीं, याला प्रत्यक्ष दत्तात्रेयांनींच अनुग्रह दिला. याला उपदेश कोणाचाहि असो, पण हा कडकडीत दत्तोपासक होता यांत संशय नाहीं. जनार्दनपंताचें मूळ घराणें चाळीसगांवचें. तेथील हे वतनदार देशपांडे. यांचा जन्म चाळीसगांव येथें शके १४२६-मध्यें रक्ताक्षी संवत्सरीं झाला. परंतु जनार्दनस्वामी हे वयांत आल्यावर यांचें राहणें

पैठणास फार असे. यांस देवगडाच्या किल्ल्यावर यवन किल्लेदारांच्या कारभारीपणाचें काम होतें. आपली सरकारचाकरी संभाळून हे नेहमीं ईश्वरभक्तींत मग्न असत. असें म्हणतात कीं, दोन धन्यांची नोकरी केव्हांहि नीट होत नाहीं; पण जनार्दनपंतानें आपल्या अंगच्या गुणानें ईश्वर व सरकार या दोन्ही धन्यांस अगदीं आपलेंसें करून ठेविलें होतें. परमेश्वराचा यांना साक्षात्कार असे, अशी त्या वेळच्या सर्व लोकांची दृढ समजूत दिसते. यांचे कांहीं अभंग व कांहीं पदें मात्र आहेत. यांखेरीज यांची कांहीं रचना प्रसिद्ध नाहीं. यांनीं एक श्रीदत्तस्तुतिपर ग्रंथ लिहिला आहे, असें म्हणतात; पण हा उपलब्ध नाहीं. जनार्दनस्वामी शके १४९७-चे सुमारास समाधिस्थ झाले[2]. यांची समाधि दौलताबादेस आहे. या पुरुषाचें नांव याच्या ग्रंथापेक्षां याच्या शिष्यसमुदायामुळेंच महाराष्ट्रांत अजरामर होऊन राहिलें आहे. याच्या शिष्यमंडळीपैकीं **पैठणकर एकनाथ** हा फार प्रसिद्ध आहे. किंबहुना, ज्ञानेश्वराशिवाय बाकी सर्व महाराष्ट्रसंतमंडळांत एकनाथच श्रेष्ठ होय. **एकनाथा**चा जन्म शके १४७०-मध्यें पैठणास झाला. पूर्वीं भानुदास या नांवाचा एक पुरुष होऊन गेला. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. याचा जन्म शके १३७०-चे सुमारास झाला. हा वैराग्यसंपन्न पुतळा सदासर्वकाळ ईश्वरभजनांत निमग्न असे. या काळीं विजयनगरचें राज्य भरभराटींत होतें व तेथील राजा श्रीकृष्णराज हा राज्याधीश होता. विजयनगरचें साम्राज्य फार

---

१. जनार्दनस्वामीस 'शहा दत्त अलमा प्रभू' यांचा उपदेश झाला असल्याचाहि क्वचित् उल्लेख आढळतो. तसेंच सुमारें शके १८२०-मध्यें ताहराबादकरांचें दफ्तर तपाशीत असतां त्यांत 'समाधी-प्रकरण' नांवाची एक पोथी मीं पाहिली होती. तींत शेवटीं 'गिरिधरनाथें मज। दाविली हातोटी। वटवृक्षा तळवंटी। समाधी दिली' असें म्हटलें होतें. जनार्दनस्वामीस अनुग्रह शके १४५३ खरनाम संवत्सरीं झाला. कोणी हा शक १४१३ व समाधिकाल १४९४ हा समजतात. कांहीं चरित्रकार म्हणतात कीं, जनार्दनस्वामी सुभेदार होते.

२. कदाचित् हा शक सुमारें १४५५-हि असेल

विस्तीर्ण असून याची राजधानी जें विजयनगर शहर तें हल्लींच्या लंडन, न्यूयॉर्क, पारिस वगैरे शहरांपेक्षांहि अवाढव्य होतें. अशा या आपल्या राजधानींत दुनियेंतील सर्व चांगल्या व महत्त्वाच्या वस्तु असाव्या, असें तेथील राजास वाटणें साहजिक आहे; आणि कदाचित् याच मोहानें कृष्णरायानें पंढरपूरची श्रीविठ्ठलाची मूर्ति आपल्या राजधानींत नेली; व तेथें तिची स्थापनाहि केली. परंतु पुढें या भानुदासानें महत्प्रयासानें व आपल्या अंगच्या अलौकिक कर्तृत्वानें नेलेली ही विठ्ठलाची मूर्ति तेथून परत पंढरपुरास आणिली. कोणी म्हणतात, केवळ आपल्या अंगच्या भक्तिबलानेंच ही मूर्ति भानुदासानें परत आणिली[1]. आणि हें खरेंहि दिसतें. कारण त्या मूर्तीसंबंधानें मनांत पूर्ण भक्ति व अंगांत दृढभाव असल्यावांचून भानुदास या यातायातींत पडला नसता व पडला असता तरी त्याला यश आलें नसतें. कसेंहि असो. भानुदासानें विठ्ठलमूर्ति परत आणिल्याच्या काव्यमय कथानकाच्या मुळाशीं खरा इतिहास निःसंशय आहे. हल्लीं तेथें जाऊन पाहतां विजयनगरास[2] ‘श्रीविजय विठ्ठलाचें’ देऊळ मात्र आहे, पण त्यांत विठ्ठलाची मूर्ति नाहीं.

महान् भगवद्भक्त म्हणून भानुदासाची आधींच मोठी ख्याति होती; पण सर्व विठ्ठलभक्तांना अत्यंत स्मरणीय अशा त्याच्या या कृत्यामुळें तर त्याचा लौकिक फारच झाला. भानुदास हा आपल्या अंगच्या कर्तृत्वामुळें तसाच आपल्या वाणीमुळेंहि महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे.

---

१. भानुदासाच्या कुळांत विठ्ठलभक्ति फार पूर्वींपासून चालू होती, असें महीपती वगैरे म्हणतात. पण एकनाथ लिहितो कीं, आमचे कुळांत ‘कृष्णभक्ती’ पूर्वींपासून चालत होती.

२. विजयनगर हें शहर हल्लींच्या हासपेट स्टेशनापासून सात मैलांवर आहे. येथील तुंगभद्रा नदीकांठचें हंपी-विरूपाक्षाचें देऊळ फारच रमणीय आहे. देवळांतील पुजारी रात्रीचे प्रहरीं देवाला आळवितांना जीं गाणीं म्हणतात त्यांत मराठी गाणीं व पदेंहि असतात. यांनीं म्हटलेलीं “देवा तुम्हीं

[पान २५४ पहा.]

भाकितों करुणा । पंढरीच्या राया । अगा यादव राया । रामकृष्णा ॥
तूं माय माउली । जीवीं जीवन कळा । भक्तांचा लळा । पुरविसी या ॥
आवडे सावडें । भक्तांचें कीर्तन । नाचसी येऊन । निरभिमानें ॥
भानुदास म्हणे । पुरवी माझे लळे । विठ्ठले सांवळे । माउलीये ॥
बसुनि अधिष्ठान । रामनाम ध्यान । यापरि साधन । नेणें कांहीं ॥
एकविध भाव । दृढता हें मन । यापरि साधन । आन नाहीं ॥
परद्रव्य परदारा । यांचा तो विटाळ । यावीण निर्मळ । तप नाहीं ॥
भानुदास म्हणे । रामनाम गुढी । लाविली चोखडी । कलियुगीं ॥

अशा या भानुदासाच्या वंशांतच एकनाथाचा जन्म झाला. भानुदासाचा मुलगा चक्रपाणी, चक्रपाणीचा सूर्यनारायण व सूर्यनारायणाचा एकनाथ¹, अशी एकनाथाची पितृपरंपरा आहे. एकनाथाच्या आईचें नांव रुक्मिणी. एकनाथाच्या जन्मानंतर त्याचीं मातापितरें लवकरच निवर्तलीं. यामुळें

---

[पान २५३-वरून.]

मंदिरि कधीं तरी याल " वगैरे गाणीं तर मला फारच आवडलीं. प्रत्येक महाराष्ट्रियानें एक वेळ अवश्य जावें, असें हें ठिकाण आहे. या ठिकाणीं अशी एक मौजेची आख्यायिका सांगतात कीं, तेथें दशावतारांचीं देवळें होतीं, व मुसुलमानांनीं देवळें पाडण्याचा सपाटा लाविला त्या वेळीं ते देवळें पाडीत वराहस्वामीच्या देवळाजवळ आले. तेथें त्यांनीं देवळांतील वराहाच्या आकाराची प्रतिमा पाहिली तेव्हां ते तेथेंच थबकले. यामुळें पुढचीं देवळें त्यांच्या सपाटचांतून वांचलीं; व त्या वेळीं मूर्ति कायम राहिल्या. हल्लीं मात्र तेथें मूर्ति फोडून त्यांची खडी रस्त्यावर टाकतांना नजरेस पडते. असो. या ठिकाणीं जुन्या दप्तरखान्यापैकीं कांहीं शिस्तीचे कागद वगैरे मराठींत लिहिलेले अजून आहेत, असें तेथें अनेक लोकांनीं सांगितलें. महाराष्ट्र-सारस्वताचा तत्कालीन बराच भाग येथें निःसंशय सांपडेल. श्रीशिवाजी महाराजांनीं येथील राजास एक इनामपत्र रुप्याच्या पत्र्यावर लिहून दिलें होतें. विजयनगरच्या शेवटल्या राजाचीं चित्रें सरदार आबासाहेब मुजुमदार यांचे संग्रहांतील एका ग्रंथांत आहेत.

१. एकनाथ हें पाळण्यांतलें नांव दिसत नाहीं. हें नांव या महापुरुषाला पुढें केव्हांतरी दिलें गेलें असावें; व मग पहिलें पाळण्यांतलें नांव मागें पडून विसरलें गेलें, असें दिसतें. थोरल्या बाजीरावसाहेबांचें लहानपणचें नांव विसूभाऊ हें कितीकांना ठाऊक आहे !!

एकनाथाचें सर्व पालनपोषण त्याचा आजा जो चक्रपाणी त्यानेंच केलें. लहानपणापासूनच एकनाथाचें चित्त परमेश्वराकडे वळलेलें होतें. दगडाचे देव मांडून त्यांची पूजा करावी व कांहींतरी पुराणांतील गोष्ट सांगून कीर्तन करावें, अशा तऱ्हेचे याचे खेळ असत. याची सहाव्या वर्षी मुंज होऊन पुढें विद्याभ्यासास सुरुवात झाली. एकनाथाची बुद्धि फार तीव्र होती; यामुळें गुरूनें दिलेली संस्था त्याला तेव्हांच पाठ होई, असें त्याचे बहुतेक चरित्रकार सांगतात. रीतीप्रमाणें ब्रह्मकर्माचें सर्व म्हणणें पुरें झाल्यावर एक दिवस एकनाथास असें वाटलें व त्याच्या मनाचाहि त्यास असा दृष्टांत झाला कीं, देवगिरीस जनार्दनपंत हा दत्तोपासक आहे त्याचा अनुग्रह घ्यावा. याप्रमाणें एकनाथानें जनार्दनपंताकडे जाऊन त्याचा अनुग्रह घेतला व त्याजपाशीं पुढील ज्ञान संपादन केलें. जनार्दनपंतानें एकनाथास शके १४८०-मध्यें काळयुक्त संवत्सरीं फाल्गुन वद्य षष्ठीस उपदेश दिला व एकनाथानें 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' या ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचें अध्ययनहि जनार्दनस्वामींपाशींच केलें. जनार्दनस्वामीसारख्या व्युत्पन्न ब्राह्मणापाशीं ज्ञानेश्वर महाराजांच्या ग्रंथांचें पठन झाल्यामुळें एकनाथाचें महाराजांच्या कृतींवर जें एकदा मन बसलें, तें तेथेंच उत्तरोत्तर दृढ होत गेलें, असें दिसतें. कारण या ज्ञानेश्वर-महाराजांच्या लोकोत्तर कृतींचा महाराष्ट्रास सतत लाभ घडावा अशी योजना फार परिश्रमपूर्वक एकनाथानें केली. किंबहुना, महाराष्ट्र-भाषेंत ग्रंथरचना करण्याची बुद्धिहि एकनाथास ज्ञानेश्वरांच्याच ग्रंथामुळें झाली असावी. एकनाथानें ग्रंथरचना पुष्कळ केली आहे. आपल्या रचनेस एकनाथानें प्रारंभ कसा केला, याची हकीकत थोडी मनोवेधक आहे. एके वेळीं जनार्दनस्वामीच्या मनांत तीर्थयात्रेस जावें असें आलें, तेव्हां त्याचे बरोबर एकनाथहि यात्रेस निघाला. दोघेहि यात्रा करीत करीत गोदातीरीं आले. तेथें 'चंद्रावती' गांवीं हे दोघेहि गुरुशिष्य चंद्रभट नांवाच्या एका ब्राह्मणाकडे उतरले. हा ब्राह्मण विरक्तवृत्तीनें असे. दिवसास कामधंदा करावा व रात्रीं पुराण सांगून व्याख्यान करावें, हा

याचा नित्यक्रम असे. या गुरुशिष्यांची जोडी जेव्हां उतरली होती त्या दिवशींहि यानें नित्याप्रमाणें चतुःश्लोकी भागवतावर व्याख्यान केलें तें जनार्दनपंतास व एकनाथास फार आवडलें. दुसरे दिवशीं हे दोघे पुढें जावयास निघाले, तेव्हां त्यांच्या बरोबर चंद्रभटहि निघाला व तिघे मिळून पुढील मार्ग क्रमूं लागले. थोडे दिवसांनीं हे तिघे त्र्यंबकेश्वरीं आले. वाटेनें रोज भागवतावर व्याख्यान होईच. त्र्यंबकेश्वरीं आल्यावर

'जनार्दन म्हणती एकनाथा। सांगतों वचन ऐक आतां। श्रीदत्तवरद तुझिया माथां। लाधला अवचिता निजभाग्यें ॥ चतुःश्लोकी जें भागवत। चंद्रभटें आणिलेंसें सांगात। त्याजवरी टीका करावी प्राकृत। प्रांजळ बहुत ये स्थानीं ॥'

जनार्दनस्वामींची आज्ञा ऐकून एकनाथानें लागलींच टीका लिहिण्यास सुरुवात केली[1] व तेथेंच हा आपला ग्रंथ समाप्त केला. या ग्रंथांत विषयाची फोड एकनाथानें फारच सरस केली आहे. ही सर्व चराचर सृष्टि निर्माण करण्यापूर्वीं ती कशी निर्माण होईल, ही चिंता ब्रह्मदेवास

---

१. ग्रंथरचनेची ही हकीकत एकनाथानें आपल्या ग्रंथांत दिली आहे. तो म्हणतोः—

गोदावरी उत्तम तीरीं। चौ योजनांचा चंद्रगिरी। श्रीजनार्दन तेथवेरी। स्वभावें गेला ॥ तो अति दीर्घ चंद्रगिरी। तळीं चंद्रावती नगरी। तेथ 'चंद्र' नामा द्विजवरीं। वस्ती त्या घरीं स्वभावें घडली ॥ तेणें चतुःश्लोकी भागवत। वाखाणिलें यथार्थयुक्त। तेणें श्रीजनार्दन अत्यंत। झाला उत्सवयुक्त अद्‌भुत स्वानंदें ॥ तेथ स्वानंदें गर्जोन। स्वमुखें श्रीजनार्दन। बोलिला अति सुखावोन। हें गुप्त ज्ञान देशभाषा वर्णीं ॥ तें मज प्रथमावस्था। नेणें संस्कृत पदपदार्था। परि बापु आज्ञेची सामर्थ्यता। वचनें ग्रंथा प्रबोध झाला ॥

च. भा. १०२८.

तीर्थयात्रेनंतर चंद्रभटानें जनार्दनस्वामींचा उपदेश घेतला व तो त्यांचे सांनिध्यांत देवगिरीस राहूं लागला. अखेरपर्यंत तो तेथेंच होता. अजूनहि देवगिरीवर चंद्रभटाची समाधि दाखवितात.

पडली. तेव्हां त्यास तूं तप कर, नीट विचार कर म्हणजे हें तुला कळेल, असें क्षीरकल्लोळांतून अशरीरिणी वाणीनें सांगितलें. तरीहि ब्रह्मदेवाचे मनास नीट उलगडा पडला नाहीं. तेव्हां एके वेळीं तो गूढ विचारांत निमग्न असतां त्यास जगन्मोहिनी, पीतांबरधारी, दिव्य आणि अत्यंत तेजस्वी अशा श्रीभगवंताच्या चतुर्भुज मूर्तीचें दर्शन झालें, व मनाच्या त्या प्रसन्न स्थितींत भगवंतानें आपलें सर्व गुह्य ज्ञान त्यास सांगितलें. पुढें हें गुप्त ज्ञानधन ब्रह्मदेवापासून श्रीनारदमुनींच्या द्वारें महर्षि व्यासांस प्राप्त झालें. श्रीव्यासांनीं तें शुकाचार्यांस देऊन त्यांस स्वानंदसाम्राज्याच्या चक्रवर्ति-पदावर बसविलें; आणि मग श्रीशुकाचार्यांनीं आपल्या सुंदर श्रीमद्भागवतग्रंथाच्या दुसऱ्या स्कंधांत नवव्या अध्यायीं हें ज्ञान अवघ्या चार श्लोकांत सांठवून जगाच्या स्वाधीन केलें. हे चार श्लोक म्हणजे संसारपथश्रांत भाविकांकरितां उभारलेलें चारखांबी मंदिरच आहे. दिव्य मंदिर उभारून त्यांत श्रीभगवंताची वाङ्मयीन मूर्ति नित्य दर्शनासाठीं स्थापून केलेलें तें विश्रांतिस्थान होय. श्रीशुकाचार्यांनीं व आद्यमुनींनीं केलेली ही सोय संस्कृत जाणणाऱ्या विद्वानांपुरतीच झाली; पण यांत स्त्रीशूद्रादिकांना जाण्यासारखी सोयीची वाट नव्हती. ती वाट एकनाथानें करून दिली. हा ग्रंथ जनार्दनस्वामीस व महाराष्ट्रीयांस तर आवडलाच, परंतु एकनाथासहि या आपल्या कृतीनें फार संतोष झाला. तो म्हणतो—

माझे वेडेवांकुडे आरुष बोल। त्यांमाजि ब्रह्मज्ञान सखोल।
नित्य नव प्रेमाची वोल। हे कृपा संतांची॥

भागवत हा ग्रंथ आधींच लोकप्रिय आहे; आणि त्यावर एकनाथानें आपलें व्याख्यान देऊन तो महाराष्ट्रीयांस सुगम केला आहे; आणि त्यांतहि एकनाथानें जें विशेष केलें तें असें कीं, या कर्मठांच्या आणि ज्ञान्यांच्या आवडत्या ग्रंथाच्या अनुरोधानेंच आपला ज्ञानेश्वरी-पंथ विशद केला व परमेश्वर सर्वां भूतीं सारखाच असून तो केवळ एका भक्तीनें मात्र सहज प्राप्त होणार आहे, असें संकीर्तन केलें.

'श्रीभागवत मराठे। हें बोलणें नवल वाटे।
पूर्वीं नाहीं ऐकिलें कोठें। अभिनव मोठें धिटावा केला ॥

असें एकनाथ याबद्दल लिहितो. हा ग्रंथ सहजासहजीं आपल्या सौंदर्यामुळें, तसाच नावीन्यामुळें लोकांच्या आदरास पात्र झाला. चतुःश्लोकी भागवताचें हें विवरण पाहून जनार्दनस्वामींनीं लवकरच आपल्या या शिष्यास श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधावर व्याख्यान करण्यास सांगितलें. नंतर ही लहानशी तीर्थयात्रा पुरी करून एकनाथ परत आल्यावर पैठणासच त्यानें या आपल्या जगन्मान्य ग्रंथास प्रारंभ केला; आणि

'ग्रंथारंभ प्रतिष्ठानीं। तेथ पंचाध्यायी संपादुनी।
इतर ग्रंथाची करणी। आनंदवनीं विस्तरली ॥'

व आनंदवनांत मणिकर्णिकेच्या महातीरीं वाराणसीसारख्या पवित्र क्षेत्रांत पंचमुद्रापीठामध्यें एकनाथानें

शालिवाहन शक वैभव। संख्या चौदाशें पंचाणव[1]।
श्रीमुख संवत्सराचें नांव ॥

या सालीं कार्तिक शुद्ध पौर्णिमेस सोमवारीं हा ग्रंथ पुरा केला. या अपूर्व ग्रंथाचे ३१ अध्याय असून त्याची ओवीसंख्या सुमारें वीस-हजार आहे. चतुःश्लोकी भागवतांत ब्रह्मविद्येची भागवतधर्माच्या अनुरोधानें उत्कृष्ट मांडणी करीत असतां एकनाथाचें मन साहजिकपणेंच त्या प्रकारच्या रचनेंत रमूं लागलें; व तेच विचार सारा वेळ मनांत घोळत राहून पुढें पुन्हांहि याच विषयाचें नीट व साग्र निरूपण करण्याची आवड त्याच्या मनाला अधिक-अधिक वाटूं लागली. एक वेळ इंधनें टाकून अग्नि विझेल, कामी जनाचे मनाला तृप्ति वाटून विषयापासून त्याचें मन परावृत्त होईल, कमळाला कंटाळून भ्रमरहि तेथून दूर सरेल, पण ब्रह्मविद्येच्या ज्ञानामृताला लालचावलेलें मन केव्हांहि तेथून सरणार नाहीं; आणि ज्याचे बुद्धीला हा विषय सदाकाळ नजरेसमोर

१. विक्रम-संवत् १६३०, वृषभ संवत्सर.

ठेवून तो इतरांस शिकविण्याची सवय जडली तो तर तें काम कितीहि श्रम पडले तरी एकसारखा करीत सुटेल. त्याचे मनाची कसमस त्या उद्योगावांचून कशानेंहि मोडणार नाहीं. हीच स्थिति या ब्रह्मविद्येसंबंधीं व भागवतधर्मासंबंधीं एकनाथाची झालेली होती. तशांत गुर्वाज्ञाहि झाली. त्यामुळें तर त्याचें मन उचंबळून जाऊन लेखणीला आणि ज्यांत भागवतधर्म आपल्या पूर्ण प्रकाशानें प्रकाशत आहे अशा त्या एकादशस्कंधटीकेलाहि एकनाथानें सुरवात केली व भागवतधर्माची पाणपोई घालून दिली.

भागवतधर्म हा महाराष्ट्राचा आवडता धर्म आहे. त्याच्याशीं मराठमोळ्याच्या मनाचें फार साम्य आहे. तो जात्या फार प्रेमळ आहे, पण त्याचा चिवटपणा लोकोत्तर आहे. तो या एका राष्ट्राचा आहे, पण त्याच्या पोटांत सर्वांची सोय होऊं शकते. तो मऊ आहे, पण त्याच्यांत बुद्ध, जैन, महंमदी वगैरेंसारख्या धर्मांशीं झगडून त्यांना हटविण्याचें सामर्थ्य आहे. कोणी कर्मठ, ज्ञानी व योगाभ्यासी आणि म्लेच्छविद्येचे पंडित म्हणतात कीं, त्यांत विशेष असें कांहीं नाहीं; पण खरें पाहतां त्यांत सर्वस्व आहे. या धर्माचें व या पंथाचें मुख्य इंगित असें आहे कीं, त्यांत रावापासून रंकापर्यंत, जाणत्यापासून नेणत्यापर्यंत, ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत, स्त्रियांसुद्धां सर्वांची सोय केली आहे व सर्वांची काळजी वाहिलेली आहे. याचे ठिकाणीं सर्वांची एकवाक्यता होऊं शकते. यांत उदासीनता राहत नाहीं. निराशेला जागा नाहीं. उच्चनीच भावाला वाव नाहीं. असा हा भागवतधर्म आहे. हा अनादि आहे. म्हणजे कोणा एका साधूनें हा प्रथम बनविला, त्याच्या पूर्वीं हा नव्हता, असें याचें नाहीं. म्हणजे ख्रिस्ती, महंमदी, बुद्ध वगैरे धर्मांप्रमाणें हा ऐतिहासिक कालानें मर्यादित नाहीं. तो इतिहासापलीकडचा आहे. मानवी अंत:करणांत या जग निर्माण करणाऱ्याबद्दल जेव्हां प्रथम विचार येऊं लागले व त्याचे कर्तृत्वाविषयीं कौतुक, प्रेम, प्रीति, भक्ति वगैरे विकार उत्पन्न होऊं लागले तेव्हांपासूनच या भागवतधर्माला

व भक्तिमार्गाला आरंभ झाला. मात्र हा नीट रीतीनें जुळवून याची चांगली मांडणी करून हा प्रथम श्रीनारदऋषींनीं कलियुगाच्या प्रारंभसमयीं वासुदेवाला सांगितला. हाच धर्म जनकराजाच्या यज्ञाचे वेळीं वृषभऋषींनीं जनकाला सांगितला; आणि हाच सर्वांना अत्यंत श्रेयस्कर म्हणून श्रीव्यासांनीं शुकाचार्याला सांगितला व शुकाचार्यांनीं तो परीक्षितराजाला सांगितला. परीक्षिताचा आजा अर्जुन समरांगणांत ऐन वेळीं हतवीर्य झाला असतां त्यालाहि श्रीकृष्णानें भागवतधर्माचें दूध पाजून त्याचे शरीरांत चैतन्य आणिलें. पण हें सर्व संस्कृत भाषेंत झालें. ज्यांना त्या देववाणींत गम्य नाहीं अशा प्राकृत जनांना हें अगम्यच राहिलें. पण मग त्यांचे सोयीकरितां श्रीकृष्णानें पाजिलेल्या या दुधाचे जे थोडे ओघळ बाहेर आले ते नीट धरून ज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्राला महाराष्ट्रभाषा-पात्रांत सांठवून दिले व बुद्ध वगैरे चातुर्वर्ण्याचा नाश करूं पाहणाऱ्यांशीं झगडण्याचें सामर्थ्य महाराष्ट्रदेहांत आणून सोडिलें. पुढें या दुग्धरसाचा उत्तम मेवा बनवून महंमदीधर्मानें उच्छाद मांडिला असतां एकनाथानें त्याचा रतीब महाराष्ट्राला लाविला आणि त्याला आपल्या काळजाचा उबारा देऊन त्यांत हालचाल सुरू केली. पुढें याचाच आणखी इतर रसायनांशीं मिलाफ करून श्रीसमर्थ रामदासानें 'महाराष्ट्र-धर्म' बनविला व त्याच्या खुराकानें महाराष्ट्रांत असें सामर्थ्य आणिलें कीं, महाराष्ट्र दुनियेला डोईजड झाला आणि दंडकारण्याचें 'आनंदवनभुवन' झालें. पण ही हकीकत या पुढल्या शतकांतील आहे. तरी पण 'आनंदवनभुवन' हा शब्द मूळ एकनाथाचा आहे. दंडकारण्याचें 'आनंदवनभुवन' बनविण्याचें सामर्थ्य आपल्या शिकवणींत आहे, ही जाणीव एकनाथाला होती असें मानण्यास हरकत दिसत नाहीं. या आनंदवनांतच एकनाथानें आपल्या भागवतएकादशस्कंध-टीकाग्रंथाची 'करणी' केली, असें त्याच्या लिहिण्यावरूनच होतें.

हा भागवतग्रंथ रचण्याला एकनाथाला मूळ आधार श्रीकृष्णाच्या वाणीचाच आहे व त्या श्रीकृष्णानें उपदेशिलेल्या ज्ञानाच्या आधारावरच

एकनाथानें याची उभारणी केली आहे.

श्रीगोपालकृष्ण भगवंतानें जें ज्ञान प्रत्यक्ष रमेलाहि सांगितलें नाहीं, सर्वस्व अर्पण करणाऱ्या गोपींनाहि इतर रसानुभवांत गुंगवून ठेवून जें ज्ञान त्यांचेपासूनहि चोरून ठेविलें, जें ज्ञान सदाकाळ सान्निध्यांत सेवारत असणाऱ्या गरुडालाहि कळूं दिलें नाहीं, तें अपार ज्ञान त्या परमात्म्यानें या एकादशस्कंधांत आपला प्रेमळ भक्त जो उद्धव त्यास निवेदन केलें आहे! किंवा निवेदन केलें कसलें! वत्साला पाहतां पाहतांच गायीनें कितीहि चोरला असला तरी पान्हा जसा एकदम फुटतो, किंवा तान्ह्या मुलाला पाहून आईनें आवरली तरीहि दुधाची धार न आवरतां जशी एकदम बाहेरच फुटते तसें त्या भक्तवत्सल भगवंताचें झालें. समुद्राच्या मनांत असो व नसो, पण पूर्णचंद्र पुढें येतांच सागराच्या पाण्याला जशी अनिवार भरती येते, व तो वरवर उचंबळून येतो आणि आपल्या कल्लोळांनीं सभोंवतालची सर्व घाण आंत घेऊन नाहींशी करितो त्याप्रमाणेंच या अत्यंत निष्कपट व प्रेमळ उद्धवभक्ताचें साधें मन पुढें दिसतांच त्या दीननाथाच्या कृपासागराला ज्ञानामृताचें भरतें आलें व सर्वभर त्या अमृताच्या संसारभयनाशक अशा लहरी उसळूं लागल्या. हे प्रवाह पाहून एकनाथालाहि महाराष्ट्राची करुणा आली व त्यानें या अमृतप्रवाहांत यथेच्छ मज्जन करण्याची, राजापासून रंकापर्यंत, विद्वान् कर्मठापासून भाविक शूद्रातिशूद्रापर्यंत सर्वांना आपल्या महाराष्ट्रवाणीनें सोय करून दिली. या अपूर्व ज्ञानसागराला, या चिन्मय-तीर्थाला, एकनाथांनीं सुमारें वीस-हजार उत्तम घडीव चिरे जोडून एकतीस पायऱ्यांचा सुंदर घाट बांधून ठेविला आहे. या घाटावर शांतमनानें बसून वाटेल त्यानें ज्ञानामृताचें मनसोक्त स्नान करावें, विषयकर्दमाचा मळ धुऊन टाकावा व मुखानें गोविंदनामाचा उच्चार करीत ज्ञानचक्षूंनीं माधवाचें दर्शन घेऊन ब्रह्मानंदांत आजन्म गर्क होऊन रहावें. श्रीकृष्णानें अर्जुनाला केलेल्या मेजवानीचा लाभ जसा ज्ञाननाथांनीं 'ज्ञानदेवी'नें सर्वांस करून दिला तसाच त्या ज्ञाननाथाचा भाविक भक्त जो एकनाथ

त्यानें कृष्ण व उद्धव या गुरुशिष्यांच्या एकांतांतला मंत्रोपदेश, मेघ-गर्जनेप्रमाणें मोठ्यानें ओरडून सांगून सर्व जगास ऐकविला. हा एकनाथानें चारशें वर्षांपूर्वी केलेला शब्दनाद महाराष्ट्रांत अजूनहि दुमदुमून राहिला आहे. या ग्रंथाची एकनाथाच्या वेळीं चांगली ख्याति झाली होती; व त्याच्या पश्चातहि आज तीनशें वर्षें या ग्रंथाच्या ठायीं महाराष्ट्रांतील सर्व विद्वान् मंडळीची प्रीति अजूनपर्यंत अव्याहत तशीच स्थिर आहे. तुकारामानें भांडारासारख्या उंच पर्वतावरील गुहेंत बसून या ग्रंथाची कैक पारायणेंच्या पारायणें केलीं व त्वरित काव्यरचनेची अद्भुत शक्तिहि त्याजमध्यें येण्यास हाच ग्रंथ कारणीभूत झाला. मोरोपंतानेंहि आपल्या ग्रंथांत याबद्दल

> ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर ते।
> जरि न रचिता दयानिधि केवळ जड जीव तरि कसे तरते ।।

असें म्हटलें आहे. सारांश, तुकारामापासून तों न्या. मू. माधवराव रानड्यांपर्यंत सर्व महाराष्ट्राची या ग्रंथावर अलौकिक भक्ति होती. एकनाथाची कीर्तिहि पुष्कळ अंशीं याच ग्रंथानें वाढली. हा ग्रंथ कवीनें आपल्या पंचवीस वर्षांच्या वयांतच रचिला, यावरून त्याची विद्वत्ता व संस्कृति किती दांडगी असली पाहिजे, याचें अनुमान सहज होईल. 'वेणू घेऊनियां हातें। विश्व मोहिलें कृष्णनाथें' असें एकनाथानें लिहिलें आहे. त्याच्याच शब्दांनीं आम्ही म्हणतों कीं—'बोरू घेऊनियां हातें, महाराष्ट्र मोहिलें एकनाथें'!

वेणूनादांत फरक इतकाच कीं, श्रीकृष्णाच्या शब्दांत अनुपम गोडी होती; पण एकनाथाच्या शब्दांत गोडीपेक्षां ज्ञानाचें तेजच मुख्य आहे. ज्ञानेश्वराप्रमाणें त्याच्या ग्रंथांत ज्ञान आणि भाषासौष्ठव हीं दोन्ही एकत्र्टलीं असतीं तर फारच बहार झाली असती. पण एकनाथ हा ज्ञानी असला तरी प्रतिभासंपन्न, गोड रसवंतीनें गाणारा असा कवि नाहीं. यामुळें पुष्कळ लोकांचें मन त्याच्या रचनेकडे ओढावें तितकें ओढत नाहीं. त्याच्या वाक्पुष्पांना चेतोहर गंध अमूप आहे, पण त्या

पुष्पांच्या पाकळ्यांना नयनमनोहर रंग कमी आहे. कोठें-कोठें मात्र या ग्रंथाच्या ओघांत विषयाचें विवरण करितांना नाथांची वाणी रसाळ, प्रसंगविशेषीं 'प्रासादिक' कवित्वानें स्फुरलेली, समर्पक दृष्टान्तांनीं खुललेली, सद्भावानें आर्द्र झालेली, 'प्राकृत' जनांसहि गुंगवून सात्त्विक-वृत्तिप्रवण करणारी, वक्तृत्वाची व निरूपणकुसरीची साक्ष पटविणारी व विवेचक अशी स्पष्ट दिसून येते. तसेंच, भारदस्तपणांत व परमार्थाचें उद्घाटन करण्याचे कामीं संस्कृतभाषेला मराठी भाषा रेसभरहि हार जाणार नाहीं, असेंहि स्वरचनेच्या ठाकठिकीनें एकनाथानें निदर्शनास आणून दिलेलें आढळतें, ही बाब खरी आहे. पण हें सर्व प्रसंगविशेषीं झालें. ज्ञानेश्वरी कोठेंहि उघडा. तिच्या भाषेच्या अलंकाराचें तेज पहावें तेथें प्रकाशानें दिपवून टाकितें. तसें एकनाथीभागवतांत नाहीं, हें कबूल केलें पाहिजे. आपण ज्याला भाषासूर्य म्हणूं, हृदयाला शब्दशरानें भेदून टाकणारा कवि म्हणूं, तो एकनाथ नाहीं. तो ठाकठिकीचा कुशल व मेहनती कारागीर आहे. एकनाथानें दिलेल्या उपमा एकदा वाचाव्या व त्यांत आणखी दोन नवीन उपमा घालण्याचा यत्न करावा, किंवा त्यानें सांगितलेला अर्थ दुसऱ्या निराळ्या तऱ्हेनें वठवून पहावा, म्हणजे जी लटपट उडेल तिच्या योगानें त्याची करामत आपल्या लक्षांत नीट येईल व त्याचें कौतुक वाटेल.

भागवत संपविल्यानंतर लागलींच पुरे पांच महिने लोटले नाहींत तोंच एकनाथानें 'रुक्मिणीस्वयंवर' लिहिलें. याचे १८ अध्याय असून ओवीसंख्या सुमारें दोन-हजार आहे. एकनाथाच्या चरित्रपर अथवा पौराणिक ग्रंथांपैकीं हा अगदीं पहिला ग्रंथ दिसतो. भाविक लोक म्हणतात—श्रीकृष्णानें श्रीखंड्याच्या रूपानें 'स्वकरें चंदन घासल्याचे' व 'कावडीनें गंगेचें पाणी' भरलें त्याच्या स्मरणार्थ हा कृष्णाचा स्वयंवर-वृत्तांत नाथांनीं सांगितला आहे. भागवताच्या आधारानें दोन प्रचंड ग्रंथ लिहिल्यावर रचिलेल्या या पौराणिक ग्रंथाचे वेळीं वेदान्त विषय कवीच्या अगदीं दृष्टीआड झाला होता, असें नाहीं. या वेळीं ब्रह्मज्ञानाच्या विचारांत

मन गढून राहिलें असल्यामुळें व हातालाहि तेच विचार लिहिण्याची सवय लागून गेल्यामुळें त्या विचारांचा पूर्ण मिलाफ या पौराणिक कथेंतहि एकनाथानें केला. यामुळें या ग्रंथानें गोड अशा पौराणिक कथेचा व सखोल ब्रह्मज्ञानाचा स्वादिष्ट पेला महाराष्ट्राच्या जिभेला लाभला. या लग्नकथेच्या रचनेंत, लेकरांस दुधाच्या मिषानें औषध पाजावें, तशांतली गत केली आहे.

'ये ग्रंथींचें निरोपण । जिवा शिवा होतसे लग्न ।

अर्थ पाहतां सावधान । समाधान सात्त्विकां ॥'

असें कवीनेंच शेवटच्या म्हणजे अठराव्या अध्यायांत सांगितलें आहे[1]; व सतराव्या अध्यायांत कृष्णरुक्मिणींचें–जिवाशिवांचें–लग्न लावून, अठराव्यांत 'बोधाच्या' खांद्यावर कृष्णास बसवून आणि 'देहाभिमानाच्या' कडेवर रुक्मिणीस देऊन 'बोध नाचे घेऊनि कृष्ण। नोवरी घेऊनि देहाभिमान' अशा थाटानें शेवटीं 'धेंडा' नाचवून ही मंगळकार्याची कथा पुरी केली आहे[2]. पौराणिक आख्यानांवर रचिलेले दुसरे लहान-लहान ग्रंथ 'बालक्रीडा' 'प्रल्हाद-चरित्र' व 'शुकाष्टक' हे होत.

---

१. नाथांच्या या ग्रंथांत ज्ञान आणि कृष्णकथा तर आहेतच; पण यांत विनोदालाहि स्थळ मिळालें आहे. या विवाहोत्सवाचे वेळीं अनेक लोक तेथें आले. त्यांत सुखवस्तु गृहस्थ होते, कुलीन स्त्रिया होत्या, संन्यासीहि होते व वेश्याहि होत्या. तेव्हां त्या गर्दींत एका श्रीपाद संन्याशाला एका वेश्येचा स्पर्श झाला. यामुळें श्रीपाद रागावून वेश्येला दंड मारूं लागले. तें पाहून ती वेश्या 'त्यांस हासोनि म्हणते ।–अजून क्रोध न सोडी पाठी । विटंबली दंड कांसोटी । आत्मदृष्टी तुम्हां नाहीं ॥ मी उत्तम पैल हीन । विषम भेदाचें अज्ञान । सर्वांभूतीं समसमान । निजात्मज्ञान तुम्हां नाहीं ॥

२. ह्या कवीनें 'वाराणसी महापुरीं । मणकर्णिकेच्या तीरीं । रामजयंती-माझारीं । ग्रंथ निर्धारीं संपविला ॥' शके ( १४९६ ) चौदाशें शहाण्णव। प्रजापती संवत्सराचें नांव । चैत्रमासाचें वैभव । पर्व अभिनव रामजयंति ॥ हे दिवशीं सार्थक अर्थी । रुक्मिणीस्वयंवर समाप्ती । एका जनार्दनकृपेची स्थिति । वाराणसीप्रती संपवी ॥

[२६५ पृष्ठ पहा.]

'प्रल्हाद-चरित्र' हें लहानसें १७६ ओव्यांचें प्रकरण जसें सुरस आहे तसेंच 'शुकाष्टक'हि आहे. या १४४ ओव्यांच्या 'शुकाष्टका'शिवाय

---

[ पान २६४-वरून. ]

परंतु शक १४९६- ला प्रजापति संवत्सर येत नाहीं; भाव संवत्सर येतो; व त्याप्रमाणें कांहीं पोथ्यांत हा शक १४९३ असा दिलेला आढळतो.

या पुस्तकांत शकांचे दिलेले संवत्सर मूळ ठिकाणांत आढळले तसेच प्राय: दिले आहेत. मुळांत कांहीं ठिकाणीं दिलेला संवत्सर येत नाहीं, असें आढळतें. अशीं ठिकाणें विशेष प्रसंगीं निर्देश करून दाखविलीं आहेतच; परंतु कांहीं ठिकाणीं तीं तशींच राहूं दिलीं आहेत. शकाचें साल दिलें असतां ठोकळ मानानें संवत्सर चटकन् काढतां यावा म्हणून मीं एक केलेला संवत्सरदर्शक 'अनंतपट' पुढें दिला आहे--

**अनंतपट**

| | ० | १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|---|---|
| ० | कालयुक्त | विभव | बहुधान्य | सर्वधारी | विलंबी | कीलक |
| १ | सिद्धार्थी | शुक्ल | प्रमाथी | विरोधी | विकारी | सौम्य |
| २ | रौद्र | प्रमोद | विक्रम | विकृति | शार्वरी | साधारण |
| ३ | दुर्मति | प्रजापति | वृष | खर | प्लव | विरोधकृत |
| ४ | दुंदुभि | अंगिरा | चित्रभानु | नंदन | शुभकृत् | परिधावी |
| ५ | रुधिरोद्गारी | श्रीमुख | सुभानु | विजय | शोभन | प्रमादी |
| ६ | रक्ताक्षी | भाव | तारण | जय | क्रोधी | आनंद |
| ७ | क्रोधन | युवा | पार्थिव | मन्मथ | विश्वावसु | राक्षस |
| ८ | क्षय | धाता | व्यय | दुर्मुख | पराभव | आनल |
| ९ | प्रभव | ईश्वर | सर्वजित् | हेमलंबी | प्लवंग | पिंगल |

[पान २६६ पहा.]

शुकाष्टकाच्या आधारें अथवा टीकात्मक असा रचिलेला 'स्वात्मसुख' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. अद्वैतावर लिहिलेला हा लहानसा ग्रंथ फारच उत्कृष्ट उतरला आहे. यांत

'जें सकळ शास्त्रांचें सार। जें सकळ वेदांचें गर्हिवर।
जें सकळ पुराणांचें माहेर। ग्रंथासि आलें॥'

असा कवीचाच अभिप्राय आहे. तेव्हां हा ग्रंथ कवीच्या मनासारखा उतरला असें दिसतें आणि म्हणूनच—

'जें गुप्त एकाएकपणें। मज दिधलें स्वामी जनार्दनें। तें निरंतर अनुभवणें' अशी कवीनें सर्वांस आग्रहाची शिफारस केली आहे. 'स्वात्मानुभवा'प्रमाणेंच 'आनंदलहरी', 'अनुभवानंद', आचार्यांच्या 'हस्तामलका'वरील टीका, 'गीतासार', 'मुद्राप्रकाश' वगैरे हे सर्व ग्रंथ वेदांतपर असून अद्वैतमतप्रधान आहेत. यांखेरीज पदें, गारुड वगैरे सर्व लहान-लहान चुटके आणि अभंग अशी विविध

---

[पान २६५-वरून.]

**स्पष्टीकरण**:—ज्या शकाचा संवत्सर पहावयाचा असेल त्या शकाचा शवटला म्हणजे एकं स्थानचा अंक घ्यावा. वरील पटांत उभ्या अंकमालेंतील त्या अंकापुढील आडव्या ओळींतल्या सहा संवत्सरांत त्या शकाचा संवत्सर येतो. नंतर घेतलेल्या मूळ शकाच्या मधल्या दोन अंकांच्या संख्येस म्हणजे शतं व दहं स्थानांच्या अंकांनीं दर्शविलेल्या संख्येस सहांनीं भागावें. भाग जातां जी बाकी उरेल त्या आडव्या मालेंतील अंकाखालील उभ्या ओळींत असेल तो इष्ट संवत्सर जाणावा.

उदाहरण, शके १८२९ यांत शेवटचा अंक '९'. तेव्हां उभ्या ओळींपैकीं ९-पुढील प्रभव, ईश्वर, सर्वजित्, हेमलंबी, प्लवंग किंवा पिंगल यांपैकीं एक संवत्सर येईल. आतां मधील दोन अंकांनीं दर्शविलेली संख्या ८२ हिला सहांनीं भागिलें असतां बाकी चार राहते. तेव्हां चार अंकाखालील उभ्या माळेंत वरील सहांपैकीं प्लवंग हा संवत्सर येतो. सबब संवत्सर प्लवंग शके १८२९ सालीं येईल. तसेंच, शके १८३९-मध्यें ९-च्या पुढली आडवी ओळ व ५-च्या खालील ओळ घेतां पिंगल संवत्सर येतो. मतावरूनच नांवें जमतात.

१. तें शुकमुखींचीं गळित फळें। प्राप्ता प्रभावबळें। ते गोडियेची रसाळें। अक्षरें लिहिलीं॥

रचना एकनाथानें केली आहे. यांपैकीं एक लहानशी अर्जदास्त एकनाथाच्या कल्पनाशक्तीचा व त्या काळच्या गद्याचा मासला म्हणून येथें देतों —

## अर्जदास्त

अर्जदास्त अर्जदार। बंदगी बंदेनवाज
अलेकं सलाम। साहेबांचे सेवेसी
बंदे शरीराकार। जीवाजी शेखदार
बुधाजी कारकून। प्रगणे शरीराबाद
किल्ले कायापुरी। सरकार साहेबांची

आज्ञा घेऊन स्वार जालों. तों प्रगणेमजकुरीं येऊन सरकारकाम करावयास लागलों। तों प्रगणेमजकूरचे जमेदार दंभाजी शेटचे व कामाजी महाजन व मनीराम देशमुख व ममताई देशपांडी व क्रोधाजी नाईकवाडी ऐसे हरामजादे फार आहेत ते सरकारकामाचा कयास चालूं देत नाहींत। दंभाजी शेटचा कचेरीस येऊन जोम धरून बसतो। मनीराम देशमुख आपलें काम परभारें करून घेतो। ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला। क्रोधाजी नाईकवाडी याणें तमाम तफरका केला तों साहेबांपासून जरासंध चोपदार आला। त्यानें खबर केली कीं मागून यमाजीपंताची तलब होणार। त्यास त्या धास्तीनें तमाम प्रगणा वोस जाला। बितपशील कलम। डोळासवाडीस मात्र कांहीं रुई भुई वस्ती राहिली। कानगांव तो बंद जालें। दोन्ही वेशींचीं कवाडें लागलीं। नाकापुरास वहाव सुटलें। तोंडापूर तो तफरका जालें। दंताळवाडी वोस पडली। दिवेलागणी देखील राहिली नाहीं। केसगांवची पांढर झाली। शिरापुरचा लोक दरोबस्त थरथरा कापतो। हातगांव कसाल्यानें जर्जर जालें। त्याच्यानें आतां कांहीं लावणी होत नाहीं। पायगांवचीं मेटें बसलीं। ढोपरपूरचीं राहिलीं। चरणगांव चाली सरली। गांडापूर वाहूं लागलें। लिंगस्थान भ्रष्ट जालें। उठूं पळूं लागलें। धीर

> घरवेना । ऐसी प्रगण्यांत कीर्दी बुडाली । यावर सरकारकाम सुरू करीत होतों । तों यमाजीपंताची परवानगी आली कीं हुजूर येथें आपणास साहेबाचा आश्रय आहे । एकाजनार्दन बदा । बंदगी रोशन होय । हे अर्जदास्त ॥

या अर्जदास्तीप्रमाणेंच एकनाथाचीं पुष्कळ पदें फार गमतीचीं व चमत्कृति-जनक अशीं आहेत परंतु अशांची संख्या थोडी आहे. बहुतेक पदें भारदस्त व गंभीर अर्थानें भरलेलीं आहेत. कांहीं-कांहींत तर वेदान्त आणि व्यवहार यांची उत्तम सांगड घातलेली आहे. याचें 'चिरंजीव पद' या नांवाचें एक लहानसें प्रकरण आहे. हें श्रीकृष्णानें उद्धवास केलेल्या उपदेशाच्या आधारानें रचिलें आहे. कवि म्हणतो, 'कृष्णें उद्धवा सांगितलें । तें मी साच बोलिलों.' यांत विरक्त पुरुषाला ज्या बाबींपासून अलिप्त राहणें मुख्यतः फार आवडतें असें एकोबा सांगतात, त्या अशा —

> मांडीना स्वतंत्र फड । म्हणे अंगा येईल अहंता बाड । धरून जीविकेची चाड । न बोले गोड मधुर वाणी ॥ नावडे लौकिक परवडी । नावडती लेणीं लुगडीं । नावडे परान्न गोडी । द्रव्य जोडी नावडे ॥ नावडे स्त्रियांत बैसणें । नावडे स्त्रियांचें पाहणें । नावडे स्त्रियांचे रगडणें । त्यांचें मृदु बोलणेंही नावडे ॥

आणि कोणाहि संघ निर्माण करून कार्य करणाऱ्याला हें कदाकाळ न आवडावें, हेंच श्रेयस्कर आहे, अशी आजहि अनुभवांतीं खात्री पटेल. संस्था, महंती व स्त्री हीं तिन्ही रसायनें फार जाज्वल्य आहेत. तीं पेलतील त्यानेंच वापरावीं. हीं तिन्ही रसायनें नीट काळजीपूर्वक न वापरलीं तर कोणाहि पुरुषाला तेव्हांच खाड्यांत नेऊन पाडतात, असें एकोपंत सांगतात.

या लहानसान रचना चालू असतांना फार मोठें असें एक मराठी भाषेसंबंधाचें काम एकनाथानें आरंभिलें. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांवर एकनाथाची कशी दृढ भक्ति होती व आपल्या गुरुमुखानें त्या ग्रंथांचें सेवन

एकनाथानें किती आदरानें केलें, हें वर सांगितलेंच आहे. या अद्वितीय कृतीची जोड महाराष्ट्रास नीट व्हावी व आपल्या हातून त्या ग्रंथासंबंधानें जी सेवा घडण्यासारखी असेल, ती अवश्य बजावावी, अशा भावनेनें त्या कृतीचा उद्धार करण्याचें त्यानें योजिलें. कोणी म्हणतात, त्यास एके दिवशीं असा असा दृष्टांत झाला कीं, 'ज्ञानेश्वराचे समाधीपाशीं अजानवृक्ष आहे. त्याची मुळी समाधीमधील ज्ञानेश्वराचे गळ्याला जाऊन गुरफटली आहे. तेथें जाऊन ती काढावी व दूर करावी.' हें मनांत येऊन एकनाथ आळंदीस समाधीजवळ गेला आणि पाहतो तों अजानवृक्षाची मुळी खरोखरीच समाधींत शिरून तशी गुरफटली असल्याचें त्यास आढळलें. कदाचित् या आख्यायिकेंत थोडी उलटापालट असेल. ज्ञानेश्वराच्या ग्रंथांवर दृढ प्रेम असल्यामुळें एकनाथ त्याच्या समाधीच्या दर्शनास उत्कंठेनें गेला असेल; व तेथें अजानवृक्षाचीं पाळेंमुळें समाधींत घुसून तिचा नाश करीत आहेत, असें त्यास आढळून आलें असेल; व त्यानें ती समाधि खणून मुळें काढून टाकून नीट दुरुस्त केली असेल. हें कसेंहि असो. पण श्रीज्ञानेश्वराच्या समाधीकडे एकनाथ गेला, त्यानें वाढलेलीं मुळें काढून समाधि दुरुस्त केली व हें करीत असतां ज्ञानेश्वराच्या या लोकांतल्या अवशेषांचें त्यास दर्शन होऊन, याचा अद्वितीय ग्रंथहि आपण शोधून नीट करावा, असें त्याच्या मनांत आलें[1], ही ऐतिहासिक माहिती खरी दिसते.

पुढें लवकरच त्यानें तीनशें वर्षांपूर्वी लिहिलेल्या ज्ञानेश्वराच्या प्रती मिळवून तो ग्रंथ प्रतिशुद्ध करण्यास आरंभ केला. वास्तविक पाहतां

---

१. यासंबंधें एकनाथ एका अभंगांत म्हणतो –

श्रीज्ञानदेवें येउनी स्वप्नांत । सांगितली मात । मजलागीं ॥
अजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनी आळंदी । काढ वेगीं ॥

आणि असें सांगणें हें समाधि उघडून ज्ञानेश्वरांचें दर्शन मिळण्यास फारच सोयीचें झालें.

महाराष्ट्रकवीच्या काव्याच्या या आद्यसंपादकानें त्या कृत्यास कां प्रारंभ केला व कोणत्या धोरणानें हें काम केलें हें सहज अनुमानण्यासारखें नाहीं. त्या वेळीं ज्ञानेश्वरीसारखा अलौकिक ग्रंथ अगदीं लुप्तप्राय होऊन गेला होता व त्याची एकच प्रत एकनाथानें मिळवून प्रसिद्ध केली, अशांतला प्रकार मुळींच नव्हता. त्या काळीं हा ग्रंथ लोकांस चांगला माहीत होता, असें दिसतें. तेव्हां या ग्रंथाचा जीर्णोद्धार करण्याचें प्रयोजन एकनाथास या वेळीं इतकें कां वाटलें, हें कळत नाहीं. कदाचित् ज्ञानेश्वरांच्या अवशिष्ट भागावर बांधिलेल्या समाधीचा जीर्णोद्धार केल्यावर त्यांच्या कृतीच्या अवशिष्ट भागाचाहि जीर्णोद्धार करण्याची एक कल्पना एकनाथास सहजासहजीं सुचली असावी. एकनाथानें ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार शके १५०५-मध्यें ज्येष्ठांत केला आणि नंतर वर्ष-सव्वा-वर्षानें म्हणजे शके १५०६-च्या भाद्रपदांत ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार पुरा झाला. असा हा जीर्णोद्धार करून जी नवी प्रत तयार केली तिच्या शेवटीं पुढीलप्रमाणें एक लेख एकनाथानें लिहून ठेविला आहे—

शके पंधराशतें सावोत्तरी । तारणनाम संवत्सरीं । येकाजनार्दनें अत्यादरीं । गीताज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली ।। ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परि पाठांतरें शुद्धाबद्ध । तें शोधूनि एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ।। नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका ।

---

१. शके १२१२-त लिहिलेल्या ज्ञानेश्वरीचा बरोबर ३०० वर्षांनीं जीर्णोद्धार झाला, अशा भावनेनें हा शक १५१२ दिलेला अनेक ठिकाणीं आढळतो. परंतु हा शक १५०६ असल्याबद्दल पुढें दिलेला एकनाथाचा लेख पुरावा असून शिवाय आणखी एक असा श्लोक प्रसिद्ध आहे—

स्वतिश्रीनृपशालिवाहन शके पंधाशतें साऽगळी ।
श्रीमत्पैठणि तारणाख्य वरुषीं गोदावरीच्या कुळीं ।।
षष्ठी कृष्ण कपील भाद्रपदिंची ग्रंथार्थ मूलान्वयें ।
केलें शोधन ज्ञानदेविप्रतिचें श्रीएकनाथें स्वयें ।। १ ।।

जयाची गीतेची वाचितां टीका। गीताज्ञान होय लोकां। अतिभाविकां ग्रंथार्थियां॥ बहुकाळपर्वणी गोमटी। भाद्रपदमास कपिलाषष्ठी। प्रतिष्ठानीं गोदातटीं। लेखनकामाठी संपूर्ण केली॥ ज्ञानश्वरीपाठीं। जो वोंवी[1] करील मऱ्हाटी। तेणें रत्नखचिताचिया ताटीं। जाण नरोटी ठेविली॥ ५॥

या अंतिम लेखावरून असें दिसतें कीं, एकनाथाला या ग्रंथाच्या बऱ्याच प्रती मिळाल्या होत्या व त्या प्रतींतलीं निरनिराळीं पाठांतरें पाहून व तीं शोधून एक नवी प्रत एकनाथानें तयार केली. ही प्रत तयार करितांना मुळांत बदल केला नसावा; कारण मुळांत बदल केल्याचा एकनाथ उल्लेखहि करीत नाहीं; इतकेंच नव्हे, तर असे बदल करणारांना तो दोषी ठरवून नांवेंहि ठेवितो. या लेखावरून असें दिसतें तरी हल्लीं महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या ज्ञानेश्वरांच्या प्रतींत यांपेक्षां पुष्कळ अधिक फेरफार केलेले नजरेस पडतात. मग ते प्रत्यक्ष एकनाथानें केलेले असोत किंवा त्याच्या नंतर आज तीनशें वर्षांत हळूहळू झालेले असोत. हा प्रकार कसाहि असो; तथापि आजच्या ज्ञानेश्वरी ग्रंथावरून मुळांत एकंदर अनेक प्रकारचे फेरफार झाले असले पाहिजेत, असें ठरतें–( १ ) शब्दांचीं जुनीं प्राचीन रूपें बदलून त्यांचे ऐवजीं नवीं व प्रचलित अशीं रूपें योजिलीं गेलीं; ( २ ) जुने शब्द गाळून त्यांचे जागीं समानार्थक असे सहज समजण्याजोगे नवे शब्द बदलून ठेविले; ( ३ ) मूळ शुद्ध मराठी प्रयोगांत बदल केला किंवा नवीन क्षेपक ओव्या घातल्या; ( ४ ) कांहीं ओव्या सबंध बदलून साडेचार-चरणी[2] नव्या ओव्या त्या ठिकाणीं घातल्या; ( ५ ) व आल्या-

१. ही नरोटीची ओवी ज्ञानेश्वरीच्या पुष्कळ प्रतींत नाहीं. खुद्द एकनाथाच्या मठांत जी सांप्रदायिक प्रत आहे तींतहि ही ओवी नाहीं.

२. एकनाथानें साडेचार–चरणांच्या ओवीचा प्रघात प्रथम सुरू केला व साडेचार-चरणी ओवी म्हटली म्हणजे ती एकनाथाची असावी, असें फार दिवस मानिलें जात असे. परंतु एकनाथाच्या पूर्वींचे साडेचार- चरणी ओव्यांत रचिलेले अनेक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. तेव्हां आतां हे समज सोडून देणें भाग आहे.

यिकेप्रमाणें म्हटलें म्हणजे किमयेच्या अशा ओव्या मुळींच गाळून टाकिल्या. हे असे फेरफार मूळच्या प्रतींत होऊन तिची आजची ज्ञानेश्वरी सिद्ध झालेली आहे.

असो. एकनाथानें ज्ञानेश्वरीची प्रतिशुद्ध केलेली प्रत शके १५०६-त पूर्ण झाली हें वर सांगितलेंच आहे. ज्ञानेश्वरीप्रमाणेंच अमृतानुभवासंबंधींहि कांहीं खटपट करून हा ग्रंथ महाराष्ट्रीयांस सुलभ करून देण्याचा एकनाथानें यत्न केला असावा. यावर एकनाथानें प्रत्यक्ष एक टीकाच लिहिली असावी, असा विद्वानांचा तर्क आहे; परंतु ही टीका हल्लीं उपलब्ध नाहीं.

एकनाथानें आपल्या वयाच्या एकवीस-बाविसाव्या वर्षीं ग्रंथरचनेच्या उद्योगास सुरुवात केली व हा त्याचा उद्योग आजन्म सतत चालू होता. आपल्या पूर्ववयांत यानें भागवतासारखा ग्रंथ मराठींत आणिला व त्यावर टीका रचिली. तसाच आपल्या उत्तरवयांतहि यानें दुसरा एक मोठा ग्रंथ, रचण्याचा उपक्रम केला. हा ग्रंथ 'रामायण' हा होय. 'चतुःश्लोकी भागवत', 'एकादशस्कंधटीका' हे अध्यात्म-ग्रंथ लिहिल्यावर अध्यात्म-रचनेची आवड बरीच पुरी झाली. पण गोड पौराणिक चरित्रगायन करण्याची मनाची हौस 'प्रल्हादचरित्र' किंवा 'रुक्मिणी-स्वयंवर' यांसारख्या लहान-लहान आख्यानांनीं भागण्यासारखी नव्हती. तेव्हां आतां एक सर्वांगसुंदर प्रचंड पौराणिक ग्रंथ लिहिण्याचें एकनाथानें योजिलें आणि सर्वांस अत्यंत प्रिय असें जें सत्त्वशील व प्रेमळ 'श्रीरामचरित्र' तें लिहिण्यास त्यानें सुरुवात केली. हें रामचरित्र 'भावार्थरामायण' या नांवानें प्रसिद्ध आहे. हें कोणत्याहि एका संस्कृत ग्रंथाचें भाषांतर नसून अनेक ठिकाणच्या गोड गोष्टी घेऊन रचिलेलें स्वतंत्र असें 'रामचरित्र' आहे. यांत एकोपंतानें त्या काळच्या सर्व लोकांना कित्यादाखल व नित्य मनन करण्यास योग्य असा एक रामचंद्र आपल्या कल्पनेच्या डोळ्यांपुढें उभा करून त्याचें चित्र आपल्या लेखणीनें काढिलें आहे. हें या ग्रंथांतल्या अनेक ठिकाणांवरून कोणाच्याहि लक्षांत

येईल. एकनाथानें काढिलेल्या श्रीरामाचें व ज्ञानेश्वरानें श्रीराम कसा काढिला असता हें कल्पनेनें ठरवून त्या श्रीरामाचें, अशा दोघांच्या रामाचीं दोन चित्रें एका डोळ्यानें एकदम पाहणें व त्यांची तुलना करणें जरा मनोरंजक होईल. ज्या वर्णनावरून ही कल्पना बांधितां येईल त्यांपैकीं एकच लहानसें उदाहरण घेऊं.

राम वनवासास निघाला तेव्हां धनधान्य व वस्त्रें, रत्नें वगैरे सर्व लौकिकपदार्थ टाकून, निर्विकल्प मनानें सर्वां भूतीं प्रेमयुक्त अंतःकरणानें आणि सात्त्विक बुद्धीनें भाव ठेवून निघाला. या वेळीं एकनाथाच्या रामानें सर्व धनें, गोधनें वगैरे वांटून टाकण्यास सौमित्रीला आग्रहानें सांगितलें. ही आज्ञा करितांना एकनाथाचा हा वनगमनाभिमुख झालेला असा —

श्रीराम म्हणे लक्ष्मणासी। यथाकाळीं शीघ्र आलासी । मी निजधन देईन दीनासी । तूं त्या कार्यासि संपादि ।। सर्वार्थी सखा साह्यातें । आधीं पुजावें वसिष्ठातें । सर्वस्व अर्पावें श्रीगुरुतें। हा मुख्य आमुतें स्वधर्म ।। अमूल्य वस्त्रें सीतेपाशीं। तींहि दिधलीं सुयज्ञासी। जडित शय्या आस्तरणेंसीं। सहित दासी अर्पिल्या ।। मातुळगज रामापासीं । तो शृंगारोनि अलंकारेंसीं । त्यावरी बैसवोनि सुयज्ञासी। गज गजरेंसीं बोळविला ।। श्रीराम सांगे सौमित्रासी। अगस्त्या, शांडिल्या गार्ग्य ऋषींसीं । वामदेवादि कौशिकांसी। बहु धनराशी पाठवाव्या ।। वेदपाठक, अग्निहोत्री । सत्कर्माचार नित्य श्रोत्री। आगमिक महामंत्री। द्रव्यसंभारीं पुजावें ।। अयाचित भगवद्भावें । अवश्य दान त्यांसी द्यावें । आपण जावोनियां सवें । धन अर्पावें याचकां ।। कुटुंबवत्सल आणि निर्धन । बहु अपत्यें अत्यंत दीन । त्यांचें सुखी होय मन। इतुकें धन अर्पावें।। शिलवृत्ति आणि उंच्छवृत्ति ।जावोनि त्यांच्या गृहाप्रती। जितकें द्रव्य ते मागती। तितुकें चतुर्गुणीं तूं त्यां देईं ।। धनधान्य कौसल्ये घरीं। आधीं द्यावें धर्माचारी । संन्यासी, मधुकरी, करपात्री ।

ब्रह्मचारी भिक्षार्थी ॥ **कौसल्येचे** निजसेवक । आणि तिचे उपासक । तैसेंच सुमित्रेचे देख । धन अनेक त्या देईं ॥ आमुचे सुहृद आणि सेवक। परिचारक आणि प्रेषक । कथाकथक पुराणिक । द्रव्य अनेक त्या द्यावें ॥ छत्रकार, चामरधारी । हडपी, बारी आणि व्यवहारी । जळप्राशक धूपी फुलारी । सुखी करीं द्रव्यदानें ॥ मल्ल, दगनी, नटनाटक । अश्ववाहक वस्त्र-प्रक्षाळक । राय विनोदी, उपहासक । शिल्पकारक सुखी करीं ॥ माझा सारथी चित्ररथ । त्यासी अर्पीं अपार अर्थ । दीन दरिद्री जे जे समस्त । अर्थवंत ते करीं ॥ आमुचे सुहृद भक्त । जे कां आमुचे नित्याश्रित । जे जे आम्हांसी आर्तभूत । ते धनें समस्त सुखी करीं ॥ माझें होय पुनरागमन । तोंवरी खावया पुरे धन । एसें दीनासी द्यावें दान । सनातन हा धर्म ॥

(भावार्थरामायण, अयोध्याकांड, अ. ८)

ही एकनाथाच्या रामानें केलेली निरवानिरव, एखाद्या व्यवहारचतुर वकिलाच्या साह्यानें केलेल्या मृत्युपत्रांतली निरवानिरव दिसते. यांत सर्वांस समान लेखणाऱ्या श्रीरामाची ओळख पटत नाहीं. हें देवाघरचें देणें नाहीं. देव देतो तेव्हां हिशोब आणि चोपडया पाहत बसत नाहीं. तो आपल्या अनंतहस्तांनीं ‘ नको, नको ’ म्हणत असतांहि देतोच. त्यास अमक्याला इतकें द्यावें आणि तमक्यास तितकें द्यावें, हें नाहीं. या रामाच्या देण्यांत सर्वां भूतीं सारखें प्रेम नाहीं. कैकेयीचें तर यांत नांव नाहीं. तिचे सेवक, तिच्या दासी, तिचे आश्रित उपाध्ये यांचाहि परामर्श यांत नाहीं. या एकोपंताच्या श्रीरामाच्या चित्रांत ज्ञानेश्वराच्या चित्रांतला हळुवारपणा तर नाहींच नाहीं, पण तें मार्दव आणि तें दयाळुत्वहि दिसत नाहीं.

‘ कां तोंड पाहुनि प्रकाशू । न करी जेवीं चंडांशू । जगा एकुची अवकाशू । आकाश जैसें ॥ तैसें ज्याचें मन ः माणुसप्रती आन आन । नोहे आणि वर्तन। ऐसें पैं तें ॥ जे जगेची सवोळख । जगासी जुनाट सोयरिक । आपपर हे

भाष । जाणणें नाहीं ॥ वारियाची धाव । तैसे सरळ भाव । शंका आणि हाव नाहीं जया ॥

ही उच्च पायरी एकोपंताच्या रामांत नाहीं. आणि याचें कारणहि उघड आहे. एकनाथ संसार करीत होता व व्यवहार जाणीत होता; ज्ञाननाथ कल्पनेच्या तरंगांत वाऱ्यावर वावरत होता. संसारांतल्या गोष्टी तो जाणीत नव्हता असें नाहीं; पण संसारांत व जगांत जें जें लोकांच्या व्यवहारांत दिसतें किंवा चित्तांत असतें त्याला कल्पनेच्या प्रांतांत नेऊन अत्युच्च स्वरूप देऊन मग त्याचे केवळ कल्पनेनेंच जाणतां येईल असें मोहक शब्दचित्र काढून तें तो जनतेपुढें मांडितो व तें काल्पनिक चित्र व्यवहारांत आणून दाखविण्यास सांगतो; आणि एकनाथ हा जें केवळ कल्पनेनेंच दिसूं शकेल अशाला नीट व्यावहारिक स्वरूप देऊन त्याचें चांगलें चित्र पुढें मांडून त्याबरहुकूम जनतेनें नित्य वागावें, असें सुचवितो. म्हणजे एक नित्यव्यवहाराला काल्पनिक पोषाख चढवितो व दुसरा कल्पनेला शब्दांत बांधून व्यवहारयोग्य करितो. 'अमृतातेंहि पैजा जिंकें, अशीं रसिकें अक्षरें मी मेळवीन, शब्दांचें असाधारण व्यापकपण पाहून पाहणारांना त्यांत चिंतामणीचे गुण दिसतील असे शब्द मी योजीन, माझ्या शब्दांच्या रसाळपणानें श्रवणेंद्रियांना जिभा फुटतील, घ्राणेंद्रियाला गोड परिमळ आलासें वाटेल. डोळ्यांना माझीं अक्षरें मौक्तिकांपेक्षांहि सुंदर दिसतील, आणि मन तर संपूर्ण पद पाहून शरीरांतून तें झेलावयाला बाहेर निघेल,' अशी ज्ञानेश्वराची मोठी प्रतिज्ञा होती. असली शब्दसृष्टि निर्माण करण्याची हाव एकनाथाला मुळींच नव्हती, सर्वांना समजतील असे शब्द योजिले म्हणजे पुरे, असें त्याला वाटे. अरूपाला बोलाचें रूप द्यावें व तें अतींद्रिय असलें तरी इंद्रियांना भोगवावें ही ज्ञानेश्वराची हातोटी, व जें शब्दरूपानेंच दिसतें आणि ज्ञानेंद्रियांनाच जाणतां येतें तें साधारण माणसांनाहि वागवितां येईल असें करावें ही एकनाथाची युक्ति. ज्यांनीं स्वर्गसंसाराची कुरवंडी केली आहे, ऐहिक गोष्टींना तिलोदक दिलें आहे, अशांसाठीं ज्ञानेश्वरानें

आपली ग्रंथरचना केली. तो म्हणतो, 'अशा वांचूनि एथिंची गोडी। नेणती आणिक।' त्याचा ग्रंथ 'हिमांशु जैसें खाजें चकोराचें। वायसीं चंद्र नोळखिजे। तसा प्राकृतीं तो नेणिजे। तो सज्ञानांचा ठावो।' पण एकनाथाचें तसें नाहीं. तो आपले ग्रंथ साधारण सांसारिकांकरितां, भवभयानें गांजलेल्यांकरितां, अनेक सिद्धांतांनीं गोंधळून गेलेल्यांकरितां, आपणाला मोक्षसाधनाची आशा कैची, असें वाटून भेदरलेल्यांकरितां, आणि लुंग्यासुंग्या भाळ्याभोळ्यांकरितां लिहितो. तेव्हां ज्ञानेश्वराचें ग्रंथरचनेचें ध्येय निराळें, आणि एकनाथाचें निराळें. कैवल्यरसाची खाण उघडी करणें हा हेतु ज्ञानेश्वराचा तर खराच; पण हें करितांना वसिष्ठानें आपल्या छाटीकडून सूर्याशीं झोंबी घेवविली, किंवा विश्वामित्रानें नवी सृष्टि निर्माण करून ब्रह्मदेवाला लाजविलें तसें आपल्या मऱ्हाटी रचनेनें संस्कृतज्ञांना, आणि त्यांच्या भाषेला खालीं पाहवावें, अशीहि हाव होती. जें संस्कृताला साधिलें नाहीं, तें मीं मराठीला साधून दिलें, असें आडून किंवा उघड सांगणाऱ्या मराठी कवींत ज्ञानेश्वर पहिला होता. आणि ही एक त्याची उघड प्रतिज्ञा होती, ही एक त्याची होड होती व ती त्यानें जिंकिली. अशी पैज एकनाथाचे मनांत नव्हती व ती जिंकण्याचा पवित्राहि त्यानें मांडिला नाहीं.

एकनाथाच्या काळांतल्या परिस्थितीचा विचार केला असतां त्याच्या कृतीचें, त्याच्या ग्रंथरचनेचें, किंबहुना त्याच्या सर्व आयुष्यरहाटीचें रहस्य चांगलें लक्ष्यांत येईल. एकनाथाचे वेळीं सभोंवतीं सर्वभर मुसुलमानी अंमल पसरला होता. अविंधशाहीच्या रंगाची छटा जिकडे-तिकडे दाटली होती व हें सर्व महाराष्ट्र अविंधमय होऊं पाहत होतें. उत्तरेकडून महंमदी वारे जोरानें वाहत होते तसे इतर दिशांनींहि महाराष्ट्रधर्माला विघातक असे वारे वाहूं लागले होते. जैनांच्या पोटांतून निघालेला लिंगायतधर्म, कबीरपंथ, दादुपंथ, वगैरेंनीं महाराष्ट्राच्या चातुर्वर्ण्यप्रमुख आचारावर व विचारावर सारखे आघात मांडिले होते. मानभावपंथानेंहि हातपाय पसरण्यास सुरुवात केली होती व चातुर्वर्ण्य मोडणाऱ्या किंवा

मोडूं पाहणाऱ्या अनेक मतवाल्यांनीं कहर उडविला होता. स्वराज्य तर पूर्वींच लयास गेलें होतें व आतां स्वधर्मालाहि राजयक्ष्मा झाल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. स्वभाषाहि खालावत चालली होती. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरी-सारखा दिव्य ग्रंथहि फारसा दिसेनासा झाला होता. आचार तर साफ भ्रष्ट होऊन गेला होता. धर्मगुरु जे ब्राह्मण त्यांपैकीं कांहीं कर्मठपणांत बुडून रुपले होते. कांहींनीं चाटेपणासारखे धंदे पत्करून वैश्यवृत्ति आरंभिली होती. कांहींनीं शेतीभाती करून खोतीगांव वसवून शूद्राचार धरिला होता व कांहींना इतकीहि कर्तबगारी नसून ते केवळ यवनांची सेवा पत्करून त्यांची व त्यांच्या बायकापोरांची 'हांजी हांजी' करीत थुंकी झेलून उदरपोषण करीत होते. अभिमान तर नष्टच झाला होता. लहानपणींच घर सोडल्यावर दौलताबादेस जनार्दनपंताजवळ असतांना हें सर्व एकनाथानें पाहिलें होतें. परधर्मीयांची नोकरी स्वधर्माचाराला कशी आड येते, हें जनार्दनस्वामीला अखेर नोकरीस रामराम ठोकणें भाग पडलें यावरून त्याला चांगलें दिसलें होतें; व पुढें दोन-अडीच वर्षें जनार्दनस्वामीसारख्या तेजस्वी व निःस्पृह पुरुषाबरोबर तीर्थयात्रा आणि पर्यटन करितांना एकंदर लोकस्थिति व देशस्थिति त्यानें उत्तम न्याहळली होती. यानंतर त्यानें आणखीहि स्वतःच पर्यटन केलें, यात्रेच्या निमित्तानें सर्व थोर स्थळें पाहिलीं, तेथील महंतांच्या गांठी घेतल्या आणि देशावर, धर्मावर व भाषेवर कोणती आपत्ती ओढवली आहे, हें नीट लक्षांत आणिलें व या आपत्तीचें निवारण होईल असे ग्रंथ व असें आचरण त्यानें आरंभिलें. याकरितां भागवतधर्माचा नीट विचार करून त्याचें महाराष्ट्राला पटेल व पचनीं पडेल आणि त्याला लाभदायक होईल असे उत्तम योगमार्ग व ज्ञानमार्ग हे दोन्ही अव्यवहारार्ह म्हणून त्यानें ते सोडून दिले. योगमार्ग तर अत्यंत दुर्गम. तेथें इंद्रियदमन फार करावें लागतें. श्वास आवरावा लागतो. निरनिराळीं आसनें अभ्यसावीं लागतात. यांत जरा चुकलें कीं प्राणांशीं गांठ. ही तरवारींची कसरत लाख-दहालाखांत एखाद्यालाच साधली तर साधणार. बाकी साधारण

माणसांना एकनाथ म्हणतो,

"इंद्रियें कोंडितां न कोंडतीं । विषय सांडितां न सांडिती । पुढतपुढतीं बाधों येती । यालागीं हरिभक्ती द्योतली वेदें ॥"

ही झाली योगमार्गाची गोष्ट. ज्ञानमार्गाचीहि तसलीच कथा. एकोपंत म्हणतात —

"न करितां वेद शास्त्र व्युत्पत्ती । ऐसिया अज्ञाना निजात्मप्राप्ती । सुगम जोडे ब्रह्मस्थिति । यालागी हरिभक्ति प्रकाशली देवें ॥"

कर्ममार्गाची यातायात तर विचारूंच नये. पुरश्चरणें, चारी धागें, सर्व यात्रा, हीं लचांडें तेथें फार. धडधाकट असेल त्याच्याहि कंबरेचे काटे तेथें ढिले होणार, मग लुंग्यासुंग्यांचा पाड काय! तेव्हां हा मार्गहि फुकट. याकरितां अंधळे, पांगळे, थोटे यांनाहि ईश्वरप्राप्ति होईल, खट-नट, भोळे-भाबडे, अज्ञान, अनाथ, अपंग हेहि तरून पार होतील, असा मार्ग दाखविणें अवश्य आहे. हें तीर्थयात्रेंत जगाची स्थिति निरखून पाहत असतां नाथांच्या लक्षांत आलें व त्यांनीं सर्वांना सहज साधितां येईल, असा भागवत-धर्म स्पष्टपणें दाखवून दिला; आणि महंमद-धर्मीयांच्या, आचारभ्रष्टांच्या, वितंडवाद्यांच्या जाळ्यांत सांपडलेल्या महाराष्ट्राला त्यांतून सोडवून मुक्त केलें. आपल्या ग्रंथांचें, या भागवत-धर्माचें रूप त्यांनीं सर्वांपुढें स्पष्टपणें मांडिलें. आपल्या उपदेशानें त्यांनीं त्या धर्माची वाट सर्वांना समजावून सांगितली; आणि आपल्या प्रत्यक्ष नित्य-व्यवहारांतल्या आचरणानें त्यांनीं या धर्माचा धडा सर्वांना साक्षात् घालून दिला. भलत्याच समजांचा ठाव पुसून टाकिला व सत्य वर्तनाचे कित्ते पुढें मांडिले. हिंदुधर्माला संसार अवश्य सोडावा लागतो, हें निव्वळ खोटें आहे हें त्यानें प्रयत्क्ष संसार थाटून, स्त्रीपुरुषांची जोपासना करून सर्वांच्या निदर्शनास आणून दिलें. या चातुर्वर्ण्यांत सर्वांची सोय राहत नाहीं व एक दुसऱ्याचा तिरस्कार करितो व हें करणें यांतच धर्मरहस्य व सदाचार आहे, असें म्हणून बुद्धिभेद करूं पाहणारांना, श्राद्धाचे दिवशीं ब्राह्मणांच्या आधीं अंत्यजांना जेवूं घालून, उन्हांत तळमळणारें

महाराचें शेंबडें मूल उचलून कडेवर घेऊन व त्याचा शेंबूड आणि लाळ स्वहस्तानें पुसून, आपल्या हांतरुणावर वडाऱ्याला निजला ठेवून, स्वतः राणू महाराकडे सर्वां समक्ष जेवावयास जाऊन आणि अशा अनेक गोष्टींवरून एकनाथानें अगदीं निरुत्तर केलें व हिंदुधर्म हा सर्वांचें मायपोट आहे, त्याला सर्व सारखेच आहेत, त्यांत व्यवसायनिमित्तानें भेदाभेद आहे; पण त्यांत उच्चनीचपणाचा भाव नाहीं व तो (हिंदुधर्म) कोणीं सोडणें श्रेयस्कर नाहीं, असें त्यानें स्पष्टपणें जाहीर केलें. या धर्माला माणसामाणसांत तर उच्चनीच हा भाव नाहींच नाहीं, त्या तर सर्व परमेश्वराच्या रूपाप्रमाणेंच घडविलेल्या प्रतिमा आहेत, पण या धर्माच्या दृष्टीनें इतर प्राण्यांत आणि माणसांतहि उच्चनीचपणा नाहीं. ईश्वरनिर्मित सृष्टींतले सर्व प्राणिजात त्याचेच केले आहेत व ते सर्व सारखेच असून त्या सर्वांत बंधुभाव असावा व एकाचे दुःखानें दुसऱ्यास कळवळा यावा हें इतर कोणत्याहि धर्मापेक्षां यांतलें विशेष मर्म आहे, हें एकनाथानें तान्हेनें व्याकूळ झालेल्या गाढवाला रामेश्वरास चालविलेल्या खांद्यावरील कावडींतलें पाणी पाजून सर्व जगास जाहीर केलें आणि एकनाथाचें करणें तेव्हांच्या व तेव्हांपासून आतांपर्यंतच्या सर्व ब्राह्मणांस पटलें. मोरोपंतासारखा बालबोध आचरणाचा, कुटुंबवत्सल राष्ट्रीय पुराणिकदेखील एकोपंताच्या या करणीस मान डोलवून आपल्या महद्विज्ञापनेंत म्हणतो—

पाणी एकोपंत द्रवुनि विकळ तृषित रासभा पाजी ।
तें लक्षविप्रभोजनसम झालें, म्हणति साधु, बापा जी ॥

जसे स्वतःच्या आचरणानें सर्वांना गिरविण्याजोगे धडे एकनाथानें घालून दिले, तसेंच स्वतःच्या ग्रंथरचनेनेंहि सर्वांना उपयोगी पडतील व समजतील असे विचार त्यानें लोकांपुढें ठेविले. त्यानें ब्रह्मज्ञान्यांना झटापटी घेण्यास सांपडेल असे भागवतासारखे अध्यात्मग्रंथ निर्माण केले, ईश्वरकथांनीं भक्तांचें चित्त ज्यांत रमेल असें रामायण रचिलें, स्त्रियांना

फावल्या वेळीं वाचून आनंद होईल असे रुक्मिणीस्वयंवर, प्रल्हादचरित्र यांसारखे प्रबंध गाइले. इतकेंच नव्हे, तर लहान खेळाडूंना अल्लड मुलांनाहि तो विसरला नाहीं. त्यांच्या योग्य असे जोहार, अर्जदास्त, कोल्हाटीण, बालसंतोष, जोगवा, कानफाट्या, पांगूळ वगैरे अनेक प्रकारचे मनोरंजक 'भारूड' त्यानें लिहिलें आहे. हेंच काय, पण भिक्षेकऱ्यांना भिक्षा मागतांहि हरिनाम व हरिकथा यांचा उच्चार व्हावा, अशी त्यानें सोय केली आहे. या भिक्षेकऱ्यांच्या वांटणीची थोडी वानगी देतों—

"असा कसा देवांचा देव हा ठकडा। देव एक पायानें लंगडा ॥ ग बाई॥
शिंकेंचि तोडितो, मडकेंचि फोडितो। करी दह्या-दुधाचा रबडा ॥ ग बाई॥
वाळुवंटीं जातो, कीर्तन करितो। घेतो साधु-संतांशीं झगडा ॥ ग बाई॥
एका जनार्दनीं। भिक्षा वाढा बाई। देव एकनाथाचा बचडा ॥ ग बाई॥
असा कसा देवांचा देव हा ठकडा। देव एका पायानें लंगडा ॥

अनेक दृष्टींनीं पाहतां असें दिसून येतें कीं, एकनाथ हा लोकोत्तर पुरुष होता. त्याचें काम अगदीं बिनखोड आहे. काव्य या दृष्टीनें पाहतां केवळ कल्पनेच्या भराऱ्या त्याच्या ग्रंथांत फारशा दिसणार नाहींत; पण त्याचे ग्रंथांत कांटेतोलपणा, व्यावहारिक चातुर्य, खोल अर्थ व सर्वव्यापी प्रमेयें हीं सर्वभर आढळतील. किंबहुना, या व अशा सर्व बाबींत एकनाथ केवळ हातखंडा आहे. त्याची राहणी आणि वागणीहि अशीच अवर्णनीय दिसते. तो जसा लौकिकांत वागतो तसेंच ग्रंथांत लिहितो; आणि तो जसें लिहितो तसाच वागतो. हें असिधाराव्रत फार कठीण आहे. पण तें एकनाथानें साधून दाखविलें; आणि यामुळेंच कृष्ण-दयार्णव त्याला 'सकळ सद्गुणीं संपूर्ण' असें म्हणतो. देवदास त्याला 'उदार, धीर, सर्वज्ञ' असें संबोधितो. एकेश्वर अवधूत त्याचे ग्रंथ पाहून त्याला 'व्यासाचा साक्षात् अवतार' मानितो. मोरोपंत म्हणतो— 'तो केवळ 'प्रभुरूप' असा 'शांतिजलधि' आहे. कारण 'स्वापत्य तसें प्रेमें अन्नार्थि प्राणिजात तर्पात्रे' ही त्याची नेहमींची करणी असे.

अमृतराय तर त्याला 'परमपुरुष परम भागवत'च लेखितो. तुकाराम त्याचे गुण आठवून आणि त्यानें वैष्णवांचा मिळविलेला मेळा पाहून 'त्याचे पायीं माथा' ठेवितो. मुक्तेश्वराला त्याचे 'आचार विचार हे निर्दोष आणि निर्मळ' वाटतात आणि तो सकल 'सज्जनवृंदांपेक्षां अधिक' श्रेष्ठ दिसतो. त्याचा सहचर व गुरुबंधु दासोपंत याला तर त्याचा सगळाच चमत्कार अनुभवास येतो; आणि तो त्याला 'दयेचें अधिष्ठान' समजतो. अलीकडले विद्वान् लोकहि एकनाथाकडे पाहून कौतुकानें मानाच डोलवितात. चिपळूणकरशास्त्री, गोडबोले, राजारामशास्त्री भागवत, सहस्रबुद्धे, पावगी वगैरे मंडळी तर एकनाथाची थोरवी गातातच; पण नवीन पंथाची मंडळीदेखील त्याचे ग्रंथ मनापासून वाचतात व अभ्यसितात. न्यायमूर्ति रानडे तर याच्या ग्रंथांचा फार प्रेमानें अभ्यास करीत. आपल्या प्रार्थनासमाजांतील भक्त-मंडळींनाहि त्यांनीं पुष्कळ दिवस एकनाथाच्या ग्रंथांतलें रहस्य सांगितलें; व त्यांच्याच शब्दांनीं भक्तिमार्गाचें निरूपण केलें. न्यायमूर्तींच्या या निरूपणाचे वेळीं मुंबईसारख्या बकाल शहरांतदेखील श्रोत्यांच्या झुंडींच्या झुंडी लोटत. असा हा एकनाथस्वामी केवळ अलौकिक पुरुष होता. अनाथ-दुबळ्यांना साह्य करावें, बुडत्यांना हात द्यावा, विश्वकुटुंबी वृत्ति ठेवावी, असंतांनाहि संत मानावें, भक्त्यानंद आपण भोगावा व दुसऱ्यांना भोगवावा ईश्वरचरित्रांत आपण रमावें व इतरांना रमवावें, सुंदर ग्रंथ आपण लिहावे व दुसऱ्यांकडून लिहवावे, हाच क्रम त्यानें आजन्म आचरिला. आपल्या उत्तरवयांत त्यानें दशावतारांपैकीं अत्यंत प्रेमळ अशा रामावताराचें निरूपण करण्यास प्रारंभ केला; व 'भावार्थरामायण' या ग्रंथास सुरुवात केली. पण तो ग्रंथ त्याचे करवीं श्रीरामानें पुरा करविला नाहीं. युद्धकांडाच्या चव्वेचाळिसाव्या अध्यायापर्यंत ग्रंथ लिहून झाल्यावर असा हा आपला दास आपल्या सन्निध असावा, असें श्रीरामास वाटलें; व या एकनाथास त्या श्रीरघुनाथानें आपल्या चरणसेवेला समीप बोलाविलें. तें आलेलें देवाजीचें बोलावणें पाहून एकनाथानें सर्व

आवराआवर केली; व रामायण-ग्रंथरचनेचा पुढील भार आपल्या 'गावबा' नांवाच्या एका शिष्यावर सोंपवून तो शके १५२१-च्या फाल्गुन वद्य षष्ठीस हा लोक सोडून गेला.

---

१.कांहीं ग्रंथकार व अनेक भाविक संत म्हणतात कीं,एकनाथानें जलसमाधि घेतली. हें खरेंहि असेल. पण आयुष्य सरून मृत्यूनें गांठलें नसतांच एकनाथ आपलें हातांतलें रामचरित्रलेखन अर्धवट टाकून समाधि घेईल, हें म्हणणें चिकित्सकांस कदाचित् नीटसें पटणार नाहीं. ते म्हणतील—साधूंच्या संबंधीं पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी येवढ्याचकरितां ही एक बनविलेली आख्यायिका असेल. कसेंहि असलें तरी शके १५२१-च्या शिमग्यानंतर एकनाथ हयात नव्हते, हें मात्र 'बहुतेक' सर्वांना मान्य आहे. बहुतेक म्हणण्याचें कारण असें कीं, हें सरकारच्या विद्याखात्यास व नवनीतकारांस अजून मान्य नाहीं तरीपण पुढें-मागें हें मान्य होईल, अशी आशा वाटते. कारण इ. सन १८५८-च्या नवनीताच्या आवृत्तींत एकनाथाचा निधनशक १५४६ असा दिला होता. इ. सन १९१०-च्या आवृत्तींत हा शक १५३१ असा दिला आहे. म्हणजे हा शक पंधरा वर्षें मागें येण्यास बावन वर्षें लागलीं. आतां आणखी दहा वर्षें मागें येण्यास या हिशोबानें पसतीस वर्षें लागतील ! म्हणजे इ. स. १९४५-चे नवनीतांत हा शक १५२१ असा बरोबर दिला जाईल असें गणितानें निघतें!



## एकनाथ–पंचक

गेल्या प्रकरणांत श्रीएकनाथस्वामींचे रामायण, भागवत वगैरे ग्रंथ सांगितले. त्या ग्रंथांखेरीज 'बालक्रीडा' वगैरे ग्रंथहि एकनाथानें लिहिले, असें त्या ग्रंथांतील अंतिम लेखावरून दिसतें. पण या ग्रंथांतली भाषा, विचारसरणी, निरूपण वगैरे सर्व प्रकार पैठणकर भानुदासाचा नातू जो महाप्रसिद्ध एकनाथ त्याचे ग्रंथांपेक्षां फार भिन्न आहे. तेव्हां हा एकनाथ दुसरा कोणी तरी भिन्न कवि असावा, असें अनुमान होतें व शोधा अंतीं हें अनुमान खरें असून हा एकनाथ कोणी महानुभावपंथी ग्रंथकार होता, असें ठरतें. एकाच नांवाचे एकापेक्षां अधिक ग्रंथकार होऊन गेल्यामुळें त्यांचे संबंधीं फार घोटाळा होऊन गेला आहे. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, वगैरे अनेक नांवें एकापेक्षां जास्त ग्रंथकारांचीं आहेत; पण या नांवांपेक्षां 'नामदेव' या नांवानें फार घोटाळा उडाला आहे आणि याचें कारण असें आहे कीं, 'नामदेव' नांवाचे दोन्ही ग्रंथकार सारख्याच दर्जाचे व प्रसिद्धीचे होते. या दोघां नामदेवांचा थोडासा खुलासा करूं.

( १ ) ज्ञानेश्वरसमकालीन, ज्ञानेश्वराची 'आदि' गाणारा नामदेव व ( २ ) महाभारतकार नामदेव. पहिला नामदेव हा नामा सिंपी—याची हकीकत मागें एका स्वतंत्र प्रकरणांत सांगितली आहे. अभंगांशिवाय याची दुसरी रचना नाहीं. निदान ती हल्लीं प्रसिद्ध नाहीं. या नामदेवासंबंधीं पुढील माहिती आहे —

१. तो जातीनें शिंपी होता; २. त्याचा गुरु विसोबा खेचर; ३. त्याचा बाप दामाशेटी, बायको राजाई, पुत्र नारा, महादा इत्यादि; या सर्वांचा उल्लेख नामदेव अभंगांत वारंवार करितो; ४. नाम्याचें दैवत विठ्ठल, या बाबी निश्चित व सर्वमान्य आहेत. आतां यात्यतिरिक्त यांपैकीं एक किंवा अनेक बाबी ज्याचे संबंधीं असतील तो नामदेव

या नामदेवाहून भिन्न पुरुष होता हें समजलें पाहिजे. आतां 'नामदेवा' चे नांवानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथांतून त्याची माहिती देणारे कांहीं कांहीं उतारे पाहूं —

१. **प्रिय विष्णुदास** लागे अंबेच्या चरणीं । ( कामाईची आरती )
दृढभक्तीचा अंगिकारी । जन्मोजन्मी वोळगावा श्रीहरी ।
न विसंबावा क्षणभरी । म्हणे पंडित **विष्णुदास**[1]
( हरिश्चंद्राख्यान ).

२. अपूर्व द्रोणपर्वीची कथा। लाघव बहुत युद्ध करितां ।
दत्तचित्त परिसावे श्रोता । म्हणे **नामा पाठकू**

३. आतां नमूं तो कुळगुरू । जो परंपारा वृद्धाचारू ।तो
**चिंतामणी** भवतारूं । स्वमी माझा
आतां नमूं कुळअंबिका । मूळपीठ-निवासी **रेणुका** ।। जीचेनि
प्रसादें आइका । ग्रंथरचना हे पवित्र ।।

या उताऱ्यावरून हा **दुसरा नामदेव** पहिल्या ज्ञानेश्वरकालीन नामदेवापेक्षां भिन्न ग्रंथकार होय, असें म्हणतां येतें. या दुसऱ्या नामदेवाचीं लहानसहान अनेक प्रकरणें असून सबंध अठरा पर्वें महाभारत आहे. आपल्या मराठी भाषेंत अठरा पर्वें महाभारत लिहिणारा हा पहिलाच ग्रंथकार दिसतो. हा एकनाथाच्या जरा पूर्वीं होऊन गेला असेल किंवा समकालीन असेल.

याच्या ग्रंथाच्या प्रती शके १५३०-पासून व नंतरच्या केलेल्या आढळतात. हा मुक्तेश्वरापूर्वीं होऊन गेला व याचें महाभारत मुक्तेश्वरानें पाहिलें होतें, असें खास दिसतें. मुक्तेश्वरानें आपल्या आदिपर्वांत द्रौपदीस्वयंवराचे वेळची मत्स्ययंत्रभेदाची हकीकत सांगतांना म्हटलें आहे कीं—

'प्राकृत कवींचा वाग्जल्प । तैलकढईंत पाहुनी रूप ।
फिरतां मत्स्य सकंप । वामनेत्रीं विंधला ।।

१. गो. का. चांदोरकर, भा. इ. मं. पु. ९, पृ. ७०.

परी तें मूळ भारतीं नाहीं । म्हणोनि असें न बोलों कांहीं ।
नळिकाछिद्रांतुनि पाही । यंत्र छेदोनि पाडिलें ॥' (अ. ४१)

आणि **नामा विष्णुदास** आपल्या महाभारतांत स्वयंवराची हकीकत सांगतांना म्हणतो—

'तेल कढैसी घालुनु । वरि लक्ष मांडिले असे ॥ वेळू बांधिला असे मासा । तयाचा वेगू भ्रमत कैसा । दृष्टी दिसेना सहसा । आणीक परियेसा कवतुक ॥ ते तेल कढैत उततें । रूप पाहावें तेथें । लक्ष भेदावें निरुते । तीहींच बाणीं अवधारा ॥'

यावरून मुक्तेश्वराचें लिहिणें नामा विष्णुदासास लावून आहे, असें दिसतें. नामा विष्णुदासाचें भारत या वेळीं महाराष्ट्रांत सर्वमान्य असून त्याचे पाठ गांवोगांव चालत. हल्लींहि हीं पर्वें सर्वभर पसरलेलीं आढळतात. याच्या भारतीपर्वांच्या पुष्कळ पोथ्या आहेत. पण त्यांचा एकमेकींशीं मेळ नीटसा बसत नाहीं. त्यांत फरक आढळतो. कांहीं पोथ्यांत गदापर्व, स्त्रीपर्व, शांतिपर्व वगैरे पर्वें १०० ओव्यांचे आंतच सांगितलीं आहेत. तर कांहींत याच पर्वांनीं ६००-पासून १०००-वर ओव्या घेतल्या आहेत. कोठें-कोठें—

'भारतीं बहुत बोलिलें । तें म्यां साक्षेपें सांगितलें ।'

असाच शेरा आढळतो. पण सरासरीनें पाहतां या विष्णुदास नामाच्या भारताची ओवीसंख्या अठरापासून वीस-हजारापर्यंत असावीसें दिसतें. याचे ग्रंथांतलीं वर्णनें पुष्कळ ठिकाणीं सरस व गोड उतरलीं आहेत. उद्योगपर्वांतील 'कृष्णनीति' प्रकरणाचे प्रारंभींच सभास्थानवर्णन, उत्तरगोग्रहण वगैरे अनेक प्रकरणें याची साक्ष देतील. पांपरा (लाथ), मेळिकार (शिबिर), रणवट (सेनापतीचीं वस्त्रें), केणें (विक्रीचा माल) वगैरे जुनाट शब्द याचे ग्रंथांत बरेच आढळतात. तसेंच, याच्या भारतांत साडेचारचरणी ओव्याहि चोहींकडे पसरलेल्या आढळतात. याच्या ग्रंथाच्या नकलांत इतका फरक दिसतो व त्या अशा केलेल्या आढळतात कीं, त्यांवरून कवीचा मूळ पाठ कोणता असावा, हें ताडणें

फार जड जातें. थोडाथोडा बदल करतां करतां, नकलांत किती फरक पडत जातो हें कळण्याकरितां जवळ-जवळ समकालीन, अशा नकललेल्या दोन पोथ्यांतून एकाच प्रसंगाचे दोन उतारे पुढें देतों—

राजा नगर प्रवेसला। राजभुवनासि गेला। दाबोपासावो दिधला। लोकां सन्मानू केला। बहुतु॥ ५९॥ मग बोलाविलें कंकभटासी। बहुत सन्मानिलें तयासी। वस्त्रें अलंकार तयासी। बलवासहित दाता झाला॥ ६०॥ ते न घेती पतिकरू। म्हणती येऊं द्या उत्तरु। मग समारंभु करूं थोरू। नव्हे हा अवस्वरू। आतांचा॥ ६१॥ ऐसें कंकभटु बोलिला। तंव रायें सारीपाटाचा खेळू मांडिला। तंव उत्तरु जवळु आला। गजरु आइकला। तुरांचा॥ ६२॥ वैराटु कंकभटातें म्हणे। आम्ही गेलो दक्षिणे। तेथें आम्हां आलें उणें। मग आलें सोडवणें। बलव देखा॥ ६३॥ येकला उत्तरु उत्तरे गेला। तेणें दुर्योधनु जिकला। वेरूं मोडिला। सात क्षौणी॥ ६४॥ यावरि कंकभटू बोले। तुम्ही सुशर्मयासी। जिंकिले। ऐसे बोलिलें। युधिष्ठिरु॥ ६५॥ ऐसें उत्तर वर्मं केलें। तें जिव्हारीं लागलें। ते व्हेळीं हातीचे फासे टाकिले। रायें कोपें बहुते॥ ६६॥ ते फासे पाटावरि पडिले। तेथौनि उसळले। ते लागले कपोळीं। धर्माचिये॥ ६७॥ तेणें ल्लाट फुटले। निडळीहुनि असुद निघालें। तळीं कंचोळें वोडवीलें। सेळंद्रिया तये वेळीं॥ ६८॥ असूद धरणीये पडैल। तरि अरिष्ट उपजेल। म्हणौनि सेळंद्री धावूनि आली॥ ६९॥

—विराटपर्व.

राजा नगरा प्रेवेसला : राजभुवणीं आला : दाण पासाव दीधला : लोकु सन्मानीला णागरीची :॥ बोलाउणीं कंकभटासी : बहुत सन्माणीलें त्यासी। वस्त्रे अळंकार दीधले त्यासी : बल्लवासीही देता जाला :॥ तेणे घेत प्रतीग्रहो : म्हणती येऊं द्या उतरु : मग समारंभु करु : नव्हे आवसरू आतांचा॥ यैसा कंकभट बोलीला : खेळु सारीचा मांडीला : तंव उत्तरु जवळे

आला : गजरू आईकीला तुरांचा :।। वैराट कंकभटासी म्हणे : आम्ही गेलों होतों दक्षीणें : उतरू दुर्योधनातें जीणें : सात क्ष्यौणी सैन्यासी ।। यावरी कंकभटु बोलीले : तुम्ही सुसर्मा यातें जींकीलें : तैशे ची उतर दुर्योधनातें जींकीलें : काये नवल असे ।। यैसे वैराटे आईकीले : तें जीवीं लागलें : फासे हांतींचे टाकोले : ते उसळुनी कपाळी बैसले : कंकभटाचीया ।। तेणे कपाळ फुटलें : तेथें असुध नीघालें : ते सेळंद्रीया काय केलें : कंचाळे वोडविलें : भुमीला असुध पडेल म्हणोनिया ।

दोन्ही उतारे शके १५००-नंतर पंचवीस-तीस वर्षांत लिहिलेल्या पोथ्यांतले आहेत. हे उतारे बरेच जवळचे होत, पण ज्यांत यांहूनहि पाठ भिन्न आहेत असे याच प्रसंगाचे आणखीहि दोन उतारे देतां येतील. पण ते शके १७००-च्या नंतरचे असल्यामुळें येथें देत नाहीं. हे उतारे वाचून पाहिल्यावर नक्कलकार किती खेळखंडोबा करितात, हें लक्ष्यांत येईल. भारतासारख्या तोंडानें पाठ म्हटलें जाणें जवळजवळ अशक्य, अशा ग्रंथाच्या नकलांची ही स्थिति, मग नित्यपाठाच्या अभंगांची व पदांची काय दशा उडत असेल, व त्यांत अस्सल रूप किती राहील, याची कल्पना कोणालाहि होईल व नामा शिंप्याचे अभंगांची भाषा अशी कां, याचा उलगडा पडेल. महाभारताचे शेवटीं विष्णुदास नामा म्हणतो—

"ऐसी हे भारती कथा। व्यासें सांगितली परीक्षितीसुता। म्हणुनी अठरा ब्राह्मणहत्त्या। गेल्या रायाच्या ।। मग तो रावो करी काये। ऋषी षोडशोपचारीं पुजिला आहे। पुन्हा पुन्हा धरी पाये। जी उतीरीन काये। उपकारा ।। जी मज दोषा-वेगळें केलें। ऋषिसीं रायें पुजीलें तंव त्रिभुवन गर्जिन्नलें। जयजयकार झाला ।।"

असा मजकूर असून पुढें लेखनाच्या कालाचा वगैरे उल्लेख न करितां

"ऐसें बोलोनियां वचन। ग्रंथ झाला संपूर्ण। भारत संपलें येथून। म्हणे नामा विष्णुदास ।। श्रीमहाभारते इ० इ०"

असा ग्रंथाचा शेवट आहे.

या नामा विष्णुदासाच्या नांवानें 'बुधभावनी' व 'कपोत-आख्यान' अशीं दोन प्रकरणें आढळतात. हीं प्रकरणें महाभारतकार नामदेवाचीं नसण्याचा संभव बराच आहे. महाभारतकार दुसरा नामदेव, म्हणजे हा नामदेव आपल्या उत्तरवयांत महानुभाव-पंथांत शिरलेला दिसतो. महानुभाव-ग्रंथकार नामदेवानें भटमार्ग (महानुभाव-पंथ) स्वीकारिल्याची हकीकत देतात. तशीच नामदेव हा कोळी होता, वगैरे हकीकतहि त्यांचे ग्रंथांत आहे. (उत्तरार्ध चरित्र ४५८ विठ्ठल विरूकथन.) पण तेथें **नेमदेव** असा शब्द आहे. नामदेव नाहीं. याशिवाय आणखी एक बाब अशी कीं, महाभारतांत अनेक ठिकाणीं 'नामा विष्णुदास' असा उल्लेख आहे. 'कृष्णदास नामा' असा उल्लेख नाहीं. महानुभावांनीं आपणांला विष्णुदास म्हणविल्याचीं उदाहरणें नाहींत. ते नेहमीं कृष्णदास म्हणवितात. नामदेवानें महानुभाव-पंथ स्वीकारिल्याच्या वगैरे आख्यायिकेशिवाय आणखी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. नामदेवाला एक दिवस बादशहानें बोलाविलें व त्याचे पुढें गोमांसाचें अन्न वाढून ठेवलें; पण नामदेवाचे निःसीम भक्तिभावामुळें त्या गोमांसाचीं फुलें झालीं[3]. कोणी सांगतात कीं, यानंतर बादशहानें त्यास कुटुंबासुद्धां ठार मारिलें. पण पुढें या कृत्याचा बादशहास पश्चात्ताप झाला व त्यानें त्या सर्वांचीं शवें परत दिलीं. तीं सर्व आणून पंढरपुरास देवळांत पुरलीं.

१. कपोत–आख्यानांत 'मग नमिला श्रीगुरु। तो रामभारती दिगंबरू' असा उल्लेख आहे.

२. एक वेळ नामदेव आला : तो कोणा नमस्कारू न करितु बैसला : तंव कवणी एकी भणितलें: तुम्ही नमस्कारू न करितु कैसे बैसलेती : तंव नामदेया कांहीं निंदा बोलिला:... मग केसोबासीं निरूपण करुनि तेयाची कुमती हरिली. चर्चा केली : पंडितबासी खंडिला. मग उपदेश मागूं लागला. इ. इ.

३. असाच एक उल्लेख माहीमच्या बखरींत आहे. पण यांत ठार मारल्याची व शवें पुरल्याची हकीकत नाहीं. "त्यावर देवगिरी काबीज केली.

[पान २८९ पहा.]

महानुभावग्रंथकारांनीं दिलेली नामदेवाची हकीकत कितपत खरी असेल ती असो, पण नामदेवाचा 'महाभारत' हा पूर्वी लिहिलेला ग्रंथ महानुभाव लोकांनीं आपल्या पंथांतल्या साधुपुरुषाचा म्हणून आपल्या ग्रंथसंग्रहांत संगृहीत केला आहे. महानुभावग्रंथकार आपल्या ग्रंथांत पूर्वाश्रमींचें नांव न घालतां, त्या मार्गांत गेल्यावर धारण केलेलें नवें नांव प्राय: घालतात[1]. पण महाभारतांत 'नामा' हेंच नांव आहे. इतकेंच नव्हे, तर 'विष्णुदास नामया' असाहि उल्लेख आहे[2]. तसेंच, 'नाम्या तुझ्या आदरें संतोष झाला थोरु' हीं व अशासारखीं प्रेमळ सलगीचीं भाषणें देवाच्या तोंडीं घातलेलीं आहेत, हें त्या पंथांतल्या इतर ग्रंथांपेक्षां निराळें दिसतें. या व इतर अनेक बाबींवरून असें वाटतें कीं, नामदेव नांवाच्या कोणा विद्वान् ब्राह्मणान साग्र महाभारत ग्रंथ रचिला व तो कदाचित् पुढें महानुभाव-पंथांत गेला व नंतर त्याचे ग्रंथांत कांहीं ठिकाणीं फिरवाफिरव करून महाभारत ग्रंथ महानुभावांनीं आपल्या ग्रंथांत प्रचलित केला.

---

[ पान २८८-वरून. ]

तेथें म्लेंछ जये पावले ।। रामदेवराजा आणि हेमाडपंत हे दोघे गुप्त जाले ।। त्या उपर महाराष्ट्र राज्यावरि पातशाही हल्ला जाला ।। मग सर्व विलाय यावत देवगिरी राज्य दस्त केली ।। त्या नंतरें मलिक बहादुर प्रमादला ।। ते समई श्री पंढरपुरी नामदेव सिपा हरिभक्त होता । तो वाराणसीचे यात्रेस जातां पातस्यानें बोलाविला ।। हिंदु कुफराणदार म्हणोन त्याचा अंत पाहों लागला ।। त्यास खानें सानकंदुरी मोहोरे ठेविली ।। भक्ष म्हणोन बलोत्कार करों लागला ।। ते समईं श्री विठ्ठल भक्त कैवारी त्या कंदुरिची पुष्पें जाली ।। ते करामत देखोन पादशा आश्चिर्य पावला ।। तेधवां नामदेवाप्रत पातशा विचारों लागला ।। तूं जातीचा कोण होसी ।। त्याणें सांगितलें की माझी जात सिपा ।। मग तो नामा दस्त केला.

माहीमची बखर.

1. याला कांहीं अपवाद आहेत.

२. ऐसे कौरवदळ आटलें । कंदन तेथें थोर झालें । मग द्रोणें काय केलें । तें सांग रे विष्णुदास नामया । द्रोणपर्व.

नामदेवाच्या महाभारताचे पर्वांचे प्रारंभीं—

मग वैशंपायन म्हणे आतां । राया परिस गा पूर्वजांची कथा । जेणें करूनी ब्रह्महत्या । महादोष नासती ।। तंव म्हणे परीक्षितीनंदन । जी हें तुमचें वचन । जे पूर्वीं उठतसे मृत ब्राह्मण । आणि कापड होय शुद्ध एक हात ।।

असे, व शेवटीं

ऐसे ऋषि बोलिला । तंवं रवि अस्तमानासि गेला । मग रावो पाहे तंव मृत ब्राह्मण उठला । आणि कापड जाले शुद्ध एक हात ।।

असे किंवा अशा अर्थाचे उल्लेख आहेत. आपल्या इकडील भारतांत असे उल्लेख नाहींत. मूळ भारतांत जनमेजयाला ब्रह्महत्या लागल्याचा उल्लेख आहे; पण तो जनमेजय म्हणजे भारत ऐकणारा जनमेजय नसून त्याच नांवाचा त्याचा एक पूर्वज होय. तेव्हां या कापड शुद्ध झाल्याच्या आख्यायिकेचें मूळ दुसरें कोठेंतरी असलें पाहिजे.

असो. एकनाथ नांवाचा दुसरा ग्रंथकार व नामदेव नांवाचा दुसरा ग्रंथकार आढळल्याची हकीकत सांगतांना नामदेवासंबंधींच्या प्रश्नाचा थोडासा उलगडा करणें ओघानें आलें. म्हणून ही वरील हकीकत दिली; पण हिनेंहि नीटसा उलगडा होत नाहीं. मात्र दोन स्वतंत्र नामदेव होते, एवढें मात्र ठाम म्हणतां येतें.

एकनाथाच्या निकटसहवासांतले असे पुढील चार ग्रंथकार प्रसिद्ध आहेत— (१) **विठा रेणुकानंदन**, (२) **जनीजनार्दन**, (३) **रामा जनार्दन**, (४) **दासोपंत.** हे चार व स्वतः एकनाथ किंवा एकाजनार्दन मिळून पांच जणांस 'नाथपंचक' असें म्हणण्याचा परिपाठ आहे. हा परिपाठ पडण्याचें एक कारण असें आहे कीं, हे चौघेहि एकमतानुयायी होते; व आचांडाल सर्व महाराष्ट्र-समाजाला ईश्वरप्राप्तीचा सोपा मार्ग दाखवून द्यावा, याविषयींच हे सर्वजण अश्रांत श्रम घेत व ग्रंथरचना करीत.

वर्णावर्णकर्मांचा नाश करूं नये, हा चातुर्वर्ण्यसमाज नीट संभाळून सनातन हिंदुधर्मांची जोपासना करावी आणि जातिविशिष्ट समाजाचे द्वेष्टे जे परकी लोक त्यांच्या जाळ्यांत अप्रबुद्ध लोक सांपडूं देऊं नयेत, असाच यांचा यत्न असे. दासोपंतांच्या पदांच्या बाडावर प्रारंभींच 'श्रीमदादिगुरवे सर्वज्ञाय स्वपक्षपालाय नमः' असें लिहून स्वपक्षाच्या प्रतिपालनाचा संकेत दर्शविलेला आढळतो. **जनीजनार्दनाच्या** ग्रंथांतहि सर्व समाजाची काळजी वाहिलेली दिसून येते.

चांडाळासि होय बोध। येणें नासती भेदाभेद। ज्ञानियासी उपजे
प्रबोध। ऐसें सांगितलें उद्धवा ।।

असें ग्रंथाचें निमित्त सांगून जनीजनार्दन पुढें एके ठिकाणीं म्हणतात.

करावा बुद्धीचा प्रकाशू। अवघा देव हा उपदेशू।
परंतु वर्णावर्णाचा नाशू। करों नये ।।
ज्या ज्या कर्मासी यावें। तैसें आचारें विचारें वर्तावें।
तेणें मुक्त व्हावें। सर्वकाळ ।।
जो आचार विचार भंगला। तोकर्मचांडाळ जाला।
तो रौरवीं पडला। चंद्रार्कवरी ।।

इत्यादि उपदेश जनीजनार्दन कंठरवानें सर्व महाराष्ट्र-समाजाला करितो. हा जनीजनार्दनाचा व असाच आचाराचा धडा एकनाथपंचकांतील सर्व संतांचा महाराष्ट्राला आहे. हा उपदेशाचा धडा, ही आचाराची शिकवण खास आपल्या समाजासाठींच लिहिली आहे, म्हणजे हे ग्रंथ महाराष्ट्र-समाजाचें कल्याण कशांत आहे, याचा विचार करून त्यांच्या राहणीला व व्यवस्थेला योग्य असेच लिहिले आहेत. पृथ्वीवरील इतर देशांत ही शिकवण पटणार नाहीं व या लेखकांचें मर्म आणि ग्रंथांचें रहस्यहि इतर देशांतल्या लोकांना उमगणार नाहीं. आपला हा महाराष्ट्रदेश अनेक लहान-लहान प्रजासत्तात्मक संस्थानांचा बनलेला आहे. संस्थानांचा म्हणण्यापेक्षां संस्थांचा म्हणण्यानें अधिक खुलासा होईल. आपल्या देशांतलें प्रत्येक लहान खेडेंगांव हें स्वतंत्र

प्रजासत्तात्मक राज्य आहे. बारा बलुतीं वांटून देऊन त्यांतील कामें व धंदे ठाम विभागलेले आहेत व त्या त्या धंद्यांचे पिढीजाद संघ किंवा जाती आहेत. न्यायमनसुबाहि होतां होईतों प्रत्येक गांव आपला आपण करितें. कोणाचा वाद उत्पन्न झाल्यास, त्याच्या गांवकऱ्यांनीं त्या गांवांतील रितीभाती, हक्कसंबंध, वहिवाटी यांच्या अनुरोधानें एकंदर हिंदु समाजाच्या श्रुतिस्मृतिग्रथित धोरणानें, निकाल करावा म्हणून तो वाद प्रथम ग्रामपंचाइतीकडे सोंपविण्याची रीत येथें पूर्वापर होती. अगदीं परक्या देशांतल्या परक्या राहणीच्या, परक्या समाजाच्या न्यायाधीशांचे निवाडे येथें आधार म्हणून पूर्वीं कोणी समजत नसे. यामुळें येथलें प्रत्येक गांव ही एक लोकसत्तात्मक स्वतंत्र संस्था असे. यामुळें समाज सुरळीत चाले व प्रत्येक ग्रामस्थाला ग्रामाभिमान असे. पण हें सर्व चालण्याला सर्व धंदेवाल्यांनीं आपआपले धंदे स्वतंत्रपणें करणें अवश्य होतें. एकानें दुसऱ्याचे धंद्यांत किंवा जातींत शिरण्याची हाव धरून घोटाळा उत्पन्न न करतां आपला धंदा, आपली जात उत्तम नांदवावी हेंच धोरण अशा समाजाला योग्य होतें. मात्र त्यांत उच्चनीच हा भेदाभेद व मत्सर वगैरे मात्र नसावा. सर्वजण सारखेच समजले जावे; आणि म्हणूनच जनीजनार्दन पुन्हां पुन्हां सांगतात—

**आत्मवत् सर्व जाणावें ।** परंतु आचारातें न भंगावें ।
आचार वर्तणुकी पावावें । परम पद ॥

हा उपदेश जनीजनार्दनांच्या 'निर्विकल्प ग्रंथ' नांवाच्या ग्रंथांत मोठ्या कळवळ्यानें केला आहे. 'निर्विकल्प ग्रंथ' हा सुमारें सातशें ओव्यांचा ग्रंथ आहे. त्यांत मात्र शेवटीं

हा 'निर्विकल्प ग्रंथ' । असे गीतेचा मथितार्थ ।
**जनीजनार्दन** एकनाथ । बोलिले असे ॥

असा जनीजनार्दन म्हणून उल्लेख आला आहे. हा 'निर्विकल्प ग्रंथ' अध्यात्मपर आहे व उद्धवकृष्णसंवादरूपानें सांगितला आहे.

कोणे येके अवसरीं । उद्धव आणि श्रीहरी।
बैसले होते यमुनेतीरीं । स्नानसंध्या करीत ।।

अशा त्या समयीं उद्धवानें एका कावळ्यानें एक बेडूक धरून नेतांना पाहिलें व श्रीकृष्णाला विचारिलें कीं, हे कृष्णा,

शरीरें शरीराचें केलें भक्षण । तरी हें केल्याचें काय पुण्य।
तुझें कर्तृत्वीं माझ मन । कंटाळलें श्रीहरी ।।

आणि मग येथूनच उद्धवकृष्णांच्या प्रश्नोत्तरांना व जनीजनार्दनाच्या ग्रंथाला सुरुवात झाली. उद्धवानें मोठ्या लडिवाळपणानें कृष्णाला एकेक शंका विचारीत जावी व मोठ्या कृपाळूपणानें त्या श्रीहरीनें त्याला उत्तर द्यावें, असा क्रम सर्व ग्रंथभर आहे. यांत एक प्रश्न जरा गमतीचा आहे. सर्वां घरीं भगवान् नांदताहे, द्वैतपणा कोठेंहि नाहीं तेव्हां उद्धव विचारितात—

'अवघाची देव जाला । तेथें विटाळ कोणासी लागला ।
आचार तरी वहिला । कोणासी धरावा ।।'

हा प्रश्न थोडा कठीणच खरा. पंतोजीला एखाद्या बुद्धिमान् पण फटकळ पोरानें जरा कठीण शंका विचारिल्यावर जो प्रकार घडतो तोच घडण्याची वेळ आली, आणि यावर नेहमींचेंच उत्तर मिळालें—

'ऐकतां उद्धवाचें वचन । कंटाळले श्रीभगवान् ।
ऐसें बोलों नको रे वचन । उद्धव अज्ञाना ।।'

सोप्या शब्दांनीं सहज समजेल असें तें आत्मज्ञान श्रीकृष्णांनीं यमुनातटाकीं उद्धवाला हळूहळू चारिलें आणि त्या प्रेमळ शब्दांचा गोड प्रसाद जनीजनार्दनांनीं दुःखमय वाळुवंटांत संसारतापानें तापून भुकावलेल्या भाविकांना निर्विकल्पपणानें वांटला आणि बजावून सांगितलें कीं—

'हा ग्रंथ वाचितां । येकांतीं मनन करितां ।
समाधान तयाचे चित्ता । होतसे जाण ।। '

हा ग्रंथ एका कार्तिकी एकादशीस यमुनेंत स्नान करून सकाळीं

प्रारंभ करून तृतीय प्रहरीं संपविला, असें त्यांत म्हटलें आहे.

याचें उपास्य दैवत गणपति होतें. त्याची स्थापना त्यानें गंगामसलें[१] या गांवीं केली. याचीं अनेक पदें आढळतात. त्यांपैकीं कांहीं वेदान्तपर, कांहीं रामचरित्रपर व बरींच श्रीकृष्णचरित्रपर आहेत.

स्वधर्म स्थापावया । पूर्णानंद घनू । जगत्रयजीवनू । रूप धरीं ॥
कैसा शोभे स्वामी । श्रीगुरु सांवळा । प्रेमाचा पूतळा । चिदानंदू ॥
दुष्ट निर्दळनु । सज्जन स्थापनु । म्हणत जनार्दनु । स्वामी माझा ॥

अशा त्या नंदाच्या बाळाची बाळक्रीडा जनीजनार्दनानें

कैसा हा देवदेवो । निर्गुण गुणवंतू । रिंगणीं रिंगतु । नंदाचा हो ॥
राधिके देखौनि । हांसतु मुरडतु । डोळे पै घालितु । सदांचा हो ॥

इत्यादि पदांत गोड गाइली आहे. याची रचनाशैली नीट लक्षांत येण्याकरितां याचें आणखी पद येथें देतों—

चंद्रिच्या अमृता । भोक्ते ते चकोर । नेणती गांवार । काक अंध ॥
तैसे स्वयें सुख । सेवितो साधुजन । नेणती अज्ञान । पासीं असतां ॥
पद्मिणोपराग । सेविती मधुकर । नेणती दर्दुर । पंकभोक्ते ॥
धेनुस्तनीं क्षीर । नेति ते श्रीमंत । गोचिडा शोणित । जन्मवरी ॥
क्रोडा अप्रिती । कापुरचंदनी । त पाहे संवदणी । चर्मकाची ॥
जनार्दनु म्हणे । न चले कांहीं योगू । त्याचा कर्मभोगू काय कीजे ॥

जनीजनार्दनाचीं हिंदी भाषेंतहि कांहीं पदें आहेत. तींहि इतकीं गोड व सोपीं आहेत कीं, तीं कोणालाहि सहज समजतील. जनीजनार्दनाच्या या रचनेशिवाय आणखी दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. एक 'महावाक्यनिवारण' नांवाचें वेदांतपर प्रकरण व दुसरें 'सीतास्वयंवर' हें पौराणिक आख्यान. जनीजनार्दन हा शके १५२३-मध्यें श्रावण वद्य सप्तमीस समाधिस्थ झाला. याच्या दोन समाधि आहेत. एक सरदाराचें भूम या गांवीं व दुसरी मौजें बीड येथें. दोन समाधि असण्याचें

१. पुढें दोन-अडीचशें वर्षांनीं पेशव्यांचे प्रसिद्ध सेनानी व मुत्सद्दी गाणपत्य हरिपंत तात्या फडके यांनीं गंगामसलें येथील या देवळाचा जीर्णोद्धार केला.

कारण असें कीं, एक त्याचें देहावसान झालें त्या ठिकाणीं बांधिली व दुसरी त्याच्या अस्थि घेऊन त्याच्या शिष्यांनीं मटांत बांधली. हल्लीं बीड येथें याचे वंशज आहेत. जनीजनार्दन स्वामींचें उपनांव 'गोसावी'. हा विजापूरकर पादशहाच्या नोकरींत होता. नोकरींत असतांना एके सालीं मोठा दुष्काळ पडला. प्रसिद्ध दामाजीपंत मंगळवेढेकराप्रमाणेंच यानें सरकारी कोठारांतलें धान्य सरकारच्या मरणोन्मुख झालेल्या दुबळ्या प्रजेस वांटून तिचें प्राणरक्षण केलें. या कारणावरून पादशहानें यास दोषी ठरवून देहांतशिक्षा करण्याचें फरमाविलें; परंतु परमेश्वरकृपेनें व गायगरिबांच्या आशीर्वादानें त्या संकटांतून हा पार पडला. तरी पुढें या पादशाही कृतीचा जनीजनार्दनाला इतका वीट आला कीं, त्यानें पादशाही नोकरी स्वत: सोडिली व आपले वंशांत ती पुढें कोणीहि करूं नये, असा निर्बंध घातला. आपला पुढील सर्व काळ यानें ईश्वरसेवेंत घालविला. जनीजनार्दनाचा एक वंशवृक्ष मीं पाहिला आहे. त्यावर 'श्री वंशपरंपरा श्रीजनिजनार्दन महाराज सिद्धपुरुष महानुभाव कुळपुरुष' असें लिहिलेलें आहे. यांतील 'महानुभाव' हा शब्द चिंतनीय आहे.

जनीजनार्दन एका पदांत म्हणतो–

संपूर्ण अवतारू। नंदाचा नंदनु। म्हणत जनार्दनु। भक्तिप्रियु॥
स्वधर्म स्थापावया पूर्णानंद घनु। जगत्रयजीवनू रूपधारी॥
कैसा शोभे स्वामी। श्रीगुरु सावळा। प्रेमाचा पुतळा। चिदानंदू॥
दुष्ट निर्दळनु। सज्जन स्थापनू। म्हणत जनार्दनू। स्वामी माझा॥

जनीजनार्दन हा गाणपत्य होता. पण याचा समकालीन, एकनाथपंचकांत ज्याची गणना करितात तो दुसरा साधु **विठा रेणुकानंदन** हा देवी-उपासक होता. यास **विठा रेणुकानंदन सोनठाणे गोलटगांवकर** असें म्हणतात. याचे गांवापासून दोन कोसांवर देवीचें देऊळ होतें. तेथें देवीदर्शनास जाण्याचा याचा नित्य-नियम असे. पुढें वृद्धापकाळ झाल्यावर यानें आपल्या गांवांतच रेणुकादेवीचें देऊळ

बांधिलें. याचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत. त्यांपैकीं एक पद असें—

उगवला दिनकरू। विश्व देखे डोळां। न देखे आंधळा। तरी काय सूर्यू नव्हे? ।।
वाजे गाजे ध्वनी। विश्व ऐके कानीं। न पडे बधिरा श्रवणीं। तरी काय नादू नव्हे? ।।
पंचमालापस्वरें। गान करिती कोकिळा। नायके कावळा। तरी काय वसंतु नव्हे? ।।
तैसा आदिपुरुषाचा दासू। विठा रेणुकानंदन। न मनिती दुर्जन। तरी काय साधु नव्हे? ।।१।।

विठा रेणुकानंदनाच्या एका पदांतील—

मुरालें महि आणि मंदिर रे। तेथें फिटलें दुसरेंपण रे ।।
विठ्याचा स्वामी रेणुकानंदन। आदिपुरुषीं खूण रे ।।

या शेवटच्या चरणावरून याच्या गुरूचें नांव रेणुकानंदन व तें तो आपल्या नांवापुढें लावी, हें स्पष्ट होतें. या कवीचा थोडासा उल्लेख दासोदिगंबराच्या 'संतविजयां'त आहे. हा विठा रेणुकानंदन देवी-उपासक होता, पण रामचरित्रावर याची भक्ति फार होती. यानें एक 'सीतास्वयंवर' लिहिलें असून अनेक पदांत राममहिमा वर्णन केला आहे. हा म्हणतो—

योगयागें सिणावें नलगे। म्हणा वा उगे रामनाम ।।
राम सीतापती। जिव्हा हेचि पोथी। आणखीये ग्रंथीं। चाड नाहीं ।।
चातुर्य चर्चा। व्यर्थ का करिसी। एका उद्धरसी रामनामें ।।

या विठा रेणुकानंदनाची कांहीं थोडी कृति व कांहीं थोडी अंधूक माहिती आपणांस उपलब्ध आहे. पण नाथपंचकांतल्या **रामाजनार्दन-स्वामी**विषयीं तर आपणांस मुळींच कांहीं माहिती नाहीं. याची अनंतभुजाची आरती व एक ज्ञानेश्वराची आरती अशा दोन आरत्या मात्र प्रसिद्ध आहेत. ज्ञानेश्वरावर यानें आरती रचिली आहे. यावरून एकनाथाप्रमाणेंच या रामाजनार्दनाचेंहि ज्ञानेश्वरावर आणि त्याच्या ग्रंथांवर फार प्रेम होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

एकनाथपंचकांतील सर्व पुरुषांत एकनाथाच्या खालोखाल **दासोपंता**ची प्रसिद्धि विशेष आहे.

**दासोपंत** हा मूळ बेदरच्या ब्रहामनी पादशाहींत नारायणपेठ म्हणून एक गांव आहे तेथला राहणारा गाल्व-गोत्री देशस्थ ब्राह्मण. याचा जन्म शके १४७३-मध्यें भाद्रपद वद्य अष्टमीस झाला. याच्या आईचें नांव पार्वतीबाई व बापाचें नांव दिगंबरपंत. पंतमजकूर हे नारायणपेठचे देशपांडे होते. एके वेळीं दुष्काळाचें साल असल्यामुळें यांचेकडून पादशाही रसद वेळेवर पोहोंचली नाहीं. तेव्हां त्याबद्दल पादशहानें यांचा मुलगा दासोपंत यास नेऊन ओलीस ठेविलें व महिन्यांत रसद न आली तर या मुलास बाटवून मुसलमान करूं, असें धमकावून सांगितलें. आधींच दासोपंताचें चित्त ईश्वरचरणीं विशेष असे. त्यांत असल्या संकटकाळीं तर त्यास त्या परमेश्वराचेच पाय आधार होऊन राहिले. शेवटीं त्या अनाथांच्या नाथानें कृपा केली व रसदीची सर्व व्यवस्था लाववून दासोपंताचें संकट दूर केलें. दासोपंताचें संकट दूर झालें पण त्याच्या चित्तांतून परमेश्वराचे पाय दूर झाले नाहींत. त्याच्या वृत्तींत जो एकदा फरक पडला तो कायमचाच झाला व तो जगांत विरक्तवृत्तीनें राहूं लागला. हा नेहमीं आंबेजोगाई अथवा मोमिनाबाद येथें राहत असे. यानें लहान-मोठे अनेक ग्रंथ मराठी भाषेंत रचिले आहेत. एकट्या गीतेवरच याच्या पांच-सहा टीका आहेत. पैकीं 'गीतार्थबोधचंद्रिके'ची संख्या सुमारें वीस-हजार आहे. मूळ गीतेप्रमाणेंच हिचे अठरा अध्याय आहेत. हिच्यापेक्षांहि 'गीतार्णव' ही फार मोठी व विस्तृत टीका आहे. आजपर्यंत प्रसिद्ध असलेल्या सर्व मराठी टीकांमध्यें हिच्या एवढी दुसरी टीका नाहीं. हिची ग्रंथसंख्या सव्वा-लक्ष असल्याचें प्रसिद्धच आहे. फक्त अठराव्या अध्यायाच्याच व्याख्यानाच्या हींत सोळा-हजार ओव्या आहेत. असा हा प्रचंड ग्रंथ आहे ! हा एवढा ग्रंथ दासोपंतानें दूर डोंगरांत बसून केवळ कडूलिंबाचीं पानें व फळें यांवर राहून लिहिला. याच्या रचनेस वीस वर्षे लागलीं, अशी समजूत आहे. हें दासोपंताचें व्याख्यान वाचतांना एखाद्या महानदीच्या प्रचंड जलप्रवाहाची आठवण येते. आधीं त्याच्या मोठेपणामुळेंच मनुष्य दंग होतो. तसेंच त्या

वाक्प्रवाहांतले उत्प्रेक्षालंकार वगैरे पाहून मोठें समाधान वाटतें. यांत ज्ञानेश्वरांची कुसर नाहीं, हें खरें आहे. पण या प्रचंड व्याख्यानांत इतर अनेक आल्हाद्जनक विषय आढळतात. यांत मनोरंजक कथा आहेत, गोष्टीहि आहेत, हरदासी नकलाहि आहेत. तसेंच, वेदान्त-विषयांतील सिद्धांतांचें विवरणहि आहे. कोठें-कोठें पुनरुक्तिहि आहेत; पण त्या कंटाळवाण्या केव्हांहि होत नाहींत. प्रचंड प्रवाहच तो. मी मी म्हणून वेदान्त-विषयांत पोहणाऱ्याला खेळविणाऱ्या लाटा आणि गांगरून टाकणारे भोंवरे आहेत; तसेंच लहान नवशिक्या मुलांना क्रीडा करावयाला यांत लीलेनें हेलकावे खात वाहणारीं पुष्पें, पानेंहि आहेत. सारांश, एका अधिकारी, विद्वान् व धार्मिक हरिदासाचें हें एक मोठें थोरलें गीतादेवीचें कीर्तनच आहे, इतकें म्हटलें म्हणजे याची बरोबर कल्पना सहज होईल. आपल्याकडील बहुतेक चांगल्या टीका आचार्यांच्या भाष्याच्या आधारेंच रचिल्या आहेत, ज्ञानेश्वरांनीं तर 'भाष्यकारांतें वाट पूसतु' या गीतामंदिरांत मी प्रवेश करितों, असें स्पष्ट म्हटलें आहे. ही दासोपंताची टीका म्हणजे आचार्यांच्या भाष्याला सोडून आहे, असें नाहीं; पण दासोपंत म्हणतो–

न पाहें श्रोतयांचें वदन । न करीं भाष्याधारें विवरण ।
स्वस्वानुभवें हें मन । न म्हणोनि संपादीं ॥
आइकैल तेणें आइकावें । मानैल तेणें घ्यावें ।
नावडे तेणें नेघावें । दोहीं श्रवणीं ॥
स्वानुभवचि येथिचें प्रमाण । स्वानुभव हेंचि साधन ।
अन्यत्र शास्त्रश्रवण । तैसें हें नव्हे ॥
प्राकृत म्हणौनि दूषिती । तेचि यया ज्ञाना वंचती ।
भाषाचि केवळ भजती । ते मूर्ख कीं ना ॥
संस्कृतें बोलिलें सेवणें । तेंचि सांडावें प्राकृत वचनें ।
ऐसियां मूर्खां मुंडणें । किती आतां ॥

मराठी भाषा ही संस्कृत भाषेपेक्षां कोणत्याहि प्रकारें कमी नाहीं व

मराठींत ग्रंथरचना करण्यांत उणेपणा बिलकूल नाहीं, असें आजपर्यंतच्या अनेक ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे; व कोणीं कोणीं याला प्रमाणें देऊन ही गोष्ट सिद्ध करण्याचा यत्नहि केलेला आहे. पण या सर्वांपेक्षां दासोपंतानें हा मुद्दा फार गमतीनें सांगितला आहे. यावर त्यानें एक लहानसें मार्मिक कथानक रचिलें आहे. या कथानकांत एक देशी भाषेचा अभिमानी व एक संस्कृत भाषेचा पूर्ण अभिमानी—प्राणांतींहि प्राकृत शब्द न उच्चारणारा, असे दोन भाऊ कल्पून, दुसऱ्या म्हणजे संस्कृताच्या अभिमानी भावास त्याच्या हट्टामुळें व प्राकृत भाषाद्वेषामुळें किती त्रास व क्लेश सोसावे लागले, हें सांगितलें आहे. अखेर या दोन्ही भावांची गांठ पडून त्यांच्यामध्यें याबद्दल मोठा कडाक्याचा वाद झालेला फार गमतीनें वर्णन केला आहे. वादांत दोन्ही बाजूंनीं सर्व मुद्दे संगतवार पुढें मांडून त्यांचें खंडन-मंडन केलें आहे. सरतेशेवटीं वडील भावानें धाकटयास म्हणजे प्राकृतद्वेष्टयास सांगितलें कीं, "बापा, संस्कृतांतील ग्रंथांत काय तत्त्वें आहेत हें जाणण्याची आर्त उपजेल तेव्हां ती भाषा अभ्यसावी. कांहीं प्रौढी मिरवावयाची असेल, रुका-टका गांठी पाडावयाचा असेल, साधारण सांसारिकांना योग्यता दाखवावयाची असेल, मूर्खांना ठकवावयाचें असेल, अपार दांभिकपणाची वटवट करावयाची असेल तेव्हां त्या त्या निमित्तानें संस्कृत भाषा पढावी व वापरावी. नाहींपेक्षां प्राकृत भाषा वापरणेंच फार चांगलें.' हें असो. पण संसारनगरपेठेंत, ठिकठिकाणीं नाना भाषांचें नाणवटें चालतें म्हणून तेथें सगळीकडे संस्कृत नाणें चालेलच व त्यानेंच सर्व व्यवहार संपादितां येईल, असें समजणें हा केवळ भ्रम आहे. 'परिग्रहो कैसा पाळसी? । पौष्यासी कैसा बोलसी? । दाता संतुष्ट करिसी । कवणें उपायें?।' हेंहि असो. पण जिवंत व्यवहारांत समजावे लागणारे नित्य-भेद दाखविण्याचें सामर्थ्य तुझ्या त्या मृत संस्कृत भाषेंत मुळींच येणार नाहीं. मातीच्या विशेष भांड्यांचा निर्देश करणें तर

**संस्कृतें 'घटू' म्हणती । आतां तया घटांचे भेद किती ।**
**कवण्या घटाची प्राप्ती । पावावी तेणें ॥ हारा, डेरा रांजणू ।**

मुढा, पगडा, आनु । सुगड, तौली, सुजाणू । कैसी बोलेल? ।
घडी, घागरी, घडौली । आळंदें, वाचिकें, बौळी । चिटकी,
मोरबा, पातली, सांजवणें ते ।। ऐसे प्रतिभाषे वेगळाले ।
घट असती नामाथिले । एके संस्कृतें सर्व कळे ऐसें कैसेन ? ।।

अशीच निरनिराळ्या जमिनींची, जलस्थलांची, कापडांची, कपड्यांची, तारवांची वगैरे अनेकविध भेद दाखविण्याची ताकद मृत संस्कृतांत नाहीं. इतर वस्तु राहोत, पण

न प्रकाशवती संस्कृता । पाषाणही परी ।। गोटा, गोटली,
घोटाळा । चिरा, बंडा, सिरसाळा । कोदवा, किनरी, म्हैसाळा ।
रत्ननिळू ।। खवला, मुरंबाळा, कुरुंदु । सेल, गारगोटचा, हेदु ।
ऐसा पाषणाचा भेदु । ( संस्कृतांत ) बोल बोलयां ।।

नुसत्या दगडांचेहि भेद जिला स्पष्ट करितां येत नाहींत, अशी ही तुझी मृत भाषा आणि हा तुझा अनाठायीं अभिमान अगदीं व्यर्थ होय. व्यवहारास, अजाणत्यांना जाणते करण्यास, लोकसमाजाचें अज्ञान घालविण्यास, स्त्रिया, मुलें आणि अशिक्षित लोक यांना शिकविण्यास ही मृत भाषा कामीं पडावयाची नाहीं. तेव्हां बापा,

"आतां सांडी हा चाळा । यया संस्कृताचा । ऐसा ज्येष्ठें शंकिला । मग तो उमजू पावला । प्राकृत बोलों लागला । तयेचि क्षणें ।।"

अशी ही कथा दीड-हजार ओव्या लावून दासोपंतानें वर्णन केली आहे. अशा मोठ्या गमतीनें सांगितलेल्या गमतीच्या गोष्टी, आख्यानें, उपाख्यानें, दृष्टांत, दाखले दासोपंत आपल्या ग्रंथांत वारंवार योजितो. त्याच्या प्रचंड ग्रंथदेशांत असलीं रम्य स्थळें सर्वभर आढळतात; व अभ्यासाचा कठीण मार्ग तीं आनंददायक करितात. मराठी भाषेची ताकद, तसेंच ती भाषा वापरण्याची पंतमजकुरांची हातोटी, त्यांची ती गोड वर्णनशैली, त्यांचें भाषाप्रभुत्व यांची या ग्रंथांत चांगली ओळख पटते. अशा या नानाविध प्रसंगांत दासोपंत ठिकठिकाणीं फारच बहार करितो. वर्णनें इतकीं यथातथ्य करितो कीं, त्यांचें तें चित्र वाचकांच्या पुढें

उभेंच ठाकतें. ज्याला अलीकडील ग्रंथकार शब्दचित्र म्हणतात आणि ज्याची थोरवी ते इतक्या मोठ्या गौरवानें गातात, तें सर्व बारीक-सारीक छटा नुसत्या शब्दांनीं दाखवून देणारें चित्र, कुशल चित्रकाराच्या कलमाशीं स्पर्धा करणारें, शब्दचित्रसौंदर्य त्यांतील सर्व चमत्कारांसह दासोपंत पूर्णपणें दाखवितो. असें एका पुराणिकाचें सुंदर चित्र (दासोपंतानें केलेलें एका पुराणिकाचें वर्णन) पुढें मांडतों. हें पाहून दासोपंताचें कौशल्य नजरेस पडेल; व मराठी भाषेंतल्या एका सरस वर्णनाचा आनंद अनुभविण्यास सांपडेल:—

पीतगंध ललटीं। वरि कस्तुरीची द्विबोटी। आरक्ताक्षता निहटीं। रेखिलिया जाणों ॥ ३५२० ॥ श्वेतचंदनें डवरिले। सर्वांस उदें धूपिलें। मस्तक भरूनि फुलें। चंपकाचीं ॥ २१ ॥ केतकीदळें ठाईं ठाईं। आरोपित कपोलीं दोहीं। पुष्पघोंस ते जेंही। श्रीमुख शोभे ॥ २२ ॥ नानावर्णा पुष्पमाळा। तिया घालूनियां गळां। बुका सर्वांगीं उधळिला। श्रोत्रीं गंधराजु ॥ २३ ॥ कडेलु पीतांबरु सोनेसला। कडेलु श्वेतु वरि पांघुरला। मध्यें मुक्ताफळें, अक्षमाला। शोभती कंठीं ॥ २४ ॥ शुद्धा कोंदणाचे खिळे। प्रतिदंतीं वेगळाले। बोलु बोलतां आगळे। झळकती वीजूहूनि ॥ २५ ॥ कर्णमात्रा झळकती। मुखावरी पडे ते दीप्ति ॥ तेणें शोभे गौरकांति। तया मुखाची ॥ २६ ॥ श्रोत्रांचें तेज आगळें। दशनाचिया तेजा मिनलें। उभय तेज फांकलें। मुखावरी ॥ २७ ॥ तेणें मुखाचा गौरवर्णु ॥ दिसों लागे शोभायमानु। वरि सुंदरतेचा गुणु। तारुण्य आगळें ॥ २८ ॥ पासीं झारी सुवर्णवर्णा। वरि चोखघडी उपरणा। नाना वर्णीचिया वेष्टणां। उपमा नाथी ॥ २९ ॥ वामदक्षिणभागीं ग्रंथ। वेष्ठणीं दिसती सुशोभित। मध्यें पुस्तक घवघवित। विचित्रें पानें ॥ ३५३० ॥ पुढें सभा श्रोतयांची। मागें तयां विद्यार्थियांची। मग प्रारंभणा कथेची। तेचि कैसी! ॥ ३१ ॥ मृदंगु येकु वांचूनि। आणि टाळु वीणा तये स्थानीं। उपांग आणि श्रुति दोन्ही। लाविलिया तत्काळें ॥ ३२ ॥ मग ते पाहोनि सुवेळा। क्रमेंचि आपुला केला। तदंगन्यासकला। संपादी कुशलत्वें ॥ ३३ ॥ भ्रूद्वयीं आणी ठेव। दावी स्वरानुसार करपल्लव। तेणेंचि अंगें बरव। दिसों लागे ॥ ३४ ॥

कर्णभूषणें झळकती । दंततेजकीळ फांकतीं । हस्तमात्रांचिया पंक्ति । दावी प्रेत्नें ॥ ३९ ॥ मग आलापाचां अवसानीं । प्रवर्ते मंगळाचरणीं । आलापरूपेंचि मांडणी । तयाची करी ॥ ३५४० ॥ मंगळाचरण संपादलें । क्षणेकु नयन लाविले । जैसे गुरुध्यानीं गुंतले । सुभक्त जन ॥ ४१ ॥ तैसेचि भाव आणून । सजळ करी नयन । मग क्षणा येका सांवरून । श्लोकु आरंभी ॥ ४२ ॥ आलापाचिवरि घोळितु । श्लोकु बोले समस्तु । मग पदमोडी करितु । ते वैयाकरणशुद्ध ॥ ४३ ॥ पदान्वयें बोले अर्थु । परि आलापाचिवरि समस्तु । आला शब्दु प्राकृतु । तानेंचि संपादी ॥ ४४ ॥ अर्थी घालूनि अंतःकरण । शरीर करी दोलायमान । लावी, उघडी नयन ॥ प्रेम आणी ॥ ४५ ॥ अर्थानुसार देहभाव । अर्थानुसार न्यासमुद्रा-अंगपल्लव । अर्थानुसार गौरव । आणी शरीरीं ॥ ४६ ॥ अर्थानुसार हास्य रंजन । अर्थानुसार लावी नयन । अर्थानुसार मान । मस्तक हालवी ॥ ४७ ॥ "बापु, बापु" "कैसा कैसा ?" । क्षणक्षणा शब्दु ऐसा । अनुवादे, माणुसा । लावी वेधु ॥ ४८ ॥ प्रसंगु निघे युद्धाचा । तरी आवेशु आणी वीराचा ॥ रोषावेशु तेथिंचा । संपादूनि दावी ॥ ४९ ॥ भुजा, दंड पीटितु ॥ मार्गे-पुढें अवलोकितु । घ्याघ्याकारें गर्जतु । मुद्रा दाखवी ॥ ३५५० ॥ श्रोतयां अर्थाची अचाड । वाचाचि लागे त्याची गोड । देहचार उदंड । तेंचि आवडती ॥ ५१ ॥ विरावें आणुनि दावी । तें श्रोतयां आंगीं खेळवी । घडाते वेड लावी । आवेशाचें ॥ ५२ ॥ येथेंचि जाणों वैरी । होईल जाणों मारामारी । ऐसा आवेशु शरीरीं । संचरे श्रोतयां ॥ ५३ ॥ वैराग्याचा निघे प्रसंगु । तें न्यासें दावी वीतरागु । विसरवी संसारमार्गु । श्रोतयांतें ॥ ५४ ॥ संसारदुःखदर्शन । जैसें बोले वचन । तैसेंचि करी वदन । शरीर तैसेंचि ॥ ५५ ॥ अरे रे ! मना, मर्कटा । वृथा भ्रमसी दहा वाटा । वाउगा गेला, कटकटा । नरदेहो हा ॥ ५६ ॥ जनाप्रति बोले वचन । "किती कराल पिंडपोषण ? । आणि कीं पाहें मरण । पासीं आलें ॥ ५७ ॥ किती कराल रे, आयासु ? । तुम्हीं मनुष्यें नव्हां, पशु । विषोपमु विषयरसु । किती सेवाल ? ॥ ५८ ॥ किती योनिमुखें देखाल ? । कित्यांचे स्तन प्राशाल ? । कित्यांचें पुत्र होआल, । पापिष्ट हो ? ॥ ५९ ॥ मळमूत्र आपुले शरीरीं । पोष्यांचें घे तयावरी । पडलेति नरकसागरीं । दुरात्मे हो ! ॥ ३५६० ॥ मळमूत्राचें भांडार । येथें वातपित्तकफ पाझर । अस्थि, रक्त,

मांस समग्र । येकवटलें असे ॥ ६१ ॥ ऐसिया देहाचा कंटाळा । कैसा पां नये, चांडाळा ? । यया कुश्चिळा, अनिर्मळा । निर्मळ करितो ॥ ६२ ॥ स्त्रीसुख तें किमात्मक ? । परि तेणेंचि हें सर्व दुःख । विचारें नेघती मूर्ख आसक्त होतां ॥ ६३ ॥ लोकहो, तुम्ही काबाडी । नेघां विश्रांति येकि घडी । जळो जळो हे खोडि ! । सांडा वेगीं " ॥ ६४ ॥ हाहाशब्दें म्हणे, " गेलें । नरदेहरत्न हारपलें । दिवसाचि खान पडलें । कव्हणा न कळे ॥ ६५ ॥ बुडालें, रे ! हें बुडालें, । नरदेहतारूं भंगलें । ज्ञानवित्त वायां गेलें । नागवलेत ॥ ६६ ॥ धिग् धिग् तुमचें जिगें ! । स्वहित तें न साधेचि जेणें । आजन्म आइकतां पुराणें । नुपजे त्यागु ॥ ६७ ॥ गणना जाली रे जाली ! । आयुष्यें वेंचलीं, वेंचलीं ! । पाठी मरणें लागलीं । पहा परतोनि ॥ ६८ ॥ कटकटा कैसें जालें ? । नकळत विष प्राशिलें । करूं नये तें केलें । क्रियमाण कीं ॥ ६९ ॥ कैसें रुचे तुम्हां अन्न ?। कैसें दे सुख जीवन ? । क्षयाचा परिहार येथून । कैसा न करा ? ॥ ३५७० ॥ अस्तमाना दिनकरु । गेला, जाणा निर्धारु । मरणा ऐसा अंधकारु । पडेल पुढां ॥ ७१ ॥ वन्हि लागला, रे मंदिरा । किती पाखुडाल मातेरा ?। येथें तंव नसुधा धुळोरा । कणु नाहीं. " ॥ ७२ ॥ ध्याध्याकारें गर्जतु । मागेंपुढें पाहतु । " अपारु पावला संघातु । चोरांचा " म्हणे ॥ ७३ ॥ कामु, क्रोधु आणि मत्सरु । दंभु, प्रपंचु तस्करु । ययांचा न करवे संहारु । पावले कीं ॥ ७४ ॥ हृदयमंदिरीं निघाले । शांतिक्षमावित्त नेलें । विवेकावरि घाय केले । पडेल तो ॥ ७५ ॥ बापु, बापु ! भला भला ! । धरिला रे चोरु धरिला ! । मींचि मी मातें येकसरा । सांपडला हातीं ॥ ७६ ॥ आतां यथार्थ जें न मरा । तें बळ बहुत अहंकारा । वंचाल हिता समग्रा । ऐसें होईल. " ॥ ७७ ॥ यापरी आणूनि आवेश । वैराग्याची दाविती भाष । श्रोतयांचें मानस । दुखंड करिती ॥ ७८ ॥ भक्तीचा निघे प्रसंगु । तें रडविती, हांसविती जगु । मूर्खांतें स्वरयोगु । दावूनि रंजविती ॥ ८२ ॥ " विश्वात्मया, विश्वनाथा, । विश्वव्यापका, अनंता, । कैसा विसरलासि आतां । यये संसारीं ? ॥ ८३ ॥ आठवी पूर्वींचा विवेकु । तूंचि जननी तूंचि जनकु । इतरू हा पारिखा लोकु । कवणाचा, काई ? ॥ ८४ ॥ तूंतें नेणोनि कर्म केलें ।

तें देहाकारें साकारलें। देह तें योनी उपजलें। कव्हणे येके ॥ ८५ ॥ तेथिचीं मातापितरें, । पुत्र, स्त्री, पोष्यें अपारें, । तीं तंवचिवरि साचारें। जंव तो देहो ॥ ८६ ॥ ऐसीं अपारें शरीरें। तीं तीं मातापितरें। संख्या नाहीं गोत्रें। याती, वर्णे मज ॥ ८७ ॥ मागिलाचा पडे विसरु। पुढिलांचा न कळे निर्धारु। वर्तमानांचां ठाईं थोरु। योगु ममतेचा ॥ ८८ ॥ तेंही गेलियावेरि। येंही परी जालीं दूरि। निर्वाणीं तूं येकु, श्रीहरि। देवराया ॥ ८९ ॥ कवणाचिया गळां झोंबावें ? । कवणा माझें, माझें म्हणावें ? । शरीरचि सांगातें नवें नवें। स्वजन हें ॥ ३५९० ॥ माझा म्हणती बहुतें। निर्वाणीं कवण सोडवितें ? । विसरलों, देवा, तुमतें । ऐसें जालें ॥ ९१ ॥ पडैल मिठी काळाची। आणिक तया मरणाची। ते व्हेळीं वाट कव्हणाची। पाहों, देवा ?" ॥ ९२ ॥ ऐसा आपणपयां अनुवादतु। जनातें प्रेम उपजवितु। अनन्यभाव दावितु। रंजवीं लोकां ॥ ९३ ॥ म्हणे, "हें कवणाचें रे वित्त ? । तुम्ही कां येथ आसक्त ? । ईश्वराधीन समस्त। ऐसें असतां ॥ ९४ ॥ येथें धरूं नये ममता। स्वामीद्रव्य हें सर्वथा। देहेंसीही स्वतंत्रता। नसे तुमतें ॥ ९५ ॥ न धरा रे देहीं अहंकारु। परमात्मा देहीं ईश्वरु। कां रे वाहा भारु। संसाराचा ? ॥ ९६ ॥ विचारा पोष्यें कवणाचीं ? । येथें आलीं केंचीं ? । गति ऋणानुबंधाची। जे संगु परस्परां ॥ ९७ ॥ परमात्मा ययांचा नियंता। अति समर्थु प्रतिपालिता। तुम्हीं कां करा चिंता। वाउगीचि? ॥ ९८ ॥ अचैतन्यरूपा शरीर ॥ चैतन्य कवणें विचारा। कासया स्वामित्व धरा। ईश्वरु असतां ॥ ९९ ॥ विश्वोत्पत्ति तुम्हीं केली ? । सृष्टि स्वाश्रयें राखिलीं ? । तुम्हीं राखाल प्रलयकाळीं। विश्व काय, पां ? । ॥ ३६०० ॥ देहातें सांडूनि जातां। राया रंका समता। मुंगीचा देहो पडतां। तेही तैसीच ॥ १ ॥ अहंममता हें अरिष्ट। चिंता शोकु वृथा कष्ट। कल्पना सांडा रे येकट। भजा देवा ॥ २ ॥ सर्वत्र सांडूनि ममता। आठवा ना कां श्रीअनंता ? । वाउगा भ्रमु भोगितां। अपराधु हा ॥ ३ ॥ अंतकाळींचें तारूं। तेथ कां घाला पायरु ? । बुडतां तारुवीं समग्रु। अर्थु ठेवा" ॥ ४ ॥ हाहाकारें गर्जतु। "वन्हि लागला, रे !" म्हणतु। जळते घरींचा अर्थु। काढा कांहीं ॥ ५ ॥ स्वामीद्रोहो किती कराल ? ।

जयाचें तया बंचाल ? । अंतीं केउतें पळाल । तस्कर हो ? ॥ ६ ॥ नाना तुम्हीं आत्महून । विष घेऊनि करा शयन । परंतु नामामृतपान । न करा फूकाचें ॥ ७ ॥ माझें म्हणौनि सकल । जोडिलें, परि कैसें न्याल ? । जातां आपुलेंही स्थूल । नये सांगातें ॥ ८ ॥ उभा वसु घालिजे वनी । तो जैसा तैसाचि निदानीं । कांहींचि आपुलें मरणीं । नव्हे तैसें ॥ ९ ॥ आला, रे ! आला, आला । पीयूषघनु बोळला । पर्वतु आड केला । पापिष्ट हो ! ॥३६१०॥ नामामृतरसघनु । बोला वाचेचा गुणु । तो व्यवहारु आड करूनु । वंचलेति ॥ ११ ॥ शब्दचि विश्वासें घ्याल । तरि अक्षयी स्वर्ग भोगाल । कष्ट न करितां बहुसाल । रोकडी गति ॥ १२ ॥ श्रवणाचेनि व्यापारें । स्वर्गाचीं उघडलीं द्वारें । डोळे लावूनि आंधारें । बळें कां करा ? ॥ १३ ॥ देवदर्शन नित्य यात्रा । फुकाचें हें कां न करा ? । करूनि नयनव्यापारा । पावा मोक्षु ॥ १४ ॥ पासीं आलें निधान । बळें नेत्र लावून । कां रे अंधाचें लक्षण । प्रतीती आणा ? ॥ १५ ॥ करव्यापारेंकरून । करितां देवाचें भजन । स्वर्गसुख असाधारण । असे रोकडेचि ॥ १६ ॥ मनचि देवीं लावितां । फुकाची कल्पना करितां । स्वर्गु जोडैल बहुतां । भर्वसेन ॥ १७ ॥ कर्मेंवांचूनि करणातें । नसवे हें सत्य निरुतें । यालागीं कर्तव्य भलय तें । करालचि ॥ १८ ॥ तोचि देवसंबंधीं आचारु । करितां इंद्रियांचा व्यापारु । स्वर्गु पावाल निर्धारु । फुकासाठीं " ॥ १९ ॥ ऐसे रसिक बोल बोले । सर्वांमें आपणु डोले । प्रेमाश्रु आणी कांटाळे । विषयस्फूर्ती ॥ ३६२० ॥ ऐसें रडोनि रडवणें । हांसोनि जन हांसवणें । नाना प्रकारीं मोहणें । ऐसिया वर्तला ॥ २१ ॥ देखोनि अंगचारातें । येक ते लोधले तेथें । येक मनोरमे वाचेतें । गुंपुले लोक ॥ २२ ॥ येक रागरचना पाहती । येक नादलुब्ध होती । येक अर्थाचां ठाईं रमती । निर्मळें मनें ॥ २३ ॥ जैसा बैसला पुराणीं । तैसाचि शास्त्र वाखाणी । फांकी बोले ठेवणीं । शब्दरचनेचियें ॥ २४ ॥ वेदांचेंचि करी अध्ययन । तें स्वर तेचि जाणों गायन । आणी ऐसें कुशलपण । वाचेचा ठाईं ॥ २५ ॥ फुगे तें भातयापरी । कां वेळीं जाये तें अंबरी । बोले तें अमृतापरी । वचनचि गोड ॥ २६ ॥ अर्थचाड श्रोतयां थोडी । परंतु शब्दीं, रूपीं त्यांची आवडि । च्यारी प्रहर ते घडी । येकि होये ॥ २७ ॥

दासोपंताची ही अवाढव्य व स्वतंत्र रचना पाहून कोणाहि महाराष्ट्रीयास या पुरुषाबद्दल अभिमान वाटेल, यांत संशय नाहीं.

गीतेवरील टीकात्मक ग्रंथांखेरीज 'अवधूतराज' आणि 'ग्रंथराज' हे दासोपंताचे वेदान्तपर ग्रंथ आहेत. याचा 'वाक्यवृत्ति' या नांवाचा आणखी एक वेदान्तपर ग्रंथ आहे. हा पद्यात्मक नसून गद्यात्मक आहे, हें या ग्रंथासंबंधीं विशेष आहे. याच्या ग्रंथांपैकीं 'पंचीकरण' या ग्रंथासंबंधीं एक विशेष गोष्ट अशी आहे कीं, हा सबंध ग्रंथ एका अडीच हात रुंद अशा पासोडीवर दासोपंताच्या हातचा लिहिलेला आहे व या पासोडीचें टोक पाण्यांत भिजवून तें तीर्थ दिलें असतां ताप, पिशाच्च वगैरेंच्या बाधेपासून सुटका होते, असा फार पूर्वींपासून समज आहे. या वर सांगितलेल्या ग्रंथांखेरीज यानें रचिलेले संस्कृत ग्रंथ, दशोपनिषदांवरील स्वतंत्र रचिलेलीं भाष्यें (उपनिषदर्थप्रकाश), स्तोत्रें, अष्टकें वगैरे अनेक आहेत. तसेंच, याचीं शेकडों पदें हल्लीं प्रसिद्ध आहेत. हीं पदें सर्व मिळून सव्वालक्ष आहेत. यांना 'पदार्णव' असें म्हणतात. यांत त्यानें आपल्या उपास्य दैवताला अनेक तऱ्हांनीं आळविलें आहे. केव्हां त्या दैवताची दासी, केव्हां कांता, केव्हां विरहिणी कामिनी, केव्हां लहान मूल अशा अनेक भूमिका कल्पून त्याची करुणा भाकली आहे. कांहीं पदें 'श्रुतीं'मधून वाक्यें घेऊन त्यांवर रचिलेलीं आहेत. कांहीं पौराणिक कथानकांवरहि आहेत. हीं निरनिराळ्या रागांत बसविलेलीं असून गवयांनीं गाण्याला योग्य अशीं जुळविलीं आहेत. हे सर्व अंबेजोगाईस असलेले उपलब्ध ग्रंथ झाले. यांखेरीज याचे वंशज नागपूर प्रांतांत चंद्रपुरास व दुसरे बेदराकडे बावगीस आहेत. त्यांजवळचे ग्रंथ आणि शिवाय अनुपलब्ध ग्रंथ असतील ते निराळेच! तेव्हां एकंदरींत हा पुरुष किती उद्योगी व विद्वान् असेल आणि याची रचना केवढी प्रचंड असेल, याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. असें सांगतात कीं, याला ग्रंथ लिहिण्याकरितां रोज दोन पैशांची शाई लागत असे! यानें केलेल्या ग्रंथांची यादी, याची अवाढव्य रचना व याचें जुन्या चालीचें प्रशस्त

हस्ताक्षर पाहिलें म्हणजे या आख्यायिकेच्या खरेपणाची साक्ष चांगली पटते. सव्वालक्ष 'गीतार्णव' व सव्वालक्ष 'पदार्णव' हे दोन समुद्र वलांडिले तरी पलीकडे आणखी कितीक ग्रंथसमुद्र आहेत. याच्या ग्रंथांची एक यादी 'महाराष्ट्र-कवीं'त दिली आहे. ती फक्त एका देवघरांतील. म्हणजे याच्या वंशजांच्या एका शाखेंतील आहे. त्याखेरीज इतर वंशजांकडे ग्रंथ असतील ते निराळे. दासोपंत, शिवराम, माधव वगैरेंसारखे सरस्वतीचे सागर महाराष्ट्राबाहेर इतरत्र थोडेच आढळतील. स्वतः उत्तम संस्कृतज्ञ असल्यामुळें दासोपंताची मराठी भाषा शुद्ध, सतेज, व भारदस्त आहे. याच्या हस्तलिखित पोथ्या पाहिल्या म्हणजे एक गोष्ट नजरेस येते कीं, इतर कवींपेक्षां याच्या लिहिण्यांत अनुनासिकांचा व अनुस्वारांचा भरणा विशेष आहे. दासोपंत हा दिगंबरदत्तोपासक व नाथ-संप्रदायी होता. हा शके १५३७-मध्यें माघ वद्य षष्ठीस समाधिस्थ झाला.

दासोपंताची ही रचना पाहून एक तऱ्हेचें मोठें कौतुक वाटतें. पण एवढा मोठा विशाल बुद्धीचा पुरुष सरकारी नोकरी सोडल्यावर केवळ वेदान्त कुटीत शांतपणें स्वस्थ रहावा, याबद्दल थोडें वाईटहि वाटतें. ज्यानें केवळ दुष्टपणानें, आपण अनपराधी असूनहि आपणांस छळलें, व ज्याच्या अमलांत आपल्या देशावर, आपल्या लोकांवर, आपल्या मुलांबाळांवर असा जुल्म झाला, अशा बादशहाला कांहीं अद्दल घडवावी, अशा बादशहाची तिरडी उचलण्याचा यत्न करावा, हें दासोपंताच्या मनांतदेखील आलें नाहीं, व असा त्यानें यत्नहि केलेला दिसत नाहीं, याबद्दल मन खट्टू होतें; आणि या असल्या शांतपणाबद्दल, या समाधानवृत्तीबद्दल थोडा किळसहि वाटतो. पण ज्यांना प्रत्यक्ष इहलोकापेक्षां काल्पनिक परलोकाबद्दल आवड जास्त उत्पन्न झाली त्यांचा मार्ग हा असाच असावयाचा. क्षणभर असेंहि वाटतें कीं, ज्यांना इहलोकाची चाडच राहिली नाहीं, ते इहलोकीं राहण्याला थोडे अयोग्यच खरे!

# एकनाथाच्या वेळचे कांहीं इतर कवि

महाराष्ट्रांतील ग्रंथासंबंधीं असा एक प्रकार दिसून येतो कीं, ज्या ज्या ग्रंथकारांचे मठ आहेत किंवा ज्यांची शिष्यपरंपरा चालू आहे, अशा ग्रंथकारांनीं लिहिलेले ग्रंथ हल्लीं आपणांस उपलब्ध होतात व होऊं शकतात. यापलीकडे म्हटलें, तर कांहीं एका विशिष्ट दैवताचे किंवा पंथाचे अनुयायी असे ग्रंथलेखक असतील, व त्या दैवतासंबंधीं किंवा त्या पंथासंबंधीं त्यांनीं ग्रंथ लिहिला असेल तर तो ग्रंथ नाहींसा न होतां त्या अनुयायांत टिकूं शकतो. परंतु असा पाठिंबा ज्यांना नाहीं, असे ग्रंथ बहुतकरून लवकरच नाहींतसे होतात; आणि याच कारणामुळें धार्मिक ग्रंथांपलीकडे इतर ग्रंथ प्रायः फारसे आढळत नाहींत. इतर तऱ्हेची ग्रंथरचना मराठींत झाली नाहीं, असें नाहीं. धर्माशिवाय इतर वार्तासंबंधाचे मराठींत बरेच ग्रंथ लिहिले गेले, पण त्यांची जतन कोणीं नीट न केल्यामुळें ते ग्रंथ लुप्त झाले. **प्रेमदास, महालिंगदास, नरसिंह, विश्वेश्वर** वगैरे ग्रंथकारांनीं इतर विषयांवर रचिलेले ग्रंथ अजूनहि उपलब्ध आहेत. **प्रेमदासा**चा 'मूळस्तंभ' या नांवाचा गद्यपद्यमय असा ग्रंथ आहे. हा शिवपार्वतीसंवादरूपानें सांगितला आहे. यांत ग्रंथकार लिहितो—

'ईश्वर बोलिले: काळज्ञान परियसा देवि: अंगुष्ट अंगोळिया: चीपोळि वाजविलिया ।। तिन शतें जालियां : तें एक पळ : यैसिया पळां ६० साटि: येकि घटिका : ।। यैसिया घटिका ८ तो एक प्रहर : ।। यैसे प्रहर आठ : ते येक दिवसरात्रि : ।। यैसिया दिवसरात्री तिस : तो एक मासु : ।। यैसे मास द्वादश : तें एक वरुष : ऐसि वरुशे दाहासहस्र १०००० यैसें दश आयुत : तो येकलक्ष १००००० ।। यैसे लक्ष शत : ते कोटि येकि ।। वैस्या कोटि चौदा : तें येक योग : अठरा योग मध्यें अनंत योग : हा पहिला ।। हा कैसा वर्तला तें परिस देवि : हा अनंत योगा सांगितला : कोडि चौदा गणित : चिपोळियांचें : ।।'

प्रेमदासाप्रमाणेंच **नरसिंहाचें** एक 'सामुद्रिक' नांवाचें प्रकरण आहे. विश्वेश्वर, महालिंगदास वगैरेंचे अश्वचिकित्सेसारख्या विषयांवर ग्रंथ आहेत. विश्वेश्वराचा ग्रंथ मूळ संस्कृत ग्रंथावर महाराष्ट्र-टीका आहे. पण **महालिंगदासा**ची रचना स्वतंत्र आहे. या आपल्या ग्रंथास त्यानें 'शालिहोत्र' असें नांव दिलेलें आहे. महाराष्ट्रांत निरनिराळ्या ग्रंथकारांनीं लिहिलेले अश्वचिकित्सेवर बरेच ग्रंथ आढळतात. त्या सर्वांस प्राय: 'शालिहोत्र' हेंच नांव दिलेलें असतें. महालिंगदासानें आपल्या या ग्रंथास 'शालिहोत्र' हें नांव कां दिलें, याचें कारण ग्रंथारंभींच दिलें आहे. तो म्हणतो, 'अश्वपति' या नांवाचा एक ऋषि होता. तो नित्य-होम करीत असतां डोळ्यांना धूर लागून त्यांतून अश्रुपात होत असे. या अश्रुपातापासून अश्वजाति निर्माण झाली आणि या ऋषीच्या पुत्रानें या अश्वजातीसंबंधीं ग्रंथरचना केली व त्या ग्रंथांत अश्वांचें वर्णन, चिकित्सा, वगैरे विषय सांगितले.'

**'तया पुत्राचें नांव 'शालिहोत्रु'। तो माता योग्य पवित्रु। तेणें कथिला मंत्रु। अश्वाचा पै॥ तेणें समूळ आगमू केला। ग्रंथु निष्पत्ति पावला। मग आपुलें नांव ठेविता झाला। शालिहोत्रु॥'**

या ग्रंथांत महालिंगदासानें घोड्यांचे गुण, अवगुण, त्यांचा रंग, त्यांचे केसांचे भोंवरे वगैरे सांगून त्यांचा शुभाशुभविचार केला आहे. तसेंच, घोड्यांना होणारे रोग, त्या रोगांवरील औषधें वगैरे बाबींचाहि यांत ऊहापोह आहे. याखेरीज महालिंगदासाचें 'पंचोपाख्यान', 'वेताळ-पंचविशी' व 'सिंहासन-बत्तिशी' असें मनोरंजनार्थ लिहिलेले तीन ग्रंथ आहेत. हे तिन्ही ग्रंथ तत्कालीन गद्यग्रंथांवरून पद्यमय केले आहेत. हे तिन्ही ग्रंथ महाराष्ट्रांत फार पूर्वीपासून गद्यरूपानें वाचले जात असत व त्यांच्या गद्यप्रती अजूनहि आढळतात. पुढें हे वाचण्यास व ऐकण्यास सुलभ व्हावे, एतदर्थ महालिंगदासासारख्या कवींनीं ते पद्यमय-ओवीबद्ध केले. महालिंगदासाची चाणक्य-नीतीवरहि एक मराठी टीका उपलब्ध आहे. ग्रंथाचे प्रारंभीं महालिंगदास लिहितो-

पुरातन चाणक्य बोलिला । संस्कृत भाषे वदला । त्याचें उच्छिष्ट बोलता जाहला । महालिंगदासू ।। संस्कृत न कळे आरजां जनां । म्हणौनि मराठी केली रचना । ते आणिजे मनां । बोध जनीं ।। राजनीती बोलिजैल । बुद्धी, धृति, सांघिजैल । हित, अनहित, जाणिजैल । मित्र कुमित्र ।। स्त्रियेचे गुण अवगुण । आणि भृत्याचें परिक्षण । विश्वासू अविश्वासू जाणणें । सांघिजैल ।। बंधूंची परीक्षा । पंडितांची व्याख्या । मूर्खांची बोळखी देखा । सांघिजैल ।।

वगैरे आपल्या ग्रंथांतल्या विषयांची यादी देऊन तो सांगतो,

हे कथा जो पठण करी । तो श्लाघ्य होय लोकाचारी । शोभे सभे भीतरीं । होय सर्वांसी मान्य ।।

म्हणजे हा कवि केवळ पौराणिक आख्यानांत मग्न न होतां लोकोपयोगी ग्रंथ लिहीत असे. असे कवि व असे ग्रंथ हल्लीं आपणांस फारच थोडे उपलब्ध आहेत; पण असल्या तऱ्हेचे सुबोध ग्रंथ असंस्कृतज्ञांसाठीं व साधारण बुद्धीच्या लोकांकरितां त्या काळीं लिहिले जात, इतकेंच मात्र या महालिंगदासाच्या ग्रंथावरून म्हणतां येतें. महालिंगदास हा खानदेशांत गिरजा किंवा गिरणा नदीचे तीरीं वाडें या गांवचा राहणारा होता. कदाचित् पुढें हा महानुभाव-पंथांत शिरला असावा. यानें चाणक्य-नीतींत पुढीलप्रमाणें आपली माहिती दिलेली आढळते. तो म्हणतो—

रामकृष्ण माझें गुरु दैवत । विक्रमदेव माझा पिता । महालिंगदासू करी कविता । सूत बंक्रदेवाचा ।। वंशू कश्यपाचा । गोत्र भारद्वाजाचा । कुळ वासुकीचा । उपनाम आहिररावो ।।

या वर उल्लेखिलेल्या ग्रंथावरून या काळीं मराठी भाषेंत केवळ ईश्वरोपासनेपलीकडे इतर विषयांवरहि थोडीफार रचना होत असे, असें स्पष्ट दिसतें. ही रचना फार उच्च दर्जाची नसून साधारणच होती, व तींतील विषय अगदीं सोपे आणि सहज समजतील असेच प्रतिपादिलेले असत; पण लोकांच्या व्यवहारांत या विषयांचा संबंध येई, म्हणून ही रचना करणें तत्कालीन ग्रंथकारांस भाग पडे. म्हणजे ही रचना लोकांत

बहुश्रुतपणा यावा इतक्याच मासल्याची असे. ही वाचणारांना विशेष बुद्धि किंवा परिश्रम यांची गरज पडण्यासारखी ती दिसत नाहीं.

ईश्वरोपासनेंत मात्र भक्तिमार्गाखेरीज आणखी एक प्रकारची ग्रंथरचना मराठींत अव्याहत होत असलेली दिसते. उपासनेचे दोन मार्ग प्रचलित आहेत. एक सगुण-उपासना व दुसरी निर्गुण-उपासना. यांत पहिलीपेक्षां दुसरी अवघड असणारच, हें उघड आहे. सगुण-उपासनेंत, द्वैत-भाव थोडाफार अखेरपर्यंत कायम राहणारच. तेथें उपास्य दैवताचें गुणवर्णन, कथाकीर्तन हेंच मुख्य अंग असतें. नामघोष हा प्रकार याचे पोटांत येतो. यामुळें या उपासकाचा भर पौराणिक गोष्टींवर विशेष असतो. तेथें साधारण चित्तवेधक गोष्टींवर झोड उठविली म्हणजे काम भागतें. बुद्धीच्या तीव्रतेनें किंवा इतर तऱ्हेनें, परिश्रमांचें आणि कसरतीचें तेथें कांहींच प्रयोजन पडत नाहीं. पण निर्गुण-उपासनेचा प्रकार याहून अगदीं निराळा पडतो. तेथें भिस्त कल्पनेवर आणि बुद्धीवर असते. यामुळें त्या उपासनेचे विषय पौराणिक नसून अध्यात्मचर्चेचे असतात. यांत केवळ कल्पनेनेंच जाणतां येईल, असा बुद्धिवाद असतो. ईश्वरोपासनेचें, किंवा याहून खरें पाहतां ईश्वरज्ञानाचें अथवा ब्रह्मप्राप्तीचें दुसरें एक अंग आहे. यांत अत्यंत परिश्रम व फारच तीव्र बुद्धीची आवश्यकता असते. येथें आपल्या अंगच्या मेहनतीनें, स्वतःच्या जोराबर झुंज घेऊन, ब्रह्मप्राप्तीच्या मार्गानें जावयाचें असतें. यालाच 'योगमार्ग' म्हणतात. हा मार्ग महाराष्ट्रांत फार जुना आहे; व एके वेळीं तरी या वाटेचे वाटसरू बरेच होते. त्यांच्याकरितां या वाटेचा रस्ता नीट कळावा, म्हणून तींतील मुख्य-मुख्य वाटाडे ग्रंथरचना करीत. महाराष्ट्रांत एके काळीं या मार्गाच्या परंपरा व शाखोपशाखाहि सर्वभर पसरलेल्या होत्या. ज्ञानेश्वरमहाराज हेहि या मार्गाचे एक प्रमुख वाटाडे आहेत. त्यांच्या परंपरेंत म्हणजे नाथपंथांत तर सर्वांना हाच मार्ग दाखवून दिलेला असतो. यामुळें त्या पंथांत या मार्गाचे ग्रंथ पिढ्यानुपिढ्या रचिले जात. गोरक्षनाथाच्या योगमार्गावरील ग्रंथरचनेचा उल्लेख मागें आलाच आहे. मागें उल्लेखिलेल्या अमरनाथाचीहि

हटयोगावर रचना आहे. अमरनाथाची शिष्यशाखा बरीच असून तींत योगमार्गासंबंधीं बरेच ग्रंथ रचिलेले आहेत, असें मला एका नाथपंथी गृहस्थानें सांगितलें. बहुतेक योगशास्त्रांतल्या ग्रंथांत ॐकार, समाधि वगैरेंची चर्चा असते, व हटयोगांतले अभ्यसात्रयाचे क्रम सांगितलेले असतात. सर्व योगांत हटयोग हाच विशेष दगदगीचा व दृढ अभ्यासाचा आहे; कारण यांत मानसिक व शारीरिक दोन्ही प्रकारचे कष्ट फार होतात.

आपल्या पाठीच्या कण्यांत 'इडा', 'पिंगला' व 'सुषुम्ना' अशा तीन नाड्या आहेत. यांपैकीं मधली म्हणजे सुषुम्ना ही नाडी महत्त्वाची आहे. हींत मणक्या-मणक्यावर गांठी आहेत. त्यांस योगाभ्यासी 'चक्रें' असें म्हणतात. मनुष्याच्या डोक्यावर एक ठिकाण आहे; यास 'ब्रह्मरंध्र' असें म्हणतात. सुषुम्नानाडीच्या मुखापाशीं 'कुंडलिनी' या नांवाची एक नाडी आहे, आणि भ्रुकुटीचक्रामध्यें एक चंद्रामृताचें तळें आहे. योग्यानें आसन मांडून अपानवायु कोंडून आंतल्या आंत माघौता मुरडिला म्हणजे ही कुंडलिनी नाडी किंवा शक्ति जागी होते; व मग

'ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी । अधोमुख सर्पिणी ।....सावध होये ॥'

आणि तिचे ते साडेतीन फेरे उकडून ती कुंडलिनी वर चढून चंद्रामृताच्या तळ्यांतलें पाणी म्हणजे अमृत पिऊं लागते. हें एकदा साध्य झालें म्हणजे त्या योग्याच्या त्वचेवरील कोंडा व पापोद्रा पार झडून जाऊन तो योगी

'कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिन्नला मळा । कोंवलिकेचा ॥ कां जे शारदियेचे नि ओलें । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥'

असा तेजःपुंज दिसूं लागतो. नुसता दिसण्यांत तो देदीप्यमान दिसतो इतकें नव्हे, तर मग त्याला नव्या नव्या अनेक सिद्धि सहज साध्य होतात व तो अनेक चमत्कार करूं शकतो. सातां समुद्रांपलीकडील वस्तुहि दिसूं लागतात, स्वर्गांत काय चाललें आहे हें कळतें, व मुंगीच्या

मनांतलें मनोगत ओळखतां येतें. तो वाऱ्याच्या घोड्यावर बसूं शकतो व पाण्याला पाय न लागतां पाण्यावरून चालूं शकतो; आणि तशा वेळीं त्याला ॐकाराचा ध्वनि अखंड ऐकूं येतो. हें कसें होतें, हें केवळ कल्पनेनेंच जाणिलें पाहिजे. त्याशिवाय हें सांगण्याला दुसरा मार्ग नाहीं. कुंडलिनी ही पंचमहाभूतें आटण्याची मूस आहे. शरिरानें शरीर नाहींसें करावें हाच योगशास्त्राचे आचार्य जे शंकर त्यांचा सिद्धांत आहे; आणि हाच सिद्धांत सर्व योगी व नाथपंथी मानितात; व

'जें हें साधन सांगितलें। तेंचि शरिरीं जेंहीं केलें। तें आमुचीन पाडे आलें। निर्वालिया॥'

म्हणजे हें साधन ज्याला करितां येऊं लागलें व साध्य झालें तो प्रत्यक्ष परमेश्वराच्या पायरीस चढतो. हा ईश्वरप्राप्तीचा जो मार्ग त्यासच योगमार्ग म्हणतात, व हा वर्णन करणारे ग्रंथ ज्ञानेश्वराच्या वेळेपासून महाराष्ट्रांत रचिले जात आहेत.

हाच योगमार्ग सुगम करून सांगण्याकरितां पंधराव्या शतकाचे शेवटीं **त्र्यंबक** नांवाच्या ग्रंथकारानें एक सुंदर ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचें नांव 'बालबोध'. याची रचना त्र्यंबकानें फार मेहनत घेऊन केलेली दिसते. बालबोध हा ग्रंथ त्र्यंबकानें दोन वेळां लिहिला. प्रथम हा ग्रंथ लिहून पुरा झाल्यावर तो कोणीं एका संन्याशानें पाहिला. त्याला हा इतका उत्तम वाटला कीं, त्यानें इहलोकींच्या सर्व गोष्टींचा त्याग किंवा न्यास केला असतांहि हा ग्रंथ उचलून नेण्याची त्याला बुद्धि झाली व त्यानें तो नेला. आपण लिहून पुरा केलेला ग्रंथ असा तस्करोपद्रवानें नाहींसा झाल्यावर त्र्यंबकानें हा ग्रंथ पुन्हां लिहिला. ग्रंथ चोरण्याची बुद्धि एका संन्याशाला व्हावी, व तो फिरून लिहून काढण्याचे श्रम त्र्यंबकानें करावे, या गोष्टीवरून हा ग्रंथ दोघांच्याहि मतें किती उत्तम असावा, हें उघड दिसतें; आणि ग्रंथ पाहिला असतां त्यांचें मत यथार्थ दिसतें.

'बालबोध' अथवा 'बालावबोध' हा ग्रंथ त्र्यंबकानें परमार्थविषय

जगाला विशद व सुगम करून सांगण्याच्या हेतूनें लिहिला आहे. याचे तीन खंड किंवा भाग असून एकंदर ओवीसंख्या पांच-हजारावर आहे. आपल्या ग्रंथासंबंधें हा कवि अभिमानानें म्हणतो कीं, माझ्या ग्रंथांतली शब्दधारा ही केवळ ब्रह्मवृष्टि आहे, व

हे केली ग्रंथवोवणी । परि जो वोविला शब्दमणी । तो नाहीं आला परतोनि । मालिके इयां ॥

आणि अशा माझ्या ग्रंथांत जें ज्ञान मीं भरून दिलें आहे, तेंहि तशाच थोर मोलाचें आहे.

'हे पवित्र विद्या भली घ्यावी । आत्मपल्लवीं ग्रंथीं द्यावी ।
हृदयें मांदुस करावी । सांठवणें यासी ॥
वेदशास्त्रद्रुमवल्ली । तेथींचीं पुष्पें यें गुंफिलीं ।
जें अमोदगुणें आथिलीं । मकरंदबोधें ॥
.........यास्तव हा ग्रंथू बरवा । समूळ सुजाणि घ्यावा ।
जरी विश्वासू होईल जीवा । तरिच निका ।'

आणि कवीचें हें शेवटलें म्हणणें कोणासहि पटेल. ज्याचा योगमार्गावर विश्वास असेल, श्रद्धा असेल, ज्याला त्याची अनुभवगोडी असेल, त्याला हा ग्रंथ खरोखरच फार 'निका' वाटेल, यांत संशय नाहीं. अर्थात् हे असले ग्रंथ उगाच पाहिजे त्या भलत्यानें वाचण्याजोगे केव्हांहि नसणारच. अत्यंत गूढ अशा विषयाच्या चर्चेचीं हीं व्याख्यानें, व्याख्यात्यानें कितीहि सुगम केलीं तरी तीं गोड काव्यमय करणें फारसें संभवनीय नसतें. तें अगदींच अशक्य आहे, असें नाहीं. पण तें साधण्याला ज्ञान्यांचा ईश्वर लागतो; इतरांना तें होणें नाहीं. तरी त्यांतल्या त्यांत त्र्यंबकानें आपला ग्रंथ साधेल तितका मनोरंजक करण्याचा यत्न केला आहे. या ग्रंथाची रचना त्यानें आपल्या गुरूंच्या सांगण्यावरून केली. 'गुरूंच्या' असें म्हणण्याचें कारण असें कीं, त्र्यंबकाला दोन गुरु होते. एकाचें नांव कमळाकर. याच्यापासून त्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश मिळाला. पण कमळाकराची भेट होण्यापूर्वींच त्यानें आपल्या त्रिवर्गापैकीं ज्येष्ठ बंधु जो

नृसिंह त्याचेपासून बीजमंत्र घेतला होता. म्हणजे कमलाकर हा ज्ञानगुरु, व वडील बंधु नृसिंह हा मंत्रगुरु, असें झालें. त्र्यंबकाच्या भावांपैकीं वडील नृसिंह, मधला त्र्यंबक आणि धाकटा कौंडन्य. यांच्या आईचें नांव अंबावती; बापाचें नांव भैरव; आणि आजाचें कृष्णदेव. भैरवाला तुळजापूरच्या भवानीच्या आशीर्वादानें हे तीन पुत्र झाले. परंतु देवीनें सांगितलें होतें कीं, मधला पुत्र तो माझा अंश समज. तो योगी होईल. या भीतीनें भैरवानें मधल्याचें म्हणजे त्र्यंबकाचें लग्न केलें नाहीं. पण भैरव वारल्यावर त्र्यंबकानें संसार केला व 'गृहस्थधर्म विस्तारला.' त्र्यंबकानें 'बालबोध' रचण्यास–किंवा फिरून दुसऱ्यानदा लिहिण्यास–सुरवात शके १४९४-चे फाल्गुनांत केली. हा ग्रंथ कवीनें शके १५००-त चैत्र शु॥ प्रतिपदेला म्हणजे पाडव्याचे दिवशीं पुरा केला. म्हणजे ग्रंथ लिहिण्याचें काम पांच वर्षें चालू होतें. असें दिसतें कीं, हल्लीं महशूर असलेला 'त्र्यंबकी' हा वैद्यक-ग्रंथ याच त्र्यंबकाचा असावा. म्हणजे याला जशी वेदान्ताची तशीच वैद्यकाचीहि चांगली गोडी होती; व दोहींतहि यानें प्रावीण्य संपादन केलें होतें. याला श्री चंडिकादेवी प्रसन्न झाली होती. तिच्या इच्छेनुरूप यानें सिद्धेश्वर-संप्रदायाची स्थापना केली.

याच सुमारास **सिद्धपाल केसरी** कवीनें आपला 'मल्हारी-माहात्म्य' ग्रंथ रचिला आहे—

'श्री शके पंधराशते सात। पार्थिवनाम संवत्सरी श्रावणमासांत। वद्य-पक्ष शुक्रवारी षष्ठीसी ग्रंथ। समाप्तीसी पावला॥'

हा ग्रंथकार स्वतःस मार्तंडभैरवाचा दास म्हणवितो. याच्या आईचें नांव अंबिका, बापाचें नांव कुबेर, व आजाचें नांव विश्वासराय. या ग्रंथांत सातारा जिल्ह्यांतील प्रेमपूर ऊर्फ पाल–पेंबरें (खंडोबाची पाली) या क्षेत्रांत देवाचीं दोन लिंगें

'शुक्लपक्षि मार्गेस्वरि। षष्टी तिथी आदितवारी। शततारका नक्षत्री'

प्रगटलीं, असें लिहिलें आहे. एकविसाव्या अध्यायांत अष्टविधा भक्ति

वर्णिली आहे. ग्रंथ साधारणपैकींच आहे.

याच काळीं विद्यमान असणारा **कृष्णदास** या नांवाचा एक कवि महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. याचें नांव **कृष्णदास लोळ्या** असें महीपती व इतर चरित्रग्रंथकार सांगतात. यानें रामायण-युद्धकांड मराठींत लिहिण्यास सुरुवात केली. ग्रंथ पुरा होण्याचे पूर्वींच कृष्णदासास आपला मृत्यु संनिध आला, असें वाटलें व हातीं घेतलेला ग्रंथ आपल्या हातून पुरा होत नाहीं हें पाहून कृष्णदास फार कष्टी झाला. त्यानें ही आपली हकीकत एकनाथास सांगितली व आतां माझे मागें आपणच हा ग्रंथ पुरा करावा, अशी विनंती करून लिहिलेला ग्रंथ एकनाथाचे पुढें ठेविला. कृष्णदासाचा दृढनिश्चय व ग्रंथ पुरा करण्याची उत्कट इच्छा पाहून एकनाथानें त्यास सांगितलें कीं, असें हताश होऊं नये—

‘ तुम्ही आरंभिला ग्रंथ बरा । हा आपुल्याच मुखें पूर्ण करा .’

ग्रंथ पुरा होईपर्यंत तुम्हांस काळाचें यत्किंचितहि भय नाहीं. हें ऐकून कृष्णदासास धीर आला व त्यानें आपला ग्रंथ रात्रंदिवस श्रम घेऊन अकराव्या दिवशीं पूर्ण केला. ग्रंथ पुरा झाल्यावर लागलाच कृष्णदास मृत्यु पावला, अशी हकीकत महीपती सांगतो. हल्लीं आपणांस उपलब्ध असें रामायण-युद्धकांड आहे. परंतु याचा लेखक आपलें नांव ‘ कृष्णदास लोळ्या ’ असें देत नाहीं; तो आपणास ‘ कृष्णदास मुद्गल ’ म्हणवितो. एकनाथाचे समकालीन किंवा त्याचे नंतर लौकरच प्रसिद्ध असलेले कृष्णदास नांवाचे तीन पुरुष प्रसिद्ध आहेत. हे सर्व सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेले असावे. हल्लीं प्रसिद्ध असलेल्या युद्धकांडाचा लेखक कृष्णदास मुद्गल व कृष्णदास लोळ्या हे दोन्ही एकच नसतील तर कृष्णदास लोळ्या हा एक अगदीं स्वतंत्र कवि समजला पाहिजे, हें उघड आहे. याचा ग्रंथ एकनाथानें प्रत्यक्ष पाहिल्याचें महीपती सांगतो. कृष्णदास मुद्गलानें रचिलेलें रामायण - युद्धकांड मात्र हल्लीं उपलब्ध आहे. याचे ७८ प्रसंग अथवा अध्याय असून याची ग्रंथसंख्या सुमारें दहा-हजार आहे. हा कवि

पैठण येथील राहणारा. याच्या बापाचें नांव नृसिंह. याचें स्वतःचें नांव मुद्गल असून याच्या गुरूचें नांव 'कृष्ण' असें असलें पाहिजे. यानें ग्रंथांत गुरूचें स्तवन विस्तारानें केलें आहे, पण त्याजविषयीं दुसरी कांहीं माहिती सांगितली नाहीं. यानें आपला ग्रंथ वाल्मीकि-रामायणाच्या आधारेंच सुगम भाषेंत लिहिला आहे. याची भाषासरणी साधारण मनोरम आहे. उपमाद्यलंकारांनीं आपल्या ग्रंथाला उत्कृष्ट तऱ्हेनें नटवून यानें आपल्या ग्रंथाची रचना थाटाची करण्याचा यत्न केला आहे. माझी देशभाषा मराठी आहे, म्हणून मी मराटींत ग्रंथ लिहितों, असें सांगतांना मराठीची व मराठी ग्रंथाची योग्यता फार श्रेष्ठ आहे, असें कवीनें मोठ्या डौलानें सांगितलें आहे—

कथापंथीं महाराष्ट्र वचनें । परि हीं रसिकें अतिगहनें ।
जैसीं वनमक्षिकांचीं वदनें । मधूतें श्रवती ।।
नाना संस्कृत हें चंद्रमंडळ । महाराष्ट्र चंद्रिका केवळ ।।
संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें ।।
जैसें दधीचें मथन केलें । त्यांतुन नवनीत निवडिलें;
तैसे संस्कृतापासोनि जाहलें । महाराष्ट्र कवित्व ।।
इक्षुदंडू रसनायकू । शर्करा पुढें तयाचा पाकू ।
गोडीचा विचार अधिकु । रसनायकीं जाणावी ।।

या कृष्णदासाचें युद्धकांड मात्र हल्लीं प्रसिद्ध आहे, हें वर सांगितलेंच आहे.

कृष्णदासाच्या या युद्धकांडाचीं पारायणें मराठेशाहींत किल्ल्यांकिल्ल्यांवरून नेहमीं होत. या ग्रंथाच्या पारायणानें अंगीं युद्धसामर्थ्य येऊन यश येतें, अशी जुन्या काळची समजूत होती. अत्यंत पूज्य अशा योद्ध्यांच्या सर्वस्वीं यशस्वी अशा युद्धसंग्रामाचें वर्णन, आणि तेंहि उत्तम ईश्वरभक्तिपरायण कवीनें केलेलें, असें असल्यामुळें त्याबद्दल भक्तिभाव उत्पन्न व्हावा, हें साहजिक आहे. रामायणांतल्या कोणत्याहि कांडावर एवढ्या विस्तारानें रचिलेला ग्रंथ मराठींत दुसरा नाहीं. युद्धकांडास आरंभ करितांना कवि ह्मणतो—

विचित्र वाल्मिकीनें कथिलें । मागें सुंदरकांड संपादिलें ।
आतां 'युद्धकांड' आरंभिलें । जें अपूर्व सप्तमध्यें ॥

या उल्लेखावरून व प्रचलित आख्यायिकेवरून कृष्णदासानें सबंध रामायण कदाचित् लिहिलें असावें, असें वाटतें.

रामरावणयुद्धाचे वेळीं रावण युद्धाला गेला तेव्हां मुद्गल म्हणतो—

रावणू नोवरा केळवला । मुक्ति परणावया निघाला ।
ह्मणोनि बाणीं मंडपू घातला । अवघें आकाश लोपलें ॥
कुंभकर्णादिक भले भले । समस्त वऱ्हाडी पुढें गेले ।
रावणा परिवेष्टित उरले । किंचित कोटी असती ॥
रावणू जातो मिरवत रणरंगी । कपाळें शोभती बाणांच्या बाशिंगीं ।
रक्तक्षतें गळतीं सर्वांगीं । त्याची आरक्ता पुष्पमाळा ॥
रावणू शिवभक्तु होय । आणि रामु शिवाचें सत्यहृदय ।
ऐसें जाणूनि पूजनार्थ काय । प्राण पंचरत्नें वाहिलीं ॥

प्रत्यक्ष रामरावणांचें युद्ध सुरू झालें तेव्हां—

रामरावण समदृष्ट जाले । शरासन सोडुनी सरसावले ।
दोघेहि क्रोधें उचंबळले । खवळले समुद्र जैसे ॥
यापरी दोघेजण । क्रोधा चढले रामरावण ।
मग अमित शरीं संपूर्ण । आकाश करिते जाले ।
रामरावणांचे बाण गगनीं । येकयेकांचे मुख छेदुनी ।
शर पडती मेदिनीं । मृत्युरंग जैसें ।
बाणबाणांच्या झगटणीं । पावकाच्या ज्वाला पडती धरणीं ।
खंडभाळीच्या उसळणीं । इंद्रतरणीं बुजकळोनि गेला ॥
बाणबाणांच्या घसरीं । रागिटा तिडकीया धांवती अंबरीं ।
तेणें तारा आहाळोनि भूमीवरी । पडों लागल्या बहुत ।
खेचरांसि आरंभला प्रळयो । कळाहीन कांपती चंद्रसूर्यो ।
अंगिरासुत आणि भृगुतनयो । चिंताचक्रीं पडले ॥
पाहां पां केतु आणि राहो । त्यांसी मांडला प्राणसंदेहो ।
बुध मंगळ पावले मोहो । शनी म्हणे 'मेलों, रे मेलों' ॥

बाणांच्या तीक्ष्ण भालीं । पोटें समुद्राचीं तापलीं ।
तेणें जलचरें मेलीं । मच्छकच्छादिक ॥

आणि असें तुंबळ युद्ध होऊन शेवटीं रावणाचा पराजय होऊन रावण पडला; त्या वेळीं त्याचें उत्तरकार्य करण्यासाठीं रामास परवानगी विचारण्यांत आली. तेव्हां मराठ्यांच्या क्षत्रियधर्माला साजेल, असेंच उत्तर कवीनें रामचंद्राच्या तोंडून देवविलें आहे. श्रीरामचंद्र म्हणतात,

'जैसा दग्ध काष्ठा सरिसा । वन्हि विझोनि जाय आपैसा ।
वैरीवधांतीं तैसा । वैरसंबंधु कुठे ॥'

या मुद्गल कृष्णदासाचे सुमारास आणखी एक '**कृष्णदास**' या नांवाचा कवि होता. याची महाभारतांतील निरनिराळ्या कथानकांवर रचिलेलीं प्रकरणें आढळतात. याचें स्वतःचें नांव **विश्वनाथ** असावें, असें याच्या 'अभिमन्युविवाहां'तील उल्लेखावरून वाटतें. केव्हां-केव्हां हा आपणास 'विप्र', 'विप्रनाथ' असेंहि म्हणवितो. या 'अभिमन्युविवाहा'चे सात अध्याय असून याची ग्रंथसंख्या जवळ-जवळ अडीच हजार आहे.

या सर्व कृष्णदासांपेक्षां '**कृष्ण**' या नांवाचा या काळचा एक कवि महाराष्ट्रांत फार प्रसिद्ध आहे. याचें नांव '**कृष्ण याज्ञवल्की**' असें होतें. यानें 'देवीमाहात्म्य' नांवाचा ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आढळतो, पण हा याचा मुख्य ग्रंथ नव्हे. यानें 'कथाकल्पतरू' या नांवाचा एक मोठा थोरला पौराणिक ग्रंथ रचिला आहे. सांप्रतच्या कथाकल्पतरूचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. यांपैकीं पूर्वार्ध मात्र कृष्ण-याज्ञवल्की यानें लिहिला. या पूर्वार्धांत सात स्तबक अथवा भाग आहेत. यांत एकट्या सातव्या स्तबकाचीच ग्रंथसंख्या २९४६ आहे. आपल्या ग्रंथांत कवीनें आपणाविषयीं थोडीशी माहिती सांगितली आहे; परंतु कवीचा काळ कोणता हें कळण्याला यांत साधन नाहीं. तथापि कृष्णयाज्ञवल्कीचा मुलगा जो गोपाळ याज्ञवल्की याच्या विनंतीवरून मी ग्रंथ लिहितों, असें शिवकल्याणानें शके १५५७–मध्यें लिहिलेल्या आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे; यावरून कृष्णयाज्ञवल्की हा शके पंधराशेंच्या सुमारास विद्यमान

असावा, असें होतें. हा कौंडिण्य गोत्री त्रिप्रवरी ब्राह्मण. यानें आपल्या आईचें नांव कमलजा व बापाचें नांव अंबऋषी असें दिलें आहे[१]. याच्या गुरूचें नांव अनंत असें होतें. कवीनें हा ग्रंथ श्रीक्षेत्र नाशीक येथें लिहिला. ही माहिती यांत प्रत्येक स्तबकाचे शेवटीं सांगितली आहे. या ग्रंथांत अनेक पौराणिक कथा सांगितल्या आहेत. प्रचलित कथांपेक्षां या कवीनें सांगितलेल्या कथानकांत पुष्कळ फेर आढळतो. कदाचित् याच्या कथानकांचें मूळ प्रचलित ग्रंथांपेक्षां अन्यत्र सांपडूं शकेल. या ग्रंथांत अनेक तऱ्हेच्या कथानकांशिवाय दुसरे पुष्कळ विषय कवीनें आणिले आहेत. यांत भूगोलवर्णन, सूर्याच्या गति, चारी वर्ण व सर्व जातींची उत्पत्ति, वगैरे नेहमीं असल्या ग्रंथांतून न येणारे विषयहि आले आहेत. कृष्णयाज्ञवल्कीची भाषा अगदीं सरळ आहे. याच्या ग्रंथांत यानें सांगितलेल्या कथा वाचल्या असतां हा ग्रंथ एके दृष्टीनें खरोखरच कल्पतरु वाटतो. म्हणजे यांत वाटतील तितक्या कथा आणि त्याहि मनसोक्तपणें सांगितल्या आहेत. भारत, भागवत आणि इतर अनेक पुराणें यांतल्या आठवल्या त्या गोष्टी कवीनें सांगितल्या आहेत.

'कथाकल्पतरूची वाणी । नाना मत्त पुराणी ।
हिरा रत्नें मेळवूनी खाणी । म्हणे कृष्ण याज्ञवल्की ।।

असें ग्रंथांत सांगितलें आहे. याच्या या कल्पतरूमध्यें एकच खोड आहे. त्याला फळें अपार लागलीं आहेत. पण त्या फळांना स्वाद नाहीं. कवीच्या भाषेला चांगलीशी गोडी नाहीं आणि काव्यांत त्याच्या लौकिकाच्या मानानें प्रसाद नाहीं.

या आतांपर्यंत सांगितलेल्या कवींचा समकालीन असा एक गीता-टीकाकार महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. याचें नांव **रंगनाथ**; व यानें केलेल्या

१. त्या अंबऋषीची कांता । कमळजा नामे पतिव्रता ।
ते प्रसवली विष्णुभक्ता । कृष्ण कविसी ।।

२. पांचवे स्तबकाचे १८व्या अध्यायांत 'देशभाषाकथन' म्हणून एक अनुसंधान आहे.

भगवद्गीतेवरील टीकेचें नांव 'चित्सदानंदलहरी'. पुष्कळ वर्षें ही टीका रंगनाथ निगडीकराच्याच नांवावर विकली जात असे. परंतु सुमारें अठरा वर्षांपूर्वी रंगनाथ निगडीकराचे ग्रंथ जरा चौकशीनें पाहत असतां या टीकेशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं, असें माझ्या लक्ष्यांत आलें; व यानें आपल्या टीकेंत दिलेल्या आपल्या गांवाच्या 'मोगरें' या नांवावरून भेद दाखविण्यासाठीं मीं यास 'रंगनाथ मोगरे'कर असें म्हटलें. तेव्हांपासून हा '**मोगरेकर रंगनाथ**' या नांवानेंच ओळखला जातो. यानें आपलें राहण्याचें गांव जें मोगरें तें गोदावरीकांठीं असल्याचें सांगितलें आहे. याच्या आजाचें नांव 'अनंत' व बापाचें 'आपेराज' ऊर्फ आप्पाराव असें होतें. याचें गोत्र कपि. आपल्या कुळांत पुष्कळ पिढ्यांपासून श्रीकृष्णाची उपासना चालू आहे, असें रंगनाथ म्हणतो. याची गुरुपरंपरा सिद्धानंद (उर्फ वासुदेवानंद) → परमानंद → वैकुंठानंद → कृष्णानंद अशी यानें दिली आहे.

गोदावरीचे तीरीं धारेस असतांना रंगनाथानें कृष्णानंदाचा अनुग्रह घेतला. रंगनाथाचे (१) चित्सदानंदलहरी, (२) योगवासिष्ठ व (३) पंचरत्न असे तीन ग्रंथ हल्लीं प्रसिद्ध आहेत. 'चित्सदानंदलहरी' ही टीका लिहितांना प्रारंभींच

श्रीशंकर आणि मधुसूदन । आणिकही जे आचार्य सज्ञान ।
त्याहीं नाना अनेक क्लेश करून । गीता-व्याख्यान । केलें असें ।।
एकेका अक्षराचें व्याख्यान । केलें श्रुतिस्मृती मथून ।
तेंचि तयांचें सिद्ध अर्थान्न । परवडून काढीं श्रोतयां ।।

असें सांगितलें आहे. चित्सदानंदलहरी टीकेंत दरएक अध्यायाचे शेवटीं त्या त्या अध्यायाच्या माहात्म्यासंबंधीं एकएक भाकडकथा सांगून कवीनें अध्याय पुरा केला आहे. ही कवीची कृति म्हणण्यापेक्षां मागाहूनची कोणा कलमबहादराची मखलाशी, असें वाटतें. या टीकेची ग्रंथसंख्या अकरा-हजारावर (११२३४) आहे. याचा दुसरा ग्रंथ 'योगवासिष्ठसार' हा यानें मूळ योगवासिष्ठ रामायणापैकीं सुमारें सव्वादोनशें श्लोक निराळे

काढून त्यांच्या आधारें हा रचिला आहे. या योगवासिष्टसार टीकेचीं दहा प्रकरणें असून एकंदर ग्रंथसंख्या सुमारें सात–हजार आहे. ही टीका कवीनें शके १५३०-मध्यें कीलकनाम संवत्सरीं आश्विन शु० अष्टमीस गुरुवारीं पुरी केली, असें या ग्रंथांत म्हटलें आहे. याचा तिसरा, म्हणजे 'पंचरत्न-टीका' हा ग्रंथ 'वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयताम्' इत्यादि श्रीमत् शंकराचार्यांच्या 'सोपानपंचक' या प्रसिद्ध पांच श्लोकांवर लिहिलेली टीका होय. या टीकेची ग्रंथसंख्या दोन-हजारावर आहे (२०६५). या रंगनाथाची शिष्यपरंपरा किंवा पुत्रपरंपरा हल्लीं कोठें असल्याचें माहीत नाहीं. याचा पुत्र व शिष्य जो काशिराज त्याच्या **विश्वनाथ** नामक शिष्यानें एक 'उपदेशरहस्य' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथांत आपली परंपरा सांगतांना विश्वनाथ म्हणतो,

'कृष्णानंदाचा अनुग्रहीत । तो महाप्रसिद्ध रंगनाथ ।
कपिलगोत्रोत्पन्न विख्यात । नाशिकीं वसत, निजमुखें ॥'

या उल्लेखावरून रंगनाथाचें वसतिस्थान किंवा त्याचें समाधिस्थान श्रीक्षेत्र नाशीक हें होतें, असें दिसतें.

ही रंगनाथाची भगवद्गीतेवरील टीका ज्या काळीं लिहिली गेली, त्याच्या दहा-पंधरा वर्षे अलीकडील 'अवधूतगीते'वरील व 'गणेशगीते'वरील टीका उपलब्ध आहेत. अवधूतगीतेवरील टीका शके १५३५-चे सुमारास **मेरु** कवीनें लिहिली व गणेशगीतेवरील टीका १५५४-मध्यें पंढरपूर येथील **निरंजन** नांवाच्या साधुपुरुषानें लिहिली. हा निरंजन, प्रसिद्ध जे निरंजनस्वामी, रामदासाचे समकालीन, त्यांच्याहून भिन्न होय. ही टीका ओवीबद्ध असून अकरा-अध्यायात्मक आहे. मूळ गणेशगीता म्हणजे श्रीगणपतीचा व वरेण्याचा संवाद होय, हें प्रसिद्धच आहे. निरंजनानें आपल्या टीकेच्या शेवटीं ग्रंथसमाप्तिकाल

अंगिरा संवत्सर । श्रावणशुद्ध भौमवार ।
एकादशीं द्वितीय प्रहर । स्वातीसार नक्षत्र ॥

असा दिला आहे. म्हणजे ही टीका शके १५५४-मध्यें लिहिली, असें

झालें. निरंजनानें ग्रंथांत आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें दिली आहे. शंकराचार्य–हस्तामलक–भास्कर–लयानंद–आनंदानंद–परमानंद–काशिराज–निरंजन.

या निरंजनाच्या आधीं थोडे दिवस विठ्ठल नांवाच्या एका कवीनें रचिलेली एक श्लोकबद्ध रासक्रीडा उपलब्ध आहे. या ग्रंथांत विठ्ठलानें आपलें गोत्र श्रीवत्स असून आपली 'व्यापारी वृत्ती' होय, असें लिहिलें आहे. हा वऱ्हाडांत कळपूर येथें राहणारा. यानें वृश्चिकेचा गुरु व कर्केचा रवि असतांना

कुमारवक्त्राग्निशरेन्दुयोगें। शकें गणावीं विपरीत मार्गें।
आनंद संवत्सर माघमासीं। नीशीशवारी तिथि पौर्णिमेसी॥

आपण ग्रंथ पुरा केल्याचें लिहिलें आहे. कवीनें सांगितल्याप्रमाणेंच 'अङ्कानां वामतो गतिः' या नियमानें शक १५३६ हा येतो. या रासक्रीडा ग्रंथाचीं पद्यें 'दर्शनाग्निनयन' म्हणजे २३६ आहेत, असें शेवटल्या पद्यांत कवीनें लिहिलें आहे. श्लोक अनेकवृत्तात्मक असून साधारण बऱ्यापैकीं दिसतात. याच्या कवितेचा नमुना थोडासा देतों—

जनक तूं जननी द्विरदानना। तुजविणें दुसऱ्यास भजेचि ना॥
हरिकथा वदतां कवि विठ्ठला। करि कृपा शरणागतवत्सला॥१॥
गणपति वरदानें स्फूर्ति अद्भूत आहे।
मृदुपदरचनेचे श्लोकसाहित्य पाहे॥
कुज म्हणतील वाचा काय भाषा मऱ्हाठी॥
परि सुरस, जनातें प्रीति होईल मोठी॥२॥

**मृत्युंजयस्वामी**हि याच काळीं होऊन गेले असावे, असें वाटतें. मृत्युंजयस्वामी हे पूर्वींचे मुसुलमान असून बेदर येथील ब्रामणी राज्यांतील राजघराण्यापैकींच एक पुरुष होते. असें सांगतात कीं, हे पूर्ववयांत विषयलंपट व मोठे रंगेल स्वभावाचे होते. एके वेळीं राजवाड्यांतील झरोक्यांत आपल्या रूपवती स्त्रीसह बसून हे फळें खात होते व सालें खालीं टाकीत होते. गोषाच्या रिवाजाप्रमाणें या वेळीं आसपास कोणीहि

असावयाचें नाहीं, अशी शिस्त होती. परंतु कोणी एक भिकारी हे सालें टाकीत तीं खालीं चुंफीत बसलेला यांच्या दृष्टीस पडला, आणि या रागावर त्यांनीं त्यास बरेंच शासन केलें. त्यावर भिकारी म्हणाला, " मला शिस्त लागली, हें ठीक झालें. मीं नुसतीं टाकलेलीं सालें चुंफलीं, त्या मला हें इतकें शासन मिळालें; मग ज्यांनीं फळेंच सगळीं खाल्लीं त्यांची वाट काय होईल, तें मनांत आलें म्हणजे वाईट वाटतें!' हें ऐकून या राजपुरुषास वाईट वाटलें; व अनुताप होऊन हा भक्तिमार्गांत शिरला. पंढरपुरांत ' विवेकसिंधु ' वाचून याची वृत्ति परमार्थप्रवण झाली. यास कल्याणीचे ' सहजानंद ' स्वामींनीं उपदेश दिला व नांव ' मृत्युंजय ' असें ठेविलें. नंतर हा नारायणगांवीं राहूं लागला. बाडांतून याचें नांव कोठें-कोठें ' ब्राह्मणी ' किंवा ' बामणी मुंताजी ' किंवा ' मुंताजी ' असें आढळतें. याची ग्रंथरचना बरीच असावी, असें वाटतें. याचे रचनेपैकीं हल्लीं ( १ ) अनुभवसार, ( २ ) गुरुलीला, ( ३ ) अमृतसर, ( ४ ) अद्वैत-प्रकाश, ( ५ ) सीताबोध, ( ६ ) पंचीकरण, ( ७ ) स्वरूपसमाधान व ( ८ ) सिद्धसंकेतप्रबंध इतके ग्रंथ उपलब्ध असून शिवाय कांहीं पदें, अभंग वगैरे किरकोळ रचनाहि उपलब्ध आहे. आपल्या अभंगांत कांहीं ठिकाणीं हा आपणास ' मुंतोजी ' असेंहि म्हणवितो.



# मुक्तेश्वर



पुराणांतील कथाभाग आधाराला घेऊन तदनुरोधानें ज्यांनीं आपल्याकडे मराठींत काव्यरचना केली आहे, त्यांत मोरोपंत, रघुनाथपंडित व **मुक्तेश्वर** हे श्रेष्ठ समजले जातात. या तिहींत मोरोपंत व रघुनाथपंडित या दोहोंहि कवित्र्यांत पहिला मान देण्याविषयीं मतभेद आहे. रघुनाथपंडिताला तर हा मान देणारे फारच थोडे रसिक आढळतात. पंडित-मजकूर हे उत्तम कवि आहेत, असे म्हणण्यापेक्षां हे उत्तम भाषांतरकार आहेत, असेंच पुष्कळांना वाटण्याचा संभव आहे. मोरोपंताला हा अत्युच्च मान देणारे पुष्कळ लोक आहेत; पण त्याच्याविरुद्ध मत देणारे तसेच पुष्कळ आहेत. ते त्याला अगदींच साधारण प्रतीचा व केवळ भाषांतर करणारा कवि, असें लेखितात. मुक्तेश्वरासंबंधाचा प्रकार याहून अगदीं निराळा आहे. त्याला मराठींतला सर्वांत श्रेष्ठ दर्जाचा कवि, असें म्हणणारे लोक पुष्कळ आहेत. कांहीं इसम—विशेषतः कथेंत आणि जेवणावळींत पंतांच्या आर्येला लालचावलेले व एकेका आर्येचे दहा-दहा अर्थ करून दाखविण्यांत सर्व रसिकता आहे, असें समजणारे कांहीं इसम--मुक्तेश्वराला सिंहासनाचा मान स्वतः होऊन देत नाहींत, हें खरें आहे. पण तो मान कोणीं त्याला दिला असतां ते मुक्तेश्वराच्या विरुद्ध फारसे बोलत नाहींत. याचें एक आणि मुख्य कारण असें आहे कीं, त्यांनीं मुक्तेश्वराचें काव्य वाचलेलें नसतें; व त्याची चटक त्यांच्या जिभेला व कानाला लागलेली नसते. बाकी ज्यानें एकदा मुक्तेश्वरी आदिपर्वांतील आख्यानांचा स्वाद चाखला आहे, तो त्यांतील रसानें वेडा होऊन पुन्हां-पुन्हां तेथेंच भ्रमत राहतो. वाहत्या पाण्याच्या धबधब्याचा धोत पाहून कोणाचे डोळे विटले आहेत! गोड आम्रफळें खातां खातां कोणाच्या जिभेला त्यांची शिसारी आलेली आहे! गंधर्वांच्या गाण्यानें आणि कोकिळेच्या स्वरानें कोणाच्या कानठळ्या

बसल्या आहेत! आणि कपाळ उठलें आहे! तसेंच, मुक्तेश्वराचें गोड काव्य वाचीत असतां कोणाला त्याचा कंटाळा वाटला आहे! शरदृतूच्या स्वच्छ चांदण्यांत चांदण्यानें न बोलावतां लोक जसे आपण होऊन तिकडे जातात किंवा ढळढळीत उन्हांत दुपारच्या वेळीं झाडांच्या गर्द व शीतळ छायेंत निमंत्रणाची अपेक्षा न करतां स्वतः होऊन लोक जाऊन बसतात, किंवा जाई-मोगऱ्यांनीं विनवण्या केल्याशिवाय त्यांचा वास लोक एकसारखा घेतात, त्याप्रमाणें ज्याला सहृदयता आहे तो रसिक कोणीहि न विनवितां, न सांगतां, आग्रह न करतां आपण होऊन मुक्तेश्वराचीं गोड आख्यानें पुन्हां-पुन्हां वाचीत सुटतो; आणि पोथी गुंडाळून ठेवल्यावरहि तींतील ओव्या एकसारख्या आपल्याशींच गुणगुणत राहतो. असा हा मुक्तेश्वर कवि लोकोत्तर आहे; आणि पुष्कळ लोकोत्तर गोष्टींप्रमाणें या लोकोत्तर कवीसंबंधींहि खात्रीलायक अशी माहिती फारच थोडी आहे.

याचा जन्म कधीं, हें माहीत नाहीं. हा मेला कधीं, हें माहीत नाहीं. यानें ग्रंथ लिहिले किती, हें माहीत नाहीं. याचें शिक्षण किती व कोठें झालें, हें माहीत नाहीं. याची घरची स्थिती कशी काय होती, हें माहीत नाहीं. फार काय, पण याचें पाळण्यांतलें नांव काय व उपनांव काय, हेंहि खात्रीलायक माहीत नाहीं. याच्या चरित्रमंदिरांत चोहोंकडे अशी नकार-घंटा वाजते आहे. या वर दिलेल्या सर्व बाबी वादग्रस्त आहेत. तरीदेखील यानें आपण स्वतः आपल्या ग्रंथांत स्वतः-संबंधें जी थोडीशी माहिती दिलेली आहे तीवरून पुढील गोष्टी कळतात.

याचा पिता चिंतामणि, कारण चिंतामणि भूदेव कुमर
हा सेवक दत्ताचा, कारण श्री दत्तांघ्रिपद्मभ्रमर
याची कुलस्वामिनी,अंबा करवीर लक्ष्मी विष्णुभाजा
याचा कुलस्वामी, भैरव सुवर्णपुरीचा[1] राजा

---

१. जी. आय. पी. च्या केम स्टेशनाजवळ सोनारी ( सुवर्णपुरी ) हें गांव आहे.

हा मूळ राहणारा, गोदावरीतटनिवासी
याचा गोत्र-पुरुष, अत्रिगोत्री पविप्र[1] ऋषी
याचा गुरु, चिन्मूर्ति लीला विश्वंभरू[2]
याचें उपास्य दैवत, दत्तात्रेय जगद्‌गुरु
याचें नेहमीं राहणें पैठणास, कारण वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं

याशिवाय असें आणखीहि म्हणतां येतें कीं, हा कांहीं दिवस तरी काशीस राहत असे व तेथें सतत ईश्वर भजनांत याचा वेळ जाई; कारण हा म्हणतो,

सुचिर सहजवासें गौतमीच्या तटाकीं । अतुल भजन पंथें पंथ टाकीत टाकी ।।

पण याचें नेहमींचें राहण्याचें ठिकाण पैठण असून तेथें संतमंडळींत तो असे. कारण 'निर्मळ गोदातटीं मुनिराज हंस । निर्गुण प्रतिष्ठानीं केला रहिवास' असें त्यानें म्हटलें आहे. याचें लहानपणचें नांव 'मुद्गल' होतें, असें याच्या 'संक्षेप-रामायणां'तील 'द्विजवर कविनामा मुद्गल अत्रिगोत्री' या ओळीवरून म्हणतां येतें. गुरूपदेशानंतर व कवितादेवीच्या मंदिरांत प्रवेश केल्यानंतर हा 'मुद्गल' हें साधें नांव टाकून आपला 'मुक्तेश्वर' या काव्यमय गोड नांवानें उल्लेख करूं लागला, हें उघड दिसतें. यानें मातृजनक जनार्दनी—। एकनाथ नमियेला आहे, यावरून हा प्रसिद्ध एकनाथस्वामीच्या मुलीचा मुलगा, हेंहि स्पष्ट आहे. पण एकनाथाच्या या मुलीचें म्हणजे याच्या आईचें नांव 'गोदावरी'

---

१. कोणी म्हणतात कीं, मुक्तेश्वराच्या आईचें नाथांनीं ठेविलेलें लाडकें नांव लीलाबाई; व तिच्या नवऱ्याचें नांव विश्वंभर.

एकनाथ कन्या नाम लीलाबाई । प्रीति तिचे ठायीं बहु असे ।। वरुषें जाली सात, लग्नाची योजना । लोक करिती जाणा ठाई ठाई ।। विश्वंभर नामें विप्र येक आला । कोणी नाहीं त्याला । मागेंपुढें ।। ... मोठे मोठे आले । न देवोनि तयासी । देवोनिया यासीं लग्न केलें ।। घरींच ठेविलें भजन–कीर्तन । अनुग्रह जाण । दिला तया भीमस्वामी ( भक्तलीलामृत ).

२. संक्षेप-रामायणांत याच्या आधींच्या श्लोकांत-काशीनिवासी जगताप-हारी । तारी जगा केवळ नामधारी ।। असा उल्लेख आहे. यावरूनहि वरील अनुमानाचाच ध्वनि निघूं पाहतो.

किंवा गंगाबाई, हें मात्र निश्चित नाहीं. एकनाथ- चरित्रकार केशवदास म्हणतात, **गोदावरी**; कोल्हापूरकर शंभूछत्रपती म्हणतात, **गंगाबाई**; व मोडक, पांगारकर वगैरे ग्रंथकार तर्कानें म्हणतात कीं, गोदावरी व गंगाबाई हीं दोन्हीं नांवें मुक्तेश्वराच्या आईचींच होत. एक माहेरचें व एक सासरचें. यांपैकीं शंभूछत्रपतींच्या सरकारी दफात्यांतील सनदेंत दिलेलें नांव गंगाबाई हें निश्चयात्मक मानण्यास हरकत नाहीं. बाकी दोन्ही पक्ष तूर्त संशयात्मक धरून चालूं.

याच्या जन्मकालासंबंधींहि खात्रीलायक अशी माहिती उपलब्ध नाहीं. पण कोडितकर अत्रे यांच्या दप्तरांतील टिपणवहींत व सरंजामे यांचे जंत्रींत एकनाथाचे मुलीचा मुलगा मुक्तेश्वर याचा जन्म पैठण येथें शके १५३१-मध्यें झाला, अशी लेखी माहिती दिली आहे. पण गप्पा तर अशा ऐकूं येतात कीं, मुक्तेश्वर हा लहानपणीं मुका होता. पुढें एकनाथाच्या कृपेनें त्याला वाचा आली. त्याचा विद्याभ्यास एकनाथाजवळ झाला; त्याला काव्यस्फूर्तिहि एकनाथापासून प्राप्त झाली. या सगळ्या गप्पांना एकनाथाच्या मृत्यूपूर्वी मुक्तेश्वराचा जन्म झाला, हें गृहीत धरणें अवश्य आहे. एकनाथ शके १५२१-मध्यें समाधिस्थ झाला; तेव्हां यापूर्वी म्हणजे शके १५२१–पूर्वी मुक्तेश्वर जन्मला, असें या गप्पिष्टांची जिव्हा सुचविते; व त्यानंतर म्हणजे शके १५३१-मध्यें मुक्तेश्वराचा जन्म झाला असें टिपणकारांची वही सांगते. अधिक पुराव्याच्या अभावीं जिभेपेक्षां हाताच्या बोटांना आधार मानणें जास्त सयुक्तिक आहे, हें उघड आहे. नुसत्या अदमासानेंच कांहींतरी तर्क काढून बोलावयाचें, तर याचा जन्मकाल शके १५०४ म्हणण्यास तरी कोण नको म्हणणार! कारण एकनाथाच्या जांवयाच्या चाळ्याबद्दलच्या आख्यायिका प्रसिद्ध आहेत.

---

१. श्रीनाथ कृपेशी सत्पात्र । गिरजाबाई सुक्षेत्र । प्रसवली एक पुत्र । कन्या विचित्र । पैं दोघी ॥ पुत्राभिदान ठेवलें हरी । गोदुबाई ज्येष्ठ कुमरी । चिंतोपंत प्रतिष्ठान पुरी । त्याचें घरीं । ते अर्पिली ॥ कनिष्ट गंगाबाई । कर्नाटक प्रांतीं । दिधली विवाही । इ. इ. —केशवदास.

मामाजींनीं सांगितलें, 'चित्ताची चंचलता टाकून द्या. श्रीकृष्णाची मूर्ति मनांत आणून डोळ्यांपुढें धरा व तिजवर दृष्टि स्थिर करा.' हें ऐकून असा यत्न करून पाहून जांवईबोवा म्हणाले, 'हें साधत नाहीं. ती कृष्णमूर्ति मनाच्या डोळ्यापुढें ठरत नाहीं. क्षणांत ती नाहींशी होऊन तिच्या जागीं जिच्या ठिकाणीं माझें मन रमतें, अशा एका तरुणीची मूर्ति दिसूं लागते!' यावर उपाय म्हणून मग नाथांनीं सांगितलें कीं, 'हरकत नाहीं. तीच त्या बाईचीच मूर्ति मनामध्यें धरून तिजवर दृष्टि स्थिर करीत जा; आणि हा दृढ अभ्यास झाल्यावर तिलाच काल्पनिक मुकुट, भूषणें लेववा. तिच्याच गळ्यांत वैजयंती-माळा घाला. हात चार लावून त्यांत शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधें द्या, म्हणजे झालें. मनाला एके ठिकाणीं स्थिर होण्याचा दृढ परिचय झाला म्हणजे तें तुमच्या आटोक्यांत येईल.' या मंत्राचा ठोका पुढें आला आणि मग जांवई नाथांच्या येथें पुराण-भजनास नित्य येऊं लागले; व त्यांचें मन आणि शरीर नाथांच्या ठिकाणीं स्थिर झालें. इतकें होण्याला बराच काळ लोटला असला पाहिजे, हें उघड आहे. म्हणजे या वेळीं बाईचें—नाथांच्या मुलीचें—वय बरेंच असावें. नाथांच्या समाधिकालीं बाई चांगली पसतिशीच्या घरांत गेली असली पाहिजे. हें क्षणभर गृहीत केलें तर बाईला मुलगा सतरा-अठराव्या वर्षी झाला असेल, असेंहि मानण्यास हरकत नाहीं. म्हणजे १४८६-त बाईचा जन्म व १५०४-मध्यें मुक्तेश्वराचा जन्म, असें उत्तर येतें. पण इतकें सगळें गृहीत करून तर्क बांधीत बसण्यापेक्षां जन्मशक १५३१ खरा मानला तरी त्यांत कांहीं बिघडतें असें नाहीं. तेव्हां तूर्त तरी हा तर्कांचा डोलारा आपण मोडून ठेवूं; व मुक्तेश्वराचा जन्म शके १५३१-मध्यें झाला असें मानूं.

कोणत्याहि ग्रंथकाराचे ग्रंथ वाचतांना त्या ग्रंथकारासंबंधानें त्याची संस्कृति काय होती, त्याचें शिक्षण व विद्या कितपत होती, स्वभावानें तो कसा होता, त्याचें आचरण कसें असे, त्याच्या मनाचा कल कोणीकडे झुके, वगैरे माहिती मिळाली असतां त्याचे ग्रंथ चांगले उकलतात व

यांचें मर्म :चांगलें लक्षांत येतें. एखाद्यानें उगाच शब्दजाल पसरावें, ग्रंथांत मोठ्या उपदेशाच्या गोष्टी सांगाव्या, वेदांताचे आणि ब्रह्मविद्येचे पांचपंचवीस शब्द पुन्हां-पुन्हां योजावे, आणि इकडे पहावें तों संध्येचेंदेखील नांव नाहीं, तों वेदान्त आणि ब्रह्मविद्या कोठली! सदा तलफेंत गुंग आणि आचरण किळसवाणें; सर्वकाळ तमासगिरांत आणि नाटक्यांत राहून आयुष्य कंठावें; असें असलें म्हणजे त्याचे ग्रंथ आणि त्याचा उपदेश हे सगळे बिनपाण्याच्या नारळाप्रमाणें होतात. कांहीं वेळ त्याचें स्तोम माजतें पण त्याचे ते शब्द मनाला केव्हांहि आनंद देत नाहींत, किंवा त्याच्याविषयीं आदरहि वाटत नाहीं. पण ही माहिती आपल्या मराठी कवीसंबंधीं कचितच असते. किंबहुना, बहुतेकांच्या संबंधीं ती मुळींच नसते, असेंहि म्हटलें तरी वावगें होणार नाहीं; पण कवि आणि त्याचे ग्रंथ ही बिंब-प्रतिबिंबें असल्यामुळें कांहीं थोडीशी तर्क बांधण्याला जागा सांपडते.

मुक्तेश्वर हा बहुश्रुत असून मोठा चौकस असावा. त्यानें हिंदुस्थान देश स्वतः हिंडून पाहिला होता व प्रत्येक ठिकाणीं त्यानें शोधपूर्वक माहिती गोळा केली होती. द्रौपदीवस्त्रहरणांतलीं अनेक पेठांतील वस्त्रांचीं वर्णनें, त्याच्या वेळच्या फिरंगी लोकांचीं वर्णनें, त्यांचें लढायांचे विशेष प्रकार, आपला माल लोकांच्या डोळ्यांत भरण्यासाठीं

समुद्रवासीय नाना यवनीं । रत्नें वसनें अनेकवर्णी । विशाळ काचेच्या रांजणीं । सुविचित्र फळातें ॥ वगैरे युक्त्यांचीं वर्णनें वाचतानां हा कवि मोठा चाणाक्ष होता, असें वारंवार मनांत येतें. तसाच तो बुद्धिमान् असून विद्याव्यासंगी आणि चिकित्सक असावा, असेंहि दिसतें. मुक्तेश्वर

---

१. मराठी कवींचीच ही रड आहे, असें नाहीं. सर्वमान्य इंग्रजी कवि शेक्सपियर याची कहाणी तर याहून चमत्कारिक आहे. ते त्याचे ग्रंथ त्यानेंच लिहिले कीं इतर कोणीं त्याचे नांवानें लिहिले हाच वाद मुळीं अजून मिटला नाहीं. त्याच्या एवढ्या रचनेपैकीं त्याच्या हातची अशी एकहि ओळ उपलब्ध नाहीं. इतर चरित्रात्मक माहितीचीहि दुर्दशाच आहे.

हा आपल्या वाचकांना दुष्यंताबरोबर कश्यपारण्यांत नेतो व तेथें निरनिराळे महाविद्वान् तपोनिधि आपापल्या नित्य-नैमित्तिकांत नदीतटाकीं गढून राहिलेले दाखवितो. कोणी मंत्रोपासक सांग उपासना करितांना दाखवितो, कोणाचें सामगायन ऐकवितो, तसेंच कोणाचे वेदपठनाचे घोष चालले असतानां, 'भाष्यकार। 'अर्थानुष्ठान थोर। वृथा पठणाची करकर। कंठशोषणा वाउगी॥' असें त्याच्या घोकंपट्टीसंबंधें विनोदानें म्हणतात तें ऐकवितो, चार्वाकांचें 'शरिरात्मा। एक प्रत्यक्ष प्रमाण प्रतिमा' हें स्पष्ट मत व त्यावर मुरारिभट्ट-प्रभाकरादि मीमांसकांचें 'कर्मचि मुख्य आचरिजे' हें आग्रहाचें सांगणें, आणि नैयायिकांचें 'कर्ता ईश्वर एक। कारणभूत जगातें' हें उत्तर, तसेंच सांख्यांचें 'आदिकारण पुरुष प्रकृति। त्यापासोनि जगदुत्पत्ति' हें तत्त्व, आणि या सर्वांचे बुद्धिवाद तो ऐकवितो, व 'परिणामवाद विवर्तवाद। बिंबप्रतिबिंब जीवेश्वरवाद। अन्वय-व्यतिरेकाचे शब्द।' वाचकांच्या कानावर घालतो तेव्हां याला या विषयांचें ज्ञान किंवा निदान या निरनिराळ्या कुशाग्रबुद्धीच्या विचारवंत मतवाल्यांच्या ग्रंथांचा सहवास बराच घडलेला असावा, असें निःसंशय वाटतें. प्रभातकाळाचें चित्र काढतांना त्यांत शाक्त, सौर, गाणपत्य, अग्निहोत्री, आदिकरून ईश्वरपरायण साधुलोक नित्यकर्म आचरितांना दाखविण्याचें विसरत नाहीं. तेव्हां तर हा पवित्र नदीच्या कांठीं राहिलेला असावा व यानें हें सर्व प्रत्यक्ष पाहिलें असावें, असें आपलें मन सांगूं लागतें. नाथांचा पुत्र हरिपंडित हा मोठा कर्मनिष्ठ कडकडीत ब्राह्मण होता; व त्याचा विद्याभ्यास तत्कालीन सर्व ब्रह्मविद्येचें केवळ आदिपीठ असें जें काशीक्षेत्र येथें राहून चालला होता हें मनांत आणिलें, म्हणजे रामायणांतें मी द्विजवर मुद्गलकवि 'सुचिर सहजवासें गौतमीच्या तटाकीं। अतुलभजन-पंथें पंथ टाकीत टाकी' असें यानें सांगितल्याची त्याच वेळीं आठवण होऊन या दोहोंची संगति उत्तम लक्षांत येते; आणि हे मामाभाचे एकाच वेळीं एके ठिकाणीं राहून

---

१. युद्धकांड.

कालक्रमणा करीत काशिवासाचें सुख भोगीत आहेत, असें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें.

पण याचा हा काशिवास मनांत पटून बिंबून गेल्यावर याच्या ग्रंथांत यानें सैरंध्रीला पाहून कीचकानें केलेली कृति, शुकाचें विषयविडंबन, इंद्रानें मेनकेला विश्वामित्राला कुमार्गप्रवृत्त करण्याकरितां शिकविलेली युक्ति, जरत्कारूनें केलेलें विषयी पुरुषांचें वर्णन हीं सागतांना यानें योजिलेलीं वाक्यें पाहून हे राजश्री काशींत अभ्यासाशिवाय दुसरेहि कांहीं ढंग करीत असावे, असेंहि वाटतें. शर्मिष्ठेनें नदीमध्यें अंग धुतल्यावर ती वस्त्र गुंडाळीत असतां वाऱ्यानें तें उडून गेल्यामुळें तें सावरतानां वर्णन केलेली शर्मिष्ठेची तारांबळ वाचून आणि—

हे संसारिक जना । सुप्रिय विषयाची वासना ।
निःशेष देखतां अंतःकरणा । अभिलाष उपजे सर्वांतें ॥
तैसींच पुरुषांचींही मनें । सुंदर परस्त्री अवलोकनें ।
देखतांक्षणीं तत्क्षणें । मनें भोगोनि जाइजे ॥
माता, कन्या अथवा भगिनी । त्यांचें मैथुनीं अंतःकरणीं ।
न स्मरे, ऐसा न दिसे कोणी । तो अव्यभिचारी मनाचा ॥

हे त्याचे मनोमय सिद्धान्त डोळ्यांपुढें आले म्हणजे नदीवर स्नान करितांना याची जिव्हा गंगास्तोत्र उच्चारीत असेल, पण याचे डोळेदेखील कांहीं रिकामे बसले नसतील, असें वाटूं लागतें. आणि एकदा मुक्तेश्वराच्या वागणुकीबद्दल मनाचा कल असा वळूं लागला म्हणजे परक्याच्या घरीं जाऊन तो घरांत नसतांना त्याच्या सुंदर अ याज साध्याभोळ्या कुमारिका मुलीजवळ दुष्यंतानें —

मद्रेत-स्वात्योदकाची वृष्टी । धरी गुह्यांगशुक्ति-संपुटीं ।
रत्न निपजेल जें का सृष्टी । मोलागळें त्रैलोकीं ॥

असा तिचें मन वळवितानां केलेला चारगटपणा ऐकून मन या बुवांचे चाळे अमजावूं लागतें. आणि मनांत हे विचार चालू असतां भरल्या पंक्तींत जेवतांना रूपवती द्रौपदी हातीं ताट घेऊन वाढीत

असतां 'सहस्र पदार्थ सहस्रजणीं । मागितले एकेच क्षणीं' आणि त्या बिचारीची धांदल उडवून देऊन 'कोणीं भक्ष्य, कोणीं भोज्य । कोणीं दुग्ध । कोणीं आज्य' मागत सुटून 'म्हणती, वहिनी, हें काज । तुमचें नोव्हे वाढावया' आणि शेवटीं ते निर्लज्ज बेशरमपणानें म्हणतात—

'एक कुंजर एका रुखा । झगडतां थरकती सकळ शाखा ।
पंच कुंजर भिडतां देखा । ठाव नुरे कर्दळिचा ॥'

अशासारखी तुमची गत झाल्यामुळें

'आज तुमचे हातीं । एकादशी आमुते ॥'

हें असलें किळसवाणें वर्णन आणि तें धर्मराजाच्या राजसूय यज्ञानंतरच्या भोजनपंक्तींत, प्रत्यक्ष श्रीकृष्ण तेथें वाढीत असतांच्या वेळचें, मुळांत व्यासभारतांत आधार नसतांना केलेलें पाहून मुक्तेश्वराच्या मनाची चांगलीच अटकळ होते आणि या असल्या वर्णनाचे गोडवे गाणारे मुक्तेश्वराचे वाचक, कोणी भोळे हरिभक्तपरायण मुक्त असले पाहिजेत किंवा ज्यांना वर्ज्यावर्ज्य नाहीं, काळवेळ नाहीं असले विषयी तरी असले पाहिजेत, असे दोनच तर्क संभवतात. बाकी खरे हरिभक्तिपरायण मुक्त मनाचे विरळाच असणार, हें उघड आहे. कदाचित् हे मनाचे असले अंकुर मुक्तेश्वरामध्यें आनुवंशिकहि असतील, असें त्याच्या बापासंबंधींच्या आख्यायिकेवरून आणि त्याच्या पणतवाला दिलेल्या कोल्हापूरकरांच्या सनदेंत उल्लेखिलेल्या गानकलेंतील नैपुण्यावरून सहज मनांत येतें. याबद्दल याला दोष देण्याचेंहि विशेष कारण नाहीं. कालिदास-शेक्सपियरसारख्यांच्या काव्यांतहि असले प्रकार आढळतात. मोरोपंतांसारखा कुटुंबवत्सल मंडळींत शिष्टतेनें वागणाराहि कवि एखादे वेळीं असले शब्द उच्चारितो. वामन-पंडित तर सीमाच करितो. इतरहि अनेक कवींच्या काव्यांत हे प्रकार अधून-मधून नजरेस पडतात. आजन्म ब्रह्मचारी ज्ञानेश्वरसुद्धां ज्ञानेश्वरींत

'जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे। मग दारहि चेपूं नये तियेचें'

किंवा

'खरी टेकों नेदी उडे। लाथौनि फोडी नाकाडें। तऱ्हीं जेंवी न काढें। माघौता खरा ॥'

असलीं उदाहरणें देतो आणि 'अमृतानुभवा'सारख्या ग्रंथांतहि मायेच्या कृत्रिमपणाचा 'उठणें कीं पडणें। कुच भाराचें कोणे जाणे' असला दाखला देतो, तेथें मुक्तेश्वराचें मोठेंसें काय आहे! आणि शिवाय हे वरील विचार निव्वळ ग्रंथवर्णनावरून काढलेले तर्क आहेत. हे तथ्यच असतील, असें थोडेंच आहे! 'जे देखों न शके रवि। तें देखे कवि' असेंहि असेल. हेंहि मनांत येतें. तरी-पण हीं असलींच वर्णनें मुक्तेश्वरापासून उसनीं घेतलीं असतांहि श्रीधरस्वामींचे ग्रंथ नित्य भक्तिभावानें घरोघर वाचले जातात, आणि मुक्तेश्वराच्या भारताचें एकाहि ठिकाणीं 'पारायण' झालेलें कां ऐकूं येत नाहीं, हा प्रश्न मनांत घोळत राहतोच.

काशी किंवा पैठण दोन्ही ठिकाणें विद्येचीं माहेरघरेंच होतीं; आणि या दोहोंपैकीं कोठेंहि राहत असला तरी तेथें मुक्तेश्वरानें आपल्या पोथ्या-पुस्तकांवर नुसत्या अक्षता न टाकतां त्यांचा नीट उपयोग केलेला दिसतो. याचा थोडासा पुरावा मागें आलाच आहे. याच्या सुरुवातीच्या रचनेंतहि याचा पुरावा नजरेस येतोच. कवि नवीन कविता करूं लागला म्हणजे शब्दालंकारांकडे किंवा कांहीं चमत्कृति करण्याकडे त्याच्या लेखणीचा ओढा फार असतो.

पवित्र शीतल जळ माथां मंदाकिनी। कंठीं धरियेला वन्ही। नवल काय।
गरुडारूढ मधुसूदन। हृदयीं वसिजे पूर्ण। कंठीं सर्पाभरण। नवल काय।
सिंहावरी वोळंगत। अंकीं गिरिजा स्वस्थ। मारिला कुंजरदैत्य। नवल काय।
अहो लीलाविश्वंभरा। कृपामूर्ति जगदोद्धारा। तारिसी मुक्तेश्वरा। नवल काय।

अशासारख्या पदांत ही चमत्कृतीची हौस दिसून येते. पदांत आणि आरत्यांतच काय, पण रामायणासारख्या ग्रंथांतदेखील कवीची शब्द-चमत्काराची हौस ठिकठिकाणीं नजरेस पडते. पण एका दृष्टीनें पदांपेक्षां

आणि आरत्यांपेक्षां ‘ रामायण ’ जरा विशेष महत्त्वाचें आहे. यांत त्याचा संस्कृत कवींच्या कृतींशीं चांगला परिचय असून त्यानें त्यांचा अभ्यास मनापासून पद्धतशीर केला होता, असें स्पष्ट होतें. ‘ एक एक अक्षराची भीक ’ मीं जीर्णकवींजवळ मागितली, असे पुढें भारतांत विनयानें काढलेले उद्गार रामायणरचनाकाळीं सत्य व सार्थ होते. संस्कृत कवींच्या गोड कल्पना, त्यांचे सुंदर श्लोक, त्यांचे गोंडस शब्द हे काळजीपूर्वक वेचून यानें आपल्या कृतींत ओवून टाकिले आहेत.

रामायण हें काव्य यानें प्रथम रचिलें असावें. एवढेंच याचें संपूर्ण असें उपलब्ध काव्य आहे. याची ग्रंथसंख्या १७२५ असून याची रचना अनेक-वृत्तात्मक आहे. याला हा ‘ संक्षेप-रामायण ’ असें नांव देतो. यांत यानें जयदेवाचें ‘ प्रसन्नराघव ’, भर्तृहरीचीं ‘ शतकें ’, जगन्नाथाचा ‘ भामिनीविलास ’, कालिदासाचा ‘ कुमारसंभव ’, वगैरे चांगल्या-चांगल्या संस्कृत कवींच्या ग्रंथांतील श्लोकांचें भाषांतर करून आपल्या कथानकांत गोवून दिलें आहे. साऱ्या कल्पना व नित्यांतले दाखलेदेखील यानें पुरातन कवींच्या शब्दांनीं सांगितलेले दिसतात. कोणाचीहि घाटावरची लाडावलेली मुलगी खालीं कोंकणांत सासरीं जाऊं लागली म्हणजे ते उंच-उंच डोंगर, नद्या आणि समुद्र पाहून माझ्या आणि माझ्या आवडीच्या माणसांत हे केवढाले अडथळे, ही कल्पना नेहमीं येते. मी जरा नजरे-आड झालें तर ज्यांनीं हाका मार-मारून पुरे करावें, त्यांच्या आणि माझ्या-मध्यें आतां हे केवढाले पर्वत, हीच कल्पना

‘ हारो नारोपितः कण्ठे मया विरहभीरुणा । इदानीमन्तरे जाताः सरित्सागरपर्वताः ॥’

या संस्कृत श्लोकांत आहे आणि याच श्लोकाचें मराठींत

रघुपति तुज प्रेमें क्षेम देतां विनोदें ।
जंव किं निकरिं वैरी हार फेडी विषादें ॥
गिरि, सरि, तरु आतां मंडलें आड ठेलीं ।
म्हणवुनि बहुशोकें जानकी साद घाली ॥

हें भाषांतर अगदींच साधारण आहे. इतर अनेक श्लोकांचींहि यानें केलेलीं मराठी रूपांतरें कांहीं फारशीं चांगलीं नाहींत. स्वतःची कल्पना स्वतःच्या शब्दांत सांगणें निराळें आणि दुसऱ्याचें भाषांतर करणें निराळें. भाषांतराला भाषेवर पगडा चांगला असावा लागतो. तो तितका मुक्तेश्वराचा निदान या वेळीं तरी नव्हता. भारती पर्वांच्या लेखकाची लेखणी या रामायणांत दिसत नाहीं. पण एक गोष्ट मात्र अभिनंदनीय वाटते. आणि ती ही कीं, संस्कृतांतले चांगले श्लोक आपण मराठी पेहरावांत आपल्या बंधूंना दाखवावे, ही हाव मुक्तेश्वराला होती. म्हणजे केवळ धार्मिक दृष्टीनेंच मराठींत ग्रंथरचना न करितां ललितवाङ्मय मराठींत निर्माण करण्याकडे मुक्तेश्वराच्या मनाचा ओढा दिसतो; पण त्या सुंदर श्लोकांतल्या कल्पना मराठी शब्दांनीं संस्कृत छंदांच्या साच्यांत बसविण्याची करामत याला नीटशी साधली नाहीं. व्याकरणाचे नियम, शब्दांची ओढाताण, यमकें यांनीं हा नवा कवि गांगरून गेलेला दिसतो; आणि तो इतका कीं, एकदा हें हातीं घेतलेलें रामायण मेटाकुटीनें पल्ल्यास पोहोंचविल्यावर पुनश्च तो या भिकार भानगडींत पडला नाहीं. अर्थाची किंवा रसाची हानि होऊं न देतां छंद, यमक, अनुप्रास हीं साध्या शब्दांनीं सहज साधतां आलीं तर ती पाकनिष्पत्ति मोठ्या बहारीची वाटते. पण हें वकूब ज्याच्या अंगांत नाहीं त्याची पाकनिष्पत्ति बेचव आणि मिळमिळीत लागते. मुक्तेश्वराच्या रामायणाची गत थोडीशी अशीच आहे. हें महाभारतकर्त्या मुक्तेश्वराच्या कीर्तीला शोभण्यासारखें काव्य नाहीं. हें काव्य प्रथम युद्धकांडापर्यंतच लिहून पुरें केलें असावें, असें युद्धकांडाच्या शेवटील पद्यांवरून होतें. यास त्यानें 'संक्षेप रामायण' असें नांव दिलें असावें व पुढें यानें किंवा दुसऱ्या कोणीं आणखी उत्तरकांडाची भर घालून हें संपूर्ण रामायण केलें. या रामायणाची रचना इतर कृतींच्या मानानें बरीच नीरस व बोजड झाली आहे.

रामायणाप्रमाणेंच, हरिश्चंद्राख्यान, शुकरंभासंवाद, गरुडगर्वपरिहार,

कालियमर्दन, अहिमहिआख्यान हीं यानें लिहिलेलीं आख्यानें उपलब्ध आहेत. यांपैकीं कालियमर्दन व अहिमहिआख्यान या दोहोंत एकंदर कथाभाग ओवीबद्ध असून अधून-मधून कांहीं ठिकाणीं श्लोक योजिले आहेत. श्लोक अगदीं साधारणच आहेत. कदाचित् हीं किंवा यांपैकीं कांहीं आख्यानें रामायणानंतरची व भारतापूर्वीची असावीं. यांत रामायणांतल्या श्लोकांचा जाडेभरडेपणा व भारतांतल्या सुंदर कल्पनांचा मृदुपणा हीं दोन्ही पाहण्यास सांपडतात. याशिवाय त्याची श्रीतुळशी, पांडुरंग, दत्तात्रेय वगैरेंची स्तवनें, ज्ञानेश्वर, एकनाथ वगैरेंच्या आरत्या व अभंग आणि पदें अशी लहानसहान रचना उपलब्ध आहे. वरील आख्यानें भारत-भागवतांत आहेत, व तीं मुक्तेश्वरानें तेथूनच घेतलीं असावीं. असें समजून यानें साग्र भारत व भागवत लिहिलें असावें, असा महाराष्ट्रांत फार दिवसांचा समज आहे. पण खरी स्थिति अशी आहे कीं, यानें हीं आख्यानें वरील दोन्ही ग्रंथांवरून न घेतां इतर ठिकाणांवरून घेतलीं आहेत.

हीं लहानसहान आख्यानें, उपाख्यानें, तसेंच अभंग व पदें हे सर्व त्याच्या रचनेचे अगदीं लहान-लहान नमुने आहेत. पण यांतहि एका तऱ्हेचें त्याचें कौशल्य व त्याची धाटणी दिसून येते. यांपैकीं एक पद पुढें देतों—

पवित्र शीतळ जल माथां मंदाकिनी । कंठीं धरियला वन्ही । नवल काय!
गरुडारूढ मधुसूदन, हृदयीं वसे पूर्ण । कंठीं सर्पाभरण । नवल काय !
सिंहावरी वोळंगत, अंकीं गिरजा स्वस्थ । मारिला कुंजर दैत्य । नवल काय!
अहो लीलाविश्वंभरा । कृपामूर्ती जगदोद्धारा । तारिसी मुक्तेश्वरा । नवल काय !

याचे पुष्कळ अभंगहि असेच चमत्कृतिजनक आहेत. यांपैकीं

१. अहिमहि-आख्यानांत कवि शेवटीं लिहितो, ' इतुकी जाली दंतकथा । श्रोतीं अपेक्षिला वक्ता । काव्यामाजीं नसतां । कोठील कथा कळेना ।। साच न मानी ज्याचें मन । तेणें पहावें अग्निपुराण । श्रोतीं व्हावें सावधान । मुक्तेश्वर कवि वदे ।।

कोणती रचना प्रथमची व कोणती मागाहूनची, हें कोणालाच सांगता येणार नाहीं'.

या लहानसहान आख्यानांच्या रचनाकालीं व रामायणाच्या रचनाकालीं मुक्तेश्वराची ही वाग्वधू अगदींच नवोढा असून आपल्या कीर्तिमंदिराच्या द्वारांत ती प्रथमच प्रवेश करण्यास सिद्ध झाली होती. तिच्या हृदयाचा कंपदेखील अजून थांबला नव्हता, व लज्जेचें आणि भीतीचें पांघरूण दूर सारून मोकळ्या मनानें आनंदक्रीडा करण्याचा तिला परिचय नव्हता. मनांत आलें तरी फार आवरून बोले. पण थोड्या काळानें आत्मप्रत्यय आल्यावर आणि अंगांत स्फूर्तीचा फुंद चढल्यावर गर्भश्रीमंत घरधनिणीप्रमाणें आपल्याच डौलांत स्वैरसंचार करून ती आपल्याच तोऱ्यांत बोलूं लागली म्हणजे आकाशींच्या विजलीप्रमाणें चमकूं लागते व आपल्या गोड शब्दानें कोकिळेसहि लाजवून टाकिते. पाहणाराला ती अगदीं मोहून वेडावून सोडिते, व हिचें तें झगझगीत

---

१. मुक्तेश्वराच्या कोणत्याहि पोथींत तिचा रचनाकाळ प्राय: आढळत नाहीं; पण महाभारताच्या एका पोथींत रचनाकाल दिलेला मला आढळला. ही पोथी सभापर्वाची आहे. या पोथींतील ओव्यांचा अनुक्रम सर्व पर्वंभर चालूच ठेविला आहे. यांत शेवटल्या अध्यायांतली २७९१ वी ओवी पुढीलप्रमाणें आहे.

ना संवत्सर आषाढमासीं । नवार द्वितीयेचे दिवशीं ।
आली पूर्णता ग्रंथासी । काश परियेसिजे ।। २७९१ ।।

दुर्दैवानें संवत्सराचें नांव व वाराचें नांव या दोन्ही ठिकाणीं कसरीनें पोथी खाल्लेली आहे. पण संवत्सर दोन-अक्षरी असून ( अधिक अक्षरें मावण्यास जागा नाहीं यावरून ) आकारान्त असावा व वार सोम किंवा भौम असावा. फार तर कदाचित् शनिवार असूं शकेल, पण हा संभव कमी. यावरून मीं वरील विधान केलें आहे. शके १६१८ व १५५७ या दोन शकांचा मेळ तिथीशीं बसतो. इतर प्रमाणांवरून शके १५५७ आषाढ व॥ २ सोमवार हा दिवस सभापर्वाचा समाप्तिकाल म्हणून मानणें मला ग्राह्य वाटतें. शके १६०६-मध्यें समाधिस्थ झालेल्या रंगनाथ निगडीकरानें आपल्या संतमालिकेंत मुक्तेश्वराला नमन केलें आहे.

सौंदर्य पाहून ही ब्रह्मदेवानें अमृतवेळा पाहूनच घडविली असावी, असें कोणाच्याहि सहज मनांत येतें.

आपल्याकडे वाचल्या जाणाऱ्या मराठी महाभारतांत सर्वांत जुनें असें महाभारत मुक्तेश्वराचेंच उपलब्ध आहे. मुक्तेश्वरापूर्वीचें असें नामाविष्णुदासाचें महाभारत उपलब्ध आहे; पण तें आपल्या इकडे वाचण्याचा प्रघात नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं, नामाविष्णुदास हा भारत-रचनेनंतर महानुभाव-पंथांत गेला, त्यामुळें त्याचा ग्रंथ लोकांच्या अनादरास पात्र झाला. नामविष्णुदासाशिवाय आणखीहि कित्येक भारत-ग्रंथ मुक्तेश्वराचे वेळीं वाचिले जात होते, असें मुक्तेश्वरी भारतांतल्या उल्लेखांवरून होतें.[२] मूळ व्यासकथेला सोडून अन्य तऱ्हेनें जेथें इतर कोणीं कथाभाग वर्णन केलेला आढळला तेथें-तेथें तसा उल्लेख करून त्याबद्दल मुक्तेश्वरानें आपल्या ग्रंथांत असें करणारांस शब्द लाविला आहे. यावरून मुक्तेश्वरानें आपल्या काळीं उपलब्ध असलेल्या प्राकृतकथा नीट लक्षपूर्वक वाचिल्या होत्या, असें दिसतें. इतकेंच नव्हे, तर कथाभाग सांगतांना व्यासांची संगति जेथें

---

१. नामा विष्णुदासाच्या साग्र भारताच्या मीं अनेक प्रती पाहिल्या आहेत. त्यांत गणपति वगैरे देवतांना नमन आहे; पण महानुभाव-पंथांतील चक्रधर वगैरेंना नमन नाहीं. यावरून हा त्या पंथांत जाण्यांपूर्वीच त्यानें महाभारत लिहिलें असावें, असें दिसतें; व मग त्या पंथांत शिरल्यावर त्या ग्रंथांत बरेच फेरबदल करून कांहीं नवे कथाभागहि घातले असावे.

२ प्राकृत कवींचा वाग्जल्प। तैल कढईंत पाहुनि रूप। फिरतां मत्स्य सकंप। वामनेत्रीं विंधिला ।। परी तें मूळ भारतीं नाहीं। म्हणूनचि असो न बोलों कांहीं। नळिकां छिद्रांतून पाहीं। यंत्र भेदोनि पाडिलें ।। तसेंच जरासंधवधाचे वेळीं—कथा बोलती ग्रंथांतरीं। संकेत दाविला मुरारी। खर्जूरीपर्ण धरूनि करीं। मध्यभागीं चिरियेलें ।। सव्य अपसव्य सांडितां करें। मग न जडतीच परस्परें। परी हें व्यास ऋषीश्वरें। कथिलें नाहीं भारतीं ।। आणि स्थालीपाककथेंत, बोल बोलती सर्वत्र। सूर्यें दिधलें थालीपात्र। परि तें व्यासाचें वस्त्र। बोललें नाहीं भारतीं ।।

नीट जुळली नाहीं असें त्यास दिसलें तेथें त्या कथासम्राटास दोष देण्यासहि कमी केलें नाहीं.

सगुण सुभद्रा यादवी । द्वारके धाडिली स्नेहभावीं । सांगों विसरला व्यासकवी । परी म्यां स्मरण दीधलें ।।

असें मुक्तेश्वर सभापर्वांतल्या आपल्या आख्यानांत सांगतो. ही असली धिटाई मुक्तेश्वराशिवाय दुसऱ्या कोणींहि केलेली दिसत नाहीं. हें असें आहे, तरी व्यासाचें थोरपण व आपण केवळ त्याचीच कथा उसनी घेऊन सांगत आहों, असें वर्णन मुक्तेश्वरानें अनेक वेळीं गाइलें आहे. आणि हें असें न म्हणून चालेलच कसें ! जेथें त्या महर्षीच्या उच्छिष्टाचा प्रसाद सर्व जगतानें सेवन केला तेथें मुक्तेश्वराचा काय पाड !

'व्यास वाढितां जगातें । ग्रास लाधला जीर्ण कवीतें । त्यांचे मुखींचीं उच्छिष्ट शितें । म्यां दुर्बळें वेचिलीं'।।

हें कबूल करणें या बापुड्याला भाग आहे व तें त्यानें कबूल केलें आहे.

व्यास ग्रंथगिरीचें सोनें । संस्कृत, खोटिये गाळुनि मनें । देशभाषा घडिलें लेणें । साहित्य रत्नीं सुजडित ।।

हें सांगून मुक्तेश्वर मोठ्या अभिमानानें सुचवितो कीं, व्यासाचें भारत ही एक सोन्याची रास, इतकेंच नव्हे तर तो ग्रंथ सोन्याचा एक डोंगर आहे हें खरें, पण नुसतें सोनें काय होय !! तें सोनें आपल्या मनोमय मुशींत गाळून त्याचे या देशाला आवडतील असे गोड अलंकार मीं तयार केले, आणि त्यांवर रत्नांचें सुंदर जडाव-काम करून त्यांचीं तीं कर्णभूषणें तुम्हांला लेवविलीं. आणि ही सात्त्विक अभिमानाची गर्वोक्ति थोडीशी खरीहि आहे. आपल्या कथेला रंग येण्यासाठीं, आणि ती वाचून आपल्या देशबांधवांना आनंदाचे ढेकर यावे यासाठीं मुक्तेश्वरानें अनेक ठिकाणीं पदरचीं वर्णनें ठेवून दिलीं आहेत. राजसूय यज्ञांत पंक्तींत आग्रहावरून वाढण्याच्या धांदलींत द्रौपदीच्या कंचुकीचें बिरडें निसुटलें असतां टवाळांच्या पुढें तिच्यावर प्रसंग गुदरला, त्या वेळीं कृष्णानें

चटकन् तिची लाज राखिली हा प्रसंग मुळांत नसतां मुक्तेश्वरानें मोठ्या बहारीनें सांगितला आहे. व्यासकथेला सोडल्याबद्दल "सांडूनि व्यासाची संगती। चालों नये इतर पंथीं" असा प्राकृत कवींना दोष दिल्याचें विसरून जाऊन "जेणें वाढे उत्कट भक्ती। तो तो विशेष" ग्रंथांत लिहिला आहे. 'एक एक अक्षराची भीक। जीर्ण कवीतें मागोनि देख' मी सर्वज्ञ असा कविनायक झालों, असें हा म्हणतो. म्हणजे सुंदर कल्पना, गोंडस शब्द, हृदयंगम अलंकार जें जें याला कोठें आढळलें तें तें वेचून यानें आपल्या काव्यांत गोवून टाकिलें. पण हें गोवणें इतकें बेमालूम साधलें आहे कीं, यांत विरजलेल्या दह्याच्या विरजणाप्रमाणें बाहेरचे विरजणथेंब कोणते हें ओळखतां येणें अशक्य झालें आहे. निरनिराळ्या एकेका फुलांतून मधमाशीनें एक-एक कण (थेंब) आणावा व तो एक ठिकाणीं पोळ्यांत साठवून मधाचें उत्तम मोहोळ तयार करावें, आणि मग जसा कोणता कण कोणत्या फुलांतला हें ब्रह्मदेवालाहि उमगणार नाहीं तीच अवस्था मुक्तेश्वरानें आणिलेल्या शब्दांची आणि कल्पनांची त्याच्या या काव्यमोहोळांत झाली आहे. यांतील गोड मधाचा आस्वाद घेतांना हे कण दुसऱ्या कोठून असे आणिले असतील ही कल्पनाहि येण्यास वाव राहिला नाहीं. याची ही वाग्वल्लरी, विश्वेश्वरकृपासलिलानें ओलावून हिला स्फूर्तीचे पल्लव फुटले व शब्दसुमनांचे फुलोरे आले म्हणजे त्यांतील परागांनीं सर्व वाचक आणि श्रोते वगैरे 'चतुर चंचरिकांची मांदी। सेवितां माते ब्रह्मानंदीं। 'साधु साधु' इहीं शब्दीं। गुंजारवें गर्जते' व त्या 'शब्द-मोतियांचा चारा चरत,' तेथेंच गुंगून राहतात; आणि मग हाहि थोडासा नादावून जातो व मन मानेल तसा वागूं लागतो.

व्याख्यानाच्या भरांत आल्यावर एकदा कथेला रंग चढला म्हणजे मुक्तेश्वराची वाग्देवी, व्यासऋषीचा आश्रय सोडून पाहिजे तिकडे सैरावैरा वागूं लागते. किंबहुना, मर्यादाबंधनाचें उल्लंघन करून ती आपल्याच तोऱ्यांत धुंद होऊन नर्तन करूं लागली, म्हणजेच तिच्या स्वरूपाची धाटी खुलूं लागते, व मग तिच्या त्या लीलेनें कोणीहि सहृदय

वाचक डोलूं लागतो.

मुक्तेश्वराचीं सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें व कोणत्याहि मनोविकारांचीं हावभावांसह यानें रेखाटलेलीं शब्दचित्रें फारच मनोवेधक आहेत. याच्या वाणीचा मोह असा आहे कीं, हा बोलूं लागला म्हणजे श्रोता स्वतःला विसरून जाऊन यानें वर्णिलेल्या प्रसंगाशीं व दाखविलेल्या चित्राशीं तादात्म्य पावतो. याच्या शब्दचित्राला रूप येतें, आणि त्यांत जणों चेतनाच भरली आहे असें होऊन सर्व देखावा मनाच्या डोळ्यांपुढें स्पष्ट दिसूं लागतो. शृंगाररस तर हा वाटेल तेथें वेळीं-अवेळीं[1] भरून देतोच; पण माया, मोह, क्षोभ, राग वगैरे भावविभावांनाहि हा रूप देऊन ते पुढें उभे करितो. पापबुद्धि दुर्योधनानें भर सभेंत आपली मांडी उघडी करून 'येऊनि बैसे मांडीवरी। होई अंतुरी पट्टाची' असें म्हटल्याबरोबर दुःखातिशयानें गांगरून गेलेली आणि आपल्या अधोवदनानें भूलिंगावर अश्रुधारा धरणारी द्रौपदी डंवचलेल्या सर्पाप्रमाणें एकदम उसळते व आकाशींची वीज कडकडावी त्याप्रमाणें होऊन ते

"पापशब्द पडतां कानीं। हृदयीं धडकला क्रोधवन्ही।
म्हणे दुरात्मिया तुझी वाणी। जळो भस्म हो रे पापिष्ठा ॥
प्रळयवीज माथां पडो। नेत्र फुटोनि जिव्हा झडो।
कायेपासूनि प्राण विघडो। तात्कालिक पैं तूझा ॥
जे भीमाकरी केळवली। गदा नोवरी सगुणाथिली।
वाग्निश्चयें तुज नेमिली। गोत्र घटित निर्धारें ॥

---

१. अवेळीं म्हणण्याचें कारण पुढीलसारखीं ठिकाणें होत-
पांडवप्रताप पुरुष तरणा। नववधू कौरवसेना।
शृंगारिली परिसंघट्टना। युद्धमुरता न धारवे ॥
गळालें अभिमानाचें वास। धैर्याचे मोकळे केस।
रणशय्यासनीं त्रास। मानोनिया पळाली ॥
कर्ण सैंधव पयोधर पीन। मर्दितां झालें आरक्तवर्ण।
शकुनि कंचुकी आवर्ण। पडिलें कोठें नेणवे ॥
शस्त्रधारा तीक्ष्ण दातीं। चुंबितां मुख आंतले क्षिती।
झाली रुपाची उपहती। कौरव-सेनावधूची ॥

बोहिलें योजिलें रणतळवट । आयुष्यावधीचा अंत्रपाट ।
हातें साहूनि बळ वरिष्ठ । लग्न लावील खड्गहस्तें ॥
रक्तहरिद्रा तनुलेपनीं । माथां अक्षता पायपिटणीं ।
स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी ॥
ते गदा घेवोनि मांडियेवरी । रणमंचकीं निद्रा करी ।
प्राण पारिखे दवडूनि दुरी । मग एकांतीं पहुडिजे ॥"

हें याचें रुद्ररसाचें चित्र झालें. यांतील कवित्व व आवेश पाहून मन स्तब्ध होतें. असेंच दुष्यंत-आख्यानांत शकुंतला हस्तिनापुरांत गेली असतां दुष्यंत राजा तिचा अंगीकार करीना, तेव्हांचें तिचें क्रोधाचें भाषणहि सरस आहे. पण यापेक्षां तें फार मर्यादेचें आहे. अखेर पुन्हां दुष्यंत तिला, तूं भ्रष्ट झालेल्या विश्वामित्राची कन्या, तुझी आई मेनका हीहि तसलीच; आणि 'म्हणोनि खाण तैशी माती' असे अपशब्द बोलला. इतका वेळ शकुंतलेनें सर्व सहन केलें; पण ज्याच्यावर आपली सगळी भिस्त, ज्याच्या शब्दावर विश्वास ठेवून आपला देहदेखील कोणाला न विचारितां ज्यास अर्पण केला तोच असें बोलूं लागला, हें तिच्यानें सहन होईना. विशेषत: जेव्हां हा राजा आपल्या प्रत्यक्ष आईबापांनादेखील आपल्या समक्ष असे शब्द लावतो असें ऐकलें, तेव्हां तिनें रागाच्या आवेशांत दिलेलें उत्तरहि फार चांगलें साधलें आहे. हीं दोन्ही क्रोधाचीं चित्रें आहेत. भय आणि करुणा यांचीं चित्रेंहि मुक्तेश्वर अशींच रेखाटतो. खालील उतारा कांहीं मुक्तेश्वराच्या उत्तमांपैकीं नाहीं; तरी त्यांतहि त्याचें कवित्व आणि चातुर्य नजरेस पडेल. मंदपाल ऋषीनें आपणाला संतति व्हावी, या इच्छेनें पुष्कळ संतति ज्यास होते अशा पक्षिकुळांत जाऊन, जरिता नांवाच्या पक्षिणीशीं विवाह केला. थोड्याच अवधींत तिला चार पिलें झालीं; पण तीं अगदीं लहान आहेत व त्यांना पुरे पांखहि फुटले नाहींत, तोंच खांडववनदहनास सुरुवात झाली. संसारांत काल सदा सर्व-काळ सारखाच येतो, असें नाहीं.

'अभाग्य–भाग्याचीं आभाळें । येतीं जातीं आपुल्या काळें ।
निश्चयाच्या ध्रुवें अचळें । चळत्व सर्वथा न पाविजे ॥'

पण असें न होतां मंदपाल आपल्या स्त्रीपुत्रांस तेथेंच सोडून निघून गेला. इकडे मागें सर्वभर वणवा पेटला.

वृक्ष भक्षितु कडकडाटें । जीव जाळीतु धडधडाटें ।
निकट येतां हव्यवाटे । जरिता मोहें जाकळे ॥
'पक्षहीन कोमल बाळीं । उडों न शकतीं अंतराळीं ।
पुत्र कवळोनि हृदयकमळीं । काळानळीं प्रवेशे ॥
या अनिवार हुताशना । वारूनि कवण रक्षील प्राणा ।
काय करूं नारायणा । जीवदान तूं देईं ॥'
पुत्र म्हणती, 'ऐक माते । उड्डाण करोनि गगनपंथें ।
तूं जाईं मंदपाल जेथें । स्नेह चित्तें सांडोनि ॥
वोढविल्या एकत्र मरणु । उरे तेणें उरविजे प्राणु ।
मोहें अंगिकारितां निधनु । आत्मघातु बोलिजे ॥
पक्षहीनें, चक्षुहीनें । आम्ही सांडवलों सर्व यत्नें ।
आम्हांलागीं प्राण देणें । हा अविवेक सर्वथा ॥
तूं तरुण रूपवंती । प्रीती वसतां पतिसंगातीं ।
अपार लाधेल संतती । आम्हांहूनी विशेष.' ॥
माता बोले रुदित-मुखीं । 'तुम्हां ओपोनियां पावकीं ।
म्यां राहोनि मृत्युलोकीं । किती काळ वांचणें! ॥
तुमच्या वियोगाचें दुःख । देह असिजे तों करणें शोक ।
पुढतीं विश्रांतिचें सुख । स्वप्नींहि परी न देखों ॥
पांचहि प्रवेशूं हुताशनीं । दिसे तोंवरी उपाय करिजे यत्नीं ।
संकटें पळतीं ज्याच्या स्मरणीं । तो चक्रपाणी आठवा ॥
धरातळीं मूषकबीळ । म्यां रक्षिलें अति विशाळ ।
त्यामाजीं प्रवेश करूं सकळ । चित्त विकळ न करितां.' ॥
पुत्र म्हणती, 'ऐक वचन । गगनचारियां आम्हां जाण ।
बिळवासिये न लागतां क्षण । भक्षण करिती निर्धारें ॥

या दुर्मरणें शरीरनाशु । त्याहूनि पवित्र हुताशु ।
धैर्यें करितां येथ प्रवेशु । श्रेय पावों परलोकीं ॥
संकट ओढवल्या दारुण । श्रेष्ठांसींच जावें शरण ।
नीच सेवितां जघन्य । हें लांछन श्रेष्ठांतें ॥
जंव अपायें स्पर्श न कीजे । तंव चिंता यत्नें शीणिजे ।
अनर्थ आदळल्या होईजे । महामेरू धैर्याचा ॥
सांपडल्या वन्हिचक्रीं । नौका बुडतां महासमुद्रीं ।
एकला शूर नानाशास्त्री । बहुतावरी मारिजे ॥
नृपें वधितां बळात्कारीं । विजनीं प्राण घेतां चोरीं ।
रोगें पीडिला देशांतरीं । द्रव्यहीन एकला ॥
मुखें न भाकितां करुणा । धैर्यें देह वोपीं मरणा ।
तो अक्षय स्वर्गभुवना । पावे जैसा यागान्तीं ॥
आतां धैर्य धरोनी चित्तीं । वेगें जाई वल्लभाप्रती ।
आमुच्या चिंतेच्या आवर्तीं । भ्रमों नको सर्वथा ! ' ॥
ऐकोनिया कुमारांचिया उत्तरा । देखोनि भ्यासुर वैश्वानरा ।
जरिता लंघोनि अंबरा । वनांतरा प्रवेशे ॥
समीप येतां हुताशन । चौघीजणीं करून नमन ।
म्हणती, ' आतां तुजवांचोन । रक्षक आम्हां असेना ॥
हिरण्यकश्यपें जाळितां सुत । पांडव जाळितां जोहारांत ।
लंकेश जाळितां हनुमंत । कृपा केली तयातें ॥
गोकुळीं जळतां गोपाळगायी । त्यांतें झालासि प्राणदायी ।
ते कृपेची भिक्षा कायी । आजि घाली आमुतें. ' ॥
ऐकोनि पिलियांचें वचन । वन्ही जाहला हास्यवदन ।
म्हणे , ' ऋषिपुत्रहो मन । व्याकूळ कांहीं न करावें ॥
मजपासोनी भयाचा अनिळ । तुम्हांस झगटेना अळुमाळ ।
हेचि विषयीं मंदपाळ । प्रार्थोनि मातें गेलासे ' ॥

फुलांचें अत्तर असें असावें कीं, त्याचा वास घेतांच त्या फुलांचा ताटवा मनुष्याच्या डोळ्यांसमोर दिसूं लागावा, तसेंच कवीचें मनोविकारांचें वर्णन—त्यानें काढलेलें शब्दचित्र—असें असावें कीं, तें वाचीत

असतां, ते ते विकार वाचकाच्या मनामध्यें एकदम उमे रहावे व त्याचें मन त्याच विकारांनीं व्यापून जावें. क्षणभर तो आपली तहानभूकहि विसरून जावा व नकळत झालेल्या परिणामांनीं चेतना पावून त्याचीं इंद्रियेंहि त्या विकारांचे हावभाव करूं लागावीं. कवीनें वर्णिलेल्या शृंगारानें वाचक मदनपीडित व्हावा; कवीनें दाखविलेलें रागाचें चित्र पाहून त्याचेंहि मन क्रोधाविष्ट व्हावें; कवीच्या हर्षरसानें त्यालाहि हसूं अनावर होऊन जावें; करुणारसपर भाषणांनीं वाचकाचे डोळ्यांना अश्रूंचे पाझर फुटावे. सारांश, कवीनें वर्णिलेले प्रसंग वाचल्यावर आपण ते ते प्रसंग प्रत्यक्ष अनुभविल्यासारखे वाटावे; व ग्रंथ मिटून ठेवला असतां झोपेंतून जागें झाल्यावर क्षणापूर्वीं पाहिलेल्या स्वप्नांनीं मनाचा जसा गोंधळ उडतो तसाच गोंधळ उडून जावा. शब्दांनीं हा चमत्कार जो कवि घडवून आणूं शकेल तोच कवि श्रेष्ठ समजावा. मग तो व्याकरण, व्युत्पत्ति जाणो कीं न जाणो; त्याचीं वाक्यें शुद्ध असोत कीं अशुद्ध असोत; तो विद्वान् असो की अविद्वान् असो; त्याचें लिहिणें सयमक असो कीं निर्यमक असो; पण निश्चयानें असें जाणावें कीं, कवि असा तोच. या कसोटीला मुक्तेश्वर—निदान त्याचें आदिपर्व—निःसंशय उतरेल, हें निर्विवाद आहे.

मुक्तेश्वर एका वेळीं एकच मनोविकार उत्पन्न करून थांबत नाहीं. तो आपल्या वर्णनांत अनेक रसांची मेसळ करून देऊन वाचकांच्या मनांत अनेक विकार एकदम उत्पन्न करतो. याचा मासला वरच्या शेवटल्या उताऱ्यांत दिसेल. यांत अनेक मनोविकारांचीं चित्रें एकवटलीं आहेत. मोह, माया यांनाहि मर्यादा आहे. जग हें स्वार्थी आहे. मातेची ममतानदीहि संकटसूर्याच्या तापानें आटून जाते व आपल्या प्राणांवर वेळ येऊन ठेपली म्हणजे तीहि पिलांस टाकून दूर होते. या जगांत खरा मायेचा आणि अगदीं शेवटींहि आश्रय देणारा एक परमेश्वर मात्र आहे. व खचून न जातां यत्न केल्यास तो करुणासमुद्र आपल्या पोटांत सर्वांस थारा देतो, हें या गोष्टींतलें सार

आहे. हें मुक्तेश्वरानें उत्तम तऱ्हेनें सांगितलें आहे. याचीं मुग्धशृंगाराचीं वर्णनें याहूनहि चांगलीं खुलविलेलीं असतात. यानें ठिकठिकाणीं मदनशरांनीं पीडित झालेल्या 'तारुण्य—लावण्य ऐश्वर्यवंत' अशा नर-समर्थांची किंवा

कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकळातनुधारिणी ।
सुगंध केतकीपत्रवर्णी । मुगंधखाणी हरिणाक्षी ॥

अशा मंदहासिनी 'मन्मथ-पुतळ्यांची' आणि त्यांच्या 'लीलांचीं' केलेलीं वर्णनें वाचतांना वाचकाचें मन प्रसन्न होतें; आणि स्फूर्तीच्या पल्लवांनीं हिरव्यागार झालेल्या व अर्थसुमनांनीं फुललेल्या अशा मुक्तेश्वराच्या वाग्वल्लरीच्या शीतल लतामंडपाखालीं आपण आनंदानें बसलों आहों, असें त्यास वाटूं लागतें; व तेथेंच कवीनें निर्माण केलेल्या काव्यशिलेवर बसून सर्व वाचक आपल्या राजहंस-श्रोत्यांसह

शब्दार्थ-मोतियांचा चारा । चरोनि देतो सुखढेंकरा ।
आणि पुढें प्रार्थिती मुक्तेश्वरा । कथा सादर परिसवी ॥

अशा लतामंडपांत नवरसांच्या वसंतवातानें रोमांचित होऊन मुक्तेश्वरानें दाखविलेली प्रात:काळची शोभा एक वेळ तरी पहावी, असें कोणास वाटणार नाहीं !

शेष वेचतां अठरा घटिका । पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा ।
कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे ॥
भार्गवाचार्य उदया येत । तंव अपार क्रमुनिया पंथ ।
पुढें जान्हवीजळाचा वात । शीतळ, मंद पातला ॥
कुक्कुट रव करितां का का । भयें पळ सूटला उलुका ।
भोग द्यावया चक्रवाका । चक्रवाकी चालिल्या ॥
गाढालिंगनें पडिली गांठी । सोडितां दंपत्यें होतीं कष्टी ।
वस्त्रें वेढिती परी पोटीं । अपूर्ण कामें जळजळ ॥
स्वैरिणी सांडोनि सखयांतें । दूतीसहित त्वरें बहुतें ।
गृहा येऊनी स्वकर्मातें । संपादिती लौकिका ॥

घेवोनि अंधकाराची बुंथी । चंद्रस्वेच्छा भोगी जगतीं ।
प्रकाश वेढोनी सूर्याप्रती । म्हणे ' मी शुद्ध पतिव्रता ' ॥
भोग भोगोनि सांडिले राजे । नूतनातें उपजवो चोजें ।
भ्रम घालोनि म्हणे माझें । असें ऐश्वर्य अक्षयी ॥
गगनसमुद्रीं मुक्ताफळें । अरुणचंचुनें कनकमराळें ।
वेंचोनि घेतां कळाकुशळें । नाहींच केलीं नक्षत्रें ॥
कीं व्योमनर्मदेमाजी थोर । कार्तवीर्य सहस्रकर ।
ताराबाणलिंगांचा भार । निवटोनि करी परौता ॥
कापडी चालिले तीर्थपंथें । ' सोऽहमस्मि ' चिंतिती ज्ञाते ।
भक्त स्मरती हरिहरातें । प्रेमभावें आवडे ॥
शाक्त चिंतिती शक्तिप्रतिमा । सौर म्हणती सूर्यचि आत्मा ।
गाणपत्य गणेशमहिमा । वाखाणिती ब्रह्मत्वें ॥

असलीं वर्णनें मुक्तेश्वराच्या काव्यांत वारंवार आढळतात. पण या मुक्तेश्वरी वर्णनांत एक दोष आढळतो. वास्तविक पाहतां, हा दोष आपल्या इकडील बहुतेक सर्व ग्रंथांत थोडाफार दिसून येतो. हा दोष असा कीं, कवि आपल्या कथानकाच्या काळावर नजर न देतां आपल्या वेळच्या कल्पना, चालीरीती, आचारविचार हीं सर्व तो प्राचीन काळांत नेऊन सोडतो. इतकेंच नव्हे, तर त्याच्या काळचे राजे व लढवय्ये लोक आणि त्यांचे संग्रामप्रकारहि तो खुशालपणें भारतीय युद्धाचे प्रसंगांत नेऊन सोडतो. दुष्यंतराजाच्या अमलाखालील लोकांत त्यानें इंग्रज, फिरंगी, हबशी वगैरे लोकांचा समावेश केलेला आहे. ऋतुपर्णाकडून यानें भास्कराचार्यांच्या लीलावतीच्या आधारें वृक्षांच्या पानांची गणना करविली आहे[1] (सभापर्व अ० ८). हा कालविपर्यासाचा दोष हेंच मुक्तेश्वराच्या काव्याच्या मर्माचें एक बीज आहे, हेंहि म्हणणें थोडें खरें आहे; कारण असें कीं, हा जें डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहतो त्याचेंच चित्र हा

---

१. 'लीलावती' ग्रंथावरून अशी गणना करतां येते, ही समजूत खोटी, आणि त्यांत भास्कराचार्यांचे ग्रंथ त्यांच्या पूर्वी एक दोन युगें होऊन गेलेला ऋतुपर्ण राजा पढला होता, हें म्हणणें तर अगदींच चमत्कारिक.

कागदावर काढितो; व कल्पना जशा सहजासहजीं त्याच्या मनांत उद्भवतील तशाच्या तशाच हा आपल्या कथानकांत गोंवून पात्रांच्या तोंडी घालतो. याचीं काव्यें हीं याच्या मनोविकारांचे प्रत्यक्ष आदर्श आहेत. तीं मुक्तेश्वर कसा असावा, हें बरोबर दाखवितात.

याच्या रामायणाचा उल्लेख मागें आलाच आहे. हाच काय तो यानें रचिलेला पूर्ण असा ग्रंथ उपलब्ध आहे. याची उपलब्ध असलेली बाकी सर्व रचना अपूर्ण किंवा त्रुटित आहे. महाभारताच्या अठरांपैकीं चार-पांचचें पर्वें उपलब्ध आहेत. तशींच इतर 'गरुडगर्वपरिहाराख्यान,' 'रंभाशुकसंवाद', 'मूर्खांचीं लक्षणें', 'पद्यगीता', 'विश्वामित्रभोजन' वगैरे लहानलहान आख्यानेंहि त्रुटितच आहेत. मुक्तेश्वराच्या ग्रंथांसंबंधानें एक गोष्ट अशी अनुभवास येते कीं, त्याच्या उपलब्ध रचनेपेक्षां त्याचे अनुपलब्ध (परंतु कोणीं कोणीं प्रत्यक्ष पाहिलेली) अशी ग्रंथरचना फार जास्त आहे, असें लोक नेहमीं म्हणतात. हें त्याच्या ग्रंथांवर लोकांच्या असलेल्या प्रेमाचें व ते उपलब्ध व्हावे या त्यांच्या इच्छेचेंच प्रमाण आहे. यानें भागवत रचिलें आहे, असें नवनीतकार (इ. स. १९१०-मधील व त्या पूर्वींच्या आठ आवृत्त्या) व रा. गोडबोले लिहितात. रा. गोडबोले हे 'वत्सलाहरण'हि मुक्तेश्वरकृत असल्याचें सांगतात. तसेंच 'भविष्योत्तर पुराणा'वर त्याचा एक ओवीबद्ध ग्रंथ असल्याचें एका गृहस्थांनीं मागें 'केसरी' पत्रांत प्रसिद्ध केलें होतें. मुक्तेश्वराचें 'शांतिपर्व' एका गृहस्थास मिळालें असल्याचें सांगतात; आणि या सगळ्यांबरोबर मीहि असें म्हणतों कीं, आपणांजवळ साग्र अठरा पर्वें मुक्तेश्वरी महाभारत

---

१. आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक.

२. 'महाराष्ट्रकवि' छापीत असतां मजकडे दोन प्रती आल्या होत्या. वर 'मुक्तेश्वरकृत भागवत' असें लिहिलें होतें. पण त्या दोन्ही पोथ्या दुसऱ्याच कवींच्या होत्या. माची कविचरित्रांत तर मुक्तेश्वरी 'भागवत' हा ग्रंथ मोठा असून फार सुंदर आणि रसभरित आहे, असें शिफारसपत्रहि दिलेलें आहे !

असल्याचें अनेक लोकांनीं प्रत्यक्ष पत्रें लिहून मला कळविलें आहे. पण दुःखाची गोष्ट अशी कीं, यांपैकीं कांहीं जणांकडे जाऊन यांच्या पोथ्या पाहतां असें आढळून आलें कीं, पहिलीं चार पर्वें मात्र मुक्तेश्वराचीं व बाकीचीं पर्वें गोपाळ, माधव, नामाविष्णुदास, शुभानंद यांपैकीं कोणाचीं, अशीं मिळून १८ पर्वें पुरीं करून वर 'मुक्तेश्वरकृत महाभारत' असें लिहिलेलें असे.

आतां हीं बाकीचीं पर्वें मुक्तेश्वरानें रचिलीं असावीं कीं नाहीं, हा एक जरा विचार करण्यासारखा मुद्दा आहे. यासंबंधीं साधक व बाधक दोन्ही प्रमाणांचा विचार करितां मला असें वाटतें कीं, मुक्तेश्वरानें पहिलीं चार पर्वें साग्र रचून उद्योगपर्वहि अर्धेमुर्धे रचिलें असावें. याशिवाय 'सौप्तिक-पर्वा' सारखीं मधलींच लहानसहान पर्वेंहि लिहिलीं असावीं. कारण 'सौप्तिकपर्व' प्रत्यक्ष सांपडलेंच आहे व उद्योगपर्वाचा दोनतीन ठिकाणीं स्पष्ट उल्लेख आला आहे. पण यापलीकडे साग्र महाभारत मुक्तेश्वरानें रचिलेलें दिसत नाहीं. मुक्तेश्वरानें महाभारत संपूर्ण रचिलें नाहीं, असें वाटण्यास मुख्यतः कारणें पुढीलप्रमाणें होतात—

(१) लोक अनेक वेळां अजाणपणानें फसले जातात. भोळी श्रद्धा आणि हीं पर्वें मिळण्याविषयींची हौस व अनिवार इच्छा या फसण्यास कारणीभूत होते. गप्पाष्टकें झोकण्याची सवयहि एखादे वेळीं मदतगार होते.

(२) महाराष्ट्रांतील कवि अनेक वेळीं मधलींच त्रुटित प्रकरणें पुढें योग्य अशा शब्दांनीं दुवे जोडून मोठ्या ग्रंथांत घालण्याच्या उद्देशानें लिहितांना आढळतात. महीपतीबोवांचें उदाहरण प्रसिद्धच आहे. ते म्हणतात—

> संतांचीं चरित्र पूर्ण । एकदांच नाकळती जाण ।
> जेव्हां जी झाली आठवण । तीं चरित्रें लिहून ठेविलीं ॥

आणि मग तीं ग्रथित करून ग्रंथ तयार केला. तेव्हां मुक्तेश्वरानेंहि अशाच योजनेनें हीं आख्यानें स्फूर्तीसरशीं लिहिलीं असणें संभवनीय आहे.

(३) विराटपर्वांतल्याप्रमाणेंच मुक्तेश्वरानें उद्योगपर्वाचा उल्लेख इतरहि कांहीं ठिकाणीं केला आहे. उदाहरणार्थ—

ऐसे हे ययातीचे दौहित्र । चौघे माधवीचे सुपुत्र ।
यांचें सविस्तर चरित्र । उद्योगपर्वी परिसणें ॥ आदिपर्व अ. २०, ओ. १७३.

(४) आज सुमारें दोन-अडीचशें वर्षे महाराष्ट्रांतील साधु, चरित्रकार व विद्याव्यासंगी पुरुष यांस इच्छा असूनहि हीं पर्वे आढळलीं नाहींत. अलीकडील दहा-पंधरा वर्षांत पुष्कळ खटपट करूनहि यांचा सुगावा लागत नाहीं. श्रीधरस्वामींनाहि पुढील पर्वे सांपडलीं नव्हतीं, असें त्यांच्या पांडवप्रतापावरून अनुमानितां येतें. उद्योगपर्व रचणारे अनेक कवि आपण मुक्तेश्वरानें अर्धवट टाकिलेलें महाभारत पुरें करितों, असें ग्रंथारंभीं सांगतात. म्हणजे पुढील पर्वे रचिलीं गेलीं नाहींत, अशी त्यांची पूर्ण खात्री होती, असें दिसतें.

(५) भारत लिहिणारे अनेक महाराष्ट्र-कवि अधलींमधलीं पर्वे वेळोवेळीं लिहून मग तीं जुळवून संपूर्ण भारत तयार करीत. मोरोपंता-संबंधें त्यांचे ग्रंथप्रकाशकहि अशीच साक्ष देतात. तेव्हां याप्रमाणेंच 'सौप्तिक पर्व' हें एवढें मधलेंच लहानसें पर्व मुक्तेश्वरानें लिहून ठेविलें असेल, म्हणून तें तेवढेंच उपलब्ध झालें. कर्ण, शल्य, द्रोण वगैरेंसारखीं मोठीं पर्वे रचिलींच नाहींत.

(६) मला एक परीनें वाटतें कीं, मुक्तेश्वरानें अठरा पर्वे भारत साग्र लिहिलें नसावें. कारण मुक्तेश्वराच्या बुद्धीला थकवा किंवा मांद्य आलें असावें; आणि त्यानें पुढील रचना केली नसावी. त्याचा स्वतःचा आत्मविश्वास फार दांडगा होता. अनेक महाराष्ट्र-साधुपुरुषांपैकीं ग्रंथांत फक्त दोघांनाच त्यानें नमन केलें आहे. एक ज्ञानेश्वर व दुसरा एकनाथ पैकीं एकनाथाला तो आपला 'मातृजनक' म्हणूनच केलेलें दिसतें. ज्ञानेश्वराबद्दल मात्र कवीच्या मनांत खरी पूज्य बुद्धि दिसते. बाकी मुकुंदराज, नामदेव, कृष्णदास वगैरे मंडळी याला खाशा पंक्तीची वाटत नाहींत.

तसेंच, स्वतःच्या ग्रंथरचनेबद्दलहि याला मोठा अभिमान वाटतो. तो म्हणतो, "महाराष्ट्रासि **काव्यगुरु** । हा गौरव इये ग्रंथीं ॥" 'गुरुत्व' आणि 'गौरव' हीं दोन्ही आपल्याच ग्रंथाला तो देतो आणि 'आदिपर्व' पाहिलें असतां हें अगदीं खरें आहे, असें वाटतें. पण आदिपर्वाचा पाक पुढील पर्वांत तसा उतरला नाहीं. आदिपर्वाची गोडी 'सभापर्वां'त येत नाहीं. 'वनपर्व' हें मूळ महाभारतांत सर्वांत मोठें पर्व आहे. पण तें मुक्तेश्वरानें अठरा अध्यायांत पुऱ्या तीन-हजार ओव्या न लिहितांच उरकून टाकिलें आहे, आणि या तिहींच्याहि मानानें विराटपर्व तर अगदींच कमी दर्जाचें झालें आहे. यांतलें उत्तरगोग्रहणानंतरचें 'पांडवप्रगटोन्नाम'-आख्यान तर पंतांच्या किंवा इतर साधारण ऱ्या कवीच्या आख्यानाशींहि तोलण्याजोगें नाहीं. आदिपर्व वाचीत असतां आपण पौर्णिमेच्या पिठासारख्या स्वच्छ व शुभ्र चांदण्याची शोभा अनुभवितों; पण त्याच आशेनें पुढें पर्वोपर्वीं पाहिलें तर दिवसानुदिवस आपणांस वद्य पक्षाचा अनुभव येतो.



# सोळाव्या शतकांतील आणखी कांहीं कवि

मुक्तेश्वरानें भागवतावर टीका केली असावी, असें कांहीं लोक म्हणतात; पण ही टीका उपलब्ध असल्याची कोणासहि माहिती नाहीं. मुक्तेश्वराच्या वेळच्या इतर कांहीं साधुपुरुषांनीं मात्र भागवतावर रचिलेल्या टीका उपलब्ध आहेत. त्यांपैकीं दोन टीका आपल्या इकडे विशेष प्रसिद्ध आहेत. एक ' रमावल्लभदासा 'ची व दुसरी ' शिवकल्याणा 'ची. हे दोघेहि विद्वान् साधुपुरुष होते. दोघांची ग्रंथरचना विस्तृत आहे; व दोघांचीहि परंपरा अजून चालू आहे. या दोघांनींहि श्रीभागवताच्या कांहीं भागावर टीका केली आहे.

यापैकीं **रामावल्लभदास** याचा जन्म शके १५३२-मध्यें झाला. याची चरित्रकथा थोडी नवलपरीची आहे. याचे वडील अंबाजीपंत ऊर्फ यमाजीपंत. उपनांव राळेरासकर. हे देवगिरी ऊर्फ दौलताबाद येथील राजाचे कारभारी होते. त्यांस फार दिवस पुत्रसंतान नव्हतें. पुढें श्री. अंबेच्या कृपेनें एक पुत्र झाला. त्याचें नांव तुकोपंत असें ठेविलें. पुत्रोत्सवाच्या आनंदाप्रीत्यर्थ पित्यानें हत्तीवरून साखरा वांटिल्या, इतकी घरची श्रीमंती होती. सातव्या वर्षीं मुंज व बाराव्या वर्षीं लग्न झाल्यानंतर सहा वर्षांनीं हा तुकोपंत आपल्या वडिलांचा कारभार पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं लढाईचा प्रसंग आला. तेव्हां हाताखालीं हजार दोन-हजार शिपाई घेऊन तुकोपंत युद्धास गेला. तेथें त्यास यश आलें व शत्रूच्या लोकांची लूट झाली. लुटींत ज्याच्या जें हातीं लागलें तें त्यानें घेतलें. या वेळीं तुकोजीपंताला

**एकादशस्कंध एकतीस अध्याय । ' एकाजनार्दनी टीका ' अन्वय ।**

ही पोथी मिळाली. हाच देवाचा प्रसाद जाणून तो ती पोथी नित्यनियमानें वाचूं लागला. हळूहळू तुकोपंताचें मन संसारांतून निघून भगवंताच्या

चरणांकडे वळूं लागलें. याच सुमारास याची व लक्ष्मीधर नांवाच्या एका साधुपुरुषाची गांठ पडली. लक्ष्मीधरानें तुकोजीपंतास अनुग्रह–मंत्र दिला. श्रीगोपाळविद्येची उपासना सांगितली; व नांव **'रामावल्लभदास'** असें ठेविलें. एव्हांपासून पूर्वींचे तुकोजीपंत हे रमावल्लभ-दास या नांवानें जगांत वर्तूं लागले. यापुढें ते बरेच दिवस गोदातटींच असत. यांनीं भागवताच्या दशमस्कंधावरील बहिरंभटाची टीका पाहिली होती, असें आपल्या ' दशकनिर्धार ' या ग्रंथांत लिहिलें आहे. ' दशक-निर्धारां'त भागवताच्या दशम स्कंधाच्या आधारें कृष्णजन्मकथा सांगितली आहे. हा ग्रंथ यांनीं शके १५५५-मध्यें लिहिला पण रमावल्लभदासांचा मुख्य व प्रसिद्ध ग्रंथ म्हटला म्हणजे त्यांनीं श्रीशंकराचार्यांच्या 'बृहद्वाक्यवृत्ति' ग्रंथावर केलेली ' वाक्यवृत्ति ' या नांवाची विस्तृत टीका हा होय. ही टीका करण्यास त्यांनीं वाई येथें प्रारंभ केला; व दाभोळ येथें ती पुरी केली. याशिवाय यांची ' चमत्कारी ' या नांवाची गीतेवरहि एक टीका आहे. ही यांनीं शके १५५८-मध्यें लिहिली. हे दोन्ही ग्रंथ हल्लीं उप-लब्ध आहेत. याशिवाय ' वैष्णवगति ' वगैरे आणखी कांहीं ग्रंथ आणि अनेक पदें व अभंग यांनीं केले आहेत. यांची परंपरा हल्लीं गोमंतकाकडे आहे. यांच्या शिष्यवर्गांत ' आवडाबाई ' या मुख्य होत्या. आवडाबाईचें उपनांव उभयकर. यांचा मठ व परंपरा कारवार जिल्ह्यांत मौजे चंदावर येथें अजून आहे.

रमावल्लभदासांच्या परंपरेंत श्रीकृष्णचरित्राचें संकीर्तन सर्व स्त्रीपुरुषांकडून अजूनहि फार प्रेमळपणानें करण्यांत येतें. त्यांच्या येथें कीर्तनसमयीं

अवघा बोले चाले हरी । ज्याचि कथा तोचि करी ॥
होऊनियां श्रोता वक्ता । आपुली आपण करी कथा ॥
विश्वव्यापक परिपूर्ण । अवघा एकचि नारायण ॥
कैचा रमावल्लभदास । अवघा हरीचा उल्हास ॥१॥

हें पद म्हणण्याचा प्रघात आहे. या पदाप्रमाणेंच रमावल्लभदासांच्या

शिष्यपरंपरेंत दुसरें एक पद फार ऐकूं येतें. तें असें—

मुळीं लागतां सहज। मायबाप नाहींत मज ।।१।।
झालों पोसणें संतांचें। मन कोंवळें तयांचें ।। धृ.।।
गोत्र अगस्ति होतें साचे। आतां गोत्र व्यापकाचे ।।२।।
ऋग्वेदि होतों पहिले। आतां भागवतीं वहिले ।।३।।
नामघोषाचा आचारू। भगवद्‌गीतेचा विचारू ।।४।।
पूर्वि संध्या ते त्रिकाळ। प्रेमसंध्या सर्वकाळ ।।५।।
पूर्वि होतो मतभेदी। आतां जालों जी अभेदी ।।६।।
पूर्वि बोलिलों लौकिक। आतां बोलें अलौकिक ।।७।।
पूर्वि मान म्याच घ्यावा। आतां मान सर्वां द्यावा ।।८।।
पूर्वि रुचे चतुरपण। आतां भोळीव आपण ।।९।।
पूर्वि मुक्ती लागे बाहे। आतां भक्ति लागे बाहे ।।१०।।
पूर्वि होतो परतंत्र। आतां सर्वांशीं स्वतंत्र ।।११।।
पूर्वि रुचे रुपनाम। आतां त्याचें नाहीं काम ।।१२।।
नामरूप जाऊनि भास। अवघा रमावल्लभदास ।।१३।।

रमावल्लभदासापेक्षां **शिवकल्याणा**ची भागवताच्या भागावरील टीका फार विस्तृत व जास्त योग्यतेची आहे. शिवकल्याण म्हणतो कीं, श्रीमद्भागवत हा सगळाच ग्रंथ सुंदर आहे. पण त्यांतहि दशमस्कंध हा आणखी विशेष सुंदर आहे.

'दुष्टीं पिडितां मेदिनी। धर्माची देखोन ग्लानी। यदुवंश दिनमणी। उदयो जाला ।। दुष्ट राजे दमिले। अधर्माचें मूळ छेदिलें। तत्प्रसंगें जालें। उदंड चरित ।। ते कृष्णचरितावळी। दशमामाजीं वर्णिली। नव्वद अध्यायीं। केली रचना ते प ।। म्हणून जींत प्रधानत्वें करून। श्रीकृष्णजीचें गुण-कीर्तन। सर्वतापोपशमन। आहे ती कल्याणवतो कथा मी ' मऱ्हाटियां बोलीं। बोबडांचि बोलीं। बोलेन कांहीं ।।'

या टीकेंत शिवकल्याणांनीं सर्व संसारी जनांस कृष्णावताराचें रहस्य उघड करून दाखविलें आहे. दशमासारखा कृष्णलीलांनीं भरलेला

कथाभाग, पण त्याचा सर्वभर परमार्थपर अर्थ लावून त्या लीलांच्या मिषांनीं भगवंतांनीं अज्ञानी लोकांस काय उपदेश केला हें 'शिवकल्याणी' या टीकेंत सांगितलें आहे. कामक्रोधादिकांचे अंकित होऊन खऱ्या आत्मसुखास पराङ्मुख होणाऱ्या अज्ञ लोकांस प्रवृत्तिमार्गाकडून वळवून निवृत्तिमार्गाकडे नेणारी ही टीका मुमुक्षूंस फारच आल्हादजनक वाटेल. ज्ञानमार्ग चोखाळणाऱ्या एकंदर लोकांस ही टीका चांगली 'मार्गदर्शनी' होईल. योगमार्गाच्या वाटेनें जाणाऱ्यांसहि शिवकल्याणाच्या या वाग्वल्लरीच्या छायेंत जरा विश्रांति मिळेल; व कोणत्याहि पौराणिक कथानकावर रूपक बसवून तिचा वेदांतपर अर्थ लावण्याची ज्यांस नेहमींची चटक आहे अशांच्या जिव्हेला तर या शिवकल्याणाच्या सुधारसाचा आस्वाद विशेषच गोड लागेल; आणि साधारणपणें अनधिकारी अशा इतरांसह सर्व कृष्णचरित्रांवर, त्याच्या रासोत्सवासारख्या अनेक क्रीडांवर आणि अनेक लीलांवर टीकाकारानें बसविलेलें हें रूपक पाहून कवीच्या ज्ञानाचें, त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेचें व कर्तबगारीचें कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. अशा वाचकाच्या क्षणभर असेंहि मनांत येईल कीं, या बुद्धिमान् व उद्योगी पुरुषानें ब्रह्मज्ञानपर एखादा निराळा व स्वतंत्रच ग्रंथ लिहिला असता तर बरें होतें.

शिवकल्याणस्वामीच्या या दशमस्कंधावरील टीकेची संख्या जवळजवळ एक लक्ष आहे. सर्व ग्रंथभर याच्या लेखणीचा ओघ सारखा चालू राहिलेला आहे. त्यांतून पुढील व्याख्यान येथें उतरून घेऊं.

'अगा या देहाचेनि सांगातें । रोकडें जन्मणें घडलें तुतें । तरि आतां मरणातें । वायांची भोसि ॥ जन्मवंतातें मरण । हें गा ठेविलेंचि

१. सत्वादिकांचे अवतार । तेचि अवघे सुरवर ।
त्यांच्या साह्यालागीं अवतार । भगवंताचा ॥
त्यांतु अहंकारें पैसु केला । तोहि तेथेंचि संचरला ।
कंसरूपें अवतरला । पहिलें तेथें ॥
त्या अहंकंसहरणाचें निमित्त । करुनि श्रीकृष्णजी आविर्भुत ।
तेचि कथा प्रस्तुत । शुकेंद्र सांगे ॥

आहे जाण। या देहसंगें कोण। वांचेल येथें ? ॥ असो. या देहाचेनि संगें। मरावें जन्मावें लागे। वांचुनि तुं आंगें। अविनाशरूप ॥ देहारंभाचेनि आचरणें। दिधलें मृत्यूसी आंवतणें। असो. लिहिलें जें विधातियेनें। तें चुकेल कैसें ? ॥ ........... हें तंव येथें नसे। देहांतर ठेविलेंचि असे। मरणवंतासि कैसें। सोडील जन्म ? ॥ कर्मवश जो आला देही। तो देहाचें मरणसमयीं। देहांतरातें पाही। करूनि सिद्ध ॥ तेथ करूनि अवस्थान। करि पूर्वदेहांचे विसर्जन। पुढें पाऊल न देतां जाण। मागील नुचले ॥ पुरुषासि चालतां पाहे। पुढें येक पदें उभा राहे। मग मागिल्या पदासि होये। सुटका जेवि ॥ तेंवी देहांतरातें अविष्टंभुनि। पूर्वदेहातें त्यजिती प्राणी। असो; देहांतरावांचूनि। न सुटे देहो ॥ जेंवि तृणाळिकेची गति आधि। तृणांतरीं करूनि वस्ती। मग आपेंआप सुटती। मागील तृणें ॥ तेंवि देही तादाम्य पावोन। जिव आला कर्माधीन। कर्मपंथीं वर्तमान। फेरा जो पाडिला। ।तो देहांतरीं अवस्थान।करूनि पूर्वदेहाचें वीसर्जन।करि,यासि अन्यथा जाण। कधिचि नव्हे ॥ तरि देह असणें तंव न चुके। आतां या देहाचेंचि काय इतुकें। करुणातकें पाळावा कां गा ? ॥ देहांतरप्राप्तीविण। नव्हे पूर्वदेहाचें विसर्जन। आणिकि दृष्टांति करून। बोलिले हेंचि। जागृतिचा ठायीं। राजे रंक देखिले पाहीं। आणि आइकिलें जें कांहीं। इंद्रादि लोक ॥ तो चिंतनाचिये रिती। संस्कार होऊनि चित्तीं। तैसिचो रूपें देखती। स्वप्नीं नर ॥ मग अहंप्रत्ययो अपुला। स्वप्नदेहीं जडोनि गेला। जागृत देहाचा घडला। विसरून तेव्हां ॥ किंवा दृष्टश्रुताचेनि संस्कारें। चित्तीं अभिनिवेष अनुकरे। त्या अभिनिवेषाचें भरें। मनोरथ उपजे॥ तोचि अध्यास धरूनि चित्तीं। पुढें उभी ठाके अहंकृति। आकृतिचां ठायीं अहंकृति। जडोनि जाये ॥ तेंचि मी, म्हणोनि मानें। तेव्हांचि जागृत देहातें नेणें। तेंवि देहांतराचेनि अभिमानें। पूर्वदेहातें विसरे ॥ एवं कर्मास्तव देह स्फुरे। तेथेंचि अहंत्व अवतरे। तेणेंचि काळें विसरे। मागील देहातें ॥ येथें भलतेनिहि मिषें। देहाचिये स्मृतिभ्रंशें। जाणति मृत्यु ऐसें। बोलिलें त्यासी ॥

शिवकल्याणाचें व्याख्यान वाचीत असतां त्यांत ज्ञानेश्वराच्या भाषेची ओळख स्पष्ट पटते; आणि याला कारणहि तसेंच बलवत्तर आहे. तें हें कीं, शिवकल्याणाचा ज्ञानेश्वराच्या ग्रंथांशीं फार विशेष परिचय होता.

त्यांपैकीं 'अमृतानुभव' या उत्कृष्ट ग्रंथावर शिवकल्याणाची एक सुंदर टीकाहि आहे. या टीकेचें नांव 'नित्यानंददीपिका'. ही त्यानें मागें सांगितलेल्या 'कथाकल्पतरु' ग्रंथाचा कर्ता जो कृष्णयाज्ञवल्की त्याच्या गोपाळ नामक पुत्राच्या विनंतीवरून रचिली.[1] हींत हिचा रचनाकाल शके १५५७ युवा संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा असा दिला आहे. यांत शिवकल्याणानें आपणा स्वत:संबंधींहि थोडीशी माहिती दिली आहे. शिवकल्याण हा अंबापूर म्हणजे जोगाईचें अंबें उर्फ मोमिनाबाद येथला राहणारा. याची पितृपरंपरा अशी—कमलाकार → चिंतामणी → त्रिमल → शिवकल्याण. यांपैकीं शिवकल्याणाचा पिता जो त्रिमल तोच शिवकल्याणाचा गुरु[2] व त्याचेच चतुर्थाश्रमांतलें नांव नित्यानंद. या नित्यानंदाच्या पूर्वींच्या पंधरा-सोळा पुरुषांचा आपल्या गुरुपरंपरेसंबंधीं शिवकल्याण उल्लेख करितो. यानें दिलेली आपली गुरुपरंपरा अशी—

आदिनाथ → मच्छेंद्रनाथ → गोरक्षनाथ → मुक्ताबाई वटेश्वर → चक्रपाणी → विमलानंद → चांगाकेशवदास → जनकराज → नृसिंह → हृदयानंद → विश्वेश्वर → केशवराज → हरिदास → परमानंद → नित्यानंद → शिवकल्याण[3]. 'नित्यानंददीपिका' टीकेच्या शेवटीं शिवकल्याणानें जशी आपणासंबंधें माहिती दिली आहे, तशी दशमाच्या पोथींत कोठेंहि दिली नाहीं. यांतहि 'गंगारूप हरिकथा' मीं परंपरेनें ऐकिली व मग

---

१. गोदातीर उत्तर भाग । देवगिरी नगर सुभग ।
......तेथें याज्ञवल्कि श्रीमंत । श्रीगोपाळ श्रीकृष्णसुत ॥ इ०

२. दशमाच्या टीकेंत ९०-व्या म्हणजे शेवटील अध्यायांत कवि सांगतो—

मी 'शिव' नामांकित । नित्यानंदान्वयभूत ।
जनकहि प्रस्तुत । नित्यानंद त्रिमलनामा ॥

३. यांत ज्ञानेश्वर व निवृत्तिनाथ यांचीं नांवें नाहींत; मुक्ताबाई ही गोरक्षनाथाची उपदिष्ट शिष्यीण; वटेश्वर व चांगाकेशवदास हे पुरुष भिन्न असून त्यांत तीन पिढ्यांचें अंतर आहे; —वगैरे बाबी लक्ष्यांत घेण्याजोग्या आहेत.

हे गंगा, जगतारिणी । जाली मद्‌गुरुगामिनी ।
ते प्रवेशली माझां मनीं । गुरुमुखे कर्णद्वारा ॥......
......तेणेंचि देऊनि अनुमोदन । वर्णविले हे हरिगुण ।
तें म्यां निजमतितें अनुसरोन । वर्णिले भाषाबद्ध ॥

इतकेंच लिहिलें आहे. टीकारचनेचा कालहि यांत दिलेला नाहीं. फक्त—

श्रीपंढरी नामें करूनी । श्रीविठ्ठल महाराजधानी ।
हा ग्रंथ येथेंचि आरंभुनि । संपला येथेंचि ॥

असा रचनास्थलाचा उल्लेख आहे. याशिवाय शिवकल्याणाची चतुःश्लोकी भागवतावर एक लहानशी टीका आहे. त्याचीं पदें वगैरे फारशीं आढळत नाहींत.

शिवकल्याणाचा समकालीन व त्याच्याचप्रमाणें भागवताच्या दशम स्कंधावर टीका करणारा आणखी एक ग्रंथकार प्रसिद्ध आहे. याचें नांव **लोलिंबराज.** हा जुन्नर येथील राहणारा. उपनांव जोशी असून याचे वंशज जुन्नर प्रांतीं नांदत आहेत. याचा 'वैद्यजीवन' या नांवाचा एक वैद्यक ग्रंथ संस्कृतांत असून मराठींतहि यानें भागवताच्या दशम स्कंधावर एक टीका लिहिली आहे. याचींहि पदें वगैरे पुष्कळ आढळतात. अनेक बाडांतून याचें पुढील गोड पद आढळतें—

ज्याची कीर्ति जगत्रईं प्रगटली मंदाकिनीचे परी ।
जो एके घटिकेंत शंभर नवीं पद्यें विनोदें करी ॥
ज्याला 'कविपातशाह' पदवी विद्वज्जनीं लाभली ।
तो हा रत्नकले ! तुला विनविती लोलिंबराजः कवी ॥

आणि रचना नुसती जलदच नव्हे, तर 'अमृतमधुर' असे. हा लोलिंबराज व रत्नकला हीं एकमेकांवर अत्यंत अनुरक्त असतां रत्नकला मृत्यु पावली. कारण, कवि म्हणतो—

---

१. या टीकेचे शेवटीं " श्रीमत् पंडित सन्निधाने । मुग्ब लाचेनि प्रश्नें । नित्यानंद खुणें । प्रगट केली ॥ " असें म्हटलें आहे.

२. रत्नकलेच्या मनाची स्थिति लोलिंबराज दूर गेला म्हणजे

( पान ३६० पहा. )

'मजविण घडि कोठें जासि ना तूं रसाळें।
न पुसत परलोका केवि गेलीस बाळे ? ॥'

तरुणवयांत यानें अनेक चाळे केले. पण ही रत्नकळा मेल्यावर याला उपरति झाली.

'विषय विषय करितां सर्व संसार गेला।
क्षणभरि परि नाहीं मुक्तिचा यत्न केला ॥'

यानें सप्तशृंग भवानीची आराधना केली व तप करून हा तिच्या आणि लोकांच्या आदरास पात्र झाला. अशी याची हकीगत आहे. हें वर उल्लेखिलेलें चरित्र लोलिंबराजानेंच लिहिलें असलें आणि तें एखाद्यास कितीहि चांगलें वाटलें तरी तें अत्यंत किळसवाणें आहे. उपलब्ध अशा सबंध मराठी वाङ्मयांत याच्या तोडीचें बीभत्स काव्य दुसरें नाहीं. वामन पंडित, धुंडिकुमार वगैरे कृष्णलीला निर्भीडपणानें वर्णन करणारे ग्रंथकार तर राहोतच, पण लाडखानासारख्यांच्या करमणुकीकरितां रचिलेलीं अनंगरंग किंवा रसकल्लोळ, कामशास्त्र, कोकशास्त्र, वगैरेंसारखीं चोपडीं-देखील या चरित्राच्या तुलनेनें सभ्यच म्हणावीं लागतील. या चोपड्यांत अगर पोथ्यांत याला थोडेंसें शास्त्रीय स्वरूप देऊन कांहीं शिष्ट शब्दांचा थोडा आडपडदा तरी सोडिलेला असतो. पण तितकाहि काडीचा आडोसा यांत ठेविला नाहीं. भारतभागवतांच्या कथांपलीकडे गेलेला हा पहिलाच लेख आहे हें खरें, पण त्यामुळें त्याचा किळस कमी होत नाहींच. उलट लोलिंबराजाच्या नांवाशीं या अशा चरित्राचा संबंध पोहोंचावा, हें पाहून वाईटच वाटतें.

लोलिंबराजानें रचिलेला एक 'वैद्यजीवन' या नांवाचा (शके १५५५)

---

(पान ३५९-वरून.)

चटपट सुटलीसे जीव कोठें न राहे ।
वदन धरुनि हस्तीं येकली वाट पाहे ।
करुनि सकल शोभा दर्पणीं रूप पाहे ।
पति अजुनि नये का हेंचि चिंतीत आहे ॥

अशी होई, असें सांगितलें आहे.

संस्कृत ग्रंथ आहे, असे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात. मजजवळ एक 'वैद्यजीवन' ग्रंथाची पोथी आहे. हिची रचना अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध असून सर्व श्लोक मराठींत आहेत. ग्रंथ कवीनें आपल्या 'सुंदरी' स सांगितला आहे. ग्रंथाचे शेवटीं 'इति श्री लोलिंबराज ग्रंथ वैद्यजीवन संपूर्ण' असें लिहिलें आहे. पण ग्रंथांत ठिकठिकाणीं 'त्र्यंबकराज' असें नांव आलें आहे. मग लोलिंबराजाचें नांव 'त्र्यंबक' असल्यास कोण जाणे. ग्रंथांतील श्लोक सोपे असून त्यांत सांगितलेलीं औषधेंहि साधीं व नेहमींच्या वस्तूंचीं आहेत. तीं कितपत गुणकारी आहेत हें एखादा वैद्यच जाणूं शकेल.

लोलिंबराजाचा उल्लेख अनेक ग्रंथांत आढळतो व साधारणपणें बहुतेक सर्व संतमालिकांत याचें नामस्मरण आहे. पण ज्याचे संतमालिकांतून नांवहि आढळत नाहीं व ज्याचा उल्लेखहि फारसा कोठें सांपडत नाहीं, पण ज्याची रचना वर सांगितलेल्या तिघांपेक्षांहि अवाढव्य आहे असा कवि **शामाराध्य** हा आहे. हा मोठा विद्वान् व उद्योगी पुरुष दिसतो. याची ज्ञानेश्वराच्या ज्ञानेश्वरींतील कठीण शब्दांचा अर्थ सांगणारी 'पद्यमाला' नांवाची एक टिप्पणी आहे; आणि याशिवाय बहुतेक सर्व तऱ्हेची रचना आहे. भारत, भागवत, रामायण वगैरे ग्रंथांतील सर्व आख्यानें यानें लिहिलीं आहेत. भागवताच्या दुसऱ्या व दहाव्या स्कंधांवरील याची टीका उपलब्ध आहेच. कदाचित् यानें हे ग्रंथ समग्र मराठींत लिहिले असण्याचाहि संभव आहे. 'आश्वलायन प्रश्नमाला', 'नित्यानित्यविचार' 'ज्ञानोदयसिंधु' वगैरे वेदांतपर इतर रचनाहि यानें केली आहे. गीतेवरीलहि याची एक टीका उपलब्ध आहे. तसेंच, कांहीं उपनिषदांवर यानें

---

१. यांत एक श्लोक असा आहे.

> प्रकटित सकळातें हें कलायाचि साठीं ।
> स्फुट अति वदलों मी देशभाषा मऱ्हाठी ।
> अमृतमय चिकित्सा मेघरोगा मुलाला ।
> प्रियजन उपकारालागिं हा ग्रंथ केला ॥

मराठींत भाष्य रचिलें असावें, असें कैवल्योपनिषदाच्या उपलब्ध असलेल्या भाष्यावरून दिसतें. 'विद्यार्णवस्वामी'ची टीका पाहून, आणि गुरुमुखानें ती ऐकून मीहि स्वभाषेंत रचना करितों, असें या भाष्यांत शामाराध्य सांगतो या टीकेचे शेवटीं व इतरहि ठिकाणीं यानें आपलें नांव 'शामसुंदर रघुनाथ' असें दिलें आहे.

> 'आराध्यवंशीं आराधन। रंगशीले करावें पुराण पठण।
> तेणें तोषें विठ्ठल यजमान। स्वानंदप्रदान देत असे॥'

या ओवीवरून याचें उपनांव 'आराध्ये' हें उघड आहे. याचे कुळांत विठ्ठलाची भक्ति विशेष होती. त्या दैवताचे ठिकाणीं या आराध्यांची निष्ठा इतकी दांडगी होती कीं, याचे वंशांत कोणीहि काशीस जात नसे, व अजूनहि जात नाहींत. या शामसुंदराची भाषा किंवा रचनाशैली मात्र. असावी तशी सुंदर नाहीं. पण आपल्या अवाढव्य रचनेमुळें हा कवि आदरास पात्र आहे. याचा काळ नक्की ठरविण्याचें साधन आज उपलब्ध नाहीं; पण आराध्यांच्या व बडव्यांच्या वादासंबंधींच्या कागदांतील व इतर उल्लेखांवरून हा सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांतच विद्यमान असावा, असा तर्क होतो. याचीं पदें, अभंग वगैरे रचना आहे. याचे श्लोक मात्र फारसे पाहण्यांत नाहींत. एक दहा श्लोकांचें अंबाभवानीचें स्तोत्र यानें रचिलेलें आहे. दहाहि श्लोकांत शेवटचा चरण तोच आहे. यांतील शेवटला श्लोक असा—

> आराध्यान्वय शामराजहृदयीं ध्यानीं तयेतें वरी
> सोहं सोहं म्हणोनिया निशिदिनीं वाङ्मालिका स्वीकरी।
> सारासार विचारुनी मग तिला वाहात पुष्पांजली
> माता हे जगदंबिका भगवती दृष्टास म्यां देखिली॥१०॥



# तुकाराम व आणखी कांहीं संत



श्रीएकनाथाचा जगद्विख्यात नातू मुक्तेश्वर आणि त्याच्या वेळचे आणखी कांहीं कवि यांची हकीगत मागें आली आहे. याच काळीं या सर्वांपेक्षां जास्त प्रसिद्ध असा एक महाकवि विद्यमान होता. त्याचें नांव **तुकाराम**. तुकोबा अथवा तुकाराम हा जातीनें शूद्र खरा, पण याचा पिढीजाद धंदा उदीमपणाचा होता. पंढरीच्या विठ्ठलाची भक्ति याच्या कुळांत अनेक पिढ्यांपासून चालत आली होती. याचा शिष्य आणि चरित्रकार महीपतीबावा ताहराबादकर यानें आपल्या ग्रंथांत याची सात-आठ पिढ्यांची माहिती दिली आहे. त्यावरून याचे पूर्वजांत भगवद्भक्ति होती, तसेंच शौर्यधैर्यादि गुणहि त्यांच्यांत होते, असें दिसतें. तुकारामाच्या बापाचें नांव बाल्होबा व आईचें नांव कनकाई. ही पुण्याजवळील लोहगांवे येथील मोझे या आडनांवाच्या घराण्यांतील मुलगी. तुकारामाचें उपनांव आंबिले.[२] बाल्होबास फार दिवस मूल नव्हतें; तेव्हां आपणास संतान द्यावें, हें तो नेहमीं विठोबाच्या पायापाशीं मागणें मागे. पुढें ईश्वरी कृपेनें त्यास तीन मुलगे झाले. थोरल्याचें नांव सावजी.

---

१. तुकाराम आपल्या आजोळीं म्हणजे लोहगांवीं नेहमीं जाई व कीर्तन करी. तेथें तुकारामाचें स्वतंत्र मंदिर आहे.

२. श्रीक्षेत्र नाशिक येथील उपाध्ये " गायध्वनि " यांचे वहींत तुकोबाचे पुत्र 'नारायणबोवा' यांच्या हातचा पुढीलप्रमाणें लेख आहे. " ली. नारोबा गोसावी पीते तुकोबा गोसावी महादजी ( गोसावी ) विठोबाचे पुत्र उवोबा रामजी गणेश गोसावी गोविंद गोसावी महादजीचे पुत्र आबाजी चु. कान्हाबा गोसावी त्याचे पुत्र खंडोबा माता अवळिबाई कुणब वाणी अडनांव आंबोले गांव देहु प्र. पुणें कुळी मोरे. "

तसेंच, श्री क्षेत्र त्र्यंबक येथील उपाध्यांचे वहींत नारायणबुवांचा पुढीलप्रमाणें लेख आहे—" नारोबा पीता तुकोबा गोसावी आजा बोल्होबा भाऊ महादादा व वीठोबा पुतने रामा व गणो व गोविंदजी चुलतभाऊ आबाजी मावा जाईबाई ज्ञा( त ) कुनबी आब( ळे ) वात देहु प्र. पुने. "

हा लहानपणापासून विरक्त होता. संसाराची यातायात यानें केली नाहीं. मधला तुकाराम. यानेंच आपल्या पूर्वजांचें नांव अजरामर केलें. धाकटा कान्हा हा संसारधंदाहि करी व शिवाय तुकोबाचे कीर्तनांत धृपदहि धरी. तुकारामास दोन बायका होत्या. पहिलीचें नांव रखुमाई; हीस दम्याची व्यथा होती. हिचें वय आठ-दहा वर्षांचें असतांच तुकारामानें दुसरें लग्न केलें. तुकारामाचें कुटुंब चांगलें खानदानीचें आणि जवळ पैसा-अडकाहि चांगला. म्हणून या वेळीं तुकारामाचे गुळवे या आडनांवाच्या एका धनाढ्य सावकाराच्या लेकीशीं लग्न झालें. हिचें नांव जिजाई. ही अर्थात् तुकारामाची दुसरी बायको. तुकारामाच्या गळ्यांत त्याच्या बापानें संसाराची माळ अडकविली तेव्हां त्याचे वय अवघें तेरा वर्षांचें होतें व त्या वेळीं त्याच्या घरची स्थिति उत्तम होती.

मातापिता बंधू सज्जन । घरीं उदंड धनमान्य ।
शरीरीं आरोग्य लोकांत मान । एकहि उणें असेना ।।

असें महीपतीबुवा सांगतात. एवंच, तुकाराम लहानपणापासून सुखांत आणि श्रीमंतींत वाढला होता.[1] तुकोबानें संसार हातीं घेतल्यावर ही स्थिति कांहीं दिवस टिकली. पण पुढें थोड्या दिवसांत म्हणजे त्याच्या वयाच्या १७-व्या वर्षी तुकारामाचे आईबाप वारले. वडील भावाची बायकोहि वारली. बायको मेल्यावर दुसऱ्याच वर्षी त्या दुःखानें त्रासून जाऊन वडील भाऊ सावजी हा घर सोडून तीर्थाटनास चालता झाला. यामुळें आधार म्हणून वडील भावाचें छत्र होतें तेंहि गेलें. तरीदेखील

---

१. तुकोबांच्या नातवाच्या हातच्या एका लेखांत व श्रीशिवाजी महाराज यांच्या एका आज्ञापत्रांत देहू येथील महाजनकीची वृत्ति तुकारामाच्या घराण्यांत पुरातनची असल्याबद्दल उल्लेख आहेत. या घराण्याचें देहूंत एक घर असून शिवाय एक वाडाहि होता, असा लेख आहे. तुम्हांस वैराग्य कसें प्राप्त झालें, असें शिष्यमंडळीनें विचारिल्यावरून सांगितलेला 'याति शूद्रवंश केला व्यवसाय' वगैरे अभंग तर प्रसिद्धच आहेत.

सावजीच्या मागें सुमारें चारपांच वर्षें तुकाराम हा आपल्या दोन्ही स्त्रियांसह संसार करून, व्यापारधंद्यांत निमग्न राहून आयुष्य आनंदानें घालवीत असे. या वेळीं त्याला काळहि अनुकूल होता. तुकारामानें थाटलेला संसार पाहून त्याच्या आईबापांना व सोयऱ्याधायऱ्यांना कौतुक वाटे.

ज्येष्ठ कनिष्ठ दोन्ही भार्या । आणि संसारही आंवरी तुकया ।
ऐसी स्थिती देखोनिया । माता पितया संतोष ।।

घरचें महाजनकीचें वतन, यामुळें लोकांत वजन थोर, व्यापारांत लाभ यामुळें हातीं पैसा उमाप, दाराशीं नोकर-चाकर, गोठ्यांत गुरेंढोरें, शेजेला दोन भार्या, पोटीं पुत्र सुलक्षणी, यापरतें इहलोकीं सुख तें कोणतें! पण हा सुखाचा काळ फार दिवस टिकला नाहीं. ही घडी हळूहळू विघडूं लागली. व्यापारांत तोटा येऊं लागला. एक साल दुष्काळ पडला. त्यांत तर होतें नव्हतें तें सर्व गेलें. कुटुंबवत्सल तुकारामाचा पाय आंत येऊं लागला. पुन्हां व्यापार थाटावा, मोडलेली घडी पुन्हां बसवावी, या हेतूनें चार व्यापाऱ्यांनीं मदत दिली. पण व्यापार करणार तुकशेट. त्यांना बरकत येणार कोठून! एके वेळीं व्यापाराचा माल विकून हातीं पैका आला, त्याचीं त्यांनीं सोन्याचीं कडीं विकत घेतली. घरीं येऊन दाखवितात तों कसलें सोनें आणि कसलीं कडी! पितळेवर मुलामा देऊन तो दागिना केलेला होता, असें दिसून आलें. पदरचा पैसा गेला. लोकांत फजिती झाली, आणि बायकोच्या तोंडची शिव्यांची लाखोली नफ्यांत मिळाली. व्यापारी नालायक व बावळा म्हणूं लागले असतील तें वर. तुकोबांनीं होतें तें राखलें नाहीं, तें नवीन काय कमावणार! लवकरच बोभाट झाला आणि तुकशेटीच्या दुकानांत दिवा लागला.

'सावकार पिशुन आणि खळ । गृहासी पातले जैसे काळ ।'

अशी मरणप्राय स्थिति प्राप्त झाली.

पदरचा पैका गेला, पत गेली आणि ज्यांनीं सुखांत व अब्रूंत रात्र दिवस काढले त्यांस आतां मध्यान्हींची पंचाईत पडण्याची वेळ आली!

'दुष्काळें आटिलें, द्रव्यें नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥
लज्जा वाटे जीवा, त्रासलों या दुःखें। वेवसाय देखें तुटी येतां ॥'

असें तुकोबा स्वतःच सांगतात. खरें आहे. अंतकाळापेक्षां मध्यान्ह-काळाच्या यातना मोठ्या कठीण आहेत. या दुष्काळांत धारण इतकी कडाडली कीं, एक होनास एक पायली धान्य विकूं लागले, व भल्या-भल्या प्रतिष्ठित कुटुंबांसहि अन्नान्नदशा आली. याच काळास तुकारामाचा संतू या नांवाचा एक मुलगा होता, तोहि मरून गेला. धन-द्रव्य तर पूर्वींच गेलेलें होतें. पण कुठें दोन गुरेंढोरें दारीं होतीं तींहि आणखी मरून गेलीं. कहर इतका उसळला, आणि स्थिति इतकी खालावली कीं, जगण्यापेक्षां मरण बरें, असें होऊन गेलें. आपलें तोंडहि कोणास दाखवूं नये, असें तुकारामास वाटूं लागलें. ते सांगतात —

प्रिया पुत्र बंधु। यांचा तोडिला संबंधु।
सहज जालों मंदु। भाग्यहीन करंटा ॥
तोंड न दाखवें जना। शिरे सांदी, भरे रानां।
एकांत तो जाणा। तयासाठीं लागला ॥

अशा विपत्तीनें कोणीहि खचेल; मग तुकारामासारखा श्रीमंतींत जन्मलेला, सुखांत वाढलेला, आरामांत राहिलेला असा मुलगा गडबडून गेला, तर त्यांत नवल कशाचें! त्याला दुनिया शून्यवत् व भयाण भासूं लागली; आणि त्याच्या डोक्याला चोहोंकडे वणवा पेटलेला दिसूं लागला. नामदेवाप्रमाणें कांहीं एखाद्या विशेष प्रसंगामुळें पश्चात्ताप झाला, व त्यामुळें तुकारामानें आपला संसार आणि व्यवहार सोडला, असें झालें नाहीं. तर संसारानें आणि व्यवहारानेंच तुकारामाला सोडिलें व आपल्याकडून त्याचें मन परतेल, असें केलें. परमेश्वराच्या मनांत जें करावयाचें असतें, त्याची तयारी तो आधींपासून करतो; तेंच येथें झालें. उसळलेल्या कहरामुळें तुकाराम करपून गेला. ज्या वस्तु पूर्वीं सुखाचीं साधनें होत्या, त्याच आतां दुःखाचीं कारणें होऊं लागल्या.

पहिली स्त्री मायेच्या कळवळ्याची, ती अन्न-अन्न करीत मरून गेली. दुसरी स्त्री जिजाई ही श्रीमंत सावकाराची मुलगी. हौसेसाठीं केलेली. नवऱ्याजवळ संपदा होती, तोपर्यंत सर्व ठीक होतें. पण आतां विपत्ति आल्यावर तीच त्रासाला कारण झाली.

तोंवरी तोंवरी धैर्याची ती मात। संसारीं आघात पडला नाहीं।।

पण आतां संसारांत आघात एकावर एक कोसळले, आणि मग तुकारामाच्या मनाला वैताग आला; व संसाराविषयीं त्याचें मन अगदीं विटून गेलें. आपत्तीच्या धगधगीत इंगळांनीं संसारावरील प्रीतीचे, आणि मोहाचे सर्व अंकुरसुद्धां जळून खाक झाले, आणि अशा भाजलेल्या जमिनीत ईश्वरोपासनेचें बीं आपोआपच रुजूं लागलें. अविवेची रात्र सरून गेली व ज्ञान-भास्कराचा अरुणोदय झाला. गांवांत एक देवाचें देऊळ होतें तें मोडकळीस आलें होतें. तें दुरुस्त करावें, असे विचार तुकोबाच्या चित्तांत आले, व त्यानें तसें करण्यास सुरुवात केली. आणि चार लोकांच्या साह्यानें तें काम पुरें केलें. देवळांत एकादशीस कीर्तन होत असे. तेथें तुकाराम यापुढें नियमानें जाऊं लागला.

आरंभीं कीर्तना। करी एकादशीं। नव्हते अभ्यासीं। चित्त आधीं।।

परंतु पुढें हळूहळू हाहि अभ्यास होऊं लागला. आणि मग

कांही पाठ केली संतांचीं उत्तरें। विश्वासें आदरें करोनिया।।

थोडेंसें पाठांतर झाल्यावर कीर्तनांत हरिदासांच्या मागें उभें राहून तुकाराम धृपद धरूं लागला. यामुळें बहुश्रुतपणा सहजच आला, व जुन्या साधुसंतांचे ग्रंथ ऐकण्याची व वाचण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. एकनाथी भागवत व नामदेवाचे अभंग यांचीं तो पारायणें करूं लागला. त्याच्या मनानें संसाराची बाजू साफ सोडली व तें तेथून मुरडून ईश्वरचरणांकडे वळलें. पूर्ववयांतील वृत्ति पार पालटून गेली आणि जुने छंदहि सर्व सुटले.

'परद्रव्य परनारी। झाली विषाचिये परी।।'

कांहीं दिवसांनीं तुकारामाचें मन संसाराविषयीं पुरें विटलें व मग

वृथा उपाधीस आणि आशेस मात्र कारण, असें मानून त्यानें घरचीं खतें, चोपड्या वगैरे सर्व कागदपत्र होते ते इंद्रायणींत बुडवून टाकिले; आणि परमेश्वराच्या ठायीं चित्त एकाग्र होण्यास साधनीभूत असा जो एकांतवास तो त्यानें पत्करिला. नित्य सकाळीं उठून विठ्ठलाची पूजा करावी आणि मग गांवाजवळील भांडार पर्वतावर बसून एकाग्र चित्तानें ग्रंथाचें पठन व मनन करावें असा त्यानें क्रम धरिला; व

शेंडीस बांधोनियां दोरी। निजहस्तें टांगी वरी।
म्हणे मानेसि आंसडा बैसल्यावरी। निद्रा दुरी पळेल ॥

अशा दृढ निश्चयानें त्यानें अनेक ग्रंथांचा अभ्यास सुरू केला. आधींच स्मरणशक्ति उत्तम व बुद्धिहि कुशाग्र आणि अध्ययनाचा असा दांडगा निदिध्यास, यामुळें तो लवकरच चांगला विद्वान् झाला व त्याच्या मनांत स्फूर्ति उत्पन्न झाली.

संतांचा सहवास घडत चालला आणि तुकारामाचें मन ईश्वरोपासनेकडे जास्त-जास्त वळूं लागलें. चार सुहृद्, सोयरे आणि इष्ट होते त्यांनीं कांहीं निषेध केला. पण तिकडे बिलकुल लक्ष न देतां आपला हाच क्रम तुकारामानें चालू ठेविला.

वृक्षवळी आम्हां सोइरीं वनचरें। पक्षीयें सुस्वरें आळवीती ॥ धृ० ॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास। नाहीं गुण दोश आगायेत ॥ १ ॥
आकाश मंडप प्रुथुवी आसन। रमे तेथें मन क्रीडा करूं ॥ २ ॥
कथा कुमंडळ देहे उपचारा। जाणीवी तो वारा अवस्वरू ॥ ३ ॥
हरीनामें भोजन प्रवडी वीस्तार। करुन यां प्रकार सेऊं रुचीं ॥ ४ ॥
तुका म्हणे होये मनासीं संवाद। आपलाची वाद आपल्यासी[1] ॥ ५ ॥

अशा मनाच्या स्थितीनें तो राहूं लागला. थोडे दिवसांनीं एकांतवासाचा छंद कमी होऊन तो चार लोकांत येऊन भजन करूं लागला. पंढरीची वारी तुकाराम पूर्वीपासूनच करीत असे. पण आतां उठतां बसतां सर्व ठायीं व सर्व काळ तो भजन आणि कीर्तन करूं लागला. संसाराचें वारें

---

१. तुकारामाच्या वंशांतील वहींतल्याप्रमाणें हा अभंग दिला आहे.

पार उडून गेलें व बुवाचें मन विठ्ठलचरणीं दृढ झालें. पूर्वार्ध संपून तुकारामाच्या आयुष्याच्या उत्तरार्धाला यापुढें सुरुवात झाली.

यापुढें संसाराची व बायकामुलांची आस्था तुकारामानें मुळींच केली नाहीं. घरांत होतें नव्हतें तें सर्व गेलेंच होतें; आणि घरहि मोडकळीस आलें होतें. ' केळीवर नारळी आणि घर चंद्रमौळी ' अशी स्थिति होती. तरी तुकोबा तिकडे ढुंकूनहि पाहत नसे. घरांत चिमणीला घालण्यापुरतेंहि दाणे नसत व जिजाई—हिचेंच नांव आवली—हिला मुलें खाण्यासाठीं तडतडा तोडीत. घरांत समृद्धि असली म्हणजे मुलें दिलें तरी खात नाहींत; पण जरा कांहीं नसलें कीं त्यांना दुप्पट भूक लागते, आणि तीं आईबापांना वेवतावून सोडतात. अशीच अवस्था आवलीची झाली.

काय तरी देऊं तोडतील पोरें। मरती तरी बरें होतें आतां ॥
कांहीं नेदी वाचों बोवियलें घर। सारवया ढोरशेण नाहीं ! ॥
किती सर्वकाळ सोसावें हें दुःख। किती लोकां मुख वासूं तरी ! ॥

असें वाटून तिला उद्वेगाचे आंसडे येत आणि तिचे डोळे पाण्यानें भरून जात. तिची आपदा पाहून कोणीं कांहीं दिलें किंवा आवलीनें शेजारपाजारच्या आयाबायांकडून कांहीं आणिलें तर तेंहि तुकाराम घरांत टिकूं देत नसे; कोणास तरी देऊन टाकी. एक दिवस बायको अंग धुण्यास बसली होती आणि आपलें ढुंगणाचें धडूत तिनें वाळत लाविलें होतें. इतक्यांत गांवची महारीण मागण्यास आली. तिला तुकोबानें तें धडूत देऊन टाकिलें. त्याच वेळीं सोयरे आंवतणें देण्यास आले. तेव्हां आवली पाहते तों धडूत नाहीं आणि दारांत सोयरे उभे. या वेळीं आवलाईला धरणी पोटांत घेईल तर बरें होईल, असें होऊन गेलें.

अशा स्थितींत या संसाराचा वेल मांडवावर चढावा कसा ! तुकारामाचें लक्ष घरांत काडीभर नसे. तो सारा वेळ टाळ कुटीत बसे. त्याचा आवलीला संताप येई. तुकाराम आणि त्याचे बरोबर भजन करून नाचणारे गांवांतले दुसरे लोक यांच्या नांवानें ती सदासर्वदा खडे फोडी.

न करवे धंदा । आईता तोंडी पडे लोंदा ।।
उठीतें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ।।
जिवंतचि मेले । लाजा वाटोनिया प्याले ।।

असें ती म्हणे. पण तुकाराम तिकडे बिलकुल लक्ष देत नसे. केव्हां-केव्हां तर तो तिची निर्भर्त्सनाच करी. ती कांहीं बोलली तरी तें याच्या गांवींहि नसे. सारा काळ याचा विठोबाच्या भजनाचा सपाटा चालू राही. थोडेच दिवसांत

'जैसा कां जागृतीचा मोळा । स्वप्नहि तैसेंच दिसे डोळां ।'

या न्यायानें तुकारामाच्या मनाला दृष्टांत झाला व स्वप्नांत येऊन सद्गुरूनें कृपा केली आणि स्वप्नांतच 'राम कृष्ण हरी' हा षडक्षरी गुरुमंत्र सांगितला[1].

याप्रमाणें गुरूचा उपदेश झाल्यावर थोडेच दिवसांत श्रीविठोबांनीं आणि नामदेवांनींहि[2] स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, आतां काळ व्यर्थ दवडूं नको, आणि नामदेवाची अपुरी राहिलेली 'शतकोटी अभंगांची प्रतिज्ञा' पुरी कर. ही आज्ञा मानून यापुढें तुकाराम हा जिकडे-तिकडे कथाकीर्तनें करूं लागला.

'तुका म्हणे मज । धाडिले निरोपा । मार्ग हा सोपा । सुखरूप ।।'

असा हा देवाचा निरोप घेऊन भागवत-धर्माचा सोपा मार्ग अनाथ-दुबळ्यांना दाखवून देण्यासाठीं

'गर्जूं हरीचे पवाडे । मिळवूं वैष्णव वागडे । पाझर काढूं रोकडे । पाषाणामध्यें ।।

अशी प्रतिज्ञा करून भक्तीचा डांगोरा पिटीत, भवरोगाचें

---

१. या मंत्रांत विठोबाचा उल्लेख नाहीं, व पहिलेंच नांव रामाचें आहे. तुकारामानें रामचरित्रपर अनेक अभंग केलेले आहेत. पण ते हल्लींच्या गाथ्यांत दिलेले आढळत नाहींत. संताजीच्या वहींत असे कांहीं कांहीं अभंग आहेत.

२. नामदेवा पाईं । तुकया स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटी । राहिलासे । तसेंच, नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येवोनियां ।।

औषध सर्वांना सांगत तो हिंडूं लागला. मेघ गर्जून पाऊस पाडूं लागला, म्हणजे खडक, पाषाण, शेत, माती हीं जशीं तो निवडीत बसत नाहीं, त्याप्रमाणेंच तुकाराम कांहीं आवड-निवड न करतां भाविकांना आणि अभाविकांना, सुजनांना आणि दुर्जनांना सारखाच एक उपदेश करूं लागला. तो सर्वांना एकच सांगे कीं,–

सांपडे हा देव, भाविकांचे हातीं । शहाणे मरती, तरी नाहीं ॥
चित्त रंगलिया चैतन्यचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥
जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा, भाक माझी ॥

तो सभोंवतालच्या श्रोत्यांना पुन्हां-पुन्हां विठोबाची शपथ घेऊन म्हणतो कीं–

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरिचीं ।।
न लागती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥
ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥
' रामकृष्ण हरी ' विठ्ठल केशवा । मंत्र हा सोपा जपा सर्वकाळ ॥

हें नामामृताचें पुराण तो सदाकाळ सर्वांस ऐकवी आणि त्या गोड रसाचें जेवण ' आपण जेवून जेववी लोकां । संतर्पण करी तुका '. या जेवणांत पंक्तिभेद नसे. येथें वाटेल त्यास बसण्याचा अधिकार होता.

ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळाही अधिकार ।
बाळें, नारी, नर । आदि करूनि वेश्याही ॥
तुका म्हणे अनुभवें। आम्हां पडियले ठावें ॥

तसेंच येथें, आपली जातपातहि सोडण्याचें कारण नाहीं.

नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म ।
आणिक न करावे श्रम । पुरे एक नाम विठ्ठलाचें ॥

चातुर्वर्ण्य-आश्रम न सोडतां, कुळाचार-कुळधर्म न टाकतां, घरींच राहून सर्वांना सारखा आक्रमितां येईल, असा हा धर्ममार्ग तुकाराम मोठ्या प्रेमानें आणि आपल्या अधिकारयुक्त वाणीनें सर्वांस सांगूं लागला.

धर्म रक्षावया साठीं । करणें आटी आम्हांसी ॥

असें तो म्हणतो.

हरिभजनीं आणि हरिकीर्तनीं आधींच ज्याची अलोट प्रीति होती, आणि जागृतींत व स्वप्नांतहि ज्याला आतां तेंच दिसूं लागलें होतें. त्याच्या वाणीला यापुढें कसे पाझर फुटूं लागले असतील, याची कल्पना कोणालाहि होईल. तो सहज स्फूर्तीनेंच आतां कवित्व करूं लागला. तुकाराम कवित्व करूं लागला, असें म्हणण्यापेक्षां तो कवित्व बोलूं लागला, असेंच म्हणणें जास्त सयुक्तिक होईल. कारण तुकारामाची कवित्वशक्ति अशी दांडगी होती कीं, तो सहज बोलूं लागला तरी त्याचे तोंडून अभंगच निघत. किंबहुना, तो बोले, असेंहि नाहीं. तर त्याच्या उचंबळलेल्या मनोवृत्तींचे उद्रेक त्याच्या मुखावाटे अभंगरूपानें सहज बाहेर फुटत, हेंच जास्त खरें.

तुकारामाचें अलौकिक कवित्व, त्याची अमृतासारखी रसाळ वाणी आणि त्याच्या मनाचा कळवळा यांमुळें त्याच्या कीर्तनास उत्तम रंग चढे व लोकांची गर्दी होई. या वेळीं त्या प्रांतांत रामेश्वरभट म्हणून एक विद्वान् ब्राह्मण होता. तो प्रारंभीं तुकारामाचा द्वेष करी. रामेश्वरभट हा जुन्या काळचा चांगला पढिक विद्वान् होता. तो मराठी भाषेची आणि तींत रचना करणाऱ्या एकंदर ग्रंथकर्त्यांची फार अवहेलना करी. तो कर्मठ असून कडकडीत वृत्तीनें राही. तुकारामासारख्या शूद्रानें कीर्तन करावें आणि ज्ञानापेक्षां भक्तिमार्गाचें स्तोम माजवावें, याचा त्याला फार राग येई. हें त्याला पाखांडपणाचें वाटे. हें तुकारामाचें करणें त्याला अगदींच खपलें नाहीं, म्हणून त्यानें गांवच्या दिवाणांत फिर्याद देऊन गांवच्या पाटलाकडून याचा बंदोबस्त केला, व त्याला गांवांतून निघून जाण्याविषयीं ताकीदहि देवविली. त्या वेळीं

काय खावें आतां ? कोणीकडे जावें ?। गांवांत रहावें कोण्या बळें ? ॥
कोपला पाटील गांविचे हे लोक। आतां घाली भीक कोण मज ? ॥

अशी तुकोबाला काळजी पडली व चिंता उत्पन्न झाली, आणि शेवटीं

---

१. रामेश्वरभटाचा वंश हल्लीं वाघोली व बहळ येथें आहे. याचें घराण्यांत जोशीपण अजून चालतें.

त्यानें लोकांच्या त्रासानें त्रासून जाऊन 'जनाचीया बोलासाठीं' आपल्या आजपर्यंत केलेल्या अभंगांच्या सर्व वह्या गांवाजवळील इंद्रायणी नदींत बुडवून टाकिल्या. हें कृत्य पाहून लोक तुकोबास म्हणूं लागले कीं, पूर्वी खतें, चोपड्या बुडवून स्वार्थाचें साधन बुडवून टाकिलें; व आतां परमार्थ जोडून कवित्व केलें होतें, तेंहि बुडवून टाकिलें. एवंच, तुकोबा दोन्ही बाजूंनीं आतां साफ धुतले गेले; आणि वर हें गांवकऱ्यांचें बोलणें ऐकून ते आणखी खिन्न झाले. ते उद्विग्न होऊन एका दगडाच्या शिळेवर तेरा दिवस स्वस्थ पडून राहिले. असें सांगतात कीं, तेरा दिवसांनीं कागद (फुगून?)[1] वर आले तेव्हां तुकोबाला मोठा आनंद वाटला व ते पुन्हां भजन व कीर्तन करूं लागले. या वेळीं तुकोबाला देवाचें प्रथम सगुण दर्शन झालें. पुढें लवकरच रामेश्वरभट हा तुकाराम-बुवांस शरण गेला व त्यांच्याबरोबर भजन आणि कीर्तन करूं लागला. हळूहळू तो इतका वळला कीं, तुकारामाच्या शिष्यवर्गांतल्या उत्तमांत तो मोडूं लागला आणि माळेंतल्या चवदा टाळकऱ्यांपैकीं एक झाला. त्याला तुकोबाच्या साधुत्वाची व कडकडीत वैराग्य-वृत्तीची साक्ष उत्तम पटली.

यापुढें थोडे वर्षांनीं 'मंबाजी गोसावी' या नांवाचा दुसरा एक इसम देहूंत राहूं लागला होता. तोहि तुकारामाचा फार द्वेष करी. त्यानेंहि देहूचा कुळकर्णी महादजीपंत देशपांडे याच्याकडे तुकारामाविरुद्ध तक्रार केली होती. या गोसाव्यानें एके दिवशीं तुकारामाच्या कीर्तनास लोक फार जातात म्हणून वाटेवर कांटे घालून ठेवले होते व ते झाडून काढले म्हणून तुकारामास फार मार दिला. शेवटीं हाहि तुकारामास शरण गेला व त्यानेंहि त्याचें शिष्यत्व पत्करिलें.

तुकारामाची कीर्ति हळूहळू वाढत चालली व त्याचा लौकिक सर्वभर पसरला. तुकारामाच्या मनाची स्थिति आतां अशी होऊन गेली कीं, त्याला विठ्ठलसेवेपरतें जगांत कांहींच आवडेना.

---

१. हल्लीं देहूस इंद्रायणींतून वर आलेल्या म्हणून ज्या वह्या दाखवितात, त्या तुकोबाच्या हातच्या नाहींत.

गाईन तुझें नाम । ध्याईन तुझें नाम । आणीक न करी काम । जिव्हा मुखें ॥
पाहेन तुझे पाये । ठेवीन तेथें डोये । पृथक ते काये । न करी याणीं ॥
तुझेचि गुणवाद । आइकेन कानीं । आणिकांची वाणी । पुरे आतां ॥
करीन सेवा करीं । चालेन पाइं । आणिक नवजे ठाईं । तुजवीण ॥
तुका म्हणे जीव । ठेविला तुझ्या पाईं । आणिक तो काई । देऊं कवणा ॥

(संताजीची वही)

अशी त्याची अवस्था होऊन राहिली.

तुकाराम स्वतःचे घरीं तर नेहमीं कीर्तन करीच, पण कीर्तनाला कोणीहि घरीं किंवा देवळांत बोलाविलें तर तेथेंहि तो मोठ्या प्रेमानें जाई.

कीर्तन करण्याला तुकारामाला फारशी सामग्री लागत नसे. खांद्यावर एक वीणा आणि हातांत एक टाळ किंवा चिपळ्यांचा जोड एवढें असलें म्हणजे त्याला पुरे होई; व एवढ्या सामग्रीवरच तो आपल्या रसाळ वाणीनें सर्व श्रोत्यांस भक्तिरसाचें भरतें आणी[1]. तो कीर्तन करतां करतांच क्षणांत अभंग रचून म्हणे. जे अभंग आज दोन-तीनशें वर्षांनंतरदेखील कोणाहि मनुष्याचे तोंडून ऐकले असतां मनाला इतका आनंद देतात, ते अभंग प्रत्यक्ष तुकारामाच्या तोंडून ऐकले असतां, ऐकणारांच्या मनाला कसा आनंद देत असतील, व त्यांचा श्रोत्यावर केवढा परिणाम होत असेल याची कल्पना कोणासहि सहज होईल.

'ऊर्ध्व पुंड्र भाळीं । कंठीं शोभे माळ' असा हा वैष्णव वीर हातीं

---

१. कीर्तनास उभा राहिल्यावर मागें जे टाळकरी उभे राहत त्यांपैकीं चौदा असामी तुकारामाच्या विशेष प्रेमांतले होते व त्यास हे सर्वजण गुरुस्थानीं मानीत.

१. निळोबाराय, २. रामेश्वरभट, ३. गंगाराम मवाळ, ४. संताजी जगनाडे, ५. महादाजीपंत कुळकर्णी, ६. शिवबा कासार, ७. अंबाजीपंत, ८. कोंडोपंत लोहकरे, ९. मल्हारपंत कुळकर्णी, १०. मालजी लाडे, ११. गवरशेट वाणी, १२. कान्होबा, १३. नावाजी माळी, १४. कोंडपाटील.

वीणा घेऊन कीर्तनाला उभा राहिला म्हणजे 'आनंद सर्वथा। डोलतसे'. कथेला सुरुवात झाली म्हणजे 'प्रथमारंभीं मंगलाचरणीं। हरिस्मरणें गर्जवी वाणी' आणि मग कीर्तनाला रंग चढून त्याचा नाद गगनांत कोंदून गेल्यावर

जैसे मेघ वर्षतां साचार। अगणित उठती तृणांकुर।
कां सागरीं येती अपार। संख्या न करवे तयांची।

असे प्रेमपाझर फुटत, व श्रोत्यांना सात्त्विपणाचे उमाळे येऊन

संशय न राहे कोणाचे मनीं। खळ तेही होती भाविक॥

तुकाराम मोठा पंडित होता, असें मुळींच नाहीं. किंवा त्याला संस्कृत भाषा नीट अवगत होती, असेंहि नाहीं. त्याचें ग्रंथपठनहि फारसें दिसत नाहीं. ज्ञानेश्वरी, नामदेवाचे अभंग, एकनाथी भागवत व रामायण इतकेच ग्रंथ त्यानें अभ्यसिलेले दिसतात. याशिवाय गीता, विष्णुसहस्रनाम, तसेंच साधारण बहुश्रुत मनुष्याच्या कानावर असणारे भर्तृहरीचे वगैरे श्लोक, कांहीं सुभाषितें, क्वचित् कबीर वगैरेंचे दोहरे त्याला येत असत. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ यांच्या ग्रंथांचें पठन व मनन त्यानें उत्तम केल्यामुळें ते ग्रंथ त्याच्या अंगांत चांगले मुरलेले होते. यामुळें त्याच्या अभंगांत त्यांतील वाक्यें जवळ-जवळ तशींच्या तशींच अवतरलेलीं दिसतात. हा पदिक विद्वान् नव्हता हें खरें, पण याची बुद्धिमत्ता फार दांडगी होती व वाणीहि कांहीं कमी नव्हती. जें काम एखाद्या जाडया पंडितालाहि साधणें कठीण, तें काम आपल्या प्रेमळ वाणीनें उरकण्याचा त्यानें सपाटा लावला. पांढरपेशे हिंदुलोक तर अभंगरचना करून पंढरीस नाचूं लागले होतेच. परंतु त्याच्या उपदेशानें शूद्र, अतिशूद्र व प्रत्यक्ष अविंधहि पंढरीस नाचूं लागले आणि त्यांस त्यानें पंढरीची दीक्षा दिली. पूर्वींपासून पंढरीचें माहात्म्य कांहीं थोडें नव्हतें. पण तुकारामाच्या वेळेपासून तें फारच वाढलें. इतरांस जसें काशीरामेश्वर, तसेंच या भागवत-धर्मानुयायांस पंढरपुर झालें. किंबहुना, रामेश्वरापेक्षांहि एका दृष्टीनें पंढरी श्रेष्ठ म्हणावी लागते. पंढरी

एकदेशीय नाहीं. पंढरीचा देव सर्वांचा. त्याच्या जवळ पंक्तिभेद नाहीं. रामेश्वराचें पाद्यपूजन सर्वांस घडत नाहीं. त्याच्या नुसतें समीपहि पाहिजे त्यास जातां येत नाहीं. तेथें भेदाभेद फार आहे. पण पंढरीस तसें नाहीं. पंढरीस हा लहान, हा मोठा, तो नीच, तो उच्च, हा प्रकार संपतो. ज्ञान, विद्या आणि बुद्धि यांचीहि थोरवी पढरीस फारशी नाहीं. ज्यानें उठावें त्यानें गळ्यांत तुळशीमाळा घालावी आणि हातीं टाळ घेऊन विठोबाच्या भजनास लागावें. तेथें एकनाथासारखा ब्राह्मण असो, कीं चोखामेळ्यासारखा अतिशूद्र असो, फार काय, पण शेख महंमदासारखा अविंध असो, सगळे सारखेच. पंढरीस जातिभेद आहे. पण जातीमुळें द्वेष नाहीं. उंचनीचपणाहि नाहीं. वैष्णव वीर म्हटला म्हणजे त्याच्या पायांवर सर्वांनीं मस्तक ठेवावें. तो जातीचा कोणीहि असो, त्याची कृति आणि भक्ति मात्र निर्मळ असली म्हणजे झालें. तेथें वर्णाची, ज्ञानाची किंवा पैक्याची थोरवी नाहीं. ‘ नाम द्यावें, नाम घ्यावें ’, असा तेथें नामाचा आणि भक्तीचाच अवघा बाजार भरून राहतो; आणि हें पाहून कोणाच्याहि डोळ्यांला प्रेमाश्रु येतात. देवाच्या आणि भक्ताच्या मध्यें जो एक भेदाचा पडदा असतो, तो उत्कट भक्तीसरसा फाटून जातो; आणि मग कवाड उघडून जाऊन देव सगुण रूपानें आपल्या भक्ताच्या डोळ्यांपुढें उभा राहतो; व भक्त गोड सेवासुखाचा आणि त्याच्या साहचर्याचा अनुभव घेऊं लागतो. तो जें जें इच्छितो, तो जें जें कल्पितो, तें तें प्रत्यक्ष घडून येत आहे, असें त्याच्या मनाच्या अनुभवास येऊं लागतें. ज्ञान आणि तर्क हीं येथें लुलीं पडतात. विश्वास, प्रेम आणि पूर्ण भक्तिभाव यांचा येथें पाऊस पडतो. ही गोष्ट एका पंढरीस घडते तशी ती इतरत्र घडत नाहीं. आणि म्हणून तेथल्या संतांनीं व कवींनीं निर्माण केलेल्या वाङ्मयांत कदाचित् ज्ञान सांपडावें तितकें सांपडणार नाहीं. कदाचित् तर्कवितर्कांच्या कसोटीलाहि ते ग्रंथ फारसे उतरणार नाहींत. पण त्यांच्यांत भक्तीचा जिवंत झरा आढळेल. भाविकाचें मन तेथें स्पष्ट उमटलेलें दिसेल व ते ग्रंथ

म्हणजे संसारांत तापलेल्या आणि गांजलेल्यांसाठीं बांधिलेली धर्मशाळा व आरामवटिकाच आहे, असें दिसून येईल व सर्वांस तेथें विश्रांति मिळेल.

पंढरीस भक्त आपलें मस्तक पंढरीनाथाच्या प्रत्यक्ष पायांवर ठेवतो. आणि त्या अनाथांच्या नाथाच्या चरणस्पर्शाचा अनुभव घेऊं शकतो. 'जीवींचा जिव्हाळा। पाहूं आपुलिये डोळां' असा ध्यास लागलेल्या भाविकाला येथें पंढरीनाथाला जवळ जाऊन डोळे भरून पाहतां येतें व भेटतांहि येतें व मग 'मेळवितां अंगें अंग। प्रेमरंग वाढतो'. आणि मग

विठ्ठल माउली। प्रेमपान्हा पान्हाइली ॥
कुरवाळूनी लावी स्तनी। न वजे दुरी जवळुनी ॥
प्रेमळाचे अवघे लाड। पुरवितो कोड पांडुरंग ॥

काशी आणि पंढरी या दोहोंमध्यें अंतर फार आहे. काशी ही मोक्षवापी आहे, पंढरी ही मोक्षगंगा आहे. काशीच्या वापींत खोल पाण्यामध्यें श्वास कोंडून, बुड्या मारून, तळ काढावा लागतो आणि मग तेथें विश्वनाथाचें दर्शन घडून मोक्षाच्या मार्गास जातां येतें. पण पंढरीस हे श्रम नकोत. तेथें मुक्तिसरितेचा पाट सारखा वाहत राहिला आहे. मानवी देहांचीं क्षेत्रें शिंपून तेथें मोक्षाचे मळे लावण्याला ज्ञान-वापीपेक्षां ज्ञानगंगाच फार सोयीची असणार, हें उघड आहे. पहिल्याला किती सामग्री आणि केवढी खटपट पाहिजे ! ! हा नरदेहाचा

मळा शिपावया लागुनी। मोट पाट उपाय दोन्ही ॥
मोटा काढिजे विहीरवणी। बहुत कष्टोनि। अत्यल्प ॥
मोट नाडा बैल जोडी। अखंड झोडितां असुडीं।
येतां जातां वोढा वोढी। भोय भिजे थोडी। भाग एक ॥
तैसा नव्हे सरितेचा पाट। एक वेळ केल्या वाट।
अहर्निश घडघडाट। चालती लोट जीवाचे ॥

ही गोष्ट लक्षांत आणून ज्यांनीं सोपा भागवतधर्म पढविला त्यांचे उपकार स्मरून तुकोबा म्हणतात—

गोदेकांठीं होता आड । करूनी कोड कवतुक ।।
देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जीवना पें ।।
राखोनियां होतों ठाव । अल्पजीव लावुनी ।।
तुका म्हणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांती ।।

भक्तिमार्गी विठ्ठलभक्त हे जातिभेद बिलकूल मानीत नाहींत, असा एक समज दिसतो, पण तो खोटा आहे. ते जातिभेद मानतात. इतकेंच नव्हे, तर तो पाळण्याकडेच त्यांचा रोख असतो. विठ्ठलभक्त, वारकरी, चातुर्वर्ण्य विसरत नाहीं. ते पुसून टाकण्याची सोय त्याचे जवळ नाहीं. तो जातिभेदाची तीव्रता कदाचित् फार कमी मानील. स्पर्शास्पर्शाचा प्रकार तो विसरून जाईल, पण अगदीं अभेदतत्त्व त्याला व्यवहारांत पटणार नाहीं. बेटीव्यवहाराला तर तो केव्हांच कबूल होणार नाहीं. तुकोबांनीं सांपडले ते मुलगे धरून आणिले व अंगाला हळद लावून आपल्या मुलींचीं लग्नें करून दिलीं; पण हे मुलगे आपल्याच जातीचे पाहिले, हें विसरतां कामा नये. कोणाहि वारकऱ्यानें आपल्याहून भिन्न जातीच्या कुटुंबांशीं बेटीव्यवहार केल्याचें उदाहरण आढळत नाहीं. व्यवहारांत आणि समाजांत जातींची अवश्यकता त्यांना मान्य आहे; पण परमेश्वराच्या पायापाशीं या जातीची थोरवी फारशी राहत नाहीं, हाच त्यांचा आशय आहे. या भागवत धर्मानुयायांनीं आपल्या दैवताची भक्ति करण्याची अविंधासहि मोकळीक दिली व हिंदूंतल्या जातिभेदाचा तीव्रपणा कमी केला. परमेश्वराच्या भेटीचा मार्ग सोपा आहे आणि साळ्याभोळ्यांना व अज्ञजनांनाहि तो सहज सांपडेल अशी सर्वांची खात्री करून दिली. या वेळीं भोळे लोक मुसलमानी धर्माचा एका पायरीवरचा प्रकार पाहून तिकडे वळूं लागले होते. कांहीं लोक अविंधांनाच गुरुपद अर्पण करून त्यांच्या नादानें नादावून हिंदु संस्कृतीचा उपमर्द करूं लागले होते. हे अपाय टाळून चातुर्वर्ण्याबद्दल हिंदुसमाजांत फूट पडूं न देतां, या अर्धवट माणसांस आपल्या साधुसंतांनीं व कवींनीं हिंदुसंस्कृतीची ओळख करून देऊन त्यांस तिचें

महत्त्व शिकविलें, ही यांची मुख्य कामगिरी होय.

तुकारामाच्या अभंगांत विशेष गोष्ट ही कीं, ते वाचीत असतांना तुकोबाची मूर्ति आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते. प्रत्येक अभंगांत, किंबहुना, यांच्या प्रत्येक शब्दांत, त्याची व्यक्ति आपणांस दृग्गोचर होते व आपणांशीं प्रत्यक्ष तुकाराम महाराज बोलत आहेत असा भाव उत्पन्न होतो. दुसरे कवि आपल्या पात्रांकडून किंवा आपल्या व्याख्यानांतील प्रमेयांमार्फत वाचकाच्या मनाला जाऊन मिळतात. पण येथें तसा प्रकार नाहीं. कवि प्रत्यक्षच वाचकाबरोबर बोलतो, व काय सांगणें तें आडपडद्याशिवाय स्वच्छ समोरासमोर सांगतो; आणि यामुळेंच याच्या शब्दांचा प्रत्यक्ष परिणाम विशेष होतो. याशिवाय दुसरें असें कीं, तुकारामाच्या प्रासादिक वाणीमध्यें मराठी भाषेचें जें एक विलक्षण मनोहर व साधें स्वरूप आढळतें तें इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं. सोप्या व साध्या शब्दांनीं मनावर ठसेल असा उपदेश करणें, तसेंच प्रसंगीं राग, त्वेष इत्यादि विकारांचे श्रोत्यांच्या मनांत काहूर उभें करणें, किंवा एखाद्या निंद्य गोष्टीची अवहेलना करून तिजबद्दल तिटकारा उत्पन्न करणें या सर्व गोष्टी यानें आपल्या अभंगांत लीलेनें साधल्या आहेत. तसेंच, याचे दृष्टांत आणि दाखले हृदयास जाऊन भिडतील, असेच आहेत. बोलणें पाटीभर आणि अर्थ चिमूटभर, असा प्रकार याच्या अभंगांत कोठेंहि आढळणार नाहीं. उलट इतरांना पांच वाक्यें लिहूनहि जो अर्थ नीट स्पष्ट करितां येत नाहीं तो यानें पांच शब्दांतच सांगितलेला आढळेल. 'सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वताएवढें ॥' याची शब्दरचना गोड असून शब्द जसे कोंदणांत बसवावे त्याप्रमाणेंच तेजानें चमकतात व त्यांच्या बैठकीनेंच ते जास्त शोभतात. मनांतला अर्थ थोडक्यांत विशद करावा, व आपल्या कल्पनेला मोहक असें मूर्तस्वरूप द्यावें यांतच तुकारामाच्या श्रेष्ठपणाचें गूढ आहे; आणि यामुळेंच याचे अभंग आज अठरापगड जातींच्या तोंडांत कायमचे होऊन राहिले आहेत. यानें कोणतेंहि मत किंवा विषय घेऊन त्यावर एखाद्या ग्रंथाची उभारणी केली

आहे, किंवा एखाद्या सिद्धांतावर ग्रंथ लिहून व्याख्यान केलें आहे, असें मुळींच नाहीं. जसा प्रसंग असेल किंवा ज्या वेळीं जो भाव मनांत संचारला असेल, त्याप्रमाणेंच यानें अभंग करून म्हटला आहे; आणि असे सहज वृत्तीनेंच वेळोवेळीं अभंग रचिले गेल्यामुळें त्यांना तेजहि विशेष चढलें आहे. तुकारामाच्या अभंगांचे अनेक चरण महाराष्ट्रांत आबालवृद्धांच्या तोंडीं कायमचे बसले असून ते सूत्रवत् उच्चारिले आणि मानिले जातात. यामुळें तुकारामाच्या शब्दांना स्मृतिकाराच्या शब्दांचेंच महत्त्व आलें आहे. परंतु प्रसंगानुसार निरनिराळ्या वृत्ति मनांत उसळल्यामुळें अभंगांत एकपणा राहिला नाहीं; थोडाफार विरोध उप्तन्न झाला आहे. तसेंच, रचनेंत विचारापेक्षां वृत्तीचें आणि विकारांचेंच प्राबल्य जास्त, किंबहुना, मुख्य असल्यामुळें ज्ञानेश्वराच्या व्याख्यानावरून ज्ञानेश्वराच्या निर्विकल्प मनाची आणि साधुवृत्तीची ओळख पटते, तशी तुकोबाच्या अभंगांवरून तुकोबाच्या साधुवृत्तीची ओळख पटत नाहीं.

नाम न वदे ज्याची वाचा । तो लेक दो बापाचा ।।
नाम न म्हणे ज्याचे तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ।।
तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ।।

किंवा

बाईले आधीन होय ज्यांचें जीणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड ।।
कायसा ते जंत जिताती संसारी । माकडांच्या परी गारोडयांच्या ।।
तुका म्हणे पेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ।।

हे असले अभंग, 'कुंकवाची उठाठेव । बोडकाबाई कशाला !' 'जळो त्यांचें तोंड', 'मोजून माराव्या पैजारा', 'त्यांच्या तोंडावरी थुंका' असल्या शिव्याशाप आणि असले कोरडे कितीहि आवश्यक किंवा उपयोगी असले, तरी शेवटीं हे जाडेभरडेच खरे. यांत आडपडदा मुळींच नाहीं, सौजन्यहि नाहीं. शिंदळीच्या भांडणांत शोभणारे हे शब्द 'वाट कृपेची करितु । दिशाचि स्नेहभरितु । जीवातळीं आंथिरतु । जीव अपुला ।।' अशा भगवद्भक्ताच्या तोंडांत शोभत नाहीं. हें काय जगाला वळण ! ही

काय मनाची समता आणि शांति ! ज्यांनीं क्रोधाला तिलांजलि दिली त्यांनीं असें बोलावें, ज्यांनीं संसारमाया सोडिली त्यांनीं अगदीं शेवटीं वैकुंठास जातांना सभोंवतालच्या मंडळीस माझ्या बायकोला सांभाळा व माझ्यासाठीं तिचे अपराध पोटीं घाली, अशा एखाद्या संसाऱ्यासारख्या विनवण्या कराव्या, ज्यांनीं कामाचा विटाळ मानला त्याची स्त्री मरणकाळीं गरोदर असावी[2] आणि त्यांना मेल्यावर पुत्र व्हावा, हें आम्हां अनधिकाऱ्यांना विसंगत वाटतें. कदाचित् यांतहि कांहीं हेतु असेल. नाहीं कोणीं म्हणावें ! हें थोडें ज्यास्त वाहवलें. असो. तरीपण वर अभंग दिले आहेत त्यावरून किंवा वर लिहिलें आहे त्यावरून तुकारामाची वृत्ति किंवा त्यांचें साधुत्व कांहीं लवभर तरी कमी दर्जाचें होतें असा आशय बिलकूल समजूं नये. हे अभंग त्याच्या आतुरतेचे व आवेशाच्या रचनेच्या प्रकारचे खेळ आहेत. ज्यानें आपणांस काठ्यांनीं मारलें, त्या मंबाजीस दंडवत घालून ' निजांगें झाडितां कांटवण । आला शीण स्वामीसी ' म्हणून त्याचेच पाय धरावे, घर ब्राह्मणांकडून लुटविल्यावर सर्वस्वदान करून एक धडकें धडूत राहिलें तेंहि

' मी तुमची महारीण राबती । कांहीं उरलें असेल तयां हातीं ।
तरी द्यावें मज प्रती । मायबापा ॥

असें म्हणून मागितल्यावर तेंहि देऊन टाकावें, अंगावर आधणाचें पाणी ओतून फोड आले तरीहि ज्याचे मनाला विषाद वाटूं नये, अशा या

---

१. सर्व हेत झाला एक आहे मनीं । एका विनवणी तुम्ही संत ॥
आमुची ही कांता आहे तुमचे पदरीं । दया तिजवरी करावी ते ॥
आहे अचपळ तोंडें फटकळ । सोसा वरदळ मजसाठीं ॥
पसरी पदर धरी दाढी होंटी । घालावे जी पाठीं अपराध ॥
इतुक्या शब्दाचा खरा हेत धरा । उपकार करा मजवरी ॥
तुका म्हणे नेणें बोलणें मी फार ॥ करा अंगिकार तुम्ही आतां ॥

२. सडा संमार्जन तुळसीवृंदावन । देवाचें पूजन करीत जावें ॥
तुझीये गर्भीं आहे नारायण । तो तुजलागोन उद्धरील ॥
ऐसें बोलोनियां तुका पुढें चाले । सद्‌गदीत झालें हृदय तिचें ॥

महापुरुषाच्या शांत स्वभावाची थोरवी काय वर्णावी ! हा मनोनिग्रहाचा महामेरु सर्व जगाला वंद्य असलाच पाहिजे.

असो. याप्रमाणें सर्व जगाला उपदेश करण्यांत, भागवत-धर्माचा बावटा सर्वभर नाचविण्यांत आणि मराठी भाषेचा लौकिक जगभर पसरविण्यांत ज्यांनीं आपल्या आयुष्याचा विनियोग चालविला होता, अशा या महात्म्याची भेट घेण्याचें महाराज छत्रपतींच्या मनांत आलें. असें सांगतात कीं, ते कीर्तनास येऊन वसले आणि कीर्तनाच्या गजरांत

'श्रोतयांस म्हणे अवसरा । नाशवंत संसार जाईल खरा । तुम्ही विठोबाचे भजन करा । तरीच भव तरा बापानों ॥'

असें सांगून जेव्हां तुकोबांनीं विवेचन केलें, तेव्हां त्यांचे ते सुधा-रसासारखे गोड शब्द ऐकून राजाहि क्षणभर देहभान विसरला; व त्याला संसाराचा वीट येऊन त्याच्या मनानें परमार्थचिंतन करावें, असें घेतलें. अखेर बुवांनींच 'जो पेशा पत्करला तो नीट चालवावा व गोत्राह्मणांचें म्हणजे अनाथांचें आणि विद्वानांचें रक्षण करावें हाच तुम्हांस श्रेयस्कर मार्ग आहे' असें सांगून पुन्हां त्याला अंगीकृत कार्यास लाविलें. यानंतर छत्रपतींनीं तबकभर द्रव्य तुकोबापुढें ठेविलें असतां 'द्रव्य आणि धन हीं आम्हां गोमांसासमान', असें सांगून बुवांनीं त्याचा अव्हेर केला.

१. टीप– तुकारामाच्या मरणसमयीं शिवाजीचें वय विशीच्या सुमारास होतें व तो दादोजीच्या नजरेखालीं होता. आणि त्याचे पराक्रमासहि सुरुवात झाली होती. तेव्हां ही आख्यायिका अगदीं संभवनीय आहे. शिवाजी, तुकाराम, व रामदास यांचे संबधीच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. वरील आख्यायिकेवरून शिवाजीची व तुकारामाची भेट शिवाजीच्या पूर्व-वयांतच झाली असली पाहिजे, असें होतें. शिवाजीनें तुकारामाप्रमाणें रामदासांची भेट आपल्या पूर्ववयांतच निःसंशय घेतली होती, पण अलीकडे ही भेट फार उशिरा झाली, असें म्हणण्याचा बूट कांहींनीं काढिला आहे. या म्हणण्याला सर्व आधार काय, तो केशव गोसाव्यानें दिनकर गोसाव्याला लिहिलेल्या एका पत्रांतील एका वाक्याचा आहे. सदहू वाक्य असें–'राजे

[पान ३८३ पहा.]

तुकारामबुवांची सर्व रचना मराठींतच आहे; अगदीं थोडीं पद्यें व्रज भाषेंतलीं आढळतात. मराठींतली रचना बहुतेक अभंग-वृत्तांत आहे. अभंग हें वृत्त असें आहे कीं, त्याला धरबंध अगदी थोडा आहे. त्याच्या लांबीला तर अगदींच सीमा नाहीं. दोनपासून दोनशें चौकहि एकाच अभंगांत येऊं शकतील. चौक म्हणण्याचें कारण असें कीं, अभंगाच्या एका ओळींत चार चरण असतात व या चार चरणांचा एक चौक होतो; पण या चरणांना अक्षरांचा, मात्रांचा किंवा गणांचा एकहि नियम नीटसा लागू पडत नाहीं. अशा या अभंगवृत्तांत तुकोबांची रचना आहे. कांहीं थोडे श्लोक, पदें व थोड्या ओव्या त्यांनीं रचिल्या आहेत. कवित्वाच्या सुरुवातीस यांनीं 'बालक्रीडा' लिहिली असें महीपतीबोवा सांगतात, आणि तें खरें दिसतें. या बालक्रीडेच्या शंभर ओव्या असून त्यांत प्रारंभीं दुसऱ्या ओवींत 'त्याच्या कृपादानें कथेचा विस्तार । बाबाजी सद्गुरु दास तुका ॥' असा उल्लेख आहे. आपला गुरु जो बाबाजी चैतन्य त्याचा उल्लेख तुकोबांनीं फारसा केलेला दिसत नाहीं. जे दोन-चार उल्लेख आहेत त्यापैकीं एक अभंग असा:—

ज्योतिचा प्रकाश : पाहेन तुझे पाय । स्थुळामाजि काय : आहे माझे ॥
सूक्ष्मांश जरि : कारण ते आशे । निळबिंदु वशे : शामवर्ण ॥
मसुरे प्रमाण मोतियाचे परी । आहे दशवे द्वारी निजरूप ॥

---

[ पान ३८२-वरून. ]

श्रीशिवाजीराजे भोसले समर्थाचे भेटीस येणार म्हणोन लिहिलें, समजलें. राजे यांची पहिलीच भेट आहे.' एक तर हें पत्र अस्सल नसून नक्कल आहे. शिवाय, यांतील 'राजे यांची पहिलीच भेट आहे' या वाक्याचा अर्थ मंडळींनीं भलताच केला आहे. याचा खरा अर्थ असा आहे कीं, 'राजे यांची पहिलीच म्हणजे जुनीच भेट आहे. तेव्हां हा प्रसंग कांहीं मोठा अपूर्व नाहीं. आमचें येणें होण्याचें फारसें प्रयोजन नाहीं. पहिलीच, म्हणजे जुनीच; पूर्वींपासूनची. उदा. ते होय हंसगमना पहिलीच आहे. (रामदासशिष्य, रघुनाथ-पंडितकृत नलदमयंती पहा.)

१. भुजंगवृत्तांत रचिलेले श्लोक तुकोबांच्या सर्व गाथ्यांत आहेत; पण हे श्लोक कांहीं बुवांना नीट साधलेले दिसत नाहींत.

डोळिया न दिसे हातानें धरवेना। हेचि खूण जाणा संतामाजि ॥
तुका म्हणे माझे तोडिलें बंधन। सद्गुरु निधान बाबाजीनें ॥ १ ॥

सद्गुरु बाबाजीनें 'रामकृष्णहरि' हा गुरुमंत्र दिल्यावर प्रथम कांहीं दिवस तुकारामाचें मन रामचरित्रांतें रंगलें असावें, असें वाटतें. पण मनापासून त्याचें खरें प्रेम विठोबाच्याच चरणीं होते, व तो त्याच्याच नांवानें आनंदानें भजन करी.

कीर्तनाचा, ईश्वरभक्तीचा व कवित्वरचनेचा सपाटा सर्वकाळ चालू असून तुकारामबोवा पंढरीची वारी अनेक शिष्यमंडळी बरोबर घेऊन नित्यनियमानें करीत. त्यांचीं कीर्तनें पंढरीस तशीच देहूस व लोहगांवासहि नेहमीं होतें. त्यांच्या बरोबर त्यांची शिष्यमंडळी असून त्यांतहि विशेष आवडीचे असे चवदा शिष्य किंवा टाळकरी असत. यांत रामेश्वरभट वाघोलीकर हे प्रमुख होते. परंतु तुकारामाच्या तोंडून निघालेले अभंग प्रेमानें लिहून ठेवण्याचें काम प्रायः चाकणचा संताजी जगनाडे तेली हाच मुख्यत्वेंकरून करी. हल्लीं आपणांस तुकोबाच्या अभंगांची अस्सल संहिता या संताजीच्याच लिखाणांत पाहण्यास सांपडते.[३]

तुकारामानें स्वतःचें वर्णन

---

१. रामहरे रामहरे रामहरे रघुराजहरे ॥ राम जपतां बीजमंत्र नळां ? सिंधु तरतो ज्याच्या प्रतापें शिळा। कंठ सीतळ जपतां शूळपाणी। राम जपतां अविनास भोवानी ॥ तारक मंत्र श्रवण कासी। राम जपतां वाल्मिक ऋषि। अहिल्या जेणें तारिशी रामें ॥ वेश्या परलोका नेली नामें। ध्यान जपजीवन मुनीजन। तुकया स्वामी रघुनंदना ॥

(संताजीची वही)

२. महीपतीबोवा म्हणतात, देहूमधील लोकांपेक्षां लोहगांवच्याच लोकांची तुकोबा यांच्या ठिकाणीं विशेष पूज्यबुद्धि होती.

'मथुरेसी कृष्ण जन्मला पाही। परी गोकुळीच्या सुखासी पार नाहीं। तैसा तुकयाचा प्रेमा सर्वहि। लोहगांवीं लूटिला ॥'

३. संताजीच्या वह्यांत तुकारामाच्या कांहीं कांहीं अभंगांत पाठभेद [पान ३८५ पहा.]

'वस्त्रावीण काया झालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ रोडके हातपाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥'

असें शिवाजीस पाठविलेल्या उत्तराच्या एका अभंगांत केलें आहे[1]; पण तुकारामाच्या सांप्रदायिकांपैकीं कचेश्वरभट ब्रह्मे (शक १६००–१६५०) यानें तुकोबाचें स्वप्नांत पाहिलेलें रूप खालील-प्रमाणें वर्णिलें आहे.

देखिलें रूप जैसे, तेंचि पाविजे तैसे । सांवळें रूप बापा, याचें लागलें पिसें ॥
वर्तुळ दोंद पोट, नेत्र नासिका नीट । देखिल्या दंतपंक्ती, लघु आरक्त ओंठ ॥
उंच ना ठेंगणे हो, ध्यान हेंचि राहो । मानसीं कचेश्वरा, गुरू तुकोबा राहो ॥

हाहि लेख काल्पनिकच आहे, हें उघड आहे. पण यावरच समाधान मानणें भाग आहे. कारण तुकारामाच्या शरीरयष्टीचें ज्यांत वर्णन आहे, असा दुसरा लेख उपलब्ध नाहीं.

आपण आतां हा लोक सोडून जावें, असें शके १५७२-मध्यें तुकारामास वाटूं लागलें. एक तर यापूर्वींच त्याला आपणावर ईश्वराची कृपा झाली, अशी खात्री वाटली होती. त्याच्या मनाला इहलोकची पर्वा फारशी राहिली नव्हती; व पूर्ण भक्तीनें आणि दृढ विश्वासानें मिळणारी मनाची शांतिहि त्याला मिळाली होती. स्वतःबद्दल यत्किंचितहि तळमळ उरली नव्हती. दुसरी गोष्ट अशी कीं, ज्यांचे संबंधें त्याचा अत्यंत प्रेमभाव व अलोट पूज्यबुद्धि, त्या ज्ञानेश्वर-एकनाथांनीं ही ऐहिक उपाधि टाकून शांतिसुखाच्या आनंदाचा अनुभव घेण्यासाठीं

---

[पान ३८४-वरून.]

आहेत, व कांहीं दुबार आहेत. दुबार अभंग विसराळूपणामुळें आलेले असावे. कांहीं अभंगांत पाठभेद आढळतात. यावरून असें दिसतें, कीं, तुकाराम अवसानांत येऊन अभंग म्हणूं लागला कीं, त्याचे म्हणण्यांत पाठभेद होत. आणि असें होणें अगदीं साहजिक आहे.

१. हा अभंग निःसंशय बनावट आहे (मुमुक्षु वर्ष २, अंक ४ पहा.) तरी पण इतकें म्हणतां येतें कीं, ज्या अर्थीं वारकऱ्यांना हे अभंग संमत आहेत त्या अर्थीं त्यांचे माहितीप्रमाणें काया वर उल्लेखिल्याप्रमाणेंच होती.

आपण होऊन हा लोक सोडल्याची कीर्ति त्याचे कानांवर होतीच. तेव्हां आपणहि तसेंच करावें, हें साहजिकपणें त्याचे मनांत आलें. हांतरुणावर खितपत पडून मृत्यूनें आपणांस गांठावें, त्यापेक्षां आपण होऊन ही काया सावरून ईश्वरभजनांत निमग्न असतां हा लोक सोडावा, व देखतां-देखत निजधामास जावें, हा बेत त्याचें मनानें निश्चित ठरविला. मनानें एकदा असा संकल्प केल्यावर तुकोबा आपल्या गमनाच्याच गोष्टी बोलूं लागला; व आपल्या मागची आवराआवर करूं लागला; आतां त्याला कोणीहि 'कोठें जातां?' असें सहज विचारिलें तरी तो 'आम्ही वैकुंठास जातों', असेंच सांगे; व विचारणारांस 'तुम्हीहि आमचे बरोबर या' असें म्हणे. आपणाला देवाचा निरोप आला आहे, तो आपणास पाचारीत आहे, तो आपली वाट पाहत आहे, तो आतां हाकेसरसा आपल्या जवळ येईल, असें त्याला वाटूं लागलें. फाल्गुनांत शुद्ध दशमीस तर देव आपणास प्रत्यक्ष बोलावूं आले आहेत, असाच भास त्याला झाला. त्याचें देहभान नाहींसें झालें व तो तन्मय होऊन गेला. देव बोलावूं आला, असेंच मनास वाटून 'पाहुणे घरासी। आज आले हृषीकेशी' असें तो म्हणतो व 'काय करूं पाहुणेर। खोप मोडकी जर्जर' अशा चिंतेंत निमग्न होतो. या वेळीं घरांत काय जवळ होत्या त्या 'दरदरित पाण्यामाजी। रांधियेल्या कण्या' आणि त्याचाच त्यानें देवाजीला पाहुणेर केला. अजूनहि या गोष्टीचे स्मरणार्थ पंढरपुरास दर फाल्गुन शुद्ध दशमीस श्रीविठ्ठलाला कण्यांचा नैवेद्य दाखवितात व या दशमीला तेथें 'कण्यांची दशमी' असें म्हणतात. यानंतर त्यानें दोन दिवसांनीं म्हणजे द्वादशीस आपल्या बायकोस—जिजाईस—बोध केला व निरवानिरव सांगितली; पण तिला तें पटलें नाहीं. तेव्हां शेवटीं तिचा संभाळ करण्याविषयीं लोकांस आग्रहानें विनंती केली. पुढें रोज सर्वांचा निरोप घेत ते फाल्गुन वद्य द्वितीयेस सोमवारीं प्रातःकाळीं सर्व देहूकरांस, भक्तांस व शिष्यमंडळीस सोडून

निजधामास निघून गेले.

तुकाराम महाराज हा लोक सोडून परलोकास कसे गेले, याबद्दल थोडा वाद आहे. हा वाद अलीकडचा आहे. कारण सुमारें शंभर वर्षांपूर्वी तुकोबा विमानांत बसून स्वतःच्या देहानिशीं म्हणजे सदेह, लोकांच्या डोळ्यांदेखत हा लोक सोडून गेले, याबद्दल सर्वांचें एक मत होतें. पण जुन्या गोष्टी नवीन डोळ्यांनीं पाहण्याची सवय महाराष्ट्राला थोडीशी लागल्यावेळेपासून या मतावरचा दृढ विश्वास कमी होऊं लागला. यासंबंधें निरनिराळे तर्क पुढें येऊं लागले. परक्या लोकांत जातांना तुकोबांनीं आपली टाळ व गोधडी बरोबर नेली होती, ती पांच दिवसांनीं परत पाठविली व मध्यंतरीं पत्रेंहि लिहिलीं हें सांगणें आतां बरेंच मागें पडलें आहे. पण ते सदेह गेले, हें मात्र अजून कांहीं कांहीं लोक खरें मानतात.[1] तुकोबांच्या प्रयाणासंबंधीं जुने असे पांच लेख उपलब्ध आहेत. ते प्रथम येथें देतों.

(१) तुकोबाचे चरित्रकार महीपतीबावा म्हणतात—

"सके पंधरासें येकाहत्तर जण । विरोधी संवछर नामाभिधान ॥
फालगुण वद्ये द्वीतीया सोमवार पूर्ण । आलासे दीन चार घटीका ॥
जो जगद्‌गुरू तुका वैष्णव भक्त । तय समइ होतसे गुप्त ॥
भाविक प्रेमळ वैस्णव संत । शोक बहूत ते करीती ॥"

(२) देहू येथें पूजेंत अभंगांची वही आहे, तींत पुढील लेख आहे—

"सके १५७१ वीरोधीनां संवछरे शीमगा वद्य द्वीतीया : वार सोमवार ते दीवसीं प्रातःकाळीं तुकोबानीं तीर्थास प्रयाण केलें. शुभ भवतु: "मंगळं""

---

१. इतकेंच नव्हे, तर मेल्यानंतर पुष्कळ वर्षांनीं आपला शिष्य संताजी जगनाडे मेला तेव्हां त्यास माती देण्यासाठींहि ते पुन्हां परत आले, असेंहि कांहीं लोक मानतात; व त्याचा पुरावा म्हणून तुकारामाचा पुढील अभंग म्हणतात:

चारितां गोधन । माझें गुंतलें वचन ।
आम्हां आलें येणें । एका तेलिया कारणें ।
तीन मुठी मृत्तिका देख । तेव्हां लोपविलें मुख ।
आलें म्हणे तुका । संत नेला विष्णुलोका ॥

(३) तुकोबाचा शिष्य संताजी याचा पुत्र बाळाजी याचे वहींत त्याचे हातची पुढील नोंद आहे—

" श्री नृप सालीवाहण सके १५७२।। वीकृती नाम संवछरें फळगुण वदी २ द्वीतीया वार सोमवार ते दिवशीं तुकोबा गोसावी वैकुंठास गेले स्वदेहनसी गेळे णमस्तु: ।। "

(४) भारत-इतिहास-मंडळांत सरदार आबासाहेब मुजुमदारांनीं त्यांस निमगांव येथें मिळालेलें 'जुन टाचण' वाचलें आहे, त्यांत पुढील मजकूर आहे—

"सके १५७१ नारायेण बाबा वीष्णव गवाशेट वाणि भक्तराज ।। गवाशेट बिनवि जे औसे भाग्य नाहीं देवा । विरोधीनाम संवछरे वार सोमवार ठीक च्यार दिवस ।। आसे तुकाराम नीजे धाम मंदिर गेले अंसे ।। "

(५) खेडेबाऱ्यांतल्या एका जुन्या घरांत मिळालेल्या एका कागदावर जुनी लेखी नोंद आहे. लेख दीडशें वर्षांपलीकडला दिसतो.

श्री

स्मरण तुकोबा वैकुंठास गेले फाल्गुण वद्य द्वितीया सके १५७१ विरोधी-नाम संवछरी सोमवारीं प्रातःकाळीं गुप्त झाले, तेच दिवशीं संध्याकाळीं अभंग येक पत्र पडिलें. तृतीयेस येक च्यतोर्थीस येक पत्र पंचमीस येक पत्र येशी चार पत्रें पडिलीं. पंचमीपर्यंत घोष होत होता तो राहिला म्हणून तो दिवस मुख्य धरिला.

हे असे पांच लेख हल्लीं उपलब्ध आहेत. याशिवाय विठ्ठल-नाथापासून मोरोपंतांपर्यंत अनेक कवींचे लेख आहेत, पण ते सर्व तुकाराम सदेह स्वर्गास गेला, असेंच सांगतात. तुकारामाच्या भावांकडून व वंशजांकडून या अद्वितीय आणि सृष्टिनियमाविरुद्ध असलेल्या आख्यायिकेचा काहीं विशेष खुलासा व्हावा, पण ते तीच री ओढतात. इतकेंच नव्हे, तर त्याला आपल्या पदरचा आणखी सालापाला लावतात.

---

१. एक तत्कालीन साधू.

इतर अनेक लेखक हें स्वर्गारोहण प्रत्यक्ष घडल्याचें सांगतात, आणि पुन्हां-पुन्हां प्रपादितात.

हें या लेखकांचें म्हणणें मी प्रामाणिकपणाचें समजतों. यांत बुद्धिपुरःसर लबाडी नाहीं. मात्र हे एक पूर्णभक्तीचें अंधश्रद्धेचें आणि गचाळ बावळेपणाचें उदाहरण आहे. असो बापडें. आपण आतां या वरील पांच लेखांकडे थोडेंसें निरखून पाहूं.

वर दिलेल्या लेखांपैकीं एक लेख महीपतीच्या स्वदस्तुरच्या नोंदवहींतून मीं जसाच्या तसाच नकलला आहे. महीपतीनें हा लेख बाळाजीच्या वहींतील किंवा कदाचित् संताजीच्या वहींतील नोंदीच्या आधारें व इतर वारकऱ्यांनीं तोंडी सांगितलेल्या व प्रचलित असलेल्या दंतकथेच्या आधारें लिहिलेला आहे, तेव्हां त्याचा विशेषसा उपयोग नाहीं. पण महीपती हा तुकाराम गुप्त झाला, असें मोघम म्हणतो. हें सहेतुक असेल तर विशेष आहे.

दुसरा म्हणजे देवपूजेच्या वहींतला लेख तुकोबानें तीर्थास प्रयाण केल्याचें सांगतो. हें उघड-उघड अविश्वसनीय किंवा निरर्थक आहे. हा देव्हाऱ्यांतला लेख देव्हाऱ्यांतच ठेवावा, हें बरें. यापासून विशेष कांहीं निष्पत्ति होत नाहीं.

तिसरा म्हणजे जगनाडयाच्या लेख सर्वांत अत्यंत महत्वाचा आहे. यांत '**तुकोबा स्वदेहानिशीं वैकुंठास गेले**' असें म्हटलें आहे. चौथ्यांत ते '**निजधाममंदिरास गेले**' असें सांगितलें आहे; व पांचव्यांत ते 'गुप्त' झाले, असें सांगून शिवाय तुकोबा गुप्त झाल्यानंतरची थोडी हकीकत दिली आहे. हा लेख अनेक कारणांनीं फार मननीय आहे. तूर्त याच्या आधारें 'गुप्त' या महीपतीच्या शब्दाचा अर्थ करूं. 'गुप्त होणें' म्हणजे 'दृष्टीआड होणें'.

---

१. बाळाजीची वही ही संताजी जगनाडयाच्या वहीची अगदीं अस्सल-बरहुकूम नक्कल आहे, असें मला वाटतें.

शेवटले तिन्ही ( ३, ४, ५ ) लेखांवरून व सर्वमान्य आख्यायिकां-वरून पुढील बाबी स्पष्ट दिसतात.

१. तुकोबा ' निजधाममंदिरास ' गेले.

२. **ते स्वदेहानिशीं गेले.** आपल्या पायांनीं चालत गेले.

३. ते गेल्यावर त्यांनीं परत यावें म्हणून शिष्य व इतर लोक अट्टहास धरून बसले होते. म्हणजे ते गेले ते अशा ठिकाणीं गेले कीं, आग्रहानें विनवण्या केल्या असतां व हट्ट धरला असतां गेल्या ठिकाणाहून परत येऊन तेथें जमलेल्या मंडळीस भेटणें त्यांस शक्य होतें. असंभवनीय नव्हतें.

४. असा हट्ट धरून मंडळी तीन दिवस बसली होती. म्हणजे तीन दिवसांपर्यंत ते परत येऊं शकतील, असें वाटण्यास जागा होती, कारण होतें. पण तीन दिवसांनीं तसा संभव राहिला नाहीं. सबब सर्व निराश झाले.

५. तीन दिवस लोटल्यावर जें मिळालें त्यांत समाधान मानून मंडळी परत फिरली.

६. तीन दिवस म्हणजे पंचमीपर्यंत घोष होत होता. म्हणजे आवाज येत होता. पुढें आवाजहि बंद झाला. अर्थात् त्या दिवशीं प्राणोत्क्रमण झालें, हें सर्वांस कळलें. याकरितां तोच दिवस तुकोबा वारल्याचा कळून त्याच तिथीस पुण्यतिथि धरिली. प्राण कुडींत असल्याचें चिन्ह होतें, घोष होत होता, तोंपर्यंत ते मेले नव्हते; व तोंपर्यंत पुण्यतिथि धरणें शक्य नव्हतें. प्राण गेला त्या दिवशीं पुण्यतिथि धरिली, हें रास्तच झालें.

जगनाडे वहींत तुकोबा गोसावी वैकुंठास गेले, तेथपर्यंतच्या शब्दांनीं सर्व नोंदावयाचा तो मजकूर आला होताच; पण येथें न थांबतां जगनाडे मुद्दाम सांगतो कीं, 'ते स्वदेहानसी गेले' अंतकाळींहि त्यांस कोणीं नेलें नाहीं. ते स्वतः 'स्वदेहानसीं गेले'. सर्व लेखांचा इत्यर्थ असा कीं, तुकोबांनीं इंद्रायणीजवळ किंवा पलीकडे एक समाधिस्थान बांधविलें

होतें; व ज्ञानेश्वराप्रमाणेंच त्यांनीं तींत समाधि घेतली. आंत गेल्यावर दार बंद करून टाकिलें. तीन दिवस त्या समाधि-मंदिरांत आवाज येत होता व पंचमीचे दिवशीं आवाज राहिला व सर्व सामसूम झालें. असें झाल्यावर तुकोबांचा प्राण गेला, तेव्हां उगाच अट्टहास करून येथें बसण्यांत आतां कांहीं हाशील नाहीं, असें जाणून मंडळी घरोघर परत गेली. तुकोबा फाल्गुन वद्य द्वितीयेस बांधलेल्या समाधिघरांत गेले व पंचमीस ते निर्वाण पावले, हा इत्यर्थ दिसतो.

तुकोबांचें देहावसान कसें झालें, याचा असा तपास लावल्यावर आतां तुकोबा कधीं निजधामास गेले, याचीहि चौकशी करणें अवश्य आहे; कारण त्यांच्या निधनकालाबद्दलहि प्रचलित समजांत थोडा फेरफार करणें अवश्य दिसतो.

तुकोबांच्या निधनकालासंबंधाचे सर्व उपलब्ध व महत्त्वाचे लेख मागें दिले आहेतच, त्या सर्व लेखांत ' फाल्गुन वद्य द्वितीया वार सोमवार हा दिवस व प्रातःकाळ हा समय ' याबद्दल एकवाक्यता आहे. पण शकाबद्दल तसें नाहीं. यांपैकीं ( १ , २ , ४ व ५ हे ) चार लेख विरोधी संवत्सर आणि १५७१ हा शक देतात; व जगनाडे मात्र शके १५७२ हा शक देतात; व संवत्सर विकृति होता, असें सांगतात. याचें स्पष्टीकरण पुढें करूं.

आतां महिना, तीथ व वार हीं सर्व साधारण असल्यामुळें ग्राह्य धरणें भाग आहे; व याकरितां शके १५७०–पासून १५७३–पर्यंत फाल्गुन वद्य द्वितीयेला संवत्सर, वार व तीथ हे योग कसे येतात तें पाहूं.

| शक | संवत्सर | वार | द्वितीया घटी–पळें |
|---|---|---|---|
| १५७० | सर्वधारी | रविवार | ५०–२२ |
| १५७१ | विरोधी | शनिवार | ५४–९ |
| १५७२ | विकृत | गुरुवार | २२–२९ |
| १५७३ | खर | सोमवार | ३१–५७ |

म्हणजे वारांचा व तिथींचा योग खरा मानिला असतां शके १५७३ खर नाम संवत्सरीं फाल्गुन वद्य द्वितीयेस तुकोबांनीं हा लोक सोडिला, असें होतें.

आतां शके १५७३-मध्यें तुकोबांनीं हा लोक सोडला असें असतां संताजीचा पुत्र बाळोजी यानें १५७२ हा शक कसा दिला, याचा उलगडा होणें अवश्य आहे. संताजीनें स्वहस्तें तुकोबांच्या अभंगाच्या वह्या लिहिल्या. तो निवर्तल्यावर त्याचे चार मुलांनीं या वह्यांच्या आपसांत वांटण्या करून घेतल्या व इतर तिघांच्या बांटणीला ज्या वह्या गेल्या, त्यांच्या प्रत्येकानें नकला करून घेऊन आपआपला संग्रह पुरा केला. यांपैकीं बाळाजीनें केलेली नक्कल व ज्यावरून ही नक्कल केली ती संताजीचे हातची वही अशा दोन्ही वह्या हल्लीं उपलब्ध आहेत. या वह्या—अस्सल व नक्कल अशा दोन्ही एकमेकींशीं बारकाईनें ताडून पाहतां असें स्पष्ट दिसतें कीं, बाळाजीनें आपली नक्कल अत्यंत काळजीपूर्वक व मुळाला धरून केली आहे. फार काय, पण मुळांत जेथें पुनरावृत्ति किंवा हस्तदोष आहे तेथें बाळाजीनेंहि दुरुस्ती न करतां तशीच नक्कल केली आहे. यावरून बाळाजीनें हा मृत्युतिथीचा लेख आपल्या वहींत संताजीच्या लेखावरूनच बरोबर उतरून घेतला असावा, असें मानण्यास जागा होते. आतां संताजीनें हा लेख असा कसा लिहिला, याचा उलगडा करूं. शक व संवत्सर—किंवा एखादे वेळीं यांपैकीं एकच—गत लिहिण्याची चाल सोळाव्या शतकांत अनेक ठिकाणीं होती. शिवाजीनें गोपाळभट महाबळेश्वरकर यास दिलेल्या सनदेंतील संवत्सर (१५७४ नंदन), हा गत आहे. प्रत्यक्ष संताजीनेंहि शके १५६८ पार्थीवर संवत्सर, असें लिहिलें आहे. हाहि संवत्सर गत आहे. (संताजी गत व चालू अशा दोन्ही तऱ्हांनीं संवत्सर देतो.) तेव्हां संताजीनें शके १५७२ विकृत संवत्सर असे लिहिलें, हें 'गत' धरून लिहिलें, असें म्हणावें लागतें; व हें 'गत' म्हटलें म्हणजे चालू शके १५७३ खर फाल्गुन वद्य द्वितीया सोमवार

असें झालें. तीथ, वार, महिना हा सर्व योग १५७३ खर चालू—१५७२ विकृत गत—याशीं गणितानें बरोबर मिळतो. तेव्हां आतां मृत्युकाळ शके १५७२ विकृत संवत्सर फाल्गुन वद्य द्वितीया सोमवार हाच निःसंशय खरा आहे. महीपती व तुकारामाचे घरच्या वहीचा लेखक यांनीं संताजीची वही देखली नव्हती, असें म्हणणें प्राप्त आहे; पण या लेखकांना महिना, तीथ व वार यांची मात्र माहिती बरोबर होती आणि ती त्यांनीं दाखल केली.

जिच्याबद्दल कांहीं तरी कालनिर्देश केलेला आहे, अशी तुकाराम महाराजांच्या चरित्रांतील आणखी एक बाब म्हटली म्हणजे, त्यांस झालेला गुरूपदेश ही होय. ज्या अभंगांत ही गुरूपदेशाची हकीकत दिली आहे तो तुकारामबुवांनींच रचिला आहे आणि सुदैवानें सांपडलेल्या संताजीच्या हातच्या वहींत तो संताजीच्या हातचा लिहिलेला आहे. तो अभंग पुढीलप्रमाणें आहे.

वीठल

सते गुरुराये कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडवीळें वाटे जातां गंगे स्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला करू ॥ २ ॥
भोजना मागती तूप पाऊशेर । पडीळा विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥
कांहीं कळहे उपजला अंतराये । म्हणउनी काये त्वरा जाळी ॥ ४ ॥
राघो चैईतन्य केशो चैतन्ये । सांगीतली षुण माळीकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपुळे सांगीतळें नाम । मंत्र दिळहा रामकृस्णहरी ॥ ६ ॥
माहो शुध दसमी पाहोनी गुरवार । केळा अंगिकार तुका म्हणे ॥ ७ ॥

यांत सांगितलेला योग म्हणजे माहो (माघ) शु. दशमी गुरुवार हा शक १५६१ यांत येतो. त्या दिवशीं पहाटेपर्यंत दशमी आहे. म्हणजे तुकारामाला गुरूपदेश शके १५६१-मध्यें माघ शु. दशमीस पहाटे तो निद्रित असतां स्वप्नांत झाला असावा, असें होतें.

१. 'केशवचैतन्य—कथा—कल्पतरू' या नांवाचा ग्रंथ कोणा 'कृष्णदास
[पान ३९२ पहा.]

वैशाख वद्य द्वादशीचे दिनीं । समाधी स्वामीनीं घेतलीसे ॥
तेथूनी तीस वर्षा भेटी तुकयामी । देऊनी तयासी पूर्णपणें ॥
महिपती म्हणे जाले समाधिस्त । तुकया क्रीडित ब्रम्हानंदें ॥

यावरून गुरूपदेश शके १५२३-त झाला, असें होतें. पण हा अभंग दुसऱ्या कोठेंहि आढळला नाहीं. महीपतीबुवांचे चरित्रात्मक ग्रंथ त्यांच्या हातचे मीं पाहिले आहेत. इतकेंच नव्हे, तर यांत दिलेल्या चरित्राकरितां प्रथम लिहिलेल्या महीपतीच्या हातच्या टिपणवह्याहि मीं तपासिल्या आहेत. त्यांच्या स्वदस्तुरचीं कांहीं टिपणें या वेळीं माझ्या पुढें आहेत. पण यांत कोठेंहि वरील माहिती उल्लेखिलेली नाहीं. महीपतीबावांस ही माहिती असती तर त्यांनीं ती खास टिपणांत लिहून आपल्या ग्रंथांत दिली असती, असें मला वाटतें.

या परंपरेंत स्वप्नांत गुरूपदेश देणें ही एक साधारण बाब दिसते. तुकाराम, बहिणाबाई, महीपती वगैरेंना उपदेश स्वप्नांतच झाला आहे. असो. माघ शुद्ध दशमी गुरुवार हा योग शके १५३७ ते १५६८-पर्यंत पांच वेळां पुढीलप्रमाणें येतो.

| शक | घटी | पळें | इंग्रजी तारीख |
|---|---|---|---|
| १५३७ | २१ | २२ | १८-१-१६१६ |
| १५४१ | २५ | ४२ | ३-२-१६२० |
| १५६१ | ३९ | २२ | १३-१-१६४० |

[पान ३९१-वरून.]

वैराग्या' नें १५९६–त लिहिलेल्या हकीकतीवरून निरजनबोवा नांवाच्या लेखकानें लिहिला आहे. यांत बाबाजी चैतन्याच्या बापाचें नांव नरसिंह व आईचें लक्ष्मी असें दिलें आहे; व यांत केशव चैतन्यानें शके १३९३-त प्रजापती संवत्सरीं वैशाख वद्य द्वादशीस गुरुवारीं समाधि घेतली व त्या वेळेपासून म्हणजे समाधीनंतर शतावे अब्दीं तुकारामास उपदेश दिला, असें म्हटलें आहे. अर्थात् हें म्हणणें उघड अविश्वसनीय आहे.

तसेंच, निबधमालेंत पुढील अभग प्रसिद्ध झाला आहे.

बावाजी चैतन्य योगिराज धन्य । तुकयालागून प्रगटले ॥
शालिवाहन शकें चौदाशे त्र्याण्णव । प्रजापतिनाम संवत्सरी ॥

| शक | घटी | पळें | इंग्रजी तारीख |
|---|---|---|---|
| १५६४ | ३१ | ४३ | १९-१-१६४३ |
| १५६८ | ५५ | ८ | ४-२-१६४७ |

यांपैकीं इतर संदर्भांवरून १५४१ किंवा १५६१ शक ग्राह्य दिसतो. या दोहोंतहि १५६१ जास्त ग्राह्य वाटतो; म्हणून मीं तो वर दिला आहे.

तुकारामाच्या चरित्रांतील बाबींची संगति जुळवितांना गुरूपदेश ही एक महत्त्वाची बाब आहे. ही एक सीमेची निशाणी आहे. येथून पूर्वार्ध संपून उत्तरार्धाला प्रारंभ झाला; करितां हा काळ निश्चित होणें अवश्य आहे.

महीपतीबुवांनीं तुकारामाच्या निरनिराळ्या वयांत काय काय प्रसंग घडले किंवा निरनिराळे प्रसंग घडले त्या वेळीं तुकारामाचें वय काय होतें, हें सांगितलें आहे. संतांच्या चरित्राची माहिती जशी मिळेल तसतसे ते टांचण करीत. प्रायः हें टांचण ओवीबद्ध असे, व मग याच ओव्या ते ग्रंथांतील चरित्रांत ओवून देत. अशी एक टांचणवही मजजवळ आहे. यांत मागें मुतखड्याची हकीगत असून पुढें रोहिदासाची कथा आहे, व मध्येंच वर 'श्रीपांडुरंग' असें लिहून तुकोबाच्या लहानपणाच्या वृत्तांताच्या सतरा ओव्या दिल्या आहेत. या १७ ओव्यांवर १ ते १७ पर्यंत क्रमांक घातले आहेत. हें इतकें खुलासेवार सांगण्याचें कारण असें कीं, या सतरा ओव्यांतील माहिती लिहिण्याच्या भरांत कथा सजवितांना कांहीं तरी सांगितली नसून ही माहिती महीपतीस निराळीच स्वतंत्र अशी सांपडली व तिचें त्यानें तेवढेंच स्वतंत्र टिपण केलें. अर्थात् ही माहिती पूर्णपणें विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. यांत महीपती लिहितो:

**तेरावे वरुषी पीतीयानें। संसार गळां घातला जाण। तेथें दक्षें येतां दिसोन। समाधान वडिलासी ॥ २ ॥ सत्रावे वरुषी तत्वतां। कर्मोणी गेली मातापिता ॥ वडील बंधूंची जे कांता। तेहि अवचितां निमाली ॥३॥ मग अठरावें वरुषीं जाण। सांवजी गेला तीर्थाटणा। त्याच्या वियोगें करोनी नाना। शोक निजमना वाटत ॥ ४ ॥ वीसावीयांत पुत्रकांत**

स्वमेव। देखोनि धरिली संसारी हांव। येथूनि मन वीटवावें। मग देवाधि-देव काय करी ॥ ५॥ येकवीसाव्यांत विपरीत काळ। तुकयासी पातला तात्काळ। तेव्हा निघताची दिवाळें। सोयेरे सकळ हांसती॥ ६॥ ...स्त्री निश्चित। तेही निमाली आंन्न आंन्न करित। माहांमाहो पुत्र भरत॥ लौंकिकि विपरीत हे वार्ता॥ ७॥ पूर्वार्ध संपलें ऐशा रिती। ई०

ही वयाच्या तेराव्या वर्षापासून एकविसाव्या वर्षापर्यंतच्या ठळक गोष्टींची नोंद झाली. याच वेळीं दुष्काळ पडला ('यातिं शूद्रवंश इ.' तुकारामाचा अंभग) व दिवाळें निघालें. आणि दिवाळें निघाल्यानंतर लवकरच गुरूपदेश झाला. गुरूपदेशाची वर धरलेली मिति व शके (१५६१ माघ) खरी धरली तर या सरणीनें तुकारामाचा जन्म आजपर्यंतच्या समजाप्रमाणें शके १५२९।३० हाच धरावा लागेल.

इतके दिवस तुकारामाचा जन्मशक १५३० हा अनुमानानेंच ठरवीत. हें अनुमान बांधण्याचें धोरण कोणाच्याहि सहज लक्षांत येण्याजोगें आहे. महीपतीबावांनीं तुकारामाचे आईबाप सतराव्या वर्षीं मेले, अठराव्यांत बंधु वारला, असें सांगून पुढें

एकविसाव्यांत विपरीत काळ। तुकयासी पातला तात्काळ॥

असें सांगितलें आहे; आणि नंतर

पूर्वार्ध संपलें ऐशा रिती। दुःखें देखिली नाना रीती॥

असें म्हटलें आहे. यावरून एकविसाव्यांत जर पूर्वार्ध संपलें तर त्याचें वय ४२ वर्षांचें असलें पाहिजे, असें समजून त्याच्या जन्मकालाचा शक १५३० हा धरिला आहे. कदाचित् हा शक बरोबर असूं शकेल. पण शक ठरविण्याचा हा मार्ग चुकीचा आहे.

---

१. महाराष्ट्रांत शके १५५२–मध्यें एक मोठा दुष्काळ पडल्याची नोंद पुष्कळ ठिकाणीं आहे. तसाच शके १५५५ –मध्यें अवर्षण होऊन पुन्हां दुष्काळ पडला होता.

२. तुकारामाच्या जन्मशकाच्या १४९० व १५१० अशा आणखी दोन नोंदी आढळतात. पैकीं शके १४९० हा शक रा. राजवाडे यांस सांपडलेल्या जुन्या टांचणांत दिला आहे; व शके १५१० हा शक सरंजामे–जंत्रींत दिला आहे.

आणखी एका प्रमाणाचा विचार करूं. संत बहिणाबाई ही तुकोबाची शिष्यीण होती. हिनें तुकोबास देहूस जाऊन प्रत्यक्ष पाहिलें होतें व त्याच्या सांनिध्यांत कांहीं काळ काढिला होता. प्रथम-भेटीची व पुढील अनुभवाची त्रोटक हकीकत हिनें आपल्या अभंगांत दिलेली प्रसिद्ध आहे. बहिणाबाईचा जन्म शके १५५०–मध्यें झाला होता[1]. ही आपल्या वयाच्या बाराव्या वर्षी आपल्या गुरूच्या म्हणजे तुकारामाच्या दर्शनास देहूस गेली होती, असें ती स्वतः लिहिते. यावरून ती देहूस गेली तेव्हां तिचें वय कमीत कमी बारा वर्षांचें तरी उघड असलें पाहिजे. म्हणजे ती शके १५६२–चे सुमारास देहूस गेली. ती देहूस गेली तेव्हां विठ्ठलमंदिरात 'तुकोबा आरती करीत होते' (पृ. १९ बहि० क. सं.). या वेळीं रामेश्वरभट्ट तुकोबाचा पट्टशिष्य बनला होता. परंतु 'मंबाजी गोसावी द्वेष करी जीवें' असें बहिणा लिहिते. रामेश्वरभट चरणीं लागलेला व मंबाजी अजून शरण आलेला नसून द्वेष करतो आणि दिवाणांत फिर्याद करतो, ही स्थिति शके १५६३-चे सुमारास होती, असें दिसतें. बहिणीबाई आपणांस गुरूपदेश 'कार्तिक वद्य पंचमी रविवारीं' झाल्याचें लिहिते, पण शक देत नाहीं. शके १५६२- मध्यें रविवारीं वद्य पंचमी येते. त्या दिवशीं पंचमी १ घटिका आहे. पुढें १५६९-मध्यें पुन्हां रविवारीं वद्य पंचमी कार्तिकांत येते. ह्या दिवशीं पंचमी ही पूर्ण तीथ आहे. पण बहिणाबाई ही सुमारें अकरा वर्षांची असतानां तिचे कानांवर तुकोबाची कीर्ति गेली, व पुढें लागलाच तिला त्याचा ध्यास लागून उपदेश झाला. यावरून उपदेश शके १५६२-त झाला असावा. नंतर लौकरच ती देहूस दर्शनाकरितां गेली. त्या वेळीं सोमवती अमावास्या होती. हा योग शके १५६२-चे फाल्गुनांत येतो. तसाच १५६३-च्या ज्येष्ठांत व कार्तिकांत येतो.

---

१. शत शोडसवरी द्वाविंशत काळीं ( १६२२–मध्यें ) बहिणाबाई मृत्यु पावली व मरणसमयीं तिचें वय बहात्तर वर्षें होतें. सबब १६२२-७२= १५५०, हा जन्मशक.

यावरून प्रत्यक्ष दर्शन १५६२-त अथवा फार तर १५६३-त झालें असें दिसतें. याप्रमाणें तुकारामाच्या चरित्रांतील बाबींचा थोडासा पत्ता लावितां येतो, व कांहींसें निश्चितपणें बोलतां येतें. बाकीच्या महान् भगवद्भक्त पुरुषांचें जीवनवृत्त अजून बहुतेक अज्ञातच आहे, हें एक दुर्भाग्यच आहे.

ज्ञानेश्वर महाराजांनीं चातुर्वर्ण्य-व्यवस्था कायम ठेवून यच्चयावत् हिंदू समाजाला परमेश्वरप्राप्तीचा मार्ग चोखाळून दाखविल्यापासून त्या मार्गानें जाणारे व त्याचे वाटाडे अनेक होऊन गेले. ज्ञानदेवांची शिकवण प्रत्यक्ष आश्रमधर्म न सोडतां व कडकडीत वैराग्यवृत्तीनें जवळ-जवळ संसार सोडल्याप्रमाणेंच राहून नामदेवानें सर्व लोकांस आचरून दाखविली. नामदेवाला त्याच्या उपरतीपूर्वींच मुलें-लेकरें झालेलीं दिसतात. उपरतीनंतर व वारकरी-पंथांत गेल्यानंतर मुलेंबाळें त्यास झालेलीं दिसत नाहींत. इतकेंच नव्हे, तर मुलें—बाळें, बायको, लेकी, सुना वगैरेंचा पाशहि त्यानें आपल्या मानेस अडकावून ठेविलेला दिसत नाहीं. नामदेवानंतर एकनाथानें आणखी एक पुढची पायरी गांठली. त्यानें वैराग्यवृत्तीचा पूर्णपणें अवलंब करून शिवाय संसारहि करून दाखविला. म्हणजे संसार व गृहस्थाश्रम चालवून त्यांत अंतर येऊं न देतां भागवतधर्म पाळून स्वर्गसोपानपरंपरा कशी चढावी, हें त्यानें प्रत्यक्ष आचरणानें दाखविलें; व आपल्या भागवतग्रंथांत संकीर्तन करून हें पढविलें. तुकाराम याच्याहून जरा भिन्न, पण थोडा आणखी निराळा वागला. त्यानें होऊन संसार सोडलाहि नाहीं व धरलाहि नाहीं. त्यानें अखंड वैराग्य पत्करिलें; पण आमरणान्त स्त्रीपुत्रांचीहि चिंता ठेविली आणि आपल्या वाणीनें आणि आचरणानें खळांनाहि भाविक केलें, अशी ही परंपरा आहे. आपण संन्याशाची संतति, यामुळें आपल्याला परमेश्वरप्राप्तीचा मार्ग बंद होतो, हे पंडितशास्त्र्यांचें म्हणणें सत्य नाहीं, व हें समाजाला, व्यवहाराला आणि स्वतःला अनिष्ट आहे, असें

पाहून यावर भागवतधर्माचें विनतोड रसायन वारकरी-पंथाच्या अनुपानासह ज्ञानदेवानें मोठ्या युक्तीनें तयार केलें. पण ज्ञानदेव गृहस्थाश्रमी नसल्यामुळें स्त्री, पुत्र जवळ असूनहि वैराग्यव्रत कसें चालवावें, हें त्याला आचरणांत दाखवितां आलें नाहीं. तें नामदेवानें केलें. पण वैराग्यवृत्ति सांभाळून संसार नेकीनें कसा करावा व जन-राहाटी न टाकतां कसें वागावें, याचा कित्ता नामदेवापेक्षां एकोबानें उत्तम घालून दिला. एकोबाजवळ भक्तीप्रमाणेंच विद्वत्ताहि होती. त्यानें वैराग्यवृत्ति ज्ञानानें सजवून मृदु केली. एकोबापेक्षां जास्त कडक वैराग्य, पण जास्त सौम्यवृत्ति यांचा मिलाफ, तसेंच इतर आप्तेष्टांबद्दल काळजी आणि स्वतःबद्दल बेफिकिरी हें तुकोबानें करून दाखविलें आणि याप्रमाणें या चार महाभगवद्भक्त वारकऱ्यांनीं भागवतधर्माचें मंदिर उभारून ठेविलें. हीच गोष्ट सर्व वारकरी आणि साधुसंत

**संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । त्यानें बांधिलें देवालया ॥ नामा तयांचा किंकर । त्यांनीं केला हा विस्तार ॥ जनार्दनीं एकनाथ । स्तंभ दिला भागवत ॥ भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ॥**

या अभंगानें नेहमीं सांगतात.

याप्रमाणें पायापासून कळसापर्यंत भागवतधर्माची बांधणी व उभारणी अशा प्रकारची आहे. भागवतधर्म हा महाराष्ट्रीयांनीं महाराष्ट्राच्या गरजा जाणून महाराष्ट्राच्या सोयी पाहून महाराष्ट्राकरितांच उभारला आहे. हा बाहेरून कोठून आणिलेला नाहीं. आणि म्हणूनच हा भागवतधर्म महाराष्ट्रांत जसा स्थिरावला आणि मजबूत झाला, तसा तो इतरत्र जमला नाहीं. वास्तविक पाहतां महाराष्ट्रीयांनीं उभारिलेला हा भागवतधर्म महाराष्ट्र-धर्माचेंच अव्वल रूप आहे. भागवतधर्म हा वृक्ष मानिला तर महाराष्ट्रधर्म हें त्यावर आलेलें फूल आहे. आणि या महाराष्ट्रधर्माच्या फुलापासूनच पुढें महाराष्ट्रस्वातंत्र्य हें फळ निर्माण होणारें आहे. झाडाचीं पानें, झाडाचीं फुलें आणि झाडाचीं

फळें ही तिन्ही वरवर पाहणाराला अगदीं निराळीं दिसतात आणि त्यांचा संबंधहि एकदम लक्षांत येत नाहीं. तरीदेखील हीं तिन्ही एका पानाचींच निरनिराळीं रूपें आहेत, हें सर्व शास्त्रज्ञ जाणतात. नीट पाहणारांना याबद्दल बिलकूल संशय वाटत नाहीं. त्याचप्रमाण भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म हीं सर्व एकमेकांचीं रूपें आहेत आणि तीं एकापासून दुसरें अशींच बनलीं जातात, हें अगदीं निःसंशय खरें आहे. वर सांगितलेल्या भागवतधर्माचें परिणत रूप म्हणजेच महाराष्ट्रधर्म होय. किंवा वर सांगितलेल्या भागवतधर्माच्या मंदिरापुढें स्थापिलें जाणारें मुख्य दैवत ' महाराष्ट्र-धर्म ' हें होय. याची नीट मनोभावें आराधना केली असतां त्यावरून ' महाराष्ट्र-स्वातंत्र्य ' हें ' पसायदान ' सहज मिळणारें आहे. वरील संतांनीं भागवतधर्माचें मंदिर उभारल्यावर त्यात महाराष्ट्र-धर्म या दैवताची नीट मूर्ति घडवून तिची स्थापना रामदासानें केली. रामदास हाहि वरील संतांच्याच परंपरेची पुढील पायरी आहे, हें योग्य स्थळीं दिसेलच.

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ तुकाराम व रामदास हे सर्व भागवत-धर्माचे हरिदास आहेत व त्यांच्या त्या धर्माचें अखेर साध्यहि एकच आहे. महाराष्ट्रसमाजाचें संकटपरंपरेपासून रक्षण व उच्च स्थानावर त्याची स्थापना हा या सर्वांचा एकच रोख आहे; आणि म्हणूनच हे सर्व महाराष्ट्राला सारखेच पूज्य आहेत. पण झाडाचीं पानें, फुलें व फळें हीं वस्तुतः एकच असून व त्या सर्वांचें अंतिम कार्य एकच असूनहि कारणपरत्वें तीं भिन्नभिन्न दिसतात, तसेंच या संतांचें झालेलें आहे. ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत सर्वांना जरी विठ्ठलभक्त म्हणून वारकरीपंथाचे, असें आपण म्हणतों, तरीहि त्यांतल्या त्यांत फरक दिसतोच. ज्ञानेश्वराचे मुख्य ग्रंथांत विठ्ठलाचें नांव नाहीं. इतरांचे ग्रंथांत तो जिकडेतिकडे दिसतो. अनुमानानें पाहतां ज्ञानेश्वर संन्यासवृत्तीनें राहत असावा, असें मनांत सहज येतें. पण विठ्ठल-संप्रदायाला

संन्यास नाहीं. ज्ञानेश्वर हा नाथपरंपरेंतला. हठयोगी दिसतो व योगाभ्यासाचा पूर्ण अनुभवी वाटतो; पण योगाभ्यासाची अपेक्षा किंवा परवा विठ्ठलभक्तांना दिसत नाहीं. ज्ञानेश्वराचा उत्तम आश्रम संन्यासाश्रम, तर विठ्ठलभक्तांचा उत्तम आश्रम गृहस्थाश्रम. ज्ञानेश्वर आणि त्याचे संप्रदायी मठस्थापना करितात. विठ्ठलसंप्रदायी घरें बांधितात.

भागवतपंथाचा मूळ पाया जो ज्ञानेश्वर, त्याच्यांत आणि त्याच्या पुढील पायऱ्यांत जर इतका फरक दिसतो, तर या पंथाचा मूळ देह जो तुकाराम त्याच्यांत व रामदासांत फार फरक असावा, हें साहजिक होय. थोडक्यांत निर्देश करावयाचा, तर या दोघांतील फरक पुढीलप्रमाणें मांडून दाखवितां येईल.

(१) तुकाराम संसारांत गुरफटला होता; पोराबाळांचा जंजाळ अखेरपर्यंत त्याला सुटला नाहीं. संसार आणि संतान या वस्तु रामदासानें आपणास कधींच चिकटूं दिल्या नाहींत.

(२) आपल्या आयुष्यांतील संकटपरंपरेची कहाणी तुकाराम डौलानें चारचौघांत सांगत सुटतो. रामदास आपल्यावरील संकटांबद्दल ब्रहि काढीत नाहीं.

(३) आपल्या आप्तेष्टांची चिंता तुकाराम अखेरपर्यंत वाहतो व कष्टी होतो. रामदासाला सगळी चिंता महाराष्ट्राची वाटते. तुकारामाला शेवटीं काळजी बायकोची, रामदासाला शिवाजीची आणि महाराष्ट्राची.

(४) विद्येची आणि ज्ञानाची महती एकाला फारशी नसे. दुसऱ्याला अवश्य वाटे. तुकारामाचें शिक्षण व विद्या बातावेताची होती. रामदास हा त्यांत आचार्य होता.

(५) देशाची आणि राजकारणाची कल्पनाहि तुकोबाला कधीं शिवली नाहीं. देश व राजकारण हीं आमरण रामदासाच्या नजरेआड झालीं नाहींत.

(६) लाज राखण्यापुरती कंबरेला लंगोटी लावून कदन्नावर

उपजीविका करणें हें तुकोबा महंतीचें लक्षण समजे. गरिबीच्या गादवावर बसणें हें महंताला अयोग्य आहे, असें रामदासाला वाटे.

(७) रामदासानें अकराशें मठ स्थापिले व हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत आपला पसारा पसरला. तुकारामानें कोठें मठहि स्थापिले नाहींत व पंढरीपलीकडे तो गेलाहि नाहीं.

(८) दैवी चमत्काराचें खुळसट प्रकार तुकोबा कौतुकानें मानी. रामदासाला असला भाबडेपणा तिरस्करणीय वाटे. एक दैववादी होता, तर दुसऱ्याची सर्वांत जास्त भिस्त प्रयत्नांवर होती.

(९) तुकाराम पूर्वपरंपरेच्या चकारींत चालत असे; पण रामदासाला परंपरेची चकार ठाऊकच नव्हती. त्यानें नव्या वाटा पाडिल्या व नवे मार्ग चोखाळून रस्ते बांधिले.

(१०) तुकारामाच्या शिष्यांवर त्याचा दाब नसे व त्यांना आज्ञा नसत. रामदास आपले शिष्य जरबेंत वागवी व ते चुकल्यास त्यांना खरमरीत शासन करी.

(११) तुकाराम जगाला उपदेश करी. रामदासाचा उपदेश महाराष्ट्रापुरताच होता. रामदासाला सारी तळमळ महाराष्ट्राची वाटे. त्यापुढें त्यास जग अल्प दिसे.

(१२) महाराष्ट्रानें रानावनांत दगडावर बसून टाळ बडवावे व नामामृत प्यावें, हें तुकोबारायाचें मोठें ध्येय व आग्रहाचें सांगणें. महाराष्ट्रानें आनंदवनांत सिंहासनावर बसून चांढाळ बडवावे व स्वातंत्र्यामृत प्राशन करावें, हें श्रीसमर्थ रामदास-स्वामींचें ध्येय व आग्रहाचें सांगणें.

असे हे दिसणारे फरक आणखीहि सांगतां येतील. नामदेव-एकनाथांमध्येंहि असेच भेद दाखवितां येतील; पण हे वरवरचे आहेत. वरचा भाग खरवडला तर आंतील गाभा सर्वांचा एकच दिसेल. आपापल्या मताप्रमाणें हे सर्व महाराष्ट्राची काळजी ठेवून त्याला सुखाच्या प्रांतांत नेऊं पाहतात, व जो तो एकएक मार्ग सुचवितो. पण त्या सगळ्यांचें

मन एकच आहे; आणि या सर्वांचें बोलणें, सांगणें, आणि लिहिणें एकाच धोरणाचें आहे. यामुळें यांचे ग्रंथ कळकळीनें लिहिलेले आहेत. तीं कांहीं तरी काव्यें नाहींत. ते ग्रंथ, शिक्षा-ग्रंथ आहेत. त्या महाराष्ट्राच्या स्मृति आहेत. त्या सर्वांत कळवळ्याचा निरोप आहे. त्या सर्वांत अंतिम हेतु आहे. त्या सर्वांत एक साध्य डोळ्यांपुढें ठेविलेलें आहे. हें लक्षांत आणून यांचे ग्रंथ वाचले पाहिजेत आणि त्यांचा अभ्यास केला पाहिजे. म्हणजे महाराष्ट्र-सारस्वताचा हा भाग मोठा रमणीय वाटेल व याची उपेक्षा करणें श्रेयस्कर नाहीं, अशी खात्री पटेल. महाराष्ट्र-सारस्वताच्या या भागाला दुनियेंत जोड सांपडणार नाहीं, असा तो आहे. हा महाराष्ट्रीयांना आवडेल व पटेल तितका तो इतरांना आवडणार नाहीं व पटणारहि नाहीं. मातेच्या वेणा मातेला कळतात. त्या सुइणीला काय होत! मातृस्तनांतल्या दुधाची गोडी तान्हुल्पालाच कळते. वरच्या दुधाचे हांडेच्या हांडे त्या एका घोटापुढें तुच्छ होत!



# रामदास



कुटुंबाला एकदा बरे दिवस येऊं लागले म्हणजे त्यांत एकापेक्षां एक हुशार व बुद्धिमान् मुलें निपजूं लागतात. तसेंच राष्ट्रालाहि चांगले दिवस येण्याची वेळ आली म्हणजे त्यांत चोहीकडे बुद्धिमान् व कर्तृत्ववान् पुरुष उत्पन्न होतात. मुक्तेश्वरासारखे कविकुलगुरु आणि तुकारामासारखे अलौकिक संत ज्या वेळीं महाराष्ट्रांत वावरत होते त्याच वेळीं आणखी तिसराहि एक थोर पुरुष येथें संचार करीत होता. याची ओळख महाराष्ट्राला **'रामदास'** या नांवानें आहे. पण याचें खरें नांव 'नारायण'. वर उल्लेखिलेल्या दोघांपेक्षां हा कांहीं निराळ्याच कोटीचा मनुष्य होता. याचा जन्म मौजे जांब येथें शके[1] १५३०- मध्यें कीलक संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीसे[2] म्हणजे रामनवमीचे दिवशीं माध्यान्हीस रामजन्माचे वेळींच 'टळटळीत दुपारीं' झाला, असें याचे संप्रदायी सांगतात. याच्या पित्याचें नांव सूर्याजीपंत व मातेचें नांव राणूबाई; उपनांव ठोसर. याच्या वडील भावाचें नांव गंगाधर[3]. यासच पुढें 'श्रेष्ठ' किंवा 'रामीरामदास' असें म्हणत. याचा जन्म शके १५२७-मध्यें म्हणजे नारायणापूर्वी तीन वर्षें झाला होता. दोघाहि भावांचें वय पांच वर्षांचें असतांच लहानपणीं या दोन्ही भावांच्या मुंजी झाल्या.

---

१. हनुमंतस्वामीकृत श्रीरामदासांच्या बखरीची छापील पहिली प्रत ज्या मूळ मोडी प्रतीवरून छापली गेली, त्या मूळ मोडी प्रतींतून हे शक दिले आहेत.

२. शके १५३०-चे चैत्र शु० नवमीस शनिवारीं जन्म झाला, असें दासविश्रामधामांत म्हटलें आहे. पण १५३०-चे चै० शु० नवमीस शनिवार येत नाहीं, मंगळवार येतो.

३. एका लहानशा चरित्रांत यांचेसंबंधीं 'वडिलाचें तो नाम पूर्वीं राम ठेविलें' असें लिहिलें आहे. हें खरें मानिल्यास यांस पुढें 'रामीरामदास' कां म्हणत, याचा उलगडा नीट होतो.

शके १५३४-मध्यें 'श्रेष्ठां'चें लग्न आंबेडकर देशमूख यांच्या मुलीशीं (पार्वतीबाईशीं) झालें. मुलगा मोठा झाला तेव्हां श्रावण महिन्यांत एके दिवशीं सूर्याजीपंतानें आपल्या वडील मुलास, चांगला दिवस पाहून, मंत्रोपदेश व अनुग्रह द्यावा, असा विचार ठरविला. या वेळीं धाकट्या मुलानें म्हणजे नारायणानें ऊर्फ रामदासानें मलाहि अनुग्रह द्यावा, असा आग्रह धरिला. परंतु तुजला अधिकार नाहीं, म्हणून त्याला बापानें निवारिलें व मंत्रानुग्रह दिला नाहीं. या गोष्टीची चीड येऊन नारायण हा रागानें घरांतून निघून गेला. चालतां चालतां वाटेंत नदी लागली. ती दुथडा भरून वाहत चालली होती; पण मनांत भीति न बाळगितां नारायणानें—रामदासानें—ती पोहून पलीकडे जाण्याच्या उद्देशानें तींत उडी टाकिली. प्रवाह जोराचा होता, यामुळें

तीन गांवें वाहत वाहत । गेले तों सूर्योदय होत ।
तंव एके ग्रामासमीप । ऐलथडी स्वानंदें ॥

पाहिली. तेथें एक ब्राह्मण होता; त्यास मुलाची ती स्थिति पाहून करुणा आली व त्यानें ह्यास यज्ञोपवीत आणि वस्त्र दिलें. तेथून हा मुलगा पुढें नदीचे कांठाकांठानें वाट चालूं लागला. तेव्हां त्यास 'पंचवटी' क्षेत्र

---

१. नारायण ऊर्फ रामदास हा लहानपणीं आपल्या लग्नाचे वेळीं अंतःपट धरिला असतांच, ब्राह्मण अष्टकें म्हणत होते तोंच, नंदाचा शेला दूर होण्यापूर्वींच तेथून एकदम पळाला, अशी हकीगत बखरकार सांगतात व ही गोष्ट महाराष्ट्रांत सर्वभर मानिली जाते. पण वर दिलेली हकीकत 'श्री सांप्रदायिक विविध विषय' या पुस्तकांत दिलेल्या एका लहानशा चरित्रांत दिली आहे, ती मला जास्त स्वाभाविक व खरी वाटते, म्हणून मीं तिचाच अनुवाद केला आहे. 'सावधान' शब्द ऐकून पळून गेल्याच्या हकीकतींत काव्य आहे व ती सांगण्याला आणि ऐकण्यालाहि गोड आहे. मोठ्या लोकां-संबंधीं अशा गोड काव्यमय हकीकती चरित्रकार हौसेनें सांगतात, व पुष्कळ वेळां स्वतः चरित्रनायक अशा अद्भुत हकीकती पसरविण्यास कारण होतात; पण पुष्कळ वेळां सत्यशोधनाच्या आड येऊन त्या चरित्रकारांस फसविण्यास व वाचकांस रंजविण्यास मात्र कारणीभूत होतात. वरील गोष्टीचा उल्लेख दासविश्रामधामांतहि आहेच.

लागलें. तेथें श्रीरामाचें देऊळ होतें. तेथेंच हा मुलगा राहिला. तेथेंच रहावें, श्रीरामाची पूजा आणि सेवा करावी व त्याचीच कृपा संपादन करून त्याचाच अनुग्रह व मंत्र घ्यावा, असा त्यानें पूर्ण निश्चय केला. येथें म्हणजे गोदाकांठींच पंचवटीजवळ टाकळी या गांवीं राहून त्यानें बारा वर्षें पुरश्चरण केलें. नंतर रामदासास एके रात्रीं श्रीरामचंद्राचा अनुग्रह झाला. पुरश्चरण चाललें असतांच आपल्या सभोंवती काय चाललें आहे, जगाची हाल-हवाल कशी काय आहे, हें रामदासाला दिसतच होतें; पण असें दिसतें कीं, अनुग्रहानंतर आणखी सर्व देशभर तीर्थयात्रा करीत हिंडून देशाची एकंदर स्थिति यानें नीट निरखून पाहण्याचा विचार केला; व त्याप्रमाणें तो पर्यटनास निघाला. पर्यटनांत त्याला काय दिसलें, व त्यानें काय पाहिलें, याचा कांहींसा अदमास त्याच्या ग्रंथांतल्या अनेक उल्लेखांवरून होण्यासारखा आहे.

लहानपणीं एक दिवस आपल्याच विचारांत गढून जाऊन रामदास स्वस्थ बसलेला पाहून आईनें रामदासास विचारिलें होतें कीं, 'बाबा, तूं चिंताग्रस्त बसून चिंता कोणाची करतोस?' तेव्हां रामदास म्हणाला, 'आई, चिंता करतों विश्वाची.' रामदासाच्या मनाची हीच स्थिति या वेळींहि म्हणजे पर्यटनांत असतांनाहि असावी. पर्यटनांत सारा देश उद्ध्वस्त झालेला त्याला दिसला, आणि

"देशकाल वर्तमानें । आपण चिंताग्रस्त होती मनें । म्हणती कैसी वांचतील जनें ?..............कैसी क्षेम राहील जगती ? । कैसी देव देवालयें तगती ? । कैसे कुटुंबवछल लोक जगती ? । कोणेकडे जातील हे ? ॥"

असें त्याला वाटूं लागलें.[1] मुसुलमानी अमलाखालीं सर्व लोक चुरडून

---

१. स्फुट प्रकरणांत पुढील अनुष्टुभें आढळतात—

"रडावें बोंबलावेना । लाथा बुक्या परोपरी ।
उदंड ताडणें होती । दुःख शोक विडंबना ॥

[पान ४०७ पहा.]

गेले होते; देशांत दैन्य पसरलें होतें; लोक हताश झाले होते. जिकडे-तिकडे वरवंटा फिरत होता;

बहूसाल कल्पांत लोकांसि आला ।
महर्गे बहू धाडि केली जनाला ।
किती येक मृत्यासि ते योग्य जाले ।
किती येक ते देश त्यागोनि गेले ॥
किती येक ग्रामेंचि तें वोस जाली ! ।
पिकें सर्व धान्येंचि नाना बुडालीं ! ।
..................................

---

[पान ४०६-वरून]

आधार पाहतां नाहीं । कैवारी तो असेचि ना ।
देहत्याग बरा वाटे । दुःख ब्रह्मांड जाहलें ॥
मिथ्याच सांगतो वार्ता । मेटें पोटें बळावती ।
ऐसे हे लोक सृष्टीचे । प्रवाहीं पडिले पहा ॥
करंटे मिळाले सर्वे । जो तो बुद्धीच सांगतो ।
सांगावें तें आपणाला । आपणु करितां बरें ॥
लोकांचें गोष्टिनें वर्ते । प्रत्ययो पाहिल्याविणें ।
आळसें चाळणा नाहीं । स्वता बुद्धी कळेचि ना ॥
श्वानासि लावितां लागे । तैसा तो जाणिजे नरू ॥
खरें खोटें विचारी ना । लोकांचें शिकविलें करी ॥"

ही झाली लोकांची हालत. बरें, राजा तरी नीट म्हणावा, तर त्याची गत ही अशी--

"मोठें तें पाप लोकांचें । प्रभू तो जाणता नव्हे ।
वर्ततो शिकविल्या बोलें । तो काय म्हैसमंगळू ! ॥
लाच-चोरी बहू झाली । घाला घाली परस्परें ।
धन्याला नेणवे कांहीं । बेदादी नगरी पहा ॥
धणी तो राहिला मागें । कारबारीच नासती ।
थोर पाप हें लोकांचें । सांगावें कवणापुढें ॥
खबर्दार बरा राजा । विवेकी सर्वसाक्षपी ।
आज्ञेनें सर्वहि चाले । तेणें सौख्य बहू जनां ॥
पोरांला माय जाणेना । तीं पोरें वांचती कशी ।
गुराखी राखतो गूरें । धणी दोहींस पाळितो ॥"

किती गुजिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या ।
किती शांमुखी जाहजीं फांकवील्या ।
किती येक देशांतरीं त्या विकील्या ।
किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥

असें ठिकठिकाणीं होऊन गेलें होतें; आणि शिवाय

कांहीं मिळेना, मिळेना, मिळेना, खायाला ।
ठाव नाहीं रे, नाहीं रे, नाहीं रे जायाला ॥

.....................................

जनीं ईजती हुरमती पाहों जातां कैंचीं ।
दुनिया जाली रे, जाली रे, जाली रे बळाची ॥

म्हणजे ' वळी तो कान पिळी ' अशी स्थिति होती. न्याय मुळींच राहिला नव्हता. ' न्याये बुडाला, बुडाला, जाहाली सिर्जोरी '. देशाची ही कंगाल स्थिति आणि त्यांतील लोकांच्या असह्य यातना पाहून त्यानें श्रीरामाची करुणा भाकली.

या कष्टमय स्थितीनें मन विव्हळ होऊन गेल्यावर हींतून कांहीं वाट काढण्याची बुद्धि व्हावी, हें साहजिक आहे. सर्व ज्ञातींचे गुरु ब्राह्मण. त्यांनीं कांहीं योजना करावी, तर त्यांचाच पाय ठिकाणावर नव्हता. ' दुरून डोंगर साजिरे । जवळी गेल्या दरी खोरें ' अशी त्यांची गत होती.

नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला ।
वेदशास्त्र ब्राह्मणाला । कोण पुसे ॥
ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।
गुरुत्व सांडूनि झाले । शिष्य शिष्यांचे ॥

इतकेंच काय, पण ब्राह्मणांनीं सर्वांस धर्माचरणाचे धडे द्यावे, तों धर्माचे धडे तेच नीचांकडून घेऊं लागले !

गुरुत्व आले नीच याती । कांहीं येक वाढली महंती ।
शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणांचा ॥
हें ब्राह्मणांस कळेना । त्याची वृत्तीच वळेना ।
मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥

ज्यांना खेटराशीं ठेवावयाचें, त्यांचीं खेटरें डोक्यावर घेऊन ब्राह्मण नाचूं लागले; त्यांच्या पायाची धूळ अंगारा म्हणून ब्राह्मणच कपाळीं लावूं लागले, म्हणजे मग इतरांनीं काय करावें! धर्म कोठें आणि कसा राहावा!

> कित्येक दावलमलकास[१] जाती । कित्येक पीरास भजती ।
> कित्येक तुरुक होती । आपले इच्छेनें ॥

हें साहजिकच आलें. बरें, यांतूनहि कांहीं ब्राह्मण दूर राहिले ते आपल्या ब्राह्मण्याच्या खोट्या भारानें चिरडून गेले. आपसांतच तंटेभांडणें करूं लागले. 'ब्राह्मणांस प्रामण्यानें बुडविलें' असें दासबोधांत लिहिलें आहे. एवंच, रामदासास असें दिसून आलें कीं—

> पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला । येणें करितां बहुनाला । संकट झालें ॥ माणसा खावया धान्य नाहीं । आंथरूण तेंहि नाहीं । घर कराया सामग्री नाहीं । काय करिती ॥ कांहींच पाहतां धड नाहीं । विचार सुचेना कांहीं । अखंड चिंतेच्या प्रवाहीं । पडिले लोक ॥ प्राणीमात्र जाले दु:खी । पाहतां कोण्ही नाहीं सुखी । कठीण काळ ओळखी । धरीनात कोणी ॥

बरें, जे इतर लोक स्वत:स ज्ञानी म्हणवीत, आपण गुरु समजून इतरांस 'उपदेश' देऊं धावत, स्वत: आपण आणि आपला देश बुडत आहे तिकडे लक्ष न देतां दुसऱ्यास तरणोपायाचा मार्ग दाखवूं लागत, त्यांची तरी अवस्था काय होती! त्यांना काय चाललें आहे हेंच मुळीं दिसत नव्हतें; व कंगालपणाच्या किंकाळ्या त्यांच्या कानांला ऐकूं येत नव्हत्या. आणि केव्हां आल्याच तर ते लोकांना शिकवीत कीं," बाबांनो, हें सर्व मिथ्या आहे. हा केवळ भास आहे. दारिद्र्य जितकें येईल तितकें चांगलें. त्यानें ऐहिक सुख दूर जातें पण परमेश्वराचे पाय जवळ येतात. संसार ही वस्तु वाईट आहे. त्याची चिंता करणें मूर्खपणा आहे. शहाण्यानें संसाराची होळीच करावी. बायकापोरें डोळ्यांदेखत तडफडून

---

१. या नांवाचा एक साधु खानदेशांतील मुल्हेरीचा राहणारा होता. याचे पुष्कळ हिंदू भक्त होते.

मेलीं तरी त्याचें दुखः लवमात्र मानूं नये व अशा ऐहिक त्रासांनीं मनाची शांतता बिघडूं देऊं नये. अंगभर वस्त्र लेऊं नये व पोटभर अन्न खाऊं नये. उपासतापासांची सवय करावी; आणि सारा वेळ टाळ हातीं धरून—तेहि नसले तर नुसते दगडच हातानें कुटून—तोंडानें ईश्वरनामाचा[1] जप चालवावा." असें हे संत गुरु जगाला पढवीत. ही यांची पढवणी महाराष्ट्र तीन-चारशें वर्षें सारखा पढत होता; पण त्याचा परिणाम काय झाला, हें रामदासाला दिसत होतें. पाहिजे होतें एक, आणि हे पढवीत होते भलतेंच. दुनियेभर समबुद्धि निर्माण करावी, उंदीरमांजरांची मैत्री जमवावी, ऊसभोपळ्याची जुडी बांधावी, अशासारखे या संतांचे यत्न होते. त्यांची अशक्यता रामदासाच्या डोळ्यांस स्पष्ट दिसली. एक वेळ वाऱ्याचा दोर विणून त्यानें पाण्याच्या धारांचा भारा बांधितां येईल; सावली उलथून तिची दुसरी बाजू पाहतां येईल; कदाचित् कोणाला आपल्या कोपराला लागलेला गूळ चाटून त्याचीहि गोडी चाखितां येईल; पण टाळ्यांच्या आवाजानें, आणि नुसत्या नामाच्या देवघेवीनें देशाची आपत्ति दूर होणार नाहीं, हें त्याच्या तीव्र बुद्धीनें तेव्हांच ताडिलें.

महाराष्ट्राच्या उत्तम क्षेत्रांत इतकीं वर्षें निवृत्तीचे मळे हे संत एकसारखे लावीत होते. जें पेरावें तें उगवतें. निवृत्तीच्या झाडांना प्रवृत्तीचीं फळें कोठून येणार ! तुळस कितीहि पवित्र झाली, तिची लावणी कितीहि भक्तिभावानें केली तरी आंब्याचें किंवा बांबूचें कार्य करील काय ! बसावयाला सावली किंवा टेकावयाला काठी तिच्यापासून कधींहि प्राप्त होणार नाहीं. त्याचप्रमाणें हे संत गुरु आणि ह्यांचा उपदेश उपयोगी पडण्यासारखा नाहीं, हें रामदासाच्या लक्षांत आलें; व नामरसायन ही कितीहि गुणी मात्रा असली तरी जडलेल्या रोगाला कांहीं विशेष अनुपानावांचून ती कुचकामाची आहे, असें त्याला दिसलें. यामुळेंच 'प्राणिजात तेथून सारखेच' हा उपदेश त्याला पटला नाहीं.

---

१. 'भाविकें सात्त्विकें भोळीं। त्या नामस्मरणीं रतो। विवेकी जाणते चेती॥ सारासारविचारणा॥' पंचमान.

दैन्यदु:खीं न तपे : भयशोकीं न कंपे :
देहमृत्यु न वासिपे : पातलेनी ॥

अशी मनास सवय करावी आणि

जयाचिया ठायीं : वैषम्याची वार्ता नाहीं :
रिपुमित्रा दोहीं : सरिसा पाडु ॥

असें राहून प्रत्येकानें

जो खांडावया घाव घाली : कां लावणी जयानें केली :
दोघां एकचि साउली : वृक्षु जैसा ॥
नातरी इक्षुदण्डु : पाळतिया गोडु :
गाळतिया कडू : नोहेचि जेंवी ॥

याप्रमाणें सर्व ठिकाणीं एकसारखी वागणूक ठेवावी, भेदभाव मनांतदेखील येऊं देऊं नये, ही शिकवण—उत्तमपणाचा हा कित्ता—रामदासाला आवडला नाहीं व पटला नाहीं. त्याला

'भेद ईश्वर करून गेला । त्याच्या बाचे न वचे मोडिला ।
मुखामधें घास घातला । तो अपानीं घालावा ।'

असें रामदासाचें सडेतोड उत्तर आहे. ज्यास त्वेष नाहीं, द्वेष नाहीं, सूड घेण्याइतकी ज्याच्या मनाला चीड येत नाहीं, अभिमानानें ज्याला पार सोडलें, तो मनुष्य एक जातीचा पत्थरच समजावा. मग तो आपणांस संत म्हणवो कीं महंत म्हणवो, अथवा महात्मा म्हणवो. कोणी त्याला संडासाच्या पायरीला लावोत किंवा कोणी त्याची मूर्ति घडवोत. पण मूळचा तो खराखुरा पत्थरच होय. वरील कोणत्याहि गोष्टीनें त्याच्या अंतरंगांत काडीमात्रहि फरक पडणार नाहीं.

असो. अनेक वर्षेपर्यंत स्वत: हिंडून, डोळ्यांनीं लोकस्थिति पाहून, एक नवा संप्रदाय काढून महाराष्ट्राचा उद्धार करावा, असें रामदासानें ठरविलें व तो शके १५६६-मध्यें तीर्थयात्रा संपवून परत जांबेस आला; व येथूनच त्यानें संप्रदायाचा आरंभ करून मठस्थापनेस सुरुवात केली.

महंते महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । देशोदेशीं ॥

हें त्याचें मुख्य धोरण होतें. खुळसट भोळ्या भाविकांना तो फारसें हाताशीं धरीत नसे.

'जितुका भोळा भाव । तितुका अज्ञानाचा स्वभाव ।
अज्ञानें तरी देवाधिदेव । पाविजेल कैचा ॥'

असें तो म्हणे. आपल्या सांप्रदायिकांनीं वाटल्यास घरेंदारें करून त्यांनीं संसार करावा व कुटुंबवत्सल व्हावें, यास त्याची हरकत नव्हती. किंबहुना, संसार नीट करणें हाच परमार्थाचा एक रस्ता होय, असें त्यास वाटे. संसार हा परमार्थाचा एक रस्ता होय, पण तो परमार्थ नव्हे. तें एक साधन असेल, पण साध्य नव्हे. त्यांतच गढून राहणें हें केवळ शहाणपण नाहीं. ज्यायोगें पुष्कळांचे संसार नीट नांदतील, अनेकांचे योगक्षेम चांगल्या रितीनें चालतील, सर्वांचीं मुलेंबाळें सुख पावतील, याकरितां आपल्या संसाराचा त्याग करावा, हेंच रामदासास योग्य वाटे. इतकेंच नव्हे, तर आपला संसार वेशीवर बांधून हातांत भिक्षेची झोळी घ्यावी लागली, तर तीहि घ्यावी, असें त्याला वाटे. त्यानें स्वतःचा संसार शिंक्याला टांगून हातीं झोळी घेतली होती, हें आपणांस माहीतच आहे. त्याचा व्याप फार अवाढव्य होता. त्यानें आपल्या हयातींत एकंदर अठराशे मठ स्थापन केले. या मठांतून तो मुमुक्षूंना अनेक तऱ्हेच्या विद्या पढवी. भिक्षावृत्तीपासून राजकारणापर्यंत अनेक तऱ्हेचें ज्ञान योग्यायोग्यतेचा विचार पाहून या रामदासी विद्यापीठांत दिलें जाई. येथें कोणकोणते ग्रंथ अभ्यसिले जात, याची कांहींशी कल्पना गिरिधराच्या ग्रंथावरून होईल. असें दिसतें कीं, हे मठ त्यानें धोरणानें विवक्षित ठिकाणें योजून देशभर चारी दिशांना पसरिले होते.

हीं मठांचीं ठिकाणें नकाशावर खुणा करून पाहिली असतां व दुसऱ्या अनेक मठांच्या स्थानांचा विचार केला असतां जेथें-जेथें मुसलमानी राज्यें होतीं व त्या अमलाचे वृक्ष जोरानें फोफावत होते त्या-त्या ठिकाणीं या बुवांचा मठ अवश्य असे. या सर्व मठांचें

आदिपीठ चाफळ. येथें **श्री समर्थ रामदास**स्वामी स्वतः हुजूर राहत. रामदासाचा पट्टशिष्य कल्याण याला सीना नदीचे कांठीं डोमगांव येथें मठ स्थापून दिला होता. क्रमानें दुसरा शिष्य उद्धव.—नाहीं. हें चुकलें. वास्तविक पाहतां समर्थांचा पहिला शिष्य उद्धव. यास दोन मठ स्थापून दिले होते. एक गोदेच्या पूर्वेला टाकळी येथें व दुसरा गोदेच्या पश्चिमेस इंदूर येथें. हें इंदूर म्हणजे पेशव्यांनीं आपल्या एका सरदाराची जेथें स्थापना केली तें उत्तर हिंदुस्थानांतलें इंदूर नव्हे. हें इंदूर म्हणजे मोंगलाईतलें निजामहैदराबादजवळचें इंदूर. कांहीं दिवस उद्धवानें या मठांत राहावें व कांहीं दिवस टाकळीच्या मठांत असावें, अशी गुरुजींची त्यास अनुज्ञा असे. अहमदनगराजवळ दादेगांवास देवदास यास, वऱ्हाडांत कारंजें येथें बाळकराम यास, औरंगाबादेजवळ भालगांवास त्र्यंबक गोसावी यास, असे मठ स्थापून दिले होते. तसेंच, काशीस रामचंद्र, रामेश्वरास हनुमान, गोमंतकांत गोविंद, सांवताच्या वाडीकडे संभुस्वामी या शिष्यांचे मठ होते. समुद्रकांठालाहि स्वामींचे मठ होतेच. दंडराजपुरीवर त्रिंबक गगनींची नेमणूक झाली होती. सुरतेकडे जनार्दन व द्वारकेकडे हरिस्वामी हे होते. नदीकांठ, कडेपठारें आणि डोंगरी ठिकाणें हींहि यांच्या मठस्थापनेंतून सुटलीं नव्हतीं. श्रीशैल्यशिखरावर कोदंडरामाचा मठ, बद्रिकेदारीं दयाळाचा मठ, औंढ्या पर्वतावर बल्लाळाचा, सह्याद्रीच्या डोंगरांत अनंतबुवाचा, असे अनेक मठ जिकडे-तिकडे होते. याशिवाय नारायणबुवा, चक्रपाणी, रायचूर प्रांतांतले सदाशिव, श्रीरंगपट्टणाकडे शंकर गोसावी, तेलंगणांत शिवराम यांसारखे शिष्य सर्वभर संचार करून आपल्या समर्थ स्वामीची सेवा योग्यपणें बजावीत ते निराळेच. हे मोटमोठे महंत झाले. यांची परंपरा, शिष्य-समुदाय आणि मठ, आणखी असेचे. कर्नाटक, तंजावर वगैरे प्रांतांत

---

**१. हे सगळे प्रकट शिष्य झाले. यांशिवाय—**

**'समर्थें कितेक गुप्त शिष्य केले। ते ते समर्थांसी विदित भले ॥'**

**असे होते ते निराळेच.**

तर ही परंपरा फारच फैलावलेली होती. आपल्या भाषेंतले रघुनाथ, आनंदतनय, गोसावीनंदन, माधव वगैरे अनेक चांगले चांगले कवि या तंजावराकडील रामदासी परंपेरंतलेच आहेत.

असे हे रामदासी मठ, हीं रामदासीं विद्यापीठें, हीं मुक्तिमंदिरें, हीं देवालयें चोहोंकडे उभारलीं होतीं. यांत रामनामाचा जप व रामदासी संप्रदायांतल्या विद्येचे पाठ अष्टौप्रहर चालत. रामदास आपल्या शिष्यांना नर्तन आणि गायन या ललितकला संपादण्यास सांगे. गायनाचें महत्त्व त्याला विशेष वाटे. त्यामुळे पुष्कळ गोष्टी लौकर साध्य होतात.

> आवडी सकळै लोकां । प्रीतीनें भजती जनी ।
> इच्छिले पुरविती सर्व । धन्य ते गायनी कळा ॥
> येकाकीं महंती येते । उदंड किर्ति वाढते ।
> विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनी कळा ॥
> राहती ते लोक राजी । आवडी उपजे मनीं ।
> वर्णितां कीर्ति देवाची । धन्य ते गायनी कळा ॥

असें समर्थ म्हणतात. हे मठ हाच समर्थांचा संसारपसारा होता. आपल्या शिष्यांची काळजी ते नेहमीं आस्थेनें वाहत.

'उदंड मुलें नानापरी । वडिलांचें मन अवघ्यांवरी । तैसी अवघ्यांची चिंता करी । महापुरुष ॥'

अशी त्यांची रहाटी असे. मठांतल्या शिष्यांस समर्थांची नेहमीं शिकवण अशी असे—

> 'शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ।
> उणें पडों नेदावें । कोणी येकाचें ॥
> दुसऱ्याचें दुःखें दुःखवावें । परसंतोषें सुखी व्हावें ।
> प्राणिमात्रास मेळऊन घ्यावें । बऱ्या शब्दें ॥

---

१. पण ही 'गायनी कळा' देखील नीट श्रमपूर्वक साध्य करून घेतली तर बरें; नाहीं तर दास म्हणतात—

> अर्थपुष्ट बरें गाणें । नाचणें समजोनियां ।
> उगेचि भुंकणें खोटें । गधडे भुंकती जसें ॥...
> कळा ही पुरती नाहीं । तें गाणें श्रम वाढवी ॥ (चतुर्थमान)

बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे ।
आपल्यापरीस व्हावे । पारिखे जन ।।
आलस्य आवघाच दवडावा । येत्न उदंडच करावा ।
शब्दमत्सर न करावा । कोणी येकाचा ।।
पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें ।
तरी मग कर्कश बोलावें तें । काय निमित्य ! ।।
स्वयें आपण कष्टावें । बहुतांचे सोसीत जावें ।
झिजोनि कीर्तीस उरावें । नाना प्रकारें ।।

हा धडा पढविलेले शिष्य जगाला आपल्या मुठींत कां घेणार नाहींत ! किंवा अशांच्या मुठींत जग कां राहणार नाहीं ! हा झाला एकंदर लहानसहान शिष्यांना धडा. पण जे महंत मठाधिपति होते त्यांना शिक्षण याहूनहि कडक असे[1]. रामदास म्हणतात—

जंववरी चंदन झिजेना । तत्रवरी सुगंध कळेना ।
चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ।।
बोलण्यासारिखे चालणें । स्वयें करून बोलणें ।
तयांचीं वचनें प्रमाणें । मानिती जन ।।
समुदाव पाहिजे मोठा । तरी तणावा असावा बळकटा ।
मठ करून ताठा । धरूं नये ।।

समर्थांची शिष्यसंप्रदाय वाढविण्याची तऱ्हाहि विशेष आहे. वाटेल त्यानें यावें आणि शिष्य व्हावें, असा प्रकार दिसत नाहीं. मठाधिपतींनीं शिष्य निवडून पारखून घ्यावे, अशीच आज्ञा होती. प्रमुख महंत शिष्यांना समर्थांनीं लिहिलेल्या आज्ञापत्रांत म्हटलें आहे कीं—

कांहीं समुदाव करणें । येविषीं आलस्य न करणें ।
आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थी ।।
पोहणारे बुडते तारावे । सामर्थ्यें बुडों नेदावे ।
मूर्ख ते शहाणे करावे । विवेकी पुरुषें ।।

आणि याकरितां—

सोईऱ्या धायऱ्यांची मुलें । तिक्षण बुधिचीं सखोलें ।
तयासी बोलणें मृदु बोलें । करित जावें ।।

---

१. ही एकंदर शिक्षापद्धति. पण शिवाय कांहीं शिष्यांकडे विशेष कामगिरी असे. 'समर्थप्रताप' कार म्हणतात—नाना राजकारण, दिर्घ सूचना । जनार्दन महाराष्ट्र यात्रा आणीतसे ।।

त्याचा संसारसमाचर । पुसत जावा विस्तार ।
उदंड सांगतां तत्पर । होऊन अैकावे ।।
दुःख अैकतां दुःख जातें । त्याचें दुःख हळु होतें ।
मग तें सर्वेचि धरितें । मित्रभावें ।।
निकट मित्रि बरी होतां । मग त्यासी न्यावें एकांता ।
म्हणावें,' रे भगवंता । कांहीं तऱ्हीं भजावें. ' ।।
मान्य होतां, जप सांगावा । मग तो इकडे पाठवावा ।
मग तयाचा सकळ गोवा । उगऊं आम्ही ।।

शिष्याची इतकी तयारी दिसली कीं, त्यास जपमंत्र सांगावा; आणि मग त्याची रवानगी समर्थांकडे करावी. पुढें त्याची योजना त्यांचे ते करणार. हा जपमंत्र काय होता, तो या आज्ञापत्रांत लिहिला नाहीं; आणि तो लिहिला असेल, अशी अपेक्षा करणेंहि चूक आहे. कारण—

इशारतीचें बोलतां नये । बोलायाचें लिहूं नये ।
लिहावयाचें सांगूं नये । जबाबीनें ।।

असें समर्थच सांगतात.

विशी-पंचविशी उलटून गेलेला, तारुण्याच्या पार झालेला शिष्य समर्थांना पटत नसे; व त्याला ते महंत करीत नसत. लहान, कोवळीं, तरतरीत मुलें हाताशीं धरून त्यांना ते आपल्या तालमींत तरबेज करीत; व तीं मनाजोगीं उतरलीं म्हणजे त्यांना महंत करून मठ स्थापून देत. महंतानें मठ स्थापिला म्हणजे तेथें त्यानें समर्थांनीं घालून दिलेली शिस्त पाळावी, सांगितलेलें कार्य करावें, संप्रदाय वाढवावा, अशी त्याची कामगिरी असे; व त्याला आपल्या कामाचा अहवाल स्वामीस वारंवार कळवावा लागे. महाराष्ट्रांतल्या मठाधिपतींनीं तीन वर्षांत निदान एक वेळ व महाराष्ट्राबाहेरील मठाधिपतींनीं अकरा वर्षांत एकदा स्वतः चाफळास येऊन समर्थांची गांठ घ्यावी, अशी सक्त ताकीद असे. आपल्या शिष्याजवळ ते कधीं कांहीं मागत नसत म्हणून त्यांचा वचक विशेष राही.

'आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यांसी ।। '

ही शिस्त ते स्वतः नीट पाळीत.

या शिष्यमंडळींत जसे पुरुष, तशा स्त्रियाहि होत्या. वेणाबाई, आक्काबाई या तर प्रसिद्धच आहेत; पण यांशिवाय द्वारकाबाई, गंगाबाई, अन्नपूर्णाबाई, गोदाबाई वगैरे अठरा-वीस शिष्यिणींचा उल्लेख गिरिधरानें आपल्या 'समर्थप्रताप' ग्रंथांत केला आहे. यांपैकीं कांहींनीं चांगली ग्रंथरचनादेखील केली आहे. कांहींनीं मठहि स्थापिले आहेत. या शिष्यिणींनाहि समर्थांची शिक्षा कडक असे. वाटेल तिनें वाटेल तसें वागावें, हें चालत नसे. कीर्तन करण्याचीदेखील परवानगी सर्वांना नसे.

'**वेणाबाई**'[1] वांचोनि कांहीं। इतरां कन्येसी सभेसी कीर्तनआज्ञा नाहीं। एकासनीं बैसोनि कीर्तन करणें पाही। **प्रसंगानुसारें मर्यादें** ॥ **आपाबाई** संगीत कीर्तनीं। कीर्तन करूं म्हणे राजांगणीं। **समर्थें वर्जूनि** लौकिक जनीं। आपण कीर्तन ऐकिलें[2] ॥

आपल्या शिष्य-शिष्यिणींना समर्थांची शिस्त भारी कडक असे, असें वर सांगितलेंच आहे; आणि अशी शिस्त पाळवावी आणि शिष्यांनीं ती पाळावी, असाच त्यांच्या राहणींत वचक असे. गरिबीच्या गाढवावर बसून ते दीनवाण्यासारखे हिंडत नसत. आपण महंतांचे महंत आहों; महाराष्ट्रांतील झाडून सर्व लोक हीं आपलीं लेकुरें आहेत, त्यांची काळजी वाहून त्यांचे क्लेश निवारण करण्याचें सामर्थ्य आपणांत आहे, असें पाहणारास दिसेल व पाहणारावर आपली सहज छाप पडेल, अशा थाटानें रामदासस्वामी राहत असत. त्यांची राहणी आणि त्यांचा थाट असा असे कीं, तीं देखून एखाद्या राज-राजेश्वरालाहि मत्सर उत्पन्न व्हावा. गिरिधर म्हणतात कीं, प्रत्यक्ष शिवाजीराजेदेखील समर्थांना भीत.

---

१. रामदासी संप्रदायांत 'बहिणाबाई' हें नांव वारंवार ऐकूं येतें. पण बहिणाबाईला अनुग्रह प्रथम तुकाराम महाराजांचा होता.

२. सहस्रावधी चालती वधुजनें। देवास वोवाळती निरांजनें। स्त्रियांदिकांसी दुरूनि गुरुदेवदर्शनें। नीति मर्यादा स्वामीची ॥ पुढें समर्थ स्वामी आज्ञा करिताती। स्त्रियांदिकांसी नीरांजनें वर्जिताती। नाना युगधर्म लौकिक स्थिति। मर्यादा राहिली पाहिजे ॥ (स० प्र० २०)

समर्थांची आज्ञा झाल्यावरची तर गोष्ट निराळीच, पण एकदा आपण होऊन शिवछत्रपतींनीं आपल्या सगळ्या राज्याची चिठ्ठी लिहून, तें स्वामींस अर्पण केलें. पण स्वामींनीं तें तसेंच परत देऊन आपलें म्हणून चालवावें, आणि याची खूण आपली—समर्थांची—भगवी छाटी हीच तुमची ध्वजा असावी, असा दंडक घालून दिला; आणि म्हणूनच मराठ्यांच्या राज्याला 'ब्राह्मणी राज्य' असें म्हणतात आणि मराठ्यांचें निशाण 'भगवा झेंडा' लावितात. जो शिवाजी कोणाला वीतभर जमीन देईना, त्यानें सबंध राज्य स्वामींस दिलें, आणि जो कोणाचीहि मुद्रा धारण करीना त्यानें स्वामींचें पटकूर ध्वजा म्हणून आपल्या राज्याच्या निशाणाला बांधिलें, ही एवढीच गोष्ट रामदासांची योग्यता किती होती व शिवाजी त्यांना केवढें लेखी, या गोष्टीची साक्ष देण्यास पुरे आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामींना प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून लिहिलेल्या 'श्रीसमर्थप्रताप' ग्रंथावरून असें दिसतें कीं, रामदास हे वारंवार डोईला 'केशरी पाग लपेटीत' व कपाळीं 'केशरकस्तुरीचा झगमगीत' टिळा लावीत. गळ्यांत 'सुमनमाळा' घालीत; व पायांपर्यंत पोहोंचेल अशी 'मुक्तलग मेखळा' लेत; कौपीनावरून पीतांबर कसीत; आणि करांगुळींत मुद्रिका घालीत. पायांत पादुका असत व हातांत कुबडी असे. हें गिरिधरानें काव्यांत वर्णिलेलें ध्यानं आहे. यांत कल्पनेचाहि खेळ असेल. पण यांतून खरें चित्र मनाच्या डोळ्यांना सहज दिसेल. ते वर्णानें

---

१. 'पाईं पादुका हातांत तुंबा। भर्जरी भगवी फांकली प्रभा। कटबंध कौपीन माळसूत्र शोभा। न वानवे मूर्ति साजिरी॥' असें ध्यान वेणाबाई सांगतात, आणि मनांत म्हणतात कीं:—

'तैसी मूर्ति दृष्टी पडो। तैशा पाईं वृत्ती जडो॥
ब्रह्मचारी सूत्र शिखा। पाईं शोभती पादुका॥
कटीं अडबंद कौपिन। कंठीं तुळसीमणिभूषण॥
दिव्य मुख दिव्य नेत्र। भाळीं अवाळूं सुंदर॥
रामदास दिव्य नाम। सखा ज्याचा आत्माराम॥

काळेसांवळेच होते; व त्यांच्या कपाळावर एक अवाळूं होतें. बयाबाई रामदासी म्हणतात—

' सांवळी सुरत नयनांत बैसली ।'

त्यांचें चालणें जरा भराभर असे व मागें पाठीकडे हात आडवा धरण्याची त्यांना लकब होती. त्यांची पाहणी खालीं असे; ते अखंड 'अधोदृष्टी' असत. सहज बघणाराला असें वाटे कीं, हे ध्यानस्थ आहेत व आपल्याच विचारांत मग्न असून 'दुश्चित्त' आहेत. पण वास्तविक ते तसे नसत, ते पूर्णपणें 'सावचित्त' असत. त्यांचें भाषण अगदीं थोडें असे. फार बोलणें त्यांना आवडत नसे.

थोरथोर महंतास धारकीं धरिती । श्रीगुरुमर्यादा रक्षविती सिकविती ।
भाविक भोळचा लोकांसी जवळ बैसविती । तांबूलसेवा घेती त्यांचेनि हस्तें ।।

म्हणजे मोठ्यांकडून आदब जरबेची ठेववीत, पण लहानाला ते लडिवाळपणानें वागवीत. आपल्या आज्ञेचें उल्लंघन कोणीं शिष्यानें केलेलें त्यांस खपत नसे. कोणा महंतानें त्यांच्या मंत्राचा भेद केला होता, त्याबद्दल त्यास वेताच्या छडीचा मार मिळाला. घरीं कोणीं होमहवन आरंभिलें, आणि या सबबीवर तो चाफळास उत्सवाला आला नाहीं तर तें चालत नसे; त्याबद्दल त्याला ठपका मिळे. सद्गुरुसेवा करितांना नित्यनेम टळला तरी त्याची पर्वा नसावी, अशी त्यांची शिस्त असे. गिरिधरांच्या गुरुदीक्षेंतून पुढील गोषवारा रा. देव यांनीं दिला आहे. "गुरूस दीर्घदंड नमस्कार दुरून घालावा; लाजूं नये; सद्गुरूसंनिध गलबला करूं नये; चालतांना पाय वाजवूं नयेत; त्यांच्या देखत हसूं नये, दूर उभें रहावें. जवळ बोलावल्यास सन्मुख येऊन अधोमुख उभें रहावें, ते सांगतील तें एकाग्र चित्तानें ऐकावें. वाद घालूं नये. कांहीं कमीजास्त पुसणें असल्यास एकांतीं पुसावें. स्वामींजवळ दुसऱ्या कोणाचें उणें बोलूं नये, गुरुबंधूवर प्रेम करावें........चालतांना स्वामींच्या बरोबर चालूं नये, पुढें जाऊं नये किंवा मागें राहूं नये, तर संनिध असावें. त्यांच्या चरणांकडे लक्ष ठेवून त्यांच्या मुखांतून निघतील

ते शब्द ऐकण्याकडे चित्त ठेवावें." यावरून रामदासी शिस्तीची अटकळ बांधितां येईल, असें वाटतें.

खावयास त्यांना फळफळावळें आवडत, आणि ते बहुधा तींच खात व तांबूल भक्षण करीत. त्यांचा निजावयाचा पलंग असे; पण त्यावर ते क्वचितच झोप घेत. बहुतकरून जमिनीवरच घोंगडी हांतरून तीवर ते दुपारचे वेळीं क्षणभर अंग टाकीत.

त्यांनीं सर्व कामांची वांटणी करून देऊन नीट शिस्त लावून दिली होती; व त्यांवर योग्यता पाहून नेमणुकी करून दिल्या होत्या. पुराण सांगण्याचें काम वासुदेव गोसावी यांजकडे असे. आल्यागेल्याची खबर देण्याचें काम मुसळराम गोसावी हे करीत. कोठीवरील देखरेखीचें काम दत्तात्रयस्वामी पाहत. स्वयंपाकावर आक्काबाईची नेमणूक होती. अनंत गोसावी यांनीं कीर्तनाची व्यवस्था ठेवावी. कृष्णा न्हावी यांनीं रोषनाई करावी. दिवाकरानीं देवपूजेकडे असावें. अशा प्रकारें इतर कामगिऱ्याहि वांटलेल्या होत्या.

त्यांची वृत्ति सदा उदासीन असे. म्हणजे यांपैकीं कोणत्याहि भोगानें ते बांधिले गेले नव्हते. कर्तव्य करीत असतां यश किंवा अपयश दोन्ही ते सारखेच मानीत. सुखाचा आनंद नाहीं आणि दुःखाचा कष्ट नाहीं. एक अंग मोडून मेहनत करावी व मनांत चिंता बाळगून व्यवसाय करावा, एवढेंच ते जाणीत. त्यांचें मन नेहमीं चिंतेंत आणि विचारांत मग्न असे.

श्रीगुरु समर्थ येकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शना येती ।
सकळ प्रांतींचा स्वामी परामर्श घेती । चिंता करिती विश्वाची ॥

ते सुखांत मग्न दिसत, पण त्यांच्या मनाच्या यातना कठीण होत्या. त्यांचें समर्थपण, त्यांची महंती सुखाची नव्हती. ते म्हणतात—

महंती सुखाची नाहीं । येथें दुःख उदंडही ।
उदंड दुःख लोकांचें । ऐकतां ऊर फाटतो ॥

लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती ।
पाहावें तें किती डोळां । ऐकावें श्रवणें किती ।।
वळितां दुःख मानिति । अन्यायें घात नेणती ।
सांगतां हित वाटेना । ऐकतां त्रास मानिती ।।
अखंड सर्व सोसावें । भलेंपणेंचि कारणें ।
परंतु सुख तों नाहीं । कांहीं कांहीं क्वचितही ।।

लोकांची दीनावस्था पाहून ते फार तळमळत, व मनापासून त्यांना कळवळा आणि चेव येई. आपला आधार जो श्रीरामचंद्र त्याच्या चरणींहि त्यांनी मोठ्या आतुरतेनें हेंच निवेदन केलें आहे.

क्षणभरि सुख नाहीं जन्मदारभ्य कोठें ।
कठिणची बहु वाटे लोटतें दुःख मोठें ।।
........................................ ..
बहुत विषम काळें दाटणी थोर जाली ।
म्हणउनि चरणाब्जीं वृत्ति गुंतोनि ठेलो ।।
बहुतचि सकुमारा स्वस्त नाहीं शरीरा ।
निशिदिनि जनचिंता लागलीसे उदारा ।।
सकळ जन सुखावे तो कसा काळ फावे ।
भजन जन उकावे सर्व आनंद पावे ।।

इतर दैवतांपाशींहि त्यांचें मागणें जिव्हाळ्याचें असे. तुळजापूरच्या भवानीकडे रामदास लहानपणचा एक नवस फेडण्यास गेले. त्या वेळीं ते अंबेला म्हणतात—

---

१. श्रीरामचंद्रास मात्र साष्टांग नमस्कार घालावयाचा, बाकी कोणासहि वंदन करणें तर नुसते हात जोडून नमस्कार करून करावें, असा नियम होता. एका वेळीं चाफळास दशावतारी खेळ झाला. श्रीरामावताराचा प्रवेश आला. या वेळीं रामाचें सोंग येतांच समर्थ उठून उभे राहिले. त्याबरोबर राजा, प्रधानादि इतर मंडळीहि उभी राहिली; व खेळ पुरा होईपर्यंत बसलीं नाहींत. यापुढें रामाचें सोंग खेळांत आणूं नये, असें समर्थांनीं सांगितलें. कारण, यांत रहावी तशी श्रींची मर्यादा राहत नाहीं.

येकचि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हांचि देखतां ॥
दुष्ट संव्हारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे माते । ईच्छा पूर्णचि ते करी[1]॥

असो. हें बरेंच वाढलें. पण रामदासांच्या ग्रंथांचें रहस्य कळण्याला हें सारें अवश्य होतें. ही त्यांची मनोरचना त्यांच्या लेखांची किल्ली आहे. ही ध्यानांत आली म्हणजे त्यांच्या ग्रंथांबद्दल आणखी विशेष कांहीं सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

त्यांचा सर्वांत मोठा ग्रंथ 'दासबोध'. हा त्यांच्या संप्रदायाचा 'ग्रंथसाहेब'. प्रत्येकानें हा ग्रंथ निरंतर जवळ बाळगिला पाहिजे व सर्वकाळ वाचिला पाहिजे[2]. कोठें कांहीं अडलें तर त्याचा निर्णय या ग्रंथांत काय सांगितलें असेल त्याप्रमाणेंच करून घेतला पाहिजे. या ग्रंथापुढें प्रत्यक्ष वेद आणि स्मृति यांचेंहि महत्त्व सांप्रदायिकांना कमी असे. असा हा 'दासबोध' ग्रंथ रामदासांनीं 'चारी सहस्र सातसें साठी। इतकी कलियुगाची राहटी।' म्हणजे गतकली ४७६० अर्थात् शके १५८१-मध्यें रचिला, असें त्यांत म्हटलें आहे.

---

१. परशुरामाच्या दर्शनास गेले असतां समर्थ विचारितात—
किती येक मार्गें बहू युद्ध केलें ।
किती वेळ या ब्राह्मणा राज्य दी[illegible] ॥
अकस्मात सामर्थ्य तें काय झालें ।
युगासारिखें काय नेणो विझाले ॥

२. कोणी महंत दर्शनास आला कीं, समर्थ त्याची अनेक तऱ्हांनीं चाचणी घेत. एखादे वेळीं त्याचे जवळून त्याची दासबोधाची पोथी घेऊन तिचीं सर्व पानें पिसकारून इकडचीं तिकडे अशीं लावीत व त्याचे जवळ ती पोथी मग नीट जुळविण्यास देत. त्याला ती चटकन् जुळवितां आली नाहीं म्हणजे म्हणत कीं, ग्रंथाचें पूजन मात्र झालें; वाचन झालें नाहीं.

हा ग्रंथ पाहून मनाची अशी खात्री होते कीं, सातव्या दशकापर्यंत प्रथम ग्रंथरचना होऊन दासबोध पुरा केला असावा. कारण हे सर्व समास एकटांकी, निदान एका विचारासरसें लिहिलेले दिसतात. इतकेंच नव्हे, तर सातव्या दशकांत 'सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा शेवट।' असें स्पष्टच लिहिलें आहे. म्हणजे आतां शेवटला भाग सांगून ग्रंथ पुरा करावयाचा, इतकेंच राहिलें. अर्थात् यापुढले भाग--समास--वेळोवेळीं लिहून या ग्रंथास जोडिले, असें दिसतें. दासबोध हा इतकाच—सात दशकांचाच--राहता तर त्याबद्दल कोणासहि कांहीं विशेष वाटलें नसतें. इतर हजारों हजार वेदान्तचर्चेच्या ग्रंथांत तोहि कदाचित् जिरून गेला असता. पण यापुढले दशक नेहमींच्या चकारीला सोडून आहेत. अकराव्या दशकाच्या पांचव्या व सहाव्या समासांत समर्थ राजकारणाच्या वातावरणांत शिरले आहेत, व राजकारण हें हरिकथेप्रमाणेंच अवश्य आहे, असें त्यांनीं सांगितलें आहे. मनांत हेच विचार भरले असतां वाचकापुढें बारावा दशक येतो. त्यांत प्रारंभींच 'प्रपंच आणि परमार्थ' यांची सांगड घातली आहे. आजपर्यंतच्या साधूंचे 'वैराग्य आणि परमार्थ' असे शब्द होते त्यांच्या ऐवजीं आतां 'प्रपंच आणि परमार्थ' हे शब्द आले. यांतच 'भजना'ची जागा 'यत्ना'ला मिळाली आहे. यापुढले एकदोन, निदान चौदावा व पंधरावा दशक रामदास-संप्रदायी मंडळाचा शिक्षाप्रबंध आहे. सामान्यतः चवदा, पंधरा व सोळा हेच दशक दासबोधाचें अपूर्वत्व विशेष दाखवितात. सामान्यतः घेतलेले उतारेहि यांतलेच असतात. यांतले उतारे देऊन भागणार नाहीं. भिंतीची एखादी वीट किंवा पायाचा एखादा दगड खणून आणून पुढें ठेविल्यानें एखाद्या भव्य इमारतीच्या रचनेची कल्पना पाहणारास जितपत होईल, तितपतच यांतील उताऱ्यानें या दशकांची कल्पना वाचकांस होईल. तेव्हां ते दशक स्वतःच ज्याचे त्यानें वाचिले पाहिजेत. या एकंदर ग्रंथांत म्हणजे दासबोधांत एक गोष्ट विशेष नजरेस येते ती अशी कीं, रामदासाचें निरीक्षण फारच चौकसपणाचें व बारकाईचें असे. भोंवतालचें

जग तो नीट निरखून पाही. याचा पडताळा या ग्रंथांत सर्वभर पाहण्यास सांपडेल. या ग्रंथांत व्यवहारांतल्या गोष्टी जरा चौकसपणानें पाहून चातुर्यानें सांगितल्या आहेत, इतकेंच. समाजव्यवस्थेचें एखादें नवीन तत्त्व, किंवा लोकांचीं मनें क्षुब्ध होण्यासारखे समान हक्काचे क्रांतिकारक विचार, किंवा मानसशास्त्राच्या गूढ कल्पना, किंवा उच्छृंखळांना बेताल करण्यासारखे सिद्धांत यांत मुळींच नाहींत. या ग्रंथासंबंधीं 'लीलावती'प्रमाणेंच अतिशयोक्तीच्या कल्पना फार पसरल्या आहेत. याचें एक कारण असें आहे कीं, यांतील प्रवृत्तिवेदान्ताचा उपदेश, प्रपंचपरमार्थाची सांगड आणि राजकारणाचें समाजास महत्त्व व तत्संबंधीं सूचना या गोष्टी महाराष्ट्रास अपूर्व आहेत. अनेक राज्यक्रांत्या आणि घडामोडी होत असतां कोणाहि साधुसंतानें त्याबद्दल एक अक्षरहि काढिला नाहीं, कीं तो काढण्याची कल्पना वा आवश्यकताहि कोणा संतगुरूला आजपर्यंत वाटली नाही, आणि रामदासानें ती गोष्ट कळकळीनें आपल्या लोकांपुढें आणि देशांतल्या देवतांपुढेंहि मांडिली, तेव्हां हा सर्व प्रकार कौतुकास्पद वाटावा, यांत नवल नाहीं. अजूनहि हा दासबोध ग्रंथ मुलांकडून वाचविला तर त्याच्या वाचनानें त्यांना फार फायदा होईल, यांत संशय नाहीं.

दासबोधाच्या अठराव्या दशकाच्या सहाव्या समासांत

म्लेंच्छ दुर्जन । बहुतां दिवसांचें माजलें बंड ।
या कारणें अखंड । सावधान असावें ॥

अशी एक ओवी आली आहे. हा समास अफजलचा वध करून शिवाजी दर्शनास आला त्या वेळीं लिहिला, असें म्हणतात. यांतील

---

१. रामदासाची आणि शिवाजीची प्रथम भेट कधीं झाली, हें अजून निश्चयात्मक ठरलें नाहीं, व तें तसें ठरवितां येण्यासारखा पुरावा हातीं लागेल असेंहि वाटत नाहीं. रामदासासारख्या आपल्या प्रांतांतल्या उपद्व्यापी व विशाल बुद्धीच्या माणसाची माहिती शिवाजीला खास लवकरच लागली असली पाहिजे;

[पान ४२५ पहा.]

'बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजा भवानी।
परंतु विचार पाहोनि। कार्य करणें।'

या ओवीवरून हें म्हणणें खरें असेल, असें दिसतें. रामदासाचा आणि शिवाजीचा संबंधहि तसाच होता.

दासबोधाशिवाय रामदासाची आणखीहि रचना उपलब्ध आहे. यांत मनाचे श्लोक फार प्रसिद्ध आहेत. हे भुजंग-वृत्तांतले श्लोक साधे, सोपे व ठसठशीत असल्यामुळें म्हणणारांना व ऐकणारांना दोघांनाहि सुखकर वाटतात. शिवाय, त्यांच्यांत तेज आणि व्यावहारिक उपदेश दोन्ही ओतप्रोत आहेत. रामदासानें रचिलेलीं रामायणाचीं 'सुंदर' आणि 'युद्ध' अशीं दोन कांडें आहेत. पहिल्याचे शंभर श्लोक असून दुसऱ्याचे तेराशें-बासष्ट इतके श्लोक आहेत. खरें पाहतां, या श्रीरामाच्या भक्ताचें समग्र रामायण पाहिजे होतें. पण त्यानें त्यांतलीं मेजकीं दोनच कांडें लिहिलीं. कारण त्यांतच रामचरित्राचें सार त्याला दिसलें.[1]

---

[पान ४२४-वरून.]

व एकमेकांचे उद्योगहि एकमेकांस अवगत असले पाहिजेत. पण याबद्दल कोणास त्यांनीं सुगावा लागूं दिला असेल, असें वाटत नाहीं. शिवाजी तर पक्का खोल, राजकार्यधुरंधर, अनेक मसलती गुप्तपणें करणारा, ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळूं देणार नाहीं, किंबहुना कानीं खडाच ठेवील, असा होता; आणि रामदासहि कांहीं कमी नव्हता. शिवाजीचाहि वस्तादजी तो, शिवाजीपेक्षां एकोणीस-वीस वर्षांनीं वडील. सगळा पसारा स्वतःच कल्पून स्वतःच उभारिला, दुनियेंतल्या कोणत्याच माणसाला गुरु म्हणण्यासहि कबूल नाहीं असा, तो तर ह्याची गंधवार्ताहि कोणाला लागूं देणार नाहीं, असा होता. तेव्हां अशा दोघांच्या प्रथम भेटीचा पुरावा सहज सांपडण्यासारखा नाहीं. हल्लीं हनुमंतस्वामीच्या बखरीच्या आधारें शक १५७१ व केशव-बुवाच्या एका पत्रावरून शक १५९४ हे दोन शक सुचविण्यांत येतात. पण दोहींनाहि असावा तितका पुरावा नाहीं. तरी पण शके १५९४-च्या पूर्वी पुष्कळ दिवस या गुरुशिष्यांचा परिचय झाला होता, यांत संशय वाटत नाहीं. ( पृष्ठ ३८२-टीप पहा. )

१. रामदासापूर्वी सर्वत्र 'जोहार' लिहिण्याची चाल होती व रामदासानें

[पान ४२६ पहा.]

अजिक्य रजनीचर माजले । देव कारागृहीं घातले ।
म्हणोनि वैकुंठीहून पातले । देव सोडवावया ॥
जिहीं त्रैलोक्य जिंकिलें । त्यास मर्कटा हातीं मारविलें ।
भुवनत्रय आनंदविलें । दाशरथीनें ।

हें रामदासानें एके प्रसगीं सांगितलेलें रामायणाचें सारें सार आहे. 'सीताहरण' हें खरें सार नव्हे. रामदास म्हणतो—

'निमित्य मात्र ते सिता । विबुधपक्ष पुरता ।'

आणि म्हणूनच

"कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकांची । समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची ॥"

इतर लेखांप्रमाणेंच रामायणाची रचना सरळ आहे. पुष्कळ ठिकाणीं तर ती इतकी सोपी आहे कीं, वाटेल त्यानें अर्थाबरोबर सहज धावत जावें. त्याचे शब्द अगदीं प्रचारांतले, साधारणपणें कधींहि काव्यांत न आढळणारे असेच असतात. 'खचतें आणि रचते' कार्य, म्हैसमंगळू वगैरेसारखे शब्द अगदीं त्याच्या खास टांकसाळींतलीं नाणीं आहेत. शिवाजीचीं नाणीं बंद झालीं पण याचीं पुष्कळ नाणीं अजून चालतात. रामदासाचें महाराष्ट्राला 'आनंदभुवन' असें आवडतें नांव आहे आणि विचार करितां तें अगदीं सार्थ आहे, असेंच कोणीहि म्हणेल.

वरील ग्रंथांशिवाय शंभर ओव्यांचें एक, अशीं चौदा शतकें, पंचीकरण, करुणाष्टकें, स्फुट ओव्या, स्फुट श्लोक, आरत्या वगैरे पुष्कळ रचना रामदासानें केलेली प्रसिद्ध आहे. शिवाय संस्कृत भाषेमध्येंहि 'दासगीता' हें एक संस्कृत पांच-अध्यायी प्रकरण आहे. ह्या सर्वांवर रामदासी भाषेचा शिक्कामोर्तब स्पष्ट आहे. रामदासाचें पहिलें काव्य कोणतें व शेवटचें कोणतें, हें कोठें सांगितलेलें नाहीं, पण अदमासानें या बाबतींत थोडें बोलतां येण्याजोगें आहें. रामदासी स्फुट प्रकरणांत एक लहानसें रामचरित्रात्मक प्रकरण आहे. यासच कोणी कोणी

---

[ पान ४२५-वरून ]

ती बंद करून 'रामराम' लिहिण्याची चाल पडली, हें म्हणणें खोटें आहे. चंद्रराव मोऱ्याला गोमाजी नरसिहानें शके १५६८-त लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे. त्यांत 'रामराम' लिहिला आहे.

'लघुरामायण' म्हणतात. याचे 'प्रामाणिका' वृत्तांतले अवघे १२५ श्लोक आहेत. हें अगदीं पहिलेंच नसलें तरी प्रारंभींच्या रचनेपैकीं तरी एक असावें. यांत दोन गणेशाच्या आणि एक सरस्वतीच्या नमनाचे असे पहिल तीन श्लोक झाल्यावर चवथा श्लोक

'समस्त ही मनी धरा। कथा करीनसें करा।
लहानसा कवी नवा। रघोत्तमासी वीनवा॥'

असा आहे. यांतदेखील कथाभाग रावणानें लंकेंत देव कोंडिले तेव्हांपासून पुढलाच आहे. देवांच्या या बंदिखान्याचें वर्णन करितांना हा लहानसा नवा कवि म्हणतो—

उदासली वसुंधरा। बहु भीति निशाचरा।
अनीति फारसी वसे। कदापि न्याय तो नसे॥ १०॥
नरेंद्र हो फणेंद्र हो। विधी सुरेंद्र चंद्र हो।
वरुण वात पावकु। कुबेर येम धार्मिकु॥ ११॥
प्रचंड दंड दंडिका। सटी गणेश चन्द्रिका।
समस्त ही विरोधली। बहू बळें निरोधली॥ १२॥
समीर लोटितो खडे। वरुण घालितो सडे।
मयंक साउली धरी। मळीण पावकू हरी॥ १३॥
विधी विधीस भाकतो। सुरेंद्र बाग राखतो।
करावयास निग्रहो। भुमंडळासि विग्रहो॥ १४॥
अखंड चाकरी करी। सदा वरूचि भाकरी।
सटी आरंधली दळी। गणेश गाढवें वळी॥ १५॥

यांत कवीच्या प्रौढपणांतल्या रचनेची ओळख स्पष्ट पटते. रामदासाच्या अथपासून इतिपर्यंत सर्व रचनेंत नियमबंधन नाहीं. शुद्धलेखनाचा धाक नाहीं. संस्कृताची जरबहि नाहीं. जसा कवि, तशी त्याची भाषा. तींत भाडभीड नाहीं. तो जें मनांत येईल तें बोलतो आणि जसें बोलतो तसें लिहितो. म्हणजे त्यानें लिहिलेलें वाचलें म्हणजे तो बोलत असेल कसा, याची कल्पना होते. जीभ जे उच्चार करील ते हातांनीं अक्षरचिन्हांनीं

दाखविले पाहिजेत. याचेंच नांव खरें शुद्ध लेखन, आणि तें रामदासाच्या लेखांत बरोबर आढळतें.

इंग्रजी वाङ्मयांत जन्मभूमि, प्रेम, ममता, मैत्री अशासारख्या विषयांवर लहान-लहान चुटके वारंवार आढळतात, आणि असे लहान-लहान चुटके आपल्या इकडे मुळींच नाहींत म्हणून नवीन विद्वान् जरा लज्जित होतात. याकरितां रामदासाच्या प्रकरणांतून असा एखाद-दुसरा चुटका म्हणून दाखवितों. म्हणजे असे चुटके आपल्या इकडेहि पसरलेले आहेत, हें नवीन मंडळीला कळेल, आणि त्यांची लज्जा थोडी रक्षण होईल.

मैत्री—माझें माझें, तुझें माझें । ऐसी हे मैत्रिकी जनीं ।
माझें तुझें, तुझें तुझें । ऐसे हें न घडे कदा ॥
आशेची मैत्रिकी खोटी । दुराशा विटंबी पुढें ।
परोपकारणी मीत्री । ते मीत्री न विटे कदा ॥
अविश्वासें वस्ती केली । विश्वास हृदयीं नसे ।
विकल्पें चालते मीत्री । मीत्री आत्मघातकी ॥
मित्र हो गोत्रिचे बंधू । आपुले पारिखे जनीं ।
विकल्पेवीण जें सख्य । तें सख्य सुख दाखवी ॥
आडोनी मित्रिकी केली । ते मित्री कार्यवादिणी ।
न होतां कार्य तें तुटें । विस्कटे सख्य मागुतें ॥
मित्र ते मिळाले दोघे । दोघे ही शठ लालची ।
टोणपे तामसी वेडे । करंटे आळसी सदा ॥
उगाचि वेळ घालाया । नासके मित्र पाहिले ।
कुबुद्धी कुकर्मी दोषी । त्याचें फळ भोगावया ॥
सारीचे मित्र नारीचे । चारीचे चारटे खवी ।
मस्तीचे चोर गस्तीचे । कोटगे लात पावती ॥
संगदोषें माहा दुःखें । संगदोषें दरिद्रता ।
संगतीनें महद्भाग्य । प्राणी प्रत्यक्ष पावती ॥
संग तो श्रेष्ठ शोधावा । नीच संग कामा नये ।
न्यायवंत गुणग्राही । यत्नाचा संग तो बरा ॥

काम, क्रोध, लोभ, मत्सर, दंभ, प्रपंच, यत्न, आळस वगैरेंवरहि असेच मोठे गमतीचे चुटके आहेत. सुटसुटीतपणांत ते इंग्रजी चुटक्यांच्या अगदीं बरोबरीचे आहेत. पण आंतल्या व्यावहारिक उपदेशांत आणि ठसकेदारपणांत तर ते त्यांहून श्रेष्ठ आहेत. त्यांतील भाषा रामदासाच्या इतर ग्रंथांतील भाषेप्रमाणेंच लवचीक व सटक आहे. हातांतल्या छडीप्रमाणें रामदास तिला हवी तशी लववितो.

श्रीशिवाजी महाराज शके १६०२ चैत्र शु. १५ रोजीं कैलासवासी झाले. त्यानंतर समर्थांनींहि आपली तयारी केली. श्रीसमर्थ रामदास स्वामींना राहण्यासाठीं छत्रपतींनीं सज्जनगडावरच एक भव्य इमारत बांधून दिली होती. तींत शके १६०३-मध्यें वैशाखांत समर्थांनीं प्रवेश केला. पण यानंतर ते फार दिवस राहिले नाहींत. आपला काळ समीप आला, असें त्यांचें त्यांस वाटूं लागलें, व तसें ते लोकांस सांगूंहि लागले. माघ महिन्यापासून स्वामींनीं बाहेर जाणेंहि वर्ज्य केलें. पुढें ते फारसे कोणाशीं बोलतहि नसत. यानंतर लोक येत जात, त्यांचेंहि येणें बंद केलें. थोडे दिवसांनीं वस्त्रप्रावरणहि सोडून दिलें; व सदाकाळ नग्नच असत. पलंगावर नुसतेच उताणे पडून राहत. हळूहळू अन्नपाणीहि टाकिलें. त्यामुळें शरिरास क्षीणता आली. शिष्यशागीर्द मंडळींनीं विनंती केली कीं, ही हवा डोंगरी व शीतळ आहे तरी गडाखालीं चांगली जागा पाहून तेथें जावें. तेव्हां स्वामींनीं उत्तर दिलें, " देहास जें घडेल, तें येथेंच घडो; आम्हांस आतां उपाधी नको." माघ वद्य पंचमीस कर्नाटकांतून रघुनाथ नारायण यांजकडून श्रीराम-लक्ष्मणाच्या मूर्ति मुद्दाम मागविल्या होत्या, त्या आल्या. त्याच दिवशीं ऐन मध्यरात्रीं ' साडेचे तासी' त्या समर्थांनीं स्वतः पाहिल्या. मूर्तींच्या डोळ्यांवर मेण बसविलें होतें, तें काढून त्यांचें नीट दर्शन घेतलें. यापुढें समर्थ अवघे तीन-चार दिवसच होते. माघ वद्य नवमीचे दिवशीं शनिवारीं समर्थ पलंगावरून खालीं उतरले; पायीं पादुका घातल्या व थोडेच वेळांत दोन प्रहरीं

त्यांच प्राणोत्क्रमण झालें. जड देह मात्र मागें राहिला. मरणापूर्वी थोडा वेळ जवळच्या मंडळींपैकीं कोणीं कांहींसें विचारिलें, तेव्हां समर्थ म्हणाले, " जें सांगणें होतें तें मीं पूर्वींच सांगितलें आहे आतां सांगावयाचें कांहीं उरलें नाहीं. त्यांतूनहि—

"माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल अंत:कर्णी ।
परि मी आहे जगजीवनीं । निरंतर ॥
' आत्माराम ' ' दासबोध ' । माझें स्वरूप स्वत:सिद्ध ।
असतां न करावा हो खेद । भक्तजनीं ॥ "

हें ऐकून भोंवतालची शिष्यमंडळी फार श्रमी झाली, व त्यांचे कंठ भरून आले. तें पाहून त्यांस समर्थ म्हणाले, " इतका काळ आमच्या सहवासांत राहून हेंच कां साधन केलेंत ? " त्यावर आक्काबाईंनीं विनंती केली, " इत:पर या मूर्तीचें दर्शन घडणार नाहीं, म्हणून वाईट वाटतें. " हें ऐकून समर्थ म्हणाले—

" माझी काया गेली खरें । परी मी आहें जगदाकारें ।
ऐका स्वहित उत्तरें । सांगेन तीं ॥
नका करूं खटपट । पहा माझा ग्रंथ नीट ।
तेणें सायुज्याची वाट । नीट पडे ।
राहा देहाच्या मिसरें । वर्तू नका वाईट बरें ।
तेणें मक्ताचीं हीं द्वारें । चोजवीती ॥ " इ०

समर्थांच्या देहाचें रामनामाच्या गजरामध्यें त्यांच्या शिष्यमंडळींनीं ' और्ध्वदेहिक ' केलें, व नंतर पुढें सुमारें एक वर्षानें त्यांच्या अस्थि काशीस नेऊन—अयोध्येस नव्हे, काशींत—रामकुंडांत टाकिल्या.

असें दिसतें कीं, कोणे एके वेळीं रामदास, आपलें मनोगत पूर्ण होऊन महाराष्ट्रांत पसरलेला दु:खाचा वणवा विझून गेल्यावर आपलें हें आवडतें आनंदभुवन कसें दिसावें, कसें दिसेल, याच्या विचारांत मग्न होते; व त्या वेळीं मनाच्या त्या अवस्थेंत त्यांच्या ज्ञानचक्षूंना जें डोळ्यांपुढें दिसलें त्याचें वर्णन त्यांनीं एका प्रकरणांत केलें आहे.

कोणी कोणी याला रामदासांचें 'भविष्यपुराण' असें म्हणतात. यांतून कांहीं ओळी समर्थांच्या या काल्पनिक चित्राची कल्पना होण्यासाठीं येथें देतों—

स्वप्नीं जे देखिलें रात्रीं । तें तें तैसेंचि होतसे ।
हिंडतां फिरतां गेलों । आनंदवनभूवना ॥
हे साक्ष देखिली दृष्टी । किती कल्लोळ उठिले ।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों । आनंदवनभूवना ॥
स्वधर्मा आड जीं विघ्नें । तें तें सर्वत्र उठीलीं ।
लाटिलीं कूटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहू ॥
सुरेश उठिला आंगें । सुरसेवा परोपरीं ।
मोहीम मांडिली मोठी । आनंदवनभूवनीं ॥
कल्पांत मांडिला मोठा । म्लेंच्छ दैत्य बुडवावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो झाला । आनंदवनभूवनीं ॥
येथून वाढला धर्मू । रमा धर्मसमागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संव्हार जाहाला ।
मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंदवनभूवनीं ॥
बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी ।
ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ॥
उदंड जाहलें पाणी । स्नान-संध्या करावया ।
जप तप अनुष्ठानें । आनंदवनभूवनीं ॥
लिहीला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहाला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभूवनीं ॥
सामर्थ्यें शर्थ कीर्तीची । प्रतापें सांडिली सिमा ।
बीदेंचि दीधलीं सर्वें । आनंदवनभूवनीं ॥
स्मरलें लिहिलें आहे । बोलता चालता हरी ।
काय होईल पाहावें तें । आनंदवनभूवनीं ॥

यावरून, श्रीसमर्थ रामदासस्वामी दिवसां काय करीत, रात्रीं कसे असत, जागतेपणीं काय बोलत, त्यांना सर्व काळ चिंता कशाची असे, त्यांचें मन कोठें धावे, भ्रमणांत त्यांना काय दिसे, काय पाहून त्यांचा ऊर फाटे, कोणती कल्पना त्यांच्या मनाला सुख देई, त्यांचा उद्योग कसा असे, त्यांचा पसारा किती होता, याचें चित्र कोणालाहि त्याच्या मगदुराप्रमाणें काढितां येईल.

रामदासस्वामींना गंगाधर या नांवाचे एक वडील बंधु होते, हें सांगितलेंच आहे. यांनाच पुढें 'श्रेष्ठ' असें म्हणत. यांनींहि मराठी भाषेंत कांहीं थोडी ग्रंथरचना केली आहे. 'भक्तिरहस्य' व 'सुगमोपाय' हे यांचे मुख्य व उपलब्ध ग्रंथ होत. यांशिवाय कांहीं थोडीशी स्फुट रचनाहि उपलब्ध आहे. 'भक्तिरहस्य' हा ग्रंथ नांवाप्रमाणेंच भक्तीचा महिमा गाण्याच्या हेतूनें रचिला आहे. यांत नामस्मरणाचें माहात्म्य सांगतांना अनेक गोष्टी व कथाहि आल्या आहेत. याचीं ७७ प्रकरणें आहेत. यांचा दुसरा ग्रंथ 'सुगमोपाय' हा एके दृष्टीनें पाहतां भक्तिरहस्याची पुरवणीच आहे. 'भक्तिरहस्य' ग्रंथ श्रेष्ठांनीं

'शकें दशके उणीं सोळा शतें। कीलकनाम संवत्सरातें।'

म्हणजे शके १५९०-मध्यें कीलक संवत्सरीं लिहून पुरा केला; व यानंतर त्यांनीं 'सुगमोपाय' लिहिला. रामदासाप्रमाणें हे त्यांचे बंधु आजन्म ब्रह्मचारी नव्हते; हे केवळ गृहस्थाश्रमी होते; व असें दिसतें कीं, यांनीं प्रपंचहि चांगला थाटला होता. हे समर्थांच्या पूर्वींच चार वर्षें म्हणजे शके १५९९-मध्यें फाल्गुन वद्य चतुर्दशीस मृत्यु पावले. यांचे पत्नीनें यांचे बरोबरच आपला देह विसर्जित केला. हे वारले तेव्हां यांचे मागें रामचंद्र व शामजी या नांवाचे दोन लहान मुलगे होते.

'बरें सत्य बोला, यथातथ्य चाला। बहू मानिती लोक येणें तुम्हांला॥'

१० श्लोकबद्ध उपदेश समर्थ स्वामींनीं याच मुलांस या वेळीं केलेला आहे.

गंगाधर उर्फ श्रेष्ठ हे आपणास 'रामीरामदास' असें म्हणवीत व आपल्या रचनेंत शेवटीं 'रामीरामदास' याच नांवानें आपला उल्लेख करीत, अशी एक फार जुनी समजूत आहे. पण प्रत्यक्ष ग्रंथ पाहतां हें खरें दिसत नाहीं. 'रामीरामदास' हें नांव समर्थांच्या अभंगांत व पदांतहि अनेक वेळां आढळतें.

उदाहरणार्थ, 'अन्नपंचका'पैकीं दोन अभंग घेऊं—

१

भक्ति न लगे भाव न लगे । देव न लगे आम्हांसी ॥
आम्ही पोटाचे पाईक । आम्हां न लगे आणीक ॥
आम्ही खाऊं ज्याची रोटी । त्याची कीर्ती करूं मोठी ॥
रामीरामदास म्हणे । ऐसें मूर्खाचें बोलणें ॥

२

आम्हां अन्न झालें पुरे । अन्नावीण काया नुरे ॥
पोटभरी मिळे अन्न । आम्हां तेंचि ब्रह्मज्ञान ॥
अन्नावांचोनि दुसरा । देव कोण आहे खरा ॥
भगवंताची नाहीं गोडी । काय म्हणें ते बराडी ॥
रामीरामदास म्हणे । मूर्ख बोले दैन्यवाणे ॥

हे अभंग 'समर्थमुखिंचे' खास दिसतात व आहेत.

तसेंच,

मनासारिखी सुंदरा ते अनन्या । मनासारिखी पुत्र जामात कन्या ॥
सदासर्वदा बोलती रम्य वाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ १ ॥
मनासारिखे दीर भर्तार भावे । मनासारिखे सासुरे ते असावे ॥
सुखें बोलती लेश नाहीं दुखाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ २ ॥
भलीं मायबापें भले मित्र बंधू । भले सोयरे राखिती स्नेहबिंदु ॥
मुलें लेंकुरें एकमेळा सुने (सुनां) चा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥३॥
मनासारिखे ग्रामग्रामाधिकारी । मनासारिखे लोक शोकापहारी ॥
मनासारिखा संग साधूजनांचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥ ८ ॥
म्हणे दास सायास केल्या घडेना । विकल्पें जनीं येक तेंही पडेना ॥
घडे योग होतां विवेकी जनाचा । जनीं जाणिजे योग हा सुकृताचा ॥१०॥

हेहि बोल समर्थांचे नाहींत, असें कोण म्हणेल !



म. सा.–५५

# दासपंचायतन

श्रीसमर्थ रामदासस्वामी व त्यांचे समकालीन आणि अनुयायी श्री-जयरामस्वामी वडगांवकर, रंगनाथस्वामी निगडीकर, आनंदमूर्ति ब्रह्म-नाळकर आणि केशवस्वामी भागानगरकर या पांच जणांस त्या वेळच्या लोकांनीं ‘ दासपंचायतन ’ असें नांव दिलें आहे. हे सर्व फार श्रेष्ठ असे साधु पुरुष असून चांगले विद्वान् ग्रंथकार होते. यांपैकीं श्रीसमर्थ रामदासस्वामी यांची माहिती मागें आलीच आहे आतां बाकी चौघांबद्दल थोडी माहिती पुढें देतों.

**श्री जयरामस्वामी** वडगांवकर हे वडगांव (जि. सातारा) येथील गादीचे अधिपति होते. या गादीची मूळ स्थापना शांतालिंगाप्पा[1] उर्फ शांतेश्वर महाराज यांनीं केली. हे जंगम होते, आणि म्हणूनच या गादीला ‘ जंगमाची गादी ’ म्हणतात. लिंगाईत हे हाडाचे कट्टे शैव, यामुळें शैव व वैष्णव यांचेमध्यें नेहमीं तंटे-भांडणें होत. या दोघांमधील

१. शांतलिंगाप्पा हे शैव होते. यांनीं स्वतःस ‘ लिंगाप्पा ’ असें म्हटलें असल्याचें माहीत नाहीं. मजजवळ लिंगाप्पा या नांवाच्या एका शैवसंताच्या पदांचें व अभंगांचें एक बाड आहे. यांतील रचना विठ्ठलभक्ताप्रमाणेंच गोड व प्रेमळ आहे. शिवसंप्रदायी साधूचे अभंग फारसे उपलब्ध नाहींत; म्हणून यांतील एक दोन अभंग पुढें देतों. मागें पृ. १६३-वर टीपेंत विसोबा खेचराचा म्हणून दिलेला ‘ मुळु मदनाचा ’ इ. हा अभंग या बाडांत लिंगाप्पाचा म्हणून दिला आहे.

तृषाक्रांत जैसे जीवनाते ओढी । तैसी तुझी गोडी लागो मज ।।
भुकेला प्राणी जैसा जेवी का तांतडी । तैसी तुझी गोडी लागो मज ।।
परिमळाचे ठायीं भ्रमरा आवडी । तैसी तुझी गोडी लागो मज ।।

[ पृष्ठ ४३५ पहा. ]

तंटे-भांडणें मिटवून या दोन्ही मतानुयायांची एकी करून देण्याचें काम शांतलिंगाप्पा स्वामींनीं केलें, असें म्हणतात. या शांतलिंगाप्पा स्वामींचा ' कर्णहस्तिकी ' या नांवाचा जंगममत प्रतिपादन करणारा असा एक ग्रंथ आहे. यांत शेवटीं

चनबसवेश्वरोक्ति । वरि मी बोलिलि अनुभूति ॥
प्रीति पावो विद्यापारंगति । म्हणे शांत नीळकंठ ॥

अशी एक ओवी आहे. शांतलिंगाप्पांचे गुरु कदाचित् नीळकंठ नांवाचे साधु पुरुष असावे, असें दिसतें. शांतलिंगाप्पांनीं शके १५४५-मध्यें माघ शु. पौर्णिमेस समाधि घेतली.[1] या शांतलिंगाप्पांचे शिष्य कृष्णाप्पा-स्वामी हे उरण बहे(अथवा उरूण बाहें)चे कुळकर्णी. हे कांहीं दिवस कृष्णातीरीं राहत असत. यांची शाखा आश्वलायन, गोत्र काश्यप. शके १५०४-मध्यें वटग्राम उर्फ वडगांव येथें येऊन यांनीं तेथें मठाची स्थापना केली. कृष्णाप्पांनीं आपली शिष्यवृत्तिहि बरीच वाढविली. यांचीं कांहीं पदें मात्र आढळतात. त्यांशिवाय यांचा ग्रंथ वगैरे कोणतीहि रचना हल्लीं उपलब्ध नाहीं. असें म्हणतात कीं, कृष्णस्वामींनीं ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय पुढें ठेवून तो वाचीत असतां शके १५४५

---

[पृष्ठ ४३४–वरून]

तारुण्यें वनिता भ्रतारासी पूजी । तैसी गोडी तुझी लागो मज ॥
लिंगेश्वर म्हणे मी नामाचा बराडी । प्रेम प्रिती गोडी पुरवी देवा ॥

ऐसा कोण देव । नाम घेतां नुरवी भाव ॥
एका शंकरावाचोनी । कोण आहे मोक्षदानीं ॥
न पाहेचि भाव शुद्ध । तोडी पतिताचे बंद ॥
नारीनर उद्धरीले । माहा पातकी तारिले ॥
लिंगयासी आणिली शोभा । केला कैवल्याचा गाभा ॥ ३ ॥

१. आद्य शांतेश्वर प्रसिद्ध सकळां । तो प्रेमजिव्हाळा । कृष्णदास ॥
शके पंधराशे पंचेताळीसांसी । माघ पौर्णिमेसी । समाधिस्त ॥

रुधिरोद्गारी संवत्सरीं माघ शु॥ पौर्णिमेस जित समाधि घेतली[1].कृष्णाप्पा-स्वामींचे शिष्य प्रसिद्ध **जयरामस्वामी वडगांवकर.** जयरामस्वामी हे कात्राबाज मांडवगणचे देशपांडे, उपनांव कसरे, गोत्र वशिष्ठ. यांच्या वडिलांचें नांव भिकाजीपंत, आईचें नांव कृष्णाबाई. यांच्या घरची फार गरिबी असल्यामुळें व लहानपणींच यांचे वडील निवर्तल्यामुळें यांच्या मातोश्रींनीं फार कठीण काळ काढिला. कांहीं दिवस हे श्रीक्षेत्र पंढरपूर येथें होते. तेथें असतांना केवळ मधुकरी मागून यांनीं आपला विद्याभ्यास केला. पुढें थोड्या दिवसांनीं हे वडगांवास जाऊन कृष्णाप्पा, स्वामीपाशीं राहिले. यांनीं आपली सर्व ग्रंथरचना वडगांवासच केली. 'दशमस्कंध टीका' (ओवीसंख्या ९९५९), 'रुक्मिणीस्वयंवर' (४०००), 'सीतास्वयंवर' व 'अपरोक्षानुभव' हे यांचे मुख्य ग्रंथ आहेत. यांखेरीज 'शांतिपंचीकरण', 'ज्ञानीभक्तसंवाद' वगैरे लहान-लहान प्रकरणें असून शिवाय यांचीं पदें व अभंगहि आहेत. वेदांत विषय सोपा करून सांगण्याची आणि कथानक गोड करून सांगण्याची हातोटी जयरामस्वामींस चांगली साधलेली दिसते.

जयरामस्वामींचा जन्म शके १५२१-मध्यें गोकुळ-अष्टमीस झाला. यांनीं शके १५९४ परिधावी संवत्सर भाद्रपद वद्य ११ या दिवशीं समाधि घेतली. यांच्या वर्णनाचा व समाधिकालनिर्देशाचा असे दोन श्लोक प्रसिद्ध आहेत. हे श्लोक विठ्ठलबोवा गुरुगोपाळबुवा यांनीं सुमारें वीसपंचवीस वर्षांपूर्वी मला म्हणून दाखविले होते; त्यावरून यांचा वर्ण

---

१. या कृष्णाप्पास्वामींचें लग्न चुकून एका न्हाव्याच्या मुलीशीं लागलें होतें, अशी माहिती दासो दिगंबर, महीपती वगैरे अनेक चरित्रकार देतात. परंतु सदरहू कृष्णस्वामी हे वडगांवपरंपरेंतील नसून रामदासी परंपरेंतील होते. ह्या कृष्णस्वामीचा जयराम या नांवाचा शिष्य असून त्याची अभंगरचना पुष्कळ आहे. अभंग गोड व प्रेमळ आहेत. ह्याचे दोन-चारशे अभंग मजजवळ आहेत. गुरुशिष्यांचीं नांवें तींच असल्यामुळें हा घोटाळा झाला, हें उघड आहे. या रामदासी जयरामाची हकीकत दासविश्रामधाम यांत आली आहे.

गोरा असून हे शरिरानें स्थूल होते, आणि नेहमीं कौपीन धारण करीत, असें दिसतें[1]. यांचे शिष्यप्रशिष्य अनेक होऊन गेले व यांपैकीं बऱ्याच जणांनीं मराठींत कविता केली आहे.

रामदास-पंचायतनांतले दुसरे साधु **श्रीरंगनाथस्वामी निगडीकर** हे आनंदसंप्रदायी होते. या आनंदसंप्रदायापैकीं अनेक पुरुषांनीं मराठींत ग्रंथरचना केली आहे. या संप्रदायाची शिष्यपरंपरा पुढीलप्रमाणें आहे. ही जरा विस्तारानें येथें देतों, म्हणजे बऱ्याच मराठी कवींची परंपरा लक्षांत येण्यास ठीक पडेल.

विष्णु
|
विधि
|
अत्रि
|
दत्त
|
सदानंद ( पुढें चालू, पान ४३८ )

---

१. हे ते दोन श्लोक--

गोरा यस्य तनुर्महोदर उदासोऽयं सुकोपीनधृक्
श्रीकृष्णेति वदन्समाधिनिरतो नित्यस्वरूपे स्थितः ।
ब्रह्मानन्दमयः सतामभयदोऽभीष्टप्रदः शंकरः
सोऽयं श्रीजयरामसद्‌गुरुवरः पायादपायात्सदा ॥ १ ॥
शालीवाहनके विरिञ्चिमुखतो भाक्तिप्रपञ्चाऽङ्कके
तत्र श्रीपरिधाविवत्सरवरे दाक्षिण्यमार्गे रवौ ।
मासे प्रौष्ठपदे शिते हरिदिने जीवाह्वये वासरे
सोऽयं श्रीजयरामयोगितिलको ब्रह्मस्वरूपो बभौ ॥ २ ॥




या दिलेल्या परंपरेंत कांहीं नांवें पुन्हां पुन्हां आलेलीं आहेत. यांपैकीं रंगनाथस्वामींचे परात्परगुरु जे सहजानंद त्यांनीं 'ज्ञानदीपिका' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. याशिवाय त्यांची श्रीज्ञानेश्वरांच्या 'अमृतानुभवा'वरहि एक संस्कृत टीका आहे, असें म्हणतात.

ह्या सहजानंदांचा पूर्ण शिष्य जो पूर्णानंद ( पूर्वाश्रमींचा नारायण ) त्यानें अवधूतगीतेवर एक टीका लिहिली आहे. टीका शके १५३२ साधारण संवत्सरीं माघ मासीं पुरी केली आहे. ही टीका आपला एक

शिष्य जो चिदानंद ( बळवंत गोविंद बुळबुळे ) त्याचेसाठीं लिहिली, असें कवि म्हणतो. सहजानंदशिष्य पूर्णानंदाचा ' शिवपार्वती-परिणय ' या नांवाचा एक ग्रंथ आहे. यांत एक पौराणिक कथाभाग घेऊन तो कवीनें अध्यात्मपर लाविला आहे. पूर्णानंद हा एकनाथाचा समकालीन होता, हें उघड आहे, व यानेंहि एकनाथी रुक्मिणीस्वयंवराप्रमाणेंच ही कृति केली आहे. या पूर्णानंदाचा शिष्य जो निजानंद याचीहि थोडी - फार रचना आहे. या निजानंदाचें पूर्वाश्रमींचें नांव बोपाजी आणि बोपाजीचा शिष्य आणि मुलगा म्हणजेच रंगनाथस्वामी निगडीकर. रंगनाथस्वामींच्या पितृपरंपरेंतील मूळ पुरुष राघोपंत, उपनांव खडके. हे माध्यंदिन शाखेचे वसिष्ठ-गोत्री ब्राह्मण. राघोपंत, हे विजापूर-दरबारांत शिपाईगिरी करून असत. राघोपंताचा पुत्र दत्तात्रय. यानें संन्यासदीक्षा घेतली होती. दत्तात्रयाचा पुत्र रंगोपंत. या रंगोपंतास चार पुत्र होते. पैकीं दुसरा पुत्र जो बोपाजीपंत हा रंगनाथ निगडीकरांचा पिता. बोपाजीच्या बायकोचें म्हणजे रंगनाथजीच्या आईचें नांव बयाबाई. या जोडप्यास पूर्णानंदस्वामींच्या प्रसादानें तीन पुत्र झाले. यादव, रंगनाथ व विठ्ठल. यांपैकीं मधला जो रंगनाथ याचा जन्म शके १५३४ मार्गशीर्ष शु॥ दशमीस झाला. रंगनाथास लहानपणापासून शिपाईगिरीची हौस फार असे; आणि या हौशीमुळेंच यानें लग्न करण्याचें नाकारिलें. चौदाव्या वर्षींच हे घर सोडून निघून गेले. बरेच दिवस बद्रिकाश्रमीं राहून अनेक विद्या संपादन करून हे परत स्वगृहीं आले. हे घरीं आल्यावर बोपाजीपंताच्या मनांत आलें कीं, आपले सर्व आश्रम पूर्ण झाले. तरी आतां चतुर्थाश्रम धारण करून जन्माचें सार्थक करावें. हें मनांत आणून श्रीक्षेत्र करहाटक उर्फ कऱ्हाड येथें " जावोनि पुत्रासहिते आश्रम चतुर्थ संपादिला " आणि तदनंतर ते देहास निजानंद म्हणवूं लागले. थोडेच दिवसांत रंगनाथ-आदि त्रिवर्गबंधूंनीं आपल्या पित्याच्या म्हणजे निजानंदाचा उपदेश घेतला. रंगनाथस्वामी तीस वर्षांचे झाल्यावर म्हणजे शके १५६४ सालीं मार्गशीर्ष महिन्यांत

निजानंदांनीं आपल्या चिरंजिवांच्या अनुमोदनानें कृष्णा व कोयना या नद्यांच्या संगमावर जिवंत जलसमाधी घेतली.

वडील नारायणस्वरूपीं मिळाल्यानंतर रंगनाथ हे फारकरून निगडी येथेंच राहत असत. त्यांचा सर्व थाट ऐश्वर्याचा असे. बरोबर लंगोटबंद शिष्यसमुदाय आणि 'भागम्मा' व 'चंद्रम्मा' या शिष्यिणी नेहमीं असत. यांचा 'मनोहर' नांवाचा एक उमदा घोडा होता. त्यावर स्वामींची मर्जी अगदीं प्यार असे. पण हे या सुखाच्या पाशानें कधींहि बांधले गेले नाहींत. असें सांगतात कीं, एके वेळीं एका बाईचे मनांत यांची खाजगींत मुलाखत घ्यावी, असें आलें; व तिनें आपला मनोदय स्वामींस कळवून फारच हट्ट घेतला. स्वामींनीं समजुतीच्या अनेक गोष्टी तिला सांगितल्या. पण बाईचें मन इतकें वाहवलें होतें कीं, तिची कांहीं केल्या समजूत पटेना व तिचें मन तिला आवरेना. तिची ती वेडावलेली स्थिति जाणून स्वामींनीं तिला भेटण्यास जाण्याचें कबूल केलें. बाई आपल्या हौसेप्रमाणें सर्व तयारी करून मंचकावर बुवांची वाट पाहत बसली. जों जों वेळ होत चालला तों तों बाईचें सर्व चित्त बुवांकडे लागलें. इतर गोष्टींचें भान बाई विसरत चालली. मनोराज्यांत ती इतकी रंगून गेली कीं, रंगनाथबुवा येऊन जवळ बसल्याचें तिला कळलेंहि नाहीं. एकवार सहज वळून जवळ पाहिलें, तों बुवा ! आणि मग त्यांची ती दृष्टादृष्ट झाल्यावर बाईची नजर बुवांकडे लागली व सर्व वृत्ति निमाल्या. देहभान गेलें. काया रोमांचव्याप्त झाली व चेतनाहि थांबली. विषयाचें वारें कोठें दूर पळालें, त्याचा पत्ताहि नाहीं. थोड्या वेळानें बाई देहावर आली व तिनें बुवांचे पाय घट्ट धरले. तिच्या अंगांतून विषयपिशाच एकदा गेलें तें कायमचेंच गेलें व यापुढें बाई ईश्वरभजनांत निमग्न होऊन बुवांपाशीं शिष्यवृत्तीनें राहूं लागली. रंगनाथस्वामींनीं तिला भक्तिप्रेमामृत पाजिलें. त्याचा चटका तिला पुरा लागला. हें कसेंहि असो. पण रंगनाथबुवांची कांति सतेज होती, यांत संशय नाहीं; आणि हीच कांति व हेंच तेज त्यांच्या

त्राणींतहि आढळतें. रामाच्या वेळेस कौसल्येला डोहळे होऊं लागले त्या वेळीं राजा दशरथानें तुला काय वाटतें, म्हणून विचारिलें; तेव्हां कौसल्या म्हणते—

स्थापूं सुरां निजपदीं असुरांसि दंडूं । पाखांड बंड अतिलंड कुमत्त खंडूं ॥
सत्कर्मधर्म हरिभक्ति विरक्ति जोडूं । संमोह शोक अविवेक समळ तोडूं ॥
सत्यासि छत्र धरवूं दुरितासि जाळूं । गोब्राह्मणां विनत होउनि पूर्ण पाळूं ॥
दीनें अनाथ गतिहीन तया कृपाळू । देऊनि अन्न धन कांचन अति टाळूं ॥
पीडा प्रजांसि न करूं परबाध वारूं । वेदानुवादत्रिविधिदूषक यांसि मारूं ॥
माता पिता सुजन भाविक भक्त निंदी । घालूं तया यमपुरीस अघोर बंदीं ॥

या कौसल्येच्या डोहळ्यांत रामचरित्राचें सर्व रहस्य आलें आहे. रचनेची हीच तऱ्हा रंगनाथांच्या गजेंद्रमोक्षांतहि आहे. सवाईवृत्तांत रचिलेला हा सुमारें पंचवीस पद्यांचा 'गजेंद्रमोक्ष' फारच गोड असल्यामुळें बायकांच्या तोंडीं सर्वत्र ऐकूं येतो. याखेरीज 'गुरुगीता', 'सुदामचरित्र', 'शुकरंभा-संवाद', 'पंचीकरण', 'भानुदासचरित्र' व 'योगवासिष्ठसार' वगैरे अनेक ग्रंथ रंगनाथस्वामी निगडीकरांनीं लिहिले आहेत. योगवासिष्ठसाराचीं दहा प्रकरणें असून शेवटीं

श्रीकृष्णातटसंनिध । निर्गुणग्राम (निगडी) अगाध ।
तेथें ग्रंथसमाप्ति बोध । जाला सहज पूर्णत्वें ॥
शके पंधराशें चौऱ्यांशी । शुभकृत नाम संवत्सराशीं ॥
उदगयन माघ कृष्ण दशमीशीं । ग्रंथ केला समाप्त ॥

असा त्याचा समाप्तिकाल दिला आहे. म्हणजे स्वामींनीं हा ग्रंथ वयाला पन्नास वर्षें झाल्यावर लिहिला, असें होतें. या ग्रंथाशिवाय शेकडों पदें महाराष्ट्रांत आबालवृद्धांच्या तोंडून नेहमीं ऐकूं येतात. यांची बरीच कृति पूर्वी निगडी येथील मठ जळला, तेव्हां अग्निमुखीं पडली, असें त्यांचे वंशज सांगतात. रंगनाथ हे आपल्या वयाच्या बहात्तराव्या वर्षी शके १६०६ रक्ताक्षी संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य दशमीस समाधिस्थ झाले.

रंगनाथ महाराजांच्या कवितेवर रहिमतपूर येथील प्रसिद्ध पुरुष तुका

विप्र, विष्णु विप्र वगैरेंचें प्रेम विशेष होतें. या ' विप्रां 'चें मूळ आडनांव ' विपट ' व वृत्ति कुळकर्णपणाची. परंतु कोणा ' बुवाजीरायें ' नांवाच्या साधु पुरुषाच्या अनुज्ञेवरून हे हरिभजनीं लागले. तुका विप्राचीं पदें, अभंग, आरत्या, स्तोत्रें वगैरे आहेत. रचना साधारणच आहे, पण त्यांतल्या त्यांत याचीं स्तोत्रें कांहीं बरीं आहेत. याच्या एकनाथस्तोत्राचे शेवटले दोन श्लोक देतों—

> **श्रीएकनाथ घरीं आवडीनें । पाणी आणी श्रीहरि कावडीनें ।**
> **धोत्रें धुतो गंध उगाळुनियां । पाणी आणी श्रीहरि गाळुनियां ।।**
> **श्रीभानुदासा कुळि एकनाथ । हो विष्णुमूर्ती उघडी कलींत ।**
> **दिसे जना मानव शुद्ध भोळा । वदे तुका विप्र अभंगलीला ।।**

रामपंचायतनांतले बाकी राहिलेले साधु **आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर** व **केशवस्वामी भागानगरकर**. यांचे ग्रंथ फारसे प्रसिद्ध नाहींत. दोघांचींहि पदें मात्र प्रसिद्ध आहेत. **आनंदमूर्ति** हे ब्रह्मनाळ, जि. सातारा येथील राहणारे, हें त्यांच्या नांवावरूनच उघड आहे. यांचा पिता बाळंभट हा आगळगांवीं ग्रामजोशी असून कर्मठ ब्राह्मण होता. यांच्या आईचें नांव माहीत नाहीं. आनंदमूर्तीस रघुनाथस्वामी नांवाच्या सत्पुरुषानें उपदेशदीक्षा देऊन भक्तिमार्गास लाविलें. यांची वाणी रसाळ असून हे कीर्तन फार प्रेमळ करीत. शके १६१८-मध्यें धाता संवत्सरीं कार्तिक शु० चतुर्दशीस हे मृत्यु पावले. यांचे मागें यांचा पुत्र कृष्णमूर्ति हा गादीवर बसला. कृष्णमूर्तीचीं पदें प्रसिद्ध आहेत. **केशवस्वामी भागानगरकर** हे आत्मारामपंत म्हणून कल्याणीस कोणी ग्रामलेखक असत त्यांचे पुत्र. आत्मारामपंतांची स्त्री गंगाबाई ही ऐंशी वर्षांची

---

१. या बुवाजीरायाचा मठ व शिष्यपरंपरा मोंगलाईंत 'अंजनवती' या गांवीं आहे.

२. रघुनाथस्वामी निजबीज । आनंदमूर्ति कोंब सतेज ।
फुटले अंकूर तेथें सहज । कृष्णमूर्ति तयाचा ।।
अशी यांची परंपरा आढळते.

झाल्यावर तिला हा पुत्र झाला.[1] तेव्हां त्याचें नांव केशव असें ठेविलें. हे भागानगरच्या तानाशा नांवाच्या प्रसिद्ध पुरुषाचे कारभारी होते. केशवस्वामींनीं काशिराजस्वामींचा अनुग्रह घेतला होता, असें म्हणतात. यांनीं 'एकादशीचरित्र' या नांवाचें एक आख्यान लिहिलें आहे. शिवाय यांचे अभंग व पदें फार प्रसिद्ध आहेत. काव्यसंग्रहामध्येंच यांचीं सुमारें पांचसहाशें पदें छापिलीं आहेत. याशिवाय अप्रसिद्धहि पुष्कळ आहेत. केशवस्वामींची शिष्यशाखा फार मोठी होती, असें दिसतें. यांच्या शिष्यवर्गापैकीं बऱ्याच जणांनीं मराठी भाषेची सेवा केली आहे; शिवराम व संतराज हे दोघेहि प्रसिद्ध असून यांचे ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. केशवस्वामी भागानगरकरांचा समाधिकाल शके १६०४ दुंदुभि संवत्सर पौष शुद्ध त्रयोदशी गुरुवार, असा आढळतो.[2] केशवस्वामींची समाधि भागानगर येथें सुलेमाज्याचे बागेपलीकडे रंग्रेज गुढा आहे, त्याच्या पलीकडे मुसानदीच्या कांठीं एका शेतांत आहे. हल्लीं तेथें वृंदावन वगैरे कांहीं नसून स्थान मात्र दाखविण्यांत येतें.

याच वेळेस केशवस्वामी म्हणून आणखी एक साधु पुरुष होते, पण त्याचें एक 'गर्भगीता' एवढेंच लहानसें शके १६२०-मध्यें लिहिलेलें प्रकरण प्रसिद्ध आहे. यांचा गुरु मारकीनाथ. हे वरील केशवस्वामींहून भिन्न पुरुष समजावे.

या भागांत उल्लेखिलेल्या जयराम, रंगनाथ, आनंदमूर्ती व केशवस्वामी अशा चौघांस रामदासस्वामींच्या सभोंवार करून या पांच जणांचें

---

१. यांच्या दुसऱ्या एका चरित्रांत गंगाबाईस वयाच्या ८०-व्या वर्षीं पुत्र झाला, असेंच दिलें आहे; पण हें चरित्र भक्तमंजरीवरूनच लिहिलेलें दिसतें. तेव्हां हा निराळा पुरावा मानितां येत नाहीं. गंगाबाईच्या वडिलांचें नांव श्रीधरपंत सबनीस.

२. भक्तमंजरीकार व इतर लेखक यांनीं शके १६०४ हाच मृत्युशक दिला आहे. परंतु वर उल्लेखिलेला केशवस्वामींचा शिष्य संतराज यानें 'चिंतानिवारण' नांवाच्या आपल्या ग्रंथांत क्षयसंवत्सर ( शके १६०८ ) हा स्वामी स्थिर झाल्याचा काळ दिला आहे.

' रामदासपंचायतन ' असें म्हणण्याचा प्रघात महाराष्ट्रांत आहे. पण या चौघांसच असें कां बसवितात, हें कळत नाहीं. रामदासाप्रमाणें स्वदेशाकरितां आणि स्वराज्याकरितां यांपैकीं कोणी उलाढाली केलेल्या प्रसिद्ध नाहींत. रामदासाची तडफ यांच्यांत दिसत नाहीं आणि रामदासाच्या भाषेचा जिवंतपणा तर यांच्यांत नाहींच नाहीं. यांपैकीं कोणींहि मठांचें जाळें पसरलेलें नाहीं. किंवा शिष्य-प्रशिष्यांची पेरणी, लावणीहि केली नाहीं. लेखन-व्यवसायांतहि हे मागेंच दिसतात. रामदासी वाङ्मयानें पोथ्यांचीं कपाटेंच्या कपाटें भरतील, पण या सर्वांचे ग्रंथ एकवटले तरी त्यांनीं मोठ्याशा कपाटाचा एक खणहि भरणार नाहीं.



## कांहीं कवयित्री

श्रीसमर्थ रामदासस्वामींचे विद्यापीठांत स्त्रियांचाहि प्रवेश होत असे, हें मागें सांगितलेंच आहे. या पीठांत ज्या अनेक विदुषी ज्ञानसंपन्न झाल्या त्यांपैकीं **वेणाबाई** ही सर्वांत श्रेष्ठ होती. समर्थांचीहि ही 'लाडकी कन्या' होती. हिचें माहेर मिरजेस व सासर कोल्हापुरास. हिचा जन्म शके १५५०-चे सुमारास झाला असावा. वयाच्या आठव्या वर्षीच हिचें लग्न झालें. दुर्दैवानें हिच्या ल्हानपणांतच हिला वैधव्य आलें; व या स्थितींत तिला वाचनाचा नाद लागला. गीता, एकनाथी भागवत वगैरे ग्रंथ ती वाचूं लागली. वेणुबाई आपल्या सासरीं म्हणजे कोल्हापुरास असतां तिच्या घरीं रामदास भिक्षेसाठीं गेले होते. 'मुखीं राम त्या काम बाधूं शकेना' हा श्लोक समर्थांनीं म्हटला व भिक्षा मागितली, वेणुबाई भिक्षा आणण्यासाठीं घरांत जाऊन येते, तों इकडे समर्थ निघून पुढें गेले. हें रामदासांचें वेणुबाईस पहिलें दर्शन. यानंतर रामदास कांहीं दिवसांनीं पुन्हां भिक्षेस गेले, तेव्हां वेणुबाई पुढल्या चौकांत 'भागवत' वाचीत बसली होती. तिला समर्थ म्हणाले, "मुली, तूं हा ग्रंथ वाचीत आहेस, पण याचा तुला कांहीं अनुभव पटतो का?" यावर आपणास अनुभव पटण्यासारखें ज्ञान नाहीं, असें तिनें सांगितलें. तेव्हां वेणुबाईला चार उपदेशपर वाक्यें सांगून रामदास तेथून निघून गेले. या वेळेपासून रामदासांच्या ठिकाणीं वेणुबाईचें मन जडलें व तिला त्यांचाच निदिध्यास लागून राहिला. 'देह माझें मन माझें। सर्व नेलें गुरुराजें' अशी तिची अवस्था झाली.

> **पाईं पादुका हातांत तुंबा। भजंरी भगवी फांकली प्रभा।**
> **कटबंद, कौपीन, माळ, सूत्र शोभा। न वानवे मूर्ति साजिरी॥**

अशी समर्थांची मूर्ति वेणुबाईला नेहमीं डोळ्यांपुढें दिसूं लागली. एकदा कोणे ठिकाणीं मन वेडावलें म्हणजे काय होतें, हें सांगायला पाहिजे!

त्याशिवाय चैन पडत नाहीं, आणि मन कितीहि आवरलें, कितीहि वेळां दुसरीकडे नेलें, तरी पुन्हां पुन्हां त्याच्या पुढें तेंच एक चित्र उभें राहतें. त्या एकाच चित्रानें मन इतकें व्यापून जातें कीं, त्यांत दुसऱ्या कशाचा शिरकाव होण्याला वावच राहत नाहीं; आणि मग शरीरहि तसेच चाळे करूं लागतें. मला वाटतें, वेणुबाई दहा वेळां, शंभर वेळां, हजार वेळांदेखील, त्याच पोथीचें तेंच पान काढून, त्या पुढल्याच चौकांत त्याच जागीं बसली असेल, व समर्थ भिक्षेस आले आहेत अशी खोटीच कल्पना मनाशीं करून तिनें पुन्हां पुन्हां त्यांच्या एक वेळ विचारिलेल्या प्रश्नांचीं तींच तींच उत्तरें शेकडों वेळां मनांतल्या मनांतच दिलीं असतील. कोणीं सहज आल्याचें किंवा डोकावल्याचें कळलेंहि नसेल. अशा वेळीं कोणीं हळूच हाक मारलेली तिच्या कानांनीं ऐकिलीहि नसेल. त्याच स्थितीचें, त्याच चित्राचें स्वप्न तरी एकदा पडावें म्हणून निजतांना तीच गोष्ट मनांत घोळत ठेवून ती कैक रात्रीं झोपी गेली असेल. 'तैसी मूर्ति दृष्टी पडो। तैशा पायीं वृत्ती जडो' अशा भावनेनें हजार युक्त्या आणि बहाणे केले असतील, हें कोणालाहि स्वतःच्या अनुभवावरून कळेल. हें आणखी शब्दांनींच येथें सांगण्याचें कारण नाहीं. वेणुबाईला रामदासांच्या चरणांचा छंद लागला, इतकें येथें म्हटलें, म्हणजे पुरे.

पुढें कांहीं दिवसांनीं वेणुबाई 'सासर'हून माहेरीं मिरजेस गेली. तेथें रामदासांचीं कथाकीर्तनें चालू होतीं. त्या वेळीं ती नित्य नियमानें कीर्तनास जाऊं लागली; व तेथेंच असतांना तिनें समर्थ स्वामी रामदास यांचा उपदेश व अनुग्रह घेतला. पुष्कळांना तिचें हें करणें आवडलें नाहीं; व कांहींना तर उगाच टवाळी करण्यास ही आयती संधी सांपडली. पण वेणुबाई ही मनाची खंबीर बायको होती; व आपलें पाऊल कांहीं गैर पडलें नाहीं, अशी तिची खात्री होती. यामुळें टवाळांच्या जिभलीकडे तिनें लक्ष दिलें नाहीं. ती म्हणते–

कोणी वंदिती कोणी निंदिती । वास मी त्यांची पाहिना ।।
हृदयीं धरिले सद्‌गुरुचरणा । प्राणांतींहि विसंबेना ।।

असेंहि सांगतात कीं, वाचाटांच्या टवाळकीनें वेणूचे आईबाप इतके त्रासले कीं, त्यांनीं अखेर हिला 'विष' हि दिलें. पण समर्थ स्वामी रामदासांच्या कृपेनें त्या विषाचीहि बाधा झाली नाहीं. खरें-खोटें 'देव' जाणे.

वेणुबाईनीं गुरूपदेश घेतल्यानंतर थोड्या दिवसांनीं त्या समर्थांच्या सांनिध्यांतच राहूं लागल्या. इतर सर्व कन्यांत—समर्थ आपल्या शिष्यिणींना कन्या म्हणत—समर्थांची हिच्यावर मर्जी विशेष असे. हिच्या अंगीं महंताची योग्यता आहे, असें पाहून त्यांनीं शके १५७७-मध्यें मिरजेस हिला स्वतंत्र मठस्थापना करून दिली होती. येथेंच हिनें शिष्यसंप्रदाय व परंपरा वाढविली. पुढें हिला 'वेणाबाई' किंवा 'वेणुस्वामी' असेंच लोक म्हणूं लागले. या वेणाबाईचीं पदें, अभंग व इतर ग्रंथरचनाहि आहे. हिचे तीन-चार ग्रंथ आहेत; पण या सर्वांत 'सीतास्वयंवर' हा ग्रंथ विशेष सुंदर आहे. जनाबाईचीं कांहीं लहान-लहान प्रकरणें आहेत. पण असा स्वतंत्र व सुंदर ग्रंथ वेणाबाईच्या आधीं कोणा स्त्रीनें रचिलेला आपणांस उपलब्ध नाहीं.

स्वयंवराची कथा आधींच केव्हांहि गोड, तशांत ती सीता-स्वयंवराची, आणि ती सांगितलेलीहि एका स्त्रीनेंच, यामुळें या ग्रंथांत विशेष सौरस्य आलें आहे. पुरुषाच्या मनांतले विकार पुरुष चांगले वर्णन करितील. पण स्त्रियांचे विचार स्त्रियांनींच सांगितलेले उत्कृष्ट उतरतील, हें उघड आहे; आणि याचा अनुभव या ग्रंथाच्या वाचनानें प्रत्येकाच्या मनास पटेल. स्त्रियांना तरी कोणाहि इतर कवीच्या सीतास्वयंवरापेक्षां हें एका स्त्रीनें लिहिलेलें सीतास्वयंवरच जास्त आवडेल,

---

१. या एका शब्दानेंच, या अभिधानानेंच अलीकडील वाचाटांच्या तोंडास कुलूप बसलें पाहिजे.

यांत संशय नाहीं. ग्रंथ ओवीबद्ध असून याचे एकंदर चौदा समास आहेत. प्रारंभींच बायकांच्या वहिवाटीप्रमाणें

'सितासंवराच्या काजा । सिद्धलाडू गणराजा ।।
पूर्ण मोदक पंचखाजा । तूं वन्हाडी आधीं ।।'

अशी योजना करून पुढील कार्यास सुरुवात केली आहे. लग्नांतले बारीकसारीक सोहाळेदेखील गोड शब्दांनीं वेणुबाईनीं यांत सांगितले आहेत. देवकप्रतिष्ठा, हळदीउटण्याची गडबड, मधुपर्कादि विधि हे सर्व येथें नीट पाहण्यास सांपडतील. यांत खालीं मान घालून लाजत लाजत गौरीहराची पूजा करितांना आणि दारीं पाहुणे येतील त्यांना आयुष्य मागतांना सीतादेवी नजरेस पडेल, व त्यांस—

नाना अलंकारें विराजमान । पीत कंचुकी पीत वसन ।
सर्वांगीं ते शोभायमान । नागर हळदि नागरे ।।
गौरीहराची पूजा । सांग केली सलज्जा ।
अधोमुख ते जनकजा । थोर आनंद अंतरीं ।।
सखिया हासती कौतुकें । पूजाफळ लाधलें निकें ।
सुंदर रामासारिखें । अक्षई वर जानकी ।।

इत्यादि वर्णन वाचून मोठी मौज वाटेल. पुरुषांनीं केलेलीं स्त्रियांचीं वर्णनें वाचण्यास, व आपआपल्या कल्पनेप्रमाणें त्यांचीं काढलेलीं सुंदर चित्रें अनेक ठिकाणीं पाहण्यास सांपडतात. पण स्त्रीनें आपल्या कल्पनेनें काढिलेलें सुंदर पुरुषाचें चित्र याच ग्रंथांत वाचकास पाहण्यास सांपडेल, व तें पाहून मनाला आनंद वाटेल. पण ग्रंथ पुढें वाचीत गेलें असतां मुलगी आपल्या घरीं—सासरीं जाण्याची वेळ आली म्हणजे मात्र वाचकाचा गळा दाटून येईल; व ज्यांच्या दैवानें एखादे वेळां तरी कन्यादानाचें पुण्य लाभलें असेल, त्यांना त्या दिवसाची आठवण खचीत होईल. 'आयरणी' चा विधी झाल्यावर

जानकीरमा सुलक्षणी । कनकमणीची आहिणीं ।
निरवणेंचीं बोलणीं । दंपत्यें गंहिवरें दाटलीं ।।

करीं दुहिता मिथिळापती । जानकी निरवी आयोध्यापती ।
ते समईं गोतसंपत्ति । सभेसहीत गहिंवरें ॥
जानकी-गुणें हृदयकृपण । राजा निरवितां उच्चारण ।
अष्ट वर्षें केलें म्यां पाळण । आतां तुम्ही करावें ॥
माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायक सुशीळा ।
परम स्नेहें भूपाळा । इचें पाळण करावें ॥
परम स्नेहें मिथिळापति । दुहिता निरविली अयोध्यापति ।
कन्यास्नेहाची थोर प्रीति । नेत्रोदक जातसे ॥
कौसल्ये निरवी जनकबाळा । जळ वाहे नेत्रांजळा ।
म्हणे माझी हे सुशीळा । पाळण तुम्ही करावें ॥
जानकी सुरतरोपमा । हेहि कठीण उपमा ।
कन्या माझी निरोपमा । अर्भकापरी पाळावी ॥
माझ्या प्राणाची आवडती । जीवनकळा हे सुमती ।
इचें पाळण बरव्या रिती । वडिलीं केलें पाहिजे ॥

असें म्हणत

रामअंकावरी बाळी । रायें बैसविली मैथळी ।
देवदुंदुभी ते काळीं । समस्त तुरें लागलीं ॥

यापुढें चौदाव्या समासांत वरातीचा थाट होऊन तो समास आणि ग्रंथ पुरा झाला आहे. वेणूबाईनीं रचिलेलें असें दुसरें एक मौजेचें प्रकरण आहे. श्रीरामचद्र सिंहासनावर आरूढल्यावर यच्चयावत् सर्व प्रजांना थोर आनंद झाला. आपले दैन्याचे दिवस सरून आतां सुखाचा पाऊस पडणार, असें सर्वांस वाटूं लागलें; आणि आतां आपलीं संकटें आणि गाऱ्हाणीं सांगण्याचाच अवकाश, तोंच तीं दूर होतील, या भावनेनें

प्रजा कष्टल्या पातल्या सीण सांगों । अयोध्याधिशा राघवा कौल[1] मागों ॥
गुरें वासुरें लेकुरें मेळ जाला । अयोध्यासमीपें बहू लोक आला ॥

---

१. याचें नांव 'कौल'. कौल म्हणजे राजानें प्रजेला दिलेली देणगी किंवा हक्क. हा 'कौल' महाराष्ट्रांत एके वेळीं फार प्रिय होता, असें दिसतें.

[पान ४५० पहा.]

रघूनाथजी सांगती दूत वार्ता । 'प्रजा लोक बाहेर आल्या समर्था' ॥
कृपासागरें सर्वहि आणवीलें । सभामंडपा ते असंख्यात आले ॥
प्रभू देखतां जयजयाकार केला । नमस्कार साष्टांग घालोनि त्याला ॥

यानंतर रामचंद्रानें त्यांस उठवून आपल्या जागेवर बसण्यास मोठ्या कृपेनें सांगितलें; व मग त्यांस

प्रभू बोलिला, 'रे अपेक्षीत मागा । नका हेत ठेवूं' समस्तासि सांगा ॥

प्रजेनेंहि यानंतर अनेक तऱ्हेच्या मागण्या मागितल्या.

'मनासारिखी मेघवृष्टीहि व्हावी । जयीं पाहिजे ते प्रसंगीं पडावी ।
समर्था कदा रोगराई नको रे'।
(यावर रामचंद्र लक्ष्मणाकडे पाहून)
वदे राम, 'लक्षूमणा, हें लिही रे' ॥

अशा अनेक तऱ्हेच्या मागण्या मनसोक्त केल्या आहेत.

'समर्था कधीं पापबुद्धी नको रे । समर्था प्रभू भाग्य यथेष्ट दे रे ।
प्रितीनें प्रजा पाळि रे रामराया । नको दैन्यवाणी करूं दिव्य काया ॥
दिनानाथजी उदंड दे रे ।

इत्यादि दरएक मागणी प्रजेनें मोठ्या कळवळ्यानें व उत्कटतेनें मागितली आहे. पण या सर्व मागण्या ऐकून रामचंद्रानें काय केलें! नेहमींचाच प्रकार येथेंहि घडला. प्रत्येकाचें मागणीनंतर 'वदे राम, लक्षूमणा, हें लिहीं रे' म्हणजे सर्वांच्या अर्जांची नोंद केली; व या वेणुबाईच्या प्रकरणाच्या आधारेंच बोलावयाचें तर हे सगळे अर्ज 'फैलीस' लागले.

वेणाबाई ही शके १६००-मध्यें चैत्र वद्य चतुर्दशीस मृत्यु

---

[पान ४४९-वरून.]
नगरच्या 'हराळे' नांवाच्या भटजींनीं आपल्या शके १६१५-मध्यें लिहिलेल्या बाडांत हा उतरला आहे. तसेंच, महीपतीबुवांनींहि आपल्या 'टांचणवहींत' हा उतरला दिला आहे. 'संतविजय' हा ग्रंथ अर्धवट न राहता पुरा झाला असता तर त्यांत वेणाबाईचें चरित्र खास येतें, असें बावांच्या टांचणांवरून मला वाटतें.

पावली.[1] हिच्या शिष्यसमुदायांत 'बाइयाबाई' असें एक नांव दिलेलें आढळतें. पण या बाइयाबाईची कविता कोठें व किती आहे, हें कळत नाहीं. रामदासी 'बयाबाई' म्हणून एक बाई प्रसिद्ध आहे. ही व 'बाइया'बाई एकच कीं काय, कळत नाहीं; पण, या दोघी एक नसाव्या. कारण बयाबाई आपला गुरु प्रत्यक्ष रामदास असल्याचा उल्लेख करिते.[2] बयाबाईची थोडीशी कविता प्रसिद्ध आहे. हिच्या रचनेंत एक विशेष गोष्ट अशी आहे कीं, हिचीं कवनें उत्कृष्ट भक्तीनें ओतप्रोत भरलेलीं दिसतात. हिनें 'आर्या' रचिलेल्या आढळतात; व त्या चांगल्या साधल्या आहेत.

तव वागमृत-वृष्टी होतां हे मन-मयूर आनंदे ।
चरणीं ठेउनि दृष्टी नयनीचे बिंदु टाकि स्वानंदें ॥
श्रीमुखचंद्र पहातां लवती या पापण्या न सोसवती ।
स्वँसुखें स्वपतिशि रमतां त्या समयीं अन्य हे नसो सवती ॥
रमतांना एकांतीं द्वैताचा टाकुनी दिला पदर ।
बोधरसानें भरुनी निजवदनीं लाविला असे अधर ॥
गुरुरूपचि तूं असिसि हरि बा तुजला अखंड नमित असे ।
दास बया हे त्यजुनी श्रीचरणीं मस्तकास ठेवितसे ॥
श्री जेष्ठ शुद्ध नवमी नवमीच्या तिज घरींच राहतसे ।
समजुनिया उमजावें अदारपत्रीं लिहून धाडतसे ॥

या पांच आर्यांवरून हिची मराठी रचना ध्यानांत येईल. हिची रचना स्त्रीस्वभावाप्रमाणें कोमल नसून जरा ठसक्याची दिसते. मराठीपेक्षां हिंदी रचना तर आणखीच ठसकेदार आहे.

---

१. चांफळास रामचंद्राच्या उत्सवाच्या वेळीं दशमीचें पारणें वेणूबाई शेवटपर्यंत करीत असत. हिच्या चिताभूमीवर पूर्वी चंपक होता. हल्लीं वृंदावन सज्जनगडावर रामदासांच्या समाधीचे डावे बाजूस आहे.

२. या गुरुनें मज वेडचि लाविलें । अहो मन हें तत्पदीं तन्मय झालें ॥
सांवळी सुरत नयनांत बैसली । पाहतां पाहणें समुळचीं गेलें..............
रामदास गुरु-राजकृपेनें । दास बया हें मीपण गेलें ॥ १ ॥

बाग रंगेलीं महाल बनाहे । महालके बीचमें झुलना खुलाहे ।।
इस झुलनेपर झूलो रे भाई । जननमरनकी भूल न आई ।।
दास बया कहे गुरु मैयानें । मुझकु झुलाया सोहि झुलाने ।।

इत्यादि चरणांवरून वरील म्हणण्याची साक्ष पटेल.

रामदासांच्या पाठशाळेंतल्या अनेक शिष्यिणी कवित्व करीत असत. या सर्वांची हकीकत सांगतां आली असती तर बरें होतें. पण आतां आणखी '**अंबाबाई**' नांवाच्या एकाच शिष्यिणीचें एकच पद देऊन दुसरीकडे वळूं—

मी सद्गुरुघरची सैरी शोभत्ये बरी ।। धृ. ।।
बाई मज गोल्हाटी गे राहणें । तेथुनि श्रीहाटीं मज पाहणें ।
त्रिकुटशिखरीं येऊनि जाणें । बोलते बरी ।। १ ।।
बाई मी त्रिगुणी खेळ खेळत्ये । चतुर्थ गुणि मी साक्षी होत्ये ।
सदा मी येत्ये जात्ये । भय न अंतरीं ।। २ ।।
स्थूळ सूक्ष्म कारण । चौथा देह महाकारण ।
स्थाने क्रीडायाची जाण । माजीं हे बरी ।। ३ ।।
आतां मी सर्वांसि ग्रासुनि । मोहातीत क्रीडते अनुदिनि ।
निःशंक वर्तते हो जनी । पाहा च्यातुरी ।। ४ ।।
रामदासाश्रय म्यां केला । म्हणउनी विलास सर्वहि आला ।
अंबी न विसरे गुरुपदाला । प्रतिज्ञा खरी ।। ५ ।। मी सद्गुरुघरची० ।।

रामदासांप्रमाणेंच तुकाराममहाराजांच्या शिष्यसमुदायांतहि शिष्यिणी होत्या. निदान अशा एकीचा तरी आपणांस थोडा परिचय आज होण्यासारखा आहे. हिचें नांव **बहिणाबाई.** हिचा जन्म शके १५५०-त झाला. वेरूळाजवळ देवगांव येथें आऊजी कुळकर्णी नांवाचा 'मानस'-गोत्री ब्राह्मण होता. त्याची ही मुलगी. हिच्या आईचें नांव जानकी. ही अगदीं लहान म्हणजे तीन वर्षांची असतांच मौजे सिऊर येथील एका पाठक उपनामाच्या एका तीस वर्षांच्या बिजवराशीं आईबापांनीं हिचें लग्न लावून दिलें. लग्नानंतर चार

वर्षांनीं घेण्यादेण्यासंबंधींच्या कांहीं कलहावरून बहिणाबाईला आपल्या आईबापांसुद्धां व भ्रतारासह घर सोडणें भाग पडलें. घर सोडल्यावर हीं सर्वजणें देशोधडीस लागलीं; व

'मागोनियां भिक्षा क्रमितसे वाट । सोसूनियां कष्ट नाना परी ॥'

याप्रमाणें नृसिंहदर्शन घेऊन भिक्षा मागत मागत हें कुटुंब पंढरपुरास आलें. असें दिसतें कीं, तें क्षेत्र पाहून व तेथले वारकरी पाहून बहिणाबाईला फार आनंद झाला.—

उदंड देखीलें उदंड ऐकिलें । उदंड वर्णिले क्षेत्रमहिमे ॥
पंढरीसारिखें स्थळ नाहीं कोठें । जरी तें वैकुंठ दाखविलें ॥
ऐसी चंद्रभागा ऐसे भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥
ऐसे हरिदास ऐसा प्रेमरस । ऐसा नामघोष आहे कोठें ॥
बहेणि म्हणे आम्हां अनाथाकारणें । पंढरी निर्माण केली देवा ॥

कांहीं दिवस येथें राहिल्यावर हें कुटुंब शंभु (?) महादेवास गेलें. तेथून शिंगणापुरास गेलें. वाटेंत कोरान्नाची भिक्षा मागून तिजवरच उदरनिर्वाह होत असे. 'या वेळीं माझें वय नऊ वर्षांचें होतें,' असें बहिणी सांगते. शिंगणापुरास वस्ती करावी, असें सर्वांच्या मनांत होतें. पण तेथें राहण्याचें जमेना. म्हणून हें कुटुंब रहिमतपुरास गेलें. तेथें यांचा पाय थोडासा जमिनीला लागला. प्रथम हीं सर्व भिक्षा मागूनच असत. परंतु रहिमतपुरांतला ग्रामोपाध्याय 'रत्नाकर ज्योतिषी' हा वारणसीं जाऊं इच्छीत होता. त्यानें आपल्या मागें गैरहजिरींत आपली वृत्ति बहिणीच्या नवऱ्यास सांगितली. यामुळें तेथें एक वर्षाचा निर्वाह चांगला लागला. तेथें असतांच बहिणाबाईस कथाकीर्तनाची आवड लागली व ती नित्य नियमानें श्रवणास जाऊं लागली. याप्रमाणें बहिणीचें वय अकरा वर्षांचें झाल्यावर येथून हें कुटुंब कोल्हापुरास गेलें. तेथें त्या वेळीं (शक १५६१-चे सुमारास) कोल्हापुरांत जयरामस्वामींची कथा व भागवताचें पुराण दररोज चालत असे. त्याच्या श्रवणाला हें कुटुंब नित्य जाई. येथें बहिरंभट नांवाच्या एका ब्राह्मणाकडे या कुटुंबाचीं सर्व माणसें

राहत असत. त्यानें गोप्रदानांत आलेली एक सवत्स कपिला गाय या कुटुंबास दिली. या वत्साचें पालनपोषण बहिणी फारच प्रेमानें करी. यामुळ त्या वासराला हिचा लळा अतोनात लागला. बहिणाबाई आपल्या आत्मचरित्रांत सांगते—

मीच तरी सोडी तरी वत्स रिघे दोहा। करितां दोहावा सवे माझी ॥
मीच पाणी पाजी तृण घाली मीच। मजवीण कांच मनीं वाहे ॥
मी जाय पाणिया ओरडे तें वत्स। गाय वाया पुच्छ सवें चाले ॥
मोकळेंच वत्स असोनियां जाण। न वचे आपण गाईपासी ॥
रात्रीच्या अवसरीं वत्स निजे सेजे। पुराणीं फुजे श्रवणकाळीं ॥
कथेपासीं जाया सवें तेंहि येत। उभेंचि निवांत कथा ऐके ॥
गाय गोठा घरीं आपण कथेसी। जातां मी स्नानासी सवें चाले ॥
ऐसे नानापरी वत्स तें न सोडी। मजहि आवडी तयापाशीं ॥
दळितां कांडितां वाहतांहि पाणी। वत्सेविण जनीं नावडे हो ॥
रात्रीं कथा होती साहि करिता। मायबापें प्रीती पाहती तें ॥
तेथें तया संगें मीहि जाय कथे। वत्सहि तें तेथें सवें चाले ॥

असा क्रम चालू असतां एक दिवस जयरामस्वामींच्या कथेला गर्दी इतकी अतोनात झाली, कीं कोणाला जागा मिळेना. त्या वेळीं एका गृहस्थानें जागा व्हावी, म्हणून हें वासरूं दूर नेऊन बांधिलें. तेव्हां त्यानें हांबरडून इतका आकांत केला कीं, अखेर

साक्ष अंतरींचा तो स्वामी जयराम। वत्स अंतर्याम ओळखीलें ॥
म्हणे, ‘आणा त्या वत्सासी अंतरीं। काय नाहीं हरी आत्मवेत्ता ॥
कथेलागी होतो जीव कासावीस। पशु कीं तयास म्हणों नये’ ॥
आणविलें वत्स बैसवी आसनीं। पाहोनी नयनीं तोष वाटे ॥
मज ही कृपावंत कृपेचिया शब्दे। बोलावीं प्रारब्धें पूर्वपुण्यें ॥
कुरवाळुनी दोघां पाहे पूर्णदृष्टी। न मानेची गोष्टी जनालागीं ॥
मग म्यां आपुलें आपण पाहिलें। चरणीं घातलें लोटांगण ॥
वत्सहि तसेंचि पायावरी पडे। अपूर्वता घडे सर्व जना ॥

असें या वासराचें कोड बहिणी लाडानें करी व त्याच्या लडिवाळ

चाळ्यांनीं बहिणीचा आनंद त्रैलोक्यांत मावेनासा होई. पण पुढें या वासराचा तिच्या नवऱ्याला मोठा राग आला व त्यानें बहिणीस त्यावरून देहदंड केला आणि तो दोघांसहि त्रास देऊं लागला. अखेर हें वासरू मरून गेलें. तेव्हां बहिणीस अत्यंत वाईट वाटलें आणि असें दिसतें कीं, या वेळेपासून तिच्या मनांत या देहाचें नश्वरत्व व वैराग्य पूर्ण बिंबलें. पुढें तिला तुकाराम-महाराजांचा निदिध्यास लागला; व अखेर एके दिवशीं तुकोबानें स्वप्नांत येऊन बहिणाबाईला उपदेश दिला.

ठेउनिया कर मस्तकीं बोलिला। मंत्र सांगितला कर्णरंध्रीं।
कार्तिकांत वद्य पंचमी रविवार। मंत्र स्वप्नींचा विचार गुरुकृपा॥

यापुढें बहिणीला तिच्या नवऱ्याकडून बराच जाच सोसावा लागला. शेवटीं एके दिवशीं नवरा फारच रागावला व एकटाच तीर्थास निघून जाऊं लागला. परंतु त्याला आयते वेळीं जिवावरचें दुखणें आलें. या वेळीं बहिणीला तीन महिने गेले होते. तिचे चुडे बळकट म्हणूनच दुखण्यांतून नवरा वांचला, व पुढें हीं दोघेंहि नीट गोडीनें नांदूं लागलीं. यानंतर हें जोडपें देहूस जाऊन राहिलें; व तेथें तुकारामाच्या सांनिध्यांत कालक्रमण करूं लागलें. येथें मंबाजीची वगैरे हकीकत बहिणीनें प्रत्यक्ष पाहिलेली, आपल्या आत्मवृत्तांत निवेदन केली आहे.

येथें असतांना तिला कन्या झाली. तिचें नांव काशिबाई ठेविलें. असें दिसतें कीं, बहिणाबाईला आणखी एक मुलगाहि होता. बहिणाबाई ही शके १६२२-मध्यें अश्विन शुद्ध प्रतिपदेस मृत्यु पावली.

हिची रचना फारच प्रेमळ आहे. हिच्या शब्दांचा साधेपणा व वर्णनाचा मोहकपणा वरील उताऱ्यांवरूनहि सहज लक्षांत येईल. जवळ-

---

१. बहिणाबाईनें आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें दिली आहे. गोरक्ष— गहिनी — निवृत्ती — ज्ञानदेव — सच्चिदानंद — विश्वंभर — राघवचैतन्य — केशवचैतन्य — बाबाजीचैतन्य — तुकाराम — बहिणाबाई.

२. उपलब्ध असलेली बहिणाबाईची कविता याच मुलानें लिहिलेल्या वहीवरून छापिली आहे. या बहिणाबाईचा 'दीन कवी' या नांवाचा एक शिष्य होता. त्यानें 'पंचीकरण' वगैरे ग्रंथ रचिले आहेत.

जवळ जनाबाईसारखी गोडी हिच्या वाणींत दृष्टीस पडते रामदासाच्या शिष्यिणींच्या कवितेंत जसा रामदासीपणा दिसतो तसा तुकारामाच्या वाणीचा ठसाहि या तुकारामाच्या शिष्यिणीच्या वाणीवर स्पष्ट उमटलेला दिसतो. हिची रचना बहुतेक अभंग वृत्तांतच आहे. पण हिच्या 'कवितासंग्रहां'त हिच्या नांवावर एक आर्याहि दिलेली आढळते. ती अशी––

बहेणीनें अवलंबुनि श्रीरामस्मरण मानसीं धरिलें ।
गंगाधरवंशीच्या एकोत्तरशत कुळासि उद्धरिलें ॥

बहिणाबाईप्रमाणेंच **प्रेमाबाईची**हि रचना गोड आहे. हीहि सोळाव्या शतकाचे शेवटीं विद्यमान होती, असें मानितात. लहानपणींच पति निवर्तल्यामुळें प्रेमाबाईच्या मनाला एक तऱ्हेचें वैराग्य आलें होतें; व ही ईश्वरभक्तीकडे वळली. डोळ्यांनीं कृष्णाची मूर्ति पहावी, कानांनीं कृष्णकथा ऐकाव्या, तोंडानें कृष्णचरित्र गावें, व मनानें कृष्णाचें ध्यान करावें, हाच हिचा व्यवसाय असे. आल्यागेल्याला अन्नदान करावें, अडल्या माणसाला यथाशक्ति मदत करावी, यांतच ती आनंद मानी.

'गडे हो कृष्ण गडी आपुला । यमुनाडोहीं बुडाला ॥'

हें सर्वतोमुखीं ऐकूं येणारें रसाळ पद हिचेंच आहे.

हिचें दुसरें एक पद असें––

गडे हो कृष्ण गडी अपुला । राजा मथुरेचा झाला ॥ धृ० ॥
टाकुनि काळा कांबळा । कासे पितांबर कसिला ॥
टाकी मयुरपिछाला । जडित मुकुट तो त्याला ॥
आतां ओळखिल का आपुल्याला । राजा मथुरेचा झाला ॥ १ ॥
टाकुनि गुंजांची दाटि । घातला कौस्तुभ कंठी ॥
टाकुनि मुरली वेताटी । करिं घेत आयुधें मोठी ॥
आतां काय बागुल भय त्याला । राजा मथुरेचा झाला ॥ २ ॥
गोधनें चारूं विसरला । आतां तो नृपांमधि शिरला ॥
नारीनीं उरीं धरूनि चुरिला । तो आतां कुब्जेनें वरिला ॥
देतसे निजपद प्रेमेला । राजा मथुरेचा झाला ॥ ३ ॥



# वामन पंडित



शालिवाहन शकाच्या सोळाव्या शतकाचे शेवटीं वामन पंडित या नांवाचा एक अतिविद्वान् कवि महाराष्ट्र-भाषेंत होऊन गेला. हा ऋग्वेदी 'वसिष्ठ'-गोत्री ब्राह्मण मूळ विजापूरचा राहणारा. याचें उपनांव शेषे.[१] हा लहान वयापासूनच विद्याव्यासंगी असून याची बुद्धिहि तीव्र होती. या वेळीं विजापुरांत आदिलशाही पातशाहीचा अंमल चालू होता. यामुळें तेथें फारशी भाषेचा प्रचार फार होता व वामनानें लहानपणींच या भाषेचा अभ्यास केला. चरित्रकार सांगतात कीं, हा फारशी भाषेंत चांगला प्रवीण असून याचेवर पातशहाची मर्जी असे. एके वेळीं तेथील पातशहाचे मनांत यास बाटवून मुसुलमान करावें, असें आलें. पण ही गोष्ट वामनास कळली तेव्हां तो विजापूर सोडून बाहेर-देशीं निघून गेला. विजापूर सोडिल्यावर हा भिक्षावृत्तीवर उदरनिर्वाह करीत अनेक ठिकाणें हिंडला व पुढें श्रीक्षेत्र काशी येथें जाऊन राहिला. काशीस असतांना यानें संस्कृत भाषेचा व तत्कालीन अनेक शास्त्रांचा अभ्यास केला. वेदविद्येंत व शास्त्रविद्येंत यानें नैपुण्य संपादन केलें, आणि चांगली कीर्ति मिळविली. पूर्वपक्ष, उत्तरपक्ष करून सभाहि जिंकिल्या; व वाद करून विजयपत्रें घेत हा यानंतर दक्षिणेंत आला. असें सांगतात कीं,

---

१. विजापुरीं द्विजोदरीं । जन्मले वामन निर्धारी ।
ज्ञान जयाचें वसिष्ठापरी । 'वसिष्ठ'–गोत्री ते जाणा ॥
उपनाम म्हणती जन 'शेष' । साधिलें जेणें विशेष ।

इ. इ. भक्तमंजरी.

२. राजारामप्रसादी भक्तिमंजरींत 'शेष' हें उपनांव देतात. इतरत्रहि असेंच आढळतें. सदानंदाचा शिष्य सच्चिदानंद याचा 'अनुभवसागर' नांवाचा ग्रंथ आहे. त्यांत पुढील ओवी आहे—

येविषयीं युक्तिप्रयुक्ति । 'चित्सुधा' 'राजयोगा'दि ग्रंथीं ।
श्री वामन शेषे बहुधा युक्ति । श्री सच्चिदानंद-कृपे बोलिले ॥

हा बाहेर फिरे ,तेव्हां याचे बरोबर एक उंटभर पोथ्यापुस्तकें असत; व हे इतके ग्रंथ बरोबर घेऊन तो गांवोगांवी हिंडे.

काशीस असतांना यानें गुरूपाशीं विद्याभ्यास केला. तो मध्वमताचा अनुयायी झाला; व वामन पंडितहि प्रथम द्वैतमताभिमानी होता. परंतु द्वैतमताच्या विचारसरणीनें याच्या मनाचें समाधान नीट झालें नाहीं. तेव्हां पुढें यानें निरनिराळ्या मतांचे अनेक ग्रंथ वाचले, अनेक शास्त्र्यांच्या भेटी घेतल्या व अनेक विद्वानांची ज्ञानार्जनाच्या हेतूनें सेवाहि केली. परंतु त्यांपैकीं कोणापासूनदेखील याला पाहिजे होतें तसें समाधान झालें नाहीं. त्या वेळच्या तुकाराम-रामदासादि साधूंचाहि उपदेश घेण्याचें यानें योजिलें; पण तेंहि नीट जमलें नाहीं; व अखेर निराशेनें कंटाळून जाऊन तनुत्याग करण्याचा विचार याचे मनांत आला. परंतु —चरित्रकार म्हणतात रामदासाच्या सूचनेवरून— असें न करतां हा हिंडत हिंडत श्रीमलयाचल पर्वताकडे गेला. बरोबर याची स्त्री 'गिराबाई' हीहि होती. परंतु हा आचरणानें अत्यंत कर्मठ असल्यामुळें तिच्या हातचें न जेवतां आपलें जेवण आपण स्वतःच करी. स्वतःच जेवण करून जेवावें, सारा वेळ अभ्यास आणि सत्-चित्-आनंद अशा ब्रह्माचें चिंतन करीत रहावें आणि वाट क्रमावी, असा याचा नित्य क्रम असे. असा क्रम चालू असतां एके दिवशीं वामन पंडित पाकसिद्धि करीत होते. पुढें अग्नि पेटवून हातांनीं पाकक्रिया चालू होती, व मन ब्रह्मचिंतनांत गढून गेलें होतें. याप्रमाणें जड देहाच्या समाधानासाठीं हात व चित्ताच्या समाधानासाठीं मन आपापल्या क्रियेंत मग्न असतां, याच स्थितींत वामनास एका यतीचें दर्शन झालें व या यतीनें वामनाचे मनास साक्ष पटवून देऊन गुरूपदेश सांगितला; आणि पूर्वीं वरुणानें भृगूस पढविलेली '**भार्गवी वारुणी**' विद्या पढविली.

वामनानें आपल्या स्वतःविषयींचा चरित्रात्मक उल्लेख आपल्या ग्रंथांत कोठेंहि फारसा केलेला नाहीं. परंतु आपल्या आयुष्यांतील अत्यंत

आनंददायक व स्मरणीय अशा या गुरूपदेशाच्या प्रसंगाचा उल्लेख मात्र त्याच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं आढळतो. सर्वांत 'निगमसार' ग्रंथाच्या प्रारंभींच ही यतीची हकीकत वामनानें जरा विस्तारानें सांगितली आहे. या ग्रंथांत वामन म्हणतो—

श्री सच्चिदानंद गुरु । ब्रह्मविद्येचा कल्पतरु ।
करुणामृताचा सागरु । वेदांतवेद्य गोविंद ॥
जो भेटला मलयाचळीं । मार्गीं पाक करिते काळीं ।
आधीं स्फुरला हृदयकमळीं । सच्चित् पदार्थ विचारितां ॥
उपनिषदार्थ पाहतां । आत्मा ब्रह्म हें तत्त्वतां ।
परी अनुभवा न ये ऐशी चिंता । ज्या दिवसांत अत्यंत ॥
जेथें सर्व वृत्ति शून्य । तें सद्रूप ब्रह्म हें चैतन्य ।
तैसें न कळे तोंवरी धन्य । नव्हे ऐसें वाटलें ॥
तथापि सत्पदें पाहतां । आपणासि घडे ब्रह्मता ।
परि आनंद कैसा न कळे तत्त्वतां । मनीं ऐसा विचार ॥
ऐसें विचारितां मनीं । तों ऐकों आली हास्यध्वनी ।
पाहतों जंव परतोनि । वस्त्र भगवें देखिलें ॥
अवलोकिलें मुखा । तंव मस्तकीं नाहीं शिखा ।
मुखचंद्र देखतां सुखा । भरतें जैसें समुद्रासीं ॥
कृपादृष्टी अवलोकुनी । 'काय विचारितां हो मनीं ?' ।
म्हणोनि पुसतां, धावोनि । श्रीचरणा लागलों ॥
"स्वामी, आत्मा आपुला । ब्रह्म कैसें हें न कळे मला ।
विचारितां अनुभवा आला । सच्चित् पदें कांहिसा ॥
परि आनंद नाहीं कळला । आणि वृत्तिवेगळा न दिसे मला ।
न तुटे संदेहशृंखळा । श्रीगुरुविणें ॥
जो अंतःकरणीं स्फुरला । तोचि या रुपें प्रगटला ।
आतां कृतार्थ मजला । करावें स्वामी" ॥
ऐसें बोलोनि चरणीं । मस्तक ठेवोनि अंतःकरणीं ।
तो नित्य मुक्त चक्रपाणी । जगद्गुरु वरिला गुरुत्वें ॥

मस्तकीं ठेवोनि कर । सकळ उपनिषदांचें सार ।
पंचकोशीं करूनि निर्धार । केला ब्रह्मात्मतेचा ॥

आणि मग नंतर त्या सच्चिदानंदस्वामींनीं वामनाच्या मनास समाधान होईल, असा ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. त्या समयीं वामनस्वामी सांगतात:—

क्षणामाजीं चराचर । मज वाटलें माझें शरीर ।
साकार तितुके निराकार । तेचि समयीं ॥
जैसा उगवतां दिनकर । कांहींच नुरे अंधकार ।
उपदेशाचा बडीवार । ऐसा देखिला ॥
तों गमनाभिमुख देखिलें । म्यां दोन्ही चरण मस्तकीं धरिले ।
तों कृपेकरून बोलले । 'आतां उरलें तें काय? ॥
आम्हीच आत्मत्वें प्रगटलों । नाहीं बोलिलें तेंहि बोललों ।
अंतर्यामीं आम्हीच उरलों । निषेधिला क्षरभाग ॥
तुज विद्या भार्गवी वारुणी । उपदेशिली हे अंतःकरणीं ।
दृढ धरूनि गोविंदचरणीं । प्रीति धरणें आत्मत्वें ॥
विज्ञानकोशी अभ्यास । जो सांगितला तयास ।
सर्वथा न करणें आळस । हे आज्ञा आमुची ॥...........
भवभयें येतील शरण । त्यांसि हे विद्येचा उपदेश करणें ।
आपण तरोनि तारणें । हें ज्ञानियासी अवश्यक.'॥
ऐसें बोलोनि चालिले । ते उभे नाहीं राहिले ।
नेत्र झाकोनि अवलोकिले । हृदयामाजी ॥
घटिका मात्र केलें ध्यान । मग उघडिले लोचन ।
आत्मलाभानुसंधान । वाटला नाहीं वियोग ॥

वामनाला गुरूपदेश घडल्याचा हा गोड प्रसंग कधीं घडून आला, हें कळण्यास मार्ग नाहीं. पण असें दिसतें कीं, 'निगमसार' हा ग्रंथ लिहिण्यापूर्वीं थोडे दिवस हा योग घडून आला असावा. कारण, या गोष्टीची आठवण या ग्रंथरचनेच्या वेळीं वामनास अगदीं ताजी होती असें दिसतें. निगमसारांत हा प्रेमळ प्रसंग जितक्या विस्तारानें वर्णन

केला आहे तितक्या विस्तारानें तो दुसऱ्या ग्रंथांत सांगितला नाहीं. इतर ग्रंथांत या प्रसंगाचा उल्लेख मात्र आला आहे. किंबहुना 'निगमसार' हा ग्रंथ या प्रेमळ गोष्टीचे स्मरणार्थच लिहिलेला दिसतो. यांत प्रथमाध्यायांत ही यतिदर्शनाची हकीकत देऊन पुढील अध्यायांत सच्चिदानंद यतींनीं जी 'भार्गववारुणी विद्या वामनाला सांगितली ती विस्तारानें उघड करून सांगितली आहे. गुरुदर्शन, गुरूचा सहवास ही अवघी 'दोन मुहुर्तांत' घडलेली गोष्ट आहे, असें वामन निगमसारांत व इतरत्रहि म्हणतो. या 'दोन मुहुर्तांत', म्हणजे दोन-चार मिनिटांतच ही विद्या सच्चिदानंदांनीं वामनास पढविलेली दिसते. यापुढें, म्हणजे यानंतर, या यतीची व वामनाची केव्हांहि भेट झालेली दिसत नाहीं. तेव्हां इतक्या थोड्या अवधींत जी विद्या वामन पढला तीच या ग्रंथांत त्यानें सर्वांस निवेदन केली. वामन म्हणतो—

> ग्रंथ हा निगमसार । शब्द थोडे अर्थ फार ।
> कृपा करूनी याचा अर्थविचार । करावा संतीं ॥

निगमसारांत आणखी एक विशेष असें आहे कीं, इतर कोणत्याहि ग्रंथांत वामनानें रचनाकाल दिला नाहीं, तो यांत दिला आहे. 'शके पंधराशें पंचाणव । तैं ग्रंथ प्रगटला अभिनव ।' म्हणजे शके १५९५-मध्यें हा ग्रंथ लिहिला. वामनाचा काळ निश्चित करण्यास विश्वसनीय असा हा एवढाच आधार आज उपलब्ध आहे. गुरूपदेशानंतर अथवा या निगमसारानंतर वामनानें 'कर्मतत्त्व', 'समश्लोकी' वगैरे ग्रंथ लिहून आत्मज्ञान विशद करून सांगण्याकडे आपली वाणी खर्च केली, असें दिसतें. कारण या ग्रंथांत निगमसाराचा उल्लेख आला आहे. कर्मतत्त्वांत 'चित्सुधे'चा उल्लेख आहे. तेंहि प्रकरण शके १५९५-नंतरच लिहिलें असावें, असें वाटतें. 'सिद्धांतविजय' व 'अनुभूतिलेश' हीं लहान-लहान संस्कृत प्रकरणेंहि १५९५-नंतरच लिहिलीं. कारण यांतहि सच्चिदानंद यतीच्या उपदेशाचा उल्लेख आहे. अद्वैतमत प्रतिपादन करून ब्रह्मज्ञान सुलक्ष करून देणारीं अनेक लहान-लहान प्रकरणें लिहिल्यानंतर

वामनानें 'समश्लोकी' गीता लिहिली, असें दिसतें. 'शेषपर्यंक' श्रीकृष्ण गोविंदानें आपल्याकरितां 'सच्चिदानंद' अवतार धारण करून, व यतिरूपानें दर्शन देऊन आपली आत्मज्योती जागृत केली, व आनंदानुभव देऊन भार्गववारुणी विद्या पढविली, त्या परमात्म्याचे प्रत्यक्ष शब्द जी गीता, ती 'भूलोकभाषेंतें' अज्ञजनांना सुलभ करून द्यावी, असें वामन-स्वामींस वाटलें असावें; व तेव्हांपासूनच गीतेवर महाराष्ट्रटीका लिहिण्याचा त्यांनीं विचार केला असावा. गीतेवर विस्तृत व्याख्यान करितांना त्यांत आपल्या शब्दांची भेसळ होते व त्या परमात्म्याच्या प्रत्यक्ष शब्दांचा निर्भेळ भेला, लोकांच्या जिभेला लागत नाहीं, असा विचार मनांत आणून ही टीका 'समश्लोकी' करण्याचा विचार पंडितांनीं केला, असें दिसतें. कसेंहि असो. वामन पंडितांनीं ही समश्लोकी टीका, हा गोविंदमुखींचा शुद्ध प्रसाद, हा ज्ञानमार्गाचा प्रत्यक्ष चिंतामणि, आपल्या कृतीनें महाराष्ट्रलोकांस सहज साध्य करून दिला आहे. या टीकेला 'समश्लोकी' असें पंडितांनींच नांव दिलें आहे. पण हे श्लोक अनुष्टुभ् आहेत. यांची धाटणी अगदीं रामदासी ठशाची आहे; व पंडितांचें भाषानैपुण्य विशेष असल्यामुळें ही टीका खरोखरीच फार उत्कृष्ट उतरली आहे. हींतील शब्दांची मांडणी केवळ उपमेच्या पलीकडे झाली आहे. एका दिव्यावर दुसरा दिवा लावावा, व मग पहिला कोणता आणि मागाहून लाविलेला कोणता, हें जसें कळत नाहीं तशीच कांहींशी या गीतेच्या महाराष्ट्र-छायेची स्थिति झाली आहे.[२] यांत प्रत्येक अध्यायाला उपोद्घात व उपसंहार जोडिला आहे

१. मराठीला वामन 'भूलोकभाषा' असें वारंवार म्हणतो. देवलोकांची भाषा संस्कृत व भूलोकांची मराठी, असा आशय.

२. ही वामन पंडितांची 'समश्लोकी' पाहून महाराष्ट्रकविवर्य मयूर-पंडितहि मोहून गेले. हिजबद्दल पंत म्हणतातः—

रीति समश्लोकीची अतुला साधेल काय नव्यास ।
या सुयशें होइल कां रोमांचव्याप्त काय न व्यास ? ॥

[पान ४६३ पहा.]

व बाकी नुसतें श्लोकास श्लोक याप्रमाणें गोड भाषांतर आहे. ही टीका वामन पंडितांसहि इतकी आवडली कीं, ती संपूर्ण झाल्यावर, आपण आज धन्य झालों असें त्यांस वाटलें व 'माता धन्य, पिता धन्य, धन्य धन्य सुहृत्सखे' असा धन्यवाद त्यांनीं उपसंहारांत गाइला; आणि शेवटीं

'समश्लोकी टीका' प्रगटलि जगीं ज्ञानसरिता ।
सदा स्नानें पानें करुनि करि आनंदभरिता ॥
अनंता जन्मांच्या हरुनि सकळा साच दुरिता ।
स्वयें दे मोक्षातें श्रवण-पठणीं हेचि त्वरिता ॥

असें या समश्लोकीचें माहात्म्य सांगितलें. समश्लोकी रचिल्यानें धन्यता वाटून त्याच्या मनाचें कांहींसें समाधान झालें. परंतु ग्रंथरचनेच्या जिज्ञासेचें समाधान झालें नाहीं. त्या नित्यतृप्त भगवंताचे हे नुसते शब्द गाइल्यानें ग्रंथरचनेची तृप्ति झाली नाहीं. अग्नीवर टाकिलेल्या इंधनाप्रमाणें ती जिज्ञासा व आतुरता जास्तच वाढली. समश्लोकीनंतर 'गीतार्णवसुधा'[1], 'चरमगुरुमंजरी', 'उपादान', 'कर्मतत्त्व' वगैरे प्रकरणें वामन पंडितांनीं रचिलीं. यानंतर पुन्हां आणखी, गीतेवर 'जगदुपयोगी अशी टीका' लिहिण्याचें अनेकांच्या सूचनेवरून व

---

[पान ४६२-वरून]

पंतांनीं आपली गीतेवरील 'आर्याटीका'हि पंडितांच्या या समश्लोकीवरूनच रचिली. पंत म्हणतात—

श्रीमत् वामनविरचित गीता टीकोत्तमा समश्लोकी ।
आर्या टीका तेचि, छंद निराळे विचित्र हें लोकीं ॥

पंतांनीं प्रत्यक्ष गीता बाजूला ठेवून 'समश्लोकी'वरूनच आपला ग्रंथ रचावा, याहून या टीकेच्या उत्तमत्वाची आणखी साक्ष ती काय असणार.! मोरोपंतांनीं नुसती वामनी टीका पाहून आपली टीका रचिली असें नाहीं, तर त्यांनीं वामनाचेच शब्द घेऊन आपल्या आर्या केल्या आहेत.

१. गीतार्णवसुधेंत समश्लोकींतले श्लोक तसेच उतरून घेतले आहेत. कदाचित् हें प्रकरण वामनाच्या शिष्याचें असेल असा संशय येतो, व याच्या उपसंहाराच्या श्लोकावरून हा संशय थोडा दृढ होतो.

आग्रहावरून त्यांनीं ठरविलें.[1] अद्वैतामृतवर्षिणी अशी ही गीता-कामधेनु पुन्हां दोहावी, आणि तिच्या गोड व पुष्टिकारक रसाची पोई जगताला घालून द्यावी, असा विचार त्यांनीं मनांत आणिला. आपल्या जिवाचा जिवलग सखा जो अर्जुन त्याला श्रीकृष्णांनीं युद्धारंभीं ब्रह्मरसाची मेजवानी दिली, त्याच्या पंक्तीचा लाभ सर्वांना द्यावा व त्या अनुपम मेजवानीचा प्रसाद सर्वांना वांटून या प्रसादाचें अन्नछत्र त्रिकाल उघडें करून ठेवावें, या आशयानें वामन पंडितांनीं 'यथार्थदीपिका' रचण्यास सुरुवात केली. आपल्यापूर्वीं गीतेवर मराठींत जरी अनेक टीका झाल्या आहेत, तरी त्या असाव्या तशा नाहींत, असें पंडितांच्या मनास दिसून आलें. कोठें शब्दार्थ चुकले आहेत, तर कोठें प्रमेयेंच विपरीतपणें सांगितलीं आहेत, कोणीं उगाच अर्थवाद माजविला आहे, तर कोणीं कांहीं तरी ओढाताण करून आपल्या मतास अनुकूल असा अर्थ काढिला आहे.

'जे निर्गुणवादाभिमानी । विपरीत सर्व त्यांच्या व्याख्यानीं ।
कीं भक्त म्हणतां ऐसा ज्ञानी । पोट दुखों लागे तयांचें ॥

अशा स्थितींत या टीका दूर सारून, एक परमेश्वराच्या मनांतला खरा अर्थ स्पष्ट करून सांगणारी 'यथार्थ टीका' लिहिणें अवश्य वाटलें व ती त्यांनीं लिहिली. वामन पंडितांनीं आपल्या टीकेंत अंधळी भक्ति कुचकामाची ठरवून ज्ञानयुक्त सगुण भक्ति हीच सर्वश्रेष्ठ होय, मोक्षसाधनाचा तोच उत्तम मार्ग होय, असें प्रतिपादिलें आहे. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं अद्वैत व अव्यभिचारिणी सगुण भक्ति हेंच गीतेचें एक सार त्यांनीं काढिलें आहे. जो गीताटीका रचणार त्याच्या मनांतहि कडकडीत अनन्यभक्ति पूर्णपणें बिंबलेली पाहिजे व त्यानें श्रीकृष्णाव्यतिरिक्त इतर देवतांचे भजनीं लागतां कामा नये; तरच

---

१. तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य संत भक्त योगी ।
ते म्हणती कीं, 'जगदुपयोगी । ऐशी टीका करावी' ॥
—यथार्थदीपिका.

तो गीताटीका लिहिण्यास अधिकारी समजावा, असें पंडित सांगतात. नाहींपेक्षां 'मामेकं शरणं व्रज' असें कंठरवानें सांगणाऱ्या श्रीकृष्णाच्या शब्दांवर ग्रंथ रचितांना, प्रारंभींच मंगळाचरणाचे समयीं त्या श्रीकृष्णाला सोडून इतर देवतांना नमन करावें, आणि ग्रंथांत कृष्णाच्या अनन्य अव्यभिचारी भक्तीचें आग्रहपूर्वक व्याख्यान करावें, हा कोण विपरीत प्रकार! ग्रंथभर कृष्णाच्या चरणीं लागावें, तेंच सर्वांत श्रेष्ठ असें वारंवार म्हणावें; आणि शेवटीं प्रसादाला शंकराकडे धाव घ्यावी, याला काय म्हणावें! गीताभक्तानें हें करणें म्हणजे केवळ दांभिकपणा होय, आणि हा श्रीकृष्णभक्तीचा आपला कडकडीत नियम वामनानें पूर्णपणें पाळिला आहे.

श्रीज्ञानेश्वरांनीं ज्ञानापेक्षां भक्तीचें माहात्म्य जास्त वर्णन केलें आहे. भक्तिमार्गाचा प्रसार व्हावा, हा ज्ञानेश्वरांचा मुख्य हेतु होता. प्रेमळ भक्ति ही केवळ ज्ञानाहून श्रेष्ठ आहे, हें लोकांना जाहीर करणें हा ज्ञानेश्वरी-अवताराचा मूळ उद्देश समजतात; आणि म्हणूनच ज्ञानेश्वरांनीं 'भावार्थदीपिका' लिहिली. पण पंडितांना ही भोळी भक्ति विशेष मान्य नव्हती.

'जगीं मिरवोनी सिद्धी। आपुल्या टीकेची केली प्रसिद्धी।
तथापि नाहीं झाली अर्थसिद्धी। यथार्थ गीतारहस्याची॥'

असा त्यांनीं ज्ञानेश्वरावर आणि त्याच्या टीकेवर एक दुरून टोला दिला आहे. अंधळ्या भक्तीनें पंडितांना समाधान होण्यासारखें नव्हतें. भोळी भक्ति वाढवावी, हा हेतु त्यांनीं धरिलाच नाहीं. गीतेचें यथार्थ ज्ञान व्हावें, असाच आणि एवढाच एक हेतु त्यांनीं मनांत धरिला आणि म्हणूनच त्यांनीं 'यथार्थदीपिका' लिहिली. गीतेंतील शब्दांचा खरा अर्थ स्पष्ट व्हावा, त्यांतील सर्व अभिप्राय विशद व्हावा, आणि कृष्णाचें बोलणें नीट समजावें, असा उद्देश बाळगून त्यांनीं हा ग्रंथ रचिला. मग असें करितांना आपला ग्रंथ कोणास बरा वाटो वा न वाटो, त्याचा प्रसार

होवो वा न होवो, त्याची परवा वामन स्वामींनीं ठेविली नाहीं. ते म्हणतात—

तत्वता अर्थ ठायीं पडो न पडो । सर्वांस टीका आपुली आवडो ।
हा भाव असे तरी झडो । जिव्हाचि हे ॥

यथार्थदीपिका हा ग्रंथ ओवीबद्ध आहे. याची ओवीसंख्या बावीस-हजारांवर आहे. म्हणजे हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या जवळजवळ तिप्पट झाला. मात्र यांतली ओवीरचना अत्यंत अनियमित आहे. म्हणजे ती कोठें अगदीं आखूड व कोठें फार लांब, अशी झाली आहे. हें एक विद्वत्ताप्रचुर असें व्याख्यान असल्यामुळें यांत काव्यकल्पना फारच थोड्या आल्या आहेत. पण यांतील भाषा सकस, जोरदार व वकिली थाटाची आहे. हा ग्रंथ लिहिण्याचा हेतु व्याख्यान करण्याचा होता, काव्य करण्याचा नव्हता. यामुळें यांत शब्दलालित्य, किंवा मनाला उंच वातावरणांत नेऊन रंजविणारे दृष्टांत, व उपमा, अलंकार आणि भाषासौष्ठव पाहण्यास सांपडत नाहीं. कल्पनेच्या सुंदर भराऱ्या किंवा प्रतिभासंपन्न अशी डौलदार भाषा यांत आलेली नाहीं; आणि अशा ग्रंथांत ती तशी यावी, असा पंडितांचा अभिप्रायच नाहीं. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाप्रमाणें या टीकेच्या नवव्या अध्यायांत भक्तीचा गोड डांगोराहि नाहीं. तसाच, कोणत्याहि प्रकारचें किंवा आकाराचें 'लोखंड' असलें तरी त्याला परीस ज्याप्रमाणें 'सुवर्ण' करतो, त्याप्रमाणेंच 'पापयोनिहि अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥' असा ज्ञानेश्वरी-सिद्धांतहि नाहीं. याच अध्यायांत असमर्पक असा अर्थ गोड शब्दांनीं सांगणाऱ्या टीकाकारांसंबंधें पंडित लिहितात—

भगवंत म्हणा वेडा । अथवा त्या टीकेची श्रद्धा सोडा ।
गीता सोडोनि व्यर्थ पवाडा । गोष्टींचा वाचणें, तरी वाचा गोड गोष्ट ॥
गीता जाते पश्चिमेकडे । टीका चढे पूर्वदिशापर्वताचे कडे ।
दोहींस हात लाविती बापुडे । अर्थ सांपडे केवी तयां ॥

ही सर्वत्र टीका नीट काळजीपूर्वक वाचून, त्यांत ज्या ज्या इतर टीकाकारांच्या टीकांचा उल्लेख आहे व त्या काळच्या ज्या टीका वामनांनीं पाहिल्या असून त्यांतील विचारांसंबंधीं अभिप्राय प्रकट केले आहेत त्या सर्वांचा खुलासा चौकसपणें केला असतां अनेक दृष्टींनीं मनोरंजक असा एक सुंदर ग्रंथ निर्माण होईल. या एवढ्या मोठ्या ग्रंथांत वामनाचा कोणत्याहि तऱ्हेचा चरित्रात्मक उल्लेख आलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर कवीचीं मातापितरें, किंवा राहण्याचें ठिकाण किंवा नुसता रचनाकालदेखील यांत कवीनें दिला नाहीं. पण हा ग्रंथ कवीनें आपल्या वयाच्या शेवटीं शेवटीं रचिला असावा, असें मात्र वाटतें. कृष्णचरणारविंदीं असलेली पंडितांची नितान्त 'सगुण भक्ति' आणि त्या भक्तीच्या भरांत एकसारखा धो धो वाहणारा त्यांच्या 'कवना'चा प्रचंड प्रवाह पाहून मोरोपंतांनीं म्हटलें आहे कीं,

केली श्रीगीतेची व्याख्या, बहु भक्ति जींत गाजविली।
साजविली साधुसभा, भाषाकविकवनशक्ति लाजविली॥

अध्यात्मग्रंथांपैकीं प्रेमसरी, योगवासिष्ठ वगैरे प्रकरण निगमसारापूर्वी रचिलेलीं दिसतात. किंबहुना, हीं सर्व मलयाचलावरील गुरूपदेशाच्या आधींचीं असावीं, असेंहि म्हणण्यास जागा आहे. हीं प्रकरणें श्लोकबद्ध असून त्यांची भाषा पंडितांच्या इतर ग्रंथांप्रमाणेंच सरस व जोरदार आहे; आणि यांत भक्तीचा आणि विद्वत्तेचा मिलाफ फार उत्तम जुळला आहे.

येथपर्यंत वामनस्वामींच्या अध्यात्मपर ग्रंथांचा उल्लेख केला; आतां त्यांच्या इतरहि प्रकरणांचा उल्लेख केला पाहिजे. हीं इतर प्रकरणें अध्यात्माबाहेर आहेत किंवा यांत तसा शब्दहि आला नाहीं, असें मुळींच नाहीं; किंबहुना, ज्यांत अध्यात्माची छटा नाहीं असें वामनाचें एकहि प्रकरण सांपडावयाचें नाहीं. या प्रकरणांत मुख्य हेतु परमेश्वरचरित्र-वर्णनाचा आहे इतकेंच. एक प्रकारें हीं प्रकरणेंच किंवा आख्यानेंच जरा विशेष महत्त्वाचीं आहेत. हीं किंवा यांपैकीं कांहीं प्रकरणें शृंगाररसानें

भिजलेलीं असल्यामुळें हीं 'यथार्थदीपिका'कार वामनस्वामींचीं नसून निराळ्या एखाद्या वामनाचीं असावीं, असा पुष्कळ विद्वानांनीं तर्क बांधिला आहे. परंतु हीं प्रकरणें कोणाचीं आहेत, किंवा यांच्या लेखकाला ब्रह्मविद्या कितपत अवगत होती, हा श्लोकबद्ध ग्रंथ रचणारा वामन व्युत्पन्न पंडित होता किंवा साधारण शास्त्री होता, हे सर्व प्रश्न जरी क्षणभर बाजूला ठेविले तरी महाराष्ट्रसारस्वताच्या दृष्टीनें हीं सर्व फार महत्त्वाचीं आहेत, यांत संशय नाहीं. हीं आख्यानें व उपाख्यानें कोणाचींहि असोत, ज्याचीं तीं आहेत तोच महाराष्ट्राचा वामनस्वामी किंवा वामन पंडित होय. वामन पंडित या शब्दांनी ज्या हृदयंगम कवीची कल्पना मनांत येते तोच कवि यांचा कर्ता. हीं प्रकरणें नसतीं तर यथार्थदीपिका, निगमसार, वगैरे ग्रंथ इतके लोकप्रिय राहते ना. कदाचित् जनता यांना आणि यांच्या कर्त्याला समूळ विसरूनहि गेली असती. या वामनी प्रकरणांतली ज्ञानाची बाब बाजूला ठेविली तरी हीं प्रकरणें फार हृदयंगम आहेत. यांचें तेज विशेष आहे व यांतील शब्दरचनेची माधुरी अलौकिक आहे, यांत संशय नाहीं. निष्णात आचाऱ्यानें पाडिलेल्या मोतीचुराच्या कळ्या पाहूनच जसा आनंद होतो किंवा कुशल कारागिरानें बनविलेला जडावाचा दागिना पाहून त्यांतील सोन्याच्या किंवा हिऱ्याच्या किमतीशिवाय जसें त्याच्या पचीकामानेंच मन तृप्त होतें, तसाच प्रकार या वामन पंडिताच्या शब्द-कुसरीचा आहे. याच्या शब्दांची निवड आणि त्यांची श्लोकांत केलेली जडण पाहून चित्त वेधून जातें व कानहि तृप्त होतात; आणि असें असूनहि यानें अर्थाची हानि होऊं दिली नाहीं, असें नजरेस येतें.

वंशीं नादनटी तिला कटितटीं खोंवोनि पोटीपटीं ।
कक्षे वामपुटीं स्वशृंग निकटीं वेताटि ही गोमटी ।
जेवी नीरतटीं तरूतळवटीं श्रीशामदेहीं उटी ।
दाटी व्योमघटीं सुरां सुख लुटी घेती जटी धूर्जटी ॥

—वनसुधा.

असे दहापांचच श्लोक सोडिले म्हणजे इतर ठिकाणीं शब्दांबरोबर अर्थाची अपूर्व शोभा आढळेल. कवीनें आपल्या कलमानें काढिलेलें शब्दचित्र असें असावें कीं, वाचतां वाचतांच तें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें रहावें. आपल्या चर्मचक्षूंच्या आणि पुढें धरिलेल्या ग्रंथाच्या आड तें यावें व ग्रंथांतले शब्द दिसण्याचें राहून त्या जागीं तें चित्रच दिसूं लागावें; आणि हें असें होतें किंवा नाहीं, याचा अनुभव पुढीलसारखे वामनाचे श्लोक वाचून ज्याचा त्यानें आपल्या मनाशीं घ्यावा.

पृथु नितंब नितंबिनिचा वरी । कटितटीं करीं सूत्रचि सावरी ।
कनककंकणवृंदहि वाजती । मुखि सुखश्रमबिंदु विराजती ॥
श्रवणिचे श्रवणीं नग हालती । गळति गुंफिलिया शिरिं मालती ।
घुसळितां कुचकुंभहि कांपती । अमृत ज्यांतिल घे कमळापती ॥
फिरविते रवि ते दधिभोतरीं । मिरविते रवितेज नगांवरी ॥
स्वकरिं ते करीं चंचळता मनीं । उपरमे परमेश्वरगायनीं ॥

—उखळबंधन.

यांत दहीं घुसळणाऱ्या यशोदेचें व

गडबडां धरणीवर लोळते । वदवती न कवीसहि लोळ ते ।
रडत मूर्छित होय घडी घडी । पवन निश्चळ नेत्र न ऊघडी ॥
अलक हार गळ्यांतिल तोडिते । कुरळ केश मुखावरि सोडिते ।
करयुगें उर मस्तक तांडिते । वसन आणिक कंचुकि फाडिते ॥

यांत प्रेमानें रागावलेल्या सत्यभामेचें, हीं चित्रें किती सुबक आहेत ! हीं वाचून कोणाहि चिताऱ्याला तीं कागदावर काढावीं, असा सहज मोह पडेल. याप्रमाणेंच ' गजेंद्रमोक्ष ', 'सीतास्वयंवर', 'कात्यायनीव्रत', 'वनसुधा' वगैरे अनेक प्रकरणांतील सुंदर श्लोक वाचून कोणाला आनंद होणार नाहीं. आज तीनशें वर्षे आबालवृद्धांच्या तोंडी झालेले हे वामनाचे श्लोक किती लोकप्रिय आहेत, हें कोणास सांगितलें पाहिजे, असें नाहीं. हे गोड श्लोक वाचले म्हणजे, हा मानवी कवि नाहीं, हा भगवंताचा आवडता राघूच आहे, असें वाटतें. कविताधेनूच्या गोड गोरसांत, केव्हां भक्तिरसाचा तर केव्हां वत्सलरसाचा, केव्हां करुण

शृंगाराचा तर केव्हां अद्भुतरसाचा उत्कृष्ट मिलाफ करून, त्यांतच वेदांताचा मसाला टाकून उत्तम मिठाई बनवून ती आपणांस नित्य चाखविणारा हा त्या व्रजवासी गोपाळाचा हलवाईच आहे, असें मनांत येतें.

वामन पंडिताची जशी शब्दरचना तशीच वर्णनशैलीहि फार मार्मिक आहे. श्लोकांतल्या अर्थाला व त्या वर्णनाच्या प्रसंगाला साजेल अशीच वृत्तांची योजना करून पंडितांनीं आपल्या काव्याला विशेष मोहकता आणिली आहे. नाहीं तर एकच भरजरी ठाण घेऊन त्याचाच पाटव करावा व चोळीहि त्याचीच शिवावी, अंगावर शेल्याऐवजींहि तेंच, खालीं हांतरायलाहि तेंच घ्यावें, व वर छताहि त्याचेंच. असा सर्व एकवृत्तात्मक प्रकार नाहीं. जसें जेथें योग्य, तसेंच तेथें वृत्त वापरिलें आहे.[1] राधाविलास, राधाभुजंग इत्यादि प्रकरणांतला उघडा व बीभत्स शृंगार पाहून मनाला खंती वाटते व अशा कवीनें या अश्लील शब्द-रचनेंत सौख्य मानावें, किंबहुना आपल्या पुराणांत असलीं आल्यानें कवींना सांपडावीं हें पाहून वाईट वाटतें हें खरें, परंतु त्यामुळें यांतल्या पद्यांच्या रचनाचातुर्याचें व वर्णनाच्या हातोटीचें कौतुक कमी वाटत नाहीं.

गोपिकानंद श्रीमुकुंदाच्या अनेक क्रीडांचीं वर्णनें वामनानें फारच मनोवेधक केलीं आहेत, यांतील शब्द असे आहेत कीं, ते आपोआपच तेथें सहज येऊन बसल्यासारखे वाटतात. सृष्टीचें वर्णन वाचतांना, त्या स्थळीं आपण स्वतःच उभे असून तो देखावा आपण डोळ्यांनीं पाहत आहों, असा वाचकाचे मनाला भास व्हावा, हें जें कवीचें चातुर्य तें

---

१. वामन पंडिताच्या श्लोकांसबंधीं एक बाब अशी आहे कीं, त्यांत शब्दांचीं व्याकरणदृष्ट्या अशुद्ध रूपें वारंवार नजरेस पडतात; आणि वृत्तसुखार्थ ऱ्हस्वदीर्घांचेहि अल्पस्वल्प दोष त्यांत झालेले आढळतात. यासंबंधीं एक उणीव अशी आहे कीं, वामनाचे अस्सल पोथ्यांवरून त्याचे ग्रंथ छापिलेले नाहींत. इतकेंच नव्हे, तर चांगल्या शुद्ध प्रती जमविण्या-सबंधानेंहि कोणा संपादकानें अजून नीटसा यत्न केलेला दिसत नाहीं.

[पान ४७१ पहा.]

वामनाच्या रासोत्सवाच्या वर्णनांत उत्तम साधलें आहे. शरदृऋतूमध्यें एके रात्रीं, गगनांत तारापति चंद्र संपूर्ण कलांनीं प्रकाशला आहे, भोंवती अनेक तऱ्हांचीं सुवासिक पुष्पें प्रफुल्लित होऊन त्यांचा मधुर परिमल सर्वभर पसरला आहे, मंद आणि शीतळ असा वारा हळूहळू वाहत आहे, अशा समयीं कालिंदी नदीच्या वाळवंटांत, त्या पिठासारख्या स्वच्छ चांदण्यांत, चंद्रबिंबांतून स्रवणाऱ्या अमृताच्या फवाऱ्यांत तो नंदकिशोर श्रीकृष्ण, गोकुळांत मदनपुतळ्यांना घेऊन, नानाविध स्मरविलासांनीं श्रांत झाल्यावर रासोत्सव करीत होता. या समयाचें वामनाचें शब्दचित्र फार बहारीचें उतरलें आहे. याचा थोडा मासला देतों—

माळाकार परस्परें कर गळां घालोनि गोपांगना ।
गाती नाचति पाहती अवघिया एका जगज्जीवना ।
सोन्याचे मणि ओंविले भुजगुणीं गोऱ्या शशांकानना ।
पाचूचे पदक स्थळीं स्मर मना श्रीदेवकीनंदना ।।

---

[पृष्ठ ४७०–वरून]

बहुतेकांनीं सर्वसंग्रहावर भिस्त ठेविलेली दिसते. या शुद्धाशुद्धाच्या बाबींत मूळ पोथ्यांत पाहतां असा प्रकार लक्षांत येतो कीं, दासोपंत, मोरोपंत वगैरेसारख्या संस्कृतज्ञ कवींनीं मराठींतलीं रूपें संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीनें बरोबर करून लिहिलीं आहेत; व जे संस्कृत भाषेंत प्रवीण नव्हते असे तुकाराम, महीपती वगैरे शुद्ध मराठी कवींनीं आपल्या रचनेंत मराठी व संस्कृत शब्दांचीं रूपें नेहमीं–मराठ्यांच्या–बोलण्यांत येतात तशींच कायम ठेविलीं आहेत. ऱ्हस्वदीर्घसंबंधें या शुद्ध मराठी कवींचा कल शब्दाचें रूप प्रायः दीर्घ करण्याकडे जास्त दिसून येतो. आतां शब्दांचीं रूपें, ती भाषा बोलणाऱ्या बहुजनसमाजामध्यें जशी रूढ असतील व त्यांतले शिष्ट लोक तीं जशीं उच्चारीत असतील तशीं लिहिणें शुद्ध समजावयाचें, किंवा ज्या मृत भाषेंतून ते मूळ शब्द आले असतील तींतील व्याकरणाच्या नियमानुसार जीं रूपें बनतील तशीं तीं लिहिणें शुद्ध समजावयाचें, हा एक स्वतंत्र प्रश्न आहे. सध्यां, वामन पंडित उत्तम संस्कृत पंडित असून शब्दांचीं रूपें संस्कृताच्या दृष्टीनें अशुद्ध अशीं आपल्या काव्यांत वापरतो, एवढी बाब जरा लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

जे ते गोपिस आपणाच जवळी वाटे असावा हरी ।
जाणोनि जितुक्या स्त्रिया तितुकिया तत्काळ मूर्ती धरी ॥
सोन्याचे मणि इंद्रनीळ तितके तो हार त्याचे परी ।
दो गोपींत मुकुंद कृष्णयुगुलीं एकेक ते सुंदरी ॥
त्या गोपी जितुक्या करोनि तितुक्या मूर्ती जरी नाचला ।
ज्या त्या मानिति आपणाचि जवळी आहे हरी येकला ।
तीची तेथुनि दृष्टि ती न विघडे जो जो जिणें देखिला ।
मेघश्याम अनेकरूप रमतो ऐसें न भासे तिला ॥
रूपें तीं स्मरकल्पवृक्ष हरिचीं गोपांगना त्या लता ।
कीं ते मेघसमूह त्या चमकती त्यांमाजि विद्युल्लता ॥
कीं तारा युवती अनत गगनीं मूर्ती मधें नीलता ।
जेव्हां एकचि तेधवां उडुगणीं भूचंद्रमा खालता ॥
गोऱ्या गौळणि सांवळचा हरितनू रासोत्सवीं नाचती ।
श्रीगंगेयमुनेमधें तरल ते कल्लोळ आंदोलती ।
गोपीलोचन मीन लोल मकर श्रीकुंडलें डोलती ।
गोपस्त्रीकुचकुंभ तारक करी पोहे रतीचा पती ।
कोणी श्रीभुजदंड हुंगिति गळां जे आपुल्या घातले ।
जे स्वाभाविकही सुगंध अगरुश्रीचंदनें चर्चिले ।
कोणी श्रांत कुचावरी करतल श्रीमूर्तिचे ठेविले ।
कोणी ओष्ठहि नाचतां मुख मुखीं घालूनि आस्वादिले ॥
गोपीनाथकथारुची सुजन हो घ्या आपुलाल्या मना ।
शृंगारामृत हेंचि घ्या त्यजुनियां दुर्वासना कामना ।
गोपीतें अधरामृतें कलियुगीं नामामृतें वामना ।
केलें धन्य तया तुम्ही फुकट कां नेघा जगज्जीवना ।

या रासोत्सवांत कामिजनांच्या मनोविलासाचें, तरुणींच्या आतुरतेचें आणि स्त्रियांना स्वाभाविक अशा मत्सरी स्वभावाचें वर्णन यथास्थित पाहण्यास सांपडेल. या वर्णनांत योजिलेले शब्द असे कोमल व मधुर आहेत कीं, ते वाचीत असतांना मन प्रसन्न होतें; आणि इतकें असून या काव्यांत बीभत्सपणा आला नाहीं. हें सबंध वर्णन

इतकें सरस उतरलें आहे कीं, तें वाचीत असतां मन अर्थाबरोबर धावूं लागतें आणि तें वाचून झाल्यावर आपण क्षणभर तरी त्या ठिकाणीं जाऊन तो देखावा डोळाभर पहावा, असें वाचकांच्या मनांत येतें. हेंच काय, पण वामनाचीं बहुतेक सगळींच वर्णनें अशीं अपूर्व आहेत. त्यानें अनेक ठिकाणीं काढिलेलीं श्रीकृष्णाचीं मनोहर शब्दचित्रें वाचतां वाचतां गोपीजनांप्रमाणेंच

'पाहतां पाहतां पहावाच वाटे। रुते चित्त जाऊनि नेत्राचि वाटे।'

अशी स्थिति सर्वांचीच होते, आणि मनांत संतोषाच्या उकळ्या फुटतात.

वामन पंडितानें भारतभागवताप्रमाणेंच रामायणांतील पांच—सात आख्यानांवर प्रबंधरचना केली आहे. यांपैकीं रामजन्मांतला

टळटळित दुपारीं जन्मला रामराणा।
म्हणुनि सकळ गाती ठाऊकें हें पुराणा॥
दशरथगृहमाथां सूर्य आला अहो तो।
कुलतिलक पहाया तोचि मध्यान्ह होतो॥

हा मधुर श्लोक म्हटल्यावांचून प्रायः कोणाहि हरिदासाचा रामजन्म पुरा होत नाहीं, हें खरें आहे. पंडितांच्या अंगच्या विद्वत्तेमुळें व कवित्वामुळें या रामायणांतल्या प्रकरणांतहि कांहीं पद्यें गोड आलीं आहेत. पण तीं फारच थोडीं आहेत. कृष्णकथेंत जी ठिकठिकाणीं बहार आढळते ती यांत कोठेंच आढळत नाहीं. यदुनाथाचीं चरित्रें वर्णन करितांना पंडितांच्या काव्यसागराला जशी भरती येते, तशी ती रघुनाथाच्या चरित्रवर्णनांत येत नाहीं, हें मात्र खरें आहे. 'गजेंद्रमोक्षा'सारखें लहानसें प्रकरणः त्याचे अवघे दहा-बारा श्लोक आहेत. पण ते वामनानें इतके गोड गाइले आहेत कीं, त्यांतला प्रत्येक श्लोक कानांत गुणगुणतच राहतो.

'नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी।
हरी जो तापातें, उचलुनि कृपासिंधु लहरी॥'

हा श्लोक किती वेळां म्हटला तरी फिरून एकदा तो म्हणावासाच वाटतो, इतका तो गोड आहे.

साधेल तों शुद्ध शब्दांची योजना करणें, आपण जें वृत्त कथन करीत आहों त्याच्या रसाला पोषक अशा वृत्तांत श्लोकरचना करणें, अनुप्रासादि अलंकार घालून सौरस्य वाढविणें व जरा शब्दचमत्कृति उत्पन्न करणें, तसेंच मंगलाचरणाच्या एकदोन श्लोकांत पुढील कथानकाचा सारांशरूपानें निर्देश करणें हे सर्व वामनी प्रकरणांचे विशेष असून, ते वामनपंडिताच्या मार्मिकपणाचे व विद्वत्तेचे द्योतक गुण आहेत. केवळ कथानकावर नजर ठेवून कांहींशी स्वतंत्र रचना करीत असतां कवीची मार्मिकता व रसिकता जशी प्रकट होते, तशीच समश्लोकी 'भाषांतरें' करीत असतांना त्याची विद्वत्ता व त्याचें भाषाप्रभुत्व हे गुण नजरेस येतात. वामनानें केलेलीं भाषांतरें पाहिलीं असतां हे दोन्ही गुण या पंडिताच्या अंगांत किती उत्कृष्ट होते, हें कोणाच्याहि नजरेस येईल. गीतासमश्लोकीचा उल्लेख मागें आलाच आहे. याशिवाय यानें केलेलीं आणखीहि भाषांतरें उपलब्ध आहेत. 'चतुःश्लोकी भागवत', 'अपरोक्षानुभूति', तसेंच 'ध्यानमाले'सारखीं भागवतांतील लहान-लहान प्रकरणें, यांचीं वामनानें गोड भाषांतरें केलीं आहेत. त्यांत 'पद्यासि पद्यचि निघे मुखिं वामनाच्या' असा प्रकार असून तीं 'मनाच्या वृत्ती' हरण करण्यासारखीं सुंदर उतरलीं आहेत.

जगन्नाथ पंडिताची 'गंगालहरी' व भर्तृहरीचीं 'शतकें' यांचीं मराठींत भाषांतरें उतरण्यांत वामनाची खुबी विशेष आहे. या भाषांतरांनीं वामनानें मराठी भाषेची एक विशेष प्रकारें सेवा केली आहे. संस्कृतांतले उत्तम काव्यग्रंथ मराठींत आणावे, व त्यांचा आस्वाद आपल्या बांधवांस घेऊं द्यावा या बुद्धीनें केलेलीं भाषांतरें कौतुकास्पद आहेत. भक्तिभावाकरितां नव्हे, तर उत्तम काव्य इतक्याचकरितां संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरे स्वभाषेंत करण्याचा हा वामनानें सुरू केलेला

परिपाठ प्रशंसनीय आहे. या काव्यांप्रमाणेंच शाकुंतलादि नाटकांचीं व कादंबरीसारख्या इतर ग्रंथांचीं भाषांतरें करण्यापर्यंत मजल कां गेली नाहीं, हें कळत नाहीं. एक मनें असेंहि वाटतें कीं, यांचींहि भाषांतरें झालीं असतील व पुढें-मागें तींहि उपलब्ध होतील. मेहनत घेऊन यांचा छडा मात्र लाविला पाहिजे. दिल्लीपतीचें मन आणि कन्या हरण करणाऱ्या जगन्नाथरायांनीं 'गंगालहरी' हें स्तोत्र कोणत्या प्रसंगीं रचिलें हें सर्वश्रुतच आहे. हा प्रसंग थोडासा अद्भुत असून यांत कवीनें काव्यरस उत्तम भरून दिला आहे; व वामन पंडितानेंहि कोणत्याहि प्रकारें त्याची हानि होऊं न देतां हें चटकदार काव्य शिखरिणी वृत्ताच्या श्लोकांत भाषांतरित केलें आहे. भर्तृहरीचीं शतकें तर संस्कृतांत आज हजारपांचशें वर्षें सर्वतोमुखीं झालेलीं आहेत. याचीं बहुतेक मूळच्याच वृत्तांत अशीं पद्यास पद्य याप्रमाणें भाषांतरें वामनानें केलीं. तीं इतकीं सरस उतरलीं आहेत कीं, मूळ संस्कृताप्रमाणेंच वामनाचे श्लोकहि सर्वभर पसरलेले दिसतात. असें दिसतें कीं, वामनानंतर आणखीहि तीनचार कवींनीं या शतकांचीं मराठींत भाषांतरें केलीं. पण कालगंगेनें बाकीचीं बुडवून टाकून एकट्या वामनाचेंच तेवढें भाषांतर आजपर्यंत तरवून ठेविलें, ही एकच गोष्ट त्याच्या चांगलेपणाची उत्तम साक्ष आहे.[1]

वामन पंडिताची स्त्री वामन पंडिताबरोबरच नेहमीं फिरे, असा ध्वनि वर आला आहे. वामन पंडिताच्या या स्त्रीचें नांव गिराबाई. हिला आत्मज्ञानाचा उपदेश व्हावा म्हणून पंडितांनीं 'प्रियसुधा' या नांवाचें

१. उपलब्ध असलेल्या भाषांतरांत वामनाच्या खालोखाल साधारणपणें नरहरीचें भाषांतर आहे. पण यांत एक अडचण अशी आहे कीं, अमुक एक भाषांतर अमक्याचें असें निश्चयानें सांगण्यासारखा पुरावा आपणांजवळ नाहीं. आज वामनाच्या म्हणून प्रसिद्ध असलेल्या भाषांतरांत अनेक श्लोक इतर भाषांतरकारांचे घुसडले गेले आहेत. वामनाचे स्फुट श्लोक, सवया, गजेंद्रमोक्ष वगैरे प्रकरणांतहि हाच प्रकार अधूनमधून नजरेस येतो.

एक प्रकरण लिहिलें आहे.

'प्रियसुधा' उपदेश 'गिरा' प्रति। करुनि वामन तोस म्हणे सती।
परम आवडि आपुलि आपणा। वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥

हा पंडितांनीं घालून दिलेला आत्मज्ञानाचा ओनामा आबालवृद्धांनीं वाचण्याजोगा आहे. आपलें 'समश्लोकी' हेंहि काव्य असेंच एका शिष्यासाठीं पंडितांनीं रचिलें, असें म्हणतात. 'उपदेशमाला' या प्रकरणांतहि 'नृसिंहानें' ही करविली, असा उल्लेख आला आहे. वामन म्हणतो—

'उपदेशमाला'। सुता देवराया। नृसिंहें बिबाया। करविली॥
तेचि सर्व शिष्यां। उपयोगा आली। कंधरीं धरली। ज्यानें त्यानें॥

अर्थात् ज्यानें त्यानें गळ्यांत घातलेल्या या लहानशा माळेचा सुवास चांगला आहे, हें निराळें सांगणें नको. याप्रमाणेंच रामदासाच्या धाटणीवर लिहिलेले 'मनाचे श्लोक', 'मुखी रामचंद्र स्मरा वेळवेळां' हा चतुर्थचरण नेहमीं येणारें 'वामनी बोध' हें प्रकरण, 'नाममहिमा' 'भक्तिमाहात्म्य' हींहि प्रकरणें बऱ्यांपैकीं आहेत. पण यांत वामन-पंडिताच्या पुढील हृदयंगम रचनेचा थाट आलेला दिसत नाहीं. कदाचित् हीं प्रकरणें ही याची प्रारंभींची रचना असणें संभवनीय आहे.

'यथार्थदीपिके'मध्यें दिसून येणारी असामान्य विद्वत्ता आणि 'राधाभुजंग', 'राधाविलास', 'कात्यायनी व्रत', 'बालक्रीडा' इत्यादि प्रकरणांत दृष्टीस पडणारा किळसवाणा चावटपणा यांच्या मुळाशीं असणाऱ्या भिन्नभिन्न तऱ्हेच्या वृत्ति पाहून या निरनिराळ्या प्रकरणांचे रचणारे पुरुष भिन्नभिन्न असावे, असें मानण्याकडे मनाची प्रवृत्ति साहजिकपणें होते; व एकदा या प्रवृत्तीनें ग्रासिलें म्हणजे दोन, चार किंबहुना पांच किंवा अधिकहि 'निरनिराळे वामन कवी' आपापल्या बुद्धीच्या धावेप्रमाणें टीकाकार व चरित्रकार मानूं लागतात. वामन पंडितासंबंधींची चरित्रात्मक माहिती फारच कमी आहे; व माहिती

ज्या मानानें कमी आहे त्याच मानानें त्याच्यासंबंधींच्या गप्पा जास्त पसरलेल्या आहेत. यामुळें या भिन्नत्वाच्या प्रपंचाला एक प्रकारें मनसोक्त वाव मिळाला आहे. शून्यापासून जग निर्माण झाल्याचीं बोलणीं अंगवळणीं पडलेल्या विद्वानांना एकाचे चार, पांच वामन करतां येणें ही कांहीं मोठीशी नवलाची बाब नाहीं.

वामन कवीच्या अनेकत्वाविषयीं अनेकांचीं अनेक मतें आहेत. पण सर्वांमध्यें 'यथार्थदीपिका'कार वामन पंडित व 'श्लोकबद्ध' रचना करणारा वामन पंडित हे दोन अगदीं भिन्न पुरुष होत, या मुद्यासंबंधीं अगदीं एकवाक्यता दिसते. बहुतेकांच्या मतें, या दोन व्यक्ति निरनिराळ्या होत, असें ठरलेलें दिसतें. पण असें मानण्यास कांहीं विशेष पुरावा दिसत नाहीं. किंबहुना पुरावा आहे तो थोडासा उलट बाजूचाच दिसतो म्हणजे तो पाहून गोड यमकांची सुंदर श्लोकबद्ध रचना करणाऱ्यानेंच यथार्थदीपिका रचिली, असें मनाला वाटतें. निगमसारांत मळयाचलावर गुरूपदेश झालेला वर्णन करणाऱ्या वामनानेंच यथार्थदीपिका, गीता-समश्लोकी, अनुभूतिलेश, सिद्धांतविजय हे ग्रंथ लिहिले, यांत लवमात्र शंका नाहीं. कारण या सर्वांत मळयाचलावरील गुरूपदेशाचा उल्लेख आलेला आहे. तसेंच, गीतासमश्लोकीचे शेवटीं चार सुंदर श्लोक आहेत. हे निःसंशय याच वामनाचे आहेत. या श्लोकांची धाटणी इतर प्रकरणांतील श्लोकांच्या धाटणीशीं इतकी मिळती आहे कीं, हीं प्रकरणें याच वामनानें रचिलीं असलीं पाहिजेत, अशी सहज खात्री होते. याशिवाय यास आणखी प्रत्यंतर असें आहे कीं, समश्लोकींत शेवटील अध्यायाच्या उपसंहारांत, येथें विस्तार केला असतां ग्रंथ वाढेल याकरितां 'ब्रह्मस्तुति' त्रिचरणी टीका हे, ते स्थळीं पहा। (अ. १८ उप० श्लोक ३६) असें लिहिलें आहे. ब्रह्मस्तुति[1] ही

१. ब्रह्मस्तुति हें काव्य भक्तिरसानें बबथबलेलें असून फार सरस आहे. यांत ब्रह्मदेवानें श्रीकृष्णाची केलेली स्तुति भागवताच्या दशमस्कंधाधारें वर्णिली आहे.

श्लोकबद्ध असून 'त्रिचरणी' आहे; व तृतीय चरणांत (भागांत) हा विषयहि आलेला आहे. 'ब्रह्मस्तुति' हें भागवतांतलें प्रकरण आहे, यावरून भागवतांतलीं श्रीकृष्णचरित्रें मराठींत याच वामनानें गाइलीं, हें उघड होतें. शिवाय दुसरें असें कीं, 'निगमसारांत'च भागवती प्रकरणें रचिल्याचा उल्लेख आलेला आहे. हे दुवे इतके स्पष्ट आहेत कीं, यावरून भागवतांतील शृंगारात्मक अनेक कृष्णकथा खुलवून सांगणारा वामन आणि यथार्थदीपिका लिहिणारा वामन हे एकच पुरुष होत, असें मानणें भाग पडतें. हाच वामन रामदासाच्या आश्रितवर्गांत असून यानेंच रामदासाच्या धर्तीवर मनाचे श्लोक, अष्टकें वगैरे रचिलीं असणें अगदीं शक्य आहे. यानेंच पुढें कृष्णकथा वर्णन केल्या व यानेंच पुढें मलयाचलावरील गुरूपदेशानंतर निगमसार, यथार्थदीपिका वगैरे ग्रंथ लिहिले असणेंहि संभवनीय आहे; व प्रचलित समजहि असाच आहे; तेव्हां भरभक्कम व समाधानकारक पुरावा पुढें येईपर्यंत हा समज टाकून नवा तर्क बांधणें हें केव्हांहि इष्ट नाहीं.

वर सांगितलेल्या सरणीला कांहीं गोष्टी विरोधी अशा दिसतात. त्यांचाहि येथें उल्लेख करणें रास्त व अवश्य आहे.

१. वामनाच्या दोन समाधी.

२. 'भीष्मयुद्ध' या प्रकरणांतील प्रारंभींचा व शेवटला असे दोन श्लोक.

३. 'भीष्मशरपंजर' या प्रकरणांतील शेवटला श्लोक.

(१) वामन पंडिताच्या म्हणून मानिल्या जाणाऱ्या दोन समाधी आहेत. एक वारणातीरीं शीगांव कोरेगांव येथें; व दुसरी वाईजवळ कृष्णातीरीं भूगांव येथें. केवळ दोन समाधी असणें ही एकच बाब दोन भिन्न वामन मानण्यास पुरेशी नाहीं. एकाच पुरुषाच्या दोन-दोन समाधी असल्याचीं उदाहरणें इतरत्र आहेत. माझा तर्क[1] असा आहे कीं, वामनाच्या 'हरि' नांवाच्या

१. या तर्काला कोणताहि योग्य पुरावा मजजवळ नाहीं, हें येथें सांगणें अवश्य आहे.

शिष्यानें कृष्णातीरींची समाधी आपल्या गुरूच्या स्मरणार्थ बांधिली असावी व हा 'हरि' शिष्य धौमकडील राहणारा असावा.

(२) 'भीष्मयुद्ध' या प्रकरणांत छापील प्रतींत प्रारंभींच 'लक्ष्मीनृसिंह-चरणास' वंदन आहे; व शेवटीं

तााताभिधान नृहरि पंडित माय लक्ष्मी ।
दे सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ।
शांडिल्यगोत्र, कुळदेव नृसिंह ज्याचा ।
दासानुदास निज वामन हो अजाचा ॥

असा श्लोक आहे.

यांपैकीं, आईबापांचीं नांवें अनुक्रमें नृहरि व लक्ष्मी अशीं दिलीं आहेत, ही बाब अडथळ्याची नाहीं; कारण, वामनानें दुसरीं नांवें दिलेलीं नाहींत. परंतु यांत दिलेलें 'शांडिल्य' गोत्र ही खरी अडचण दिसते. कारण वामनानें आपलें गोत्र 'वासिष्ठ' असें 'सिद्धांतविजये' ग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे. वरील चौथा चरण छापील ग्रंथांत आहे. पण मीं पाहिलेल्या अनेक लेखी प्रतींत हा चरण **'दासानुदास हरि तो सकळां द्विजांचा'** असा लिहिलेला आहे.[२] तेव्हां हें प्रकरण वामनाचें नसून त्याचा शिष्य जो 'हरि' त्याचें आहे, हें उघड आहे. या वामनशिष्य हरीचीं अनेक प्रकरणें वामनी ग्रंथ छापणारांनीं त्यांत छापून दिलेलीं आहेत. 'विराटपर्व' हें वामनी ग्रंथांत नेहमीं आढळणारें काव्य वामनाचें नसून याच 'हरी'चें आहे. या विराटपर्वांतील बहुनेक अध्यायांचे शेवटीं अशा अर्थाचे द्योतक उल्लेखहि आलेले आहेत.

---

१. 'अहो देहो जातो रघुकुलगुरोर्गोत्रजलधौ' —सिद्धांतविजय.

२. एका बाडांत भीष्मयुद्धाचे शेवटीं हा श्लोक नाहीं. परंतु त्याच बाडांत हा श्लोक 'जयद्रथवधा'चे शेवटीं आहे. येथेंहि शेवटला चरण 'दासानुदास हरि तो सकळां द्विजाचा' असाच आहे.

(३) 'भीष्मशरपंजर' या प्रकरणाची हकीकतहि वरच्याप्रमाणेंच आहे. या प्रकरणाच्या मजजवळच्या लेखी प्रतींतील शेवटल्या श्लोकांचे शेवटले दोन चरण पुढीलप्रमाणें आहेत.

'ऋषी बोलिला भूप परिक्षतातें । कसा तुष्टला श्रीहरी दिक्षितातें ।'

हा श्लोक काव्यसंग्रहांतल्या या आख्यानांत अठ्ठाविसावा आहे; व छापील प्रतींतला 'काशींत नाम' इ० श्लोक लेखी प्रतींत नाहीं. शेवटीं 'श्रीभीष्मशरपंजर संपूर्णः श्रीकृष्णार्पणमस्तु' इतकेंच लिहिलेलें आहे. तेव्हां हेंहि काव्य वामनाचें नसून 'दिक्षित' किंवा 'हरि दिक्षित' या नांवाच्या इसमाचें आहे, हें उघड आहे. कदाचित् हें वर उल्लेखिलेल्या 'हरि' नामक वामनशिष्याचेंहि असेल व या हरीचेंच उपनांव 'दिक्षित' असें असेल.

हीं बाडें मला वाईचे आसपास मिळालेलीं आहेत; आणि एक धौमच्या इनामदारांकडून मजकडे आलेलें आहे; व त्यांत या हरीचीं प्रकरणें आहेत. असो. वामन पंडितांची चरित्रात्मक माहिती फारशी उपलब्ध नाहीं, हें सांगितलेंच आहे. यांचा निधनकाल शके १६१७-मध्यें झाला, असें मानितात[१]. वामनाची सुमारें अर्धा लक्ष ग्रंथसंख्या हल्लीं आपणांस उपलब्ध आहे, व शोधाअंतीं आणखीहि सांपडेल असा भरवसा वाटतो. वामन पंडितांचा 'श्रुतिकल्पलता' नामक संस्कृत ग्रंथ उपलब्ध असून तो अप्रकाशित आहे.

मागें संतमंडळासंबंधें लिहिलें त्यांत, एखादा मोठा भगवद्भक्त हयात असतां त्याच्या दिव्य तेजानें इतरहि संत प्रकाशित होऊन भगवद्भक्त बनलेले आपण वाचिले. तसेंच, एखादा प्रतिभासंपन्न कवि आपली रचना करीत असतां व तद्रचित काव्यें लोकांच्या कानांत गुणगुणत असतां, त्याच प्रकारची रचना करण्याची चेतना अनेक पुरुषांस होऊं लागते.

---

१. शके १५९५ वैशाख वद्य ६ पांडववाडीस (वाईजवळ) वामन पंडित समाधिस्थ झाला, असें सरंजामे यांनीं लिहिलें आहे. पण हें उघड चुकीचें आहे.

विशाल बुद्धीची ही अशी प्रभा पडून इतर सामान्य जनांच्या बुद्धिहि प्रकाशित होऊन चमकूं लागतात; व इतर साधनाभावीं स्तब्ध राहणारी त्यांची वाणी त्या प्रतिभासंपन्न कवीच्या वाणीचा प्रतिशब्द करून तशीच वाचा बोलूं लागते. हा नियम सचेतन सृष्टींतच आढळतो असें नाहीं; तर अचेतन सृष्टींतहि हाच नियम दृष्टीस पडतो. एखादें तंतुवाद्य किंवा चर्मवाद्य नीट सुरावर वाजवीत असतां त्याच्या शेजारीं ठेविलेल्या तशाच दुसऱ्या वाद्यांतून त्यास स्पर्शहि न करितां तसेच ध्वनि उमटूं लागतात; व जसजसें पहिलें वाद्य जास्त तालावर वाजूं लागेल, तसतसें तें दुसरें वाद्यहि जोरानें बोलूं लागतें; आणि याच आघात-प्रत्याघाताच्या न्यायानें एका मनुष्याच्या मनाची आणि बुद्धीची प्रभा सभोंवतालच्या व्यक्तींवर उमटते. मग तो मूळ चेतना प्रसवणारा पुरुष कवि असल्यास इतरांस कवित्वाची स्फूर्ति होते, योद्धा असल्यास शौर्याची, संत असल्यास भक्तीची, वक्ता असल्यास वाचेची, रंगेल असल्यास चैनीची आणि दुर्गुणी असल्यास दुर्गुणाची स्फूर्ति किंवा चेतना उत्पन्न होते; आणि याच सृष्टिनियमानुसार वामनस्वामीसारख्या चंडांशूप्रमाणें सतेज श्लोक गाणाऱ्या कवीच्या स्फूर्तीनें त्या काळाचे त्याचे शिष्यहि त्याच प्रकारची श्लोकरचना करूं लागले; व काहींनीं तर वामनाच्या तोडीचीं किंबहुना त्याहून चांगलीं काव्यें निर्माण केलीं. हाच प्रकार मोरोपंतांच्याहि वेळीं झाला. पंतांच्या काव्याघातानें चेतना पावलेले रामचंद्र बडवे, कृष्णानंद, पांडुरंग वगैरेसारखे कवि अशा आर्या लिहूं लागले कीं, त्या पंतांच्याच म्हणून महाराष्ट्रांत शतकेच्या शतकें वावरत राहिल्या. वास्तविक त्या पंतांच्याच खऱ्या, पण आघातानें दुसऱ्या बुद्धींतून प्रसवलेल्या अशा होत.

राजाराम प्रासादी यांनीं आपल्या भक्तमंजरीनामक ग्रंथांत वामनस्वामींचें चरित्र वर्णिलें आहे. त्यांत त्यांचा महादेव नांवाचा एक पट्टशिष्य होता, असें सांगितलें आहे. तसेंच, रा. राजवाडे

यांनीं राजाराम महाराजांनीं वामनाच्या मठास जमीन दिल्याबद्दलची एक सनद प्रसिद्ध केली आहे. त्यांत 'विश्वात्मक गोसावी' हें वामनाच्या शिष्याचें नांव दिलें आहे. परंतु महादेव किंवा विश्वात्मक यांपैकीं कोणत्याहि नांवाच्या कवीनें लिहिलेला असा ग्रंथ उपलब्ध नाहीं. हल्लीं वामनाच्या शिष्यमंडळीपैकीं ज्यांची कृति आपणांस उपलब्ध आहे, असे कवि म्हटले म्हणजे हरी, साम्राज्य वामन, बापू वामन, विश्वनाथ, नरहरी, विठ्ठल नागेश इत्यादि कवि होत. या सर्व शिष्यांत **हरी** हा विशेष चांगला कवि आहे. त्यानें वामनाची रचनाशैली इतकी हुबेहूब उचलली आहे कीं, याचीं प्रकरणें वामनाचींच म्हणून आजपर्यंत अनेक विद्वानांनीं छापिलीं आहेत. 'भीष्मयुद्ध' हें लहानसें प्रकरण वाचिलें म्हणजे कांहीं बाबींत तर शिष्यानें गुरूवर ताण केली आहे, असेंच म्हणणें भाग पडतें. भारती युद्धांत "धरीना शस्त्रातें कदनसमयीं मीं निज करीं" अशी प्रतिज्ञा श्रीकृष्णानें सर्वांसमक्ष प्रथमच केली होती. परंतु भीष्मासारखा योद्धा जिंकणें केवळ दुर्घट झालें व त्याचे कृतांतासारखे पराक्रम पाहून ज्याच्यावर सर्व युद्धाचा भार त्या अर्जुनालाच तो कदाचित् मारील, असें दिसूं लागलें. तेव्हां आपली प्रतिज्ञा बाजूला ठेवून कृष्णाला युद्धांत सामील होणें अवश्य दिसलें; आणि श्रीकृष्णानें आपल्या हातांतला घोड्यांचा चाबूक खालीं ठेवून हातीं शस्त्र धारण केलें व तो भीष्मावर चाळून आला तेव्हां—

असा येतां देखे रथनिकट तो शामल हरी ।
नृपा गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेमलहरी ।
शरातें चापातें त्यजुनि वदला गद्गद रवें ।
'जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें' ॥

आणि शेवटीं कृष्णास म्हणाला

तोडि मस्तक पडो चरणी या । धन्य होईन सदाच रणीं या ॥

या वेळचा पुढला या प्रकरणांतला

मारावें मजला असेंच अमलें चित्तीं तुझ्या केशवा ।
तें मातें मग कोण रक्षिल पहा । विश्वेश नाकेश वा ॥

हा श्लोक अप्रतिम सुंदर आहे. हरीप्रमाणेंच वामनाचा दुसरा शिष्य **साम्राज्य वामन** हाहि चांगला कवि आहे. हा वामनाचा पट्टशिष्य दिसतो. याचें 'सुदामचरित्र', 'अनुभूतिलेशा'चें भाषांतर, 'राजयोग' व 'ब्रह्मोपदेश' हे ग्रंथ हल्लीं प्रसिद्ध आहेत. यांपैकीं ब्रह्मोपदेशांत यानें आपणासंबंधीं कांहीं माहिती दिली आहे. त्यावरून साम्राज्य हा कोल्हापुराजवळील हुपरी या गांवीं शके १५७४-मध्यें गोकुळ-अष्टमी-(श्रावण व. अष्टमी)स जन्मला व त्यानें आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षी म्हणजे शके १५९९-मध्यें वामनस्वामीचा गुरूपदेश घेतला. साम्राज्य वामनानें आपलें ब्रह्मोपदेश हें लहानसें (१३४ ओ०) प्रकरण शके १६१८-त धाता संवत्सरीं म्हणजे वयाच्या ४४-व्या वर्षी रचिलें. बाकी ग्रंथांवर त्यानें काल दिला नाहीं. साम्राज्याच्या श्लोकांची घडण वामनी श्लोकांप्रमाणेंच आहे. सुदाम्याची गृहस्थिति वर्णन करितांना त्यानें केलेला

खातीं कंदमुळें पिती मधु जळें जें नेणती ओंवळे ।
दंपत्यें अमळें स्वसाधनबळें ज्याचें सदा सोवळें ॥
नेसाया धवळें न वस्त्र पिवळें शीतें सदा व्याकुळें ।
पृथ्वी पादतळें फिरे हळहळे प्रारब्ध दैवागळें ॥

हा श्लोक कोणालाहि वामनी अनुप्रासांची आठवण करून देईल. वर लिहिलेल्या वामनाच्या सर्व शिष्यांनीं हें द्वारकाधीशाच्या लहानपणाच्या गरीब मित्राचें प्रेमळ आख्यान लिहिलें आहे; आणि नरहरीखेरीजकरून बाकी सर्वांची ही कृति उपलब्ध आहे. हें आख्यान महाराष्ट्र-कवींचें मोठें आवडतें दिसतें. यावर आणखीहि कित्येकांनीं कवनें केलीं आहेत. लहानपणाचा स्वच्छ स्नेह, मोठेपणीं आपल्या भाग्यवान् स्नेह्याकडे लहानपणीं त्यास कांहीं दिलें नाहीं हें मनांत येऊन त्याचे भेटीस जाण्याची लाज, त्यानें मोठेपणानें आपला केलेला आदरसत्कार,

बाळपणच्या विद्याभ्यासाच्या प्रेमळ गोष्टी व आपण मैत्रकीच्या नव्हे, तर कांहीं द्रव्यलोभाच्या इच्छेनें भेटण्यास आलों हें सांगण्याची भीड, वगैरे प्रसंग यांत मोठे गमतीचे आहेत; व याकरितांच हें सर्वांस आवडण्यासारखें आहे. वर दिलेल्या शिष्यमंडळीशिवायहि वामन पंडितांचे शिष्यत्व प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें पत्करलेली कांहीं मंडळी दिसते. काव्यसंग्रहकारांनीं आपल्या लघुकाव्यमालेच्या तिसऱ्या भागांत सुमारें दीडशें पद्यांचें एक ध्रुवचरित्र छापिलें आहे. याची रचना अनेकवृत्तात्मक असून पद्येंहि वामनाच्या थाटावर नेण्याचा यांत यत्न केला आहे. या कवीनें ग्रंथांत आपलें नांव दिलें नाहीं; पण ग्रंथारंभींच गणेशाचें नमन झाल्यावर

तदुपरि गुरुनाथा वंदिलें वामनासी।
ध्रुवचरित कराया स्फूर्ति दीजे मनासी ॥

असें वामनास नमन केलें आहे; यावरून हा वामनाचा शिष्य दिसतो. अशीं वामनास नमन करणारांचीं आणखीहि नांवें आढळतात. एकंदरींत वामनाच्या काव्याचा नाद महाराष्ट्रांत फार दुमदुमत होता व त्याच्या कृतीनें अनेक लहान-सहान कवींस काव्यस्फूर्ति उत्पन्न झाली होती, असें दिसतें. नागेशसुत हा वामनाच्या आवडत्या शिष्यांपैकीं एक होय. याचेचकरितां वामनानें "समश्लोकी टीका' लिहिली, असें त्या टीकेच्या शेवटीं म्हटलें आहे. या नागेशसुताचीं पदें वगैरे आहेत. एका पदाच्या शेवटीं हा म्हणतो

नागेशात्मज विठ्ठल ध्याय श्रीगुरुवामनपाय रे ॥



# नागेश व विठ्ठल

वामन पंडितांशीं अगदीं समकालीन व पंडितांप्रमाणेंच श्लोकबद्ध रचना करणारे आणखी दोन कवि प्रसिद्ध आहेत. एक **नागेश** व दुसरा **विठ्ठल.** एकाच कथनकावर श्लोकबद्ध रचना करणारे समकालीन कवि, या एका बाबीशिवाय या जोडींत फारसें साम्य दिसत नाहीं. यांपैकीं एक म्हणजे नागेश हा वृत्त्यंशी जोशी होता; आणि दुसरा म्हणजे विठ्ठल हा व्यापारी होता. नागेशाची विद्वत्ता जितक्यास तितकीच दिसते; विठ्ठल हा चांगला व्युत्पन्न व संस्कृतज्ञ होता. नागेशाला एका तऱ्हेची सहज स्फूर्ति होती; विठ्ठलाला ती श्रम करून उसनी आणावी लागे. विठ्ठलामध्यें शहरांतला सभ्यपणा आहे व त्याच्या वर्णनाला मर्यादा आहे; नागेशाला खेड्यांतल्या बाष्कळपणाची सवय दिसते, व त्याचें वर्णन वर्षांतल्या अखेरच्या महिन्याला शोभेल, असें आहे. पण होणाऱ्या प्राप्तींत नागेश सुखासमाधानानें राहतो; तर विठ्ठल असंतुष्ट होत्साता लोकांना नांवें ठेवीत सुटतो. अशी ही करनकरेची दुकल आहे. या दोघांनाहि यमकांची हौस फार आहे.

यांपैकीं **नागेश** हा अहमदनगराजवळील भिंगार येथील राहणारा. याचें उपनांव मुळे. यानें आपल्या 'चंद्रावळी'-वर्णनांत आपल्या मातापितरांचीं नांवें अनुक्रमें जानकी व मोर जोशी अशीं दिलीं आहेत. आणि यानें आपल्या बंधूंचीं नांवें मल्हारी व त्र्यंबक[1] अशीं दिलीं आहेत. या भिंगारकर जोशांच्या कुळांत नागेशाशिवाय इतरांनाहि काव्यरचनेचा नाद होता. पण नागेशाला तो विशेष होता. साधी

---

१. या भावांपैकीं 'त्र्यंबक जोसी बिन मोर जोसी कसबे भिंगार यांसीं सके १५९१ सोम्य नाम संवत्सरे जेष्ठ शुद्ध सप्तमी वार शुक्रवार ते दिवसीं' हा एका कुळकर्ण्यानें लिहून दिलेला महजर प्रसिद्ध आहे.

घरगुती भाषा आणि कानाला बरीं लागतील अशीं गोड यमकें हा नाग जोशी आपल्या काव्यांत सहज योजितो. किंबहुना, या दोहींचीहि त्याला हौस दिसते.

जरि शिरीं गणराज विराजतो । तरिच होय महाकविराज तो ।
मतिस जे जरि हेच सरस्वती । रसवती तरो होय सरस्वती ॥

अशी याची रचना व यमकें साधीं आणि मधुर आहेत. केव्हां केव्हां पुष्कळ अक्षरांचीं लांब लांब यमकें करण्याच्या हौसनें यानें आपल्या रचनेस अगदीं क्लिष्टता आणिली आहे.

नीज हे मज न ये करमेना । नीज हेम जन येक रमेना ।
वाम हा जन मनोजय दावा । वा महाजन मनोज यदावा ।

हा याच्या 'चंद्रावळी'-वर्णनांतला श्लोक चरणयमकानें मंडित आहे. पण याच्या अर्थाची वाट काय? तसेंच काव्य म्हणावें कशाला? वर्णनाची मर्यादा किती असावी? वगैरे साध्या गोष्टींसंबंधाचीहि याची कल्पना अगदीं पुसट व अंधूक असल्यामुळें याच्या काव्यांत अनेक तऱ्हेचे दोष आले आहेत. हा एकदा वर्णन करूं लागला म्हणजे मूळ कथानक अगदीं नजरेआड करतो; व वर्णनाचा अगदीं कंटाळा येऊन वाचक मनांत दहादा पुरे पुरे म्हणेपर्यंत हा आपलें तें चऱ्हाट चालूच ठेवितो. तसेंच, वर्णन कशाचें करावें आणि कशाचें न करावें, हा विधिनिषेध तर याला काडीइतकाहि नाहीं. कोणा कोकाच्या यशवंतराव नांवाच्या खुशालचंद श्रीमंताचा हा आश्रित होता, आणि भिंगारसारख्या कुग्रामवस्तींत याचा काळ गेला, हें याच्या काव्यांतल्या असभ्य व अश्लील वर्णनाचें एक कारण दिसतें. कदाचित् वामनाचीं काव्येंहि यानें पाहिलीं असतील, असें याच्या स्त्रियांच्या रूपवर्णनावरून वाटतें.

भ्रम करी प्रकरीपरि चंचला । मन हरी न हरी अशि कोकिला ॥
रसरसी सरसीरुहलोचनी । गजगमा जशि मानसमोहनी ॥

हें चंद्रावळीचें वर्णन, आणि

रुळत चंचळ अंचळ भूवरी । उसळतो वलयध्वनि अंबरीं ॥
मदभरें मग गौळणि चालती । थरथरां स्तन मंथर हालती ॥

इत्यादि तिच्याबरोबर गोरस विकावयास जाणाऱ्या मैत्रिणींच्या वर्णनाचें वामनाच्या वर्णनाशीं पुष्कळच साम्य दिसतें. हीं काल्पनिक चित्रें सोडून दिलीं तर पुष्कळ वेळां हा आपल्या डोळ्यांपुढें दिसणाऱ्या देखाव्यांचीं चित्रेंच लेखणीनें कोंढतो. यानें सीतास्वयंवरांत जनकाच्या राजधानीचें काढिलेलें शब्दचित्र भिंगारगांवाशेजारच्या अहमदनगर राजधानीशीं इतकें जुळतें, कीं तें अहमदनगरचेंच असावें, असें कोणालाहि वाटेल.

बहु बरी नगरी अति साजिरी । तिजसरी न करी अमरीपुरी ।
प्राकार शोभे तिजला विशेषें । संवेष्टिली भासत जेंवि शेषें ॥
शोभे तया फार चऱ्यासि फेरा । नाहीं तियेलागिं कदापि घेरा ।
शोभती बहू चहूंकडे हुडे । पर्वतांसि तुटले जसे कडे ॥
खंदका बहु अगाधता असे । प्राप्तसिंधुवरबद्धसा वसे ।
कर्णे नफेऱ्या बहु वाजताती । नादें दिशा सर्वहि गाजताती ॥
शोभती बहुत ते दरवाजे । नौबती बहुत सुंदर वाजे । इ. इ.

सीतास्वयंवर व चंद्रावळी या प्रसिद्ध काव्यांशिवाय रुक्मिणीस्वयंवर व रसमंजरी आणि शारदाविनोद अशीं याचीं आणखी तीनें काव्यें आहेत. एके काळीं याचे पुष्कळ श्लोक लोकांच्या व हरिदासांच्या तोंडीं असत.

---

१. नागेशानें सीतास्वयंवराच्या वेळीं ज्या 'महाख्यात कुलावतंसो' राजांना पत्रिका लिहिली त्यांचीं नांवें दिली आहेत. त्यांत चव्हाण, मोरे, राणे, शिसोदे वगैरेंचीं नांवें आहेत. पण भोसल्यांचें नांव नाहीं.

२. 'रसमंजरी' व 'शारदाविनोद' या काव्यांचीं कांहीं पानें मात्र मीं पाहिलीं आहेत. शारदाविनोदाचे शेवटीं, मीं भृंगीपुरास (भिंगारास) राहणाऱ्या 'नानाकाव्यकलापचतुर श्रीनागराज' कवीनें हा ग्रंथ रचिला, असा उल्लेख केला आहे. ग्रंथांत यालाच 'सरस्वतीविनोद' असें सर्वजगभर म्हटलें आहे. पोथीची नक्कल कोणी 'रघुनाथ' नांवाच्या लेखकानें शके १६२० बहुधान्य संवत्सरीं केलेली आहे.

'गणेश बोले बहु आदरानें । उंदीर नेला मुनि मांजरानें ॥'

हा विनोदी श्लोक अजूनदेखील लहान मुलें गमतीनें नेहमीं म्हणतात. विठ्ठलाचे श्लोक असे नेहमींच्या प्रचारांतले नाहींत. याचें एक कारण असें दिसतें कीं, नागेशांत थोडेसें तरी अंगचें वारें आहे. त्याच्या भाषेंत एक तऱ्हेची चमक आहे. पण तींत थोडा गांवढळपणा आहे. विठ्ठलाची विद्वत्ता नागेशापेक्षां निःसंशय जास्त आहे; पण त्याला कवित्वाचें अंगचें वारें दिसत नाहीं. तो थोडासा मारूनमुटकून बनलेला कवि आहे.

**विठ्ठल** बीडजवळील गौरीपूर नांवाच्या एका गांवचा राहणारा. हा आश्वलायन ऋग्वेदी ब्राह्मण. याचें संबंध नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर. गोत्र कौशिक. याचा धंदा व्यापाराचा असे. पण हा 'वर्षा दिसा पंढरपुरास' जात असे; म्हणजे सालोसाल पंढरीची वारी करी. कारण याचें कुलदैवत श्रीपांडुरंग उर्फ विठ्ठल हें होतें; आणि म्हणूनच हा आपणास अनेक ठिकाणीं काव्यांत 'विठ्ठलदास' असें म्हणवितो.

या बीडकर विठ्ठलाच्या नांवावर हल्लीं (१) रुक्मिणीस्वयंवर १५९६, (२) पांचालीस्तवन १५९६, (३) सीतास्वयंवर १५९९, (४) रसमंजरी १६०१, (५) द्रौपदीवस्त्रहरण १६०२, (६) विद्वज्जीवनें व

---

१. ऋग्वेदोत्तम आश्वलायन महाशाखा जगद्वंद्य जे ।
श्रीमत्कौशिक गोत्र, पंढरपुरा वर्षा दिसा जाइजे ।
श्रीविठ्ठलदास विठ्ठल कवी वंशोपनामें गुणी ।
क्षीराब्धीपदसागरोत्तमकुलालंकारचूडामणी ॥
(अथवा पाठभेद–वर्णी विठठल क्षीरसागरकुलालंकारचूडामणी ॥)

२. हल्लीं छापिलेल्या याच्या 'विद्वज्जीवन' प्रकरणांत फक्त रचनाकाल दिलेला नाहीं; बाकी सर्व माहिती यथास्थित आहे. याचें कारण उघड असें आहे कीं, यांत चार श्लोक कमी आहेत. ग्रंथाचे शेवटीं कवीनें पद्यसंख्या 'पंचषष्टिशतद्वयोत्तमा' म्हणजे २६५ सांगितली आहे; व छापील प्रतींत पद्यें २६१ आहेत. अर्थात् चार पद्यें गहाळ आहेत. त्यांत रचनाकाल असला पाहिजे.

(७) बिल्हणचरित्र असे सात ग्रंथ प्रसिद्ध आहेत. माझ्याजवळ असलेल्या एक हस्तलिखित बाडांत प्रथम बिल्हणचरित्र नकललें असून नंतर एकाजनार्दनाचे, तुका केशवाचे कांहीं अभंग त्याच हस्ताक्षरांत असून मग 'शके १६२८ व्ययनाम संवत्सरे, श्रावण वद्य एकादशी वार शुक्रवार' रोजीं द्रौपदीवस्त्रहरणाची नक्कल केली आहे. परंतु 'बिल्हणचरित्र' शके १६२८-चे पूर्वीं कवीनें लिहिलें असून तें द्रौपदीस्वयंवराचा कवि विठ्ठल याचेंच असा १६२८-मध्यें समज होता. यांपैकीं एक 'बिल्हणचरित्र' वगळिलें म्हणजे बाकी राहिलेल्या सहाहि ग्रंथांवर यानें आपलें नांव, राहण्याचें ठिकाण व इतर माहितीहि दिली आहे. यामुळें याच्या ग्रंथाची घालमेल होणें अशक्य झालें आहे. तसेंच, ग्रंथाचे शेवटीं हा त्या ग्रंथांतली पद्यसंख्या देऊन मोर्तब शिक्का करतो. यामुळें ग्रंथांतल्या श्लोकांचीहि व्यवस्था नीट राहते. याच्या सीतास्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर व विद्वज्जीवन या तिन्ही ग्रंथाचे प्रत्येकीं सातसात भाग आहेत; व आपली रचना थेट संस्कृताच्या धर्तीवर झालेली आहे अशा बुद्धीनें त्यानें दोन्ही स्वयंवरांच्या भागांस 'सर्ग' म्हटलें आहे व जीवनाच्या भागांस 'उल्लास' म्हटलें आहे. वर ग्रंथाच्या नांवापुढें त्या त्या ग्रंथाचा रचनाकाल कंसांत दिला आहे. त्यावरून असें दिसून येईल कीं, यानें ही सर्व रचना पांच-सहा वर्षांतच केलेली आहे. यावरून याला काव्यरचनेची कल्पना उत्तरवयांत सुचली असावी; किंवा याची आणखी बरीच कृति असावी, असें दिसतें.

उपलब्ध काव्यांत 'पांचालीस्तवन' (द्रौपदीचा धावा) हें याचें पहिलें काव्य आहे. याचे अवघे २३ श्लोक आहेत. एक सोळावा-खेरीजकरून हे सगळे शिखरिणी वृत्तांत आहेत. याच वर्षांत यानें दुसरें एक काव्य लिहिलें आहे. त्याचें नांव रुक्मिणीस्वयंवर. याची रचना संस्कृतांतील चांगल्या काव्यांच्या धर्तीवर करण्याचा यानें फार यत्न केला आहे. निरनिराळीं वृत्तें, निरनिराळे बंध, चमत्कृतिजनक यमकें व

अनुप्रासादि अलंकार या काव्यांत विठ्ठलानें फार योजिले आहेत. आपलें चित्रकाव्यरचनाकौशल्य व छंदःशास्त्रनैपुण्य दाखवून पंडितांकडून वाहवा मिळवावी, असा याचा डौल आहे. आपल्या काव्यांत आपण सर्व नऊ रस भरले आहेत, असें हा वारंवार सांगतो; आणि असें सांगणें अवश्य आहे. कारण हें सांगितल्याशिवाय नुसत्या वाचनानें वाचकांस कळण्यासारखें नाहीं. हें विठ्ठलाचें रुक्मिणीस्वयंवर एका दृष्टीनें खरोखरीच महत्त्वाचें आहे. यापूर्वी मराठींत चित्रबंधात्मक रचना कोणींहि केलेली दिसत नाहीं; व मुद्दाम निरनिराळीं अनेक वृत्तें आणण्याचाहि कोणीं यत्न केला नाहीं. यानें या काव्याच्या पहिल्या सर्गापासूनच मंडपशोभेचा फार थाट उडविला आहे. यांत नुसतीं अनेक वृत्तें आहेत इतकेंच नव्हे, तर त्या त्या वृत्ताच्या श्लोकांत वृत्ताचें नांवहि वर्णनाच्या ओघांत सार्थ आणिलें आहे. संस्कृतांतलीं अनेक नवीं नवीं वृत्तें निवडून तीं यानें आपल्या काव्यौघांतून महाराष्ट्रभाषेच्या प्रदेशांत आणून सोडिलीं आहेत. पण येथल्या ओवी, अभंग, दिंडी, साकी वगैरे वृत्तांचा यानें आपल्या काव्यास बिलकुल स्पर्श होऊं दिला नाहीं. तीं आपल्या सबंध रचनेंत येथून-तेथून वर्ज केलीं आहेत. एकंदरींत विठ्ठलाचें शब्दकौशल्य पाहण्यासारखें आहे, यांत संशय नाहीं. पण आपल्या निरनिराळ्या काव्यांत निरनिराळी योजना करण्याइतकें शब्दभांडार आणि भाषाप्रभुत्व याचेजवळ नाहीं. रुक्मिणीस्वयंवरानंतर दोन-तीन वर्षांनीं रचिलेल्या 'सीतास्वयंवरांत'हि शब्द आणि चरणच्या चरण रुक्मिणीस्वयंवरांतल्यासारखेच आहेत. 'पांचालीस्तवन' हे अवघे २३च श्लोक; पण ते त्यानंतर सहा वर्षांनीं रचिलेल्या 'द्रौपदीवस्त्रहरणा'च्या ४६ श्लोकांशीं ताडून पाहिले तर सबंध चरणच्या चरण या दोहोंत एकच आढळतील. नुसते शब्द जरा फिरवून पुन्हां बांधिलेले, असे सारखे श्लोकहि या दोन लहानशा प्रकरणांत अनेक आहेत. तींच तींच यमकें तर याच्या रचनेंत पुष्कळ वेळां

येतात. मात्र कांहीं यमकें गमतीचीं आहेत खरीं[1].

वीराजते मत्त उदार पाहें। वीरा धरीं शक्ति शराव साहे।
हे सावरा शक्ति शरीं धरावी। हें पारदा उत्तम तेज रावी॥

या रुक्मिणीस्वयंवरांतल्या श्लोकांत नेहमींप्रमाणें यमक असून शिवाय यांत 'प्रतिलोम' यमकहि साधिलें आहे. म्हणजे पहिला व चवथा आणि दुसरा व तिसरा, हे चरण पहिलींच अक्षरें पुन्हां उजवीकडून डावीकडे उलटीं लिहून साधिले आहेत. यांत कुशलता नाहीं असें कसें म्हणतां येईल! यानें आपल्या काव्यमंदिराची केलेली उभारणी पाहिली म्हणजे विपुल पैसा खर्च करून आपल्या वाड्याभोवती एखाद्या श्रीमंतानें माळ्यांकडून आखीव बाग करवावा व त्यांत कुंड्या आणि झाडें ओळीनें लावावीं, किंवा किड्यांच्या आणि शंखांच्या मृत शरीरांच्या अवशेषानें प्राण्यांचीं चित्रें काढावीं, तशांतला देखावा दिसतो. यानें साधिलेले नानाविध बंध पाहिले म्हणजे ते दुरून पाहणारा क्षणभर थक्क होतो; व या व्यापाऱ्याची ही नीट मांडिलेली शब्दसंपत्ति पाहून कौतुक वाटतें. यानें उभारिलेल्या मंदिरांत जिकडे--तिकडे '**छत्र**'-'**चामरें**' आहेत. न जाणों, आंत उष्मा वाटेल म्हणून उष्णतेची बाधा हरण करणारीं '**व्यजनें**'हि चोहोंकडे टांगलेलीं आहेत. खालीं जमिनीवर सुंदर '**स्वस्तिके**' काढिलीं आहेत. कोठें कोठें '**पद्मीश**' बंधाचा '**सारीपाट**' करमणुकीसाठीं काढून ठेविला आहे. येथें वाटेल त्यानें खुशाल अक्षक्रीडा करावी. मंदिराच्या आवारांत शीतजलाच्या '**वापी**'हि अनेक आहेत. बाजूच्या जागेंत '**अश्व**'शालाहि आढळतात. येथेंच '**उष्ट्र**' '**गज**' वगैरे श्रीमंतांच्या दारापाशीं असणारीं जनावरेंहि आहेत. मधें-मधें '**धनुर्बाणां**'ची योजना ,विठ्ठलानें करून ठेविली आहे. या काव्य-

---

१. विठ्ठलाला 'कूटश्लोक' रचण्याचीहि मोठी हौस होती. याचे कांहीं कूटश्लोक काव्यसंग्रहकारांनीं दिले आहेत. कित्येक वेळां पहिल्या तीन चरणांत आपलें 'कोडें' वाचकांस सांगून शेवटच्या चरणांत हा 'बोले विठ्ठल हा पदार्थ उमगा षण्मासिचा वायदा' असें लिहितो.

मंदिराच्या वरच्या दालनांतून जरा क्षणभर डोकाविलें असतां तेथें तर एक लहानसा कृत्रिम चिमणा बागच बनविलेला दिसतो. त्यांत सुंदर '**वृक्ष**' लाविले असून भोंवती शब्दलतांचीं '**चक्रें**' तयार केलीं आहेत. या लतांवर अनेक तऱ्हेच्या रंगांची '**अष्टदल**', '**द्वादशदल**' अशीं चित्रविचित्र कमळें फुललेलीं पाहत असतां पाहणाराचें मन प्रसन्न होतें. अशा रितीनें प्रसन्न झालेला प्रेक्षक मंदिराची रजा घेतांना त्याचे गळ्यांत घालण्यासाठीं पुष्पांच्या तऱ्हातऱ्हांनीं गुंफिलेल्या सुंदर '**माला**'हि येथें तयार आहेत. नंतर येथून प्रेक्षक निघाला व क्षणभर त्यानें जरा एकदा परतून पाहिलें कीं, त्याच्या नजरेस एखादा '**सर्प**'हि येथें दिसतो, व तो पाहून त्याचा अंदाज होतो कीं, ज्याअर्थीं येथें '**सर्प**' वास करितो त्याअर्थीं येथें 'मयूर' बहुशः नसेल. चाकशीअंतीं निरीक्षण करून पाहिलें तर येथें मयूर नाहीं, असें दिसून येतें. 'मयूर' नाहीं म्हणजे येथें मयूर-वाहिनी[1] सरस्वती ही क्रीडासंचार करीत नाहीं, हें उघड झालें; आणि या काव्यांत सरस्वतीचें क्रीडाकौतुक खरोखरीच दिसत नाहीं. विठ्ठलाचीं हीं चित्रें, त्याचे हे बंध वगैरे पाहून डोळ्यांना क्षणभर जरा मौज वाटेल; पण त्यापासून मनाला काव्यामृतसेवनाचा आनंद यत्किंचित् होणार नाहीं. अनुप्रासादि अलंकार, चित्ररचना, प्रतिलोमचरण, लांब लांब यमकें, नानाविध बंध हीं सर्व फार तर कवीच्या विद्वत्तेची साक्ष देऊं शकतील. पण हे त्याच्या 'कवित्वा'चे पुरावे नाहींत. या कष्टसाध्य रचना, हे नाजूक चमत्कार, हे शब्द-कुसरीचे अनेक प्रकार फार तर बुद्धिचे उत्तम खेळ आहेत. या नाडेभोरप्याच्या कसरती आहेत. पण नाडेभोरप्याजवळ आजपर्यंत कधीं वीरश्री डोलली आहे! कीं कधीं ती त्याचेजवळ नुसती बोलली तरी

१. हीं वर उलटया विरामचिन्हांत दिलेलीं नांवें विठ्ठलाच्या रुक्मिणी-स्वयंवरादि काव्यांत साधिलेल्या निरनिराळ्या 'बंधा'चीं आहेत. हे बंध काव्यसंग्रहांतल्या 'विठ्ठलकृत कवितासंग्रहांत' सचित्र दिले आहेत. यांत मयूरबंध नाहीं, हें तीं चित्रें पाहिलीं असतां घ्यानांत येईल.

आहे!! तसेंच, शब्दरचनेचे चित्रविचित्र प्रकार कोठें ‘काव्य’ म्हणून चालणार आहे! माझें हें म्हणणें विठ्ठलाचें ‘विद्वज्जीवन’ काव्य पाहिलें असतां कोणाच्याहि प्रत्ययास येईल. ‘विद्वज्जीवना’चे सात उल्लास हे भागवताच्या दहाव्या स्कंधांत वर्णिलेल्या अत्यंत चित्तवेधक अशा कृष्णकथांच्या आधारें रचिलेले आहेत. या ग्रंथाच्या रचनेसंबंधें कवि म्हणतो कीं, यांत माझी वाणी ही प्रत्यक्ष ‘मंदाकिनी’ म्हणजे गंगा आहे. कृष्णकथा ही ‘यमुना’ आहे. आणि या दोहोंत काव्यकल्पनांची ‘सरस्वती’ मिळून हा त्रिवेणीसंगम बनला आहे. तेव्हां यांत ‘रुक्मिणी-कांत’ हें दैवत असून हा माझा ग्रंथ ‘प्रयागागळा’ म्हणजे प्रयागापेक्षांहि श्रेष्ठ असा समजावा. कवीला इतका आवडलेला हा विद्वज्जीवन ग्रंथ प्रत्यक्ष वाचिला असतां या नद्यांच्या ऐवजीं वाचकास सर्वभर कोरडीं ठणठणीत वाळवंटें मात्र आढळतील. क्वचित् ठिकाणीं पाण्याचा एखादा डोहरा किंवा कोठें-कोठें डोहहि आढळतील. ते चार-दोन श्लोक जरा गोडहि लागतील. पण त्यांत काव्यगंगेच्या गोड प्रवाहाची मौज कधींच अनुभवास येणार नाहीं. संस्कृतांतलीं अनेक वृत्तें योजण्या-साठीं केलेले भरडे भरडे श्लोक, आणि त्या श्लोकांत त्या वृत्तांची नांवें गोवण्यासाठीं घेतलेल्या कोलांट्या उड्या, यामुळें या ग्रंथाला बेढबपणा मात्र आला आहे. ग्रंथ म्हणजे कल्पनांचा व श्लोकांचा एक मोठा ढिगारा आहे. पण हें काव्य नाहीं. पंतांच्या मंत्ररामायणाप्रमाणें सबंध ग्रंथ काव्यरसानें ओथंबलेला असेल आणि त्यांतच एखादा लहानसा शब्दचमत्कार साधिला असेल तर तो स्त्रियांच्या डोळ्यांतल्या काजळाप्रमाणें किंवा कपाळावरच्या गोंदलेल्याप्रमाणें शोभिवंत दिसेल. पण एखाद्यानें काजळ शोभा दुणावतें, म्हणून आपल्या सर्व चेहऱ्याला काजळच फासून ठेविलें, किंवा हनवटी, गाल, कानशिलें, नाक, कपाळ, भांग वगैरे जिकडे-तिकडे गोंदूनच टाकिलें तर तो प्रकार जितका शोभिवंत दिसेल तितकाच हा विठ्ठलाचा सर्व प्रकार शोभायमान झाला आहे!

विठ्ठलानें श्रमपूर्वक रचिलेल्या या रचनेसंबंधें आपल्यालाच असें वाटतें असें नाहीं, तर त्या वेळच्या लोकांनाहि असेंच वाटलें असावें, असें दिसतें. कारण, नेहमींच्या नाडेभोरप्याच्या प्राप्तीपेक्षां कांहीं विशेष प्राप्ति विठ्ठलाला कधीं झालेली दिसत नाहीं. आपला हा खेळ विठ्ठल दारोदार नाचवी; व द्रव्यार्जनाच्या लालसेनें या आपल्या काव्यसरस्वती–गिरे–ला हा कैकांचे वाडे दाखवी. पण त्यापासून फलप्राप्ति फारशी होत नसे. तमाशा चालू आहे तोपर्यंत टाळ्या वाजवाव्या व पैशासाठीं परडी पसरली कीं तेथून हळूच रस्ता धरावा, हा नेहमींचा प्रकार येथेंहि घडे. हें पाहून आपल्या या सहचारिणीला विठ्ठल म्हणतो—

वाग्देवी! उदरानिमित्य सदरा म्यां पाहिल्या सुंदरा।
पैं नोहे जठराग्निशांति विधुरा आला कलौ पाहरा।
गर्भांधा बधिरापुढें श्रम पुरा तूं पावलीसी गिरा।
हा माते! अपराध तो कविवरा सर्व क्षमावा बरा॥

आणखी

जिव्हे! तूं नटवी, तुझे अनुभवीं श्रीमंत सन्मानवी।
होती लुब्ध परंतु एकहि तुला कोणीच ना गौरवी।
सत्कीर्ती बरवी जगांत उरवी व्युत्पन्नता बोलवी।
सत्संगें नटवी पवित्र पदवी देशील ज्या सत्कवी॥

विठ्ठल कवीचे असले शब्द ऐकून सरस्वती त्यास शंकराकडे बोट दाखवून म्हणते, 'अरे कविराया, यांत खेद मानण्याचें कारण नाहीं; कारण तूं असें पहा कीं, 'झाला क्षीरसरित्पती शिव तरी दिग्वासलीला धरी'' हें ऐकून कोणाचें मन क्षुब्ध होणार नाहीं! जिच्यापासून सुखाच्या शब्दांची अपेक्षा करावयाची तीच उणें उत्तर देऊं लागली तर तें कोणाच्यानें साहवेल! तेव्हां हें ऐकून कवि संतापून म्हणतो—

यत्नें कल्पलते, सुरायपुरिचें आळें बरें बांधिलें
साक्षेपें सुरधेनुच्या पयरसें म्यां सर्वदा सिंचिलें।

---

१. 'विद्वज्जीवन.'

ते वल्ली इइचीं फुलें प्रसवली, झाली निराशा मना
हे वांच्छा पुरवील कोण कविची श्रीपांडुरंगाविना ! ॥

हें अगदीं खरें आहे. पण हा विठ्ठल मात्र शुद्ध खुळा दिसतो. आधीं आपण व्यापारी मनुष्यानें तो धंदा सोडून या कवितेच्या व ग्रंथरचनेच्या भानगडींत पडावें कशाला! आणि नसती भिक्षुकी पत्करावी कशाला! हिचें कपाळ नेहमींचेंच हें असें आहे; बरें, पडलें तर आपली अब्रू आपल्या मुठींत ठेवावी, तें सोडून हें सगळें लिहून चव्हाठ्यावर ठेवावें कशाला! आपली हौस आपल्याला भोवली, इतकें मानून स्वस्थ व्यापार चालू ठेवावा, हेंच उत्तम.

ही सर्व कहाणी पौराणिक कथानकांवर रचिलेल्या काव्याची आहे. या काव्यांशिवाय यानें दोन संस्कृत काव्यांचीं भाषांतरें केलीं आहेत. त्यांचा प्रकार याहून निराळा आहे. याचें भानुदासाच्या 'रसमंजरी'चें एक श्लोकबद्ध भाषांतर आहे. हें सर्वमान्य आहे. तसेंच, बिल्हणचरित्राचेंहि यानें भाषांतर केलें आहे. हेंहि सरस उतरलें आहे. या दोन्ही काव्यांत कवि चित्ररचनेच्या भानगडींत मुळींच पडला नाहीं. 'रसमंजरी' ही अनेक श्लोकवृत्तात्मक तरी आहे. पण बिल्हणचरित्रांत तितकेंहि नाहीं. तें सर्व काव्य 'वसंततिलका' या गोड वृत्तांत लिहिलें आहे. आधीं वसंततिलका हें वृत्तच मधुर आहे; आणि त्यांत गुंफिलेलें हें कथानकहि मनोरंजक आहे. विक्रमांकदेव या नांवाचा चालुक्य किंवा चाळके या वंशांतला एक राजा कल्याणी येथें राज्य करीत होता. त्याला 'चंद्रकला' किंवा 'शशिलेखा' नांवाची एकुलती एक सुंदर कन्या होती. हिला आपल्या पित्याचा लळा फार असे; व ती लाडकी लेक आपल्या बापाबरोबर वारंवार राजसभेंत सहज खेळत खेळत येई. ही मुलगी आपल्या पणांत येऊं लागली तसतशी तिची कांतिहि फार मनोहर दिसूं लागली. या रूपयौवनसंपन्न अशा आपल्या बुद्धिमान् कन्येला अनेक शास्त्रांचें शिक्षण देऊन विद्यासंपन्न करावें, असें साहजिकपणें राजाच्या मनांत आलें; व

त्यानें आपल्या मंत्र्यास कोणी हुशार ज्ञाता पंडित आढळला तर पाहण्याची आज्ञा केली. कर्मधर्मसंयोगानें याच वेळीं 'चौरपंचाशिका' 'कर्णसुंदरी' वगैरे प्रसिद्ध काव्यांचा कर्ता बिल्हणपंडित हा आपल्या काश्मीर देशांतून फिरत फिरत तेथें आला होता. त्याची व विक्रमांकदेवाची मंत्र्यामार्फत भेट झाली. बिल्हणाची विद्वत्ता व त्याच्या अंगचें चातुर्य पाहून विक्रमांकदेवानें त्याचें विधियुक्त पूजन करून त्यास भूषणें आणि वस्त्रें देऊन आपल्या लडिवाळ कन्येस शास्त्राभ्यास पढविण्याकरितां ठेवून घेतला. नीट मुहूर्त पाहून गुरुजींनीं शिष्येस पाठ देण्यास सुरुवातहि केली. थोड्याच दिवसांत ती बुद्धिमान्, हुशार व चुणचुणीत मुलगी अनेक शास्त्रें पढली. राजकन्येचें शिक्षण व गुण पाहून पिता आणि गुरुजी दोघांचींहि मनें प्रसन्न झालीं; व दोघांचेंहि तिच्या ठायीं प्रेम विशेष जडलें. हळूहळू पण थोड्याच दिवसांत ज्योतिष, काव्य वगैरे सर्व प्रकारचें शिक्षण पुरें झालें व आधींचीच नयन-मनोहर अशी ती राजबालिका विद्यातेजानें फारच चेतोहर दिसूं लागली; आणि मग 'तरुणीशिक्षणनाटिकें'तला वारंवार दिसणारा प्रकार येथेंहि घडून आला. एके दिवशीं ही शिक्षणसमाप्ति करून आपल्या देशास जाण्यापूर्वी बिल्हणानें तिला म्हटलें कीं, "तुला सर्व शास्त्रें पढविलीं; पण 'स्मरशास्त्र' पढविण्याचें राहिलें. तें मीं तुला पढविलें नाहीं." हें ऐकून चंद्रकलेनें तें शास्त्र आपणास पढवून मग स्वदेशास जावें, असा बिल्हणाजवळ हट्ट धरिला. त्यावर एके दिवशीं त्या शृंगारिलेल्या राजमंदिरांत, दिव्यांचा लखलखाट झाला असतां, आणि अनेक तऱ्हेचे सुगंध सुटले असतां त्या 'कंदर्पसिंधुलहरी' नृपकन्येला पाहून कवि बिल्हणाचें मन पाझरलें; व त्यानें कामसूत्रांच्या आधारें त्या दिव्यशास्त्रामृताचें तिच्याकडून नानाप्रकारें प्राशन करविलें. त्या कल्पनातीत क्रीडाकुतूहलानें ती राजनंदिनी अत्यानंद पावून तिनें आचार्यदक्षिणेप्रीत्यर्थ आपला देह गुरुजींस अर्पण केला; व हस्तगुणांत

आपलें मुखकमल ओवून ती सुमनमाला बिल्हणाच्या गळ्यांत तिनें प्रेमादरानें घातली. त्या दक्षिणेचा बिल्हणानेंहि सद्गदित मनानें अंगिकार केला. थोडेच दिवसांत तीं 'पुरुषभुक्त' चिन्हें दूतींना आणि त्यांच्या सांगण्यानें वेत्रधारी सेवकांना कळून आलीं; मग त्यांनीं ती गोष्ट राजपुरोहिताकरवीं राजाच्या कानांवर घातली. प्रथम राजाला ती खरी वाटली नाहीं. पण पुढें त्याच्या ती प्रत्यक्षपणें निदर्शनास आल्यावर तो संतापून गेला; व त्या भरांत त्यानें बिल्हणास सुळीं द्यावें, अशी आज्ञा केली. राजाज्ञेप्रमाणें सेवकजनांनीं बिल्हणाला वध्य स्थानीं नेलें; व तेथें रोविलेल्या शूलाजवळ नेल्यावर त्यास ते म्हणाले—

'सुस्नात भजें जगदीश्वराला'। अंतीं मती गति तशी मग होय त्याला ॥

बिल्हणाच्या तोंडून एकहि अक्षर निघेना. तें पाहून ते त्याला पुन्हां म्हणाले,

'अद्यापि कां न भजसी भगवंतजीतें।'

तरीहि बिल्हणाच्या मुखांतून हरिभजनाचें अक्षरहि नाहीं. अखेर बिल्हण म्हणाला, 'माझे मनाला दुसरें कांहींच दिसत नाहीं. माझी देवी ती चंद्रकला. ती मला दिसते.

मी आयिका, नृपसुतारतिसौख्य जाणें
अद्यापि देव दुसरा तिजवीण नेणें'

असें उत्तर देऊन त्यानें त्या आनंददायिनी नृपनंदिनीचें आणि तिच्या बरोबर अनुभविलेल्या अनेक सुखप्रसंगांचें स्मरण सुरू केलें; आणि तो म्हणाला—

'अद्यापि ते कनकचंपकवर्णगोरी। उत्फुल्लपद्मनयना तनुरोमहारी।
सुप्तोत्थिताच शयनीं मदविव्हलांगी। विद्या जशी गति तशी स्मरतों प्रसंगीं ॥
अद्यापि चंद्रवदना नवयौवनांगी। पीनस्तनी मजपुढें उभि हेमरंगी।
माझी तनू स्मरशरें पिडितांचि वेगीं। गात्रें सुशीतल करी सुरतप्रसंगीं ॥
अद्यापि ते तरुणपल्लवरक्तपानी। चोळी तिची तटतटीत भुजंग-वेणी।
वस्त्रांचलस्खलन होत विलोकितांची। तीच्या स्तनांसि उपमा स्मरकंदुकांची ॥
अद्यापि ते कुशल काव्यकला विनोदी। ते मी स्मरें त्रिदशनाथसुखासि निंदीं।

आलिंगिली भुजलता पसरोनि शाली । ते राजहंसगमना स्मर अंतकाळीं ॥
अद्यापि बाळहरिणीनयनी स्मरें मी । कंदर्पयुद्ध मजशीं करि गुप्त धामीं ।
वक्षोजकुंभ घन पीन धरीं स्वपाणी । तेव्हां सुरेंद्रसुख तुच्छ मनांत मानीं ॥
अद्यापि चंद्रवदना करि फार खंती । लावण्यसागरलता द्विजराजकांती ।
रात्रौ दिवा स्मरण होय तिच्या मुखाचें । दावा मुहूर्त मुखवारिज वल्लभेचें ॥
अद्यापि मी धरितसे निजजीविताशा । जन्मांतरीं वरिन हे प्रमदा परेशा ।
अन्योपभोग मजला न लगेच कांहीं । ते दाखवा शशिकला कवळीन बाहीं ॥
अद्यापि वक्त्रकमलावरी भृंग येती । गंडस्थळीं परिमळास्तव चुंबिताती ।
हे वारितां ध्वनि उठे करिं कंकणाची । तेणें करून मुरकुंडि वळे मनाची ॥
अद्यापि तन्वि मधुराधरदान देते । म्यां रोविलें निजनखें स्तनमंडळातें ।
उद्भिन्नरोम पुलकांकित होय बाला । ते आठवे मदनमंजरि वेळवेळां ॥
अद्यापि ते नृपतिशेखरराजपुत्री । संपूर्णयौवनमदालसखंजनेत्री ।
मी एक दैवत तिते न मानीं । ते राजहंसगति चिंतितसे निदानीं ॥
अद्यापि ते कनककांति मदालसांगी । सल्लज्जनम्रवदना स्मरतों प्रसंगीं ।
त्यागो न औषधसुधा सरिता गुणांची । म्यां वर्णिली क्षितितलीं गुणकीर्ति तिची ॥
अद्यापि ते नृपसुता रतिभोगकालीं । प्रेमाकुलें करयुगें धरिं कंठनालीं ।
दंतोष्ठपीडनक्षतें सुखभाव दात्री । ते मी स्मरें मदनमंदिरदेवदेवी ॥
अद्यापि धूर्जटि धरी विष तें स्वकंठीं । कूर्में धरागिरिवरा नरलें स्वपृष्ठीं ।
अंभोनिधीस वडवानल नित्य जाळी । केलांगिकार बुध पाळिति सर्व काळीं ॥'

बिल्हणाचें हें असें बोलणें ऐकून राजाचें मन पालटलें. हाहि मरेल, शशिकलाहि प्राणत्याग करील आणि आपणाला ब्रह्महत्येचें व स्त्रीहत्येचें पातक लागेल; तें टाळावें आणि अत्यंत अनुरक्त अशा या दोघांस जीवदान द्यावें, असें मनांत आणून विक्रमांकदेव राजानें बिल्हण पंडितास शिक्षा माफ केली; व आपली ती कन्या त्यास यथाविधि अर्पण करून आणखी 'ग्रामें, पुरें, धन दिलें; यश वाढवीलें;' व अशा गमतीनें हें चरित्र परिपूर्ण झालें.

हें बिल्हणचरित्र वाचून व त्याची ती सरळ शब्दरचना पाहून मन एकवार विचारतें कीं, हें या चित्ररचनाकार विठ्ठलाचेंच खास आहे ना?

याचे शेवटीं नुसतें 'विठ्ठल' असें नांव आहे; पण नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें रचनाकाल नाहीं, पद्यसंख्या नाहीं, कवीसंबंधाची इतर माहिती नाहीं, हें कसें?[1]

विठ्ठलाच्या वर दिलेल्या काव्यांखेरीज शंकराचार्यकृत 'सौंदर्य-लहरी'चें श्लोकबद्ध भाषांतर व भानुदासकृत 'रसमंजरी'चें भाषांतर, हीं दोन विठ्ठलकृत काव्यें उपलब्ध आहेत. यांपैकीं 'सौंदर्यलहरी' हें स्तोत्र छापिलेलें नाहीं. एक सौंदर्यलहरी 'महाराष्ट्रकवी'त छापिली आहे; पण ती विठ्ठलाची नसून 'ललितानंद'नामक कवीची आहे. या आपल्या टीकेला ललितानंदानें 'लहरीसुंदर' टीका असें नांव दिलें आहे.[2] या ललितानंदाच्या टीकेपेक्षां 'विठ्ठला'ची सौंदर्यलहरी सरस आहे. हिचे एकंदर १२२ श्लोक आहेत. या टीकेचे शेवटीं विठ्ठलाचें नांव आहे; पण याहून जास्त माहिती तींत दिलेली नाहीं. यामुळें हीहि याच बीडकर विठ्ठलाची आहे किंवा दुसऱ्या कोणा विठ्ठलाची आहे, हें कळण्यास मार्ग नाही.[3] परंतु दुसरें काव्य म्हणजे

---

१. हें बिल्हणचरित्र या विठ्ठलाचें नसावें, अशी शंका वारंवार येते. पण या शंकेचें थोडेंफार निवारण करणारी एक गोष्ट आढळली, ती येथें नमूद करून ठेवितों. मजजवळ एका जुन्या बाडांत प्रथम हें विठ्ठलाचें बिल्हण-चरित्र लिहिलेलें आहे. नंतर त्यापुढें त्याच अक्षरांत 'द्रौपदीवस्त्रहरण' लिहिलें आहे. द्रौपदीवस्त्रहरणाचे शेवटीं तें तेथें उतरून घेतल्याची मिती व्ययनाम संवत्सरे शके १६२८ श्रावण व. एकादशी शुक्रवार अशी लिहिली आहे. यावरून विठ्ठलाचे हयातींत किंवा फारतर दहा-पंधरा वर्षें मागाहून हें बिल्हणचरित्र या बीडकर विद्वानाचें समजलें जात असे.

२. ललितानंद हा गुर्जरदेशस्थ असून फत्तेसिंग महाराज गायकवाडांचा आश्रित होता. यानें आपली परंपरा नित्यानंद–विठ्ठलानंद–ललितानंद, अशी दिली आहे. अशीच रंगनाथाच्या परंपरेहून भिन्न अशा एका सहजानंदाची सौंदर्यलहरीवर एक टीका आहे.

३. मराठींत विठ्ठल या नांवाचे चार-पांच भिन्न कवि होऊन गेले, हे प्रसिद्ध आहे. यांपैकीं विठ्ठल दीक्षित, विठ्ठल केरीकर व आणखी एक

[पान ५०० पहा.]

रसमंजरीचें भाषांतर, हें मात्र बीडकर विठ्ठलाचें खास आहे. तें त्यानें शके १६०१-मध्यें 'शहागड' येथें रचिलें, असें त्यांत म्हटलें आहे. या विठ्ठलाप्रमाणेंच चित्रकाव्य करणारा एक कवि महानुभाव-पंथांत होऊन गेला. याचें नांव ओंकार, उपनांव चोरमागे. याच्या कोणा पूर्वजास 'चोर' म्हणून सुळीं देत असतांना त्यास एका महानुभाव-पंथी साधूनें सोडविलें व त्यास आपल्या पथांत मागून घेतलें, म्हणून त्यास 'चोरमागे' हें उपनांव पडलें, असें म्हणतात. याच्या कुळांत दोनचार कवि होऊन गेले. त्यांपैकीं हा चित्रकाव्य रचणारा ओंकार चोरमागे हा विठ्ठलाचा समकालीन होता. याचें 'लक्ष्मणा-स्वयंवर' नांवाचें एक कृष्णपत्नी लक्ष्मणा हिच्या किंवा ह्या कथेवर काव्य आहे. याचे सात सर्ग असून यांत ४४२ पद्यें आहेत. हा 'पळसी' गांवचा राहणारा असून कोणा 'पहाडसिंग' नांवाच्या राजाचा आश्रित होता, असें तो लिहितो. पहाडसिंगाच्या पदरीं असल्यामुळें त्याच्या ऐकिवांत हिंदी छंद अनेक होते; व ते यानें मराठींत आणिले आहेत. दक्षामकर, ललिता वगैरे नवीं नवीं अक्षर-वृत्तेंहि याच्या ग्रंथांत आलीं आहेत. याच्या ग्रंथांत एक-दोन आर्याहि आहेत. याच्या या लक्ष्मणा-स्वयंवरांत बंध तर पुष्कळच आहेत. चौरस बंध, नवरस बंध, गोमूत्रिका बंध, वगैरे बंध मराठी रचनेंत अगदीं नवीन दिसतात. गोमूत्रिका बंध असाः—

---

[पान ४९९-वरून]

विठ्ठल यांची कविता काव्यसंग्रहांत छापिली आहे. यांशिवाय विठ्ठल कळंूरकर म्हणून एक विठ्ठल होऊन गेला. हा बीडकर विठ्ठलापेक्षां अगदीं भिन्न पुरुष समजावा. याचें गोत्र 'वत्स', शाखा 'आपस्तंब', गुरूचें नांव 'गणेश', अशी स्वतःची माहिती यानें आपलें 'हरिराधिके'च्या 'रासक्रीडा' काव्यांत दिली आहे. याची रचनाहि जवळ-जवळ विठ्ठल बीडकराप्रमाणेंच दिसते. हाहि माझी 'वृत्ति व्यापाराची' असें सांगतो. हा वऱ्हाडांतील कळपूर (?) येथील राहणार. वर उल्लेखिलेलें रासक्रीडा काव्य यानें शके १५३६-मध्यें आनंद संवत्सरीं लिहिलें.

कुरंगणी जया परी । परीस सांपडे वनीं ।
वनीं भवार्णवीं हरी । हरी हरी त्वरा करी ॥

इतके नवीन छंद मराठीं भाषेंत रचणारा हा कवि चिंतनीय आहे. याचा लक्ष्मणा-स्वयंवराचा रचनाकाल १६३० आढळतो.[1] ज्यांत भक्तीचा लवभर संबंध नाहीं असले काव्यग्रंथ संस्कृतांतून मराठींत भाषांतरित करण्याचा प्रघात या काळीं बराच पडलेला दिसतो. या भानुदास-कविविरचित रसमंजरीचें विठ्ठलाप्रमाणेंच आणखीहि कित्येक कवींनीं भाषांतर केलेलें दिसतें. मराठींत हल्लीं या ग्रंथाचीं पांच-सात भाषांतरें उपलब्ध आहेत. पण त्यांत विठ्ठलाशिवाय भैरवाचें व अनंत पंडिताचें, अशीं दोन बऱ्यापैकीं आहेत. विठ्ठलाची पद्यसंख्या 'नंदत्रिभू' म्हणजे १३९ आहे. भैरवाचीहि अगदीं तितकीच आहे; व शेवटचा स्वतःच्या नांवाच्या उल्लेखाचा श्लोक धरून १४० आहे. या दोघांचेंहि भाषांतर मुळास अगदीं धरून आहे. अनंताचें भाषांतर तितकें बरोबर नाहीं. अनंतानें आपली थोडीशी माहिती पुढील श्लोकार्धांत दिली आहे.

पुण्यस्तंभपुरी सुखाब्धिलहरी विद्वज्जनी साजिरी
तेथें त्र्यंबक पंडितात्मज वसे; प्रेमा घरीं शंकरी ।

या अनंतानें या ग्रंथाचीं कदाचित् दोन भाषांतरें केलीं असावीं, असें पुढील ओळींवरून वाटतें—

आज्ञा त्या प्रभुची असे म्हणुनियां 'म्हाराष्ट्र-संजीविनी'
तैसी हे दुसरी वरी करितसे 'शृंगार-कल्लोलिनी' ॥

या अनंत पंडितानें आपला रचनाकाळ दिलो नाहीं.[2]

---

१. शुन्याग्नि संख्या रसभूशका हे । मेषाधिलग्नीं शुभरोग आहे ॥
प्रसिद्ध संवत्सर 'सर्वघाटी'। संपूर्ण जन्माष्टमि बौधवारीं ॥

२. या पोथीचे शेवटीं 'इति श्री कविकुलालंकार श्रीमदनंत पंडित-विरचिता शृंगार-कल्लोलिनी समाप्त' इतकेंच लिहिलें आहे.



# देवदास, शिवराम वगैरे कवि

रामदासस्वामींचा शिष्यसमुदाय पुष्कळ दांडगा होता, व तो सर्वभर पसरिलेला होत. या रामदासी मंडळींचें शिक्षण चांगलें, व्यवस्थितपणानें व दक्षतेनें झालेलें असल्यामुळें त्यांच्यांत बहुश्रुत व बुद्धिमान् माणसेंहि बरींच निपजलीं; व त्यांचे हातून मराठी सारस्वतहि पुष्कळ निर्माण झालें. पण एका झाडाच्या सावलींत दुसरें झाड ज्याप्रमाणें नीट फोफावत नाहीं, त्याप्रमाणेंच कोणत्याहि प्रकारचा स्वतंत्रपणा आणि विशिष्टपणा यांच्या सारस्वतांत वाढलेला दिसत नाहीं. ही रामदासांनीं आखून दिलेल्या रेषेबाहेर गेलेली दिसत नाहींत. इतकेंच नव्हे, तर रामदासी बाण्याचें तेजहि यांच्यांत राहिलेलें नजरेस येत नाहीं. त्यांचा तो सूत्रधार निघून गेल्यावर हीं नुसतीं रंगीत बाहुलीं जागचे जागींच पडून राहिलीं. त्यांना कदरेंत धरून वागविणारा तो दरवेशी निघून गेल्यावर हे प्राणी आपआपसांत भांडूं लागले; व क्षणिक मानापमानाच्या आणि सुखाच्या कर्दमांत लोळून त्यांतच हे आनंद मानूं लागले. इतर अनेक मराठी कवींप्रमाणेंच भाबडी भोळी रचना यांच्याहि हातून निर्माण झालेली आहे. ती अवाढव्य आहे. कित्येकांची तर सुंदरहि आहे. पण रामदासी जिवंत झऱ्याचें, बुडबुड्यासरसें वर येणारें पाणी तींत नाहीं. कल्याणे[1] व उद्धवें[2] हे दोघेहि रामदासांचे उजवे-डावे हात होते. ते त्यांचे आवडते शिष्य होते. या दोघांचीहि थोडीशी रचना उपलब्ध आहे. पण दोघांपैकीं एकांतहि गुरुजींची चमक दिसत नाहीं. किंबहुना, रामदासांच्या कोणत्याहि शिष्याच्या उपलब्ध ग्रंथावरून, त्यांच्यांत रामदासांची

---

१. कल्याण हा बामुळगांवच्या कृष्णाजीपंत नांवाच्या एका ब्राह्मणाचा मुलगा. याचें मूळ नांव अंबाजी. याचीं पद्यें वगैरे आहेत ( काळ १५४० ते १६३६ ).

२. उद्धव हा टाकळीजवळील राहणारा. याचें उपनांव दशपुत्रे, आई उमाबाई व बाप सदाशिव ( काळ १५४६ ते १६३५ ).

कळकळ, आतुरता, स्वदेशप्रीति किंवा मनाला जाऊन झोंबेल असलें कवित्व प्रकट करण्याची ताकद मुळींच दिसत नाहीं. नाहीं, म्हणावयाला देवदासाची कांहीं थोडीशी कविता मात्र जरा ठणठणीत आहे. उत्कट स्वदेशप्रीतीनें मनाला येणारा चेव याच्या शब्दांत थोडाफार दिसतो. हा देवदास 'दादेगांव' येथील मठाधिपति होता. याचे श्लोक, अभंग, अष्टकें वगैरे कविता आहे.

क्षयो दुर्जनाचा करी कोण आतां ? । शिरीं रामराणा असे; काय चिंता ! ॥

असा धीर आपल्या चित्तांत बाळगून

भवें तापलों प्रीतछाया करावी । कृपाळूपणें सर्व चिंता हरावी ।
अहो संकटीं सोडवावें समर्था । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥

अशी प्रार्थना तो आपल्या दैवताजवळ करी. या देवदासानें मुसलमानांची निर्भर्त्सनाहि आपल्या श्लोकांत केलेली दिसते. अव्वल इंग्रजींत हिंदू व खिस्ती मिशनरी हे जसे एकमेकांस नांवें ठेवून एकमेकांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढीत, त्याच मासल्याचे याचे श्लोक आहेत.

अहा रे अहा ! तूं मुसलमान वेडा । मसीदींत जावून कां हाक फोडा ! ।
हाका मारितां ऐकतो काय अल्ला ! । मुलाना उगा वडंवडोंनि मेला ॥
अरे ऐक तुर्का, जिबेका करीतां । जिता जीव तो गाय मारोन खातां ।
आम्हांसारिखें अन्नही भक्षितां रे । तरी कां तुम्ही जीवहत्या करा रे ॥

असा याच्या रचनेचा मासला आहे. या देवदासाचा एक लहानसा चोवीस श्लोकांचा 'गजेंद्रमोक्ष' आहे. हा रामदासी परंपरेतलें आवडतें वृत्त जें प्रमाणिका त्यांत रचिलेला आहे. मुलांना म्हणण्यास हा फारच सरस आहे.

प्रबंध बांधितो बरा । तुम्ही मला दया करा ।
म्हणोनि प्रार्थितों पुरा । गदाधरा सदा स्मरा ॥

असे यांत सर्वभर साधे व गोड शब्द योजिले आहेत.

या समर्थशिष्याच्याच नांवाचा, पण याहून भिन्न असा दुसरा एक

**देवदास** महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. हा चैतन्यशिष्य असून याचें कुलदैवत गिरीचा व्यंकटेश हें होतें. या दैवताच्या स्तवनपर याचें 'व्यंकटेश-स्तोत्र' या नांवाचें एक गोड स्तोत्र सर्व महाराष्ट्रभर आबालवृद्धांच्या तोंडीं झालेलें आहे. याच देवदासाची एक 'संतमालिका'हि प्रसिद्ध आहे. हीं दोन्ही स्तोत्रें फारच प्रेमळ व रसभरित आहेत. संतमालिकांतून आपल्या देशांत अनेक भगवद्भक्तांचें स्मरण त्यांच्या कांहीं अलौकिक गोष्टींसह लहानथोरांस सदैव व्हावें, अशी सोय असते.[१] अशाच वीरमालिकाहि अवश्य असावयास पाहिजे होत्या. कदाचित् तशा त्या असतीलहि; पण अजून त्यांपैकीं एकहि ज्ञात असलेली दिसत नाहीं. देवदासांचीं कांहीं पदेंहि प्रसिद्ध आहेत.

'नको नको स्त्रीसंगनामग्रहण सर्वथा ।
शुक म्हणे परीक्षितीस ऐक भारता ।'

हें पद प्रसिद्धच आहे. या देवदासाची भगवद्गीतेवर एक ओवीबद्ध टीका आहे.

समर्थांचे शिष्य निरंजन, बाळकराम, सीताराम व त्या परंपरेंतील इतर अनेक पुरुष, तसेंच 'प्रदोषमहात्म'कार रामकवि (१५६७), 'संदेहहरण' ग्रंथाचा कर्ता राघव[२] (१६११), 'श्रीखंड्याचें चरित्र' वगैरे आख्यानें गाणारा प्रभुनंदन (१६३३), कानडी ग्रंथावरून मराठींत उद्योगपर्व रचणारा चंद्रात्मज रुद्र (१६०४), त्र्यंबक अंकोळकर, मुकुंद वगैरे कवि साधारणपणें समकालीन होत. देवदासाप्रमाणेंच

---

१ संत पुरुषांच्या स्मरणानें सौख्य व आनंद प्राप्त होईल, हें सांगणें ठीक आहे. पण तीन पारायणांनीं पुत्रप्राप्ति होईल, सात पारायणांनीं रोग दूर होईल, चौदांनीं कारागृह टळेल, इत्यादि कोष्टकें कवि देऊं लागला म्हणजे थोडें हसूंच येतें.

२. यासच राघवदास असेंहि म्हणतात. 'शके सोळाशें अकरावरी । प्रबोधनाम संवत्सरीं । अश्विन शुक्ल गुरुवारीं । विजयादशमी सुदीन ॥' ते दिवशीं 'संदेहहरण' ग्रंथ पुरा झाला. याशिवाय याचें 'अध्यात्मरामायण'हि आहे.

मुकुंद या नांवाचेहि दोन कवि थोड्याफार अंतरानें एकाच काळीं होऊन गेले, असें दिसतें. एक **दत्तपदांकित मुकुंद** व दुसरा सातारकर **ताराबाईचा आश्रित मुकुंद**.

पहिला म्हणजे **दत्तपदांकित मुकुंद** हा भारद्वाज-गोत्री, त्रिप्रवरी, यजुर्वेदी ब्राह्मण. याच्या बापाचें नांव नारायण व आईचें साखराबाई. याच्या वयाच्या पांचवे वर्षी मुंज व सातवे वर्षीं लग्न झाल्यावर थोडेच दिवसांत याचा बाप वारला. तेव्हां हा खानदेशांत जैतापूर येथें गेला. त्यानंतर आपल्या आयुष्याचीं दहा वर्षें यानें एका राजाच्या सेवेंत खर्च केलीं; व पुढें याला संसाराचा कंटाळा वाटून यानें तीर्थयात्रेस प्रयाण केलें. शके १६२३-मध्यें यास स्वप्नांत गुरुदीक्षा व गुरुमंत्र मिळाला. पुढें कांहीं दिवस यानें औरंगझेबाचा वडील मुलगा मोअज्जीम याच्या पदरीं नोकरी धरिली; व कांहीं पैका गांठीं पाडून पुन्हां तीर्थयात्रा केली. यानें आपल्या तीर्थयात्रेचें एक प्रवासवर्णन लिहिलें आहे. यांत अनेक ठिकाणांचा उल्लेख व कांहींचें वर्णनहि केलेलें दिसतें. यांतच यानें 'मूलस्थान' ऊर्फ 'मुलतान'चा उल्लेख पुढीलप्रमाणें केलेला आढळतो—

मूलस्थान प्रसिद्ध नाम नगरी जैसी अयोध्यापुरी।
जेथें जन्म धरी नृसिंह बरवा प्रल्हाद राखे हरी॥
तर्णी कुंडहि रामतीर्थ लहरी हें चंद्रभागा निरीं।
केलें सज्जनमज्जने निजकरीं संतोषलों अंतरीं॥

बुंदेलखंडापर्यंत प्रवास करणाऱ्या या कवीचें हें प्रवासवर्णन अनेक कारणांमुळें मोठें चित्तवेधक आहे. या कवीची बरीच कविता आहे. पैकीं कांहीं रचना ब्रिज, नेमाडी, अभीर, बागलाणी, खानदेशी, रणावट, गुर्जरी, मारवाडी याहि भाषांत आहे. म्हणजे त्या काळीं प्रचलित असलेल्या अनेक भाषांत कवित्वरचना करण्याइतकें भाषाज्ञान या मुकुंदकवीस होतें[1].

---

१. ही माहिती भारत इ. सं. मंडळाच्या शके १८३४-च्या वृत्तामधून घेतली आहे. या कवीची आणखीहि सविस्तर माहिती तेथें सांपडेल.

**दुसरा मुकुंद** हा प्रसिद्ध ताराबाईचा आश्रित होता, हें वर आलेंच आहे. या मुकुंदाची कांहीं कविता मजजवळ आहे. याचीहि देवदासा-प्रमाणेंच एक 'संतमालिका' असून अनेक दैवतांच्या स्तुतिपर 'स्तोत्रें' व 'अष्टकें'हि आहेत. या मुकुंदाची रचना वरील दत्तपदांकित मुकुंदाच्याचप्रमाणें साधारण आहे. मुकुंद म्हणतो—

सप्तशृंगनिवासिनी भगवती! माते! जगत्तारिणी!।
आतां तूं मम मस्तकीं कर शिवे, ठेवी रमे उन्मनी ॥
जे जे वाणि वदे रसाळ कविता ते मानिती सन्मुनी।
दासाचें निजअंघ्रि वंदिन सदा हस्तांबुजा जोडुनी ॥
तारादेवि, मला कृपा करुनियां सांभाळिते तोषदा।
सिद्धीच्या सुखराशि अंतरिं बहू धान्यें गहूं सर्वदा ॥
काव्यें कोटिशतें प्रबंध रसना बोले जशी शारदा।
संताचे निजमंडळी युदुकुळीं स्वानंद बिंदीं मुदा ॥

या मुकुंद कवीनें कदाचित् छंदःशास्त्रावर एखादा ग्रंथ रचिला असल्याचा संभव आहे. यानें दिलेल्या कांहीं वृत्तलक्षणांपैकीं 'मालिनी' वृत्ताचें याचें लक्षण असें—

उभय 'न'गण पूढें जाण एका 'म'कारा।
गण उभय 'य'कारी मालिनी जाण सारा ॥
कविजन वदताती मा असे लीन जेथें।
यदुसुत वितरागी होय विश्रांति तेथें ॥

मुकुंदाच्या पित्याचें नांव यादव पंडित व त्याची गुरुपरंपरा, एकनाथ—राघव—विठ्ठल—मुकुंद अशी होय. या परंपरेंत उल्लेखिलेला एकनाथ हा प्रसिद्ध जनार्दनस्वामीचा शिष्य पैठणकर एकनाथच समजावा. हें सांगण्याचें कारण असें कीं, महाराष्ट्र-साधुपुरुषांच्या परंपरेंत या 'एकाजनार्दना'हून भिन्न असा एक एकनाथ नांवाचा पुरुष येतो, असें दिसतें. 'ज्ञानाब्धितरंग' नांवाच्या ग्रंथांत ग्रंथकार ब्रह्मदास यानें आपली गुरुपरंपरा दिली आहे; त्यांत माधवेंद्रस्वामीचा शिष्य एकनाथ असा उल्लेख आहे. या ब्रह्मदासानें आपली सांगितलेली

परंपरा पुढीलप्रमाणें आहे. नृसिंहसरस्वती — माधवेंद्रसरस्वती — एकनाथ — श्रीकृष्णस्वामी — ब्रह्मदास. या नृसिंहसरस्वतीच्या शिष्य-परंपरेंतील ब्रह्मदासानें आपला हा 'ज्ञानाब्धितरंग'नामक ग्रंथ शके १६३०-मध्यें सर्वधारी संवत्सरीं मार्गशीर्ष महिन्यांत कृष्णातीरीं 'मुक्तावळी' नाम नगरींत पूर्ण केला, असें त्यांत लिहिलें आहे.

या सर्व मंडळीपेक्षां '**अवचितसुत काशि**' या कवीची रचना बरीच जास्त आहे. अवचितसुत काशीनें आपल्या ग्रंथांत आपली माहितीहि बरीच दिली आहे. या कवीचें नांव काशि व याच्या बापाचें नांव अवचितराव. याचें उपनांव सोळंखी व गोत्र अत्रि. अवचितराव 'भारम' या नांवाचें एक गांव वसवून तेथेंच नेहमीं राहत. हा गांव नाशिक जिल्ह्यांत असून अवचितरावांचे वंशज अजूनहि या भारमगांवीं नांदत आहेत. भारम गांवाजवळीलच एक गोपाळगिरी नांवाचा किल्ला यांचे ताब्यांत असून हे तेथें जोरावरीनें राहत असत. पुढें परचक्र येऊन यांचा फार नाश झाला; व दिल्लीपतीच्या सेनेनें अवचितरावांस मुलांसह नेऊन दिल्लीस कैदेंत ठेविलें. पुढें कांहीं दिवसांनीं हे तेथून सुटून दक्षिणेंत परत आले.

काशिकवीनें द्रौपदीस्वयंवरावर दोन ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध आहेत. यांपैकीं एक श्लोकबद्ध असून दुसरा ओवीबद्ध आहे. हे ग्रंथ, काशिकवि हा मानभाव-पंथाचा अनुयायी असल्यामुळें, प्रायः त्याच पंथाच्या लोकांत फार वाचिले जातात. कवीनें या एकाच कथानकावर दोन निरनिराळे ग्रंथ कां रचिले, हें कळत नाहीं. यांपैकीं श्लोकबद्ध ग्रंथापेक्षां ओवीबद्ध ग्रंथ जास्त चांगला उतरला आहे. ओवीवृत्तांत गणांचें व अक्षरांचें बंधन फार कमी असल्यामुळें साहजिकपणेंच आपल्या कल्पना नीट मांडण्यास कवीस त्यांत सोपें गेलें आहे. या ओवीबद्ध ग्रंथांत इतर

---

१. माधवेंद्राचा शिष्य। जगप्रसिद्ध एकनाथ...व तत्कुक्षपयसागर-। माजी जन्मला अमृतकर। तो श्रीकृष्ण भीमकीवर। सद्‌गुरु साचार आम्हासीं॥ (तरंग ११, ओ. १७९)

महाराष्ट्र-ग्रंथकारांच्या, व मुख्यत्वेंकरून मुक्तेश्वराच्या, कृतीचें कवीनें पुष्कळ अनुकरण केलेलें आढळतें. एकंदरींत हा द्रौपदीस्वयंवर ग्रंथ बरा उतरला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा ग्रंथ शके १६१८-मध्यें पौष वद्य दशमीस कवीनें पुरा केला आहे.

मागें रामदासपंचायतनांत जयरामस्वामीसंबंधें लिहितांना (पृ. ४३६-वर) रामदासी परंपरेंत एक **जयराम** या नांवाचा साधुपुरुष होऊन गेला, असें टीपेंत म्हटलें आहे. ज्याच्या नांवावरून महीपतीबुवासारख्या चरित्रकारांचा घोटाळा झाला तो हाच जयराम होय. यास '**जयरामबावा**' असें म्हणत. याचे श्लोक, पदें, अभंग अशी विविध रचना आहे. एक विशेष गोष्ट अशी कीं, याची जशी श्रीरामचंद्रासंबंधीं रचना आहे, तशीच पंढरीच्या विठ्ठलासंबंधींहि आहे. दोहोंची धाटणी सरळ असून दोहोंतहि गोडी सारखीच भरलेली आहे.

यानें लिहिलेल्या अभंगांतील उल्लेखांवरून असें दिसतें कीं, याला दायादांनीं फसविल्यामुळें[1] व लुबाडिल्यामुळें हा संसाराला आणि या जगाच्या राहटीला अगदीं कंटाळून जाऊन ईश्वराराधनेस लागला. पुढें याला सद्गुरूनें गुरूपदेश देऊन संसारपसारा सोडून विरक्तवृत्तीनें दूर राहण्यास सांगितलें व हा तसा राहूं लागला. हें पाहून याचे आप्तेष्टांनीं यास नीट संसार करून पूर्ववत् राहण्याचा आग्रह केला.

धंदा रोजगार करा म्हणताती। हकीम बोलती आल्या (म्हा?) पाशीं ॥

त्यावर जयराम म्हणतो—

---

१. गणगोत अपत्य। स्त्रियादी समस्त। व्यर्थ यांचा प्रांत। कळों आला ॥
तंबाखुच्या देठां। दांत पसरावे। फिरोन राहावें। ऐशा स्थळीं ॥
त्याहुनी हा बरा। अलेखीचा धंदा। ऐसे हें गोविंदा। सत्य वाटे॥
नको नको नको। ऐसी ही संगती। बहूत फजिती। मज वाटे ॥
अनोळखी जन। त्यांत म्यां असावें। ऐसें माझ्या जीवें। आवडतें ॥
अनाथ किंकर। आहे दीन मी देवा। सोडवी हा गोवा। रघुपती॥ इ. इ.

घातला तो पाय । मागे कैसा होय । शूर तो......य । जन थुंके ॥
थोरांच्या सेवेसी । हेचि कां हो बळ । काय घालमेल । रामराया ॥
सतीचें तें वाण । घेऊनियां मग । फिरतां तें जग । थू थू करी ॥

आणि हें आपलें म्हणणें जयरामानें खरें केलें. तो पुन्हां संसारांत पडला नाहीं. आपल्या पोटाचा भारहि त्यानें कोणावर घातला नाहीं. तो केवळ भिक्षा मागून असे. श्रीरामचंद्राच्या पायांशीं मोठ्या कळवळ्यानें विनवण्या करून तो म्हणतो—

अझोनिया काय । पाहतोसि अंत । संसाराची मात । कानीं येते ॥
आपुलें विषिचें । न घाली मी संकट । पोटाचा बोभाट । करी ना मी ॥
जेव्हां जैसें मिळे । तेंचि सुखें घेऊं । निदानि तीं सेऊं । शुष्क पर्णें ॥
दोन बोटें चिंधी । लंगोटिला द्यावी । परि सेवा घ्यावी । रामराया ॥
बिदीवरिल चिंध्या । मेळऊनि घांद्या । आनंदाच्या मांद्या । मौजा करूं ॥
घरोघरीं माया । दारोदारीं बाप । पोराचा अक्षेप । नाहीं आम्हां ॥
पृथ्वी हे मंचक । हस्त हेचि उशि । अंबर शालेसी । पांघरूं आम्ही ॥
ऐसे हे डोहळे । जाहले जयरामी । कृपेचे संगमी । पूर्ण करा ॥

इतक्या अल्पसंतुष्टपणानें राहणाऱ्या असल्या कवीचे हे डोहळे कोणताहि समाज आनंदानें पुरवील. यानें अनेक अभंगांत दासबोधाची स्तुति केली आहे. याचे श्लोक व अभंग शेंकड्यांनीं गणतां येतील इतके आहेत. या जयरामबावाच्या वाणींत मनोहर असा एक साधेपणा आहे. यांत शब्दांची कुसरी नाहीं. पण याचा समकालीन असा 'पंडित' या नांवाचा एक कवि होता; त्याच्या रचनेंत शब्दचमत्कार केलेला आढळतो. शब्दचमत्कार म्हटला म्हणजे साधेपणा आणि सरळ रचना हीं त्यापासून दूर राहतात. इतकेंच नव्हे, तर उलट क्लिष्टता आणि अर्थाची ओढाताण मात्र जास्त-जास्त होत जाते. हा 'पंडित' प्रसिद्ध वामन पंडितापेक्षां भिन्न पुरुष होय, हें उघड आहे. याचीं पदें फार आहेत. त्यांतून एक पद येथें देतों. श्रीकृष्णाच्या विरहानें व्याकूळ होऊन वेडावलेल्या गोपिका रानावनांतल्या जनावरांना आणि

वृक्षवेलींना श्रीकृष्ण कोठें आहे, म्हणून विचारीत हिंडत आहेत, त्या प्रसंगाचें वर्णन यांत आहे—

पुसति गोपिका, शुका पिका काका चक्रवाका चातका बका वृका जंबुका ।
मशका चंपका तिलका; सांगे शोका ढोंका बदका; बद 'का रे येका रमानायका ।'
कमलजजनक, कमलदललोचन, कमलविमलमुख कमलनायका ।
या म्हणति गोपी देखिल्या तें कृष्णाविरहें नेणती
तन्मय झाल्या चित्तें ॥१॥ दावा ॥

उरगा तुरगा तुं विहगा नगा नागा माहोंळिगा, नारिंगा भृंगा मेढशृंगा ।
पिंगा निवडंगा सारंगा चांगा, सांगा सांगा श्रीरंगा गाय गा भेटीं दे गा ।
घडिभरी हरी झडकरी जरी, तरी धरि करीं,
मजवरी करी खरि पुरी दया बरी ॥ २ ॥ दावा ॥
अगरा उंबरा तगरा देवदारा खैरा सहकारा हिवरा सामरा तितरा ।
सारा अंजिरा मांदारा, तारा रे, पाचारा सुंदरा गोपाळ विरा ।
सुंदर इंदुवदन, मंदरधर, कुंदरदन, सुरनरनुत, यदुविरा ॥ ३ ॥ दावा ॥
हंसा मुंगसा वासा तरसा रिसा फणसा सिरसा सारसा सरसा अनारसा ।
पळसा राहिसा महिसा उरसा मेषा ! ! गोपवेशा जगदीशा, दावा, हृषिकेशा ।
अंकुरित स्मित, पंकजभवनुत, शंकर-सनंदन-वंदित ॥ ४ ॥ दावा ॥
शबरी पिंपरी सुकरी सोंवरी चमरी भ्रमरी कुररी भोंकरी दावा शौरी ॥
कारी बावरी घारी तारी नारी कृष्णाविरहें मज्जति भारी दुःखपुरीं ।
अलिकुल विमल कुटिल निलालक पंडितजव मन निजसुखदायका ॥५॥ दावा ॥

या पंडित कवीच श्लोकहि आहेत. त्यांतदेखील याच प्रकारची शब्दचमत्कृति करण्याचा कवीनें यत्न केला आहे. या काळीं अनेक कवींना या शब्दचमत्काराची कसरत करण्याची वेडी हौस लागलेली दिसते. दासविश्रामधामांत असेंच एक कवन बागेच्या वर्णनासाठीं रामदासांच्या ग्रंथांतून अवतरून घेतलेलें आहे. तें वाचून एखाद्याच्या मनांत असें येईल कीं, एखाद्या इंग्रजी कवीला नदीच्या ओघाचें वर्णन करण्याची स्फूर्ति हें ऐकून तर झाली नसेल ना ! ! हें दासविश्रामधामांत अवतरलेलें रामदासी पद्य असें:—

त्या वळी आवळी रावळी जांभळी । बाफळी पोकळी कर्दळीच्या वळी ।
सुंदरा इंदिरा मंदिरा हीवरा । वल्लरी झल्लरीच्या परी विस्तरा ॥१॥
केतकी त्याजुती मालती सेवती । मांडवी वोळल्या डोलती तोलती ।
माजल्या वाजल्या फलल्याही भल्या । ष्पयाति कितीयेक पाल्हाळल्या ॥२॥
तिं बनें सुवनें सुमनें ही घन । आननें माननें त्या जनें सज्जन ।
रंजले गंजलेही भले भूलले । पातले जीव ते रातले मातले॥३॥
गुल्गुला बुल्बुला गल्बला माजला । रोळला घोळला वोळला मेहुला ।
हालती चालती तोलती डोलती । भृंगसे रंगले शृंगसे वेधती ॥४॥
कोकिळा त्या किळा वीकळा हो कळा । मोकळा मोकळा तोकळा हूत्कळा ।
ईतरें ही वरें सुस्वरें सुंदरें । आगरें नागरे नागरें पाखिरें ॥५॥

या सर्व ग्रंथकर्त्यांचा समकालीन किंवा त्यापेक्षां थोडा पूर्वीच एक अतिशय मोठा असा ग्रंथकर्ता महाराष्ट्रांत होऊन गेला. याचें नांव शिवराम. किंबहुना, सोळाव्या शतकाच्या शेवटीं जे मराठी ग्रंथकार होऊन गेले त्या सर्वांत **शिवरामस्वामी** हाच मोठा ग्रंथकार होय. यानें निर्माण केलेली ग्रंथसंपत्ति अतिशय प्रचंड आहे. हा मागें (पृ. ४३७-वर) सांगितलेल्या रंगनाथाच्या परंपरेंत येतो. त्यांत सहजानंदाचा शिष्य जो पूर्णानंद या नांवानें उल्लेखिलेला आहे, त्या पूर्णानंदाचा शिष्य (व पुत्र) हा शिवराम होय. पूर्णानंदाचें पूर्वाश्रमींचें नांव नारायण. नारायणाच्या बापाचें म्हणजे शिवरामाच्या आजाचें नांव तिमण्णा दीक्षित. हे काश्यपगोत्री, आश्वलायन, ऋग्वेदी ब्राह्मण. हे कलबुर्गे प्रांतांत महागांवीं राहत असत. यांचा मुलगा नारायण उर्फ पूर्णानंद हा तेथील ग्रामजोशाची वृत्ती संभाळून असे. यास बाळकृष्णपंत चंद्रकेत यांची मुलगी लक्ष्मी ही दिली होती.[1] या जोडप्यास सात

---

१. ही माहिती कै. राजवाडे यांनीं विश्ववृत्तांत दिली आहे; व इतरत्रहि अशीच माहिती कळते. पण पुढें राजवाडे यांनीं, (भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३३ पृ. ५५-वर) 'शिवराम हा एकनाथस्वामीचा नातू–मुलीचा मुलगा' होय, असें लिहिलें आहे.

अपत्यें होतीं. त्यांपैकीं सर्वांत लहान शिवराम हा होय. नारायण ऊर्फ पूर्णानंदाचे वडील तिमण्णा हे आपल्या वृद्धापकाळीं श्रीक्षेत्र वाराणसी येथें राहत असत. तेथें त्यांस भेटावयाकरितां नारायण हा गेला असतां त्याची व आनंदपरंपरेंतील ब्रह्मानंदस्वामींची गांठ पडली, व नारायणानें ब्रह्मानंदांची उपदेशदीक्षा घेतली. ब्रह्मानंदांनीं या शिष्या-नारायणा—चें नांव 'पूर्णानंद' असें ठेविलें. पुढें कालांतरानें नारायण—पूर्णानंदानें आपल्या मुलास—शिवरामास मंत्रोपदेश दिला; व तेव्हांपासून शिवराम हा शिवराम पूर्णानंद या नांवानें ओळखिला जाऊं लागला.

शिवरामस्वामींचा विद्याभ्यास विजापुरास रुक्मण्णापंत यांच्या जवळ झाला. रुक्मण्णापंत हे नामांकित विद्वान् होते. त्याप्रमाणेंच त्यांचा शिष्य शिवराम हाहि चांगला विद्यासंपन्न झाला. शिवरामाचें लग्न तो दहा वर्षांचा असतांच झालें होतें. याच्या पहिल्या बायकोचें नांव पार्वती. दुसरें लग्न चौदाव्या वर्षीं झालें. दुसऱ्या स्त्रीचें नांव कावेरी. शिवरामस्वामींचा मठ व परंपरा अजून आहे. शिवरामानें रचिलेलें शेकडों ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. यांत कांहीं ओवीबद्ध, कांहीं श्लोकबद्ध, व कांहीं गद्य असे आहेत. बहुतेक सर्व रचना वेदांतपर व भक्तिपर आहे.[१]

याच्या भागवताच्या एकादशस्कंधावरील टीकेंत पुढील श्लोक आहेत.

---

१. शिवरामाचें खालील पद प्रसिद्धच आहे.

गुरुवाक्याचें निजशेष चाखावया । मांजर आजी होऊं ॥
मी येऊं । मी यंऊ मी यंऊ ॥
सीर करिसी त्यासि तरी । त्या घरीं न कळत तेथें जाऊं ॥
गोडी लाचावली प्रेम तुझें निजपाया । मागें पुढें भोऊं ॥
पूर्ण गुरु शिवराम असोनि, कां, मी काळसुण्यासी भेऊं ॥ १ ॥
गुरुवाक्याचे निजशेष चाखाया मांजर आजी होऊं ॥ म्याऊं ॥ म्याऊं ॥ म्याऊं ॥

मायेचा जो पाहतां आजि आजा[1] । तो हा येका जाहाला बाप माझा ॥
आंगें येथें पालटी नांवरूपा । श्लोकीं श्लोकें दाखवी अर्थदीपा ॥
कोणी म्हणेतो शिवराम टोणपा । पाहा अनुष्ठान बसेचि ना जपा ॥
उगेचि नुस्तें मिळऊनि पोरटीं । नाचे, उडे, गाय, करीत चाउटी ॥
कल्याण धामीं शिवराम योगी । हे संपवी भागवत प्रसंगीं ॥
वक्त्या जनाला श्रवणार्थ याला । कल्याण हो सर्वहि भाविकांला ॥

शिवरामस्वामींचा जन्म शके १५५४-मध्यें झाला; व त्यांनीं हा लोक शके १६११ (?)–मध्यें वैशाख शु. तृतीयेस सोडिला. यांनीं केलेलें कवित्व यांचा शिष्य अच्युत अनंत हा लिहून ठेवी. या शिवरामाचा गुरुबंधु, म्हणजे पूर्णानंदाचा शिष्य, '**निरंजन**' यानेंहि बरेच ग्रंथ लिहिले आहेत[2]. या शिवराम, निरंजन, वगैरेंचा समकालीन असा एक मचकुंद नांवाचा कवि उल्लेखिलेला आढळतो. याला शिवसुत मच्कुंद असें श्री. देवांनीं म्हटलें आहे; व याचे संबंधानें श्री. देव हे लिहितात कीं, 'मुक्तेश्वराची बरोबरी मच्कुंद करतील, इतकी यांची कविता सरस आहे.' यानें श्रीभार्गवचरित्र म्हणजे विष्णूचा सहावा अवतार जो परशराम त्यांतील चरित्रभाग वर्णिला आहे. या चरित्रांत वीररसच प्रधान आहे.

सरक्षावे साधु जन । आणि दंडावे दुष्ट दुर्जन ।
करावें धर्माचें पाळण । हें अंतःकरण देवाचें ॥

**कोकीळ** या नांवाचे एक कवि याच सुमारास होऊन गेले असावे. यांचें नांव गंगाधर कोकीळ. यांचें नांव बरेच वेळां ऐकूं येतें. व यांचीं पदेंहि जुन्या बाडांतून बरींच आढळतात. भक्तमंजरींत राजाराम प्रासादींनीं हे कोकीळ, केशवस्वामी भागानगर-

---

१. याचा अर्थ 'एकनाथ हा माझे आईचा आजा' असा घ्यावयाचा कीं काय ? म्हणजे शिवराम हा एकनाथाचा पणतू होतो.

२. या निरंजनाचा 'मननमाला' या नांवाचा एक फार सोप्या व सरस भाषेंत लिहिलेला चार-हजार ओव्यांचा ग्रंथ आहे.

करांचे समकालीन होते, असें म्हटलें आहे. कोणी कोणी हे १६६०-पासून १६७५-चे दरम्यान समाधिस्थ झाले असावे. असें म्हणतात. यांची समाधी औरंगाबादेकडे सायखेडें या गांवीं आहे. या कोकिळांचीं पदें चांगलीं आहेत. पैकीं कांहीं व्यवहारोपदेशक आहेत. यांचें एक पद असें—

ठेविल भगवान तसेंचि राहणें । तूप साखर पोळी, खीर, भात खाणें; । केव्हां भाकर भाजी, स्वीकार करणें । केव्हां नूतन बारिक वस्त्र परिधान करणें । केव्हां जाडें मलिन बहु जीर्ण लेणें ।। केव्हां रथ हय हस्ति शिबिकेंत बसणें; । केव्हां कार्यासाठीं पायींच फिरणें ।। प्रारब्धें जें जें पडेल तें साहणें। हळहळही नयेची सोडुनि देणें ।। कोकिळ ! प्रभुवरी बोल कशासी धरणें।। निशिदिनीं प्रभुच्या स्मरणें सुख साहणें ।। १ ।।



## दक्षिण हिंदुस्थानांतले कवि

कोणत्याहि भाषेचा प्रसार होणें हें, त्या भाषेच्या बरेवाईटपणापेक्षां किंवा तिच्या सोपेपणापेक्षां ती भाषा वापरणाऱ्या लोकांच्या संस्कृतीवर, त्यांच्या अंगच्या बुद्धिमत्तेवर व विशेषतः त्यांच्या अमलाच्या प्रसारावर व महत्त्वावर विशेष अवलंबून असतें. मराठ्यांची सत्ता फक्त महाराष्ट्रांतच होती तोपर्यंत त्यांच्या भाषेचें क्षेत्र फारसें पसरलें नाहीं. पण त्यांचा व्याप जेव्हां महाराष्ट्राबाहेर वाढत गेला तेव्हां त्यांची भाषाहि महाराष्ट्राबाहेर फैलावूं लागली. मराठे तंजावराकडे गेले व त्यांच्या राजध्वजाचा दांडा तेथें रोवला गेला, तेव्हां त्यांच्याबरोबर त्यांची भाषाहि तिकडे गेली व तिच्या वेलीच्या मुळ्याहि तेथें रुजल्या; आणि यापुढें पेशव्यांच्या अमदानींत मराठ्यांच्या सत्तेनें आणि व्यापानें बहुतेक सर्व हिंदुस्थान ग्रासिलें तेव्हां हिमालयापासून रामेश्वरापर्यंत ती भाषा पसरली. माळव्यांत आणि बडोद्यांतहि मराठी कवि होऊं लागले. दूरदूरच्या राजांस मराठी लिहिणारांचें अगत्य करून येऊन पुण्यांतले हुकूम व पुण्यास धाडावयाचे अर्ज मराठींतच लिहविणें त्यांस भाग पडलें. महाराष्ट्रांतून मराठे सरदार बाहेर जात तेव्हां त्यांचे बरोबर सावकार, साधु, संत, कारकून, आश्रित, उपाध्ये जोशी, शाहीर वगैरे मंडळींचा ताफाहि तिकडे जाई व अनेक वेळां ही बरोबर गेलेली मंडळी त्या दूरदूरच्या प्रांतांत वस्ती करून राही; आणि त्या त्या प्रांतांत आपली भाषा, आपल्या ललितकला, आपलें सारस्वत, आपले उद्योग वगैरेंचा पसारा पसरून टाकी.

शहाजी राजे भोसले हे प्रथम चंदिचंदावराकडे गेले तेव्हां त्यांच्याबरोबर महाराष्ट्रांतलीं अनेक कुटुंबें तिकडे गेलीं; आणि जीं कुटुंबें एकदां तिकडे गेलीं त्यांपैकीं बरींच तिकडेच वस्ती करून राहिलीं. यांपैकीं कांहींचे वंशवृक्ष अजूनहि त्या प्रांतांत चांगले बळावलेले आहेत.

शहाजीनंतर शिवाजी राजे जेव्हां त्या प्रांतांत तंजावरास गेले तेव्हां त्यांच्या बरोबर रामदासस्वामींनीं आपल्या शिष्यवर्गापैकीं भीमस्वामी, अनंत मौनी, राघवस्वामी वगैरे शिष्य तिकडे धाडिले होते. या शिष्यमंडळींनीं तिकडे रामदासी संप्रदाय व मराठी भाषा यांची उत्कृष्ट तऱ्हेनें जोपासना केलेली दिसते.

यांपैकीं **भीमस्वामींची** हकीकत थोडी मनोरंजक आहे. कऱ्हाडाजवळ शहापूर येथें कमळाजीपंत या नांवाचे एक गृहस्थ राहत असत. यांच्या बायकोचें नांव गंगाबाई. यांस एक पुत्र होता. या पुत्रास तीन पुत्र होते. या तिघांपैकीं सर्वांत वडील मुलाचें नांव ' नाना ' किंवा भीम. हाच ' भीमस्वामी ' होय. या भीमस्वामीची आजी म्हणजे गंगाबाई ऊर्फ सतीबाई हिनें श्रीसमर्थ रामदासस्वामींचा उपदेश घेतला होता. हिच्या येथें एकदा रामदासस्वामी गेले असतां तेथें त्यांस नाना ऊर्फ भीम यानें पाहिलें. या वेळीं भीम हा अगदीं लहान म्हणजे केवळ सात-आठ वर्षांचा होता. या लहान मुलाची चलाखी व बुद्धि पाहून श्रीरामदासस्वामींनाहि संतोष वाटला; व त्यांनीं यास विचारिलें, ' तूं आमचा शिष्य होतोस का ? ' यावर भीमानें ' होय ' म्हणून उत्तर दिल्यावर रामदासांनीं त्यास सांगितलें कीं, ' आम्हीं सांगूं तें काम तुजला करावें लागेल. ' यावर-देखील भीम यानें ' होय करीन ' असेंच उत्तर दिल्यावर रामदासांनीं जवळ एक विहीर होती तिजकडे बोट करून रामदासांनीं त्यास सांगितलें , ' आंत टाक उडी '. ही रामदासांची आज्ञा ऐकतांच भीमानें त्या विहिरींत एकदम उडी टाकिली ! हें पाहून रामदासांनीं त्यास आपल्या शिष्यवर्गांत सामील केलें. या भीमस्वामीचा सर्व विद्याभ्यास रामदासांच्या नजरेखालींच झाला; व पुढें योग्य काळीं यास शहापूर येथील मठाचें महंतपण मिळालें. कांहीं दिवसांनीं ( शके १५९७-चे सुमारास ) हे भीमस्वामी शिवाजीमहाराजांबरोबर तंजावर प्रांतीं गेले. तेथें शिवाजीचे सावत्र बंधु व्यंकोजी महाराज यांनीं त्यांस एक मठ बांधून दिला. हल्लींहि यांची परंपरा व मठ तेथें आहे. या भीमस्वामींची

कांहीं पदें वगैरे असून शिवाय यांनीं लिहिलेलें एक श्रीसमर्थ रामदासस्वामींचें लहानसें चरित्र आहे.[1]

या भीमस्वामींच्या बरोबरच तंजावर प्रांतांत गेलेले दुसरे शिष्य **अनंतस्वामी** व **राघवस्वामी**. या दोघांचेहि मठ व परंपरा तंजावर प्रांतांत आहेत. यांपैकीं अनंतस्वामींचा शिष्य **मेरुस्वामी** या नांवाचा होता. यानें 'भीमोपदेश', 'स्वानंदलहरी', 'अनुभवसार' वगैरे ग्रंथ रचिले आहेत. राघवस्वामींचा **माधव** या नांवाचा एक शिष्य होता. तंजावर प्रांतांत होऊन गेलेल्या सर्व मराठी कवींत याच्याइतके ग्रंथ कोणींहि लिहिलेले दिसत नाहींत. याचें एक श्लोकबद्ध रामायण असून शिवाय दुसरें एक ओवीबद्धहि रामायण आहे. तसेंच, 'योगवाशिष्ठ' आणि 'गणेशपुराण', 'विष्णुपुराण', 'अश्वमेध' वगैरे अनेक ग्रंथ यानें रचिलेले आहेत. याच्या योगवाशिष्ठाचे १२६ सर्ग असून ओवीसंख्या बारा हजारांवर आहे. सर्वांत अठरा पर्वें महाभारत हा याचा मोठा ग्रंथ आहे. माधवस्वामी[2] हा ग्रंथ चार वर्षें रचीत होते.

> शके ( १६२५ ) सोळासें पंचवीस । सुभानु संवत्सर अश्वीन मास ।
> शनवार कृष्ण तृतीयेस । ग्रंथ सौरस योजिला ॥

असें यांनीं प्रारंभीं आदिपर्वांत लिहिलें आहे; व शेवटच्या म्हणजे स्वर्गारोहणपर्वांत लिहिलें आहे कीं,

> शके सोळा शतें येकोणतिसी । कार्तिक वद्य प्रतिपदेसी ।
> आरंभ केला स्वर्गारोहणासी । ...............

व हें पर्व दुसरे दिवशीं समाप्त झालें, या ग्रंथाची एकंदर अध्यायगणती कवीनें पुढीलप्रमाणें सांगितली आहे.

> अठरा पर्वें भारत संपूर्ण । नव शत चोवीस अध्याय प्रमाण ।
> एकादश मासें गुणितां आपण । ताळ आणा चौऱ्यांशी ॥

---

१. या भीमस्वामींचा जन्म शके १५६४-त झाला व मृत्यु १६६३-त झाला. म्हणजे यांची हयात एक कमी शंभर वर्षांची होती.

२. या माधवाचा मुलगाहि रचना करी. याचे अनेक ग्रंथ तंजावर प्रांतांत आढळतात. हा ग्रंथांत आपणास माधवनंदन, माधवतनय असें म्हणवितो.

म्हणजे अध्यायसंख्या ९२४ नऊशें-चोवीस. हिला अकरांनीं भागिलें असतां भागाकार चवऱ्याशीं येतो. हा एवढा मोठा प्रचंड ग्रंथ कवीनें श्रीकावेरी नदीच्या काठीं गौरी-मयूर (?) या गांवीं श्रीरघुनाथासमोर बसून लिहिला. याच्या अनेक प्रती मद्रास प्रांतांत आढळतात. याच्याइतका दुसरा प्रचंड महाभारत-टीकाग्रंथ मराठींत उपलब्ध नाहीं. मात्र रचनेच्या मानानें या ग्रंथाची गोडी जितक्यास तितकीच आहे. ग्रंथाची भाषा आणि एकंदर शैली साधारण प्रतीची आहे.

तंजावर प्रांतांत माधवाप्रमाणेंच **रंगनाथ** या नांवाचा एक विस्तृत रचना करणारा कवि होऊन गेला. हा बहुतकरून श्रीरंगपट्टणाच्या आसपासचा राहणारा असावा. याची पौराणिक रचना पुष्कळच आहे. या 'कावेरीतटनिवासी' रंगनाथानें 'कावेरीमाहात्म्य' या नांवाचा मोठा ग्रंथ लिहिला आहे. इतर 'माहात्म्या'प्रमाणेंच याहि ग्रंथांत ऐतिहासिक माहिती किंवा 'स्थलवर्णन' देण्याचा कवीचा इरादा नसून केवळ भोळ्या भाविकांमध्यें त्या स्थलाची महती वाढावी, व भक्तिभावानें त्यांनीं तेथें जाऊन दानधर्म करावा इतकाच या मोठ्या थोरल्या ग्रंथरचनेचा हेतु दिसतो. अर्थात् अशा प्रकारच्या रचनेंत 'काव्या'पेक्षां 'अर्थावर'च नजर विशेष असते. या रंगनाथाचा छंदःशास्त्रावरहि एक लहानसा प्रबंध आहे. पण यांतहि विशेष असें सांगण्यासारखें कांहीं नाहीं.

कावेरी नदीचे काठीं आणि श्रीरंगपट्टणाचे आसपास रंगनाथाप्रमाणेंच अनेक मराठी कवि होऊन गेले; व या सर्वांनीं मिळून बरेच मोठे काव्य-ग्रंथ निर्माण केले. '**दासानुदास**', '**भगवंत**', '**वैद्यनाथ**' वगैरे कवि कावेरीकांठचेच राहणारे होत. 'दासानुदासा'चें नांव '**राम**' व हा अनंताचा मुलगा. याच्या गुरूचें नांव 'केशिराज' असें याच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून दिसतें. शंकराचार्यांच्या 'ज्ञानसंन्यास' ग्रंथावर

१. कदाचित् शिवरामहि असेल, 'शिवरामनामें मुखग्रंथतंत्रें' असा उल्लेख 'ज्ञानसार' प्रकरणांत आहे.

याची एक टीका आहे. तींत हा म्हणतो—

अनंतपुत्रें निजनाम रामें । या गोतमगोत्रकुलोद्भवामें ।
या केशिराजें निजदास रंका । मुखप्रवाहीं वदवा तदा कां ॥

हा ग्रंथ यानें शके १६२६-मध्यें श्रीरंगपट्टणाजवळील होसपूर या आपल्या गांवीं रचिला. याशिवाय 'सिद्धानुभव', 'कायाजीवलग्न', 'ज्ञानामृत', 'ज्ञानसागर' वगैरे याचे बरेच ग्रंथ आहेत. भगवंत हा पट्टणाजवळील 'मुक्तातीती' गांवचा राहणारा. याच्या गुरूचें नांव 'सच्चिदानंद'. यानें 'सच्चिदानंदविलास', 'निजसुख' वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. 'वैद्यनाथ' हा शके १६००-च्या पूर्वींच होऊन गेला. याची 'अष्टवक्रा-'वर 'चिदंबरी' नांवाची टीका आहे.

तंजावर प्रांतांतल्या ग्रंथकारांसंबंधानें एकदोन गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. या मंडळींनीं अनेक वृत्तांतलें सारस्वत निर्माण केलें आहे. परंतु पवाडा आणि लावण्या या दोन्ही तऱ्हेचीं कवनें यांच्यांत लिहिलीं गेलीं नाहींत. तिकडे असणाऱ्या मराठे सरदारांच्या हालचाली असाव्या तितक्या जोराच्या नव्हत्या म्हणून, किंवा लढवय्ये शिपाई त्या प्रांतांतले कायमचे राहणारे नव्हते म्हणून, या तऱ्हेच्या काव्यांना पोषक अशी हवा तिकडे मिळाली नाहीं, आणि हीं असलीं काव्यें रचण्याची स्फूर्ति तिकडील कवींना झालेलीहि दिसत नाहीं. परंतु आणखी एका तऱ्हेचें सारस्वत तिकडे निर्माण झालेलें दिसतें. तंजावर येथील सरस्वतीमहालांत पौराणिक संविधानकांवर रचिलेलीं कांहीं नाटकें आहेत. हीं नाटकें तेथील राजे 'शाहुमहाराजे'[1] यांच्या नांवावर रचिलेलीं आहेत. तीं खरोखरच शाहुमहाराजांनीं रचिलेलीं असोत किंवा त्यांचे आश्रितांपैकीं कोणीं त्यांचे नांवावर रचिलेलीं असोत, तीं लिहिण्याचें सर्व श्रेय तंजावराकडील ग्रंथकारांसच आहे, हें उघड आहे. हीं नाटकें कांहीं विशेष चांगलीं आहेत, असें नाहीं. किंबहुना, हीं अगदींच साधारण

---

१. व्यंकोजीचा मुलगा.

आहेत. पण दोन-अडीचशें वर्षांपूर्वी इकडे नाटकें कशीं असत व नाटकाचे प्रयोग कशा तऱ्हेचे होत असत, याची कल्पना होण्यास हीं चांगलीं उपयोगी आहेत.

वास्तविक पाहतां, नाटकांचा प्रचार इकडे पुष्कळच होता. कालिदास--भवभूतीसारख्या उत्कृष्ट नाट्याचार्यांचीं नाटकेंहि सर्वभर पसरलेलीं होतीं, आणि त्यांची माहिती व ज्ञानहि महाराष्ट्रांतील विद्वानांस चांगलें होतें. असें असतां त्यांचे नमुन्यावर इकडे नाटकें कां रचिलीं गेलीं नाहींत, किंवा त्यांचीं नुसतीं भाषांतरें कां झालीं नाहींत, हें एक मोठें गूढ आहे; गद्य ग्रंथ लिहिण्याचा प्रघात फार पूर्वीपासून इकडे होता. पंधराव्या शतकापासूनचे गद्य ग्रंथहि सांपडतात. भास्कराचार्यांच्या लीलावतीचीं अनेक भाषांतरें झालेलीं आढळतात. वेदान्तविषयक गद्य ग्रंथहि गेल्या चारशें वर्षांत लिहिलेले अजून उपलब्ध होतात. असें असतां बाणभट्ट, कालिदास वगैरे कवींचे ग्रंथ मराठींत कां भाषांतरित केले जाऊं नयेत, याचा उलगडा नीटसा होत नाहीं.

रामदासस्वामींनीं तंजावर प्रांतांत जे शिष्य पाठविले त्यांत 'अनंत' हे होते, हें आपण पाहिलें. हे अनंत कांहीं कवित्व करीत असत. परंतु 'अनंत' किंवा '**अनंत कवि**' या नांवानें ज्या कवीचा आपल्याला आज चांगला परिचय आहे तो कवि या समर्थशिष्य 'अनंता'हून भिन्न पुरुष समजावा. हा 'अनंत' उर्फ 'अनंत कवि' मूळचा सातारा जिल्ह्यांतील 'मेथवड' या गांवचा राहणारा. पण पुढें यास रामदासस्वामींनीं निलंगाबादेस मठ स्थापून दिला होता व हा तेथेंच असे. हा रामदाससांप्रदायी असून विठ्ठलभक्तहि होता आणि नेहमीं पंढरीची वारी करी. याची हजार-पंधराशें कविता हल्लीं प्रसिद्ध आहे; व आणखी थोडीशी नवीन उपलब्ध झाली आहे. यानें आपल्या 'सुलोचनागहिंवर' व 'सुलोचना-आख्यान', या काव्यांचे शेवटीं अनुक्रमें १६४३ व १६४५ असे

समासिशक दिले आहेत. याच्या 'रामदासस्तुती' वरून हा रामदासाचे हयातींतच कविता करूं लागला होता, असें दिसतें. म्हणजे हा अनंत कवि जवळ-जवळ पन्नास वर्षें काव्यरचनेच्या छंदांत होता, असें होतें. यावरून आणि याच्या उपलब्ध प्रकरणांतील अनेक उल्लेखांवरून याची बरीच कविता अजून अनुपलब्ध असावी, असें वाटतें.

या 'अनंत' कवीच्या अगदीं जोडीचा असा 'आनंदतनय' हा कवि चांगला प्रसिद्ध आहे. हे दोघेहि कवि सारख्याच योग्यतेचे आहेत. या दोघांची भाषा, त्यांच्या कथानकाची निवड व या दोघांची कल्पनासरणी जवळ-जवळ अगदीं सारखी आहे. या दोघांचाहि संस्कृत व हिंदी भाषांशीं थोडाफार परिचय होता; व दोघांनाहि छंदःसाहित्याचा नाद असावा, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. हे दोघेहि कवि स्त्रियांच्या आणि मुलांच्या आवडीचे आहेत. याचें कारण असें कीं, यांनीं योजिलेलीं कथानकें सर्वांच्या चांगल्या परिचयाचीं असून यांची भाषा सरळ व कर्णमधुर आहे. अनंत कवीचें—

प्रभातकाळीं जननी यशोदा। 'उठी' म्हणे सत्वर बा मुकुंदा।
गोपाळ येती तुजला बहाती। 'गोविंद दामोदर माधवेति' ॥

हे गोपीगीताचे श्लोक सकाळच्या प्रहरीं म्हणतांना व आनंदतनयाचें सायंकाळीं कथेमध्यें 'कोण तूझ्या मनासि येतो सांग हो सीते.' हें पद हरिदासानें नीट स्वरानें म्हटलेलें ऐकून कोणाच्या मनाला चटका लागणार नाहीं!

पैल कुसुंबो दुस्तर ज्याला। पांघुरला नवरंग दुशाला।
माथां मंदिल झळकत शेला। 'बाई तो काय?' 'नव्हे'।
तोरा बहुवस पैल तुऱ्याचा। मनोहराकृति मदनवयाचा।
ज्याला पोषाख कंदर्पाचा। अभिनवकंकणहस्त जयाचा।

पद्मासनिं करिं वरून कटारी । त्याला बारिक दस्त दुनारी ।
गौरवराधिप त्या शेजारीं । दिक्करिसा नृप शोंदिल भारी ।

असें स्वयंवरास आलेल्या राजांचें, सूचक वर्णन करून सीतेला 'हा मनास येतो काय?' अशा प्रश्नास सीतेनें 'नव्हे' हें खालच्या मानेनें दिलेलें उत्तर, व मग पुढें श्रीरामचंद्राकडे पाहून

'तो ऋषिमंडळीं दिव्य धनुर्धर । मेघःशाम श्रीराम मनोहर ।'

इत्यादि श्रीरघुनाथाच्या वर्णनाच्या वेळेस मात्र कांहीं न बोलतां नुसत्या नजरेनें दिलेला कबुलीजबाब, हें थोड्या हावभावानें चांगल्या हरिदासाच्या तोंडून ऐकिल्यावर मनाला एक तऱ्हेचा विशेष आनंद होतो; व हे शब्द बराच वेळ कानांत गुणगुणत राहतात. अशीं गोड पद्यें अनंत व आनंदतनय या दोघांच्या काव्यांत आढळून येतात. या शब्दसौंदर्यामुळें कर्णेंद्रियाला तृप्ति वाटते खरी; व तेवढ्या वेळेपुरता आल्हादहि होतो खरा; परंतु कविकल्पनेनें सहृदय वाचकाच्या मनांत अनेक रस उत्पन्न करून त्याच्या चित्तास डोलवून टाकणें हा जो प्रतिभासंपन्न काव्याचा मुख्य गुण तो या दोघांच्याहि ठिकाणीं दिसून येत नाहीं; आणि म्हणूनच यांचीं काव्यें विद्यासंपन्न सहृदय वाचकापेक्षां कथेकरी हरिदासांनाच जास्त उपयोगी आहेत. किंबहुना, यांची कविता ही हरिदासांची एक अन्नदात्री कामधेनु आहे. तिच्या गोड रसावर त्यांची उपजीविका चांगली चालते. जीवनकलहामध्यें व संसाराच्या यातायातीमध्यें सारा दिवस त्रासून गेल्यावर रात्रीं विश्रांतीच्या वेळीं आनंद देणारी व घटकाभर परमेश्वराच्या लीलांकडे मन ओढणारी अशी या दोघांचीहि कृति महाराष्ट्रियांना अनेक दृष्टींनीं फार उपयोगी आहे.

या दोन्ही कवींमध्यें पुष्कळ साम्य आहे, हें वर म्हटलेंच आहे. जसे गुण तसे अवगुणहि या दोघांच्या रचनेंत सारखेच दिसतात. दोघांतहि शब्दांची ओढाताण, अनुप्रासाची आवड व त्यामुळें येणारी दुर्बोधता हे दोषहि सारखेच आढळतात. पण 'अनंत' व 'आनंदतनय' या दोघांमध्येंच डावेंउजवें पाहिलें तर अनंतापेक्षां आनंदतनय हाच थोडा

श्रेष्ठ आहे. याच्या काव्यांत एक तऱ्हेची चटक आहे; व त्यांत अनुप्रासांची गर्दी बरीच असून यमकेंहि चांगलीं साधलीं आहेत. यामुळेंच 'शोभवी कवन फार यमकांहीं' असें याजबद्दल मोरोपंतांनीं म्हटलें आहे. आनंदतनयाचा

" पाया नमीं देइन वंश सारा । पा यां नमी दे इनवंश सारा ।
न या वया माजि भला जनां दे । न यावया मा जिभ लाज नांदे ।।

हा श्लोक प्रसिद्धच आहे. तसाच

ते पद्माकर, ते सुगंध बरवे, ते बोध, ते वाहिनी ।
ते वल्लिद्रुम, ती प्रफुल्ल कुसुमें ते भा जगन्मोहिनी ।
ते गानध्वनि, ती मनोज्ञ मुरली, ते गोप, तीं गोधनें ।
तें वृंदावन, तो मुकुंद नमिला, साष्टांग संबोधनें ।।

हा याच्या 'राधाविलासां'तला श्लोक चांगला आटोपसर असा आहे. याची एकंदर रचनाघाटणी अशाच प्रकारची आहे. हल्लीं याचीं सुमारें एक हजार पद्यें उपलब्ध आहेत; व त्यांपैकीं बहुतेक सर्व पौराणिक कथानकांवर रचिलेलीं आहेतें.

मराठेशाहीच्या कल्पनेचा मूळ उत्पादक जो शहाजी त्यास त्याच्या मुलाच्या कर्तृत्वासाठीं कैद करण्याकरितां विजापूरच्या बादशहानें 'वेदोभास्कर' या नांवाच्या पुरुषाची योजना केली होती; व या कामगिरीबद्दल पुढें त्यास अरणी हा गांव इनाम करून दिला. तेव्हां त्याचेबरोबर जे मराठे लोक अरणीस गेले त्यांतच या आनंदतनयाचा बाप आनंदराव हा होता. या आनंदरावाचा मुलगा **'गोपाळराव'**. हाच काव्यांत आपलें नांव आनंदतनय किंवा आनंदनंदन असें लिही. याच्या गुरूचें नांव मुरारपंत ऊर्फ मुरार परब्रह्म असें लिहिलेलें आढळतें. पण तंजावर प्रांतांतले लोक याला याच्या वडिलांनींच

---

१. आनदतनयाच्या पदांच्या एका बाडांत एक महेशाचें पद आहे. त्याचा प्रारंभ 'सजणी ग माझे मनिचे निजगुज हें ऐका बाई' असा असून शेवट न मनीं मग देव नरा मी म्हणते आनंदसुताची आई' असा आहे.

गुरूपदेश दिला होता, असें सांगतात. याचें गोत्र भारद्वाज व शाखा आश्वलायन. हा आपल्या 'पूतनावध' काव्यांत आपणास 'अरणिचा शिपाई' असें म्हणवितो. पण कोणत्याहि लढाईत हा जातीनें हजर असल्याची माहिती उपलब्ध नाहीं. तथापि या उल्लेखावरून आनंदतनयाला शिपाईपेशाची मनापासून हौस असावी, असें दिसतें. कदाचित्

'कंगाल हे ब्राह्मण आरणीचे। परंतु ते शूर रणांगणीचे।'

या अरणीकरांच्या एकंदर वर्णनावरूनच हे शब्द आनंदतनयानें आपणाबद्दल योजिले असतील. असें सांगतात कीं, आनंदतनयाच्या मुलास रघुनाथपंडिताची मुलगी दिली होती. म्हणजे हे दोघे महाराष्ट्र-कवि व्याही-व्याही झाले. या व्याह्यांपैकीं एकाची काव्यरचना पाहून दुसऱ्यास काव्य करण्याची स्फूर्ति झाली, असें म्हणतात. आनंदतनयाची कृति पाहून पंडितांना स्फूर्ति झाली असेल, हें फारसें संभवनीय वाटत नाहीं; आणि रघुनाथ पंडिताच्या काव्यावरून आनंदतनयानें आपली नक्कल उतरली असेल तर नकलेंत मुळांतलें सौरस्य मुळींच उतरलें नाहीं, असें म्हणावें लागतें.[२] हें कसेंहि असो; पण हे दोघे व्याही असल्यामुळें यांनीं एकमेकांचीं काव्यें पाहिलीं असतील, हें संभवनीय आहे. या दोघांच्या काव्यांत कांहीं दोनचार पद्यें मात्र सारखीं-सारखीं दिसतात. बाकी कोणतेंहि साम्य फारसें नजरेस येत नाहीं.

---

१. आनंदतनयाचा निधनकाल शके १६४५ असा भक्तमंजरींत दिला आहे. त्यांत याचें गोत्र शांडिल्य व उपनांव देशपांडे असें चुकीनें म्हटलें आहे. आनंदतनयास 'शंकर' नांवाचा मुलगा होता, असें म्हणतात. शके १८२५-मध्यें मी तंजावरास गेलों असतां तेथें आनंदतनयाचे वंशांतले एक पुरुष हयात होते. आतां असें कळतें कीं तेहि निवर्तले; व आतां आनंदतनयाच्या वंशांत कोणी वंशज राहिला नाहीं.

२. काव्यसंग्रहकार म्हणतात, 'आनंदतनयांनीं सीतास्वयंवर ग्रंथ केला, हें पाहून पंडितांनीं नलदमयंतीस्वयंवराख्यान केलें. परंतु त्यांत सीता-स्वयंवराइतका रस उतरला नाहीं' (अ. क. कविता, भाग १, पृ. ६).

आनंदतनयापेक्षां त्याचा व्याही जो **रघुनाथ पंडित** तो फार श्रेष्ठ दर्जाचा कवि आहे. याची रचना व याचें कल्पनाचातुर्य फारच अप्रतिम आहे. अगदीं आरंभापासून तों अखेरपर्यंत रघुनाथ पंडितानें आपलें नलदमयंतीस्वयंवराख्यान संस्कृत काव्यशास्त्राच्या नियमांस धरून थेट पंचमहाकाव्यांच्या थाटावर रचिलें आहे[1]. याची रचना ठाकठिकीची असून यांतला मुग्ध शृंगार फार बहारीचा उतरला आहे. प्रसिद्ध ग्रीक कवयित्री साफो हिच्या एकाच चुटक्यावर तिची कीर्ति जशी अजरामर झाली, तशी एका 'नलदमयंती'-आख्यानावर पंडितांची कीर्ति आजपर्यंत अबाधित राहिली आहे व पुढेंहि कैक काळपर्यंत ती तशीच राहील, हें उघड दिसत आहे.

> लोकीं सौरभकाव्यनाटककलालंकारचूडामणी ।
> सर्वां नैषध-विद्वदौषध असे विख्यात वाग्धोरणी ।
> हे त्याचीच टिका टिकोनि घटिका ऐकेल जो आदरें ।
> बोले त्या रघुनाथपंडित कवी भेटे हरि सादरें ॥

कित्येकांच्या मतानें तर हें काव्य सर्व मराठी काव्यग्रंथांत पहिल्या प्रतीचें उतरलें आहे; व सर्व मराठी कवींत हा कवि अग्रगण्य गणण्याजोगा श्रेष्ठ आहे. आतां हा अभिप्राय सर्वांनाच बरोबर पटेल, असें नाहीं. पण इतकें खरें कीं, रघुनाथ पंडिताच्या रचनेची पायरी पुष्कळ वरच्या दर्जाची आहे. सहज स्फूर्तीनें मन उचंबळून जावें आणि तोंडांत शब्द येऊन काव्य रचीत जावें, अशी रचना पंडितांची नाहीं. यांच्या सरस्वती देवीची मूर्ति स्वयंभू नसून ती फार परिश्रमानें, विशेष काळजीपूर्वक, चातुर्यसर्वस्व खर्चून, बिलकुल कसर न करतां, कुशल कारागिरीनें घडविलेली अशी आहे. पदलालित्य, वचनमाधुर्य, उपमाचातुर्य इत्यादि अलंकारांनीं यांनीं आपल्या देवीस

---

१. हें काव्य श्रीहर्षाच्या नैषधकाव्याधारें मीं लिहिलें, असें यांत पंडित शेवटीं सांगतात.

फारच उत्कृष्ट नटविलें आहे. हिचें नयनमनोहर असें हृदयंगम रूप पाहून वाचकाच्या मनाला आनंदाचा उमाळा येतो, हें कोणाच्याहि अनुभवास येईल. उत्तम पटवेकऱ्यानें मोत्यांचे दाणे निवडावे व मग सर ओवून त्यांचा जसा उंची दागिना पटवावा, त्याप्रमाणेंच एकेका शब्दाची निवड करून यांनीं आपले श्लोक जडले आहेत. यांच्या एकेका श्लोकाची किंमत एकेका पैद्दार खड्याबरोबर आहे. उत्तम पाणीदार हिऱ्याचें तेज यांच्या श्लोकांत आहे. पण ताज्या खुडलेल्या फुलांची किंवा फळांची बहार त्यांच्यांत नाहीं. यांच्या कृतीनें मनाला आनंद होतो पण मन भरून येत नाहीं; तें उचंबळून उडया घेऊं लागत नाहीं.

ज्याच्या मनाला कवित्वाचा ओलावा आहे. अशा विद्वानानें मेहनत घेऊन एखादें काव्य रचिलें असतां तें कोणासहि आवडेल, यांत संशय नाहीं. पण मनाला काव्य आवडणें निराळें, आणि काव्यानें मन वेडावून जाणें निराळें. दुसऱ्याची कृति मनाच्या डोळ्यापुढें कायम ठेवून त्या कित्यावरून हातानें काव्य लिहिणारा कवि लोकांचीं मनें वेडावून टाकण्यासारखें काव्य बहुशः निपजवूं शकणार नाहीं. खरें उत्तम काव्य म्हटलें म्हणजे असें असावें कीं, त्यानें वाचकाच्या मनाला वेड लावावें. या वेडाचें एक कारण असें असतें कीं, तें काव्य रचणारा कवि वाचकाच्या मनांत वेळोवेळीं येणाऱ्या अस्पष्ट कल्पनांना व विचारांना शब्दांत बांधून टाकितो; आणि त्यांना एक तऱ्हेचें मूर्त स्वरूप देऊन त्यापासून होणारें सुख वाटेल तेव्हां अनुभवितां यावें, अशी तो सोय करून ठेवितो, व आयुष्यांत क्षणभर उद्भवणाऱ्या काल्पनिक विचारांची व विकारांची प्रत्यक्ष पाहिजे तितका वेळ अनुभविण्यास सांपडेल अशी सृष्टि तो निर्माण करितो; आणि मग आपल्या कल्पनांची त्यांत आणखी भर घालून त्या सृष्टीला नवें रूप देतो व वाचकाला पूर्वीं कधींहि न अनुभविलेलें सुख अनुभववूं लावतो.

रघुनाथ पंडिताच्या काव्यांत असल्या प्रकारची करामत आढळून येत

नाहीं हें खरें; तरीदेखील तो विद्वान् व निष्णात असल्यामुळें त्यानें अनेक चित्रें फारच स्वाभाविक व सुंदर काढिलीं आहेत. आधीं नल-दमयंतीचें आख्यान हें फार सरस आहे आणि तें आज हजारों वर्षें महाराष्ट्राच्या मनाला आनंद व विसावा देत आहे. पांडव आपल्या वनवासाचा दुःखमय काळ कंठीत असतां बृहदश्व ऋषि त्यांच्या भेटीस गेले. त्या वेळीं धर्मराजानें आपल्या दुःखाची कहाणी त्यांच्याजवळ गाऊन, 'माझ्याइतका कष्टी प्राणी तुमच्या पाहण्यांत कधीं आला आहे काय ? असले कावाडकष्ट तुमच्या ऐकण्यांत तरी कधीं कोणीं काढिलेले आहेत काय ?' असा त्यांस प्रश्न केला. याप्रमाणें त्या सत्त्वशील राजाचें मन दुःखसागरांत बुडूं लागलेलें पाहून त्याला आधार व्हावा, म्हणून ही नळराजाची कथा बृहदश्व ऋषींनीं त्यास सांगितली. या करुणरसप्रधान कथानकांतला पहिला नलदमयंतीच्या विवाहाचाच तेवढा गोड भाग घेऊन त्यावर हें काव्य पंडितांनीं रचिलें आहे. हें कथानक भारत-काळींहि अगदीं जुनें वाटलें जाण्याइतकें तें प्राचीन आहे. त्यांत विष्णु, शंकर, गणपति वगैरे देवांचाहि उल्लेख नसून इंद्र, वरुण, अग्नि वगैरे देवांचा उल्लेख आहे व तेच स्वयंवराला आले आहेत. इतक्या प्राचीन कथानकांतल्या कल्पना महाराष्ट्रीयांच्या अगदीं आवडत्या असाव्या, हें साहजिकच आहे; आणि हा कथाभाग सांगतांना रघुनाथ पंडितानें स्वभाववर्णन फार मार्मिकपणानें केलें आहे. यामुळें या काव्याला विशेषच गोडी आली आहे.

रघुनाथ पंडिताच्या गजेंद्रमोक्षांत, अनेक वर्षें गजराजाबरोबर क्रीडा करणारे 'सखे माये भाचे चुलत-पुतणे आणि चुलते' असले दूरचे आणि जवळचे सर्व आप्तेष्टमित्र 'विषम समय येतांच' क्षणांत निघून गेलेले पाहून त्या गजेंद्रानें काढिलेले उद्गार, आणि स्वयंवरांत 'उपवन-जलक्रीडा' करण्यासाठीं जमलेले शाळूसोबती, त्यांतला एक हंस नळराजानें पकडतांच सर्व 'वेगळाले पळाले', हें पाहून त्या पकडलेल्या हंसाचे 'कठिण समय येतां कोण कामास येतो!' हे उद्गार किती

नित्यांतल्या परिचयाचे आहेत ! या जगाच्या रहाटींत याचा कठीण अनुभव कोणाला येत नाहीं ! पैशाचा जरा चाळ आहे तोपर्यंत जिवा-पेक्षांहि जास्त म्हणविणारे इष्टमित्र, पैशाचा हात जसा आखडतांच किंवा तो आखडेल असें वाटतांच कसे दूर होतात व दुष्मन बनतात, याचा प्रत्यय कोणाला नाहीं !

तसेंच, जमलेले सखे-सोयरे दूर उडाल्यावर हातीं सांपडलेला हंस, आपल्या सोडवणुकीसाठीं नल राजाच्या अनेक विनवण्या करितो, हाहि प्रसंग चांगला साधिला आहे. प्रथम तो पक्षी राजाला आपल्या बरोबरीच्याशीं सामना करून थोरपणा मिळव, मला पांखराला धरण्यांत काय भूषण ! असें म्हणून त्याला चढवूं पाहतो. तें नीट जमेना तेव्हां आपली म्हातारी आई आणि लहान-लहान 'सात दिसांचीं पिलें' यांची दीन दशा सांगून त्याची करुणा भाकतो. यांतहि, स्त्रीला पुढेंमागें मुलांचा आधार होईल व विरंगुळा पडेल, पण म्हतारीला माझ्यावांचून कांहींच आधार नाहीं आणि तिचें काळीज पोळून जाऊन ती मरेलहि, असें सांगतो. पण या अशा दैन्याच्या कहाणीनें राजा थोडाच वळणार ! गरीब प्राण्यांच्या दुःखाचें त्याला काय ! राजाच्या मनाला दयेचा पाझर मुळींच येत नाहीं, असें पाहून पक्षी म्हणतो, 'राजा, तुझ्या सदयतेची व मोठेपणाची कीर्ति ऐकून व त्यावर विश्वसून मी येथें सहज क्रीडा करावयास आलों; आणि या अशा

'मजहि वध कराया घातकी पातला जो ।
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ! ॥'

हे मर्मभेदक शब्द बोलतो. या उघड तिरस्काराचा पण आंतून भरलेल्या ओतप्रोत स्तुतीचा बरोबर परिणाम होऊन राजहंसाचा कार्यभाग सहज साधतो, हेंहि चित्र स्वाभाविक आणि खुबी-दार आहे.

तो सुंदर राजहंस पाहून त्याला धरूं इच्छिणारी दमयंती बरोबर 'सखींचा मेळ' असतां त्यांस युक्तीनें दूर ठेविते, अल्लड स्वभावानें

त्यांचेवर रागावते; हेंहि वर्णन अगदीं स्वाभाविक आहे. दमयंतीचें रूप, तिचें पदर सावरून सुटसुटीत होणें, तिला दूर नेण्याकरितां त्या पांखराच्या युक्त्या, हे सर्व प्रसंग लहानापासून मोठ्या-पर्यंत सर्वांना आवडतील असेच आहेत. इंद्राचा दूत म्हणून परोपरीची शोभा पाहत तो

... ... । राजा जाय अंतःपुरीं ।
तेथें देखिली सुंदरी । कामसोमपौणिमा ॥
सुमनसेजेच्या पलंगीं । सखि बैसलीसे तन्वंगी ।
सख्या खेळताति संगीं । बहु अप्सरा त्या जैशा ॥

आणि मग

प्रगट तिज पुढारां जाहला राजमौळी ।
पदर वरि न घेतां हार जैसा झळाळी ।
निजहृदयनिवासी काय बाहीर आला ।
निरखुनि दमयंती नेंवि मानी तयाला ॥

तेव्हां

गजबजोनि समस्त तिच्या सख्या । गजगमा उठल्या तिजसारख्या ।
पदर सांवरितां नृपबाळिका । झळकती हृदयीं मणिमाळिका ॥

हें सर्व वर्णन गोड आहे. थोरांच्या मुलींना शोभेल असा साधा स्वभाव, बाळपणाला योग्य असें वर्तन आणि कोणालाहि कौतुक वाटेल असले शब्द, यांच्यायोगानें पंडितांची ही दमयंती फारच शोभते. स्त्रीजातीच्या नाजूकपणाला गैरवाजवी असें उच्छृंखळ वर्तन पंडितांच्या दमयंतीला ठाऊकदेखील नाहीं. अगदीं स्वयंवराच्या वेळींदेखील सभेंत आलेले राजराजेश्वर शारदेनें दमयंतीला दाखविले आणि

मना येईल तयाला । माळ गळां घाली तूं' ।

असें सांगितलें.

तेव्हां दमयंती सुंदरी । इंद्रादिकां नमस्कारी ।
तयां बोलली उत्तरीं । अमृतापरिस मधुर ॥

'माझा भीम जैसा पिता । तैसे तुह्मी जी तत्वतां ।
करा कन्यादान आतां । नळनाथाचे करीं ॥'

या उत्तरांत केवढा विनय भरला आहे! आणि हे शब्द कसे कोमल व मधुर लागतात! वर दिलेली पद्यें हीं रघुनाथपंडिताच्या काव्यांतली अगदीं साधीं पद्यें आहेत. पण यांची घडण किती मनोहर आहे! यांत विशेष असें कांहीं नाहीं. पण यांत काव्यसर्वस्व आहे, याची साक्ष प्रत्येकाचें मन देईल. रघुनाथपंडितासंबंधानें

म्हातारा बहु जाहलों, कवण ही त्राता नसे भेटला ।
भाताची तजवीज तेच उदरीं भाता गमे पेटला ।
हातामाजि नसेच येक कवडी हा ताप आतां हरी ।
दातारा मज वाचवी सदय हो माता पिता तूं हरी ॥

हा श्लोक तंजावर प्रांतांत प्रसिद्ध आहे. यावरून लक्ष्मीसरस्वतींचें अखंड हाडवैर असतें म्हणतात, तें खरें दिसतें; आणि महाराष्ट्र-भाषेतलें एक अप्रतिम काव्य निर्माण करणारा रघुनाथ पंडित आपल्या म्हातारपणीं अन्नाला महाग व्हावा, एका कवडीचीहि माया त्याच्याजवळ नसावी, हें पाहून वाईट वाटतें व मन खंती होतें. नलदमयंतीस्वयंवराशिवाय रघुनाथ पंडिताचीं 'रामदासवर्णन' व 'गजेंद्रमोक्ष' अशीं आणखीं दोन प्रकरणें आहेत. स्वयंवरांतले कांहीं श्लोक जसेच्या तसेच 'मोक्षांत' आले आहेत. शब्द तर पुष्कळच आढळतील, म्हणजे पाहिजे तितका शब्दांचा व कल्पनांचा पुरवठा कवीजवळ नव्हता, असें होतें.

रघुनाथ पंडिताचा समकालीन व ग्रामस्थ **गोसावीनंदन** हा होय.[1] याच्या आईचें नांव नागाई व बापाचें नांव गोस्वामी. याचा 'ज्ञानमोदक' हा ग्रंथ प्रसिद्ध असून शिवाय यानें 'सीतास्वयंवर' हें

---

१. याचें नांव 'वासुदेव' होतें असें पुढील श्लोकाच्या चवथ्या चरणावरून समजतात--

नेत्रीं दोन हिरे प्रकाश पसरे अत्यंत ते साजिरे ।
माथा शेंदूर पाझरे वरि बरे दुर्वांकुराचे तुरे ।

[पान ५३१ पहा.]

प्रकरण रचिलें आहे. याचीं अष्टकें, पदें व आरत्याहि पुष्कळ प्रसिद्ध आहेत. याचीं स्तोत्रें व अष्टकें लहान मुलांना शिकविण्यासारखीं साधीं व गोंडस आहेत. मोठ्या रचनेपेक्षां लहान लहान चुटक्यांतच गोसावीनंदनाची वाणी चांगली खुलते. गोसावीनंदनाचे अभंग फारसे प्रसिद्ध नाहींत. ह्याकरितां त्याचा एक अभंग देतों.

भगवंताचे भक्त भोळे। त्यांचे पायीं ज्ञान लोळे ॥
भक्तिवांचून ब्रह्मज्ञान। तितुकें अवघें व्यर्थ जाण ॥
नाहीं जया चित्तशुद्धी। काय तयाची व्युत्पत्ती ॥
म्हणे गोसावीनंदन। नाहीं भक्तासी बंधन ॥

वर सांगितलेल्या या तंजावर प्रांतांतल्या कवींत एक गोष्ट विशेषपणें नजरेस पडते, ती अशी कीं, यांपैकीं कोणाच्याहि काव्यांत अश्लीलपणा तर राहोच, पण फाजील श्रृंगारहि नजरेस पडत नाहीं. यांचीं काव्यें माजघरांत बसून खुशालपणें चारचौघांत मोठ्यानें वाचावीं अशीच आहेत. बाकी अगदीं सोवळेपणा मुद्दाम राखणें हा कांहीं काव्यांतला मोठासा गुण आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कवीचें काव्य हा कांहीं 'मुलाना उपदेश' नव्हे, कीं ही भिक्षुक–पुराणिकाची नीतिकथा नव्हे. काव्य हें त्रासलेल्या मनाला आनंद देणारें, उदासीन झालेल्या चित्ताला खुलवून टाकणारें, आणि कोमेजलेल्यांना टवटवी आणणारें अमृत आहे.

---

[पान ५३०-वरून]

माझें चित्त विरे मनोरथ पुरे देखोनि चिंता हरे।
गोसावीसुत वासुदेवकवि रे त्या मोरयाला स्मरे ॥

या श्लोकांतील वासुदेव या शब्दावरून वरील अनुमान कोणी काढितात. पण याखेरीज असें म्हणण्यास दुसरा आधार नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं हा श्लोक गोसावीनंदनाचा नसून, पेण, जि. कुलाबा येथील एका हरिदासाच्या पूर्वजानें, रचिलेला आहे असें कल्याण येथील रा. दिवेकर हे सांगतात. गोसावीनंदनाच्या गुरूचें नांव 'निरंजन' असावें. एका पदाचे शेवटीं 'गोसावीनंदन नाथनिरंजन गुरूके बडे प्यारे' असें आहे.



# शाहू महाराजांच्या वेळचे कांहीं कवि

श्रीमंत सरकार शाहूमहाराज यांचे वेळीं महाराष्ट्रांत जे कवि होऊन गेले त्या सर्वांत **कचेश्वर** व **निरंजनमाधव**, हे विशेष प्रसिद्ध आहेत. कचेश्वर हा चाकणचा राहणारा. याचें उपनांव ब्रह्मे. याचें गोत्र काश्यप. याच्या बापाचें नांव सिद्धेश्वर. याची पितृपरंपरा त्र्यंबक खेडकर—शंकर—मेंगनाथ—सिद्धेश्वर अशी आढळते. त्र्यंबक भट हा शके १५५५-त तुळापूर येथें मुरार जगदेवानें सोमवती अमावास्येस ग्रहणसमयीं केलेल्या तुलादानप्रसंगीं हयात होता. त्याचा नातू मेंगनाथ याजकडे शिवाजी महाराजांकडील 'ब्रह्मत्वाचा' अधिकार होता; व त्यास शहाजी राजे यांचे वेळेपासून १०० होनांचें वर्षासन चालू होतें. हे सर्व पुरुष वेदाध्यायन केलेले असून कर्मठ होते. परंतु कचेश्वराची लहानपणची वृत्ति थोडी निराळ्या तऱ्हेची होती. याला स्नानसंध्येचा कंटाळा असे; आणि इतरांची उद्धटपणानें टवाळी करण्याची त्यास हौस वाटे. ही हूडपणाची बालिशवृत्ति हा चांगला वयांत येईपर्यंत अशीच होती. पुढें 'प्रपंचाच्या योगें' हा जुन्नरास गेला असतां तेथें एका सत्पुरुषाच्या प्रसादानें व उपदेशानें कचेश्वराची ही वृत्ति पालटून तो निवळत चालला. या सत्पुरुषाचा

ऐसा उपदेश । पडतांची कानीं । होतें जें जें मनीं । तें तें गेलें ॥
चित्ता दृढ आलें । गीता ही पढावी । आनदें पहावी । नित्य टीका ॥

असें कचेश्वर आपल्या आत्मचरित्रांत लिहितो.[1]

---

१. यापुढें कचेश्वर विजापुरास गेला असतां कचेश्वराला गीता वाचण्याचा बराच छंद लागला. कदाचित् एखादे वेळीं गीता न वाचिली तर एक चमत्कार होत असे. तो असा—

जरि प्रभातेसी । न म्हणतां गीता । पाषाण तत्वतां । ताडूं पाहे ॥
कोणी एक नर । दिव्य दिगंबर । हाणाया प्रस्तर । पाहे वेगीं ॥

(कचेश्वर आ. च.)

यानंतर कचेश्वराला कांहीं विपबाधा झाली; व त्यामुळें शरीर क्षीण होऊन फार क्लेश झाले. नित्य त्रास होई व झोप मुळींच लागत नसे. या संकटाला त्रासून तो हरिभजनीं लागला; आणि त्याला कथाकीर्तनें ऐकण्याची व स्वतः करण्याची आवड उत्पन्न झाली. यामुळें तो खेड येथें गेला. या ठिकाणीं तुकाराम महाराजांचा एक टाळकरी अंबाजी (लोहगांवकर?) हा राहत असे. त्याचे कीर्तनास हा जाऊं लागला; व अंबाजीजवळ तुकोबाच्या अभंगाच्या वह्या होत्या त्यांचाहि यानें अभ्यास केला. असें चालत असतां एके दिवशीं तुकारामानें कचेश्वराच्या स्वप्नांत येऊन डोक्यावर हात ठेविला व उपदेश दिला. तुकोबाचा असा दृष्टांत झाल्यावर कचेश्वरहि भजन आणि कीर्तन करूं लागला. याला विपाची व्यथा झाली होती तीहि पार निघून गेली; आणि मनाला नामसंकीर्तनाचा चाळा जास्त जास्त लागत चालला. हा 'लौकिकाची लाज सोडून' सारा वेळ भजन करीत नाचूं लागला. तेव्हां याला कांहीं भूतबाधा झाली असावी, असें लोक म्हणूं लागले.[1] मुलाचे हे चाळे पाहून त्याच्या कर्मठ बापाला फार वाईट वाटलें व या दुःखानें त्याचें मन कष्टी झालें.

बोलति कष्टोनि । क्रोधें तीर्थरूप । 'कैसा पापरूप । पोटा आला !॥
यासि पढविलें । सर्व शिकविलें । वृथा वाया गेलें । काय करूं ? ॥
कष्टाचें सार्थक । माझ्या झालें नाहीं ।.........'

गांवांतील इतर ब्राह्मणांनींहि कचेश्वराचा फार निषेध केला व त्याला नीट ताळ्यावर आणण्यासाठीं अनेक उपायहि केले. परंतु कचेश्वराच्या बुद्धींत फरक न पडतां तो तसेंच वर्तूं लागला. हळूहळू कचेश्वराचा नांवलौकिक वाढत जाऊन लोकांत त्याची साधुपुरुषांत गणना होऊं लागली. यानें विहिरी खणल्या, देवळें बांधिलीं व स्वतः अग्निहोत्रही

१. कचेश्वराच्या पहिल्या गुरूचें नांव कृष्णभट व यानें त्याला त्याच्या ह्या कृत्यांबद्दल बायकोसुद्धां घराबाहेर घालविलें, असें भक्तमंजरींत राजाराम प्रासादी लिहितात.

घेतलें; आणि हा कवित्वरचनाहि करूं लागला. यानें शके १६०७-त पाऊस पाडिला याबद्दल त्याला चाकण परगण्यापैकीं दर गांवांतून टका १ व धान्य १ मण मिळत असे. हळूहळू याचा शिष्यसमुदायहि वाढत गेला; व प्रत्यक्ष शाहूमहाराजांनींहि याची शिष्यवृत्ति संपादिली. शाहूमहाराजांनीं स्वतःच कचेश्वराचें शिष्यत्व पत्करिल्यामुळें त्यांचे सरदार व प्रधान आणि मंत्रीहि कचेश्वराच्या चरणीं सहजच लागले. या सर्व मंडळींत, मराठी राज्याचा समूळ उपटून कोसळलेला वृक्ष, महाराष्ट्रांत पुन्हां आणून मोठ्या युक्तीनें तो रुजविणाऱ्या बाळाजी विश्वनाथाविषयीं कचेश्वराच्या ठिकाणीं प्रेम व आदर विशेष होता, असें दिसतें. बाळाजी विश्वनाथ उर्फ बाळाजीपंत नानाला कचेश्वर आपल्या पत्रांत 'श्रीमत् भगवद्भजनपरायण सद्‌गुणाधिष्ठान विवेकसागर राजमान विराजित नाना स्वामी गोसावी' असा मायना योजून पुढें 'अपत्यें कचेश्वरें नमस्कार विशेष', असें लिही[1].

कचेश्वर हा शके १६५२ मध्यें कृष्णातीरीं उंब्रज येथें फाल्गुन शु. द्वितियेस मृत्यु पावला. याचे वंशज हल्लीं खेड तालुक्यांत खेडवाकी, चांडोली व साताऱ्याकडे अतीत या गांवीं आहेत. ते राजगुरू या आडनांवानें प्रसिद्ध आहेत. कचेश्वरसुत देवराम याचीहि थोडी बहुत कृति प्रसिद्ध आहे. कचेश्वराची पदें व इतर अनेक तऱ्हेची रचना त्याच्या परंपरेंतील लोकांकडे आहे. परंतु याचीं 'सुदामचरित्र' व 'गजेंद्रमोक्ष' हीं दोनच आख्यानें छापून प्रसिद्ध झालेलीं आहेत. या दोहींतली रचना अनेक वृत्तात्मक श्लोकबद्ध अशी आहे. कचेश्वराचे सर्वच वृत्तांतले श्लोक चांगले असतात, असें नाहीं. परंतु साधारणपणें

---

१. पुष्कळ वेळां हे मायने केवळ औपचारिक असतात. यांचा शब्दार्थ घेणें हें चूक असतें. परतु कचेश्वर हा विरक्त, साधु, तशांत शाहू महाराजांचा राजगुरु, त्याच्या राणीवशात व सरदारांतदेखील याचें शिष्यत्व, असें असतां बाळाजीपंत नानाला यानें अशा प्रकारें लिहावे, हें जरा विशेष दिसतें; व यावरून वरील अनुमान बांधणें साहजिक होतें.

चामर, सवाई वगैरे वृत्तांतले याचे श्लोक जरा विशेष बरे असतात; व वाचकांना आणि श्रोत्यांनाहि ते गोड लागतात. किंबहुना, यामुळेंच याचीं हीं आख्यानें बायकांच्या म्हणण्यांत वारंवार येतात.

या चामर, पंचचामर, सवाई, अश्वधाटी वगैरे वृत्तांत एक असा गुण आहे कीं, त्यांत एक तऱ्हेचा ठेका ते वाचतांना सहज येतो. म्हणजे यांत अर्थाबरोबरच शब्दचमत्कारहि आपोआप साधिला जातो; आणि यामुळें हे श्लोक वाचकाच्या व श्रोत्याच्या मनाप्रमाणेंच त्याच्या शरिरालाहि आनंद देतात. यांत एक तऱ्हेचें कर्णद्वारें अनुभवितां येणारें असें शारीरिक सुख आहे. कडाका छंदांतल्या पद्यांत तर हें विशेषच असतें. किंबहुना, हा ठेका हेंच कडाका छंदाचें वैशिष्ट्य आहे.

कचेश्वराच्या रचनेचा एक विशेष असा आहे कीं, त्याचे आख्यानांत अगदीं साध्या घराऊ शब्दांची योजना केलेली असते; व त्याचे दृष्टांत आणि दाखले हेहि लोकांच्या नेहमींच्या प्रचारांतलेच असतात. यामुळें याची रचना समजण्यास सर्वांस सोपी जाते. गजेंद्रमोक्ष व सुदामचरित्र या दोहींचीं कथानकें अत्यंत लोकप्रिय असल्यामुळें व कचेश्वरानें तीं साध्या शब्दांत सांगितलीं असल्यामुळें हीं फार प्रसिद्ध आहेत.

या दोहोंशिवाय 'द्रौपदीवस्त्रहरणा'वरील याचें एक कथानक छापिलेलें आहे, असा पुष्कळांचा समज आहे. द्रौपदीस्वयंवरावरील हें कथानक 'महाराष्ट्रकवि' व 'काव्यसंग्रह' या दोन्ही मासिकांत छापिलें आहे. काव्यसंग्रहकारांनीं हें विठ्ठलाच्या काव्यांत विठ्ठलाचें म्हणून छापिलें आहे; आणि यांतील श्लोकांच्या धाटणीवरून व शब्दांवरून हें आख्यान विठ्ठलाचें नसून या कचेश्वराचें असावें असा कांहीं चरित्रकारांचा समज झाला आहे. परंतु हें या दोघांपैकीं कोणाचेंहि नसून तें अगदींच एका निराळ्या कवीचें आहे. या 'द्रौपदीवस्त्रहरणा'च्या कर्त्याचें नांव '**रामसुतात्मज**'. या 'राम-

सुतात्मज' कवीची रचना जवळ जवळ कचेश्वराच्या रचनेसारखीच आहे; आणि हे दोघेहि कवि कांहींसे समकालीनच होते. रामसुतात्मजानें आपल्या या प्रकरणाच्या रचनेचा काल

जै तो शक 'वेदफणींद्रतिथी' ऋषि आतमज तो 'परिधावि' असे।
वर्षा ऋतु श्रावण शुद्ध बिजे भृगुवार मघा उडु पूर्ण वसे ॥

असा म्हणजे शके १५९४ परिधावी संवत्सर श्रावण शुद्ध द्वितीया हा दिला आहे. या काव्यांत कवि आपणास 'रामसुतात्मज दास नवा' असें म्हणतो. यावरून हा या काळीं नवीनच देवी सरस्वतीची सेवा करूं लागला होता असें दिसतें. याचें गोपीचंदाख्यान या नांवाचें आणखीहि एक प्रकरण उपलब्ध असून यानें याशिवाय 'बहुविध रचना' केली असल्याचा उल्लेख आढळतो. द्रौपदीवस्त्रहरण हें प्रसिद्ध आहे. गोपीचंदाख्यान हें अनेक वृत्तात्मक आहे, इतकेंच नव्हे, तर तें अनेक भाषात्मक आहे. याचे एकंदर सहा सर्ग आहेत. यांत प्रत्येक सर्गांत मराठी व व्रज अशी सरमिसळीची रचना आहे.

या दोन्ही ग्रंथांत कवीनें आपली थोडीशी माहिती सांगितलेली आहे. त्यावरून असें दिसतें कीं, या कवीचें नांव 'मुळोजी' व याच्या मातापितरांचीं नांवें अनुक्रमें यशोदा व विनायक. याच्या आजाचें नांव 'रामचंद्र' हें उघडच आहे. हा नाथपंथी असून याच्या गुरूचें नांव विश्वंभरनाथ. हा ऋग्वेदी, त्रिप्रवरी, देशस्थ ब्राह्मण असावा.

या 'रामसुतात्मजा'प्रमाणेंच मिश्र रचना '**वस्वलिंग**'हि करितो. वस्वलिंगाचा कालहि शके १६००-च्या आसपासच असावा. याची

---

१ ऋग्वेद वसुपुरि ग्राम तळी अभिधान '**मुळाजी**' नाम असे ।।'
असें गोपीचंदाख्यानांत म्हटलें आहे. आपला पिताहि काव्यरचना करी, असें हा म्हणतो. 'रामात्मज' या कवीची कांही कृति उपलब्ध आहे. याची 'कृष्णदानकथा' छापिलेलीहि आहे. पण हा 'रामात्मज' या मुळाजीचा बाप, असें म्हणण्यास कांहीं पुरावा नाहीं.

भामाविलास, उमामहेशसंवाद, गजगौरीव्रत आख्यान वगैरे बरीच कविता उपलब्ध आहे. यांपैकीं गजगौरीव्रत काव्यसंग्रहांत छापिलें आहे.[1] बस्वलिंगाची माहिती महीपतीबुवांनीं आपल्या ग्रंथांत दिली आहे. याची कविता साधारण प्रतीचीच आहे. 'स्वरूपनिर्णय' वगैरे प्रकरणांचे लेखक अमृतानंद, 'कपिलगीते'वर टीका रचणारे 'अवधूतनिरंजन', तसेच नारायण, केशव वगैरे लहान लहान कवि याच काळीं विद्यमान होते. केशवालाच **'केशवस्वामी'** असें म्हटलेलें आढळतें. याची बहुतेक सर्व रचना श्लोकबद्ध आहे. याचें साडेपांचशें श्लोकांचें गुरुस्तुतिपर एक प्रकरण आहे. यांत शेवटीं केशव म्हणतो,

दया सद्गुरु स्वामिनें पूर्ण केली । मृषा कल्पना नाशिली भ्रांति गेली ।
अती पक्वता पावली वृत्ति धालीं । अबाधीत हे केशवी प्राप्त झाली ।।

केशवस्वामी आपली गुरुपरंपरा सिद्धेश्वर—नारायण—केशव अशी देतो. केशवाचा गुरु नारायण हाहि काव्यरचना करी. याची एक दामाजीची रसद आहे. यांत शेवटीं यानें आपणास 'सिद्धेश्वरनंदन नारायण पंडित' असें म्हटलें आहे. केशवस्वामीचा काळ कोठेंहि स्पष्टपणें दिलेला आढळत नाहीं. तरी तो याच सुमारास होऊन गेला असावा, असा अदमास आहे.

या काळीं हयात असलेल्या मराठी मुत्सद्यांपैकीं अनेक पुरुषांना कविता करण्याचा नाद होता, असें दिसतें. परशराम त्रिंबक प्रतिनिधि, कृष्णराव खटावकर वगैरे मंडळींचीं नांवें इतिहासांत प्रसिद्धच आहेत. परशराम त्रिंबक हे आनंदमूर्ति ब्रह्मनाळकरांचे शिष्य. हे विजयदुर्गास कैदेंत असतांना यांनीं बरीच कविता केली आहे. कृष्णराव हे तर मुत्सद्दी असून शूर शिपाईहि होते. यांनीं विष्णुसहस्रनामावर टीका

---

१. काव्यसंग्रहांत बस्वलिंगाचे नांवावर छापिलेलें 'गजगौरीव्रत' एकट्या बस्वलिंगाचें नाहीं. त्यांतील सर्व साक्या 'राघव' कवीच्या आहेत. म्हणजे 'राघव' आणि बस्वलिंग या दोघांचें हें आख्यान एका ठिकाणीं करून हें एक आख्यान जमविलें आहे.

केली आहे. राजकारणांत पडलेल्या मंडळींत कवि म्हणून निरंजन-माधवाची प्रसिद्धी विशेष आहे. **निरंजनमाधव** हा वर उल्लेखिलेल्या सर्व मंडळींपेक्षां बऱ्याच श्रेष्ठ दर्जाचा कवि होता, यांत संशय नाहीं. याची हकीकत थोडी मनोरंजक आहे. बापुभट बर्वे उर्फ लक्ष्मीधर या नांवाचे एक कोंकणस्थ चित्पावन ब्राह्मण शाहूराजाच्या कारकीर्दींत सातारा येथें राहत असत. हे फार विद्वान्, नीतिमान् आणि आचार-शुद्ध असून प्रेमळ व गुणी असत. गायनवादन विद्येंतदेखील हे फार निपुण होते. हातीं रुद्रवीणा घेऊन गोड आलापानें हे नित्यनियमानें ज्ञानेश्वरीचें पुराण सांगत. यांची काव्यरचनाशैली अशी अलौकिक होती कीं, ती पाहून यांच्या गुरूंनीं यांस 'लक्ष्मीधर कालिदास' असें नांव दिलें होतें. यांचे ठिकाणीं शाहू छत्रपतींची व इतर मराठे सरदारांचीहि निष्ठा फार असे.

आचार महाऋषीप्रमाणें । नारद तैसें वीणावादन ।
आलाप गंधर्वासमान । कवित्वीं प्रत्यक्ष कालिदास ॥
ज्यांचे ग्रंथ गीतप्रबंध । सर्व गाताति गायक सुविद ।
जैसे पूर्वीं रामानंद । वरदराज तत्तुल्य ॥

असें यांचें वर्णन 'सांप्रदायपरिमळ' ग्रंथांत केलेलें आहे. हा 'परिमळ' ग्रंथ निरंजनमाधव या कवीनें आपल्या व्हीस आपल्या गुरुपरंपरेची हकीकत सांगण्याकरितां रचिला आहे. निरंजनमाधव हा वर सांगितलेल्या बापुभट बर्वे उर्फ लक्ष्मीधर महाराजांचा शिष्य होय. पैठणचे पश्चिमेस दोन योजनें (सुमारें ८ कोस) व सिद्धेश्वराचे पूर्वेस दीड योजन (सुमारें ६ कोस) रामडोह नांवाच्या गांवीं याचे वाडवडील राहत असत. याच्या बापाचें नांव 'महादो बनोजी'. याची वृत्ति ग्रामलेखकाची असे. परंतु व्यापारासंबंधानें आपलें मूळचें रामडोह गांव सोडून महादो बनाजी हा विजापुरास जाऊन तेथील पादशाहाचे

१. बनाजी हें उपनांव असावें, असें दिसतें. निरंजनमाधव आपल्या अनेक प्रकरणांचे शेवटीं आपणास 'बनाजी कवि' असें म्हणतो.

पदरीं राहिला. महादो बनाजीस चार पुत्र व एक कन्या अशीं पांच अपत्यें होतीं. यांपैकीं निरंजनाचा जन्म कर्नाटकांत 'कंची प्रांतीं' झाला. असें दिसतें कीं, निरंजनाच्या जन्मानंतर लवकरच याचा पिता 'महादो' हा 'कंची प्रांतात'च मृत्यू पावला. तेव्हां कर्नाटक देश सोडून निरंजन हा महाराष्ट्रांत आला. निरंजन महाराष्ट्रांत आला तो आपल्या वडील बंधूसह श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांच्या पदरीं सातारा येथें राहिला. सातारा येथें असतांना निरंजनानें वरील लक्ष्मीधराची शिष्यवृत्ति करून त्याचे जवळ व्याकरण वगैरे शास्त्रांचा अभ्यास केला. निरंजन म्हणतो कीं, 'लक्ष्मीधराजवळ अनेक विद्यार्थी अनेक तऱ्हेचीं शास्त्रें शिकण्यास येत असत. परंतु त्या सर्वांपेक्षां गुरुजाची कृपा मजवरच विशेष असे;'. आणि हें खरें दिसतें. लक्ष्मीधरानें या निरंजनाला अनेक विद्या पढवून विद्वान व बहुश्रुत केलें, यांत संशय नाहीं. निरंजनाचे सांप्रदायपरिमळग्रंथावरून त्याची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें असावी असें दिसतें. दत्त—विमलानंद—ब्रह्मानंद — विमलानंद — सच्चिदानंद—ब्रह्मानंद — लक्ष्मीधर — निरंजनमाधव.

श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांच्या आश्रयानें निरंजनमाधव हा राहत असे, असें वर आलेंच आहे. बाजीरावांच्या पश्चात् त्यांचें वैभवशाली चिरंजीव बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांनींहि या निरंजनाचा चांगला परामर्श घेऊन त्यास सेवा-चाकरी सांगितली. परंतु निरंजनाचे हातून आपल्या अन्नदात्या धन्याच्या सेवेंत कांहीं अंतर पडलें. यामुळें निरंजनावर श्रीमंतांनीं थोडी गैरमर्जी दाखविली. परंतु पुन्हां कृपावंत होऊन त्यांनीं या आपल्या जुन्या आश्रितास पुनरपि आपल्या सावलींत घेऊन,

> शिबिकादि सकळ संपदा । देवोनि अर्पिलें महत्पदा ।
> श्रीरंगपट्टणीं नियो (जू?) न वंदा । कथिला तेणें ॥

निरंजनमाधव हा पेशव्यांचे नोकरीनिमित्त एके वेळीं तंजावर प्रांतीं

असतांना तेथें याची व बापजी पंडित नांवाच्या एका गृहस्थाची गांठ पडली. हा बापजी पंडित सिद्धेश्वरसांप्रदायी असून वेदविद्येंत फार निपुण असे. याचेपाशीं ज्ञानमार्गाचा अभ्यास करण्यासाठीं निरंजनानें याची गुरुदीक्षा घेतली. म्हणजे निरंजनाचे हे दोन गुरु झाले. निरंजन म्हणतो,

> लक्ष्मीधरें महावाक्य उपदेश केला । बापदेवें तो अर्थ प्रकट दाविला ।
> स्वानुभव आणोनि दिधला । हृदयीं लाविला ज्ञानदीप ॥

आणि याच भावनेनें निरंजनमाधवानें आपल्या ग्रंथांत या दोन्ही गुरूंस वंदन केलें आहे.

निरंजनमाधवानें मराठी भाषेंत अनेक विषयांवर ग्रंथ लिहिले आहेत. 'सांप्रदायपरिमळा' वरून असें दिसतें कीं, 'कृष्णानंदसिंधु' या नांवाचा ग्रंथ त्यानें प्रथम रचिला असावा.[1] हा ग्रंथ समाप्ति पावल्यावर यानें 'चिद्बोधरामायण' लिहिलें. याचें फक्त बालकांड (४२२ श्लोक) हल्लीं छापिलेलें आहे. हा ग्रंथ कवीनें लक्ष्मीधराच्या आज्ञेवरून रचिला; व लक्ष्मीधरास ही शिष्याची कृति पाहून समाधान वाटलें. श्रीरामचरित्रावर या कवीनें आणखी बरीच रचना केली आहे. रामकर्णामृत हें एकशें-अकरा श्लोकांचें सुंदर स्तोत्र आहे. याला कवि 'रामकर्णपीयूषस्तोत्र' असें म्हणतो. यांत श्रीरामाच्या आंगच्या शौर्य, धैर्य, गांभीर्य, औदार्य, एकपत्नीत्व वगैरे अनेक गुणांचें निरनिराळें वर्णन कवीनें फार सुंदर केलें आहे. हल्लीं आपणास घरोघर दिसणाऱ्या रामपंचायतनाच्या चित्रांत दाखविलेलें ध्यान या स्तोत्रांत कवीनें पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे:—

> वामे वैदेहकन्या सकळशुभगुणा भूषणालंकृतांगी ।
> बंधू सौमित्र शोभे धनुशरधर तो सर्वदा दक्षभागीं ।

---

१. आधीं कृष्णानंदसिंधु । रचावया हा प्रबंधु । उल्हास घडला सच्चि- । स्वप्नश्लोक स्फुरण होतां ॥ पुण्य ग्रामीं ग्रंथोत्पत्ति । श्रीरंगपट्टणीं समाप्ति । कृष्णानंदसिंधु श्रेष्ठ अति । आनंददाता सर्वजना ॥ (सां० प० उ० ३)

कैकेयीपुत्र साजे अरिदमन सवें चामरछत्रधारी ।
तिष्ठे तो अग्रभागीं विनययुत महा मारुती ब्रह्मचारी ॥

या स्तोत्रांत कवित्व आणि भक्तिरस हा सर्वभर आहेच; पण केव्हां केव्हां कवि थोडा विनोदहि करितो —

रामा ! श्रीमंतगेहोद्भव तरि कथिजे वृत्त आम्ही कशाला ? ।
तत्रापी राहवेना म्हणुनि विनवितों ऐक तूं सत्यशीला ।
तूझी ते कीर्तिकांता दिशि दिशि फिरते स्वर्ग-पाताळ-धात्री ।
देवा ! दैत्येंद्रराजेश्वरमुनिसदनीं राहते दीसरात्रीं ॥

आपल्या आराध्यदैवताशीं केलेला असल्या सलगीचा प्रकार थोडासा नवीनच दिसतो. हें स्तोत्र रचून झाल्यावर निरंजनमाधवाला वाटलें कीं,

'झाली मद्भाग्यसीमा तव गुणगणनीं योजिता बुद्धि साची ।'.

रामायणांपैकीं 'मंत्ररामचरित' व 'निर्वोष्ठ राघवचरित' हीं याचीं चित्रकाव्यें होत. पहिल्यांत 'श्रीरामजयरामजयजयराम' हा मंत्र आद्याक्षरांनीं साधिला आहे; व दुसरें 'अवोष्ठवर्णें ग्रथित' असें आहे. म्हणजे यांत पवर्गांतलीं अक्षरें वगळिलीं आहेत. यांत 'व' हें अक्षर व उ-कार हीं वर्ज्य केलीं नाहींत. याचे पंचेचाळीस श्लोक आहेत. पण छंदःशास्त्रदृष्टीनें ही रचना नीट झाली नाहीं. 'सुभद्राचंपू' हा एका सप्तसर्गात्मक संस्कृत ग्रंथाच्या धर्तीवर रचिलेला आहे. यांतील कांहीं कांहीं पद्यें सरस उतरलीं आहेत. निरंजनमाधवानें 'ज्ञानेश्वरविजय' नांवाचा एक चरित्रपर ग्रंथ लिहिला आहे. यांतील माहिती नामदेवाचे 'प्रबंधा'वरून घेतली, असें कवि म्हणतो. हा ग्रंथ पुणें येथें शके १६८७-मध्यें पार्थिव संवत्सरीं पुरा केला. छंदःशास्त्रावर या कवीचे 'वृत्तावतंस' व 'वृत्तमुक्तावलि' असे दोन सुंदर ग्रंथ आहेत. यांपैकीं 'वृत्तमुक्तावली' ही प्रसिद्ध आहे. यांत प्रथमचरणांत वृत्ताचें लक्षण व नांव सांगिलेलें असून पुढील चरण उदाहरणार्थ दिले आहेत. अर्थात् प्रत्येक वृत्त

सांगणारा श्लोक त्या त्या वृत्तांतच रचिला आहे. हल्लीं प्रचलित असलेल्या वृत्तदर्पणांतील कांहीं बाबी या व इतर जुन्या कवींनीं दिलेल्या बाबींशीं मिळत्या नाहींत. हें थोडें चमत्कारिक आहे. उदाहरणार्थ 'दीर्घ' व 'लघु' अक्षरें दाखविण्याचीं वृत्तदर्पणांतलीं चिन्हें अनुक्रमें – व ⌣ सरळ व वक्र रेषा अशीं आहेत. पण निरंजनमाधव म्हणतो—

गुरुसंज्ञा वक्र रेखा ऋजु रेखा लघु स्थळीं ।
प्रस्तार लेखनीं आहे रीती हे ऋषिनिर्मित ।।

या वृत्त मुक्तावलिग्रंथरचनेंत कवीचें विशेष कौशल्य किंवा विद्वत्ता प्रकट झालेली दिसून येत नाहीं. यांतील श्लोक मात्र या कवीच्या एकंदर रचनेप्रमाणेंच गोड झाले आहेत. मराठींत नांवें न आढळणाऱ्या कामक्रीडा, सहदळा, प्रभद्रक, लोला वगैरे अनेक वृत्तांचीं नांवें व लक्षणें यांत आलीं आहेत. 'वृत्तवनमाला' या नांवाचा या कवीचा एक छंद:शास्त्रावर ग्रंथ आहे, असा कांहीं लोकांचा समज आहे. पण हें त्याच्या अनेक स्तोत्रांपैकीं केवळ एक स्तोत्र आहे. यांत विष्णुपत्नी श्रीलक्ष्मी देवीची स्तुति सतरा पद्यांत गाईली आहे. पहिली चौदा पद्यें, उपजाति वृत्ताचे जे चौदा पोटभेद त्या त्या पोट-वृत्तांत त्यांचीं नांवें सार्थ योजून, रचिलीं आहेत. याशिवाय निरंजनमाधवाचीं अनेक स्तोत्रें उपलब्ध आहेत. किंबहुना, बहुतेक सर्व दैवतांच्या स्तुतिपर याचीं स्तोत्रें आहेत. यांपैकीं बरीच स्तोत्रें यानें त्या त्या दैवतांच्या दर्शनसमयीं लिहिलीं

---

१. पंध्रा वर्णी गुर्वंगी ते कामक्रीडा योजावी ।
ईचा भोगीं इच्छा तूंतें तैं त्वां माध्वी पाजावी ।
नाना गोडा गोष्टी ईतें बोलोनीयां मोहावी ।
वेश्या नारी चित्ता चोरी माया ईची जाणावी ।।

२. पंधरावें पद्य असें:—
चौदा परीच्या उपजाति वृत्तें । संप्रार्थिलें म्यां हरिवल्लभेतें ।
इंद्रादि साम्राज्यपदीं उपेक्षा । मानूनि तुझी धरिली अपेक्षा ।। १५ ।।

असण्याचा संभव आहे. यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास व तीर्थयात्रा केल्या होत्या. याचा प्रवासवर्णनपर एक ग्रंथ आहे. यांत अनेक क्षेत्रांचे ठिकाणीं हा गेला तेव्हां में जें याला दिसलें व वाटलें त्याचें यानें यथातथ्य व सुंदर वर्णन केलें आहे. श्रीप्रयाग क्षेत्रीं त्रिवेणीच्या ठिकाणीं असलेला सुवासिनींनीं वेणीदान करण्याचा प्रघात पाहून कवि म्हणतो—

छपन्न देशीहुन लोक येती । क्षौरादि कर्मं पुरुषास होती ।
अपूर्वता येक असे त्रिवेणी । सुवासिनी देति असेति वेणी ॥

पण या प्रयागपेक्षांहि येथील प्रयागवळांची आणि त्या शहरांतल्या व्यापाऱ्यांची रीत पाहून कवीला फारच चमत्कार वाटला. प्रयागांत,

शिवीवेगळा शब्द तोंडीं असेना । बुरा कीं भला लोक त्यातें कळेना ।
उणा देति सौदा खरा घेति पैका । ठकु लोक मोठा प्रयागांत देखा ॥

अशा अनेक गोष्टी कवीनें जशाच्या तशाच वर्णन केल्या आहेत.

प्रयागीं जसें पाहिलें म्यां विचित्र । तसें वानिलें वर्णिलें हें चरित्र ।
दयाळू नृसिंहें कृपा पूर्ण केली । निरंजनें रसज्ञा गुणि माघवें (?) गुंफवीली ॥

याप्रमाणेंच उत्तरमानस, दक्षिणमानस वगैरे ठिकाणचेंहि या ग्रंथांत वर्णन आहे. श्रीकाशी क्षेत्रांत असतांना नदींतल्या नावांचें, त्यांत बसून फिरणाऱ्या 'हौशी' लोकांचें आणि नावेंतून दिसणाऱ्या बाजूच्या घाटाचें वर्णन फारच सुंदर साधलें आहे.

किती घाट वानूं । किती थाट वानूं ।...समस्तांसि काशी असे कामधेनू ॥

असे उद्गार कवीनें हें स्थळ पाहून तेथील सृष्टिसौंदर्यासंबंधें काढिले आहेत. पण तेथले लोक पाहून कवि फार संतापलेला दिसतो. आलेल्या सात्विक व धार्मिक यात्रेकरूंना लुटून क्षेत्रस्थांनीं त्यांवर यथेच्छ चैन करावी, हा प्रघात पूर्वापार आहे. क्षेत्रांतले भिक्षुक तर हें करतातच. कारण त्यांचा उदरनिर्वाहच त्याचेवर चालतो. पण त्यांच्यावर नजर ठेवणारे व यात्रेकरूंना मदत करणारे सरकारी

अम्मलदारहि त्याचप्रमाणें वागूं लागतात, तें पाहून कोणालाहि राग येईल. बारीक-सारीक गोष्टीदेखील त्रासदायक करून त्यांपासून द्रव्योत्पादन करणारे हे सरकारी कामगार आणि त्यांचीं तीं हिडीस कृत्यें पाहून निरंजनाला मोटाच त्वेष आला आहे.

आधीं नरांची गणती करावी । वेळीं अवेळीं रुजु ती पहावी ।
न्यूनाधिकें कैद दुती धरावी । तें जेजयाची[1] भरती भरावी ॥

आणि याप्रमाणें प्रत्येकाचें हासिल (कर) निराळें. तें भरतां भरतां शपित्रीचा तळ उघडा पडतो.

निकाश बे मोइन दुःखकारी । घ्यावा दुजा हासिल फौजदारी ।
द्यावा किती मोइन हें कळेना । नीतीस कांहीं जन आकळेना ।
हासील देतां चुरडा उडावा[2] । कोठूनिया धर्म पुढें करावा ? ॥
... ... ... ... ...
खातां नये अन्न करोनि गोड । चोरूनि खाति लपवूनि आड ।
गंगावळाचा बहु धाक मोटा । कंगाल बोले बहु मी करंटा ॥
निःशंक कंगाल फिरों शकेना । येके स्थळीं येक घडी टिकेना ।
नेती धरोनी दुत जेजयाचे । हे धाक मोठे हृदयीं भयाचे ॥
गंगापुत्र गुमान फार धरिती घांटीं सदा हिंडती ।
कंगालासि पिडा करूनि धरिती 'दे दक्षिणा' बोलती ।
थोडी घेती न बोलती खलमती नानापरी पीडिती ।
आंगासी झटती किचाट करिती हाणोनि घेती किती ॥

इत्यादि वर्णन पुरें करून काशींतल्या दिनचर्येची एक बाजू दाखविल्यावर कवि आपल्या वाचकांस दुसरी बाजूहि दाखवितो.

आतां असो गोष्टि अशा रितीची । सांगो स्थिती ती इतरा रितीची ।
भागीरथीचीं तिरें रम्य खाशीं । हिंडोनि म्यां पाहिलिं सावकाशीं ॥
महाल नानापरिचे बसाया । केले झरोके नयनीं दिसाया ।
त्यांतूनिया पाहत भोंवतालें । हौशी नरांचे बहुसाल ताले ॥

---

१. 'जेजया' हा शब्द या काव्यांत अनेक वेळां आला आहे. याचा अर्थ डोईपट्टी = प्रत्येक माणसावरील कर.

२. 'चरु का' ( अन्य पाठ ).

झरोक्यांतुनी पाहती रम्य नारी। जयांच्या चिरांच्या जरांच्या किनारी।
अलंकार ल्याल्या विजांच्या झळाळी। तयां पाहतां भूक तीही पळाली ॥
नारी करोनी नव पेहरावे। हौसी नरांच्या नयनीं भरावे।
पाहोनि दृष्टीं गमके करावे। ऐशा भरीं ते तरणें भरावे ॥
जुना जाहला कोट गंगातटीचा। सराई पुढें रम्य बाजार साचा।
तमाशा सदा होय नाना परीचा। पहातां भुले लोक या दक्षिणेचा ॥
फिरे जान्हवीचे तिरी नारिमेळा। तयामाजि त्या सुंदरा प्रौढ बाला।
मुखीं गायनें पंचलापें करीती। तया काशिची चांगली भक्तिरीती ॥

याचप्रमाणें विष्णुपदाचें व इतर तीर्थांचेंहि वर्णन आहे. हा ग्रंथ इतके उतारे देऊन येथें सांगण्याचें कारण असें कीं, यांत अलीकडील तऱ्हेनें प्रवासयात्रेची सांगितलेली हकीकत कौतुकास्पद आहे. हा निरंजनमाधव कवि सबरस दिसतो. अनेक विषयांवर याचे ग्रंथ आहेत. चरित्रपर, वेदांतपर, ईशस्तवनपर वगैरे अनेक प्रकारचे ग्रंथ यानें लिहिले आहेत. छंदःशास्त्रावरहि याची रचना आहेच. प्रवासवर्णनेंहि आहेतच. इतकेंच नव्हे, तर यानें शंकराचार्यांच्या कांहीं स्तोत्रांवर व इतर विषयांवर टीकारूपी गद्य ग्रंथहि रचिलेले उपलब्ध आहेत. तेव्हां एका दृष्टीनें हा कवि विशेष महत्त्वाचा आहे.

निरंजनमाधवाप्रमाणेंच कांहींशी नानाविध रचना करणारा दुसरा एक कवि या काळीं हयात होता, असें दिसतें. याचें नांव **सामराज.** या सामराजासंबंधानें एक मोठी अडचण अशी आहे कीं, यानें आपली चरित्रात्मक अशी माहिती आपल्या ग्रंथांत फारशी दिलेली नाहीं. यामुळें 'सामराज' किंवा 'शामराज' या नांवाचा एकच ग्रंथकार असून त्या नांवावर उपलब्ध असलेले सर्व ग्रंथ त्या एकाचेच आहेत, किंवा हे भिन्न भिन्न ग्रंथकारांचे ग्रंथ आहेत हें कळण्यास मार्ग नाहीं. 'कोकशास्त्रा'पासून 'भागवतटीके' पर्यंतचे निरनिराळे दर्जाचे विषयावरील ग्रंथ सामराज या कवीनें लिहिलेले

आढळतात. एका संस्कृत ग्रंथाच्या आधारें 'मी ही कामशास्त्रटीका रचितों' असें कवि त्या ग्रंथाचे प्रारंभीं लिहितो. भागवताच्या दशम स्कंधावरहि एक टीका आहे. हींत कवि आपलें नांव 'शामराज', 'शाम' व 'सामराज' असें तीन तऱ्हेनें लिहितो. या टीकेचे ९० अध्याय असून हिची ग्रंथसंख्या जवळ-जवळ साडेचार हजार आहे. हा ग्रंथ यानें एका वर्षांत लिहिला. हा ग्रंथ अगदीं साधारण आहे. यावरून ही रचना अगदीं प्रारंभींची असावी किंवा हा कवि पुढील 'रुक्मिणीहरण'कर्त्या कवीहून भिन्न असावा असें वाटतें.

'सामराजा'नें रचिलेलें एक 'मुद्गल-आख्यान'हि उपलब्ध आहे. या प्रकरणावरून कवीचें कुलदैवत 'मुद्गल' हें होय, असें दिसतें. या मुद्गल आख्यानांत कवीनें आपलें गोत्र, मातापिता व बहीण यांचा उल्लेख पुढीलप्रमाणें केला आहे:—

> **शाकल्यान्वय** सागरीं **जनि** असे ज्याची मना शुद्धता।
> **आल्हादीं द्विजराज लक्ष्मण सुधी जाणा** जयाचा पिता।
> **काशी** हे **विमळा** जयास जननी **मंदाकिनी** सोदरी।
> केली **मुद्गलदैवतस्तुति** पहा त्या **सामराजें** वरी॥

हें मुद्गल क्षेत्र दौंडापासून चार कोसांवर भीमा नदीच्या कांठीं आहे, व येथील जोशीपण साताऱ्च्या राजोपाध्यांकडे आहे.[2] पण या वर सांगितलेल्या सर्व ग्रंथांपेक्षां सामराजविरचित 'रुक्मिणीहरण' हा ग्रंथ जास्त सरस व मोठा आहे. याचे ८ सर्ग असून एकंदर श्लोक ११००-वर आहेत. यांतील कांहीं वर्णनें नागेशाप्रमाणें थोडीं

१. **या भागवतटीकेचे प्रारंभीं**— संवत सत्राश साठी (१७६०) भरितां। मीच **शामराज** कथा वदितां।...... इ. (अ. १ ओं. ५) व शेवटी संवत सत्राशें एकसष्टीत। श्रावण वद्य सप्तमी भगत। त्यात हें पुराण पूर्ण होत। ......(अ. ९० ओं. ५६)' असे उल्लेख आहेत.

२. भा. इ. सं. मं. ग्रं. ११ पृ. ५०—या राजोपाध्यांकडे एक सामराजाच्या **रुक्मिणीस्वयंवराची** पोथी मिळाली होती. यावरून हा रुक्मिणीस्वयंवरकर्ता व हे तरी भिन्न नसावे, असें वाटतें.

पाल्हाळिक आहेत. पण नागेशाच्या वर्णनाप्रमाणें तीं ग्राम्य नाहींत. पुष्कळ ठिकाणीं तीं वामनी रचनेची आठवण करून देतात. कांहीं ठिकाणीं तर वामनापेक्षांहि स्वाभाविकपणाच्या दृष्टीनें हीं कदाचित् जास्त बरीं ठरतील. यांत कोठें-कोठें कथाभाग आपल्या सोयीसाठीं कवीनें बदलिला आहे. यामुळें याच्या काव्यांत थोडी जास्त गोडी आली आहे. याच्या सातव्या सर्गांत रुक्मिणीला तिच्या आईनें सासरीं कसें वागावें, हें सुमारें ५५ श्लोकांत सांगितलें आहे. हा उपदेश मुलींनीं अवश्य वाचावा, असा उतरला आहे. असा हा योग्य उपदेश केल्यानंतर मुलीला देवीदर्शनासाठीं नेली. देवीची पूजा झाल्यावर मुलगी परत येत असतां वाटेंतच कृष्णानें लगट करून जवळ येऊन तिच्या पदराला हात लाविला. तेव्हां—

सुशीला तन्वंगी पदरिं धरितां ते दचकली ।
कृपाळें गोपाळें त्वरित चहुं हातीं उचलिली ।।
रथीं वाहे बाहे धरुन जगदाधार जिजला ।
तयेची ही लज्जा तदपि न विसंबेच तिजला ।।
रथारूढें कृष्णें शिथिल भुजबंधें कवळिली ।
कृशांगी सत्कारें करूनि निज अंकीं बसविली ।।

यापुढें काय प्रकार झाला हें सर्वांना ठाऊकच आहे; आणि सामराजानेहि तें वर्णिलें आहे. हें सर्व आख्यान संपवितांना शेवटीं—इतकेंच नव्हे, तर यांतील प्रत्येक सर्गाच्या शेवटीं—सामराज आपल्या श्रोत्यांना म्हणतो—

कथा कृष्णाची हे सकल जगदानंदजननी ।
मनोभावें ईचें श्रवण करिजे नित्य सुजनीं ।।
प्रसंगें श्रोत्यांचे सकळहि महादोष हरती ।
यदूत्तंसप्रेमें विषयरसगोडी विसरती ।।

---

१. सामराजाचें 'रुक्मिणीहरण' महाराष्ट्रकवींत छापलें आहे. त्यावर शके १६६८ हा काल आहे; तो ग्रंथरचनेचा नसून प्रतीचा शक आहे. हें प्रारंभीं प्रस्तावनेंत पृ. १—वर त्या ग्रंथांत स्पष्ट म्हटलें आहे.



# कृष्णदयार्णव व श्रीधर



कृष्णा आणि कोयना या नद्यांच्या संगमाजवळ कराडक्षेत्राच्या उत्तरेस कोपारूड (कोपरडें) नांवाच्या गांवी शंभुमणि या नांवाचा एक माध्यंदिनशाखी देशस्थ ब्राह्मण राहत असे. यास नारायण नांवाचा एक पुत्र होता. पुष्कळ दिवस नारायणास संतान नव्हतें. परंतु नारायणाची स्त्री वहिणा अथवा वहिणादेवी हिनें एक तपपर्यंत आराधना केल्यावर हिजला जनार्दन नांवाचा पुत्र झाला. थोडे दिवसांनीं जनार्दनाचे पाठीवर दुसरा मुलगा झाला. त्याचें नांव **नरहरी** असें ठेविलें. नरहरीचा जन्म शके १५९८-मध्यें आनंद-संवत्सरीं अक्षय्य तृतीयेसे[1] झाला; व नंतर दुसरे वर्षी वहिणादेवी मृत्यु पावली. नरहरीची आई बाळपणींच वारली परंतु ईश्वरकृपेनें बापाचें छत्र कांहीं दिवस त्यास होतें. लहानपणींच पांचव्या वर्षी मुंजे[2] झाल्यावर नरहरीस पित्यानें काल-वर्तमानानुसार थोडेंसें शिक्षण दिलें. आठव्या वर्षी दुंदुभी--संवत्सरीं[3] नरहरीचें लग्न करून त्यास संसारांत वसवून पिता नारायण यानें इहलोकचा त्याग केला. लहानपणीं आई वारली; बाप होता तोहि आतां गेला; व सर्व भार नरहरीवर पडला. शिवाजीमहाराज दिवंगत झाले होते व या वेळीं महाराष्ट्रांत अवरंगजेवाचे स्वारीमुळें सर्वभर धुमाकूळ माजला होता. या परचक्राच्या फेऱ्यांत नरहरीस गांव टाकून देशत्याग करावा लागला. फिरतां फिरतां नरहरी कुटुंबसुद्धां जोगाईच्या आंब्यास आश्रय धरून राहिला. येथें असतांना एका गोविंद नांवाच्या आनंद-सांप्रदायांतील पुरुषाची व त्याची गांठ पडली. हा गोविंद एकनाथाचा शिष्य जो चिदानंद त्याच्या स्वानंद नांवाच्या शिष्याचा शिष्य होता.

---

१. मृगनक्षत्र, तृतीय चरण, प्रथम प्रहर (हरिवरदा अ. १).

२. मुंज शके १६०१.

३. लग्न शके १६०४.

स्वानंदाला शिवाजी महाराजांनीं रायगडीं ठेविलें होतें.[1] रायगडास हा असतांना तेथें शिवाजीमहाराजांचा गोविंदराव नांवाचा कोणी सेवक होता. त्याला या स्वानंदाच्या सहवासानें ब्रह्मविद्येचा नाद लागला आणि तो आपला संसार सोडून भार्येसह स्वानंदाचा अनुग्रह घेता झाला; व राजकारणांत वावरणारा गोविंद हा परचक्राच्या फेऱ्याला त्रासून जाऊन भक्तिमार्गांत शिरला. आणि स्वदेश सोडून मोंगलाई मुलुखांत गेला. येथें असतांना त्याच्याचप्रमाणें संसाराला त्रासलेला जो नरहरी त्याची व याची गांठ पडली. तेव्हां आपल्यावरील संकट-परंपरा त्या 'गोविंद'स्वामीस निवेदन करून मी,

'कालचक्रें आचारहीन । जठरचिंतनें अभ्यासविहीन ।
एव जड मूढ अज्ञान'।

आहे असें नरहरीनें सांगितलें. नरहरीचा निष्कपट भाव व सात्त्विक प्रेम पाहून गोविंदानें त्याजवर कृपा केली, व त्यास श्रावण वद्य अष्टमीस म्हणजे गोकुळअष्टमीचे दिवशीं (शके १६१८ युवा-संवत्सरीं) उपदेशदीक्षा दिली आणि–

करूनि निरपेक्ष कोरान्न । कृष्णदयार्णव[2] नामस्मरण ।
स्नानसंध्या गीता पठण । पारायण ज्ञानेश्वरी ॥

अशी आज्ञा देऊन नित्य-नेम करून दिला. यानंतर तोंडानें 'कृष्णदयार्णव' म्हणून गांवांत माधुकरी मागावी[3] व राहिल्या वेळांत ज्ञानेश्वर, एकनाथ, इत्यादिकांच्या ग्रंथाचें पठन व चिंतन करावें, असा यानें क्रम चालविला. पुढें आपल्या गुरुबरोबर नरहरीनें श्रीकाशी, उत्तरमानस, दक्षिणमानस वगैरे तीर्थयात्रा केली व

---

१. तयां आपुलियां कल्याण कामें । शिवभूपतीनें प्रार्थूनि प्रेमें । रायदुर्गी स्थापिले नेमे । सेवानुक्रमे तोषविलें ॥

२. कृष्णदयार्णवाचा पुत्र मेघशाम याचा मठ हरिद्वारीं आहे.

३. 'गोविंद'राज गुरुवर्याचें एक अष्टक कृष्णदयार्णव म्हणत. त्यांतील शेवटला श्लोक असा:—

गोविंदराज गुरुवर्यपदारविंदा । चिंतावया त्यजुनि मन्मथसंग धंदा ।
पावावया सुहृद भीष्म बळी ध्रुवाचे । भिक्षाप्रदान मज कृष्णदयार्णवाचे ॥

तपश्चर्याहि केली; तोंडानें नेहमीं कृष्णदयार्णवाचें नामस्मरण चालू असल्यामुळें व घरोघर भिक्षेस गेल्यावर तोंडानें हा 'कृष्णदयार्णव' म्हणून मोठ्यानें म्हणे, यामुळें लोक यास **'कृष्णदयार्णव'** असेंच म्हणूं लागले. व 'नरहरी' नांव जाऊन हे स्वामी 'कृष्णदयार्णव' या नांवानेंच प्रसिद्ध झाले. आपल्या गोविंद गुरूबरोबर कोरान्न भिक्षा मागून तीर्थयात्रा करीत असतां भागवत, गीता व ज्ञानेश्वरी यांचा पाठ ते सतत करीत व निरूपणेंहि सांगत असत. श्रीगयेस असतांना यांनीं भागवतावर व्याख्यान केलें होतें. याप्रमाणें क्रम आचरून कांहीं वर्षांनीं तीर्थयात्रा संपवून हे परत स्वदेशीं आले. परत येऊन पाहतात तों इकडे अंबा नगरीचा विध्वंस झाला होता व धुमश्चक्रीहि चालू होतीच. तेव्हां कुटुंबासुद्धां नरहरी उर्फ कृष्णदयार्णव पिंपळनेर गांवीं जाऊन राहिले. असा कष्टाचा काळ जाऊन थोडीं वर्षें स्वस्थतेचीं होतात तों वयाचे ३७-वे वर्षीं कृष्णदयार्णव स्वामींची बायको वारली. पोटीं एक पुत्र व एक कन्या अशीं दोन अपत्यें होतीं; याशिवाय घरांत कोणी नाहीं; आणि अग्निहोत्राची तर मनांत इच्छा; म्हणून गुर्वाज्ञेनें स्वामींनीं द्वितीय संबंध केला. व थोडेच दिवसांत अग्निहोत्र घेतलें. पांच-सात वर्षें बराबाईट संसार करितात तों अंगावर महारोगाची छाया दिसूं लागली. रक्तपितीचा प्रादुर्भाव झाला. यामुळें चित्तास अस्वस्थता आली; व सर्व काळ भजनांत घालवावा, असें वाटूं लागलें. पूर्वी आपल्या गुरूजवळ यानें श्रीमद्भागवतावर व्याख्यान केलें होतें; व आतां महारोग झाल्यावर गुरूंनीं व इतर संतांनीं यास भागवताच्या दशमस्कंधावर प्राकृत टीका लिहिण्यास आग्रहानें सांगितलें. महारोगासारख्या शरिराच्या व्याधीला एका परमेश्वराच्या नामसंकीर्तनासारखें दुसरें रसायन नाहीं, असें समजून व सर्वांचा एकच मनोदय पाहून कृष्णदयार्णवानें ही टीका लिहिण्यास सुरुवात केली.[1] या वेळीं त्याचें वय

---

१. शके १६४९, प्लवंग-संवत्सरी.

५४ वर्षांचे होतें. ज्या वयांत मनाचे आणि शरिराचे सर्व व्यापार शिथिल व्हावे, त्या वयांत यानें हा मोठा ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली, हें केवढें कर्तृत्व! आपल्या ग्रंथांत प्रथम संदर्भासाठीं पूर्वीचा सर्व कथाभाग थोडक्यांत सांगून पुढें दशमस्कंधावरील विस्तृत टीकेस यानें सुरवात केली आहे. मूळ ग्रंथावरील श्रीधरी टीकेच्या आधारें यानें आपल्या ग्रंथाची उभारणी केली आहे. पूर्वार्धाचे ४९ अध्याय लिहिण्यास यास सात वर्षे लागलीं. शके १६५६-मध्यें आनंद संवत्सरीं गोकुळाष्टमीचे दिवशीं म्हणजे वयाला साठ वर्षे झालीं तेव्हां पूर्वार्ध पुरें झालें. पूर्वार्ध पुरें होण्यापूर्वीच शरिरावर रोगाची व्यथा जडली होती ती नाहींशी झाली; व चित्तास एक प्रकारें समाधान वाटलें. परंतु वयाला साठी उलटली व गुरु गोविंद, ज्यांचे आग्रहानें ग्रंथारंभ केला ते, आणि बरोबरीचे इतर संतसज्जन होते तेहि दिवंगत झाले. यामुळें सर्व जग शून्य वाटूं लागलें.[1] किंबहुना आपलाहि अवतार आतां आटोपणार, असें वाटून एक तऱ्हेची निराशा उत्पन्न झाली व शरीर तर क्षीण झालें. परंतु भगवंताच्या मनांत उत्तरार्धाचें व्याख्यान करविणें असेल तर तोच सामर्थ्य देऊन तें पुरें पाडील, असें स्वामींच्या मनांत आलें; आणि

---

१. कृष्णदयार्णवांनी आपल्या एका अभंगांत गुरुनिधनानंतर मनाची स्थिति काय झाली, याचें वर्णन केले आहे. दयार्णव म्हणतातः—

चाड नसे मज आणिक कोणाची । एका गोविंदाची आस पाहे ॥
तयावीण जीणें शून्य वाटे लोकीं । कोण माझे पोषी (खी) मनोरथ ॥
कोण जाणे माझे जीवींचा कळवळा । कोण वेळवेळां आळवील ॥
दाही दिशा शून्य तुजवीण झाल्या । चित्त कांही केल्या स्थीर नोहे ॥
दयार्णवा तुझ्या छायेशीं वाढलों । आजि वाटे झालों परदेशीं ॥

२. परंतु जरेनें शरीर क्षीण । देशकालादि विपरीत चिन्ह । संतीं करविलें व्याख्यान । तेहि निर्वाण पावले ॥ प्राचीन सज्जन जिवलग सखे । ब्रह्मसायुज्यीं भजले तितुके । त्यांच्या वियोगें वाटे फिकें । जिणें वर्तणें भूभार ॥ त्यांच्या स्मरत्तां गोठी ग्हाटी । विरहावस्था उथळे पोटीं । सगुणमुखाची पडली तुटी । भासे सष्टी अविराम ॥

गुरूपुत्र शिवदिक्षित यानेंहि फार आग्रहानें आज्ञा केली, यावरून स्वामींनीं उत्तरभागास सुरुवात केली. पूर्वार्ध श्रावणांत संपलें व कार्तिकांतच उत्तरार्धास सुरुवात केली. उत्तरार्धाचे ३७ अध्याय म्हणजे ग्रंथाचे ८६ अध्याय संपवून ८७-व्या अध्यायाचे सुमारें २३ श्लोक झाले तोंच ईश्वरानें आयुष्य कमी केलें. शरिरास फार क्षीणता आली व शके १६६२-मध्यें रौद्रनाम-संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस गुरुवारीं श्रीक्षेत्र पैठण येथें स्वामी समाधिस्थ झाले. आपला मृत्यु अगदीं समीप आला, आतां आपल्याच्यानें ग्रंथ पुरा होत नाहीं, असें पाहून स्वामींनीं आपला शिष्य **'उत्तमश्लोक'** यास ग्रंथ पुरा करण्याविषयीं आज्ञा केली. उत्तमश्लोकानें स्वामींच्या आज्ञेप्रमाणें हा हरिवरदा ग्रंथ, पुढील राहिलेले तीन-साडेतीन अध्याय लिहून शके १६६५-मध्यें (रुधिरोद्गारी-संवत्सरीं) मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस गुरुवारींच पुरा केला. म्हणजे गुरुशिष्य मिळून ग्रंथरचनेचें काम सुमारें सोळा वर्षें अव्याहत करीत होते.

वयाच्या उत्तर भागांत लिहिलेला हा ग्रंथ चांगला उतरला आहे. ग्रंथ ओवीबद्ध असून ओवीची बांधणी एकनाथाच्या ओवी-प्रमाणेंच म्हणजे साडेचार-चरणी आहे. चरित्रनायक श्रीकृष्ण व मूळ ग्रंथ भागवत असल्यामुळें ग्रंथांत संसारी आणि ज्ञानी अशा

---

१. पैठणास कृष्णदयार्णव व त्याचा शिष्य या दोघांच्याहि समाधी आहेत. यांपैकीं कृष्णदयार्णवाच्या समाधीवर पुढील श्लोक आहे:—

रौद्रीं द्विषद् षट् शशि शाक्यवर्षीं। सत्पंचमी शुक्ल सुमार्गशीर्षी ।।
नैर्गुण्य श्रीकृष्णदयार्णवासी। तत्पादुका पूज्य सुखैकराशी ।।

यांच्या समाधीशेजारींच यांचे शिष्य 'उत्तमश्लोक' याची समाधी आहे. उत्तमश्लोकाचा समाधिकाल शके १७५८ हा दिलेला आढळतो. पण यावरून पाहतां उत्तमश्लोकाचें मृत्युसमयी वय फार जास्त येतें. ग्रंथ-समाप्तीनंतर ९३ वर्षें हा हयात होता, हें थोडें असंभवनीय दिसतें. कृष्णदयार्णवांस चार शिष्य होते. १ उत्तमश्लोक, २ सनातन, ३ **कौस्तुभ**, ४ श्रीवत्स. हे अनुक्रमें अवरखेड, वऱ्हाड, मुंगी व बीड येथील राहणारे होत.

दोघांनाहि आनंददायक असे अनेक प्रसंग आले आहेत; व ते कवीनें फुकट जाऊं दिले नाहींत. ज्ञानेश्वरीची आणि नाथाच्या ग्रंथाची छाया या ग्रंथावर बरीच उमटलेली दिसते. समान अर्थाच्या व समान शब्दांच्या ओंव्या यांत अनेक आढळतात. ग्रंथकाराची विद्वत्ता व त्याचा बहुश्रुतपणा हीं या ग्रंथावरून स्पष्ट दिसतात. यानें यांत जरी एका श्रीधरी टीकेचाच उल्लेख केला आहे तरी यांत अनेक इतर टीकांचें सार आणून व बाहेरचेंहि अधिक विषय घेऊन हा ग्रंथपरिपाक फार स्वादिष्ट बनविला आहे. विद्वत्तेच्या दृष्टीनें तर या ग्रंथास फार मान आहेच; पण काव्य या दृष्टीनेंहि ग्रंथ सरस आहे. कवि-कल्पनेच्या भराऱ्या यांत मुक्तेश्वराप्रमाणें जिकडे-तिकडे आढळत नाहींत, हें खरें. पण मधून-मधून अनेक वर्णनें चित्तवेधक आहेत. कवीनें आपला हात थोडा आखडता घेतला असता तर हीं वर्णनें याहीपेक्षां विशेष चटकदार लागलीं असतीं.

नभ आच्छादे निबिड घनीं । माजी गर्जना दीर्घ ध्वनी ।
विद्युल्लतांचिया स्फुरणीं । दृश्य दिसोनि हारपे ॥
चंद्रसूर्यतारांगणें । घेती अभ्रांचीं प्रावरणें ।
स्पष्टास्पष्ट प्रभाहीनें । तेणें गुणें भासती ॥
सजल मेघांच्या येती सरी । तेव्हां झांकोनि जातो गिरी ।
जळें वाहती पृथ्वीवरी । चिंता अंतरीं पांथिकां ॥
विद्युल्लता कडकडाटीं । महा मेघांचिया दाटी ।
चंडवायो झडझडाटी । करी दिग्पटीं सकंप ॥
प्रदोषकाळीं निशामुखीं । प्रभा आगळीं खद्योतकीं ।
मोडे ग्रहांची ओळखी । कोणा ठाउकीं नक्षत्रें ॥

हें शरद् ऋतूंतील पर्जन्यकाळचें वर्णन त्या वेळेची खरोखरच आठवण करून देण्यासारखें आहे. याच दिवसांत पुढें पर्जन्याचें उग्र रूप जरा शांत झाल्यानंतर गोकुळाष्टमीच्या वेळीं श्रीकृष्ण भगवानाच्या जन्मकाळीं सर्व सृष्टि कशी आनंदमय झाली होती, याचें कृष्णदयार्णवानें केलेलें

वर्णन चांगलें आहे:—

दिशा सुप्रसन्न सकळ । गगन निरभ्र निर्मळ ।
उदय पावला तारकमेळ । वर्षाकाळ असतांही ।।
मंगलोत्साह घरोघरीं । शोभा आनंद नगरोनगरीं ।
दुःखशोकदोषदरिद्री । सुखसागरीं बुडाले ।।
हृदयशल्यें विरोनि गेलीं । ब्रह्मानंदे मनें निवालीं ।
सुहृद्भावें प्रेमाथिलीं । भूतें भूतळीं परस्परें ।।
नगरोनगरीं घरोघरीं । प्रतिशरीरीं सर्वांतरीं ।
ब्रह्मानंदाचिये गजरीं । गोष्टी दुसरी हारपली ।।
श्रीकृष्णाचा जन्मकाळ । तेणें आनंदभरित जळ ।
सर्वभूतात्मा गोपाळ । सुखसुकाळ सर्वांसी ।।
नद्या वाहति प्रसन्नजळें । शुद्ध सत्वामकें सुविमळें ।
त्यजिलीं रजतमाचीं डहुळें । शुद्ध मेळे ज्याचेनी ।।

कृष्णदयार्णवाचीं वर्णनें कांहीं ठिकाणीं बरीच पाल्हाळात्मक झालीं आहेत; व कांहीं कांहीं ठिकाणीं शृंगाररसाचाहि थोडा जास्त शिरकाव झाला आहे. तरीहि अनेक ठिकाणचीं वर्णनें या दोन्ही दोषां-पासून अलिप्त अशीं आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं तर काव्यां-तली गोडी जाऊं न देतां आटोपसरपणानें कथानक सांगण्याचें कवीचें चातुर्य चांगलें नजरेस येतें. बलरामाचे वाड्यांत, त्रिदंडी संन्यासी अर्जुनाची व सुभद्रेची दृष्टादृष्ट झाली; व दोघांचीहि मनें वेडावून गेलीं, त्या वेळीं कवि म्हणतो—

कपटी यतिवर तये सदनीं । उपवर कन्या लावण्यखाणी ।
वीर मनोहरा देखोनि नयनीं । जाहला मनीं स्मरक्षुब्ध ।।
प्रीतिपूर्वक सप्रेमवक्त्रें । शरत्फुल्लारपंकजनेत्रें ।
सादर पाहतां सुंदर गात्रें । मन्मथशस्त्रें भेदियला ।।
तियेच्या ठायीं रुतलें मन । कामें कलुषी केले नयन ।
ऐसिया यतिवरा देखून । वेधले नयन कन्येचे ।।
तव तें सुभद्रा तन्वंगीं । त्यातें देखूनि भुलली वेगी ।
दाटली कामोर्मी सर्वांगी । व्रीडितापांगी स्मितवदना ।।

देखिलें यतीचें नवयौवन । आजानुबाहु सरळ सुपीन ।
ज्यातें देखतां स्त्रीजन हृदयें । द्रवोन वश होती ॥
ऐसा लावण्यरसपुतळा । सुभद्रेनें देखतां डोळा ।
सलज्जहास्यवदनकमळा । वेधिली अबळा स्मरबाणें ॥
परस्परें मिनले नयन । मनें आळंगिलें मन ।
हृदयीं कडतरले स्मरबाण । न थरे अवसान धैर्याचें ॥
भिक्षु भिक्षार्थ आणिला सदना । तेणें पाहोनि कन्यकावदना ।
वश्य जाला म्हणती मदना । यास्तव रदना खाऊनी ॥
बळेंचि अवलंबूनि विरक्ति । सवेग गेला मठाप्रति ।
परंतु चटपट लागली चित्तीं । ते शुकोक्ति अवधारा ॥

या सर्व ओव्या मराठी भाषेंतल्या उत्तम कवींच्या काव्यांत सहज शोभणाऱ्या आहेत. विस्ताराच्या मानानें हा ग्रंथ प्रचंड आहे. याची एकंदर ओवीसंख्या ४२,०००, म्हणजे जवळ जवळ अर्धा लक्ष आहे. याशिवाय कृष्णदयार्णवाचा 'तन्मयानंदबोध' या नांवाचा एक ३२५ ओव्यांचा ग्रंथ आहे. याचे कांहीं अभंग व सुमारें शेंदीडशें पदें इतकी कृति हल्लीं उपलब्ध आहे. कृष्णदयार्णवाची गुरुपरंपरा जनार्दन—एकनाथ—चिदानंद—स्वानंद—गोविंद अशी आढळते.[1]

---

१. उत्तमश्लोक-गुरुपरंपरा :— जनार्दन—एकनाथ—चिदानंद—स्वानंद—गोविंद—कृष्णदयार्णव—उत्तमश्लोक.

ग्रंथ :—प्रबोधसार (ओं. ३२१) मठ-उमरखेड (वऱ्हाड)

शके सोळा शते ब्यांशी । विक्रमाब्दि श्रावण मासीं ।
वद्य द्वादशीचे दिवशीं । 'प्रबोधसारासि' अलंकारिलें ॥

कृष्णदयार्णवाचे १६ शिष्य होते. कृष्णदयार्णवाचे नातू 'काशिनाथ' हे उत्तमश्लोकाचे शिष्य होत

कृष्णदयार्णव-उत्तम-काशिनाथ यांच्या समाधी पैठणीं जवळजवळ आहेत.

मृत्यु श. १७८०, पराभव-संवत्सर चैत्र शु. ४. कृष्णदयार्णवाचा पुत्र मेघशाम याचा मठ हरिद्वारी आहे.

शिवभूपती पावला मुक्ती । दक्षिणे येवोनि ताम्रपती ।
केली विजयपुरा समाप्ती । थोर विपत्ती राष्ट्रातें ॥

या कृष्णदयार्णवाचे ग्रंथावर एक तऱ्हेची खिन्नतेची छाया पडलेली दिसते. आणि याचें कारण असें आहे कीं, दयार्णव-स्वामीचा सर्व जन्म हालअपेष्टांत आणि कष्टांत गेलेला होता. आप्तेष्टांच्या अकाली मृत्यूचे आघात, महारोगासारख्या मृत्यूलाहि बरा म्हणविणाऱ्या रोगाचा प्रादुर्भाव, व संसारांतील आपदा यांनीं स्वामींना छेडून टाकलें होतें. या सर्वांचा थोडा-फार परिणाम तरी त्यांच्या लेखावर व्हावा, हें सहाजिकच आहे. तशांत त्यांनीं भागवताच्या दशमावरच व्याख्यान केलें, हेंहि योग्यच केलें. महाभारतांत आपल्या आयुष्यांतील अनेक दुःसह प्रसंगांच्या आठवणी करून देणारे प्रसंग फार, तेव्हां ते सोडून ज्यांत केवळ कृष्णाची सदानंददायिनी गोड कथा भरलेली आहे त्या भागवत दशमस्कंदावर आपल्या गोड वाणीनें कीर्तन करावें, हें नीट आहे. कृष्णदयार्णवानें आपल्या व्याख्यानांत अनेक वेळां आपल्या वाङ्मोहिनीच्या गोड आलापांनीं श्रोत्यांना संसार दुःखाचा विसर पाडून केवळ कृष्णकथेच्या सुंदर जलांत पोहत ठेवलें आहे. भागवतांतून, संस्कृतांतून, मराठींत या कथांचें संक्रमण होत असतां मूळकथांना आपल्या गोड अलंकाराच्या शर्करेनें अवगुंठित करून हे संक्रमणाचे ‘ तिळगूळ ’ स्वामी सर्वांना यथेच्छ देत आहेत. वाटेल त्यांनीं आपल्या कर्णसंपुटीं ते घालून आकंठ तृप्त व्हावें. आणि स्वतःच्या सर्व आयुष्यभर नानाप्रकारचे आघात व कष्ट सोशीत असतां हें गोड रसायन स्वामींनीं निर्माण केलें, हाच त्यांच्या चरित्राचा थोरपणा आहे. ही त्यांची दैवी श्रीमंती आहे. दैवी आघातानें खचून जाणें हीच खरी विपत्ती आहे. या आघातांनीं जो कार्य-विमुख होतो तो खरा गरीब, खरा दरिद्री. पण पडलेल्या आघातांनीं जो जमिनीवर लोळण घेत नाहीं व त्या आपत्तींचा मनांतील योजलेल्या हेतूच्या सिद्धीकडेच उपयोग करून घेतो तो खरा

संपत्तिमान्, खरा श्रीमंत होय. विपत्तींनीं मनाची शांति ढळू देऊं नये, हातून भलतेंच होऊं देऊं नये व चित्ताची समता जाऊं देऊं नये, हेंच खरें श्रेष्ठत्व. हें ज्यांचे जवळ असतें ते द्रव्य नसतांहि धनवान् होत. किंबहुना, द्रव्याचा अभाव हेंच त्यांचें द्रव्य व आपदा हीच त्यांची संपदा जाणावी. हेच कृष्णकथा-निरूपणाचे थोर अधिकारी. कारण यांना त्या त्या कथेची जोड होऊन हे इतरांना इंगळाप्रमाणें स्पर्श करण्यासहि असह्य अशी कठीण आपदा केवळ 'अमृत-सोपान' करतात व अत्यंत गोड आनंद–साम्राज्यांत जाण्याला ती एक पायरीच योजतात; व या पायरीनें ते स्वतः जाऊन इतरांस तेथें सदैव जाण्याचा मार्ग तयार करून ठेवितात. स्वतः आजन्म आपदा सोसून त्यांनीं आपदा ही अमृतसोपानाची पायरी केली व दशमांतल्या गोड कथा श्रोत्यांना ऐकविल्या हाच श्रीकृष्णदयार्णव स्वामींचा मोठेपणा महाराष्ट्राला अत्यंत कौतुकास्पद आहे. या कथा तेव्हां श्रोत्यांनीं ऐकिल्या व अजूनहि वाचक फार हौसेनें वाचतात. तोंडानें ज्या ग्रंथावर जमलेल्या श्रोत्यांपुढें नित्य व्याख्यान केलें त्याच ग्रंथावर पुढें स्वस्थपणानें टीका ग्रंथ लिहिला, यामुळें हा ग्रंथ चांगला झाला आहे. याची भाषा कोणाचेंहि रंजन करील अशी स्वादिष्ट आहे.

दयार्णवस्वामींनीं भागवतावर व्याख्यान करून ग्रंथ लिहिला. पण **श्रीधरस्वामींनीं** एकटी कृष्णकथाच काय, पण अनेक कथा गाऊन आपल्या वाचकांसाठीं अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत. दयार्णवांप्रमाणें संकटपरंपरेनें न पछाडल्यामुळें श्रीधरस्वामींना अवसरहि पुष्कळच सांपडला. शिवाय असें कीं, श्रीधरस्वामींच्या कुळांत अनेक पिढ्या ग्रंथरचनेचा क्रम चालू होता; व पिढ्यानुपिढ्या त्या व्यवसायांत त्यांचें कुटुंब रोळलेलें होतें. कृष्णदयार्णवस्वामींपेक्षां श्रीधरस्वामींचे ग्रंथ अधिक लोकप्रिय आहेत. त्यांच्या वाणीचा रसाळपणा हा कांहीं आणखी विशेष आहे.

याच्याच तोडीचा, किंबहुना याच्याहूनहि सरस असा याच्या हयातींत दुसरा एक विद्वान् व प्रतिभासंपन्न आणि रसाळ ग्रंथकार महाराष्ट्रांत होऊन गेला. याचें नांव **श्रीधरस्वामी**. याचे ग्रंथ लहानापासून थोरापर्यंत, सर्व महाराष्ट्रभर नेहमीं वाचिले जातात. श्रीधराच्या गोड वाणीची माधुरी ज्यानें मुळींच चाखिली नाहीं असा अभागी देह–स्त्री किंवा पुरुष–महाराष्ट्रांत कोठेंहि सांपडावयाचा नाहीं. आमच्या अठरापगड जातींत सर्वांचा आवडता, संसार-तापानें तापलेल्या अनाथांचें मनरंजन करून त्यांचें चित्त परमे-श्वराकडे लावणारा, सर्वांच्या संकटकाळांतला एक तऱ्हेनें आधार, असा श्रीधरस्वामींशिवाय दुसरा ग्रंथकार नाहीं. नामदेवतुकारामाचे अभंग फार पसरलेले खरे; पण ते फक्त पुरुषांच्याच सहवासाचे. भजनाचा छंद बायकांना, पतितांना आणि विधवांना किंवा लहान मुलांना आढळत नाहीं. या सर्वांना सारखें अन्नछत्र श्रीधराचेंच आढळतें. त्यांना श्रीधराच्याच ग्रंथांचा आधार फार. याचे बरेच ग्रंथ ओंवीबद्ध आहेत. हे संस्कृतांतील पौराणिक ग्रंथास धरून लिहिले असल्यामुळें यांच्या ठायीं लोकांची भक्तिहि विशेष आहे. भाविक लोक श्रीधराचे ग्रंथ फार मनोभावेंकरून वाचतात. याच्या काव्यांत प्रायः सर्व रसांचा भरणा आहे; परंतु कठीण किंवा जाडे शब्द यांत फारच थोडे आढळतात. भाषा शुद्ध, सरणी सुबोध व विषयाची मांडण गोड, यामुळें हे ग्रंथ वाचण्यासहि सोपे आहेत. खेरीज याचीं वर्णनें स्थलविशेषीं फारच उत्तम असून कोमल आहेत. याच्या लेखणींत एका तऱ्हेचें जें मार्दव दृष्टीस पडतें तें इतरांच्या लेखणींत आढळत नाहीं, असें म्हटल्यास चालेल. याच्या ग्रंथांचा पाठ घरोघर नेहमीं होत असल्यानें व जात्याच याच्या शब्दांत माधुर्य असल्यानें याच्या वाणीचा परिणाम श्रोत्यांच्या भाषेवरहि चांगला होतो. ग्रंथ वारंवार कानावरून गेल्यामुळें, घरांतील स्त्रिया व मुलें यांच्या तोंडांतहि चांगली भाषा येत जावी, हा याच्या

ग्रंथांचा सहज परिणाम दिसतो.

जें कथानक सांगणें तें परिस्थितीच्या आणि वयाच्या श्रोत्याला अनुरूप होईल व त्याच्या मनोविकाराला बरोबर पटेल असें करून सांगण्याची हातोटी श्रीधर उत्कृष्ट जाणतो.

मल्लयुद्धानें मल्लांस आनंद व्हावा, भीष्मद्रोणादि योद्ध्यांचें युद्ध-वर्णन वाचतांना योद्ध्यांस तेज यावें, नंदकिशोर गोपाळाच्या क्रीडा सांगतांना कामिजनांस कामभाव उत्पन्न व्हावा, सुदामजीचें चरित्र वाचून दरिद्र्यास आपल्याच स्थितीची त्यांत ओळख पटावी, राम-लक्ष्मणाच्या हकीकतीनें प्रेमळपणाचा उमाळा यावा; फार काय, पण कृष्णाच्या बाललीलांची चरित्रें ऐकतांना खोडकर मुलांनाहि हसूंच यावें व मोठ्यांनाहि मुलांच्या अनेक खोड्या आठवाव्या, हें वर्णन-विशेषाचें रहस्य श्रीधराच्या ग्रंथांत आढळतें. कृष्णाच्या द्वाड खोड्या पाहून मुलाला सुबुद्धि देण्यासाठीं व्रजवधू यशोदेला त्या बुद्धिदात्या गणेशाला नवस करण्यास ते सांगतात.

गणेश देईल उत्तम गुण । मानी आमुचें वचन प्रमाण ।
यशोदा म्हणे अवश्य करीन । संकष्ट चतुर्थी व्रत आतां ॥
गजवदनासी म्हणे यशोदा । गुण देइं माझिया मुकुंदा ।
संकष्ट चतुर्थी सर्वदा । न सोडी मी जाण पां ॥
वचन ऐकोनि कृष्णनाथें । सत्य कराया गणेशातें ।
खोडी नाहीं केली अनंतें । एक मासपर्यंत ॥
यशोदा म्हणे आली प्रचीती । धन्य धन्य देव गणपती ।
तों सवेंचि आली चतुर्थी । संकटहर्त्री सर्वांचें ॥
इंदिराबंधूचा उदय होय । तववरी यशोदा उपवासी राहे ।
पूजासामग्री लवलाहे । करी माय सिद्ध तेव्हां ॥
थोर थोर लाडू एकवीस । शर्करामिश्रित केले सुरस ।
सिद्ध लाडू विशेष । आणि बहुवस मोदक ते ॥
ऐसा नैवेद्याचा भरून हारा । माता नेऊन ठेवीं देव्हारां ।
तों उदय झाला निशाकरा । पडिला अंबरीं प्रकाश ॥

मातेसीं म्हणे हृषीकेशी । 'लाडू मज कधीं देशी ?' ।
माता म्हणे, 'गजवदनासी । नैवेद्य दावून देईन' ॥
आणिक धूप दीप सामग्री । माता आणूं गेली बाहेरी ।
देव्हारिया जवळी श्रीहरी । एकलाचि उभा होता ॥
एकांत देखोनि ते वेळां । श्रीकृष्णें हारा उचलिला ।
नैवेद्य सर्वहि स्वाहा केला । क्षणमात्र न लगतां ॥
मौनेंचि करूनि सर्वग्रास । उगाच बैसला जगदीश ।
श्रीवैकुंठपुरविलास । लीला भक्तांस दावित ॥
धूप दीप घेऊनि त्वरित । माता आली सदनांत ।
तों रिताचि देखिला हारा तेथ । देव्हारियावरी पडियेला ॥
विस्मय मायेसीं वाटला । म्हणे, 'रे घननीळा ।
नैवेद्य अवघा काय झाला । हारा पडिला रिता कां ?' ॥
श्रीकृष्ण म्हणे, 'वो माते । सत्य मानी वचनातें ।
एक सहस्त्र उंदीर येथें । आले होते आतां हो ॥
त्यांत एक थोरला मूषक । त्यावरी बैसला विनायक ।
सोंडेनें लाडू सकळीक । एकाएकीं आकर्षिले ॥
सर्वांगीं चर्चिला शेंदूर । सोंड हालवी भयंकर ।
उदर त्याचें भ्यासुर । देखोनि थोर भ्यालों मी ॥
बोबडी वळली वदनी । न बोलवे माझेनी जननी ।
क्षुधा लागली मज लागूनी । लाडू देई सत्वर' ॥
जननी बोले क्रोधायमान । उघडूनि दावी तुझें वदन ।
जगन्निवास करी रुदन । दीनवदन करूनियां ॥
'लाडू होते बहुत । कैसे जातील माझिया मुखांत ।
विचार करूनि निश्चित । मग मज शिक्षा करी वो ॥
गणेश गेला लाडू घेऊन । मजवरी आलें विवरण' ।
माता म्हणे, 'वदन उघडून । दावी मज मुकुंदा' ॥
हरी म्हणे, 'मारूं नको माते । उघडूनि दावितों वदनातें' ।
मातेपुढें वैकुंठनाथें । मुख पसरूनि दाविलें ॥

ही श्रीकृष्णाची लहानपणची हकीकत वाचून हसूंच येईल.

अशीं स्थळें 'हरिविजयांत' अनेक आहेत. 'हरिविजय' हा श्रीधराच्या प्रसिद्ध ग्रंथांपैकीं प्रथम रचिलेला दिसतो. हा ग्रंथ शके १६२४-मध्यें चित्रभानु-संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस पंढरपुरीं पुरा केला, असें त्याचे शेवटीं म्हटलें आहे. वयाचे ऐन उमेदींत रचिलेला हा ग्रंथ त्या वेळींहि लोकांना फार पसंत पडला; व श्रीधराची आणि या ग्रंथाची कीर्ति सर्वभर पसरली. या ग्रंथांत भागवत दशमस्कंध, पद्मपुराण, जैमिनिकृत ग्रंथ वगैरे अनेक ग्रंथांतून गोड कथा निवडून घेऊन त्या कवीनें सांगितल्या आहेत. पैकीं हें श्रीकृष्णाचें चरित्र वर्णिल्यानंतर कवीस श्रीरामचरित्र वर्णन करण्याची इच्छा झाली; व पुढील सालीं म्हणजे १६२५-त श्रावण महिन्यांत त्यानें रामविजय ग्रंथ लिहून पुरा केला. हाहि पहिल्याप्रमाणेंच फार चांगला उतरला आहे.

'हरिविजय' व 'रामविजय' हे दोन पौराणिक ग्रंथ लिहून झाल्यावर त्यानें आपली बुद्धि आध्यात्मिक विषयावर ग्रंथ रचण्याकडे लाविली असें दिसतें. कारण याच (१६२५) सालांत 'वेदांतसूर्य' या नांवाचा बारा अध्यायांचा एक ग्रंथ यानें पुरा केला. पौराणिक वर्णनात्मक ग्रंथांत कवीचें तेज पडलें, तसें या विषयांत पडलें नाहीं. हा ग्रंथ फारसा नांवाजला गेला नाहीं व कवीलाहि त्यापासून कांहीं विशेष समाधान झालेलें दिसत नाहीं. यापुढें श्रीधरानें पुन्हां पौराणिक आख्यानें टाकून दुसरे ग्रंथ लिहिण्याचें सोडून दिलें. किंबहुना, पुढें कांहीं वर्षेंपर्यंत कवीची रचना फार मंदावली, असें दिसतें. पुढील आठ-नऊ वर्षांतला एकहि ग्रंथ नाहीं. श्रीकृष्णाचें व श्रीरामाचें अशी दोन्ही चरित्रें लिहिल्यावर सर्वांत श्रेष्ठ व प्रपंचाला आणि परमार्थाला—दोहींलाहि उपयोगी असा जो महाभारत ग्रंथ, तो रचण्याचें कवीनें मनांत आणिलें; व शके १६३४-मध्यें विजय-संवत्सरीं माघ शुद्ध दशमीस कवीनें 'पांडवप्रताप' हा ग्रंथ पुरा केला. या ग्रंथाला महाभारत असें न म्हणतां 'पांडवप्रताप' असें म्हणण्याचें कारण हें कीं, यांत पांडवांचाच

प्रताप तवढा वर्णन केला आहे. म्हणजे ते निजधामास गेल्याची हकीकत मुळांत ज्यांत आहे, तें भारताचें स्वर्गारोहणपर्व यांत सांगितलें नाहीं. कारण कवि म्हणतो—

'स्वर्गारोहण पर्व । निजधामा गेले पांडव ।
तें निरूपण अभिनव । पंढरिनाथ लिहों नेदी ॥'

पूर्वींहि श्रीकृष्णाचें निजधामवृत्त व 'श्रीराम—रघुनंदन' निजधामास गेल्याचें 'अनुसंधान' यानें सांगितलें नाहीं.

हरिविजय रामविजय ग्रंथ । तिसरा हा पांडवप्रताप अद्‌भुत ।
तिहींत निजधाम यथार्थ । वर्णू देत नाहीं मी ॥

असें पांडुरंगानें कवीस सांगितलें.[1]

श्रीधराच्या पूर्वीं दोन-तीन व श्रीधरानंतर पांच-सात असे सबंध महाभारताचे मराटींत झालेले अवतार हल्लीं उपलब्ध आहेत. यापेक्षां आणखीहि कांहीं अधिक असतीलच. पण इतकीं सगळीं महाभारतें मागें पडून एकट्या श्रीधराच्याच महाभारताचा — पांडवप्रतापाचा— घोष महाराष्ट्रांत आज-दिवसपर्यंत कां सारखा चालू राहिला, ही एक विचार करण्यासारखी बाब आहे. मोरोपंतांचें महाभारत हें आर्याबद्ध असल्यामुळें तें समजण्यास सुलभ नसून नित्यपाठास तर अगदींच गैरसोयीचें आहे, असें त्यासंबंधें म्हणतां येईल. नामाविष्णूदासाचें किंवा हरिदास कान्ह्याचें, ते ते ग्रंथकार पुढें कदाचित् महानुभाव-पंथांत गेल्यामुळें जनतेनें त्यांचा अव्हेर केला असावा, असें आपण मानूं शकूं. पण इतरांची वाट काय? मुक्तेश्वराचें भारत भाषेच्या दृष्टीनें व काव्य म्हणून अद्वितीय खरें पण तें साग्र नाहीं; व ज्या पर्वांवर सहाजिकपणेंच उड्या पडावयाच्या

१. इतकेंच नव्हे तर,

तथापि करिशी अतिशय । तरी लिहितां वाचितां होईल प्रलय ।
तुझी स्फूर्ति पावेल लय । ग्रीष्मकालीचें तोय जैसें ॥

असेंहि सांगितलें. तेव्हां

ऐशी आज्ञा होतां सत्वर । श्रीधरें घातला नमस्कार ।
करोनियां जयजयकार । पांडवप्रताप ग्रंथ संपविला ॥

तीं पर्वे त्यांत नाहींत. हें एक कारण त्याचा सार्वत्रिक प्रसार न होण्यास आहे यांत संशय नाहीं. पण मुक्तेश्वरी पर्वांत अनेक ठिकाणीं अत्यंत अश्लील शृंगार आहे, हें कारण या संबंधांत पुढें मांडतां येणार नाहीं. कारण श्रीधराच्या पांडवप्रतापांत व शिवलीलामृत वगैरे इतर ग्रंथांतहि उत्तान श्रृंगार काय कमी आहे! गुरूचरित्र, भागवत दशम वगैरे अनेक ग्रंथांतहि असाच बीभत्स श्रृंगार पुष्कळ ठिकाणीं आहे. म्हणून महाराष्ट्रानें ते ग्रंथ कोठें वर्ज्य केले आहेत! तेव्हां हें कारण मुक्तेश्वरी ग्रंथास लागू पडत नाहीं. त्रुटितपणा हेंच कारण मानावें तर इतर जीं महाभारतें त्रुटित नाहींत, त्यांची वाट काय? माधवस्वामी, गोपाळ, नरहरी वगैरेंचे ग्रंथ पूर्ण आहेत. हे सर्व पुरुष संत म्हणून गणले जात. तरी यांचे ग्रंथांचीं पारायणें घरोघर ऐकूं येत नाहींत. यांचे ग्रंथांचा प्रसारहि फारसा झालेला दिसत नाहीं. यांचे ग्रंथ संशोधकांना प्रयासानें शोधावे लागतात. पण श्रीधराचे ग्रंथ गांवोगांव पसरलेले आढळतात; व त्याच्या ग्रंथांचीं पारायणें घरोघर ऐकूं येतात.

श्रीधराच्या ग्रंथावरील महाराष्ट्राच्या प्रीतीचें एक कारण असें दिसते कीं, श्रीधराच्या मागें त्याच्या अनेक पूर्वजांची पुण्याई आहे. आठ-दहा शिष्यांच्या तपोबलाचा त्याला पाठिंबा आहे. "शुद्ध बीजा पोटीं। फळें रसाळ गोमटीं" अशी त्याची पूर्वपरंपरा आहे. आणि हें असून त्याचें स्वतःचें बळहि त्यास कमी नाहीं. निर्मळ आयुष्यक्रम, सच्छील वर्तन, शुद्ध अंतःकरण, दृढ आत्मविश्वास हीं सर्व त्याचे ठिकाणीं असल्यामुळें त्याचे ग्रंथ साहजिकपणेंच लोकांच्या आदरास पात्र झाले. ज्याचें वर्तन किंवा आयुष्यक्रम चारचौघांत उजळपणानें सांगण्याची सोय नाहीं, ज्याच्या आईचें चरित्र दिवसा भर सभेंत सांगतां येण्याजोगें नाहीं व जिची माहितीहि फारशी नीट नाहीं, बरें, आईची कांहीं तरी माहिती झाली तर बापाचा तितकाहि पत्ता नाहीं, अशांचे ग्रंथ महाराष्ट्र केव्हांहि पूज्य मानणार नाहीं. भाविक

आदरानें ते हातीं धरणार नाहीं. महाराष्ट्रांत जातीची चाड नाहीं पण नीतीची चाड फार जबर आहे. जनाबाईसारख्या दासीचे, बाका-सारख्या कुंभारणीचे, चोखा मेळ्याच्या बायकोसारख्या महारणीचेंहि कवित्व महाराष्ट्र फार आदरानें व प्रेमानें डोक्यावर घेईल. पण कोणा नवरा टाकलेल्या बाईचें किंवा पापबुद्धि विदुषीचें कवित्व कितीहि विद्वत्ताप्रचुर असलें तरी अस्सल महार्ष्ट्रायाला तें वंदनीय होणार नाहीं. अशी महाराष्ट्राची मनोरचना आहे; व महाराष्ट्रांतील लोक खऱ्याखुऱ्या शुद्ध वर्तनाचे असे चहाते आहेत. तेव्हां हेंहि एक कारण थोडेंफार श्रीधरस्वामीच्या ग्रंथांवरील प्रेमभावाचें असूं शकेल. पण याहिपेक्षां दुसरें बलवत्तर कारण असें आहे कीं, श्रीधर जें लिहिणें तें स्वच्छ साध्या भाषेंत लिहितो. तो विद्वत्तेच्या भानगडींत न पडतां बहुजनसमाजाची नेहमींचीच भाषा प्रायः वापरतो. त्याचे शब्द, त्याचीं प्रमेयें व त्याच्या कथा आबालवृद्धांना, स्त्रियांना, मुलांना व शूद्रांनाहि सहज समजतील, अशा रितीनें तो सांगतो. त्याचे ग्रंथ म्हणजे एक अवीट पक्वान्न आहे. चातुर्मासांत श्रावण महिन्यांत रोज संध्याकाळीं सभोंवार असलेल्या शेतकऱ्यांना मध्यें पाटावर बसून पोथी लावणारा (वाचणारा) वक्ता श्रीधरी ग्रंथ वाचतांना पाहून मनाला मोठें समाधान वाटतें. ती सर्व संकटांचा विसर पाडणारी, श्रमभाग हरणारी, अरसिकांनाहि गुंगवणारी, अनंतरस-वाहिनी, दुःख-दारिद्र्य-परिहारिणी अशी श्रोत्यांच्या कर्णसागराला भेटण्याकरितां प्रेमभरानें उचंबळून वाहत जाणारी गोड वाणी यथेच्छ कथापान करीत वाहत आहे, हा देखावा पाहून मन प्रसन्न होतें; व त्या देवादिकांच्या आणि भारतीय युद्धाच्या नितांत रम्य कथा ऐकून ते श्रोते डोलूं लागले म्हणजे खरोखर या कवीबद्दल धन्यता वाटते.

पांडवप्रताप ग्रंथ रचिताना कोणत्या ग्रंथांचा आधार घेतला हें शेवटीं कवीनें सांगितलें नाहीं. पण असें दिसतें कीं, मूळ संस्कृत ग्रंथांशिवाय इतर प्राकृत-महाराष्ट्र-भारतग्रंथांचाहि कवीनें पुष्कळ

उपयोग करून घेतला आहे, मुक्तेश्वराच्या भारती टीकेचा तर श्रीधरानें फार उपयोग केला आहे. मुक्तेश्वराचीं आदि, सभा, वन, विराट अशीं चार पर्वें प्रसिद्ध आहेत. या चार पर्वांतील कथानकानें पांडवप्रतापाचे सुमारें पसतीस अध्याय व्यापिले आहेत; व हे सर्व अध्याय श्रीधरानें मुक्तेश्वरी पर्वांच्याच आधारानें रचिले आहेत. यांत मुक्तेश्वराच्या सर्व चांगल्या कल्पना व अशा कल्पनेच्या सर्व भराऱ्या यांचा श्रीधरानें समावेश केला आहे. अनेक ठिकाणीं शब्दहि तेच ठेविले आहेत. किंबहुना मूळ व्यासग्रंथाचें जसें मुक्तेश्वरी ग्रंथ हें सार, तसेंच मुक्तेश्वरी पर्वांचे पांडवप्रतापांतील ३५ अध्याय हे सार होत. अर्थात् हे सर्व अध्याय फारच सरस आहेत. या पुढील २९ अध्यायांतहि श्रीधराची वाणी निर्मळ सुवर्णाप्रमाणें सतेज व अनेक रस स्रवणारी अशीच आहे. द्रोणपर्वांतील अभिमन्युवधाची व स्त्रीपर्वांतील अनेक वीर रणसमरांगणीं पडलेले पाहून आक्रोश करणाऱ्या राजस्त्रियांची हकीकत अत्यंत चित्तवेधक आहे.

देखोनि अभिमन्यूनें पाडिलें रण । आश्चर्य करिती कृष्णार्जुन ।
बहुत केलें रणशोधन । परि बाळ न कोठें सांपडे ॥
तों मजूळ श्रीहरीचें स्मरण । ऐकतां होय अर्जुन ।
'हे जगनिवास मनमोहन । मधुसूदन श्रीहरी ॥'
अभिमन्यूचे शब्द कोमळ । अर्जुनें ओळखिले तत्काळ ।
रथारूढ पार्थवननोळ । आले जवळ धांवोनी ॥
सौभद्रें नेत्र उघडिले । पार्थें अंग धरणीस टाकिलें ।
अभिमन्यूस पोटा धरिलें । पार्थें मांडिलें शोकातें ॥

---

१. मुक्तेश्वरी ग्रंथांवर श्रीधराची अतीशय प्रीति होती. कदाचित् ते श्रीधराला मुखोद्गतहि येत असतील, असें दिसतें. हरिविजयादि ग्रंथांतहि मुक्तेश्वरी काव्याची प्रतिमा ठिकठिकाणीं स्पष्ट आहे. अर्थात् अनाठायीं शृंगार हा मुक्तेश्वराचा दोषहि यांत आला आहे, हें निराळें सांगणें नको. श्रीपांडुरंगानें 'निजधामवृत्त लिहूं नको' हें सांगितलें त्यापेक्षां, 'मुक्तेश्वरी काव्य तूं वाचूं नको' असें श्रीधरास सांगितलें असतें तर बरें होतें !

" अरे माझिया सुकुमारा । बाळा अभिमन्या सुंदरा ।
मजवांचन राजकुमारा । कां आलासि रणभूमी !" ॥
अभिमन्यु स्मरत नामावळी । जवळी आले कृष्ण वनमाळी ।
उकसाबुकसी ते केळीं । पार्थवीर स्फुंदत ॥
पार्थाचिया कानीं । हळूच अभिमन्यू बोले वाणी ।
'मी पडिलों घोर रणीं । याचा खेद मज वाटेना ॥
मी निश्चेष्टित पडिलों एथें । मज लत्ताप्रहार केला जयद्रथें ।
तेणें सर्वांग तिडकतें । हें मज दुःख अतिभारी' ॥
ऐसें ऐकून वचन । संबोखूनि बोले अर्जुन ।
'तुझें उसनें मी घेईन । कांहीं खेद न करावा' ॥

याप्रमाणेंच वीरांच्या प्रेतांनीं रणभूमि आच्छादिली होती तेव्हां—

आपुल्या पतीचीं प्रेतें पाहुनी । शोक करिती नितंबिनी ॥
सुभद्रा उत्तरा शोधुनी । अभिमन्यूसी आलिंगिती ॥
अभिमन्यूचें स्वरूप जाण । प्रत्यक्ष केवळ श्रीकृष्ण ।
असो देशोदेशींच्या स्त्रिया येऊन । आपुले पति शोधिती ॥
अभिमन्यूलागीं गांधारी । बहुत शोक करी ते अवसरीं ।
'हे बाळा, नरवीर केसरी । कोमलांगा कमलनेत्रा ॥
हे महाराज गुरु द्रोण । हे धीर वीर उदार कर्ण' ।
कर्णस्त्रिया सर्व मिळोन । रणांगणी आरडती ॥
हा शकुनि वीर पडिला एथ । हा दुःशीलापती जयद्रथ ।
बहुतीं रक्षिला, परी मृत्य । न सोडीच तयातें ॥
हा पडिला माद्रीचा बंधु शल्य । हा भगदत्त पडिला विशाल ।
हा भीष्म सूर्य केवळ । शरपंजरी पहुडला ॥
नारायण हरि गोविंद । ऐशा नामांचा दिव्य प्रबंध ।
सहस्रनामावळी प्रसिद्ध । भीष्मदेव स्मरण करी ॥
कोणाशीही न बोले वचन । निज रूपीं सावधान ।
सकल स्त्रिया करूनि नमन । प्रदक्षिणा करून जाती ॥
देहावरी नाहीं भीष्म । स्वरूपीं पावला विश्राम ।
नारी नर आप्त परम । कोणासहि नेणें तो ॥

तो पिंडब्रह्मांडावेगळा । जैसें कमलपत्र नातळे जळा ।
तैसा तो ज्ञानी जाहला । त्याची लीला कोण जाणे ॥
असो गांधारी म्हणे ते वेळां । 'श्रीकृष्णा पाहे रे डोळां ।
स्नुषा तळमळती सकळा । जीवनावीण मीनापरी ॥'
सात्यकीनें मारिला । हा भूरिश्रवा एथें पडिला ।
हा सोमदत्त रणीं मृत्यु पावला । बाल्हीक वृद्ध तैसाची ॥
छपन्न देशींचे नृपती । धावोनि आल्या त्यांच्या युवती ।
दीर्घ स्वरें हाका देती । नाहीं मिती शोकातें ॥
द्रुपद विराट द्रोणें मारिले । ते हे दोघे एथें पडिले ।
असो शाण्णव कुळींचे पहुडले । राजे सर्व समरांगणीं ॥
ऐके कृष्णा शामसुंदरा । 'तूं उपलव्यासि गेलास माघारा ।
दळासह माझ्या कुमारां । पाणी तेव्हांच सोडिलें ॥'

या हृदयद्रावक वर्णनाला महाराष्ट्र काव्यांत दुसरी जोड क्वचित् सांपडेल. याला एक जोड शिवलिलामृतांतील श्रियाळचरित्राची आहे; आणि 'शिवलीलामृत' हा ग्रंथ श्रीधरस्वामींचाच आहे. पांडवप्रतापानंतर सहा वर्षांनीं श्रीधरानें 'शिवलिलामृत' लिहिलें. हा ग्रंथ कवीनें शके १६४० विलंबी-संवत्सरीं, फाल्गुनी पौर्णिमेस 'ब्रह्मकमंडलूच्या तीरीं। द्वादशमती नाम नगरी'। स म्हणजे बारामतीस साद्यंत लिहिला, असें त्यांत शेवटीं म्हटलें आहे. शिवलिलामृतापूर्वी दोन तीन वर्षे श्रीधरस्वामी 'पाथरी' येथें असतां त्यानीं १६३७-त 'जैमिनि–अश्वमेध' लिहिला; 'पांडवप्रताप' लिहितांनाच या ग्रंथाची कल्पना श्रीधरस्वामींच्या मनांत आली असावी; व लागलाच तो प्रतापानंतर लिहून टाकून मग लिलामृताकडे स्वामी वळले हें ओघानेंच झालें.

---

१. 'शिवलीलामृत' जुन्या बारामतींत काशिराजाचे ऊर्फ काशि-विश्वेश्वराचे देवळांत बसून लिहिला.

याच सुमारास म्हणजे शके १६४०-मध्यें राघो अप्पाजी कुळकर्णी ऊर्फ रघु कवि यानें 'ब्रह्मोत्तरखंड' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. यांत शिवलीलामृताचाच थोड्या फरकानें विस्तार केला आहे. यावरून शिव-लीलामृताचा प्रसार व त्याची लोकप्रियता यांची कल्पना करतां येईल.

वर लिहिलेल्या ग्रंथांखेरीज श्रीधराचें वसतिस्थान श्रीक्षेत्र पंढरपूर, तेथील श्रीविठ्ठलस्तुतिपर 'श्रीपंढरीमाहात्म्य' आणि याचें कुलदैवत श्रीमार्तंड मल्हारी, याच्या स्तुतिपर 'मल्हारीविजय' असे दोन ग्रंथ श्रीधराचे प्रसिद्ध आहेत. याशिवाय अप्रसिद्ध अशी विपुल ग्रंथरचना श्रीधरानें केली असून तीपैकीं पुष्कळच त्याच्या वंशजाकडे व शिष्यवर्गाकडे अजून आढळते.

श्रीधरस्वामीची ओवीबद्ध रचना बरीच प्रसिद्ध आहे, पण त्याची श्लोकबद्ध रचना प्रसिद्ध नाहीं. याकरितां त्याच्या ध्रुवचरित्रांतून कांहीं श्लोक येथें देतों:—

येके दिनी भूपति ये सहित । येकासनी खेळत जाण द्यूत ॥
तों बाळ आला ध्रुवराज तेथें । प्रणाम केला नृपराणियेतें ॥
परम निर्दय पापिणी ते खरी । ढकलिला चरणें धरणीवरी ॥
पडत तो तळि, बालक रुदना । करित, आठवितो मधुसूदना ॥
सुशिल गेला त्वरें मंदिरासी । स्फुंदे, रडे, सांगत मायपासीं ॥
'बारे सख्या सुंदर पुत्रराया । गेलास कां तूं मजपासुनियां ॥'
बोलोन ऐसें निज बाळकाला । अश्रू आले सद्गद कंठ जाला ॥
तयों निघे बाळ जाई वनासी । हिंडे वनीं चिंतित माधवासी ॥
जगज्जीवना अंतरीं जो पहातो । वनीं बाळ तो प्रेमभावें बहातो ॥
अती सद्गदें दाटला कंठ तेव्हां । त्वरें धावला प्रेमळांचा विसांवा ॥

---

१. याचीं लहान मोठीं सुमारें पाउणशें (७५) प्रकरणें मीं पाहिली आहेत. यांपैकीं गोकुळलीला (३ भाग) व हरिश्चंद्र आख्यान (३ भाग) हीं साधारण मोठीं असून बाकीं लहान-लहान आहेत. कांहीं श्लोकबद्ध आहेत व कांहीं संस्कृत ग्रंथहि आहेत. गयाविलास, तत्त्वगीता हे ग्रंथ संस्कृत आहेत. तत्वगीतेच्या शेवटीं म्हटलें आहे:—

ब्रह्मानंदप्रसादेन तत्वगीता प्रकाशिता ।
श्रीधरानंदनाम्ना वै सर्वलोकहिताय च ॥

इति श्रीआनंदसांप्रदायभूषणश्रीब्रह्मानंदपुत्रश्रीधरानन्देन विरचिता तत्वगीता समाप्ता ॥

महाराष्ट्रकवींत छापलेलें दासोपतचरित्र या श्रीधराचें नाहीं. तो कोणी निराळा श्रीधर असावा.

देखोनियां त्या कमलानिवासा । वदे स्तुती बालक गोड कैसा ।।
धरीं हृदीं बाळक श्रीहरी तो । म्हणे, 'तुझें संकट मी हरीतो' ।।
बोले हरी, 'काय तुझी अपेक्षा?'। तेव्हां म्हणे, 'दे तव दास्यदीक्षा ।।
देईं मला अक्षय दास्य देवा । सदा मुखीं कीर्तन नामसेवा ।।
दत्तात्रया श्री गुरुदेव देवा । श्री ब्रह्ममूर्ती तव पाद सेवा ।।
अभंग हें तूं मजलागिं देई । ठेवीं तुझ्या श्रीधर राज (नित्य) पाईं ।।'

श्रीधरानें आपल्या बहुतेक सर्व ग्रंथांत आपली गुरुपरंपरा दिली आहे. ती अशी : रामानंद–अमलानंद–सहजानंद– पूर्णानंद–दत्तानंद–ब्रह्मानंद. श्रीधराच्या बायकोचें नांव पार्वती. पूर्ववयांतच पितृऋण फेडून श्रीधरानें संन्यासदीक्षा धारण केली असावी. श्रीधराच्या आईचें नांव सावित्री व बापाचें नांव ब्रह्मानंद. आपल्या पित्याचें पूर्वाश्रमींचें नांव श्रीधर कोठें देत नाहीं व त्याच्या विद्यमान वंशजासहि तें माहीत नाहीं. श्रीधराला त्याच्या पित्यापासूनच, व त्याच्या पित्याला त्याचा पिता म्हणजे श्रीधराचा पितामह जो दत्तानंद त्याजपासूनच उपदेश मिळाला. पित्यानें पुत्रास गुरूपदेश देऊन मंत्र सांगावा, हा संप्रदाय या कुटुंबांत अजूनहि आहे. श्रीधराचें कुटुंब महाराष्ट्रांतील एक अत्यंत भाग्यशाली व फार विद्वान् असें होतें. प्रसिद्ध रंगनाथ स्वामी निगडीकर हे याच कुटुंबांतले. ते व आत्यास्वामी हे श्रीधराचे चुलत चुलते. म्हणजे श्रीधराचा आजा व या दोघांचा बाप हे सख्खे भाऊ. या तिघांची रचना प्रसिद्ध आहे. श्रीधराचा आजा 'दत्तानंद' व पिता 'ब्रह्मानंद' या दोघांचेहि ग्रंथ त्याच्या वंशजांकडे आहेत. विठ्ठल ऊर्फ आत्यास्वामीचा पुत्र 'काशीराज' याचीं पदें प्रसिद्धच आहेत. पदांत हा आपणास 'रंगानुजतनुज' असें म्हणवितो. श्रीधराचा पिता ब्रह्मानंद याचा 'आत्मप्रकाश' या नांवाचा ग्रंथ आहे. हा यानें शके १६०३-मध्यें पुरा केला आहे. याचे अभंग व पदेंहि आढळतात. याचें एक पद असें—

ब्रह्मपुरी पेठ तेथें, चला जाऊं हाटा ।
अभंड गांवें तिन्हीं द्वारा, वाहताति वाटा ।।
चारि विदी, आठ कोण, केणें असे तेथें ।
सौदा सुत्त करा वेगिं सद्‌गुरुचे हातें ।।
कौल करार पूर्ण दिल्हा, असे सहजानंद ।
दान जकाती माफ केलि, ब्रह्मीं ब्रह्मानंद ।।
**ब्रह्मानन्द** म्हणे आतां, हाणा हातोफळी ।
नेघे त्याच्या तोंडावरि ती वाटेचि धूळी ।।

ब्रह्मानंद हा शके १६१५-मध्यें श्रीमुख संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस रविवारीं समाधिस्थ झाला. यासंबंधाचा श्रीधराचा पुढील श्लोक याच्या वंशजांच्या दप्तरांत आढळला.

श्रीमुख संवत्सर नाम ज्याचें । मार्गेश्वरीं शुद्ध बीजेसि साचें ।
श्रीपंढरी क्षेत्र अबाव कीर्ति । निवास झाला यतिराज मूर्ती ।।
श्रीचंद्रभागातिर जेथ आहे । भीमा पुढें वाहत पूर्ण पाहे ।
समाधि तेथें यतिराजयाची । अनाथबंधू गुरु माझियाची ।।

श्रीधराचा पुत्र दत्तात्रय हाहि कांहीं रचना करी. यानें रचिलेल्या आरत्या, पदें वगैरे श्रीधराच्या वंशजांकडे आहेत. दत्तात्रयाची रचना साधारण प्रतीचीच आहे. व ती विपुलहि नाहीं.

श्रीधराच्या कुटुंबांतील व वंशांतील आणखीहि अनेक पुरुषांनीं ग्रंथरचनेचा उद्योग केला आहे यांवरून हें सर्व कुटुंब फार विद्याचार-संपन्न व धर्मशील असून महाराष्ट्र–सारस्वताचा आखाडा याच्या कुळांत पिढीजाद होता, असें स्पष्ट दिसतें. श्रीधरस्वामी हे शके १६५१-मध्यें माघ वद्य तृतीयेस सोमवारीं समाधिस्थ झाले. यांची

१. श्रीधराचा जन्म शक शके १६०० असा आधुनिक ग्रंथकार देतात. पण यास आधार काय, तें कळत नाहीं. श्रीधराचें विद्यमान वंशज आपल्या या महाप्रसिद्ध पूर्वजाचा जन्मकाल किंवा जन्मशकदेखील आपणांस माहीत नाहीं, असें सांगतात. श्रीधराचा वडील मुलगा दत्तात्रेय यानें एक आरती

[पान ५७१ पाहा.]

समाधी श्रीक्षेत्र पंढरपूर येथें कुंभारघाटावर श्री ब्रह्मानंदांच्या समाधी-शेजारींच आहे. श्रीधराच्या वंशजांस, श्रीछत्रपती शाहूमहाराज व नंतर श्रीमंत बाजीराव बल्लाळ व बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांनीं दिलेल्या सनदा त्यांचेजवळ आहेत.

---

[पान ५७०-वरून]

रचिलेली त्याच्या वंशजांकडे आहे. तींत "सुमाघ वद्य तृतिया शशिवासर उदयीं। सुसौम्य वत्सरीं सौम्यायनीं विठ्ठलपायीं ॥ सोळा शत एकावन अर्यमउडुसमयीं। पंढरपुर सत्क्षेत्रीं समाधि ते ठायीं ॥" असा एक श्लोक आहे. वर लिहिलेली श्रीधराची माहिती व वंशावळ याच्या वंशजांचें दफ्तर, श्रीधराचे वंशज रा. रा. कृष्णाजी आप्पाजी नाझरेकर, देशपांडे यांनीं १९०४ व १९०५ सालीं मला वेळोवेळीं लिहिलेलीं पत्रें आणि रंगनाथस्वामींचे वंशज रा. रा. अनंत गणेश घोडके, निगडीकर यांचीं पत्रें यांच्या आधारें दिली आहे. पुढील वंशावळहि श्रीधराच्या वंशजांकडून मिळाली तशीच दिली आहे हिजवरून दत्तोपंतास ब्रह्माजीपंत हा एकच मुलगा होता असें होतें. पण श्रीधराच्या मल्हारीमहात्म्यांत 'ज्ञानानंद ब्रह्मानंद। उभय बंधु जगप्रसिद्ध। त्यांचे चरणाब्जीं मिलिंद। श्रीधर स्वानंद अभंग ॥' अशी ओंवी आहे. तसेंच श्रीधराच्या संतमालिकेंत—

'ज्ञानाब्धीचा चंद्र तो पूर्ण साजे। ब्रह्मानंदा ज्येष्ठ बंधू विराजे।
ज्ञानानंदा वर्णु मी जाण काय। बोले ज्याच्या कल्पना शांत होय ॥'

असा एक श्लोक आहे. श्रीधरस्वामींनीं १४-व्या वर्षीं संन्यासदीक्षा घेतली हा समज अगदीं खोटा दिसतो. त्यांचे चिरंजीव दत्तात्रय व मनोहर यांना अनुक्रमें श्रीमंत बाजीरावसाहेब व नानासाहेब पेशवे यांनीं जमिनी इनाम दिल्याच्या सनदा आहेत, त्यांत 'दत्तात्रय गोसावी बिन श्रीधर गोसावी' व 'मनोहर गोसावी बिन श्रीधर गोसावी' असे उल्लेख आहेत. यावरून व यांचे येथील एका वाटणीपत्रावरून हें स्पष्ट दिसतें.

## श्रीधरस्वामींचा वंशवृक्ष–रंगनाथ स्वामींच्या शाखेसह.



मागें पृ. ४३७ वर रंगनाथस्वामी निगडीकरांच्या आख्यानांत त्यांची परंपरा दिली आहे. त्यावरून श्रीधरस्वामींचीहि गुरुपरंपरा लक्षांत येईलच. येथें या परंपरेंतील पुरुषांच्या समाधी कोठें कोठें आहेत, त्याचें टाचण देतों :—

| नांव | समाधीस्थान | नांव | समाधीस्थान |
|---|---|---|---|
| सदानंद | ........निंब(कृष्णातीरीं) | सहजानंद | ........कल्याणी |
| रामानंद | ........काशी | पूर्णानंद | ........गोलवण |
| अमलानंद | ........पेंबर | दत्तानंद | ........नाझरें |
| गंभीरानंद | ........रामेश्वर | ब्रह्मानंद | ........पंढरपूर |
| ब्रह्मानंद | ........पंढरपूर (?) | श्रीधर | ........पंढरपूर |

वर सांगितलेल्या माहितीवरून श्रीधरस्वामींची परंपरा केवढी दांडगी होती व या परंपरेंत केवढी ग्रंथसंपत्ति निर्माण झाली आहे याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. श्रीधराच्याच प्रसिद्ध ग्रंथांची ग्रंथसंख्या अर्ध-लक्षापेक्षां जास्त आहे. असे ग्रंथ निर्माण करणाऱ्या परंपरा या काळीं महाराष्ट्रांत अनेक होत्या. यांपैकींच रामदासी परंपरा ही एक होय. या परंपरेपैकीं श्रीधरस्वमींशीं समकालीन असे **गिरिधरस्वामी** हे चांगले ग्रंथकार होते. हे कधीं जन्मले हें माहीत नाहीं; पण हे शके १६५१-मध्यें म्हणजे श्रीधरस्वामी ज्या सालीं समाधिस्थ झाले, त्याच सालीं वैशाख शुद्ध अष्टमीस समाधिस्थ झाले. हे मूळ मिरज तासगांवा-कडचे राहणारे. पण पुढें बीडप्रांतीं मौजे ‘ इट ’ या गांवीं ते राहावयास गेले. हल्लीं यांचा तेथें एक मठ आहे.

रामदासांच्या नंतर ‘ कांहीं कवयित्रीं ’ ची हकीकत सांगितली. त्यांत ‘सीतास्वयंवर’ रचणाऱ्या वेणूबाईची हकीकत आली आहे. या वेणूबाईची शिष्यीण बाइयाबाई आणि बाइयाबाईचा शिष्य **गिरिधर**. यास लोकांत ‘ **गिरमाजी** ’ असें म्हणत. या गिरिधराच्या ‘ समर्थप्रताप ’ ग्रंथाचा उल्लेख पूर्वींच आला आहे. या समर्थप्रताप ग्रंथासुद्धां चाळीस

ग्रंथ व श्लोक वगैरे हजार-पंधराशें आणखीं पद्यें इतकी याची रचना हल्लीं उपलब्ध आहे.[1] समर्थप्रतापांत समर्थांच्या म्हणजे रामदासांच्या चरित्रांतील हकीकती आल्या आहेत. यांतून कांहीं प्रत्यक्ष पाहून व कांहीं चांगल्या आधारानें माहिती मिळवून सांगितल्यामुळें या ग्रंथास एक विशेष महत्त्व आलें आहे. गिरिधरानें आपल्या परंपरेच्या उपास्य दैवताचे—रामचंद्राचे—चरित्रपर पांच रामायणें लिहिलीं आहेत. १ अब्द रामायण, २ मंगलरामायण, ३ छंदोरामायण, ४ सुंदर रामायण व ५ संकेतरामायण. हीं सर्व रामायणें चांगलीं कल्पून रचिलेलीं दिसतात. अब्दरामायणांत रामचंद्राचे जन्मापासून निरनिराळ्या गोष्टी, त्याचें वयमान व महिना, तिथी वगैरे सांगून दिल्या आहेत. राम सिंहासनावर बसले ते वेळीं त्यांचें वय ४२ व सीतेचें वय ३३ होतें, असें यांत म्हटलें आहे. हें याच्या रामायणांपैकीं सर्वांत लहान रामायण आहे. याचे अवघे १८३ श्लोक आहेत. याचें सर्वांत मोठें रामायण 'संकेतरामायण' हें होय. हें गिरिधरानें शके १६४४-मध्यें गोदातीरीं संपूर्ण केलें, असें याचे शेवटील कांडांत म्हटलें आहे. या रामायणाचे १८८ सर्ग असून ओंवीसंख्या साडेसहा हजारांपेक्षां जास्त आहे. सुंदर रामायण हें लवांकुशांनीं आपल्या अपूर्व गायनानें गाइलेलें रामचरित्र आहे. यांत

---

१. ही व पुढील बरीच माहिती 'समर्थप्रतापा'च्या प्रस्तावनेवरून घेतली आहे.

२. या अब्दरामायणांत गिरिधरस्वामींनी रामचरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांच्या मित्या व त्या त्या वेळीं असलेलें रामाचें वय दिलें आहे हें खरें; पण मूळ वाल्मीकि रामायणांत वाल्मीकीनें अशा मित्या दिलेल्या नाहींत किंवा अशा मित्या कळणेचें साधनहि त्यांत नाहीं. तसेंच यांत दिलेल्या प्रसंगांच्या वेळीं रामाचें वय काय होतें, हेंहि वाल्मीकी-रामायणांत या सर्व प्रसंगांसंबंधें दिलेलें नाहीं. राम वनवासास जातेप्रसंगीं सीतेच्या तोंडीं एक वाक्य आहे कीं, वनवासाच्या आरंभीं रामाचें वय २७ वर्षांचें होतें व माझें वय १८ वर्षांचें होतें, असा उल्लेख वाल्मीकि रामायणांत आहे.

दोधकवृत्ताचे ७४०, श्लोक आहेत. याशिवाय ज्यांत रामाची करुणा मोठ्या प्रेळमपणानें भाकिली आहे असें 'श्रीकरुणाराम' नांवाचें याचें एक प्रकरण आहे. श्रीरामाची करुणा भाकिली, म्हणजे त्याचा नितान्त भक्त जो मारुती आणि मग मारुतीचा भक्त किंवा अवतार जो रामदास त्या दोघांचीहि करुणा भाकणें ओघानेंच आलें. या दोघांचें संबंधाचीं हीं अशीं दोन प्रकरणें आहेत. एक 'करुणारुद्र' व दुसरें 'समर्थकरुणा'. करुणारुद्रांत मारुतिरायाचें चरित्र क्रमशः वर्णिलें आहे. याचे (११×११) १२१ श्लोक आहेत. हीं तिन्हीं प्रकरणें ११ अक्षरांच्या स्वागता वृत्तांत रचिलीं आहेत. रामदासी सांप्रदायांत अकरा हा आंकडा विशेष प्रिय आहे, हें प्रसिद्धच आहे. या सर्व प्रकरणांच्या शेवटीं मात्र एकएक श्लोक शार्दूलविक्रीडिताचा घातला आहे. जसें—

इत्यादी करुणा करूनि बहुसा प्रार्थूनि प्राणाधिपू
नाना गूणरुपें यथामतिरुपें गाऊनि वज्रीवपू ।
रुद्रा रुद्ररुपेंचि श्लोक जाहले रुद्राक्षरीं मंत्र हा
रामोपासक वीनवी भिमरुपी आनंद हा कंद हा ।। (श्रीकरुणारुद्र)

या रामदासी परंपरेंतील गिरिधरानें इतर दैवतांच्या स्तुतिपरहि ग्रंथ लिहिले आहेत. 'कृष्णकथातरंग' या ग्रंथांत यानें कालियामर्दन, रासक्रीडा, वगैरे अनेक कथांचें वर्णन केलें आहे. तसेंच 'हरिलिला' याहि ग्रंथांत कृष्णलिलांचेंच वर्णन केलें आहे. या 'हरिलिले'चे अकरा समास असून त्यांत ४५४ श्लोक आहेत. यांत—

रघुविरभजनाची मुख्य आजन्मदीक्षा । यदुविरभजनाची रामरूपें अपेक्षा ।।
यदुपतिरघुराजीं ऐक्यरूपें मिळाला । श्रवण करुत आतां संत श्रोते तयाला ।।

असें यदुवीराच्या लीला गाण्याचें स्पष्टीकरण दिलें आहे. या कवीनें

---

२. रामकथा हें लवकुश गाती । सुरमुनि चकित ते पाहताती ।।
रामरुपें स्वरुपें दिसताती । कोण कुमार प्रभू म्हणताती ।।
काय अपूर्व हें गायन यांचें । रामरुपेंचि स्वरूप जयांचें ।।
कोण जनक निजस्थान तयांचें । उत्कट तप वाल्मिकसखयाचें ।

रचिलेल्या सर्व ग्रंथांत 'निवृत्तिराम' हा फार सुंदर ग्रंथ आहे. यांत आपणास अनुभव येत जाऊन निवृत्ति कशी कशी होत गेली, हें 'समर्थ देवें आज्ञा केली' त्यावरू या ग्रंथांत लिहिलें आहे. तसेंच आपल्या आयुष्यांतल्या स्मरणीय गोष्टींचीं प्रकरणें गिरिधरानें आस्थापूर्वक व प्रेमानें लिहून ठेविलीं आहेत. गिरिधराला श्रीसमर्थांचें प्रत्यक्ष दर्शन झालें, व त्या वेळीं गिरिधराच्या मनानें व शरीरानें त्या महापुरुषाच्या चरणीं लोटांगण घालुन घट्ट मिठी मारिली तो रोमांचव्यासकाय करणारा प्रसंग गिरिधरानें 'श्रीस्वामी दर्शन' या प्रकरणांत वर्णन केला आहे. कांहीं दिवस रामदासांच्या सन्निध राहिल्यावर शेवटीं 'एकांतांत बुद्धिवाद सांगून' यास जाण्याची आज्ञा मिळाली तेव्हां गिरिधराच्या डोळ्याला पाणी आलें

'असूं आलें मग पल्लवें पुसिलें। आश्वासन दिल्हें काय देवें ॥'

समर्थांनीं त्यास सांगितलें—

विचाराचा अर्थ नित्य बाळगोनी। खंति करितोसी नवल मोठें ॥
नवल मोठें वाट भक्तांची आवडी। राहों द्यावी जोडी भक्ति प्रेम ॥
सर्वकाळ आहों वचनप्रमाण। प्रसंग जाणून भेटी आणूं ॥
भेटी आणूं कांहीं खंति न करावी। नौमी आठवावी रात्रिदिवस ॥

याप्रमाणें सांगून श्रीसमर्थांनीं गिरिधरास अनेक तऱ्हेचा बोध केला व एक श्रीदासबोधाची पोथी त्यास देऊन जाण्यास निरोप दिला; आणि आशिर्वाद दिला कीं,

'लोकामध्यें आहे राम साभिमानी। जनीं जनार्दनीं सुखें असा ॥

तेव्हां गिरिधर म्हणतो:—

उभा ठेलों रूप न्यहाळिलें दृष्टीं। साष्टांगीं हे सृष्टी स्पर्शलीसे ॥
स्पर्शिलीं पाउलें मस्तक ठेविला। मग धीर केला निघावया ॥

आणि मग गिरिधर तेथून निघून देवदर्शन घेऊन पुढें निघाले. हा प्रेमळ प्रसंग 'देवदर्शन' या प्रकरणांत वर्णन केला आहे. गिरिधर एके वेळीं काशीयात्रेस गेले होते. त्याच्या वर्णनपरहि त्यांनीं एक अभंगात्मक प्रकरण लिहिलें आहे.

सारांश मागें उल्लेखिलेल्या निरंजनमाधवाप्रमाणेंच या गिरिधरांचीहि रचना नानाप्रकारची आहे. हे शके १६५१–मध्यें समाधिस्थ झाले, हें वर आलेंच आहे. यांची समाधी मोंगलाईंत बीड येथें नदीच्या कांठीं आहे. यांचे मागें यांची साळूबाई नांवाची एक मुलगी होती, तिनें यांची परंपरा चालविली.

या गिरिधराला आणखी तीन धाकटे भाऊ होते. त्यांचीं नांवें त्रिंबक, यशवंत व भीम. हे तिघेहि जण रामदासी संप्रदायांत असून बाइयाबाईचेच शिष्य होते. यांपैकीं सर्वांत धाकटा जो भीम याचा मठ व शिष्यपरंपरा अजून बीड येथें आहे. मराठींत महाभारताच्या कांहीं पर्वांवर टीका लिहिणारा कवि **नरहरि मोरेश्वर** हा या भीमस्वामींचा शिष्य होय. याचें सबंध नांव नरहर मोरेश्वर देशपांडे असें होतें. पण लौकिकांत लोक याला 'बचाजी' असें म्हणत. यानें आपणासंबंधींची बरीच माहिती आपल्या ग्रंथांत दिली आहे. ती त्याच्याच शब्दांनीं येथें देतों—

कवीचें बसतिस्थान–**बीड** परडे मध्य भांगीं । **बालाघाट** विख्यात जगीं ।
बिट परगणा शोभे भांगीं । शेंदुर जेवीं स्त्रियांच्या ॥
बालाघाटीं ईट नगरी । महा सुरवाड रम्य पुरी ।
,, आईबाप– नामें **मोरोजी नरहरी** । देशपांडा तेथिंचा ॥
त्याची भार्या गुणेकराशी । नाम **भवानी** भवानीतोषी ।
,, नांव – हरिभक्त जन्मला पुत्र कुशीं । **नरहरी**, दास संताचा
पाळणा नांव **नरहरी** । ठेविलें केलें लालन परी
,, लौकिक नांव–**बच्या** म्हणतां निज वैखरी । लोकविहारी **बच्याजी** ।
,, उपासना– **श्रीनृसिंह** उपासना परंपरा । .........
,, कुळगोत्र– भृगुकुळवंशाभरण । जमदग्निगोत्र उद्‌भव जाण ।
,, कुलस्वामीनी–माता सह्याद्रिनिवासिनी । भवानी **तुळजापुर**वासिनी ।
देवी भगवती कुलस्वामिनी । साह्य ग्रंथीं सर्वथा ।
,, गुरु– समर्थ श्रीगरु **भीमराज** । अवताररूपें रघुराज ।
,, संप्रदाय– समर्थसंप्रदायी कीर्तिध्वज । **रामदास** लौकिकी ॥

याप्रमाणें कवीनें आपली माहिती दिलेली आहे. याचीं उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण अशीं चार पर्वें उपलब्ध आहेत. याचें उद्योगपर्व शके १६८१-त व द्रोणपर्व १६९०-मध्यें पुरें झालें, असें त्या त्या पर्वांचे शेवटीं म्हटलें आहे. तसेंच याचें कर्णपर्व शके १६९१—च्या ज्येष्ठांत पुरें झालें. म्हणजे द्रोणपर्वानंतर आठ महिन्यांच्या आंतच कवीनें कर्णपर्व पुरें केलें. या कवीनें सबंध भारत लिहिलें नसावें, असें त्याच्या कर्णपर्वांतील

उद्योग भीष्म द्रोण कर्ण । चत्वारि पर्वें गुणैकरत्नें ॥
नरहरीमुखें सिंहाननें । प्रकट केलीं श्रवणार्थ्यां ॥

या उल्लेखावरून दिसतें. नरहरीची भाषा चांगली आहे व त्याचा रचनेचा झोंकनोकहि बरा साधला आहे. इतर अनेक मराठी कवींप्रमाणें मुक्तेश्वरी थाट उठविण्याचा यानें वारंवार यत्न केला आहे. वास्तविक पाहतां भाषेची रामदासी लकब याच्या लिहिण्यांत यावी, पण ती येत नाहीं. 'गोवा' वगैरे सारखे कांहीं शब्द क्वचित् स्थळीं आढळतात. नरहरी ऊर्फ बच्याजी हा चांगला बहुश्रुत व वाचनप्रिय मनुष्य दिसतो. आपल्या पूर्वींचे व आपल्या वेळचे पुष्कळ मराठी ग्रंथ यानें वाचिलेले असावेत. महीपती, मुद्गल वगैरेंच्या उपमा व कल्पना याचे ग्रंथांत आपणास भेटतात. तसेंच आपलें भारत लिहितांना मूळ व्यासकृत पोथी पुढें ठेवून हा लिहितो असें दिसतें; व आपल्या पूर्वींच्या मराठी ग्रंथकारांनीं मूळ पोथीला सोडून जेथें एखादी गोष्ट लिहिली असेल, तेथें हा तसा उल्लेख करितो. जयद्रथवधाचे वेळीं सुदर्शन सूर्याआड धरिल्याची गोष्ट किंवा अश्वत्थामा मारिला त्या वेळीं द्रोण धर्माकडे चौकशी करण्यास गेला त्याची हकीकत, मूळ व्यासकृतीपेक्षां दुसरे ग्रंथकार निराळी देतात. याबद्दल तो त्यांस खोड ठेवितो[१]. अश्वत्थामा

---

१. अभिमन्यु पडल्यावर त्याला जयद्रथानें लत्ताप्रहार केला या हकीकतीसंबंधेंहि नरहरी असाच प्राकृत ग्रंथकारास दोष ठेवितो. तो म्हणतोः—

प्राकृत कवींचीं वाग्वल्लरी । सौभद्र पडल्या भूमीवरी ।
लत्ताप्रहार मस्तकावरी । केला सैंधवें संतोषें ॥

मारिला, असें ऐकतांच, मारिला तो आपुला मुलगा, असें समजून द्रोण हतवीर्य झाला; आणि मग खरें कळण्याकरितां तो भोळा ब्राह्मण शत्रुपक्षाकडील धर्माकडे गेला, आणि तेथें तो मारिला गेला, ही हकीकत नरहरि पुढीलप्रमाणें सांगतो--

द्रोणाचार्य समरांगणीं । प्रज्वळला जैसा सहस्रकिरणी ।
बाणीं निवटिल्या सैन्यश्रेणी । पांचाळ सृंजय अमित ।।
गजाश्व रथी पदाती । मर्दोनी शवें भरिली क्षिती ।
विन्मुख वीर नले शक्ति । उद्विग्न वीर सर्वहि ।
तेव्हां नाटकी श्रीकृष्णनाथें । मत बोधोनी भीमसेनातें ।
मारोनी अश्वत्थामा गजातें । शब्द तव नामें फोडिला ।।
मारिला मारिला अश्वत्थामा । चहूंकडे हाचि हुमामा ।
ऐकोनि द्रोण ब्राम्हणोत्तमा । कासावीस तव मोहें ।
सत्य मिथ्या पुसतां धर्मा । येरू वदे अश्वत्थामा ।
मारिला म्हणतो वीरगरिमा । गज कीं नर नेणवे ।।
असत्येंसी वर्तला धर्मराज । तेणें उद्विग्न भारद्वाज ।
पुत्रशोकें निस्तेजतेज । धनुष्यबाण विसर्जी ।।
योगयुक्त प्रायोपवेशनीं । ऊर्ध्ववायु हरिचिंतनीं ।
प्राण सोडितां विचित्र करणी । दुष्ट पार्षतें केली पां ।।
खड्ग पुसोनि धावला त्वरा । वीरीं निषेध केला सैरा ।
अमान्य करुनी शिखा निकरा । वाम हस्तें कर्षिली ।।
घाव घालोनी कंठनाळीं । प्रदीप्त शिर पाडिलें तळीं ।
आहाकार वीरमंडळी । पार्थ दुःखें दुखावला ।।
ऐकतां क्षणीं क्रोधभरणी । द्रोणी प्रज्वळला युगांतवन्ही ।
जेवीं दाक्षायणी देह हवनीं । दाहतां शंभु ज्यापरी ।।
खदिरागार ज्वलितनयन । तप्त शरीर जैसा ज्वलन ।
किरण रोम थरकती त्राणें । स्फुरित वोष्ठ सरोषें ।।
क्रोधें प्रदीप्त श्राद्धदेवो । तैसा सर्वां गमला भावो ।
फोडिता जाहला मुखीं टाहो । काळमेघासारिखा ।।

म्हणे अपांडवी धरित्री । करीन आजी पहा नेत्रीं ।
नारायणशास्त्र विधियुक्त मंत्री । जपोनि आतां सोडितो ।।
यया अस्त्रासी निवारण । ब्रम्हांडगेहीं नाहीं जाण ।
पार्थी देखतां धृष्टद्युम्न । काळधामा वोपणें ।।
मम विक्रम बाहुवीर्य । अस्त्रप्रयोग वर्यवर्य ।
पाहोनि कृतांत मानी भय । पाय न घाली पुढारा ।।
निर्वाण युद्ध रणधुमाळी । सेना सर्व मेळवीन धुळी ।
रक्तनदीच्या खळाळी । सागरातें डहूळीन ।।

यापुढें अश्वत्थाम्यानें घनघोर युद्ध करून समरभूमि मेलेल्या आणि मृतप्राय योद्धयांनीं भरून टाकिली. त्या वेळचे त्या रणक्षेत्राचें नरहरीनें काढिलेलें चित्रहि फार सरस उतरलें आहे; या द्रोणपर्वांत जिकडे-तिकडे वीररसाची बूज चांगली राहिलेली दिसते; व मग

जाहलीया द्रोणनिधन । वीररसासी उतार पूर्ण ।
जसी प्रसूत प्रमदारत्न । सरे यौवन मागुतें ।
कीं शरत्काळ आक्रमिता जाण । नदीपूराचें उतरे मान ।
कीं वसंतांतो पंचमस्वरगान । वोहटे जेवी त्यापरी ।।

नरहरि मोरेश्वरानें भारताशिवाय दुसरी कांहीं रचना केलेली सध्यां उपलब्ध नाहीं. पण यानें शतमुखरावणवध, रामजन्म व कांहीं अभंग वगैरे लिहिले असावे, असा पुष्कळांचा समज आहे.

वर सांगितलेली श्रीधरस्वामींची आनंद परंपरा व ही गिरिधर, नरहरी वगैरेंची रामदासी परंपरा पाहून या परंपरांतील पुरुषांनीं महाराष्ट्र सारस्वताची कशी निःसीम सेवा केली आहे, हें कळतें; व याबद्दल साभिमान कौतुक वाटतें. अशा परंपरा इतर कोणत्याहि देशांत क्वचितच पाहण्यास सांपडतील. या दोहोंशिवाय आणखीहि इतर अनेक परंपरा महाराष्ट्रांत अशाच चालू होत्या. कांहीं तर अजूनहि विद्यमान आहेत. यांपैकीं आणखी अशाच एका परंपरेची हकीकत आतां पुढील भागांत पाहूं.



# महाराष्ट्रांतील एक मोठी परंपरा



महाराष्ट्रांत ज्या परंपरा बऱ्याच प्रसिद्ध आहेत व ज्यांतील पुरुषांची नांवें वारंवार एकूं येतात त्यांत 'शिवदिन केसरी' ची परंपरा बरीच मशहूर आहे. या परंपरेच्या दोन शाखा दोन ठिकाणीं चांगल्या नांदत आहेत. एक राशिन येथें व दुसरी पैठण येथें. या दोन्ही शाखांची परंपरा आदिनाथापासून केसरीनाथापर्यंत एकत्र आहे. यापुढें मात्र दोन फांटे वरीलप्रमाणें झाले. मूळपरंपरा पुढीलप्रमाणें आढळते:— आदिनाथ —मच्छेंद्रनाथ —गोरखनाथ — गैनीनाथ — निवृत्तिनाथ— ज्ञाननाथ (उर्फ ज्ञानेश्वर) —सत्यामलनाथ—गैबीनाथ —गुप्तनाथ — उद्बोधनाथ —केसरीनाथ —शिवदिननाथ.[१]

यांपैकीं शके १२१२-तल्या ज्ञाननाथ किंवा ज्ञानेश्वरापर्यंतच्या पुरुषांची नांवें आपणास माहीत आहेतच. यापुढील शिष्यांचा थोडा फार परिचय आतां करून घेऊं. ज्ञानेश्वरानंतर यांत **सत्यामलनाथ** येतो. या सत्यामलनाथाचा 'सिद्धांतरहस्य उर्फ ललितप्रबंध' या नांवाचा एक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. ग्रंथाला या पोथींत कोठें कोठें 'ललितप्रबंध' म्हटलें आहे. पण शेवटीं याचें नांव 'सिद्धांतरहस्य' असें दिलें आहे. या ग्रंथांत कवीचा किंवा ग्रंथरचनेचा काल दिलेला नाहीं. ज्या अनेक कवींस प्रारंभीच नमन केलें आहे त्यांत तुकाराम-रामदासांचा उल्लेख आहे. यावरून हा सत्यामलनाथ शके १६००-च्या

---

१. शिवदिन केसरीचा शिष्य नरहरि, आणि नरहरीचा महीपती या महीपतीचें– ताहराबादकर महीपतीबाचें नव्हे– एक पद आहे. त्यांत ही परंपरा किंचित् निराळी आहे. महीपती म्हणतो–

'निवृत्तीचा ज्ञानी त्याचा सोपान। चौथी मुक्ताबाई ब्रम्हचि परिपूर्ण।
सत्यामळा तारी सांगे गुरुखूण॥ इ. इ.

२. हा ग्रंथ कल्याण येथील कापडाचे व्यापारी रा. सदाशिराव दिवेकर यांचे संग्रहीं आहे.

म्हणे अपांडवी धरित्री । करीन आजी पहा नेत्रीं ।
नारायणशास्त्र विधियुक्त मंत्री । जपोनि आतां सोडितो ।।
यया अस्त्रासी निवारण । ब्रम्हांडगेहीं नाहीं जाण ।
पार्था देखतां धृष्टद्युम्न । काळधामा वोपणें ।।
मम विक्रम बाहुवीर्य । अस्त्रप्रयोग वर्यवर्य ।
पाहोनि कृतांत मानी भय । पाय न घाली पुढारा ।।
निर्वाण युद्ध रणधुमाळी । सेना सर्व मेळवीन धुळी ।
रक्तनदीच्या खळाळी । सागरातें डहूळीन ।।

यापुढें अश्वत्थाम्यानें घनघोर युद्ध करून समरभूमि मेलेल्या आणि मृतप्राय योद्धयांनीं भरून टाकिली. त्या वेळचे त्या रणक्षेत्राचें नरहरीनें काढिलेलें चित्रहि फार सरस उतरलें आहे; या द्रोणपर्वांत जिकडे-तिकडे वीररसाची बूज चांगली राहिलेली दिसते; व मग

जाहलीया द्रोणनिधन । वीररसासी उतार पूर्ण ।
जसी प्रसूत प्रमदारत्न । सरे यौवन मागुतें ।
कीं शरत्काळ आक्रमिता जाण । नदीपूराचें उतरे मान ।
कीं वसंतांतो पंचमस्वरगान । वोहटे जेंवी त्यापरी ।।

नरहरि मोरेश्वरानें भारताशिवाय दुसरी कांहीं रचना केलेली सध्यां उपलब्ध नाहीं. पण यानें शतमुखरावणवध, रामजन्म व कांहीं अभंग वगैरे लिहिले असावे, असा पुष्कळांचा समज आहे.

वर सांगितलेली श्रीधरस्वामींची आनंद परंपरा व ही गिरिधर, नरहरी वगैरेंची रामदासी परंपरा पाहून या परंपरांतील पुरुषांनीं महाराष्ट्र सारस्वताची कशी निःसीम सेवा केली आहे, हें कळतें; व याबद्दल साभिमान कौतुक वाटतें. अशा परंपरा इतर कोणत्याहि देशांत क्वचितच पाहण्यास सांपडतील. या दोहोंशिवाय आणखीहि इतर अनेक परंपरा महाराष्ट्रांत अशाच चालू होत्या. कांहीं तर अजूनहि विद्यमान आहेत. यांपैकीं आणखी अशाच एका परंपरेची हकीकत आतां पुढील भागांत पाहूं.



# महाराष्ट्रांतील एक मोठी परंपरा



महाराष्ट्रांत ज्या परंपरा बऱ्याच प्रसिद्ध आहेत व ज्यांतील पुरुषांची नांवें वारंवार एकूं येतात त्यांत 'शिवदिन केसरी' ची परंपरा बरीच मशहूर आहे. या परंपरेच्या दोन शाखा दोन ठिकाणीं चांगल्या नांदत आहेत. एक राशिन येथें व दुसरी पैठण येथें. या दोन्ही शाखांची परंपरा आदिनाथापासून केसरीनाथापर्यंत एकच आहे. यापुढें मात्र दोन फांटे वरीलप्रमाणें झाले. मूलपरंपरा पुढीलप्रमाणें आढळते:— आदिनाथ —मछेंद्रनाथ —गोरखनाथ — गैनीनाथ — निवृत्तिनाथ— ज्ञाननाथ (उर्फ ज्ञानेश्वर) —सत्यामलनाथ—गैबीनाथ —गुप्तनाथ — उद्बोधनाथ —केसरीनाथ —शिवदिननाथ.[1]

यांपैकीं शके १२१२-तल्या ज्ञाननाथ किंवा ज्ञानेश्वरापर्यंतच्या पुरुषांची नांवें आपणास माहीत आहेतच. यापुढील शिष्यांचा थोडा फार परिचय आतां करून घेऊं. ज्ञानेश्वरानंतर यांत **सत्यामलनाथ** येतो. या सत्यामलनाथाचा 'सिद्धांतरहस्य उर्फ ललितप्रबंध' या नांवाचा एक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. ग्रंथाला या पोथींत कोठें कोठें 'ललितप्रबंध' म्हटलें आहे. पण शेवटीं याचें नांव 'सिद्धांतरहस्य' असें दिलें आहे. या ग्रंथांत कवीचा किंवा ग्रंथरचनेचा काल दिलेला नाहीं. ज्या अनेक कवींस प्रारंभीच नमन केलें आहे त्यांत तुकाराम-रामदासांचा उल्लेख आहे. यावरून हा सत्यामलनाथ शके १६००-च्या

---

१. शिवदिन केसरीचा शिष्य नरहरि, आणि नरहरीचा महीपती या महीपतीचें— ताहराबादकर महीपतीबाचें नव्हे— एक पद आहे. त्यांत ही परंपरा किंचित् निराळी आहे. महीपती म्हणतो—

'निवृत्तीचा ज्ञानी त्याचा सोपान। चौथी मुक्ताबाई ब्रम्हचि परिपूर्ण।
सत्यामळा तारी सांगे गुरुखूण॥ इ. इ.

२. हा ग्रंथ कल्याण येथील कापडाचे व्यापारी रा. सदाशिराव दिवेकर यांचे संग्रही आहे.

नंतर हयात असावा, असें उघड होतें. परंतु ग्रंथांत कवि आपणास श्रीज्ञानेश्वरानें अनुग्रह दिल्याचें सांगतो. यावरून सत्यामलनाथास ज्ञानेश्वर महाराजांनीं स्वप्नांत येऊन अनुग्रह दिला असावा असें मानणें अवश्य आहे. ग्रंथांत कांहीं थोडे ज्ञानेश्वरस्तुतीपर श्लोक आहेत; तेवढे वगळले म्हणजे बाकी सर्व ग्रंथ येथून-तेथून अभंग वृत्तांत लिहिला आहे; आणि ग्रंथहि कांहीं लहान सहान नाहीं. एकंदर ग्रंथसंख्या सुमारें बारा-हजार आहे. ग्रंथांत वेदान्त विषय आला असून तो उत्तम रीतीनें प्रतिपादिला आहे. तत्कालीन साधुपुरुषांच्या विचारसरणीवर ज्यापासून उत्तम प्रकाश पडेल, असा हा ग्रंथ आहे. हा ग्रंथ कोणत्या दुसऱ्या एखाद्या संस्कृत किंवा अन्य ग्रंथावर रचिलेली टीका नसून अगदींच स्वतंत्र आहे. यांत कवि म्हणतो—

संस्कृत असोनि । वरी टीका केली । तैसी नव्हे झाली । ग्रंथोत्पत्ती ॥
वेदांतवनींचीं । वेंचोनीयां फूलें । दहा हार केले । प्रकरणाचे ॥
प्रेमाचिया सूत्रीं । गुंफोनिया माळा । बुका तो योजिला । सद्भावाचा ॥
एव हार बुका । घेवोनो श्रीकंठीं । करतया भेटी । घातलों मो ॥

वरील मजकूर शेवटल्या म्हणजे दहाव्या प्रकरणांत–प्रबंधांत–आहे. एकंदर ग्रंथाचे दहा भाग किंवा प्रबंध आहेत.

या सत्यामलनाथाचा शिष्य **गैबीनाथ.** याचे कांहीं अभंग, पदें व एक लहानसा ग्रंथ आहे. गैबीनाथाचा शिष्य गुप्तनाथ. **गुप्तनाथ** हें नांव कोणा पुरुषाचें नसून एका स्त्रीचें आहे. हिचें खरें नांव **गंगाबाई.** ही बाई राशिन येथील एका ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणाची मुलगी. वयाच्या सोळाव्या वर्षीच हिला वैधव्य आलें. तेव्हांपासून ही बाई, म्हणजे गंगाबाई (उर्फ गुप्तनाथ) सारा वेळ भजनकीर्तन करी; व रात्रीं श्रीज्ञानेश्वरांच्या ग्रंथावर व्याख्यान सांगे.

ज्ञानेश्वरीचा पाठ करावा । संतसमुच्चय भोंवता मिळावा ।
क्षणक्षणा देहभावा । विसर पाडावा अर्थ करिता ॥

अशी तिची व्याख्यानशैली असे. हिच्या व्याख्यानाला अनेक मंडळी

येत. त्यांतच राशिन येथील राहणारे मल्हार नाईक ठिपसे यांचा मुलगा उद्धव हाहि येई. बाईच्या प्रासादिक वाणीनें उद्धवाच्या मनास उपरती झाली, आणि तोहि ईश्वरभजनांत रंगूं लागला. पुढें ही बाई काशियात्रेस जाण्यास निघाली. तेव्हां तिच्या बरोबर उद्धव ठिपसे हाहि यात्रेस निघाला. वाटेंत बाईची व गैबीनाथाची भेट झाली; व बाईस गैबीनाथानें उपदेशदीक्षा देऊन नांव 'गुप्तनाथ' असें ठेवलें. हिनें अभंगरचना केली आहे. हिचे दोन अभंग पुढें देतों[1]—

१. सर्व करी देवाधिदेव । त्यासी नेणती मानव ॥१ ॥
वाहती देहअभिमान । देव सर्व कांहीं जाणें ॥ २ ॥
अहंपणें आतां । देव न दिसे सर्वथा ॥ ३ ॥
अहंकर्ता जो मी म्हणे । तेणे केली आपुली हानी ॥ ४ ॥
चाले देवासी भिऊन । गुप्त म्हणे तोचि धन्य ॥ ५ ॥

२. माता पिता त्राता अरि पुत्र भ्राता । गुरूवीण आतां नाहीं दुजा ॥ १ ॥
पशुपक्षीयाती गुरुरूप भासती । ऐसी ज्यासी स्थिती तोचि जाणें ॥ २ ॥
वृक्षवल्ली पाही अणुरेणू ते ही । गुरूविण नाहीं रितें कोठें ॥ ३ ॥
ऐसा गुरुराज भज पूर्ण व्यापक । गुप्त बोले रंक राजसम ॥ ४ ॥

या बाईनें म्हणजे गुप्तनाथानें पुढें आपल्या बरोबर काशियात्रेस आलेल्या उद्धव नाईकास उपदेशमंत्र दिला; व तेव्हांपासून 'उद्धव नाईकां'चे 'उद्बोधनाथ' झाले. या उद्बोधनाथाचीं पदें अभंग वगैरे रचना आहे. याचे पदांत योगमार्गाचीं पदें बरीच आढळतात. उद्बोधनाथानें ज्यांत आपल्या गुरुचा उल्लेख केला आहे, असें एक पद येथें देतों—

---

१. हे अभंग सुबोधपत्रिका व महाराष्ट्र कविचरित्र यांत दिलेले आहेत. गुप्तनाथाच्या अभंगांची एक वही डॉ. वुइल्सन यांनीं मुंबई युनिव्हर्सिटीच्या पुस्तकालयास नजर केली होती, असें पत्रिकाकार (७-७-१९०१) लिहितात. परंतु शोधाअंतीं असें कळतें कीं, वही मुंबई यु० पुस्तकालयांत हल्लीं नाहीं. ही वही नाहीं, इतकेच नव्हे तर या 'बॉम्बे युनिव्हर्सिटी लायब्ररीं' तल्या सर्व मराठी हस्तलेखांच्या पोथ्या कसरीनें खाऊन टाकिल्या! हल्लीं तेथें औषधाला एकहि मराठी जुनें लेखाचे चिटोरें नाहीं ! !

कां मज लखलख दिसतें । किंवा नयनीं बसतें ।।
सांगा स्वामी अरतें । कीं तें आहे परतें ।।
काय झालें डोळिया । न दिसे रूप ना छाया ।
उलका परतवि ज्योती । दाहि दिशा दाटलियां ।।
ब्रह्मतेजाचे भडके । उठति नादाचे तडके ।
तारा आदळति सिके । दिव्य तेजाचें सडके ।।
कैसे हास्य नाडळे । फिरति उफराटे डोळे
कांहीं केल्या ना कळे । बळिच दिठी आदळे ।।
गुप्तगंगा नर कपटि । दैवत लाविलें दिठी ।
सहजानंदाचे दाटी । पडिले उद्‌बोध तुटी ।।

उद्बोधनाथांनीं शके १६०९-मध्यें वैशाख वद्य नवमीस समाधी घेतली. यांची समाधी यांचा गुरु जो गुप्तनाथ त्याचे समाधीजवळच राशिन येथें आहे.

उद्बोधनाथांनीं अनेक शिष्य केले. पण त्यांचे गादीवर त्यांचे मागें **केसरीनाथ** हे बसले. हे केसरीनाथ राशिन येथें मामलतीचे हुद्यावर असत. सरकारचाकरीवर असतांना, गांवांत उद्बोधनाथ कीर्तन करीत व ज्ञानेश्वरीचें पुराण सांगत तेथें हे जात असत. पुढें उद्बोधनाथांच्या उपदेशानें यांस ईश्वरभक्तीचा व्यासंग फार जडला; व आपली नोकरी सोडून देऊन यांनीं उद्बोधनाथांचा गुरुमंत्र घेतला. केसरीनाथांचीहि रचना पुष्कळ आहे. यांनीं 'सिद्धांतसार' या नांवाचा ग्रंथ शके १६३८-मध्यें रचिला आहे. यांची पदेंहि पुष्कळ आहेत. यांनीं शके १६४६-मध्यें मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस समाधी घेतली. यांची समाधी आळंदीस आहे.

ह्या केसरीनाथांचे शिष्य '**मल्हारीनाथ**' व '**शिवदिननाथ**' यांपैकीं पहिला म्हणजे मल्हारीनाथ हा केसरीनाथांचा गुरु जो उद्बोधनाथ त्याचा पुत्र होय. याचा मठ व याची शिष्यपरंपरा राशिन येथें आहे; व दुसरा शिष्य जो शिवदिननाथ याचा मठ व याची शिष्यपरंपरा पैठण येथें आहे. म्हणजे केसरीनाथानंतर या परंपरेच्या दोन शाखा झाल्या. एक

राशिन येथेंच राहिली व दुसरी पैठण येथें गेली. पैठण येथें गंगेच्याकांठीं शिवदिननाथांचा भव्य मठ अजूनहि आहे. या शिवदिननाथांच्या सर्व परंपरेंत आजपर्यंत जे पुरुष झाले त्या सर्वांत विशेष प्रख्यात पुरुष (ज्ञानेश्वरानंतर) 'शिवदिननाथ' ऊर्फ शिवदिन केसरी हाच होय. शिवदिननाथ हा युजुर्वेदी, कौशिकगोत्री ब्राह्मण. याच्या बापाचें नांव कृष्णाजीपंत. हा पैठण येथील राहणारा असून ज्योतिषपणाची वृत्ति करी. या कृष्णाजीपंताचा

... ... पुत्र छांदसी जाण । द्वादश पूर्ण वर्षे तया ॥
पदार्थ पडेल जो दृष्टीसी । नेऊनि द्यावा तेणें हलवेकन्यासी ।
आणुनी शर्करा मिठाईसी ॥ वाटुनी सर्वांसी भक्षावा ॥

अशा याच्या खोड्या असत. या छंदिष्ट व खोडकर मुलाचे हे चाळे पाहून याच्या आईनें यास केसरीनाथाचे स्वाधीन केला. केसरीनाथांनींहि त्यास आपल्या मठांत ठेवून घेतलें; आणि स्नान झाल्यावर पुढें खडावा आणून ठेवण्याची कामगिरी यास सांगितली. एके दिवशीं केसरीनाथांनीं पहाटेस स्नान केलें. परंतु त्यांचे पुढें खडावा ठेविलेल्या नव्हत्या; या चुकीबद्दल त्या दिवशीं त्यांनीं

'खडाव मारिली त्या मुलाला । खोच पडली कपाळाला ।
रक्त भळभळा वाहतसे ॥

कपाळावरच्या खोकेंतून अशुद्ध वाहून गेलें आणि त्याबरोबरच या शिष्याची अशुद्धता निघून त्याचें चित्त त्या दिवसापासून शुद्धीवर आलें; व आपल्या सर्व खोड्या टाकून तो निर्मळ आचरणानें राहूं लागला. पुढें केसरीनाथांनीं याच्याकडून चांगला विद्याभ्यास करवून शके १६२८-सालीं त्यास गुरुमंत्र सांगून उपदेशदीक्षा दिली. हाच पुढें 'शिवदिन-केसरी' ऊर्फ '**शिवदिननाथ**' या नावानें प्रसिद्ध झाला. यानें

---

१. असें सांगतात की, यास प्रथम 'शिवनाथ' असें म्हणत. परंतु एके वेळीं याचें कीर्तन ऐकण्यास कोणी 'जर्जरी बक्ष' नांवाचा एक फकीर आला होता. त्यानें याचा भक्तिप्रेमा पाहून आपल्या डोईची टोपी काढून

[पान ५८६ पहा.]

कथाकिर्तनें करून शिष्यसंप्रदायहि वाढविला. यानें 'विवेकदर्पण' 'ज्ञानप्रदीप' वगैरे ग्रंथ रचिले आहेत. यांशिवाय याचे श्लोक, अष्टकें असून पदें वगैरेहि पुष्कळ रचना आहे. याचा जन्म शके १६२०-मध्यें वैशाख कृ. सप्तमी भृगुवासरीं सकाळीं झाला; व हा शके १६९६-मध्यें माघ वद्य त्रयोदशीस शिवरात्रीं समाधिस्थ झाला. म्हणजे यानें मराठेशाहीचे बरे दिवस पाहिले असून तीस पानपत येथें बसलेला जबर धक्काहि पाहिला होता. या पानपतचे प्रसंगानंतर महाराष्ट्राची कशी काय हालहवाल होती, याचें वर्णन शिवदिनकेसरींनीं एके पदांत केलें आहे. तें पद असें —

सोळा शतें चौऱ्याशित झाली धुलधानी ।
द्वैतराज्य दुष्टबुद्धी नामिले प्रधानी ॥ ध्रु० ॥
ब्यांशी त्र्यांशी गेले भाऊ नाना दोनी ।
तैसी कोणी कोणांची मानीना निदानीं ॥
सारा दाणा जप्ती पट्टी द्रव्य गृह खाणी ।
पंचाशित लुटालुट माडिली तापत्रय दुःखांनी ॥
देशग्रामवस्ती ओस पडिल्या पेंढाऱ्यांनी ।
तस्कर पुस्तर पापी उदधी आणिले खिडाऱ्यानीं ॥
हाहाःकार तो फारचि केला राघोबा वाघांनीं । ...............
उरली मुरली ग्रामअहंता बुडविली द्वेषानीं ।
तीर्थें क्षेत्रें गाई ब्राह्मण फार कष्टलीं क्लेशानीं ॥

---

[ पान ५८५-वरून. ]

याचे डोईवर ठेविली, व यास 'पगडीबंधू' केलें. तेव्हांपासून या गोष्टीचे स्मरणार्थ हा आपल्या नांवापुढें 'दीन' अशीं अक्षरें लावून आपणास 'शिव दिननाथ' असें म्हणवूं लागला. या जर्जरीबक्षाची कबर रोझ्यास आहे. तेथें दरसाल मेळा भरतो. या जर्जरीबक्षाप्रमाणेंच कोणी 'शहा दावल' या नांवाचा एक मुसलमान फकीर शिवदिननाथाचा मोठा स्नेही होता. यावर शिवदिननाथानें 'वाहवा शहा दावल, शह दावल पीर जागते अव्वल' असें एक पद केलेलें आहे.

१. सरदार आबासाहेब मुजुमदार यांचा संग्रह.

भक्त विरक्त साधु संत आही बोलति वाणी ।
**शिवदिनकेसरी** भगवंता तूं यासी पाव निर्वाणी ॥ सोळा ॥ १ ॥

शिवदिनकेसरींनीं आपल्या पदांत आपल्या कुलस्वामीवर—तुळजापुरच्या भवानीवर—एक सुंदर पद केलें आहे. 'हे जगदंबे विश्वकदंबे । निरावलंबे तूं शिवसांवे । मज अविलंबें । धांव पाव निर्वाणी ॥ हें यांचें पद चमत्कृतिजनक आहे. याचें विठ्ठलस्तुतिपर एक पद येथें देतों:—

विठ्ठल गायिलाचि गाऊं । विठ्ठल पाहिलाचि पाहूं ॥ ध्रु ॥
सत्रावी भिंवरेच्या तीरीं । पंढरपुरासि जाऊं ।
चंद्रभागे स्नान करुनी । भक्ति पताका लावूं ॥ १ ॥
मृदंगवीणा टाळ घोळ संत संगति बाहूं ।
प्रदक्षिणेसी नाचत कीर्तनीं । नेमनिष्ठ राहूं ॥ २ ॥
जीवजंतू पंढरिचे वतनी। त्यांस विठ्ठलरूप भासूं ।
स्वहित शिक्षित त्यांची वचनें । अन्न कोश साहूं ॥ ३ ॥
वेणूनादीं संतत काला । केसरि गुरुचा खाऊं ।
**शिवदिन** गारुडपारीं । प्रसार हरिदासांचा लाहूं ॥
विठ्ठल गायिलाचि गाऊं । विठ्ठल पाहिलाचि पाहूं ॥ ४ ॥

या परंपरेतील सर्व पुरुषांत शिवदिननाथांचें नांव फार प्रसिद्ध असण्याचें एक कारण असें दिसतें कीं, यांनीं आपल्या मठाची नीट व्यवस्था करून देऊन त्यास चांगला स्थायिकपणा आणिला; व उत्सव नैवेद्याची उत्तम प्रकारची तरतूद करून ठेविली. तसेंच यांची पद्यरचनाहि बऱ्या प्रकारची असून विपुल आहे, हेंहि एक कारण आहे. शिवदिननाथांचा **नरहरिनाथ** या नांवाचा एक शिष्य होता. नरहरीनाथ हा शिवदिनाचा पुत्र होय. या नरहरीचींहि अनेक पदें आढळतात. याचें एक पद असें—

---

१. मागें पृष्ट ४७५ वर वामनपंडिताची हकिकत सांगतांना भर्तृहरीच्या श्लोकांचें भाषान्तर करणाऱ्या 'नरहरी'चा उल्लेख आला आहे. तो नरहरि व हा नरहरि हे दोन भिन्न पुरुष होत. त्या नरहरीनें आपल्या

[ पान ५८८ पहा. ]

गुरुरायें बरवें केलें । माझें मीपण हरूनि नेलें ॥
काय सांगू आतां बाई । सांगायाची सोयच नाहीं ॥
ठेवितांच माथां हात । षड्रिपूंचा झाला घात ॥
दृष्टी मुरडोनी दावितां । जाली मनासि उन्मनता ॥
हिज करतां अवलोकन । गेलें तुटोनी बंधन ॥
शिवनाथे धरितां करी । तेव्हां जहाला नरहरी ॥

या नरहरीनाथाचे दोन शिष्य बरेच प्रसिद्ध आहेत. एक लक्ष्मण व दुसरा महीपती. यांपैकीं लक्ष्मण हा नरहरीनाथाचा पुत्र होय. आपला आजा जो शिवदिननाथ त्याच्याचप्रमाणें लक्ष्मण लहानपणीं फार छांदिष्ट होता. भक्तमंजरीकार राजाराम प्रासादी लिहितात कीं, हा लक्ष्मण बावा 'लोलिंबराज साधु सारिखा । अत्यंत विषयी' होता. याचा थाटमाट अगदीं चैनीचा असे.

शिपाई डौल मस्तकीं फेटा । पायांत तोडा वेष मराठा ।

असें याचें त्यांनीं वर्णन दिलें आहे. एके वेळीं हा नरहरीनाथांच्या पुण्यतिथीला पैठणास आला. तेव्हांहि आपल्या बरोबर कलावंतिणी स्त्रिया यानें आणिल्या होत्या; आणि हा रक्तासारखे डोळे लाल झालेल्या व तोंडांत विडा खाल्लेल्या अशा त्या गणिकांस घेऊन, त्यांच्या आंगावर हात टाकून खुशालपणें रस्त्यांतून फिरे. हें पाहून त्या क्षेत्रांतल्या लोकांस नरहरीनाथाची आठवण येई व वाईट वाटे. याच वेळीं लक्ष्मणाची आत म्हणजे शिवदिननाथांची मुलगीहि तेथें आली होती. तिनें हा प्रकार पाहून एक दिवस लक्ष्मण आपल्या गणिकेचा हात धरून

---

[ पान ५८७-वरून. ]

भर्तृहरीच्या श्लोकांच्या भाषांतराच्या प्रारंभीं आपली माहिती पुढीलप्रमाणें दिली आहे—

अंबा नाम पुरी असे महिवरी प्रख्यात योगेश्वरी ।
सिद्धांचे हृदयांतरीं गमतसे अज्ञा जसी शांकरी ॥
तेथें 'व्यास' कुळावतंस निवसे श्रीशंकराख्या जया ।
त्याचा आत्मज बाल तो नरहरी व्यासार्थ ग्रंथास या ॥ १ ॥

स्वयंपाकघरामधूनच माडीवर जात असतां त्यास वाटेंत अडविलें व त्याची अतिशय निर्भर्त्सना केली. आत्याबाईचे हे अत्यंत क्रोधाचे पण पराकाष्ठेच्या कळवळ्याचे शब्द ऐकून लक्ष्मणानें आपलें वर्तन सुधारण्याचा निश्चय केला; व याच वेळीं आपलीं तीं चैनीचीं वस्त्रें अंगावरून काढून स्वयंपाकघरांतून विस्तव आणवून जाळून टाकिलीं. यापुढें हा ईश्वरभजनाकडे वळला. याची कांहीं पदें असून याचा 'प्रीतिभूषण' या नांवाचा एक ग्रंथहि आहे असें सांगतात.

नरहरीनाथांचा दुसरा शिष्य **महीपती** या नांवाचा होता, हें वर सांगितलें आहे. महीपतीची प्रसिद्धि उत्तरहिंदुस्थानांत फार आहे. या महीपतीची ऊर्फ महीपतीनाथाची पुष्कळ रचना आहे; व पदें, अभंग, कडाका छंदांतले कटाव, लावण्या अशी ती नानाविध प्रकारची आहे. आपलें पद्यांत हा नरहरीमहीपती असें स्वतःस म्हणवितो. वास्तविक पाहतां, नरहरी हें गुरुचें नांव व महीपती हें शिष्याचें नांव आहे. तेव्हां एकाजनार्दन, उद्धवचिद्धन, शिवदिनकेसरी वगैरे नांवांप्रमाणें पहिलें नांव शिष्याचें व दुसरें गुरुचें असें असावयाचें. परंतु येथें तसें नसून पहिलें गुरुचें व दुसरें शिष्याचें असा प्रकार आहे. या महीपतीच्या आयुष्याचा बराच काळ ग्वालेर—उज्जनीकडे गेला असल्यामुळें त्याची किर्ति व शिष्यपरंपरा त्याच प्रांतांत जास्त आहे. उज्जनीस नाथसंप्रदायी दत्तबुवा नांवाचे साधु पुरुष असत. त्यांचे मठांत हे महीपतीनाथ कांहीं वर्षें रहात असत, पण हे मुळचे पैठण येथील राहणारे आणि प्रसिद्ध संत व कवि जे जनार्दनस्वामी त्यांचे वंशज होत. येथून ते प्रथम बडोद्यास गेले. तेथून मग पुढें ते इंदुरास जाऊन राहिले. इंदुर येथें असतांना त्यांचा तेथें चांगला प्रपंच वाढला. असें म्हणतात कीं, यशवंतराव होळकरांनीं या महीपतीनाथांचा अनुग्रह घेतला होता. इंदुराहून पुढें हे उज्जनीस

१. 'उज्जनीस महीपती हा दत्तनाथ नांवाच्या एका स्वामीच्या मठांत राहत असे. या दत्तनाथाची परंपरा व मठ हीं अजूनहि उज्जनीस

[ पान ५९० पहा. ]

जाऊन राहिले. उज्जनीहून दौलतराव शिंद्यांच्या विनंतीवरून ते ग्वाल्हेरास गेले; व ग्वाल्हेरीस बरेच दिवस राहून तेथूनच कैलासवासास गेले. यांचा मठ व गादी अजूनहि ग्वाल्हेरीस आहे. यांनीं शके १७४४-मध्यें पौष शुद्ध त्रयोदशीस समाधी घेतली.

वर लिहिलेल्या मजकुरावरून हें सहज ध्यानांत येईल कीं, या नाथ-संप्रदायी गुरुशिष्यांची परंपरा श्रीनिवृत्तिज्ञानेश्वरांपासून तो नरहरीमहीपती पर्यंत म्हणजे शके १२००-पासून १७४४-पर्यंत पांचशें-साडेपांचशें वर्षें मराठी भाषेंत एक सारखी ग्रंथरचना करीत असून महाराष्ट्राची अव्याहत सेवा करीत आहे. ज्यांत या परंपरेंतील बहुतेक पुरुषांचा उल्लेख आहे, असें नरहरीचें एक पद येथें देतों:—

**सकळा आदिनाथ** शिवशंकर भोळा । विष्णूचा अवतार **मछींद्र** जाला ।
गोरक्षाचे पोटीं **गोरखनाथ** उद्भवला । गुरुभक्तिनें **गणीनाथ** उद्धारला ॥ १॥
जयजय स्वामी नाथा सद्गुरु मूर्ती । अखंड चरणांगुष्टीं वोवाळूं आरती ॥धृ॥
**निवृत्तीचा ज्ञाननाथ** त्याचा **सोपान**। चौथी **मुक्ताबाई** ब्रह्माचि परिपूर्ण ।
**सत्यमळा** तारी सांगे गुरूखूण । **गैबी** त्रैलोक्य मध्यें जाहला पावन ॥ २ ॥
**गुप्त उद्बोधासी** सांपडला ठेवा । **केशरी** जाला न कळे मोक्षाचा हेवा ।
**शिवदिनसुत** हा नरहरी मज पावेल केव्हां। **अक्षयी महिपति** होईन राजा
मी तेव्हां ॥ ३ ॥

या पुस्तकाच्या मर्यादेला जो काळ ठरविला आहे त्या सर्व काळ-भर ही परंपरा ग्रंथरचनेंत सारखी निमग्न आहे. अशा या कौतुकास्पद परंपरेंतील या पुरुषाचीं एक दोन पदें येथें देतों—

---

[ पान ५८९-वरून. ]

आहेत. या दत्तनाथाची पुष्कळ कविता त्या प्रांतांत आहे. हा १३६ वर्षांचा पूर्ण वयस्क होऊन वारला ', असें रा. भालेराव लिहितात. ' या महिपतीचें नांव महीपत भारती,' यांची समाधि शिंगणापुराजवळ फडतरी या गांवीं गुप्तलिंगाजवळ आहे. यांचे गुरूचें नांव नरहर भारती. हल्लीं या शाखेच्या गादीवर जे पुरुष आहेत, त्यांचें नांव गंगाभारती, मठ पानभोशी, ' इ० मोगलाई. ( दासगणू यांच्या सांगण्यावरून )

गुरुनें नवल केलें ग। माझें मीपण नेलें ग ॥
गुरुरूप माझ्या नयनीं भरलें। ब्रह्मचि होउनि गेलें ग ॥धृ०॥
नयन सांठउन नयनांत। उभें मज केलें अंगणांत।
हळूच सांगे कानीं दुरुनी। बोट दाखवी गगनांत।
निळी चांदणी लखलखली। प्रभा लोचनीं झकझकली।
पहातां दृष्टी न पुरे माझी। पुढें ज्योति चकचकली ॥
सुंदर सुनीळ नार ग। स्वरूप तिचें अरुवार ग।
मस्तकी येक फूल फूललें। तें हि सदा गरुवार ग ॥
फुलोन फुलली पूर्ण कला। चिन्मय उगवे चंद्रकला।
मुद्रा तंद्री लागुन गेली। अलक्ष रूप झाला सगळा ॥
नरहरिनाथा श्रीगुरुराया। महिपति लागे तव पाया।
कर्ता हर्ता तूंचि स्वामी। अर्पण केली तुज काया ॥

या पदांत एकाग्र चित्त केल्यावर गुरुकृपेनें दिसणाऱ्या दिव्य तेजाचें वर्णन केलें आहे. अशा अनुभविक वर्णनाची या महीपतीनाथाची अनेक पद्यें आहेत. साधारणपणें इतर बावींच्या वर्णनात्मक पद्यांत हा महीपतीनाथ अनेक वेळां असले प्रकार सांगतो. मुलांच्या खेळाचीं याचीं कांहीं वर्णनपर पद्यें आहेत. त्यांत 'शिमगा' हें यांचे पद पुढीलप्रमाणें आहे—

सावध व्हा गडे हो नीट उमगा शिमगा निघून जाईल कीं ॥
बसुन तमाशा पाहुं चला रे पहातां पहाट होईल कीं।
पांच पचवीस पोरें यांची संगत सोडुन द्यावी कीं।
त्रिगुण मोळी बांधुन होळी ऐठ पिठावर न्यावी कीं।
सत्रावीचा लाट घोटुन लक्ष सुनीळा लावी कीं।
फटफटांत चांदणे ज्योतिज्वाळा त्यांत भासा येइल कीं।
नवरंगाचा येकच गोळा बहु बाभाळा भासेल कीं।
चंद्रसूर्य देखणें गेलें पाहतां पाहणें नासेल कीं।
लपेल ढवळे दिसेल पिवळें यांत कांहीं बाही असेल कीं।
त्यांत मिळावें तन्मय व्हावें साधनि मन हें भावेल कीं।
गरुची सेवा घडेल जेव्हां समाधि लागुन जाइल कीं।

नरहरिनाथा स्वामि समर्था कधि हे घडोन येइल कीं।
जन्ममरण या दुःखापासुनि सुटका कशि तरी होइल कीं।
महिपती किंकर अखंड भोगी स्वरुपसमाधित राहिल कीं।
हा सुखसोहळा आपुल्या डोळा आपणचि आपणा पाहिल कीं।
जनासि हंसतो मनासि पुसतो कधि सण शिमगा येइल कीं।
मद्गुरुनाथें कृपा करुनि मज माहेराप्रति नेइल कीं ॥
सावध० ॥ १ ॥

हें पद साधारण ऐकणाराच्या कानाला संतोष देईल व यांतलें वर्णन अनुभविकांच्या अनुभवाला चांगलेंच पटेल, असा भरंवसा वाटतो. आतां, सर्वांच्या अनुभवाला पटेल अशा एका कवनांतला कांहीं भाग नमुन्यासाठीं देऊन हें प्रकरण पुरें करूं. यांत कवीनें आपल्या काळच्या लोकस्थितीवर फटका उडविला आहे.

पाहतां पाहतां धर्म बुडाला, अधर्म झाला चहूंकडे।
जिकडे तिकडे कली मातला, कठिण काळ हा अला पुढे ॥ धृ० ॥
दात्यांचे घरिं दरिद्र आलें, कृपण धनाढ्य झाले कीं।
पापि चिरायू पुण्यशील ते, अल्पायुष्या गेले की।
सत्कर्माचा लोप जाहला, दुष्कर्मीं जन भुलले कीं।
स्वधर्म सांडुनि अधर्म वाटे, कैसें कलियुग आलें कीं।
पुत्र पित्याचा द्वेष करीतो, कांता पतिशी मानीना।
मायलेकिचें भांडण होतें, जीव सासुवर देति सुना।
शिष्य गुरुचा प्राण घेतो, गुरु शिष्याकडे पाहीना।
बंधुबंधुशीं वैर चाललें, भाऊ बहिणीशीं बोलेना।
सेवक स्वामिसीं मारु पाहता, स्वामिसेवका वैर पडे ॥ जिकडे० ॥
कीर्तनसमयीं निद्रा येई, नाचामधि जन दंग पडे।
साधुसंतासी दृष्टी पाहतां, कपाळासि ते पित्त चढे।
नामस्मरणीं वाचा बसली, विषयी गाणें चित्ति जडे।
नरहरि सद्गुरु-भजनीं महिपती जडला हा मज समज पडे।
हरिनामाचा गजर करतां, कळीकाळ तो पायां पडे।
कडकड कडकड वाजवि टाळी, उगाच पाहतो तोंडाकडे ॥ जिकडे० ॥



## मध्वमुनि, अमृतराय वगैरे



असें दिसतें कीं, मराठेशाहीच्या ऐन अमदानींत स्वतंत्र अशी काव्यरचना करण्याकडे मराठी कवींची प्रवृत्ति होत चालली होती. वेदान्त वगैरे शास्त्रीय विषयांवर स्वतंत्र, म्हणजे भाषांतर नाहींत असे ग्रंथ तर फार पूर्वींपासून तयार होत होते. परंतु ज्यांना काव्य म्हणतां येईल असे प्रबंध अजून फारसे होत नव्हते. पण, पेशवाईच्या अबादानीमुळें लोकांच्या मनाला स्वास्थ वाटून चित्तरंजक रचना करण्याकडे ग्रंथकारांची लेखणी वळूं लागली. यापूर्वीं झालेल्या लोलिंबराजाच्या 'रत्नकलाचरित्रा 'चा उल्लेख मागें आलाच आहे. पण हें कवीनें स्वतःच्या कल्पनेनें कल्पिलेलें स्वतंत्र कथानक नसून प्रत्यक्ष घडलेलें असें चरित्र आहे. भक्तीच्या दृष्टीनें साधूंचीं चरित्रें आख्यायिकांचा आणि चमत्कारांचा सालापाला लावून ज्याप्रमाणें सजवून सांगतात त्याप्रमाणेंच हेंहि चरित्र फार तर शृंगाराचें रूपुस्त लावून सांगितलेलें असेल पण अगदीं नवीन असें स्वतंत्र कथानक कल्पून तें पद्यरूपानें कथन केलेलें असें हें रत्नकलाचरित्र नाहीं. हल्लीं उपलब्ध असलेलें अगदीं स्वतंत्र असें सर्वांत मोठें कथानक म्हटलें म्हणजे 'शशिसेनाकाव्य' हें होय. हें काव्य जगन्नाथ या कवीनें रचिलें आहे. याचें कथानक कोणत्याहि प्राचीन ग्रंथांतून घेतलेलें नसून तें कवीनें स्वतःच्या कल्पनेनें रचिलें आहे.

कोणा एका देशांतील अमरावती नामक नगरींत एक राजा राज्य करीत होता. या राजाचा फारच बुद्धिमान व सुद्‌गुणी असा एक प्रधान होता. हा प्रधान सर्व ऐश्वर्यानें संपन्न होता. पण पुत्रोत्सवाचें सुख त्याला लाभलेलें नव्हतें. याकरितां त्याच्या स्त्रीनें अंबाभवानीची पुजा-अर्चा करून तीस प्रसन्न करून घेतलें व तिजजवळ पुत्र मागितला. पण 'तुझ्या कपाळीं पुत्र लिहिलेला नाहीं; यामुळें तुला पुत्रप्राप्ति अशक्य आहे. तरी माझा एक पुत्र आहे तो मी तुला देईन' असें देवीनें

तिला सांगितलें. पुढें देवीनें माळिणीच्या रूपानें येऊन त्या प्रधानस्त्रीस फुलांचा एक हार दिला. या हाराचा लौकरच एक मुलगा झाला. हें पाहून प्रधानास व त्याच्या स्त्रीस परमानंद झाला आणि पुत्रवात्सल्यानें त्या बाईस दुधाचा पान्हाहि फुटला. पुढें या मुलाचें त्यांनीं उत्तम प्रकारें पालनपोषण केलें आणि नांव अहिमाणिक असें ठेविलें.

हा मुलगा थोडासा मोठा होतो तोंच त्या देशाच्या राजाला एक कन्या झाली. ती फार सुंदर असल्यामुळें राजानें तिचें नांव 'शशिसेना' असें ठेविलें. हीं दोन्हीं मुलें थोडीं मोठीं झाल्यावर दोघांचेंहि शिक्षण एकाच गुरूपाशीं व एकाच ठिकाणीं होऊं लागलें. अनेक तऱ्हेच्या कला व विद्या हीं दोघेंहि पढलीं. शस्त्रविद्येंत आणि शरसंधानांतहि तीं दोघें निपुण झालीं; आणि दोघेंहि फिरावयाला व शिकारीला बरोबरच रानावनांत जाऊं लागलीं. असा क्रम चालत असतां एके दिवशीं शशिसेनेची लिहावयाची लेखणी कोठें हरवली होती ती कांहीं केल्या सांपडेना. तिची ती लेखणी तिचा बाळपणचा मित्र व सहाध्यायी अहिमणी यास सांपडली. अहिमणीनें लेखणी देण्याचें कबूल केलें; पण अशी अट घातली कीं,

म्हणेन जें मी तुज लागिं बाळे । तें मानिशी तूं जरि चंद्रभाळे ॥
जरी मला तूं निज भाक देशी । ही लेखणी देईन गे सुकेशी ॥

ही अट शशिसेनेनें कबूल केल्यावर अहिमणीनें तिची लेखणी दिली; व त्या प्रधानपुत्राची स्त्री होण्यास ती मुलगी वचनबद्ध झाली. आधींच दोघांचींहि मनें एकमेकांवर आसक्त होतीं; व प्रेमरज्जूनें आणि वचनप्रमाणानें तीं आतां बांधलीं गेलीं तेव्हां,

तूं प्राण माझा सगुणे तुझा मीं । तूं चंद्रमा कौमुदिनी तुझी मी ॥
सुगंध तूं मी वनपुष्पवल्ली । जशी सुरंगी सम युक्त लाली ॥

असें त्यांस होऊन गेलें. परंतु त्यांची लग्नाची गांठ पडली नव्हती. यामुळें तीं दोघेंहि चिंताक्रांत होतीं. अशा प्रसंगांत त्या दोघांनींहि आपलें मन व संकट आपल्या गुरुजीस सांगितलें; आणि त्यास सहाय

करून घेऊन त्याच्या मदतीनें त्या दोघांचें लग्न लागलें. धर्मशास्त्रदृष्ट्या यथासांग लग्न लागलें तरी लौकिकदृष्ट्या त्यांची अडचण दूर झाली नाहीं. याकरितां त्यानें नदींत बुडून व तिनें शिकारींत वाघाच्या तडाख्यांत सांपडून, असा दोघांनींहि आपण मेल्याचा बहाणा करून तीं दोघें दूर देशास चोरून निघून गेलीं. निघून जातांना शशिसेननें पुरुषवेष धारण केला. त्या दूरच्या गांवास गेल्यावर मोठ्या चमत्कारानें त्या दोघांची तुटातूट झाली; व शेवटीं त्या पुरुषवेषधारी शशिसेनेला त्या गांवच्या राजाच्या पदरीं नोकरीस राहणें भाग पडलें. या ठिकाणीं असतां त्या प्रांतांत एक वाघ फार मातला होता व कोणाच्यानेंहि तो मारवेना. तेव्हां एके दिवशीं त्या राजानें पण लाविला कीं, जो कोणी या वाघाला मारील त्याला मी आपली कन्या देईन. कांहीं तरी 'स्वामीकार्य' करावें या भावनेनें वेशधारी शशिसेनेनें तो मातलेला वाघ ठार केला व राजाचें संकट निवारिलें. परंतु त्यामुळें हिच्यावर एक नवेंच संकट अकल्पित येऊन पडलें. राजानें आपल्या कन्येशीं—ती खराखुरा पुरुष आहे असें समजून—शशिसेनेचा विवाह केला. अखेर फलशोभनाचा प्रसंग आला. तेव्हां युक्तिप्रयुक्तीनें तो शशिसेनेनें लांबणीवर टाकिला. शेवटीं अहिमणीची व शशिसेनेची मोठ्या चमत्कारानें गांठ पडलीं; व त्या दोघांनींहि झालेला सर्व वृत्तान्त त्या राजकन्येमार्फत राणीस व राजास निवेदन केला. वृत्तान्ताच्या खरेपणाबद्दल खात्री पटल्यावर राजाला एक प्रकारचें कौतुक वाटलें; व त्या राजानें

सन्मानना करुनियां अहिमाणिकाला । वेगें समर्पिलि तया निज राजबाला ।।

आणि मग

राज्यांत त्या नृपतिस्नेहवशात्सुखानें । दोघां स्त्रियांसहित गे अहिमाणिकानें ।।
नाना विलास सुखसंभ्रम राजलीला । भोगूनियां कितिक वासर वास केला ।।

असा आनंदाचा काळ क्रमीत असतां या जोडप्यावर पुन्हां दुसरें एक संकट ओढवलें. अहिमाणिक हा प्रथम नागलोकचा राहणारा होता व तेथें त्याची पूर्वीची एक वधूहि होती. तिनें येऊन या आपल्या प्रियास

पुस लावून पाताळांत नागलोकीं नेलें; व आपण सुखांत पडून तिनें शशिसेनेस दुःखसागरांत लोटून दिलें; आणि यामुळें शशिसेना भ्रमिष्ट होऊन भ्रांतिवटासारखी भटकूं लागली. तिची ती दीनावस्था पाहून, वनदेवतांनीं कृपावंत होऊन तिला तिचा प्राणाहूनहि प्रिय असा अहि-माणिक परत आणून दिला; व पुन्हां दोघेंहि सुखानें नांदू लागलीं. थोडे दिवसांनीं हीं दोघें आपल्या पहिल्या देशास आपल्या मातापित्यांकडे परत गेलीं; व मग तेथें अक्षय आनंदांत व सुखांत राहिलीं.

पुरातन कथा अशी अति अपूर्वशी ऐकिली ।
विशेष कविता प्रबंधित करूनि म्या वर्णिली ॥
यथार्थ नवधारसें स्तुति पतिव्रतेची बरी ।
समग्र कथितां अशी सगुण सारशी साजरी ॥

असें कवि ५७१-व्या पद्यांत म्हणतो. आणि हें शशिसेनाव्रत भाद्रपदांत आचरून ही कहाणी ऐकली असतां कोणीही वधू 'न होय पण ती कधीं प्रियवियोगिनी सर्वथा', असें फळ सांगतो.

असें हें जरासें लांब कथानक जगन्नाथ कवीनें पांचशें एक्याऐशीं पद्यांत सांगितलें आहे. या काव्याची रचना साधारणप्रतीचीच आहे; व शब्दांची ओढाताण आणि थोडेसें उत्तानशृंगारात्मक चारगट वर्णन या काव्यांत आल्यामुळें हें अगदीं विशोभित झालें आहे. पण या बाबी अशा असल्या तरीहि स्वतंत्र संविधानक कल्पून हें 'शशिसेना काव्य', रचणारा हा जगन्नाथपंडीत कवि महाराष्ट्रीयांच्या आदरास व कौतुकास विशेष पात्र आहे.

या शशिसेना काव्याशिवाय पौराणिक आख्यानांवर व वेदान्त विषयांवर या कविची आणखीहि बरीच रचना आहे. बोधवैभव, ज्ञान-बत्तिशी वगैरे प्रकरणें असून याची एक वाक्यसुधेवर व एक भगवद्गीते-वरें, अशा टीका उपलब्ध आहेत. हा कवि सतराव्या शतकाच्या शेवटीं

१. ही गीतेवरील टीका समश्लोकी आहे. हिचा समाप्तिकाल शके १६७३ श्रावण शु. ३ असा दिला आहे.

होऊन गेला. यानें आपल्या बोधवैभवाचे शेवटीं त्याचा रचनाकाल शके १६६९-असा दिला आहे; याचे गुरूचें नांव ऋषीश्वर असें होतें[1]; व यानें संन्यासदीक्षा धारण केली असावी असें कळतें.

जगन्नाथाप्रमाणें आणखीहि कवींनीं लहान मोठी स्वतंत्र रचना या काळीं केली असावी. असें मानण्यास बराच पुरावा आढळतो. या वेळीं महाराष्ट्रांतील लोकांच्या डोळ्यासमोर अनेक तऱ्हेचे प्रसंग व अद्भुत घडामोडी होत होत्या. सुखदु:खाचे अनेक प्रसंग ते पाहत होते व ऐकत होते; आणि असें होत असतां या सर्वांची लेखणी त्यासंबंधें अगदीं मूकव्रत धारण करून राहिली असेल व कोणाहि कवीच्या काव्यरचनेचा सूर या घडामोडीच्या दिवसांत त्यांचें वर्णन करण्यास लागला नसेल, हें फारसें संभवत नाहीं.

याच सुमारच्या 'जीवन' नांवाच्या एका कवीनें लिहिलेला 'अनुभवलहरी' या नांवाचा एक प्रबंध आहे[2]. याचे चार प्रसंग आहेत. एक गृहस्थ बेरोजगारी असा घरांत बसून असे, हें पाहून त्याच्या कुटुंबांतलीं माणसें त्याला फार टाकून बोललीं व पदोपदीं त्याचा अपमान आणि पाणउतारा करूं लागलीं.

धनावेगळें सौख्य संतोष नाहीं । धनावेगळा मान सन्मान नाहीं ।।
धनावेगळा तो जना आवडेना । धनावीण जो तो मृतासाम्य जाणा ।।

ही जगाची राहटीच आहे. एक दिवस त्याला त्याची घरचीं माणसें फारच दुरुत्तरें बोललीं; तीं ऐकून त्याच्या बायकोस अतिशय खंती उत्पन्न झाली.

---

१. ऐसें दुर्लभ अखंडानंद । जें दर्शनें करी निर्द्वंद्व ।
जो जगन्नाथाचा गुरु विशद । ऋषीश्वर नाम ज्याचें ।।
(अखंड सहजावस्था)

२. 'जीवन' नांवाच्या कवीचीं अष्टकें व स्तोत्रेंहि आहेत. पण हे दोन्ही जीवनकवी एकच किंवा काय, हें कळण्यास मार्ग नाहीं. एक नसावे, असें वाटतें. स्तोत्रकर्त्या जीवनानें आपला गुरु मुकुंद व गांव नांदेड दिलें आहे. लहरीकर्त्यानें अशी कांहींच माहिती सांगितली नाहीं.

सतिस हें बहु वाइट वाटलें । नयनिं किंचित बाष्पहि दाटलें ।
विषम मानस दुश्चित बैसली । विघुरली वसुधातळ न्याहळी ।।

अशा स्थितींत सारा दिवस घालविल्यावर रात्र पडली आणि तिची आणि नवऱ्याची गांठ पडली. तेव्हां तिनें नवऱ्यास कांहीं तरी रोजगारधंदा पाहण्याविषयीं फार आग्रहानें सांगितलें. घरांत जावा, नणदा कशा टोंचून बोलतात व त्याचा कसा संताप येतो, हें त्यास सांगतांना ती थोडी दुरुत्तरेंहि बोलली. एकांतांतले बायकोचे हे शब्द ऐकून ' मातापिता भगिनी आणि समस्त लोकां 'चा निरोप घेऊन तो दुसरेंच दिवशीं रोजगारासाठीं घर सोडून बाहेर पडला. थोडेच दिवसांत त्यानें सैन्यांत नोकरी पत्करिली व तो सैन्याबरोबर दूर देशीं गेला. आपल्या यजमानांना रोजगार लागला हें पाहून स्त्रीला प्रथम फार बरें वाटलें. परंतु सैन्याचे मुक्काम दूर देशांत गेल्यावर तिकडील हकिकती ऐकून तिला वाईट वाटूं लागलें; व तिकडील कष्ट मनांत आणून ती दुःख करूं लागली.

कळकळित उन्हाळा काळ कर्मेल कैसा ।
तळमळि मन जैसें जाळियांतील मासा ।।

असें मनांत येऊन तिला घरांतल्या घरांत फार हुरहुर वाटे.

चालोनि गेल्या श्रमल्या दुपारा । नेत्र क्षुधेनें फिरती गरारा ।।
तंबूमधें उष्ण बहू उबारा । तेव्हां तयीं घालिल कोण वारा ! ।।

एखादे वेळीं पाऊस पडला तर मग

वारा पाउस सोसितां तव बहू रानामधें राहती
रात्रीं चाचड झोंबती क्षिति किती सांगूं जळो ही स्थिति ।
झालें कूच म्हणोनि गुल्ल (?) करितां रात्रींच पैं ऊठती
हा हा कष्ट किती म्हणोनि श्रमती कोणासि ना सांगती ।।

इकडे स्त्रीची अशी स्थिति होई; व तिकडे नवऱ्यालाहि घरच्या आठवणी येत—

मुकामास येतांच निद्रेस जेव्हां । मुलें लेकरें आठऊ होय तेव्हां ।।

कोणी आल्या-गेल्या वार्तिकाबरोबर धरून 'पापड लोणचीं' वगैरे जिन्नस व वाळविलेलें दहीं, आंबेंत भिजवून वाळविलेला शाद्बचा फडका, वगैरे उपयोगी पदार्थ आणि स्वहस्तें लिहिलेलें पत्रहि बायको पाठवी. तें पाहून त्या दूर रानावनांत नवऱ्याला फार आनंद वाटे. इत्यादि सर्व बारीकसारीक गोष्टीहि यांत लिहिल्या आहेत. एखादे वेळीं सैन्यांतून नवराहि कांहीं वस्तू घरीं पाठवी.

चोळी सुंदर राजहंस लिहिले भुजांवरि साजिरे ।
तूंतें पाठविली अपूर्व बरवी हे आपुले आदरे ।।

अशा प्रकारचा या प्रबंधाचा विषय आहे. या लहानशा काव्याचा इतका खुलासा करण्याचें कारण असें कीं, हें एक त्या वेळची समाज–स्थिति दाखविणारें व घरगुती मनोविकार सरळ भाषेंत सांगणारें गोड प्रकरण आहे. हा एक नमुना झाला. पण असलीं प्रकरणें स्वानुभवा-वरून किंवा प्रत्यक्ष डोळ्यांनीं स्थिति पाहून कवि लिहूं लागले होते,[1] हें यावरून स्पष्ट होतें. याच प्रकारचें '**शिवराम**' नांवाच्या कविचेंहि एक लहानसें प्रकरण आहे. यांत पतिराज दूर देशास गेले असतां घरीं बायकोनें निरनिराळे सणावाराचे दिवस कसे घालविले, याचें वर्णन आहे. याप्रमाणें सुमारें एक वर्ष गेल्यानंतर एक दिवस सेवकानें येऊन यजमान आल्याची खबर सांगितली.

ऐकुनी असा शब्द भामिनी । वस्त्र सांवरी तुष्टली मनीं ।
येउनि गृहद्वारि पातली । पावली म्हणे देवमाउली ।।
तों उभा असे आंगणी पती । देखुनि तिला अश्रु लोटती ।
हर्ष अंतरीं फार वाटला । विरहशोक तो सर्व सांडला ।।

आणि मग ते दिवशीं तिनें 'रुचकर व गोड' पदार्थांची पाक-सिद्धि करून मोठया आनंदानें पतीस वाढून भोजन केलें. त्या दिवशीं

---

१. 'अनुभवलहरी' हें जीवन कवीनें स्वतःच्यासंबंधानें लिलिलें असावें, असें आंतील भाषेवरून वाटतें. पण

साष्टांगीं प्रणिपात त्या गजमुखा घालीतसे किंकरू ।
कांहीं येक विनोदसार रचना आज्ञा तुझी; दे वरू ।।

या गणेशाच्या नमनावरून हें प्रकरण काल्पनिक असण्याचाहि संभव आहे.

'वाटे तिला दिवस का अति थोर झाला'. पण तो लांब आणि कंटाळवाणा दिवस सरून रात्रहि आली; व प्रवासांतल्या सुखदु:खांच्या गोष्टी बोलण्यास आणि

त्यजूनीयां मातें बहु दिवस गेलेत रमणा ।
मनामध्यें कांही कधि तरि तुम्हां येत करुणा ॥

असें रागावून सांगण्यास फुरसत सांपडली.

साधारणपणें 'बारा मास' म्हणून विठ्ठल, त्र्यंबक वगैरेंचीं जीं प्रकरणें आहेत तीं असल्याच धर्तीवर रचिलेलीं आहेत. कोणीं कोणीं त्यांत अनुभवसिद्ध गोष्टी सांगून त्यांना विशेष गोडी आणिली आहे; व कोणीं अगदींच ठरीव वर्णनें केलीं आहेत, इतकाच यांत भेद आहे.

कवींच्या कल्पनेच्या भराऱ्यांत एक तऱ्हेची मौज वाटते हें खरें, पण तितकीच मौज अगदीं साधेपणाचें वर्णनांतहि अनुभविण्यास येते. ज्यांत स्वत:चे निरिक्षण तंतोतंत उतरिलें आहे; व ज्यांत डोळ्यांनीं जें पाहिलें, कानांनीं जें ऐकिलें व मनानें जें अनुभविलें तेंच जसेंच्या तसें हातांनीं लिहिलेलें आहे अशी रचना प्रत्येकाच्या स्वानुभवास पटते व त्यांतच सहृदय काव्याची ओळख दिसून येते; आणि असें वर्णन करण्याचा अवसर नीट सांपडण्यासाठीं नेहमींच्या प्रचारांतलें असें साधें संविधानक कल्पून हे विचार त्यास जोडून दिले तर तो कवि एक सर्वमान्य काव्य निर्माण करूं शकतो. मात्र असें करतांना जुन्या कवींनीं पुरातन कांळीं पाडिलेल्या कविकल्पनांचे कायम ठशांचा त्यांत उपयोग करण्याचा मोह दूर ठेविला पाहिजे. वर्णनांतले ठरीव शब्द त्यांत मुद्दाम आणून योजितां कामा नयेत. त्या वर्णनांत प्रत्यक्ष पाहिल्याचा खरेपणा खणाणला पाहिजे. केवळ गोड वाटेल असें वर्णन किंवा उसने शब्द यांचा बेसूर आवाज यांत येतां कामा नये[1]. म्हणजे तें काव्य विशेषच मोहक होईल.

१. आपलीं वर्णनें, प्रत्यक्ष पाहून अथवा डोळ्यासमोरच्या गोष्टींचीं टिपणें न करितां, केवळ कल्पनेवर विश्वासून केलीं असतां त्यांत अनेक

[पान ६०१ पहा.]

केवळ मनानें कल्पून लिहिलेलें असें **अनाम** कवीचें एक ‘ सावकार-आख्यान ’ म्हणून जरा गमतीचें प्रकरण आहे. तसेंच कोणा ‘ **दत्त** ’ नांवाच्या कवीनेंहि अशीच एक कल्पित गोष्ट लिहिलेली आहे, असें त्यांतील कांहीं भाग प्रसिद्ध आहे त्यावरून दिसतें. ‘ दत्त ’ कवीनें आपली कथा वसंततिलका वृत्ताच्या श्लोकांत सांगितलेली दिसते. असली कथानकें लिहिणाऱ्या कवींच्या कथानकांमध्यें मध्वनाथाचें ‘ धनेश्वरचरित्र ’ उर्फ ‘ चौल राजाची कथा ’ हें प्रकरण फार प्रचारांतलें आहे.

**मध्वमुनि** हे आपल्या मराठी भाषेंतील एक फार नामांकित कवि व साधुपुरुष होऊन गेले. यांच्या नांवाप्रमाणें यांची वाणी खरोखरच मधुस्त्रिवणी आहे. यांची पुष्कळ कविता पैठण व औरंगाबाद येथें आहे. मध्वमुनि हे नाशिकचे राहणारे होते व पुढें उत्तर वयांत हे सेंदुरवाडें येथें राहत असत, अशी माहिती महीपतीबुवा आपल्या ग्रंथांत सांगतात. पण राजाराम प्रासादी म्हणतात ‘ निरा नदीचिये तिरीं । ‘ कळबोली ’ ग्राम उत्तम नगरी । ’ या ठिकाणीं मध्वमुनींचा जन्म झाला. मध्वमुनींचा जन्म कधीं झाला, हें नक्कीं माहीत नाहीं. पण यांचा समाधिकाल शके १६५६ विरोधी-संवत्सर मार्गशीर्ष शु॥ प्रतिपदा हा होये. मध्वमुनींनी

---

[ पान ६००-वरून. ]

तऱ्हेचे हास्यास्पद प्रकार दिसून येतात. असले प्रकार उत्तम नांवाजलेल्या अशा अलीकडील विद्वान् कवींत तर केवळ अक्षम्य वाटतात.

तो चंद्रमा उगवला गगनप्रदीप । आहेत शुक्र गुरु मंगल ज्यासमीप ॥

हें पौर्णिमेच्या चंद्रोदयाचें वर्णन व

वैशाखमास वासतिक समय शोभला ।
जाइ जुई मोगरिला बहर तो अला ॥

हें वैशाखाचें वर्णन, हीं दोन्हीं नाणावलेलीं व प्रसिद्ध पद्यें आहेत. पण यांत सत्यपणा किती आहे ! पौर्णिमेच्या चंद्राजवळ शुक्र आणि तसेंच वैशाखांत जाईला आलेला भर कधीं तरी कोणीं पाहिला आहे काय !

१. राजाराम प्रासादी ‘ मध्यनाथाचें जनन । सोळाशें येकुणहत्तर । शुल्क नाम संवत्सर जाण । माघ कृष्ण चतुर्दशी ॥’ असें सांगतात. पण १६६९- त शुल्क संवत्सर येत नाहीं. शिवाय अमृतरायाचे हे गुरु होते हीहि गोष्ट मान्य आहे. तेव्हां हा शक बरोबर नाहीं, हें उघड आहे.

'धनेश्वरा' ची गोष्ट अभंग वृत्तांत गाइली आहे; व यांतील सुमारें नव्वद चौक किंवा चरण आहेत.

तशीच दुसरी चोळ राजाची कथा ओंवी वृत्तांत लिहिलेली एका बाडांत आढळली. बाड जुनें आहे पण किती जुनें आहे, हें कळत नाहीं. यांत पानें फाटलीं असल्यामुळें ओंव्या त्रुटित आहेत. दोनच पृष्ठें साधारण बरीं आहेत. त्यांतील उतारा —

"कथा चोळरायाची"

नारद म्हणे नवल वितलें ( वर्तलें ? )। चोळरायासी संकट पडलें। तेथें जगनिवासें रक्षिलें। तें ऐका सावधान ॥ गावीं असतां चोळ राजा ...। कोन्ह येक आला ब्राह्मण। ... सांगाते घेऊन शिशु येक धाकटा ॥ देखूनि दिव्य...णं। राजा उठोनि आपणें। करूनिया वंदनें। पूजा करून वर्तमान पुसें ॥ ३ ॥ राजा म्हणे ब्रम्हद्विजवरा। कोठूनि येणें जाहलें या नगरा। कांहीं अज्ञा मर्जकिकरा। सांगावें इच्छित ॥ ४ ॥ विप्र म्हणें राया अवधारी। दक्षिण समुद्राचिया तिरीं। इंदुपूर नाम नगरी। तेथें वास्तव आमुचें ॥ ५ ॥ ते ठायीं परम धर्मिष्ट। कूर्म नाम द्विज श्रेष्ठ। तो माझा पिता सुभट। माझें नाम कृष्ण शर्मा ॥ ६ ॥ भार्या नाम सुह्यमीणी। येक पुत्र मज लागुनी॥ त्रिमासाचा राजेंद्र ॥ ७ ॥ ...री राया अवधारी। येक इच्छा आहे अंतरी॥ पाहावी वाराणसी नगरी। जे मुक्त करीं प्राणियां ॥ ८ ॥ भार्या सकुमार। त्रिमासाचा श...सुंदर। प्रवासा योग्य नव्हेसा...र। मज थोर चि...॥ ९ ॥ तरी इछी माझें मन। अस्त्री आणि बाळ तुजपाशी ठेवून। मी येतों वाराणसी करून ॥ तुझें नि धर्म राजेंद्रा ॥ १० ॥ करूनी गयावर्जन। संवछरांत येतों परतोन। तरी माझी स्त्री करी जतन। वस्त्रें अन्न देऊनी॥ ११ ॥ राजा म्हणे स्वामी। अवश्य ठेवा ... धामी। ते ... कन्या माझी मी। अवश्य जतन करीन ॥ १२ ॥ अैकोनी रायाचें वचन। संतोषला ब्राम्हण। अस्त्री-लागी पुसोन। पुत्रवदन अवलोकी ॥ १३ ॥

इंद्रायणीचे तीरीं जसें 'सिद्धेश्वरा'चें देऊळ आहे तसेंच एक 'धने-श्वराचें' देऊळ होतें. हें देऊळ पुरातन काळीं कुबेरानें स्थापिलें असून त्यांत शाळुंकेखालीं अपार द्रव्य पुरून ठेविलें होतें, आणि 'देवालयापुढें।

होता नंदिकेश्वर । कुबेरें त्यावर । लिहिलें होतें ।' कीं सिंहस्थांत माघमासीं सोमवारी शिवरात्र आली असतां ते रात्रीं

विप्रकुमाराचा बळी दीजे । त्याचे रक्तें कीजे । अभिषेक ॥
पांचा वरुषांचें बाळक असावें । आणिक नसावें वय त्याचें ॥
बापावें धरावे आईनें आवरावें । राजानें करावें । छेदन त्याचें ॥
मध्यरात्रीं देवा । देईल ऐसा बळी । त्यासीं चंद्रमौळी । देई धन ॥

याप्रमाणें एक दिवस योग आला असतां, चाकणचा राजा त्या अपार धनाच्या लोभांत गुंतून या प्रयत्नास लागला; व त्यानें एका गरिबाचें असें मूल बळीं देण्यास तयार केलें. राजाच्या आग्रहानें व धनाच्या लालचीनें आईबापेंहि कबूल झालीं व माघमासीं शिवरात्रीच्या रात्रीं—

मायबाप राजा आले देउळासी । कडेवरी बाळासी घेऊनीयां ॥
रायें पूजियेला देव मध्यरात्रीं । तांदुळ बिल्वपत्रीं वाहीयेली ॥
बाळ देवावरी धरिला मायबापें । आतां म्हणें कांपे मान याची ॥
रायें उपसली आपुली तलवार । पुसियेली धार रुमालानें ॥
तये वेळीं बाळ काकुळती रडे । पाहे मुखाकडे माउलीच्या ॥
म्हणे, माई मज घेई कडेवरी । चल घडिभरी दूर जाऊं ॥
रडेना मी कदा मागे ना मी आमा । काढीन ॐनामा पाटीवरी ॥
कंठ हा सोकला लागलीसे तहान । लोटी भरुन आण पाणी पाजी ॥
पशुपक्षी म्हणतीं मायबापें वेडावलीं । रडती वृक्षवल्ली पाषाण ते ॥
कांहीं केल्या त्यांचें द्रवेना तें मन । बाळापरिस धन प्रिय झालें ॥
बाळ म्हणे, देवा आतां करूं काय । कैशी बापमाय उबगलीं ॥
माय मारी तेव्हां बाप लळा पाळी । तो मारितां सांभाळी माय तेव्हां ॥
मायबापाविण आहे जें लेंकरूं । त्याचा अंगिकारूं राजा करी ॥
मायबापें माझे धरियेले पाय । राजा सिद्ध होय वधावया ॥
अनाथाचा नाथ पुराणीं वर्णिला । तो माझ्या तान्हेला रक्तासाठीं ।
देह देवाच्या हा कारणी कीं पडो । मनोभावें घडो सेवा त्याची ॥
हरहर महादेव वदत वदनीं । देह नैवद्य अर्पुनी सिद्ध झाला ॥

राया शस्त्र उचलोनी लावी कंठनाळी । तेव्हां चंद्रमौळी गजबजला ॥
मध्वनाथ म्हणे ऐकुनीया कींव । घामें सदाशीव डवडवला ॥

इतकें झाल्यावर शंकर तेथें प्रत्यक्ष अवतरला. त्याचा आवेश पाहून मायबाप आणि राजा तिघेंहि मूर्च्छित होऊन पडलीं; आणि श्रीशंकरानें तें बाळ उचलून आपल्या मांडीवर घेतलें.

देव म्हणे, बाळा, झालों मी प्रसन्न । माग वरदान मज कांहीं ॥
बाळ म्हणे देवा, तुझें नांव काय ? कोठें बापमाय? महाराजा? ॥
देव म्हणे तुझीं, मायबापें मेलीं । राजासहित गेलीं, नर्कवासा ॥
बाळानें ऐकोनी निराशवचन । दाटले लोचन अश्रुपातीं ॥
बाळानें घेतली गडबडां लोळण । म्हणे, माझी कोण मुंज करी? ॥
देव म्हणे आतां, रडूं किंवा हासूं । मोठें आलें हासूं सदाशीवा ॥

ही मध्वमुनींची 'धनलोभ्याची' गोड गोष्ट वर सांगितली. याचप्रमाणें यांची पदेंहि फार गोड आहेत. किंबहुना यांचें एकहि पद असें सांपडत नाहीं कीं, ज्यांत विशेष गोडी नाहीं. यामुळें यांचे पदांचा मासला देण्याला निवड करण्याची गरज नाहीं. कोणतेंहि पद दिलें तरी चालेल. याकरितां एक लहानसेंच पद येथें देतों—

हरि तुझि मुरली ऐकुनि गोड । नीरस तरुवर फुटती ॥ निघती पल्लव मोड ॥ सखिये सजीव होते । तें स्थळि निर्जिव खोड ॥ १ ॥ प्रसवति वांझा गाई । त्या पुरवति सर्वंहि कोड ॥ सखया चुरुचुरु थानें प्राशिति । वत्सें न दीसति रोड ॥ २ ॥ मध्वमुनेश्वर स्वामी । तूं माझें बंधन तोड ॥ सखया निजपद आपुलें दावि । तूं पुरवी सर्वंहि कोड ॥ ३ ॥

मध्वमुनींचें मूळ नांव 'महादेव' होतें असें भक्तमंजरीकार म्हणतात. पण इतरत्र त्यांचें नांव त्र्यंबक होतें असाहि उल्लेख आढळतो. नाशिक ऊर्फ 'जनस्थान' येथील राहणाऱ्या त्र्यंबक कवीची कांहीं कविता उपलब्ध आहे. यापैकीं याचें 'प्रल्हाद चरित्र' हें प्रसिद्ध आहे. यांत

जनस्थानीं नांदे द्विजवर ६८।त्र्यंबक कवी ।
तयानें हे केली सरस कवित्व पद्धति नवी ॥

असें प्रारंभीं सांगून शेवटीं

दयाळा म्यां तूझा अमल मनिं धावा विनविला ।
धनी त्रैलोक्याचा अभयवरदानीं शिणविला ।।
तया प्रल्हादानें हृदयकमलीं देव नमिला ।
म्हणे 'स्वामीं स्थापीं चरण कमलीं मध्वमुनिला' ।।

असा श्लोक घातला आहे. हें प्रकरण मध्वमुनींचें असल्यास त्यांचें नांव '**त्र्यंबक**' होतें, असें उघड ठरतें. पण तें मध्वमुनींचें नसेल तर त्र्यंबक हा त्यांचाच शिष्य होता असें होतें. या प्रल्हादचरित्राच्या गोड भाषेवरून त्याचा व मध्वमुनींचा कांहीं विशेष संबंध असावा, हें मात्र खरें वाटतें. प्रल्हादचरित्राची कथा महाराष्ट्राच्या मनाला नेहमींचीच फार आवडती आहे. या कथेचें गोड अमृत महाराष्ट्र पूर्ण भक्तिप्रेमानें आपल्या कर्णद्वारांतून ओतून त्याचा अभिषेक आपल्या हृदयलिंगावर आज अनेक शतकें करीत आहे. माता वसुंधरेला 'त्राहि त्राहि' करून टाकणाऱ्या राक्षसाला मारण्यासाठीं व तिच्या मुलांचें संरक्षण करण्यासाठीं त्या दीनवत्सल प्रभूनें अचेतन स्तंभामध्येंच अवतार धारण करावा, त्या अचेतनालाहि चेतना आणावी, व दुष्टांचा संहार उडवावा, हा चमत्कार कोणालाहि संतोष देईल. मग दुःखानें वारंवार गांजलेल्या महाराष्ट्राला त्यापासून आनंद होईल यांत काय नवल! हें गोड आख्यान एकनाथ, तुकारामापासून तों आजपर्यंत दहाबारा निरनिराळ्या कवींनीं गाईलें आहे. पंतांचा तर यावर 'प्रल्हादविजय' नांवाचा स्वतंत्रच ग्रंथ आहे हें मशहूर आहे.

वर उल्लेखिलेलें 'प्रल्हादचरित्र' हें प्रत्यक्ष मध्वमुनींचें नसलें तर त्याचा कर्ता 'त्र्यंबक' हा मध्वमुनींचा एक शिष्य होय, हें उघड आहे. पण यासंबंधें निश्चयात्मक माहिती सांगण्यासारखा आधार आज उपलब्ध नाहीं, तेव्हां तूर्त तरी हें संशयास्पदच समजलें पाहिजे.

मध्वमुनींचा दुसरा प्रसिद्ध शिष्य **अमृतराय**. हें गुरुशिष्यांचें नातें महाराष्ट्रांत आज अनेक वर्षे प्रसिद्ध व संमत आहे. अमृतरायानेंहि एका पदांत 'गुरु मध्वनाथ' असें म्हटलें आहे. परंतु कांहीं ठिकाणीं

अमृतरायानें आपल्या गुरुचें नांव ' अंबिका सरस्वती ' असेंहि दिलेलें आढळतें. तसेंच, अमृतरायाच्या ' अविनाश संदेहहरणा 'चे शेवटीं त्यानें ' माधवसरस्वती — विठ्ठलसरस्वती — अंबिकासरस्वती ' अशी आपली गुरुपरंपरा दिली आहे[1]. अमृतरायाचा जन्म शके १६२० बहुधान्य-संवत्सरी झाला; याच्या बापाचें नांव शंकर व आईचें नांव उमा, असें यानें आपल्या व्याख्यानांत सांगितलें आहे. हे मुळचे बुलढाणा जिल्ह्यांत मेहकर तालुक्यांतील फत्तेखेरडा येथील राहणारे. या गांवीं अजूनहि यांच्या घराचा चौत्रा आहे. हें गांव बुलढाण्यापासून ३०–३५ मैल आहे. परंतु पुढें हे औरंगाबाद येथील विसामोरो नांवाच्या एका श्रीमंत गृहस्थाच्या पदरीं कारकून होते. परंतु यांच्या-सारख्या रंगेलाचें तेथें कसें पटणार? अखेरीस ' विसामोरोला जाऊन सांगा, पुरे तुझी नोकरी ' असें म्हणून यांनीं नोकरीला रामराम ठोकला व भिक्षावृत्ति पत्करिली. यांच्या कवितेंत टिकठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून यांच्या स्त्रीची वृत्तिहि यांना संसारास वैतागून जाण्यास कारणीभूत झाली असावी असें दिसतें[2]. यांनीं नोकरीचा पेशा सोडून

---

१. ' मद्गुमुनीश्वर सद्गुरुनाथजी आवडला मजला ' (पद) अमृत-रायाचे शिष्य सिद्धेश्वर यानीं आपली परंपरा पूर्णानंद— ज्ञाननंद—अमृतराय अशी दिली आहे. यावरून रायजींनीं चार वेळां चार गुरूंचा उपदेश घेतला असावा, असें होतें.

२. मागे ती लुगडीं सकाम बुगडी आठां दिसा बांगडी  
घाली ते फुगडी कधीं न रगडी, फाडीतसे आंगडी ॥  
खैराची शगडी तशी धडधडी तोंडाळ मोठी खुडी  
सोन्याच्या लगडीस देखुनि रमे ऐशी महा धांगडी ॥  
दारा देत कडी, सदा बडबडी बोले महा वांकडी  
दाणे चोरुन फांकडी न कळतां घेते मुळे कांकडी ॥  
खाते ती जशि माकडी वसवसी दांती दिसे खोकडी  
यालागीं अमृतेश्वरासि रुचली गंगातिरी झोपडी ॥

तसेंच

बाइल पैशाची पैसाची । कधीं नव्हे पुरुषाची ।  
जोंवरि धनमुत जोडी । तोंवरि लावी लाडीगोडी ॥ इ. इ.

दिला व संसाराची उठाठेवहि टाकिली. पण यांचा मूळ स्वभाव यांनीं टाकिला नाहीं. असें सांगतात कीं, आपल्या स्वभावाप्रमाणें यांनीं एके वेळीं मध्वमुनींची थट्टा केली. तेव्हां मध्वमुनि रागास बिलकुल थारा न देतां शांतपणानें म्हणाले, ' बापा ! तुला परमेश्वरानें अमृततुल्य वाणी दिली आहे. तिचा उपयोग त्वां असा करूं नये. ईश्वरभजनाकडे करून परमेश्वराचे पायाची जोड करावी ! ' या उपदेशानें रायजींच्या वृत्तींत फेर पडला व ते आणि त्यांची वाणी ईश्वरभजनाकडे वळली. हाच मध्वमुनींचा उपदेश —

प्राण्या बोलावें बहुगोड ॥ ध्रु० ॥ दुष्ट दुरुक्ती दुर्वचनाची । टाकनि द्यावी खोड ॥ अंतर बाहिर नवादि साखर । सेवि सुखाची कोड ॥ अमृत म्हणे परदेहा येऊनि । संतसमागम जोड ॥ प्राण्या० ॥

या पदांत रायजींनीं सर्व जगास केला आहे.

तसेंच,

माझं अचड बचड छकड ग । माझं अचड बचड छकड ग ।
त्रिभुवनपालक बालक त्याला । पांघरवितें घोंगड ग ।
माझं अचड बचड छकड ग ।
आंगणीं रांगत मंजुळ बोलत । माझं सोन्याचं ठिगडं ग ।
विकसत पंकज लोचन ज्याचे । जननि म्हणे हे चिपडं ग ।
माझं अचड बचड छकड ग ।
मध्वमुनीश्वर खेळवि अंकीं । ब्रम्हसनातन उघड ग ।

अमृतरायांची वाणी फार सरस होती. अमृतराय हें नांव त्यांस सार्थ होतें. प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशी यांची बरीच कवित्वरचना आहे. यांची बहुतेक कविता कटावात्मक आहे. रचनेंत प्रौढता असून आपल्या काव्यांत हिंदी व संस्कृत शब्दांची योजना मोठ्या चतुराईनें करून आपल्या काव्यास यांनीं वैचित्र्य आणिलें आहे. यांच्या कटावांत प्रसाद तर ओतप्रोत भरलेला आढळतो. चांगल्या कुशल चितार्‍यानें सहज कुंचला फिरविला तरी जसा रंग सफाईनें खुलतो, तसेंच यांच्या कटावाचें आहे. कटावांत कथनकाच्या गोडीपेक्षां कवीच्या करामतीनेंच

वाचकाचें मन दंग होऊन जातें. नुसतें कपड्यांचें, जेवणापक्वान्नांचें किंवा अलंकारांचें वर्णन म्हणजे त्या त्या वस्तूंची नुसती एक लांबलचक यादच म्हणावयाची; पण ही याद करितांनादेखील कवीनें आपलें अमोल चातुर्य प्रकट केलें आहे. यांची सर्व कविता 'कडाका' छंदात आहे; यांत प्रासानुप्रासांची जुळणी अशी मोहक रितीनें केली आहे कीं, एकादे वेळीं अर्थ न कळला तरीदेखील त्या शब्दांच्या नुसत्या नादावरच चित्त डोलूं लागतें, श्रवणमात्रेकरून आनंद उत्पन्न व्हावा व शब्दालंकारांनीं मनुष्याचें मन तन्मय होऊन जावें अशी यांची रचना गोड, खुबीदार व प्रलोभक आहे. शब्दांची ठसकेदार ठेवण, वाक्यांची डौलदार घाटणी, आणि वस्तुस्थितीचें हुबेहुब वर्णन यांमुळें व अक्षरांच्या ठेक्यानें ऐकणाराचें मन तल्लीन होतें. यांच्या त्या यमक छंदांच्या शब्दांचा खणखणाट एकदां सुरू झाला म्हणजेश्रोता कसाहि अरसिक असला तरीहि त्याचा लय तेव्हांच लागून जातो व मन समरस होतें. यांच्या कटावांतले ते एकसारखे शब्द पाहिले म्हणजे मोत्यांच्या ओंवलेल्या सरांची आठवण येते. 'मी एकेक अक्षरें रसिकें मेळवीन' असें म्हणून यांच्या पूर्वीच्या कवींनीं तीं तशीं मिळविलीं. पण रायजींना तीं येऊन सहज मिळालीं, इतका फरक आहे. आज इतके वर्षांनींहि ही स्थिती; मग कवीच्या हयातींतच त्याच्या कीर्तनाचा काय रंग असेल ! नानासाहेब पेशवेहि यांच्या कीर्तनानें फार खुष होत, अशी प्रसिद्धि आहे. शनिवारवाड्यांत श्रीमंतांच्या समोर अमृतरायाचें कीर्तन झाल्याची आख्यायिका प्रसिद्धच आहे. अमृतरायांस रामयोगी व शिवयोगी या नांवाचे दोन पुत्र होते. ते रायजींप्रमाणें छंदिष्ट नसून ईश्वरपरायण होते व दोघेहि योगाभ्यास करून आजन्म ब्रह्मचारी राहिले. या दोघांच्याहि समाधी सायखेडें येथें आहेत. अर्थात यांचे पश्चात् अमृतरायजी महाराजांची अवलाद संतति नाहीं. अफलाद वंश अजून आहे. रायजींस एक कृष्णाबाई नांवाची कन्या होती. तिचा वंश अजून पैठणांत आहे. रायजींस पेशवाईत मिळालेलें वर्षासन अजून

यांचेकडे चालतें. शेवटच्या बाजीराव साहेबांचे वेळीं कोणत्या कोणत्या गुणिजनांस बक्षिसें दिलीं जात, याची एक सुमारें तीनशें नांवांची याद आहे. हींत 'नारायण गोसावी अमृतरायाचे नातू' असें नांव आहे. हे अर्थात् मुलीचे पुत्र असावे.

अमृतराय हे शके १६७५-मध्यें श्रीमुखनाम संवत्सरीं चैत्र शु॥ प्रतिपदेस म्हणजे वयाची पन्नाशी उलटली नाहीं तोंच समाधिस्त झाले. 'गुणगण लिहितां अमृतकविचे केश झाले भोरे' असें एका पद्यांत ते म्हणतात. यांच्या शिष्यमडळींत प्रसिद्ध कोल्हापूरकर सिद्धेश्वरमहाराज[1], माधवकवि वगैरे पुरुष होते. मराठी भाषेत कटाव करण्याची चाल अमृतरायापूर्वी नव्हती. किंबहुना 'कटाव' हें वृत्त रायजींनीं मराठी भाषेत नविनच सुरू केलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मराठीप्रमाणें हिंदी भाषाहि अमृतराय चांगली जाणीत असत. त्या भाषेतहि त्यांची पदें वगैरे रचना आहे. त्यांचें एक आशिर्वादात्मक हिंदी पद आहे. त्यावरून ते ती भाषा कशी लिहीत हें कळेल व त्यांची सुखाची कल्पना काय होती हेंहि कळेल. ते म्हणतात—

तुम चिरंजीव कल्याण रहो। हरिकथा सुरस पिवो ॥
हरिकीर्तनके साथी सज्जन। बहुत बरस जीवो ॥ तुम चिरंजीव० ॥ धृ० ॥
उच्चा मंदिर मेहेल सुनेरी। महल मुलुख बस्ती ।
पुत्र पौत्र धन, सुंदर कामिनि। सुगुण रूप हस्ती ॥ १ ॥
सस्ता दाना पाणी निर्मल। गंगाजल गेहरा ।
रंगराग घर बाग बगीचे। रुपयें होन मोहरा ॥ २ ॥
अमृतरायके अमृतबचन। तुम सदा सुखी रहियो ॥
सबल पुष्ट अरोग्य अनामय। आनंदमो रहियो ॥ ३ ॥

---

१. सिद्धेश्वरमहाराजांनीं आपली गुरुपरंपरा पूर्णानंद—ज्ञानानंद—अमृतराय—सिद्धेश्वर अशी दिली आहे. वर मध्वनाथ व अंबिकासरस्वती अशीं रायजींच्या गुरूंचीं दोन नांवें दिलीं आहेत. यांपैकीं खरा गुरु कोण हें एक अमृतरायांसच ठाऊक. कदाचित् तिघांचाहि अनुग्रह घेतला असेल. एकापेक्षां अधिक गुरु केल्याचीं उदाहरणें महाराष्ट्रांत आढळतात. तथापि ही आनंदसंप्रदायाची परंपरा त्यांचे शिष्य सिद्धेश्वर महाराज यांनीं स्वतः व सिद्धेश्वरांचे शिष्य राजारामबुवा यांनीं भक्तमंजरींत दिली आहे.

तसेंच नारदाच्या मनांत एक वेळ संसारसुख अनुभवावें असें आलें असतां तो सोळा सहस्र कामिनींचा पती जो श्रीकृष्ण त्याचेजवळ त्यापैकीं एक मागण्यास गेला. त्या वेळीं मी जिच्या येथें नसेन ती तुम्ही घेऊन संसारसुख अनुभवावें, असें कृष्णानें सांगितलें. त्यासंबंधाच्या कटावांतला एक उतारा देतो.—

म्लानवदन अतिअस्वस्थ होवुनि, सलज्ज मतिनें जवळ जाउनी, गृहांत आमुच्या नसे कामिनी, चैन पडेना दिवस यामिनी, अग्निहोत्र मज अवश्य घेणें, अनुभवोनियां पुनरपि देणें, अभिलाषाची वृत्ति नेणें, रमाकांत एकांत पाहुनी, कांता तुमच्या समीची न घरीं, कमीचि नसतां शुद्ध बुद्ध तो मुनिवर वदला, ‘ विषयसर्प कंदर्प झोंबला.’ भ्रमला जाणुनि अबला माग; कमलापतिचे करकमलानें, कमलोद्भवसुत धरि करकमला, कमलनाभ तो प्रसन्न वदला, ‘ जयीं स्थळीं मी नसेन स्वामि, तया स्त्रियेशीं निजसुखधामीं, हेतू पुरवा, नुरवा कांहीं; बरवा प्रपंच, नीट करावा; वाहवा तुमची जनांत होइल, मनांत कांहीं विकल्प न धरा, अधगामृन तें पान करावें, अविलंबानें शीघ्र उठावें,’ ऐसें पाहुनि त्वरित निघाला; पाहत चालिला, त्या श्रीहरीला, भामें मंदिरीं कृष्ण निजेला; कालिंदीला घेत कडेला; लक्ष्मणेचा निजकर धरिला, जांबुवंतीनें विडा अर्पिला, मयूरभद्रा चुरि चरणाला, मूळ धाडितो त्वरित सुनेला, स्वयें घेउनी कडे मुलाला, मंडप बांधी व्रतबंधाला, ऐसा झाला भरोनि उरला, ठायीं ठायीं सर्व व्यापिला ।। भवभ्रम हा नारदाचा श्रीकृष्णे सर्वही हरिला ।।

अमृतरायांच्या कटावांचा रंग पाहून महाराष्ट्रांत इतर कविहि कटाव करूं लागले. हरिदासांना कथाकीर्तनांत श्रोत्यांना खुलविण्याच्या कामीं यांचा उपयोगहि जिकडे-तिकडे होऊं लागला; व लोकांनाहि या नव्या वृत्ताचा बराच चटका लागला. अमृतरायाचे माधव, शंकर वगैरे शिष्य चांगले

१. शंकराचे कटाव असून पदें, अभंग, श्लोक, वगैरे रचनाहि आहे. यानें रचिलेलीं कांहीं आख्यानें व प्रकरणेंहि आहेत. याचें एक पद येथें देतों. हें ‘रामवनवास’, या आख्यानांतील आहे. आख्यान अनेकवृत्तात्मक आहे.

[पान ६११ पाहा.]

कटाव करीत. यांच्या शिष्यांपैकीं 'ब्रह्मगिरी'ची दामाजीची रसद तर विशेषच प्रसिद्ध आहे. या शिष्यांखेरीज इतरहि मंडळी अमृतरायांच्या धाटणीची नक्कल चांगली करीत. **विनायक** नांवाच्या एका कवीचे कांहीं कटाव आहेत. त्यांची रचना कर्णमधुर आहे, यांत संशय नाहीं. याचा नऊ कडव्यांचा एक 'नवरस' आहे. या नवरसाच्या नऊ कडव्यांपैकीं शेवटलें कडवें असें:—

मंजुळवेणूनादितवदना। निजजनघातक षड्रिपुदमना॥ शरणांगत जन कलिमलदहना। ऐसा गोपिनि श्रीकृष्णाला॥ स्तवनें सुमनें भावें पुजिला। ... ... ...बहु अभिमानी ऐशा रामा। पाहुनि त्यांचा अद्भुत प्रेमा। कृपा उपजली मगलधामा। दर्शन देऊनि पाठि थापटी। सावध व्हा मे सकल गोरटी। ह्मणुनि कवळुनि धरिल्या पोटीं। हरिची पाहुनि मूर्ति गोमटी। ठेविति मस्तक हरिचे चरणीं। आनंदानें भरल्या तरणी। भरमद डुल्लति जैशा करिणी। विकसित नलिनी पाहुनि तरणी। तैशा सुस्मित वदना रमणी। पुन्हां आणिल्या रासमंडळा। अद्भुत क्रीडारंग मांडिला। पराग परिमळ बुका उधळिला॥ भरमुठ फेकिती गुलालाच्या। रंगे भरुनी पिचकाऱ्याच्या। उडविती धारा कारंज्यांच्या। रंग खेळता रंगे भिजल्या। बहु जळक्रीडेमधि रत झाल्या। मग सुखशय्येवर त्या रमल्या। श्रीकृष्णानें अपूर्व केली। षण्मासाची रात्र चांगली। हरिरतिसंगें वृत्ति मुरली। गोपवधूंची आशा पुरली। अज्ञानाची निशि मावळली। ज्ञानभास्करीं प्रभा उदेली।

---

[पान ६१०-वरून]

**पद**

सांडुनिया सोनियाची अंगी। सुंदर विभुत चर्चिली अंगीं। जैसा भव्य पुरातन शरयुतिरीं बैसला। राम गोसावी कीं झाला॥ अवघे मिळोन पाहु चला॥ १॥ फेंकुनि दिला बादिला, बांधला चिरा। काढिला मोतियांचा तुरा। फेडुनि पिवळ्या पितांबरा॥ वनीं वल्कलें नेसला॥ २॥ घरांत होऊनिया बेजार। काढी किनखापी विजार। जैसी तुटकी पैंजार। तैसे राज्य झुगारीलें॥ ३॥ उदास होऊनी सुवर्ण नगी। संन्निध सीता बैसली उगी। भेटीस नलगे परवानगी। उघडें दर्शन चांगलें॥ ४॥ **शंकर अमृतेश्वर** भगवान। त्याचें आवडतें ध्यान। आपुल्या जातीचें महिमान। ज्याला त्याला आवडे॥ ५॥

प्रपंच-गोपी-मूर्खें लाजलीं । व्यस्तकुंतलांबर व्रजांत नारी । प्रवेश करिती निज मंदीरीं । सुरास क्रीडा येथुनि सरली ।। महादेवात्मज विनायकाचे । मुखवल्लीला कलिका आली । रासक्रीडा परिमळ फुललीं । श्रीरंगाचे पदीं अर्पिली । श्रीकृष्णाचे दासिं घेतलीं । प्रसाद म्हणुनि मस्तकिं धरिली । त्यांचे हृदयीं तोष वाटला । ब्रह्मानंदे डोल डौरला । सुगोपिकांचे महोदयाला । श्रीकृष्णें नवरस केला । गाती नित्य महोदयाला ।। ९ ।।

या विनायक कवीसंबंधें इतर माहिती फारशी उपलब्ध नाहीं, पण यानें आपल्या दुसऱ्या एका कवनांत आपणास 'सद्धिल गुणसंपन्न अत्रि गोत्रोत्पन्न श्री महादेवसुत' असें म्हटलें आहे. यावरून हा अत्रिगोत्री ब्राह्मण होता व याच्या बापाचें नांव महादेव होतें, असें दिसतें.



## महीपती व इतर चरित्रकार



प्रसिद्ध संतांचीं चरित्रें लिहिण्याचा प्रघात महाराष्ट्रांत फार पूर्वीपासून आहे. ज्ञानेश्वराचें चरित्र त्याच्याच वेळच्या सच्चिदानंदबावानें व त्याच्या नंतरच्या अनेक लेखकांनीं लिहिलें आहे. तसेंच नामदेवादि संतमंडळ, एकनाथ, दासोपंत, जनीजनार्दन, रामदास, तुकारामहाराज वगैरेंचींहि चरित्रें निरनिराळ्या लेखकांनीं लिहिलेलीं आहेत. निरंजनमाधव, कचेश्वर वगैरेंनीं तर 'आत्मचरित्रेंहि' वर्णन केलेलीं आहेत. साधारणपणें आपल्या ग्रंथासंबंधीं व परंपरेसंबंधाची व स्वतांसंबंधाची कांहीं कांहीं माहिती ग्रंथकार प्राय: आपल्या ग्रंथारंभीं किंवा शेवटीं देतो. पण हीहि माहिती त्या कृतीच्या एकट्यापुरतीच म्हणजे आत्मचरित्रात्मकच असते. अशी एकएकट्याची माहिती दिलेले ग्रंथ व चरित्रें सोडिलीं तर ज्यांत अनेक कर्त्यांचीं किंवा साधूंचीं चरित्रें सांगितलीं आहेत असे चारपांचच ग्रंथ मराठींत हल्लीं उपलब्ध आहेत. संतांचीं नुसतीं यादीवजा नांवें व क्वचित् चार--दोन शब्दांत कांहीं माहिती सांगणाऱ्या 'संतमालिका' पांचपंचवीस आहेत. काळ ठरविण्यास मात्र यांचा थोडासा उपयोग होतो. याशिवाय त्यांचा फारसा उपयोग दिसत नाहीं. संतांसंबंधीं इतिहासकुतूहल पुरें करण्यास वर सांगितलेल्या चार-पांच ग्रंथांचा मात्र उपयोग आहे. हे चार--पांच ग्रंथ देखील मोठ्या चौकसपणानें सर्व चरित्रात्मक माहिती मिळवून लिहीले आहेत, असें मुळींच नाहीं. चौकसपणापेक्षां भाविकपणानेंच साधुसंतांचीं चरित्रें लिहावीं, असा रोख नेहमीं लेखकांचा दिसतो. आपण ज्याचें चरित्र गाणार तो अत्यंत थोर साधुपुरुष होता, किंबहुना तो परमेश्वराचा प्रत्यक्ष अवतार होता; अद्भुत गोष्टी तो सहज करी, हें मुख्यत्वेंकरून वाचकांच्या मनांवर बिंबवणें हेंच आपलें मुख्य कार्य बहुतेक चरित्रकार समजतात. म्हणून या ग्रंथांची व ग्रंथकर्त्यांची थोडीशी माहिती येथें सांगणें अवश्य आहे.

या सर्व चरित्रात्मक ग्रंथांत नाभाजीची भक्तमाला, हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. एक तर तो सर्वांत आधींचा आहे व दुसरें. महाराष्ट्रांतल्या चरित्रात्मक ग्रंथकारांनीं त्या ग्रंथाचा बराच उपयोग करून घेतला आहे. या दोन कारणांसाठीं या भक्तमाला ग्रंथाची व नाभाजीची हकीकत प्रथम सांगणें योग्य आहे. **नाभाजी**[1] हा जातीचा नागर ब्राह्मण, मूळ रामचंद्राचल पर्वताजवळील राहणारा. लहानपणींच याला घेऊन याचे आईबाप व्यवहारधंद्यानिमित्त ग्वाल्हेर प्रांतीं गेले. थोडेच दिवसांत त्याचा बाप वारला; आणि संसाराचा व या मुलाचा सर्व भार याचे आईवर पडला. आधींच गरिबी होती. पण त्यांतहि ती माउली दोन धंदे करून दिवस लोटी; व समाधानानें असे. परंतु पुढें मोठा दुष्काळ पडला. तेव्हां नाभाजीला घेऊन त्याची आई ग्वाल्हेर सोडून जयपुराकडे गेली. यावेळीं नाभाजीचें वय अवघें पांच वर्षांचें होतें. काळ कठीण येत चालला व दिवस निघतना. पोटचें पोर पण तेंहि नकोसें झालें; त्याला एकट्यालाच टांकून वाट चुकवून आई कोठें निघून गेली. मूल रस्त्यांत एकटेंच राहिलें. पण दैवयोग कांहीं विचित्र आहे. त्या वेळीं 'कील्हदास' व 'अग्रदास' या नांवाचे दोघे साधुपुरुष त्याच वाटेनें चालले होते. त्यांनीं जवळ येऊन त्या मुलाला कमंडलूंतील पाणी पाजिलें व उचलून आपल्या मठांत नेलें. तेथें या साधुपुरुषांनीं त्याचें पालनपोषण करून त्याजकडून विद्याभ्यास करविला. नाभाजी हा दोन्ही डोळ्यांनीं आंधळा होता. पुढें त्याला अग्रदासांनीं उपदेश दिला व नांव '**नारायणदास**' ठेविलें; परंतु हा नाभाजी याच नांवानें हल्लीं महशूर आहे. नाभाजीनें 'भक्तमाला' या नांवाचा संतचरित्रवर्णनात्मक एक ग्रंथ मूळ ग्वाल्हेर भाषेंत रचिला. या ग्रंथास संतचरित्र ( वर्णनात्मक ) म्हणणें नीट नाहीं. कारण, या मूळ ग्रंथांत संतनामांच्या उल्लेखापलीकडे फारशी हकीकत नाहीं. मूळ भक्तमाला

---

१. नाभाजी हा शके १६००-च्या सुमारास होऊन गेला असावा. 'भक्तमालें'त त्याचा काल दिलेला नाहीं.

ग्रंथांतल्या १९७ छप्पा आहेत व या छप्प्यांवर म्हणजे मूळ 'भक्तमाला' ग्रंथावर नाभाजीच्या **प्रियादास** नामक शिष्यानें 'भक्तिरसबोधिनी' नांवाची टीका लिहिली आहे[१]. ही टीका

'संवत प्रसिद्ध दसमातसतऊन हत्तर फाल्गुनमास वदि सप्तमी बिताइके' म्हणजे संवत् १७६९–त लिहिली. संवत् १७६९–मध्यें शक १६३५ येतो. या टीकेसंबंधें प्रियादास म्हणतो—

रचि कविताई सखदाई लगे निपट सुहाई आ सचाई पुनरुक्ति ले मिठाई हें ॥ अक्षर मधुरताई जनुप्रास चमकाई अति छबि छाई मोदझरीसी लगाई हें ॥ काव्यकि बढाई निजमुख न भलाई होती **नाभाजू** कहाई याते प्रौढके सुनाई हें ॥ हृदय सरसाई जोये मुनियें सदाई यह '**भक्तरसबोधिनी**' **सोनाम गाई हें** ॥

(मराठी टीका) प्रियादास म्हणे ते समयीं । मी जें कवित्व करी पाहीं । ते सर्वांसी बहुसुखदाई । अतिशयेंसी आवडे ॥ जें सत्यत्वें शोभे पाहीं । पुन्हां पुन्हां भाषण ज्यांत नाहीं । अक्षरांत बहु मधुरताई । अनुप्रास यमकें उत्तम ॥ यापरी कविता विस्तारली । आनंदामृतातें वर्षली । जैसे मेघ वर्षाकालीं । सतत वर्षती जलधारा ॥ आपुल्या काव्याचें आपण । न वर्णीं मी श्रेष्ठपण । हृदयीं नाभाजी प्रगटोन । तेंचि कवन करीतसे ॥ ज्यांचें कां हृदय अतिसरस । तेचि योग्य तेथें श्रवणास । इतर जे कां अभक्त वायस । ग्राम्यगीत परिसोत कीं ॥ असो '**भक्तिरसबोधिनी**' । या टीकेसी नाम ठेवोनि । गातसे मी ऐका श्रवणीं । शृंगारसहित भक्तिरूपा ॥

या प्रियादासाचे टीकेवर मराठींत श्रीमार्तंडबुवांनीं 'भक्तिप्रेमामृत' नामें टीका केली आहे. याच ग्रंथाला हल्लीं सामान्यत्वें 'भक्तमाला' म्हणतात. नाभाजी हा शके १६००-च्या सुमारास होऊन गेला व त्या पूर्वींच्याच संतांचा त्याच्या ग्रंथांत उल्लेख आला आहे. त्यानें दिलेल्या शेकडों संतांपैकीं ज्ञानदेव किंवा ज्ञानेश्वर, नामदेव व आणखी एकदोन

---

१. श्रीनारायणदासजु किनो 'भक्तमाल'। पुनिताकी टीका करी प्रियादास सुरलाल ॥ (मराठी टीका) नाभाजी हेचि नारायणदास । भक्तमाल येही केली सुरस । पुन्हां त्यावरी प्रियादास । परम रसाळ टीका करी ॥

संतखेरीजकरून बाकी सर्व संत महाराष्ट्राबाहेरचे आहेत. असें असूनहि मराठी ग्रंथकारांनीं नाभाजीच्या भक्तमालेंतून शेकडों संतांचा उल्लेख–नांवें व चरित्रें मिळून–केला आहे. नाभाजीनें वर्णन केलेले महाराष्ट्रांत जे ज्ञानेश्वर, नामदेव वगैरे संत आहेत त्यांच्याहि कथा आपल्या इकडे प्रचलित असलेल्या कथांपेक्षां नाभाजीनें म्हणजे त्याचा टीकाकार जो प्रियादास यानें अगदीं निराळ्याच वर्णन केल्या आहेत. किंबहुना, या संतांची माहिती नाभाजीस अगदींच थोडी व तीहि फारशी बरोबर मिळालेली दिसत नाहीं. नाभाजी हा मथुरा प्रांतांत राहणारा असल्यामुळें व मराठी भाषेशींहि परिचय नसल्यामुळें महाराष्ट्रसंतांची माहिती केवळ दंतकथांवरून किंवा इकडील एखाद्या प्रवाशाच्या सांगण्यावरूनच लिहिली असली पाहिजे, असें वाटतें. म्हणजे भक्तचरित्रें या दृष्टीनें नाभाजीच्या ग्रंथाचा उपयोग महाराष्ट्रास कितीहि असला तरी महाराष्ट्रांतील कर्त्यां-संबंधीं ऐतहासिक माहिती मिळविण्याच्या कामीं नाभाजीच्या भक्तमालेचा फारसा उपयोग होण्यासारखा नाहीं. किंबहुना, त्याच्या ग्रंथाचा उपयोग महाराष्ट्रीय भक्तचरित्रकारांनीं मुळीच केला नसता तरीहि चालण्यासारखें होतें.

नाभाजीनंतरचा चरित्रग्रंथकार एक '**उद्धवचिद्घन**' किंवा '**दासोदिगंबर**' यां दोहोंपैकीं एक होय. दोहोंपैकीं एक म्हणण्याचें कारण या दोघांचाहि बरोबर काल आपणांस माहीत नाहीं. पण ह्या दोहोंत उद्धवचिद्घन विशेष प्रसिद्ध असल्यामुळें त्याचा उल्लेख अगोदर करून दासोदिगंबराचा नंतर करावा, हें बरें.

**उद्धवचिद्घन** या जोडशब्दापैकीं 'उद्धव' हें कर्त्याचें व 'चिद्घन' हें उद्धवाच्या गुरूचें नांव आहे. तथापि या कवीचा 'उद्धवचिद्घन'

१. एकनाथ, रामदास, तुकाराम यांसारख्या महाराष्ट्रांतल्या अत्यंत प्रसिद्ध संताचाहि उल्लेख किंवा निर्देष नाभाजीचे ग्रंथांत नाहीं.

२. नाभाजी, नामदेव हा वामदेवाच्या विधवा मुलीस विठोबापासून झालेला मुलगा म्हणतो. तसेंच ज्ञानेश्वराच्या शिष्यांचीं नांवें त्यानें त्रिलोचन व नामदेव अशीं दिलीं आहेत.

याच नांवानें उल्लेख करण्याचा संप्रदाय आहे. उद्धवचिद्घनाचें उपनांव 'कोकिळ' व हा धारूरचा राहणारा. हा चैतन्यसंप्रदायांतील एका परंपरेंत येतो. म्हणजे प्रसिद्ध साधुपुरुष तुकाराममहाराज व उद्धवचिद्घन हे एकाच चैतन्यसंप्रदायांपैकीं होत. आत्माराम चैतन्यापासून दोघांची परंपरा निराळी झाली, हें पुढील गुरुपरंपरेच्या दिलेल्या वृक्षावरून दिसून येईल.




उद्धवचिद्घनानें आपल्या अनुभवशतकाचे शेवटीं आपली परंपरा ज्या

श्लोकांत दिली आहे ते श्लोक असे—

**श्रीदत्त** जो तो शिवरूप झाला । **गोपाळ, आत्मा, तुळसी** ही बोला
**श्रीकृष्ण अद्वय**पदासि ध्यातां । चैतन्यता **पूर्ण** प्रकाश आतां ।।
**श्री चिद्घनीं** स्नेहसुधा प्रसादें । वळोनियां वर्षत पूर्ण **बोधें** ।
**आब्रह्म प्रेमोदधि** पूर्ण झाला । पूर्णोदकीं **उद्धव** ही विराला ।।

या परंपरेपैकीं अनेक पुरुषांनीं मराठींत ग्रंथरचना केली आहे. त्यापैकीं उद्धवचिद्घनाचा गुरुबंधु राघवस्वामी यानें शके १६११–मध्यें ‘ संदेहहरण ’ नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ केला आहे; व या ग्रंथसमाप्ती-नंतर उद्धवास चिद्घनाचा अनुग्रह झाला, असें याच परंपरेंतल्या माधवदास कवीनें आपल्या ‘ अलक्षनिधान ’ ग्रंथांत सांगितलें आहे. म्हणजे शके १६११–नंतर उद्धवचिद्घनास गुरुपदेश झाला, असें होतें व हा उद्धवचिद्घनाचा काळ ठरतो.

या अलक्षनिधानांतच उद्धवचिद्घनासंबंधीं लिहितांना माधवदास म्हणतो–

**जयाच्या कीर्तनाचा डंका । चोहों देशीं विराजे भजन शिक्का । उभी शंकर देवता देखा । कीर्तनामाजी ।। व बहुत केला वाग्विलास । ‘ भक्त-मालिका ’ वेणिली विशेष ।**

उद्धवचिद्घनाची कांहीं कविता काव्यसंग्रहांत छापिली आहे. याची छापिलेली कविता निरनिराळ्या वृत्तांत आहे. वर उल्लेखिलेलें ‘ अनुभवशतक ’ हें अनेक वृत्तांत श्लोकबद्ध रचिलेलें आहे. याचा ‘ गीतार्थमंजरी ’ हा गीतेचा छायारुपी ग्रंथ सवाई वृत्तांत आहे. याचा ‘ शुकरंभासंवाद ’ दिंडी वृत्तांत आहे; व ‘ नागनाथ ’ आणि त्याचे शिष्य ‘ हेमराज ’ व ‘ बहिरंभट ’, किंवा ‘ बहिरापिसा ’ यांचीं चरित्रें, तसेंच ‘ मृत्युंजय ’ ‘ गोराकुंभार ’ वगैरेंची चरित्रें यानें साकी वृत्तांत गाईलीं आहेत; अशी याची विविध रचना आहे. परंतु उद्धवचिद्घनाचें नांव आपणास नेहमीं ऐकूं येतें तें याच्या यांपैकीं कोणत्याहि प्रकरणावरून नसून याच्या अप्रसिद्ध व अनुपलब्ध अशा ‘ भक्तकथामृतसार ’ किंवा

अशाच नांवाच्या, संतचरित्रात्मक ग्रंथावरून होय. हा ग्रंथ कोठेंहि आढळत नाहीं. यामुळें या ग्रंथासंबंधें कांहींच लिहितां येत नाहीं. स्वतंत्र चरित्रात्मक ग्रंथ असतां वर सांगितलेलीं सुटीं चरित्रें कवीनें कां लिहिलीं, याचा उलगडा नीटसा होत नाहीं. इतकेंच नाहीं, तर या साकीबद्ध

'बरवीं संतचरित्रे हो। पावन परम पवित्रें हो।'

या धृवपदानें प्रायः प्रारंभ होणाऱ्या लहान—लहान चरित्रांखेरीज दुसरा याचा चरित्रात्मक ग्रंथ असण्याचा संभव कमी वाटतो. तथापि असा ग्रंथ असल्याचें अनेकजण लिहितात. उद्धवचिद्घनानें रचिलेली एक 'संतमाला' मात्र प्रसिद्ध आहे. हींत पुष्कळ संतांचा उल्लेख असून कांहींच्या संबंधीं मुख्य अशी एखाद-दुसरी गोष्ट सांगितलेली आहे. या संतमालेची नक्कल महीपतीबुवांनीं उतरून घेतली होती. पण हीसच ते 'संतचरित्र' म्हणत असल्यास कोण जाणे! नाभाजीच्या 'भक्तमाला' या मूळ ग्रंथांत जितपत संतांची माहिती आहे, तितपतच माहिती या 'संतमाला' तून असते. यांच्या आधारें कवींचें अगर संतांचें चरित्र देणें नीट जुळणार नाहीं. पण दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं आज उद्धवचिद्घनानें साकीवृत्तांत लिहिलेलीं कांहीं चरित्रें जशीं उपलब्ध आहेत तशींच अनुपलब्ध अशींहि आणखीं असूं शकतील. कांहीं व्रज भाषेंतील अशींच लिहिलेलीं आढळतात. तेव्हां हीं सगळीं एके ठिकाणीं केलीं, व त्या ग्रंथास मग 'संतचरित्र' म्हटलें तर फारसें गैर होणार नाहीं; आणि नंतर असें म्हणतां येईल कीं हल्लीं जीं सुटीं चरित्रें आपण पाहतों तीं सुटीं व स्वतंत्र नसून त्या 'संतचरित्र' ग्रंथाचे ते अध्याय

१. असा ग्रंथ कै. ह. प. भिंगारकरबुवांनीं प्रत्यक्ष पाहिल्याचें लिहिलें आहे व त्यांतील उताराहि दिला आहे. हा ग्रंथ पाहण्यासाठीं मीं फार यत्न केले परंतु द्रव्य, काळ आणि मेहनत हीं सर्व फुकट जाऊन अखेर या ग्रंथाचा व भिंगारकरबुवांचा नाद सोडिला. या व 'भक्तकथातत्व' या ग्रंथापायीं अनेक ठिकाणें हिंडून झाल्यावर आतां या ग्रंथांच्या अस्तित्वांविषयींहि माझें मन साशंक होऊं लागलें आहे.

किंवा भाग होत. महीपतीबावांनीं लिहिलेल्या उद्धवचिद्घनाच्या चरित्रांत त्याच्या या ग्रंथाचा उल्लेख नाहीं. पण त्यांच्या ग्रंथांत इतर ठिकाणीं तो उल्लेख आहे. उद्धवचिद्घन याची समाधी मौजे ' धारूर ' येथें आहे.

या उद्धवचिद्घनासंबंधें कांहीं थोडीशी तरी माहिती आपणांस उपलब्ध आहे, पण **दासोदिगंबरासंबंधें** तीहि नाहीं. उद्धवचिद्घनाचा भक्तचरित्रपर ग्रंथ उपलब्ध नाहीं, पण दासोदिगंबराचा भक्तचरित्रपर ' संतविजय ' नांवाचा ग्रंथ उपलब्ध आहे. या ग्रंथाचीं ३४ प्रकरणें असून यांत अनेक संतांची माहिती सांगितली आहे. यांत कवीनें नाभाजीच्या ग्रंथाचा उल्लेख केला असून त्याच्या ग्रंथाचा उपयोगहि पुष्कळ करून घेतला आहे. दासोदिगंबर आपल्या संतविजयांत अनेक नवीन गोष्टी व आख्यायिका सांगतात. पण त्या फारशा चौकसपणानें मिळवून लिहिलेल्या दिसत नाहींत. महीपतीबावांनीं हा चरित्रग्रंथ पाहिला असावा, असा माझा तर्क आहे. दासोदिगंबर हे जुन्नर प्रांतांतले राहणारे. दासोदिगंबरांनीं आपली कोणतीहि माहिती किंवा आपल्या ग्रंथरचनेचा कालहि आपले ग्रंथांत दिला नाहीं.

**महीपतीबोवा ताहराबादकर** हे महाराष्ट्र भाषेंतील एक फार प्रसिद्ध कवि व साधुपुरुष होत. हे नगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्यांत ताहराबाद म्हणून एक गांव आहे तेथले राहणारे. हे ऋग्वेदी वासिष्ठ-गोत्री देशस्थ ब्राह्मण, उपनांव कांबळे. यांच्या वडिलांचें नांव दादोपंत व आईचें गंगाबाई.[1] दादोपंत व गंगाबाई हीं दोघेंहि भक्तिपरायण असून पंढरीची वारी नियमानें करीत. दादोपंतांस फार दिवस पुत्रसंतान नव्हतें. पुढें वयाची साठी उलटल्यावर त्यांस ईश्वरकृपेनें शके १६३७-मध्यें एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं महीपती असें ठेविलें. महीपती हा रूपानें फार सुरेख असून याचा बांधाहि सुदृढ होता. याची वृत्ति लहानपणीं जरा खोड्याळ होती. परंतु लवकरच म्हणजे याचे वयाचे

---

१. गंगाबाई हे महीपतीच्या बायकोचें नांव होय. आईचें नाहीं— ताहराबादकरबुवा.



संतचरित्रकार

**महिपतिबोवा ताहराबादकर**

( शके १६३७ ते १७१२ )

[ वरील चित्र महिपतिबोवांचें कीर्तन चालू असतांना रोज समोर बसून कोणा राम नांवाच्या चित्रकारानें काढलेलें आहे. ]

सोळाव्या वर्षीं वडील निवर्तल्यामुळें संसाराचा भार याच्याच अंगावर पडला. यामुळें व्रात्यपणा टाकून महीपतीस संसारवृत्ति चालविणें भाग पडलें. वडील हयात असतांच हा पंढरीची वारी करूं लागला होता. लहानपणापासून धर्माचे व विद्येचे बाबतींत यास शिक्षा मोरोबा तांभेरकर[1] नांवाच्या एका गृहस्थाश्रमी सत्पुरुषाची असे; व यासच महीपतीबुवांनीं गुरु म्हटलें होतें. ताहराबादची तेव्हांची कुग्रामवस्ती व गांवहि जरा एकीकडे, यामुळें महीपतीबुवांचें शिक्षण जितक्यास तितकेंच झालें होतें. मी विद्वान् नाहीं, मला संस्कृतहि येत नाहीं; फार काय, पण

> म्यां नाहीं पाहिला अमरकोश । गीर्वाण भाषा तीहि निःशेष ।
> नाना पुराणें विशेष । श्रवण सायासें न केलीं कीं ॥

अशासारखे उद्गार यांनीं अनेक ठिकाणीं काढिले आहेत. यांत कदाचित् कांहीं भाग विनयाचा असेल पण यांत सत्यहि बरेंच आहे. महीपती-बावांचें हस्ताक्षर अगदीं साधारण प्रतीचें, पण घटलेलें असें आहे. मोडीपेक्षां बालबोध अक्षर जास्त चांगलें आहे. पण भाषा मात्र अगदीं कुणबाऊ उच्चारांची दिसते, याचें जरा नवल वाटतें.

दादोपंत वारल्यानंतर गांवची कुळकर्णपणाची वृत्ति करून महीपती-बुवा संसार संभाळून असत. बावांसंबंधीं पुढील आख्यायिका वारंवार ऐकूं येते. पुढें एके दिवशीं सकाळीं बावा स्नानसंध्या व पूजाअर्चा करीत असतां यांस सरकारचे शिपाई बोलावूं आले. तेव्हां बावांनीं सांगून पाठविलें कीं देवपूजा करीत आहे, झाल्यावर येईन. या सबबीनें समाधान न होतां सरकारकडून त्यास फिरून बोलावणें आलें व अधिकाऱ्याचा बोल लागला. त्या वेळीं बावा सरकारांत जाऊन काम करून आले. पण बावांनीं मनांत विचार केला कीं, दोन धन्यांची नोकरी आपल्या हातून होणार नाहीं. यापेक्षां एक विठ्ठलाचीच नोकरी नीट करावी, हें उत्तम. असें म्हणून घरीं दादोपंतानीं स्थापिलेली विठ्ठलाची

---

१. तांभेर हें गांव ताहराबादपासून सहा मैलांवर आहे.

मूर्ति होती तिच्या पायांवर त्यांनीं कानांतील लेखणी ठेविली; व अत:पर आजन्म गांवकृत्याचें लिहिणें लिहिणार नाहीं, अशी शपथ वाहिली; एव्हांपासून पुढें बावा भजन कीर्तन करून देहाचें सार्थक करूं लागले. ही बावांची प्रतिज्ञा आज तीनचार पिढ्या त्यांचे वंशजांनीं पाळिली. परंतु आतां काळानुसार सेवावृत्ति पत्करणें त्यांपैकीं कांहींस भाग पडलें आहे.

ईश्वराचे भजनकीर्तनांत व कुटुंबकार्यांत निमग्न असतां, कांहीं ग्रंथरचना करण्याचें बुवांच्या मनांत आलें; व तुकोबांनींहि स्वप्नांत येऊन सांगितलें कीं 'नामदेवाची शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा राहिली ती मीं पुरी केली. आतां संतचरित्रें वर्णन करण्याचें काम त्वां करावें', असा दृष्टांत झाल्यावर तो तुकोबाचा गुरूपदेश मानून बुवा संतवर्णनाचें कार्यास लागले. या वेळीं बुवा पन्नाशीच्या घरांत गेले होते.

संतचरित्रें वर्णन करावयाचीं तीं आपल्या पूर्वीं होऊन गेलेल्या नाभाजी व उद्धवचिद्घन यांच्या ग्रंथाधारेंच वर्णन करावीं, असा संकल्प करून महिपतीबुवा ग्रंथरचनेस लागले, असें दिसतें. कारण

---

१. महीपतीबावांस श्रीमंत पंतप्रधान बाजीराव साहेब पेशवे यांजकडून व त्यांचे सरदारांकडून कांहीं जमीन व वतनें वगैरे इनामें मिळालीं होतीं. यांच्या सनदा त्यांच्या वंशजांजवळ मीं शकें (१८१६-त) पाहिल्या आहेत. सनदा शके १७१०-पासून पुढल्या म्हणजे बावांची ख्याति सर्वभर पसरल्या-नंतरच्या आहेत. सनदेंत 'हरिभक्तपरायण महिपत गोसावी बीन दादाजी गोसावी कांबळे वास्तव्य ताहराबाद पा। पारनेर हे श्रीहरीसेवा करून निरपेक्ष वृत्तीनें आहेत. परंतु पदरीं कुटुंब त्याचेंही संरक्षण होउन चाललें पाहिजे याजकरितां...यासी धर्मादाय वर्षासन करून देउन हें पत्र तुह्मास सादर केलें असे' इ. इ. मजकूर आहे. यापेक्षां त्यांत विशेष मुद्याचें कांहीं नसल्यामुळें विस्तारभयास्तव येथें सनदांचे उतारे देत नाहीं. हल्लीं इनाम कांहीं नसून भिक्षुक वृत्तीवरच कुटुंबाचा निर्वाह चालतो. महीपतीबावांनीं आपलें घर लुटल्याची दंतकथा प्रसिद्ध आहे. पण महीपतीबावा, हे तुमच्या आमच्या-प्रमाणेंच पूर्णपणें संसारदक्ष असावे, असें त्यांची पुष्कळ पत्रें व कागद वगैरे पाहून मला वाटतें.

आपल्या चार चरित्रात्मक ग्रंथांपकीं प्रथम रचिलेला जो 'भक्त विजय' त्याच्या प्रारंभींच--

ह्मणाल निजबुद्धीनें त्वरित । आपुले मतिनें रचिला ग्रंथ । तरी तैसें नव्हे निश्चित । विकल्प मनीं न धरावा ॥ उत्तर देशीं साचार । नाभाजी विरंची अवतार । तेणें 'संतचरित्र' ग्रंथ थोर । ग्वालेरी भाषेंत लिहिला असे ॥ आणि मानदेशीं 'उद्धवचिद्‌घन '। त्यानीं भक्तचरित्रें वर्णिलीं जाण । दोहींचें संमत एक करून । भक्तविजय आरंभिला ॥

असें कवीनें सांगितलें आहे. चरित्रग्रंथ लिहितांना नाभाजीच्या ग्रंथाबरहुकूम आपला ग्रंथ लिहावा, असें प्रथमारंभीं कवीच्या मनांत होतें असें दिसतें; व प्रारंभींचीं चरित्रेंहि तशींच लिहिलीं आहेत. परंतु नामदेवज्ञानेश्वरादि कवींच्या चरित्रापर्यंत आल्यावर नाभाजीपेक्षां या पुरुषांसंबंधें या प्रांतांत जास्त व भिन्न माहिती प्रचलित आहे असें पाहून, महीपतीनें नाभाजीचा ग्रंथ सोडून इकडील ग्रंथांच्या आधारें हीं चरित्रें लिहिण्याचें योजिलें; आणि कांहीं अध्याय नामदेवाचे तीर्थावळीवरून रचिले[1]. हें असें लिहीत असतां महीपतीचें मन नाभाजीच्या ग्रंथावरून इकडील साधुसंतांकडे वळलें व पुढें कांहीं अध्यायांत (२०।२२) इकडील संतांचींच चरित्रें सांगितलीं. तीर्थावळीवरून रचना करूं लागल्यावर हें ओघानेंच आलें. हे तीर्थावळीतले संत संपल्यावर कवि पुन्हां नाभाजीच्या ग्रंथाकडे वळला व पुढील १६।१७ अध्याय त्यानें भक्तमालेच्या आधारें रचिले; आणि एकोणतिसाव्या अध्याया-नंतर दामाजीचें, भानुदासाचें चरित्र सांगतांना महीपतीसारख्या वारकऱ्यास, पैठणच्या भानुदासांच्या--नाथांच्या--वंशजांकडून साहजिकच जास्त व विश्वसनीय माहिती मिळाली व तिचा त्यानें ग्रंथांत उपयोग

---

१. १२ ते १५. २ सच्चिदानंदबाबांच्या 'ज्ञानेश्वरविजया' चा उल्लेख महीपतीच्या ग्रंथांत कोठेंहि नाहीं. महिपतीस या ग्रंथाची माहिती नव्हती, असें वाटतें.

करून घेतला. पुढें बहिरंभटाचें चरित्र आटोपून महीपतीनें तुकारामाचें चरित्र लाविलें. तुकारामाच्या चरित्राची माहिती कोणाच्याहि ग्रंथाधारें न लिहितां ती महीपतीनें प्रत्यक्ष त्याच्या वंशजांकडून मिळवून लिहिली. हे तुकारामचरित्राचे अध्याय सर्व भक्तविजयांत, किंबहुना महीपतीच्या सर्व ग्रंथांत फार सरस उतरले आहेत. यांत तुकारामास सद्गुरु[1] म्हटलें आहे. तुकारामाची माहिती मिळवितांना व ती सांगतांना त्या वेळच्या इतर संतांची माहितीहि ग्रंथकारास सहजासहजीं मिळाली व मनांत घोळून राहिली. अर्थात् तुकारामानंतर बोधलेबुवा, गणेश नाथ, संतोबा पवार वगैरेंच्या चरित्रांचें संकीर्तन यापुढील अध्यायांत आलें; व पुढें ज्याच्या ग्रंथाचा भक्तविजयास आधार झाला त्या उद्धवचिद्घनाचें व नंतर विसोबा सराफाचें आख्यान सांगून महीपतीनें भक्तविजय ग्रंथ पुरा केला. ग्रंथ-समाप्ति शके १६८४ चित्रभानु–संवत्सरीं वैशाख वद्य द्वितीयेस झाली.

या ग्रंथांत भक्तांचा व भक्तचरित्रांचा जयजयकार केल्यानंतर ईश्वर-प्राप्तीस साधनीभूत अशीं कांहीं व्रतें सांगण्याच्या उद्देशानें कवीनें ' कथासारामृत ' नांवाचा एक ग्रंथ रचिला. या कथासारामृताचे छत्तीस अध्याय असून त्याची ग्रंथसंख्या सुमारें सात-हजार आहे. प्रारंभीं तुकाराम वगैरे इतर साधुवृंदाबरोबर कृष्ण–याज्ञवल्कीस नमस्कार करून त्याचे ग्रंथाचाहि उल्लेख केला आहे; व

पंढरीनाथें । स्वयें आज्ञापिलें माते ।
कीं निवडूनिया विष्णूव्रतें । ग्रंथ प्राकृत निर्मावा ॥

असा रचनेचा उद्देश कळविला आहे. उद्देशाप्रमाणें कवीनें निरनिराळीं चार व्रतें निवडून तीं आपल्या ग्रंथांत विस्तारानें सांगितलीं आहेत. पहिल्या अध्यायापासून नवव्या अध्यायापर्यंत कार्तिक व्रताचें आख्यान लाविलें आहे. हें पद्मपुराणाच्या आराधानें लिहिलें असल्याचें कवीनें सांगितलें आहे. पुढें एकविसाव्यापर्यंत वायुपुराणाच्या आधारें माघ-माहात्म्य वर्णन केलें आहे. यानंतर वैशाखव्रताची कथा स्कंदपुराणाच्या

१. स्वप्नांतला गुरूपदेश मनांत आणून, असें दिसतें.

आधारानें तिसाव्या अध्यायापर्यंत सांगून पुढें सहा अध्यायांत अनेक पुराणांच्या आधारें एकादशीमहात्म्य सांगून छत्तिसाव्या अध्यायांत ग्रंथ पुरा केला आहे. या ग्रंथांत पुष्कळ पौराणिक कथा आल्या आहेत. हा ग्रंथ कवीनें शके १६८७-मध्यें पार्थिव संवत्सरीं श्रावण शु० पंचमीस ताहराबाद येथेंच पुरा केला. याच्या पूर्वी तीन वर्षे 'भक्तविजय' ग्रंथ पुरा झाला होता. पण त्याचा किंवा तत्कृत इतर कोणत्याहि ग्रंथाचा यांत उल्लेख आढळत नाहीं. तसेंच या ग्रंथाचाहि इतर ग्रंथांत कोठें फारसा उल्लेख आलेला नाहीं. भाषेच्या व सौरस्याच्या मानानें हा ग्रंथ अगदीं साधरण आहे. कदाचित् स्वतः महीपतीबावांनादेखील हा ग्रंथ फारसा आवडला नसेल. ग्रंथांतील गोड कथांच्या मिषान लोकांचें चित्त परमेश्वराकडे वळावें, संकटांत पडलेल्या मनाला धीर वाटावा, व देवाच्या चरणाचा आधार त्याचा धांवा केला असतां कोणालाहि सहज मिळूं शकतो, हाच महीपतीच्या ग्रंथांचा मुख्य हेतु दिसतो; आणि तो त्यानें, अनेक साधे दृष्टान्त व सोपी भाषा यांच्या साह्यानें चांगला साधिलाहि आहे. अनेक दृष्टान्त देऊन आपलें म्हणणें वाचकांच्या मनांत बिंबेल अशा तऱ्हेनें सांगण्याची हातोटी महीपतीचे ग्रंथांत विशेष नजरेस येते.

भक्तांचीं चरित्रें व व्रतें गाईल्यानंतर त्या सर्वांचें ध्येय जो श्रीपांडुरंग त्याचें चरित्र व त्याच्या कथा वर्णन करण्याचें महीपतीबावांच्या मनांत आलें; आणि हें मनांत आणून त्यांनीं 'पांडुरंग–महात्म्य' हा ग्रंथ रचिण्यास सुरुवात केली. पाडुरंगाचा सर्वांत जुना व प्रिय भक्त, ज्यानें विठ्ठलाची पंढरीस स्थापना केली त्या पुंडलिकाचें चरित्र भक्तविजयांत आलें नाहीं हें जाणून कवीनें या पांडुरंगमहात्म्य ग्रंथांत पुंडलिकाचेंहि चरित्र सांगितलें आहे. भक्तविजयादि ग्रंथांप्रमाणें या ग्रंथांत सरळ कथानकें सांगितलीं नसून हा ग्रंथ शंकरपार्वतीसंवादरूपानें निरूपण केला आहे.

एके वेळीं कैलासनाथ ध्यानस्थ बसले असतां गिरिजेनें त्यांस विचारलें कीं, "नाथ, तुम्ही सर्व देवांचे देव, सर्वांनीं ध्यान तुमचें करावें,

असें असतां तुम्ही ध्यान करतां तें कोणाचें ?" तेव्हां किंचित् हास्य करून शंकरांनीं श्रीकृष्णाचें नांव सांगितलें; व एके वेळीं पट्टराणी रुक्मिणी ही कृष्णावर रुसून दिंडिर वनांत लोहदंडक्षेत्रीं जाऊन तेथें तपश्चर्या करीत बसल्याची हकीकत सांगितली. हें ऐकतांच गिरिजेनें त्या वनाला दिंडिर-वन कां म्हणतात व त्या क्षेत्राला लोहदंडक्षेत्र हें नांव कशामुळें पडलें तें विचारिलें. हें सांगतांना शंकरांनीं मल्लिकार्जुनाच्या वगैरे कथा प्रसन्न मनानें सांगितल्या. शंकराचें मन प्रसन्न पाहून स्त्रीस्वभावानुसार 'श्रीकृष्णाचा तुम्ही कोणत्या नांवानें जप करतां ?' असा प्रश्न पार्वतीनें शंकराला पुन्हां केला. तेव्हां " मी 'विठ्ठल' नामानें जप करितो " असें कैलासपतीनें तीस सांगितलें. याबरोबर विष्णूला विठ्ठल हें नांव कधीं पडलें, अशी शंका मनांत येऊन ती दूर करण्याविषयीं गिरिजेनें आपल्या रमणाची प्रार्थना केली. हें सांगण्याकरितां शंकरांना पुंडलीकाची हकीकत, त्याचा जीवनवृत्तांत व पुंडलीकाच्या भेटीला श्रीविष्णु आले असतां जवळ वीट होती तीच पुंडलीकानें पुढें केल्याचा आणि तेव्हांपासून 'विठ्ठल' नांव धारण करून विटेवर विठ्ठल तेथें अक्षय उभे राहिल्याचा इतिहास ओघानेंच सांगावा लागला. याच अनुसंधानांत वृत्रासुराची कथा व भागीरथीला या ठिकाणीं 'चंद्रभागा' हें नांव कशानें प्राप्त झालें हीहि कथा अपर्णेनें एकून घेतली. पुढें सभोंवतालच्या क्षेत्रांचीं नांवें व त्यांच्या चित्तवेधक कथा सांगत सांगत कवीनें द्वादश–अध्यायात्मक असा हा आपला ग्रंथ पुरा केला. हें कीर्तन शके १६८८–मध्यें भाद्रपदमासीं संपलें.

यापूर्वीच एक चरित्रात्मक व एक पौराणिक असे दोन ग्रंथ कवीनें लिहिले होते. परंतु त्या ग्रंथांचे धाटणीचे मानानें पाहतां या ग्रंथाची उभारणी नीटशी झालेली दिसत नाहीं. एकंदरींत पौराणिक कथाभागापेक्षां चरित्रात्मक ग्रंथ सांगतांनाच महीपतीबावांच्या वाणीला विशेष भरतें येतें, असें दिसतें. भक्तचरित्रें हा त्यांचा आवडता विषय दिसतो; आणि म्हणूनच इतकीं चरित्रें त्यांचे हातून लिहून झालीं.

या वेळीं बोवांची पन्नाशी उलटून गेली होती. पण ग्रंथरचनेची हौस

बिलकूल कमी झाली नव्हती; आणि भक्तविजय ग्रंथ रचिला तेव्हांपासूनच 'भक्तस्तवनीं रमलें चित्त। यालागीं 'संतलीलामृत'। दुसरा ग्रंथ आरंभिला।' व 'भक्तविजयांत राहिलीं चरित्रें। तीं येथें ऐकावीं सविस्तर। बुद्धीचा दाता रुक्मिणीवर। सर्व भार तयावरी॥' असें सांगून ग्रंथास सुरुवात केली. 'संतलीलामृतां' तील चरित्रें कोणत्याहि एका ग्रंथाच्या आधारें न लिहितां, निरनिराळे ग्रंथ व अनेक पुरुषांकडून कळलेली माहिती यांच्या आधारें हा ग्रंथ रचिला आहे. कांहीं आधार असल्या-शिवाय उगाच मनास मानेल तशी भाकडकथा ग्रंथांत सांगितली नाहीं, असें बावा म्हणतात. 'विकल्प झणीं आणाल चित्तीं। तरी आधार टाकोनि आपुले मतीं। बोलिलों नाहीं सर्वथा॥' अशासारखीं आश्वासनें अनेक ठिकाणीं ग्रंथांत लिहिलीं आहेत. ग्रंथास सौरस्य येण्यासाठीं व विषय वाचकांचे मनांत नीट उतरण्यासाठीं, 'दृष्टांत मात्र दिधले चार। तेणेंचि ग्रंथ वाढला थोर।' असें कवि म्हणतो, आणि हें ठीकच आहे. हा ग्रंथ कवीनें १६८९–मध्यें पुरा केला.

यानंतर 'तुळसीमाहात्म', 'गणेशपुराण', दत्तात्रेयचरित्र' यांसारखीं लहान–लहान प्रकरणें व 'मुक्ताभरण', 'ऋषिपंचमी', 'अनंतचतुर्दशी', यांसारख्या व्रतांच्या बारीकसारीक कथा कवीनें लिहिल्या. परंतु पूर्वीं रचिलेल्या भक्तचरित्रांकडे महीपतीबोवांचें मन पुन्हां वळलें; व आणखी एक चरित्रग्रंथ लिहावा अशी वासना महीपतीबूवांस उत्पन्न झाली.

पहिल्याप्रथम भक्तविजय लिहिलाच होता. त्यावर फिरून दुसरा 'संतलीलामृत सार। त्यांत हीं चरित्रें वर्णिलीं फार। परि आणिक कथा राहिल्या अपार। मग रुक्मिणीवर अज्ञापी मातें॥' म्हणोन 'भक्तलीलामृत,

१. संतलीलामृताचे कांहीं छापील पोथ्यांत 'शके सोळाशें एकोणऐशी' असें छापिलें असल्यामुळें कांहीं आधुनिक चरित्रकारांना थोडें घोटाळयांत पाडिलें आहे. परंतु महीपतीबुवांच्या स्वदस्तुरच्या हस्तलिखित प्रतींत ग्रंथसमाप्तीचा काळ 'शके सोळाशें नव्यायशीं। सर्वजीतनाम संवत्सरासी। फाल्गुन वद्य चतुर्थीसी। ग्रंथ सिद्धी पावला॥' असा दिला आहे.

जाण। ग्रंथ आरंभिला दुसऱ्यानें ॥' असें हा नवा ग्रंथ रचिण्याचें कारण सांगितलें आहे. या भक्तलीलामृतांत पहिल्या दहा अध्यायांत, चांगदेवाच्या[१] अवतारकृत्यांचें कीर्तन करून पुढें एक-दोन अध्यायांत नानक व रोहिदास यांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. तेराव्यानंतर अकरा अध्यायांत महासाधू एकनाथमहाराजांचें व त्यापुढें सोळा अध्यायांत सद्गुरु तुकारामबुवांचें अशीं दोन चरित्रें वर्णन करून ग्रंथ चाळिसाव्या अध्याया-पर्यंत आणिला आहे. हे अकरा व सोळा मिळून सत्तावीस अध्याय शोधकपणानें माहितो मिळवून फार काळजीनें लिहिलेले दिसतात. भाषेच्या दृष्टीनेंहि हे फारच सुरस व चित्तवेधक उतरले आहेत. आपला ग्रंथ-विस्तार बराच झाला परंतु चरित्रें मात्र अवघीं सहाच आलीं, असें पाहून कवीनें पुढील भागांत चरित्रांची गर्दी उडवून दिली आहे. पुढील दहा अध्यायांत सुमारें पन्नास चरित्रें कोंबिलीं आहेत. यामुळें या शेवटील भागांत ग्रंथाची प्रथमची गोडी राहिली नाहीं; व या चरित्रांची माहितीहि पहिल्याप्रमाणें काळजीपूर्वक मिळविली गेली नाहीं. यांत महाराष्ट्राबाहेरील व भक्तमालेंतलीं बरींच चरित्रें आलीं आहेत. याप्रमाणें एकावन्न अध्याय पुरे करून हा ग्रंथ संपविला आहे.

भक्तलीलामृत ग्रंथ १६९६-च्या फाल्गुनांत पुरा केला. म्हणजे या वेळीं महीपतीबावा साठ वर्षांचे वृद्ध झाले होते. तरी त्यांनीं राहिलेल्या आयुष्यांत पुन्हां आणखी नवा ग्रंथ रचिण्याची जमवाजमव चालविली होतीच असें दिसतें. रचिलेला भाग हल्लीं 'संतविजय' या नांवानें

---

१. चांगदेवाचें चरित्र त्याचा वंशज शामजी याच्या ग्रंथाधारें लिहिलें आहे. मागें माणकोजी बोधल्याचेंहि चरित्र असेंच त्याच्या वंशजांनीं लिहिलेल्या लेखाधारें लिहिल्याचा उल्लेख महीपतीनें केला आहे. यावरून महीपतीबोवा माहिती किती काळजीनें मिळवीत, तें स्पष्ट दिसतें. एके ठिकाणीं महीपतीबुवा म्हणतात, ' स्वदेशामाजी निश्चित । प्रख्यात जाहले जे महासंत । त्यांच्या वंशीं सज्ञान महंत । त्यांचे वचनार्थ पाहिले ॥ आपल्याच मतें वदलों जर । तरी सर्वज्ञ न मानिति उत्तर । यासी साक्ष रुक्मिणीवर । जाणे अंतर सकळांचें ॥ '

प्रसिद्ध आहे. पण हा पुरा ग्रंथ नसून यांत एक रामदासस्वामींचें व दुसरें बाबाजी गोसाव्याचें अशीं दोनच चरित्रें आहेत. बावांच्या मृत्यूपूर्वीं हीं दोनच सुटीं चरित्रें लिहून झालीं होतीं. असें दिसतें कीं, महीपतीबावा एकेका संताची माहिती मिळवून मिळविलेल्या माहितीचें एक चरित्र पुरें करीत. 'संताचीं चरित्रें संपूर्ण। एकदांचि नाकळती जाण। तेव्हां जी झाली आठवण। तीं चरित्रें लिहून ठेविलीं ॥' असें महीपतीबुवा स्वतःच सांगतात; व अशीं बरींच चरित्रें झालीं म्हणजे आदि अंतींचे अध्याय व मधील दुव्याच्या ओंव्या वगैरे घालून ग्रंथ पुरा करीतें. संतविजय हा असा पुरा केलेला ग्रंथ नाहीं. यांत नेहमींप्रमाणें नमन किंवा ग्रंथसमाप्तीचा काल नाहीं; याचेंहि कारण हेंच आहे. ग्रंथ पुरा होण्यापूर्वींच बोवांचे आयुष्याचे दिवस सरले. यामुळें ग्रंथ अपुरा राहिला. हा ग्रंथ चालू असतां वृद्धापकाळांत कवीनें इतरहि लहानलहान कथा व स्तोत्रें रचिलेलीं दिसतात. यापैकींच 'अपराधनिवेदनस्तोत्र' या नांवाचें स्तोत्र आहे. 'आंगासि आले वृद्धपण। क्षुधा न सोसे शीत उष्ण।' अशा आयुष्याच्या काळीं, वयाच्या उमेदींत घडलेले अपराध आठवून ते पांडुरंगाच्या चरणीं निवेदन करण्याकरितां लिहिलेलें हें स्तोत्र एका दृष्टीनें चित्तवेधक आहे[२]. पण यांत माहितीपेक्षां भक्तिरसच विशेष भरलेला आढळतो. या स्तोत्रापेक्षां महीपतीचें 'पांडुरंगस्तोत्र' हें एका दृष्टीनें विशेष महत्वाचें आहे. यांत पंतांच्या संशयरत्नावलीचें बीज आपल्या नजरेस पडेल. यांतून शेवटल्या थोड्या ओंव्या पुढें देतों—

---

१. भक्तविजय, भक्तलीलामृत वगैरे ग्रंथ प्रथम लिहले, तेव्हां त्यांत दरएक अध्यायांत एकएकच चरित्र घातलें होतें. पण मग पुढें या अध्यायांना आणखी इतर चरित्रांचे नवे कप्पे जोडण्यांत आले. कांहीं ठिकाणीं तर या गोधडीच्या शिवणी अगदीं बोजड झाल्या आहेत.

२. आत्मचरित्र या दृष्टीनें पाहतां हा लेख वाटतो तितका महत्त्वाचा नाहीं. यांत कांहीं गोष्टींचा उल्लेख आहे, पण एकंदर लेख विशेष महत्त्वाचा नाहीं.

हें संतांचें मुखें करुनि । कीर्तनीं ऐकलें चक्रपाणी ।
त्याचा विश्वास धरूनि मनीं । तुझें भजनीं लागलों ॥
आतां समर्थासी असेल उचित । तैसें करावें माझें हित ।
उपेक्षा करशील निश्चित । तरी हसतील संत तुजलागीं ॥
देवा तूं ब्रह्मांडनायक । तुझे रोमरंध्री सकळ लोक ।
तो तूं पुंडलिकासी देवोनि भाक । उभा सन्मुख तिष्ठशी ॥
तें रूप धरूनिया चित्ती । तुज आठवितो रुक्मिणीपती ।
ऐसी ऐकुनिया विनंती । करुणा चित्तीं कां न ये ॥
मज वाटतें रूप सगुण । टाकूनि आतां झालासि निर्गुण ।
म्हणून ब्रिदाचा अभिमान । सोडिला संपूर्ण ये काळीं ॥
कां माझे दोष दारुण । भस्म न होती तुझिया स्मरणें ।
म्हणूनि निष्ठूर करुनि मन । दिधलें टाकून मजलागी ॥
कां निजभक्त लाविती प्रीती । ध्यानांत गोविलें श्रीपती ।
म्हणून न ऐकसी माझी विनंती । ऐसे चित्तीं वाटतसे ॥
कीं एसें वाटतें माझिया मनांत । तुज लेंकुरें झालीं बहूत ।
म्हणून निष्ठूर करुनि चित्त । मज निश्चित उपेक्षिलें ॥
यात्रा मिळाली अधोक्षजा । कीं राउळीं मांडिली महापूजा ।
तेथेंच प्रेमा लागला तुझा । विसर माझा पडला कीं ॥
कीं संचित माझें ओखटे । जाणुनि तुजला भय वाटे ।
मग निष्ठूर करूनि मन मोठें । येत येत वाटे परतलासी ॥
कीं डोळे झाकून कठिणपण । सांडुनि देवपणाचा अभिमान ।
म्हणून विनंती ऐकून । दिधले टाकून मजलागीं ॥
कीं कलीचें बळ दुर्धर जाण । म्हणुनी न करिसी माझें धावणें ।
कीं प्रेमळ भक्ताचे ऐकूनि कीर्तन । तेथें बैसून श्रवण करिसी ॥
तुझी कीर्ति अद्‌भुत झाली देवा । म्हणुनि न ऐकसी माझा धांवा ।
कीं घडोनीं आली नाहीं सेवा । म्हणुनि केशवा मोकलीलें ॥
कीं हा समय अमंगल जाण । म्हणुनी न करिसी माझें धावणें ।
कीं आडवी येऊनी माता रुक्मिण । तूंते धरूनी बैसविलें ॥
कीं मी पतीत साचार । घडला सकळ दुराचार ।
सांगता अपराधाचे विस्तार । शिणेल फणिवर व्यर्थची ॥

अंतर साक्ष तूं चैतन्यघन । माझीया कर्माची जाणसील खुण ।
आतांचि गुणदोष निवारुन । भवबंधन निरसावें ।।
तुझिया नामावांचूनि जर । अन्य उपाय केले फार ।
तरी हंसतील सकळ वैष्णववीर । म्हणतील निर्धार यासी नाहीं ।।
कल्पतरूखालीं बैसलो जाण । तेथें क्षुधित अन्नाविण ।
तरी हा शब्दसुरतरू कारण । जाण संपूर्ण पावती ।।
कीं कामधेनूचें पाडस पय । अजा पावसी चाखू जाय ।
तरी तीस म्हणती बुरठ गाय । पंढरीराय जाणसी तूं ।।
तृषा लागतां चातकास । त्यानें मेघाची करावी आस ।
तेवीं संकट पडतां आम्हांस । तूज सायास आळवावें ।।
बाळकासीं क्षुधा लागतां नेटें । त्यानें मातेच्या स्तनीं धवावें झटें ।
तेवीं आम्हांस पडतां संकटें । तेव्हां तुझी वाट पहावी ।।
ना तरी पाडस क्षुधित जालें वनीं । तेणें सायासें धुंडावें हरणी ।
तैसें संकठीं चक्रपाणी । तुजलागुनि आळवावें ।।
कीं पतिव्रता इच्छी परमार्थ । तिनें आपले पतीचें घ्यावें तीर्थ ।
तेवीं कामक्रोधासी पीडितां बहुत । भजन निश्चित करावें ।।
गगनीं नक्षत्रें आहेत बहुत । परी चकोरासी तोषवी रोहिणीकांत ।
तेवीं आम्हां पतिताचें हित । तुजवीण निश्चित कोण करी ।।
बाळकासी क्षुधा लागतां पोटीं । तेव्हां कासव पाहे कृपादृष्टी ।
तैशापरी जगजेठी । मज ही शेवटीं रक्षावें ।।
जरी मी वायां गेलों येणें । तरी हास्य होईल पिशुनांत ।
आतां आपणांस असेल उचित । तैसें निश्चित करावें ।।
ब्रिदासी बोल लागेल तत्वतां । ऐसें न करीं पंढरीनाथा ।
महिपती चरणीं ठेवोनी माथां । विनंति अनंता करीतसे ।।
स्वस्ति श्रीपांडुरंगस्तोत्र । नित्य पठती भाविक नर ।
निश्चय देखोनि रुक्मिणीवर । पुरवी मनोरथ तयांचे ।।

।। इति श्री–पांडुरंग–स्तोत्र संपूर्ण ।।

तसेंच श्रीपांडुरंगास बोवांनीं भाविक बुद्धीनें लिहिलेलें पत्र प्रसिद्ध आहे, तें असें––

जयजय क्षीराब्धिवासा अनंता । अनंतशायी मायातीता । भक्तवत्सल पंढरीनाथा । रुक्मीणीकांता श्रीविठला ॥ १ ॥ सेवेसी विज्ञापना ऐसी । येत होतो पंढरीशी । पांच कोस प्रथम दिवशीं । नांदुरग्रामीं पातलो ॥ २ ॥ एक रात्र करमोनी तेथ । प्रातःकाळीं उठलों त्वरित । तो अश्वावरोनि अकस्मात । ग्रामद्वारांत पडियेलों ॥ ३ ॥ तेणें देहदुःखें करून । विकळ मूर्छित पडिलों जाण । तों नामधारक यात्रेंतून । आला धांवून सन्निध ॥ ४ ॥ त्यांनीं संबुखितां मजकारणें । यास्तव देहीं परतले प्राण । चित्तासी प्रतीती आली गहन । अगाध महिमान संताचे ॥ ५ ॥ मग इष्टमित्र आप्तविषयाही । डोली करोनी आणिले गांवीं । परी चित्तवृत्ती विठाबाई । तुझे पायी लागली ॥६॥ त्रितापाचे विस्तार किती । पत्रीं लिहावें तुजप्रति । तरी शरीरीं नाहीं शक्ति । लेखणी हातीं धरवेना ॥ ७ ॥ अंतरसाक्ष चैतन्यघन । जाणशीं जिवाची निजखूण । परी मी आर्ष म्हणवोन । तुजकारणें लिहिलें ॥ ८ ॥ आतां शेवटील हेत आहे साचा । संबंध तोडी या देहाचा । ठाव इच्छितसे पायाचा । आणीक वाचा न बोले ॥ ९ ॥ मागें भक्तासि पावलासी अंति । तें यथार्थ करी रुक्मीणीपती । दासानुदास महिपती । सेवेसी विनंती करीत ॥ १० ॥

महीपतीबुवा आपल्या वयाच्या ७५-वे वर्षी म्हणजे शके १७१२–मध्यें श्रावण वद्य द्वादशीस मरण पावले[1]. यांचे मागें ‘ विठोबा ’ व ‘ नारायण ’ असे यांचे दोन पुत्र होते. यांपैकीं विठोबास पदें वगैरे रचिण्याचा नाद असे. यांना पंतकाव्यांचा नाद फार होता. महीपतीबावांनीं मिळविलेल्या सामुग्रीचा उपयोग करून घेऊन व आणखी सामुग्री मिळवून विठोबादादांनीं, आपल्या पित्यानें – महीपतीनें – आरंभिलेला

---

१. ताहराबाद गांवाबाहेर महीपतीबुवांनीच केलेला एक चांगला बाग आहे. येथेंच विठोबा, महीपती, नारायण अशा दोहींकडे दोन मुलांच्या व मध्यें महीपतीबावांची अशा तीन समाधी आहेत. कीर्तनारंभीं पुढील अभंग महीपतीबुवा म्हणत. बुवांचे वंशजहि हा अभंग अजून प्रारंभीं म्हणतात.

चित्तीं धरिली वासना । सिद्धी न्यावी नारायणा ॥
मी तो अपंग अनाथ । तुम्ही अनाथाचे नाथ ॥
केला पण सिद्धी न्यावा । मज सांभाळावें देवा ॥
महीपती निढळवाणा । याची येऊं द्या करुणा ॥

संतविजय ग्रंथ पुरा केला असता तर बरें होतें. पण तसें झालेलें दिसत नाहीं.

आतां महीपतीबावानंतर झालेल्या दोन भक्तचरित्रवर्णनात्मक ग्रंथांचा थोडा निर्देश करतों. वास्तविक पाहतां कालानुरोधानें ते यानंतर बरेच पुढें यावयास पाहिजेत. परंतु त्यांचा निर्देश येथेंच थोडक्यांत आटोपणें थोडें सोईचें पडेल, असें वाटल्यावरून तो येथेंच करण्यास हरकत नाहीं. हे दोन ग्रंथ म्हणजे एक **भीमस्वामी**कृत 'भक्तलीलामृत' व दुसरा **राजाराम प्रासादी**कृत 'भक्तमंजिरी' हे होत.

'भक्तलीलामृत' ग्रंथाचे कर्ते **भीमस्वामी** किंवा **भिमाजीबुवा** हे श्रीरामदासस्वामींच्या शिष्यपरंपरेपैकीं एक असून शिरगांव मठाचे अधिपति होते. शिरगांव हें चांफळापासून दोन कोसांवर असून या ठिकाणीं समर्थांचे शिष्य कल्याणस्वामी यांचे बंधू दत्तात्रयस्वामी यांचा वंश नांदला. दत्तात्रय स्वामीपासून पुत्रपरंपरेनें (१) दत्तत्राय, (२) राघव, (३) यशवंत व (४) भिमाजी अशी प्रस्तुत भक्तलीलामृतकार भिमाजीबुवा यांची चौथी पिढी येते. भिमाजीबुवांनीं आपला ग्रंथ शके १७१९–त लिहिला. प्रथम यांत श्रीसमर्थांचें चरित्र सांगितलें असून पुढें निरनिराळीं सदतीस भक्तांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. भक्तांची निवड कांहीं विशेष धोरणानें केली नसून साधारण जीं मनांत आलीं तीं चरित्रें सांगितलीं आहेत. रामदासपंचायतनांतले प्रमुख साधुपुरुष किंवा रामदासी पंथांतील मुख्य-मुख्य शिष्य यांचाहि समावेश या ग्रंथांत नाहीं. कथा सांगितल्या आहेत त्याहि नीट चौकसपणानें सांगितल्या नसून यथातथाच आहेत. भिमाजी-बावांनीं मनांत आणिलें असतें तर एक अद्वितीय व बहुमोल ग्रंथ निर्माण करण्यासारखी सामुग्री त्यांस सहज स्वाधीन करून घेतां आली असती, असें वाटतें. भिमाजीबोवांचा हा भक्तलीलामृत ग्रंथ ओंवीबद्ध नसून अभंगमय आहे.

'भक्तमंजिरी' हा ग्रंथ भक्तलीलामृतापेक्षां विस्तारानें फार मोठा असून ज्यास्त व्यवस्थित आहे. हाहि रामदासी पंथांतील श्रीसिद्धेश्वरमहाराजांचा

शिष्य **राजाराम प्रासादी** यानें रचिला आहे. याचे एकंदर १०९ अध्याय आहेत. अष्टोत्तरशत अध्यायांची मणिमाला कल्पून १०९–वा अध्याय मेरुमणि म्हटला आहे. अर्थात् या १०९–व्या मेरु-अध्यायांत रामदासी संप्रदायाचे मेरुमणि श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचेंच चरित्र सांगितलें आहे. ग्रंथाप्रारंभींच्या पहिल्या अकरा अध्यायांतहि रामदास-चरित्रवर्णनच आहे. बाकी राहिलेल्या सत्याण्णव अध्यायांत कवीनें जवळ-जवळ शेंसव्वाशें साधूंची हकीकत सांगितली आहे. साधारणपणें महीपतीबावांनीं वर्णिलीं नाहींत अशा साधुपुरुषांचीं चरित्रें गाण्याचा कवीचा अभिप्राय दिसतो.

या ग्रंथांतील माहिती राजारामप्रासादींनीं कशी कशी मिळविली हें नीटसें कळत नाहीं. पण ती बरीच प्रयासानें मिळविलेली दिसते. ग्रंथांत

---

१. राजाराम प्रासादींचीं पुष्कळ पदें प्रसिद्ध आहेत. त्यापैकीं पुष्कळ चांगलीं व चमत्कृतिजनक आहेत, पैकीं एक पद देतों—

देवा कोण आतां तारी। धुंदी झाली दरबारीं ॥ ध्रु०॥
पांडव तुज म्हणतीं खासा। दवडिसि त्यांतें वनवासा ॥
छळि निशि येऊनि दुर्वासा। परि तो पावे सुग्रासा।
गोपी अनुसरल्या रासा। विरहें देसि तया त्रासा ॥
आवडे तुज कुब्जा नारी। धुंदी झाली दरबारीं ॥ देवा० ॥ १ ॥
त्वन्मुखि बकि कुचविष घोंटी। मानिसि देवकिसम पोटीं।
ज्यांचीं आचरणें खोटीं। वदविसि तेथुनि शतकोटी।
कीर्तनि नारदरति मोठी। घड त्या न मिळे लंगोटी।
असि काय चाल तुझी भारी। धुंदी झाली दरबारीं ॥ देवा० ॥२॥
त्वां जे भक्त विभो केले। ते विचित्र करिते झाले।
कोणी पशूंतें बोलविलें। अमृत मृतांतें सेवविलें।
कन्ये पुंस्त्वचि लेवविलें। मृत पितरांतें जेवविलें।
मारुनि कां उठवा धारी। धुंदी झाली दरबारीं ॥ देवा० ॥ ३ ॥
अघटितघटनापटु देवा। न कळत लीलाचा ठेवा।
इच्छि मन निज धनहिन ठेवा। यातें पदिं कां नच ठेवा।
वद या राजाराम सेवा। पुरवीं प्रासादिक हेवा।
घेउनि दाद भवा वारी। धुंदी झाली दरबारीं ॥ देवा० ॥ ४ ॥

यांची समाधी बांबेजवळ मौजे गुंज येथें नदीचे कांठीं आहे.

परंपरा, समकालीन संत व जन्ममृत्यु वगैरेचे शक राजारामबुवांनीं अनेक ठिकाणीं सांगितले आहेत. यामुळें या ग्रंथास एक तऱ्हेचें विशेष महत्त्व आलें आहें. तथापि राजारामबुवांनीं दिलेली माहिती थोडी जपून व चौकशीनेंच घेतली पाहिजे, असें सदरहू ग्रंथाची तपासणी थोड्या बारकाईनें केली म्हणजे वाटूं लागतें. मात्र समजूनउमजून मनास मानेल ती खोटी माहिती राजारामबुवांनीं आपल्या ग्रंथांत दिली नाहीं. माहिती त्यांनीं आपल्या समजुतीप्रमाणें चौकसपणानें दिली आहे. राजारामबुवांचा ग्रंथ अनेक कारणांनीं हल्लीं उपलब्ध अशा चरित्रग्रंथांत वरच्या दर्जाचा आहे. हा ग्रंथ कवीनें शके १७५६—मध्यें पुरा केला असें शेवटीं त्यांत सांगितलें आहे.

**नरहरी धुंडिराज मालु** हा एक मोठा ग्रंथकार आहे. याचे कांहीं अभंग व पदें असून ' मालुतारण ' व ' भक्तिकथामृत ' या नांवाचे दोन मोठाले ग्रंथ आहेत. यांपैकीं ' भक्तिकथामृत ' हा ग्रंथ भक्तचरित्रकथा सांगण्याच्या इरायानें लिहिला आहे. याचें एकंदर ६४ अध्याय असून यांत अनेक साधुपुरुपांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. हा नरहरी धुंडिराज माऌचा ग्रंथ केवळ अलौकिक आहे. महाराष्ट्रभाषेंतल्या अफाट ग्रंथ-सागरांत या ग्रंथास दुसरी जोड नाहीं. यांतलीं सर्व चरित्रें पूर्ण आहेत. म्हणजे कवीची मातापिता, गुरु, स्थळ वगैरे माहिती यांत सूक्ष्म रीतीनें दिली आहे; व अशी ही माहिती एखाददुसऱ्या कवीसंबंधीं सांगितली नसून ती बहुतेक सर्व कवींसंबंधीं सांगितली आहे ! मात्र यांत एकच जरा व्यंग आहे, आणि तें असें कीं, नरहरी धुंडिराज माऌनें आपल्या 'भक्तिकथामृत' ग्रंथांत दिलेली माहिती त्याच्या काळीं सर्वतोमुखीं असलेल्या गोष्टी खेरीजकरून इतर बाबतींत बहुतेक:सर्व येथून—तेथून खोटी आहे म्हणजे चुकीची आहे; व कवीनें नीट चौकशी केल्याशिवाय ती घेतली आहे, असें नाहीं. तर ती समजूनउमजून खोटी दिली आहे. या बापुड्यास माहितीची अडचण म्हणून पडलीच नाहीं. प्रत्येक गोष्ट यानें आपल्या कल्पनेनें सिद्ध करून वाचकांच्या व श्रोत्यांच्या तोंडावर

टाकिली आहे. चुकूनमाकून एखाददुसरी गोष्ट खरी आली असेल, पण तिची खोट्यापासून निवड करणें अवांतर माहितीच्या व प्रमाणांच्या अभावी दुरापास्त आहे. ग्रंथास आधार नामाजीचा व उद्धवचिद्घनाचा म्हणून कवीनें सांगितलें आहे. वरील हकीकत सांगितल्यावर हेंहि थोतांड आहे आणि उद्धवचिद्घनाची स्वतःचीहि हकीकत यानें दिलेली खरी नाहीं, हें फिरून निराळें सांगण्याची गरज नाहीं.

'मालुतारण' ग्रंथहि भक्तिकथामृत ग्रंथाप्रमाणेंच अनेक तऱ्हेच्या खेळखंडोबांनीं भरलेला आहे. तेव्हां यासंबंधें उगाच जास्त चर्चा करण्याचें कांहीं कारण नाहीं.



# मयूरपंडित



मोरोपंतांची काव्यरचना कोणत्या प्रकारची होती, मोरोपंत हे केवळ भाषांतरकार होते, किंवा स्वतंत्र रचनाहि ते करीत, त्यांस विस्तार करून सांगण्याची हौस होती, किंवा ते संक्षेपप्रिय होते, यांविषयीं जाणत्यांचीं आणि अजाणत्यांचीं निरनिराळीं मतें आढळतात. कोणी त्यांस 'महाराष्ट्र-कविवर', किंवा 'प्राकृतकाव्याचार्य' म्हणून अत्यंत उच्च अशा सिंहासनावर बसवितात, तर कोणी त्यांस केवळ 'भाषांतरकार' म्हणून अगदींच सामान्य लेखतात. वास्तविक पाहतां मोरोपंतांच्या काव्यरचनेचा हेतु काय होता, हें लक्षांत आणिलें असतां या सर्व मतांचा उलगडा सहज होणार आहे. मोरोपंतांनीं अध्यात्मपर सिद्धांत सप्रमाण मांडण्याकरितां आपल्या ग्रंथांची रचना मुळींच केली नाहीं. संसाराला तिलांजलि देऊन केवळ परमार्थचिंतनांत लोकांनीं काळ घालवावा यासाठीं त्यांचे ग्रंथ रचिले गेले नाहींत. केवळ नीतितत्त्वें पढविण्याकरितांहि त्यांनीं लेखणी चालविली नाहीं. तसेंच पंतांनीं जगन्नाथाप्रमाणें आपलें भाषाप्रभुत्व स्थापन करण्याकरितां व 'वाचामाचार्यतायाः पदमनुभवितुं कोऽस्ति धन्यो मदन्यः' ही साक्ष सर्वांना पटविण्याकरितांच 'पांडित्य' केलें, असें प्रायः कोणीहि म्हणणार नाहीं; तसेंच, केवळ जडजीव तारण्याकरितां व सर्वांना वैकुंठपेठेचा रस्ता सुलभ करण्याकरितांच रचनेचा श्रम केला असेंहि नाहीं; किंवा देहभान विसरून प्रेमानंदानें पांडुरंगचरणीं नाचत असतां ही काव्यगंगा त्यांच्या तोंडावाटे सहज बाहेर पडली असेंहि नाहीं; एकटेच सृष्टिसौंदर्यांत तल्लीन होऊन गुंगत असतां मनोवृत्तींच्या अनावर उचंबळ्यासरसी ही त्यांची काव्यनदी एकदम सैरावैरा धावूं लागली व त्यांतच तेहि वाहूं लागले असेंहि

नाहीं; किंवा रंगेलपणाच्या वहारींत हा रंग उडविला असें तर नाहींच नाहीं; संसारत्रासानें त्रस्त होऊन आणि वैतागून जाऊन देवाच्या चरणीं लोळण घेतांना ते काकुळतीनें काव्य म्हणूं लागले, हेंहि नाहीं; तर मोरोपंत हे संसारी स्त्रीपुरुषांच्यासाठीं, कुटुंबवत्सलांसाठीं, देवांच्या कथा कानीं पडाव्या असें इच्छिणाऱ्या सुखवस्तु लोकांसाठीं, ग्रंथरचना करीत होते, असें दिसतें. देवादिकांच्या कथा आपण गाव्या व त्या लोकांना ऐकवाव्या आणि पुढल्या पिढ्यांनीं आपलें कवित्व वाचावें, हाच त्यांचा हेतु दिसतो. यांचा नेहमींचा व्यवसाय पुराण सांगण्याचा. व्यासपीठावर बसल्यावर पुढें पुराणश्रवणार्थ सायंकाळीं आलेल्या मंडळींमध्यें लहान-थोर सर्व असणार; आपल्या नाती, सुना, बरोबर घेऊन आलेल्या स्त्रिया, वयानें मोठीं मुलें, विद्वान् अविद्वान् पुरुष, आपले अन्नदाते धनी, तसेंच त्यांचे आश्रित, नोकर, चाकर, हेहि सर्व असणार. या सर्वांना काय आवडेल, काय समजेल, यांच्या पुढें काय बोललेलें शोभेल हें नीट ध्यानांत आणून पंतांनीं आपलें सर्व व्याख्यान केलें आहे. भारत, भागवत, रामायण आदिकरून पौराणिक ग्रंथांतील कथाभाग सर्वांना सहज सुगम व्हावा, व त्यांतच आपलें व्याख्यान कंटाळवाणें न होईल, त्याची गोडी कमी न पडेल अशा बेतानें सनातनधर्माचीं तत्त्वें व्यवहारिक दृष्टांत घालून कथेच्या मिषानें तीहि सहजासहजीं पढवावीं. अशा नजरेनें यांनीं आपली सर्व रचना केलेली दिसते. पंतांच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं मुळांतली केलेली छाटाछाट, कोठें-कोठें मुळापेक्षां केलेला विस्तार, आणि मूळ प्रकरणांचे पाडिलेले सोयीचे भाग हें सर्व या दृष्टीनें एकदा पाहिलें असतां पंतांच्या रचनेची किल्ली कोणाच्याहि लक्ष्यांत येईल.

आपल्या व्याख्यानाला मोहकपणा तर यावा, परंतु त्याला शिष्टांनींहि नांव ठेवूं नये, अशा बेतानें योजिलेला किंचित् हास्यरस, मोठ्यांना समजून पटावा व केवळ मनांतल्यामनांत त्यांना गुदगुल्या व्हाव्या—फार

तर डोळा जरा वांकडा करून कोणाकडे पाहून त्यांनीं थोडें हंसावें—पण लहानांना त्याचें कांहींच वारें लागूं नये, अशा बेतानें हळूच योजिलेला मुग्ध शृंगार, वत्सलतेनें डोळे भरून येऊन लेकुरवाळ्यांना जरा डोळ्याला पदर लावावासा वाटेल इतक्याच बेताचा करुणरस, आणि पुराणांतल्या योद्ध्यांचे संगर—पराक्रम ऐकून आपल्या नित्यांतल्या लढाईच्या प्रसंगाची खूण पटेल व लहानांना थोडी गंमत वाटेल एवढ्याच धोरणानें केलेलीं वीररसभरित आटोपसर वर्णनें; याच प्रमाणानें सर्वभर योजिलेले इतर रस, यांनीं त्यांच्या ग्रंथांना एक तऱ्हेचा विशेष स्वाद आणि शिष्टपणा आला आहे. अंगीं जाडी विद्वत्ता व बहुतश्रुतपणा हीं भरपूर असून समोरच्या आपल्या श्रोत्यांना समजेल इतपतच व त्यांना कंटाळवाणें न होईल अशाच बेतानें त्यांचा उपयोग केल्यामुळें, आणि पुराणिकाची दृष्टि सारा वेळ कायम ठेविल्यामुळें पंतांचे ग्रंथ नीट मनन करूनहि, विष्णुशास्त्र्यांसारख्या चिकित्सकाला रघुकिरातादि पंडितमान्य काव्यांची मोरोपंतास बिलकुल ओळख होतीशीसुद्धां दिसत नाहीं, असा अभिप्राय द्यावासा वाटला; आणि असल्या चिकित्सक विद्वान् टीकाकाराचा पंतांच्या ग्रंथांचें अध्ययन, अध्यापन व मनन करून करून अखेर वर दिलेलाच अभिप्राय पडावा व वर लिहिल्याप्रमाणेंच त्याला वाटावें हीच मोरोपंतांच्या ग्रंथाची एक थोरवी आहे. यांतच त्यांचे ग्रंथ 'उपजतांच काशिरामेश्वराला कां गेले' याचें रहस्य आहे, नाहींपेक्षां सगळेच चांगले कवि शब्दसृष्टीचे ईश्वर असतात; ते शब्दचातुर्यानें नव्या नव्या सृष्टि निर्माण करितात, व त्यांत विद्वत्ताबलानें कल्पनेच्या झाडांवर हव्या तशा उड्या मारितात; पण अशा उड्या मारितांना लहानलहान मुलांनाहि बरोबर पोटाशीं चिकटून न्यावें, त्यांना पेलतील इतक्याच बेतानें तोल सांवरून उडी झोकावी, हें एक त्या जगत्प्रभू श्रीरामचंद्रजीच्या सेवकांनाच साधतें आणि हें श्रीरामचंद्राच्या या निःसीम भक्तानेंहि उत्तम साधिलें आहे, यांतच त्यांच्या मोठेपणाचें बीज आहे.

आतां, रघुकिरातादि काव्यें पंताना नुसतीं माहीत होतीं इतकेंच

नाहीं; किंवा रंगेलपणाच्या बहारींत हा रंग उडविला असें तर नाहींच नाहीं; संसारत्रासानें त्रस्त होऊन आणि वैतागून जाऊन देवाच्या चरणीं लोळण घेतांना ते काकुळतीनें काव्य म्हणूं लागले, हेंहि नाहीं; तर मोरोपंत हे संसारी स्त्रीपुरुषांच्यासाठीं, कुटुंबवत्सलांसाठीं, देवांच्या कथा कानीं पडाव्या असें इच्छिणाऱ्या सुखवस्तु लोकांसाठीं, ग्रंथरचना करीत होते, असें दिसतें. देवादिकांच्या कथा आपण गाव्या व त्या लोकांना ऐकवाव्या आणि पुढल्या पिढ्यांनीं आपलें कवित्व वाचावें, हाच त्यांचा हेतु दिसतो. यांचा नेहमींचा व्यवसाय पुराण सांगण्याचा. व्यासपीठावर बसल्यावर पुढें पुराणश्रवणार्थ सायंकाळीं आलेल्या मंडळींमध्यें लहान-थोर सर्व असणार; आपल्या नाती, सुना, बरोबर घेऊन आलेल्या स्त्रिया, वयानें मोठीं मुलें, विद्वान् अविद्वान् पुरुष, आपले अन्नदाते धनी, तसेंच त्यांचे आश्रित, नोकर, चाकर, हेहि सर्व असणार. या सर्वांना काय आवडेल, काय समजेल, यांच्या पुढें काय बोललेलें शोभेल हें नीट ध्यानांत आणून पंतांनीं आपलें सर्व व्याख्यान केलें आहे. भारत, भागवत, रामायण आदिकरून पौराणिक ग्रंथांतील कथाभाग सर्वांना सहज सुगम व्हावा, व त्यांतच आपलें व्याख्यान कंटाळवाणें न होईल, त्याची गोडी कमी न पडेल अशा बेतानें सनातनधर्माचीं तत्त्वें व्यवहारिक दृष्टांत घालून कथेच्या मिषानें तींहि सहजासहजीं पटवावीं, अशा नजरेनें यांनीं आपली सर्व रचना केलेली दिसते. पंतांच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं मुळांतली केलेली छाटाछाट, कोठें-कोठें मुळापेक्षां केलेला विस्तार, आणि मूळ प्रकरणांचे पाडिलेले सोयीचे भाग हें सर्व या दृष्टीनें एकदा पाहिलें असतां पंतांच्या रचनेची किल्ली कोणाच्याहि लक्ष्यांत येईल.

आपल्या व्याख्यानाला मोहकपणा तर यावा, परंतु त्याला शिष्टांनींहि नांव ठेवूं नये, अशा बेतानें योजिलेला किंचित् हास्यरस, मोठ्यांना समजून पटावा व केवळ मनांतल्यामनांत त्यांना गुदगुल्या व्हाव्या—फार

तर डोळा जरा वांकडा करून कोणाकडे पाहून त्यांनीं थोडें हंसावें—पण लहानांना त्याचें कांहींच वारें लागूं नये, अशा बेतानें हळूच योजिलेला मुग्ध शृंगार, वत्सलतेनें डोळे भरून येऊन लेकुरवाळ्यांना जरा डोळ्याला पदर लावावासा वाटेल इतक्याच बेताचा करुणरस, आणि पुराणांतल्या योद्ध्यांचे संगर—पराक्रम ऐकून आपल्या नित्यांतल्या लढाईच्या प्रसंगाची खूण पटेल व लहानांना थोडी गंमत वाटेल एवढ्याच धोरणानें केलेलीं वीररसभरित आटोपसर वर्णनें; याच प्रमाणानें सर्वभर योजिलेले इतर रस, यांनीं त्यांच्या ग्रंथांना एक तऱ्हेचा विशेष स्वाद आणि शिष्टपणा आला आहे. अंगीं जाडी विद्वत्ता व बहुतश्रुतपणा हीं भरपूर असून समोरच्या आपल्या श्रोत्यांना समजेल इतपतच व त्यांना कंटाळवाणें न होईल अशाच बेतानें त्यांचा उपयोग केल्यामुळें, आणि पुराणिकाची दृष्टि सारा वेळ कायम ठेविल्यामुळें पंतांचे ग्रंथ नीट मनन करूनहि, विष्णुशास्त्र्यांसारख्या चिकित्सकाला रघुकिरातादि पंडितमान्य काव्यांची मोरोपंतास बिलकुल ओळख होतीशीसुद्धां दिसत नाहीं, असा अभिप्राय द्यावासा वाटला; आणि असल्या चिकित्सक विद्वान् टीकाकाराचा पंतांच्या ग्रंथांचें अध्ययन, अध्यापन व मनन करून करून अखेर वर दिलेलाच अभिप्राय पडावा व वर लिहिल्याप्रमाणेंच त्याला वाटावें हीच मोरोपंतांच्या ग्रंथाची एक थोरवी आहे. यांतच त्यांचे ग्रंथ 'उपजतांच काशिरामेश्वराला कां गेले' याचें रहस्य आहे, नाहींपेक्षां सगळेच चांगले कवि शब्दसृष्टीचे ईश्वर असतात; ते शब्दचातुर्यानें नव्या नव्या सृष्टि निर्माण करितात, व त्यांत विद्वत्ताबलानें कल्पनेच्या झाडांवर हव्या तशा उड्या मारितात; पण अशा उड्या मारितांना लहानलहान मुलांनाहि बरोबर पोटाशीं चिकटून न्यावें, त्यांना पैलतीर इतक्याच बेतानें तोल सांवरून उडी झोकावी, हें एक त्या जगत्प्रभू श्रीरामचंद्रजीच्या सेवकांनाच साधतें आणि हें श्रीरामचंद्राच्या या निःसीम भक्तानेंहि उत्तम साधिलें आहे, यांतच त्यांच्या मोठेपणाचें बीज आहे.

आतां, रघुकिरातादि काव्यें पंताना नुसतीं माहीत होतीं इतकेंच

नाहीं, तर त्या सर्वांशीं त्यांचा उत्तम परिचय होता. आपल्या पूर्व वयांत किंबहुना सर्व आयुष्यभर त्यांचा उत्तमोत्तम प्राचीन ग्रंथांचा व्यासंग व अभ्यास कायम होता. यांपैकीं अनेक ग्रंथ त्यांनीं स्वहस्तानें लिहून काढिले होते. ग्रंथांच्या वाचनानें त्या ग्रंथांशीं केवळ परिचय मात्र होतो, पण वाचून नीट समजून, लिहून काढिल्यानें तो ग्रंथ अगदीं आपलासा होतो; आणि असे अनेक ग्रंथ पंतांनीं लिहून काढिलेले अजूनहि पाहण्यास सांपडतात. पंतांचें ग्रंथलेखनाचें हें काम अखेरपर्यंत चालूच होतें, यामुळें त्यांच्या विद्वत्तेचें तेज विलक्षण पडे. छंद:साहित्यादि शास्त्रांत तर ते अगदीं निपुण होतेच, पण व्यवहारांतील गोष्टींतहि ते कांहीं कमी नव्हते. एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे मोरोपंत हे विशाल बुद्धीचे, दांडग्या व्यवसायाचे, सकलशास्त्रपारंगत असे चतुर व चौरस राष्ट्रीय पुराणिक होते.

पंताचा जन्म शके १६५१ सौम्यनाम संवत्सरीं पन्हाळगडावर झाला. त्यांच्या बापाचें नांव रामाजीपंत व आईचें लक्ष्मीबाई. यांचा वंशवृक्ष पुढीलप्रमाणें आहे[1]—




१. पंतांची बहुतेक माहिती रा. पांगारकरांच्या पंतचरित्रावरून घेतली आहे हें सुंदर चरित्र पंतभक्तांनीं अवश्य वाचण्यासारखें आहे.

मोरोपंतांच्या पूर्वजांचें मूळ गांव सौंदळ. पण त्यांच्या जन्मापूर्वीच त्यांचे वडील सौंदळ सोडून पन्हाळगडावर येऊन राहिले होते. पंतांचें बाळपण पन्हाळगडावरच गेलें. तेथेंच पाध्ये या नांवाचे एक विद्वान् घराणें होतें. या पाध्यांच्या घराण्यांत केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे दोघेहि पंतांना संथा देत. या दोघांचाहि 'गुरु' म्हणून पंतांनीं आपल्या काव्यांत उल्लेख केला आहे. ही पाध्ये मंडळी जरा कडकडीत वृत्तीचीच होती. यांच्यापैकीं काशिनाथ बाबा पाध्ये नांवाच्या एका इसमानें तर बनावट ताम्रपट आणि खोटे शिक्के केल्याचाहि लेख आहे. परंतु यांचा कोणताहि असला गुण न उचलतां मोरोपंत अगदीं सालस व प्रेमळ असेच राहिले, हें पाहून मोठें कौतुक वाटतें. पन्हाळगड सोडिल्यावर मोरोपंत हे पेशव्यांचे व्याही जे बारामतीकर त्यांच्या आश्रयानें त्यांचे घरीं असत. बारामतीकरांकडे पुराण सांगावें एवढीच कामगिरी पंतांकडे होती. राजकारणाच्या भानगडींत पंत कधींहि पडले नाहींत.

मोरोपंतांनीं काव्यरचनेला सुरवात अगदीं पंचविशींत म्हणजे पन्हाळगड सोडून बारामतींत आल्याबरोबरच केली. रेवडीकर हरिदासांच्या कीर्तनसमयीं जागा मिळेना म्हणून रचिलेली—

नित्य तुम्ही प्रभुपाशीं पेढेबरफी नवा खवा खावा।
तरी म्यां एके दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा॥

ही आर्या पंतांची पहिली आर्या म्हणून प्रसिद्ध आहे. याला पुरावा काय, हें माहीत नाहीं. पण आमचे गुरु जनार्दनपंत मोडक यांनीं आम्हाला अगदीं लहानपणीं ही सांगितली व ती आम्ही तेव्हांपासून पंतांची पहिली आर्या म्हणत आलों आहों. बारामतींत तर एक फार जुनें शंकराचें – विश्वेश्वराचें – देवालय आहे. तेथें पंत नित्य दर्शनास जात. पंतांचें कुलपरंपरागत दैवत शंकरच होय; आणि याच दैवताच्या स्तवार्थ पंतांनी आपला 'ब्रह्मोत्तरखंड' हा तेथेंच रचिला. हा पंतांचा पहिला ग्रंथ. याच्या उपसंहारांत पंतांनीं आपणास 'कवि नवीन' असें म्हटलें आहे. हा ग्रंथ आर्यावृत्तांत आहे, पण यानंतरचा दुसरा 'भस्मा-

सुरआख्यान' हा श्लोकबद्ध आहे. या दोन्हीं 'शिवकीर्तिग्रंथां'पेक्षां पंतांच्या आवडत्या रामचरित्रांतले[1] 'सीतागीत' व 'लवांकुशआख्यान' हे पहिल्या भरांत रचिलेले ग्रंथ विशेष चांगले आहेत. पहिला तर घरच्या मुलींना गाण्याकरितांच रचिलेला. तेव्हां तो

**'पहिली माझी ओंवीं। पहिला माझा नेम। तुळशीखालीं राम। पोथी वाची'॥**

या लहानपणाच्या छंदांतच आहे; आणि तसाच तो कोमल आणि गोड आहे. 'लवांकुशआख्यान', वामनाचें आपण वाचिल्यामुळें आपल्याला हें तितकें गोड वाटत नाहीं. पण स्वतः पंतांना तें फारच नामी वाटलें. त्यांनीं पुढें मोठेपणीदेखील त्यासंबंधीं लिहितांना 'मज तो वाटे सुधा नदी वाहे' असें म्हटलें आहे. 'सीतागीता'प्रमाणेंच 'रुक्मिणीगीत'हि मुलींना म्हणण्यासाठींच रचिलें होतें. या प्रथम लिहिलेल्या गोष्टी मागाहून कृष्णविजयांत पंतांना फिरून सांगण्याची पाळी आली. तेव्हांहि त्यांनीं ते पहिलेच शब्द वृत्तसुखाकरितां थोडे बदलून पुन्हां तसेच सांगितले. रुक्मिणीगीतांतलीं—

**न आलें त्या दिशीं। मध्यें रात्र मात्र। चिताज्वरें गात्र। तापविलें॥**
**त्या रात्रीं लागला। नाहीं माझा डोळा। प्राण कंठीं गोळा। झाले होते॥**

इत्यादि पद्यें त्याच प्रसंगाच्या कृष्णविजयांतल्या आर्यांशीं ताडून पाहिलीं असतां हें सहज लक्ष्यांत येईल. वरच्याप्रमाणेंच 'लवांकुशाख्यान' 'हरिश्चंद्राख्यान', 'देवीमहात्म्य', 'प्रल्हादविजय', 'अंबरीषचरित्र' हीं सर्व लहान लहान व स्वतंत्र आख्यानें पंतांनीं पहिल्या भरांतच रचिलीं असावीं. लवांकुश–आख्यान हें वामनाच्या लवांकुशापेक्षां नीरस आहे हें खरें. पण पंतांच्या श्लोकबद्ध काव्यांत त्याची जागा बरीच वर लागेल. यांत वर्णिलेल्या बालवीरांचे पराक्रम वाचून याच सुमारास उद्गीरच्या लढाईचे वेळीं गाजवलेले सदाशिवरावभाऊंचे पराक्रमांची आठवण सहज

---

१. पंतांना एका ब्राह्मणानें आपल्या पूजेच्या श्रीरामाच्या मूर्ती सोंवळ्यानें आणून दिल्या व हाच ईश्वरप्रसाद समजून पंत रामोपासना करूं लागले. पुढें आजन्म ते रामचंद्राचीच सेवा व भजन करीत.

होते; व एकमतें असेंहि वाटतें कीं, सदाशिवरावभाऊंच्या पराक्रमाची कानावर आलेली हकीकत हातानें या काव्यांत उतरली असेल. कदाचित या भट-बाल-वीराच्या पराक्रमाचें प्रतिबिंब प्रल्हादविजयांतही नजरेस पडेल. यांपकीं प्रल्हादविजयावर मात्र पंतांनीं शके १६८० बहुधान्य–संवत्सर पौष शु० अष्टमीं असा रचनाकाल दिला आहे. म्हणजे या वेळीं अजून त्यांच्या वयाची तिशी उलटली नव्हती. याशिवाय इतर कोठें पंतांनीं रचनाकाल दिलेला नाहीं. प्रल्हादविजय ग्रंथांत पंतांनीं अवजड, आया-वृत्त योचिलें आहे, यामुळें या काव्याची सर्व मजा फुकट गेली. हें वृत्त मोठें अवजड आणि कर्णकटु आहे. यामुळ ही पाकनिष्पत्ति नीट उतरली नाहीं. पुढें कृष्णविजयाचाहि हाच प्रकार झाला आहे. उत्तम स्वयंपाक करणारानें कडू कार्ल्यांची भाजी कितीहि चांगली केली तरी अखेर कार्लें तें कार्लेंच. तसेंच किती गोड बनविलें तरी अवजड आर्यावृत्त कटू तें कटूच. पण इतकेंहि असून कार्ल्यांची भाजी प्रेमानें खाणारेहि रसिक आढळतात. तद्वतच हा प्रल्हादविजय व नंतरचा कृष्णविजय (५४ अध्याय) हे आर्यावृत्तांतले ग्रंथ वाचून मिटक्या मारणारेहि रसिक आढळतात. स्वतः पंतदेखील 'हा प्रल्हादविजय ग्रंथ

---

१. ज्या वृत्ताला प्रायः आपण 'आर्यावृत्त' म्हणतो तें खरें 'गीतीवृत्त' आहे. आर्यावृत्तांत प्रत्येक चरणांत दोन यमकें असतात; व दोन्हीं चरण शेवटीं सयमक नसतात. पंतभक्त परसुरामतात्यांनीं या वृत्ताचें लक्षण दिलें आहे तें असें.

' पहिल्या चरणीं बारा मात्रा दुसऱ्यांत सात आणि तेरा ।
उभय दळीं हे रीती जीस तिला म्हणति सूज्ञ 'आर्यागीती' ।।

या वृत्ताच्या नांवासंबंधानें फार घोटाळा होतो. छंदःशास्त्रगुरु सांगतात कीं, जें म्हणण्याला अवजड व ज्यांत दर चरणांत दोन यमकें येतात त्याला 'आर्या' म्हणा; व जें सुलभ वृत्त त्याला आर्यागीति म्हणा. पण पत्रव्यवहारांत सर्व लोक या दुसऱ्याच वृत्ताला आर्या म्हणतात. प्रत्यक्ष मोरोपंतदेखील या आवडत्या सुलभ वृत्ताला आर्या असेंच म्हणतात, असें दिसतें.

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों स्वल्पांतचि आणितों कथा सारी ।। इ. इ.

सुरआख्यान' हा श्लोकबद्ध आहे. या दोन्हीं 'शिवकीर्तिग्रंथां'पेक्षां पंतांच्या आवडत्या रामचरित्रांतले 'सीतागीत' व 'लवांकुशआख्यान' हे पहिल्या भरांत रचिलेले ग्रंथ विशेष चांगले आहेत. पहिला तर घरच्या मुलींना गाण्याकरितांच रचिलेला. तेव्हां तो

'पहिली माझी ओंवीं। पहिला माझा नेम। तुळशीखालीं राम। पोथी वाची'॥

या लहानपणाच्या छंदांतच आहे; आणि तसाच तो कोमल आणि गोड आहे. 'लवांकुशआख्यान', वामनाचें आपण वाचिल्यामुळें आपल्याला हें तितकें गोड वाटत नाहीं. पण स्वतः पंतांना तें फारच नामी वाटलें. त्यांनीं पुढें मोठेपणींदेखील त्यासंबंधीं लिहितांना 'मज तो वाटे सुधा नदी वाहे' असें म्हटलें आहे. 'सीतागीता'प्रमाणेंच 'रुक्मिणीगीत'हि मुलींना म्हणण्यासाठींच रचिलें होतें. या प्रथम लिहिलेल्या गोष्टी मागाहून कृष्णविजयांत पंतांना फिरून सांगण्याची पाळी आली. तेव्हांहि त्यांनीं ते पहिलेच शब्द वृत्तसुखाकरितां थोडे बदलून पुन्हां तसेच सांगितले. रुक्मिणीगीतांतलीं—

न आलें त्या दिशीं। मध्यें रात्र मात्र। चिंताज्वरें गात्र। तापविलें॥
त्या रात्रीं लागला। नाहीं माझा डोळा। प्राण कंठीं गोळा। झाले होते॥

इत्यादि पद्यें त्याच प्रसंगाच्या कृष्णविजयांतल्या आर्यांशीं ताडून पाहिलीं असतां हें सहज लक्ष्यांत येईल. वरच्याप्रमाणेंच 'लवांकुशाख्यान' 'हरिश्चंद्राख्यान', 'देवीमहात्म्य', 'प्रल्हादविजय', 'अंबरीषचरित्र' हीं सर्व लहान लहान व स्वतंत्र आख्यानें पंतांनीं पहिल्या भरांतच रचिलीं असावीं. लवांकुश–आख्यान हें वामनाच्या लवांकुशापेक्षां नीरस आहे हें खरें. पण पंतांच्या श्लोकबद्ध काव्यांत त्याची जागा बरीच वर लागेल. यांत वर्णिलेल्या बालवीरांचे पराक्रम वाचून याच सुमारास उद्गीरच्या लढाईचे वेळीं गाजवलेले सदाशिवरावभाऊंचे पराक्रमांची आठवण सहज

१. पंतांना एका ब्राह्मणानें आपल्या पूजेच्या श्रीरामाच्या मूर्ती सोंवळयानें आणून दिल्या व हाच ईश्वरप्रसाद समजून पंत रामोपासना करूं लागले. पुढें आजन्म ते रामचंद्राचीच सेवा व भजन करीत.

होते; व एकमतें असेंहि वाटतें कीं, सदाशिवरावभाऊंच्या पराक्रमाची कानावर आलेली हकीकत हातानें या काव्यांत उतरली असेल. कदाचित् या भट-बाल-वीराच्या पराक्रमाचें प्रतिबिंब प्रल्हादविजयांतही नजरेस पडेल. यांपकीं प्रल्हादविजयावर मात्र पंतांनीं शके १६८० बहुधान्य–संवत्सर पौष शु० अष्टमीं असा रचनाकाल दिला आहे. म्हणजे या वेळीं अजून त्यांच्या वयाची तिशी उलटली नव्हती. याशिवाय इतर कोठें पंतांनीं रचनाकाल दिलेला नाहीं. प्रल्हादविजय ग्रंथांत पंतांनीं अवजड, आया-वृत्त योचिलें आहे, यामुळें या काव्याची सर्व मजा फुकट गेली. हें वृत्त मोठें अवजड आणि कर्णकटु आहे. यामुळ ही पाकनिष्पत्ति नीट उतरली नाहीं. पुढें कृष्णविजयाचाहि हाच प्रकार झाला आहे. उत्तम स्वयंपाक करणारानें कडू कार्ल्यांची भाजी कितीहि चांगली केली तरी अखेर कार्लें तें कार्लेंच. तसेंच किती गोड बनविलें तरी अवजड आर्यावृत्त कटू तें कटूच. पण इतकेंहि असून कार्ल्यांची भाजी प्रेमानें खाणारेहि रसिक आढळतात. तद्वतच हा प्रल्हादविजय व नंतरचा कृष्णविजय (५४ अध्याय) हे आर्यावृत्तांतले ग्रंथ वाचून मिटक्या मारणारेहि रसिक आढळतात. स्वतः पंतदेखील ‘ हा प्रल्हादविजय ग्रंथ

---

१. ज्या वृत्ताला प्रायः आपण ‘ आर्यावृत्त ’ म्हणतो तें खरें ‘ गीतीवृत्त ’ आहे. आर्यावृत्तांत प्रत्येक चरणांत दोन यमकें असतात; व दोन्हीं चरण शेवटीं सयमक नसतात. पंतभक्त परसुरामतात्यांनीं या वृत्ताचें लक्षण दिलें आहे तें असें.

‘ पहिल्या चरणीं बारा मात्रा दुसऱ्यांत सात आणि तेरा ।
उभय दळीं हे रीती जीस तिला म्हणति सूज्ञ ‘आर्यागीती ’ ।।

या वृत्ताच्या नांवासंबंधानें फार घोटाळा होतो. छंदःशास्त्रगुरु सांगतात कीं, जें म्हणण्याला अवजड व ज्यांत दर चरणांत दोन यमकें येतात त्याला ‘आर्या’ म्हणा; व जें सुलभ वृत्त त्याला आर्यागीति म्हणा. पण पत्रव्यवहारांत सर्व लोक या दुसऱ्याच वृत्ताला आर्या म्हणतात. प्रत्यक्ष मोरोपंतदेखील या आवडत्या सुलभ वृत्ताला आर्या असेंच म्हणतात, असें दिसतें.

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों स्वल्पांतचि आणितों कथा सारी ।। इ. इ.

पहा, मगची मणीगणीं खचिला' असें म्हणतात. जनकाला आपलें शेंबडें पोरदेखील मनापासून आवडतें म्हणतात तें खरें; पण पुष्कळांना या 'विजया' पेक्षां देवीमहात्म्यदेखील ज्यास्त गोड वाटेल. यांतली

विश्व प्रसन्न झालें होय जसें भास्करोदयीं कमळ।
उत्पातमेघ शमले सर्व व्योम प्रकाशलें अमळ ॥

ही एकच आर्या त्या आख्यानाच्या सुंदरतेची साक्ष पटविण्यास पुरे आहे. पंतांच्या इतर लहान-लहान प्रकरणांपैकीं 'मदालसा-आख्यान' व 'हरिश्चंद्राख्यान' हीं विशेष गोड आहेत. हरिश्चंद्राची कथा मूळचीच करुणरसानें इतकी थबथबलेली आहे कीं, ती कोणींहि कशीहि सांगितली तरी डोळ्यांना पाणी आणतेच. मग पंतांनीं सांगितल्यावर ती आणखी हृदयद्रावक होईल, यांत नवल नाहीं. पण मदालसाचरित्र तसें नाहीं. तें कथानक गोड आहे, पण त्याची गोडी टिकविणें रचनाकारावर अवलंबून राहतें. मदालसा नांवाची एक गंधर्वकन्या लावण्यलतिका एका राक्षसानें पळवून आपल्या क्रीडामंदिरांत नेऊन ठेविली. पुढें गालवाच्या आज्ञेवरून ऋतुध्वज हा तरुण राजपुत्र मखरक्षणार्थ चालला असतां त्यानें त्या दुष्ट राक्षसाचा वध केला. तेव्हां ही मन्मथपुतळी ऋतुध्वजाच्या नजरेस पडली. एकमेकांना पाहतांच दोघेहि पंचशरानें विंधून गेली. पण मग पुढें तिनें विचारल्यावरून राजपुत्रानें निजवृत्त सांगतांना आपण नुकताच केलेला राक्षसवधाचा पराक्रम सांगितला. शूरांचे पराक्रमवृत्तांत ही तरुण कामिनींना केवळ मोहिनी आहे. त्यांनीं त्यांचें मन लटपटुन जातें. ऋतुध्वजाचा तो पराक्रम—

श्रवण असें होतां ती हर्षें लाजे मदालसा कन्या।
वदनीं सुस्मित राहे पाहे स्वसखीमुखाकडे धन्या ॥

इतकें झाल्यावर पुढचा प्रकार काय सांगायला पाहिजे! त्या जद्गुरुच्या शिकवणीवरून त्या दोघांचा गांधर्व विवाह झाला. त्या उत्सवप्रसंगीं मदालसेच्या सखीनें आशिर्वाद देऊन म्हटलें—

दोघें चिरकाल तुम्ही सतत सुखें पुत्रपौत्रसह नांदा।
तुमच्या यशासि सज्जन सेवत चकोर ते जसे चांदा ॥

विवाहानंतर तीं दोघें ऋतुध्वजाच्या नगरांत परत आलीं; पुढें कांहीं दिवसांनीं एका कपटी चांडाळानें ऋतुध्वज नगराबाहेर गेला असतां तो मेल्याची खोटी बातमी उठविल्यामुळें ती ऐकून मदालसेनें शोकाच्या भरांत प्राणत्याग केला. ऋतुध्वज परत आला तेव्हां त्याला हें सर्व कपट कळलें; आणि त्यानें आपल्या स्नेह्यांच्या मदतीनें शिवसदनास गेलेली भार्या मदालसा परत आणिली. पुढें त्याला तिजपासून चार पुत्र झाले. पैकीं पहिल्या तिघांस मदालसेनें बाळपणींच ब्रह्मज्ञान पढवून वैराग्यसंपन्न केले. हें ऋतुध्वजाला न आवडून चवथ्या पुत्राच्या जन्माचे वेळीं मदालसेला तसें न करण्याबद्दल आज्ञा केली. ती मानून मदालसेनें या चवथ्या म्हणजे अलर्क नांवाच्या पुत्रास

स्तन पाजितां निजविता हालविनां बालकासि खेळवितां।
दे बोध जो सुदुर्लभ थोरांसि सहस्त्रकल्प मेळवितां॥

आणि तिनें त्यास व्यवहारदक्ष केलें; व पुढें तो राज्यारूढ झाला. अशी ही मार्कंडेय-पुराणांत व्यासांनीं सांगितलेली गोड कथा आहे. हिचें पंतांनीं काढिलेलें शब्दचित्र इतकें सुंदर रंगलें आहे कीं, त्याच्या पुढें रविवर्म्यानें रंगविलेलें ' ऋतुध्वज आणि मदालसेचें ' चित्र अगदीं बोजड वाटतें.

या लहानसहान आख्यानांपेक्षां मोठमोठाल्या ग्रंथांतच पंतांची करामत ज्यास्त दिसून येते. मोठ्या ग्रंथांपैकीं ' कृष्णविजय ' हा प्रथम रचिलेला दिसतो; आणि म्हणूनच याची रचना क्लिष्ट झाली आहे. हा बाबा पाध्ये यांच्या विनंतीवरून रचिला; आणि बाबा पाध्ये म्हणजे संस्कृताभिमानी जाडे पंडित; तेव्हां या प्रस्थाच्या डोळ्यांत भरेल अशा तोलाची शब्दरचना त्यांत दिसेल अशा धोरणानें हा ग्रंथ रचिला असावा. याला पंत 'कृष्णविजय' म्हणतात. पण याच्या प्रशस्त रचने-वरून लोक याला 'बृहद्दशम' म्हणतात. मूळ भागवताप्रमाणेंच याचे ९० अध्याय आहेत. पैकीं पूर्वार्धांत ४९ व उत्तरार्धांत ४१. यांतला पूर्वार्ध आणि उत्तरार्धांतलें पहिले पांच मिळून ५४ अध्याय अवजड

आर्यावृत्तांत आहेत. पण हें वृत्त वाचायाला जड म्हणूनच कीं काय कोण जाणें, यापुढील पंचवीस अध्यायांत पंतांनीं अनेक वृत्तात्मक श्लोक योजिले आहेत; आणि पुढें हेंहि सोडून पंत आपल्या व महाराष्ट्राच्या आवडत्या सुलभ आर्यावृत्तावर म्हणजे गीतीवर येऊन पडले आहेत. याच क्रमानें ग्रंथांत रसाचाहि परिपाक उतरला आहे. पूर्वार्ध केवळ नारिकेलपाक आहे. बाबा पाध्यांनादेखील तो पचायला जरा जडच वाटला. पण याची सगळी उणीव उत्तरार्धाच्या शेवटल्या दहा–अकरा अध्यायांनीं पुरेपूर भरून काढिली आहे. तें म्हणजे कपिला गाईचें दूध आहे. लहानापासून थोरांपर्यंत, सशक्त असो, कीं अशक्त असो, वाटेल त्यानें तें यथेच्छ प्राशन करावें. सर्वांनाच तें सहज मानवेल.

या अकरा अध्यायांत पहिलीच कथा सुदामदेवाची आहे. हा लहानपणचा कृष्णाचा गुरुबंधू. हा अठरा–विश्वे दारिद्र्यांत संसार कंठीत असतां आपल्या बायकोच्या सांगण्यावरून सर्वसंपन्न वैभवशाली मित्राच्या भेटीला निघाला. निघतांना रिक्त हस्तांनीं जाऊं नये म्हणून घरांत काय चार–दोन मुठी पोहे होते ते फाटक्या-तुटक्या वस्त्रांत बांधून त्याला दोन–तीन गांठीं देऊन ते घेऊन निघाला. वाटेंत ‘कोठें दरिद्र हो मी ! कोठें लक्ष्मीनिवास तो स्वामी’ असे विचार मनांत आलेच. पण तसाच तो हळूहळू द्वारकेंत श्रीकृष्णाकडे गेला. तो राजवाड्यांत गेला ‘तेव्हां होता अमलाकमलाशयनीं मुकुंद, तीसहित’ पण दुरून अंगणांत आपला लहानपणचा मित्र आलेला पाहून तो तसाच उठून धांवत पुढें आला.

त्या शुद्धसत्व तनुला भेटे गुरुबंधु ज्यांत तो वार ।
फार प्रिय कर जैसा हंसला मानसाख्य कासार ।।

आणि प्रथम भेटीनंतर थोड्या गोष्टी झाल्यावर तो लबाड

... ... ... चित्तज्ञ प्रभु म्हणे धरादेवा ।
दे वाट पाहिली बहु काय मला आणिला असे मेवा ।।

असें म्हणून मग तो स्वतःच शोधूं लागला.

तों जीर्ण मलिन वस्त्रीं सांपडली श्रीकरांसि गांठोडी ।
जोडी द्रव्याची जसि चुकली कृपणास हे तुला थोडी ॥
'हें काय सख्या' ! ऐसें बोले डोले हळूच मग सोडी ।
गोडी याची मज बहु भेटि उदारा तुला गमे थोडी ॥

असें म्हणून लोकांच्या भवबंधनाची गांठ सोडणारा तो कृष्ण, सुदाम्याच्या बायकोनें बांधिलेली ती पुरचुंडीची गांठ स्वहस्तानें सोडून ते पोहे मिष्टान्नापेक्षांहि अधिक प्रेमानें खाऊं लागला. तें पाहून लक्ष्मीनेंहि थोडे उरले ते खाऊन टाकिले. गुरूच्या घरच्या जुन्या गोष्टी बोलत चालत जुन्या आठवणींचा आनंदानुभव घेत घेत, दिवस निघून गेल्यावर

ब्राह्मण त्या रात्रींत प्रभुनें मणिकनकमंडिता पाटीं ।
बैसविला सन्मानें जेवविला कांचनाचिया ताटीं ॥
स्वकरें साक्षात् लक्ष्मी या भावोजीस आग्रहें वाढी ।
काढी गुरुगोष्टी मुखकर्णयुगांहि तृप्ती दे गाढी ॥

पुढील हकीकत तर महाराष्ट्रांत आबालवृद्धांच्या चांगल्याच परिचयाची आहे आणि ती गोड कथा पंतांनीं आणखी गोडीनें सांगितली आहे.

सुदामाख्यानानंतर एक चाळीस आर्यांचा लहानसा अध्याय टाकिल्यावर; मोरोपंतांच्या काव्योदधींतलें एक अप्रतिम सुंदर रत्न आहे. येथें यदुकुलभार्या कुशल प्रश्नालिंगन करून बसल्या आहेत व एकमेकींजवळ गुजगोष्टी सांगण्याच्या भरांत आल्या असतां द्रौपदी कृष्णसख्यांना म्हणजे आपल्या भावजयांना त्यांच्या लग्नाच्या जुन्या हकीकती विचारीत आहे.

हे वैदर्भि ! स्वमुखें स्वविवाहोत्सवकथा मला सांगे ।
कैसें वरिलें तुजला श्रीकृष्णें दीनवत्सलें आंगें ॥
भामे ! या मेघानें कैसें सौदामिनीस तुज वरिलें ? ।
हे जांबवंति ! त्वत्कर-सरसिज कैसें रमाधवें धरिलें ?।
कालिंदि ! मित्रविंदे ! सत्ये ! भद्रे वदा सदाधारा ।
या राकानाथासी योग कसा पावला तुम्ही तारा ?॥
वद लक्ष्मणें ! स्वयंवरवृत्त मज स्वजनकल्पवृक्षातें ! ।
वरिलें कैसें लतिके ? सति ! केतकवर्णि ! या सद्वृक्षातें ? ॥

तेव्हां नणंदेचा आग्रह पाहून, तेथें असलेल्या सात–अठ जणींनीं आपापलीं पृथक्-पृथक् वृत्तें सांगितलीं. पहिली पट्टराणी रुक्मिणी. तेव्हां पहिली पाळी रुक्मिणीवर आली; आणि पहिल्याप्रथम मोठी दिवाळी तिची झाली. स्वतःच्या स्वयंवराची कथा, मोठेपणीं नणंदेस चारचौघींच्या देखत सांगावयाची; यामुळें लाजत लाजत तिनें सांगितलेल्या या भागाला विशेषच गोडी आली आहे. याचा मुळांत एकच श्लोक आहे. तरी याचे ऐवजीं पंतानीं ९२ आर्या घातल्या आहेत. पण हा विस्तार वाचल्यावर वाचकाला वाटतें कीं, याच्या बदली १९२ कां घातल्या नाहींत ? ९२०० आर्या पंत याच सुरांत लिहिते तरी फार चांगलें झालें असतें. रुक्मिणीनें सुदेव ब्राम्हणाबरोबर कृष्णाला दिलेली पत्रिका जशी

स्वकरें वसंततिलका वृत्तें पत्रांत सात मोजूनी ।
लिहिली होतीं तीं ही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी ।।

तशाच या सगळ्या आर्याला एका झटक्यासरशी लिहितां लिहितां योजून लिहिल्या आहेत. यांत कृष्णाबद्दल झालेली रुक्मिणीच्या मनाची उच्छृंखल वृत्ति,

चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा ।
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ।।

अशी मनाची अवस्था आणि यांतच तिनें दुखःचे भरांत ब्राम्हणास व शेवटीं ईश्वरास लाविलेला बोल, कृष्ण आला किंवा नाहीं, हें पाहाण्याकरितां तिचे तीनतीनदा उंच गच्चीवर जाणें व मन अगदीं निराशेनें उदास झालें होतें

तों प्रियकंठीं आपण पडोन हेही सुखांत गाडावी ।
या भावेचि स्फुरली करि माझी भुजलता कृपा डावी ।।

असा झालेला आनंद व धीर देणारा शकुन, ब्राह्मण आलेला पाहून मनांत न मावणारा आनंद, देवीदर्शनाचे वेळची तिची स्थिति, 'तुज कृष्णचि योग्य होय जामाता' अशी तिनें खुबीनें केलेली देवीची प्रार्थना,

हीं सर्व फारच बहारीचीं उतरलीं आहेत. प्रथम मन सलज्ज होतें. पण आपली ती गोड आठवण सांगण्याच्या भरांत, लज्जेचा शेला जरा दूर सरला, आणि मग रुक्मिणी म्हणाली—

हरि रवि, मी नलिनि, स्त्री कैरविणी, वीर वायसाराती।
आनंदाची वेळा, सांगो तुज साध्वि! काय सारा ती ॥

थोड्यांतच 'माझा मूर्त मनोरथ, तो रथ आला; प्रियास घेऊन' आणि मग रथ जवळ आल्यावर श्रीकृष्णाच्या गळ्यांत घालण्यासाठीं आपली सुमनांची

माळा उंचलितां प्रिय आपणहि रथावरूनियां लवला।
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला ॥

आणि हा उत्सव होऊन रथ हाकटून दूर नेल्यावर इकडे

हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं।
हाकांनीं नभ भरिलें जाय सुरांच्याहि नाद हा कानीं ॥

असे हे सगळे प्रसंग, हीं सगळीं शब्दचित्रें फारच हृदयंगम आहेत. रुक्मिणीनंतर इतरांनींहि आपापल्या विवाहोत्सवकथा सांगितल्या आहेत. त्यांच्या कथांना उत्तरोत्तर कमी-कमी आर्या योजिल्या आहेत. भद्रेची कथा तर अवघीं आठ आर्यांतच संपविली आहे. पण तिच्यांतहि गोडी कांहीं कमी नाहीं. भद्रेनंतर लक्ष्मणेवर पाळी आली; व तिच्या नंतर बाकी राहिलेल्या सर्वजणींतर्फे त्यांपैकीं एकीनेंच थोडक्यांत त्या सगळ्यांची कथा निवेदन केली आहे. ती म्हणते—

द्वारावतींत प्रभुवर आम्हां नवपद्मिनीसि हा मित्र।
एका लग्नीच वरी नाना रूपें धरूनि हें चित्र ॥

हा गोड अध्याय असा संपल्यावर 'सुभद्राहरणा'दि गोड आख्यानें सांगत सांगत आणखीहि सहा-सात अध्याय सांगून हा 'कृष्णविजय' ग्रंथ पुरा केला आहे.

पूर्वार्ध क्लिष्ट झाला आहे, हें खरें; पण त्याच्या उपसंहारांत 'अभय दिधलें आहे, वाहे शुचि प्रतिभा झरा' असें सांगितल्याप्रमाणें उत्तरार्धांत

वाक्सुधेचे झरे खरोखरीच वाहूं लागले आहेत. वर म्हटल्याप्रमाणें अखेरीस तर अमृत आहेच; पण प्रारंभींहि कांहीं कांहीं ठिकाणें सरस आहेत. 'अंबरीष-आख्याना'प्रमाणेंच तीं गोड व ठसकेदार वाटतात. त्यांतच प्रद्युम्नविवाहाची कथा आली आहे. ती इथल्यापेक्षां हरिवंशांत गोड साधली आहे, पण तेथें आर्या आहेत; येथें श्लोक आहेत. यांत कांहीं श्लोक वामनाच्या तोडीचे आहेत. मायावतीनें कृष्णपुत्र प्रद्युम्नाला द्वारकेंत आणिल्यावर कृष्णस्त्रियांना तो ओळखला नाहीं. पण दुष्यंत–भरताचे भेटीप्रमाणेंच जडदेहांची ओळख न पटली तरी सहज क्रियेनें त्यांच्या मनाची स्थिति अगदी उल्हसित होऊन गेली. पंत सांगतात—

वैदर्भि यास पाहे द्रव हृदयि धरि तत्क्षणीं स्तन्य वाहे ।
कीं तें आनंद लाहे जरि तनुज असें ज्ञात होणेंचि आहे ।
बाष्पानें कंठ दाटे सकळ तनुवरी क्षिप्र रोमांच थाटे ।
शोकाचा सिंधु आटे त्वरित परम तद्दर्शनीं लाभ वाटे ॥

आणि मग ती रुक्मिणी—

म्हणे हा कोण श्रीयदुपतिसम श्रीनरमणी ? ।
गमे या पुत्रास प्रसवलि नराची न रमणी ॥
अशा रत्नाची जी खनि जनि तिचा धन्य कुसवा ।
स्वयें याचें वृत्त प्रियसखि पुसा गे न पुसवा ॥

यांत कृष्णचरित्रांतल्या अनेक सुंदर कथा आहेत. कोठें भक्ति, कोठें शौर्य, कोठें क्रोध असे अनेक मनोविकार या कथानुषंगानें रेखाटले आहेत. कृष्णाच्या लीला, त्याचे कलह, त्याचे विनोद हेहि यांत आहेत. हे सर्वांच्या रोजच्या आयुष्यक्रमांतलेच थोडे-फार प्रकार आहेत. यांचा कमीजास्त अनुभव सर्वांनाच आहे—

विनोदरससागरीं रमति मीनसे दंपती ।
असा कलहसांत्वनीं दिवसयामिनी संपती ॥

हा कृष्णविजय ग्रंथ पंतांनीं भागवताच्या दशमस्कंधाच्या आधारानें रचिला. यांत लांब–लांब यमकें, अनुप्रासादि शब्दचमत्कार

वगैरेंच्या नादी लागल्यामुळें व बऱ्याच भागांत वृत्तहि अवजड योजिल्या-मुळें हा परिपाक नीट उतरला नाहीं. याकरितां पंतांनीं पुढील वयांत भागवताच्या दशमस्कंधाच्या आधारें पुन्हां नवी रचना केली.[२] या वेळीं सर्व रचना गोड व सुलभ अशा आर्यागीति वृत्तांत केली असल्यामुळें व कवीचीहि बुद्धि प्रगल्भ होऊन सराव चांगला वाढल्यामुळें ही रचना चांगलीच उतरली आहे. यांत प्रत्येक गीतीच्या आरंभींच्या अक्षरांनीं **'नमो भगवते वासुदेवाय'** हा मंत्र अव्वलपासून अखेरपर्यंत साधिला आहे. या अकरा-अक्षरीं मंत्राचा एक–एक सर असे ११८८ गीतींचे एकशें–आठ सर करून व प्रारंभाला **श्रीमानुरुगायो मुकुंदो जयति** या मत्रांकित द्वादश आर्यांचा गोंडा लावून आणि शेवटीं उपसंहारात्मक श्लोकांची गांठ मारून ही माळ पंतांनीं प्रभुचरणीं अर्पण केली आहे; आणि उपसंहाराच्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें ही 'साष्टशत' मंत्रमण्यांची माळ माधवजीलादेखील इतकी आवडली कीं, ती

श्रीकृष्णें स्वगळां स्वयेंचि धरिली वक्षःस्थळीं शोभली।
वर्णावी बहु काय ! पाहुनि इला श्रीदृष्टी ही लोभली ॥

जी माळ पायांवर वाहिलेली श्रीकृष्णानें स्वतः उचलून गळ्यांत घातली, आणि जी पाहून प्रत्यक्ष रमेलादेखील ती आपल्या गळ्यांत असावी, असा लोभ सुटला, ती तितकी आल्हादकारक व शोभायमान असलीच पाहिजे, यांत संशय नाहीं. आणि ती तशी आहे हेंहि खरें. आपण रचिलेला हा नवा ग्रंथ सर्वांना पसंत पडला हें पाहून व यांत नुसताच दशमस्कंध आला हें बरें न वाटून मोरोपंतांनीं भागवतांतील

---

१. हा ग्रंथ त्या काळींहि पुष्कळ लोकांना आवडला नाहीं असें दिसतें. याचें पंतलिखित पोथींत पूर्वार्धाचे शेवटीं निंदकांसंबंधींचें लिहिलेले पांच श्लोक हे लोकांच्या नापसंतीचें फळ असावें.

२. हा नवीन रचिलेला ग्रंथ संख्येनें पहिल्यापेक्षां लहान आहे. तेव्हां याला नुसता 'दशम' व पहिल्याला ' बृहद्दशम ' असें लोक म्हणूं लागले.

३. या दशमस्कंधावरील रचिलेल्या भागाला पंतांनीं ' भागवतमंत्रमुक्ता-मणिमाला' असें स्वतंत्र नांव दिलें आहे.

याच्या आधींच्या नऊ स्कंधांचा एक व पुढील दोन स्कंधाचा एक असे याला मागें-पुढें आणखी जोड दिले. या दोन्हीं जोडांत पहिल्याप्रमाणेंच **नमो भगवते वासुदेवाय** हा मंत्र अष्टाक्षरांनीं सर्वभर साधिला; आणि या सर्वांमिळून ३३३ मंत्रांच्या तीन माळा करून त्यांत सर्व भागवत पुरें केलें. यांत सर्व मंत्र साधिले असल्यामुळें याला 'मंत्रभागवत' हें नांव कवीनें दिलें आहे. या मंत्रभागवतांत मोरोपंतांची लेखणी अस्खलित चाललेली दिसते. यांत मंत्राच्या अक्षरांचें जरी बंधन आहे तरी, ज्या दामोदराला लहानपणींदेखील दाव्याचें बंधन कांहींच जड झालें नाहीं, त्याच्या या चरित्रगुणवर्णन करणाऱ्या चरित्रकारालाहि त्या बंधनानें फारसें अडविलेलें दिसत नाहीं.[1] प्रारंभींच पंत हे जन्मसिद्ध पुराणिक होते, व काव्यरचनेंत त्यांची ती पुराणिकाची दृष्टि जागृत होती असा जो ध्वनि आम्हीं काढिला आहे, त्याचा प्रत्यय हें मंत्रभागवत व असलेच इतर ग्रंथ निरखून पाहणारांस सहज दिसून येईल.

या ग्रंथांत वेदान्त, ब्रह्मज्ञान, उपदेश वगैरेसारखे प्रसंग जेथें जेथें आले तेथें तेथें पंतांनीं आपली लेखणी अगदीं आटोपती घेतली आहे. परंतु मूळ भागवतांतल्या गोड कथा मात्र पंतांनीं मुळींच सोडिल्या नाहींत. इतकेंच नव्हे तर अशा ठिकाणीं आपल्या लेखणीला चांगली मुभा देऊन पाल्हाळहि केला आहे. चतुर आणि रसिक माळ्यानें सरसकट हातीं येईल तें फूल खुडण्याचा सपाटा न लावतां, ज्याच्या-करितां आपण माळा गुंफणार त्याची वृत्ति मनांत आणून फुलें निवडावीं, त्याप्रमाणेंच पंतानींहि आपल्या श्रोत्यांना व वाचकांना आवडतील अशींच स्थळें निवडून त्यांचें सार काढून त्यांनींच या मंत्रभागवतांतील

१. पण दामोदराची स्वैरगतिदेखील त्या दाव्याला बांधिलेल्या उखळानें, झाडामुळें जशी थोडीशी अडखळली, तशी मंत्रांनीं पंतांच्या काव्यगतिलाहि थोडासा प्रतिबंध केलाच. पंत म्हणतात:--

वानावीं पाताळें सप्त बळि श्री अनंत वानावे ।
परि मंत्रवर्ण अडविति आदरिले गुरु कसे न मानावे ।।

माळा गुंफिल्या आहेत. यामुळें सौरस्य इतकें भरलें आहे कीं, त्यांच्या शोभेनें कोणीहि सहृदय वाचक अगदीं तल्लीन होऊन जाईल; आणि त्याला पंतांप्रमाणेंच कांहींसा अनुभव येईल. मंत्रभागवताच्या रचनेच्या शेवटीं पंतांना वाटलें कीं,

देउनि उत्साह मला श्रीभागवतार्थ वदविला साच ।।
आनंद यापुढें तो तुच्छ ब्रह्मादि पदविलासाचा ।।

हें मंत्रभागवत पूर्ण झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं पंतांची लेखणी पुन्हां एकदां कृष्णचरित्राकडे वळली; व त्यांनीं 'हरिवंश' हा ग्रंथ लिहिला. पण या वेळीं हा ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति त्यांच्या मनानें झाली नसून हरिवंशांत प्रारंभीं पंत म्हणतात—

श्रीपांडुरंगरायें असकृत् प्रेमेंकरूनि सांगावें ।
भगवन्निदेश जाणुनि सुयश यथाबुद्धि मग न कां गावें? ।।

त्याप्रमाणें त्यांच्या यजमानांचे चिरंजीव व श्रीमंत बाजीराव साहेब पेशव्यांचे मेहुणे, पांडुरंगाराव नाईक यांनीं केली. या ग्रंथाचे एकंदर ५४ अध्याय असून याची ग्रंथसंख्या जवळजवळ साडेपांच-हजार आहे. अनेक तऱ्हेचीं आख्यानें व भारतभागवतासारखे उत्कृष्ट ग्रंथ रचण्याचें काम ज्याच्या लेखणीनें मौजेनें केलें, त्याला हा हरिवंश ग्रंथ उत्तम खुलवितां यावा असें साहजिकपणें वाटतें. पण ग्रंथ पाहिला असतां अनुमानावा तसा उत्तमपणा यांत आलेला दिसत नाहीं. यजमानांनीं सांगितलें आणि पुराणिकांनीं लिहिलें, असेंच हें काम झालें आहे. हा ग्रंथ पंतांनीं शके १७०८-चे सुमारास लिहिला असावा. म्हणजे या वेळीं त्यांचे वयाला पंचावन्न वर्षें होऊन गेलीं होतीं. त्यांची बुद्धि चांगली मुरली होती; व ग्रथरचनेचा सरावहि उत्कृष्ट झाला होता.

---

१. मंत्रमयभागवत असें एक प्रकरण पंतांचें आहे. यांत दशम स्कंधाचीच तेवढी कथा असून प्रत्येक आर्येत 'नमो भगवते वासुदेवाय' हीं मंत्राक्षरें आणिलेलीं आहेत. जसें—

संतत नव परमोत्सव भरले नगरींत वसति ते करिती ।
वाद्यें सुस्वर गीतें देवालयगर्व सर्व ही हरिती ।।

यामुळें या साडेपांच-हजार आर्यांच्या ग्रंथांत कांहीं कांहीं उत्तम स्थळें आलींच आहेत. किंबहुना उत्तरार्ध एकंदरीनें बराच चांगला झाला आहे. उतरार्धांतहि तेहतिसावा व त्या पुढले अध्याय सरस उतरले आहेत. तेहतिसाव्यांत एकदा एका महापर्वाचे वेळीं सर्व यादव पिंडारकास गेले व तेथें त्या सर्वांनीं मिळून यथेच्छ जलक्रीडा व गायननृत्योत्सव केला ही कथा आलेली आहे.

... ... ... ...

पिंडारकासि यादव गेले स्नानार्थ सिंधुच्या सर्व ॥
वसुदेव, उग्रसेन, द्वारावतिमाजि राहिले अवना ।
वरकड सर्वहि गेले कीं यात्रोत्सव भजों न दे भवना ॥
प्रभुच्या इच्छामात्रें धरि सिंधु सुगंध अमृतसे तोय ।
जानुप्रमाण कोठें कोठें वक्षःप्रमाण तो होय ॥
बळदेव रेवतीसी मधुरसमुद्रोदकीं करी केली ।
बहुदयितांसी क्रीडा बहुरूपें केशवे बरी केली ॥
जी ती चित्तांत म्हणे, 'मीच बहु श्रीधरास आवडती'।
संसारग्रीष्मपथीं पांथ अतिश्रांत कृष्ण हा, वड ती ॥
कृष्ण जसा स्ववधूंसीं यादव यादवकुमार ही व्रीडा ।
सोडुनि, कृष्णाज्ञेनें करिती मधुरोदकर्णवीं क्रीडा ॥
कोणी स्त्री जळ सिंचि, कोणी मज्जनभयें गळा पडली ।
कोणी 'अबळापांसुनि परिभूति' म्हणे गळां भली जडली ॥
त्या सर्व यादवांसीं क्रीडाया अप्सराहि आठविल्या ।
आल्या प्रभुनें त्या त्या सांत्वुनि त्यां त्यां समीप पाठविल्या ॥
तो सिंधु अप्सरांहीं चपळांहीं मेघ तेंवि शोभविला ।
वृष्णिजन नभीं नाकीं नेला भोगार्थ सर्व लोभविला ॥
वंदूनि रेवतीतें देववधूंनीं करून सलगितें ।
आराधिला सुवाद्यें नृत्यें तो राम पानकल गीतें ॥
प्रभु सत्येसह आला हरिण जसा ये भुलोनि नादानें ।
गाय स्वयेंहि सुस्वर शिवचरितांचीं जयांत आदानें ॥

बळभद्र रेवतिसह सत्येसह कृष्ण लागला गाया ।
कवि हो! सुपथा घृतिचा लागाया शीघ्र लाग लागा या ।।
आला होता यात्रेकरितां नरलोकवीर तो पार्थ ।
गाय सुभद्राकृष्णांसह यश परपापगर्वलोपार्थ ।।
प्रद्युम्न सांब सात्यकि उद्धव अक्रूर हेहि गानाचा ।
करिति प्रसंग सादर कवि हो तैसें तुम्हीहि गा नाचा ।।
प्रभुगानामृत पुष्कळ नारद सज्जन सुराग आलापी ।
मग आपणहि तयांत श्रीहरीहर यश सुराग आला पी ।।
गानरसीं हास्यरस प्रकट करी हा नयज्ञ समयज्ञ ।
वदले श्रीबळकृष्ण प्रभुहि नसे गानयज्ञसम यज्ञ ।।
सर्व स्त्रिया पुरुष ते वाहविले गानहास्यरसपूरें ।
सूरें भवतिमिराच्या प्रभुभक्तिज्ञानदानबहुशूरें ।।
दक्षिण करीं मुनीतें भामेसह धरुनि पार्थ सव्यकरीं ।
टाकी उडी समुद्रीं प्रभु ज्यातें म्हणति साधु भव्य करीं ।।
तों राम रेवतीतें धरुनि करीं सागरीं उडी घाली ।
झाली यादवसंहति तिकडे मग अर्ध हरिकडे आली ।।
जळवाद्यें वाजविति उडविती जळयंत्रहस्त नीरातें ।
गानी भाषागोतें ताडिति सिंचूंत वीर वीरांतें ।।
जरि चंद्र सहस्त्रांहें निर्मळ आकाश एकदां धरिल ।
तरि वृष्णिसुरवधूमुखरम्य जलधिची बरोबरी करिल ।।
नानाविधें सदन्नें मांसें सेविति तसेच आसव तें ।
वासव तेज न साहे अजिताचे जन जनांत वा सवतें ।।
रात्रौ सभेंत बैसुनि सांगे छालिक्य गेय योजाया ।
ज्यातें भजति म्हणति जे 'स्वर्गादि पदार्थ हेय यो जाया' ।।
छालिक्यें अव्यद्भुतगांधर्वें सर्व पाप ताप सरे ।
चंद्रासि चकोराचा, रसिकाचा या रसासि 'आ' पसरे ।।

या यादवांच्या जलक्रीडोत्सवानंतरच्या पुढल्या दोन तीन अध्या-यांतल्या आर्या बऱ्याच चांगल्या उतरल्या आहेत. या सर्वत्र हरि-वंशकथाहारांत त्यांचाच परिमळ विशेष आहे. यांत कृष्णपुत्र

प्रद्युम्नाचें चरित्र आलें आहे. यादवांनीं एक नाटक मंडळी काढून असुरांच्या राजधानींत 'रंभाभिसार' नामक नाटकाचा प्रयोग करून त्यांस वेडावून टाकिलें. वज्रनाभानें हा खेळ आपल्या राणीवशाला दिसावा म्हणून मोत्यांच्या माळांचे केलेले चिकाचे पडदे सोडवून त्याच्या आड स्त्रियांस बसण्यास जागा केली. आणि मग खेळास सुरुवात झाली. हा खेळ पाहून अनेक प्रेक्षकांनीं आंगावरचीं वस्त्रें व दागिनेहि त्या नटांस दिले. व त्यांतलें प्रद्युम्नानें घेतलेलें 'नलकुबेरा'चें सोंग पाहून, राजकन्या प्रभावती ही अगदीं मोहून गेली; आणि तिला त्याचाच चटका लागून राहिला; व अखेर तिनें आपल्या हंसीनामक दासीकरवीं त्या प्रद्युम्नास गुप्तरूपानें आपल्या मंदिरांत बोलावून आणविलें; आणि अशा रीतीनें रात्रीच्या समयीं तिच्या मंदिरांत प्रद्युम्न आला असतां

राजात्मजा सलज्या होवूनि उभी अधोमुखी राहे।
साहे तेज न बाळा मदनानन तिर्यगीक्षणें पाहे ॥

यापुढलें चित्र पंतांनीं फार चेतोहर रंगविलें आहे. पंतांच्या सर्व काव्यांत शृंगाररसाचा रंग या चित्रांत ज्यास्त उडविलेला दिसतो.

वर सांगितलेल्या 'हरिवंश' ग्रंथाची रचना मोरोपंतांनीं शके १७०४ ते ०९ याचे दरम्यान केव्हां तरी केली असावी. म्हणजे वयाची पन्नाशी उलटून गेल्यावर त्यांनीं ही रचना केली असावी. याचे पूर्वींच त्यानीं 'महाभारत' हा ग्रंथ पुरा केला होता. 'महाभारत' किंवा 'आर्याभारत' हा ग्रंथ मोरोपंतांच्या सर्व ग्रंथांत मोठा व फार महत्त्वाचा आहे. याची रचना ते (शके १६९४ ते १७०४) सुमारें दहा वर्षे करीत होते. वयाच्या ४३-पासून ५३-व्या वर्षापर्यंत म्हणजे बुद्धि, मन आणि शरीर पूर्ण दशेस येऊन वृद्धापकाळाला सुरुवात होण्यापूर्वीं[1] लिहिलेला हा ग्रंथ

---

१. भारतरचनाकालचें पंतांचें वयोमान लक्षांत आणून हें लिहिलें आहे. पण पंत स्वतः या वयांतच आपणांस वृद्ध समजत असत. विठोबादादांना [पान ६५७ पहा.]

सर्वांगसुंदर उतरला असून मोरोपंतांच्या कीर्तिमंदिराचा हा मुख्य स्तंभ आहे. हा ग्रंथ रचण्यापूर्वीच पंतांची कीर्ति इतकी पसरली होती व आतां हा ग्रंथ लोकांस इतका पसंत पडला कीं, तो रचण्याचें काम चालू असतांच त्याच्या नकला करून घेण्यासाठीं लोकांच्या उड्या पडत; आणि अजूनहि तोच लोकप्रिय आहे. एखादें कमळ नुकतें उमलूं लागावें व तें पुरें उमललेलेंहि नाहीं तोंच त्यांत भ्रमरांची गर्दी व्हावी, व त्यांतील रसानें ते इतके गुंगून जावे कीं, सायंकाळ झाल्याचें त्यांना भानहि राहूं नये व तेथून बाहेर येऊन दुसऱ्या व्यवसायास लागण्याचें ते विसरूनच जावे, तशांतला प्रकार या ग्रंथपुष्पाचा आणि वाचकांचा झालेला दिसतो. हातांत ज्ञानेश्वरीचें पुस्तक घेतलेल्या महाराष्ट्रसरस्वती देवीच्या चरणांवर अठरा पाकळ्यांचें हें सुंदर कमळ फारच उत्तम शोभतें. तिच्या भव्य मंदिरांत याच्या वासाचा दरवळ इतका पसरून भरून गेला आहे कीं, त्यांत प्रवेश करणाऱ्या कोणाहि मनुष्याचें मन तो प्रसन्न करून टाकतो. आधींच महाभारत हा ग्रंथ जगांतील सर्व ग्रंथांत उत्तम असा आहे; आणि त्याचा हा गोड निष्कर्ष पंतांसारख्या उत्कृष्ट कारागिरानें काढिल्यामुळें त्यांत विशेष गोडी आली आहे. मूळ भारतांतल्या यक्षप्रश्न, कृष्णगीता, भीष्मगीता, वगैरे अनेक नीतिकथांना पंतांनीं अजीबात फांटा देऊन त्यांतील नवलकथा मात्र आर्याभारतांत घेतल्या आहेत. यामुळें हा पंतांचा ग्रंथ कोठेंहि कंटाळवाणा न वाटतां यापासून मनोरंजन होऊन

---

[पान ६५६-वरून.]

पाठविलेल्या एका पत्रांत ते लिहितात, 'शांतिपर्व राजधर्मपर्व प्रारंभ झाला आहे. सांप्रत वर्षाकाळीं बुद्धीस आळस आला आहे; राहिलें, खोकला झाला आहे. आपणही चार दिवस धीर धरावा. वर्षाकाळीं असें बुद्धिमांद्य किंचित् होतें. वृद्धपणीं शक्त्युत्साह उणा पडतो. श्रीज्ञानदेवाचे चरितांचें कितंन झालें. पुढेंहि चालेल...'

या पत्रावरून असेंहि दिसून येतें कीं, पंत एकेच वेळीं एकापेक्षां जास्त ग्रंथरचना करीत असत.

शिवाय व्यवहारी आणि संसारी मनुष्याला उत्तम दाखले व उपदेश पदोपदीं आढळतात. मनुष्यानें दैवावर किंवा देवावर नुसतें अवलंबून न राहतां सतत उद्योग केला पाहिजे, व इष्टकार्यासिद्ध्यर्थ अनेक उपाय योजीत राहिलें पाहिजे, हें यांतलें सार आहे. धर्मासारखा नीतिमान पुरुष केवळ वेळीं अवेळीं नादांत दिलेलें वचन पाळण्यासाठीं आपलें सर्वस्व घालवून बंधुसह संकटांत पडतो आणि तींहि सोसून झाल्यावर त्याचा योग्य भाग त्याला मिळत नाहीं. पांडवांच्यासारख्या सर्वांना मान्य अशांना सर्वांना मान्य असा हक्क आणि तो मिळवून देण्यासाठीं प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णासारखा मध्यस्थी आणि शिष्टाई करणारा वकील; तरीदेखील त्यांना तो प्राप्त होत नाहीं. त्याचेसाठीं त्यांना अठरा अक्षौहिणी मानवी देहांचे बळी द्यावे लागतात, अनेक योद्धे आणि अभिमन्यूसारखीं लहान मुलें रणांगणावर खर्चीं घालावीं लागतात, आणि असेंहि करून केवळ धर्मयुद्धानें न भागतां बऱ्यावाईट युक्त्या योजाव्या लागतात, व शेवटीं कृष्णालाहि आपली प्रतिज्ञा सोडून देणें भाग पडतें; तेव्हां पांडवांचे रास्त हक्क त्यांना मिळतात, हें पाहून मोठें नवल वाटतें. स्वतःच्या कर्तृत्वाशिवाय परमेश्वराचा पाठिंबाहि फुकट वाटतो.

अनुकूळ काळ होतो तेव्हां, बळ बुद्धि तेज यश देतो ।
प्रतिकूळ तोचि होऊनि माघारें दत्त सर्वहि घेतो ॥

हें जरी खरें असलें तरी केव्हांहि यत्न सोडतां कामा नये; हा महाभारतांतला धडा आहे.

नेहमींप्रमाणें याहि ग्रंथांत संभाषणाचे व बोलण्याचे प्रसंग आले म्हणजे पंतांची लेखणी अस्खलित चालूं लागते. याचे मासले अनेक दिसतील. पण त्या सर्वांत कर्णपर्वांतला कर्णशल्याचा संवाद हा तर फारच मासलेवाईक आहे. कर्ण जेव्हां आत्मविक्रमाची वाचाळता करूं लागला तेव्हां—

कर्णा ! उगा, उगा रे ! किति कत्थन ? हें न ऐकवे कानें ।

असें म्हणून शल्यानें निर्भर्त्सनेची सुरुवात केली. व

नरवर अर्जुन कोठें ! पुरुषाधम सूतपूत्र तूं कोठें ?।
वाचाळा ! नाचावे सत्स्तवनीं न स्ववर्णनीं ओठें ॥

असेंहि त्यास सांगितलें. येथपासून या दोघांचीं उत्तरें प्रत्युत्तरें फारच वहारीचीं उतरलीं आहेत. शल्यानें अर्जुनास कृष्णाचें सहाय्य आहे, हें सुचविलें तेव्हां—

दोघांची काय कथा ! जरि कृष्णार्जुन सहस्र येतील ।
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हरूनि घेतील ॥

हेंच उत्तर त्याला कर्णानें दिलें. तसेंच पुढें कर्णरथाचें चाक भुमीनें गिळिलें त्या वेळचीं कृष्ण-कर्णाचीं भाषणेंहि अशींच आहेत. अशीं भाषणें सर्व ग्रंथभर आहेत. या ग्रंथांत चोहोंकडे उपमा व अलंकार हे इतके भरले आहेत कीं, ते पाहतां मन वेडावून जातें. हें सर्व भारत म्हणजे अलंकारांची एक पेटीच, नव्हे प्रदर्शनच मांडिलें आहे, असें दिसतें. त्यांतल्या उपमा तर अत्यंत सरस असून अगदीं नेहमींच्या प्रचारांतल्या अशा आहेत.

उत्तर म्हणे, ' नको गे ! पायां पडतों; बृहन्नडे सोड ।
जोड दिली, दुखवुं नको केवळ पितृकरतळस्थ हा फोड ॥

यांतली किती प्रचारांतली आहे ! भीष्म रणांगणावर पडला त्या वेळची

पक्वार्कबीजसा न क्षितिस शिवे, वरिच राहिला काय ।

ही आर्या किती समर्पक आहे ! रुईचें बीं—मुलांची म्हातारी—ज्यानें

---

१. ज्यांत भीष्मपर्वाचा उल्लेख आहे असें पंतांच्या हातचें एकहि पत्र त्यांच्या वंशजास आढळलें नाहीं. याकरितां व पंतचरित्रांत विठोबादादा ताहराबादकरांचें जें पत्र छापिलें आहे त्याचें हें उत्तर आहे. म्हणन थोड्या मौजेसाठीं मजकूवळील हा पंतांच्या स्वदस्तुरच्या पत्राचा उतारा येथें देतोः—

श्री.

हरिभक्तिपरायण राजश्री विठोबा गोसावी ताहराबादकर, स्वामीचे शेवेसी विद्यार्थी मयूर कृतानेक सा। नमस्कार उपरी येथील कुशल फाल्गुन शुा। ७ सप्तमी जाणोन आपलें कुशल लिहित असावें विशष तुम्ही पत्र

[पान ६६० पहा.]

उडतांना पाहिलें असेल व ज्याला छापील पोथ्यांतलें शरतल्पीं निजलेल्या भीष्माचें चित्र आठवत असेल त्याच्या मनाला या आर्येनें त्या दोहींचीहि आठवण सहज होईल.

पंतांच्या भारतांत सर्व तऱ्हेचे रस आलेले आहेत. पहिल्या रसाची तर शकुंतला, ययाती वगैरेंच्या आख्यानांतून ठिकाणें अनेकच आहेत. पण दुसरा जो वीररस तोहि येथें यथेच्छ भरला आहे. भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य वगैरें पर्वें या रसानें भिजलेलीं आहेत. युद्धाच्या गोष्टी मोठ्या गोड असतात, याचा अनुभव येथें वाटेल त्यानें अनुभवून घ्यावा. करुणरसाचीहि स्थळें कांहीं कमी नाहींत. वस्त्रहरणाचे वेळीं द्रौपदीनें कृष्णाचा 'प्रभुजी ! रक्षा, तुमच्या पायाची मी लहानशी बटिक' असें म्हणून धांवा केला, त्या आर्या सर्वश्रुतच आहेत. तसेंच इकडे अभिमन्यु मारिला गेला होता त्या दिवशीं 'संसप्तक मथुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते' तेव्हां वाटेंत अपशकून होऊं लागले, त्या वेळीं अर्जुन म्हणतो—

कंठ गहिवरें भरला, शिरली हृदयांत केशवा ! धडकी
येतें रडें वृथा कां ? बा ! माझी प्रकृति काय गा ! रडकी ! ॥
अतुळ प्रताप लोकीं ज्या खळबळजळधिवाडवाभाचा
तो कृष्णा ! आज तुजा मज आला कां न आडवा भाचा ? ॥
बोले कृष्णमुखींची वेणु तसा, परम लाढिका वाणी
जो स्पर्शे, शिशुहि, न घें गुरुसंन्निध, पर, मला डिकावाणी ॥
ज्याचा शास्त्रीं, शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज
काय तुम्ही केला हो ! ! आणुनि तो भेटवाचि वत्स मज ॥
तुमच्या भुजशस्त्रांतें धिक् ! हा निःसार हो ! खटाटोप;
शिर ज्या न रक्षवे, तो कार्याचा काय ओखटा टोप ॥

---

[ पान ६५९-वरून ]

पाठविलें तें पावलें. धात्र जाडा......व पेढे बतासे पावले. पुस्तका विशई लिहिले त्यास उद्योगपर्व पाठविले आहे घ्यावे. मावारे सत्वर पाठवावे. भीष्मपर्व पुणियास गेलें आहे. कळावे. हे पुस्तक सत्वरच पाठवावे अथवा आषाढीस याल तेव्हां चिरंजीव आपापासी द्यावें. बहूत काय लिहिणें लोभ करावा हें विनंती पत्रे ५७.

कुंतीस काय सांगूं ? कृष्णेला दाखवूं कसें वदन !
दुष्कर मला सुभद्रासांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन ॥

दुर्दैवानें ज्यांच्या हृदयावर पुत्रमृत्यूचा एखादा तरी घाव पडला असेल, व पुत्रशोकाच्या अत्यंत प्रखर ज्वालेनें ज्यांचें मन होरपळलें असेल त्यांना तर या प्रसंगाच्या ओव्या रडवतीलच; पण इतरांच्याहि डोळ्यांना त्या एकदा तरी पाणी आणितील. हा झाला अर्जुनाचा शोक. पण सुभद्रेची काय अवस्था! मातृहृदय तें, त्याचे शतशः तुकडेच झाले असतील. पंत सांगतात—

मूर्छित पडे सुभद्रा शीघ्र तिला सांवरी कमळपाणी ।
वारा घाली लावी नेत्रांला शीतसें अमळ पाणी ॥

पण हेंहि असो. जिच्या सर्व ऐहिक सुखांचा झरा अभिमन्यु त्या उत्तरेला तो आतां आटून गेल्याचें ऐकून काय झालें असेल याची कल्पनाहि करणें कठीण आहे. रणांगणावर पडलेलें अभिमन्युचें शरीर पाहून उत्तरा—

अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें ।
चिबुक धरुनि बालवित्यें 'लिहिलें ऐसें कसें महापतितें'॥
म्हणत्ये, ' मौन त्यजुनि स्मितपूर्वक एक बोल बोला जी ।
ती कसि निवेल तुमच्या प्रियवागमृतोंच लोला जी ॥
हा जन सखीसमाजीं तुमचा सोडुनि काय पद रमला ! ।
चुकल्यें क्षमा करावी, पसराया उशिर काय पदर मला ॥
नसतां उशी, उशीस्यजन पयःफेनशुभ्र मृदु शयन ।
कसि निज आली ? जरि शिर मदंकीं, पदतळींहि हा शय न ! ॥
नत्रें उघडूनि पहा दासी तुमचीच, हे नव्हे अन्या ।
भलती स्पर्शेल कसो ? मी सत्य विराटनृपतिची कन्या ॥
हा सातवा परिचय मास, पहा गणुनि लोटले साच ।
इतुक्यांत कसें विटलां ? साधु म्हणति, 'सख्य साधुसीं साच ॥
वीरा कोणा पांडव माधव तव हे न नाथ सा मान्य ।
मेलासि असा हि कसा ? सहसाचि जसा अनाथ सामान्य ॥

तुजवांचुनि वांचुनि सुख कैचें ? हा काय भारतार मला ।
ने, हंस मानसीं निजहंसीविण काय भारता ! रमला ? ।।
दायांतें आयांतें म्हणते, मज लाविली बळेंच सवे ।
कां मोडितां तुम्ही च क्षण आतां स्वपति वेगळे नसवे ।।
पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबाव करूनि खोलींत ।
तुमच्याहि असें अंतर पडलें कां गे ? स्त्रियेंत बोलीत '।।

असे हे नमुने किती द्यावे ! असे सर्व रसांचे घोंस या आर्याभारतांत सर्वभर लहडलेले आहेत.

या अशा आर्या पाहून पंतांच्या भारताला भाषांतर कोण आणि कसें म्हणेल ! प्रतिभासंपन्न अशा अनेक कवींप्रमाणेंच भारतांतल्या मूळ कथा पुढें ठेवून त्या आपल्या सुंदर भाषेनें आणि मोहक कल्पनांनीं पंतांनीं सजवून सांगितल्या आहेत. आर्याभारताचीं जशीं पहिलीं तशीं शेवटलीं पर्वेंहि फार चांगलीं उतरलीं आहेत. म्हणजे अव्वलपासून अखेरपर्यंत यांतल्या रसांचे झरे सारखे वाहत राहिले आहेत. गदापर्वांत भीमानें अधर्मैंकरून दुर्योधनाच्या मांडीवर गदेचा घाव घातला आणि दुर्योधन खालीं पडला तेव्हां भोंवताली जमलेल्या मंडळींत श्रीकृष्ण होता, त्याचेकडे पाहून दुर्योधन —

कोपें कृष्णासि म्हणे, 'आइक रे कंसदमादायादा ।
निर्लज ।! कपटा तव हृदया तसि गांठि जसि नदा यादा ।।

पुढें आणखी अनेक दुष्कृत्यें सांगून शेवटीं म्हणाला—

भीष्मासीं कर्णासीं गुरुसीं मजसीं न कपट करितास ।
हरितास क्षितिस न तूं, वाढविसि कुटिलपणेंचि चरितास ।।
भीष्म द्रोण सुदुर्जय परि मेले हे तुज्याचि पापानें ।'
ज्यां प्रबळां जोडावे हात जयंताचियाहि बापानें ।।

यावर त्या कपटी कृष्णानेंहि उत्तर दिलेंच. याला दुर्योधनानें दिलेलें

अखिळाहि भोगिली म्यां पृथ्वी, परमस्तकीं दिला पाय ।
स्वंततर कवण मजहुनि! आतां कर्तव्य राहिलें काय ! ।।

इत्यादि प्रत्युत्तरहि झणझणींत आहे. यापेक्षांहि दुर्योधनानें त्या आसन्न-मरण स्थितींत रणांगणावरून आपल्या आप्तेष्टांस पाठविलेला निरोप फारच सरच आहे.

तातातें मातेतें नमुनि असें सांग संजया बा ! कीं ।
'केलें राज्य अकंटक, पुष्कळ सुख भोगिलें जसें नाकीं ॥
विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं देय पाय जो डावा ।
तो म्यां दिला, अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा ॥
होऊनि पराजित परप्रेष्य न मी जाहलों, न हें थोडें
अरिहृतपदोपजीवन खाजविजें जेंवि आपुलें घोडें ॥
हें बहु बरवें, मजवरि असतां मी श्री कधीं न रागेली ।
देनो लाज तसी हे, त्यागुनिया स्त्री जसी नरा गेली ॥
आमरण पांडवांसी माझा निर्विघ्न चालला दावा ।
दैवें सुपुरुषपुंगव अभिमानभरें असाचि लादावा ॥
सुक्षत्रियांसि जी गति बहुमान्या तीव हे मला घडली ।
तनु मनुपूत घृताहुति मखशिखिकुंडीं तसी रणीं पडली ॥
शस्त्रें विषें वधावा जैसा सुप्त प्रमत्त अनयानें ।
बधिला तसा अधर्मे हा तेजस्वींद्र पांडुतनयानें ॥
या छळवधें परांचें दुर्यश, माझें जगीं सुयश जालें ।
आजन्मसदाचारें यावें तें सुफळ शेवटीं आलें ॥

असो. याप्रमाणें हा सर्वांगसुंदर भारत ग्रंथ शेवटास गेल्यावर

या श्रीव्यासप्रभुला मी वंदुनि भारतेतिहासरस ।
पाजीन तुम्हां श्रोत्यां अमृतरसाहुनि फार हा सरस ॥......

हा प्रारंभीं आदिपर्वाचे वेळीं मनानें योजिलेला संकल्प पुरा झाला, असें पाहून मोरोपंतांस आपण कृतकृत्य झालों असें वाटलें; व त्यांनीं आपल्या जन्मदात्या मातापितरांसहि धन्यवाद दिले.

धन्य श्रीराम पिता धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली ।
आली सत्यवतीची कीं भारतकीर्ती सुतमुखीं आली ॥

या महाभारतासंबंधें एक गोष्ट कोणाच्याहि नजरेस येते ती अशी कीं, यांत मुक्तेश्वरी भारताचा मागमूस कोठेंहि आढळत नाहीं. ज्यांनीं

मुक्तेश्वरानंतरचीं मराठींत झालेलीं भारती पर्वें पाहिलीं असतील त्यांना या गोष्टीचें कौतुक वाटेल; व पंतांची रचना किती स्वतंत्र आहे याची खात्री पटेल. पंतांनीं आपल्या या काव्यांत नव्या कल्पना व नवे अलंकार एकसारखे योजून, हें काव्य उत्तमपणाच्या कोणत्या कमालीपर्यंत नेऊन पोचविलें आहे, हें जरा बारकाईनें यांतील कोणतेंहि पर्व पाहिलें असतां कोणाच्याहि सहज ध्यानांत येईल. या महाभारताच्या गोड रचने-कडे पाहूं लागलें म्हणजे असें वाटतें कीं, मोरोपंतांनीं या आपल्या वाक्-कन्यकेला नानाविध अलंकारांनीं नटवून सजवून आपल्या रसिक वाचकांबरोबर तिचें सालंकृत कन्यादानच करून दिलेलें आहे.

मोरोपंतांना आपल्या भारत ग्रंथांत शब्दचमत्कार करून चित्रविचित्र-पणा आणण्याचा मोह फारसा पडला नाहीं, हें एक वांचकांचें मोठें भाग्यच होय. पण यांतहि पंतांनीं थोडासा अक्षरचमत्कार केलाच आहे. या अठरा पर्वांच्या प्रारंभींच्या आर्यांच्या अद्याक्षरांनीं त्यांनीं '**श्रीपांडवस-हायो भगवानरविंदाक्षो जयति**' हा अठरा अक्षरांचा मंत्र साधिला आहे; व जेथें–जेथें एकाच पर्वांतरगत दुसरीं पोटपर्वें आलीं तेथें त्या मुख्य पर्वाचेंच आद्याक्षर पुन्हां पुन्हां या पोटपर्वांच्या प्रारंभीं योजिलें आहे. या थोड्याशा 'चित्रचमत्कारामुळें' देखील कांहीं पर्वांच्या आरंभीच्या आर्येंत क्लिष्टपणाचा व रसहानीचा शिंतोडा उडाला आहे. याशिवाय आणखीहि एक चमत्कार नजरेस येतो. हा कोणीहि दाखविला नाहीं. म्हणून अगदीं क्षुल्लक, तरीहि येथें सांगतों. पंतांच्या महाभारताचीं एकंदर पद्यसंख्या १७१३६ येते. (पराडकर महाभारत भाग ३ पहा) यांतील आंकड्यांची बेरीज १८ येते. आतां १८ या आंकडयाला महाभारतांत विशेष मान आहे हें आपणास ठाऊकच आहे. महाभारतांतील पर्वसंख्या १८ आहे. यांतील भगवद्गीतेचे अध्यायहि १८ आहेत. यांत ज्या युद्धाचें वर्णन आहे तें युद्ध १८-च दिवस चालूं होतें. युद्धांत हजर असणाऱ्या सैन्याच्या अक्षौहिणींची बेरीज (७+११=१८) १८-च येते.

मोरोपंतांनीं निरनिराळीं एकशें-आठ रामायणें रचिलीं, ही दंतकथा आज फार दिवस प्रचलित आहे, व हिला पंताच्या हातच्या लेखाचा आधारहि आहे. या संख्येपैकीं सुमारें नव्वद रामायणें आज प्रत्यक्ष आपणांपुढें आहेत. तसेंच भारत, भागवत, हरिवंश आणि अवतारमाला या ग्रंथांतून आलेलीं रामचरित्रें-पंतांच्या इच्छेप्रमाणेंच-यांत गणिली असतां ही संख्या ९४ होते. याशिवाय आणखी दहाबारा आपणांस नुसत्या नांवानें हल्लींहि माहीत आहेत. हीं जमेस धरिलीं असतां बेरीज १०६ होते. म्हणजे १०८ पैकीं सुमारें १०६ रामायणांचा आपणांस सप्रमाण छडा मिळतो. बाकीं उरलेलीं दोन रामायणें खास रचिलीं असतील, असें मानून पंतानीं आपल्या मनोरथाप्रमाणें १०८ संख्या पुरी केली असेल याविषयीं शंका राहत नाहीं. ही रामायणांची सोमवती पुरी करण्याची 'लहर' कां व केव्हां आली, हें माहीत नाहीं. त्यांच्या वंशजांकडील या रामायणांवर रचनाकाल दिलेला नाहीं. यामुळें यांचा अनुक्रम कसा असावा, हेंहि ठरविण्यास चांगलेसें साधन नाहीं. या बाबतींत इतकें मात्र म्हणतां येतें कीं, मंत्ररामायण रचिल्यानंतर पुष्कळ दिवसांनीं ही कल्पना पंतांना सुचली; व ते या यत्नास लागून त्यांनीं ही सोमवती पुरी करण्याचा उद्योग झपाट्यानें चालविला.

पंतांनीं हीं रामायणें शके १७०८-९-चे सुमाराम रचिलीं असावींत असा समज आहे. म्हणजे या वेळीं पंत जवळजवळ साठीच्या वरांत गेले होते. यापूर्वी सुमारें पंधरा वर्षें पंतांनीं 'मंत्ररामायण' रचून पुरें केलें होतें. यांत 'श्रीकारापासुनियां मकारपर्यंत वर्ण जे तेरा' ते प्रत्येक आर्येंत एकएक वर्ण याप्रमाणें योजून **'श्रीराम जयराम जयजयराम'** हा मंत्र साधिला आहे. पहिल्या कांडांत हे वर्ण आर्येच्या अद्याक्षरांत म्हणजे प्रारंभींच योजिले आहेत; आणि पुढें दुसऱ्या म्हणजे अयोध्याकांडांत

---

१. "भारतांतील सुद्धां लहान मोठी यादी पाठवावी. अष्टोत्तर संख्या झाली पाहिजे."

(मोरोपंतांचें मैराळ बुवांस पत्र)

आर्येच्या प्रथम दली तो दुसरा मंत्रवर्ण समजावा ।
दुसऱ्या कांडापासुनि षट्कांडीं हाचि मार्ग उमजावा ।।

असें पंत सांगतात. याशिवाय—

शिशुकांडाच्या अंतीं सप्तार्यायुक्त एक मंत्र असे ।
एक अयोध्याकांडीं एका आर्येत पूर्ण मंत्र वसे ।।

अशी योजना केली आहे. या रामायणांत उत्तरकांडांत सातव्या अक्षरांनीं 'श्रीराम जयराम जयजयराम' हा मंत्र साधून पहिल्या तीसपसतीस आर्यांत रामरक्षेंतले चार श्लोक–प्रायः एकेक आर्येंत एक एक शब्द–याप्रमाणें गुंफिले आहेत. यापुढें ३४ ते ५० पर्यंतच्या आर्यांत 'राम राम हरे राम राम राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे' या मंत्राचीं अक्षरें आणिलीं आहेत; व कांहीं भगवन्नामेंहि साधिलीं आहेत. इतके चित्रचमत्कार या मंत्ररामायणांत आणिले आहेत. पंतांच्या सर्व रामायणांत हेंच जरा मोठें व सरस आहे. यांत पंतांचा आवडता मंत्र १४६ वेळां साधला आहे व याची एकंदर पद्यसंख्या १९१३ आहे.

विंध्य तसा निजला तो वदनदरीमाजि निबिड अंधार ।
फार भयंकर भासे पाताळाचेंचि काय तें दार ।।

ही लहान मुलांची आवडती आर्या यांतील युद्धकांडांत आली आहे. पंतांचें हें सगळेंच युद्धकांड फार रसभरित झालें आहे. यांत त्यांच्या बुद्धिवैभवाची आणि भाषाप्रभुत्वाची ओळख चांगली पटते. पंतांना स्वतःलादेखील हा ग्रंथ चांगला आवडला. पण 'गीर्वाणशब्द पुष्कळ जनपदभाषाचि देखतां थोडी' अशी याची रचना झाली असें त्यांस दिसून आलें, याचा दोष चित्रचमत्कारामुळेंच पत्करावा लागला. याच प्रमाणें मंत्र साधिलेलें असें एक संस्कृत मंत्ररामायण आहे. याशिवाय हाच मंत्र असाच कांडोकांडीं चढत्या अक्षरांत साधिलेला अशीं आणखीं पांच रामायणें आहेत. 'मंत्रगर्भरामायण', 'रम्यमंत्ररामायण', 'मंत्रिरामायण', 'सप्तमंत्ररामायण' आणि 'बालमंत्ररामायण'; यांपैकीं पहिल्याचें

साकी, दुसऱ्याचें शार्दूलविक्रीडित आणि तिसऱ्याचें व चौथ्याच अनुष्टुभ् वृत्त असून या चोहोंत प्रत्येक कांड तेरा-तेरा पद्यांत आणिलें आहे. बालमंत्ररामायणांत प्रत्येक कांडात ३९ आर्या व तीन मंत्र असून याचें वृत्त रामायणाप्रमाणेंच आर्यागीति हें आहे. अशीं चढत्या अक्षरांत मंत्र साधणारीं सात रामायणें झालीं.

आतां प्रत्येक पद्यांत सबंध तेरा वर्ण ज्यांत साधिले आहेत अशी तीन रामायणें आहेत. 'त्रि:सप्तमंत्रमयरामायण', 'सत्स्वरामायण' व 'मंत्ररामायण'. यांपैकीं पहिलीं दोन शार्दूलविक्रीडितांत व तिसरें आर्यावृत्तांत आहे. यांपैकीं दुसऱ्याला 'द्विसप्तरामायण' म्हटलें असतें तर ज्यास्त बरें होतें.

आर्येच्या प्रथम चरणाच्या प्रारंभीं "रा" दुसऱ्या चरणाच्या प्रारंभीं "म" अशीं अक्षरें साधिलेलें असें 'नामांकरामायण' आहे. याप्रमाणें हीं अकरा रामायणें पद्यांत 'रामनाम' किंवा 'राममंत्र' साधून रचिलीं आहेत.

नामांकरामायणाप्रमाणेंच 'उमा' रामायण आहे. यासारखींच 'गंगा', 'काशी', 'प्रयाग' व 'शिव' हीं चार रामायणें आहेत. पण या चोहोंत ते ते वर्ण आर्येच्या चरणारंभीं नसून आर्येंत कोठें तरी आणिले आहेत. याप्रमाणेंच 'ऋषि', 'राज' व 'सन्नामगर्भ', अशीं तीन रामायणें आहेत. यांत अनुक्रमें पुराणांतल्या ऋषींचीं, राजांचीं व प्राचीन आणि अर्वाचीन साधुसंताच्या नांवांचीं अक्षरें पद्यागणिक साधिलीं आहेत. यांतील सन्नामगर्भ रामायणांतून एक आर्या देतों.

गोदावरीतटीं प्रभु उटज करुनियां वसोनि चिर धन्या।
पंचवटी करि, हर्षे बहु माहेरीं तसी धराकन्या ॥

याप्रमाणें हीं अठरा रामायणें झालीं. यांतील सर्व चमत्कार प्रथम

---

१. यांत शेवटील तीन आर्यांत अशाच खुबीनें 'पंढरपुरवासी हरिकथा-वणरसिक मयूर' अशी पंतांनीं सही घातली आहे.

रचिलेल्या मंत्ररामायणांत आलेलेच होते. पण यापुढलें ' चित्ररामायण ' या सर्वांपेक्षा निराळ्या धाटणीचें आहे. याला एक रामायण म्हणण्यापेक्षां दहा रामायणें म्हणणें आणि तितकींच तीं मोजणें योग्य आहे. हीं ' विष्णुसहस्रनाम रामायणें ' होत. या सहस्र नामांपैकीं शंभर शंभर नामें एकेका रामायणांत आणून दहा वेळां रामकथा गाऊन हीं दहा रामायणें पुरीं केलीं आहेत. पूर्वीप्रमाणेंच यांतहि ' विश्वं विष्णुर्वषट्कारो भूत भव्य भवत् प्रभुः ' इत्यादि नांवांतलीं अक्षरें पद्यांत आणिलीं आहेतच. पण पुष्कळ ठिकाणीं कथानकाच्या संदर्भाला जुळतील अशीं हीं नांवें किंवा हे शब्द ' सार्थ ' योजिले आहेत, हें यांत विशेष आहे. या कसरतीला शब्दभांडार आणि बुद्धिमत्ताहि विशेषच श्रेष्ठ असावी लागेल, हें उघड आहे. पुढील दोन आर्यांत **' सर्वतोमुख '**, **' सुलभ '** आणि **' सुव्रत '** हीं तीन नांवें आलीं आहेत.

हरि ताप **सर्व तो मुख** दावुनि बहु गायिला पुरजनांहीं ।
कोणाचें अनळंकृत गृह ? कोठें वाजला मुरज नाहीं ?
दुर्लभहि **सुलभ** झाला जय **सुव्रत** पुत्र राम या कांत ।
युवराज करूं पाहे करि कैकेयी कुबुद्धि आकांत ॥

विष्णुसहस्रनामाप्रमाणेंच ' श्रीकंठो वरदः शर्वः ' इत्यादि १०८ शंकराचीं नांवेंहि वरप्रमाणेंच योजून एक १०८ आर्यांचें रामायण रचिलें आहे. याला ' द्वितीय शिवरामायण ' म्हणतात.

या चित्ररामायणांप्रमाणेंच एक ' मात्रारामायण ' आहे. यांत अ-पासून ज्ञ-पर्यंत बहुतेक अक्षरें किंवा मात्रा, क्रमानें आर्यारंभीं साधिल्या आहेत. याच्या ४६ आर्या आहेत. म्हणजे सहा अक्षरें कमी आहेत. म्हणजे बावन मातृकांपैकीं सहा मात्रांची पंतांना हजिरी घेतां आली नाहीं. या चुकार सहा मात्रा **ॠ**, **ऌ**, **ॡ**, **ङ**, **ञ**, आणि **ळ** या होता. ज्यांच्या प्रारंभीं हीं अक्षरें आहेत असे शब्द मराठींत नाहींत, हें सहज लक्षांत येईल. वास्तविक पहातां प्रारंभी ण आहे असाहि शब्द मराठींत नाहीं. पण

'ण पुढें मागें रा ज्या तो राय कपीश भेटला वानी ।
असा चरण योजून पंतांनीं वेळ मारून नेली आहे.[1]

याशिवाय 'लघूरामायण', 'दिव्यरामायण', 'सौम्यरामायण' या तीन रामायणांत लघु व दीर्घ वर्ण योजून तीं बनविलेलीं आहेत. आणि कविप्रिय रामायणांत २, ७ व ९ हीं अक्षरें पद्यांतल्या प्रत्येक ओळींत एकच आणिलीं आहेत. ज्यांत कांहीं विशेष प्रकारानें वर्ण साधून चमत्कार केला आहे अशीं एकंदर चवतीस रामायणें झालीं. 'दाम' रामायणाची गणनाहि यांतच केली पाहिजे. यांत प्रत्येक आर्यार्धाच्या शेवटील दोनचार अक्षरें पुढल्या आर्यार्धाच्या प्रारंभीं आणिलीं आहेत. म्हणजे यांतल्या आर्या एकमेकींत गुंतवून, सायंकाळोच्या किंवा गुलबाशीच्या फुलांचा मुली देवाला वाहण्याला हार करतात त्याप्रमाणेंच या रामायणांतील सर्व (९०) आर्यांचा एक हारच गुंफवून तो श्रीरामचरणांवर वाहिला आहे. यांत शेवटल्या आर्येचीं शेवटलीं दोनतीन अक्षरें पहिल्या आर्येतल्या प्रारंभींच्याच सारखीं आणिलीं असतीं म्हणजे आणखी थोडी गंमत झाली असती व हार पुरा झाला असता. हल्लींहि या रामायणांतला पहिला शब्द 'श्रीपति' हा व शेवटला शब्द 'राम' हीं दोन्हीं श्री विष्णूचींच नांवें असल्यामुळें एक तऱ्हेचा दुवा होऊन हा हार झालाच आहे. याप्रमाणें हीं पसतीस रामायणें झालीं. या सर्वांत वर प्रमाणें अक्षरचमत्कार केले आहेत. अष्टोत्तरशतापैकीं कांहीं रामायणांत कवींनीं शब्दचमत्कृतिहि केली आहे 'परंतु'–रामायण, 'धन्य'–रामायण, 'हुं'–रामायणें हीं रामायणें या प्रकारचीं आहेत. या तिन्ही रामायणात ते ते

---

१. पंतांच्या वंशजांनीं अस्सलबरहुकूम छापिलेल्या पुस्तकांत हा चरण 'ण पुढें मागें ना' इ. असा छापिला आहे. टीपेंत या कोटीचा अर्थ लागत नाहीं असें म्हटलें आहे. या 'ण' प्रमाणेच नळ, नीळ या वानरनामांपैकीं एखाद्याचा असाच उपयोग करून घेऊन 'ळ' या चुकारतट्टूला पंतांनीं आपल्या दावणींत कां बांधिलें नाहीं, हें कळत नाहीं.

२. मोरोपंतांच्या वंशजांनीं प्रसिद्ध केलेल्या रामायणाच्या प्रस्तावनेंत

[पान ६७० पहा.]

प्रत्येक शब्द सार्थ योजिलेले आहेत. 'परंतु'–रामायणांत 'परंतु' शब्दानें विरोध, 'धन्य'–रामायणांत 'धन्य' शब्दानें कोणाला तरी धन्यवाद, व 'हुं'–रामायणांत 'हुं' शब्दानें हु–कार दर्शविला आहे. याशिवाय चमत्कृति केलेली ज्यांत आढळते असें आणखी एक रामायण आहे. तें 'निरोष्ठ' रामायण होय. याची रचना निरंजनमाधवाच्या निरोष्ठ-रामायणाप्रमाणेंच 'पवर्ग' सोडून केली आहे. म्हणजे ज्यांत चित्रविचित्र रचना आढळते अशीं हीं चाळीस रामायणें झालीं. बाकीं राहिलेलीं बहुतेक सर्व इतर काव्याप्रमाणेंच सरळ रचनेचीं आहेत. यांत 'हनुमान', 'गुरु', 'सीता', हीं रामायणें निरूपणात्मक आहेत. म्हणजे यांत कवीनें रामकथा स्वतः न सांगतां सीता, हनुमान वगैरे निराळ्या पात्रांच्या तोंडून, सांगविल्या आहेत. हनुमंताने आपल्या आईस मोठ्या गौरवानें सांगितलेली श्रीरामकथा 'हनुमंतरामायणांत' आली आहे. निरूपणात्मक अशा तिन्हीं रामायणांत हेंच सरस उतरलें आहे. याच्या खालोखाल 'गुरु-रामायण' उतरलें आहे. राज्याभिषेकानंतर सर्व मंडळी जमली असतां एके ठिकाणीं बसून अधून-मधून निरनिराळ्या व्यक्तींनीं निरनिराळ्या विशिष्ट प्रसंगाच्या हकीकती सांगितल्या त्यांचें बनविलेलें तें गुरुरामायण. यांत साधारण माणसाप्रमाणें प्रत्येकानें आपण आपलीच बहादुरी सांगत सुटावें असें न करतां प्रत्येकानें स्वतःकडे लघुत्व घेऊन व इतरांस मोठेपणा देऊन या हकीकती सांगितल्या आहेत. सीतारामायण हें सीतेनें 'स्वसा जावा' भेटल्या नंतर —

---

[ पान ६६९-वरून. ]

'हुं'रामायणाविषयीं असें लिहिलें आहे कीं, "'हुं' या नांवासंबंधानें आम्हांला असें वाटतें कीं पंतांनीं 'सु' नामक जीं दोन रामाणणें रचिलीं आहेत, त्यांपैकीं एखाद्याच्या बाबतींत झालेला हा श्रवणभ्रम किंवा अक्षरभ्रम असावा." पण हें असें नाहीं हें मला खात्रीलायक ठाऊक आहे. हें रामायण एका गृहस्थाजवळ होतें; व त्यानें त्यांतून कांहीं आर्या मला शके १८२१।२२ मध्यें म्हणून दाखविल्या होत्या. यांत प्रत्येक आर्येंत हुंकारदर्शक 'हुं' हा शब्द योजिलेला आहे. नीट शोध केला असतां हें रामायण सांपडेल, असें मला वाटतें.

पडुनि गळां गहिंवरल्या सीतेच्या कन्यका तशा गमल्या।
श्रमल्या विरहें श्रीनें भेटुनि कुरवाळितां करे शमल्या ॥

त्या वेळीं त्यांच्या विनवणीवरून सांगितलेले आहे. यांत—

आलिंगुनि कुरवाळुनि हुंगुनि शिर पुसुनि लोचनें पदरें।

सीता रामचंद्राबरोबर वनवासास निघाल्यावेळेपासून परत येई-पर्यंतच्या चवदा वर्षांतलें सीतेनें सांगितलेलें आत्मवृत्त आहे. कल्पिलेल्या प्रसंगांवरून हें जितकें सरस असावें अशी अपेक्षा होते, तितकें तें सरस नाहीं. यांत रावणाकडे लंकेंत असतां सीतेस 'एका काळीं रात्रींचे समयीं 'प्रत्यक्ष दुर्जनाशीं बोलावयाचा प्रसंग पडला' तेव्हांची हकीकत व त्या वेळचें सीतेचे शब्द कोपानें आणि दर्पानें दरवळलेले असतील व ही अपमानापेक्षां मृत्यूला तयार झालेली जळजळीत ज्वाला भडकलेली तेथें दिसेल, असें सहज मनांत येतें. पण हा प्रसंग तसा उतरला नाहीं. मुक्तेश्वराच्या द्रौपदीच्या चित्रा-पुढें तर हें चित्र कांहींतरी खरडलेल्या रेघोट्याप्रमाणें दिसतें. यांत अनेक वृत्तें योजूनहि रसाचा परिपाक बनावा, तसा बनला नाही. बाकी हें असें पुष्कळच रामायणांत झालें आहे. संख्यापूर्तीसाठीं खोगिरभरतीची मंडळी या अष्टोत्तरचमूंत कितीतरी आढळते. या निरूपणात्मक रामायणांत मंदोदरी किंवा शत्रुपक्षांकडील कोणा एखाद्याचें रामायण असतें तर जरा मौज झाली असती. शत्रुपक्षांकडील लोकांच्या डोळ्याला अनेक गोष्टी कशा दिसल्या; चांगलीं कृत्येंहि शत्रु कशी पाहतात व कशीं सांगतात, हा नित्य व्यवहारांतला अनुभव त्यांत चांगला दिसला असता.

वर सांगितलेल्या या रामायणांखेरीज बाकी राहिलेल्या रामायणांत शब्दचमत्कार असा कांहीं नाहीं. त्यांची गणना चित्रकाव्यांत न होता सरळ काव्यांतच होईल. यांत कवीनें वैतालिक, रथोद्धता, सारंग, नर्दटक, पज्झटिका, तन्वी वगैरे अनेक नवीं नवीं संस्कृत वृत्तें योजून दोहा, दोहासोरठा, हरिगीतिका इत्यादि हिंदी साहित्यांतील

वृत्तेंहि मराठी वाचकांस दाखविलीं आहेत. एकट्या 'सार-रामायणांत'च इतकीं नवीन वृत्तें आलीं आहेत कीं, तितकीं नवीं वृत्तें कोणाहि कवीनें यापूर्वी किंवा यानंतर मराठींत आपल्या काव्यांत योजिलेलीं दिसत नाहींत; आणि सार-रामायण हें सबंद नसून फक्त पहिल्या दोन कांडापर्यंतच रचिलेलें आहे. याप्रमाणें 'त्रुटित रामायण' हेंहि अर्धवटच राहिलेलें आहे. याचा नामकरणविधिदेखील झालेला आठवत नाहीं. यांतील कांहीं श्लोक जसेच्या तसेच सार-रामायणांत घेतलेले आहेत. मोरोपंतांनीं रचलेलीं हीं एकशें आठ रामायणें मनांत आणिलीं म्हणजे त्यांच्या भाषाप्रभुत्वानें मन थक्क होऊन जातें; व त्यांच्या कमावलेल्या बुद्धीच्या लवचीकपणाबद्दल मोठा अभिमान वाटतो. यांच्या या नानाविध रचना पाहिल्या म्हणजे आरबी भाषेंतील सुरस गोष्टींतल्या रत्नभांडाराची आठवण येते. हिऱ्यांची खोली म्हटली, म्हणजे चोहोंकडे हिऱ्यांचा लकलकाट; ती टाकून माणकांच्या खोलींत गेलें म्हणजे सर्वभर माणकेंच माणकें; पाचांची खोली पाहिलीं कीं खालीं, वर, बाजूला सगळीकडे हिरवागार देखावा; मोत्यांच्या दालनांत गेलें म्हणजे चोहोंकडे तींच; असा यांच्या रचनेचा थाट पाहून डोळे दिपून जातात व मनाला मोठें कौतुक वाटतें.

पण कोणाच्या मतें हीं रामायणें रचिण्यांत मोरोपंतांनीं काळाचा व बुद्धीचा व्यय चांगला केला नाहीं. तीच ती रामकथा पुन्हां पुन्हां सांगण्यांत एवढें सामर्थ्य व इतकी बुद्धिमत्ता खर्च झाली यापेक्षां ही अत्यंत प्रेमळ कथा आदिकवि वाल्मीकि याच्या ग्रंथाबरहुकूम एकच वेळ विस्तृतपणें सांगण्यांत आली असती तर ती महाराष्ट्राला फार उपयोगी पडली असती, किंवा निदान भारताप्रमाणें वाल्मीकि ग्रंथाचा 'नवनीत मेला' आपल्या कल्पनांनीं सजवून महाराष्ट्र-वाचकांस पंतांनीं वाढिला असता तर तो त्यांच्या जिभेला खास गोड लागला असता. लोकांच्या या म्हणण्यावर पंतकाव्यभक्तांचें म्हणणें असें पडतें कीं,

पंतांनीं अनेक काव्यें रचिल्यानंतर आपल्या आवडत्या दैवताचें चरित्र अनेक तऱ्हांनीं गाइलें व तें गातांना थोडी-फार कसरत केली तर त्यांत गैर तें काय झालें! कांहींचें असेंहि म्हणणें पडतें कीं, "ही कसरत साधण्यास आमच्या कवीचे श्रम म्हणजे हत्तीस आपल्या शुंडा-दंडावर पुष्पमाला खेळविण्याचे जितके श्रम तितकेच बहुधा होत; व आणखी असे कीं, या सर्वच रामायणांमध्यें सरळपणा व प्रेमभाव उघड आहे. यांतलें एखहि रामायण त्यांनीं कोणाच्या सांगण्यावरून रचिलें नाहीं. तसेंच रामप्रभूच्या प्रसादाशिवाय आपल्याला कोणा मर्त्याकडून वाहवा मिळवावयाची अशीहि पंतांची यत्किंचित् कल्पना होती, असें वाटत नाहीं." पंतभक्तांचें हें म्हणणें एक तऱ्हेनें थोडेसें खरें असेल पण दुसऱ्या पक्षाच्या तक्रारींत अगदींच अर्थ नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. कारण हीं रामायणें पाहून एक प्रकारचा अभिमान वाटतो आणि हीं रचणाऱ्या या कवीच्या सामर्थ्याविषयीं एक तऱ्हचे कौतुक वाटतें, हें खरें आहे. पण हेंहि आणखी खरें आहे कीं, चांगल्या मल्लाची कसरत पाहून मनाला ज्या प्रकारचा आनंद वाटतो त्याच प्रकारचा आनंद रामकथेचीं हीं अष्टोत्तरशत रूपें पाहून वाटतो. पण दोहोंपासून होणारा आनंद केवळ तात्पुरताच असतो. मल्लाच्या त्या कर्तबगारीचा एकंदर जसा राष्ट्राला तसा कवीच्या या कर्तबगारीचा एकंदर भाषेला उपयोग जितक्यास तितकाच होतो. त्याचप्रमाणें हीं रचण्यांत मर्त्यांची वाहवा मिळविणें हा पंतांचा मुळींच उद्देश नव्हता व हीं रचण्याला हत्तीला फुलांची माळ झेलण्याला लागणाऱ्या श्रमाइतकेच श्रम त्यांना लागले, या दोन्हीं विधानांत कांहीं हशील नाहीं. पहिलें तर उघड-उघड चुकीचें आहे हें कोणालाहि दिसेल; व दुसरेंहि खरें नाहीं, हें थोड्या विचाराअंतीं सहज कळेल. आधीं ही संख्या जमविण्यासाठींच आपल्य इष्टमित्रांकडून 'भारतांतीलसुद्धां लहानमोठी याद' 'अष्टोत्तर संख्या जाहली पाहिजे' यानिमित्त मागविणें भाग पडलें. या रामायणांना नांवें देण्यांतदेखील सरळपणा किंवा साहजिकपणा राहिला नाहीं. कांहीं नांवें

तर अगदींच डोकें खाजवून शोधून काढिल्यासारखीं वाटतात; आणि इतकेंहि करून शेवटीं 'शिव', 'सु' वगैरेंना प्रथम, द्वितीय असे क्रमांक देणें भाग पडलें. कांहीं नांवें तर इतकीं विचित्र आहेत कीं, त्यांवरून आंतील मजकुराचा यत्किंचितहि बोध होत नाहीं. या रामायणांची पद्यसंख्या मनांत आणिली असतांहि हीं इतक्या लीलेनें सहज रचिलीं गेलीं असतील असें वाटत नाहीं. एकच पद्याचें एकश्लोकी रामायण जरी सोडून दिलें तरी ज्यांची पद्यसंख्या पुरी शंभरहि नाहीं अशीं उपलब्ध अशा ८७ रामायणांत ५३ रामायणें आहेत. शंभर (१००) पासून सव्वाशें (१२५) पर्यंत पाहिलीं तर आणखी चवदा–पंधरा आंत येतात. यावरून ही रचना सहज लीलेनें खास साधली गेली नाहीं. कोणतेंहि कारणानें कां होईना, पण 'साररामायणा' सारख्या एक-दोन प्रकाऱ्च्या रामायणांची रचना तरी कवीनें अर्धवटच सोडून दिलेली दिसते.

याशिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, ज्यांत कोणत्याहि प्रकारची चित्र-रचना नाहीं अशीं पूर्ण रामायणें घेतलीं तर त्यांत दोनशेंपेक्षां ज्यास्त पद्यांचें असें 'रामायण–पंचशती' हें ५०५ पद्यांचें एकच रामायण आहे. ही बाब लक्षांत घेतली असतां पंतानीं एक मोठें रामायण रचावयास पाहिजे होतें, असें म्हणणारांची तक्रार अगदींच विचित्र वाटणार नाहीं. ज्यांनीं १७००० पेक्षां ज्यास्त पद्यसंख्येचा 'भारत' ग्रंथ लिहिला, ज्यांनीं साडेपांचहजार ग्रंथसंख्येचा 'हरिवंश' रचिला, 'कृष्णविजय' ज्यांनीं ३६०० पद्यांनीं गाइला त्यांनीं रामायणाच्या बाबींत इतका हात आखडता धरावा, हें जरा निराशाजनक असें कोणासहि वाटेल. मंत्ररामायणाचीहि संख्या दोन–हजारांचे आंतच आहे. आपल्या अत्यंत आवडत्यां दैवताचें चरित्र गातांना केलेला हा कंजूष-पणा पाहून कोणीहि वाचक पंतांशीं प्रेमानें भांडण करील व त्यांच्यावर कौतुकानें रागावेल. मग तो पंतभक्त असो कीं साधा काव्यभक्त असो.

भारत, भागवत, रामायण वगैरे ग्रंथांची रचना झाल्यावर पंतांनीं काशीयात्रेस जाण्याचा बेत केला; व शके १७१०–मध्यें ते अमरसिंह

जाधवाबरोबर काशीयात्रेस गेले. जवळ-जवळ दोन वर्षें त्यांना या यात्रेस लागलीं. काशी, प्रयाग व गया ह्या त्रिस्थळी यात्रा झाल्या. त्यांचे बरोबर पुष्कळशी मंडळी असून सामानाकरितां गाड्या, उंट वगैरे लवा-जमा होताच. या दोन वर्षांत मोरोपंतांनीं लहान-लहान स्तोत्रें वगैरे बरीच रचना केली असावी असें दिसतें. 'गंगाप्रार्थना' व 'गंगाविज्ञप्ति' हीं काव्यें आधींच लिहून पुढें पाठविलीं होतीं; व मग प्रत्यक्ष स्वतः तेथें गेल्यावर पंत नित्य गंगास्नानास जात. तो गंगेचा स्वच्छ आणि सुंदर प्रवाह पाहून पंत म्हणतात—

देवि ! दयावति !! दवडिसि दासांचो दुःख दुर्दशा दूर ।
पापातें पळवितसें परमपवित्रे ! तुझा पयःपूर ॥

याकरितां हे देवी—

गळावा त्वत्तीरीं भगवति ! न हा देह सदनीं ।
पडो गंगे ! तूझें मरणसमयीं तोय वदनीं ॥

या पवित्र व रम्य गंगातटाकीं असतांना पंतांनीं 'गंगावकिली', 'विष्णुपदवकिली', 'गंगास्तव', 'काशीस्तुति', 'विश्वेशस्तुति' अशीं लहान-लहान अनेक काव्यें केलीं. हीं सर्वच फार सरळ व मंजूळ आहेत. दोन्हीं 'वकिल्यांत' त्यांनीं आपले इष्टमित्र, सोयरे, स्नेही वगैरे सर्व मंडळींच्या उद्धारासाठीं तरफदारी केली आहे. तसेंच, श्रीमंत सवाईमाधवराव पेशवे, अहिल्याबाई, नाना फडणवीस, हरिपंत फडके वगैरे सरदारांची वकिली केली आहे.

यावे द्युनदि ! खळातें श्रीमाधवराय पेशवे दमुनि ।
व्हावे श्रीरामजयें हृष्ट जसे सर्व देश वेद मुनि ॥

आपल्या बरोबर आलेले व मागें राहिलेले बारामतींतले लहान-मोठे लोक, तसेंच त्या गांवचे तेली, तांबोळी, परीट, न्हावी आणि देशपांडे, कुळकरणी, पाटील, चौगुले यांनांहि मोरोपंत विसरले नाहींत. अशीं हीं स्तोत्रें फारच प्रेमळ आणि कळवळ्याचीं आहेत. यापूर्वींहि पंतांनीं अनेक स्तोत्रें रचिलीं होतींच. तीं आणि हीं, अशीं सर्वच

स्तोत्रें फार हृदयंगम व प्रेमळ आहेत. यांत तुळजाभवानी, जेजुरीचा खंडोबा, गिरीचा व्यंकटेश, कोल्हापुरची अंबा, तसेंच विघ्नहर्ता विनायक इत्यादि अनेक देवतांवर रचिलेलींहि स्तोत्रें आहेतच. पण त्यांतल्या-त्यांत 'पांडुरंगदंडक', 'पंढरीमाहात्म्य', 'विठ्ठलप्रणिधि', 'विठ्ठल-स्तुति', 'विठ्ठलविज्ञापना' हीं विशेष चांगलीं आहेत. विठ्ठलभक्तांची स्तोत्रें व प्रार्थना हीं तर भक्तिरसानें थबथबलीं असून फारच मधुर आहेत. भारतभागवतादि प्रचंड ग्रंथ रचिणाऱ्या या मयूरपंडिताचे हीं लहानसहान स्तोत्रें म्हणजे केवळ खेळ आहेत. त्याच्या रस-वंतीच्या त्या सहज लीला आहेत; त्याच्या सरस्वतीच्या मोहक कंठांतून तिचा सूर लागला तेव्हां आपोआप निघालेले ते गोड आलाप आहेत. हीं पंढरीच्या विठोबाचीं आणि त्याच्या साळ्याभोळ्या भक्तांचीं स्तोत्रें, श्रीविठ्ठलाच्या पंचामृत स्नानाच्या तीर्थाप्रमाणेंच गोड वाटतात. त्याचा पळी-पळी प्रसाद नित्यशः लहान मुलांस दिला असतां त्यांची जिव्हा खास मधुस्रविणी होईल. ज्ञानेश्वराची स्तुति तर उत्तमच आहे; पण नामदेव-तुकारामासंबंधाचा पंतांचा अभिप्राय फारच मार्मिक आहे—

श्रीनामदेवतुकया तदभंग प्रभुसि गोड घांस तसे ।
गर्हिवरतसे परिसतां नाचतसे पांडुरंग हासतसे ।।

महीपतीच्या चरित्रग्रंथांना अनुलक्षून पंत म्हणतात—

साधूंचें यश गाया प्रेमें देवुनियां सुभा केला ।
निःसंशय ताराया जड महिपति विठ्ठलें उभा केला ।।

असे सर्वांवरचेच अभिप्राय आदरणीय आहेत. आतां पंतांच्या मतें रामदासाचा व शिवाजीचा संबंध काय होता, हें दाखविणारी एक आर्या देऊं—

शिवराजास ज्ञानद जो, जैसा याज्ञवल्क्य जनकास ।
तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कांस ।।

इतर अनेक कवींप्रमाणेंच मोरोपंतांनींहि एक संतमणिमाला किंवा

सन्मणिमाला केलेली आहे. हींत दरएक संतावर त्याचा विशेष काय आहे, हें थोड्यांत आणून एक-एक आर्या रचिली आहे.

ही पंतांची एकंदर स्तोत्ररचना प्रेमळ व मधुर आहे हें वर सांगितलेंच आहे. पण या स्तोत्रांत कांहीं कांहीं तर अगदींच साधीं आहेत. 'सन्मनोरथराजी', 'नामार्या', 'महद्विज्ञापना' वगैरे स्तोत्रें सहज बोलल्याप्रमाणें सरळ आलीं आहेत.

**मज भामवतांचा कीं नामाचा भरंवसा न इतरांचा।**
**बा अकलंका लंकानाथा! बाळासि जेंवि पितरांचा॥**

ही महद्विज्ञापनेंतली आणि

**तृष्णानदींत अघना तारिसि तूं नामराज नावाडी।**
**तोचि उदार सदन्नें जो क्षुधितां पामरां जनां वाढी॥**

ही नामार्यांतली या दोन्ही आर्या किती सरस आहेत! 'नामसुधाचषकां'त शंकराचा स्तव आहे. त्याप्रमाणेंच 'नामरसायनां'त पंतांच्या आवडत्या दैवताच्या आवडत्या दासाची म्हणजे श्रीमारुतीची प्रार्थना आहे. यांत अंजनीसुत श्रीहनुमंताला पंत म्हणतात—

**चुकणें भूषण आम्हां भूषण करणें क्षमा तुम्हां देवा।**
**अनुरागें कीं रागें करचरणांभोज या शिरीं ठेवा॥**

आणि माझेकडून तुम्हीच गोड कविता बोलवा.

**वीणा वेणु जडचि परि बाजवि त्याची कळाचि बोलविते।**
**अन्यांची काय कथा? ती वादकमस्तकेंहि डोलविते॥**
**यावें दर्शन द्यावें बोलावें डोलवून डोलावें।**
**वाटे स्व 'मंत्ररामायण' निज नाटक तुम्हीच तोलावें॥**

या सर्व स्तोत्रांत 'मुरलीपंचक' अगदीं लहान आहे, तें सरस आहे. पण तें थोडें क्लिष्ट आहे. वर सांगितलेल्या 'नामरसायनां'त पंतांनीं, आपल्या 'बृहद्दशम', 'प्रल्हादविजय', 'मंत्ररामायण', 'केकावली', 'संशयरत्नावली' वगैरे दहाबारा ग्रंथांचा उल्लेख केला आहे. यांतील 'केकावली' म्हणजे पृथ्वी छंदांतली सर्वतोमुखीं असलेली केकावली नसून आर्यावृत्तांत रचिलेली केकावली ही होय. ही आर्याकेकावलीहि दुसऱ्या केकावलीच्याच

तोडीची आहे. मोरोपंतांवर एखादे वेळीं मोठें संकट आलें असावें व त्यावेळीं हें स्तोत्र रचिलें असावें, असें ती वाचल्यावर वाटतें.

संकट वारुनि रामा ! निजगुणकीर्तन करावया योजी ।
आपुलिया थोरपणें रामा मजला स्वकिंकरीं मोजी ॥
स्तुति करुनि तुझी तुजला आम्हीं अज्ञान काय बा रिझवूं ।
गावुनि अमृतगुणांतें हृदयीचे ताप आपुले विझवूं ॥
बहु गोड गुण तुझे ते ऐकावे आदरें स्वयें गावे ।
या वेगळे मनोरथ नसती ते तूज काय सांगावें ॥

या आर्याकेकावलीपेक्षां 'संशयरत्नावली' हें लहानसें काव्य ज्यास्त आनंददायक व चमत्कृतिजनक आहे. याची कल्पना मोरोपंतांना महीपतीबुवा ताहराबादकरांच्या पांडुरंगस्तोत्रावरून सुचली असावी, असें मला निःसंशय वाटतें. 'संशयरत्नावलीपेक्षां' 'केकावली' हें स्तोत्र फारच हृदयंगम आहे. यांत परमेश्वराला फार आतुरतेनें आळविलें आहे. इतके दिवस आर्या रचिल्यानंतर तें वृत्त सोडून या स्तोत्राला पृथ्वीवृत्त योजिलें आहे; पण असें केल्यामुळें यांतील पद्यांची तेजस्विता उणी न होतां उलट दुणावली आहे. यांत कवीनें परमेश्वरापुढें आपलें सर्व हृद्गत उघडें केलें आहे. या स्तोत्राचे एकंदर १२३ श्लोक आहेत. यांत मोठ्या प्रेमानंदानें परमेश्वराजवळ आपला उद्धार करण्याविषयीं हट्ट घेऊन शेवटीं कवि म्हणतो,

दयामृतघना अहो हरि वळा मयूराकडे
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ।
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदां सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासा पडे ॥

यानंतर मोरोपंत फार दिवस या लोकीं राहिले नाहींत. ते शके १७१६-मध्यें चैत्र शुद्ध पौर्णिमेस म्हणजे हनुमन्तजयंतीचे दिवशींच कैलासवासी झाले.



# पंतसमकालीन कविमंडळ



एक प्रतिभावान् पुरुष निपजला म्हणजे त्याच्या बुद्धीच्या प्रभेनें त्याच प्रकारचे इतर पुरुष कसे निर्माण होतात, हें मागें वामनस्वामीचे वेळीं आपण पाहिलेंच आहे. बिंबप्रतिबिंब-न्यायानें एकाचा प्रकाश दुसऱ्यावर पडून व एकाच्या तेजानें उत्पन्न झालेले आघात दुसऱ्याच्या बुद्धीला त्याच प्रकारचें चलन देऊन तसलेच पुरुष निर्माण होण्याचा मार्ग सुलभ होतो. पंतांच्या पूर्वी महाराष्ट्रांत आर्यांचा प्रसार फारसा नव्हता. त्यांनीं हा प्रघात इतक्या जोरानें सुरू केला कीं, त्यांचा कित्ता पाहून त्यांचें बेमालूम अनुकरण अनेक जण करूं लागले. आर्या हें मात्रावृत्त असल्यामुळें त्यांत अडवणूक थोडी होते; व मना-सारखी शब्दयोजना करण्यास पुष्कळच वाव सांपडतो. यामुळें पंतांच्या हयातींतच खेड्यापाड्यांतहि आर्यांचा शिरकाव सहज झाला. कांहीं लोक तर त्या इतक्या चांगल्या करीत कीं, त्यांपैकीं कांहीं पंतांच्या नांवावर खुशालपणें विकल्या जात; आणि यांचे रचणारे नेहमीच चांगले कवि किंवा प्रसिद्ध विद्वान् असत असेंहि नाहीं. तर त्या, नांव-गांव देखील ठाऊक नाहीं अशी साधारण मंडळीहि रचीत.

श्रीरामाच्या मूर्ती तुळशीवागेमधें कशा रमल्या ।
ज्याला त्याला पावति श्रीमंतांच्या मनामधें भरल्या !

---

१. श्री एकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो ।
प्रेमें चंदन घाशी गंगेचे पाणि कावडी भरितो ।।

ही आर्या पतांचा पुतण्या बाळाजीपंत याची आहे. ही पंतांच्या वंशांतल्या एका पुरुषाची इतका तरी पंतांचा संबंध हिच्याशी आहे. पण

गोविंदा ! गोपाळा ! कृष्णा ! विष्णू ! मुकुंद ! घननीळा ! ।
धृतकौस्तुभवनमाळा ! पितांबरधारि ! देवकीबाळा ! ।।

ह्या आर्येशीं तर तितकादेखील पंतांचा संबंध नाहीं. पण या दोन्ही आर्या पंतांच्याच असें पुष्कळ लोक समजतात.

ही आर्या आपण बोबडें बोलत होतो तेव्हांच म्हणूं लागलों; आणि तेव्हांपासून ती नेहमी तोंडांत आहेच. हिच्यांत कांहीं विशेष अर्थ भरला आहे असें नाहीं, पण मुलाबाळांनीं गजबजलेलें असें एकहि कुटुंबवत्सलाचें घर महाराष्ट्रांत सापडावयाचें नाहीं कीं, ज्या घराच्या भिंतींनाहि ही आर्या पाठ झाली नाहीं. तसेंच एकाहि चांगल्या कार्यांतलें असें प्रयोजन झालेलें नाहीं कीं, जेथें

न मरे यास्तव नेला पर्वतशिखरासि लोटिला खोली ।
परि तो निर्भय चित्तीं वाहे नारायणासि लाखोली ।।

ही आर्या जेवणावळींत एकाहि बटूनें म्हटली नाहीं, ही आर्या मोरोपंतांची नसून. धुंडिराज–नामक कवीच्या 'प्रल्हादविजयां 'तली आहे. हा धुंडिराज कोण व कुठला याची माहिती आज आपणास नीटशी नाहीं. आपणांस कोणा धुंडिराजाचा 'मोरेश्वर' नांवाचा एक मुलगा माहीत आहे. यानें 'चंद्रावळी' नांवाचें प्रकरण लिहिलें आहे. 'चंद्रावळी' हें आख्यान शृंगारिक असून नीतिदृष्ट्याहि अत्यंत हिडीस आहे; पण या दुसऱ्या मोरेश्वरानें पहिल्या मोरेश्वराप्रमाणेंच आर्या सरळ व सुटसुटीत केल्या आहेत. 'जनार्दन' आणि 'कृष्णानंदनिमग्न' हे दोघेहि कवि मोरोपंतांची नक्कल चांगली करितात. पहिल्याच्या 'दामाजी-पंतचरित्रां 'तली

काळा दोरा कंठीं लंगोटी जीर्ण कांबळी काठी ।
झाला तो जगजेठी वाहे पोतें त्वरें त्वरे पाठी ।।

ही विठ्या महाराच्या वर्णनाची आर्या, आणि दुसऱ्याच्या 'राधा-विलासां 'तील,

'एके दिवशीं गेली श्रीराधा नंदभाजसदनासी'

तेव्हां आईजवळ असलेला श्रीकृष्ण एकदम उसळून रडूं लागला त्या वेळच्या यशोदेच्या तोंडीं घातलेल्या

फार खवळला राधे ! काय करावा उपाय ? राहील ।
कैसा ? आतां वाटे घेतां तूं, तुजकडे न पाहील ।।

'ये' राधिका म्हणे उडि मातेपासून नंदसुत टाकी ।
गगनांतुनि हंस जसा उतरे मानस तडाग-सु-तटाकी ॥

इत्यादि आर्या अगदीं पंतांच्या धाटणीच्या आहेत.

काव्यसंग्रहांत वामनचरित, शुकरंभासंवाद, कबीरकथा, गजगौरीव्रत वगैरे प्रकरणें आणि थोडीशीं पदें, इतकी विठ्ठल केरीकराची कविता छापिलेली आहे. याशिवाय याची आणखीहि रचना उपलब्ध आहे. याचें सबंध नांव विठ्ठल नरसिंह सांखोळकर. हा त्या प्रांतांत प्रसिद्ध असलेल्या मंगीशाचा भक्त असून चांगला विद्वान् होता. याचीं वर दिलेलीं सर्व आख्यानें, आर्या—म्हणजे आर्यागीती—वृत्तांत आहेत. या सर्वांत याच्या 'कबीरकथे'च्या आर्या बऱ्या झाल्या आहेत; पण याच्याहि पेक्षां 'नारायण' कवीनें लिहिलेलें 'कबीराख्यान' जास्त चांगलें आहे. नारायणानें ठिकठिकाणीं मोरोपंतांचें नुसतें अनुकरण केलें आहे इतकेंच नाहीं, तर त्यांच्या कल्पना आणि त्यांचे शब्ददेखील उचलून घेतले आहेत. हा 'नारायण' पंतांच्याच केवळ नव्हे, तर पंतांप्रमाणेंच ओजस्वी अशा इतर कवींच्या कवनांतले शब्द आणि कल्पना खुशाल उचलून घेतो.

गोदे ! ओ दे सदये ! सांभाळीं दीन हा तुझा बाळ ।
स्वकरेंचि घालिते; घे ओटींत तुझ्या न कापितां नाळ ॥

ही नारायणकवीची कबीराच्या आईनें कबीराला गंगेंत टाकिलें त्या वेळची आर्या 'गंगे गोदे यमुने' या आर्येची सहज आठवण करून देते.[२] या नारायणाची आणखींहि प्रकरणें आहेत; पण हीं छापिलेलीं नाहींत. यांपैकीं भागवताच्या आठव्या स्कंधांत आलेल्या

---

१. हा सोहिरोबा अंबियाच्या बराच मागाहून होऊन गेला. हा अदमासें शके १७००-नंतर होऊन गेला असावा.

२. गंगे गोदे यमुने माझा नोहे तुझाचि हा बाळ ।
जतन करी गे याचें, स्वाधिन केला न कापितां नाळ ।

हीहि आर्या खुद्द मोरोपंतांची नाहीं, हें आपणांस माहीतच आहे.

'शिवमोहिनी' आख्यानावर यानें रचिलेल्या आर्या प्रसिद्ध आहेत. यानें काढिलेलें—

भरला वसंत वनि त्या क्रीडे कंदुक करांबुजें उडवी।
दडवी कंपित कुचयुग सांबाला मदनसागरीं बुडवी ॥
रुणझुण पैंजण वाजवि तैशा छुमछुम नितंबकिंकिणिका।
वेणी फणिवत् लोळे झळकति रदपंक्ति रत्नमणिकणिका ॥
उजव्या हस्तें खेळे डाव्यानें सावरूनि वस्त्रातें।
लाजे 'हर' वश केला तीनें टाकूनि कामशस्त्रातें ॥
झेली कंदुक तेव्हां दिसती किंचित सतेज वर लाशी ॥
सांबा हळुच खुणावी नेत्रें मुरडी मनांत वरल्याशी ॥
पंकजनेत्री चमकत चाले, कंदुक उडे तया पाठीं।
पाठी उघडी झाली कंचुकिची ही सुटे तदा गांठी ॥

अशी कंदुकक्रीडा करणाऱ्या मोहिनीचें चित्र कोण वाईट म्हणेल! पंतांनीं आपल्या मंत्रभागवतांत वर्णिलेल्या याच कथानकापेक्षां हें नारायणाचें कथानक खरोखरीच सरस आहे; पण याला एक कारण आहे. ज्यांत हें प्रकरण आहे तो मंत्रभागवत रचितांना पंतांना आर्यारंभीं मंत्र साधून काव्यांत चित्रचमत्कार करण्याची लहर आली होती; आणि त्यांनीं रचनेला प्रमाणाचें बंधन घातलें होतें. यामुळें त्यांची रचना जरा बोजड झाली आहे. पण असें बंधन नारायणाच्या वाणीला नसल्यामुळें ती सरळ वाढली आहे.

या नारायणकवीनें पंतांचे शब्द उचलले आहेत; पण त्यांच्या नांवाचा उल्लेख यानें कोठें केलेला नाहीं. 'चिंतामणि' कवीनें पंतांचे शब्द उचलले आहेत व त्यांचा उल्लेखहि आपल्या ग्रंथांत केला आहे. आपल्या 'गोपीचंदाख्याना'च प्रारंभींच यानें—

विद्वज्जनवृक्षवना सौरभगुणवृद्धिदा महागुरुला।
भावें ध्यातों प्राकृतकाव्याचार्या मयूरकविराया ॥

असें मोरोपंतांना नमन केलें आहे. याचें 'सीतास्वयंवर' नांवाचेंहि एक आर्यावृत्तांतलें प्रकरण प्रसिद्ध आहे. 'सूर्यवंशीं उत्तानपाद राजा' इ.

दिंडी वृत्तांत असलेलें 'ध्रुवाख्यान' याचेंच असें म्हणतात. चिंतामणीची माहिती उपलब्ध नाहीं; पण हा नरहरीभक्त असून याच्या घरची वृत्ति ज्योतिषाची असावी, असें वाटतें. याच्या गणपतीवर ११०० आर्या आहेत.

वर उल्लेखिलेल्या कवींशिवाय पंतांचें अनुकरण करणारे आणखीहि इतर अनेक कवि आहेत. एकदां एखाद्याचें अनुकरण होऊं लागलें म्हणजे चांगल्याबरोबर वाईटाचेंहि अनुकरण होऊं लागतें; आणि याकरितांच थोर माणसांनीं आपल्या कृतीविषयीं नेहमीं फार जपणें व विचारानें पाऊल टाकणें अवश्य असतें. पंतांची चित्ररचना पाहून त्याप्रमाणेंच आपणहि चित्ररचना करावी, असें अनेक इसमांना वाटलेलें दिसतें. चिंतामणिप्रमाणें आर्यावृत्तांत एकानें ध्रुवचरित्र गाईलें आहे. हें काव्यसंग्रहांत छापिलें आहे. यांत यानें '**श्री नमो भगवते वासुदेवाय**' हा मंत्र आर्यांच्या आद्याक्षरांनीं साधिला आहे. नरहरी कवीनें आपल्या रामजन्मांतहि '**श्रीराम जयराम जयजयराम**' हा पंतांचा आवडता मंत्र आर्यांच्या आद्याक्षरांनीं साधिला आहे. अशीं आणखीहि उदाहरणें आहेत. पण या सर्वांत 'चतुर्मंत्र–रामायण' रचणाऱ्या कवीची कर्तबगारी विशेष आहे. यानें एक तऱ्हेनें पंतांच्या वर ताण केलेली दिसते. यानें रामायणाचीं सातहि कांडें लिहिलीं आहेत. प्रत्येक कांड तेरा-तेरा आर्यांचें आहे; व पहिल्या कांडांत पहिल्या आर्येच्या दोन्ही चरणांच्या प्रारंभीं व शेवटीं **श्री**, दुसऱ्या आर्येच्या दोन्ही चरणांच्या प्रारंभीं व शेवटीं **रा** याप्रमाणें अक्षरें घालून '**श्रीराम जयराम जयजयराम**' हा त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला आहे. दुसऱ्या कांडांत हाच मंत्र आर्येच्या दोन्ही चरणांत आरंभापासून व शेवटापासून दुसरें अक्षर असें योजून आणिला आहे. तिसऱ्यांत तिसरें असा सातव्या कांडांपर्यंत चढत्या अक्षरांनीं–दोन्ही टोकांकडून चढत्या अशा अक्षरांनीं–साधिला आहे. दर-एक कांडांतली एक अशा याच्या सात

१. काव्यसंग्रह, अ. क. लघुकाव्यमाला, भाग २, पृ. ३६.

आर्या देतों.

श्री मद्विबुधवरद जो सेवितसे यस्य पाद सतत श्री ।
श्री करधर तो स्मरतां तो मग होतो प्रसन्न सहित श्री ॥
श्री राघवकुलभूषण दशरथ तीघी जयास दारा हो ।
त्या राया सुत जाला मुनि मनि म्हणती जया सदा राहो ॥
हे प्रमदा कवणाची होउनि पडली असे शिलामय हो ।
ऐसे महोग्रशापी कोण ? म्हणुनिया पुसे निरामय हो ॥
नमुनी जगतीतनया रामा दे लक्ष्मणास निज दुहिता ।
रामानुज भरतातें शत्रुघ्नातें निजानुज स्व-सुता ॥
हा ! हाय ! काय केलें मम हित होऊनि माय मजलागीं ।
वधिता भय मज वाटे माय म्हणे रामराय तुजलागीं ॥
सानुज येतां राघव परतुनि तंव ती वरानना न दिसे ।
शोक करी 'हा रामे !' तुजविण युगसदृश रात्रि वाटतसे ॥
ऐशा परिचि यमल मुलें सीतेचीं मनोरमें सगुण ।
पितृसम परम पराक्रमीं जं सद्‌गुणधाम सत्कलानिपुण[1] ॥

ही सर्व मंडळी मोरोपंतांच्याच तालमींतली म्हणजे त्यांची अनुयायी दिसते. पंतांचे इष्टमित्रांतहि कविता करणारे बरेच पुरुष होते. पंतांचे व्याही बाबा पाध्ये यांनीं पंतांच्या धर्तीवरच एक 'रुक्मिणपत्रिका' लिहिली आहे. यांनींच पंतांची आर्याकेकावली पाहून पंतांना लिहिलें कीं,

ऐकुनि विश्व सुखावे ज्या केकीचा अपूर्व तो टाहो ।
त्याला आयुष्याचा ईशकृपेनें कधीं न तोटा हो ॥

याप्रमाणेंच नगरचे बाळंभट काजळे, कोल्हापुरचे दाजिबा पुजारी, सोलापुरचे रामजोशीबुवा, पंढरपूरचे रामचंद्र बडवे वगैरे मंडळीहि पंत-

---

१. मोरोपंतांनीं मंत्रभागवताच्या उपोद्घातांत मंत्रांतलें प्रत्येक अक्षर दर चरणांत प्रारंभीं, मध्यें व शेवटीं असें तीन वेळां म्हणजे सबंध आर्येत सहा वेळां आणिलें आहे.

नलिनाक्ष प्रभु लक्ष्मी नयनमनोहर पदांबुजध्यान ।
नवघननील चतुर्भुज नमिला जो पुण्यकीर्तिचें स्थान ॥

२. हिची मूळ प्रत पंतगृहीं आहे. तींत ही आर्या अशीच आहे.

काव्यांवर लुब्ध असत व अधूनमधून आर्या लिहिण्याचा छंद या सर्वांना असे.

सुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ।
ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंतांची ।।

ही प्रसिद्ध आर्या रामचंद्र बडवे यांच्या 'मोरेश्वर–वर्णनां'तली होय. या रामचंद्र बडव्यापेक्षांहि रघुनाथपंत कोशांचें प्रेम पंतांवर आणि पंतांच्या काव्यांवर विशेष होतें, असें दिसतें. आपल्या नामरसायनांत यांचा

रघुनाथपंत कोशे संप्रति गेले समीप सेवेला ।
प्रेमें सिंचित होते या कवना ते सखे जसे वेला ।।

असा गोड उल्लेख पंतांनीं केला आहे. यांचें संबंध नांव रघुनाथ गणेश कोशे. हे बारामतीचे राहणारे असून श्रीमंत थोरले नानासाहेब पेशवे यांच्या मर्जीतले होते. कदाचित् त्यांचे आश्रितहि असावेत. गुणी व विद्वान लोकांना पेशव्यांचा आश्रय नेहमीं असे. ते विद्येचे आणि शौर्याचें मोठे चाहते होते. रघुनाथपंतांचें[1] एक बाड आहे. त्यांत तें 'महाराज श्रीमत् प्रधान सैन्य मध्यें' टांकळी, औरंगाबाद, पुणें, शहागड वगैरे ठिकाणीं लिहिल्याचा उल्लेख आहे. यांत 'पंतप्रधान-काव्यें[2]' या नांवाचें एक काव्य आहे. हें श्लोकबद्ध असून यांत श्रीमंत पेशवे यांचें वर्णन आहे. काव्यांत कवीची शब्दचमत्कृतीकडे असलेली नजर स्पष्ट दिसते. यांतील दोन तीन श्लोक येथें देतो.

बाळाजी तरि विश्वनाथ म्हणवी बाजींद्र वाजीपती ।
श्रीनाना सुत त्यांस ज्यास हृदयीं दिल्लीश ही कांपती ।।
नाना ना न वदे म्हणोनि जनता 'नाना' जयातें वदे ।
विप्राला धन दे खळा निधन दे सर्वांस सर्वस्व दे ।।
शत्रूंला भय दे निजां अभय दे विश्वास विश्वास दे ।
दे दे देउनि देचि दे तरि सख्या शैवास संवास दे ।।

---

१. भारत इतिहास मंडळांतील दफ्तर.

२. या काव्यासारखेंच 'परशुरामचरित्र' या नांवाचें एक काव्य आहे.

पेशव्यांचें सैन्य पाहून हा कवि म्हणतो —

शें शे बाण भरूनि उष्ट्रशतकें सेनामुखीं चालती ।
शें शें अश्वजजालनाल झडतां भूभृच्छिरें हालती ।।
नाना दिग्विजयास या जंव निघे तें देव उल्लासती ।
सेनाव्यूह तसे उडुव्रज जसे चंद्रासवें भासती ।।

या काव्याबद्दल रा. पोतदार लिहितात कीं, 'काव्य चटकदार आहे. शब्दचमत्कारावर जास्त भर आहे. थोड्यांत गोडी आहे.'

या पंतप्रधानाख्यानाच्या कर्त्याचें नांव 'शैव मोरेश्वर' असें दिसतें. या 'शैवकवी'प्रमाणेंच रघुनाथपंत कोशांचीहि कांहीं कृति आहे. तींतहि पेशव्यांचा व त्यांच्या कुटुंबाचा उल्लेख मोठ्या गौरवानें केलेला आहे. या रघुनाथपंतकोशांचाच 'श्रीधर' या नांवाचा एक भाऊबंद होता. याचें 'भगवत-स्तुतिपर कांहीं श्लोक व तत्त्वबोध[1] नांवाचा छोटासा ग्रंथ' वगैरे कृति आहे. याचीहि—

श्रीमंत श्रीप्रधानोत्तम नमन तुम्हांलागीं साष्टांग माझें ।
पृथ्वीच्या पालनाचें निज शिरीं धरिलें स्वामिनीं सर्व वोझें ।।

इत्यादि श्लोकांची एक पेशव्यांची 'प्रार्थना' आहे. या वेळीं पेशवे हे अधिकारसंपन्न असल्यामुळे त्यांच्या स्तुतिस्तोत्रांना साहजीकच भर आला होता. यांपैकीं कांहीं साधारण बरीं आहेत. त्यांतल्यात्यांत भगवंतराव यादवासारख्यांच्या स्तोत्रासारखीं जरा विशेष कौतुकास्पद आहेत. भगवंतराव यादव हे स्वतः तरवारबहादूर होते; व यांचे पुत्र त्र्यंबक भगवंत हे, ज्यांत मराठ्यांच्या तरवारीला पूर्ण यश आलें त्या खर्ड्याच्या लढाईंत जातीनें हजर असून तींतच कामास आले. यांच्या रचनेचा मासला म्हणून दोन श्लोक देतों. यांनीं 'श्री शिवपाद-पद्मयुगुलांना' वंदन करून पुढील हकीकतीस सुरुवात केली. बाळाजी

---

१. हा ग्रंथ राम-मारुतिसंवादात्मक आहे.
'केला असा मारुतिला प्रबोध । म्हणोनि हा ग्रंथहि 'तत्वबोध ।।'
श्रीराम आत्मा निज श्रीधराचा । हा ग्रंथ तेणें रचिला स्ववाचा ।।'

विश्वनाथापासून नारायणरावापर्यंत सर्वांचा उल्लेख व वर्णन यांत आहे. थोरल्या बाजीरावासंबंधें कवि म्हणतो—

पादाक्रांत करूनि म्लेंच्छ नृपती, शिवराज हें रक्षिलें
दीनां दुर्बळ भाग्यवंत पुरुषा समदृष्टिनें लक्षिलें ।
लंकेच्या सम दुर्ग थोर बसई जें सिंधुमध्यें असे
पाहा क्रूर पराक्रमासि करूनि तें घेतलेसें कसें ॥

राघोबादादाबद्दल —

जिंकूनी कुरुदेश गुर्जर तथा लाहोर मुलतान हो ।
शत्रूचा परिहार गर्व करूनी केलें तया म्लान हो ॥

इत्यादि वर्णन कवीनें केलेलें आहे. असलीं स्तुतिस्तोत्रें यदाकदाचित् थोडीं मौजेचीं वाटलीं तरी यापेक्षां या कवींनीं मराठयांच्या लढायांचीं किंवा इतर प्रसंगांचीं प्रत्यक्ष पाहिलेलीं वर्णनें रचिलीं असतीं तर तीं विशेष आदरणीय झालीं असतीं. निदान ज्यांनीं त्या काळाच्या लढाईंत कामगिरी बजाविली होती, व जे तेथें रणभूमीवर जातीनें हजर होते आणि ज्यांना कवित्वाची हातोटी साधली होती, अशांनीं महाभारतांतलीं भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, गदा वगैरे पर्वें लिहिलीं असतीं तर त्यांचा परिपाक उत्कृष्ट उतरला असता. मराठयांच्या अमदानीच्या या काळांत महाभारतावर कोणींच रचना केली नाहीं, असें बिलकुल नाहीं. या काळांत पुष्कळांनीं महाभारतावर लेखणी चालविली आहे. पण यांपैकीं कोणाच्याहि हाताला तरवारीचा विटाळ झालेला त्यांच्या ग्रंथांवरून दिसत नाहीं. ज्या हाताला माळेच्या मण्याचे घट्टे पडले त्या हातांनीं लिहिलेलीं हीं भारतेंहि तितक्याच मासल्याचीं उतरलीं आहेत.

यापैकीं हल्लीं ज्यांचीं कांहीं पर्वें आपणास उपलब्ध आहेत त्यांत गोपाळ, शुभानंद, माधव आणि जिवा शिवा यांनीं समग्र महाभारत

---

१. नरहरि मालूनें आपल्या ग्रंथांत मुक्तेश्वराचें चरित्र दिलें आहे. त्यांत मरणसमयीं मुक्तेश्वराची भारतरचनेची इच्छा पूर्ण झाली नाहीं, म्हणून [ पान ६८८ पहा.

मराठींत लिहिलेलें असावें असें दिसतें. गोपाळ हा नेवासें येथील राहणारा असावा असें याच्या अनुशासयपर्वांतील—

'मोहिनीचरण पद्मभ्रमर । असे तेथें कविकिंकर ।
सेवूनियां प्रवरातीर । देवीलागीं ध्यातसे ॥'

या उल्लेखावरून दिसतें. उद्योगपर्वांत यानें आपल्या कुलदेवतेचा पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहे.

आतां सह्याद्रिमातापुरी । एकवीरा ते ब्रह्मकुमारी ।
ज्ञानोदकाची तीर्थेश्वरी । कुलदेवता कवीची ॥

याच्या अनुशासनपर्वांत तें शके १६९०–मध्यें लिहिलें, असें म्हटलेलें आहे. आपला गुरु 'गोपाळ' असल्याचा उल्लेख सर्व पर्वांत आला आहे. या गोपाळानें मुक्तेश्वराचीं चारीं पर्वें पाहिलीं होतीं हें, मुक्तेश्वरी शब्द व उपमा त्याच्या ग्रंथांत जागोजाग आढळतात यावरून स्पष्ट दिसतें. वेदान्तविषयाचा कोणताहि चांगला ग्रंथ पाहिला तर त्यांत जसें प्रायः ज्ञानेश्वरीचें प्रतिबिंब दिसतें तसेंच प्रायः बहुतेक सर्व ओंवीबद्ध भारतांत मुक्तेश्वराच्या भारताचें प्रतिबिंब उमटलेलें नजरेस पडतें. यावरून मुक्तेश्वरी वळण होईल तितकें आणतोच ; व कांहीं–कांहीं ठिकाणीं तें त्याला साधलेंहि आहे. गोपाळाप्रमाणेंच 'शुभानंद' देखील मुक्तेश्वरी भाषा लिहिण्याचा आव घालतो; पण तें त्याला साधलेलें दिसत नाहीं. शुभानंदाचीं 'उद्योग' व 'भीष्म' हीं पर्वें प्रसिद्ध आहेत. याशिवाय आणखी कांहीं उपलब्धहि आहेत, पण अजून याचीं सगळीं

---

[ पान ६८७-वरून. ]

'मी नेवाशांत गोपाळ या नांवानें अवतरेन आणि मग बाकीचीं पर्वें पुरीं करीन' असें सांगितलें, असें लिहिलें आहे. नरहरीच्या लिहिण्यावर एक काडीचादेखील भरवसा ठेवणें योग्य नाहीं, हें खरें. पण यावरून नरहरी मालूला याचीं चारांपुढलींच पर्वें माहीत होतीं असें मात्र म्हणतां येतें. याच्या उद्योगपर्वांत पुढील ओंवी आहे.

विराटपर्व संपलें मागें । आतां उद्योग आरंभिला उद्योगें ।
जेवीं पौर्णिमेसी कुमुदरंगें । मावळतां होय सूर्योदय ॥

पर्वें सांपडलीं नाहींत. शुभानंद हा गोव्याकडील गोकर्ण प्रांतांत अंकोले येथील राहणारा. याच्या आईचें नांव जानकी व बापाचें ‘ मंगिरीश ’ ऊर्फ मंगेश. यानें आपल्या गुरुचें व कुलदेवतेचें नांव अनुक्रमें ‘विश्वंभर’ व ‘ मंगिश ’ असें दिलें आहे. यानें आपली भारतरचना शके १६८८-चे सुमारास चालविली होती. या म्हणजे १६८८–मध्यें याचा ग्रंथ भीष्मपर्वापर्यंत आला होता. शुभानंदाचें भारत गोपाळाच्या भारतापेक्षां मोठें असावें, असा तर्क होतो. शुभानंदाचें उद्योगपर्व ६३०० ओंव्यांचें आहे. गोपाळाच्या उद्योगपर्वाच्या सुमारें ३४० ओंव्या आहेत. पण गोपाळाचें एकंदर भारत पाऊण-लक्षाच्या आंत बाहेर असावें. या मानानें शुभानंदाचें एक लक्षाच्या जवळ-जवळ असावें असें वाटतें. भारताशिवाय ‘ महालयामाहात्म्य ’, ‘ मल्हारीमाहात्म्य ’, ‘ व्यंकटेश-माहात्म्य ’, ‘ पंढरीमाहात्म्य ’ वगैरे ग्रंथ उपलब्ध आहेत.

या वर सांगितलेल्या कर्वीशिवाय आणखीहि महाभारतावर मराठींत रचना करणारे कवि या समयांत होऊन गेले. यांपैकीं एक दोघांचीं मात्र सबंध भारतें उपलब्ध आहेत. बाकी कोणाचीं दोन चार तर कोणाकोणाचें एखादेंच पर्व हल्लीं दृष्टीस पडतें. किंबहुना समग्र भारत न रचतां त्यांतील मधलेंच एखाददुसरें पर्व मराठींत सांगणारे कवी अनेक आढळतात. मुरारी, जनार्दन, शिवनाथ, अनंततनय, हरीदास कान्हा वगैरे कवींनीं अशींच मधलीं मधलीं पर्वें रचिलेलीं दिसतात. मुरारीचें भीष्मपर्व आहे. मुरारी म्हणतो, ‘ मी कमळापुरचा राहणारा, माझ्या जनकजननीचीं नांवें कृष्ण व राधा. मी ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हण. मी हें पर्व शके १६७६-मध्यें रचिलें. जनार्दनहि याच सुमारचा. याचेंहि एक-च व्यासाश्रमपर्व उपलब्ध आहे. तो पंधरें म्हणजे सोनें या शब्दावर श्लेष करून म्हणतो, ‘ धातुमाजी पंधरें। तेंवी पर्वामाजी हें पंधरें । व्यासाश्रम श्रीधरें । व्यासरूपें ’ इ. शिवनाथाचीं भीष्म आणि द्रोण हीं वीररसानें भरलेलीं दोन पर्वें उपलब्ध आहेत. हीं यानें शके १६८८-मध्यें रचिलीं. अनंततनयाचींहि अशींच दोन-चार असावींत असें दिसतें. परंतु उपलब्ध

असें एकच आहे, आणि तें उद्योगपर्व. हें रचिण्याचें कारण यानें पुढीलप्रमाणें दिलें आहे.

> ... ... पूर्वीं मुक्तेश्वरें । अनेक कवींच्या ईश्वरें ।
> आरंभिलें भारत सारें । भाषाधारें रचावया ॥
> परी तें न गेलें समाप्ती । ऐसें तर्कुनि सर्व मती ।
> चतुर्थानंतरें पंचमीं प्रीती । 'उद्योगीं' मती संचरली ॥
> आदि-सभा-वन-पर्व । 'विराट' पर्यंत वर्णिलीं सर्व ।
> परी उद्योग भारतीं अपूर्व । यास्तव सर्व हि प्रेरिता ॥
> तया साधूंचिये प्राज्ञे । आरंभ केला असें म्यां अज्ञें । ... इ०

अनंततनयाचें नांव त्र्यंबक असावें असें या उद्योगपर्वांतील अनेक उल्लेखांवरून दिसतें.[१] याशिवाय या कवीची आणखी माहिती फारशी उपलब्ध नाहीं. याचा काल किंवा याचें वसतिस्थान याचीहि चांगलीशी माहिती अजून कळत नाहीं. याच्या उद्योगपर्वाची ग्रंथसंख्या अदमासें सहा हजार आहे. हा आपला ग्रंथ व्यासकृतीवरून फार काळजीपूर्वक लिहितो; व आपल्या प्रत्येक अध्यायाचे शेवटीं त्यांत मूळ भारताच्या किती व कोणत्या अध्यायांतील कथाभागांचा समावेश केला आहे हेंहि सांगतो. तसेंच प्रत्येक अध्यायाचे शेवटीं उपसंहारादाखल यानें एक एक श्लोक घातला आहे. या श्लोकांत त्या त्या अध्यायांतला कथाभाग सारांशरूपानें सांगितलेला आढळतो.

वर उल्लेखिलेला 'हरिदास कान्हा' हा कवि अनंततनय त्र्यंबकापेक्षां खालच्या दर्जाचा आहे. हा ब्राह्मणेतर असल्यामुळें याची विद्वत्ताहि सहाजीकपणें कमीच आहे. या कान्हानें आपल्या ग्रंथांत अनेक प्रकारच्या लौकिक कथा गोंवून दिल्या आहेत. बहुतकरून याचा संस्कृताशीं नीटसा परिचय नसावा; व हा दुसऱ्याकडून अर्थ ऐकूनच आपली रचना करीत असावा असें वाटतें. याचें फक्त एक भीष्मपर्वच हल्लीं उपलब्ध आहे. यांत आपल्या 'बाळाई'

---

१. ही त्र्यंबकें आपुली वाणी । वाग्पुष्पांचो गुंफिली श्रेणी ।
अर्पिली असे श्रीकृष्णचरणीं । अर्थ सुगंधें घमघमीत ॥

या आईच्या सांगण्यावरून हें मी लिहितों, असें कवीनें वारंवार सांगितलें आहे. या हरिदास कान्हाचा[1] काळ शके १७००-च्या आसपासचा समजतात. याचीं पदें वगैरे असून यानें अनुभव-रामायण या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे, असें म्हणतात.

वर महाभारतावर मराठींत रचना करणारे जे अनेक कवी सांगितले त्यांच्याप्रमाणेंच मोठ्या प्रमाणावर इतर विषयांसंबंधें ग्रंथ लिहिणारे कवीहि या काळीं होऊन गेले. या म्हणजे सतरावें शतकाच्या शेवटीं जे असे कवि महाराष्ट्रांत होऊन गेले, त्यांत **सोहिरोबानाथ अंबिये, जोतिपंतदादा महाभागवत, हरिबुवा** वगैरे मंडळी विशेष प्रसिद्ध आहे. यांपैकीं सोहिरोबानाथ हे सावंतवाडीकडील बांदे या गांवचे राहणारे. यांचा जन्म शके १६३६-चे सुमारास झाला असावा. अंबिये हें यांचें उपनांव. जातीनें हे सारस्वत ब्राह्मण होते. शिंद्यांच्या दरबारीं जिवबादादा बक्षींच्या मार्फतीनें यांचा प्रवेश झाला; व तेथें म्हणजे उज्जनीस हे बरींच वर्षे राहिले होते. यांना कोणा गैबनाथ नांवाच्या नाथपंथीं पुरुषानें उपदेशदीक्षा दिली होती असें सांगतात. गोवें प्रांतांत या कवीच्या ग्रंथांची प्रसिद्धी विशेष आहे. यांचीं पदें, अभंग वगैरे रचना बरीच असून पांच सहा ग्रंथहि उपलब्ध आहेत. अक्षयबोध, पूर्णाक्षरी, अद्वयानंद वगैरे लहान लहान ग्रंथ असून ‘सिद्धांतसंहिता’, ‘महदनुभवेश्वरी’ हे यांचे मोठाले ग्रंथ आहेत. पैकीं महदनुभवेश्वरीचीच ओवीसंख्या ७००० आहे, सोहिरोबानाथांच्या बहुतेक ग्रंथांप्रमाणेंच हाहि ग्रंथ कवीनें स्वतःच्या अनुभवसिद्ध माहितीवरून स्वतंत्रपणें रचिला आहे. सोहिरोबांची कविता ज्ञान, वैराग्य, नीति, योगाभ्यास या संबंधाच्या माहितीनें भरलेली आहे. तींत कथानकें व चरित्रें यांचा भरणा नाहीं. यामुळें ती काव्यमय नाहीं;

---

१. या कान्हाची भाषा व सरणी इतकी जुनाट दिसते कीं ती पाहतां हा कवि १७००-च्या पुष्कळ पूर्वीं होऊन गेला असावा असें वाटतें. कदाचित् हा मुक्तेश्वराचाहि समकालीन असावा असें याच्या भाषेवरून भासतें.

व या साधुपुरुषांची भाषाहि फार गोड नसल्यामुळें काव्यवाचकांपेक्षां वरील विषयांचा आस्थेनें अभ्यास करणाऱ्या जनांस मात्र ती आवडणारी आहे. यांचीं पदें मात्र नृत्यगायनकलानिपुण अशा स्त्रियाहि गोमांतक प्रांतांत वेळोवेळीं म्हणतात. शके १७१४-मध्यें सोहिरोबा हे कैलासवासी झाले.[1] सोहिरोबानाथांनीं एकदां हरिभजनीं मन घातल्यावर गृहस्थाश्रमाकडे मुळींच पाहिलें नाहीं. ते या लोकच्या खटाटोपाकडे अगदीं वळलें नाहींत. यांचेच समकालीन साधुपुरुष जोतिपंतदादा महाभागवत. हे यापेक्षां जरा निराळ्या वृत्तीचे होते. यांनीं आजन्म अनेक खटपटी केल्या व मोठ्या चिकाटीनें पुष्कळ कामें केलीं. या जोतिपंत दादांचें चरित्र थोडें चित्तवेधक आहे.

जोतिपंतांचें घराणें मूळ सातारा जिल्ह्यांतल्या खटाव या गांवचें होतें. या घराण्यांत कोणी गंगाधर नांवाचा एक पुरुष होता. याच्या मुलास माण तालुक्यांत मलवाडी येथील देशपांडेपण मिळालें व पुढें गंगाधरास विजापुर दरबारांत मोठा अधिकार मिळाला होता. तेव्हांपासून हें कुटुंब मलवाडी प्रतांत राहूं लागलें. या गंगाधरापासून--गंगाधर—कोन्हेर तिमाजी—कोन्हेर—राघव—तिमाजी—गोपाळ या पुत्रपरंपरेनें--गोपाळ हा सातवा पुरुष. या गोपाळपंताच्या बायकोचें नांव गोदावरी. या दोघांस पुत्र झाला. त्याचें नांव जोतिपंत. जोतिपंताचा जन्म बुध—मलवडी येथें

---

१. सोहिरोबांचे भक्त रा. भगवंत बाळकृष्ण पै यांनीं फार वर्षांपूर्वीं त्यांच्या मृत्यूसंबंधीं एक पद मला म्हणून दाखविलें होतें. तें असें:—

दिसणें हें सरलें, अवघें प्राक्तन हें मुरलें ॥ धृ ॥
आलों नाहीं गेलों नाहीं । मध्यें दिसणें हें भ्रांती ॥
जागृत होतां स्वप्नचि हरपे । कर्पुरन्यायें जग सरलें ॥ १ ॥
मच्छिंद्र जालंदर गोरख । हे न्याया आले स्वस्वरूपीं ॥
जातां जातां गमनग्राम तें । समूळ कोठें ना गमलें ॥ २ ॥
म्हणे सोहिरा सतरा चवदा । मधुमासाच्या प्रथम दिनीं ॥
सगुण स्वरूपीं निर्गुण ठेलें । अनुभव हरलें स्वरूप कळे ॥ ३ ॥

सोहिरोबानाथ हे मठांतून बाहेर पडले ते पुन्हां परत आले नाहींत. ते कोठें गेले तें कळलें नाहीं.

झाले. यांचेकडे बुध—मलवडीचे देशपांडेपणाचें वतन होतें. लहानपणीं जोतिपंत अगदीं जडबुद्धीचा होता. पण पुढें श्रीगजाननाची आराधना करून त्याचे कृपेनें यांनीं विद्या संपादन केली. कांहीं दिवस हे पुणें येथें आपला मामा महिपतराव यांचेकडे राहत असत. तेथें असतांना यांस पेशव्यांचे पदरीं दरमहा चार रुपये पगारावर नोकरी मिळाली व पुढें कांहीं दिवसांनीं यांची बुद्धिमत्ता श्रीमंतांचे लक्ष्यांत आल्यावर यांचेकडे पुरंदर येथील फडावरची कामगिरी आली. तेथून नंतर यांस झांशी येथें मोठ्या हुद्याची व अधिकाराची जागा मिळाली. हे पानपतच्या संग्रामाचे वेळीं सैन्यांत होते. मग पुढें यांचें मन परमेश्वर भक्तीकडे विशेष वळलें; व हे नोकरीचाकरी सोडून काशी येथें गेले. तेथें असतांना यांस श्रीमत् भागवताची पोथी प्राप्त झाली; व तेव्हांपासून त्या ग्रंथाचा यांनीं दांडगा व्यासंग सुरू केला.

यांनीं आपणास सुदैवानें प्राप्त झालेल्या या सबंध भागवत ग्रंथावर मराठी भाषेंत एक विस्तृत टीका लिहिली. मराठी भाषेंत ज्या पंधरावीस कवींनीं भागवत ग्रंथावर टीका केली आहे, त्यांत सबंध भागवतावर टीका करणार दोघेतिघेच आहेत. त्यांपैकीं जोतिपंतदादा हे एक होत. बाकी बहुतेकांनीं दशमस्कंधावर मात्र तेवढी टीका लिहिलेली आहे. या दृष्टीनें जोतिपंतांची रचना विशेष लक्ष्यांत घेण्याजोगी आहे. याशिवाय दुसरें असें कीं, जोतिपंत दादांची टीका 'अभंगबद्ध' व 'ओंवीबद्ध' अशी दोन प्रकारची आहे, हें आणखी विशेष आहे. या भागवत टीकेशिवाय जोतिपंतांनीं अभंगरचनाहि पुष्कळ केली आहे. हे विठ्ठलभक्त असून

---

१. बुधग्राम वदती जन । बुधासि जाहलें तेथें जनन ।
फलटण देश तो जाण । पवित्र स्थान धन्य ते ॥
——भक्तमंजरी.

२. कोणी म्हणतात ही पोथी यांस प्रत्यक्ष श्रीकृष्णद्वैपायन व्यासांनीं दिली.
' ऐसें अवसरीं । कोण्या भाग्योदयें त्वरी ।
भागवत नौका जगदोद्धारीं । कृष्ण द्वैपायन मज देती ॥'
असा उल्लेख यांचे भागवतांत आला आहे.

पंढरीची यात्रा करीत.

ग्रंथरचनेशिवाय दुसऱ्या एका कामगिरीबद्दल जोतिपंतांची प्रसिद्धि फार आहे. हे एकदां पंढरीस गेले असतां 'मी एक सहस्र देवालयें बांधीन' अशी यांनीं विठ्ठलासमोर प्रतिज्ञा केली; व आजन्मपर्यंत ती खटपट त्यांनीं मोठ्या परिश्रमानें चालू ठेविली. असें म्हणतात कीं, एके वेळीं हे शिष्यसमुदायासह पुणें येथें आले असतां, या आपल्या जुन्या नोकराच्या श्रीमंतांनीं फार गौरव केला. त्यास शिष्यांसह वाड्यांत प्रसादास बोलविलें व त्यांनीं योजल्याप्रमाणें विठ्ठल मंदिरांच्या उभारणीस मदत देण्याचें कबूल केलें. या प्रतिज्ञेप्रमाणें सुमारें साडेसातशें विठ्ठल मंदिरांची उभारणी यांनीं केली. तळेगांवे[1], वाई, माहुली, पाटस, मसूर, कऱ्हाड वगैरे गांवांतील देवळें यांच्याच हातची आहेत. पुणें येथील लकडी पुलावरील व मुंबई येथील विठ्ठलवाडींतील हीं देवालयें यांच्याच हातची आहेत. यांचा हा दीर्घ उद्योग पाहून कोणालाहि मोठें कौतुक वाटेल. कोण ही दांडगी चिकाटी आणि हा अवाढव्य खटाटोप! हजारों मठ स्थापणारे समर्थ व शेंकडों विठ्ठल मंदिरें उभारणारे जोतिपंत हे असले पुरुष महाराष्ट्रास अभिमानास्पद आहेत. जोति-

---

१. तळेगांव दाभाडे येथें देवालय बांधण्याकरतां ते त्या प्रांतीं गेले. या दाभाड्यांचा व ज्योतिपंतांचा पूर्वी पेशव्यांच्या पदरीं असतां चांगला ऋणानुबंध होता. तें आठवून दाभाड्यांनीं सामोरें येऊन ज्योतिपंतास आपल्या वाड्यांत नेलें. ज्योतिपंत गांवांजवळ आले तेव्हां सरदार दाभाडे हा ही खबर

ऐकतां गडबडीनें उठिला । सर्वां सांगे 'दर्शनासी चला ।
ज्योतिपंत साधू होऊन आला । पूर्वी होता आम्हां सवें ॥
कामदार झोक नोकी । चौमुलखीं डंका वाजला कीं ।
लिवणार लई आलौकिकी । पेशवाईंत नाहीं दुजा ऐसा ॥
आतां झाला देव भगत । सोडिलें काम, नोकरी नाहीं करीत ।
देवळेंच बांधित हिंडत । व्यसन लागलें देवाचें ॥'

पुढें दर्शन घेतल्यावर सरदार विनोदानें पंतास म्हणाले—

नोकरी बी लई दीस नाहीं केली । श्रीमंतानीं जागीर बी नाहीं दिली ।
पैक्याची कुठं पेवं होती भरलीं । त्यांचा हिसाब आम्हास न कळे बा ॥

पंतांचें वेळीं रामदासांच्या स्थापनेचें कार्य होऊन गेलें होतें. पण सर्व राष्ट्रास एकजीव करून एक धाग्यानें बांधणें अवश्य होतें. या दृष्टीनें या पुरुषाची ही महाराष्ट्रभर एक तऱ्हेचीं देवालयें उभारण्याची खटपट मौल्यवान आहे. पानपतानंतर असले महात्मे या देवळांतून काय कीर्तनें करीत होते याचा खुलासा होण्यास हल्लीं आणखी पुरावा नाहीं. यांच्या भाषेंत रामदासाचा जिवटपणा नाहीं. किंवा पानपतास गेलेल्या मराठ्या शिपायाची तडफहि नाहीं. यांच्याबद्दल रा. पटवर्धन म्हणतात कीं, ' जोतीपंतांनीं केलेल्या अद्भुत् चमत्कारासंबंधानें आपणास आश्चर्य वाटलें नाहीं, तरी त्यांची लोकोत्तर बुद्धिमत्ता, विलक्षण चिकाटी, अनन्य साधारण धैर्य आणि परोपकारी, निष्कपट व निर्मळ स्वभाव इत्याद्यनेक दिव्य गुणांचा विचार केला म्हणजे मनास एक प्रकारचा आल्हाद वाटून ह्या भगवद्भक्ताविषयीं प्रेम उत्पन्न होतें. ' हें अगदीं खरें आहे.

जोतिपंतदादांनीं भागवतावर टीका केल्यानंतर लोक त्यांना भागवत किंवा महाभागवत असेंच म्हणूं लागले; व हल्लीं त्यांच्या वंशजांसहि हेंच उपनांव लावितात. जोतिपंतदादा शके १७१०-मध्यें मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशीस कैलासवासी जाहले. यांची समाधी व परंपरा सातारा जिल्ह्यांत मौजे चिंचणेर येथें आहे.

जोतिपंतदादांच्या वेळीं 'हरि' या नांवानें आणखी एक कवि महाराष्ट्रांत प्रसिद्ध होता. एक म्हणण्यापेक्षां हरिदास या नांवानें ओळखिले जाणारे दोन कवी जोतिपंतदादांच्या हयातींत होऊन गेले, असेंच म्हणणें ज्यास्त खरें आहे. पहिल्याचें नांव हरिदास. हें त्यास गुरुपदेशानंतर गुरूनें दिलेलें होय. याचें मूळ नांव रघुनाथ. हा गोदावरीच्या काठच्या वाल्मिकी (?) नगरचा राहणारा. यानें आपल्या गुरूचें नांव शांतानंद असें दिलें आहे. याचें गोत्र भारद्वाज असून याच्या कुळांत रामोपासना परंपरेनें चालत आली होती असें दिसतें.

या कवीचा योगवासिष्ठ हा एकच ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. रा. देव म्हणतात--मूळ योगवासिष्ठाच्या ३२००० श्लोकांपैकीं ६००० श्लोक निवडून काढून त्यांवर कोणी काश्मीरस्थ पंडितानें संस्कृतांत भाष्य केलें आहे. त्या भाष्याचा आधार घेऊन,

जयासि वासिष्ठीं परम प्रीती । नाहीं संस्कृती वित्पत्ती ।
तयांसि व्हावी अपरोक्ष प्राप्ति ।.........

या हेतूनें हरिदासानें ही मराठी टीका लिहिली आहे. या टीकेचीं सहा प्रकरणें असून एकंदर ओंवीसंख्या सोळा हजारां ( १६००० ) पेक्षां ज्यास्त आहे. येवढा मोठा ग्रंथ लिहून कवि शेवटच्या प्रकरणांत मोठ्या शालीनतेनें म्हणतो--

परि हा नवलाव अद्भुत । मज मूर्खाचेन मुखें वासिष्ठ ग्रंथ ।
देशभाषा टीका प्राकृत । केली विस्तारित जनहितार्था ।।
देखोनि प्रतापाचें चोज । आश्चर्य वाटे माझेंचि मज ।
बाप कृपाळू रघुराज । निजात्मगुज प्रगट केलें ।।

या ग्रंथाच्या रचनेचा काळ कवीनें--

' वैशाख शुद्ध दशमी । भृगुवासर पूर्व यामीं ।
संवत् सोळा शत दशमी । जाला विस्तार ग्रंथासी ।।'

असा ग्रंथांत दिला आहे.

दुसरा योगवासिष्ठावर टीका लिहिणारा हरिदास हा अचरें येथला राहणारा. याच्या गुरूचें नांव आत्माराम. हा आनंद सांप्रदायी होता. योगवासिष्ठाशिवाय कपिलगीता वगैरे आणखीहि याचे ग्रंथ आहेत.

या योगवासिष्ठकार दोन 'हरिदासां'पेक्षां अगदीं भिन्न असा 'हरिबुवा' या नांवाचा एक मोठा ग्रंथकार या काळीं म्हणजे सतरावें शतकांत होऊन गेला. याचें उपनांव भोंडवें[२]. जात शिंपी. हा विठ्ठलाचा

१. वरील माहिती भा. इ. सं. मं. पुणें, ग्रंथ ७. मधील रा. देवांच्या लेखावरून घेतली आहे.

२. भोंडवें हें याचें उपनांव, असें अनेक ठिकाणीं आढळतें. हा आपल्या ग्रंथांत म्हणतो, 'नामा शिंपी याची कुळी । तेचि आमुची वंशावळी ।।' ( ज्ञानसागर. )

मोठा भक्त असून पंढरीची वारी नेहमीं ,करी. अजूनहि याच्या परंपरेची पालखी पंढरपुरास नित्य जाते. तरी पण यानें गुरूपदेश रामदास-स्वामींच्या परंपरेंतील शिवराम या नांवाच्या एका पुरुषापासून घेतला होता. यानें आपल्या ग्रंथांत रामदास—माधवदास—केशवदास—पुरुषोत्तम—शिमराम - हरि अशी आपली गुरुपरंपरा दिली आहे. हा अहमदनगर जिल्ह्यांत पारनेर येथील राहणारा. याच्या आईबापाचीं नांवें अनुक्रमें बचाई व केरेश्वर अशीं होतीं. याच्या बायकोचें नांव गोडाई. हिचा उल्लेख आपल्या अभंगांत यानें अनेक ठिकाणीं केला आहे. आपल्या ' ज्ञानसागर ' या ग्रंथांत हरिबुवा म्हणतात—

हरि स्त्रियेसहित । गोडी घेऊनि करी परमार्थं ।
उडोनि गेली मायिक भ्रांत । भगवंत प्राप्त उभयतांसीं ॥
हरि आणि हरीचीं गोडी । एकमेकांसी न सोडी ।
नये करितां आवड निवडी । ताडातोडी वेगळीक ॥
साकर आणि गोडपण । काय निवडी दोन ।
हरि गोडी, जीवें प्राणे । जाती शरण संतासीं ॥

अर्थात् वरील उताऱ्यांत ' गोडी ' हें गोडाईचें लाडकें रूप आहे. हा ज्ञानसागर ग्रंथ कवीनें शके १६९५—मध्यें रचिला. याची ग्रंथसंख्या (१७०००) सतरा हजारांवर आहे. या हरिबुवानें याचे पूर्वी पांच वर्षें म्हणजे शके १६९०—मध्येंच हरिबोध हा वेदान्तपर ग्रंथ लिहून पुरा झाल्यावर आपण हाच विषय आणखी विस्तारानें पुन्हा सांगावा असें मनांत आणून आपला ' ज्ञानसागर ' हा मोठा ग्रंथ लिहिला. या दोन ग्रंथांशिवाय पंचीकरण वगैरे आणखीहि ग्रंथ यानें रचिले आहेत; आणि यांखेरीज याची अभंगरचनाहि सुमारें पाऊण लक्ष आहे. हरिबुवा हे शके १६९०.—मध्यें समाधिस्थ झाले. यांची समाधी नारायणगांवीं आहे.

आतां या सतराव्या शतकांतील अखेरचे आणखी एकदोन लहान कवी सांगून हें प्रकरण पुरें करूं. या लहान कवींपैकीं भिक्षु कवि हा

बराच प्रसिद्ध आहे. याची चरित्रात्मक माहिती मुळींच उपलब्ध नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. यानें रचिलेला 'भक्तिअनुभव' या नांवाचा दोन हजार ओंव्यांचा एक ग्रंथ उपलब्ध आहे. त्याचे वीस अध्याय असून उद्धगीतेवर ही मराठी टीका आहे. ग्रंथाचे शेवटीं समाप्तिकाल पुढीलप्रमाणें दिला आहे —

स्वस्ति श्रीशक शालिवाहन। सोळा शत शाहाण्णव जाण।
जय नाम संवत्सर नामाभिधान! माघ शुद्ध प्रतिपदा॥
बुधवार तिसरे प्रहरीं। सुरे ग्राम मुक्कामांतरीं।
ग्रंथ समाप्त निर्धारी। महिमा थोर गुरूचा॥

याच्या या गुरूचें नांव आत्माराम. आत्मारामाच्या आधींचे पुरुष योगेश्वर व भिक्षु[1] हे होत. या म्हणजे आत्मारामशिष्य भिक्षु कवीचे कांहीं कटिबंधहि आहेत. द्रौपदीवस्त्रहरणावर याचे एक चोवीस कडव्यांचें चांगलें कवन आहे. या करुणारसपर प्रसंगावर मराठींत अनेक कवींनीं कवनें रचिलीं आहेत. त्यांपैकीं मुलींच्या गाण्यांतला नरहरीचा 'द्रौपदीचा धावा' प्रसिद्ध आहे.

दोन प्रहर रात्र झाली ऋषि आले भोजना।
निद्रिस्त आम्ही होतों त्यांनीं केली गर्जना॥

मोरोपंतांच्या समकालीन कवींपैकीं तसेंच त्यांच्या पाठोपाठ होऊन गेलेल्या कवींपैकीं अनेकांनीं आपल्या रचनेंत पंतांचें आर्यावृत्त घेतलें आहे. पंतांच्या हजारों गोड आर्या वाचिल्यानंतर व त्यांच्या त्या

---

१. 'भिक्षु' व 'भिका' हे दोन्ही पुरुष एकच होत असें समजतात. 'भिका' ऊर्फ 'भिका मुनि' ची बरीच कृती आहे. याचे अभंगावरून हा दत्तात्रयाचा उपासक दिसतो. याचा एक अभंग देतों.

देवराया स्वामीरामा। दत्तराया कृपालया॥
तुझा लागो मज वेध। आणिकाचा नको छंद॥
तुझा वीसर न व्हावा। ध्यास लागो माझ्या जीवा॥
तुझी मूर्ती माझे ध्यानीं। सदा असो...पाणी॥
मन राहो निज ठायीं। मस्तक ठेवियला पायीं॥
तुजवीण नेणें कांहीं। भिका विनवीतो पाहीं॥

गोडीची चटक जिभेला लागल्यानंतर या कवींच्या जिभेनेंहि आर्या म्हणूं लागावें हें अगदीं साहजिक आहे. सुदामचरित्रकार कृष्णदास, गयगंधर्व आख्यान रचणारा पांडुरंग, सारिपाट म्हणणारा मुकुंद, वीरमणी कथा कथन करणारा राघव, गोपीचंदाची गोष्ट सांगणारा सखोबा नाईक, पुतनाख्यान ऐकवून पुनित करणारा पुंडलीक भट, या सर्वांनीं आपल्या प्रबंधांत मधून मधून आर्या योजिल्या आहेत. तसेंच जगजीवन, रविदास, भास्कर या कवींनींहि आपल्या काव्यांत मधून मधून आर्या घातल्या आहेत; आणि त्यांपैकीं पुष्कळ पंतांच्या थाटाच्या आहेत. भास्करानें अनेक वृत्तात्मक गणपतिस्वयंवर रचिला आहे. त्यांतल्या श्रीगणेशाचें लग्न झाल्यावरच्या वर्णनाच्या दोन आर्या देतों—

सवधू पुत्र शिवांकीं बैसवितां तोष तो उमापतिला ॥
मापतिला सुरपतिला देवगणालाहि तो उमाप तिला ॥
वाजति मंगल वाद्यें गाती गंधर्व नाचती रंभा ॥
मुनि वेदघोष करिती वर्णावें काय त्या समारंभा ॥

रविदासाच्या ‘ कुबेरलक्ष्मीगर्वहरणां ’तल्या आर्याहि याच धर्तीच्या आहेत. प्रारंभींची पहिलीच आर्या पहा—

गणपति वाग्देवीसह श्रीसद्‌गुरुच्या प्रणम्य हा चरणीं ।
त्यांविण त्रिभुवनिं नाहीं अन्य स्तवनीय मंगलाचरणीं ॥

या दोघांपेक्षांहि जीवनदासाच्या ‘ मयशक्तिचरित्रां ’तल्या आर्या पंतकृतीची ज्यास्त आठवण करून देतात. मय हा असुरांचा शिल्पशास्त्रज्ञ कारागीर. हा रावणाचा सासरा. मंदोदरीचा बाप. यानें या मुलीच्या लग्नानिमित्त तिचीच बहीण जी अमोघाशक्ति ती

... ...मयजेची स्वसा शक्तिबाळा ।
मयें आंदण दीधली रावणाला ॥

आणि पुढें हीच अमोघाशक्ति दशकंठानें, दशरथ राजाच्या धाकट्या मुलावर सोडिली. त्या वेळीं—

मयजा वदे 'कसें हें माझें दुर्दैव आडवें पडलें ।
तद्वत बुद्धि नृपातें केलें जें कर्म तें तसें घडलें ।।
कर्मानुसार होते प्राण्याची मति कदापि तें न टळे ।
खुटले यत्न न चाले सर्वांचें सूत्र एकदां सुटले ।

या रविदासानें पंतांचे शब्द घेऊन पंतांच्याच आर्यावृत्तांतलीं पद्यें रचिलीं आहेत असें या आर्यांवरून दिसतें. पुष्कळांनीं आर्या रचतांना मोरोपंती शब्द व मोरोपंती यमकें यांचा सढळ हातानें उपयोग केलेला दिसतो. पण काशिकवि या नांवाच्या कवीनें मोरोपंतांची सबंध शब्दवटिका घेऊन तींत थोडी पदरची भर घालून आणि तिची जरा निराळी मांडणी करून आपल्या कांहीं पद्यमणिमाला तयार केल्या आहेत. वामनाचीं पद्यें घेऊन त्यांवर जो संस्कार करून पंतांनीं आपली गीता बनविली त्याच प्रकारचा पंतांच्या काव्यावर संस्कार करून काशिकवीनें आपलें कवन बनविलें, असें तें वाचून सहज मनांत येतें. आतां खरोखरीच पंतकाव्याची प्रतिमा काशिकवीनें केली हें जर खरें मानलें तर एका दृष्टीनें या शिष्यानें गुरुवरहि थोडी ताण केली असें म्हणावें लागेल. पंतांच्या कृतींत जी विद्वत्ता दिसते ती काशिकवीच्या नकलेंत दिसत नाहीं. पण काशिकवीच्या शब्दांची मांडणी पतांच्या योजनेपेक्षांहि मृदु आणि मोहक दिसते. रसभंग लवमात्र होऊं न देतां कानांत शब्द पडल्यावरोबर हृदयांत त्यांचा अर्थ तावडतोव उतरावा अशी याची रचना अगदीं साधी आहे. काशिकवीचें—

'भीमकबाळा म्हणे नृपाळा त्या शिशुपाळा मी न वरी ।
कमलनयन हरि विमलचरित तो नवरा त्याची मी नवरी ।।'

हें कवन वाचून वरील लिहिण्याचा प्रत्यय कोणासहि येईल. हें कवन म्हणण्याला सरळ आणि अर्थाला रसाळ आहे. याप्रमाणेंच

'भूमीबाळा म्हणे नृपाळा त्या दशकंठा मी न वरी ।
कमलनयन रघुराज धनुर्धर तो नवरा त्याची मी नवरी ।।'

हेंहि कवन असेंच आहे. आतां याचें तिसरें एक असेंच सोपें व गोड कवन आहे. तें येथें देऊन हा भाग पुरा करितों.

हरिची भगिनी म्हणे सुभद्रा रुक्मिणीवहिनी दया करा।
दादाला तुम्हि कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥
आइबापांचा श्रीकृष्णांचा विचार मोडुनि बळदेवें ।
दुराग्रहानें निश्चय केला सुयोधनाला मज द्यावें ॥
भाउ नव्हे हा बाउच केवळ भावुनि मनांत उमजावें ।
वडिल बंधु परि अडिल खोडकर खळाकडिल हें समजावें ॥
हंसा टाकुनि काय वायसा मुक्ताफळ हें अर्पावें ।
जन्मांतरिचा वैरी भाऊ असें यावरुन वळखावें ।
अपाय याला उपाय न सुचे काय करावें विष खावें ॥
दुर्योधन खळ हेला मेला गेला उलथुन पोट भरा ।
दादाला तुम्ही कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥ १ ॥
भावोजींचा निरोप घेउन गेला तीर्थां हिंड फिरा ।
कोण्या जागीं न कळे आहे जागा किंवा नीदपुरा ? ॥
तडी तापडी किंवा कापडी होउनि गेला काशिपुरा ।
आवडिनें कीं कावडि नेल्या सेतुबंध रामेश्वरा ॥
गंगा यमुना तापी तुंगा कृष्णा रेवा हरिद्वारा ।
यांच्या पुलिनीं रम्य साधूंच्या मंडळिमध्यें असेल खरा ॥
कांटकबं करनाटक व्यंकटपतिसह पाहुनि करवीरा
पंढरपूर भूवैकुंठाला आला हरिजन माहेरा ॥
पुंडलिकानें कान फुंकिले केला चेला संत पुरा ।
दादाला तुम्ही कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥ २ ॥
किंवा अमराधीशें नेले अमरावतिला निज कुमरा ।
तिलोत्तमा उर्वशी मेनिका रंभादिक ज्या सुराप्सरा ॥
असला सुंदर ठसला असला भुलवुनि नेला त्यांणि घरा।
हंसला बसला घुसला फसला जाउनि तेथें खरा खुरा ॥
अथवा झाला असेल साधू शोधुनि सगळी वसुंधरा ।
प्राणाधिक जो आणा घालुनि आणावा वर पार्थ हिरा ॥

अर्जुन घेऊन कशास कोणा गर्जुन मज भय नाही जरा।
अर्जुन वर्जुन देह विसर्जन वाटे मजला मृत्यु बरा ॥
तो बैरागी तरी वैरागिण होईन जाइन दिगंतरा।
दादाला तुह्मी कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥ ३ ॥
मज हर रिपु हा जहर कहर करि लहर आलि बाई धरा धरा।
पळ पळ युगसम वाटे; अनुभव पहिला वहिनी मनीं स्मरा ॥
काल रात्रि म्यां स्वप्न देखिलें जणों पूजियें गौरिहरा।
गौरव करुनी गौरीनें हा प्रसाद दिधला हार तुरा ॥
'कौरवपतिला रौरव होइल' बोले ऐसी दिव्य गिरा।
'जाइल बाइल करुनि यती तुज वाइल कंठी नरनौरा ॥
यति नोहे यावरुनि गमतो पति अर्जुनजिचा तो चेहरा।
खुणा पाहतां उणा नसे तिळ; खूणा सगळी तुम्हीं स्मरा।
शुभ चिन्हें हीं देहीं सांगतों काशिकवीचा ठिक होरा।
दादाला तुम्हि कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥ ४ ॥

या काशिकवी प्रमाणेंच ठसकेदार असे फटके या काळीं महाराष्ट्रांत अनेक कवींनीं रचलेले आहेत. हे फटके जमलेल्या जनसमूहांत खड्या सुरांत म्हटले असतां द्रव्य आणि कीर्ती यांचा लाभ सहज घडे. शिवाय हे गाण्याला मोठासा नाजुक कमावलेला गळा किंवा सुराचे ज्ञान यांचीहि आवश्यकता फारशी लागत नाहीं. आणि इतर सामुग्रीही बेताचीच पुरते. तसेंच हे गरीबाच्या आंगण्यापासून श्रीमंतांच्या बैठकांपर्यंत सर्वभर चालूं शकतात. यामुळें यांची रचना, यांचें गायन व यांचा प्रसार सहज होऊं शकतो. या काळच्या फटके गाणाऱ्या मंडळींत रामचंद्र या नांवाचा एक रचनाकार आढळतो. हा रामचंद्र प्रसिद्ध सोलापुरकर रामजोशाहून भिन्न पुरुष होय.

रामजोशांप्रमाणेंच संस्कृत थाटाची सुंदर झोंकदार लावणी करणारा दुसरा शाहीर गंगाधर हा होता. एका सुंदरीचें वर्णन यानें एका कवनांत केलें आहे. त्यांतून दोन चौक देतों—

श्रवणि कृतिका पुंज सुढाळ मंदस्मित भाषणी । निराळीं निश्चळ सौदामिनीं ।। रक्त ( कृष्ण ? ) विलोहित मुक्त पल्लवी चिरगति चिर गामिनी ।। सभासद रूप रेखिब सद्गुणी ।। उभय पयोधर भव्य कंचुकी मीन केतना भ्रंशिनी ।। विलासी निमग्न नट भामिनी ।।
रत्नखाणी द्विज पंक्तीं सुक्ष्म चुबुकीं नील व्यजन ।।
स्फटिक सकाश रजतनूपुर मनोहर सुभ लक्षणी ।। गुणालय पवित्र मंदाकिनी ।। सत्य शौच नियम निगती धार्मिक कुलवर्धिनी । श्रौत स्मार्त वीधी गौरी अर्चा विधिवत् शिवपूजनी । यथातव अनुकुल निजभुवनी । बापु प्रभाकर रसिक सुवक्ता 'गंगाधर' गुणिजन ।। निरंतर अलिकुल मदमंजन ।।

यांत बापु प्रभाकर हें एक व्यक्तीचें नांव असावें असें दिसतें. पण बापु व प्रभाकर हे दोन निराळे शाहीर होते. दादावीर, बापु, प्रभाकर ही सर्व मंडळी गंगुहैबतीच्या फडांतली. या सर्वांत प्रभाकर हा विशेष प्रसिद्ध आहे. यानें श्रीमंतीचा पूर्ण थाट आपल्या लहानपणांत पाहिला होता. मोठया मोठया सरदारांच्या घरांतलीं राहणी, त्यांच्या मेजवान्या वगैरेंचा याला प्रत्यक्ष अनुभव होता. अशा एका मेजवानीच्या वेळीं वाढणाऱ्या सरदारणीचें वर्णन प्रभाकरानें केलें आहे—

मोहनी जशी सुरसभेंमधीं अमृत वाढी करीं । तशी नार पंगतींत आग्रह करी ।। गर्भ श्रीमंतिण सहज जिचा सर्वांवर वारसा । हालवी रूप सुंदर आरसा । चतुर स्त्रियांची धनिण ऐन आलीं भर रसा । कुणा-सवें शब्द न करी फारसा! ...दुधीं कांचन-झाऱ्या भरून । घ्या घ्या, म्हणें आदरें करून । हावभाव दावी पदरावरून ।। वरून सितेचें रूप वनीं । भुलवी रामशंकरी । तशी नार पंगतित आग्रह करी ।।
ठाईं ठाईं ठेवि दागिने तळीं लगबगित, नावरी । शरिर सुकुमार कीं गुल दावरी । पंकजनयना शुभाननी चाले ठमकत बावरी । कुण्यातरी सरदाराची नोवरी । पात्र पाहुन उभी राहुन जरा नजर करी ज्यांवरी । उजेड पडे चपळे परि त्यांवरी । लोकांस चंद्री लागली । नाहि शुद्ध राहिली । अशि नार सुगर चांगली । स्वच्छंदामधीं घाली गुंजारव वनीं मधुकरी । तशि नार इ.

नभरंगाचे वसन कटी निरी चोंगिव ना फुटे। पदर पल्लेदार मागें सुटें।
सतेज सरी शोभति वरी दाट जरीचे बुटे। चमक जणु नक्षत्रांचीं सुटे।
धन्य धन्य निर्मिता विधि नाहिं विसरला कुठे। केवळ धगधगित तारा तुटे।

दसऱ्याचें शिलंगण, दिवाळीचीं नहाणीं, शिमग्यांतली होळी, वसंत पंचमी, वगैरेंची वर्णनें प्रभाकरानें स्वतः ते ते प्रसंग पाहिले असल्यामुळें फारच बहारीचीं वठलीं आहेत. पुत्रकांक्षिणी स्त्रीची तळमळ, पुत्रोत्सवाचा आनंद हीं कवनें वात्सल्यरसानें थबथबलेलीं आहेत. प्रसंग मोठा असो कीं अगदीं साधा नित्यांतला असो, त्याचें चित्र प्रभाकर असें काढतो कीं त्याच्या जुळणीची प्रभा पाहून हा खरोखरच शब्दसृष्टीचा प्रभाकर आहे असें वाटतें.

रामजोशांचेंच नांवाचा पण त्यांच्याहून बराच कमी दर्जाचा असा रामचंद्र या नांवाचा आणखी एक शाहीर होऊन गेला असें दिसतें.

नूतन वय मुखचंद्र जसा पूर्ण तेज अंबरीं। धन्य हे कांता सृष्टीवरी ॥

ही लावणी या रामचंद्राची दिसते. हिचे शेवटीं—

'रामचंद्र कवि म्हणे सकल सौभाग्यसुंदरी खरी। धन्य हे कांता सृष्टिवरी।'

असें कवीचें नांव आहे.

प्रियपात्रा, गुण पवित्रा, प्रीतिमित्रा। अरे राजसा, तूं माझ्या शिरींच्या शिरछत्रा ॥

वर्णनपर लावणी याचीच होय. याच्या जशा लावण्या आहेत तसे फटकेहि आहेत. याच्या एका फटक्याचा प्रारंभ असा:—

भली भलाई कर कांहीं मर्दा गुण ठेवुन जारे।
या अवनीवर कितीक जाहले आणिक होणारे ॥

या कवनाच्या शेवटीं—

' ज्याची समसमान दृष्टी। त्याला मानिती सकळ सृष्टी॥ अंती पावेल जगजेठी। म्हणे ' राम जोशी ' संज्ञा चतुरें॥ '

या रामचंद्र वगैरे कवींचे अनेक फटके ठिकठिकाणीं वारंवार आढळतात. हा वर रामचंद्र कवींचा थोडा फटका दिला आहे. असल्या प्रकारचीं कवनें ज्यांची उपलब्ध आहेत, त्या सर्वांत अनंत फंदी हा

फार प्रसिद्ध आहे. अनंत फंदीची रचना तऱ्हेतऱ्हेची आहे. त्याचीं पदें आहेत, त्याच्या लावण्या आहेत, त्याचे फटके आहेत; व त्याची थोडीशी ओंवीबद्ध रचनाहि आहे. पण फंदीबोवांना 'महाराष्ट्रसारस्वताच्या कीर्तिमंडळांत' अढळस्थान मिळालें आहे, तें इतर रचनेपेक्षां त्यांच्या फटक्यांमुळें व लावण्यांमुळेंच होय. हे स्वतः तमासगिराचा धंदा करीत. व त्यांत स्वतः रचिलेल्या लावण्या म्हणत. तमाशांत यांचे साथी मलक फंदी, रतन फंदी, राघव फंदी वगैरे इसम असत. ही सर्व मंडळी कोणा भवानीबावा नांवाच्या एका पुरुषास आपल्या गुरुस्थानीं मानीत. कोणी कोणी म्हणतात कीं, या भवानीबुवांच्याच अनुग्रहामुळें फंदीबुवा कवित्व करूं लागले. फंदीबुवा हे अहमदनगर जिल्ह्यांतील संगमनेर येथील राहणारे. यांच्या आईचें नांव राऊबाई. कांहीं ठिकाणीं यांच्या बापाचें नांव भवानीबावा असें आढळतें. पण भवानीबावा हे यांचे वडील नसून गुरू होत, असें बरेच लोक समजतात. यांचा जन्म शके १६६६ रक्ताक्षी संवत्सरीं झाला. हे यजुर्वेदी कौंडिण्यगोत्रीं ब्राम्हण. उपनांव घोलप. यांच्या घरचा पिढीजाद धंदा सराफीचा असे. पण अनंत फंदी यांचें लक्ष केव्हांहि ह्या धंद्यांत असलेलें दिसत नाहीं. हे लहानपणापासूनच व्रात्य चाळे करून उनाडक्या करीत. पुढें पुढें तर हे फंद इतके वाढले कीं, जनलोक यांस फंदीबुवा असेंच म्हणूं लागले; व अखेर हें यांचें नांवच पडून गेलें. यांच्या स्त्रीचें नांव म्हाळसाबाई. यांस श्रीपती या नांवाचा एक मुलगा होता. हा आपणास 'सवाई फंदी' असें म्हणवी व स्वतः कवनें करी.

अनंतफंदींची रचना व ती म्हणण्याची धाटणी इतकी रसाळ होती कीं त्यांच्या तमाशावर लोकांच्या झुंडी पडत. यांचा तमाशा म्हटला म्हणजे सभोंवतीं हजारों लोकांचें कडें पडावें, अवशीप्रहरापासून मंडळी जी बसावी ती सकाळीं चांगलें फटफटीत उजाडेपर्यंत तेथून हालूंच नये. जसे गारोड्याच्या पुंगीनें नाग गुंगून डोलतो तसे लोक यांच्या या कवनानें गुंगून डोलूं लागत. असें सांगतात कीं, हे एके वेळीं

माळव्यांतून परत घरीं संगमनेरीं येत असतां वाटेंत यांना भिल्लांनीं गांठून लुटलें. त्यावेळीं त्यांनीं त्या भिल्लांसमोर तमाशा केला; व त्यांच्या नाईकावर लावणी रचून तेथेच ती म्हटली. ती ऐकून ते सर्व भिल्ल आणि त्यांचा नाईक खूष झाला; 'आला सात्विकपणाचा उमाळा;' आणि त्या मंडळींनीं फंदीबुवांची हिरावून घेतलेली सर्व चीजवस्त त्यांस परत दिली; इतकेंच नव्हे तर आणखी बिदागीहि दिली !

अनंतफंदींच्या लावण्यांपेक्षां त्यांचे फटकेच पुष्कळांचे तोंडून ऐकूं येतात. ' लंडगुंडे हिरसे तट्टूं यांची संगत धरूं नको ' हा फटका तर आबालवृद्धांच्या चांगला परिचयाचा आहे. यांतला मार्मिक उपदेश सर्वांना पटण्याजोगा आहे. ' वर्म काढुनी शरमायाला उणे कोणाला बोलूं नको.... कर्ज बाजारी होऊनी बहु तूं बोज आपुला दवडु नको । स्नेहासाठीं पदरमोड कर, पण जामिन कोणा राहु नको ।' इत्यादि सूत्रें सर्वांना पटवून, हीं वागणुकीचीं आणि व्यवहाराचीं मूलतत्वें सदाकाळ लोकांच्या कानावरून जात राहावीं हा या फटक्यांचा थोर उपयोग आहे; व या कवींची ही असली कामगिरी अनेक दृष्टींनीं फार महत्वाची आहे. रात्रीचे वेळीं करमणुकीकरतां शृंगारपर लावण्या म्हणतांना त्याच बैठकींत असल्या फटक्यांनीं व्यवहाराची दीक्षा मिळावी व शेवटीं—

' दे टाकुनि छंद वावुगे फंद विषयाची काय मजा । हरि नामाची लावी ध्वजा ।। असार हा संसार त्यजा ।। तमो गुणाला द्या हो रजा ।। रजसत्वाची करा पुजा । क्षमाशांति मनीं धरा जा ।। '

असला उपदेश कानांवर यावा हें खरोखरीच उचित आहे. आपल्या इकडील शाहीर मंडळीचा एक विशेष असा आहे कीं, कोणीहि शाहीर कितीहि शृंगाररसाचा चाहता असो, पण त्याचें ईश्वरस्तवनपर आणि सन्मार्गदर्शनपर कवन अगदीं नाहीं असें कधींहि घडावयाचें नाहीं. आणि यावरूनच या देशांतील लोकांच्या मनोवृत्ती व पृथ्वीवरील इतर देशांतील लोकांच्या मनोवृत्ती यांमधील फरक किंवा अंतर स्पष्ट दिसून येतें.

अनंत फंदीचे तमाशे ऐन जोरानें चालू असतांना एके वेळीं त्यांची व सती अहिल्याबाई होळकरीण यांची गांठ पडली. तेव्हां बाईनीं फंदीबुवांस मोठ्या कळवळ्यानें उपदेश केला कीं, 'तुम्ही ब्राह्मण असून तमाशा करतां हें नीट नाहीं. तुम्हांस परमेश्वरानें साधुतुल्य वाणी दिली आहे, तिचा उपयोग लोकांचीं मनें विषयासक्ततेकडे लावण्यांत न करतां, लोकांस परमेश्वराच्या भक्तिमार्गाकडे वळविण्यांत करावा हें योग्य आहे.' बाईचा उपदेश ऐकून फंदीबुवांचे मनास थोडी उपरती झाली व ते पुढें कीर्तन करूं लागले. त्यांनीं तमासगिराची वृत्ति टाकून हरिदासाची वृत्ति पत्करिली व ते गांवोगांव कथा करूं लागले. वाणी मूळचीच रसाळ असल्यामुळें हाहि पेहराव त्यांना ठीक साधला; व लोकांची गर्दी त्यांचे कीर्तनास जमूं लागली. एकदां कीर्तनाकडे फंदींचा भर वळल्यावर ते त्याच पेशानें वर्तूं लागले.

एके दिवशीं पुण्यांत बेलबागेचे सभामंडपांत फंदीबुवांचें कीर्तन चाललें होतें; व मंडळीहि फार जमून कीर्तनाला चांगला रंग आला होता. इतक्यांत पेशव्यांचे नवीन कारभारी सदाशिव माणकेश्वर यांची स्वारी तेथें आली. हे पूर्वीं कथाकीर्तनेंच करीत असत. पण तीं सोडून देऊन आतां ते राजकारणांत पडून श्रीमंतांचा कारभार पाहूं लागले होते. हे आल्यावर कीर्तन जरा थांबलें; व सदाशिव माणकेश्वर बसण्यासाठीं लोडाकडे जातां जातां फंदीबुवांकडे पाहून सहज म्हणाले 'हें केव्हांपासून धरलें!' नवीन कारभाऱ्यांची खोंच लक्ष्यांत आणून बुवांनीं चटकन उत्तर दिलें 'आपण विणा खालीं ठेवला, तोच आम्हीं उचलून हातीं घेतला.'

अनंत फंदींच्या अशाच समयसूचकतेच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. या समयसूचकतेमुळें यांच्या वेळच्या इतर शाहीर मंडळींवर यांचें वजन फार चांगलें असें. यांनीं त्या काळच्या तरवार बहादुरांवरहि अनेक कवनें केलीं आहेत; व तीं ऐकतांना आणि

वाचतांना एक तऱ्हेचा विशेष आनंद होतो. शेवटच्या रावबाजीवरील यांचा एक पवाडा तर फारच प्रसिद्ध आहे. 'श्रीमंत सवाई नांव पावले। दिव्य तनू जणूं चित्र बाहुलें' हा सवाई माधवरावाच्या प्रसिद्ध खर्ड्याच्या स्वारीचा पवाडाहि वर्णनाच्या दृष्टीनें चांगला साधला आहे.

अनंत फंदींचें वर्णन त्यांच्याच योग्यतेच्या एका शाहीरानें फार मार्मिकपणानें केलें आहे. तो शाहीर म्हणतो—

फंदी अनंत कवनाचा सागर। अजिक्य ज्याचा हात खंडा।
चमत्कार चहुंकडे डोलतो। सृष्टीवर ज्याचा झेंडा॥
मूळ संगमनेर ठिकाण त्याचें। कीर्ती उदय जैसा अर्की।
नविन तऱ्हा नारळी डोईला। पदर पागोट्याची फिरकी॥
वाचावंत संपत्ति सारखी। बहुतांचें तनमन हरकी।
लांगे लुंगे कवि भेदरले। अवघ्यांवर त्याची गुर्की॥
समोर गातां कोणि टिकेना। मनामधीं बसली कर्की।
धन ज्याचा हातचा मळ। केवळ तो रुप्यांचा हुंडा॥
फंदी अनंदी छंदी वरदी। ब्राह्मण त्यावर गुरुकृपा।
सरस्वती जिव्हाग्रि अक्षयी। भंग नसे ज्याच्या हरपा॥
कवन बहुत उदरामधि भरलें। फणस जसा मोठा कापा।
भाळी त्रिपुंड् टिळा केशरी। कस्तुरिका वरती छापा॥
मोठमोठ्या राज्यामधि महशूर। जगजाहीर चारी तर्फा।
अकट बिकट कवनाच्या चाली। नित्य नव्या अक्षयी थापा॥
विद्या अभिमान नाहीं जयाला। असा कवि कंचा धुंडा।
नांवाचें चांदणें जगाचें। मुख्य मुख्य खासे खासे॥
कीर्तनरंगीं सडा घालिती। मानवला सर्वत्रासी असे।
पुढें मागें ऐसा नसे दुसरा। मृत्युलोकिंचा रहिवासी॥
पहावें रत्न पंधरावें; माता। धन्य जन्मली हे त्यासी।
असा पुरुष चिरकाल असावा। गुण निर्गुण पंडितराशी॥
होनाजी बाळा म्हणे जगावा। बहुतकाळ आयुष्य यासीं।
अवीट ज्याची करणि ऐकतां। देह प्राण होतो थंडा।
गुरव त्याचे संगे सोबती। कुशलकला जाणे उदंडा॥

ही एकाच पेशाच्या समकालीन शाहिरानें आपल्याच पेशाच्या दुसऱ्या शाहिराची केलेली स्तुति वाचून फंदिबाबांची त्या वेळीं कशी

छाप होती हे चांगलें दिसतें. यांनीं रचिलेला 'श्रीमाधवनिधनग्रंथ' या नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांत श्रीमंत सवाईमाधवराव साहेबांनीं वाड्यांत उडी टाकल्यांपासून तों शेवटले बाजीरावसाहेब गादीवर येईपर्यंतच्या हकीकतीचें वर्णन केलें आहे. या कथानकाचे हल्लीं सहाच अध्याय उपलब्ध आहेत. हें कथानक फार गोड असल्यामुळें काव्य या नात्यानें तर तें संग्रहणीय आहेच. परंतु हें, बाजीरावसाहेबांनीं स्वहस्तें सर्व हकीकतीचा मजकूर लिहून, मग त्याप्रमाणें कवीकडून रचविलें असल्यामुळें ऐतिहासिक दृष्टयाहि आदरास योग्य आहे. यांत म्हटलें आहे कीं,

हें कथानक राघवपुत्रें । आपुल्या स्वहस्तें लिहिलीं पत्रें ।
त्या पत्रांवरून हि चरित्रें । कवीनें कविता केली असे ॥
यांत पदरचें नाहीं यत्किंचित । बाजी रघुनाथ साक्षभूत ।
टीका केली प्राकृत । लहानथोरांस समजावया ॥

अनंतफंदी हे शके १७४३-मध्यें समाधिस्थ झाले. यांचे मागें यांचा पुत्र श्रीपदफंदी ऊर्फ सवाई फंदी हा बरेच दिवस होता. आपल्या वडिलांप्रमाणेंच हाहि कवनें रची व कीर्तन करी. कवनें करण्याचा गुण फंदींच्या पुढील वंशजांतहि होता.

---

१. महाराष्ट्रांत पेशव्यांसंबंधानें रचिलेलीं प्रकरणें एके वेळीं बरींच असावींत असें दिसतें. 'चचा भतिजा लढे आपसमें' अशा प्रारंभाचें एक प्रकरण आहे. एक श्लोकबद्ध 'परशुरामचरित्र' या नांवाचा ग्रंथ मद्रासच्या पुस्तकसंग्रहांत आहे. वास्तविक पाहतां ग्रंथास श्रीमंतउत्कर्ष अशासारखेंच कांहीं नांव पाहिजे. यांत थोरले माधवरावाची स्त्री रमाबाई यांनीं सहगमन केल्यापर्यंतची व नारायणराव गादीवर बसेपर्यंतची हकीकत आली आहे. मद्रास येथील प्रत इ. स. १८०६-मध्यें केलेली नकल आहे.

परंतु या 'माधवनिधन' काव्याचे पांच अध्याय मूळ असून शेवटला सहावा अध्याय प्रक्षिप्त असावा असें उघड दिसतें. सहाव्या अध्यायाचे शेवटीं 'हे बाजी रघुनाथाच्या पत्राधारें लिहितो' असें म्हटलेलें नाहीं; आणि हा असला मजकूर बाजीरावसाहेब आपल्या हातानें लिहून देतील हें केव्हांहि संभवणार नाही. असो.



# शाहीर



एकंदर वाङ्मयापैकीं जो जो भाग हृदयाला आनंद देणारा व मनाला मोहून टाकणारा असेल त्या सर्वांचा समावेश सारस्वतांत होतो; आणि म्हणूनच महाराष्ट्र सारस्वताचा धागा जसा लहान मोठ्या कवींच्या काव्यांत आहे तसाच तो तोंडानें गाइलेल्या लहान मोठ्या इतर कवनांतहि आहे. सारस्वताचा एक धागा कटावांत आहे, एक धागा लावण्यांत आहे, एक धागा पवाड्यांत आहे, इतकेंच नव्हे तर बायकांच्या कहाण्यांत व मुलींच्या झोंपाळ्यावर बसून म्हणावयाच्या ओंव्यांतहि सारस्वताचे धागे आहेत. या सर्वांत मराठी भाषेचें नागरपण आहे; सर्वांत सारस्वतीची प्रतिमा आहे; व या सर्वांपासून मनाला एक तऱ्हेचा आनंद होतो यांत संशय नाहीं. हें सर्व वाङ्मय निःसंशय सारस्वत आहे. मग तें लिहिलेलें असो वा नसो. स्त्रियांचीं गाणीं, कहाण्या, ओंव्या हे सर्व प्रकार समाजाच्या सर्व प्रकारच्या अवस्थेंत निर्माण होतात. परंतु इतर गोष्टींप्रमाणें संपन्नतेच्या आणि ऐश्वर्याच्या काळाच्या रचनेंत जें माधुर्य व ओज दृष्टीस पडतें तें पडत्या काळाच्या रचनेंत केव्हांहि दिसत नाहीं. मराठेशाहीचें ऐश्वर्य ज्यांत प्रतिबिंबित आहे अशीं गाणीं व ओंव्या अजूनहि मुलींच्या तोंडून नेहमीं कानावर येतात.

पवाडे आणि लावण्या हीं तर राष्ट्राच्या ऐश्वर्यवसंतांतच भरास येतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. वास्तविक पाहतां कवनाचे हे दोन प्रकार म्हणजे निरनिराळ्या, किंबहुना एकमेकांस विरोधी व भिन्न अशा दोन रसांचे पोषाक आहेत. योग्य पराक्रम आणि तोंडांत बोट घालण्यासारखीं वीरांनीं केलेलीं शौर्याचीं कृत्यें हीं जसे पवाड्यांचे योग्य विषय होत, तसेंच तरुणांचे श्रृंगार हे लावण्यांना योग्य विषय होत. वीररसाशिवाय पवाड्याची बहार नाहीं आणि श्रृंगाराशिवाय लावणीची मजा नाहीं. असे हे कवनाचे दोन प्रकार बाहेरून दिसण्यांत जरा विरोधी

दिसतात खरे, परंतु ते विरोधी किंवा भिन्न नसून ती एकाच वीररसाची दोन अंगें आहेत, दोन निराळीं रूपें आहेत. या दोहींची बहार, या दोहोंचाहि भर, भरल्या गांवात आणि राहत्या घरांत येत नाहीं. रणांगणाची दिव्य भूमी, त्या काळची मनाची आतुर स्थिति, ' चालली घडी ती आपली उद्यांची कोण जाणे ' ही वृत्ति, अशी सामुग्री असेल तेथेंच या कवनांचें पूर्ण स्वारस्य व अद्भुत रंग दृष्टीस पडतील; आणि ज्या पुरुषांच्या अंगांत व तसेंच ज्या राष्ट्राच्या अंगांत सामर्थ्य आणि वीररस पूर्णपणें खेळत असतील त्यांनाच हीं दोन्हीं तऱ्हेचीं कवनें सुचतील, त्यांनाच तीं आवडतील, त्यांनाच त्यांचे रहस्य व मर्म कळेल, आणि त्यांनाच त्यांपासून आनंदाच्या गुदगुल्या होतील. ज्यांना असलीं काव्यें आवडतनाशीं झालीं; ज्यांना तीं अप्रयोजक वाटूं लागलीं त्यांच्यांतून वीररस जात चालला, जाईल, किंवा गेला असें निःसंशय समजावें. हे प्रकार टाकून राष्ट्रानें एकदां शिष्टमन्यतेचें पांघरूण पांघरलें म्हणजे, ज्या मानानें ज्योतिषाचा आणि वेदान्ताचा अम्मल त्यावर चढत जाईल त्या मानानें, तें, गाढ निद्रेंत आणि बुडत्या पंथास लागलें असें मानण्यास हरकत नाहीं.

पवाडे किंवा लावण्या हे प्रकार राष्ट्राच्या दैन्यावस्थेंत किंवा पडत्या काळांत आढळत नाहींत. हेमंत सरून राष्ट्राच्या भाग्याला वसंतऋतु आला म्हणजेच या कवनांचे फुलारे फुलूं लागतात व त्यावरिल शाहीराचे गुंजारव चोहोंकडे ऐकूं येतात. वसंतांत जसें अमक्या झाडाला पालवी फुटते आणि फुलें येतात आणि तमक्याला तो बहार येत नाहीं, असें होत नाहीं, तसेंच राष्ट्राला एकदा ज्ञानीचा व संपन्नतेचा फुंद चढला कीं अमक्या जातीचे शाहीर कवित्व करतात आणि तमक्या जातीचे करीत नाहींत असें होत नाहीं. सर्वांनाच एक तऱ्हेचा मद चढतो व सर्व जाती आनंदभरानें डोलूं लागून त्यांच्या जिव्हा कवनें म्हणूं लागतात. शाहीरांत ब्राम्हण आहेत, गवळी आहेत, तेली आहेत, तांबोळी आहेत,

शिंपी, सोनार, कासार, हेही आहेत. आतार, शिकलगार, न्हावी कोष्टी, साळी, माळी, वंजारी हेही आहेत. मुसलमान, जैन, मानभाव हेही ह्यावर थाप देतांना ऐकूं येतात. मारवाडी कधीं कोणत्या असल्या धंद्यात सांपडावयाचा नाहीं. पण तमासगिरांच्या फडांत तोहि आढळतो. प्रत्यक्ष महार, मांग, ढोर, कसाई हेही संपन्नतेच्या सागराच्या या उद्यानांतील लाटांवर मौजेनें विहार करतांना दृष्टीस पडतात. आणि हे असे सर्व जातीचे, सर्व पंथांचे, दर्जाचे लोक सुखसागरांत लीलेनें पोहतांना दृष्टीस पडले म्हणजे मनाला आनंदाचा पूर येऊन प्रेमाच्या लाटा उडूं लागतात; व ज्या काळीं हें महाराष्ट्र, हें आनंदवनभुवन, असें सुख अनुभवीत होतें त्या काळाबद्दल कौतुक वाटतें; व ज्यांनीं हे असे दिवस आपल्या वाडवडिलांना दाखविले त्यांचे बद्दल धन्यता वाटते. सर्व जातीच्या व सर्व पंथांच्या लोकांनीं आनंदांत मग्न असावें, वीर रसानें नाहून जावें, आणि त्यांचे चेहऱ्यावर मदाची धुंदी चढावी हीच राष्ट्राच्या संपन्नतेची व जिवंतपणाची खरी खूण आहे. आणि शाहीर व त्यांची कवनें ही त्याची एक निशाणी आहे. जो आनंद माहेरपणांत माहेरी लाडक्या मुलींनीं खेळतांना अनुभवावा, तोच आनंद व तोच निर्धास्त मोकळेपणा समरांगणावर शिपायांना सदैव वाटावा हेंच राष्ट्राच्या जोमाचें दर्शक आहे. आणि शाहीर व त्यांचीं कवनेंही या अशा काळाची बिनचुक निशाणी आहे. हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व पवाड्यांपैकीं सर्वांत जुना पवाडा म्हटला म्हणजे अग्निदासाचा होय. अग्निदास किंवा अज्ञानदास हा पुण्याचा राहणारा होता. याच्या गुरूचें नांव नारायण असावें. याचा विषय शिवाजी महाराजांनीं अलौकिक चातुर्यानें आपणास पिंजऱ्यांत धरून न्यावयास आलेल्या अफझलखानास गर्क केला तो होय. हा पवाडे रचण्याच्या अगदीं प्रथम प्रथमच्या प्रकाराचा नमुना आहे. नांवाला मात्र हा पद्य आहे, परंतु याची सर्व रचना एकतारी तुणतुण्यावर सहज सुरानें म्हणतां येईल अशी गद्याचीच आहे. शिवाय घडलेल्या अद्भुत प्रसंगानंतर लौकरच हा रचिलेला दिसतो.

कारण शेवटच्या चौकांत शाहीर म्हणतो कीं, या अलौकिक प्रसंगाच्या आनंदोत्सवांतच .जिजा ' बाईनें शाहीर बोलाविले ' आणि त्याच वेळीं ' आपल्या मतें अज्ञानदासानें ' एका तडाक्यानें हा ' कडाका गाइला ' व 'बिरमल राज्याचा गाईला'—

म्हणून शिवाजी सरज्यानें । इनाम घोडा बक्षीस दिला ।
शेरभर सोन्याचा । तोडा हातांत घातला ॥

हा पवाडा जिजाबाईनें, शिवाजीनें आणि त्याच्या सदरेच्या सरदारांनीं प्रत्यक्ष ऐकिलेला दिसतो. यांतील वर्णन अगदीं त्याच वेळचें दोन डोळ्यांच्या साक्षींनीं मिळविलेलें आहे. पवाड्यावरून दिसतें कीं, आपणावर अफजलखान येतो ही बातमी कळल्यावर शिवाजीनें सामदामाचे प्रकार करून पाहिले व सदरेंत सर्वांना बोलावून सर्वानुमतें अफजलखानाच्या प्रत्यक्ष भेटीचा विचार ठरविला. पण खानाची भेट हा एक निर्वाणीचा प्रसंग आहे, हें शिवाजी समजून होता; आणि म्हणूनच या आणिबाणीच्या प्रसंगाच्या तयारीबरोबरच त्यानें पुढची सर्व निरवानिरव करून ' राजे स्वामीनीं ब्राह्मण बोलावून द्रव्य दिधलें ' आणि सांगितलें कीं ' तुम्ही काशीस व गयेस जाऊन उत्तर कार्यें करणें. धर्म हस्तकें गोदानें देखील दिधलीं, दाढी लांब होती ती बाल छाटून लहान केली. 'जिजाऊ रडों लागली, तीस समीप येऊं न दिलें, कीं न जाणो मोह पडेल'. अशी सर्व पूर्व तयारी करून गडाखालीं 'सदरेची मांडणी' केली होती, तेथें भेटीस जाण्यास निघते वेळीं लोकांनीं सांगितलें कीं ' शिवबा सील करा अंगाला ! ' तेव्हां राजानें अंगांत जरीची कुडती घातली, वर चिलखत चढविलें आणि त्यावरून राजा ' बारीक झगा ल्याला,' रेशमी विजार पायांत घातली, 'डोईस मंदिल बांधला.'

' डावे हातीं बिचवा ल्याला । वाघनख सरजाच्या पंजाला ॥ वरून बारिक झगा ल्याला । कंबरबस्ता वेढा केला । पोलाद घातली गळां ॥ फिरंग पट्टा जिऊ म्हाल्याप दिला । शिवाजी सरजा बंद सोडुनि चालिला ॥ २४ ॥

निघतांना त्यानें सर्वांचे मुजरे घेतले, व

माझा रामराम दादानु । गडच्या गडकऱ्या बोलिला ।। " जतन भाईनु करा । आमुच्या संभाजी राजाला । सराईत उमाजी । राज्य होईल तुम्हांला । गड निरवितो गडकऱ्याला । राज्य निरवितो नेतोजीला । निरवानिरव दादानु । विनंती केली सकळीकाला ।। येथुन सलाम सांगा । माझा शहाजी महाराजाला " ! खबर गेली जिजाऊला । शिवबा जातो भेटायला । पालखींत बैसुनी । माता आली भेटायाला ।। २५ ।।

राजकारणावर दृष्टि देऊन शिवाजीनें आईस प्रथम भेटीस न येण्याविषयीं सांगितलें. पण म्हणतात ना! माया ही अधोवाहिनी आहे. आईच्यानें कसें राहवेल? पुत्रवात्सल्य फार कठीण आहे. जिजाऊ पुत्रप्रेमानें पालखींत बसून भेटीस धांवून आली. पुढें शाहीर म्हणतो—

शिवबा बोले जिजाऊ सवें । बये वचन माझें ऐकावें ।। ' माझी असोशी खानाला । बये जातों भेटायाला । " जिजाऊ बोले महाराजाला । ' शिवबा न जावे भेटायाला ।। मुसलमान् बेइमान् । खान् राखिना तुम्हांला । ' राजा बोले जिजाऊला । ' येवढी उंबर झाली । भेट दिली नाहीं कोणाला ।। येवढी गोष्ट माते । आज द्यावी मला ।। आई ! अबदुलखान आला । यानें धाक लाविला देवाला ।।

शिवाजीचे हे आर्जवाचे पण निर्धाराचे शब्द ऐकून—

जिजाऊ बोले महाराजाला । ' शिवबा ! बुद्धिनें काम करावें । उसनें संभाजीचें घ्यावे ' ।। २६ ।। जिजाऊ घेती अलाबला । ' शिवबा ! चढती दौलत येऊं दे तुला ।। घे यशाचा विडा । ' शिवबा स्मरे महादेवाला ।। गळां घातली मिठी । मातेच्या चरणासी लागला ।। घ्यानीं आठवूनी भगवंताला । शिवाजीराजा सदरे गेला ।। २७ ।।

याच्या पुढला प्रकार सर्वांना ठाऊकच आहे. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों ही झटापट शिवाजीनें सहज आटपून घेतली व खान ' पुरा केला '.

यापुढील दुसरा प्रसिद्ध पवाडा तुळशीदास नावांच्या शाहिरानें रचिलेला आहे. तुळसीदास हा अज्ञानदासाचा कोणी संबंधीं असावा,

असें चरित्रकार म्हणतात. हा शिवाजी महाराजांचे वेळीं पुण्यांत मंडईचे बाजारांत राहत असे. याचा पवाडा अज्ञानदासाच्या पवाड्यापेक्षां फार मोठा आहे. त्याचे पंचावन्न चौक आहेत. अज्ञानदासाची तडफ तुळसीदासांत नाहीं. पण तुळसीदासांत अज्ञानदासापेक्षां 'काव्य' ज्यास्त आहे. तुळसीदासानें आपल्या कथानकाचा प्रसंग, प्रारंभ, वर्णनें व झटापटी आणि शेवट, या सर्व गोष्टी जागच्या जागीं ठीकच्या ठीक ठेवून दिल्या आहेत.

एके सोमवारीं सकाळीं जिजाईनें शिवबास बोलावूं धाडिलें व दोघे मायलेंकरें गमतीनें सोंगट्या खेळण्यास बसलीं. खेळांत बाईची सरशी होऊन डाव शिवाजीवर लागला. म्हणून शिवाजीनें आईस कांहीं मागून घेण्यास सांगितलें. हें ऐकून त्या वीरमातेनें—

'पुण्याचे तोंडाला। जेजुरीच्या बारीला। आहे सिंहगड किल्ला।
तो घेऊन द्यावा मला। आऊक्ष मागेन तुझ्या राज्याला॥'

हें मागणें मागितलें. द्यूतांत दिलेला हा 'पण' पुरा करण्याकरितां शिवाजीनें तानाजी मालुसऱ्यास ही कामगिरी सांगितली. धन्याची चाकरी बजावितांना तानाजीनें जिवाची शर्थ केली. शेवटीं गड हातीं आला, पण हातचा सिंह गडावरच राहिला, हा वृत्तांत तुळसीदासानें या कवनांत गाईला आहे.

या कामगिरीचा लखोटा तानाजी सुभेदाराच्या हातीं पडला ते वेळीं त्यानें आपल्या एकुलत्या एक 'रायबा' नांवाच्या मुलाचें 'लगीन' योजिलें होतें.

स्वयंवर बाळाचें मांडिलें। काढल्या पंचमीच्या हळदी। काढलें षष्टीचें लगिन। लगीन बाळाचें मांडिलें। आली सिंहगडची कामगिरी। लगीन रायबाचें राहिलें। ज्यानें उमराव बोलाविलें।

त्याचे उमराव व सरदार सर्व आले. शेलारमामा तोहि आला व सूर्याबा बंधु तोहि आला. तेव्हां सिंहगडाची कामगिरी आल्याची वार्ता त्यानें

---

१. शाळिग्राम.

सर्वांस सांगितली. ती ऐकून सर्वजण दचकले.

> शेलार मामा बोलाया लागला । ऐंशीं वर्षाचा म्हातारा । 'माझ्या तानाजी सुभेदारा । जे गेले सिंहगडाला । त्याचे पाठिरे पाहिले; । नाहीं पुढारे पाहिल ।'

पण अशानें तानाजीसारखा शूर गडी थोडाच कचणार! त्यानें एकदम कामगिरीची तयारी चालविली. 'मग रायबा तो बेटा। बाबाच्या जवळ आला' तेव्हां त्याचीहि तानाजीनें समजूत घातली. सर्व तयारी झाली. शिपाई मावळे जमले, त्यांना हत्यारें वाटलीं, खर्ची दिली आणि सैन्य घेऊन तानाजी रायगडास राजाचे भेटीस निघाला.

> बारा भोयांची पालखी सवारीली । तोरण पालखीला बांधिलें । पाय दिला पालखीमध्यें । हात पालखीला दिला । रायबा तो बेटा । बाबाच्या आडवा येणार झाला ।

तेव्हां तानाजीनें—

> 'भिऊं नको माझे बेटा । तुझें येतो मी लग्नाला ॥
> आधी लगीन सिंहगडचें ! मग करीन रायबाचें ।'

असें सांगून तानाजी सुभेदार जीजाबाईचे भेटीस गेला. बाईनें त्याला ओवाळिलें व 'तानाजी सुभेदार। चढत्या दवलतीचें राज्य येउं दे तुला' म्हणून आशीर्वाद दिला. बाईची भेट झाल्यावर सुभेदार शिवाजीराजाच्या मुजऱ्याला गेला. व मुजरे करून म्हणाला—

> 'आम्ही जातो सिंहगडाला । आमचा रायबा संभाळा। जर आलो सिंहगडाहून लगीन करीन रायबाचें ॥ जर गेलों तिकडे मेलों। लगीन करा रायबाचें। मज बापाची सरदारी। द्यावी रायबा बेटयाला। दिवटी बुधलीची जहागीर। द्यावी रायबा बेटयाला। डोणजगांव द्यावा पानसुपारीला। मालसुऱ्याचा दंड द्यावा इनाम खायाला ॥'

असें सांगून निरोप घेतले; व पुन्हां एकदां जिजाईकडे जाऊन तिच्या पायांवर डोकें ठेवून, रायबाला सांभाळण्याविषयीं पुन्हां पुन्हां सांगून तानाजी सिंहगडाकडे वळला.

गडाच्या माचीस जाऊन गडाचा भेद काढिला; 'पेटारा उघडला। काढिली यशवंत घोरपड' आणि तिच्या कंबरेला साखळी बांधून ती किल्याला लाविली. घोरपड नेहमींप्रमाणें वर जाऊन धरावी ती वर न जातां मधूनच परतली. हें पाहून सुभेदार मनांत जरा कचला व रागावून म्हणाला—

'सत्तावीस किल्ले मी घेतले। घोरपड कधीं नाहीं मागें फिरली। मी आहे मराठ्याचा पोर, नाहीं भिणार मरणाला। एक हात टाकीन। आठरा खांडोळी पाडीन। शिळ्या भाकरी संगे खाईन॥'

अखेर घोरपड पुन्हा लाविली; व मग 'पट्टे घेतले तोंडामधीं। सोल धरली हातामधीं' आणि तानाजी सुभेदार शेलके माणूस घेऊन किल्यावर चढले. किल्यावर चकामक होऊन मोंगलांचा किल्लेदार उदेभान पठाण मारला गेला व किल्ला सर झाला. परंतु या लढाईंत तानाजी सुभेदार कामास आला. किल्ला घेऊन सैन्य शिवाजीकडे आलें तेव्हां त्याला आनंद झाला. परंतु तानाजीबद्दल शिवाजीला व जीजाईला फार वाईट वाटलें. पुढें सुभेदाराचा मुर्दा पालखींत घातला; व शिवाजी स्वतः जातीनें त्याबरोबर जाऊन तो सुभेदाराच्या गांवीं मुलाकडे नेला. पालखी पाहतांच रायबा धांवत आला, पण बाप मेल्याची खबर ऐकल्यावर त्यानें फार आकांत मांडिला. तेव्हां त्याचें शांतवन करून—

शिवाजी राजानें। मुलगा पोटासंगे धरिला। 'भिऊं नको माझे बेटा। शिवाजी महाराज तो गेला। तान्हाजी सुभेदार आहे तुला।'

असें सांगितलें व 'बारा दिवसांचें। सुतक धरलें। शिवाजी महाराजांनीं सुभेदाराचें'! पुढें राजानें रायबाचें लग्न केलें व

'दिवट्याबुधलीची जहागीर। दिली रायबा बेट्याला। बापाची सरदारी। दिली रायबा बेट्याला। डोणजगांव तें दिलं पानसुपारीला। मालसुराचा दंड दिला इनाम खायाला।'

हें निराळें सांगणें नकोच. पण तेंहि शाहिरानें पवाड्यांत सांगितलें आहे; आणि आम्ही तुम्हांला सांगतों. शाहीर शेवटीं म्हणतो 'हा शूर

मर्दांचा पवाडा, शूर मर्दानें ऐकावा ! ' याच्या योगानें ' गात्याला उद्धरण व ऐकत्याला पुण्यप्राप्ति होईल. '

शिवाजीचे अमदानींत महाराष्ट्राला स्फूर्ति आली होती. तेव्हां त्या काळाचें आणखीहि अनेक पवाडे असले पाहिजेत.

पुंजाजी देव बोललें त्या कबज्यांत । म्हणे नाना दिलभर बोलले संत । आहे वैजापुर पवाडा महशूर दक्खनांत ।। लगबग लगबग झाली लई । त्या गांव कसब्याची काय सांगु बढाई ।। झ्यांगड झ्यांगड वाजत नौबत मोंगलाई ।।...मार्गशोर्ष मास लागला कीं दखना मधी झाला गलबला । भोंसला शहरावरी आला ।। इ. इ.

हा पवाडा शिवकालीन असून शिवाजी महाराजांनीं वैजापुर काबिज केलें त्या समयाचा दिसतो.

हे शिवकालीन पवाडे झाले म्हणजे या प्रकारच्या रचनेंत एक मोठा खंड दृष्टीस पडतो. शिवाजी महाराजांच्या पश्चात महाराष्ट्र कोणच्या पेचांत सापडलें गेलें व त्याच्यावर कोणतीं संकटें कोसळलीं हें महशूर आहे. त्यानंतर बरींच वर्षें दुःखाचीं लोटलीं. पुढें शून्यापासून नवीन सृष्टी निर्माण करण्यांत शाहूचे आणि त्याचा पेशवा बाळाजी विश्वनाथ यांचे दिवस गेले. तेव्हां तोहि काळ संपन्नतेचा नव्हे. पुढील राज्य प्रसूतीच्या त्यावेळीं वेणा येत होत्या. अशा वेळीं शाहीर आणि पवाडे फारसे झाले नाहींत, यांत कांहीं नवल नाहीं. पण बाजीरावानंतर नाना-साहेबांच्या वेळीं मात्र सगळीकडे समृद्धीचे दिवस आले. तेव्हां या काळीं पुन्हां चोहींकडे डफ वाजूं लागले. नानासाहेबांच्या कारकीर्दींतल्या अनेक प्रसंगांपैकीं पानपतच्या घनघोर युद्ध प्रसंगावर फार पवाडे रचले गेले. तो प्रसंगही तसाच होता. त्या प्रसंगावर सात आठ पवाडे हल्लीं उपलब्ध आहेत. या पैकीं 'जंगबहार' हा उर्दु पवाडा फार जुना आहे. याची रचना, कोणी कादर नांवाच्या शाहिरानें जाधवराव मालेगांवकर यांनीं प्रत्यक्ष पानपत येथें पाहिलेली हकीकत स्वमुखानें सांगितली, त्या आधारें केली; व मग या रचनेच्या आधारें व

इतर माहितीवरून देशी शाहिरानें आपलें कवन केलें असें दिसतें.

पिंपळगांवकर शिवराम, रामा सटवाजी, रंगराय वगैरे शाहिरांनीं पानपतच्या युद्धसंग्रामावर व त्या काळच्या इतर हकीकतीवर पवाडे रचिले असावेत, असें त्यांच्या उपलब्ध कृतींवरून वाटतें. शिवरामाची रचना फारशी चोखवट नाहीं. पण रामा सटवाचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं चांगलें साधलें आहे. याचे पानपतचे लढाईवर दोन पवाडे आहेत. 'भाऊसारखा मोहरा। आम्हांवर कां रुसला पंची प्यारा ॥' या कवनां-तले ऐन गर्दीच्या वेळचे दोन चौक देतों —

**विश्वासराव शिपाई रणशूर । भले राजकुमार ॥ मारितो फौजा हातीं तलवार । रणांत होउनि धीर ॥ भोंवती गोळ्या वर्षति अपार । मर्दे उभे सरदार ॥ गिलचा कापला बेसुमार । भाऊ म्हणे मामें फिर ॥ अवचित गोळी लागली धुरंधरा । मुखीं बोलला हरिहरा ॥ भाऊसारखा मोहरा॰ ज्याला पडली भाऊची भ्रांत । ते उभे राहिले रणांत ॥ फितुरा पळुनि आले दखणांत । वांचविली दौलत ॥ त्यांचा ईश्वर करील सत्यनाश । यश दिले गिलचांस ॥ भाऊची भ्रांत पडली नारी नरां । सकळ जनां लहानथोरां ॥ भाऊसारखा मोहरा॰**

असें रामा सटवा गातो. अनेक सरदार जेथें इरेस पडले व काशी प्रयाग वगैरे पवित्र क्षेत्रें म्लेच्छांनीं पीडाग्रस्त जेव्हां केलीं, आणि दत्ताजी शिंद्यासारखा मोहरा दगाबाजीनें जेव्हां मारला गेला तेव्हां, हातची कामें हातीं ठेवून क्षेत्रांचें ग्रहण सोडविण्यासाठीं दत्ताजीचा अभिमान धरून त्याचें उसनें सव्याज फेडण्यासाठीं आणि मराठ्यांचा नक्षा राखण्यासाठीं पेशव्यांना तिकडे ढाला फिरविणें भाग पडलें. दक्षिणचे मराठे नेऊन उत्तरेच्या धिप्पाड, लोकांबरोबर झुंझवावें ही काय लहान सहान गोष्ट ! पण तीहि हातीं घेऊन मनांत योजून पेशव्यांचे दोन खासे पुरुष तिकडे गेले व अबदालीचा रेच उतरण्यासाठीं अनेक लोक खर्चीं घातले. दोन्ही खासेही समरांगणांत धारातीर्थीं सुस्नान झाले. पण या पुढें अबदालीचीच काय पण कोणाही म्लेच्छांची पुन्हां दिल्लीवर स्वारी करण्याची खुमखुम बंद झाली, तेव्हां या प्रसंगाची वर्णनें मराठी

शाहिरांनीं गाइली हें नीटच झालें.

या रामापेक्षां आणि शिवरामापेक्षां 'रंगराया'ला सृष्टीसौंदर्याचें वर्णन करण्याची हातोटी व हौस ज्यास्त दिसते.

येती सरीवर सरी सरसरून । गगन भरभरून पडे धरणीं ।
होती धुंद दिशा चाहोंकडे, पडेना दृष्टी दिसा तरणी ।......इ.

हें वर्षाऋतूचें वर्णन कोणालाहि आवडण्यासारखें आहे. लढाईचीं वर्णनेंहि रंगराय चांगलीं करतो. रंगराय हा कोठला राहणारा हें कळत नाहीं. रंगरायाप्रमाणेंच 'गोपीनाथ' व 'माधवसुत' हे शाहिरहि अनेक तऱ्हेचीं कवनें करितात. पवाड्यापेक्षां गोपिनाथाच्या वैराग्यपर लावण्याच ज्यास्त आढळतात. गोपिनाथानें 'दुर्लभ गुरु शिवदिन' असें म्हटलें आहे. हा गोपीनाथाचा गुरु शिवदिन प्रसिद्ध संत शिवदिन केसरीपेक्षां कोणी निराळा पुरुष असावा. माधवसुतानें आपल्या गुरूचें नांव एकनाथ दिलें आहे.[१] अर्थात् हाहि एकनाथ प्रसिद्ध एकनाथापेक्षां भिन्न पुरुष होय. याला उत्कृष्ट प्रमाण असें आहे कीं, माधवसुताची 'सवाइ माधवरावावर' एक लावणी आहे.

माधवसुत, लहरी मुकुंदा, खंडु संतु, जनार्दन ही सर्व शाहीर मंडळी पेशवाईचा ऐन अम्मल पाहिलेली होती. यांत कोणी थोरले माधवरावाच्या कारकीर्दीवर, कोणी महासाध्वी रमाबाई सती गेली त्या विषयावर, तर कोणी नारायणरावावर, अशीं अनेक कवनें केलीं आहेत.

लहरी मुकुंदाचा—

' दखनचा दिवा मालवला, हिरा हरपला ।
काय गुपित घाला, केला नारायणरावाला । '

हा श्रीमंत नारायणरावांच्या मृत्यूवरचा पवाडा तर फार प्रसिद्ध आहे. वास्तविक पाहतां हा पवाडा तेरा चौकांचा असून तेराव्या चौकांत कवीनें आपलें नांव घालून सहीशिक्यानिशीं पुरा केला आहे. पण कोणा

---

१ एकनाथ गुरु म्हणती प्रीतिचे छंद बिकट चांगलें । माधवसुत कवन करि जशी मोत्याची सरी । इ. इ.

अजागळानें याला पुढें आणखी एका चौकाचें शेंपूट जोडून हा चौदा चौकांचा बनविला; व एका प्रतींत हा असा आढळला म्हणून छापणारांनींहि तो तसाच छापून दिला.

नारायणराव पेशव्यांचा खून ही एक पेशवाईला मोठीच ठोकर लागली. पानपतानंतर आवराअवर करून मोठ्या शहाणपणानें, मुत्सद्देगिरीनें आणि हिमतीनें पेशवाईची मोडलेली घडी पुन्हां नीट घालणारे थोरले माधवरावसाहेब हा लोक सोडून गेल्यावर, पुढें दिवस कसे येतात ही विवंचना सर्वांनाच होती. तशांत राघोबा सारख्या भोळ्या सांबानें 'आपल्यांत दुही पडते तेव्हां शत्रूस बळ फावतें' हें स्वतःचेंच अमोल सूत्र विसरून जाऊन मतलबी माणसांच्या भरीं भरून जो अनन्वित प्रकार केला त्यानंतर तर हा येवढा मोठा वृक्ष समूळ उपटून पडतो कीं काय असें वाटूं लागलें होतें. पण बारभाईच्या मसलतीनें आणि फडणिस नानांच्या अद्वितीय बुद्धीमुळें पुन्हां जम जमला, व आलेले ढग पार वितळून जाऊन स्वराज्याचा देदीप्यमान सूर्य पूर्णपणें प्रकाशूं लागला; आणि—

> धन्य वंश एकेक पुरुष कल्पवृक्ष पिकले ।
> शत वर्षे द्विज पक्षि आनंदे त्या तरुवर टिकले ॥
> जलचर, हैदर, नबाब, सन्मुख रण करतां थकले ।
> ज्यांनीं पुण्याकडे विलोकिलें ते संपत्तिला मुकले ॥

असें म्हणण्याची हौस शाहिरांना वाटूं लागली. या काळच्या सर्व शाहिरांनीं महाराष्ट्राच्या भाग्यरवीचा माध्यान्ह पाहिला होता. या आपल्या देशाचे, या आनंदभुवनाचे ते अत्यंत सुखाचे दिवस, त्यांतील ते 'रोमांचव्याप्त काय' करणारे प्रसंगहि त्या शाहिरांनीं अनुभविले होते; पानिपताचा प्रसंग आतां मनाआड झाला होता; व खर्ड्याचा युद्धसंग्राम आणि पुण्यांतला श्रीमंत सवाई माधवराव साहेबांचा डोळे भरून पाहिलेला रंग, या कवींच्या नजरेसमोर उभा होता. पेशवाईच्या उत्तर कार्यांतले मंत्र म्हणणारांचीं तोंडें दाबून टाकून, आणि घरबुडव्यांच्या

नाकावर मिरीं वाटून श्रीमंत सवाई माधवरावांना महाराष्ट्रानें पेशवाईपद मिळवून दिलें होतें; यामुळें त्या भाग्यवान् पुण्यपुरुषाचा महाराष्ट्राला मोठा अभिमान वाटत असे; व त्याच्या प्रत्येक गोष्टीचें खऱ्या जातिवंत मराठ्याला फार कौतुक होत असे; आणि यामुळेंच या काळच्या सर्व शाहिरांनीं त्याच्या अनेक गोष्टींचें वर्णन केलें आहे. पुण्यांतला ' रंग ' आणि 'खर्ड्याची लढाई ' हे महाराष्ट्राच्या इतिहासांतले प्रसंग—मराठ्यांनीं ज्यांचीं प्रेमानें आठवण ठेवावी असे हे शेवटले प्रसंग—यांचे श्रवणानें महाराष्ट्राचे कान तृप्त होत, मन तल्लीन होई, व गाणारांच्या जिभेलाहि हे प्रसंग गातांना आपण धन्य झालों, आपण पुनीत झालों, असें वाटे; आणि म्हणूनच होनाजी बाळा, अनंत फंदी, राम जोशी, प्रभाकर, सगनभाऊ, रामचंद्र, परशराम वगैरे एकोन एक चांगल्या शाहिरांनीं या प्रसंगांचीं मनोहर वर्णनें करून आपल्या देशास ऐकविलीं; आणि आनंदानें व स्फूर्तीनें लोकांचे देह फुगवून सोडिले. बाकी जे टाळ कुटीत बसले, आणि मृत अशा संस्कृताच्या छंदाला अनुसरून भारत-रामायणांतल्या कर्मकथांचीं पुराणें पुन्हां पुन्हां सांगत सुटले, जे श्लोक-आर्यादिकांच्या उसन्या कसरतींत बांधले राहिले, त्यांचे कांहीं नाहीं. त्यांना देश तरला काय आणि बुडाला काय !! तो हंसला काय आणि रडला काय !! एकच ! त्यांचीं तीं पुराणें संथपणानें चालूंच होतीं. त्यांच्या वाग्देवीला सगळे दिवस सारखेच होते. त्या सरस्वती देवी-पुढें ते आपलीं पुराणें सांगत बसत, व तीं ती ऐकत बसे.

पण आमच्या शाहीर मंडळीचा प्रकार यापेक्षां निराळा दिसतो. ते आपल्या देशाशीं व देशांतील लोकांशीं ज्यास्त चिकटून वागत. लोकांची मनोदेवता हीच त्यांची खरी देवता होती; व ते तिच्याशींच बोलत. हे शाहीर जानपद भाषा वापरीत. ते प्रायः नित्यांतले शब्द आपल्या कवनांत योजीत. त्यांच्या उपमा, त्यांच्या उत्प्रेक्षा, या सर्व लोकांच्या परिचयांतल्या अशा असत. त्यांच्या विचारांचें वळण खरें खरें मराठमोळ्याचें असें होतें; व कांहीं प्रसंग खेरीज करून बहुतेक सर्व

ठिकाणीं ते लोकांच्या नित्यांतल्या शब्दवटिकाच योजीत असत. यामुळें त्यांच्या कवनांत एक तऱ्हेचें जीवन आढळतें. त्यांची भाषा तरतरीत अशा जिवंतपणाची आठवण करून देते; आणि यामुळेंच त्यांचें बोलणें एकंदर लोकसमूहाला ज्यास्त पटतें. ते आपल्या कवनांत प्रसंगहि असेच कल्पितात, कीं जे डोळ्यांना नित्य दिसतील व मनाला जेथें तेथें अगदीं पटतील. आमच्या संस्कृतज्ञ कवींचीं किंवा त्यांच्याच धर्तीवर रचना करणाऱ्या कवींचीं कवनें हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि भाषांत भाषांतर केलीं, तरी तीं कोठेंहि चालून जातील. कारण त्यांत मराठ्यांचें वैशिष्ट्य असें फारसें आढळणार नाहीं; मराठमोळ्याची खूण अशी त्यांत दिसणार नाहीं. पण शाहीरांचीं गाणीं हीं मराठ्यांचीं खरी गाणीं आहेत. त्यांत महाराष्ट्राच्या चालीरीती स्पष्टपणें नजरेस पडतात. त्यांत महाराष्ट्राचे विकार, त्याच्या आवडी नीवडी, त्यांतील लोकांचे गुणदोष, त्यांतील जनसमूहाचा स्वभाव व त्याच्या अनेक वृत्ती स्पष्टपणें दिसतात. इतकेंच नव्हे, तर शाहिरांचे शब्द, आणि मनांतले विचार शब्दानें प्रदर्शन करण्याची त्यांची ठेव, हीहि शुद्ध मराठी वळणाची दिसते. ती इतरांना समजणारहि नाहीं व कदाचित् पटणारहि नाहीं. 'यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता' या श्लोकाच्या वामनानें, रंगनाथानें, तुका विप्रानें किंवा इतर कोणत्याहि संस्कृतज्ञानें केलेल्या कशाहि भाषांतरापेक्षां कोणी अडाणी शाहिरानें 'आमचे डोळे तुमच्याकडे, तुमचे डोळे भलतिकडे' अशा केलेल्या रूपांतरानेंच महाराष्ट्राच्या मनाला विशेष चटका लागेल.

नाजूक बांधा सडक आकृती ठेंगणी गोजरी । कंगणीदार पगडी शिरीं ।
कंठिदार अंगरखा, दुपेटा भरनक्षिदार भरजरी । लल्लाटी गंध केशरी ॥
सुवर्ण तोडे, सुबक हिऱ्याच्या मुद्या चकमती करीं ।
खूप डौल दिसे अंबरी ॥
गळयांत कंठी, कानि चौघडा भिकबाळी गोमटी शोभती ॥
( होनाजी बाळा पृ. १२१ )

इत्यादि वर्णन इतर कोणापेक्षांहि मराठ्यालाच आवडेल. कारण त्यांत

त्याला त्याची स्वतःचीच प्रतिमा दिसेल. याप्रमाणेंच कोंवळ्या मनाची अल्लड वृत्ति, लग्न झाल्यानंतर पतीविषयीं केवळ धार्मिक आणि आनुवंशिक बुद्धीनें उद्भवणारें प्रेम, तारुण्याच्या झुळकीबरोबर पतिदर्शनाविषयींची उत्सुकता, उत्तर हिंदुस्थानांत मुलुखगिरीवर गेलेल्या स्वजनांविषयीं मनाची हुरहूर, तिकडचे जासूद येतांच होणारा आनंद, स्वारीचा मुक्काम गांवाजवळ आलेला कळल्यावर होणारी मनाची धांदल, सुमुहूर्तानें घरांत प्रवेश करणाऱ्या यजमानांना ओंवाळण्यासाठीं पंचारतीची तयारी, नवऱ्याच्या आवडीच्या पदार्थांची पाकनिष्पत्ति, नंतर राग अनुराग इत्यादि विकार आणि रुसवे फुगवे, हीं सर्व अत्यंत मनोहर चित्रें उठावदार रंगानें रंगविलेलीं आणि मार्मिक शब्दांनीं खुलविलेलीं अशीं पहावयाचीं असतील तर तीं मराठी शाहिरांच्या कवनांत पहावीं. तीं त्यांच्या तोंडून डफ तुणतुण्यावरच गाइलेलीं ऐकावीं. महाराष्ट्राबाहेर तीं दिसावयाचीं नाहींत; आणि इतर कोठें तीं खुलावयाचींहि नाहींत. ज्या लढाईचें वर्णन पुढल्या चौकांत गोंधळी एकतारीवर गात असेल, अंगेजणीनें चढाई करून चढविलेल्या हल्ल्याचें वर्णन शाहीर आंगण्यांत म्हणत असेल, त्या लढाईंत माझा भाऊ होता ही कल्पना कोणत्या बहिणीला मोहून टाकणार नाहीं ! त्या स्वारींत माझा बाप होता हा अभिमान कोणत्या मुलाला वाटणार नाहीं ! त्या लढाईंतल्या लुटींत आणिलेल्या मोत्यांचा कंठा आज माझ्या गळ्यांत आहे, तेथेंच मिळविलेल्या बक्षीशींतली तरवार ही माझ्या समोर खुंटीवर ठेविलेली आहे, हें मनांत येतांच कोणती बायको अंगावरचा शाल्ू माडीवरून त्या शाहीराच्या अंगावर फेंकणार नाहीं ! आणि हें पाहून द्रव्यलोभ पार विसरून जाऊन गळ्यांतला शेरभर सोन्याचा गोफ कोणता धनी त्या शाहिराच्या गळ्यांत घालणार नाहीं ! असे हे प्रसंग स्वराज्यांत वारंवार येत आणि अशा वेळीं शाहिरांच्या अंगावर बक्षिसांचा पाऊस पडे. सरदार, शिलेदार, मुत्सद्दी वगैरे सर्वजण हीं कवनें गोंधळ्यांकडून ऐकत. चित्रकथे, बहुरूपी,

भराडी, गोंधळी हे सर्वजण लावण्या आणि पवाडे सुस्वरानें व आडाख्याच्या म्हणणीवर म्हणत; आणि ते म्हणतांना ढोलकीं, एकतारी, डौर, संबळ, डफ हीं अस्सल देशीं वाद्यें वाजवीत. अंबाबाई, भैरव, एकवीरा वगैरे सारख्या अस्सल महाराष्ट्रीय देवतांचेंच गोंधळांत नामस्मरण व संकीर्तन चालें. गोंधळाची धार्मिक कामगिरी संपल्यावर गोंधळी जमलेल्या रसिकांच्या मनोरंजनाकरितां हीं कवनें काढीत व त्यामुळें गोंधळानांहि गर्दी जमे. तंतुवाद्यांपैकीं अगदीं साधें व बहुश: अत्यंत जुनें असें, नुसती एक तार ताण देऊन डबड्यांत बसविलेलें असें हें वाद्य तारेचा बेताचा तणावा दिला असतां, गोड सूर काढतें व त्याशीं आपला सूर लावून म्हणणारा हीं साधीं कवनें मौजेनें म्हणूं लागतो. अशा वेळीं शृंगाराच्या घरीं वीररस पाहुणा येऊन दोन्ही रस उभे राहिलेले दिसूं लागतात. आणि देशीं वाद्यावर गाइलेलीं, देशी माणासानें रचिलेलीं, देशीं कल्पनांनीं भरलेलीं, आणि स्वदेशाच्या पराक्रमांनीं गजबजलेलीं हीं कवनें गांवोगांवीं आणि घरोघरीं नेहमीं म्हटलीं जात.

अशीं हीं कवनें म्हणजे पवाडे व लावण्या, लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांचें मनरंजन करून वृत्ती उल्हसित करीत. आणि या वृत्तांचा पूर्ण अनुभव घेता यावा म्हणून कानांबरोबर डोळ्यांनाहि वाढप वाढावें लागे. म्हणूनच लावणी म्हणणारा नर्तक स्त्रीवेषधारी, मनांतील विचारांचे योग्य प्रदर्शन हावभावानें करणारा, चेहऱ्यावर प्रसंगानुसार अनेक विकार दाखविणारा असा निवडून काढणें अवश्य झालें आणि मग साहजीकपणेंच दृश्य आणि श्राव्य अशीं कवनें तयार झालीं. व फडाच्या आणि बैठकीच्या लावण्या निराळ्या होऊं लागल्या. हळुहळू ताल सुराची जोड देणें सुरू झालें. व पुण्यासारख्या तालसुरांतल्या तज्ञांपुढें लावण्या फिक्या पडूं नयेत म्हणून लावणी गायकीचे ढंगावर जाऊं लागली व निरनिराळे रागांची योग्य अशी रचना शाहीर करूं लागले. नागेशाचे सांप्रदायी हिंदुस्थानीं गवयांच्या सहवासांतले होते, यामुळें

त्यांनीं ख्यालाचे ठेके लावणीला जुळवून व साथे सूर घेऊन अनेक रसांची धून ते चमकवूं लागले; व प्रसंगाला अनुरूप अशा चाली लावण्यांना लावणें ओघानें प्राप्त झालें आणि या तऱ्हेनें उत्तर हिंदुस्थानांतल्या निष्णात गवयांच्या तोंडीं असलेल्या गोड हिंदी शब्दवटिकांप्रमाणें, मराठी शब्दवटिका बनवून या शाहीरांनीं महाराष्ट्राला आणि मराठी भाषेला एक नवीन तऱ्हेच्या वाङ्मयाची जोड करून दिली व महाराष्ट्र स्वभावाला आवडेल असा गाण्याचा एक स्वतंत्र प्रांत निर्माण केला.

निरनिराळ्या रागांतल्या चाली लावून, अनेक रागामध्यें गातां येण्यासारखीं कवनें रचण्याचा हा प्रघात नागेशाच्या आदिनाथ वगैरे शिष्यांनीं सुरू केला. या परंपरेंत पुढें दुफळी झाली. सातापा, होनाजी वगैरे मंडळी गवळी होते. ते आपल्या पोऱ्यास गवळ्याचा गाणारा असे म्हणूं लागले; व आदिनाथाचे शिष्य गोविंदनाथ, सिद्धनाथ हे आदिनाथावरून आपल्या गाण्यास राउळाचें गाणें असें म्हणूं लागले. या गवळी राउळा मध्यें चुरस येऊन ती वाढत गेली व 'आपआपल्या सुगराया करूनी दावा । राउळ गवळी भांडती करूनी कावा' असें होऊं लागलें. एक तऱ्हेनें ही चुरस या वाङ्मयाला फार फायदेशीर झाली व एकावर एक ताण करण्याच्या चढाओढीनें 'रागास राग व तोडीस तोड' अशा लावण्या ते रचूं लागले.

अगदीं प्रथम लावण्या आणि पवाडे रचणारे कवी ब्राह्मणेतर असावेत असें दिसतें. परंतु पुढें पेशवाईंत ब्राह्मणांनींहि या तऱ्हेच्या काव्यरचनेंत मन घातलें. बाबू सवाई, रामजोशी, अनंत फंदी, बापू कोन्हेर, दादा वीर, प्रभाकर वगैरे अनेक ब्राह्मणमंडळी लावण्या आणि पवाडे रचूं लागली; व त्यांपैकीं कित्येक स्वतःच तमाशा जमवून डफ तंबोरी हातीं घेऊन तीं कवनें म्हणूं लागली. पुढें पुढें तर या कवनांचें प्रस्थ इतकें वाढलें कीं कीर्तनांत आणि कथांत हरिदासांच्या द्वारें त्यांचा चांगलाच शिरकाव झाला. हल्लीं दक्षिणेंत जी वेदशास्त्रविद्या आहे तिचा मूळ उगम

ज्या नीळकंठशास्त्री थत्यांपासून लागतो, असे हे नीळकंठशास्त्री थत्ते, मोरशास्त्री साठे, आप्पासाहेब सांगलीकर, वगैरेसारखी बडी मंडळी देखील लावण्यांना नाकें मुरडीनाशी झाली. याचें एक कारण असें कीं, चांगले व्युत्पन्न ब्राह्मण लावण्या रचूं लागल्यामुळें हिंदुधर्माचीं तत्वें व वेदांताचे गूढ सिद्धांतहि ते लावण्यांत आणूं लागले. भागवतांतल्या कृष्णकथा, हे ब्राह्मण शाहीर संस्कृताशीं तोडून पाहतां उण्या न दिसतील अशा शद्बसौष्ठवानें रचून व आपल्या हृदयंगम कल्पनांनीं आणखी खुलवून लावणीवृत्तांत गाऊं लागले. यामुळें तर लावणीचा शिरकाव कथाकीर्तनांत सहज होऊं शकला. लावणीला हें उच्च स्थान मिळवून देण्याचें श्रेय बऱ्याच अंशानें त्या काळच्या विद्वान ब्राह्म्हण शाहिरांकडे आहे हें उघड आहे.

वर लावण्या रचणाऱ्या आणि पवाडे गाणाऱ्या कांहीं कवींच्या संबंधानें उल्लेख आला आहे. त्या सर्वांचा तुरा म्हटला म्हणजे सोलापुर-कर रामजोशीबावा. रामजोशीबावांमध्यें इतरांपेक्षां पुष्कळ गोष्टी विशेष होत्या. किंबहुना जोशीबुवांचें सर्वच विशेष होतें. बुद्धीची तीव्रता विशेष, विद्वत्ता विशेष, आयुष्यक्रम विशेष, छंद आणि फंदहि विशेष. पुष्कळांची बुद्धी अशी असते कीं एकदां जिकडे धांवली तिकडे धांवली. ज्या पंथांत ते झुकतील त्यांत ते कळस करून टाकतील. सोलापूरकर रामजोशी बोवा, हे याच वर्गांतले एक पुरुष होते. रामजोशांच्या वडिलांचें नांव जगन्नाथपंत जोशी. हे सोलापूरच वृत्यंशी जोशी. जोसपणाची वृत्ति कोणी धोंडभट नांवाच्या पुरुषानें प्रथम संपादन केली, व तेव्हांपासून हें घराणें सोलापूरांत राहून नांदू लागलें. हें घराणें चांगलें व्युत्पन्न होतें.

जगन्नाथ जोशांच्या वडील मुलाचें नांव मुद्गल, धाकट्याचें रामचंद्र. मुद्गल किंवा मुद्गल जोशी हे संस्कृत भाषेंत चांगले प्रवीण असून त्या काळचे नावाजलेले शास्त्री व पुराणिक होते. घरचा संसारधंदा हेच चालवीत. यांचे घरचें वळण पिढीजात बाळबोध होतें. पण रामजोशांचें वळण मुद्गल जोशांच्या अगदीं विरुद्ध असें.

घरांत लक्ष काडीभर नाहीं. सारा वेळ उनाडक्या कराव्या, तमासगिरांच्या बैठकींत बसावें व लावण्या म्हणाव्या, हा नाद. या चाळ्यांबद्दल वडील भाऊ रागावून बोलले तेव्हां घर सोडून त्यांच्या रागावर जोशीबुवा तुळजापुरास निघून गेले. पुढें कांहीं दिवसांनीं पंढरपुराकडे येऊन काव्य व्याकरणाचा अभ्यास त्यांनीं केला. मूळची बुद्धि कुशाग्र असल्यामुळें त्यांनीं यांतहि प्रवीणता सहज संपादन केली व मग तमाशाचा छंद पुन्हां परतला. ते सोलापुरांत राहत असत, त्या घरासमोर धोंडी शाहिराचें घर होतें. तेथें यांची बैठक असे. या वेळींहि कलगीतुऱ्याचे सामने जिकडे तिकडे फार बोकाळले होते. व धोंडीबाच्या तुऱ्याच्या फडाप्रमाणें दुसरा कलगीचा नागेशाचा फड या वेळीं त्या प्रांतांत गाजलेला होता. तेव्हां नागेशाच्या आणि धोंडीबाच्या फडाचा सामना वारंवार होई. रामजोशी धोंडीबाच्या आखाड्याच्या बैठकींतले. म्हणून नागेशावर सरशी करण्याकरितां व लावण्यांच्या आखाड्यांत म्हणण्याकरितां हे लावण्या करून देऊं लागले. अंगच्या विद्वत्तेमुळें व पिढीजाद आलेल्या बुद्धिवैभवामुळें यांच्या लावण्या चांगल्या होऊं लागल्या व त्या लोकांना सहज आवडूं लागल्या. पण कशी झाली तरी ती लावणीच. सोलापुरच्या ग्रामजोशांच्या मुलाला आणि मुद्गल जोशांसारख्या विद्वान् पंडिताच्या भावाला लावणींत आपलें नांव घालण्यास धैर्य झालें नाहीं. म्हणून हा लावणी रचून तींत प्रथम धोंडी शाहिराचें नांव घालूं लागला.

'हा वसंत ऋतु अनिवार । करि मदनशरांचा मार । बहुत बेजार ।।'

या लावणीचे शेवटीं कवि म्हणतो—

'नाग्यास बैसली घडक । टाकुनि दे कलगी, व्यंकटपतिला हुडक ।।
लिंब खाशील टाकूनि गूळ । धोंडि शाहिर कविचा छंद उरावर शूळ[1] ।।'

---

१. दुसऱ्या एका लावणीचा शेवट असा—नागेशा भुलवाया, त्याची कलगी उडवाया, व्यंकटपति विनवाया । शाहिर धोंडिनें केलि पाही लावणी । आशि बहार कुणा कविची । घडले तरी मी कच्चा घड्यानें वाहिन पाणी । वाहिली शपथ साची ।

अशा धोंडीबाच्या नांवावर रामजोशांनीं रचिलेल्या लावण्या बऱ्याच प्रसिद्ध आहेत. या सर्व रामजोशांच्या पूर्ववयांत किंवा प्रारंभींच रचिलेल्या होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें थोडे दिवसांनीं धीर ज्यास्त चेपला व जोशीबुवा आपल्या लावण्यांत आपलेंच नांव 'राम' म्हणून प्रसिद्धपणें घालूं लागले. परंतु या वेळीं शाहिरांत रामा रंगारी म्हणून एक होता. तोहि आपल्या कवनांत आपलें नांव 'राम' असें घाली. हाहि घोटाळा होऊं लागला. म्हणून पुढें तें सर्व टाकून जोशीबुवा आपणास 'कविराय' असें कवनांत म्हणवूं लागले; आणि खरोखर ते सार्थनाम कविरायहि झाले. यांची लावणी आधींच गोड, रसाळ व ठाकठीकीची भव्य असल्यामुळें सर्वांना प्यार होती; परंतु पुढें यांची बयाबाई नांवाच्या एका बाईशी गांठ पडली. तेव्हांपासून तर त्यांच्या लावणीवर ऐकणारांच्या उड्या पडूं लागल्या. या दोघांची एकदां मन मिळून जी मैत्रिकी जडली ती आजन्मपर्यंत तशीच राहिली. या बाईचें गाणें मधूर असून त्यांत एक तऱ्हेचा ढंग होता व ही बोवांची कवनें रागदारींत आणि खड्या स्वरांत मोठ्या आवेशानें म्हणे. मनांत प्रेमाचा ओलावा असल्यामुळें तिचें म्हणणें ज्यास्त खुलें व गाण्यास रंग येई. बयाबाईप्रमाणेंच चिमाबाई या नांवाची दुसरीहि एक मधुरवाक् व रूपसंपन्न अशी स्त्री जोशीबुवांजवळ होती. या दोघींचेहि मन रामजोशांवर व त्यांच्या कवनावर फार लुब्ध असें; व हे जोशी-बुवाहि या दोन्ही कामिनींच्या सहवासांत इष्काचे प्याले यथेच्छ पिऊन त्या रंगांत काव्यदेवतेची आराधना मनापासून करीत. यांपैकीं बया हिजबद्दल जोशीबुवा म्हणतात:---

दैवें ही गांठ बयाबाईची । मज पडली साची ॥
कविता इजसंगें रंगा आली । नानाविध चाली ॥
वाणी कशी काय परिक्षा झाली । गाणारी घाली ॥
ऐशीं मति नरांत विरळ रसाची । बायकांत कैची ॥
++ धन्या सत्कविता कविरायाची । रसिकता बयाची ॥
दया श्रीहरिची ॥ मनीं आठवण धरा श्रीहरीची ॥

रामजोशांचा राहण्याचा थाट मोठा चैनीचा असे. घरीं किंवा प्रवासांत, हे कोठेंहि असले तरी ‘बया’ व ‘चिमा’ यांची जोडी त्यांच्याजवळ नेहमीं असे. शिवाय शागिर्द आणि ‘पोऱ्ये’हि असत. हे वाटेंत कोठेंहि मुक्कामाला उतरले तरी त्यांचा थाट एखाद्या राजबिंड्या सारखा दिसे. बरोबरची झालरीदार राहुटी एकदां उभी केली आणि आपला रेशमी काढण्याचा झोंपाळा झाडाला (लावून) टांगून दिला म्हणजे हे त्यावर मौजेनें ताना घेत बसत. कुत्रे, माकडें वगैरे हौसेनें पाळलेलीं जनावरें आणि अनेक प्रकारचीं वाद्यें, वगैरे सर्व इष्काचे परिवार हे सदाकाळ नेहमीं बरोबर ठेवीत. आणि अल्लड वृत्तीला योग्य असा यांचा हातहि बराच सैल असे. तो इतका कीं, कितीहि प्राप्ती झाली तरी बुवांच्या पदराला गांठीचा संस्कार घडण्याची पाळी क्वचितच येई. इतके असल्यावर, यांच्या भोंवती हौशी मंडळींचे कडें तेव्हांच जमे हें निराळें सांगणें नकोच. तो काळच तसा मजेचा होता. त्या वेळीं पुणें प्रांतांत चोहोंकडे सोन्याचा धूर निघत असे; व जिकडे तिकडे चैनबाज आणि सदां आनंदांत मग्न अशा लोकांची गर्दी दिसे; अशा स्थितींत मनाच्या स्वाभाविक कलामुळें जोशीबुवांनीं एकदां जो तमासगिरपणाचा धंदा धरला त्यांतच ते रमून राहिले. आधींच तमाशांना व लावण्या पवाडे म्हणणारांना साहजिकच ऊत आला होता, तशांतहि रामजोशासारख्या विद्वान् ब्राह्मणानें त्यांत मन घातल्यामुळें त्या सर्वांवर ताण झाली व याच्या लावण्या ज्याच्या त्याच्या तोंडीं ऐकूं येऊं लागल्या. चांगल्या दागिन्यांनीं स्त्रीच्या सौंदर्याला शोभा येते हें खरें; परंतु एखाद्या यौवनसंपन्न कामिनीचें मनोहर रूप असें असतें कीं, तें त्या दागिन्यांनाच उलट अलंकार होऊन बसतें. तशांतला थोडासा प्रकार येथें झाला आहे. लावणीनें रामजोशांस महत्व यावें, तें रामजोशांनींच लावणीछंदास नवें महत्व आणिलें. चिंतामणराव अप्पा सांगलीकरांसारखी आणि मोरोपंतांसारखीं सोवळीं माणसें, तमाशा म्हटला कीं दूर पळून माडी गांठावयाचीं, पण त्यांसहि आपल्या वाणीनें जोशीबुवांनीं वरून खालीं

उतरविलें,[1] हें केवढें आश्चर्य?

यांची रचना प्राय: लावणीछंदांत फार आहे. हे स्वत: व्युत्पन्न व संस्कृतज्ञ विद्वान् असल्यामुळें यांच्या लावण्यांत अशुद्धतेचा प्रकार कोठें दिसत नाहीं. उलट शब्दरचनेचा सुंदर थाट दृष्टीस पडतो. ‘ कोण्या हो सुभगाची मदनमंजरी ’ वगैरे पद्यांतला प्रौढ पण कोमल अशा शब्दांनीं वर्णन केलेला सहज शृंगार, किंवा ‘ दो दिवसाची तनु ही साची ’ या लावणींतल्या वैराग्यवर्णनाची हातोटी, अथवा ‘ भूतळांत जशी या स्थळांत यमुनाजळांत ही नळवाळा ’ या पद्यांतली स्थळवर्णनाची बहार हीं पाहून कवीच्या कर्तबगारीबद्दल कोणासहि आनंद होण्यासारखा आहे. यांच्या लावण्यांत जसा प्राकृत शब्दांचा तसाच संस्कृत शब्दांचाहि भरणा फार आढळतो. परंतु त्याची आपल्या काव्यांत कवीनें इतक्या खुबीनें मिसळ करून दिली आहे कीं, त्यापासून श्रोत्यांस व वाचकांस आनंदच होतो. खेरीज कवीचें आपल्या विषयाशीं व वर्तनाशीं झालेलें तादात्म्य पाहूनहि फार नवल वाटतें. यांचा शृंगाररस पाहून हा कोणी विलासवान मर्द फांकडा असावा अशी कल्पना होते. तशीच यांची उपदेशपर किंवा वैराग्यपर लावणी काढली म्हणजे हा सर्व ऐहिक सुखांना तुच्छ मानणारा कोणी सिद्ध पुरुष तमासगिराच्या जन्मास आला आहे कीं काय असा भास होतो. यांची तमासगीर म्हणून जशी ख्याती आहे तशीच कीर्तनकार, हरदास म्हणूनहि फार प्रसिद्धी आहे. असें सांगतात कीं, आपल्या उत्तरवयांत हे कथाकीर्तन करीत, व कीर्तनांत पंतांच्या आर्या फार म्हणत. याहि कामांत त्यांनीं सर्वांवर ताण केली. यांची समयसूचकता, सभापांडित्य व बहुश्रुतपणा पाहून त्या वेळचीं नीळकंठशास्त्री थत्यांसारखीं विद्वान धेडेंहि माना हालवित. एके वेळीं मोरोपंत कथेस बसले असतां त्यांनीं पंतांच्या एका आर्येचे दोनतीन अर्थ

---

१. सांगलीकरांनीं शालजोडी देऊन जोशीबुवांचा बहुमान व गौरव केला आणि पंतांनीं ‘ नटाचें तोंड न पाहण्याची ’ जन्माची प्रतिज्ञा मोडिली. पंत यांस पत्रांत ‘ सोलापुरकर राजश्री कविप्रवर ’ म्हणत.

लावून दाखविले; व अर्थ सांगतां सांगतां पुढें गेले होते ते मागे वळतांना पंतांकडे पाहून म्हणाले, 'माझ्या अल्पबुद्धीला सुचले ते दोन तीन अर्थ मीं सांगितले, पण—या विशाल उदरांत आणखी किती अर्थ भरले असतील हें त्यांचे त्यांसच माहीत.' पंत 'तुंदिलतनु' होते असें दिसतें.[1]

मराठी लावण्यांखेरीज मदालसाचंपू व कांहीं आरत्या अशी जोशी-बुवांची संस्कृत रचनाहि आहे. हें येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, ज्याची संस्कृतांत ग्रंथ रचण्याजोगी विद्वत्ता, तो डफावर थाप देऊन लावण्या करण्यास लागल्यावर तेथेंहि सर्वांवर त्यानें ताण करावी; मराठी भाषेस समोर थाटानें उभी करून तीस आपले पुढें नर्तकीप्रमाणें नाचवावें यांत नवल तें काय !! पण भाषाकामिनीचे हे खरोखर वस्ताद आहेत; आणि एका मुक्तेश्वराखेरीज ती यांच्याशिवाय दुसऱ्या कोणा-बरोबर इतकी खुलून रंगांत आलेली नजरेस पडत नाहीं, अशी यांचीं कवनें वाचल्यावर कोणाच्याहि मनाची खात्री पटेल. महाराष्ट्र कवींच्या पहिल्या पंक्तींत जोशीबुवांची संभावना खास होते.

सुंदरा मनामधि भरलि, जरा नाहि ठरलि, हवेलित शिरलि,
मोत्याचा भांग ।

या लावणींतलें

सूंदरी मूर्ति मदनाची, अमृतवदनाची, मदनकदनाची, विखारी धार ॥
बाहुली, कामसूत्रांत; मदननेत्रांत, कोकशास्त्रांत, निपुण, ही फार ।

---

१. ही आख्यायिका कर्णोपकर्णीं जशी ऐकिली तशीच येथें दिली आहे. ती जितपत विश्वसनीय असेल तितपतच तिजवरून काढिलेले पंतांच्या संबंधाचें अनुमान खरें असूं शकेल. पण एके वेळीं, श्रीमंत सरदार सर गंगाधर उर्फ बाळासाहेब मिरजकर यांनीं मला असें सांगितलें कीं, 'अगदीं लहानपणीं, मोरोपंतांना प्रत्यक्ष पाहिलेला एक इसम मला भेटला होता. त्याचें सांगण्यांत असें येई कीं, पंत हे स्थूल नसून साधारण कृश असे होते. त्यांची काठी जरा उंच असून त्यांस किंचित् पोंक आलें होतें. वर्णानें ते गोरे होते. चेहरा तेजःपुंज दिसे.'

शुक पिक यांणीं वरिली वाज, जाहले वाज, कंठि आवाज,
विण्याची तार ।।
ही मन्मथरस हवा, काय पाहवा, बूट वाहवा, सफल संसार ।
कचघनांत सौदामिनी, दिवस यामिनी, जपावी मनीं,
कीं न कळे पार ।।
वेणींत मूदराखडी, कोर कोखडी, माडिवर खडी, बिडा रंगदार ।
मणिकुसुम कर्ण शोभवी, मतिस लोभवी, मला तर भवीं वाटली सार ।।

इत्यादि सर्व वर्णन कोणाहि कवीच्या उत्तर वर्णनाशीं तोलण्याजोगें आहे. जसें शृंगाराचें तसें रामजोशांच्या पवाड्यांतील वीररसाचें चित्रहि केवळ अद्भुत आहे.

ब्राह्मणी राज्य जोरदार, घोड्यावर स्वार, होते शिपाई ।
जबर सद्दि, कैकांनि पाहिली; शत्रु ठेविले नाहीं. ।।

हा प्रसिद्ध पवाडा एक वेळ अवश्य वाचण्याजोगा आहे. त्यांच्या हयातींत पडलेल्या दुष्काळाचें यांनीं काढलेलें शब्दचित्रहि फारच हृदयद्रावक आहे; व यांच्या काळच्या धामधुमीचें यांनीं केलेलें वर्णनहि इतकें सरस उतरलें आहे कीं, तें वाचीत असतां ती धामधूम आपल्या डोळ्यापुढें प्रत्यक्ष उभी राहते.

रामजोशांच्या बैठकीच्या जागेजवळ सुब्रावबुवा या नांवाच्या एका साधुपुरुषाचा मठ होता. या बुवाच्या कर्मठपणाचें मोठेंच स्तोम माजलेलें होतें. बुवांचें तें प्रस्थ पाहून रामजोशांनीं त्याच्या मठासमोर बसून 'हटातटानें पटा रंगवूनि जटा धरिशि तूं शिरीं । मठाची उठाठेव कां करी ' हा सुंदर फटका उडविला. हा जोरदार तडाखा बोवांच्या वर्मी कसा लागला असेल हें त्यांचे तेच जाणोत.

जोशीबुवांच्या सर्व कवनांत त्यांचा छेकापन्हुति हा अलंकार संस्कृतसाहित्यविशारदांना चांगला परिचयाचा आहे. जोशीबुवांची ही लावणी किंवा हें कवन, हें त्या अलंकाराचें साक्षात् चित्र आहे. यांत प्रथम राधिका आणि तिची सखी यांचा संवाद आहे. यांत—

अंबरगत परि पयोधराते रगडुनि पळतो दुरी । काय हा धीट म्हणावा तरी।
सासुसासरापति यां देखत अधरामृतमाधुरी । घेतसे काय वदावी परी ॥
पटविघटित कुचतटहि वसंतीं हळुच येउनि उरीं ।
शीतल स्पर्शे सुगंधित करी ॥

अशा अनेक खुणा राधिका सांगत आहे; आणि त्या ऐकून दर एक वेळीं 'तो नंदाचा मूल काय गे सांग, कन्हया हरी ?' असें तिची सखी तीस विचारीत आहे, पण ती चटोर राधिका आपल्या सखीला नीट दाद न देतां 'अग तो हरी नव्हे. तो मारुत, तो मधुप, तो मलयज,' अशा हुलकावण्या देऊन चकवीत आहे. नंतर—

गुणवंत कुचावर लोळे, अति शोभला ।
'तो कृष्ण काय ?' 'नव्हे'; "हार' कळेना तुला' ।
बाई अंगमर्दनीं अति सुखकर वाटला ।
'तो कृष्ण काय ?' ।
'नव्हें;' 'कर दूतिचा भला' ।
मज शीतळ करितो, श्रमि होउनियां भला ।
'तो कृष्ण काय ?' 'नव्हे'; 'व्यजन सुवंशांतला' ।

अशीं खुबीदार प्रश्नोत्तरें आहेत. राधीकेनंतर त्या लीलानाटकी कृष्णाची पाळी आली. त्यानेंहि—

'कंठीं लपटुनि सदा असावी सुभगा गुणशालिनी ।
'वाटते पुष्पवती शोभिनी' ।
वृषभानूची सुता काय रे ? राधा लकुचस्तनी ।
नव्हे रे, 'माळ' आठवली मनीं ।
अधरचुंबिनी वंशसंभवा लालस मधुरध्वनी। आवडते फारच हृदयांतुनी ।।
वृषभानूची सुता काय रे ? राधा लकुचस्तनी ।
नव्हे रे, 'मुरली' मनमोहिनी ॥

अशीं मोठ्या गमतीचीं उत्तरें दिलीं आहेत; आणि याप्रकारें प्रेमलंपट अशा या जोडप्याच्या मौजेच्या प्रश्नोत्तरांची ही सुंदर लावणी बनविली आहे. ही वाचून रामजोशांनीं विचारिलेल्या 'अशी रचाया दुजी कुणाची

माय व्यालि भूवरी ' या प्रश्नाला नकारात्मक उत्तर देणेंच भाग पडेल.

रामजोशांना आत्मविश्वास केवढा दांडगा होता व आपल्या रचनाकौशल्याचा केवढा अभिमान वाटत होता हें पाहून मोठें कौतुक वाटतें. ते 'अशि कोण वर्णि सदलिका । इतर कवी कविरायाहुनि फिका' असले उद्गार वारंवार काढतात. आपल्या काव्यप्रीतिनें आपणच काय पण आपला प्रांतही प्रकाशमान झाला आहे असें ह्यांना वाटे. 'कविराय धरिल पाय अशी लावणी जो करी । माय कुणाची व्याली गगनाखालीं कविता सोलापुरी ॥' असे ते डौलानें म्हणतात. पुण्यांतल्या लावणीबद्दल तर ते अगदींच नाक मुरडतात.

रामजोशांचीं कवनें नीट मन लावून वाचलीं म्हणजे या कवीच्या करामतीचें मोठें कौतुक वाटतें व मनांत आनंदाच्या उकळ्या येतात. पण हा अनुभव सर्वांनांच येतो असें दिसत नाहीं. कोणाला तर हीं कवनें तुच्छ वाटतात व वीणा काव्यांच्या लंगोट्या यांच्या भरजरी ठाणांपेक्षां जास्त बऱ्या वाटतात. कोणा कोणाला तर रामजोशांची लावणी म्हटली म्हणजे ग्राम्य वाटते व कपाळाच्या आठ्या चढतात. आणि कांहींना तर या क्लिष्टच वाटतात. पण याला काय इलाज! जोशीबुवा म्हणतात त्याप्रमाणेंच 'कविता रस झडकरि मनांत यावा । हा पुण्याचा ठेवा' । दुसरें काय ? सहृदयत्वाची खरेदीविक्री बाजारांत होत नाहीं.

एके वेळीं आपण काशीयात्रेस जावें असें मनांत येऊन जोशीबुवांनीं आपली ही इच्छा लोकांस दर्शविली. तो स्वराज्याच्या, अबादानीचा काळ आणि त्यांत अशा गुणिजनाची मागणी. मग काय उणें! लगेच पंधरा–वीस हजारांची परडी जागच्या जागीं जमली. परंतु जोशीबुवांना काशियात्रेचा योगायोग नव्हता. लवकरच दुखणें येऊन शके १७३०-मध्यें, विभव संवत्सरीं, चैत्र शुद्ध प्रतिपदेश जोशीबुवांनीं पुण्यासच देह ठेविला[१]. रामजोशी तात्या काशिविश्वेश्वराच्या चरणाला

१. सुमारें वीस बावीस वर्षांपूर्वी सोलापूर येथें जोशीबुवांच्या घरचें

[ पान ७३६-पहा. ]

अंतरले व महाराष्ट्र काशिविश्वेश्वराच्या वर्णनात्मक सुंदर लावणीला अंतरले.

अनंतफंदीनें 'आनंदवल्लीच्या तुऱ्या'च्या म्हणजे बाजीराव पेशव्यांच्या अधिकार प्राप्तीच्या प्रारंभाची हकीकत कवनांत गाइली आहे, त्याप्रमाणें या शेवटल्या पेशव्याच्या कारकीर्दीची शेवटची हकीकत 'प्रभाकर' नांवाच्या शाहिरानें गाइली आहे.

'यशस्वी झाले श्रीमंत पहिले, सर्वे लढायाला। आतांच आलें अपेश कोठून बाजीरायाला ॥' या पवाड्यांत शेवटल्या झटापटींत मराठ्यांचा झालेला पराभव वर्णन करून पुढें बाजीरावाची स्वतःची हकीकत सांगतांना प्रभाकर म्हणतो—

जे श्रीमंत सकुमार ते वनांतरीं भडकत फिरती।
कळलें तिकडे भरदिवसास प्रभु कांटचामधिं शिरती ॥
आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारून धरिती।
खालीं पसरुन उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करिती ॥
अस्तमानीं कधिं रात्रीं भात भक्षिती पाटावरती।
दर कुच दर मजलीस कृपेंतील सेवक अंतरती ॥
समस्त लष्कर दुःखित पाहुन श्रीमंत गहिंवरले।
सद्गद झाला कंठ नेत्र दोन्ही पाण्यांनीं भरले ॥......
तुमची आमची हीच भेट आतां सर्वांना सांगती।
कृपालोभ परिपूर्ण करित जा, घ्या दर्शन मागुति ॥
ऐसें वच ऐकून शतावधि पायीं सेवक लागती।
महाराज उपेक्षुन आम्हांस जाऊं नये ॥
दूर ढकलून शरणांगतास लावूं नये।......
प्राण असुन शरिरांत बुडालों वियोग लोटांत ॥
बरोबर येतो म्हणून घालति किती डोयी पोटांत।

---

[ पान ७३५-वरून. ]

दप्तर पाहण्यास गेलों असतां त्यांचे वंशज रा. श्रीपाद गोपाळ जोशी यांनीं सांगितलेल्या हकीकतीवरून वरील मजकूर व जोशीबुवांचा मृत्युकाळ दिला आहे. छापील पुस्तकांत मृत्युकाळ १७३४-हा आढळतो.

निराश जाणून झाली रडारड मराठी गोटांत ।
निर्दयांनीं लांबविली पालखी पलटण कोटांत ॥
मातबर लोकांची ओंझीं चालतात मोटांत ।
गरीब करी गुजराण एका जोठांत ॥
कुंकवावांचून कपाळ, मंगळसूत्रावांचून गळा ।
तसा सैन्यसमुदाय उदासित रंग दिसे आगळा ॥

पेशव्यांच्या शेवटच्या पुरुषाची ही शेवटची हकीकत फारच हृदयद्रावक आहे. ती वाचतांना अंत:करण पिळून जातें, मनाला मोठी उदासीनता वाटते आणि श्रीमंतीच्या ऐषआरामांत वाढलेल्या राजपुरुषांची ही खालावलेली स्थिति ऐकून साहजीकपणेंच मन कालवून जातें व आमच्या कवींना हीं असलीं वर्णनें करण्याची पाळी यावी याबद्दल वाईट वाटतें.

नारि घरोघर झुरझुक्यांतुन सजुन उभ्या शृंगारांत । गुलाल जरदा पल्ले दुतर्फा रंग रिचविति बहारांत । सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदांत । हास्यवदन मन सदय शोभलें शूर शिपाई वृन्दांत।... हरिपंत तात्यानें उडविला रंग केशरी अनिवार । हास्यवदन राजेंद्र मुखावरि शेला लाविती वारंवार । पाटिल बोवानें शिबिरा नेउनि केला जोरावर ॥

इत्यादि शब्दांनीं सवाई माधवरावांच्या रंगाचें सुंदर चित्र रंगवून महाराष्ट्राला ज्यानें दाखविलें त्याचें हें वरील चित्र पाहतां पाहतां या महाराष्ट्राचे डोळे पाण्यानें भरून आले असतील व अजुनहि येतील. प्रभाकराचा हा रंगाचा पवाडा 'दाखवी पवाडा गंगुहैबती गाउनी । महादेव गुणिराज फेंकितो तनन तान दरबारांत । प्रभाकराचें कवन फांकलें सहज सभोंवतें शहरांत ।' म्हणजे हा पवाडा भरल्या दरबारांत गाइला होता व पुणें शहरांत हा ज्याच्या त्याच्या तोंडीं जाहला होता. या रंगाप्रमाणेंच सवाई माधवरावांचा जन्म, खर्ड्याची लढाई वगैरे अनेक विषयांवर प्रभाकरानें मोठीं रसभरित कवनें केलीं आहेत. पवाड्यांप्रमाणेंच या कवीचीं पौराणिक, वर्णनात्मक व शृंगारिक अशीं

कवनेंहि फार हृदयंगम आहेत.

लक्ष्मी गर्वें निंदा बोलुनि झिडकारित पार्वती ।
आहे ठाऊक पुरुषार्थ तुझा तुज प्रिय असो पशुपती ।।

हा फटका मोठा गमतीचा आहे. यांत लक्ष्मी आणि पार्वती या दोघीहि एकमेकींच्या पतींना नांवें ठेवून, उण्या शब्दांनीं उखाळ्या पाखाळ्या काढीत आहेत; व शेवटीं विष्णु आणि शंकर हे एकच होत; पार्वतीचा पालन करणारा आणि रमेचा ईश्वर हे मुर्तीच भिन्न नव्हत, याकरितां हा केवळ विनोदी संवाद गमतीखातर बनविला आहे असें सांगून या दोघांस म्हणजे पार्वतीपरमेश्वरांस नमस्कार केला आहे. याप्रमाणेंच ‘अर्जुन मला प्राप्त व्हावा पती। देवी धांव, पाव बघुन भाव, तडिस लाव म्हणे सुभद्रासती।’ हाहि पौराणिक पवाडा बरा उतरला आहे. यांत पंतांच्या शब्दांची छाया चांगली नजरेस पडते. ‘नक्षत्रनाथ नभीं उगवला’ ही याची लावणी फार उत्तम साधली आहे.

प्रभाकराचीं कवनें एकंदरीनें फारच रसाळ आहेत. त्यांच्यांत एक तऱ्हेची गर्भश्रीमंती मुरलेली दिसते. त्यांच्या गोंडसपणानें मन तृप्त होतें. बैठकींत प्रभाकराचें कवन निघालें व म्हणणारा अभिनयकुशल असला म्हणजे मंडळींच्या कानांना दृष्टी येते; व डोळ्यांना ऐकूं येऊं लागतें. आंधळ्या माणसाला तीं ऐकतांना त्यांतील शब्दार्थानें प्रत्यक्ष प्रसंग पाहिल्यासारखें होतें व गरीब भिकाऱ्यालाही क्षणभर श्रीमंतीचें ऐश्वर्य आपण भोगीत आहों असा भास होतो.

प्रभाकराचीं स्थलवर्णनेंहि मनाला एक तऱ्हेचा संतोष देतात. पुण्याच्या पर्वतीच्या वर्णनापासून तों—

**अखंड मन कामना सहज ती पुरविते प्राण्याची ।**
**महा समर्थ घंटाळी पाहिली आज आपण ठाण्याची ।**

या ठाणें येथील श्रीघंटाळी देवीच्या वर्णनापर्यंत कोणतेंहि कवन घेतलें तरी तें वाचीत असतां, त्या त्या स्थळाची सहज आठवण करून देतें. या स्थलवर्णनांपेक्षां इतर वर्णनेंहि कांहीं कमी दर्जाचीं आहेत असें

नाहीं. किंबहुना स्थलवर्णनांपेक्षां तीं कांकणभर सरस आहेत.

> ' शोभति सर्व शृंगार । नेत्र अंगार । कुरळ भृंगार । नवनवती ।।
> हौशेनें झुकत चालणें चाल ठुमकत ही गती ।। '

अशा विलासिनींचें नटणें, बघणें आणि सहजविलास, त्यांचीं अनुरागाचीं भांडणें आणि लोभममतेचे त्यांचे प्रेमकलह हे सर्व प्रकार प्रभाकरानें वारंवार वर्णिले आहेत. मात्र एकादे वेळीं या मानिनींच्या खोटया रुसव्यांत आणि त्यांच्या त्या प्रेमकलहांत—

> सहजाचें बोलणें गोष्ट निकरावरती आली । सुंदरा मनांत थरकांपली ।
> कर जोडून विनंती करुन, चरणिं लागली ।। '

अशी गत होते. आणि मग त्या बाईला नाकदुऱ्या काढतांना आणि रागावलेल्या पुरुषांची मनधरणी करतांना नकोसें होऊन जातें.

> ' करूं काय, जाहलें गाय, ! हाय !, कोणता उपाय, मज करमेना । अशी
> कशी हो कदर, करा वर नदर, सांगत्यें सदर, पसरत्ये पदर, राहवेना ।।'

अशा विनवण्या प्रहरांचेप्रहर करण्याची पाळी येते; आणि पुढें तर ' झाली रात गजर दो प्रहरांचा वाजला । शनि चंद्र मंगळ माथ्यावरती आला । तुम्ही सर्वगुणसंपन्न प्राणप्रियकरा । छळुं नका अशी कुळवंताची लेकरा । जन्माची अक्षई झालें मी सांथिण । दोन्ही घरची मी श्रीमंतीण ।' असें म्हणून पायां पडण्याची पाळी येते. आतां ही घडी पुनः कशी बसेल याची हुरहुर वाटून केव्हां ' खेळले खेळ हर्षांत बहु बहारिचे । नेसले शालु उंच उंची प्रहरोप्रहरीचे । हारोंहारी फवारे उडत होते लहरांचे ।' अशा जुन्या आठवणी येऊं लागतात आणि डोळ्यांना पाणीहि येतें; आणि ही अश प्रेम, भय, आदर आणि शृंगार इत्यादि निरनिराळ्या विकारांनीं एकाच वेळीं गजबजून गेलेल्या मनाचीं वर्णनें प्रभाकर फार हृदयंगम करतो.

अशाच एके वेळच्या मनाचें चित्र दादा वीरानेंहि प्रभाकराच्याच धर्तीचें काढिलें आहे.

> जोडली प्रीत नको तोडूं सगुण माणसा । जिव झुरतो नवनवती आली रसा ।
> तूं बाळपणीचा मित्र जिवाचा गडी । म्हणून प्रियकरा या मी पडलें झडी ।

> अधिमधि सोडितां लागेन ( वाहेन ) कवण्या थडी। तुजवांचुनि या महापुरांत मी देशोधडी। सोडुं नको ही अशी उडवुन अधर वावडी ।। इ०
> ( दादा वीर ).

अशा वेळीं अर्थात् कोणाहि प्रेमबद्ध पुरुषाला मायेचा आणि प्रेमाचा लोट येतो आणि त्या स्थितींत त्याला ती चिंतातुर तरुणी अधिक शोभायमान दिसूं लागते. क्षणभर त्याचें मन वेडावतें, तें तल्लीन-हि होतें आणि त्या तिच्या स्वरूपाचें गोड चित्र पाहण्यांत तें वेधून जातें. आणि पारवा घुमावा त्या प्रमाणें त्या बाहुलीपुढें तो घुमून व घोटाळून प्रियाराधन करूं लागतो आणि बागडूं लागतो. मग आपल्याशींच त्या समोरच्या पुतळीला उद्देशून बच्याजी दिवटे उर्फ बचु फंदी हा कवि लिहितो त्याप्रमाणें त्याचें तें इष्काचें भुकेलें मन म्हणूं लागतें कीं,

> ' नवनवतिचा रंग तुझा, कटि पातळ भरजरी। चोळी हिरवी त्यावर दिसे साजिरी। ठुसुक ठेंगणी लहान दिसे तरुणपण रवरवी। जसा कीं गगनीं उगवला रवी ।।

आणि मनाची ही अशी स्थिति होऊन जाते. तिच्या विषयीं अव्याज प्रेम, ती नसतेंच कुंभांड कां करतें, ती खोटीच कां रुसते आणि एखाद दुसरा कठीण शब्द तोंडावाटे निघतांच ती मानिनी इतकी कष्टी कां होते आणि जिला आनंदांत पाहून मनाला समाधान वाटावें तीच थोडी रागावली असतां व जरा घाबरून कष्टी झाली असतां आणि घामानें डबडबून तिच्या शरिराला कम्प सुटला असतां तीच इतकी मनोहर कां वाटते, हें मानवी स्वभावांतले एक मोठें गूढ आहे. पण यांत गूढ तरी कशाचें? हे सर्व ढंग महादेव कवीश्वर म्हणतो त्याप्रमाणें प्रीतीचीं लक्षणें आहेत.

गंगुहैबती व महादेव हीं नांवें प्रभाकराच्या लावण्यांत नेहमीं येतात. गंगुहैबती, महादेव व प्रभाकर हे तिघे एकाच फडांतले गाणारे होते व हे तिघेही लावण्या करीत ( म्हणे कवी गंगुहैबती ) ( इ. प्र.

लावण्या पृ. १६० ला. ५७ व ५८ पहा.) यापैकीं गंगुहैबती हा महादेवाचा गुरू दिसतो ( गंगुहैबती साथि जिवाचे। ज्या मानिती पुरे दैवाचे। गुरु वंदित महादेवाचे ॥ तसेंच, पुणें शहर दक्षिणे-मधें बाळाईतक्त, ( पृ. १६२ ला. ६२ ) वस्ताद गंगुहैबती तेथील रहिवाशी। महादेव गुणीराज गुणाचा राशी। ( पृ. १६४ ला. ८५ ) व तो गंगू ओम गाणारा असावा ( गंगु हैबती आहे लौकिक जगभर गाण्याचा पृ. १९४ ला. ८५ व पृ. १९९ ला. ८७ ).

महादेव कवीश्वर म्हणे। हीं प्रीतिचीं लक्षणें, निर्मळ मन,
धुतल्याविणें। गुणिराज...गुणि भाषणें। प्रीत होणें होतसे।

आणि मग इतका वेळ मनगंगेला घातलेलें धीराचें धरण फुटून जाऊन

पति समुद्र केवळ सखी सुंदर गौतमी।
मिसळली मग आज स्नेह संगमी।...

अर्थात् ही अवस्था प्राप्त झाल्यावर मग तेथें कवीच्या वर्णनाचें व मध्य-स्थीचें कारणच राहत नाहीं. अशा या वेळीं—

'म्हणे पंत प्रभाकर समद निघुन चालला।
आम्हि जातों तुम्ही आतां इश्क करा आपुला।'

आणि मग प्रभाकर, दादा वीर, बचु फंदी, महादु सुतार हे वर उल्ले-खिलेले सर्व कवी आपापले डफ घेऊन पडद्याआड होतात. त्यांचे डफ डोळ्यांपुढें असतात आणि त्यांच्या कवनांकडे कान लागलेले असतात, तोंपर्यंत हे कोण व कुठले याची चौकशी करण्याचा मनाला विसर पडतो, किंवा मनांतहि येत नाहीं. पण ते जरा दूर झाल्यावर या असल्या चौकस्या आपल्या मनाला सुचूं लागतात. हे सर्वजण समकालीन असून एकाच बैठकींत बसत असत. बचु फंदी हा अनंत फंदीचा कोणीहि आप्त नव्हता. याचें उपनांव दिवटे. हा मोठा विचित्र पुरुष होता. याला घरा-दाराची काळजी लवमात्र नसे. सारा वेळ तमाशे करावे, पोरे नाचवावे आणि मिळेल तें सुख साधून समाधानानें मोठ्या खुशालींत काळ घाल-वावा असा याचा क्रम होता. या सर्व मंडळींत प्रभाकर हा जरा प्रति-ष्ठित दिसतो. प्रभाकर दातार हा मूळ हरणई—मुरूडचा राहणारा. याच्या

कवनांत आलेल्या उल्लेखावरून याची घरची पहिली स्थिति फार गरिबी-ची असावी असें दिसतें. किंबहुना उत्तर वयांत मुंबई, ठाणें यांसारख्या शहरांतहि सटरफटर माणसांवर कवनें करून हा द्रव्याची याचना करी. यावरूनच याची स्थिति केव्हांहि फारशी सुधारली असेल असें वाटत नाहीं. सवाईमाधवरावांचा भरलेला ऐश्वर्यसंपन्न दरबार पाहून ज्यानें त्यावर कवन करून म्हटलें, त्याला उत्तरवयांत ठाणें येथील कचेरीचें वर्णन करणें भाग पडावें; ज्यानें पेशव्यांचीं आणि त्यांच्या शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन इत्यादि सरदारांचीं वर्णनें आपल्या रसवंतीनें गाइलीं, त्याला मुंबईकडल्या पारशांचीं, सोनारांचीं आणि इतर अनेक लुंग्या-सुंग्यांचीं वर्णनें करीत सुटण्याची पाळी यावी आणि वाग्देवीच्या गळ्याला दोरी बांधून दरवेशाच्या अस्वलीप्रमाणें तिला दारोदार नाचविणें भाग पडावें हें पाहून मनाला मोठा खेद वाटतो; आणि हें असें कां व्हावें याचें आश्चर्यहि वाटतें. कारण, कोंकणांतून घाटावर आल्यावर प्रभाकर हा प्रथम नाशकाजवळ गंगापुरास राहत असे. पुढें तर हा तेथून निघून प्रत्यक्ष पुण्यास येऊन राहिला होता. पुण्यांत खंडेराव रास्ते या उदार सरदाराच्या घरीं हा कारकूनीवर असे. याच वेळीं या रास्त्यांच्या घरीं पुढें प्रसिद्धीस आलेला बाळाजी नारायण नातू हाहि शागिर्द पेशांत होता. नोकरी सोडून हा कवनें करूं लागला. याची ख्यातीहि चांगली वाढली; आणि सरदार पटवर्धन–गंगाधर शास्त्री–यांच्या घराण्याशीं याचा शरीरसंबंधहि जडला. मग याच्या कवनांवरून दिसून येणारी आणि लोकवार्तेनें खरी ठरणारी ही वरील स्थिति कशी व कां आली याचा उलगडा होत नाहीं. हा शके १७६५-मध्यें आपल्या वयाच्या ७४-व्या वर्षीं मृत्यू पावला. चित्पावन कोंकणस्थ ब्राह्मणांत जे थोडे कवी झाले त्यांत प्रभाकर हा वरच्यापैकीं दिसतो. एकंदर शाहीर मंडळींत तर हा फार वरच्या पायरीचा कवि आहे.

प्रभाकर हा उत्तर वयांत कर्जामुळें बेजार होऊन आपल्या कुटुंबाला व घराला अंतरला होता. व तें फेडण्याकरितां हा फार झटत होता

असें दिसतें. गायकवाडांवरील आपल्या पवाड्याच्या शेवटीं हा म्हणतो–
" प्रभाकर कवी भ्रमर गुंतला पहा कर्जाच्या कमळांत । द्रव्य कृपेचा प्रकाश पडल्या सुटुन जाइल स्वकुळांत ॥ " ( प्रभाकर लावण्या पृ. ८१ )

ज्या चार दोन ब्राह्मणांनीं शाहिराचा धंदा उचलिला ते खेरीज करून, बाकीच्या शाहिरांत, म्हणजे ब्राह्मणेतर शाहिरांत, होनाजी हा फार गुणी मनुष्य होता. याला कवन करण्याचा नुसता सराव होता इतकेंच नाहीं; तर याच्या वाणींत एक तऱ्हेचा प्रसाद होता. होनाजीच्या या कवनशक्तीचें एक कारण असें दिसतें कीं, तो व्यवसाय त्याच्या कुळांत पिढीजाद चालत आलेला होता. होनाजी हा जातीनें नंदगवळी. याच्या आजाचें नांव सातीप्पा, उपनांव शेलारखाने. ही मंडळी पुण्यासच राहत असे. साताप्पाला पुत्र तीन. वडील बाळा, मधला कुशाबा आणि धाकटा सयाजी. या तिघांत सर्वांत धाकटा जो सयाजी त्याचा मुलगा होनाजी. साताप्पाचा थोरला मुलगा जो बाळा तोच ' बाळा बहिरू ' या नांवानें शाहीरमंडळींत प्रसिद्ध आहे. होनाजीच्या घराण्यांत तमासगिराचा धंदा पिढीजाद असल्या-मुळें साहजीकपणें इतरांना कष्टसाध्य अशा पुष्कळ गोष्टी होनाजीला सहज साधून गेल्या. साताप्पाचीच धांटणी त्याचा मुलगा ' बाळा बहिरू ' व नातु ' होनाजी ' या दोघांनीं उचलली, असें तमासगीर म्हणतात. साताप्पाचे पवाडे कोठें आढळले नाहींत. पण त्याच्या लावण्या मात्र कोठें कोठें आढळतात.

याची कृष्णावर एक लावणी आहे. यांत कृष्णाच्या उद्धट व बालिश खोडयांनीं कंटाळून गोपवधू यशोदेकडे जाऊन सांगू लागल्या कीं––

आंवरी, आंवरी, या श्रीरंगा । यशोदे गे माय । आवरी आवरी ।
आम्ही गौळणी बरवंटा । जातो मथुरेच्या हाटा । हा येऊन धरितो

१. कोणी म्हणतात साताप्पा हा सासवडचा राहणारा. हा प्रथम ढोलकी-वर भेदिक लावण्या करून म्हणे. पुढें हा इतर लावण्या करूं लागला.

आमुच्या वाटा ।। ...गवळण म्हणते ते वेळीं । कृष्ण सांवळा हरि वनमाळी । धरी कौटाळुन करी घुमाळी ।। यमुने जळीं जातां श्रीरंग । चुंबितो वदना । कैसा लावित मुटला नंग । करूं नये ते करितो बेढंग । हा मुकुंद कान्हा ।। कौंसापाशीं सत्वर जाऊं । मथुरा नगरी बांधुन नेऊं । शीघ्र गतीनें अबरु घेऊं । जिव पदकमळीं याच्या ठेऊं । दंड पडला जो तो देऊं । या मिळुन सर्वत्रां शिक्षा आपुल्या हस्तें लाऊं । कमळोभ्दवनेत्रा । त्राहे त्राहे झाला जीऊ । या गोकुळक्षत्रा हा कंसारी । नंद खिलारी । यमुने तीरीं । धेनु चारी तो गाई ।।...ऐसी करणी करितो थोर । बाछाइत लहान चटोर[1] । तुजला दिसतो छोटा पोर । रात्रंदिस हा जिवास घोर ।। करीं दोर बांधुन जरी ठेविसी । तरी कृष्ण नाटकी । ब्रह्मादिक वर्णिति ज्यासी । कळसूत्रनाटकी । साता गवळी नीत स्मरणासी । हरी गुणनाटकी ।। इ०

सातीप्पा[2] मागें साताप्पाचा मुलगा बाळा हाहि कवनें करी. कवनांत हा आपली निशाणी ' बाळा बहिरू ' अशी घालितो. बाळा बहिरू या जोड नांवांत बाळा हें कवीचें नांव आणि बहिरू हें कवनें म्हणणाऱ्याचें नांव होय. बहिरू हा जातीचा रंगारी होता. तो बाळाची कवनें तमाशांत नेहमीं म्हणे. बाळा बहिरूच्या लावण्या व पवाडे दोन्ही प्रसिद्ध आहेत. ' श्रीमंत महाराज सवाई रावसाहेब मोती दाणा । खूप युक्तिनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ।।' हा नाना फडणविसांवरचा बाळा बहिरूचा पवाडा सर्वांच्या माहितीचा आहे. या पवाड्यांतल्या भाषेप्रमाणेंच बाळा बहिरूच्या लावण्यांची व इतर कवनांची भाषाहि सरस आहे.

' अरे प्राणसख्या ! राजसा ! तूं ये मजकडे । तुझ्या प्रीतीचें मला लावलें वेड ।। राजसा, राजअंबिरा, गुणि रे गुणवंता, । लुब्धले तुझ्या स्वरुपास लक्ष्मीकांता ।।

---

१. बाछाइतला हा नट चोर ( पाठभेद )

२. साताप्पाची समाधी पुणें येथें संगमाजवळ एका घाटावर आहे; व समाधीवर पिंडी आहे. यास शांतलिंग असें म्हणतात; व येथें श्रावण महिन्यांत सोमवारीं पुष्कळ संप्रदायी गवळी येऊन हजीरी देतात.

हें कवन तमासगीर मोठ्या मौजेनें म्हणतात. यांत कोणी विरहिणी स्त्री प्रेमानें वेडी होऊन आपल्या प्रियकराच्या आठवणी काढीत आहे, अशी कल्पना कवीनें केली आहे. ही विरहिणी म्हणते—

तूं कांहींतरी बा केलीस करणी । क्षणक्षणा आठवते तुझे गुण अंतःकरणी ।। जसी पिंजऱ्यांतली मैना पोपटस्मरणी ।। नवे नित्य भक्षुन त्यासाठीं लागली झुरणी । पाहून इंदुशी सिंधुला आली भरणी । मी तसा देह अर्पिला स्वामिच्या चरणीं ।।... जाई चुकुन तान्हुलें बाळ, गुणी रे गुणवंत । रडुरडुन माउली करी आकांत । चुके हरणी पाडसा, धुंडि वनाचा प्रांत । ती उडुन जाय पक्षिणी आकाशपंथ । पिलांसाठीं खोप्यांत तिचा जिव गुंतत । असे लक्ष लागलें चरणी मोहिलें चित्त । ऐकून शब्द तुझासा अवचित । तोंडाचा घास तोंडांत येते धांवत...तुं आलख म्हणऊन फिरसीं आळोआळी । तुज मागें होईन गोंसाविण पसरीन झोळी । तूं प्रवासी तरी वाहीन डोंगरची मोळी । परि तुझी प्रीत न तोडिन कोणें काळीं ।। तुं नेत्र मी बाहुली । तूं वृक्ष मी साउली । अर्पिला देह मी पाउलीं ।। मी कुडी सख्या तूं प्राण । तूं चिद्‌रत्नाची खाण । प्रीत तुझी अशी तव जाण ।। ... ... म्हणे कवि बाळा बहिरू । मनी नको गड्या संशय धरू । नको संगितचा शेवट करू ।। हें गडे, सत्य वचन तूं मान । गड्या तुझ्या गळ्याची आण । होईना कधी बेइमान ।।......इ.

सातप्पाची हातोटी जशी बाळानें उचलली, तशी बाळाची हातोटी त्याचा पुतण्या होनाजी यानें उचलली. कवनांत होनाजी आपणाला ' होनाजी बाळा ' असें म्हणतो. यांत आलेल्या ' बाळा ' या नांवाचा होनाजीचा चुलता ' बाळा ' याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. होनाजीचा ' बाळा ' हा जातीचा शिंपी. याचें नांव बाळा करंजकरें. होनाजीनें लावणी रचावी आणि ती बाळानें म्हणावी. या दुकलीची बैठक नेहमीं एके ठिकाणीं असल्यामुळें लोक यांच्या फडाला ' होनाजी बाळा ' चा फड असें म्हणूं लागले; व मग लोकांनीं ठेविलेलें हें नांव होनाजीहि स्वतः आपणास लावूं लागला. एकंदर तमासगीर मंडळींत लावणी रचणाराचे नांवापुढें ती गाणाराचें नांव लावावें असा प्रघातच

१ होनाजी बाळाकृत लावण्या पृ. ७.

पडून गेला होता. साधारण व्यवहारांत कोणीहि आपल्या नांवापुढें आपल्या बापाचें नांव लावितो, किंवा गुरुशिष्यांमध्यें शिष्य हा प्रायः आपल्या नांवापुढें आपल्या गुरूचें नांव लावितो; त्याचप्रमाणें तमासगिरांत शाहिराचें नांवापुढें कवनें म्हणणाऱ्याचें नांव लावण्याची चाल पडली; आणि याच चालीला अनुसरून होनाजीच्या कवनांत 'होनाजी बाळ' असें नांव येऊं लागलें व त्या कवनांना लोक होनाजी बाळाचीं कवनें असें म्हणूं लागले.[1]

होनाजीची विद्वत्ता किती होती हें कांहीं कळत नाहीं. पण त्यानें रचिलेल्या कवनांवरून असें दिसतें कीं, त्याचा संस्कृत भाषेशीं साधारणपणें बराच परिचय असावा. जुन्या मराठी कवींच्या कृतींशीं तर त्याचा चांगलाच परिचय होता. पुराणांतलीं पौराणिक आख्यानें गातांना मुक्तेश्वराच्या आणि श्रीधराच्या वर्णनांतल्या उत्तम कल्पना हा आपल्या कवनांत जवळ जवळ त्यांच्याच शब्दानें उठवून देतो. पौराणिक आख्यानांवर आणि अनेक देवतांच्या चरित्रांवर होनाजीनें लावण्या केल्या आहेत. पण त्या सर्वांत या गवळी जातीच्या शाहिरानें, सर्व गवळ्यांचा नायक जो श्रीकृष्ण गोपाल त्याची गाईलेली चरित्रें फारच सुंदर वठलीं आहेत. 'राधे हा मुकुंद उचलुनि कडिये घेई घेई' ही अगदीं बाळ-

---

१. असें सांगतात कीं साताप्पा, होनाजी वगैरे मंडळी ही जातीनें नंद गवळी होत व यांचा पेशव्यांकडे जिव्हाळ्याचा घरोबा असे. एके वेळीं होनाजीची आई ही श्रीमंत माधवरावसाहेब पेशव्यांना दिवाळींत दिवा ओवाळाण्यास गेली होती, तेव्हां श्रीमंतांनी ओंजळभर मोहरा तिच्या ओवाळणींत टाकल्या. तेव्हां गवळणीनें म्हटलें 'या मोहरा कायमच्या नव्हेत या संपून जातील. माझी गाईची खिल्लारें आणि लाडकीं वासरें चरण्यासाठीं मला माळ जमीन द्यावी.' हें ऐकून त्या सर्वांचें पालन पोषण करणाऱ्या त्या प्रेमळ धन्यानें म्हटलें 'हा तुमचे हातांतला ओंवाळणीचा दिवा घेवून तुम्ही डोंगराच्या सोंडेवरून जावे व दिवा मालवेपर्यंत तुम्ही जितक्या जाल तितकी जमीन तुम्हांस वंशपरंपरेनें द्यावी.' बाईहि तडक निघाली व हातीं जळता दिवा घेऊन जितकी जमीन तो चालली तितकी जमीन तिला श्रीमंतांनीं इनाम करून दिली.

पणची आणि 'मुकुंद यमुने थडी थडी। खेळतसे मिळवून गडी' ही लहानपणची, तशीच 'श्रीरंगा कमलकांता हरी पदरातें सोड' किंवा

राधा हरिला पुसती, नेत्र विलसती, लाल भासती, उघड दिसती, दृष्ट घुमिलो। सांगा मजला श्रीपती काल तुम्ही रात्र कोठें कामिली॥'

ही जरा जाणतेपणांतली, या सर्व लावण्या मोठ्या ठसकेदार आहेत. श्रीकृष्णाशिवाय, श्रीगणपती, श्रीमार्तंड, श्रीविठ्ठल, श्रीशंकर इत्यादि अनेक देवतांवर रचिलेलीं कवनेंहि मधुर आहेत. श्रीशंकरावरील—

श्रीविश्वनाथ पशुपती, अखिल सुरपती, भवानीपती,
भवनाशक मूर्ती॥ हें लिंगरूप मृत्युंजय अगाध कीर्ती॥

या वर्णनात्मक लावणीपेक्षां—

"श्रीभाळलोचना, नागभूषणा, निलग्रीवा पशूपती॥ मुगुटीं जटेंत कोठुन दिसती ललनेची आकृती॥" ही लावणी जरा चातुर्य खर्चून रंगविली आहे. या लावणींत कोणी 'लावण्यवती गोजरी' आपल्या पतीच्या मस्तकावर बसलेली पाहून 'नेटकी प्रवीण वनिता सुंदर केवळ बिंबाधरी। न सांगता मजप्रती वाटतें तूंच ठेविली शिरी....कां हो चोरितां मला दक्षक्रतुदलना सांगा तरी।' असा प्रश्न थोड्या मत्सरभावानें गिरजेनें शंकराला केला आहे; व यावर थोडे वकीली शब्दानें शंकरानें उत्तर दिलें आहे, कीं—

शिरीं अपूर्व वाहतसें गंगाजळ, निर्मळ, सुंदरे!
जळावरिल तें कमळ; नव्हे मुख पहा तें न्याहाळुन गे बरें॥
कमळांतिल मकरंद सेविती मिलिंद प्राणेश्वरें।
म्हणून सांवळें तेज तुला दिसतें हिमनगकुमरे।
नेत्र नव्हेत, ते मीन तळपती जिवनामधि येकसरे।
नव्हे भोंवया सलीललहरा उदकाच्या प्रियकरे॥
रत्नमाणिकें नव्हेत जळावर ते तरंग उठती। इ. इ.

देवतांच्या प्रमाणेंच पंढरपूर, जेजुरी वगैरे स्थलांच्या वर्णनपर लावण्याहि फार नमुनेदार आहेत. होनाजीच्या लावण्यांत शृंगार फार आहे. कित्येक ठिकाणीं तर त्याचा अतिरेकहि झाला आहे. पण याचा

अर्थ होनाजी–किंबहुना आमचे सर्व शाहिर–हे नीतिप्रिय नसून व त्यांना नीतिमत्तेची कल्पनाहि नव्हती असा मुळींच नाहीं. भुर्तृहरीसारख्यांनीं श्रृंगारशतक रचिलें हें खरें. पण त्यांनीं आपल्या पसंतीची चाचणी नीतिशतकांत व वैराग्यशतकांत दाखविली. तशीच होनाजीनें श्रोत्यांचें मन रिझविण्याकरितां विनोदानें श्रृंगाराचा जरी अतिरेक केला तरी तो बैठकींतल्या मजेपुरताच होय. होळीवरची कवनें होळीवरच म्हणून जाळून टाकावीं. तीं देवघरांत न्यावयाचीं नाहींत. तेथील काव्यें अगदीं निराळीं. त्याचप्रमाणें एकंदर स्त्रियांनीं कसें वागावें याबद्दलहि या शाहिरांचे उपदेश अगदीं भिन्न असून ते फार वरच्या दर्जाचे आहेत. होनाजीच्या मतें चांगली स्त्री ती, कीं जी—

" दास्य सासु सासऱ्याचें मग पतिसेवा त्यावरी । मर्जी माफक विनोद, एकांती केवल रंभेपरी । सुरतानंदीं मन रिझवुन पतिचे पाय स्वकरें चुरी । यथानुकल धर्म वासना, संतोष सदा अंतरी । ज्या गोष्टी प्रिय स्वामिस त्याच गोष्टि साक्षेपें करीं । चाल–भोजन समयीं पंचप्राण अति पतिचें भोजनीं । याच परीं स्नेह मंडित अशि हे शुभ सूचक कामिनी । पति सहित निर्दोष वास वैकुंठीं याच साधनीं । देह स्वामी कारणीं झिजावा हेत हृदयामधीं । होनाजी बाळ म्हणें हेंच स्त्रियांचें तीर्थाटण विधि ।।"

होनाजी हा पेशव्यांच्या अन्नाचा ऋणी होता. त्यानें त्या आपल्या अन्नदात्यांचें व त्यांच्या राजधानीचें वर्णनहि इतर क्षेत्रवर्णनांप्रमाणेंच मनापासून प्रेमळ केलें आहे.

श्रीमंतांचें तक्त पुणें खुषवक्त नमुना बाई ।
चल पाहूं कन्हय्या, राव राजेंद्र सवाई ।।
अपूर्व महाल मंदिर, उंच गोपुर, हवाशिर कैसी ।
पुण्यवंत नगरी दिसे द्वारका जैशी ।।

होनाजी लावण्या पृ. १८५ ला. १४२.

हें त्या शहराचें, आणि

जरद्या घोड्यावर स्वार शिपाई सरदार तो छेलछबेला।
मस्तकीं फुलाचा तुरा, शिपाई झुरा, इष्कि रंगेला।
पौर्णिमेस तारांगणीं जसा गगनीं चंद्र उदेला।
हे भगवंताचे लाल, सदा खुशियाल, न्यूनता नाहीं।।
चल पाहूं कन्हया राव राजेंद्र सवाई।।

होनाजी लावणी पृ. १८६ ला. १४२.

हें त्या शहराच्या मुख्य सरदाराचें वर्णन कोणाचा अंतरात्मा गार करणार नाहीं? या काळीं सर्वभर आबादानी होती; आणि रंग-विलासांना ऊत येऊन बसला होता. आठ महिने सर्व देशभर स्वाऱ्या शिकाऱ्या कराव्या, आपल्या देहाची आणि त्यांतील रक्ताची पर्वा न बाळगितां मुलुखगिरीचे कष्ट करावे, आणि चार महिने परत देशी येऊन विश्रांती घ्यावी; चातुर्मास घरीं असतांना सणवार सुखानें आणि थाटानें करावे व आंगत पंगत करून जेवावें, आपण लढलों कसे, हल्ले चढविले कसे या गोष्टी इष्टमित्रांना सांगाव्या, आणि जिवावरच्या प्रसंगांची तिखट मीठ लावून वर्णनें करावीं हा नित्यक्रम होऊन राहिला होता. या प्रमाणें ते चार महिने, ते विश्रांतीचे दिवस सुखांत आणि नानातऱ्हेच्या ऐष आरामांत व इष्कांत घालवितां घालवितां पावसाळा सरून दसऱ्याचा दिवस आला म्हणजे चार महिने कुरणांत चारून तयार केलेले घोडे महाराष्ट्रभर सर्व मराठे हौसेनें शृंगारीत, व त्या दिवशीं चौदा रत्नातलें एक रत्न म्हणून त्यांची पूजा करीत व आपल्या बरोबरीचें पक्वान्नाचें पान वाढून आपल्या घोड्याला मोठ्या प्रेमानें जेऊं घालीत. त्या दिवशीं संध्याकाळच्या समारंभाला जाण्यासाठीं आपला घोडा मोठ्या हौसेनें ते सजवीत. तो त्यांना प्राणापेक्षांहि प्यार असे. आपल्या लाडक्या मुला-मुली प्रमाणेंच त्याच्या आंगावरहि ते तऱ्हेतऱ्हेचे दागिने घालीत. माहेर-वासणींच्या केसांप्रमाणेच घोड्याच्या आयाळांच्या ते थाटाच्या चोटया किंवा वेण्या विणींत; आणि असा श्रृंगारलेला घोड पाहून त्याच्या पुठ्यावरून हात फिरवितांना त्यांना कौतुक आणि अभिमान वाटे.

घोडा सारंग सुजाती। जिनावर भरगच्ची कलाबतु चे जडले हिरामि

त्याचें पाणी । कलगी सूर्यपान मुलतानी । गळयांत ताइत्या पेटया,
अकबरी मोहोरा, पायीं तोरडया तुफानी । हौसेनें केला थाट पठाणी ।
अश्वावर स्वार झाले राव राजेंद्र निघाले हिंदुस्थानी ॥ (समन भाऊ)

असें शाहीर गातो.

मराठ्यांना आपल्या घोड्यासंबंधीं वाटत असलेल्या विलक्षण प्रेमाबद्दल तत्कालीन इंग्रजांना आश्चर्य व कौतुक वाटे. घोडा दहा रुपयांचा असो किंवा हजार रुपयांचा असो; त्याचे चोज व शृंगार करण्यांत मराठा स्वार गढलेला असे. अनुकूलता असेल तो घोडयाच्या गळ्यांत पुतळ्यांच्या माळा, वाळे व इतर शृंगार घाली; लगाम व अर्नीन, जीन, जेरबंद वगैरे थाटाचा करी; पण ज्याची ऐपत एवढी नसेल तो निदान आयाळाच्या केसांच्या वेण्या करून व कपाळावर रंगीबेरंगी बटीची गोंडवेणी लोंबत ठेऊन घोडयाची शोभा वाढविण्यास कमी करीत नसे. पण त्याच्या प्रेमाची मर्यादा या बाह्य थाटावरच संपत नसून तिचा ठाव घेण्यास आपणास या स्वाराच्या अंतःकरणांत शिरलें पाहिजे. त्याला आपला घोडा जिवापेक्षांहि प्यारा वाटे. त्याची शुश्रुशा करण्यासाठीं एक स्वतंत्र पोरगा स्वारींत प्रत्येक स्वार घेत असे, तरी तो त्याच्यावर विसंबून न राहतां त्याला चंदी, वैरण, पाणी, खरारा वेळच्या वेळीं मिळत आहे किंवा नाहीं हें पाहण्याविषयीं फार दक्षता ठेवी. इतकेंहि असून घोडयावरून खालीं उतरताच त्याच्या फुठ्यावर थाप मारून, त्यास गोंजारून, त्याचें सारें अंग मनगटापासून कोपरापर्यंत साऱ्या हातानें जोरजोरानें रगडल्यावांचून व त्याचे पाय मागें व पुढें ओढून सांधे मोकळे केल्यावांचून मराठी स्वारास चैनच पडत नसे. सारांश मराठ्यांचे घोडे तेजस्वी, तयार व चलाख असून धन्याच्या प्रेमळ वर्तनाचा त्यांच्यावर परिणाम झालेला दिसे. तत्कालीन एक इंग्रज गृहस्थ लिहितो 'घोडा बाळगावा मराठ्यानेंच. त्याचें तो जें कौतुक करितो, त्याचें वर्णन करतां पुरवत नाहीं; पण एवढें खरें कीं, इंग्रजी सैन्यांत घोड्यास रोज चार साडेचार शेर

चंदी असून त्यापेक्षां शेर दीडशेर चंदीवरच मराठ्यांचे घोडे जास्त तयार आहेत!'

पूर्वी घोड्यांच्या मोठमोठ्या पागा जागजागीं असत; व शिवाय कुरणांत यथेच्छ चरण्यासाठीं मोकाट सोडलेलीं शिंगरें पुष्कळ असत; त्यांपैकीं नीट देखणीं शिंगरें निवडून, त्यांना 'बजवण्याचें, सज-विण्याचें' व चोट्या (आयाळाच्या केसांच्या वेण्या) विणून, तंग तोबऱ्याची तयारी करण्याचें कामांत बायका लक्ष घालीत असत. 'परशराम' कवीनें केलेल्या एका कवनांत एक वीरपत्नी आपल्या स्वामीची महती सांगतांना म्हणते—

मादवान सिंगर पागा चरायास बनल्या, पण पाठवुन त्या स्वामिनीं शहरासि आणल्या ।। त्यांत छाट केल्या, नीट देखण्या ज्याना मी चुणल्या ।। आधीं बजबुन सजविल्या हौसेनं मग चोट्या विणल्या ।। तंग तोबरे जीन खोगरे नांवनिशी गिणल्या ।। बारगिर घोरगे ठेवितां गोष्टी गुज-गुजल्या ।। हाती उंट पालख्या नालख्या आबरानें चिनल्या ।। शिलकिस केले तऱ्हेतऱ्हेचे वस्त्र नव्या नवल्या ।। दलबादल अलिजा डेरे । नाहो फरसखाने सारे । मखमाली बिच्छुने न्यारे ।। चा० ।। सरमजाम कुल-तमाम केली तयारी जायाची ।। कोण सख्याला भजी वर्जी कठीण मर्जी रायाची ।। चलगे० ।।

पहाटे बिनीवाल्याचा नगारा कानीं पडताच खडबडून जागी झालेली व शत्रूच्या मुलखांतून जाणाऱ्या सैन्यांत असलेली एक वीरपत्नी आपल्या पतीस जागे करतांना म्हणते—

करून मघां जिनबंदी सख्या पुढें स्वतांच बिनिवाले सरले । सरंजामि सरकारि एकांडे ठळक ठळक मागें उरले ।। रंव पडली पहा ऊंट तटें किती सौदागर देसावरले । हाका आरोळ्या देति भयंकर मार्ग चुकून डोंगरि शिरले ।। कठिण घांट बाज म्हणुन मुळीं आधि फकिर आणिक ढाले फिरले । अजुन आपुण निद्रिस्त तशामधि होति मुकाम फारच दुरले ।। ।। चाल० ।। पहाटची झोंप अति गोड केवळ शरकरा ।। उठुं नये वाटतें खरेंच किहो प्रियकरा ।। सुखरूप शयन मजलिस गेल्यावर करा ।। चा० ।।

सगुण गुणगंभिरा तुला कशी दुपारचिरे सोसेल कहाली ॥ १ ॥ चपळ पंच कल्याण निळे एक एक सुरेख घोडे दिसती । उबार दाण्यासाठीं हुजुरच्या कुमेद नर माद्या हींसती ॥ दुध खिरी शिगरें पिती सुरु अपेट जे जे वळु असती । चारजामे जिन ठेउन अंधारी देउन गडीं बळकट कसती ॥ उमेदवारी जिवट गोहो कांहीं तयांत कुणी ब्राह्मण असती । सर्व कर्म सारून अगोदर ऐव्हापासुन रोखुन बसती ॥ चा० ॥ जाहाले रथारूढ नभांत नारायण ॥ लागलें काल कडकडीत उत्तरायण ॥ कुठवर तरी करूं आर्जवपारायण ॥ चा० ॥ निबीड अरण्यामधीं अशिकशी निचित पणची घडि वाहली ॥ ३ ॥

(हा उतारा प्रभाकर कवीची कविता सध्या छापण्याचें काम चालू आहे त्यांतून घेतला आहे.)

स्वराज्याचा गोड वारा सर्वभर वाहत होता. धनधान्याची समृद्धी होती. संतोष समाधानाचे दिवे उजळून जाऊन प्रकाशत होते; व दारिद्र्याचा—विवंचनेचा घोर अंधार पार नाहीसा झाला होता.

अशा सुखविश्रांतीच्या दिवसांत, अशा संपन्नतेच्या काळांत शृंगारिक कवनांची बुज केवढी राहत असेल व ख्यालीखुशालीच्या वर्णनांवर कशा उड्या पडत असतील हें सहज ताडतां येईल. अशा काळांत, आपली ममतेंतली व लोभांतली माणसें पुन: दसरा करून मुलुखगिरीवर जाण्याची तयारी करूं लागलीं, म्हणजे मागें राहणारांना काय वाटत असेल यांची वर्णनें अनेक शाहिरांनीं गाइली आहेत. अशाच एका प्रसंगीं होनाजी म्हणतो—

'गांवा जातो, प्राणविसावा, राहवा दोन गोष्टी सांगुन ।
पसरा पदर मजसाठीं सख्यांनो, घ्या यवढें त्याला मागुन ॥ ध्रु० ॥
हातिच्या हत्यारा शिवायासाठीं बेतुन अकारल्या ।
तंग, तोबरे, रजामे, जीन, घर, शृंगारल्या ।
जामदारखान्यांत खजिना द्रव्याच्या पेट्या भरल्या ।
दोन सलीते सहित कतरा त्या उंटाच्या तयारल्या ।

घर मंडळी सह वर्तमान अवघ्या फौजा येकसरल्या ।
पहिल्यानेंच कुच करून साजणी मुकामास जाती दुरल्या ।।
...........चार दिवस.................यालागुन ।
गांवा जातो प्राणविसावा, राहवा दोन गोष्टी सांगुन ।।

या अशा विनवण्या कैक शिपाईगड्यांना कैकजणींनीं त्या काळीं खचित केल्या असतील. पण ते शिपाईगडी हाडाचे खरे मर्दमराठे होते. अशा बाइलबुद्धीला ते थोडीच भीक घलणार!! असली बायकी भीड शिवाजीनें आपल्या प्रत्यक्ष आईची देखील मानिली नाहीं मग त्याचेच फर्जंदजादे आणि शिलेदार आपल्या बाइलेची कितपत मानणार!! यावर सरदारांच्या तर्फेचें उत्तर :—

आस्त्रीं प्रलयंगता, तुझी ग बुध नाहीं कामाची ।
आलीं धन्याचीं पत्रें आम्हांला जलदी जाण्याची ।। ६६० ।।
या लष्करची सुख साजणी नये ग सांगाया । आहे धन्याची दया आम्हांवर कृपेची छाया । उठुन ताजीम देती ठाव पंगतिचा जेवाया ।
पोऱ्या खजमतगार कोतवाल घोडा बसाया ।।
स्वारी जपुन चाले । नउशे रंगीत भाले । वीटे पटेवाले । हत्ती बीनीवर चाले । नौबद कडाक्याची । नामजाद शिपाई पुढें जिलिब गारद्याचीं ।।
।। आस्त्री प्रलयंगता०
कर्नाटकच्या स्वारीस होतो श्रीमंताबरोबर । रणसंग्रामीं झटुन केली तलवार । ढिगांतुन फटके आम्ही शिपाई रणशूर । झाडिमधें पिटुन घातला हैदर ।।
पाहुन मनी चटका । म्हणति त्याला हटका । शिरपाव द्या, द्या जरीपटका । चवरी, अबदागिरी, बक्षिस कंठी मोत्याची । आवंदाची बोल येक पालखिची ।।
।। आस्त्री प्रलयंगता० ।।
पूर्वीपासून नक्षा चालत आला वडिलांचा । आणीबाणीच्या वेळीं विडा उचलिला पैजेचा ।। कटुन मरावें हा असा धर्म क्षत्रीयाचा ।। कसें 'रहा' म्हणतिस घरीं डाग लागेल जन्माचा ।। इ. इ.
( होनाजी बाळ पृ. १६६ लावणी १३२ )

असें उत्तर देऊन तो शूरमर्द मुलुखगिरीवर स्वारीस गेला म्हणजे त्याच्या घरच्या माणसांना साहजीकच उत्कंठा लागे. चार दिवस

अधिक उणें झालें म्हणजे त्यांच्या मनाचे डोळे तिकडे लागत. अशा वेळीं वैरी चिंतीत नाहीं तें मन चिंतितें आणि मग तिकडचें पत्र आलें, आणि एखादे दिवशीं शुभ शकुन झाला म्हणजे चिंतातुर झालेल्या मनावर आशेचा लोंढा येतो, आणि मग लज्जेचें धरण फोडून मैत्रिणीजवळच मन बोलूं लागतें. तें म्हणतें:—

> वाम नेत्र आज सखे लवूं लागला । उगवला दिवस बाई आज चांगला । माडिच्या ग सज्यावरी काग बोलतो । हाच शकुन साक्ष पती मार्ग चालतो। डावी बाही फुरफुरे पति-भेट, ती । क्षणोक्षणीं कंचुकिचीं गाठ सुटती । याचे गुण आठवूं किती खंति वाटती । पतिचे स्मरण होतां डोळा आश्रु लोटती । हार पाचुचा ग बाई विनमोल तो । केवडयाच्या बनी ग जसा नाग डोलतो । याचेविण उपचार सर्व त्यागिला । प्रवासांत त्या कोण म्हणेल? ‘ शिणला ’ ‘ भागला ’ ॥

अशा आवडीनें लढाईवर जाणाऱ्या शिपाई गड्यांची मात ऐकून कोणाहि मराठ्याचें मन प्रसन्न होईल व हीं गाणीं ऐकून गाणाऱ्या शाहिराला कोणीहि आपल्या हातांतलें सोन्याचें कडें सहज बक्षिस देईल. होनाजीनें सवाईमाधवरावांची कारकीर्द चांगली पाहिली होती. त्यानंतर श्रीमंत बाजीरावसाहेबांची हयातहि त्यानें पाहिली. होनाजीच्या फडांत गाणारे फार कसबी होते. एकेक जण तमाशाच्या बैठकींत गाऊं लागला म्हणजे असे सूर काढी कीं ते ऐकणारे थक्क होऊन जात. टीपेचा सूर इतका सारखा लांबवीत आणि तान अशी घेत कीं ती ऐकून आतां या गाणाऱ्या पोराच्या कंठाच्या शिरा फाटून जातील कीं काय, असें ऐकणारास वाटत असें. होनाजीच्या फडाची ही कर्तबगारी पाहून व होनाजीची करामत ऐकून एके वेळीं श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं त्यास असें म्हटलें कीं ‘ गवई रागदारीचे सूर काढतात तसे तुम्हांस बैठकीच्या लावण्यांत काढतां येतील कीं नाहीं ?’ आपल्या धन्याची ही इच्छा ऐकून तसा यत्न होनाजीनें सुरू केला; व नव्या नव्या थाटाच्या लावण्या रचून त्यांत निरनिराळ्या रागाचे सूर, त्या हौशी धन्यास व आपल्या देशास

त्यानें गाऊन दाखविले. या कामगिरीबद्दल त्या वेळेस होनाजीची किती संभावना झाली असेल हें एक त्याचें तोच जाणे.[1] पण पुढें शिमग्याचे सणांत पांच दिवस शनवारच्या वाड्यापुढें हजीरी लावण्याबद्दल होनाजीस कायमची सुपारी मिळाली. याबद्दल त्यास सालोसाल बिदागी दाखल तीनशें रुपये मिळत असत.

होनाजीच्या सर्व कवनांत त्यानें रचिलेली प्रभातकाळची भूपाळी ही फार प्रसिद्ध आहे.

**घनःश्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला ।**
**उठि लौकर वनमाळीं । उदयाचळी मित्र आला ।।**

ही गोड भूपाळी आज शेंसव्वाशें वर्षें महाराष्ट्राच्या मनाला आनंद देत आहे. पहाटेच्या प्रहरीं कावळा कोकावला तरीहि तो आवाज गोड लागतो; मग ही असली सुंदर भूपाळी अरुणोदयाचे वेळीं ऐकून प्रत्येकाला आनंद वाटेल यांत नवल काय ? गाणारे तर गोड आलाप घेऊन सुस्वर कंठानें ती गातातच; पण वृद्ध स्त्रियाहि ही गोड भूपाळी सडा सारवण करीत असतां प्रेमानें म्हणतात. इतकी ही सर्वांच्या परिचयाची आहे. होनाजी कधीं मेला हें बरोबर कळत नाहीं. पण त्यानें अव्वल इंग्रजी पाहिली असावी असें वाटतें. त्याचा शेवट फार वाईट रीतीनें झाला असें त्याचे चरित्रकार रा. रा. शालिग्राम हे लिहितात. एके भाद्रपद कृष्ण त्रयोदशीचे दिवशीं होनाजी हा एकटाच घरीं असतां कोणी लोक येऊन त्यांनीं त्यास वानवडीकडे बोलावून नेलें; आणि तिकडें वानवडीच्या बाजूला रानांत आणखी कांहीं मारेकरी जमवून, त्यांनीं होनाजीस मरेमरेतों मारिलें; व शेवटीं निवडुंगांत ढकलून दिलें.

---

१. होनाजीचा आणि त्रिंबकजी डेंगळ्यांचा मोठा लोभ होता. होनाजीची बैठक डेंगळ्यांच्या वाड्यांत नेहमी असे; व तेथेंच एका खोलींत होनाजीनें आपल्याला मिळालेल्या नानाविध बक्षिसांच्या पेट्या आणि आपलीं वाद्यें ठेविलीं होतीं. परंतु पुढें त्रिंबकजीवर आलेल्या किटाळांत त्रिंबकजीच्या दौलतीची राखरांगोळी झाली, व त्यांतच होनाजीच्या दौलतखान्याचाहि निकाल उडाला.

नंतर प्रहर रात्र उलटल्यावर त्यास तेथून उचलून शहरांत आणून टाकिलें! त्या टाकल्या जागेवरून उचलून लोकांनीं त्यास त्याच्या घरीं नेऊन पोहचता केला. पण तो इतका हैराण झाला होता, कीं त्याच दिवशीं तो मरण पावला.

बाळा, होनाजी वगैरे शाहीर मंडळी झाडून सारी गवळ्यांच्या फडां-तील होती. या फडाची आणि रावळाच्या फडाची नेहमीं चुरस असे. 'गवळ्या गाणार' व 'रावळाचा गाणार' असें ते एकमेकास म्हणत. या रावळांचे नांव, सिदु रावळ या पुरुषाचें नांवावरून पडलेलें दिसतें. पण यांची परंपरा नागेश नांवाच्या इसमापासून सुरू झाली. १ नागेश २ आदिनाथ ३ गोविंदनाथ ४ सिद्धनाथ उर्फ सिदु रावळ ५ सगनभाऊ अशी परंपरा आढळते.[१] नांवावरूनच सिदु रावळ हा नाथ संप्रदायीं होता, असें दिसतें.

'लाडक्या वाणी मुका घ्यावा। मज क्षणोक्षणीं द्यावा। हाच मज विसावा ॥ बाळपणिची। प्रीत रसाची। जीव कुरबाण करावा। मनि आनंद भरावा।'

या कवनाचें शेवटीं—

नाथ रावळ सिद्ध गुण गाती। सगनभाऊ रिझवावा ॥

असा याचा उल्लेख आहे. या सिदुरावळाचीं कवनें एके वेळीं फार प्रसिद्ध होतीं व तीं गाण्यास व ऐकण्यास लोकांना फार मजा वाटे. श्रावण महिन्यांत पुण्याजवळ मुळामुठाच्या संगमावर हौशी मंडळी जमली असतां तेथें याच्या कवनाची बहार उडे. 'गोरे गाल, जपून चाल, मजा पहाल फांकडे' या लावणींत शाहीर मोठ्या कळवळ्यानें सांगतो कीं—

---

१. गुरु 'नाथ नागेश' मूळ पुरुष तोचि ओळखावा। त्यापुन गाणें आदिनाथ संप्रदाय गावा ॥ 'गोविंदनाथ' 'सिद्धनाथ' रंग जमवावा। आप आपल्या सुगराया करुनि दावा। नाहीं येथें कोणी महंकाळ आम्ही कोठें पहावा। रावळ, गवळी भांडती करुनिया कावा. इ. इ.

'चारी सोमवारी मजा संगमावर पहात जा ।
चौ भोंवती लाल उभें मर्जिनें राहत जा ।
सिदु रावळाचे छंद नित्य मुखीं गात जा.'

या 'सिदुरावळा'पेक्षां त्याचा शिष्य जो सगनभाऊ त्याचीच ख्याती महाराष्ट्रांत फार आहे. सगनभाऊ हा जेजुरी येथील राहणारा. जातीनें शिकलगार मुसलमान होता. याच्या लावण्या प्राय: चार चौकी असतात. पण त्यांतील चाली, तान, ठेका वगैरे गाण्याचे ढंग फार अवघड असतात. कोणीहि साधारण किंवा नवशिका तमासगीर, त्या गाऊं म्हणेल तर त्याच्यानें तें काम उरकणार नाहीं. सगनभाऊच्या लावण्या विलंबित लयानेंच गावयाच्या असल्यामुळें, त्या गाइलेल्या ऐकतांना श्रोत्यांना प्राय: केवळ ख्यालाचें गायनाचीच मजा अनुभविण्यास सांपडते. याच्या लावण्या मार्मिक व भेदक आहेत; आणि कांहीं शृंगारिकहि आहेत.

'सगनभाऊ जेजुरीचा । म्हणे गोविंदा फड प्रसंगें । पराजय करतो ।

ही याची लावणी प्रसिद्ध आहे.

सगनच्या लावण्यांत दादासाहेब, समशेर बहादूर, बाजीराव वगैरेंचा उल्लेख मोठ्या आदरानें वारंवार येतो. कदाचित् हा दादासाहेबांच्या बरोबर एखाद्या मुलुखगिरींतहि गेला असेल असें वाटतें. दादासाहेबांविषयीं 'ते आपले धनी व आपण त्यांचे अन्न-पाणी खात आलों' अशा अर्थाचे उद्गारहि हा काढितो. बाजीराव साहेबांच्या ठिकाणीं तर याची निष्ठा विशेषच दिसते. हा धनी आपल्या अंगच्या गुणाचा खरा चाहता आहे आणि त्याच्या पुढें गायील्यानें आपल्या विद्येचें व श्रमांचें खरें चीज आहे, असें त्याचें मनाला नेहमीं वाटे. आपल्या रागदारीनें एक परमेश्वराला तरी आळवावा किंवा एक बाजीराव रघुनाथाला तरी संतुष्ट करावा असें त्याचें मन त्याला सांगे.

'जन्मा येउनि नामस्मरणी बिठ्ठल जागवाल काय ? ।
सगन भाऊचे कवन राव बाजीला ऐकवाल काय ? ।

असें तो आपल्या एका प्रसिद्ध कवनाचें शेवटीं लोकांस विनवितो. बाजीरावाची पेशवाई गेल्याबद्दल त्या काळच्या अनेक लोकांप्रमाणेंच यालाहि फार वाईट वाटलें असें दिसतें.

' राजा कुणीकडे प्रजा कुणीकडे काय अशि आग पाखडली ।
अन्न विसरलों पाणि विसरलों वाळवंटी जशी मासोळी पडली ।
तसेच कायहो चहुभोंवत्या फौजा भयाभित झाल्या आभाळांत ।
जरि पटक्याचा हत्ती आमुचा रुतला गाळांत ॥ '

हे उमाळे कळवळ्याचे आहेत.

सगन भाऊनें आपल्या पूर्वींच्या मराठी कवींचे ग्रंथ बरेच वाचले, किंवा ऐकले होते. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, वगैरेंचा उल्लेख त्यानें केलेला आढळतो.

' विठ्ठल, दासी त्याची मी गाईन नाम नगारे ।
मुक्तेश्वराची ओंवी, जनीचा अभंग सदाकाळ गा रे ॥'

त्याला तुकारामाच्या अभंगांचा बराच नाद होता व विठ्ठलाची भक्तीहि तो करी. विठ्ठलाचा उल्लेख ह्याच्या अनेक कवनांत आहे.

कटीवर कर ठेवुनि उभा । पंढरपुर भीमा तिरी; स्मरारे रायीच्या वल्लभा ॥ भक्तराज ज्ञानेश्वर तुकाराम सावता माळी, चोखा मेळा वाट पाही दुर्लभा ॥ माय माऊली विठ्ठल आमुचा त्रैलोक्याचा सुभा ॥ अगाध महिमा निष्कलंक जगद्गुरू । सगनभाऊ म्हणे असो द्यावी पूर्ण कृपेची प्रभा ॥

यानें विठ्ठलभक्तांच्या वर्णनपर व पौराणिक कथानकांवरहि कवनें केलीं आहेत. हा आपल्या कवनांत शब्द अगदी साधे घालितो; व आपल्या शृंगारिक कवनांचे प्रसंगही नित्यांतले योजितो.

' पाणघाटावर पाणी भरलें शिरीं घागर भरपूर । चलाग बाई जाऊं झर झर । मग एकांतीच्या गोष्टी सूंदरा । पुसती मजकूर । '

ही नदीवरून बरोबर गांवात येतांची वेळ सासुरवासिनींना हितगुज बोलण्याला आणि उखाळ्या पाखाळ्या किंवा कांहीं नाजूक चेष्टा करण्याला किती सोईची आहे !

'झोपाळ्यावर बसे फांकडा । एकच झोका एकच विडा ।
कलगी शेजारी केवडा ॥'

अशी एकादीनें थट्टा केली तर दुसरीनें म्हणावें—

'तुझ्या आलें सख्याचें पत्र सायंकाळीं । वाचुन पाही गुण वेल्हाळी ।
आणि आतां......त्वरित तारे चमकतिल । डोळे भरून पाहतिल ।
पाऊलें चोरून बरोबर येतिल । गुज गोष्टी त्या सांगतिल ।'

काशीरामा, काशी महीपती, खंडू नारायण, बाळा राघू, कान्हो, बिब्बन, दासमल हे सगळे शाहीर या सगन भाऊच्या बैठकींतले आहेत.

या पैकीं बिब्बन हा माहुलीचा राहणारा. याचे जेजूरीच्या खंडोबाचें वर्णन आणि गणपतीचा धावा हीं कवनें बरीं आहेत. हा आपल्या कवनांत अनुप्रास आणतो.

गौरीतनय गणराज । नमो महाराज । आज करि काज । प्रसंगी गाता ॥
श्री सिद्ध विनायक । वर दायक । बुद्धी दाता ॥ धृ. ॥

लंबोदर तनु गोजिरी । चिमणी साजिरी । वसन कटी जरी । पितांबर सर्वा । आंगीं शेंदूर लाल दुर्वांकुर हिरवा ॥ एकदंत, गुण अनंत, वाणिती संत, चतुर गुणिवंत, लक्ष हें ठरवा ॥ हृदयांत निशिदिनी भजत जावे गर्वा ॥१॥ हेरंब चतुर्भुज ऐसा ॥ देखिला ॥ शस्त्रे करि मंडित जैसा ॥ रेखिला ॥ पाशांकुश प्रियकर जैसा ॥ लेखिला ॥ लेखिला । दया निधी असा । कृपार्णव तसा । प्रिय अति जसा ॥ दक्ष जामाता ॥ श्रीसिद्ध विनायक इ. ॥ १ ॥ क्षीरवर्ण वस्त्र उत्तरी । युक्तीनें धरी । आदरें सावरी । बहुत हर्षानें ॥ गजवदन ध्यान पाहतां । चुकलें त्वेषानें ॥ सारजा ब्रह्मकुमारी । मयुरा-वरी । बसुन सुंदरी । मनोरथ ... ... ॥ लडीवाळ बाळ प्रतिपाळी । प्रेमसुखानें ॥ चाल ॥ नृत्यकला गायन रंगी । गाजवी ॥ टाळ विणा स्वर सारंगी ॥ वाजवी ॥ यश हा सुधारस अंगीं ॥ पाजवी ॥ पाजवी नम्र सेवका । चतुर शोधका । तोचि निज सखा । कीर्ति एकदंता ॥ श्रीसिद्धि विनायक । वरदायक । बुद्धीदाता ॥

हें बिब्बनचें कवन ठीक आहे. बिब्बन हा पौराणिक गोष्ट चांगली समजाऊन सांगतो. तसाच त्याचा जोडीदार दास माद्रू हा पौराणिक

कथाभागापेक्षां व्यावहारिक गोष्टी गमतीनें सजवितो.

उत्तर हिंदुस्थानांत कोणी मराठा सरदार मुलुखगिरीवर गेला असतां त्याची बायको त्याच्या नित्य आठवणी काढी. दिवस काळ बराच लोटला. लष्करची स्वारी बरीच लांबली. त्यामुळें स्वारीचें येणेंहि घडलें नाहीं. तेव्हां त्यानें जासूदाबरोबर आपल्या घरीं एक पत्र व दोघांच्या दोन तसबिरा काढवून धाडिल्या. त्या पाहून ती भेटीला फार दिवस अंतरलेली पतिव्रता मैत्रिणींना म्हणते—

स्वामी भेटीचे चिन्ह सांगा सख्यानों, डोळे झाले पाखरूं ।। आज तिसरा महीना माझ्या पतिरायासी । ग्वालेराहुनि आले पत्र ।। पत्रा खेरिज दोन तसबिरा । त्यांचीन् माझी बहुत मजेचीं चित्रं ।। उभयतांच्या पाहता तसबिरा द्रव येई पाण्यानें भरलें नेत्र ।। तुम्ही मराठ मोळयाच्या मैत्रिणि, माझ्या, जिवलग सांगतिनी । थंड पाण्यानें नाहु नका, उन उन घ्या लौकर यावे म्हाऊनी । कुंकु कपाळी लावा हो । वस्त्रें भरजरीची नेसा न्यारीन्य रीतुनी ।। मदिर सोडुनि बैसा चहूंकडे तसबिरा पुढें ठेविते दोन्ही । दोन्ही तसबिरा दडवून ठेवा...दुःखे येते छाति भर भरून...ऐसी गाऱ्हाणी ऐकुनिया प्राण-सख्याची, भावार्थे पोटासी धरिती । आंग टाकले धरणिवर उठवुनि बसविति । मैत्रिणो धांवा म्हणती ।......जिवंत मुळी हरळिची हिरव्या पाती । ...धांवा करितां पति आले, मैत्रिणी सांगती ।। आम्ही जातो आपुल्या मंदिराप्रति । दोन्हीं तसबिरा आतां । पहा तुम्ही उभयता । मर्जी रक्षुन मौजा करा सगनभाऊ जेजुरिचा । तो गुरू दास मालुचा । खड्गाची ही धार ।।

या दास मालुप्रमाणेंच अमृत फाजखां या नांवाचा एक सगनच शिष्य होता. त्यानेंहि आपल्या गुरूची धाटणी बरीच उचलली आहे.

‘ सुखाचा केला स्नेह । दुःखाचा दिवस दाखवूं नका । ’

या लावणीचे शेवटीं—

‘ अमृत फाजखां कवि रंगेला । आठवितो हृदयीं सगन भाऊला ।। ’

असें तो आपलें नांव घालितो.

सगन भाऊ हा कवी जातीनें मुसलमान होता हें वर आलेंच

आहे. याच्या लावण्यांत श्रृंगार फार आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं तर उत्तान श्रृंगारांत हा फारच रमतो व याची रचना अगदी विचकट होते. मग याला कसलीहि मर्यादा राहत नाहीं. पण सगन भाऊच्या लावण्यांत एक प्रकारची गोड मजा आहे. काव्य किंवा साहित्य यांच्या कसोटीला याचीं कवनें कमीं उतरलीं तरी डौलदार चाली याच्या कवनांत जास्त आहेत. याच्या लावण्या गायकीचे ढंगावर रचिल्या गेल्या आहेत. त्यामुळें त्या नीट म्हणतांना ऐकतां ऐकतां मनुष्य गुंगुन जातो. व 'गुणि सगन भाऊचें कवन तंद्रि नेत्राला। अशी स्थिती होते.

गंगु हैबती हा प्रभाकराचा आणि महादेवाचा गुरु होय.

'गंगु हैबती साथि जिवाचे। ज्या मानिती पुरे दैवाचे।
गुरु वंदिन प्रभाकराचे।'

तसेंच—

'गंगुहैबती सबळ धिरवान। प्रभाकर कविवर मेहरबान।'

असे हे त्याचे शिष्य अनेक ठिकाणीं लिहितात. 'गंगूहैबतिचा आहे लौकिक जगभर गाण्याचा।' असें प्रभाकर सांगतो. म्हणजे गंगु-हैबतीच्या गुणावर मोहून महादेव, प्रभाकर वगैरे ब्राह्मण मंडळी त्याचे शागिर्द शिष्य झाले. येथें जातीपातीची किंमत नाहीं. येथें गुणाचे मोल आहे. आणि गंगुहैबतीच्या अंगांत गुणहि तसाच होता. त्याची अनेक पौराणिक कवनें आहेत. त्यांत श्रीकृष्णावरचीं बहुतेक कवनें मोठीं रसाळ व प्रेमळ आहेत. एके दिवशीं कृष्णबाळाला कोणा पापी चांडाळणीची दृष्ट पडली. त्या वेळीं यशोदा माता म्हणते—

रडतांना हृषीकेशी बाई माझा राहिना। कडे उचलुनि सये घेतां स्तन तोंडीं घेइना ॥ धृ ॥ खरी झाली दृष्ट माझ्या श्रीहरीला, वाटतें। डच-डचकुन लेंकरूं गे तिन तिनदां उठतें। भय भारी जिरेल कैसा रडे म्हणुनी दाटतें ॥ धीर देतां जिवाला ग मन शांत होईना। रडतांना हृषीकेशी बाई माझा राहिना ॥ नको नेउं हरि राधे दुध भात भरवुं

दे । कान फाटया हातीं सांजे अंगारा करवुं दे । गाई तुळशी देवापाशीं आण तान्हा फिरवूं दे । नवसाचा अजुन बाई मज ठोका येईना । रड-तांना हृषीकेशी बाई माझा राहिना । इ.

हा गंगू हैबतीच्या रचनेचा एक नमुना होय. गंगु हैबती, सगन भाऊ, होनाजी बाळा व कुशा माळी हीं या वेळचीं महाराष्ट्राच्या लोभांतलीं माणसें होतीं. यांपैकीं शेवटल्या दोघां गुणीजनांचें राहणें पुण्यासच असें. या दोघांत कुशाबा हा थोडा वेदांती होता. याच्या बहुतेक सर्व लावण्या वेदांतपर आहेत. लावणींत कूटात्मक रचना करावी, आणि ऐकणारास हें कोडें उकलण्यास सांगावें, अशी विठ्ठलाप्रमाणें याला मोठी हौस दिसते.

' नका करूं गलबला विनंति ऐका थोडीशी ।
मूळ आधारी जडून राहिले येकमेकासि ।

तसेंच

' भली घातली फुगडी झाली उघडी आली मार्गावर ।
नागडी पळसिल तूं कुठवर ॥
नीरशुन्यामधिं जन्म नारिचा मोठी खेळकर ।
निर्गुणानें हुसकली बाहेर ॥
परात्पराचे माहेर तीन्ही पेठा धुंडाली उतरली आधारचक्रावर ।
पहिलें ऋषेश्वर । एक लक्ष बेरीज घर । तीन पुत्र धुरंधर । इ. इ.

या सर्व लावण्या वेदांत विषयावरील आहेत. वेदान्तपर लावण्यांत गाणें हें श्लोकांत भूमिती रचण्याप्रमाणें थोडें अप्रयोजक आहे. पण प्रत्येक हिंदुमात्राला वेदान्ताचा असा ओढा असतो कीं तोहि म्हाताऱ्या कोताऱ्यांसाठीं लावणींत आणणें भाग पडलें असावें. श्रृंगाराला आणि वीररसाला अवश्य असा जो मर्दपणा तो आंगांतून निघून गेला, पण लावणीची तर कानाला चटक; तेव्हां अशांसाठीं वेदांतपर भेदिक लावण्या कुशाबा सारख्या शाहिरांनी बनविल्या हें नीटच झालें. जिभेला चटक राहिली पण तोंडातले दात पडून गेले, अशांना बुंदीचे लाडू, कळ्या वाटून करावे लागतात. वेदांताशिवाय इतर कांहीं लावण्या या

कुशाब्राच्या आढळतात. पण त्यांतहि कांहींना कांहीं चमत्कृति हा कुशाबा करितोच. यानें एक 'कलगी तुऱ्याचें लगीन' या नांवाची लावणी केली आहे. यांत याचा सामनेवाला फडकरी नागेश त्याची कन्या 'कलगी' हिचें 'तुऱ्याशीं' लगीन लाविलें आहे. त्यांत या लग्नाच्या खटपटीला आणि मंडपशोभेला त्या वेळच्या इतर तमासगीर शाहिरांना आमंत्रण दिलें आहे. यांत सहजासहजीं त्या काळच्या शाहिर मंडळीचीं नांवें गोविलीं असल्यामुळें ही लावणी थोडी महत्त्वाची आहे. यांतील कांहीं ओळी पुढें देतोः—

**नागेशाचे** घरीं कलगि उपवर। तिला करीना कोणि, राहिली थोर॥
नवरीच्या कारभाऱ्यानं केला विचार। द्यावी नेऊन तुऱ्यास तो धुरंधर॥
लग्नाचें साहित्य करा म्हणे **रामदास**। तमाम चिठ्या करा **नागेशवल्लीस**॥
एक चिठ्ठी लिहून पाठवा **खंडास**[1]। तेथील **लक्षुमण साळी** बिगार त्यास॥
चार फाट्याच्या मोळ्या **हरीपुऱ्यास**[2]। कवट्याचा **भवान्या** बोलावा त्यास॥
सातपुड्यांत **येमा शिंपी** सांगा त्यास। उंची कापड घेऊन ये तू लग्नास॥
निघोज्यांत[3] **भीमा सोनार** त्याला। सांगा कंठि चौकडा घेऊन ये लग्नाला॥
पुण्यांत **गंगु हैबती** बोलवा त्याला। आणि ताकिद करा **सिद्धु राऊळाला**॥
**बाळा गंगु गोविंदा** खबर पाठवा। तो **शाअल्लीचा** शिष्य **दगडु** बोलावा॥
अवघ्यांचे कारभारी **गोविंदराव मोकाशी**[4]। हरदासवळीचे शाहीर पहा
दक्षिण देशी॥

याप्रमाणेंच, 'चिळु सुतार,' 'येसू तेली,' सुप्याचा राहणारा 'कादर बुढण,' आळेगांवचा[5] 'आपा तांबोळी,' पावळीचा[6] 'दमाजी,' देवळवाडीचा 'धोंड्या,' चतुरबुडीचा 'मनछाराम,' वगैरे मंडळींचीं नांवें घालून त्या सर्वांस या कलगीतुऱ्याच्या लग्नाला आंवतणें दिलें आहे. या नांवांपैकीं कांहीं नांवांचा मात्र परिचय थोडा फार करून

१. भीमा काठीं. २ सांगली जवळ. ३ खेड जवळ. निघोजे हा गांव श्री. नातू यांस इनाम आहे. येथें नाना फडणवीसांचा वाडा आहे. ४ गोविंदा रामोशी असेंहि होईल. (अ. पाठ) ५ आळेगांव दौंडाजवळ घोडनदीवर आहे. जेजुरी पलीकडे. ६ ढमढेऱ्यांचे तळेगावांजवळ. येथें मस्तानीच्या सुनेचें थडगें आहे.

घेतां येतो. पण बाकीच्यांची हजेरी मूळींच लागत नाहीं. यांत 'गोविंदा' किंवा 'गोविंदराव' हें नांव आलें आहे. हा गोविंदा[1] शाहीर मोठा प्रसिद्ध पुरुष दिसतो. याचे वंशज हल्लीं जुन्नर येथें राहतात. गोविंदरामी लावणी म्हणून जुन्नराकडे प्रसिद्ध आहे. गोविंद शाहीराच्या आजाचें नांव गणोजी भागवत. गणोजीची समाधी ओतुर येथें वेशीचे बाहेरचे अंगाला आहे. या गणोजीचा लेक भिवाजी. याची समाधी जुन्नरास आहे. हे दोघेहि बापलेक फार विद्वान व साधु पुरुष होते. गणोजीचा लेक तोच गोविंद शाहीर. याचाच पुढें रामचंद्र–भिमाजी वगैरे वंश वाढला. गोविंदाचीं कवनें जुन्नर प्रांतीं चांगलीं प्रसिद्ध आहेत. एके वेळीं तर त्यांचा मोठाच बोलबाला होता.

' गोविंदराव पुस पुसतो प्रसन्न त्यासी भगवान ।
गड शिवनेरी यशश्वरी ठिकाण जुन्नर शहर ॥ '

अशा तऱ्हेचे उल्लेख गोविंद शाहीर आपल्या कवनांत वारंवार करितो. या गोविंदा शाहिराच्याच बाडांतल्या एका कवनांतून कांहीं ओंळी नमुन्याकरितां देतों. या कवनाचे शेवटीं गोविंदाचें नांव नाहीं; पण तें त्याचेंच असावें असें वाटतें.

होऊं द्या, प्रीत वाढु द्या, राग जाउं द्या, कांहि येउं द्या, माझि कनवाळा ।
ठेविला पुढें जीव हा माझा तुंम्हि संभाळा ॥

लागला छंद चांगला, तूमचा मला, हौसेनें बोला, मी पडते पाया ।
नको जाचणी हे दिवस जातिल वाया ॥

दश दिशा, क्रमाव्या कशा, तुम्हाविण जशा, लागली आशा, वाहिली काया ।
करुं नका कमी काडिमात्र मजवरली माया ॥

चुरमुरुन, मनीं झुरुझुरुन, जाते मरमरुन, तुमच्यावरुन अहो गुणिराया ।
निर्वाण काळ हा प्राण न ठरे ठाया ॥

डगमगले, आपुल्या तळीं, सर्वांगीं मदन जळजळी, वाटे उडी घ्यावी जळीं ।

---

१. गोविंदाचा साथीदार बहिरु न्हावी या नांवाचा एक शाहीर होता. हा स्वतः कवन करी व गोविंदाचें कवनहि फार हौशीनें म्हणे.

द्या मशीं, प्रीतिची उशी, मि झाले खुषी, प्रेमें हृवि तशी मला कुरवाळा ।
ठेविला पुढें जीव हा माझा सांभाळा ॥ १ ॥
सौभाग्यधना, बंध नाहीं मम बंधना, सकळ साधना, कल्पना सोडा ।
हा घटित योग ब्रह्मयानें निर्मिला जोडा ॥.........
रानांत हरणि येकली, पडिली मायेची कळी, निर्जळीं जाई सुकली ॥
मागली, बहुत चांगली, वळख जागली, मला लागली आपुली शाळा ॥
होउं द्या, प्रीत वाढुं द्या, राग जाउं द्या, कांहि येउं द्या, माझि कनवाळा ॥

या गोविंद शाहिराचीं शेकडों कवनें अजून मिळण्यासारखीं आहेत. गोविंदाचा एक शिष्य दत्तानुयायी धौशा या नावांचा होता. असें या धौशाच्या कवनांतल्या—

'गुरुराज गोविंद याचा मजला आधार ।
राघो धौशा कवि, पाठिशी दत्त दिगंबर ।'

या उल्लेखावरून दिसतें. हा महानुभावपथीं होता असें याच्या हातचे मानभवी लिपींतले जमाखर्च व दिनचर्येचे वृत्तान्त आहेत, यांवरून दिसतें. हा नेवासे प्रांतीं राहत असे. याचा फड पांचाळेश्वरास असे व अजूनहि तिकडे याची शिष्यशाखा आहे. राघो धौशाची लावणी गोविंदापेक्षां जरा निराळ्या धर्तीची आहे.

किती गर्व हा करितां, कां बोलतां कठिण ।
वळवाचा पाऊस नदिपुर आला भरून ॥
मनुष्य देहाचा नाहीं भरंवसा तो कांचे समान ।
श्री दत्त प्रसन्न धौशा करितो गायन ॥
बाळा गंगाजी भला रंगेला मातो हौसेन ।

अशी या दत्तवरदी धौशाची रचना आहे. धौशाचीहि शिष्य मंडळी बरीच होती. पांडोबा व मोतिराम हे दोघेहि त्याचे शिष्य होत. यांपैकीं पांडोबाच्या कवनांत धौशाचें नांव वारंवार येतें.

धाले प्राण मनोरथ नूतन उडाली गरदी । गुरु राघो धौशा श्री दत्ताचा

---

१. गोविंदराव साळी जुन्नरकर हा राघो धौशाचा गुरु नव्हे. राघोचा गुरु गोविंदा हा विद्वांस घराण्यांतला होता. ( दत्तराज महंत )

वरदी। कवि पांडुरंग शाहिर तुरेकर फंदी। युक्तिनें हा बनावला जडा व आसकी (?) जरदी। राहणार शहर नारायनगांवामधि[१]। ऐकतां विराली नांगि, सबळची सोदी।

मोतिराम हा कदाचित मारवाडी असावा. मारवाड्यानें मराठी कवनें करावी हेंच आधीं नवल, आणि तशांत शाहिरांच्या बैटकींत बसून लावण्याहि रचूं लागावें हें तर फारच नवल आहे. पण ही नवलाची करणी या मोतिराम शाहिरानें केली आहे. महाराष्ट्राच्या वैभव-सागराला पूर्ण भरतें आलें तेव्हां त्या उचंबळलेल्या लाटांत आणि गोड कल्लोळांत इतरांप्रमाणें हा मारवाडीहि वाहून गेला. याच्या लावणीचा थाट धौशाच्या लावणीचे थाटापेक्षांहि ज्यास्त उठावदार आहे, हें सहज दिसण्यासारखें आहे. याच्या कवनाची थोडी चाचणी अशी—

नविन बंगला, गर्द रंगला, हवाशिर खुला, दावाल कधि मला? ॥
हा वसंत ऋतु आला, बहार बंगल्याची पाहूं चला ॥
अहो गुणि अमोला, मशि हसुन बोला, काय राग तुम्हाला आला।
घ्या गुलाबा प्रिय फुला, करा प्रीतिचा झुला, वरि बसूं चला,
मशि डोला डोला वसंत वात सूटला, झोंबे अंगाला, अति प्रियकर मला,
ही कोमल कळी ऊकला, आतां हौसेनें बोला।

अशा नादावून जाऊन नागिणी प्रमाणें डोलूं लागलेल्या, व कामविव्हल होऊन ख्यालीखुशालीचा रंग उडविण्यासाठीं शतशः विनवण्या करणाऱ्या अशा शब्दांनीं अंजारून गोंजारून कोणा रंगेलाला मतलबानें आपल्या जाळ्यांत अडकावू पाहणाऱ्या स्त्रीचे शब्द मोतिराम आपणास जसे ऐकवितो, तसेंच नाहून माखून नेसूच्या जरीकाठीं पातळाच्या निऱ्यांचा घोळ हातीं धरून सायंकाळच्या वेळीं सहज हिंडणाऱ्या स्त्रीस पाहून वेडावून जाणाऱ्या पुरुषाच्या तोंडचे शब्दही तो आपणास एखादे वेळीं फार गमतीनें ऐकवितो—

तिन सांजची नको ग फिरूं नाहून। आलों धावुन मन घेतलें मोहून ॥

---

१. 'पांडोबा भीमातिरीं सुस्थळांत कसबा नारायण गावीं। लछिराम हानमंतराव तुरेकर गाजी।'

तुझ्या बुचडयांत केवडयाची फांक। तुझें उघडें जोबन झांक। तुझी छाती गडे रुंद। बर गुलाबी गेंद। अंगीं नवतिचा फुंद। धुंद झालों तुला ग पाहून। तिन सांजची नको ग फिरूं नाहून॥ मोतीराम म्हणे ही नार। जशी पटयाची धार। चमके तरवार। जिव्हाग्री गेलें लागुन॥ इ. इ.

मोतिरामाच्या छंदांत शब्दरचनेच्या कुसरीनें सजवलेल्या आणि मनोविकारांचे रंग भरलेल्या लावण्या अनेक आहेत. मोतिराम हा जातीनें मारवाडी होता. याचे वंशज अजूनही पुण्याकडे आहेत. मोतिरामाच्या गुरुचें नांव दादू गोपाळ.

' दादू गोपाळ घ्या तुम्ही चुटका। मोतिचे कवन निर्मळ अक्षर वटिका।'

इत्यादी उल्लेख मोतिरामाच्या कवनांत ठिकठिकाणीं आढळतात. याचीं बहुतेक सर्व कवनें अशींच सुंदर शब्दवटिकेनें फुललेलीं दिसतात.

या मोतिरामाची व वर उलेखिलेल्या गोविंदरावाची प्रसिद्धी जितकी जुन्नर प्रांतांत आहे त्याहिपेक्षां परशरामाची प्रसिद्धी नाशिक प्रांतीं सिन्नरकडे म्हणजे गंगथडींत फार आहे. किंबहुना होनाजीची चहा जशीं भिमथडींत आहे तशीच परशरामाची चहा गंगथडींत आहे. परशराम हा जातीचा शिंपी. सिन्नर तालुक्यांतील वावी हें त्याचें राहण्याचें ठिकाण. हा लहानपणापासून शिंप्याचाच धंदा करी. याला रामविजय वगैरे पौराणिक ग्रंथ आणि पुढें पुढें ज्ञानेश्वरीसारखे आध्यात्मिक ग्रंथ वाचण्याचा नाद पुष्कळ असे. यामुळें याच्या कवनांवर जुन्या कवींची सावली पडलेली दिसते. असें सांगतात कीं, कोणी देवपुरकर बावा हे परशरामाचे गुरु होते व श्रीविठ्ठल हें त्याचें उपास्य दैवत होतें; आणि याच्याच प्रेरणेनें परशरामाचें मन लावण्या रचण्यास प्रवृत्त झालें[1].

आपल्या वावी गांवच्या व इतर ठिकाणच्या दैवतांच्या वर्णनपर तसेंच भारतभागवतांतील कथानकांवरहि परशरामाचीं कवनें आहेत.

---

१. कवि विठ्ठल नामीं संत जनाला शरण। नाम विठ्ठलाचें कवि सुख पाहे शाहिरी। वगैरे विठ्ठलाचे उल्लेख परशरामाचे कवनाचे शेवटीं बहुतेक आढळतात. हा विठ्ठल हा कोणी विठोबा खत्री या नांवाचा पुरुष होय. यानेंच परशरामाला तमाशाची चटक लाविली असें सांगतात.

मल्हारराव होळकर, खंडेराव महाराज, फत्तेसिंग गायकवाड वगैरे राजकारणी पुरुषांवर यानें पवाडे रचिले आहेत. मुंबईकर इंग्रजांवरहि याचा एक पवाडा आहे. याशिवाय याच्या शृंगारिक आणि बैठकीच्या लावण्याहि पुष्कळ आहेत.

हा परशराम मनाचा मोठा सात्विक दिसतो. हा लावण्या रचून त्या तमाशांत म्हणून दाखवी. पण त्यापासून कमाईची विशेष अपेक्षा तो बाळगीत नसे. तो तमाशा नाचवीत मुलुखभर फार हिंडे. पण आपला पिढीजाद असा शिंप्याचा धंदा त्यानें कधींहि सोडिला नाहीं. एके वेळीं त्रिंबकजी डेंगळ्यानें त्याचा तमाशा मुद्दाम बोलावून आणून कोपरगांवीं श्रीमंत पेशवे सरकारचा मुक्काम असतां तेथें त्याची हजीरी लाविली. तो तमाशा पाहून श्रीमंतांची मर्जी खूष झाली व ते त्यास कांहीं इनाम बक्षिसी देऊं लागले. तेव्हां परशरामानें ती घेतली नाहीं[1] व म्हणाला 'माझ्या सुई दोऱ्याला हयात असो.' तमाशा करून लावणी म्हणणें हें थोडें कमीपणाचें आहे असें तो समजे. बावा भागवत देवपुरकर यांस त्यानें गुरुस्थानीं मानिलें होतें. त्यांच्या पुढें तो लावणी बिलकूल म्हणत नसे, असा त्याच्या अंगीं विनय होता. त्याचा अर्थ त्याचें लावण्यावर किंवा तमाशावर प्रेम कमी होतें असा मुळींच समजूं नये. परशराम चांगला म्हातारा होऊन मरावयास पडला व आपलें मरण जवळ आलें असें त्यास पक्केपणीं वाटलें, तेव्हां त्यानें आपल्या प्रांतांतल्या व भोंवतालच्या प्रांतांतल्या अनेक शाहिरांस त्यांच्या तमाशासह बोलावून आणिलें व एक दिवस जलसा करून प्रत्येकास लावणी म्हणण्यास सांगितलें; आणि त्यांचे बरोबर आपणहि लावणी म्हटली. शेवटीं त्यानें जमलेल्या मंडळीस सांगितलें कीं 'उदईक आम्हीं गेल्यावर आमचे पुढें पोऱ्यावर साज घालून तुम्हीं चालावें.' दुसरे दिवशीं परशुराम मृत्यु पावला. तेव्हां त्याच्या मर्तीकाचे वेळीं नाच्या पोऱ्यावर साज घालून पुढें चालवून शाहीर मंडळी मागोमाग चालली; व अशा रीतीनें परशराम शाहिराची शेवटची वासना त्यांनीं पुरी केली.

१. शेवटीं हें इनाम परशरामाच्या मुलास श्रीमंतांनीं आग्रहानें दिलें.



## गद्य सारस्वत



गेल्या भागांत शाहिरांचें आणि त्यांच्या कृतीचें थोडेसें दिग्दर्शन केलें. रचनेच्या मानानें शाहिरांचीं कवनें कांहीं अंशीं पद्यरचनेच्या जवळ येतात. म्हणजे त्यांतील गणांचें आणि मात्रांचें बंधन पुष्कळ सैल असतें. शाहिरांपेक्षांहि धनगर, कातकरी, कैकाडी, वारली वगैरेंचीं गाणीं, तसेंच गलबतांवरील कोळ्यांचीं, पालखीच्या भोयांचीं आणि अंगमेहनत करतांना श्रम हलके वाटण्यासाठीं इतरांनीं तोंडानें सुरावर म्हटलेलीं कवनें हीं देखील गद्यरचनेच्या बरीच जवळ येतात. यांची रचना अगदीं साधी असते; व त्यांतील शब्द आणि कल्पना इतक्या नित्याच्या, व्यवहारांतल्या असतात, कीं त्यापासून प्रत्येकाला मोठें समाधान वाटतें. या सर्वांत सारस्वताचे पदर आहेत; आणि त्या सर्वांचा नीट आस्थेनें संग्रह व अभ्यास करणें हें फार इष्ट आहे. या कवनांची बांधणी साहित्यशास्त्राच्या नियमांनुसार केलेली नाहीं. यामुळें तीं कवनें आपल्या आदरास कमी किंवा अयोग्य वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. अशा पद्यरचनांप्रमाणेंच निव्वळ गद्यरचनांचाहि महाराष्ट्र-सारस्वताच्या दृष्टीनें अभ्यास आणि विचार करणें अवश्य आहे. गद्यरचनेचें महत्त्व पद्यापेक्षां कोणत्याहि बाजूनें कमी नाहीं. इतकेंच कीं, गद्य ग्रंथ हे पद्यांप्रमाणें पाठ करण्यास सोईचे नसल्यामुळें ते लेखनसमाविष्ट केल्यानेंच जतन करून ठेवितां येतात. पण यालाहि या देशांत अपवाद आढळतो. गद्य मजकूर नीट पाठ करून तो नित्यशः मुखोद्गत म्हणण्याचा प्रकार कोणत्याहि भाषेंत फारसा आढळणार नाहीं. पण आपल्या या मराठी भाषेंत हाहि प्रकार कांहीं ठिकाणीं नजरेस येतो.

महानुभाव पंथांतील धर्मग्रंथांपैकीं पुष्कळ ग्रंथ निव्वळ गद्य आहेत. हे ग्रंथ त्यांचे धर्मगुरु तोंडानें पाठ म्हणतात; व वेळोवेळीं पुढें पोथी

ठेवून ,आणि ते वाचून, त्यावर पुराण किंवा निरूपण करतात. महानुभाव लोक आपले ग्रंथ इतर कोणाच्याहि हातीं होतां होईल तों पडूं देत नाहींत; किंवा त्यांत काय लिहिलें आहे हें आपल्या पंथाबाहेरील लोकांस बहुश: सांगतहि नाहींत. यामुळें त्यांसंबंधीं पुष्कळ प्रकारचा गैरसमज उत्पन्न झाला आहे. परंतु त्या लोकांतहि हळूं हळूं प्रगतीचीं चिन्हें दिसूं लागल्यावरून ही अडचण आतां दूर होईल अशी आशा वाटते. महानुभावांचे धर्मग्रंथांपैकीं पुष्कळ ग्रंथ गद्यात्मक आहेत. याचें कारण असें दिसतें कीं, आपल्या पंथाचा प्रसार सर्व दर्जाच्या स्त्रीपुरुषांमध्यें व्हावा हा त्यांचा पूर्ण संकल्प होता. आपले ग्रंथ जानपद लोकांना सहज समजावे व कोणालाहि प्रत्यक्ष बोलल्याप्रमाणेंच अर्थबोध चटकन व्हावा, हा एक आशय या गद्यरचनेचा कदाचित् असूं शकेल. कारण कांहींहि असो, पण हल्लीं उपलब्ध असे सर्वांत जुने गद्य ग्रंथ महानुभाव पंथांतील संग्रहांतच आढळतात.

या पंथाचा मूळ उत्पादक जो श्रीचक्रधर त्याच्या भाविक शिष्य मंडळींनीं प्रश्न करून, त्याचा सर्व जीवनवृत्तांत ऐकून घेऊन तो लिहून ठेविला आहे; आणि याप्रमाणें करीत असतां श्रीचक्रधराच्या चरित्राचे चार भाग झाले आहेत. (१) धर्मस्वीकार, (२) औदास्य-परिभ्रमण, (३) पूर्व उपदेशकाल व (४) उत्तर उपदेशकाल. या निरनिराळ्या काळांतील निरनिराळीं चरित्रें उपलब्ध आहेत. आपणांस हल्लीं उपलब्ध असलेल्या सव गद्य ग्रंथांत—म्हणजे महानुभाव पंथांतील गद्य ग्रंथांत—'महिंधर व्यास' किंवा 'महिंभट' यानें साक्षात सांगितलेली माहिती ज्यांत टिपून ठेविलेली आहे तो 'लीळा चरित्र', ग्रंथ फार प्राचीन आहे. या ग्रंथांतील श्रीचक्रधरांच्या कथा महेंद्र भटानें मूळ लिहिल्या असून त्यावरून पुढील ग्रंथकारांनीं हल्लीं उपलब्ध असलेले आपले ग्रंथ लिहिले. महेंद्रभटानें श्रीचक्रधराच्या तोंडचे शब्द जसेच्या तसे नागदेवाच्या संमतीनें उतरिले; व त्या उऱ्यावरून नक्कल

करून हल्लींचा लीळा चरित्र ग्रंथ सजविला. म्हणजे या ग्रंथांतील शब्द श्रीचक्रधर प्रभूच्या प्रत्यक्ष मुखांतूनच निघालेले आहेत, असें सर्व महानुभावपंथी मानितात. महिंधरानें आपली ग्रंथरचना ११८५-पासून ११९४-पर्यंत केव्हांतरी केलेली असावी. श्रीचक्रधरचरित्र व रुक्मिणीहरणांतील कांहीं 'धवळे' म्हणजे कांहीं भाग हे याचे मुख्य गद्य ग्रंथ होत. या महिंधर व्यासाच्या रचनेचा नमुना कळण्यासाठीं एक लहानसा उतारा देतों.

आबैसीं : गोसावियातें (सर्वज्ञातें) पुसिलें : जी जी : हें देह सांडिलेयां : अनंतरें हा जीवू कोण देहें पावे : आन : कैसे सांडि : सर्वज्ञें भणितलें : बाई लिंग देहेसी रिगे लिंग : देहेसी निगे : अध उर्ध्व गतीतें : परि लिंगपातेचीं मोक्षू : समाने पवणे सहितू लिंग देहाचे उत्क्रमण : तो मृत्यू : बोलिजे : प्राण : अपान : व्यान : उदान : समान : नाग : कूर्म : कलकलू : देवदत्त : धनंजय : हे दश वायू : सहस्त्रां व्रश्चिकांची पीडा एका सर्पा : एकी रोमेचां ठायीं : सहस्त्रां सर्पाचे जे दुःख : ते देहान्ती जीवास होये :

हा उतारा श्रीचक्रधरचरित्राच्या पूर्वार्धांतील आहे. महिंधराचा हा ग्रंथ बराच विस्तृत आहे. याचे पूर्वार्धांत ७५३ लीळा वर्णिल्या आहेत. महिंधरव्यास हा चांगला विद्वान् पुरुष होता. हा दौंड—मनमाड रेल्वेच्या बेलापूर स्टेशनजवळील सारोळे या गांवीं राहत असे.

या महिंधराच्या ग्रंथाधारें '**केशवराज व्यास**' या लेखकानें 'सूत्रपाठ' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ गद्य मराठींत आहे. या सुत्रपाठाशिवाय केशवराजानें एकशेंचवदा 'दृष्टांत' ऊर्फ गोष्टी सांगून परमेश्वरस्वरूपाचें विवरण केलें आहे. हे दृष्टात महानुभाव संत पुरुष नेहमीं नित्यपाठांत म्हणत असतात. याच्या या सुंदर दृष्टांतांपैकीं एक दृष्टात देतों. हा आपणास चांगला परिचयाचा आहे.

सर्वज्ञें भणितलें : अनंत शक्ति : परमेश्वरु : सकळांसींही निश्चयें व्यवस्था करिति : ॥ ० ॥ गावां हत्ती आला तै जात्यंध हस्तीतें पाहों गेले : ९ कें पावो देखिला : एकें सोंड देखिली : एकें कानू देखिला : एकें पाठी

देखिली : एकें पोटु देखिलें : एकें पुंस देखिलें : मग एकुमेकेंसीं संवादति : हारे तुवां हस्ती देखिला : पावो देखिला तो भणे हस्थी खांबा सारिखा : । : सोंड देखिली तो भणे हस्ती मुसळा सारिखा : कान् देखिला तो भणे हस्ती सुपा सारिखा : । पाठी देखिली तो भणे हस्ती भिंती सारिखा : । : पोटु देखिलें तो भणें हस्ती कोथळेया सारिखा : । : पुस देखिले तो भणे हस्ती खराटेंया सारिखा : । : ऐसें एकमेका उरोवीति : तेयां : मध्यें डोळसू असे : । : तो भणे हा हस्तीचा एकेकू अवयेवू होये : पर : हस्ती नोहे : एवं अवयेंवी युक्त तो हस्ती : ॥ : तैसे जेयांसी जे शक्ति प्रकाशली असे तो तियें शक्तितें : परमेश्वरु : भणे : ज्ञानिया असें तो भणे हे ईश्वराची एकेंकी शक्ति होय : पर : परमेश्वरु : नोहे : ऐसा शक्तियुक्त तो : परमेश्वरु : ॥ ४३ ॥

या 'दृष्टांता'शिवाय 'गुढे' या नांवाचा एक ग्रंथ या कवीनें लिहिलेला आहे. यांत वर उल्लेखिलेल्या 'सुत्रपाठ' ग्रंथांतील नऊ प्रकरणांची स्पष्टता केली आहे. तसेंच 'लापनिक' व 'गुढे' या नांवाचे याचे आणखी दोन गद्य ग्रंथ आहेत. या ग्रंथांशिवाय 'मूर्तिप्रकाश' या नांवाचा ३०४४ ओंव्यांचा एक ग्रंथ याच्या नांवावर मोडतो[1]. या ग्रंथाचे शेवटीं हा ग्रंथ शके १२१०-मध्यें पुरा केला असें म्हटलें आहे. म्हणजे ज्ञानेश्वरीच्या पूर्वी दोन वर्षें हा ग्रंथ रचून झाला होता असें होतें. केशवराजाच्या मराठी रचनेखेरीज त्याची आणखी संस्कृत रचनाहि उपलब्ध आहे.

केशवराज हा चक्रपाणी भटाचा मुलगा होय. चक्रपाणी भट हा मोगलाईतील 'वरखेड' या गांवचा राहणारा होता. याला दोन मुलगे होते. थोरल्याचें नांव गोपाळ पंडित व धाकटयाचें नांव केशव पंडित. या दोन भावांपैकीं धाकटयानें म्हणजे केशवानें प्रथमतः महानुभाव पंथाची दिक्षा घेतली; आणि नंतर थोडेच दिवसांत यानें ग्रंथरचनेस सुरुवात केली. केशव पंडिताचा पिता चक्रपाणी

१. कोणी कोणी हा ग्रंथ केशवाचार्यांचा आहे असें समजतात. 'केशवराज' व 'केशवाचार्य' हे दोन भिन्न पुरुष होते.

भट हा मृत्यु पावल्यानंतर कांहीं दिवसांनीं गोपाळ पंडितानेंहि आपल्या धाकट्या भावाचा पंथ स्वीकारिला; व तोहि महानुभाव झाला. या वेळीं रामदेव जाधवाची कामाई या नांवाची राणी होती. तिचा कारभारी व पुराणिक हा **गोपाळ पंडित** होता; व यानेंच पुढें या कामाईस महानुभाव पंथाचा मंत्रोपदेश देवविला, असें महानुभावां-च्या ग्रंथांत लिहिलें आहे. या गोपाळ पंडिताचीहि बरीच रचना आहे. याचे 'चौपद्या' 'निर्वचन स्तोत्र' व 'सुभाषित अंताक्षरी' असे मराठी पद्य ग्रंथ आहेत, यांपैकीं सुभाषित अंताक्षरी या ग्रंथांतील पद्याची रचना दामरामायणाप्रमाणें केलेली आहे. म्हणजे प्रत्येक चरणाचीं शेवटचीं अक्षरें पुढील चरणाच्या प्रारंभीं योजिलीं आहेत. या पद्य ग्रंथाशिवाय 'दृष्टांतलक्षण' व 'दृष्टांतव्याख्या' हे दोन मराठी गद्य ग्रंथ या गोपाळ पंडितानें लिहिले आहेत. गोपाळ पंडित हा शके १२६२-विक्रम संवत्सरीं[1] श्रावण शु. अष्टमीस मृत्यू पावला. यानें केशवराजाच्या ग्रंथांत आणखी भर घालून 'सूत्रपाठ' हा ग्रंथ पुन्हां स्वतः वाढवून लिहिला आहे.

याचा समकालीन असा '**भावे देवबास**' या नांवाचा एक ग्रंथकार होऊन गेला. हा वैराग्य वृत्तीनें गृही. याचे 'पूजा अवसर', 'पांचा पुराचें मूर्तिज्ञान', 'नामाचे दस ठाय' व 'साठ प्रश्न' असे ग्रंथ आहेत. हे सर्व गद्य आहेत. यांपैकीं 'पूजा अवसर' या ग्रंथासच 'दिनचर्या' असें अलीकडे कोणी कोणी म्हणतात. मागें पृष्ट ३८ वर जो उतारा दिला आहे तो या ग्रंथांतूनच घेतला आहे. 'भावे देवबासा' नंतर **नागंबा** या नांवाची एक बाई आपल्या ग्रंथकर्तृत्वानें प्रसिद्धीस आली. ही नागदेवाचार्यांची नात, म्हणजे नागदेवाचार्यांचे शिष्य जे महेश्वर पंडित त्यांची कन्या; व कवीश्वर व्यासांची शिष्यीण. हिनें 'सूत्र मालिका', 'शय्या पालन दृष्टांत व्याख्या', 'दुर्भगा प्रमय' व 'उद्धरणपट' असे चार गद्य ग्रंथ मराठींत केले आहेत. हिचें सप्तशृंगी

---

१. महानुभावांच्या ग्रंथांतील संवत्सर मत असतात असें दिसतें.

पर्वतावर देहावसान झालें. ही आचरणानें फार कडकडीत असे: व भिक्षावृत्तीवर आपला निर्वाह करी. हिचा पेहराव नेहमीं पुरुषासारखा असे. ही स्त्री किंवा पुरुष हें कोणासहि ओळखण्यास येत नसे. हिचे गुरु म्हणज **कवीश्वर** यांनीं श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रय, श्रीगोविंदप्रभु यांचीं गद्य चरित्रें लिहिलेलीं आहेत. एके वेळीं कवीश्वर यांनीं 'शिशुपाल वध' हें सुंदर काव्य लिहिलें; व तें भावे देवबास यांस वाचून दाखविलें. तें काव्य ऐकून भावे देवबास म्हणाले 'बटो : हा ग्रंथू निका जाहला: परि-निवृता जोगा नव्हे चि : प्रवृत्ता जोगां जाहला :' म्हणजे भावे देवबास यांचा आशय असा कीं, तो ग्रंथ विलासवंतास वाचण्यास योग्य झाला, परंतु विरक्तव्रतास वाचण्यास योग्य नव्हे. हें ऐकून मग कवीश्वरांनीं 'एकादश स्कंध' हा ग्रंथ लिहिला; व तो नेऊन भावे देवबासांस ऐकविला. ग्रंथ ऐकून भावे देवबास त्यास बोलले 'आता होए : कवीश्वर हो : हा आतां निवृता जोगा जाहला : ऐसे म्हणौनि थोर तोखले :' या ग्रंथरचनेचा काल शके ११९६-नंतर वर्षानीं असावा असें महानुभाव म्हणतात.

या प्राचीन कालापासून पुढें महानुभाव पंथांतील ग्रंथकारांनीं मराठींत अनेक ग्रंथ रचिले आहेत. त्यांचे सर्व ग्रंथ पाहून, वाचून व त्यांची नीट छाननी करून त्यांचा संगतवार इतिहास लिहिणें हें एक मराठी भाषेच्या दृष्टीनें अवश्य कर्तव्य आहे. मराठी भाषेंत त्या भाषेंच व्याकरण रचण्याचा व कोश करण्याचा हे दोन्ही मान हल्लीं उपलब्ध असलेल्या माहितीप्रमाणें महानुभावांकडेच जातात. त्यांनीं रचिलेल्या मराठी व्याकरणावरील ग्रंथास ते 'पंचवार्तिक' असें नांव देतात. याचा कर्ता भीष्माचार्य अनवयकार, हा सुमारें चारशें वर्षांपूर्वी होऊन गेला असावा. तसेंच आपल्या ग्रंथांतील दुर्बोध शब्दांचें अर्थ देणारा एक ग्रंथ त्यांच्यांत आहे. त्यास ते 'टीप' अशी संज्ञा देतात. हाहि ग्रंथ फार जुना आहे. यांत त्या काळच्या शब्दांचा त्या वेळीं प्रचलित असलेला अर्थ दिला आहे. ज्ञानेश्वरादिकांचे ग्रंथ नीट समजण्यास या कोशाचा उपयोग

चांगला होईल असें वाटतें.

या पंथांतील ग्रंथसंग्रहाचा अमूल्य ठेवा आपल्या स्वाधीन होण्यास त्यांच्या सांकेतिक लिपीचि किल्ली आपणापाशीं असणें हें फार अवश्य आहे. कारण, महानुभावांचे सर्व ग्रंथ येथून तेथून सांकेतिक लिपींत लिहिलेले असतात. नुसती लिपीच सांकेतिक असते असें नसून ते निरनिराळीं नांवें व कांहीं शब्दहि संकेत योजूनच लिहितात. मागें पृष्ठ ३७-वर या लिपीचा संकेत मीं दिला आहे. तो भाग छापून झाल्यानंतर या पंथांतील महंत **श्रीदत्तलक्षराज कवीश्वर** हे मला भेटले; व मीं विनंती केल्यावरून, महंत मजकुरांनीं आपल्या हस्तें या महानुभाव संकेताची किल्ली माझे स्वाधीन केली; आणि ती प्रसिद्ध करण्यास मला परवानगीहि दिली. मागें या पुस्तकांत ही संकेतकिल्ली एके ठिकाणीं दिलेली आहे. तरी देखील द्विरुक्तीचा दोष सहन करून ही मीं पुन्हां येथें देतों. असें करण्याचें मुख्य कारण हें कीं, ही महंत दत्तलक्षराजांसारख्या महानुभाव विद्वानानें स्वतः दिलेली असल्यामुळें बिनचूक व अधिकारयुक्त आहे; आणि म्हणूनच त्यांनीं लिहून स्वहस्तें सही करून दिलेल्या नकलेबरहुकूम ती मी येथें देतो. हिचा उपयोग करून अनेक संशोधक महंतांच्या देणगीचा पूर्ण लाभ घेतील अशी आशा आहे.

महानुभाव पंथांतील ग्रंथांत प्रायः दोन तऱ्हेच्या 'लिपी' अथवा 'संकेत' योजण्यांत येतात. एक **'सकळ लिपी'** व दुसरी **'सुंदरी लिपी'** 'सकळ लिपी' चा उपयोग चक्रधराच्या पंथांतील सर्व मठांत प्रथम केला जात असे. परंतु पुढें ही 'लिपी' किंवा हा 'संकेत' या पंथाबाहेरील कांहीं लोकांस समजल्यामुळें, त्याची गुप्तता नष्ट झाली; व अनेक लोक या पंथाचे बनावट ग्रंथ लिहूं लागले, असा महानुभावांस संशय आला. याकरितां महंत मजकूर म्हणतात कीं—नंतर 'सुंदरी लिपी' हा नवा संकेत कल्पून त्यांत ग्रंथलेखनाची सुरवात झाली. ज्याअर्थीं ग्रंथसंग्रह या दोन्ही तऱ्हेच्या लिपींत लिहिलेला आहे, त्याअर्थीं या दोन्ही तऱ्हेच्या 'लिपी' उर्फ 'संकेत' पुढें देतों—

१ सकळ लिपी ( या दोन्ही लिपींत वर रेषा नाहींत. )

अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः
स सा ष षी ह ह ,, ,, ,, ,, ,, ,, सो सौ सं सः
क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण
य र ळ व प फ ब भ ०। त थ द ध न
त थ द ध न प फ ब भ म य र ल व श
ट ठ ड ढ ण च छ ज झं इ ञ क अ ग घ ,,
ष स ह ळ क्ष ज्ञ त्र क का कि की कु कू के कै
,, म इ ल उ ,, ,, य या यि यी यु यू ये यै
श्री कृ ष्ण ष्ट द्द ह्ल द्य वृ प्र त्त श्न श्च मृ सृ त्य

: टा : डे घ टा—देवतां
: फ : च अ ञे श्च अ—परमेश्वर
: र : षी श्च अ—ईश्वर
: ३ : ळो मा घी—गोसावी=सर्वज्ञ
: ३। : म र्घ ज्ञां—सर्वज्ञां
: ३ों : म र्घ ज्ञां ते—सर्वज्ञांते
: ३ि : म र्घ ज्ञां म—सर्वज्ञांस
: न्य : पै ट न्य—चैतन्य
: न्यां : पै ट न्यां—चैतन्यां

: ची : ची : पर, परी
: टी : टी : तर, तरी
: बी : बी : जर; जरी
: ब्र : ब्रा : ब्रह्मां
: मे : भणिजे
: में : भणितिलें
: भौ : भणौनि
: ढ : संबंध
: ञ्र : धर्म

## २ सुंदरी लिपी

अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः
,, ,, ऊ ऊँ इ ई ऌ ट अे अै ए ऐ ,, ,,
क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण
न थ ज ह ० झ व प फ ठ ट ढ ळ ष
त थ द ध न प फ ब भ म य र ल व श
स छ ग भ ञ क घ श ध व र य च म द

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ | क | का | कि | की | कु | कू | के | कै |
| ल | त | ण | ड | ज्ञ | क्ष | न | ना | नि | नी | नु | नू | ने | नै |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| श्री = अी | षृ = ल्ठं | टू = ग्य | स्म = त्व | स्फ = त्व |
| कृ = नु | ध्य = भ्र | द्य = ग्र | घ्र = ह्ल | व्र = श्य |
| ष्ण = ल्य | ह्न = म्ण | तृ = सु | क्ष्म = ज्ञ्व | ह्ल = व्ण |
| त्त = न्स | स्य = त्र | त्ह = णु | न्म = त्र्व | स्त्र = त्स्य |
| ग्य = ज्र | त्य = स्त्र | ष्य = ल् | स्थ = ५ | स्त्र = त्य |
| ज्र = स्य | म्य = त्र | भृ = धु | त्व = स्म | क्ल = न्च |
| न्य = ञ्ज | प्र = क्स्य | त्त = ६ | ल्प = क्च | ह्ले = च्द |
| व्य = म्र | स्व = त्म | श्र = द्म | ज्य = प्र | श्व = उ |
| वृ = मु | द्ध = ग्भ | च्य = ड्त्र | दू = ग्म | |
| श्रु = नु | भ्रा = ध्य | त्त = स्स | ग्र = ज्य | |

(सही) महंत श्रीदत्त—लक्षराज कवीश्वर महानुभाव.

वर या ज्या लिपी दिल्या आहेत. त्यांत महानुभाव हे आपले ग्रंथ लिहितात. या महानुभावांच्या ग्रंथांसंबंधीं एकदोन गोष्टींचा येथें नुसता निर्देश करून ठेवितों. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या नांवावर मोडलें जाणारें योगवासिष्ठ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचा बरोबर तुर्जुमा महानुभावांच्या सूत्रपाठ नामक ग्रंथांत आढळतो. म्हणजे सूत्रपाठ या महानुभावग्रंथांतील एक भाग आणि हें योगवासिष्ट हे दोन्ही ग्रंथ एकच आहेत. या योगवासिष्ठाचीं पृष्टमात्रेनीं लिहिलेली अशी एक प्रत हल्लीं उपलब्ध आहे हीहि गोष्ट यासंबंधें अवश्य सांगितली पाहिजे. ज्ञानेश्वरांचे नांवावर मोडणारा हा ग्रंथ महानुभावांचे लिपींत लिहिलेला असा गद्य आढळतो. पण हा योगवासिष्ठ ग्रंथ बालबोध लिपींत गद्य लिहिलेला आढळत नाहीं. ज्ञानेश्वरापूर्वींच्या श्रीपती या ज्योतिर्विदाच्या ‘ रत्नमाळेचा ’ उल्लेख मागें आलाच आहे. ज्ञानेश्वरानंतर एक दोन शतकांचे अवधींत लिहिलेलीं कांहीं प्रकरणें हल्लीं उपलब्ध आहेत. यांत वैद्यक, ज्योतिष वगैरे विषय आलेले आहेत. नागार्जुनाचा जारणमारणावर एक योगरत्नमाला

या नांवाचा ग्रंथ आहे. त्याच्या आधारें लिहिलेल्या एका ग्रंथाचीं कांहीं पृष्ठें प्रसिद्ध आहेत. या पृष्ठांतील मजकुरावरून हा ग्रंथ गद्य असावा असें दिसतें. याच सुमारचीं–किंबहुना याच्याहि पूर्वीचीं अशीं पंचतंत्रांचीं भाषांतरेंहि आपणास उपलब्ध आहेत. यांपैकीं एक महाराष्ट्र कवींत प्रसिद्ध झालेलें आहे; व दुसऱ्यांतील लहानसा उतारा या पुस्तकांत मागील एका प्रकरणांत दिला आहे.

या नंतरचे काळांतहि मराठींत गद्यग्रंथरचना निःसंशय होत असे. वेताळ पंचविशी, विक्रमबत्तिशीसारखे ग्रंथ मराठींत गद्यांत लिहून ते मुलांकडून वाचविण्याचा प्रघात त्या काळीं होता. तसेंच रामदेवरायाच्या बखरीहि त्या काळीं लिहिल्या व वाचल्या जात असत. ' बिंबस्थान'ची ऊर्फ 'ठाण्या'ची बखर ही तेराव्या शतकांत लिहिलेली दिसते. पण हिच्या आढळणाऱ्या लेखी प्रतींत किंवा प्रसिद्ध असलेल्या शिळेवरील छापील प्रतींत हिचें रूप फार बदलून गेलेलें आहे. कांहीं शब्द व शब्दांचीं कांहीं रूपें येवढी मात्र हिच्या रचनेच्या पुराणत्वाची खूण हींत अजूनहि अधून मधून दिसते.

या वर उल्लेखिलेल्या बखरी नक्की कधीं रचिल्या हें कळण्यास मार्ग नाहीं. पण त्यांच्या मूळ प्रती मुसलमानी अमलाचे सुमारास, शिवाजी महाराजांचे पुष्कळ पूर्वी लिहिल्या गेल्या असल्या पाहिजेत. यांत संशय नाहीं. शिवाजीचे पूर्वी जुन्या काळच्या ऐतिहासिक हकीकती लिहिण्याचा प्रघात महाराष्ट्रांत बराच होता. त्या वेळीं दिल्लीच्या तक्ताचा बोलबाला पुष्कळच होता. आणि या राजधानीची व तेथील तक्ताधिपतींची हकीकत थेट धर्मराजापर्यंत नेऊन भिडवितां येत असल्यामुळें बखरकार बहुतकरून भारती युद्धानंतर युधिष्ठिराला राज्याभिषेक झाला तेव्हांपासूनची हकीकत किंवा यादीनोंद देत असत. भारती युद्धाची आणि त्या पूर्वीची हकीकत व्यासांनीं महाभारतांत दिलेली असल्यामुळें त्या भानगडींत पडण्याचें कारण या आधुनिक बखरकारांना मुळींच उरलें नव्हतें. दिल्लीखेरीज इतर मुसलमानी पादशहांच्या हकी-

कतीहि महाराष्ट्र लेखक लिहीत असत. दौलताबादचा पादशहा सुलतान निजामशहा, तसेच विजापुरचे पादशहा, यांच्या कैफियती अजूनहि कोठें कोठें नजरेस पडतात. मलिकंबर हा मूळचा फकीर होता. पण पुढें तो दिवाण झाला. फकिरीपासूत अमिरीपर्यंत स्वपराक्रमानें चढलेल्या या पुरुषाची हकीकत उपलब्ध आहे. मुसलमानांनीं दिल्लीचें तक्त बळकाविल्यानंतर कांहीं कांहीं ठिकाणीं स्वदेशीं राज्यें नांदत होतीं. त्यांचे इतिहास ' स्वराज्यप्रिय ' महाराष्ट्र आपल्या मुलांबाळांकडून नेहमीं वाचवी. जीं थोडीं राज्यें अशीं जीव धरून राहिलीं होतीं, त्या सर्वांत विजयानगरचें राज्य हें विशेष महत्वाचें होय. 'तालीकोट' ऊर्फ 'राक्षसतागडी' येथील लढाईनंतर या राज्याचा शेवट झाला हें महशूर आहे. या राक्षसतागडीच्या लढाईची बखर हल्लीं प्रसिद्ध आहे. ही लढाई शके १४८६-मध्यें झाली व त्यानंतर थोडेच दिवसांनीं ही बखर रचिली गेली. या बखरीची भाषा स्पष्टपणें पंधराव्या शतकांतली आहे; व हींत दिलेली हकीकत वाचिली असतां ती लिहिणारा लेखक त्या लढाईच्या वेळीं हयात असावा असें सहज अनुमान होतें. या लढाईचे आदलेच दिवशीं त्या नगराच्या ' राजभूवरा 'स एक दुःस्वप्न पडलें त्यानें स्वप्नांत

'देखिलें जे आपुले कानीचे मोती तोडून घेत होते बसले सिंहासन हिरोन घेत असे आपणासीं दूत येऊन बोढीत ऐसे पाहुनु घाबिरा होउनु उठिला सबेची थोर थोर जोइसी व पंडित व वेदशास्त्री व ग्रामजोसी...... बहुता दिवसांचे होते त्यासी बोलाऊ पाठविले मग त्या पुढें स्वप्न सांगितलेवरी त्यांनी राजभुवराची मन समाधान केले जे तुझे शत्रु जे कोण्ही येताती ते नास होऊनु जातील तुवा क्षेत्रपती मार्कंडी आऊश होऊनु राजसिंहासन्नी राज्य करसील.........मग राजयानें बरवे मूहूर्त पाहुनू घोडा सारंगा अमृतनिघान राजाबैसता आणऊन त्यावरी बसोन अकरावे तासी तख्त विज्यानगराहोऊनु बाहीर येऊन......उतरिले पागा व पलिखाना व उस्तरखाना व फराशखाना व अंबारखाना व तमाम येऊनु...... उतरिले. शाहार विजयानगरामध्यें धांडोरा फिरविलें कीं येक घोडा व राउत न राहतां लष्करासी चालणें म्हणोनु ताकीद केली तमाम बाहेर

येऊनु उतरिले '.

असें हा बखरकार लिहितो. अखेर या सर्व खटाटोपाचा परिणाम कांहींच न होतां, या भूवराच्या डोईचा टोप तुर्कांच्या डोकीवर बसला आणि २७ दिवस झगडा होऊन अखेर अली अदिलशाहाच्या विश्वासघातामुळें या लढाईचा व विजयानगरच्या जुनाट राज्याचा शेवट झाला.

ही तालिकोट ऊर्फ राक्षसतागडीची लढाई शके १४८६[1]-मध्यें झाली; त्यानंतर थोड्याच काळांत तिजसंबंधींच्या हकीकती व बखरी लिहिल्या असल्या पाहिजेत. पंधराव्या शतकांतले गद्य लेख आणखीहि आढळतात. या काळचे कामशास्त्रावरील, मंत्रशास्त्रावरील व रसायन क्रियेवरील कांहीं गद्य ग्रंथ उपलब्ध आहेत. तसेंच औषधी बाडेंहि ठिकठिकाणीं आहेत. या काळांत केलेलें भास्कराचार्यांच्या लीलावतीचें एक भाषांतर उपलब्ध आहे. ज्योतिषासंबंधींहि कांहीं गद्य ग्रंथ या काळचे आढळतात. वैद्यकी संबंधाच्या विषयावर लिहिलेल्या विठ्ठल गलंडूच्या 'रसरत्नदीपाचा' उल्लेख या पुस्तकांत पूर्वींच आला आहे. सोळाव्या शतकाच्या प्रथम पादांत ग्रंथरचनेंत गेलेल्या दासोपंताचा 'वाक्यवृत्ति' या नांवाचा एक प्रश्नोत्तररूप गद्य ग्रंथ आहे. हा गद्य ग्रंथ अजूनहि त्यांचे वंशजांकडे आहे. दासोपंतानंतर थोडे वर्षांनीं म्हणजे शके १५३६ (इ. स. १६१४)-मध्यें गोमांत प्रांतांत 'ख्रिस्तपुराण' या नांवाचा ग्रंथ रचिला गेला. हा ग्रंथ पद्य आहे. परंतु याला प्रारंभीं एक प्रस्तावना जोडलेली आहे, ती निव्वळ गद्य आहे. हा ग्रंथ रोमन लिपींत लिहिला असल्यामुळें व त्याच्या फारशा प्रती न झाल्यामुळें याची भाषा मूळचें रूपांतच राहिली असण्याचा संभव आहे. यासाठीं व या देशांत प्रथम येणाऱ्या इंग्रजानें लिहिलेल्या मराठी भाषेचा नमुना थोडा कौतुकास्पद होईल या साठीं त्या प्रस्तावनेंतून चार ओळी पुढें देतों:—

"ह्मणुनु रिव्रस्तांव तुमी उदंड करुनु परमेश्वरासी अर्घे देआ आणि उपेगू माना का तुमांसि येमकोंडिचेया मार्गाचे व अनुभवार्थीयांचेया अंध-

---

१. वैशाख वद्य २ सोमवार.

कारांतुले काढुनु ख्रिस्ताव पणा भितुरी मेळसे केले. तेयाचेया उत्तमा क्षास्त्राचा उजवाडु भोगुन्शी आमी जे कार्य बोरुन्शी आधारले ते परमेश्वराचे कृपेस्तव आमचे अल्पशक्ति संगडे सिद्धी पावले; दो पुराणांचे अभग केले; तेयामाजी कांहीं उत्तरांची चुकी जाहालेयावरी ती तुमी खेमा करा. मज येतुके आहे पुरे, जरी ते तुमांसी हे पुराण सरले देखुन्शी अरत होते तेंचि आतां तें वाचुन्शी तुमान्शी अरत होऊनु तेयाचा फळू जरी भोगिक्साल तरी देव माझे. तुमी दिनेदिनु अधिक ख्रिस्ताव भक्ति करूनु सते भावो मनी दृढ धरुनु सेवट पर्यंत पुण्ये पुरुषार्थाचे मार्गीं चाला. असे ह्मणवून तुमा कारणे परमेश्वरापाशी विनति करितो "

फादर स्टीव्हन्सच्या ख्रिस्तपुराणांतील हा उतारा वाचून सोळाव्या शतकांत गोमांतक प्रांतात मराठी भाषा कशी असे याचें अनुमान चांगलें होण्यासारखें आहे. त्या प्रांतांत पोर्तुगीज लोकांच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांच्या हकीकती किंवा बखरी तत्रस्थ लोकांनीं लिहून ठेविलेल्या दिसत नाहींत. तिकडील देसाई वगैरे लोकांचे शिवाजीशी जे बखेडे झाले त्याच्या कांहीं कैफियती मात्र त्या प्रांतीं सांपडण्याचा संभव आहे.

हल्लीं ज्या ऐतिहासिक बखरी प्रसिद्ध आहेत त्या सर्वांत (९० किंवा) ९६ कलमी बखर ही फार जुनी आहे. ही प्रथम अरुणोदय वर्तमानपत्रांत व नंतर 'भारत वर्षा'त छापिली गेली आहे. ही फार महत्वाची असून हिच्या नंतरच्या अनेक शिवचरित्रकारांनीं हिचाच उपयोग केलेला आहे. हिची भाषा जुनी असून हिचे शेवटीं पुढील शेरा आहे. 'सदरहू आख्यान नब्वद प्रकरणें पुण्यश्लोक राजा त्याची कथा दत्ताजीपंत वाकेनिवीसे त्यांपासी तपशीलवार लिहिली होती. त्यांपासून संकलित तालिक लेहून घेतली. अनाजी रंगनाथ मलकरे यांचे पुत्र खंडो अनाजी मलकरे याणीं हस्ताक्षरें तालिक लिहिली असे.'

यापूर्वीची अशी शिवकालीन बखर आपणास अजून उपलब्ध नाहीं.

---

१. वाका = हकीगत, मजकुर. परंतु पेशव्यांचे येथें वाकनीस असत. त्यांचें काम श्रीमंतांच्या खास पंक्तीची व वाड्यांतील एकंदर जेवणारांची व्यवस्था ठेवण्याचें होतें.

पण त्या काळच्या लहान सहान हकीकती, पत्रें व सनदा वगैरे कागद उपलब्ध आहेत. शिवकालीन अक्षरांचें वळण व त्या काळचे प्रयोग आणि तत्कालीन मराठी भाषेचें व्याकरण, इत्यादींचा अभ्यास करणारांस या कागदांचा फार उपयोग आहे. मालोजी, शहाजी वगैरे पुरुषांचीं अस्सल पत्रें आपणास हल्लीं उपलब्ध आहेत. पण जें पाहून महाराष्ट्राचे डोळे तृप्त होतील असें शिवाजीमहाराजांचें स्वदस्तुरचें एकहि पत्र अजून उपलब्ध झालें नाहीं. तरी पण ज्यांत शिवाजीमहाराजांच्या तोंडचे प्रत्यक्ष शब्द उतरून घेतले असावेत असें दिसतें, अशीं कांहीं पत्रें हल्लीं उपलब्ध आहेत. त्यांपैकीं एकाचा उतारा पुढें देतों.

### श्रीभवानी शंकर.

मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानी व हवालदारानी व कारकुनानी दिमत पायगो मुक्काम मौजे हलवर्ण ता चिपळूण मामले दाभोळ प्रति राजश्री शिवाजी राजे सु॥ अर्बा सबैन व अलफ कसबे चिपळूणीं साहेबी लष्कराची विले केली आणि या उपरी घाटावरी कटक जावे ऐसा मान नाहीं म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें ऐसीयास चिपळूणीं कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत पावसाळयाकारणें पागेस सामा व दाणा व वरकड केला होता तो कितेक खर्च होऊन गेला व चिपळूणा आसपास विलातीत लष्कराची तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली त्याकरितां हाल कांहीं उरला नाहीं ऐसें असतां वैशाखाचे वीस दिवस उनाळा हे ही पागेस अधिक. बैठी पडली. परंतु जरूर जालें त्याकरितां कारकुना कडून व गडोगडीं गल्ला असेल तो देववून जेसी तैसी पागेची बेगमी केली आहे त्यास तुम्ही मनास ऐसा दाणां रातीव गवत मागाल असेल तोंवरी धुंदी करून चाराल नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं उपास पडतील घोडीं मरायास लागतील म्हणजे घोडीं तुम्हीच मारली ऐसें होईल व विलातीस तसवीस देऊं लागाल ऐशास लोक जातील कोण्ही कुणब्याचेथील दाणे आणील कोण्ही भाकर कोण्ही गवत कोण्ही फाटे कोण्ही भाजी कोण्ही पाले ऐसे करूं लागलेत म्हणजे जीं कुणबीं घर धरून जीवमात्र घेऊन राहिले

आहेत ते हि जाऊं लागतील कित्येक उपाशीं मराया लागतील म्हणजे त्याला ऐसें होईल कीं मोगल मुलकांत आले त्याहूनहि अधिक तुम्ही ! ऐसा तळतळाट होईल ! तेव्हां रयतीची व घोडीयांची सारी बदनामी तुम्हावरी येईल हें तुम्ही बरें जाणून सिपाही हो अगर पावखलक हो बहुत यादी धरून वर्तणूक करणें कोही पायेस अगर मुलकांत गांवोगाव राहिले असाल त्याणीं रयतेस काडीचा अजार द्यावया मरज नाहीं आपल्या राहिला जागाहून बाहीर पाय घालाया मरज नाहीं साहेबीं खजानांतून वाटणिया पदरीं घातलिया आहेती ज्याला जें पाहिज दाणा हो अगर गुरेंढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो अगर फाटें भाजीपाले व वरकड विकावया येईल तें रास घ्यावें बाजारास जावें रास विकत आणावे कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे ऐसे तजविजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणेंप्रमाणेंच घेत जाणें, कीं उपास न पडतां रोज बरोज खायाला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें नसतीच कारकुनासी धसपस कराया अबर अमकेंच द्या तमकेंच द्या ऐसें म्हणाया धुंदी करून खासदार कोठींत कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं व हालीं उनाळचाला आहे तइसे खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहातील कोण्ही आगटया करितील कोण्ही भलतेच जागा चुली रंधनाळा करितील कोण्ही तंबाकूला आगी घेतील मवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें आहे ऐसें मनास ना आणिता म्हणजे अविस्राच एखादा दगा होईल एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील गवताच्या लहळयांस कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळ्या आहेत, तितक्या एकेएक जाळों जातील तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनांस ताकीद करावी तैसी केली तऱ्हो कांहीं खण कराया एक लाकुड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं, एक हें तों अवघियाला कळतें. याकारणें बरी ताकीद करून खासे खासे असाल ते हमेषा फिरत जाऊन रंधनें करिता आगटया जाळिता अगर रात्रीस दिवा घरांत असेल अविस्राच उंदीर वात नेईल ते गोष्टी न हो आगीचा दगा न हो. खण गवत वांचेल तें करणें म्हणजे पावसाळा घोडीं वाचलीं. नाहींतर मग घोडीं बांधावीं न लगेत. खायास घालावें न लगे, पागाच बुडाली !!

तुम्ही निमूर जालेत !!! ऐसें होईल या कारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार हवाल्दार कारकून आहां तितके हा रोखा तपशिलें ऐकणें आण हुशार राहाणें वरचेवरी रोजाचा रोज खबर घेऊन ताकीद करून येणें प्रमाणें वर्तणुक करितां ज्यापासून अंतर पडेल ज्याचा गुन्हा होईल बदनामी ज्यावर येईल त्यास मराठियाची तो इज्जत वाचणार नाहीं मग रोजगार कैसा खळक समजों जास्ती केल्यावेगळा सोडणार नाहीं हे बरें म्हणून वर्तणुक करणें. (छ. १२ सफर.)

या पत्राची भाषा साहेबी आहे, कारकुनी नाहीं, हें सहज लक्षांत येतें. हा एक सरकारी हुकूम आहे. पण भाषेच्या दृष्टीनेंहि यांत अनेक बाबी महत्वाच्या आहेत. शिवकालीन मराठी भाषेचा आस्थेनें अभ्यास करणारास अस्सल कागदांचा उपयोग फार आहे, हें पुन्हां पुन्हां सांगावयास नकोच. शिवाजी महाराजांस मराठी लिपीच्या बावन मातृकाहि येत नव्हत्या व त्यांना स्वतःच्या नांवाचीं अक्षरें काढण्याचेंहि ज्ञान नव्हतें. असें कांहीं ग्रंथकार सांगतात. पण हें अगदीं खोटें आहे याबद्दल संशय नाहीं.

शिवाजी महाराजांच्या अनेक उलाढालींसंबंधीं हकीकती किंवा कैफियती त्या वेळीं लिहिल्या गेल्या असल्या पाहिजेत. पण त्या हल्लीं आपणास उपलब्ध नाहींत. शिवाजीमहाराजांच्या चरित्रात्मक कांहीं बखरी हल्लीं उपलब्ध आहेत. पण त्या बहुतेक शिवाजी महाराजांनंतर बऱ्याच वर्षांनीं लिहिल्या गेल्या असाव्यात असें दिसतें.

शिवाजीच्या चरित्रग्रंथांपैकीं ९० कलमी बखरीचा उल्लेख वर आलाच आहे. या नंतरचें चरित्र 'सभासदी बखर' हें होय. हें चरित्र किंवा ही बखर कृष्णाजी अनंत सभासद यानें राजाराम महाराजांचे सांगण्यावरून शके १६१६-चे सुमारास रचिली.[1] कृष्णाजी अनंत सभासद हा देशस्थ ब्राह्मण असून छत्रपतींच्या पदरीं होता. यानें चंदीचंदावर प्रांतीं असतां राजाराम साहेबांस थोरल्या महाराजांचें चरित्र निवेदन

१. छापील बखरींत शक १६१६ हा दिला असून संवत्सर ईश्वर दिला आहे. ईश्वर संवत्सर, शक १६१९-ला येतो.

करण्याच्या हेतूनें हा ग्रंथ लिहिला आहे. यांतील हकीकत प्रत्यक्षपणें ठाऊक असल्यामुळें चांगली विश्वसनीय असून ती सांगण्याची पंतमजकुरांची शैलीहि फार चांगली आहे.

शके १६१९-नंतरचीं कांहीं वर्षे महाराष्ट्राचा काळ फार संकटाचा गेला. या काळांत फारशी रचना झालेली दिसत नाहीं. 'समाधि प्रकरणा' सारखीं कांहीं वेदांत प्रकरणें मात्र या काळचीं उपलब्ध आहेत. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर व संभाजी महाराजांच्या अमानुष वधानंतर महाराष्ट्रांतून स्वराज्याचें बीं पार निघून गेलें होतें. शिवाजीचे प्रत्यक्ष पुत्र राजाराम महाराज यांना देखील स्वदेश सोडून तंजावरचा प्रांत गांठावा लागला. या धामधुमींत चार मुत्सद्यांनीं अवसान धरून कांहीं जोपासना केली. त्याचीं फळें पुढें चाखण्यास सांपडलीं. श्रीशिवाजी महाराज शककर्ते यांचे द्वितीय पुत्र व कोल्हापूर घराण्यांतील गादीचा मूळ पुरुष राजाराम महाराज यांचा पुत्र संभाजी यानें आपला हुशार सेवक राजकार्यधुरंधर रामचंद्रपंडित अमात्य हुकमतपन्हा यांजकडून एक राजव्यवस्थेसंबंधीं आज्ञापत्र राजशक ४२ म्हणजे शके १६३८-मध्यें लिहविलें आहे, हें आज्ञापत्र त्याकाळच्या शिष्ट गद्याची कल्पना येण्यास चांगलें असून त्यांतील मजकुरहि चिंतनीय आहे. यांतून एक लहानसा उतारा देतों.

"साहुकार म्हणजे राज्याची व राज श्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होते. न मिळे त्या वस्तुज्यात राज्यांत येतात. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा.

तसेंच दर्यावर्दी सावकार यासही बंदरो बंदरी कौल पाठवून आमादरफ्ती करावी. साहुकारामध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फराशिस व डिगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात, परंतु ते वर्कड साहुकारासारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्यच करित आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक साहूकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडो पाहतें? तथापि टोपीकरास या प्रांतीं

प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्टावी हा पूर्ण अभिमान. तदनुरुप स्थळीं स्थळीं कृतकार्यंहि झाले आहेत. त्यासहि हट्टी जात हातास आलें स्थळ मेल्यानें सोडावयाचे नव्हेत. यांची अमादरफ्ती आले गेले इतकींच असू द्यावी. त्यांस केवळ नेहमीं जागा कधींही देऊं नये. कदाचित वखारीस जागा देणें झाली तर खाडीचे मोबारी समुद्रतिरीं न द्यावीं. तसेंच ठिकाणीं जागा दिल्यानें जोपर्यंत आपले मर्यादेंत आहेत तो आहेत. नाहीं तें समयीं आरमार, तोफा, दारुगोळी, हेंच त्यांचे बळ; त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार, तेव्हां इतके स्थळ राज्यांतून गेले. याकरितां जागा देणेंच तर लांब खाडी, गांव दोन गांवें राजापुरी सारखी असेल तेथें फराशिसास जागा दिल्हा होता, त्या न्यायें दोन चार नामांकित शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा कीं तीच जागा शहराचे आहारी शहराचा उपद्रव चुकवुन नेमून देऊन वखारी घालाव्या त्यांस इमारतीचे घर बांधू देऊं नये. यां प्रकारें राहिले तर बरें. नाहींतर याविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटे आपण न जावे; आपले वाटे त्यानीं न जावे इतकेंच पुरें." (मराठ्यांच्या इतिहासाची साधनें विविध-ज्ञान विस्तार वु. ५ पृ. १९७ नऊ प्रकरणें.)

या काळीं बाळाजी विश्वनाथ हा पुण्यास सर सुभेदारीच्या कामावर होता. त्यानें मोठ्या हिंमतीनें दिल्लीस जाऊन अवरंगझेबाच्या मुलीची दाई होती तिच्याशीं मसलत बांधून तिजकरवीं राजकन्येचें मन मोठ्या युक्तीनें वळवून घेतलें; आणि नंतर राजकन्येचे मार्फतीनें शाहूची सुटका करून त्यास परत देशीं आणिलें. सर्वांचें मन सुखी केलें; आणि महाराष्ट्रास त्यांच्या राजाची जोड करून दिली. बाळजीपंत नानानें त्या वेळचे कर्ते पुरुष आपल्या बाजूस वळवून घेऊन मोडलेली स्वराज्याची घडी पुन्हां नीट बसवून दिली. बाळाजीपंतांच्या या थोर कामगिरीची हकीकत नमुद करणारी एक बखर आहे. हल्लीं या बखरीचा थोडासाच भाग आपणास उपलब्ध आहे. पण पेशव्यांच्या मूळ पुरुषासंबंधीं हकीकत देणारी म्हणून ही बखर जरा विशेष महत्वाची आहे. दक्षिणचा राजा दिल्लीस ज्यांनीं धरून नेला त्यांचें तक्त हालवून

सोडणाऱ्या आणि त्याला चोंहों बाजूंनीं घेरून तें समूळ घशांत उतरऊं पाहणाऱ्या बाळाजीपंतांच्या मुलाच्या आणि नातवाच्या स्वतंत्र बखरी नाहींत. पण त्यांच्या कैफियती व राजप्रकरणीं जाबसाल, पत्रें, हकीकती वगैरे अनेक कागद-पत्र आहेत.

या काळच्या सुमारास निरंजनमाधवानें लिहिलेलें 'ज्ञानेश्वर-विजय' या नांवाचें एक ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र आहे. हा निरंजन-माधव म्हणजे लक्ष्मीधराचा शिष्य सुभद्राचंपू, वृत्तमुक्तावलि वगैरे ग्रंथांचा कर्ता होय. याच्या पांच अध्यायांच्या पद्यात्मक चरित्राशिवाय, हें गद्य चरित्र हा निराळाच लहानसा ग्रंथ आहे. तसेंच याची आचार्यांच्या कांहीं ग्रंथांवर गद्य टीकाहि आहे. या निरंजनाहून अगदीं भिन्न असा श्रीक्षेत्र कऱ्हाड येथें 'निरंजनमहाराज' या नांवाचा एक साधुपुरुष (१५५९ ते १६४९) होऊन गेला. याची गणेशगीता प्रसिद्ध आहे. या कऱ्हाडकर निरंजनमहाराजांचें एक गद्य चरित्र त्यांचा नातू भगवान पाठक यानें लिहिलेलें प्रसिद्ध आहे. या चरित्रग्रंथांत 'शके १६८३ वृशा सवंत्सर उत्तरायण ग्रीष्मऋतौ ज्येष्ठ शु० ११ मंदवारीं चतुर्थ प्रहरीं ग्रंथ संपला ॥' असें याचें शेवटीं म्हटलें आहे. याचीं छापील १७६ पृष्ठें झालीं आहेत. हा ग्रंथ भाषेच्या दृष्टीनें साधारण आहे. पण या वेळीं चरित्रलेखानाकडे महाराष्ट्राचें लक्ष कितपत होतें व त्या दृष्टीनें कसे कसे यत्न केले जात, हें समजण्यासाठीं या ग्रंथाचा आपणास उपयोग होण्या-सारखा आहे. या भगवान पाठकानें आणखीहि दहाबारा ग्रंथ लिहिले आहेत. कऱ्हाडकर निरंजन महाराजांप्रमाणेंच इतर कांहीं सत्पुरुषांच्या चरित्ररचनेचा उद्योग त्यांच्या शिष्य मंडळींनीं केल्याचा पुरावा अनेक ठिकाणीं नजरेस पडतो.

तंजावरप्रांतीं असलेल्या या काळच्या नाटकांचा उल्लेख या ग्रंथांत पूर्वीं आलाच आहे. हीं नाटकें शाहूमहाराजांचे नांवावर लिहिलेलीं आहेत. हीं निव्वळ गद्य किंवा पद्य नसून मिश्र आहेत. म्हणजे यांत थोडाफार गद्य मजकूर आला आहे. नाटकरचनेचा ओनामा या दृष्टीनें

हीं नाटकें कौतुकास्पद आहेत. नाटकाप्रमाणें कादंबरीचा यत्न केलेला कोठें आढळण्यांत येत नाहीं. स्त्रियांसंबंधींच्या लहान लहान शृंगारिक गोष्टींचें एक चोपडें आहे. पण यांतहि उत्तान शृंगारापलिकडे ग्रंथकर्त्याची मजल गेलेली नाहीं. यांतील कांहीं गोष्टीं बोकाशियोच्या गोष्टींशीं बऱ्याच साम्य पावणाऱ्या आहेत, हें यांत जरा आश्चर्यकारक आहे.

मंत्र, तंत्र, जादूटोणे, शकुन, ज्योतिष वगैरे त्या काळच्या व्यवहारांतील बाबींसंबंधीं गद्यग्रंथांची रचना त्या काळीं होत होती असें म्हणण्यास वारंवार पुरावा आढळतो. ‘ छत्तीस यक्षिणी ’ हा मंत्रशास्त्रावरील ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. यांत मूळ मंत्र संस्कृतांतच दिले आहेत. पण त्या मंत्रांचे प्रयोग व त्यांचीं तंत्रें यांचें वर्णन निव्वळ मराठींत केलेलें आहे आणि तें गद्य आहे. या ‘ छत्तीस यक्षिणी ’ प्रमाणें मंत्रशास्त्राची इतरहि लहान सहान चोपडीं आढळतात. ‘ महालक्ष्मी शकुनवंती ’ हा एक शकुन व प्रश्न पहाण्याचा ग्रंथ आहे. यांत फांसे कसे करावे, ते कसे टाकावे, व त्यांवरील अक्षरें पाहून विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें काय व कशीं द्यावीं हें सांगितलें आहे. हा ग्रंथ सोळाव्या शतकाच्या प्रारंभींच रचिला गेला आहे. या शकुनवंती प्रमाणेंच ‘ रामसीता ’ शकुनवंती, ‘ हनुमान ’ शकुनवंती वगैरेहि शकुनवंत्या आहेत. फांशाला प्रायः चार बाजु असल्यामुळें शकुनवंतीचें नांवहि चार अक्षरीं असणें इष्ट आहे हें उघड आहे. अशीच ‘ नरहरी ’ शकुनवंती या नांवाची एक जुनी शकुनवंती आहे. हींत चौकोनी चार फासे घेऊन त्यांपैकीं प्रत्येकावर न, र, ह आणि री हीं अक्षरें प्रत्येक बाजूस एक याप्रमाणें काढून मग इच्छिल्या वेळीं हे फांसे टाकावे; आणि त्या चोहोंवर मिळून जीं अक्षरें येतील तीं पाहून त्याप्रमाणें उत्तर सांगावें, असें सांगितलें आहे. या शकुनवंत्यांवरून पूर्वीच्या काळीं लोक साधारणतः काय प्रश्न विचारीत व त्यांना अपेक्षा कशाची असे याचा अंदाज बांधितां येईल. याप्रमाणेंच ‘ लीलावती ’, ‘ तिथिनिर्णय, ’ ‘ कूपखनन ’ वगैरे विषयांवरहि

गद्यरचना होत असे. 'हेमाडपंती मेस्तक' असें ग्रंथाला नांव देऊन त्यांत हेमाडपंताला कधीं कल्पनाहि नसेल अशा गोष्टी ज्याप्रमाणें लेखक लिहितात, त्याप्रमाणेंच भास्कराचार्यांच्या लीलावतीचें नांव देऊन त्यांत तोंडच्या हिशेबांच्या अनेक चाली, तसेंच व्यवहारोपयोगी इतर हिशेबी आडाखे, हे ग्रंथकार खुशालपणें सांगतात. क्वचित् कांहीं बाबी मात्र यांत नेहमीं लीलावतींतून घेतलेल्या असतात. तसेंच 'कूपखननलक्षण' हा ग्रंथ वराहमिहिराच्या दगार्गलशास्त्राधारें लिहिलेला आहे. पण यांत ग्रंथ-कर्त्यानें अनेक ठिकाणीं स्वानुभवावरून किंवा ऐकीव माहितीवरून इतर गोष्टीहि घातल्या आहेत. ग्रंथाची रचना गद्यात्मक आहे. जसें—

'जे ठाईं जांबूलिचा वृक्ष बरवां स क्षिला असे. तये जांबुलीखाली पूर्व दिशेस बारुळ होय तरि जांबुलीचे पालावं दक्षिणे कडे खणिजे । २ दोहों पुरुष २ बत पाणि मिष्ट लांगे तें पाणि कदापि खंडेना ।' इ. इ.

या प्रकरणाचे शेवटीं १६८२ वि. संवत् (म्हणजे शके १५४७) हा दिला आहे.

कांहीं कांहीं संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें गद्य मराठींत करण्याकडे प्रवृत्ति फार पूर्वींपासूनच निःसंशय होती. या काळचीं गीतेचीं गद्य भाषांतरें-हि आढळतात. हेमाडपंती मेस्तकाच्या आधारें रचिलेलीं मेस्तकें व घोड्यासंबंधीं चर्चा करणारीं 'शालिहोत्रें' तर या काळचीं वारंवार आढळतात. पण हीं बरींच त्रोटक असतात. तरी पण हे ग्रंथ मराठींतील गद्य ग्रंथांची कथा सांगत असतां विसरण्यासारखे नाहींत. विश्वेश्वरानें लिहिलेला 'अश्वचिकित्सा' या नांवाचा एक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. या काळचें 'भूगोल' या नांवाचें एक प्रकरण मीं पाहिलें आहे. यांत आपण हल्लीं अनुमानानें कल्पना करूं तशी माहिति नसून केवळ पौराणिक आधारावर, पृथ्वीभोंवतीं दधिसमुद्र वगैरे समुद्र कसे आहेत, तसेच मेरु, मांदार वगैरे पर्वतांची व्याप्ति, त्यांचीं योजनानें सांगितलेलीं मापें वगैरे माहिती आहे. अर्थात् त्या वेळीं या देशांतील लोकांची भूगोल

ज्ञानाची कल्पना काय होती इतकें कळण्यापलिकडे याचा उपयोग नाहीं.[1]

शके १६८२-मध्यें पानपतचा घनघोर युद्धसंग्राम झाला. यानें महाराष्ट्राचा इतिहास पार पालटून गेला. तेव्हां या युद्धसंग्रामाच्या अनेक बखरी मराठ्यांनीं लिहिल्या हें साहजिकच झालें. यांपैकीं कोणा मोरो हरी या नांवाच्या इसमानें नारो सखाराम या नांवाच्या इसमास लिहिलेली एक, पानपतास स्वतः हजर असलेल्या अंताजी माणकेश्वर या राजकारणी पुरुषानें लिहून ठेविलेली एक, मल्हारराव होळकर यांनीं सबंध मोहिमेची आपले धनी श्रीमंत पेशवे सरकार यांस लिहून कळविलेली व 'होळकरांची थैली' या नांवानें महशूर असलेली एक, कृष्णाजी शामराव यानें लिहिलेली 'भाऊसाहेबांची बखर' या नावानें प्रसिद्ध असलेली एक, तसेंच श्रीमंत मातोश्री गोपिका बाईसाहेब यांचे आज्ञेवरून तयार केलेली एक, वगैरे बखरी या प्रसंगाच्या लिहिलेल्या आहेत. यांतील शेवटल्या दोन काव्येतिहास संग्रहकारांनीं छापून प्रसिद्ध केल्या आहेत.

यांपैकीं पहिली म्हणजे भाऊसाहेबांची बखर ही एका सावकाराच्या दिल्ली येथील कृष्णाजी शामराव नांवाच्या गुमास्त्यानें आपल्या यजमानाकरितां लिहिलेली आहे. हींत दादासाहेबांनीं जाटास कुंमेरीच्या किल्यांत कोंडिलें तेव्हांपासूनचे हकीकतीस सुरवात करून ती शेवटचे पानपत येथील युद्धापर्यंत आणून सोडली आहे; व अखेर नानासाहेबांच्या मृत्यूचा प्रसंगहि सांगून या बखरीचा शेवट केला आहे. ही बखर भाऊगर्दीनंतर लौकरच लिहिली गेली असल्यामुळें हींतील वर्णनें फार सरस उतरलीं आहेत. कृष्णाजी शामरावाचा हा ग्रंथ मराठींतील जुन्या गद्य ग्रंथाचा एक उत्तम नमुना आहे. ही बखर वाचीत असतां वाचकाचें

---

१. या काळचे जे नकाशे आपणास आढळतात, त्यांवरून भूगोलाची-हिंदुस्थानच्या भूगोलाची-त्या काळची कल्पना याहून जास्त व्यवस्थित होती असें अनुमान निघतें. पण या नकाशांसंबंधीं वर्णनात्मक ग्रंथ जो भूगोल तो तसा अजून उपलब्ध नाहीं.

मन वेडावून जातें; आणि त्या युद्धप्रसंगांत तो गर्क होऊन त्याची तंद्री लागते. योद्धयांच्या वीरश्रीनें वाचकाचें मनास उत्साह वाटतो व त्यांचा तो हृदयद्रावक शेवट वाचूं लागलें म्हणजे वाचकाचें अंतःकरण अगदीं विरघळून जातें; क्षुब्धतेनें तो देहभान विसरून जातो. कृष्णाजी शामरावाची ही रचनाशैली खरोखरीच फार वाखाणण्यासारखी आहे, यांत संशय नाहीं. या कृष्णाजी शामरावाच्या बखरीपेक्षां रघुनाथ यादवाची बखर एका दृष्टीनें विशेष महत्त्वाची आहे. कारण कीं; ही एक तर या वेळचे पेशवे श्रीमंत थोरले माधवराव साहेब यांच्या मातोश्रींसाठीं रचिली आहे; आणि ही रचितांना, बखरकार शेवटीं लिहितो त्याप्रमाणें 'एक बारनीस शत्रूकडील व श्रीमंतांकडील या उभयतांच्या दिनचर्येचें वर्तमान दफात्यास चिटणिसानीं बार केली. त्यांची संगत पाहून, कच्चा मजकूर सेवेशीं निवेदन करावयाकरितां यथामतीनें बखर सजवून' तयार केली आहे. ही पानपत येथील युद्ध संग्रामानंतर वर्ष दोन वर्षांतच रचिली असल्यामुळें व चिटणिस दफात्याचे लेख पुढें असल्यामुळें, आणि प्रसंगीं जातीनें प्रत्यक्ष हजर असलेले अनेक लहान मोठे लोक बखरकाराला ती रचते वेळेस नित्य भेटत असल्यामुळें हींतील कथा-वर्णन निःसंशय विश्वसनीय आहे; व यांत नमुद केलेले खाशांच्या तोंडचे शब्द बजिन्नस खरे आहेत, हें उघड आहे.

लढाईचे आदले दिवशीं भाऊसाहेब आणि विश्वासराव हे चुलते पुतणे एके जागीं बसले असतां, तो भयंकर प्रसंग मनांत येऊन भाऊसाहेब फार कष्टी झाला. आपल्या भोंवतींच्या लोकांत नीच, पाजी, हरामखोर व विश्वासघातकी लोकांचा भरणा किती आहे! कोणीं मत्सरामुळें, तर कोणी आपमतलबीपणामुळें नीचपणाच्या कोणत्या सीमेला जाऊन पोहों-चले आहेत! ज्या अन्नावर यांचे देह पुष्ट झाले त्या अन्नाचीहि शरम व भीड यांच्या जिवास काडी इतकीहि नाहीं, हें त्याला कळून चुकलें, व हें मनांत येऊन तो खचून गेला. पुढें हजारों संकटें एकवटून उभीं राहिलीं असतांहि जो कधींहि लवमात्र डगमगला नाहीं तो सदाशिव-

राव भाऊ केवळ पुत्रमोहामुळें ढळढळां रडूं लागला; आणि बखरकार म्हणतो—

बोलला जे "विश्वासराव साहेब! तुमचें वय लहान. तुम्ही सुखाची जाति तिलप्राय अनुभविली नाहीं. तुम्हांसारखे गुणी पुत्र, (मातापितरांची) उभयतांची ममता तुमचे ठायीं विशेष. असें असतां हे महत्तर अपेश श्रीसांबानें माझे विभागास आणलें. रावसाहेब! तुम्हांस मीं मरणाचे घरीं आणलें. ही गोष्ट सर्वोपरी आमचे पासून गेली" ऐसीं भाषणें ऐकून सर्वांस गहिंवर आला. त्याजवर विश्वासरावानें उत्तर केलें कीं 'माझे प्राणाविषयीं मजला तिळभर काळजी वाटत नाहीं. परंतु हा समय आपणावर गुजरला ........हा प्रसंग घडून आल्यास श्रीमंत नानासाहेबांची काय गति होईल ती कळेना!! तुम्ही उभयतां बंधु कायम असल्यास माझेसारिखे पुत्र बहुत होतील'. ऐशी उदासपणाचीं भाषणें विश्वासरावांची भाउनीं श्रवण करून विश्वासरावास आलिंगन देऊन बहुत श्रमी जहाले. भाऊसाहेब म्हणूं लागले कीं, 'आम्ही तरि सतीचें वाण घेतलें, आतां तुम्हास ईश्वर साह्य आहे.' त्यावर विश्वासरावानीं उत्तर केलें कीं 'आपण वडिल संनिध असतां मला भय काय? त्यांतून ईश्वरीं इच्छेंकरून ही गोष्ट बनून आली असतां दुसरा पराक्रम जन्मास येऊन कोणता करावा? आतां प्रतिज्ञा हीच कीं रूमशामची बादशाहत करून रूमशाम यथील सरदेशमुखीच्या वतनाची वस्त्रें श्री छत्रपतीच्या नांवें घेऊन, आजपावेतों हक्काचा ऐवज राहिला आहे तो घेऊन ढाला माघाऱ्या देऊं. नाहीं तरी जो प्राणी जन्मास आला त्यास तरि मृत्यु आहे. परंतु या कुरुक्षेत्रीं, रणांगणाचे ठायीं अणुमात्र चित्तांत कांहीं एक आणूं नये. जें ईश्वरानें नेमिलें असेल तें कदापि टळावयाचें नाहीं. मग खेद करावयाचें कारण कोणतें? नानासाहेबांहून मला तुम्हीं वडील अधिक! त्यापेक्षां श्रमी होऊं नये'.

बखरकार आणखी पुढें लिहितो कीं,—

'ते दिवशीं सदाशिवरावपंतांनीं व विश्वासराव यानीं कडकडित निश्चक केलें. उदकहि घेतलें नाहीं. रात्रीचे ठायीं...........साखरबतासे व फळफळावळ मात्र भक्षिली. तों मध्यरात्रीचा समय जाहला......कांहीं निद्रा लागली न लागली एवढयांत जागृत होऊन......मुखप्रक्षालन करून......या

उभयतांनीं तैलाभ्यंग करून मंगलस्नानें केलीं. देवतार्चनें संपादून, फलाहार अल्प करून, पिकले पानाचे विडे भक्षण करून जामदारखान्यांत जाउन रणांगणींचीं पीत वस्त्रें घेतलीं. शिरपेंच व तुरे व चौकडे व बाजुबंद व मोत्यांच्या कंठा व शस्त्रास्त्रें ठायीं ठायीं बांधून तरकस कमना हातीं घेऊन सज्ज झाले. नंतर निशाणबारदारानीं निशाणें घेउन नगारा नौबती करून एकदांच गर्जना केली.

या पुढचीहि हकीकत रघुनाथ यादवानें अशीच संकलित दिली आहे. या घनघोर रणसंग्रामाचा शेवट कसा झाला व विश्वसघातक्यांनीं अंगचोरी करून ही मसलत फसवून टाकिल्यावर तेथें गेलेल्या लहानथोरांच्यावर कसें संकट कोसळलें, याची हकीकत या रघुनाथ यादवांपेक्षां फार थोर अशा एका लेखकानें स्वानुभवानें सांगितली आहे. हा लेखक म्हणजे प्रसिद्ध बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणवीस हा होय. नाना फडणविसांनीं आपलें स्वतःचें आत्मचरित्र लिहून ठेविलें आहे. त्यांत नाना लिहितातः—

पुढे थोरलें युद्ध उदयीक होणार. तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंतांचें कुटुंब व आपलें हातीं लागूं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं; असा सिद्धांत करून श्रीमंतानीं याचीहि योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहाला.........मी श्रीमंतासन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असे. तो विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघडयाचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेहि होळकर शिंदे निघोन निशाण निघाले. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धी दिली. माघारे फिरलों. पूर्वी युद्धांत बापूजीपंतीं बोध केला. माघारे फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं अशा समयीं श्रीमंतास सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें याप्रमाणें जहालें. ल [1] सैन्य त्यांत मोठे मोठे सरदार असतां एक ही त्या समयीं श्रीमंतास आप्त न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. तितकें चांगला

काळ होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो ! सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरेंकरून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा घ्याव्या. निदानीं इतकें असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहात जहालें. मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावयापुरते रामजीपंत उभे होते. सांगूं लागले घोडें वस्त्रें टाकून द्यावीं. त्यावरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसांत तीन चार वेळ शरिरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेचे समागमेचे दाहावीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों. हे सत्ता ईश्वराची......पुढें ते गेल्यावर जाऊं लागलों. तों पुढें दोन कोशांवर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचे मनांत संचार करितां जाहला. कीं कशास मारितां ? मग गेले. तदनंतर माझी शक्ति पाणिपता-वर बहुत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांबसदाशिव जो याणें कृपा करून शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं व पादचारी अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्नउदका-व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला, तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों. तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृतप्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रात:काळी गंगा-सहस्रनाम म्हणत ईश्वरस्मरण करीत चाललों तों एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता. त्यानें घरीं नेलें. भोजन एक ब्राह्मण होता व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला. त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें, तों शत्रूचे स्वार गावांत आले, हें वर्तमान कळलें.

हा उतारा बराच लांब झाला. पण हा अनेक कारणांनीं अपूर्व असल्यामुळें इतक्या विस्तारानें घेणें योग्य वाटलें. एक तर हा युद्धप्रसंग अपूर्व, तो लिहिणारा नाना सारखा कलमबहाद्दरहि अपूर्व, ज्यांत तो आला आहे तसा ग्रंथ—म्हणजे आत्मचरित्रपरग्रंथ—हाहि अपूर्व व

अशा थोर पुरुषांवर असलीं संकटें यावींत हेंहि अपूर्व. असें सर्वच अपूर्व असल्यामुळें हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि देशी भाषेंत प्राय: न आढळणारा असा हा अपूर्व उतारा येथें जरा विस्तारानें उतरून घेतला आहे.

या प्रसंगानंतर थोरले माधवराव साहेबांचे कारकीर्दीतील हकीकतीचीं व नारायणरावाचे वधासंबंधींच्या हकीकतीचीं अनेक टिपणें आहेत. त्यांपैकीं कांहीं इतकीं विस्तृत आहेत कीं, त्यांचीं गणना ग्रंथांत करण्यास हरकत नाहीं; आणि यांपैकीं कांहींची भाषा अशा वरच्या दर्जाची आहे कीं, त्यांस महाराष्ट्राच्या चांगल्या वाङ्मयांत जागा देणें बिलकुल गैर होणार नाहीं. वर नाना फडणविसांनीं स्वत: रचिलेल्या एका ग्रंथाचा उतारा व उल्लेख आला आहेच. आतां नानांच्या आज्ञेनें व प्रेरणेनें रचिलेल्या दुसऱ्या एका ग्रंथाचा उल्लेख करूं. हा ग्रंथ म्हणजे नानांनीं श्रीमंत सवाई माधवराव साहेबांसाठीं मुद्दाम लिहविलेली बखर हा होय. ही बखर चिटणिसीकडील चांगला माहितगार कारकून बाळाजी गणेश याचे करवीं लिहविली आहे. यांत मालोजी भोंसल्यांच्या वेळे-पासून अगदीं चालूं साल पर्यंतची हकीकत थोडक्यांत सांगितली आहे. यांत मराठ्यांच्या बहुतेक सर्व ठळक ठळक मसलतींची माहिती दिली आहे; व ही माहिती देतांना आपण कोणासाठीं ही बखर रचित आहों हें नीट ध्यानांत ठेविलें आहे. यांत पानपतसंबंधीं म्हटलें आहे कीं, ‘ अबदल्ली दिल्लीवर चढाई करोन आला......त्याजवरून भाऊसाहेब व विश्वासरावसाहेब यांची रवानगी फौजसुद्धां केली. दिल्लीस जाऊन पुढें अबदालीची गांठ कुरुक्षेत्रीं सोनपतपानपताजवळ पडोन लढाई होतां अबदालीस मोडलें. त्या समयांत विश्वासराव साहेबांस अंबारींत गोळी लागून कामास आले. हें वर्तमान अबदालीस कळतांच चालोन घेतलें. तेव्हां फौज पळों लागली, मल्हारजी होळकर वगैरे सरदार निघाले. ते समयीं भाऊसाहेबांवर लगट केली. लोक पडले व जखमी झाले. भाऊसाहेब व जनकोजी शिंदे व यशवंतराव वगैरे यांचें ठिकाण लागलें नाहीं.’ यांत

'अबदालीस मोडलें' असें लिहिलें आहे तें एका दृष्टीनें खरें आहे. कारण यानंतर अबदाली किंवा दुसरा कोणीहि तुर्की राजा दक्षिणेंत तोंड घेऊन आला नाहीं. त्यांची वाटच जणों बंद झाली. पण हें करण्याकरितां दोन खासे खर्ची घालावे लागले; व अनेक शेलक्या आणि उत्तम वस्तूंची आहुती द्यावी लागली ! !

ही बखर शके १७०४-मध्यें शुभकृत्नाम संवत्सरीं तयार केली आहे. म्हणजे या वेळीं सवाई माधवरावांचें लग्न नुकतेंच झालें होतें. सवाई माधवराव हे आपल्या नजरेखालीं तयार होऊन चांगले कर्ते निपजावे व त्यांस लहानपणापासून नीट शिक्षा लागावी यासाठीं नाना फडणविसांनीं व त्यांच्या इतर आप्तइष्टांनीं फार परिश्रम केलेले दिसतात. यांचेचसाठीं नानांनीं श्रीमद्भागवतांतील वेंचे काढून तयार केले. यांचेसाठीं पौराणिक कथाहि लिहविल्या. या ग्रंथाप्रमाणेंच या बालराजासाठीं एक शिक्षाग्रंथहि नाना फडणिसांनीं रचविला आहे. हा ग्रंथ ' नारायण व्यवहार शिक्षा' या नांवानें प्रसिद्ध आहे. हा शके १७११-मध्यें तयार केला. यांत निरनिराळे गण कलमवार सांगितले आहेत. असें सांगतात कीं, या ग्रंथांतील कलमांचा अर्थ श्रीमंत प्रत्यहीं गुरुमुखानें ऐकत असत. हा शिक्षात्मक ग्रंथ एके वेळीं महाराष्ट्रीयांत सर्वभर प्रसिद्ध होता. या ग्रंथाप्रमाणेंच दुसरें एक शिक्षणात्मक सुंदर प्रकरण श्रीमंत सवाई माधवराव यांजकरितां त्यांची कर्तृत्ववान् आजी गोपिकाबाई हिनें मुद्दाम लिहविलें आहे. यांत दिवसाच्या घटकांचें प्रमाण जमेस धरून घटकोघटकीं साधारणपणें काय करीत जावें हें लिहिलें आहे. हें लहानसें प्रकरण इतकें सुंदर आहे कीं, याचे पाठ मराठ्यांनीं तर नित्यशः करावेतच पण हिंदुस्थानांतल्या इतर लोकांनींहि हें आपल्या मुलांकडून वाचविल्यास त्या मुलांचें निःसंशय कल्याण होईल. यांत व्यावहारिक, धार्मिक, शारीरिक, नैतिक, वगैरे अनेक प्रकारच्या शिक्षणावर नजर ठेवून गर्भश्रीमंतांना काय योग्य व त्यांनीं कसें वागावें हें थोडक्यांत पण उत्कृष्ट रीतीनें सांगितलें

आहे.[1] यांत आजी आपल्या नातवास लिहितात कीं, ' शास्त्री यांजजवळ विराटपर्वापासून भारतांतील चिंतनिका करीत असावी व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं व अन्यत्र, शहाणे असतील त्यांशीं दिल्ली प्रकरणीं व महाराज प्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यांत असाव्या. आपले वडिलांच्या गोष्टी कारभारी यांसि एकांत स्थळीं विचारीत असावें. व तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे. ते समयीं शहाणे बुद्धिमान असतील ते जवळ असावें '.

शके १७११-नंतरचे लिहिलेले असे लहानथोर पुष्कळ गद्य ग्रंथ उपलब्ध आहेत. यांतून अनेक तऱ्हेचे विषय आढळतात. शेवटच्या बाजीरावाजवळ कोणी हुशार बुद्धिबळें खेळणारा खिळाडू होता. त्यानें निरनिराळे डाव दाखवून लिहिलेला एक ग्रंथ मी फार वर्षांपूर्वीं पाहिला होता. तसेंच औषधींची रसक्रिया, जारणमारणादि विधींची वर्णनें, स्थलवर्णनें हींहि थोडीफार नजरेस पडतात. पण या सर्वांत चरित्रात्मक व ऐतिहासिक बखरी हे ग्रंथ विशेष मोठे असे असतात. कांहीं कांहीं तर मोठया प्रमाणावर लिहिले जात. जयरामस्वामी वडगांवकरांची बखर शके १७३०।३५-चे सुमाराची प्रसिद्ध आहे. हींत त्या गादीचे संस्थापक शांतलिंगाप्पा यांचेपासून तो महादेवबावांपर्यंत हकीकत आली आहे. याप्रमाणेंच इतर साधुपुरुषांच्या बखरी आहेत. हल्लीं प्रसिद्ध असलेली हनुमंत स्वामींची बखर म्हणजे श्रीसमर्थ रामदास स्वामींचें चरित्र. हा ग्रंथ केवढा आहे हें आपणास ठाऊकच आहे. याची मूळ प्रत किंवा पहिली आवृत्ति शके १७१५-मध्यें लिहिली गेली; व नंतर स्वामींच्या आज्ञेवरून रंगो लक्ष्मण व मल्हार रामराव चिटणीस यांनीं याची वाढवून दुसरी आवृत्ति शके १७४०-मध्यें तयार केली. मल्हार

---

१. या गोपिकाबाईंच्या प्रकरणाप्रमाणेंच एक लहानशी यादी नबाब निजाम उल्मुलुख यांनीं नासरजंगास केलेल्या उपदेशाची प्रसिद्ध आहे. ही यादी ज्या नकलेवरून छापिली, ती नकल नाना फडणविसांच्या स्वदस्तुरची त्यांच्या चिरंजीवांजवळ होती. त्यावरून छापिली आहे.

रामराव हे चांगले नांवाजलेले लेखक असून मराठी भाषा सुंदर प्रकारची लिहित. आम्हां मराठ्यांत प्रभु मंडळीचा लेखनपटुत्वाबद्दल जो मोठा नांवलौकिक आहे, त्याचें पुष्कळसें श्रेय या चिटणीस घराण्याकडेच आहे. या घराण्यांतील सर्वांत थोर पुरुष बाळाजी आवजी हा होय. हा अक्षर लिहिणारा इतका बांका होता, कीं याच्या अक्षराचें वळण अजून चिटणिसी वळण म्हणून प्रसिद्ध आहे. या बाळाजी आवजीलाच काक-प्रभु किंवा काकाजी प्रभु असें म्हणतात. याचा नातु—चुलत नातु—रघुनाथ यादव. यानें 'चित्रगुप्ताची बखर' या नांवाची एक शिवाजीची बखर रचिलेली आहे. हिची रचना साधारण प्रतीचीच उतरली आहे. सभासदी बखर पुढें ठेवून तींत पदरची ठिकठिकाणीं चार दोन वाक्यें व कांहीं मजकूर घाढून ही चित्रगुप्ताची बखर या रघुनाथ यादवानें सिद्ध केलेली दिसते. रघुनाथ यादवाला मोठे मोठे शब्द घाढून अगडबंब भाषा लिहिण्याची हौस फार आहे. चिटणिसांचें उपनांव चित्रे. पण हें साधें नांव न आवडून यानें आपल्या बखरीस 'चित्रगुप्ताची बखर' असें म्हटलें आहे. भगवान यमधर्माच्या दरबारीं वही लिहिणारा जसा चित्रगुप्त, तसा छत्रपती भोसल्यांच्या दरबारीं लिखाण करणारा हा चित्रगुप्त, असा भाव दिसतो. या चित्रगुप्तानें यशवंतराव शिंद्यांच्या पदरीं असतांना शके १७००-च्या आधीं दहापंधरा वर्षें ही बखर लिहिलेली असावी. या लेखकाला जुनी माहितीहि सडकून होती. पण तिचा यानें फारसा उपयोग करून घेतला नाहीं. मजकुरापेक्षां भाषेच्या थाटमाटाकडेच याचें लक्ष विशेष वेधलें होतें. या रघुनाथ यादवापेक्षां मल्हार रामरावानें लिहिलेला 'शिवछत्रपतींचें सप्तचरित्रात्मक प्रकरण' हा ग्रंथ वरच्या दर्जाचा आहे. मल्हार रामराव हा वर उल्लेखिलेल्या बाळाजी आवजीचा निपणतू होय. पण बाळाजीची करामत या निपणतूंत उतरलेली दिसत नाहीं. या मल्हार रामरावानें आपले ग्रंथासाठीं केलेलीं कांहीं अस्सल

---

१. पानपतची बखर रचणारा रघुनाथ यादव व हा हे एकच कीं काय हें ठाऊक नाहीं.

टिपणें मी पाहिलीं आहेत. त्यावरून जवळ असलेल्या सामग्रीचा पूर्ण उपयोग करून सुंदर पाकनिष्पत्ति मल्हार रामरावानें केली नाहीं, असें म्हणावें लागतें. कोठें कोठें तर याला आपल्या जवळच्या माहितीचा नीट संदर्भहि कळला नाहीं.[1] यामुळे अनेक ठिकाणीं विपर्यास झाला आहे. तरी पण आमच्या प्रभू मंडळीची लेखनबहादुरी या ग्रंथांत चांगलीच नजरेस येते व लेखकानें आपले ग्रंथाकरितां बरेच परिश्रम केलेले दिसतात. या काळचा संस्कृत ग्रंथाधारें रचिलेला 'राजनीति' या नांवाचा एक ग्रंथ हल्लीं प्रसिद्ध आहे. त्यांत राजे लोकांच्या जनानखान्यापासून लढाईपर्यंतच्या सर्व व्यवहारांसंबंधीं विवरण केलें आहे. ग्रंथांतील विचार व विचारप्रदर्शनाचा थाट चांगल्या तोलाचा आहे. लिहिणारानें भाषाहि नीट नटवून सजविली आहे. हा ग्रंथ कोणी लिहिला याचा उल्लेख ग्रंथांत किंवा इतरत्र नाहीं. काव्यसंग्रहकारांनीं केवळ अजमासानें याचें कर्तृत्व वरील मल्हार रामरावाचें माथीं मारिलें आहे[2]. या 'राजनीति' चे प्रारंभींच म्हटलें आहे कीं, 'ही राजनीति पूर्वीं थोर थोर राजे मनु आदिकरून पाहून आचरण करिते झाले. त्या शास्त्राधारें.....प्रतिपादित युक्ति करून महाराष्ट्र भाषेनें विस्तारयुक्त सांगतो. (ही राजनीति) ज्यांस राज्य करणें व ज्यांस मोठी संपत्ति करून योग्यता इहपर लोकांस पावणें, त्याणीं अगत्य पाहत असावी.' अशी या ग्रंथाची फलश्रुती आहे.

सातारकर भोंसल्यांप्रमाणेंच नागपूरकर भोंसल्यांच्या संबंधाच्याहि

---

१. बखरीच्या आरंभींच ही बखर लिहिण्यास, 'राज्याभिषेक शक १३७-मध्यें प्रमोदिनाम संवछरे ज्येष्ट बहुल षष्टी भृगुवासरीं मला शाहु महाराजानीं आज्ञा केली' असें मल्हार रामराव लिहितो. राजशक १३७ म्हणजे शालिवान शक १७३२ आला आणि शाहू महाराज शके १७३० वै. शु. नवमीलाच कैलासवासी झाले होते ही गोष्ट सर्वमान्य आहे.

२. हा ग्रंथ किंवा हें प्रकरण चिटणीस यांचे कडील शिवाजीच्या चरित्राच्या पुस्तकांत प्रथमारभीं लिहिलें आहें. महाराजांच्या चरित्राची दुसरी प्रत इंदूर येथें उपलब्ध झाली. तींत हें नीतिप्रकरण नाहीं असें का. इ. सं. कार लिहितात.

बखरी, कैफियती वगैरे उपलब्ध आहेत. गंगाधर माधवराव चिटणीस यांनीं या भोंसल्यांची एक बखर लिहिली आहे. तशीच दुसरी बखर खंडो भगवंत परभू या नांवाच्या गृहस्थानें लिहिली आहे. हा गृहस्थ वरील गंगाधर माधवरावाच्या हाताखालीं नायब चिटणीस होता. या दोहों शिवाय विनायक आनन्दराव औरंगाबादकर वगैरे मंडळींनींहि या घराण्याच्या बखरी लिहिलेल्या आहेत. या काळीं लिहिलेल्या कांहीं बखरी इतक्या मोठ्या होत्या कीं, त्यांचे छापील ग्रंथ हजार पृष्ठांचे होतील असें त्या प्रत्यक्ष पाहिलेल्या लोकांच्या म्हणण्यावरून दिसतें.

पेशवाईच्या अखेरीस आणि अव्वल इंग्रजीच्या सुमारास ज्या मराठी बखरी निर्माण झाल्या त्यांपैकीं, 'मराठी साम्राज्याची छोटी बखर' व 'पेशव्यांची बखर' या दोन बखरींचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींत भोंसले यांचे मूळ पुरुष बाबाजी भोंसले यांचे वेळेपासून तों तहत शेवटील प्रतापसिंह महाराजांपर्यंतची सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली आहे. ही बखर कोणी लिहिली याविषयींचा निर्णय या ग्रंथांत केलेला नाहीं. पण हा लिहिणारा कोणी तरी चांगला हुशार माणूस दिसतो. ग्रंथरचनेचा काल मात्र यांत लेखकानें शेवटीं दिला आहे. 'शके १७३९ कार्तिक शुद्ध ८ ता० शु० ९ सोमवार. बखर समाप्त झाली' असा हिचा शेवट आहे. ही बखर रचीत असतांना या लेखकापुढें अनेक जुन्या बखरी, टिपणें व यादी वगैरे सामुग्री असावी व त्या आधारें ही बखर लिहिली असावी, असें स्पष्ट दिसतें. परंतु 'पेशव्यांच्या बखरीची' स्थिति यापेक्षां निराळी आहे. एक तर ही बखर 'साम्राज्याच्या छोट्या बखरी' पेक्षां मोठी आहे. पण या क्षुल्लक बाबीपेक्षां इतर अनेक कारणांनीं ही बखर महत्वाची आहे. ही पेशव्यांची बखर कृष्णाजी विनायक सोहोनी या नांवाच्या एका गृहस्थानें लिहिली आहे. लिहिली आहे हें म्हणणें या ग्रंथासंबंधें बरोबर नाहीं. कारण वस्तुस्थिति अशी आहे कीं, कृष्णाजीपंत सोहोनी यांनीं ही बखर स्वमुखानें निवेदन केली व ती इतरांनीं तशीच्या तशीच लिहून घेतली. हें थोडें विशेष आहे.

पंत मजकुरांची हकीकतहि अशीच विशेष आहे.

कृष्णाजीपंत सोहोनी हे मूळ रत्नागिरी जिल्ह्यांतील सोमेश्वर या गांवचे राहणारे होते. येथून हे पुण्यास आले व आपल्या कर्तबगारीनें सुभेदारीपर्यंतच्या हुद्यावर चढले. परंतु पुढें कालचक्र फिरल्यावर कृष्णाजी पंतांची सर्व स्थिति पालटली. मराठ्यांचें राज्य गेल्यावर आपली नोकरी व इतमाम सोडून त्या वेळीं बरेच लोक घरीं बसले. कोणी तीर्थयात्रा पत्करल्या, कोणीं संन्यासदीक्षा धारण करून आयुष्याचे राहिलेले दिवस ईश्वरोपासनेंत घालवून या देहाचें सार्थक केलें. अशा कोटींपैकींच कृष्णाजी विनायक सोहोनी हे दिसतात. विपत्काल प्राप्त झाल्यावर संसारावर पाणी सोडून हे भिवपुरी वैजनाथ येथें येऊन राहिले. वैजनाथ येथें नदीचें कांठीं एक शंकराचें देऊळ होतें. तेथेंच त्या देवळांत हे राहत व भिक्षावृत्तीवर उदरनिर्वाह करीत. जटा वाढवून बैरागी बनून हे सर्वकाळ पूजेअर्चेंत घालवीत. याप्रमाणें क्रम चालवीत पुढें अखेरपर्यंत ते त्याच ठिकाणीं होते. त्या ठिकाणीं असतांना या बखरींत छापिलेली ही हकीकत त्यांनीं तोंडानें सांगितली व त्या गांवच्या लोकांनीं मोठ्या आदरानें लिहून घेतली. ही हकीकत—अर्थात् ही बखर—ज्यानें अशी स्वमुखानें निवेदन केली, तो पुरुष किती हुशार व माहितगार असेल याची कल्पना सहज करितां येईल.

या बखरींतील पुष्कळ गोष्टी केवळ ऐकीव माहितीवरून दिल्या आहेत. यामुळें हींत कांहीं ठिकाणीं अल्प दोष आलेले आहेत. पण ही बखर सांगणाराची भाषा मोठ्या डौलाची आहे. स्वराज्यांतील निरनिराळ्या व्यक्तींविषयीं आदर, प्रेम, तिरस्कार वगैरे विकारांचीं चिन्हें या वर्णनांत पदोपदीं आढळतात. हिची भाषा एक टाकीं लिहिलेल्या लेखाप्रमाणें सारखी व सरळ आली आहे; आणि कित्येक ठिकाणीं तर ती मोठी प्रौढ, जोरदार व तेजस्वी अशी उतरली आहे.

या मोठाल्या बखरींखेरीज साष्टीची बखर, वसईची हकीकत, प्रतिनिधींची बखर, बुंदेल्याची कैफियत, खर्ड्याच्या लढाईची बखर, वगैरे अनेक लहान लहान प्रकरणें हल्लीं उपलब्ध आहेत. तसेंच पेशवाईच्या

अखेरच्या अखबारी व हकीकतीहि त्या त्या वेळच्या लेखकांनीं लिहून ठेविलेल्या आहेत. या खेरीज दिनचर्येचीं टिपणें व जमाखर्च वगैरेहि या देशांत फार पूर्वीपासून लिहून ठेवण्याची वहिवाट आहे; पण हीं टिपणें व जमाखर्च म्हणजे कांहीं ललितवाङ्मय नव्हे. किंवा नागर असें महाराष्ट्र सारस्वतहि नव्हे. तरी देखील यांचा येथें उल्लेख करण्याचा मतलब असा कीं, या योगानें आमच्या देशांत मोंगल बादशहाच्या अमलापासून तों शेवटपर्यंत जमाखर्चीं लिहिण्याची पद्धत होती. या बाबतींत आमचे लोक फार वाकुफ असत, हें स्पष्ट दिसून येतें. निबंधमालाकार आपल्या एका अंकांत लिहितात कीं, "बाळाजी विश्वनाथ पेशवे यांजपासून तर शेवटचे बाजीराव पेशव्यांपर्यंत या घराण्यांतील सर्व पुरुषांस ही विद्या संपादन करावी लागत असे. त्याप्रमाणें बहुतेक सर्व गादीचे मालक या कलेंत निपुण असत. शेवटले बाजीराव यांस तर या जमाखर्चीं लिहिण्याचा फारच नाद असे. आपल्या खजिन्यांतून ज्या रकमा खर्चीं पडत व जमा होत असत त्यांचा सर्व दिवसाचा हिशेब गुपचिप तऱ्हेनें ते रात्रीं मांडून ठेवीत असत. हा कच्चा खर्डा स्वतः करून ठेवण्याचें कारण काय तें बरोबर समजत नाहीं. बाजीरावसाहेब पुण्यांतून गेल्यावर, इंग्रजांनीं पेशव्यांचा वाडा ताब्यांत घेऊन तपासण्यास जेव्हां आरंभ केला, त्या वेळीं, त्यांच्या पलंगाखालीं चोवीस वर्षांचा हिशेब उत्तम तऱ्हेनें लिहून ठेविलेला सांपडला. बाजीराव साहेबांचें अक्षर उत्कृष्ट होतें असाहि लौकिक आहे." बाजीरावासारख्या पेशव्याला जर लेखणीची हौस तर त्या वेळच्या इतरांना ती किती असेल हें कोणासहि अजमावतां येईल. त्या काळच्या लोकांनीं, त्या काळीं प्रचलित असलेल्या अनेक विषयांवर लेख लिहून ठेविले असतील; पण कांहींची गरज नसल्यामुळें व पुष्कळांसंबंधें अनास्था उत्पन्न झालेली असल्यामुळें, हल्लीं ते सर्व लिहूनहि न लिहिल्या प्रमाणेंच आपणास झाले आहेत.



# पेशवाईअखेरील कवि



पेशवाईच्या अखेरीस जे कवी प्रसिद्ध होते त्यांत **देवनाथ[1]** महाराजांची ख्याति विशेष आहे. हे वऱ्हाड प्रांतांत सुरजी अंजनगांव येथें राहत असत. वास्तविक पहातां सुरजी अंजनगांव हें एक गांव नसून एका नदीचे कांठीं एके अंगाला सुरजी व दुसरे अंगाला अंजनगांव अशीं हीं दोन गांवें आहेत. यांपैकीं सुरजी येथें देवनाथांचा जन्म शके १६७६-मध्यें झाला. यांच्या वडिलांचें नांव राजोपंत. हे सुरजी अंजनगांवचे कमाविसदार होते. देवनाथांचें लग्न त्यांच्या वयाच्या बाराव्या वर्षी कृष्णराव नांवाच्या एका गृहस्थाच्या काशी नामक कन्येशीं झालें. काशीबाईचें सासरचें नांव रमा. देवनाथांचें मूळ नांव देवराव असें होतें. परंतु, पुढें यांस गुरुमंत्र मिळाल्यावर यांचें नांव देवनाथ असें पडलें. देवनाथांस गोविंदनाथ नांवाच्या एका नाथपंथी सत्पुरुषाकडून शके १७०३-मध्यें बीजमंत्र व अनुग्रह मिळाला. देवनाथांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आहे.

नृसिंहसरस्वती—जनार्दन स्वामी—एकनाथ —गावबा ऊर्फ नित्यानंद—कृष्णनाथ—विश्वंभरनाथ—मुरारनाथ— रंगनाथ—गोपाळनाथ—गोविंदनाथ—देवनाथ.

या परंपरेपैकीं बहुतेक पुरुषांनीं ग्रंथरचना केली आहे. गावबा यानें नाथांचें 'भावार्थ रामायण' हें त्यांच्या मृत्यूनंतर पुरें केलें, हें प्रसिद्धच आहे. यांच्या नंतरच्या दोन तीन पुरुषांची कविता वऱ्हाड प्रांतांत थोडी फार उपलब्ध आहे असें कळतें. या परंपरेंतील रंगनाथाचे शिष्य गोपाळनाथ[2] हे औरंगाबादेनजीक सलाबतपूरचे राहणारे. यांच्या

---

१. देवनाथाची कविता रा. सा. अच्युत सिताराम साठे यांनीं आपल्या 'वैदर्भकाव्यसंग्रहांत' उत्तम तऱ्हेनें संपादून छापिली आहे. त्या पुस्तकाच्या प्रारंभींचा रा. सा. अच्युतराव साठे यांचा लेख आणि देवनाथांचें चरित्र, यांवरून पुढील माहिती दिली आहे.

२. रा. पटवर्धन यांचे लेखावरून ही माहिती घेतली आहे.

वडिलांचें नांव गोविंद व आईचें आनंदीबाई. गोत्र कौंडिण्य. यांचें उपनांव घोलप. हे आजन्म ब्रह्मचारी होते. यांनीं शके १६८८-मध्यें श्रावण वद्य अमवास्यचे दिवशीं त्रिपुटी येथें जिवंत समाधी घेतली. यांचे मागें यांची गादी यांचे वडील बंधु रामचंद्रपंत यांचें वंशजांकडे चालू आहे. या गोपाळनाथांचा 'सिरोमणी' या नांवाचा सुमारें नऊ हजार ओंव्यांचा एक ग्रंथ आहे. या शिवाय 'समाधिबोध' या नांवाचा दुसरा एक लहानसा ग्रंथ असून आणखीं पदें, अभंग वगैरेहि आहेत. या गोपाळनाथांच्या धाकट्या भावानें, यांचें सुमारें साडेसातशें ओंव्यांचें एक विस्तृत चरित्र लिहिलें आहे. गोपाळनाथांच्या शिष्यांत शेख सुलतान व गोविंदनाथ हे दोघे प्रसिद्ध आहेत. शेख सुलतान हा पंढरीचा वारकरी असून त्याची अभंगरचना आहे. त्याची समाधी गोपाळनाथांच्याच गांवीं म्हणजे त्रिपुटी येथें[1] आहे. गोपाळनाथांचा दुसरा शिष्य गोविंदनाथ. हे रत्नागिरीकडील राहणारे. यांचें उपनांव परांजपे. हा कोकणस्थ चित्पावन ब्राह्मण. याचे जन्म व मृत्युशक अनुक्रमें १६४३ व १७३३ असे आढळतात. वऱ्हाडांत अकोलें जिल्ह्यांत घूसर येथें गोविंदनाथ हे राहत असत. यांनीं वऱ्हाणपूर येथें मठ स्थापिला असून त्या ठिकाणीं अजूनहि यांची शिष्यपरंपरा आहे. गोविंदनाथांनींहि बरीच कविता केली आहे. पण ती अजून सर्व अप्रसिद्ध आहे. रा. अच्युतराव साठे हे लिहितात कीं, ' नाथ–कर्तींमध्यें ओंवी एकनाथाची, अभंग गोविंदनाथाचे आणि पदें देवनाथांचीं हीं सरसपणें मनावर बिंबतात.' गोविंदनाथांचे पांच हजार अभंग व आणखी कांहीं पदें इतकी कृति हल्लीं उपलब्ध आहे. गोविंदनाथ हे एके वेळीं सुरजी येथें आले असतां त्यांनीं देवनाथांस अनुग्रह दिला. अनुग्रहानंतर देवनाथ हे कथाकीर्तनें करीत फिरत असतां त्यांची लोकामध्यें फारच वहावा झाली; व त्यांस पेशव्यांकडून चांगली बिदागी मिळाली. देवनाथांवर एलिचपूर येथील नबाबांची भक्ती फार होती; व

---

१. मागें शेख सुलतान हा तुकारामाचा समकालीन होता असें चुकीनें म्हटलें आहे तें रद्द समजावें.

ते नाथांचें कीर्तन ऐकण्याची संधी केव्हांहि वायां जाऊं देत नसत. इतकेंच नव्हें तर देवनाथांकडून त्यांनीं उर्दू भाषेंत कांहीं पदेंहि रचून घेतलीं होतीं.

'देख सुरत टक लागि नैनसो नैन भदकर दिया ।
गुरूने जोगन मुजकूं दिया ।

हें सुंदर पद देवनाथांनीं या नबाब सलाबतखांच्या समोर कीर्तन करीत असतां तेथच्या तेथेंच रचून म्हटलें असें सांगतात. नाथ हे अनुग्रहा-नंतर गांवोगांव कीर्तन करून प्रेमानंदानें नाचत व फावल्या वेळीं अनेक तऱ्हेची प्रबंधरचना करीत.

तुझिया रंगणी नाचावें । हेंचि दान बा मज द्यावें ॥
तुझिया नामाचे प्रबंध । राहो अनुदिनीं मज छंद ॥

हेंच दान ते 'नंदनवन श्रीकृष्णा' जवळ आणि आपल्या 'गुरु गोविंदा'जवळ नेहमीं मागत; आणि त्या दोघांच्याहि कृपाप्रसादानें यांची वाणी प्रासादिक होऊन हें दान यांना उत्तम लाभलें.

श्रावणाख्यान, अहिमही आख्यान, कृष्णजन्म वगैरें आख्यानें आणि अनेक सुरस कटाव यांनीं रचिले आहेत.

अमोल काया जाइल वांया, जसी कांच कीं फुटे फटकन् ।
उभा काळ विकाळ, लक्षितो वेळ, होय सावध चटकन् । खूप समजा ॥

हा यांचा कटाव मोठा डौलदार आहे. ज्यांना परमेश्वरानें ऐपत दिली असून जे तिचा सदुपयोग करीत नाहींत, गरीब दुबळ्यांना मदत देत नाहींत, ज्यांना धनमदाच्या ताठ्यानें जरा देखील वांकवतच नाहीं, आपली चैन ज्यांना सुटत नाहीं—

नाहीं ज्यास परोपकार करणें ना सर्वभूतीं दया ।
लक्ष्मी गेंहि असोनि पाळि न कदा मातापित्या बांधवा ॥

अशा लोकांना संपत देण्यांत देवानें चूक केली, आणि—

ब्रह्मा वेड + + म्हणूनि विभवा देतो अशा गाढवा ॥

इत्यादि शार्दूलविक्रीडिताचे श्लोक देवनाथांचे फार मजेदार आहेत.

यांच्या वाणींत एक तऱ्हेची जादू आहे. साधे प्रसंगहि हे चित्ताकर्षक करून सांगतात. यांची वृत्ति सदा उदार असे. यांना लहानपणापासून तालमिचा छंद फार होता. यामुळें यांची आणि यांच्या आखाड्यांतल्या मंडळीची शरीरयष्टी कमावलेली व कणखर होती. तत्कालीन इतर महाराष्ट्रियांप्रमाणेंच शिपाईबाण्याची राहणी यांना मनापासून आवडे. हे नेहमीं जवळ तलवार बाळगीत आणि मोठ्या थाटानें राहत. अंगात एक तऱ्हेची रग असल्यामुळें घरांत बसणारे आणि संसाराचा गाडा सदा सर्वकाळ ओढीत राहून तेंच आपल्या या जन्माचें एक सार्थक असें मानणारे आयदी चंदूलाल, यांना तिरस्करणीय वाटत. अशांच्यावर यांनीं अनेक 'फटके' लगावले आहेत.

धन दरकुटें, भरी चिरकुटें उंच लेत गोमटीं ।
उमजेना मतिमंद तनूची रक्षा हे शेवटीं ॥
उंच हवेली, नरम बिछाना, किनखापी तोषके ।
निजत बसत कांतेला घेउनि मटमट घेतो मुके ।
सुख मानुनियां भुलला भारी, करितसे भातुकें ।
'अचडें[1] बचडे छकडे' म्हणउनि लाडवितो बाळकें ॥
भोगितो विषय धडफुडा । अति समय कठिण पुढें कुडा ।
वाजवी काळ चौघडा ॥

इत्यादि पदें यांच्या भाषेच्या जोरदारपणाची आणि मनाच्या निर्भिड वृत्तीची चांगली साक्ष देतात. यांच्या समोर कोणीहि इसम सामन्याला टिकत नसे. तात्कालिक स्फूर्तीनें कांहीं तरी कोटी करून हे नवीन कविता रचीत आणि ती म्हणून त्याच्यावर आपली कडी ठेवून देत.

---

१. हे शब्द इतर कवींनींहि असेच योजिलेले आढळतात.

अचडें बचडे छकडे बाळ माझे ।

२. पद मध्वमुनींचें प्रसिद्ध आहे. तसेंच त्यांचा शिष्य अमृतराय याचा

बाळ खेळवा, पालख हलवा, रडूं लागला, बाहिर न्यावा ।
अंगडें कुंचडें, अचडें बचडें, कडिवर घ्यावा, ।
माझें छकडें, नका नेऊं त्यासी उघडे ।

३. कटावहि सर्वांच्या परिचयाचा आहे.

अशा प्रसंगाचे यांचे आवेशयुक्त चुटके फार बहारीचे उतरले आहेत. या बरोबरच अशा प्रासंगिक रचनेंत येणारे छंदशास्त्राचे अनेक दोषहि त्यांत आले आहेत. पण ते म्हणण्याच्या ठेक्यांत बरेच लपून जातात.

देवनाथांचें हें मन असें कडकडीत खरें पण तें परमेश्वराला आळवूं लागलें म्हणजे त्यांचें तेंच मन लेंकराच्या मनाप्रमाणें हळुवार होऊन जातें; आणि यामुळेंच त्यांचें धांवे, कोणी सुस्वर म्हटलें असतां चित्ताला भक्तिप्रेमाचें भरतें आणतात.

सांवळ्या सगुण सुंदरा, चला मंदिरा, इंदिरावरा ।
अति सदय हृदय मृदु, तरि हरि तुम्ही कठिणता कां वरा ॥ धृ० ॥
होतां गुंतला क्रोठें, भक्तिपेठे मज ना कळे ।
कोण भक्त तरि ऐसा जेथें वेढियलें निजबळें ।
बहु मी दुःखित झालें, मानस विरहाग्निनें जळे ।
दयाघना तुम्ही वर्षा या विझवा कृपाजळें ।
दासी होउनि ब्रीद मिरविलें शेवटीं हे कां फळे? ॥
हें उचित नव्हे श्रीधरा । या लवकरी स्वकरीं धरा ।
मी दीन मला उद्धरा । दीनबंधुजी करुणासिंधू ब्रीद हें[१]सत्य करा ॥

या धाव्यांतली शब्दरचना आणि त्यांतल्या अर्थाची खुमार कोणालाहि लुब्ध करील.

---

१. परमेश्वर आपला नाथ आणि आपण त्याच्या चरणाचे दास ही भावना कल्पून त्या दीनानाथाला प्रेमानें आळविण्याची रीत पुष्कळ कवींची आहे. नाथसांप्रदायांत तर ती विशेषच दिसून येते. या देवनाथाचा दयाळनाथ म्हणून एक शिष्य होता. त्याचें पुढील पद ऐका.

तूं दिनपति मी कांति तुझी अजि कोप कसा करिशी ।
जळाविण मीन मी तळमळी तशी ॥
साधन तरि कोणतें करूं मी तुझिया प्राप्तिशीं ।
किति म्हणुनियां अंत पाहसी ॥
मी सरिता तूं सागर । मी चातक तूं जलधर । मी तारा तूं शितकर ।
आगळिक नसतांनि नजर कां मजवरती वांकडी ।
सख्या तूं जिविचा जिवलग गडी ॥
(दयाळनाथ)

देवनाथ महाराज हे सदाकाळ कीर्तनें करीत. हें वर सांगितलेंच आहे. एके वेळीं आपला एक शिष्य मल्हारनाथ याच्या आग्रहावरून देवनाथ हे रामनवमीच्या उत्सवासाठीं ग्वाल्हेरीस गेले होते. तेथें रामजन्माचे वेळीं सभामंडपास आग लागली; व रामजन्मासाठीं आलेले पुष्कळ लोक त्या अग्निप्रळयांत जळून गेले! देवनाथ महाराजहि आंत होतेच. तेहि त्यांतच जळून दग्ध झाले. ही गोष्ट शके १७४३-मध्यें घडली. वीराला लढतां लढतां समरांगणांत मरण यावें, योग्याचा समाधी लावून प्राण ब्रह्मरंध्रांतून निघून जावा, अनन्यभावें सरकारी नौकरी करणाराला ती दृढ मनानें बजावीत असतांच मृत्यूनें गांठावें व ईश्वरचरणीं जो सदा रत, तो परमेश्वराचें नामसंकीर्तन करीत असतां त्याची काया अग्निज्वालांनीं भस्मीभूत करावी याहून अधिक सार्थक तें कोणतें!!

देवनाथाच्या ठिकाणीं एलिचपूरच्या नबाबाचें प्रेम विशेष होतें असा उल्लेख वर आला आहे. यावरून मुसलमानांचा ओढा हिंदूंतील साधुपुरुषांकडे व त्यांच्या धर्माकडे किती वळला होता; आणि या दोन जाती कशा रीतीनें एके ठिकाणीं नांदूं लागल्या होत्या, याची कल्पना चांगली होते. देवनाथांचा शेख सुलतान या नांवाचा गुरुबंधु होता. यानेंहि अभंग वगैरे रचना केली आहे. पण ती प्रसिद्ध नाहीं. या सुमाराच्या ज्या मुसलमान भक्ताचें कवित्व प्रसिद्ध आहे, त्याचें नांव शहामुनी असें आहे. या शहामुनीचा 'सिद्धांतबोध' नांवाचा एक पन्नास अध्यायांचा ग्रंथ आहे. यांत कवि म्हणतो—

> 'प्राकृत ग्रंथ फार झाले। संस्कृत आधारें बोलिलें।
> तैसें येथें नाहीं जाहलें। नसे टीका ग्रंथाची हे ॥
> नसतां श्लोकाचा आधार। ग्रंथ चाले सविस्तर।
> हेंच अपूर्व साचार। परिसा तुम्ही श्रोते हो ॥

यासारखेच गर्वोक्तीचे नमुने ग्रंथभर आढळतात. मुसलमानी मनुष्यानें हिंदुधर्माची दीक्षा घेऊन लिहिलेला हा ग्रंथ थोडासा कौतुकास्पद आहे खरा. पण यापलीकडे त्यांत कांहींच हांशिल नाहीं. हा ग्रंथ म्हणजे

एक अठरा धान्यांचें कडबोळें आह आणि तेंह बेचव झालें आहे. अल्ला, जीजस, विष्णु हीं सर्व एकाच परमेश्वराचीं नांवें आहेत आणि वेद व कुराण यांचा वक्ता एकच आहे, असें यांत कवीनें सुचविलें आहे. याशिवाय यांत विशेष कांहीं नाहीं. शहामुनी आपल्या गुरूचें नांव मुनींद्र असें देतो. हा ग्रंथ कवीनें शके १७०० -मध्यें लिहिला. शहामुनीचें मूळ नांव शहा हुसेन; पण आपल्या मुनींद्र या गुरूच्या सन्मानार्थ यानें आपलें नांव बदलून शहामुनी असें केलें. शहामुनी हा विठ्ठलाचाहि भक्त होता. पण याची भक्ति इतर भक्तांपेक्षां थोडी निराळी दिसते. विठ्ठलावर रागावणारे व आपला संसार बुडविला म्हणून त्याच्या नांवानें खडे फोडणारे त्याच्या भक्तांचे आप्त वारंवार आढळतात. पण कोणा भक्तांनें स्वतःच देवावर आग पाखडलेली फारशी ऐकूं येत नाहीं. 'बहेरू' नांवाच्या एका विठ्ठलभक्तानें मात्र आपल्या पुत्रशोकाच्या भरांत देवाची थोडी निर्भर्त्सना केल्याचा गलबला ऐकूं येतो. वृद्धापकाळीं आपला एकुलता एक मुलगा नेणें, हें देवाजीच्या मनास आलेलें पाहून, त्या संतापाच्या भरांत बहेरू म्हणतो--

नष्ट नारायणा । दुष्ट कर्म केलें । सिधूंत बुडविलें । जहाज माझें ॥
वैर साधूनियां । पुत्र माझा नेला । ध्वज हा मोडिला । परलोकींचा ॥
दुःख तें भोगावें । किती हे दिवस । कधीं हें आयुष्य । सरेल माझें ? ॥
अहारे अदृष्ट । कैसी घेसी घांव । घातकी हा देव । कळों आला ॥
मागें पुढें तुवा । न केला विचार । कैसी आणिली धाड । आम्हावरी ॥
बहेरु म्हणे देव । चांडाळ घातकी । काय आलें हातीं । सांग तुझ्या ॥
धराया डाहाळी । बैसावया ठाव । नाहीं तो उपाव । केला ऐसा ॥
किति ही कहाली । करावी जिवाची । कोण या मनाची समजुत पाडी ॥
पेटला हा अग्न । निघतील ज्वाळ । कोण हे सीतळ । करील माझे ॥
हारपली वस्त । जीवा भ्रम होय । कोठें आहे काय समजेना ॥
बहेरु म्हणे कैसें । वोढवलें कपाळ । कोणें देसी बाळ । नेला माझा ॥

संतापाच्या आवेशांत देवाला असे अनेक बोल लाविल्यावर, बहेरूच्या मनाचा उद्वेग थोडा शांत होऊन बहेरू पुन्हा म्हणतो—

करीतो प्रार्थना । येतों लोटांगणीं । परिसा संतजनीं । विनंति माझी ॥
निंदा अथवा स्तुती । तयाची करावी । वाचे न बोलावी । आणिकाची ॥
परिस स्वभाव । लोहा आळिंगणें । पिटितांही सोनें । करी त्याचें ॥
आम्ही तो पतीत । स्वामी तो पावन । तारावया दीना ब्रीद बांधों ॥
आतां ते नीत । नाहीं याचे घरीं । मागें पुढें न विचारी । करी भलतेसें ॥
बोलियेलों आम्हीं । दुःखाच्या संतापें । संतजनीं कोप । न धरी याचा ॥
बहेरु म्हणे यानें । गांजियलें मज । नव्हतें कांहीं काज । बोलायाचें ॥

या बहेरूप्रमाणेंच चतुर साबाजीवरहि त्याच्या उत्तरवयांत मोटें संकट ओढवलें होतें. चतुर साबाजी हा पेशव्यांच्या पदरीं सरकारकामावर होता. परंतु पुढें त्याचे दृष्टीला विकार झाला. यामुळें आपली नोकरी सोडून तो आपल्या मूळगावीं जाऊन राहिला; व नोकरीचा खटाटोप सुटल्यावर यानें ईश्वरचरित्रें गाण्याच्या खटाटोपास सुरुवात केली. याचीं कांहीं पदें व बलिदानकथा, रावणगर्वपरिहार इत्यादि आख्यानें प्रसिद्ध आहेत. याशिवाय 'दानावर्त', 'हस्तामलकटीका' वगैरे कांहीं अप्रसिद्धहि ग्रंथ आहेत. श्लोक, दिंडी, साकी, आर्या वगैरे अनेक वृत्तात्मक रचना हा करितो. चतुर साबाजीप्रमाणेंच कृष्णदास, विठ्ठलनाथ या दोघांचीहि अनेक वृत्तात्मक लहान लहान उपाख्यानें आढळतात. पण यांच्या उपाख्यानांपेक्षां यांचीं पदेंच प्रसिद्ध आहेत. कृष्णदास हा पंढरीचा वारकरी होता. पंढरीच्या विठोबावर याचीं पुष्कळ पदें आहेत. याचें—

'बाजिराव महाराज अर्जि ऐकतो बायकांची ।
चल गडे ! जाऊं पुण्याशी, हौस मोठी माझ्या मनची ।'

असें एक मौजेचें पद आहे. कृष्णदास या नांवाचे मराठींत इतके

---

१. रावणगर्वपरिहार आख्यानाचे शेवटी पुढील श्लोक आहे.

विस्तारपूर्वक चरित्र दशशिराचें ।
पातालखंड बघतां कृत वामनाचें ॥
त्यांतील तांत्रिक वदे सुत विश्वनाथ ।
पाहोनि शुद्ध करणार कवी समर्थ ॥

म्हणजे वामन कवीनें पातालखंड नामक काव्य रचिलें होतें, असें होतें. माझे जवळील या आख्यानाचे प्रतींत छापील प्रतीपेक्षां ज्यास्त श्लोक आहेत.

कवी होऊन गेले आहेत कीं, त्या सर्वांचा नीट पत्ता लावून, काळ वगैरे ठरविणें फार अवघड झालें आहे. महानुभाव मंडळींत तर कृष्णदास हें नांव पुष्कळांनींच धारण केलेलें आढळतें; आणि या पंथांतील मंडळींचीहि रचना मराठींतच असल्यामुळें घोंटाळ्याला तें एक आणखी कारण होतें. उदाहरणार्थ, कृष्णदास या नांवाच्या एका महानुभाव कवीची कृष्णलीलांच्या वर्णनाचीं कवनें आहेत. पण या कृष्णदासाच्या कालासंबंधें किंवा चरित्रासंबंधें कोणतीच माहिति उपलब्ध नाहीं. या कृष्णदासाचें स्वतःचें खरें नांव 'जयराम' असें होतें, इतकेंच याच्या कवनांतील उल्लेखांवरून म्हणतां येतें. या कृष्णदासाच्या एका कंदुकक्रीडेंतून एक चौक देतों, म्हणजे याच्या रचनेची शैली लक्षांत येईल.

अजि अजी, अहिवर शयन, मधुर त्याचीं गयन, पडेना चइन जिवाला जैशी ॥
कुठें पाहूं साजणी कृष्ण माझा हृषिकेषी ॥ धृ० ॥
गेला पळत, मुलांसंग खेळत, मला नाहीं वळत, बाळ जगजेठी । बाळ जग-
जेठी, ॥ त्यानें जाउन खेळ मांडिला यमुनेच्या तटीं ॥
चेंडुफळी खेळत वनमाळी, सांगाती हळी, युगुल मोठी हाटी ॥
युगुल मोठी हाटी, दों ठाई गडि वाटिले, मुलें धाकुटी ॥
चेंडु हातीं, घेऊन श्रीपती, ऊर्ध्वगती पाहती, कृष्ण हा कपटी ॥
कंदूक झोंकिला त्यानें, अडकला फांटी ॥ अहो फांटी ॥
अहो फांटीं चेंडु अडकला, गोपांनीं कृष्ण वेढिला, डाव कधि ना सोड
तुजला ॥ मग हरी, विचारि अंतरीं निर्विष खरी, करावं यमुनेसी । यमुनेसी, ॥
काळियाचा गर्व हरुनि दावि भक्तांसि, भक्तांसि ॥ इ. इ.

थोड्या ठेक्यावर म्हटलें असतां हें कवन ऐकणाराला गोड वाटतें. याप्रमाणेंच—

अजि अजि खगावर शयन, कंसप्राणशमन, कमलदलनयन,
सुखाची खाणी ॥ चला जाऊं कन्हय्या खेळुं यमुनेभुवनीं ॥

हेंहि कवन मोठें कर्णमधुर आहे. हें महानुभाव पंथांतल्याच कोणा 'रामचंद्र' या नांवाच्या कवीनें केलेलें आहे. या रामचंद्राची चरित्रात्मक माहिति आज आपणास नाहीं. पण याच्या कवनांवरून याची रचना

मोठी गमतीची असावी असें दिसतें. रामचंद्राच्या या श्रीकृष्णावरील कवनांप्रमाणेंच पेशवाई अखेरचे सुमारास होऊन गेलेल्या विठ्ठलनाथांची श्रीकृष्णावरील कवनें मोठ्या गमतीचीं आहेत. यांतील एका पदांत 'कृष्णराधिकेचें' वर्णन आहे. हें पद पुष्कळच प्रसिद्ध आहे. विठ्ठलनाथ हा महानुभाव नव्हता हें त्याच्या नांवावरूनच उघड आहे. याचें हें पद असें:—

राधिकेचा रंग पाहुनि । कृष्ण दंग जाहला ।।
वेणी फणी करून भांग । काजळ कुंकु ल्यालि चांग ।
गोरे अंग चोळी तंग । दाखवी श्रीहरिला ।। राधिकेचा० ।।
राधिकेचा झकाझोंक । कृष्ण पाहुनि लावि नोक ।
जरिपातळाचा झोंक । पदर सांवरिला ।। राधिकेचा० ।।
कृष्ण पाहुनि झाली वेडी । हांसतांची नेत्र मोडी ।
विठ्ठलनाथ भक्त गडी । चरणीं रंगला ।। राधिकेचा० ।।

कृष्णराधिकेच्या अशा वर्णनासारखेच निरनिराळ्या प्रकारचे शृंगारिक प्रसंग कल्पून या काळच्या कवींनीं ते वर्णिलेले दिसतात; व ते त्या काळच्या ऐषआरामी स्थितीला सहजच शोभतात.

कुठें तुम्ही गेलां होतां क्रीडेला । मुखचंद्र बहुत कोमला ।
आरक्त लोचनें दीसतीं नीलतमाला । राव रंग कुठें उडविला ? ।।

हा राधेचा पहिला प्रश्न आणि त्यावर कृष्णजीचें उडवाउडवीचें उत्तर; नंतर काजळ कोठें लागलें, सुवास कशानें आला वगैरे प्रश्न आणि त्यांवर तशींच उत्तरें, असें या विनोदी कवनांतून वर्णन केलेलें आहे. गोपाळात्मजाच्या या 'विनोदा' प्रमाणें ज्यालणास्वामी कवीचा असाच एक 'विनोद' आहे. पण त्याचें कथानक याच्या अगदीं उलट आहे. सत्यभामेनें कृष्णाकडे कांहीं निरोप सांगून आपली सखी धाडिली होती. ती परत आल्यावर तिला भामेनें असेच प्रश्न विचारिले; व तिनेंहि अशींच उत्तरें दिलीं. हीं सोडवणीचीं उत्तरें ऐकून शेवटीं भामा म्हणते—

भली भली गे सुजाणे, जाणसी शब्दांचें सोडवणें ।
दुधासी मांजर रक्षण म्यां शहाणीनें पाठविलें ।।

ववी ज्यालणास्वामी कृष्ण, केलें माइक विदाणा ।।
दोघीस लावियलें भांडणा मग आपण भेटले ।।

या खेरीज आणखी एक प्रकारची 'विनोद रचना' किंवा 'विलास' आढळतात. हे संस्कृतांतल्या 'अंगुल्या कः कपाटं प्रहरति?' 'कुटिले माधवः' किं 'वसंतो' या सुभाषितांच्या आधारें रचिलेले आहेत. यांत 'माधव', 'चक्री', 'धरणिधर' वगैरे शब्दांवर श्लेष करून कोट्या रचिल्या आहेत. या कृष्णाच्या नांवावरील श्लेषाप्रमाणेंच शंकराच्या नांवावर श्लेष करून 'सदाशिव' कवीनें एक 'उमाविलास' केला आहे. ही रचना बरीच चांगली साधली आहे. एके वेळीं भोळा दिगंबर

अंकावरी धरुनि शंकर पार्वतीसी ।
नाना विलास करि वासरहीत तोशीं ।।
तों पातले सुरमुनी नमुं त्र्यंबकातें ।
त्या देखुनी परम लज्जित अंबिका ते ।।
तेव्हां उठोनि गिरिजा सदनांत गेली ।.........

हें पाहून शंकरानें तीस 'शंका मनांत न धरतां' कवाड उघडण्यास सांगितलें. शंकराला काय! पण गिरिजेच्यानें तें कसें होणार? तिनें 'तुम्हास वेड तर नाहीं लागलें!' असें म्हटलें व बाहेर आली नाहीं; आणि मग त्या 'कळीच्या नारदाला' येवढेंच पुरलें. त्यानें लगेच शंकराला म्हटलें—

तूं तीतें अति आदरें करुनियां बाह्यांगणीं बाहसी ।
ते तूझे वचनासि तुच्छ करिते हें तूं कसें सोसिशी? ।
जेणें कामिनिचें असें बळ बहू निर्माल्य तेथें पती ।
तेणें कानन सेवणें परि न त्यां यावें सुधामाप्रति ।।

हें ऐकून तो पशुपति उठून गिरिकंदरांत निघून गेला. कांहीं काळानें त्याला केल्या कृत्याचा थोडा पश्चाताप होऊं लागला. तेव्हां नारदानें त्याला सांगून त्याचें गंगेशीं लग्न लावून टाकिलें; आणि मग पुन्हां गिरजेकडे येऊन तिला सांगितलें कीं 'हे जननी, शिवें तुतें त्यजुनी केली दुजी कामिनी!' ही खबर ऐकून गिरिजा नारदाला म्हणते—

'हें तों त्याप्रति त्वांच रे शिकविलें तो तों असे भावडा ।
'नाहीं या उदमांत मी' मुनि म्हणे 'तो ठाइंचा जोगडा ।'

आतां हें कचाट आपल्या माथीं बसणार हें पाहून पुन्हां नारद त्या भोलानाथाकडे गेला आणि त्यानें त्याला नवीन परिणिलेल्या 'मंदाकिनी' भार्येला आपल्या डोक्यावर जटेंत लपविण्याची युक्ति सुचवून परत गिरिजेकडे आणिलें. गिरिजा पतिविरहानें विव्हळ झालेली होती; पण शंकर चालून येतो. असें पाहून तिनें 'कपाट' लाविलें व स्त्रीस्वभावानुसार मोठा कांगाव मांडिला. शंकराला तूं कोण म्हणून गिरिजेनें विचारावें व शंकरानें आपलें नांव सांगितलें म्हणजे त्यावर श्लेष करून त्याचा भलताच अर्थ घेऊन त्यास उत्तर द्यावें. असे शंकराच्या अनेक नांवांवर श्लेष करून सदाशिव कवीनें हा 'शिवउमाविलास'—

झाली ती शिवशक्ति एकचि तदा ना भावरें दूसरा ।
यासाठीं पुजितो सदाशिव कवी श्रीपार्वतीशंकरा ॥

असा गोड शेवट सांगून पुरा केला आहे.

या काळीं कोंकणस्थ ब्राह्मणांतहि बरेच लोक काव्यरचना करूं लागले होते. प्रल्हादचरित्र गाणारा शंकर पाटणकर, शतमुख—रावण वधाचें आख्यान सांगणारा अमृतराव ओक, भावार्थसिंधु रचिणारा विष्णु गोखले वगैरे कवी चित्तपावन ब्राह्मण होत. या लहान लहान काव्यें रचिणाऱ्या कवींपेक्षां पांडोबा पेंडशे, दाजीबा गोळे वगैरे कवींची रचना फारच अवाढव्य आहे. एकट्या दाजीबा गोळ्यांच्या बारिक अक्षरांनीं लिहिलेल्या सव्वाशें पेक्षां ज्यास्त वह्या मीं पाहिल्या आहेत. यांत अभंग साक्या, दिंड्या, पदें, श्लोक वगैरे अनेक तऱ्हेची रचना आहे. रचनेमध्यें गोडी किंवा प्रसाद फारसा नाहीं. पण ती फार अवाढव्य आहे यांत संशय नाहीं. दाजीबा गोळ्यांपेक्षां पांडोबा पेंडशांची रचना कमी आहे. पण ती सरस आहे. गोविंदा जोशी या नांवाच्या एका कवीची श्रीदत्तात्रय—स्तवनपर बरीच कविता आहे. यांत पदांचा भरणा ज्यास्त आहे. पण या गोविंदापेक्षां महानुभाव पंथांतल्या गोविंद विध्वंश किंवा गोविंद

राज विद्वांस या कवीच्या ईशस्तुतिपर कवनांचा भरणा फार ज्यास्त व सरस आहे. याचेंहि एक श्रीदत्तात्रयावर कवन आहे. त्याचें शेवटलें कडवें असें:---

श्री दत्तनाम चवघडा धडधडा झडवा । द्वय हस्तक मस्तक त्याचे चरणीं भिडवा ।। अनुराग रंग अभंग तयां करी विडवा ।। मन चंचळ, त्याशीं विवेक लोंढण ओढवा ।। चित्तवृत्ती करूनियां निर्मळ हरिपदीं जडवा ।। स्तव घोष-नाम निष्काम निजांतरि गढवा ।। मत्वरिपुदळांचें निशाण नेवुनि उडवा ।। कैवल्य दुर्ग बुरजावर झेंडा चढवा ।। श्री दत्तनाम चौघडा धडधडा झडवा ।। गोविंद किंकरा बर दे तंव मुण पाया ।। करि आनंद जयजयकार कृपेचि छाया ।।

येथपर्यंत मराठी भाषेंतल्या अनेक कवींचें आणि त्यांच्या काव्यांचें यथाशक्ति संकीर्तन केलें आणि ही कधींही न कोमेजणारी अशी वाग्वैजयंतीमाला महाराष्ट्राला अर्पण केली. आतां ज्या नियमानुसार कवींचीं काव्यें बांधिलीं जातात, त्या नियमांचें निरूपण करणाऱ्या एका ग्रंथाचा उल्लेख करून, ती करहाटक क्षेत्रांतल्या वाक्यपुष्पांची मंजरी या कवींच्या व देवी सरस्वतीच्या चरणावर वाहूं; आणि मग नारळाच्या खिरापतीचा प्रसाद सर्वांच्या तोंडीं घालून ही वाग्देवीची कथा पुरी करूं.

ज्याप्रमाणें प्रथमारंभीं संस्कृताशींहि तोलतां येतील असे कांहीं अपूर्व उत्कृष्ट ग्रंथ आपल्या नजरेस पडले, त्याप्रमाणेंच सुंदर पण त्यांहून पुष्कळ लहान असा हा 'छंदोमंजरी' नांवाचा ग्रंथ आहे. अठराव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत व त्यानंतरहि अनेक विद्वानांनीं छंद शास्त्रावर मराठी भाषेंत ग्रंथ लिहिले आहेत. जुन्या कवींपैकीं निरंजन माधव, रंगनाथ ( कावेरीकर ) मुकुंद, विठ्ठल वगैरेंचे असले ग्रंथ हल्लीं आपणास उपलब्धहि आहेत. पण त्या सर्वांत--नव्हे आज मित्तीपर्यंत रचिलेल्या छंदशास्त्रावरील सर्व मराठी ग्रंथांत--या छंदोमंजरी इतका सुंदर ग्रंथ एकहि नाहीं. या 'छंदोमंजरी' त गणवृत्तें दिलीं आहेत. मात्रावृत्तें यांत दिलीं नाहींत. एक अक्षरीवृत्त जें 'उक्ता' त्यापासून 'उत्कृति' या

सव्वीस अक्षरी वृत्तापर्यंत सुमारें ९२ वृत्तांचें निरूपण यांत आलें आहे. मध्या, पंक्ति वगैरे लहान लहान ३, ५ अक्षरी वृत्तांचीं उदाहरणेंहि सरस आहेत.

हासुनि । पाहुनी ॥
कां उगी ? । हे मृगी ॥ १ ॥

हें ' मध्ये ' चें आणि

शेवति खालीं । तो वनमाली ॥
सांगुन युक्ति । बैसवि पंक्ति ॥

हें पंक्तिचें, हीं दोन्हीं उदाहरणें चटकदार आहेत. हें पांच अक्षरांचें वृत्त झाल्यावर पुढील वृत्तांचें विवेचन करितांना कवीनें असा चमत्कार केला आहे कीं तो पाहून तोंडांत बोटच घालावें ! प्रत्येक वृत्ताचें लक्षण देणें तें त्या वृत्ताचे गण त्याच वृत्तांतील चरणांत रचून द्यावे किंवा उदाहरणांत त्या वृत्ताचें नांव सार्थ योजावें. या गोष्टी या पूर्वींच्या अनेक कवींनीं साधिल्या आहेत. संस्कृत ग्रंथकारांनींहि हें केलें आहे. तेव्हां यांत विशेष कडी नाहीं. पण या छंदोमंजरींत आणखी एक असा चमत्कार केला आहे कीं, वृत्ताच्या श्लोकांत पहिल्या चरणांत त्या वृत्तांच्या गणांचीं संज्ञात्मक अक्षरें, प्रत्येक गणाच्या प्रारंभीं योजिलीं आहेत; आणि असें करितांना श्लोकाच्या अर्थाला बिलकुल बाध येऊं दिला नाहीं. उदाहरणार्थ 'मालिनी' आणि 'पृथ्वी' हीं वृत्तें पहाः-न, न, म, य, य, हे मालिनी वृत्ताचे गण आहेत. याचीं या छंदोमंजरींत सात उदाहरणें दिलीं आहेत. यांतील एक उदाहरण असें-

निजति न घरिं मार्गीं बायकां पायरीच्या ।
जवळ बसुनि माला गुंफिती मंजरीच्या ॥
शतदलकुसुमांच्या त्याहि नानापरीच्या ।
बहुत कुशल ऐशा मालिनी पंढरीच्या ॥

यांत प्रथम चरणाचे गण पाडिले असतां प्रत्येक गणाचें प्रथम अक्षर हें त्या गणाचें संज्ञाक्षर आहे आणि अशीं हीं अक्षरें या मालिनी वृत्ताच्या गणांचीं संज्ञाक्षरें आहेत; व शेवटल्या चरणांत 'मालिनी' हा

शब्द अर्थहानि होऊं न देतां, कथानुरोधानें सार्थ योजिला आहे. सर्व सातहि उदाहरणांत हे प्रकार असेच आहेत. तसेंच ज, स, ज, स, य, हे पृथ्वीवृत्ताचे गण आणि--

जनांस समजे जरी वसतिला यशोदे घरीं।
खराच हरि हा अला असुरमर्दनाला परी॥
व्रजांत नरनारिला बहुत हर्ष झाला असे।
धनें बहुत गोधनें करुन युक्त पृथ्वी दिसे॥

हें या पृथ्वी वृत्ताचें उदाहरण. यांतहि वरप्रमाणेंच चमत्कार नजरेस पडतील. याप्रमाणेंच 'वातोर्मी' वृत्ताचें म, भ, त हे गण—

मोठी शोभा दिसते चांदण्याची। स्वारी ये ना अजुनी कां घन्याची॥

असे चरण योजून सांगितले आहेत. कांहीं वृत्तें तेच ते गण आल्यामुळें अशा रचनेस किती अवघड आहेत, हें थोडासा यत्न करून पाहिला असतां नीट कळेल. 'स्रग्विणी' व 'मदिरा' या दोन्ही वृत्तांचे गण अनुक्रमें र, र, र, र, आणि भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग असे आहेत. हें आपणास माहीत आहे. म्हणजे पहिल्यांत चार वेळां आणि दुसऱ्यांत तर सात वेळां एकच गण आला आहे. यांतहि तोच क्रम योजून कवीनें आपल्या रचनेचें चातुर्य प्रकट केलें आहे.

राधिका रात्रि दारीं उभी राहिली।
श्रीधरानें शरत्कालीं पाहिली॥

असें स्रग्विणीचें आणि

भिक्षुक भाविक भास्कर भक्तहि भामिनि भून उभें न पुढें।

असें मदिरेचें उदाहरण दिलें आहे. या वहारीच्या चमत्कारावरून कवीचें भाषाप्रभुत्व सहज लक्षांत येतें; व कवीलाहि आपल्या या कृतीबद्दल मोठा अभिमान वाटत होता असें दिसतें. "संस्कृतांत असली चित्ररचना करण्याच्या अनेक सोयी असतांहि जें कोणा संस्कृत ग्रंथकारास साधितां आलें नाहीं तें मी या ग्रंथांत मराठी भाषेमध्यें साधून दाखवितों.

इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें प्रत्येक वृत्ताचीं अशीं दोन दोन उदाहरणें मी करून दाखवितों,' असें मोठया डौलानें सांगून या छंदोमंजरीकारानें संस्कृत ग्रंथकारांवरहि कडी ठेवून दिली आहे.

छंदःशास्त्रावरील आद्य ग्रंथकार जो पिंगलमुनी त्याच्याच सूत्रांस अनुसरून हा ग्रंथ लिहिला आहे. पण पिंगलानें जीं वृत्तें आपले ग्रंथांत सांगितलीं नाहींत व जीं कर्णमधुर असून इतर ग्रंथकारांनीं सांगितलीं आहेत तींहि 'शशिवदना', 'मनोरमा' वगैरे अनेक वृत्तें—

पिंगलें कथिलें नाहीं अन्य ग्रंथांत आसती ।
ते श्लोक देशभाषेनें लिहितों गोड भासती ॥

असें सांगून या कवीनें पुढें दिलीं आहेत. तसेंच पिंगलानें दिलेल्या नांवाशिवाय त्या वृत्तास इतर प्रसिद्ध ग्रंथकारांनीं दिलेलीं नावें आढळ-ल्यास तींहि देऊन तत्दर्शक श्लोक वरप्रमाणेंच घातले आहेत. वसंत-तिलका हें पिंगलानें दिलेलें नांव प्रथम सांगितल्यानंतर—

सिंहोन्नता म्हणुनि भासलि काश्यपाला ॥
आणि उद्धर्षिणी दिसली त्या मुनिसैतवाला ॥

असे श्लोक घाढून काश्यप, सैतव इत्यादि ग्रंथकारांनीं दिलेलीं त्याच वृत्तांचीं नावेंहि दिलीं आहेत. असें करितांना मात्र कांहीं ठिकाणीं कवीस हात टेंकण्याची पाळी आली आहे. 'शशिकला' या वृत्तास 'चंद्रावती' व 'अपवाहक' अशीं दुसरीं दोन नांवें आहेत. 'शशिकलेचे न, न, न, न, स असे गण आहेत म्हणजे शेवटलें अक्षर मात्र गुरु. बाकीं सर्व अक्षरें लघु असून शेवटचें अक्षर गुरु असल्यामुळें, हा शब्द चरणांत शेवटीं आणून त्याची वाट लावितां आली. पण 'चंद्रावती' आणि 'अपवाहक' या दोहोंतहि मधलेंच अक्षर गुरु असल्यामुळें नित्याप्रमाणें चमत्कारानें गण साधणें अशक्य होऊन—

'अपवाहक' कीं 'चंद्रावती' हें नाम तद्‍गणीं न घडे ।
यास्तव या नामांचे श्लोक करूनी न दाविले उघडे ॥

असें सांगणें निरुपायानें कवीला भाग पडलें.[1]

हा छंदोमंजरी ग्रंथ हल्लीं छापिलेला आहे. पण तो रामजोशांच्या नांवावर छापिला आहे. रामजोशांनीं छंदोमंजरी नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे अशी माहिती त्यांच्या लावण्यांच्या पुस्तकांत प्रकाशकानें प्रथम दिली; व तेव्हांपासून आतांपर्यंत जोशीबुवांच्या सर्व चरित्रकारांनीं ती पुन्हां पुन्हां उतरून दिली. पण रामजोशांचे वंशज हा ग्रंथ आपण पाहिल्याचें किंवा तो लिहिला असलेला ऐकल्याचें सांगत नाहीं. आणि यदाकदाचित् असा 'छंदोमंजरी' नांवाचा एकादा ग्रंथ जोशीबुवांनीं लिहिला असला तरी तो हा वर उल्लेखिलेल्या व वे. शा. संपन्न रड्डी-शास्त्र्यांनीं प्रकाशित केलेल्या छंदोमंजरी ग्रंथापेक्षां निराळा असेल. हा हल्लीं प्रसिद्ध असलेला ग्रंथ रामचंद्र दैवज्ञ यानें रचिलेला आहे. ग्रंथारंभीच '**रामज्योतिषि** करुनि रसज्ञ लोका' असें यानें आपलें नांव दिलें आहे; व ग्रंथाच्या अखेरीस—

> **रामचंद्र** गणके हरिलीला । वर्णुनी करि विसत्व कलीला ॥
> मंद जे तदुपयोगि सुवृत्तें । पूर्ण मंगल मही (१८०) मतिवृत्तें ॥

असा श्लोक घालून पुन्हां आपलें नांव व या ग्रंथांतील पद्यांची संख्या कवीनें देऊन ठेवली आहे. हा रामचंद्र कऱ्हाड प्रातांत उंबरजच्या दक्षिणेस बेलवंडें या नांवाचें ल्हानसें खेडें आहे, तेथला राहणारा. हा उत्तम ज्योतिषी असून प्रतापसिंह महाराजांच्या पदरीं होता. यानें हा ग्रंथ अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहून पुरा केला.

संतुबाई, रामराय, माधवेंद्र, हरिराज शेंडे, शंकरदास ही मंडळी या रामचंद्र ज्योतिषाचीच समकालीन होय. हरिराज शेंडे हा गोदा-

---

१. या ग्रंथांत यतिविच्छेदाचें एक चांगलें उदाहरण दिलें आहे तें असें:—

> तुझ्या पदाब्जीं मनभृंग नारा- ।
> **यणा** असों दे यदुनाथ धारा- ॥
> धरा समव्हिण्मधुसुदना वा- ।
> **मना** दयासिंधु सदैव देवा ॥

कांठचा राहणारा दिसतो. यानें मुद्गलभटाच्या रामायणाचीं दोन भाषांतरें केलेलीं आहेत. असें दिसतें कीं, एक यानें आपल्या लहानपणांत केलें असावें, पण पुढें मोठेंपणीं तें मनास न आल्यामुळें यानें त्याच ग्रंथाचें पुन्हां दुसरें भाषांतर केलें. यानें आपले ग्रंथाचें शेवटीं आपली कांहीं माहिती दिली आहे. त्यावरून त्याच्या बापाचें नांव माणकेश्वर असून याची आई याच्या लहानपणींच निवर्तली होती, असें होतें. हा आपणास हरिराज कवीश्वर असें म्हणवितो. याचा समकालीन कवि शंकरदास याची रचना हरिराजापेक्षां ज्यास्त आहे. पण तो अशी जाडी पदवी आपणांस कोठें लावून घेत नाहीं. त्यानें आपल्याकडे लघुत्व घेऊन नेहमीं लिहिलें आहे. याचें मूळ नांव काशिनाथ असें होतें. यानें शिवरात्रिकथा, गणेशचरित्र, निरंजनचरित्र वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. याला रूपक करून लिहिण्याची हौस दिसते. गणेशचरित्र, निरंजनचरित्र या नांवांवरून हे ग्रंथ चरित्रात्मक असावे असा कोणाचाहि तर्क होईल. पण हे ग्रंथ असे नसून अध्यात्मपर आहेत; काशिराजाच्या वेळीं एक वेंकामुंगी नांवाचा लेखक होता. यानें एक 'सत्याधिराज प्रशस्ति' या नांवाचा श्लोकबद्ध लहानसा ग्रंथ केला आहे. याच्या ग्रंथाच्या नांवांतल्या 'सत्याधिराज' या शब्दावरून हा एकादा रूपात्मक ग्रंथ असावा असें मनांत येण्यासारखें आहे. पण ग्रंथ पाहतां आढळून येईल कीं यांत रूपक मुळींच नाहीं. ही खरोखरीच सत्याधिराजाची प्रशस्ति किंवा वर्णन आहे. या वर्णनाच्या उत्तरार्धांत कवीनें त्या वेळच्या बहुतेक पक्वान्नांची व खाण्याच्या पदार्थांचीं नांवें सांगितलीं आहेत. मराठी ग्रंथांत हीं नांवें इतक्या ग्रंथांत आलीं आहेत कीं ज्ञानेश्वरापासून या देशांत खाद्य पदार्थ काय काय होत गेले याचा इतिहास कोणाहि चौकस मनुष्यास यांवरून रचितां येईल. शेवटल्या बाजीरावाच्या अमलाचा काळ म्हणजे यथेच्छ भोजनाचा काळ होता असा पुष्कळांचा समज आहे. तेव्हां या काळच्या कवींनींहि भोजनांतील पदार्थांचीं नांवें व वर्णनें आपल्या ग्रंथांतून द्यावीं हें ओघानेंच येतें. या वर्गांतलाच गोपिनाथ या नांवाचा एक कवि होता.

याचा उल्लेख मागें शाहिरांच्या प्रकरणांत आलाच आहे. याची लावण्या आणि कटाव यांखेरीज इतरहि रचना आहे. यांतच ' नारळी प्रसाद ' नांवाचें एक कवन आहे. गोपिनाथाच्या या नारळी प्रसादाचा थोडासा मासला आतां सरते शेवटीं देऊन हें कीर्तन पुरें करितों.

मुगदळ दळिया बुंदिलाडुतें शिरापुरी मिळवा ।।
केळी नारळ दाळिंब अंजिर फणस गऱ्यांचा खवा ।।
द्राक्ष जांब जांबूळ आंबा रसाळ चोखावा ।।
बदाम पिस्ते आणि विलायचीचा मेवा ।।
खारिक खजूर खवा दह्याशीं बर्फी पेढा खावा ।।
चतुर्विध पक्कान्नें पदार्थ सावकाश भक्षावा ।।
गोपिनाथ शिवदिन कृपेनें प्रसाद कांहीं ठेवा ।
शुकसनकादिक भक्ति पंक्ति घ्या ध्रुव नारद उद्धवा ।।



# उपसंहार



प्रथम सुचविल्याप्रमाणें वाचकांबरोबर हळूहळू चालत येथपर्यंतची मजल मारून हा मुक्काम जेमतेम गांठला. अनेक उपाधींमुळें, मनाच्या अस्वस्थतेमुळें व शरिराच्या त्रासामुळें चित्त स्थिर नसतां आणि वयोमानानें प्रारंभीं योजिल्याप्रमाणें, ही सेवाचाकरी माझेकडून घडावी तशी घडली नाहीं; तरीपण वाटेंत थांबावें लागलें नाहीं, हेंच मोठें भाग्य होय. ही नदीकांठची वाट पूर्वीं फारशी चोखाळली नसल्यामुळें नीटशी मळलेली नव्हती. कोठें कोठें रस्ता नीट होता. पण कोठें कोठें तर पुरती पायवाट देखील नव्हती. यामुळें रस्त्याचा सुगावा काढतांना आणि त्या त्या ठिकाणच्या माहितगारांना वाट पुसतांना थोडासा त्रास झाला. ही असली वाट चालत असतां, सरदार तात्यासाहेब मेहेंदळ्यांनीं[1] हात दिला; रा. पोतदार[2], रा. राऊत[3] वगैरे स्नेह्यांनींहि वारंवार उत्तेजन दिलें; आर्यभूषणच्या मालकांनीं विश्रांतीस नाहीं म्हटलें नाहीं; आणि भारत—इतिहास—संशोधक—मंडळानें वारंवार पाथेय दिलें; यामुळेंच इतकी तरी वाट मला चालतां आली. वाटेंत थोडीफार दिशाभूल झालीशी वाटली. तेव्हां आपल्या सारख्या इतर पांथस्तांना वाट विचारिली, तीहि त्यांनीं दोन पावलें बरोबर येऊन कृपाळूपणानें नीट दाखविली. नाहींतर या हिमगिरीतनयेकांठचीं इतकीं देवालयें आणि पुण्यस्थानें अशीं नुसतीं कशाचीं सांपडणार?

नानाविध पक्ष्यांच्या मंजुळ स्वरांनीं, आणि शुकसारिकादिकांच्या गोड आलापांनीं गजबजलेल्या पर्वतांतील उंच अशा एका पहाडावर उगम पावणाऱ्या, आणि मयूरादि सुंदर पक्ष्यांच्या थव्यांशीं हांसत खेळत वहात जाणाऱ्या या नवरसमंदाकिनीच्या कांठाकांठांनीं तिच्या सौन्दर्यसौभाग्याची

---

१. खंडेराव चिंतामण मेहेंदळे. २. दत्तो वामन पोतदार. ३. वसंतराव सखाराम राऊत.

शोभा पाहण्याकरितां आपण प्रथम निघालों, तेव्हां सुप्रभातींच श्रीवैद्य-नाथाचें दर्शन घडलें; आणि भास्कराचार्यांच्या वंशसूर्याचे किरण चांगले दिसूं लागले. यापुढें प्रथमच एका खोल गुहेंत एक लहानसें देऊळ दिसलें. तेथें आंत कोण काळोख होता! पण रा. दिवेकरांनीं[1] जरा दिवा पुढें करून थोडासा उजेड दाखविला. यामुळे मुकुंदाचें दर्शन नीट झालें. येथून या वीणाधारिणीच्या कांठीं विश्वात्मकाच्या मंदिरांत क्षणभर थांबून ज्ञानेश्वराचें गोड पुराण ऐकिलें. येथेंच जवळच विठ्ठलाच्या देवळांत बसून देवाला जेऊं घालितांना आपण नामदेवाला पाहिला; आणि मग त्या काल्यांतल्या प्रसादासाठीं जमलेल्या साधूंच्या थव्यांतून वाट काढून या तरंगिणीच्या स्फटिकाप्रमाणें स्वच्छ व अमृताप्रमाणें मधूर अशा पाण्याच्या मंद मंद वाहणाऱ्या ओघाजवळ आलों. येथून या कडेपठारावरून ही आनंददायिनी सरिता खालीं उतरतांना किती आयास पावते व किती प्रयासानें ती वाट काढते हें क्षणभर दुरूनच पाहिलें. त्या ठिकाणचा भेसूर आणि भयानक देखावा पाहून डोळे कंटाळून गेले; आणि तेथें येऊन हिला मिळणाऱ्या दुसऱ्या नदीच्या पाण्याच्या कर्कश खळखळाटामुळें कानठळ्याहि बसून जातात कीं काय असें वाटलें. पण थोडी आणखी वाट चालल्यावर दूर माणसाची चाहूल लागली; आणि जरा पुढें गेल्यावर नाथांच्या मंदिराचा घुमट दिसूं लागला. नदीच्या घाटावर एकनाथ स्नानसंध्या करीत बसलेले होते; व जरा पलिकडेच मंदिराच्या मागच्या अंगाला एका लहानशा पुष्पवाटिकेंत नाथांचा नातू, काव्यगंगेचा आवडता लेक कौतुकानें क्रीडा करीत होता. त्याच्या क्रीडा पाहून तुमचें संसारप्रेम जागृत झालें; व कामडोहांत एकवार स्नान करण्याची तुम्हांस इच्छा झाली. पण जवळच तुकोबांच्या टाळमृदंगांचा गोड ध्वनि ऐकूं येत होता. म्हणून जरासे तिकडे वळलो. तेथें संतोबा भेटले. त्यांनीं बुवांचें कीर्तन ऐकविलें व कपाळीं बुकाहि लाविला. तेथें तर देवळांची केवढी दाटी होती! नदीकांठ सर्वभर देवळांनीं भरून गेला होता; आणि

---

१. सदाशिव महादेव दिवेकर.

पळसांच्या फुलांचा सडा पडावा त्याप्रमाणें तांबड्या पताकांनीं सगळें वाळवंट फुलून गेलें होतें. आनंदाच्या भरांत हातांत काव्यग्रंथांचे टाळ घेऊन आपणहि रंगशिळांवर नाचूं लागलों; व पाय दमल्यावर थोड्या विसाव्यासाठीं पलिकडच्या अंगाला रामदासांच्या मठाकडे गेलों. हा मठ किती चित्रविचित्र प्रकारांनीं शृंगारिला होता! प्रथम याची वाटहि नीट सांपडेना. पण मठद्वारांत प्रत्यक्ष देवच भेटले. त्यांनीं दार उघडून आंत जाऊं दिलें. येथें तुम्हांला समर्थांच्या दर्शनाचें पुण्य जोडून द्यावें म्हणून मीं फार यत्न केला. पण माझ्या आणि तुमच्या दुर्दैवानें तो योग जमला नाहीं. देवांचें बोलणें, बसणें किती मिठ्ठें! यारून ते कृपा करतील असें वाटलें. म्हणून त्यांच्या पुष्कळ विनवण्या आणि गयावया-केल्या. ते जरा हासले देखील; पण वळले नाहींत. अखेर दुरूनच नमस्कार करून पुन्हां नदीकांठचा रस्ता सुधारला. येथें कांहीं स्त्रिया कल्पलतांच्या मंडपाखालीं नदीकांठच्या शिलांवर बसून वाक्पुष्पांचे हार विणीत बसल्या होत्या त्याहि पाहिल्या व मग निघून पुढें गेलों. येथून ही नदी दक्षिणवाहिनी होते; आणि हिच्या प्रवाहाला फांटेहि पुष्कळ फुटतात. या सर्व फांट्यांच्या कांठीं एका मागें एक देवळांच्या रांगाच रांगा लागलेल्या दिसत होत्या. हीं सर्व नुसतीं बाहेरूनच पहायाचीं म्हटलें तरीहि तुम्हांस वेळ पुरला नसता व तुम्ही अगदीं कंटाळून गेलां असतां; म्हणून कांहींचीं गोपुरें पाहिलीं व कांहींच्या तर कळसांनाच दुरून नमस्कार केले. त्यांत दर्शनाचें सव पुण्य आलेंच. येथेंच जवळ एका बटूचें बैठें देऊळ होतें. पण तें कसें दिव्य आणि रेखीव दिसत होतें! तेथें तुम्ही पळभर विसावा घेतलांत आणि मग एका विस्तीर्ण व भव्य अशा मटांत गेलांत. सर्व मठभर हरिनामाचा जयघोष आणि कीर्तनें चालू होतीं, आणि मृदंग सारखे झडत होते. मठाच्या मागच्या आंगानें बाहेर पडलों तरिहि तोच देखावा सर्वभर दिसत होता. सगळीकडे बुका सांडलेला आणि तुळशीमाळा पडलेल्या होत्या. नुसतें पाऊल टाकणें तरी तें जपून टाकावें लागे. येथें संतांची इतकी दाटी होती कीं त्यांना

नुसते नमस्कार करतांनाहि तुमचे हात दमले असतील. तरी देखील त्या गर्दींत किती राहिलेच. याच गर्दींत मध्येंच रंगनाथाचे वंशज अनंतराव निगडीकर आणि श्रीधराचे वंशज अपाजी नाझरेकर हेहि भेटले यांनींहि बुकाप्रसादाचें तबक सर्वांपुढें केलें. त्यांतला बुका कपाळीं लावून आपण पुढली वाट चालूं लागलों. या गर्दींतून जरा बाहेर पडलों तों वाटेंत महीपतिबुवांचा मठ लागला. मठ बांधतां बांधतां एक कोंपरा तसाच अर्धवट बांधावयाचा राहून गेला होता हें खरें. पण त्यांत किती तरी तसबिरा टांगल्या होत्या. त्यांचे वंशज केशवबुवा बाहेर हात जोडून उभेच होते. त्यांनीं मोठ्या भक्तीनें सर्वांच्या गळ्यांत तुळशीमाळा घातल्या आणि महीपतिबुवांचें कीर्तन ऐकविलें. पुन्हां एकदां भक्तिरसाचें यथेच्छ पान करून तुम्ही आकंठ तृप्त झाला; आणि मग पुढल्या मार्गाला निघालों. पुन्हां कांहीं थोडी वाट चालूं लागलों. इतकी मजल चालतां चालतां सर्वजण श्रमलेत असें दिसलें. तेव्हां कोठें-तरी स्वस्थ बसून तुम्हांस पुराण ऐकवावें या विचारानें सचिंत होतों. इतक्यांत दूर एका डोहावर पेशव्यांच्या व्याह्यांचा आठ बुरजी वाडा दिसला. त्या अंगाला वळावें असें मनांत आलें तों तेथें पंतांचे निपणतूच रामकृष्णपंत भेटले. तेहि भिक्षुकच, पण रिकामे गुरगुरणारे नव्हते. मनाचे मोठे प्रेमळ ! त्यांनीं मोठ्या आग्रहानें सर्वांस वाड्यांत नेलें आणि व्यासपीठाजवळ बसवून पंतांच्या गोड पुराणाचीं दोन वाक्यें क्षणभर प्रेमानें ऐकविलीं. पंतांचा रामपंचायतनाचा चित्रविचित्र पुष्पांनीं नटविलेला देव्हाराहि आंत नेऊन दाखविला. तो पाहतां पाहतां तर पुढें जाण्याचें-हि तुम्हांस भान राहिलें नाहीं. म्हणून थोड्या अदत्रीनेंच पण आग्रहानें तुम्हास तेथून काढून पुन्हां वाट चालूं लागलों. यानंतर या ज्ञानतरंगिणीच्या घाटावरलींच आणखी देवळें पाहत पाहत बाजूबाजूनें चाललों होतो. तों वाटेंत आपणास सरदार मुजुमदारांनीं निंबरजाच्या मठांत नेलें. तेथें क्षणभर थांबून पुढें गेलों. तों जोतिपंत दादांची पेठ लागली. यांत तर सगळीकडे विठ्ठलमंदिरेंच होतीं. कांहीं पुरीं झालीं होतीं व कांहींचे

काम अजूनहि चालूं होतें.

इतका वेळ सर्वभर एकच देखावा दिसत होता व या नदीच्या एकाच तीरावरील शोभा आपण पाहत चाललों होतों. तों दुरून पलीकडच्या तीरावर कांहीं गलबल चालूं असल्याचें ऐकूं आलें. म्हणून रा. पंटवर्धन यांनीं उतार दाखविला. त्या वाटेनें हळूहळू नदी ओलांडून त्या तीरावर गेलों. तों तेथें निराळीच शोभा दिसूं लागली. इतका वेळ पाहिलेलीं सर्व देवळें भक्तीच्या मातीचींच बांधिलेलीं होतीं. कोणीं कोणीं त्यांच्या भिंतींना शृंगाराच्या रंगानें शृंगारलें होतें; आणि आंत उजेडासाठीं भावार्थाचे नंदादीप लाविले होते. पण कोठेंहि ढासळलें किंवा नुसतें खरवडलें तरी भक्तीची माती भुळभुळ पडूं लागे. पण या तीरावर पाहिलें तों सगळेंच निराळें. येथें मठ आणि देवळें कसचीं! येथें वासनांच्या वृक्षाखालीं कामलतांचे मंडपच दिले होते. आणि त्यांत मदनाच्या मशाली पाजळून मंडळीचा तोबा उडून राहिला होता. मध्येंच चार मंडळी डफ हातीं घेऊन तोंडानें आलाप घेत डुलत राहिली होती. त्यांच्या पागोट्यांचे पदर गळ्यांत आले होते; त्यांचे डोळे तरर झाले होते; व अंगावरील शेल्याचें त्याना भानहि राहिलें नव्हतें. हाहि देखावा हळूच त्या मांडवाच्या मागें उभें करून मीं तुम्हास दाखविला. त्यांच्या कडयांत जाऊन बसण्याचें तुमच्यापैकीं पुष्कळांच्या मनांत होतें. कोणी कोणी तर जरा पुढेंहि सरकलेत; कोणी कोणी शिष्टाईच्या पडद्याबाहेरच उभे होतेत. पण तुमचें सर्वांचें मन मात्र त्या गोड गलबल्यांत मिळून गेलें; आणि त्या ठिकाणच्या ऐश्वर्यमदाचा तो थाट पाहून तुमचे डोळे अगदीं दिपून गेले; व त्या लीलांनीं तुम्ही नादावला असें दिसलें. जरा तेथेंच आणखीहि कांहीं वेळ थांबावें व तेथली ती मजा आणखी आणखी पहावी असें तुमचें मन सांगत होतें. पण मला भिक्षुकाला—निदान राजरोसपणें—तेथें उभें राहणें बरें नाहीं, हें जाणून मी तुम्हांला खुणावून तेथून दूर निसटलों. बरें झालें, कीं तुम्हीहि मागोमागच आला; नाहींतर वेडावून तेथेंच रेंगाळत राहिले असता.

वास्तविक पाहतां ही अपूर्व शोभा पाहिल्यावर पुन्हां तीं जाड-जाड भिंतीचीं—मातीचीं देवळें, ते वैराग्याचे मठ आणि ते वेदांताचे चक्रव्यूह फिरून पुन्हां पाहण्याची तुम्हांस हौस राहिली नाहीं, असें तुमच्या चेहऱ्यावरून मीं स्पष्ट ताडिलें; आणि मग दगडांच्या ओबड-धोबड साकू वरून पुन्हां या मधल्या बेटावर मी तुम्हाला घेऊन आलों. येथें मध्येंच दत्तराज महंत भेटले. प्रवासाला निघतांना आपल्याला सगळ्यांनीं बजाविलें होतें कीं या महंताच्या मठाकडे जाऊं नका. ते तुम्हांला आपल्या सावलीला देखील उभे करणार नाहींत. तरी पण जरा धिटाईनें मी त्यांचेकडे वळलोंच; आणि थोडी रदबदली करून पाहिली. तो केवढा चमत्कार ! महंतांनीं आपल्या कंबरेच्या किल्ल्याच तुमचे स्वाधीन केल्या आणि मठांत हिंडून सर्वभर मजा पाहण्याचा आग्रह केला. आतां वाट चालून चालून तुम्ही थकले होतां. म्हणून महंतांचाहि मान राहावा आणि आपली थोडी मनीषा पुरवावी इतक्याच पुरतें त्या मठांत डोंकावून परत फिरलों आणि मग नदीच्या या बाजूला तुम्हांस पुन्हां परत घेऊन येऊन कांहीं थोडीशी लहान लहान निवासस्थानें दाखवून या टप्प्यावर आलों, आणि हें करारांतलें शेवटलें मकाण एकदांचें गांठलें.

ही सदातृप्तिदाइनी व अखंडवाहिनी ज्ञानगंगा अशीच पुढेंहि वाहत गेली आहे. येथून पुढें तर हिच्या तीरांचा थाट अगदींच नवल-पराईचा आहे. नव्या नव्या कारागिरांनीं नव्या नव्या थाटाच्या हवेल्या हिच्या कांठाकांठानें पुढें बांधिल्या आहेत. पण पद्यांच्या कृत्रिम विटा आतां बहुतेक संपल्या. येथून पुढें गद्यांचे डोंगर फोडून त्यांनीं बांधिलेले दगडी वाडे आतां दिसतील. टुमदार बगीचेहि लागतील. इतका वेळ मागें, पुढें, बाजूला जशा एकमापाच्या विटा दिसत होत्या तशा आतां नाहींत. कोणी चार दोन विटा जमवून एकादा ओटा बांधिला तरी तोच मोठा चमत्कार केला असें वाटून त्याला विश्वकर्म्याची आढयता वाटेल. पण हें पुढचें पंचांगश्रवण आजच कशाला ? इतका

वेळ यथाशक्ति जशी घडली तशी सेवा चाकरी केली; आणि तुमचे बरोबर अनेक मित्रांच्या मदतीनें वाट चालून एकदांची ही मजल गांठली, शेवटीं तुमचे कानावर सुंदर पुष्पमंजरी ठेवून तुम्हांस नारळाचा गोड खिरापत-प्रसाद दिला. आतां एकदां तुम्हां सर्वांस आशिर्वाद आणि धन्यवाद देतों, तोहि आपण स्वीकारावा, आणि तुम्हींहि पांच रुपयांची आचार्यदक्षिणा देऊन या खाडीकांठच्या गांवढळ भिक्षुकाची संभावना करावी, व त्याच्या ऋणांतून उतराई व्हावें.



## महाराष्ट्राची घडण

प्रस्तुत प्रकरणांत कै. भावे यांनीं केलेला महाराष्ट्र व मराठी भाषा यांचा प्रपंच फार त्रोटक असल्यानें तो भाग पुनः लिहून काढणें अवश्य वाटतें.

अति प्राचीन म्हणजे भारतपूर्व काळांत या देशाचे आर्यावर्त व दक्षिणापथ असे दोन भाग असून त्यांत अनुक्रमें आर्य व द्रविड लोक राहत आणि आर्योत्पन्न व द्राविडी भाषा बोलत, हें मत स्थूलमानानें सर्वमान्य आहे. पैकीं दक्षिणापथांतील द्रविडांचा समाज हा एकविध नसून त्यांत महार, मांग, गोंड, भिल्ल, कातकरी, कातोडी, वारली, कोळी इत्यादि विविध जाती समाविष्ट होत्या. दक्षिणापथांतील या बहुरंगी समाजावर आक्रमण करून तुलनेनें उच्च अशी आपली संस्कृति त्यावर लादण्याचा पहिला प्रयत्न उत्तरेकडून खालीं सरकणाऱ्या नाग लोकांनीं केला, व तो पाणिनिपूर्वकाळांत म्हणजे खिस्तावतारापूर्वीं सुमारें १००० वर्षांमागें झाला असें कै. राजवाडे प्रभृति विद्वानांचें मत आहे[1].

हे नाग लोक मुख्यत: पश्चिम समुद्रपट्टीवर स्थायिक झाले व तेथें त्यांनीं आपल्या स्वतंत्र वसाहती केल्या असें कांहीं प्राचीन उल्लेखांवरून व वर्तमान अवशेषांवरून वाटतें. पाताल, रसातल, महीतल इत्यादि प्रदेशांचा मिळून नागदेश बनतो, हा 'नागानंद' नाटकांतील उल्लेख या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. या नागकुलाच्या नांवाची ओळख अजूनहि कांहीं व्यक्तिनामें व ग्रामनामें यांतून मिळूं शकते. हा नागवंश आर्य नसून द्रविडांचाच एक दूरतः संबद्ध असा वंश असावा असें वाटतें. कारण नागांची संस्कृति द्रविडांहून थोडी निराळी असली तरी त्यांची भाषा द्राविडी भाषांच्या वंशांतीलच असणार. एरव्हीं नागांची सांस्कृतिक छाया जशी दक्षिणापथावर पडली तशी त्यांच्या भाषेचीही छाया आर्येतर भाषांवर पडून त्या भाषिक देवघेवींतून एकादी नवभाषा निर्माण होण्यास प्रत्यवाय नव्हता. परंतु तसें झालेलें दिसत नाहीं. परस्य नागलोकांच्या साहचर्यानें महाराष्ट्री भाषेचें अपभ्रंशांत रूपांतर झालें, हें कै. राजवाडे[2] यांनीं मांडलेलें मत त्यास कोणताहि आधार नसल्यानें विचारार्ह नाहीं. असो. दक्षिणापथांतील दुसरी परकीय वसाहत पाणिनीच्या उत्तरकालांत म्हणजे इ. स. पूर्वीं आठव्या शतकानंतर झाली व ती

---

१. महाराष्ट्राचा वसाहतकाल–(ऐतिहासिक विविध विषय, खंड १.)

२. राधामाधवविलासचंपू, प्रस्तावना, भाग ३.

उत्तरेकडील आर्यांनीं विंध्य पर्वत ओलांडून येऊन केली. यासंबंधीं डॉ. केतकर यांचें मत निराळें असून महाराष्ट्रांतील म्हणजे दक्षिणापथांतील आर्यांचा वसाहतकाल पुराणांच्या आधारें फार मागें म्हणजे वेदकालांत नेण्याचा त्यांचा प्रयत्न आहे[१]. परंतु या मतास ऐतिहासिक प्रामाण्य नसल्यानें तूर्त तें बाजूस ठेवणें भाग आहे. शिवाय खिस्तपूर्व ८००-च्या पाणिनीय सूत्रांत दक्षिणापथाचा उल्लेख मुळींच येत नाहीं व त्यानंतर तीनशें वर्षांनीं कात्यायनानें रचिलेल्या वार्तिकांत अशा प्रकारचे उल्लेख पाणिनीय सूत्रांस पूरक म्हणून येतात; याचा सरळ अर्थ असा कीं, आर्यांची दक्षिणेकडील वसाहत पाणिनीनंतर व कात्यायनापूर्वीं म्हणजे इ. स. पूर्वीं ७००-च्या सुमारास झाली असली पाहिजे. हा काल म्हणजे बुद्धयुगाचा आरंभ होय, व त्या काळीं झालेल्या धार्मिक क्रान्तीमुळें उत्तरस्थ आर्य चहूंकडे पांगणें अगदीं संभवनीय आहे. त्यांची दक्षिणेंतील वसाहत हीहि एका अर्थानें पांगापांगच होती व म्हणून ती एका ठिकाणीं न होतां पांचसहा ठिकाणीं विभागून झाली. गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, पांडुराष्ट्र, अपरान्त, विदर्भ व अश्मक हीं एकुण सहा राष्ट्रें आर्यांनीं दक्षिणेंत वसविलीं व त्या सर्वांचें मिळून पुढें महाराष्ट्र बनलें.

दक्षिणापथ या नांवानें सूचित होणाऱ्या प्रदेशाचे व त्यांतील कांहीं भागांचे उल्लेख पुरातन काळापासून मिळतात. कौटिल्याचें अर्थशास्त्र, कात्यायनाचें व्याकरण, बौधायनस्मृति, सुत्तनिपात व महावंश यांसारखे बौद्ध ग्रंथ, नाणेघाट व जुन्नर येथील प्राचीन शिलालेख, पेरिप्लससारखे ग्रिक भूगोलज्ञ, फाइहान सारखे चिनी प्रवासी, इत्यादि अनेक साधनांतून विखुरलेल्या या उल्लेखांचें संकलन म. म. काणे[२] व डॉ. केतकर[३] यांनीं केलें असून जिज्ञासूंनीं तें मुद्दाम पहावें. महाराष्ट्र या शब्दाचा 'महारट्ट' अशा रूपांत देशवाचक असा प्राचीनतम उल्लेख 'महावंश' नांवाच्या ग्रंथांत मिळतो. इ. स. ५००-च्या सुमारास लिहिलेल्या या ग्रंथांत मोगलिपुत्त तिष्य यानें कांहीं 'थेर' म्हणजे श्रेष्ठ असें धर्मोपदेशक निरनिराळ्या देशांना पाठविल्याचें म्हटलें आहे. त्यांत 'थेरो महाधम्मरक्खिता' यास 'महारट्टा'स पाठविल्याचा उल्लेख[४] आहे. वराहमिहिरानें आपल्या बृहत्संहितेंत महाराष्ट्री-

१. प्राचीन महाराष्ट्र (प्रस्तावना).

२. Ancient Civilization and Geography of Maharashtra (JBBRAS, No. 21)

३. प्राचीन महाराष्ट्र, प्र. ३

४. महावंसो- (सम्पा० टर्नर), पृ. ७१; (सम्पा० गायगर) पृ. ८२ ते ८५.

यांविषयीं 'भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः' असें म्हटलें आहे[1]. ऐहोली-शिलालेखांत सत्याश्रय पुलकेशी (चालुक्य) हा तीनहि महाराष्ट्रांचा सार्वभौम राजा झाल्याचा उल्लेख आढळतो[2]. प्रसिद्ध चिनी प्रवासी हुएनत्संग (इ. स. ६२९ ते ६४५) महाराष्ट्रास 'मोहोलोश' असें संबोधून त्याविषयीं विस्तारानें लिहितो.[3] वात्स्यायन, वररुचि व दंडी यांनीं केलेले महाराष्ट्राचे उल्लेख प्रसिद्धच आहेत. तात्पर्य, महाराष्ट्र हें देशनाम म्हणून इ. स. पूर्वी अनेक शतकें प्रचारांत होतें यांत कांहीं शंका नाहीं.

## 'महाराष्ट्र'चें नामकरण

महाराष्ट्र या नांवाच्या व्युत्पत्तीविषयीं विद्वानांत जीं अनेक मतें आहेत त्यांपैकीं तीन विशेष महत्त्वाचीं असल्यानें त्यांची चर्चा करणें अवश्य आहे. पैकीं महार या अस्पृश्य जातीवरून 'महाराष्ट्र' हें नांव पडलें असावें असा तर्क प्रथम मोल्स्वर्थनें आपल्या शब्दकोशांत केला व त्यास पुढें 'गांव तेथें महारवाडा' या म्हणीचा आधार देऊन डॉ. जॉन विल्सनने यांनीं पुष्टि दिली. गुर्जरांचें राष्ट्र तें गुर्जरराष्ट्र, शूरांचें राष्ट्र तें सौर-राष्ट्र, तद्वतच महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र असा तौलनिक विचारहि डॉ. विल्सननें पुढें मांडला. ही उपपत्ति महाराष्ट्रांतील सर्वसाधारण सुशिक्षितांस तर मानवली नाहींच, पण डॉ. भांडारकर, म. म. काणे यांसारख्या पंडितांनींहि तिला विरोध केला. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, अगदीं अलिकडे डॉ. केतकर यांनीं या उपपत्तींतील मुख्य कल्पना उचलून धरिली असून महार व महाराष्ट्र ह्यांतील अन्योन्य संबंधास पुनः एकवार पाठिंबा दिला आहे[4]. महार आणि रठ्ठ या दोन जातिनामांचा संयोग होऊन 'महारठ्ठ' असें रूप तयार झालें व 'महाराष्ट्र' हें त्याच रूपाचें संस्कृतीकरण होय, असें डॉ. केतकर यांचें अंतिम मत असून अप्रियता पत्करूनहि त्यांनीं तें स्पष्टपणें मांडलें आहे. डॉ. भांडारकरांच्या मतें महाराष्ट्राचें नामकरण राष्ट्रिक किंवा रट्ट नांवाच्या लोकांवरून झालें असून या मतास थोडेंफार ऐतिहासिक

१. बृहत्संहिता-(सम्पा० कर्न) १०, ८.

२. ऐहोली इन्स्क्रिपशन्, क्र. ६३४.

३. Bombay Gazetteer, I, Part 2, p. 184.
Beal : Buddhist Records of the Western World, Vol. II p. 255.

४. इंडियन ॲन्टिक्वरी, क्र. ३, पृ. २२१.

५. प्राचीन महाराष्ट्र, प्र. ४.

प्रमाण मिळतें, ही गोष्ट खरी आहे. नाणेघाट, भाजें, कार्लें व कान्हेरी येथील शिलालेखांवरून 'महारठिनी' व 'महारठि' अशीं अनुक्रमें स्त्रीपुरुषवाचक विशेषणें आढळतात. नाणेघाट शिलालेख क्र. ६ यांत 'महारठिगणकाहिरो' असा स्पष्ट उल्लेख आहे. भाजें व बेडसें येथील लेखांतहि अनुक्रमें 'महारठिस कोसकीपुतस विण्हुदतस' व 'महाभोय बालिकाय महादेविय महारठिनिय' असे उल्लेख आढळतात.[२] वरील सर्व उल्लेख देश व लोक यांचे वाचक आहेत, यांत संशय नाहीं. प्रश्न त्यांतील 'महारठि' या शब्दाच्या अर्थाविषयीं आहे. तो शब्द जाति किंवा लोकवाचक असावा ही उपपत्ति व्यवस्थित बसते. परंतु महारठि हा महारथी या शब्दाचा अपभ्रंश असल्यास मात्र अनवस्था संभवते. त्यामुळें म. म. काणे यांना वरील मत मान्य नसून महाराष्ट्र या शब्दाचा दर्शनी अर्थ घेऊन 'महान् राष्ट्र तें महाराष्ट्र' अशी उपपत्ति त्यांनीं मांडली आहे.[३] दक्षिणापथांतील महाकांताराचें हळूहळू महा–राष्ट्र झालें व मल्लराष्ट्र, गोपराष्ट्र, पांडुराष्ट्र इत्यादि लहानलहान राष्ट्रें त्या महान् राष्ट्रांत सामावून गेलीं अशी म. म. काणे यांची विचारसरणी आहे.

महाराष्ट्रास महाराष्ट्र हें नांव कसें पडलें या प्रश्नाचें उत्तर निश्चितपणें देतां आलें नाहीं, तरी वरील विवेचनांतून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं, महाराष्ट्र हें अनेक राष्ट्रांचें मिळून बनलेलें एक राष्ट्र असून विदर्भ, अश्मक व अपरान्त हीं तीन त्यांतील प्रमुख अशीं घटकराष्ट्रें होत. स्वदेशाची ही घडण पुढें अनेक शतकें महाराष्ट्रीयांच्या मनांत जाणीवरूपानें कायम होती असें दिसतें. महानुभाव पंथांतील चक्रधरोक्त सूत्रपाठाचा १५-व्या शतकांतील एक भाष्यकार गुर्जर शिवबास 'महाराष्ट्रीं असावें' या सूत्रावर लिहितांना 'महंतराष्ट्र म्हणौनि महाराष्ट्र' अशी व्याख्या करतो. हाच भाष्यकार पुढें 'गर्डी सिर्डी असावें' या सूत्रावर भाष्य करतांना म्हणतो, "सेवट भणिजे श्रीनर जुन्नर कल्याण खांदार:तीन भाग मऱ्हाट : तो सेवट —" इ. स. ६३४-तील ऐहोळी लेखांतहि महाराष्ट्र हा तीन घटकांचा मिळून बनल्याचा उल्लेख आहे. ही घटकांची किंवा खंडांची कल्पना १७-व्या शतकांतील 'आचारपद्धति' नामक महानुभाव ग्रंथांतहि जागृत दिसते. त्यांतील उतारा असा —

१. Archæological Survey of Western India. Vol. 5, p. 59.

२. Burgess and Bhagwanlal : Caves of Western India, p. 24.

३. विविधज्ञानविस्तार, वर्ष ४९.

" देश भणिजे खंडमंडळ : जैसें फलेठाणापासौनि दक्षिणेसि : मऱ्हाठी भाष जेतुला ठाइ वर्ते तेतुलें एक मंडळ : तयासि उत्तरे बालेघाटाचा सेवट : ऐसें एक खंडमंडळ : मग उभे गंगातीर तेंहि एक खंडमंडळ : आणि तयापासौनि मेघंकरघाट ( मेहकर, जि. अकोला ) तें एक खंडमंडळ : तयापासौनि आवघें वराड तें एक खंडमंडळ : परि आवघीं मिळौनि महाराष्ट्रचि बोलिजे : किंचित् किंचित् भाषेचा पालट : भणौनि खंडमंडळें भणावीं "—( चक्रधर–सिद्धांतसूत्रें, उपो० पृ. २ )
वरील उतारा बारकाईनें पाहिल्यास महाराष्ट्राचा विस्तार, त्याच्या चतुःसीमा, त्यांतील भाषाभेद व त्याची नामोपपत्ति याप्रमाणें अनेक विषयांवर प्रकाश पडूं शकेल.

## मराठीची पूर्वपरंपरा

यापुढील प्रश्न भाषेचा. महाराष्ट्राची भाषा ती मराठी. महाराष्ट्री→ → महारट्ठी → मरहट्टी → मऱ्हाठी हें व्युत्पादन मान्य होण्यास प्रत्यवाय नसावा. परंतु व्युत्पादन मान्य झालें तरी मराठी भाषेच्या उपपत्तीविषयीं मतभेद संभवतात. ती संस्कृतोत्पन्न आहे हें सर्वमान्य असलें तरी तिच्या जनकत्वाचा मान कोणत्या भाषेस द्यावा हा एक वादविषय आहे. संस्कृत → महाराष्ट्री प्राकृत → मराठी अशी परंपरा प्रथम डोळ्यापुढें येते व प्रो. स्टेन कोनौ[1], डॉ. ग्रियर्सन[2], चिं. वि. वैद्य[3] यांसारखे पण्डित तिचा पुरस्कारहि करतात. हें म्हणणें स्थूलमानानें बरोबर असलें तरी त्यांतील तपशीलांत थोडी भर घालणें जरूर आहे. महाराष्ट्रांत बोलली जाणारी ' प्रकृष्ट प्राकृत' म्हणजे महाराष्ट्री अशी व्याख्या प्रथम काव्यादर्शकार दंडी यानें केली (का० १.३४), व अलिकडे डॉ. ग्रियर्सन व प्रो. स्टेन कोनौ यांसारख्या आधुनिक भाषाशास्त्रज्ञांनीं ती उचलून धरिली. या महाराष्ट्री-प्राकृतापासून साक्षात् मराठी भाषा जन्मली असें मत परवां परवांपर्यंत रूढ होतें. परंतु अलिकडे प्रसिद्ध झालेल्या जैन किंवा महाराष्ट्री–अपभ्रंश भाषेतील ग्रंथां-मुळें मराठीच्या पूर्वपीठिकेंतील अपभ्रंशाचा एक नवीन दुवा उपलब्ध झाला आहे. इ. स. ४००-च्या सुमारास महाराष्ट्रीचा लोप होऊन तिचा जो अपभ्रंश महाराष्ट्रांत सुरू झाला, तो महाराष्ट्री–अपभ्रंश किंवा जैन-अपभ्रंश या नांवानें ओळखला जातो. या अपभ्रंशांतील धनपालकृत ' भविसयत्तकहा ', पुप्पदंतकृत ' णायकुमारचरिउ ', ' जसहारचरिउ '

१. Maharastri and Marathi ( Ind. Antiquary, Vol. 32.)
२. Linguistic Survey of India, Vol. 7.
३. निबंध आणि भाषणें, क्र. ३.

व ' महापुराण ', मुनि कनकामरकृत ' करकण्डचरिउ ', देवसेनकृत ' सावयधम्मदोहा ' इत्यादि ग्रंथ प्रो. याकोबी, डॉ. गुणे, प्रो. हिरालाल जैन, डॉ. वैद्य प्रभृति विद्वानांनीं अलिकडे संपादित केले असून त्यांवरून मराठी भाषेचें उद्‌गमस्थान अजमाविण्याचें एक महत्त्वाचें साधन हातीं आलें आहे. वरील ग्रंथ दहाव्या शतकांतील असले, तरी त्यांतील ग्रांथिक अपभ्रंश हा मराठीपूर्व असल्यानें तो महाराष्ट्री व मराठी यांतील दुवा होऊं शकतो. महाराष्ट्रीचा हा अपभ्रंश भाषेच्या आंतरिक स्वभावास धरून इ. स. ४००-च्या सुमारास चालू झाला. त्याच्या निर्मितीस परप्रांतांतील नागलोकांचें आगमन कारणीभूत झालें हें कै० राजवाडे यांचें मत निराधार आहे. संस्कृत भाषेप्रमाणेंच प्राकृत भाषाहि जेव्हां व्याकरणादि नियमांनीं ग्रांथिक स्वरूपांत बद्ध झाल्या तेव्हां सर्वसामान्य लोकांच्या बोलीस जें रूप प्राप्त झालें तीच ही अपभ्रंश भाषा होय. प्राकृत वैयाकरणांनीं या अपभ्रंशाचे २७ पर्यंत उपभेद मानले असले तरी हें वर्गीकरण आज निरर्थक वाटतें. फार तर ही तत्कालीन प्रांतिक बोलींची यादी मानावी. त्यापेक्षां हें वर्गीकरण बाजूस ठेवून महाराष्ट्रीचा महाराष्ट्रांत जो अपभ्रंश इ. स. ४००-च्या सुमारास रूढ झाला त्याचा व मराठीचा सांगाडा तपासून त्यावरून मराठीचें उगमस्थान निश्चित करणें हें अधिक चांगलें. अशा प्रकारच्या तौलनिक अभ्यासावरून हें स्पष्ट होतें कीं, उच्चारप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया व शब्दसिद्धि हीं भाषेचीं तीन प्राणभूत अंगें मराठीनें साक्षात् अपभ्रंशापासून उचललीं व त्याबरोबरच कांहीं नवीन प्रकार रूढ करून भाषेचें विकसन पुढेंहि चालू ठेविलें[२]. एक गोष्ट उल्लेखनीय आहे. ती ही कीं, मराठी भाषा हा अपभ्रंशाचा अपभ्रंश नसून संस्कृतीकरणाचा संस्कार झालेला उत्क्रान्त स्वरूपांतील अपभ्रंश आहे. अपभ्रंशांतील उच्चारदौर्बल्य काढून टाकून मराठीनें ठसठशींत उच्चार रूढ केले. मराठींतील तत्सम शब्दांचें प्रमाण पाहिल्यास ही गोष्ट स्पष्ट होईल. या संस्कृतीकरणाचें कारण उघड आहे. प्राकृत व अपभ्रंश या भाषा बौद्ध आणि जैन धर्मांच्या छायेखालीं वावरल्या व त्या धर्मांचा प्रसार मुख्यतः बहुजनसमाजांत असल्यानें बहुजनांच्या बोलीस महत्त्व चढलें. तेंच इ. स. ८००-च्या सुमारास वैदिक धर्माचा ध्वज पुनश्च फडकल्यावर संस्कृत भाषेचें माहात्म्य वाढलें व त्यामुळें पंडिती भाषेची छाया लौकिक प्राकृतावर म्हणजे मराठीवर पडून ती ' सुसंस्कृत ' झाली.

---

१. S. M. Katre : Names of Prakrit Languages (Prof. Ross Commemoration Volume.)

२. तुळपुळे : यादवकालीन मराठी भाषा, पृ. १८ ते ६९.

## मराठीचा उत्पत्तिकाळ

कोणत्याहि भाषेचा उत्पत्तिकाल निश्चित करण्याचीं साधनें मुख्यतः दोन. एक म्हणजे ऐतिहासिक स्वरूपाचे उल्लेख व दुसरें म्हणजे प्राचीनतम असे ग्रंथ व ताम्र-शिलालेख. या दोन साधनांच्या आधारें मराठीचा मार्ग शोधीत कोठवर जातां येतें तें पाहूं.

मराठीचा असा नव्हे, पण सर्वसाधारण देशी भाषांचा प्राचीनतम उल्लेख 'नारदस्मृती'त आढळतो. गुरु या शब्दाची व्याख्या करतांना नारदस्मृति म्हणते—

संस्कृतैः प्राकृतैर्वाक्यैः यः शिष्यमनुरूपतः ।
देशभाषाद्युपायैश्च बोधयेत् स गुरुः स्मृतः ॥

वरील व्याख्येंत संस्कृत व प्राकृत या भाषांशिवाय देशभाषांचा स्वतंत्र उल्लेख असल्यानें नारदस्मृतीच्या रचनाकाळीं म्हणजे पांचव्या शतकांत मराठीसम देशी भाषा अस्तित्वांत आलेल्या होत्या असें अनुमान निघतें. परंतु देशभाषा हा शब्द स्मृतिकारानें कोणत्या अर्थी योजिला आहे याविषयीं निश्चित असें प्रमाण नसल्यानें हा पुरावा निर्णायक नव्हे. देशभाषांचा दुसरा प्राचीन उल्लेख बाणभट्टाच्या 'हर्षचरितां'त आढळतो. श्रीहर्षानें प्रवासास निघतांना बरोबर इतर भाषांतील कवींप्रमाणें एक देशभाषाकवीहि घेतला होता, असें इ. स ७००-च्या सुमारास होऊन गेलेल्या बाणानें सदर ग्रंथांत म्हटलें आहे.[1] याहि ठिकाणीं देशभाषा या शब्दाचा अर्थ स्पष्ट नाहीं. मराठी भाषेचा आणखी एक प्राचीन उल्लेख 'कुवलयमाला' या नांवाच्या ग्रंथांत मिळाला आहे.[2] हा ग्रंथ उद्योतनसूरि यानें शके ७००-मध्यें लिहिलेला असून त्यांत अठरा देशी भाषांचा जो उल्लेख आहे त्यांत 'मरहट्ठ' भाषेचा निर्देश असून पुढें त्या त्या देशांतील माणसांचें वैशिष्ट्य व त्यांच्या भाषेंतील ठळक अशी लकब हीं सांगितलीं आहेत. पैकीं मरहट्टांचें व त्यांच्या भाषेचें वर्णन हा कवि पुढीलप्रमाणें करतो—

'दढमडह सामलंगे सहिरे अहिमाण कलहसीले य ।
दिण्णले गहिल्ले उल्लविरे तत्थ मरहट्टे ॥'[3]

वरील उताऱ्यावरून शके ७००-च्या सुमारास मराठी भाषेस एक प्रकारचें विशिष्टत्व प्राप्त झालें असून तींत 'दिण्णले—गहिल्ले' अशीं रूपें

---

१. हर्षचरित, उ. १.

२. अपभ्रंशकाव्यत्रयी (प्रस्तावना—श्री. लालचंद गांधी)

३. (अर्थ—"धटमुट, काळासांवळा, सहनशील, अभिमानी, कलहशील 'वदिण्णले-गहिल्ले' असें बोलणारा मरहटटा...")

होत हें स्पष्ट होतें. यानंतर शके १०५१-मधील सोमेश्वरकृत ‘मानसोल्लास’ किंवा ‘अभिलषितार्थचिंतामणी’ नांवाच्या ग्रंथांत मराठी शब्दरूपेंच केवळ नव्हे, तर मराठी पद्येंहि कशीं आढळतात याविषयीं उल्लेख सारस्वत-कारांनीं केलेला असल्यानें त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. याच सुमारास म्हणजे ११-व्या शतकाच्या उत्तरार्धांत यशश्चंद्र नांवाच्या एका जैन पण्डितानें रचिलेल्या ‘राजीमतीप्रबोध’ या संस्कृत नाटकांत एक मराठी भाषेंतील उतारा आढळतो. या नाटकांतील नायिका राजमती ही असून तिच्या स्वरूपाचें वर्णन नाटककारानें एका ‘महाराष्ट्रिका’ कडून करविलें आहे. तो प्रसंग असा—

“ महाराष्ट्रिकमुखमीक्षते राजा। (अथ महाराष्ट्रिकः।) देव। चतुरांगुलाची जीहो[१] मी कांई सांघओ गोमटी मुहे[२] फाफटै[३] निलाडें[४] चापटु। आखंड याली ताहीची। बीणी[५] काली। न छोटी न मोटी। वानि चांपाहूली नाहीं काइं ताहि तूली। नाहिं उंडी जाणउं सुखकरी कुंडी बोलती मुहुरवाणि चालती मुजाणि राउल खरी रूडी[६] अमृतकरी इसी कूयडी[७]। ना पभूदं रुपेंदुं जाणामि। ......... ” (तृतीयोंऽकः)

वरील नाटकाची अलीकडे नकललेली एक प्रत बडोदें येथील जैन ज्ञानसंग्रहांत असून दुसरी जुनी प्रत हेमचंद्राचार्य जैन ज्ञानमंदिर, पाटण (उत्तर गुजराथ) येथें आहे. यशश्चंद्राचा काल श्री. लालचंद गांधी यांच्या मतें विक्रम संवताच्या १२-व्या शतकाचा उत्तरार्ध म्हणजे शके १०५०-च्या आसपास असून वरील उताऱ्यांतील मराठी भाषा स्पष्ट आहे.[८] शके १२१२-च्या सुमारास म्हणजे ज्ञानेश्वरीच्या रचनाकाळीं मराठी भाषेची परप्रांतांतहि केवढी प्रतिष्ठा होती त्याचें एक सूचक आम्हांस राइस यांच्या ग्रंथांत मिळालें, तें असें—

“ The college founded and endowed in 1290 A. D. by the Hoyasala minister Perumala at Mailangi (Tirumkudal–Narsipur, 27) deserves mention ...... Provision was made in it for masters to teach Nagar, Kannad, Tigulu (Tamil) and Arya (Mahratti).”[९]

---

१ जिव्हा. २ मुख. ३ रुंद. ४ कपाळ. ५ नाभि. ६ चांगली. ७ लहान विहीर.

८. चि. वि. जोशी : देशी भाषांचें प्राचीनत्व (विविधज्ञानविस्तार. वर्ष ५९, अंक १२.)

९. B. Lewis Rice : “Mysore and Coorg from Inscriptions.”, p. 179.

इ. स. १२९०-त तामिळनाडांत मराठी भाषा शिकविण्याची सोय केली होती असें राईस म्हैसूर प्रांतांतील मालिंगी येथील शिलालेखावरून सांगत आहेत. मराठीच्या प्राक्कालीन दिग्विजयाची ही एक निशाणीच होय.

## मराठीच्या जन्मखुणा

मराठी भाषेच्या उगमाचा शोध घेण्याचीं ग्रांथिक साधनें जीं उपलब्ध आहेत तीं यादवकालांतील असल्यानें त्यांचा या कामीं विशेष उपयोग नाहीं. आज उपलब्ध असणाऱ्या साहित्यांत मुकुंदराजांचा ' विवेकसिंधु ' हा मराठींतील प्राचीनतम ग्रंथ ठरतो व त्याचा रचनाकाल शके १११० असा आहे. सारस्वतकार म्हणतात त्याप्रमाणें, ' विवेकसिंधु ' सारखे ग्रंथ हीं भाषेच्या प्रारंभींचीं चिन्हें नसून तीं तिची परिणत अवस्था होय, व या दृष्टीनें पाहतां मुकुंदराजापूर्वीं कांहीं शतकें मराठी भाषेंत ग्रंथरचना होत असावी हें त्यांचें म्हणणें मनास पटतें. दुर्दैवानें मुकुंदराजपूर्व वाङ्मय अद्यापि सांपडलेलें नाहीं, व ज्या वैद्यकादि ग्रंथांचा उल्लेख श्री. भावे करतात, त्यांचा रचनाकाल ठाऊक नसल्यानें अभ्यासाचीं साधनें म्हणून तीं निरुपयोगी होत. मराठीच्या प्राचीन स्वरूपाची खरी चाहूल पुरातन कालापासून चालत आलेल्या लोकवाङ्मयांत किंवा Folk-lore मध्येंच लागूं शकेल. समाजांत परंपरेनें चालत आलेल्या कथा, कहाण्या, गाणीं, म्हणी, आणा-भाका, उखाणे-पाखाणे, इत्यादि अनेक प्रकार मिळून हें लोकसाहित्य बनत असतें, व विविध थरांनीं बनलेल्या विशाल अशा समाजाचें जीवन त्यांत प्रतिबिंबित झालें असल्यानें समाजशास्त्राच्या व भाषाशास्त्राच्या अभ्यासास तें विशेष पोषक ठरतें. एकच उदाहरण देतों. शके १२००-च्या सुमारास म्हाइंभटानें रचिलेल्या ' लीळाचरित्रां ' त चक्रधरांनीं धानाई नांवाच्या एका हट्टी लहान मुलीस पुढील गोष्ट किंवा ' कहाणी ' सांगून उगी केल्याचा उल्लेख आहे. ही कहाणी अशी[2] —" साळैचें घर मेणाचें : काउळेयाचें घर सेणाचें: पाउसाळां काउळेयाचें घर पुरें जाए : साळैचें वांचे:" बाराव्या शतकाच्या अखेरीसच लोककथेच्या गंगेंत समाविष्ट झालेल्या या कहाणीचा जन्म यापूर्वीं कितीतरी शतकांच्या मागें झाला असला पाहिजे. या लोककथांचा जन्मकाल जरी सांगतां आला नाहीं तरी ज्याअर्थीं १३-व्या शतकारंभीं त्यांना लोकवाङ्मयाचें स्वरूप प्राप्त झालें होतें, त्याअर्थीं

१. "नागर-कन्नड-तिगुळ-आर्यवन ओडिसुव बालसिक्षे उपाध्यर जीवितक्के वर्ष १ क्के गद्याणं आरु१". (Ep. Carnatica, Vol. III, p. 146.)

२. लीळाचरित्र, पूर्वार्ध, खंड १ पृ. १४.

त्यापूर्वी चारपांचशें वर्षापासून त्याचें अस्तित्व बीजरूपानें कां होईना पण असलें पाहिजे असें मन सांगतें.

मराठी भाषेचा जन्मकाळ अजमविण्याचें आणखी एक साधन म्हणजे शिलालेख व ताम्रपट. ज्ञानेश्वरीपूर्व लेखांची एक यादी श्री. भावे यांनी दिलेलीच आहे. त्यानंतर अधिक संशोधनान्तीं उपलब्ध झालेल्या शिला–ताम्रलेखांची भर मूळ यादींत घालणें एवढेंच आपलें कर्तव्य. एक गोष्ट मात्र खरी कीं, सारस्वतकारांच्या मागें अद्यापि कोणास जातां आलेलें नाहीं. शिलांवर उमटलेल्या मराठीच्या पावलांचा माग घेत घेत सारस्वतकार शके ९०५-पर्यंत म्हणजे श्रवणबेळगोळपर्यंत जाऊं शकले, व त्या गोष्टीस आज पंचवीस वर्षें झालीं तरी अजून आपण त्याच ठिकाणीं उभे आहों. कै. राजवाडे यांनीं ( त्यांच्या मतें ) शके ६५८-तील चिकुर्डे-ताम्रपटाच्या व शके ४१०-मधील मंगळवेढें ताम्रपटाच्या आधारें आणखी मागें जाण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण जाणत्यांनीं[३] त्यांस मागें ओढलें. या दोन ताम्रपटांच्या अस्सलपणाबद्दल विद्वानांनीं शंका व्यक्त केली व आज ते ताम्रपटच कोठें उपलब्ध होत नसल्यामुळें जी गत राजवाडे–ज्ञानेश्वरीची तीच या लेखांची झाली. मूळ साधनेंच नष्ट झाल्यावर तेथें अभ्यासक तरी काय करणार ? तात्पर्य, ज्ञानेश्वरीपासून प्रारंभ करून मागें जात जात आज तरी आपणांस श्रवणबेळगोळपर्यंतच पोंचतां येतें. त्यापुढें सर्व अंधार आहे. सारस्वत-कारांच्या काळांत आणि आजच्या काळांत फरक इतकाच झाला, कीं त्यांचीं पावलें फार लांब लांब पडलीं तर आपलीं त्या मानानें थोडीं जवळ पडत आहेत. महत्त्वाच्या लेखांची यादीच देतों, म्हणजे त्यावरून कल्पना येईल. या यादींतील कांहीं लेख पूर्णतः तर कांहीं अंशतः मराठी आहेत. या यादीवरून आणि मागील विवेचनावरून मराठी भाषेची प्राचीनतम अशी कालमर्यादा आज मिळणें सोपें जाईल. निदान इतकें तरी निश्चयानें म्हणतां येईल, कीं मराठी भाषेंतील आद्यग्रंथ शके १११०-च्या आसपास, तिची पाहिली लिखित अशी निशाणी शके ९०५-मध्यें, व तिचा पाहिला स्पष्ट उल्लेख शके ७००-च्या सुमारास मिळतो. यावरून आठव्या शतकाचा प्रारंभ हा मराठी भाषेचा जन्मकाल म्हणून तूर्त धरून चालण्यास हरकत नाहीं.

---

१. प्रथमाला, वर्ष–१, अंक १०.

२. वि. का. राजवाडे : ज्ञानेश्वरी–प्रस्तावना, पृ. १८.

३. पां. दा. गुणे : मराठी भाषचा कालनिर्णय ( भा. इ. सं. मं. षष्ठ संमेलन वृत्त. )

## प्राचीन मराठी शिलालेख व ताम्रपट

| क्र. | स्थल | काल | स्वरूप | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| १ | उनकेश्वर | श. १२११ | शिला. | भा. इ. सं. मं. त्रै. ९–१. |
| २ | कालवार ( जि. ठाणें. ) | श. १२१० | शिला. | महा० प्राचीन ताम्र-शिला-लेख. (डॉ. दीक्षित) पृ. १०३ ते ५. |
| ३ | पूर ( जि. पुणें ) | श. १२०७ | शिला. | द. म. इ. सा. खं. २, पृ. ६ |
| ४ | पंढरपूर | श. ११९५ ते –९९ | शिला. | ग्रंथमाला |
| ५ | चांजें ( जि. कुलाबा ) | श. ११८२ | शिला. | एपि. इं. व्हॉ. २३, पृ. २७९. |
| ६ | रानवड ( मुंबई ) | श. ११८१ | शिला. | एपि. इं. व्हॉ. २३ पृ. २७८ |
| ७ | राणेबेन्नुर ( कर्नाटक ) | श. ११७४ | शिला. | सह्याद्रि |
| ८ | तासगांव ( जि. सातारा ) | श. ११७२ | ताम्र. | द. म. इ. सा. खं. ३, पृ. ६५. |
| ९ | मार्कंड | श. ११७०-७१ | शिला. | भा. इ. सं. मं. त्रै. १९–३. |
| १० | नेवासें ( जि. नगर ) | श. ११६१ | शिला. | द. म. इ. सा. खं. २, पृ. ४. |
| ११ | आंबेंजोगाई | श. ११५० | शिला. | द. म. इ. सा. खं. १, पृ. ६२. |
| १२ | पाटण (पं. खानदेश) | श. ११२८ | शिला. | एपि. इं. व्हॉ. १, पृ. ३३८... |
| १३ | जालगांवें ( जि. रत्नागिरी ) | श. ११२४ | ताम्र. | द. म. इ. सा. खं. ३, पृ. ६१. |
| १४ | परळ ( मुंबई ) | श. ११०७ | शिला. | J. B. B.R A. S. भा. १२ पृ. ३३३. |

१. जैत्र सावंताचा ताम्रपट या नांवानें प्रसिद्ध असलेला.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १५ | वेहरली ( मुंबई ) | श. ११०६ | शिला. | J. B. R. S. व्हॉ. २९ |
| १६ | सावरगांव (जि. उस्मानाबाद) | श. १०८६ | शिला | द. म. इ. सा. खं. २, पृ. १. |
| १७ | तेर | श. १०८६ | शिला. | द. म. इ. सा. खं. २, पृ. ८२. |
| १८ | वसई ( जि. ठाणें ) | श. १०८३ | शिला. | एपि. इ. व्हॉ. २३ पृ. २७५ |
| १९ | पळसदेव ( जि. ठाणें ) | श. १०७९ | शिला. | महा. सारस्वत पृ. १४–१५ |
| २० | चिपळूण | श. १०७८ | शिला. | मुंबई विद्यापीठ जर्नल १३–१. |
| २१ | आगाशी ( जि. ठाणें ) | श. १०७२ | शिला. | एपि. इं. व्हॉ २३ पृ. २७३. |
| २२ | आंबे जोगाई | श. १०६६ | शिला. | अप्रसिद्ध. |
| २३ | चांजें ( जि. कुलाबा ) | श. १०६० | शिला. | एपि. इं. व्हॉ. २३ पृ. २७२. |
| २४ | मंगळवेढें | श. १०५४ | शिला. | सह्याद्रि |
| २५ | सितावर्डी ( नागपूर ) | श. १००८ | शिला. | एपि. इं. व्हॉ. ३, पृ. ३०४. |
| २६ | भोर | श. १००१ | ताम्र. | एपि. इं. व्हॉ. २२, पृ. १८९ |
| २७ | दिवे–आगर ( जि. रत्नागिरी ) | श. ९८२ | ताम्र. | सह्याद्रि, १५-६ |
| २८ | श्रवणबेळगोळ ( म्हैसूर ) | श. ९०५ | शिला. | एपि. कर्ना. खं. २. पृ. ९३ |

## अभ्यासाचीं साधनें


श्री. व्यं. केतकर : प्राचीन महाराष्ट्र.

य. रा. दाते : महाराष्ट्र भाषाभ्यास.

चिं. वि. वैद्य : निबंध आणि भाषणें.

वि. का. राजवाडे : ज्ञानेश्वरीची प्रस्तावना.

वि. का. राजवाडे. : राधामाधवविलासचंपू ( प्रस्तावना. )

ज्युल् ब्लॉश् : मराठी भाषेचा विकास (परांजपेकृत भाषांतर.)

ग. ह. खरे : दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें भा. १, २, ३.
शं. गो. तुळपुळे : यादवकालीन मराठी भाषा.
चिं. वि. वैद्य—पां. दा. गुणे : मराठी भाषेचा कालनिर्णय (विविधज्ञान-विस्तार, १९२२)
वि. का. राजवाडे : ऐतिहासिक प्रस्तावना.
कृ. पां. कुळकर्णी : मराठी भाषा, उद्गम आणि विकास.
रा. ग. हर्षे : ज्ञानदेवी (प्रस्तावना)
कृ. पां. कुळकर्णी : मराठी भाषेचा व्युत्पत्ति–कोश (प्रस्तावना)
वि. पां. दांडेकर : महाराष्ट्र.
ग्रियरसन् : Linguistic Survey of India, Vol.7.
स्टेन कोनौ : Maharastri & Marathi (Ind. Antiquary, Vol. 32.)



## प्रकरण : २ ग्रंथकर्तृत्वाची सुरवात

### आद्य कवि मुकुंदराज

मराठी भाषेंतील आद्यकवि मुकुंदराज हा एक वादविषय असून अद्यापि तो अनिर्णित असल्याचें सर्वांना ठाऊकच आहे. हा कवि अति प्राचीन म्हणजे सुमारें ७५०-वर्षांमागील असल्यामुळें त्याच्या जन्ममृत्यूचे शक व त्याचें चरित्र या गोष्टी अज्ञात असणें यांत नवल नाहीं. परंतु मुकुंदराजाचें ठावठिकाण व त्याच्या ग्रंथरचनेचा तपशील यांविषयींहि आपण अंधारांत चांचपडत असावें ही खरोखरच दुःखाची गोष्ट होय. मुकुंदराजाची काल-निश्चिति त्याच्या 'विवेकसिंधू' तील सुप्रसिद्ध अशा कालनिदर्शक ओंवी-वरून थोडीफार करतां येणें शक्य आहे. थोडीफार म्हणण्याचें कारण या ओंवींतील शक-संवत्सरांचा मेळ बसत नसल्यानें व कांहीं प्रतींत्न तिचा अभाव असल्यानें ती प्रमाण मानण्यांत कांहीं अडचणी येतात. पण मुकुंद-राजाची स्थलनिश्चिति करण्यांत याहूनहि अधिक अडचणी येत असून हा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा होऊन बसला आहे. 'विवेकसिंधू'त बाणगंगेच्या किंवा वैनगंगेच्या तीरावरील 'प्रसिद्ध' आणि 'मनोहर' अशा अंबानगरीचा व नृसिंहाचा बल्लाळ आणि त्याचा कुमर जैतपाळ यांचे जे उल्लेख आहेत ते संदिग्ध स्वरूपाचे असून त्यामुळें प्रस्तुत विषयासंबंधीं दोन भिन्न मतें मांडलीं गेलीं आहेत. पैकीं 'विवेकसिंधू' त उल्लेखिली गेलेली ही अंबानगरी म्हणजे मध्यप्रांतांतील भंडाऱ्याजवळील वैनगंगेच्या तीरावरील अंभोर नांवाचें गांव होय व ह्यावरून पाहतां मुकुंदराज हे नागपूराकडील होत असें एक मत असून त्याचा पुरस्कार कै. भावे, कै. पांगारकर इत्यादि संशोधकांनीं केलेला आहे, व बळकट अशा विरुद्ध पुराव्याच्या अभावीं आज तें पुष्कळांना मान्यहि आहे. ही विचारसरणी खरी असणें अशक्य नाहीं. पण या प्रश्नाची जी दुसरी बाजू म्हणजे मुकुंदराज हे आंबे जोगाईचे असण्याची शक्यता, तिचा पाठपुरावा करणारीं साधनें अलीकडे उपलब्ध झालीं आहेत. हीं साधनें कदाचित् अस्सल, अतएव विश्वसनीय नसतीलहि; परंतु त्यांची उपेक्षा करणें हें शास्त्रविरुद्ध असल्यानें तीं उजेडांत आणणें अवश्य आहे. आंबे-जोगाईजवळील मुकुदराजांची समाधि सर्वश्रुत असून हें अत्यंत रमणीय असें स्थान दासोपंतांच्या समाधीपासून सुमारें अर्ध्या कोसावर एका दरींतील गुहेंत आहे. या दरींतून जयन्ती नांवाची नदी वाहत असून ती आंबे गांवांतून येऊन पुढें जवळच बाणगंगेस मिळाली आहे. 'विवेकसिंधू'त ज्याचा उल्लेख आला आहे त्या जैतपाळाच्या किंवा जयन्त-

पाळाच्या नांवावरून त्या गांवच्या नदीस जयन्ती हें नांव मिळणें अशक्य नाहीं ही गोष्ट जातांजातां नमूद करून ठेवावी असें वाटतें. ही समाधीची गुहा म्हणजेच मुकुंदराजाचें ध्यानधारणेचें व ग्रंथरचनेचें स्थान होय, या आंबे-जोगाईत रूढ असणाऱ्या आख्यायिकेंतील सत्यांश ध्यानांत येण्यासारखा आहे. या समाधीच्या किंचित् खालच्या अंगास ज्ञानेश्वरांच्या पादुका असून ज्ञानेश्वर हे मुकुंदराजाच्या समाधीच्या दर्शनास येऊन गेल्याचें हें स्मृतिचिन्ह होय असें जें सांगण्यांत येतें तेंहि असंभवनीय नाहीं. कारण नामदेवादि संतांच्या मेळाव्यांत केलेल्या तीर्थयात्रेंत ज्ञानेश्वरांनीं आपणांपूर्वीं होऊन गेलेल्या या आद्य संतकवीच्या समाधीचें दर्शन घेणें अगदीं साहजिक आहे. मग ती समाधि कोठेंहि असो. अर्थात् या साधनावर फार भर देतां येणार नाहीं. कारण या पादुका ज्ञानेश्वरांच्या पश्चात् पुढें कोणींतरी स्थापन केलेल्या असणेंहि शक्य आहे. निर्णायक साधन असें ज्यास कांहीं अंशीं म्हणतां येईल असा एक ग्रंथ हस्तलिखित स्वरूपांत आंबे-जोगाईस मिळाला आहे. त्याचें नांव 'योगेश्वरीमाहात्म्य'. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिलेला असून त्याची रचना मुकुंदराजाच्या नंतर व इस्लामच्या दक्षिणेवरील आक्रमणापूर्वीं झाली असावी असें वाटतें. कारण त्यांत मुसलमानांचा उल्लेख कोठेंहि नाहीं. सुमारें २७०० श्लोकांचा हा ग्रंथ एकूण ३० अध्यायांत विभागलेला असून त्याचा कर्ता अज्ञात आहे. या काव्याच्या चारपांच प्रती आंबेगांवांत आहेत. 'योगेश्वरी-माहात्म्या'चा मुख्य विषय आंबेजोगाईचें स्थळवर्णन असा आहे. या ग्रंथांतील २२-व्या अध्यायांत मुकुंराजाच्याविषयीं माहिती आली असून ती थोडक्यांत पुढें देत आहें. 'योगेश्वरी-माहात्म्यां'तील मुकुंराजाविषयींचा कथाभाग थोडक्यांत असा—

"या जयन्तिका (आंबे) नगरींत एकूण सहा सिद्ध प्रसिद्ध असून त्यांपैकीं पहिल्या सिद्धाची म्हणजे बुटीनाथांची समाधि पापविमोचन तीर्थीं आहे. दुसरे सिद्ध पुरुष मुकुंदराज या नांवाचे असून त्यांचा वास सदा घोडदरा गुहेंत असतो. हे एकदां आपल्या गुहेंतून अकस्मातपणें गुप्त होऊन काशीक्षेत्रीं गेले व तेथें त्यांनीं कांहीं काळ घालविला. परंतु जैतपाळ नांवाच्या जैन राजानें सिद्धींच्या मागें लागून साधूंचा छळ आरंभिला आहे हें ऐकतांच मुकुंदराज पुनः जयन्तिका नगरींत प्रकट झाले. या प्रसंगीं एक चमत्कार घडून आला. जैतपाळ राजानें साधूंना चणे भरडण्याची म्हणजे चक्की पिसण्याची शिक्षा दिलेली होती व त्याप्रमाणें यंत्रें म्हणजे जातीं उभारून त्यांचें काम चालू होतें. मुकुंदराजांनीं तेथें आल्याबरोबर हें काम थांबवा असें

साधूंना सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं तें थांबविलें. पण चमत्कार असा, कीं कोणाचा हात न लागतांहि तीं जातीं आपोआप फिरूं लागून चणे पूर्ववत् भरडले जाऊं लागले. हें अघटित पाहून राजा वरमला व साधूंस बंधमुक्त करून त्यानें मुकुंदराजांचे पाय धरिले. या प्रसंगीं त्यांनीं जैतपाळास उपदेश देऊन वर 'विवेकसिंधु' आणि 'परमामृत' या आपल्या दोन ग्रंथांचेंहि त्यास निरूपण केलें. मुकुंदराजांचें आगमन होण्यापूर्वी जैतपाळ राजानें नानादेशींच्या विद्वानांना पाचारण करून त्यांजकडून मुकुंदतीर्थावर एक महायज्ञ करविला होता व त्या तीर्थाभोंवतीं यज्ञरक्षणार्थ आपले घोडेस्वार खडे केले होते. हीच 'अश्वदरी' होय. मुकुंदराजांचा निवास समाधिरूपानें याच अश्वदरींत किंवा मुकुंदतीर्थावर आहे"—

वरील कथानकांतील चमत्कारविषयक भाग विचारांत न घेणेंच बरें. 'योगेश्वरी माहात्म्य' या ग्रंथाचें स्वरूप पौराणिक असल्यानें त्यांतून कांहीं वजावट ही केलीच पाहिजे. मात्र जैतपाळ राजानें साधूंना दिलेली चणे भरडण्याची शिक्षा व 'अश्वदरी' ची कथा यांत थोडा तरी सत्यांश असावा असें वाटतें. कारण हीं ठिकाणें आंबेजोगाईजवळ दाखविण्यांत येत असून तेथील लोक आज अनेक वर्षें त्यांना अनुक्रमें 'चणेभरड' व 'घोडदरा' याच नांवांनीं ओळखत आहेत. अर्थात् हीं नांवें कोणीं कृत्रिम रीत्या ठेवलेलीं नसून त्यांच्यामागें कांहीं ऐतिहासिक सत्य असलें पाहिजे हें उघड आहे. हीं दोन स्थानें एकमेकांपासून विशेष दूर नाहींत, हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे. तसेंच आंबें ही कलचुरी घराण्याचा एक मांडलिक राजा जैत्रपाळ याची राजधानी असून तो जैन होता हें इतिहासज्ञांस ठाऊक आहे. याचा उल्लेखहि जेम्स बर्जेस यानें आंबें-जोगाईवरील आपल्या लेखांत केलेला आहे[१]. वरील ग्रंथांत आलेली हकीगत कै. पांगारकर यांनीं एक आख्यायिका म्हणून थोड्याफार फरकानें नमूद करून ठेविली आहे[२]. कृष्णदयार्णवासारखा पुढें होऊन गेलेला कवीहि मुकुंदराजांवरील आपल्या आरतींत "जैतपाल भूपतीनें केला दर्शना कोंड। अपरोक्ष बोध वाहे त्यासि घातलें कोड" असा उल्लेख करतो, त्यासहि महत्त्व आहे. ज्या नदीच्या तीरीं 'मनोहर अंबानगरी' आहे असा उल्लेख येतो त्या नदीचें नांवहि 'विवेकसिंधू' च्या बहुतेक प्रतींतून 'बाणगंगा' असें लिहिलेलें आढळतें; व ही बाणगंगा आंबें-जोगाईसच

१. Archæological Survey of Western India, Vol. III, p. 49.

२. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १, पृ. ३९०-३९१.

आहे. तसेंच मुकुंदराज अंबानगरीस 'मनोहर' म्हणतो यासहि महत्त्व आहे. आंबें हें गांव त्या काळीं किती संपन्न व अतएव नगर या नांवास कसें पात्र होतें हें त्या गांवीं उपलब्ध झालेल्या 'चौभारा शिलालेखां'[1]तील वर्णनावरून समजेल. हा लेख सिंघण यादवाच्या काळांतील असून त्याचा सेनापति खोलेश्वर याच्या प्रशस्तिपर आहे. आंबें हें या खोलेश्वराचें निवासस्थान, व त्याचें वर्णन प्रस्तुत लेखाच्या प्रारंभीं आलें आहे. या वर्णनांत, आम्रपुरास म्हणजे अंबानगरीस प्रकाशमान, जनपदव्याप्त उपवनभूषित इत्यादि विशेषणांनीं गौरविलें असून त्यांतील गगनचुंबी मंदिरांचा, भव्य प्रासादांचा, त्यांवरील डौलानें डोलणाऱ्या पताकांचा, कुंकुमसंमार्जनाचा, उत्फुल्ल कमलांचा व सौरभयुक्त वायूचा याप्रमाणें संपन्नतेचे द्योतक असे कितीतरी उल्लेख आले आहेत. हें वर्णन अंबानगरीचें आहे व मुकुंदराजांनीं आपल्या ग्रंथांत 'मनोहर अंबानगरी' असेंच म्हटलें आहे. यावरून दोन महत्त्वाचे मुद्दे उत्पन्न होतात. एक तर मुकुंदराजांसारखा कवि हा एखाद्या खेड्यास 'मनोहर नगरी' अशा अवास्तव नांवानें व्यर्थ गौरविणार नाहीं असें वाटतें. नागपूर प्रांतांतील ज्या अंभोर गांवाचा संबंध मुकुंदराजांकडे लाविला जातो तें अंभोर मनोहर होतें किंवा आहे तें ठाऊक नाहीं. परंतु तें गांव नगरी या संज्ञेस पात्र असल्याचा पुरावा इतिहासांत मिळत नाहीं, एवढें मात्र खरें. आजहि अंभोर हें एक खेडेगांवच आहे, नगर नाहीं. उलट जोगाईचें आंबें हें एका काळीं एक 'मनोहर' व संपन्न असें नगर किंवा पुर असावें हें दाखविणारे कितीतरी ऐतिहासिक अवशेष त्या गांवांत व आसपास अद्यापहि सांपडतात. अर्थात् मुकुंदराजांना 'अंबानगरी' म्हणजे आंबें-जोगाईचें अभिप्रेत असावें असें वाटतें. हें एक, व दुसरें म्हणजे या गांवचा प्राचीन उल्लेख जसा 'आंबें' याच नांवानें आढळतो त्याप्रमाणें नागपूर प्रांतांतील अंभोर गांवाचा 'आंबें' असा उल्लेख कोठें आढळत नाहीं. वर दिलेल्या चौभारा शिलालेखांतील आम्रपुर हें संस्कृत ग्रामनाम मुद्दाम बनविलेलें किंवा कृत्रिम म्हणून सोडून दिलें तरी शके १२००-च्या सुमारास रचिल्या गेलेल्या म्हाइंभटकृत 'लीळाचरित्रां'तील[2] पुढील उल्लेख मान्य होण्यासारखा आहे. या चरित्रग्रंथाच्या एकांकांतील १२-व्या लीळेंत एका चांभारास चक्रधरांपासून 'स्थिति' म्हणजे उन्मन्यवस्था प्राप्त होऊन तो 'विचरत विचरत खोलनाएका-

---

१. Kielhorn : Sanskrit, Pali & Old Canarese Inscriptions ( Epi. Ind. Vol. VII )

२. लीळाचरित्र, भा. १, एकांक, लीळा १२ वी. (संपा० ह. ना. नेने.)

चेया आंबेया ' आला असा स्पष्ट उल्लेख आहे. या उल्लेखांतील खोलनाएक म्हणजे सिंघण यादवाचा सेनापति खोलेश्वर व आंबे म्हणजे चौबारा-लेखांतील आम्रपुर किंवा आजचें जोगाईचें आंबे. खोलेश्वर हा आपल्या शौर्यादि गुणांमुळें इतका प्रसिद्ध झाला होता, कीं आंबे हें गांव त्याच्या नांवानें म्हणजे खोलनायकाचें आंबे म्हणून ओळखलें जाई ही वस्तुस्थिति इतिहासांत नमूद आहे. अजूनहि त्या गांवांत एक खोलेश्वराचा मठ असून त्या मठांत खोलेश्वराच्या प्रशस्तिपर असा एक शिलालेख उपलब्ध झालेला आहे. या लेखाचा काल शके ११६२ असा आहे.[1] तात्पर्य, आंबे हें ग्रामनाम ज्याप्रमाणें त्याच स्वरूपांत प्राचीन लेखांतून आढळतें तसें अंभोर हें आढळत नाहीं. व्युत्पत्तिशास्त्राचा कौल घेतल्यास तोहि अंभोऱ्याच्या बाजूनें लागणें कठिण दिसतें. अंभोर या नांवाचें व्युत्पादन संस्कृत 'आम्रपुर' व 'अंबापुर' अशा दोन शब्दांपासून होऊं शकतें. पैकीं 'आम्रपुर' अभिप्रेत असणें शक्य नाहीं; कारण मुकुंदराजांनीं 'अंबानगरी' असें स्पष्टपणें म्हटलें आहे. आतां अंबापुर हें नांव आंबे-जोगाई या गांवास जसें सार्थ ठरेल तसें तें अंभोऱ्यास ठरणार नाहीं. कारण जोगाई म्हणजे अंबा ही आंबेगांवास फार पुरातन काळापासून आहे. तशी ती अंभोऱ्यास असल्याचें ऐकिवांत नाहीं. अर्थात् अंबेचें म्हणजे जोगाईचें पुर तें अंबापुर ही उपपत्ति सार्थ वाटते. वास्तविक हीहि थोडी कृत्रिमच असून या गांवाचें मूळ नांव आंबे व त्याचें सुसंस्कृत रूप आम्रपुर किंवा अंबापुर होय असें मानण्याकडे मनाचा कल होतो. भाषा व इतिहास अशा दोन्ही दृष्टींनीं 'अंबानगरी'स आंबे हें गांव अंभोऱ्यापेक्षां अधिक जवळ येतें एवढें खरें. आंबे या ग्रामनामाचा संबंध अंबा या देवीच्या उपनांवाकडे लागतो असें जें वर म्हटलें तें केवळ कल्पनेनें नाहीं. अंबा आणि आंबे यांचा संबंध सूचित करणारें अलीकडे आणखी एक साधन उपलब्ध झालें आहे. आंबे गांवापासून जवळच जोगाईच्या देवळाच्या मागील बाजूस दासोपंतांच्या समाधीच्या वाटेवर एक शिवलेणें उपलब्ध झालें असून तें योगिनीचें म्हणजे जोगाईचें माहेर या नांवानें ओळखलें जातें. आज बरींच वर्षें या लेण्याचा अर्धा भाग जमिनींत गाडला गेलेला होता, तो कांहीं वर्षांपूर्वी निजामाचे युवराज आंबे-जोगाईस आले त्या निमित्तानें मोकळा करण्यांत आला. तेव्हां या लेण्यांत एक शिलालेख मिळाला असून तो अद्यापि अप्रसिद्ध व अज्ञातच आहे. या लेखांत दान देणाऱ्यास 'अंबासभाधिष्ठित' असें म्हटलें असून हें विशेषण

---

१. James Burgess : Arch. Survey of W. India, Vol. III, pp. 85-92.

द्व्यर्थी नसलें तरी सूचक खास आहे. अंबेचें म्हणजे देवीचें गांव तें आंबें असा अभिप्राय त्यावरून ध्वनित होत आहे असें वाटतें. अंबा आणि अंभोर यांचा अशा प्रकारचा संबंध जोडून दाखवितां येणार नाहीं. शिवाय असें, कीं 'विवेकसिंधू'तील त्या ओंवींत 'बाणगंगा' या ऐवजी 'वैनगंगा' असा पाठ धरला तर पुष्कळशा प्रतींतून 'बाणगंगा' असें रूप आढळत असल्यानें 'वैन' या शब्दाचा 'बाण' असा अपभ्रंश झाला असें मानणें क्रमप्राप्त होतें. आतां भाषाशास्त्राच्या कोणत्याहि नियमाप्रमाणें 'वैन' या शब्दाचें 'बाण' असें रूप होणें शक्य नाहीं. तेव्हां मूळ पाठ 'बाणगंगेच्या तीरीं' असाच असावा, व बाणगंगा ही तर अंभोऱ्यास नसून आंबें-जोगाईस आहे. तसेंच 'योगेश्वरी माहात्म्यां'त उल्लेखिलेली घोडदरी व चणेभरड हीं स्थानें जरीं आंबेगांवानजीक अजूनहि दाखवलीं जातात तरीं तीं अंभोऱ्यांत असल्याचें श्रुत नाहीं. तात्पर्य, मुकुंदराज हे मराठवाड्यांतील आंबें-जोगाईचे असावे, नागपूर प्रांतांतील अंभोऱ्याचे नव्हत असें मानण्याकडे मनाचा कल व्हावा अशा प्रकारचा हा पुरावा आहे यांत कांहीं शंका नाहीं.

शंका नाहीं म्हटलें खरें, पण मनांत कांहीं शंका येतातच. पहिली अशी, 'योगेश्वरी माहात्म्य' हा ग्रंथ अस्सल कशावरून? त्याचा कर्ता अज्ञात व रचनाकाल अनिश्चित आहे. शिवाय या ग्रंथाचा एकंदर थाट पौराणिक स्वरूपाचा आहे, ऐतिहासिक स्वरूपाचा नाही हें कबूल केलेंच पाहिजे. दुसरी शंका किंवा आक्षेप असा, कीं 'बाणगंगेच्या तीरीं। मनोहर अंबा नगरी' हा मुकुंदराजांनीं केलेला उल्लेख त्यांच्या ग्रंथरचनास्थानाचा नसून त्यांच्या गुरूचे गुरु जे हरिनाथ त्यांच्या समाधिस्थळाचा तो उल्लेख आहे व त्यामुळें मुकुंदराज आणि आंबें-जोगाई यांचा संबंध जोडण्याचें कामीं तो निरुपयोगी होय असें वाटणें साहजिक आहे. हा आक्षेप एका दृष्टीनें कांहींसा बरोबर असला तरी तोच, मुकुंदराज हे अंभोऱ्याचे होत या मताविरुद्धहि घेतां येईल हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हरिनाथ व त्यांची परंपरा यावरून मुकुंदराजांची स्थलनिश्चिति करण्याचा प्रयत्न डॉ. य. खु. देशपांडे[1] यांनीं अलीकडे केला आहे; पण तो अबाधित वाटत नाहीं. कारण, हरिनाथ व त्यांची परंपरा ही मध्यप्रांतांतील आहे असें गृहित धरून सुद्धां मुकुंदराज हे आंबें-जोगाईचे नव्हत असें सिद्ध होत नाहीं. तेव्हां हरिनाथांवरून मुकुंदराजांची स्थलनिश्चिति करण्यापेक्षां ती स्वतंत्र रीत्या करणें अधिक बरें. अशा प्रकारचा प्रयत्न वर केला आहे. परंतु तो निर्णायक मानण्याचें कारण

१. निवडक निबंध, खं १, पृ ७८ (मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर)

नाहीं.

वरीलपैकीं कांहीं शंकांचीं उत्तरें संशोधक श्री. कानोले यांच्या एका लेखांत मिळतात. श्री. कानोले यांनीं विवेकसिंधूंतील

श्रीहरि येणें नांवें विख्यातु । अवतरला श्रीअनंतु ।
तेथिंचा महिमा अद्‌भुतु । भविष्योत्तर पुराणीं ॥

या उत्तरार्ध अ. ११ मधील ओंवीवर विशेष भर दिला असून मुकुंदराजानें उल्लेखिलेली अंबानगरी म्हणजे जोगाईचें आंबेंच होय असें त्यांचेंहि म्हणणें आहे. आम्ही उल्लेख केलेलें योगेश्वरी-माहात्म्य भाविष्योत्तर पुराणांतच असून तें मुकुंदराजांच्या अवलोकनांत आलेलें असावें अशा मताचे श्री. कानोले आहेत. मुकुंदराजांचे परमगुरु श्रीहरिनाथ यांची समाधि नागपूर प्रांतीं अंभोर येथें असली तरी ही गोष्ट मुकुंदराज व आंबे-जोगाई यांतील अन्योन्य संबंधाच्या आड येऊं शकत नाहीं हेंहि श्री. कानोले यांनीं स्पष्ट केलें आहे. हरिनाथांचा शिष्यसंप्रदाय फार मोठा होता हें "अनेक शिष्य प्रबोधिले । ब्रह्मसुखीं अनुभविले । ब्रह्मविद्येचें तारूं घातलें । सकळ जनांसी ॥" या मुकुंदराजांच्या उद्गारांवरून स्पष्ट होतें. या शिष्यमंडळींपैकीं कोणीं हरिनाथ—रामचंद्र—मुकुंदराज या त्रयीच्या स्मरणार्थ त्यांच्या समाधि नागपूर प्रांतीं बांधणें शक्य आहे. मुकुंदराजांची अंबानगरी म्हणजे आंबे-जोगाईच होय या म्हणण्यास आणखी एक पुरावा देतां येईल. डॉ. य. खु. देशपांडे यांनीं महानुभावीय ग्रंथकार मेघचंद्रकृत 'यक्षदेव वृद्धान्वय' या पोथीच्या द्वारें मुकुंदराज व जैत्रपाल यांच्याविषयीं जी माहिती उजेडांत आणली आहे त्यांत 'नागनाथ' हें एक नांव आढळतें.

वैनगंगेतीरीं अंबावती पुरी । भेटला मुरारी रामदेवा ॥
रामासि वेदांतु नागेंद्रा सिद्धांतु । गुरु नागनाथु आम्हां सये ॥

याप्रमाणें उल्लेखित असा हा यक्षदेव वृद्धान्वयांतील नागनाथ व योगेश्वरी-माहात्म्यांतील सिद्ध नागनाथ या दोन व्यक्ति एकच असाव्या कीं काय असें वाटणें साहजिक आहे. कारण आंबे-जोगाई हें नाथसंप्रदायाचें एक ठळक असें केंद्र असून मुकुंदराजांनीं विवेकसिंधूंत आपले गुरु व परमगुरु यांजविषयीं लिहितांना त्यांना सिद्धच म्हटलें आहे. मेघचंद्राच्या 'यक्षदेव-वृद्धान्वयां' तील पुढील उल्लेखहि महत्वाचे आहेतः—

राजोरा रोहणें झाडी मंडळेसी । रावो पुण्यराशी जैतपाळ ।
नृसिंह बल्लाळ पुत्र जैत्रपाळ ।......

---

१. मुकुंदराजांचीं अंबानगरी कोणती? ( मराठवाड्यांतील गद्यविहार, पृ. ४७ ते ६०).

आपण मुकुंदापदीं शरण आले। संगत्याग केला जैतपाळें ॥

वरील उताऱ्यांतील जैतपाळाच्या राजधानीचें ठिकाण 'राजोरा–रोहणें' म्हणजे वऱ्हाडांतील राजुर–रोहिनखेड होय असें प्रा. भुसारी यांचें म्हणणें आहे.[1] परंतु एक तर जैतपाळाचे स्मृत्यवशेष जसे आंबें–जोगाई येथें आहेत तसे ते वऱ्हाडांत असल्याचें प्रसिद्ध नाहीं. दुसरें असें, कीं मेघचंद्रानें राजोरा-रोहणें हें जोड नांव प्रांतवाचक म्हणून वापरलें आहे; विशिष्ट स्थलवाचक म्हणून नव्हे. अर्थात् जैतपाळाच्या राजधानीचें नांव निराळेंच असणार. शिवाय हें राजोरा–रोहणें निश्चितपणें कोणतें याचाहि उलगडा होणें अवश्य आहे. कारण आंबें–जोगाईपासून सुमारें वीसएक कोसांवर राजूर–रोहिणें अशीं दोन गांवें आहेत. तात्पर्य, वरील महानुभावीय ग्रंथांतील मजकूर तूर्त तरी निर्णायक पुरावा म्हणून पुढें करतां येत नाहीं. प्रत्यक्ष प्रमाणें व ग्रांथिक आणि शिलालेखांतील उल्लेख ह्यांवरून मात्र मुकुंदराज हे आंबें–जोगाईचे असावे असें मानण्याकडे मनाचा कल होतो.

## अभ्यासाचीं साधनें


वि. अं. कानोले : मुकुंदराजांची अंबानगरी. (मराठवाड्यांतील गद्यविहार, पृ.४७...)

य. खु. देशपांडे : हरिनाथांची समाधि. (निवडक निबंध, खं.१ पृ.७८...)

र. म. भुसारी : मुकुंदराजांचा कालनिर्णय (सह्याद्रि, जुलै १९३७)

शं. गो. तुळपुळे : आंबें–जोगाई आणि मुकुंदराज (म. सा. पत्रिका, १९५०).

अनाम : योगेश्वरी–माहात्म्य (अध्याय, २२).

James Burgess : Ambe Inscriptions. (Arch. Survey of W. India, Vol. 3).

के. आ. पाध्ये : हेमाद्रि पंडित.




१. "मुकुंदराजांचा कालनिर्णय" (सह्याद्रि, जुलै १९३७).

प्रास्ताविक :—

गेलीं अनेक शतकें सांकेतिक लिपीच्या कुलपांत अडकून पडल्यामुळें पंथीयेतर वाचकांस अज्ञात असलेलें महानुभावीय वाङ्मय उजेडांत आणून त्याची ओळख बाहेरील जगास करून देण्याचें श्रेय महाराष्ट्र–सारस्वतकारां-कडे जातें. महानुभावांची सांकेतिक लिपी उकलून दाखविण्याचा पहिला मान कै. वि. का. राजवाडे यांचा असला तरी या पंथाची व त्यांतील वाङ्मयाची इतक्या मोठ्या प्रमाणावर ओळख कै. भावे यांनींच प्रथम करून दिली. सुमारें २५ वर्षांपूर्वी 'सरस्वतीचें मंदिरांतील एक अज्ञात दालन' हा महानुभावीय साहित्याचा परिचय करून देणारा त्यांचा लेख प्रसिद्ध झाला व त्यापाठोपाठ 'महाराष्ट्र–सारस्वत' अवतरलें. महानुभाव पंथ व वाङ्मय यांची कै. भावे यांनीं करून दिलेली ही पहिली ओळख तेव्हां अपूर्व वाटली तरी आज ती अपूर्ण वाटते. कारण गेल्या पांचपंचवीस वर्षांत डॉ. य. खु. देशपांडे, श्री. ह. ना. नेने, डॉ. वि. भि. कोलते, श्री. वा. ना. देशपांडे इत्यादि मध्यप्रांतस्थ संशोधकांनीं महानुभावांचें विपुल साहित्य प्रकाशित केलें असून या नवीन उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारें कै. भावे यांचे महानुभावविषयक विचार दुरुस्त करणें अवश्य झालें आहे. शिवाय कै.भावे यांनीं ज्या वैचारिक वातावरणांत या विषयाचा पाठपुरावा केला तें वातावरणहि आज उरलेलें नाहीं. सरकारी दप्तरांत नोंदला गेलेला या पंथाविषयींचा विपर्यस्त मजकूर,[१] कै. विष्णुबोवा जोग या वारकरी पंथांतील आचार्यांविरुद्ध महानुभावांनीं न्यायमंदिरांत उभा केलेला अब्रुनुकसानीचा दावा (इ. स. १९०७), डॉ. भांडारकर व लो. टिळक या विद्वद्वयांकडून पंथास मिळालेलें शिफारसपत्र,[२] त्याच्या आधारें महानुभाव महंतांनीं घडवून आणिलेली सरकारी दप्तरांतील दुरुस्ती व या सर्व घटनांची यत्किंचितहि दाद न घेतां कै. चांदोरकर यांनीं मांडिलेली व पंथीयांस अप्रिय वाटणारी मानभावांची मांगभावांपासूनची उपपत्ति,[३] अशा अनेक गोष्टींमुळें कै. भावे यांच्या काळांतील वातावरण महानुभावीय वाङ्मयाच्या अभ्यासास प्रतिकूल बनलें होतें. आज परिस्थिति निवळली

१. Imperial Gazetteer, Vol. 12.

२. टाइम्स ऑफ इंडिया (ता. १५–११–१९०७); केसरी (ता. १९–११–१९०७).

३. ऐतिहासिक विविध विषय, खंड १, पृ. २७३–३०४.

असून या पंथाकडे निरंग मनानें पाहणें संशोधकांच्या प्रयत्नांमुळें शक्य झालें आहे. या दृष्टीनें पाहतां महानुभावांचे ग्रंथ मराठी भाषेच्या अभ्यासास सदैव उपकारकच ठरतील.

**पंथाचें नांव**

हा पंथ आजवर १ महानुभाव पंथ, २ महात्मा पंथ, ३ अच्युत पंथ, ४ जयकृष्णी पंथ, ५ भटमार्ग, आणि ६ परमार्ग अशा सहा नांवांनीं उल्लेखिलेला आढळतो. आर. ई. एन्थोवेन हे आपल्या निबंधांत[1] या पंथास एकूण बारा नांवें असल्याचें सांगतात. परंतु तें बरोबर नाहीं. प्रथम उल्लेखिलेल्या सहा नांवांचीच चर्चा करून तीं नांवें पंथाला कां व केव्हांपासून पडलीं आणि पंथाचें खरें नांव कोणतें, हें ठरविलें पाहिजे. पैकीं 'महानुभाव' या शब्दाचा यौगिक अर्थ महान् अनुभवी असा असून त्याचा अपभ्रंश 'मानभाव' हा शब्द मराठींत ढोंगी, कपटी अशा अर्थानें रूढ आहे. 'मानभावी कावा', 'बोलणीं मानभावाचीं, करणी कसाबाची' इत्यादि वाक्प्रचार हा रूढार्थच सुचवितात. ज्यांचा महानुभाव पंथाशीं परिचय होता व जे या पंथाच्या आचारविचारांची निंदा करीत, अशा महाराष्ट्रीय संतकवींनीं 'महानुभाव' शब्द केवळ यौगिक अर्थानें वापरला आहे. ज्ञानेश्वरांपासून मध्वमुनीश्वरांपर्यंत सर्व कवि या शब्दाचा 'महान् अनुभवी' हा परमार्थच घेऊन चालतात. एक निरंजन माधव मात्र 'शैव वैष्णव शांभव । सौर गाणपत्य शाक्त महानुभाव' या चरणांत[2] महानुभाव शब्दाचा पंथविशिष्ट उल्लेख करतो. पण याच कवीनें हा शब्द अन्यत्र सामान्य अर्थानें वापरला आहे. याचा अर्थ असा, कीं 'महानुभाव' या शब्दाचा अभिप्राय १७ व्या शतकापर्यंत तरी पंथविशिष्ट नव्हता. स्वतः महानुभाव कवींनींहि प्रस्तुत शब्दाचा वापर यौगिकार्थानेंच प्रथमपासून केलेला आहे. भास्कर कवीश्वराच्या शिशुपालवधांत 'महानुभावांचेनि मेळें । लाहिजेति आनंदाचीं सोनकेळें ।' (ओ. ७२), दायंबाच्या निर्वेदस्तोत्रांत 'महानुभावीं निरूपिलें । तेथिचे कणु कणु काढिले ।' (नि. ५७), परशराम बासाच्या नागदेवाचार्यस्मृतींत 'केसोबास मुख्य समस्त महानुभाव बैसले असति' (क्र. ३०१), याप्रमाणें अनेक ठिकाणीं 'महानुभाव' शब्द त्या पंथाच्या ग्रंथांतून येतो. इतकेंच, कीं तो सर्वसामान्य अर्थानें, परमार्थानें येतो; पंथाचा निदर्शक

---

१. 'Ethnographical Survey of Bombay, (1909), (Monograph, No. 131.) मराठी भाषांतर, भास्कर महानुभाव पुणेकर.

२. 'संप्रदाय परिमळ' (निरंजन माधव), उद्गार ५-११८.

म्हणून येत नाहीं. तेव्हां 'महानुभाव' पंथ हें नांव श्रीचक्रधर किंवा नागदेवाचार्य यांना अभिप्रेत नव्हतें एवढें निश्चित. चक्रधराच्या संप्रदायांतील सर्वजण 'महानुभाव' होते हें खरें; परंतु 'महानुभाव' म्हणजे चक्रधरपंथीय असें मात्र नव्हे. अर्थात् पंथाला हें नांव अलीकडे मिळालें असावें. 'महात्मा' पंथ या नांवाचा प्रकार कांहींसा असाच आहे. चक्रधराचे अनुयायी परस्परांना 'महात्मा' या नांवानेंहि संबोधीत, व हा शब्द त्यांच्या ग्रंथांत अनेकदां येतो. 'महात्मेनि प्रियवक्तेया होआवें' (आचारपाठ १८८), 'माझीए मार्गींचा महात्मा ऐसा तूंचि कीं' (नागदेवाचार्यस्मृति ११२), असे अनेक उल्लेख आहेत. स्वत: चक्रधर आपल्या शिष्यांना 'महात्मे' म्हणून संबोधीत असे. अर्थात् 'महात्मा' म्हटला, कीं तो चक्रधर-सांप्रदायी होय असा विवक्षित अर्थ कदाचित् तेव्हां असूं शकेल. परंतु हें पंथाचें नांव मात्र नसावें. तसें तें असतें तर 'भट-मार्गींचे महात्मे' असा वाक्प्रयोग आढळला नसता. याचा अर्थ पंथीयांना 'महात्मा' म्हणत असले तरी पंथाचें नांव वेगळेंच होतें. पंढरीच्या वारकऱ्यांचा तो 'वारकरी पंथ' असें म्हणण्यापैकींच हा प्रकार आहे. असो. 'अच्युतपंथ' हें नांव कोणीच उल्लेखीत नाहीं; आणि 'जयकृष्णीपंथ' हें नांव पंथाचा प्रसार पंजाबांत १६-व्या शतकांत झाला तेव्हां तिकडे प्रचलित झालेलें असल्यानें, हीं दोन्हीं नांवें विचारांत घेण्याचें कारण नाहीं. 'भटमार्ग' या नांवाची गोष्ट वेगळी आहे. 'आम्ही भटमार्गींचे महात्मे झालों' (नागदेवस्मृति ८६), 'मज भटमार्गींचा उपदेसु असे' (नागदेवस्मृति १७३), इत्यादि उल्लेख या शब्दाचे आढळतात. नागदेवाचार्यांना 'भट' किंवा 'भटोबास' म्हणत, आणि त्यांचा मार्ग तो 'भटमार्ग'. चक्रधराच्या पंथाला नागदेवाचें नांव पडावें याचें कारण म्हणजे नागदेवाचार्यांचें वाढलेलें महत्व हें होय. पंथाचा प्रसार मुख्यत: त्यांनीं केल्यामुळें त्यांचें नांव पंथाला पडलें. पुढें इ. स. १५७२ ते १५८० या काळांत रचिल्या गेलेल्या त्र्यंबकराजकृत 'बालबोध' ग्रंथांत 'भटमार्गा'चा उल्लेख आहे. (मध्य खंड, पृ. १७६–७७). म्हणजे नागदेवाचार्यांपासून त्र्यंबकराजापर्यंत हें नांव रूढ असावें. परंतु हेंहि पंथाचें नांव नव्हे. नागदेवाचार्यांपूर्वी तें आढळत नाहीं, चक्रधरांच्या मुखांतून तें निघालेलें नाहीं, आणि बोलून चालून तें व्यक्तिमाहात्म्याचें द्योतक आहे.

उरतां उरलें एक नांव–'परमार्ग'. हेंच या संप्रदायाचें मूळचें नांव असणार. अजून सुद्धां 'पंथ' या शब्दाऐवजा 'मार्ग' हाच शब्द महानु-भाव पंथीयांत रूढ आहे. 'आमचा मार्ग' असा शब्दप्रयोग कानांवर

येतो, ' आमचा पंथ ' असा येत नाहीं. प्रत्यक्ष चक्रधरांच्या तोंडीं ' या मार्गासि दत्तात्रेयप्रभु आदिकारण ' असा ' मार्ग ' शब्दाचा उल्लेख आहे. ' ये मार्गीं केली क्रिया कांइ वायां जाइल ', ' मज आपुलीये मार्गींचा उपदेसु द्यावा ' (वृद्धाचार–१९), ' कां पां ? मार्गो मूळ भणौनि ' याप्रमाणें हें नांव अनेकदां आढळतें. या सर्व ठिकाणीं मार्ग म्हणजे पंथ हें स्पष्ट आहे. आतां, महानुभावीय महंत आपल्या धर्माला ' परधर्म ' व शास्त्राला ' परशास्त्र ' असें म्हणतात. त्यांच्या पोथ्यांची समाप्ति ' इति श्रीपरधर्मे महामोक्षैकसाधने–' या शब्दांनीं होते. मुद्रित पोथ्यांत ' परमधर्मे ' असें आढळतें ती चूक होय. चक्रधरांनीं स्वतः 'परधर्म म्हणिजे तुमचें जीवन कीं गा' असें म्हटलें आहे. येथें पर म्हणजे परमेश्वर. अर्थात् ' परधर्म,' ' परशास्त्रा ' चा मार्ग म्हणजे ' परमार्ग '. हा पंथ चक्रधरास परमेश्वर मानतो, आणि साहजिकच चक्रधराचा मार्ग तो ' परमार्ग ' होय. तत्कालीन विद्वानहि याच शब्दाचा उल्लेख करितात. संकेताचार्यांच्या ' विदेह-प्रबोध ' नामक काव्यांतील पुढील उद्गार सूचक आहेत.

' म्हणौनि जो परमार्गीं आचार्या । तयापासाव अनुग्रहो जया । ...'
' तो इतिहास साद्यंत असे मुरारी । परमार्गिकांसि । '

तात्पर्य, महानुभाव पंथाचें मूळचें नांव ' परमार्ग ' असें होतें. हा सिद्धान्त प्रो. वि. भि. कोलते यांनीं मांडून सप्रमाण सिद्ध केला आहे. जिज्ञासूंनीं त्यांचे मूळ निबंध पहावे.

पंथाचें मूळ नांव ' परमार्ग ' असलें तरी ' महात्मा पंथ ' हें नांव पंथीयेतर कवींत एका काळीं रूढ असावें. ' महात्मा ' या शब्दाचें स्तोम माजविणाऱ्या पंथीयांचा उपहास वामन पंडितांनीं[2] एका ठिकाणीं केला आहे. मध्वमुनीश्वरहि[3] ' माहात्मे म्हणताति ब्रह्म सगळें आम्हांमधीं ठाउकें ' याप्रमाणें पंथीयांची सोल्लेख थट्टा करतो. इ स. १६४०-च्या सुमारास लिहिलेल्या ' दर्शनप्रकाश ' ग्रंथांत मयंतसुत मुरारी बीडकर हा महानुभाव लेखक आपल्या पंथाला महात्मा पंथ म्हणतो. परंतु या पंथाचें एकनाथांपासून आजपर्यंत लोकप्रिय झालेलें नांव म्हणजे ' मानभाव पंथ ' हें होय. हा शब्द

१ ' महानुभावपंथ कीं परमार्ग ? ' ( वि. भि. कोलते ).
—लोकशिक्षण मासिक, वर्ष ७, अं. ४, ५.

२ ' द्वारकाविजय ' ( वामनपंडित ) सर्ग ४–८७ ते ९१.

३ ' मध्वमुनीश्वरांची कविता ' ( संपा० प्र. व्यं. गुब्बी ) ४४५.

४ 'एकनाथ–गाथा' (आवटे), अभंग, अनुक्रमें ३७७७, ३७७६, ३८९१

एकनाथांपूर्वी आढळत नाहीं. परंतु नाथांनीं मात्र तो चक्रधरपंथास उद्देशून सरसकट वापरला आहे.

"होउनी मानभाव । अवघा बुडविला ठाव ।"
"जालों म्हणती मानभाव । अंतरीं शुद्ध नाहीं भाव ।"
"मानभाव बाई । आम्हां भिक्षा वाढा कांहीं ॥"[४]

हे नाथवाङ्मयांतील उल्लेख आहेत. पुढें शाहूराजांच्या काळांतील जयराम पिंड्ये हा कवि 'राधामाधवविलासचंपू'त 'कधीं मानभावास भेटीस आणी ।' असा मानभावांचा उल्लेख करतो. तात्पर्य, हा संप्रदाय एकनाथांच्या काळापासून 'मानभाव पंथ' या नांवानें महाराष्ट्रास ओळखीचा आहे.

**पंथाचें तत्वज्ञान :—**

महानुभावांच्या श्रुतिग्रंथांवरून त्यांचें तत्वज्ञान थोडक्यांत पुढीलप्रमाणें मांडतां येईल. महानुभाव हे द्वैती आहेत. त्यांच्या मतें जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चार वस्तू स्वतंत्र व नित्य होत. प्रपंच हा जड, परमेश्वर नित्यमुक्त, देवता नित्यबद्ध, आणि जीव बद्धमुक्त याप्रमाणें या पंथाची विचारसरणी असून तींत जीवेश्वरसंबंधाचें द्वैत स्पष्ट आहे. शंकराचार्यांचा विवर्तवाद किंवा रामानुजाचार्यांचा परिणामवाद महानुभावांना मान्य नसून ते प्रपंच ही नित्यस्वतंत्र वस्तु मानतात हें त्यांचें वैशिष्ट्य होय. आतां जीव हा अविद्यायुक्त म्हणजे 'जैशी मसी पाणियें कालवली' (लक्षणबंध महावाक्य, ३) तसा असून 'जेविं कोंडा लागला कणेंशीं । तेविं अविद्या जीवेंशीं' (ज्ञानप्रबोध, ६५१) चिकटून असते. जीवस्वरूपावरील ही अविद्येची काजळी पुसली गेली म्हणजे त्याचें मूळचें विशुद्धत्त्व प्रकट होतें. परंतु हें होण्याच्या आड नित्य कारणप्रपंच येतो. त्यांतून सुटण्यास एका परमेश्वरावांचून अन्य साधन नाहीं. हें परब्रह्म परमेश्वरस्वरूप सर्वव्यापक, सर्वात्मक, व सर्वातीत असून शिवाय तें अनादि, नित्य, ज्ञानानंदमय, अविक्रिय व सर्वसाक्षी आहे. अशा नित्यमुक्त परमेश्वराचा अनुभव स्वतःच नित्यबद्ध असणाऱ्या देवता कसा आणून देणार? अर्थात् मोक्षदानीं देवता असमर्थ होत. परंतु आधीं मोक्ष म्हणजे काय? तर 'स्वातंत्र्यु हा मोक्ष : पारतंत्र्यु हा बंध' (आचारमाळिका, १); विशुद्ध जीवावरील अविद्याचिन्ह गळून पडणें हाच मोक्ष होय, आणि हें एका आत्मज्ञानानेंच होणार. आत्मज्ञान म्हणजेच परमेश्वराचें ज्ञान, आणि तेंच एक मोचक आहे. परंतु ज्ञान श्रेष्ठ असलें तरी 'ज्ञानापसि प्रेम उत्तम' (विचारमाळिका, ३०). तेव्हां मोक्षप्राप्तीचे मार्ग दोन, एक ज्ञानमार्ग आणि दुसरा

भक्तिमार्ग. सूत्रकार म्हणतो, 'सृष्टीमध्यें कव्हणें करणें मुचिजेना एकें परमेश्वरें विण : तोचि परमेश्वरु नीर्वेव नीराकारु असे : पर कृपावशें सावेवो साकारु होए : अवतेरे : आपुलें सन्निधान दे : तें दास्यमोचक' (सूत्रपाठ, पूर्वी ). 'परमेश्वरु एकु सोडविता' (विचारमाळिका, ३८) हें खरें; परंतु हा परमेश्वर म्हणजे त्याचें व्यक्त स्वरूप होय, अव्यक्त नव्हें. कारण 'अव्यक्तीं व्यापारु नाहीं' ( विचारमाळिका, १६ ) असें महानुभावांचें स्पष्ट मत आहे. या उद्धरणासाठीं जीवाचे सात आणि परमेश्वराचे चौदा अधिकार सांगितलेले आहेत ( लक्षणस्थळ, उद्धरण, १२ ). वेडेपिसे, बहिरे, मुके, सप्तव्यसनी, भक्तिजड, अविद्याजरठ, अशा जीवांना उद्धरणाची आशा नाहीं. ते अनधिकारी होत. अधिकारी जीवांना मात्र ज्ञानदान करावें अशी तळमळ परमेश्वरास लागलेली असते, त्यांच्याच शोधांत तो सतत असतो. 'आर्तातें परमेश्वरु वाडोवाडीं गिवसिती' (आचार, २१८). आतां कांहीं जीव 'अच्युताच्या अज्ञाना' नें अन्यथा ज्ञानाच्या मार्गे लागून प्रवाहपतित होतात, त्यास परमेश्वरानें काय करावें ? 'देवें करावें तें केलें : पुरुषें करावें तें ठेलें' ( आचार, २५५ ). मात्र देवाच्या कृपेला मर्यादा नाहीं. त्याचे शब्द जणुं परावाणींत घोळलेले असतात. याच आर्तवच्छानंदनी, तापोपशमकादंबिनी, अमृतसंजीवनी अशा देववाणीला नारो व्यास बहाळिये यानें 'ऋद्धिपूर वर्णना' त नमस्कारिलें आहे ( ओ. १–३ ). असो. हें ज्ञान ज्याला झालें तो ज्ञानी अधिकारानें मोठाच असणार. मग तो शास्त्रज्ञ असो वा नसो. केवळ शब्दज्ञानास 'हिरव्याटुटव्या' म्हणजे कोंवळ्या, न मुरलेल्या अनुभवज्ञानाची सर कशी येईल ? ( विचार, १४४ ). तसेंच उपभोग घेणारा ज्ञानी हा बाह्यत: विरक्त भासणाऱ्या अज्ञानी जीवापेक्षां केव्हांहि श्रेष्ठच होय. कारण 'ज्ञानें-विण वैराग्य : तें कांइ करावें बापेआ' (आचार, २२१)? 'आचेरे तेयाचा धर्म' (आचार, ५२) हें महानुभाव पंथांतील एक मोठें सूत्र आहे. मात्र हा पंथ ज्ञानाहून भक्तिप्रेमाची पायरी वरची मानतो. त्यामुळें ज्ञानी झाला म्हणजे तो कृत्यकृत्य होतो असें नसून येथूनच त्याच्या अध्यात्मास खरा प्रारंभ होतो. ज्ञानानंतर 'अनुसरण' येतें. सर्वसंगपरित्याग करून पूर्णपणें परमेश्वराधीन होणें याचें नांव अनुसरण. 'एथ अधीनु होइजे : एथौनि भणितलें कीजे तें अनुसरण' ( आचार, २८३ ). अशा रीतीनें द्वादश कर्माचा त्याग करून जो ज्ञानी अनुसरतो त्यासच ईशप्राप्ति होते. कारण, 'अनुसरलेयाचा देवो' ( आचारमाळिका, २०२ ). अनुसरणानंतर त्याचीं त्रिविध कर्में त्रिविध प्रकारांनीं नष्ट होतात. 'आगंतुक कुंठे : अनारब्ध सुके : प्रारब्धा भोगें क्षयो' ( उद्धरण, २४ ). मात्र ज्ञानाची

ही अवस्था म्हणजे असिधाराव्रतच होय. कारण ज्ञानियाच्या हातून कांहीं अनिष्ट घडलें तर तें 'इशालुवांचा इशालु' अशा परमेश्वरास सहन होत नाहीं. 'अन्यत्र कीजे तें वाराणसीं फेडिजे : वाराणसीं कीजे तें कें फेडावें' (विचार, २५२), याप्रमाणें ज्ञानाचीं पापें वज्रलेप होतात. असें न व्हावें म्हणून परमेश्वर त्याच्या 'संलग्नाचें चेष्टकत्व'च नाहींसें करतो, आणि त्याबरोबर त्याचें 'अंतिक' दुःख म्हणजे जीवदेहावियोगाचें दुःखहि नासतें. अशा स्थितींत त्याला 'देहविद्या'दि लाभ होऊन त्याची 'हेमकाया होये : वज्रकाया होये' (विचार, ४०). अशा ज्ञान्यास सामान्यतः पुनर्जन्म नाहीं. परंतु क्वचित् असलाच तर 'पुनःसंबंधिया पुरुषु सुखिया श्रीमंताचा घरीं जन्मे' (आचार मालिका, ८७). ज्ञानाच्या या अंतिम स्थितींत, साध्यप्राप्तीनंतर साधननिवृत्ति होते, आणि एका ब्रह्मानंदाचा द्वैतानें उपभोग घेत ज्ञानी पुरुष त्यांतच रममाण होतो. परमेश्वर 'ज्ञानियासि पाठीसि घालीति : ज्ञानिया ब्रह्मीं मिसळे : बुडी दे' (उद्धरण, ६२, ६४). मात्र या व्यापारांत जीव-ब्रह्मांचें स्वातंत्र्य, अर्थात् द्वैत कायमच राहतें. हें सारें एका अविद्यानाशानें होतें. अविद्या, अज्ञान, अन्यथा ज्ञान, आद्यमळ आणि जीवत्व हीं 'पांचपिशीं' असून अविद्या हा त्यांचा पाया आहे. तोच उखडला, कीं ही अज्ञानपरंपरा आपोआपच तुटते. जणुं मडक्यांची उतरंडीच. 'ताळिचील हाणितलेयां वरिचील पडे : उतरंडी गडबडी' (उद्धरण, ५६).

'उपावो न पविजे ऐसें काइ असे?' (वि. २७८) हें खरें; परंतु एकंदरींत हा ज्ञानमार्ग कष्टप्रदच. शिवाय ज्ञानमार्गानें ब्रह्मस्वरूपाचा आनंद मिळतो, ईश्वरस्वरूपाचा नाहीं. तो एका भक्तिप्रेमानेंच मिळणार. म्हणून 'ज्ञानापासि प्रेम उत्तम' (वि. मा. ३०). बोधाची उत्तरावस्था ज्ञान, त्याप्रमाणें प्रेमाची उत्तरावस्था भक्ति ही होय आणि तो जीवोद्धरणव्यसनिया परमेश्वर अशा प्रेमियांस गिवसीत येता. श्रीचक्रधरांनीं बाइसा नांवाच्या आर्त स्त्रीला असेंच तिच्या घरीं जाऊन प्रेमदान केलें होतें (ली. च. पूर्वार्ध, ३). भक्ताच्या ठिकाणीं हा प्रेमसंचार दृष्टिद्वारां होतो आणि तो झाला, कीं 'विकारु विकल्पु स्वभावो इयें तीनि उच्छेदौनि जाती' (उद्धरण, १५). श्रीमूर्ति हीच मग साध्यसाधन होते, आणि या भक्तिप्रेमसंचारांत 'अनुसरण' आपोआप घडतें. श्रीमूर्तीवरील हें प्रेम इतकें उत्कट असतें, कीं ईश्वर-विरहाच्या कल्पनेनेंहि भक्त कासावीस होतो. श्रीकृष्णानें निजधामास जाण्याची गोष्ट काढतांच उद्धवाला विरहविषाची उकळी येऊन त्याची जीवज्योत थरकांपूं लागली असें वर्णन भास्करकवि करितो (उद्धवगीता,

७४) तें उगीच नव्हे. 'भक्त वियोगीं नुरे' (उद्धरण, १९) हेंच खरें. अशा भक्ताचें उद्धरण न झालें तरच नवल. 'वेधौनि बोधणें' आणि 'बोधौनि वेधणें' (विचार, १११) हे दोन्हीं प्रकार परमेश्वर करतो. हा वेधबोध झाल्यानंतर भक्ताच्या ठिकाणीं कोणतीहि कामना उरत नाहीं. 'भक्त आन कामना कैसी?' (ल. बं. उद्धरण, ३६) हें स्वानंदसुख भक्त भेदभावानें, जाणिवेनें, सावधपणें घेत असतो. अभेदभक्ति महानुभावांना संमत नाहीं. याप्रमाणें साधनानंद इतका श्रेष्ठ तर साध्यानंद किती श्रेष्ठ असेल ? ज्या वृक्षाची साल गोड त्याच्या फळाची गोडी किती वर्णावी ! 'साधनापसि साध्य उत्तम' (वि. मा. १४०) असा संकेत आहे. भक्त जसा ईश्वरस्वरूपांत रममाण होतो तसा ईश्वर मात्र भक्तांत होत नाहीं; तर तो 'स्वस्वरूपीं' रमतो (विचार, १३१).

महानुभावांच्या तत्वचर्चेचा स्थूल आराखडा हा असा आहे. तिचें सूक्ष्म, सविस्तर व सप्रमाण विवेचन करण्यास येथें वाव नाहीं. जिज्ञासूंनीं तें प्रो. वि. भि. कोलते[1] यांच्या ग्रंथांत पहावें. साररूपानें तें श्रीमुकुंदराज आराध्य[2] यांच्या हिंदी प्रबंधांत व वा. ना. देशपांडे[3] यांच्या लेखांत पहावयास मिळेल. हें परशास्त्र रहस्यमय असून तें भलत्यास सांगू नये अशी पूर्वाचार्यांची आज्ञा होती. ते म्हणत— 'हां गा : हें तुमचें रहस्य का : मा आपुलें रहस्य तें आणिकाप्रति प्रकटिजे ना कीं' (आचार, १५५). या तत्वज्ञानांतील तपशीलासबंधीं कोणाचे कितीहि मतभेद असले तरी इतकी शास्त्रोक्त तत्वचर्चा विद्यमान धर्मपंथांत एका महानुभावांनींच केलेली आढळते, यांत शंका नाहीं. या चर्चेतील सूक्ष्मता, व्यापकता आणि स्वतंत्रता हीं पाहिल्यास महानुभाव मत हें एक स्वतंत्र 'दर्शन' मानावें असें वाटूं लागतें.

## महानुभावांचा आचारधर्म—

श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, द्वारावतीचे चांगदेव राऊळ, ऋद्धिपूरचे गुंडम राऊळ आणि श्रीचक्रधर हे महानुभावांचे पंचकृष्ण होत. या पांचांना ते परमेश्वराचे पूर्णावतार मानतात. भगवद्गीता आणि भागवत हे दोन ग्रंथ त्यांना विशेष प्रिय असले तरी श्रीचक्रधरांचा 'सूत्रपाठ' हा त्यांचा धर्मग्रंथ आहे व त्याचें पारायण प्रत्येक पंथीय – मग तो मराठी असो वा नसो— नित्य करितो. या सूत्रांची संहिता त्यांनीं अतिशुद्ध ठेविली

१. महानुभावांचें तत्वज्ञान, (इ. स. १९४५).

२. ब्रह्मविद्याशास्त्र (इ. स. १९२६).

३. महानुभावांचा वेद (विविधज्ञानविस्तार, नोव्हें. डिसें. १९२७).

आहे. अहिंसा, निःसंग, निवृत्ति आणि भक्तियोग ही चतुःसूत्री पंथास मान्य असून चक्रधरांचें नाम, रूप, लीला, चेष्टा, स्थानें, श्रुति, स्मृति व प्रसाद हीं सर्व महानुभावांस अतिप्रिय आहेत. त्यांची चक्रधरासंबंधींची गुरुभक्ति तर कांहीं अपूर्वच आहे. त्यांची आंगी, टोपरें, पडदणी, पासवडी, ताट, पाट, कवाड, उंबरवट, किंबहुना श्रीस्पर्श झालेली प्रत्येक वस्तु 'तया माझें दंडवत' अशा पूज्य दृष्टीनें ते पाहतात. महानुभावांच्या आचारधर्माची कल्पना चक्रधरोक्त सूत्रपाठावरून येऊं शकेल. त्यांत चक्रधर म्हणतात, कीं साधकानें स्वदेश, स्वग्राम आणि आप्तसंबंधी हीं सर्वथा त्याज्य मानावीं. कारण संग म्हणजे विषयसेवन आणि स्वधर्माची बुडवण. त्यांतून स्त्रीसंग तर फारच खोटा. 'स्त्री भणिजे मत्तद्रव्याचा रावो गा : आणिकें द्रव्यें सेविलेयां माजविती : स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी : चित्रींची स्त्री न पहावीं' (आचार, ९--१०). तेव्हां पुरुष आणि विषय यांचा सदाच शिवाशिवीचा खेळ चालला असल्यामुळें 'आपणेयातें कव्हणी नेणें ऐसां स्थानीं' (वि. २२) निःसंग होऊन राहावें हें बरें. कानड किंवा तेलंग देशीं न जातां 'महाराष्ट्रीं असावें' (वि. २४) असाहि चक्रधरांचा दंडक होता. ते म्हणतात, झाडातळीं राहून सदासर्वदा एक परमेश्वर आठवावा. त्याच्या स्मरणावांचून 'वंध्यु दिवसु जावों नेदिजे' (वि. ३२). तसेंच साधकानें आपल्या वैराग्याचें प्रदर्शनहि करूं नये. 'वैराग्य मिरवुं आवडे हाहि एकु विकारुचि कीं गा' (वि. ४५). निरस, निराश, निराश्रय होऊन आपलें उगीच असावें. मसणींचें लांकूड सुद्धां उपयोगीं पडतें; पण साधकाची निःसंगता अशी असावी, कीं चक्रधर म्हणतात त्याप्रमाणें 'तुमचेनि मुंगी रांड न होआवी' (वि. ५९-६०). 'जीतेनि मृताचां धर्मीं वर्तावें (वि. ७४). असलें वैराग्य आचरीत 'हाडांची रांगवळी' करून 'धड तुटलेंयाही परमेश्वरातें न सोडावें' (वि. ७४—७७) अशी त्यांची आज्ञा आहे. कारण सुखसाधनांनीं देव मिळणार नाहीं. या पंथांत साधक केवळ भिक्षेवर जगतो. ही भिक्षा कशी, केव्हां, कोठें व किती मागावी यासंबंधींहि नियम आहेत. 'प्राणासि आहारु देआवा, इंद्रियांसि नेदावा' (वि. ९७) या सूत्राप्रमाणें वागत पंथीयानें अहर्निश एक परमार्गाचें चिंतन करीत असावें. अन्य गोष्टच बोलूं नये. एक वेळ 'निद्रा कीजे, परि अन्यवार्ता न कीजे' (वि. १५१). षड्रिपूंचा त्याग हाच संन्यास, आणि अहंतेचें मूळ सकंद उपटून शांतीचें रोप लावणें हाच परमार्थ. या वृत्तीनें 'देवो माझा, मी देवाचा ऐसेया परी' असावें (वि. २०५). महानुभाव कठोर आत्मपरीक्षणास अति महत्त्व देतात. आपलें मात्रागमन दिसत नाहीं, दुसऱ्याचें वेश्यागमन मात्र दिसतें (वि.१७५), असा

मनुष्यस्वभाव असल्यामुळें प्रत्येकानें निरंतर अंतर्मुख असावें. जशी वैराग्याची तशीच गुरुभक्तीचीहि सीमा या पंथांत आढळते. श्रीमूर्तिसंबंधाचे ' ओटे गोटे आदिकरौनि नमस्करणीय ' मानावे असा चक्रधरांचा दंडक आहे ( वि. १८६ ). पंथांतील महात्म्यानें कसें वागावें याविषयींहि कांहीं संकेत आहेत. ' उजळलेयाचेनि संगें मैळला उजळे ' ( वि. २०३ ), हें तत्व ध्यानीं धरून महात्म्यानें स्वतः तरावें व इतरांना तारावें. ज्याच्यायोगें धर्माला धर मिळणार अशा महात्म्यानें ' प्रियवक्तेया होआवें : सत्यार्जवा होआवें ' (वि. १८८–१८९). हा परमार्ग कठिण तर खराच; पण असें पहावें, कीं एका लेंकराच्या सुखाकरितां आई सातापांचांचा सासुरवास सहन करिते, मग विश्वपति जो परमेश्वर त्याकरितां जगाचा सासुरवास कां न सहन करावा ? ( वि. २२६ ). हें दिव्य करूं इच्छिणाऱ्या साधकास ' वरि पडतें आकाशु धरिजैल : नं भीया हो ' ( विं. १०३ ), असें चक्रधरांचें आश्वासन आहे.

## महानुभाव पंथ अप्रिय कां ?

महानुभाव पंथाच्या अप्रियतेची मीमांसा करितांना सारस्वतकारांनीं जीं कारणें पुढें केलीं आहेत त्यांचा पुनर्विचार करणें अवश्य आहे. यादवकालांत राजघराण्यांतील कांहीं ठळक व्यक्तींची या पंथाकडे दिसून येणारी ओढ, यादवांच्या पश्चात् पंथीयांनीं मुसलमान राज्यकर्त्यांकडून युक्तिबळावर मिळविलेल्या कांहीं खास सवलती, औरंगजेबासारख्या धर्मवेड्या बादशहानें महानुभावांस जेझिया कर माफ करून पर्यायानें त्यांजवर केलेलें अहिंदुत्वाचें शिक्कामोर्तब, इत्यादि ऐतिहासिक घटनांचा निर्देश करून त्याबरोबरच महानुभाव संन्याशांची भिन्न राहणी, विटाळशी-चंडाळशीच्याहि अस्पृश्यतेचा अभाव, त्यांचा पेहेराव व रूढ चालरीतींची टाळाटाळ या गोष्टीहि या पंथाच्या अप्रियतेची कारणमीमांसा करतांना कै. भावे यांनीं निवेदन केल्या आहेत. परंतु त्यांचा खरा भर चातुर्वर्ण्यावर दिसतो. महाराष्ट्रास अतिप्रिय असें जें चातुर्वर्ण्य त्यावर आघात करून महानुभावांनीं समाजाचा रोष स्वतांवर ओढवून घेतला असें कै. भावे यांचें म्हणणें आहे. आजहि अनेकांच्या मनांत ही कल्पना घर करून आहे. वस्तुस्थिति मात्र निराळी दिसते. स्वतः चक्रधरांनीं कोठेंहि चातुर्वर्ण्यावर अघात केलेला नसून समाजाची बसलेली घडी विसकटावी अशा बुद्धीचे ते दिसत नाहींत. सामाजिक व्यवस्थेची मोडतोड करणें हें त्यांचें उद्दिष्ट नव्हतें व तसा उपदेशहि त्यांच्या वचनांतून कोठें आढळत नाहीं. उलट ' चातुर्वर्ण्ये चरेत् भैक्ष्यम् : या शास्त्राचि अनुसरिजे ' ( आचार, ८१ ), या सूत्रांतून त्यांच्या बुद्धीचें

औदार्य व सर्वसंग्राहकत्वच सिद्ध होतें. स्वतः चक्रधर अस्पृश्यता मानीत नसले तरी आपल्या शिष्यांनींहि ती मानूं नये असा त्यांचा आग्रह नव्हता. उलट, व्यवहारांत स्पृश्यास्पृश्य हा भेद ते पाळीत असल्याचें त्यांच्या चरित्रांतील कांहीं लीळा सांगतात. महारमांगासारख्या अस्पृश्यांचा विटाळ व विटाळशीचा विटाळ यासंबंधींचीं त्यांचीं मतें बुद्धिवादास पटतील अशींच आहेत. देहाचा विटाळ जीवास होऊं शकत नाहीं हें त्यांचें मत विवेकास धरूनच आहे. पण हीं मतें त्यांनीं कोणावरहि लादलीं नाहींत, किंवा सामाजिक स्थैर्यास उपयुक्त असे भेदाभेद दूर करून समाजाच्या व्यवस्थेसही त्यांनीं कोठें धक्का लाविला नाहीं. 'मनींचे अभिलाष निवर्तले तरि शुचिअशुचि यें दोहीं नाहीं' (आचार, १७८) हें चक्रधरोक्त सूत्र कै. भावे यांच्या आक्षेपाचा परिहार करण्यास पुरेसें आहे. महानुभाव विटाळ चांडाळ मानीत नाहींत हें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास असून तत्वाकडे दुर्लक्ष्य करण्यासारखें आहे. मनांतील संकल्पविकल्पांचा निरास होऊन तें निःसंग झाल्यावर शुचि व अशुचि हीं दोन्हीं त्यास सारखींच होत हें म्हणणें तर्कशुद्ध असून त्यास वारकरी संतांचाहि दुजोरा मिळेल. या दृष्टीनें लीळाचारित्रांतील कांहीं लीळा उल्लेखनीय आहेत. नित्य आचार निराळा व नैमित्तिक आचार निराळा हें सूत्र ध्यानांत ठेऊन वरील लीळा वाचल्यास त्यांतून विपर्यस्त अर्थ निघणार नाहीं. 'कर्मचांडाळापासि जातिचांडाळ चांगु' (आचार १४४) हें चक्रधरोक्त सूत्र त्यांची भूमिका स्पष्ट करण्यास पुरेसें आहे. शुचि-अशुचीचे आचारधर्म महानुभाव पूर्वी पाळीत व आजहि पाळतात. तात्पर्य, महानुभावपंथ अनाचारी आहे हें म्हणणें सर्वस्वीं निराधार व अज्ञानयुक्त आहे. महानुभावांचीं पूजास्थानें म्हणजे 'ओटे' याविषयींहि कांहीं गैरसमज पसरलेला दिसतो. हे ओटे रचण्यांत कोणताहि पाताळयंत्री उद्योग नसून त्यामागें साध्या मानवी स्वभावाचा इतिहास आहे. 'एथ्चेया संबंधा गेले तेतुले वोटेगोटे आदि करवुनि तुम्हां नमस्कारणीयें कीं गा' (आचार १८६) या चक्रधरोक्त सूत्राप्रमाणें ओट्यांची निर्मिति झाली असून हे ओटे म्हणजे चक्रधरांचीं स्मृतिस्थळेंच होत अशी पंथीयांची समजूत आहे. हे ओटे अनेक देवळांतून चक्रधरांच्या पूर्वीही होते व चक्रधरांचा त्यांच्याशीं संबंध आल्यानें पंथीयांस ते पूज्य होऊन बसले, इतकेंच.[1] कोणा बादशहाच्या फर्मानानें ते निर्माण झाले असें नाहीं. महानुभावांच्या मूर्तिपूजाविषयक दृष्टिकोणाचा विचारहि येथें केला पाहिजे. महानुभाव मूर्तिपूजक नसल्यानें मूर्तिभंजक अशा मुसलमानांना ते अधिक जवळ होते व या गोष्टीचा फायदा घेऊन त्यांनीं मुसलमान बाद-

---

१. लीळा चरित्र—एकांक, पृ. २२, ३०; उत्तरार्ध, लीळा ३२३, ३५५

शाहाकडून कांहीं सवलती मिळवल्या व इस्लामच्या डोळ्यांत खुपणार नाहींत असे ओटे महाराष्ट्रभर निर्माण केले, हें कै. भावे यांनीं मांडिलेलें मत सदोष आहे. लीळाचरित्रांतील अनेक लीळांवरून असें दिसतें, कीं चक्रधर हे मूर्तिभंजक तर नव्हतेच, उलट कोणत्याहि हिंदु देवस्थानाकडे ते पूज्य भावनेनेंच पहात. 'वैरियाचा देवो जाला तरि काइ दगडें फोडावा?' हें त्यांच्या तोंडचें प्रसिद्ध वाक्य त्यांची परमतसहिष्णुताच दर्शवितें (लीळाचरित्र, पूर्वार्ध, क्र. १९८). परमेश्वराचें स्मरण कसें करावें हें सांगतांना चक्रधरांनीं नाम, लीला व चेष्टा यांबरोबरच मूर्तीहि स्मरणीय म्हणून सांगितली असून त्यांनीं दिलेल्या 'कठियाच्या दृष्टांतांत' हि मूर्तिपूजेचें समर्थनच आहे. महानुभाव पंथाची स्थापना होऊन सहासातशें वर्षें झालीं, पण या दीर्घ कालांत महानुभावीयांनीं मूर्तिभंजन केल्याचें एकहि उदाहरण नाहीं. महानुभावांनीं आपण मूर्तिपूजक नाहीं, अर्थात् हिंदुहि नाहीं या सबबीवर औरंगजेबाकडून जेझिया कराची माफी मिळविली होती हाहि एक गैरसमज आहे. कारंजकर बुवा (मठ उमरावती) यांच्या सनदेवरून व संशोधक श्री. खरे यांच्या एका टिपणावरून पाहतां जेझिया हा कर सर्व प्रकारच्या साधूंना माफ होता, केवळ महानुभावांस ही खास सवलत म्हणून दिलेली नव्हती, हें सिद्ध होत आहे. तेव्हां आपण मूर्तिपूजक नाहीं हें मुसलमानांस दाखविण्यासाठीं म्हणून महानुभावांनीं 'ओटे' घातले हें म्हणणें चुकीचें आहे. आतां 'मूर्खस्य प्रतिमापूजा' या तात्त्विक भूमिकेवरून मूर्तिपूजेंतच मग्न होऊन न जातां साधकानें त्यापलीकडे जावें असें चक्रधरांनीं म्हटलें असेल तर त्यांत गर्हणीय असें कांहींच नाहीं. ज्ञानेश्वरांनींहि नित्य नवे देव मांडून त्यांची उपासना करणाऱ्यास बोलच लाविला आहे. महानुभावांत सारा भ्रष्टाकार आहे या रूढ कल्पनेसहि त्यांच्या तत्वज्ञानांत कोठें आधार नाहीं. चक्रधरोक्त आचारविषयक सूत्रांतून भ्रष्टाकार शिकविलेला नसून त्यांत सुनीतीचीच शिकवण आहे. तसेंच हा पंथ पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि संन्यासाची दीक्षा देतो हें रूढ मत म्हणजे एक अर्धसत्य असून पंथीय तत्त्वज्ञानाचा विपर्यास करणारें आहे. विधवा स्त्रिया या आधींच संन्यस्त वृत्तीनें राहत असल्यामुळें त्यांना

१. लीळाचरित्र--पूर्वार्ध खंड ३, पृ. २१, २५; एकांक पृ. ४३ ते ४७; उत्तरार्ध लीळा १५, ९१, १०७, १८२, २५०, ३०९.

२. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १६, अं. ६३-६४; 'महाराष्ट्र' (नागपूर) ता. ९ जानेवारी १९३८.

३. 'केसरी' (पुणें) ता. १५ मे १९३६

निराळा संन्यास नको, त्यांनीं 'देवो माझा, मी देवाचा' अशा अनन्य वृत्तीनें देवभक्ति करावी एवढाच त्यांचा धर्म, अशी स्पष्ट सूचना सूत्रपाठावरील 'प्रकरणवशां'त आहे. तात्पर्य, वरीलपैकीं कोणत्याहि कारणानें महानुभाव पंथाच्या अप्रियतेची मीमांसा होऊं शकत नाहीं. आमच्या मतें या अप्रियतेचें रहस्य पंथाचे संस्थापक व प्रेरक म्हणजे अनुक्रमें चक्रधर व गोविंदप्रभु यांच्या कांहीं विशिष्ट आचारांत असावें. या दोनहि व्यक्ति थोर व विशुद्ध मनाच्या असतील; परंतु त्यांच्या हातून समाजाच्या दृष्टीनें विपरीत असें वर्तन घडल्याचे निर्देश खुद्द म्हाइंभटाच्या चरित्रग्रंथांतून आढळतात. 'मार्गाधारें वर्तावें' हें ज्ञानेश्वरांचें तत्व वरील दोघांच्या आचारांत तितकें दिसत नाहीं. चक्रधर व गोविंदप्रभु हे स्वतः जीवन्मुक्त असतील; पण जीवन्मुक्तानेंहि लौकिक सांभाळून वागावें लागतें या तत्वाचा विसर पडल्यानें त्यांचा पंथ समाजांत अप्रिय होऊन बसला असावा.

**अभ्यासाचीं साधनें—**


वि. भि. कोलते : महानुभावांचें तत्वज्ञान.

वि. भि. कोलते : महानुभावांचा आचारधर्म.

ह. ना. नेने : चक्रधरोक्त सूत्रपाठ ( प्रास्ताविक ).

आर. ई. एन्थोवेन् : Monograph No. 131 ( Ethnographical Survey of Bombay ).

वि. भि. कोलते : महानुभाव पंथ कीं परमार्ग ? ( लोकशिक्षण, वर्ष ७, अं. ४, ५ ).

मुकुंदराज आराध्य : ब्रह्मविद्याशास्त्र ( हिंदी ).

वा. ना. देशपांडे : महानुभावांचा वेद (वि. विस्तार, १९२७).

वि. भि. कोलते : ज्ञानेश्वर आणि चक्रधर ( मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९५० ).

गो. का. चांदोरकर : मानभावांची उत्पत्ति (ऐति. विविध विषय, खं. १, पृ. २७३...).

ह. ना. नेने : लीळाचरित्र ( एकांक, पूर्वार्ध व उत्तरार्ध ).

गं. बा. सरदार : वारकरी पंथ व महानुभावपंथ.


( संतवाङ्मयाची फलश्रुति )



## प्रकरण : ४ महानुभाव–आद्य–ग्रंथ

'महाराष्ट्र-सारस्वता' ची रचना झाल्यानंतरच्या अलीकडील काळांत डॉ. य. खु. देशपांडे, श्री. ह. ना. नेने, डॉ. वि. भि. कोलते, श्री. वा. ना. देशपांडे इत्यादि संशोधकांच्या परिश्रमांमुळें महानुभावीय वाङ्मयाच्या इतिहासांत तपशीलाच्या दृष्टीनें पुष्कळच भर पडली आहे. ती जमेस धरून प्रस्तुत प्रकरणास पुढील पूरणिका जोडीत आहों.

**म्हाइंभटकृत चरित्रग्रंथ**—म्हाइंभट हा मूळचा नगर प्रांतांतील सारोळें या गांवचा एक गर्भश्रीमंत ब्राह्मण. गणपति आपयो नांवाच्या विद्यागुरुपाशीं पूर्वाध्ययन करून पुढील शास्त्राभ्यासासाठीं तो तेलंगणांतील विद्यानगरीला गेला. तेथून पूर्ण होऊन आल्यावर स्वतःच्या विद्वत्तेचा त्याला असा कांहीं गर्व चढला, कीं आपण इतरांना कसें तृणवत् लेखतों यांचें गमक म्हणून तो आपल्या पायांत गवताचा वांकी घालीत असे. पुढें गणपति आपयोच्या सूचनेवरून त्यानें डोमेग्रामीं श्रीचक्रधरांची भेट घेतली व तेव्हांपासून त्याचा वृत्ति एकदम पालटली. तो देहानें स्वगृहीं परतला, पण त्याचें मन मात्र चक्रधरांपाशीं राहिलें. ही वैराग्योर्मि असह्य होऊन पुढें लौकरच म्हाइंभट सरळ रिधपुराला आला व गोविंदप्रभूस अनुसरला. मात्र अजूनही त्याच्या चित्तांत सूक्ष्म अहंकार होताच. नागदेवाचार्यास तो तुच्छतेनें 'सुंठदेव' म्हणे व स्वतःस मात्र 'योगभ्रष्ट' म्हणवी. परंतु एकदां नागदेवाचार्यांच्या तोंडून "योगभ्रष्ट तव माझिये दशेचा नव्हे, मा तुमचिये दशेचा काइ होईल!" अशी स्पष्टोक्ति एकून तो मनांत वरमला. म्हाइंभटाबरोबर त्याची बायको देमाइसा हीहि मानभाव पंथांत आली. पण तिची वागणूक बरी नसावी असें वाटतें ( गो. चरित्र, १९७–८ ). स्वतः म्हाइंभट मात्र गुरुकुलाशीं आमरण एकनिष्ठ राहिला. तो सदा गोविंदप्रभूच्या आसपास असावयाचा. "म्हाइंभटातें श्रीप्रभुदास्यावेगळें जो दाखवी तयासी मी महावाक्य वाखाणीन" (स्मृतिस्थळ, २४७ ) अशी होड भटोबासांनीं घातली होती ती उगीच नव्हे. "तुम्हा माझेया चक्रस्वामीचिया धुरा" हा आउसेनें म्हाइंभटाविषयीं व्यक्त केलेला अभिप्राय अनेक दृष्टींनीं सार्थ आहे ( स्मृ. १९७ ). चक्रधर आणि गोविंदप्रभु यांच्या चरित्ररचनेचें कार्य संपविल्यानंतर "माझें कांहीं वोखटें नेघावें" अशी विनवणी भटोबासांना करून म्हाइंभटांनीं देह ठेविला ( स्मृ. १९८ ). म्हणजे त्यांचा मृत्युकाळ इ. स. १३०० च्या आसपास येतो.

म्हाइंभटाचें नांव मुख्यतः चरित्रकार म्हणून ऐकूं येतें. 'लीळाचरित्र' व

'गोविंदप्रभुचरित्र' हे त्याचे दोन प्रमुख ग्रंथ होत. याशिवाय महदंबाकृत 'धवळ्यां' तील उत्तरार्धांत त्याचा कांहीं भाग असणें शक्य आहे (स्मृ. १७४). म्हाइंभटाच्या नांवावर कांहीं गोड आरत्याहि आढळतात. 'श्रीकृष्ण चरित्रा'चा कर्ताहि प्रो. कोलत्यांच्या मतें तोच ठरतो. असो. म्हाइंभट हा मराठी भाषेतील आद्य चरित्रकार असून या कामीं त्यानें विशेष परिश्रम घेतलेले दिसतात. 'लीळा--चरित्र' रचतांना चक्रधरांच्या आठवणी जेथें म्हणून मिळणें शक्य होतें तीं सर्व ठिकाणें त्यानें धांडोळल्याचा निर्वाळा 'स्मृतिस्थळ' कार देतात (स्मृ. १४०). पंथीयांपाशीं एकेक आठवणींची भीक मागून म्हाइंभटानें हा लीळासंग्रह सिद्ध केला व पुढें त्यावर नागदेवाचार्यांचा हात एकवार फिरल्यावर तो पूर्ण दशेस आला. आठवणी गोळा करणें, त्या निवडणें, त्यांतील खऱ्याखोट्याची पारख करणें, त्या एका सूत्रांत ओवणें इत्यादि अनेक संस्कारांनीं युक्त असा ग्रंथोद्योग कौतुकास्पद आहे. स्मृतिसंकलनकार या दृष्टीनें म्हाइंभट श्रेष्ठ ठरतो.

'लीळाचरित्रा' ची रचना चक्रधरांच्या प्रयाणानंतर म्हणजे शके १२००-च्या सुमारास झाली असावी. 'लीळाचरित्रा' चे एकूण तीन भाग असून त्यांना अनुक्रमें एकांक, पूर्वार्ध व उत्तरार्ध अशीं नांवें आहेत. 'गोविंदप्रभुचरित्र' किंवा 'ऋद्धिपूरचरित्र' हा दुसरा ग्रंथ गोविंदप्रभूंच्या पश्चात् म्हणजे शके १२१०-च्या सुमारास निर्माण झाला.

कै. भावे यांच्या मताप्रमाणेंच डॉ. य. खु. देशपांडे[१] व श्री. वा. ना. देशपांडे[२] यांच्या मतेंहि 'श्रीकृष्ण–चरित्रा'चा लेखक भास्कर कवीश्वर हाच दिसतो. परंतु डॉ. कोलते यांचें मत निराळें असून तें अधिक सयुक्तिक वाटतें. डॉ. कोलते[३] यांच्या मतें 'श्रीकृष्ण-चरित्रा' चें कर्तृत्व म्हाइंभटाकडेच जातें. कारण एकतर 'वृद्धाचार' किंवा 'वृद्धान्वय' यांपैकीं एकाहि ग्रंथांतील जंत्रींत भास्कराच्या नांवावर प्रस्तुत गद्य चरित्रग्रंथाचा उल्लेख नाहीं. दुसरें म्हणजे अशा प्रकारचे सर्व चरित्रग्रंथ म्हाइंभटानें लिहिल्याचा पुरावा उपलब्ध आहे.

### बाइदेवबास-कृत 'पूजावसर'

कै. भावे ज्याचा उल्लेख भावेव्यास असा करितात त्याचें खरें नांव बाइदेवबास असें आहे. नागदेवाचार्य हे त्याचे दीक्षागुरु. नागदेवांच्या मृत्यूनंतर

---

१. महानुभावांचे चरित्रग्रंथ. (भा. इ. सं. मं. त्रै. १३–२)

२. विविधज्ञानविस्तार, ऑक्टोबर १९२८.

३. भास्करभट बोरीकर, पृ. ५५–५८.

महानुभाव पंथाचें आचार्यपद बाइदेवबासाकडे आलें. चक्रधर व गोविंदप्रभु या दोघांचेंहि सान्निध्य त्याला भरपूर लाभलें असल्यानें त्यांच्या पश्चात् त्यांच्या स्मृतिविषयांच्या दर्शनानें बाइदेवबास अति उदास होई. चक्रधरानें ज्या गांवाहून उत्तरेकडे प्रयाण केलें त्या 'बेलापुरा जाइन तरी तेथ बाइयाचें देह जाइल' या कल्पनेनें एकदां नागदेवाचार्यांनें त्या बाजूस जाण्याचें टाळलें. बाइदेवबास नागदेवाचार्यांच्या मृत्यूनंतर तीन वर्षांनीं म्हणजे शके १२३१ मध्यें मरण पावला. 'पूजावसर' किंवा 'नित्यदिनीलीळा' हा बाइदेवबासाचा प्रमुख ग्रंथ होय. त्यांत चक्रधरांच्या दिनचर्येचें अतिसूक्ष्म वर्णन आलें असून प्राचीन मराठी गद्याचा हा आदर्शच आहे असें म्हटल्यास चालेल. बाईदेवबास मोठा मार्मिक असावा. भास्कर कवीच्या शिशुपाळवधावरील 'कवीश्वर हो, ग्रंथु निका जाला : परि निवृत्ताजोगा नव्हेचि' हा प्रसिद्ध अभिप्राय बाइदेवबासाचा आहे ( वृद्धाचार, ९ ).

### "चक्रधरोक्त सूत्रपाठ" ( केसोबास–संकलित )

महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर हे पैठण येथें प्रगट झाल्यापासून तों शके ११९४-मध्यें ते उत्तरापंथीं प्रयाण करीपर्यंत त्यांचा ७-८ वर्षांचा जो काळ तो नित्य पर्यटनांत जात असे. या भ्रमंतींत ते अनेकांशीं चर्चा करीत. वादविवादाचे आखाडे घालून अजिंक्यपत्र मिळविणें हा जरी त्यांचा हेतु नसला तरी समर्पक असे व्यावहारिक दाखले देऊन विषय सुगम करण्याची हातवटी चक्रधरांपाशीं असल्यामुळें त्यांचें बोलणें सहजच परिणामकारक होई. मात्र आपलें बोलणें लेखनिविष्ट करून या तात्विक चर्चांना ग्रंथरूप देण्याचें त्यांच्या मनांत कधींच आलें नाहीं. पुढें चक्रधरांच्या प्रयाणानंतर त्यांच्या आठवणी म्हाइंभटानें आपल्या 'लीळाचरित्रां'त संग्रहित केल्या व याप्रमाणें 'मार्गासि उपयोगा जाईल' या बुद्धीनें त्यांचें बोलणें 'काळाक्षरीं प्रतिपन्न' करून ठेविलें. या 'लीळाचरित्रां'तून आलेलें चक्रधरांच्या तोंडचे सूत्रबद्ध सिद्धांत पुढें नागदेवाचार्यांच्या अनुज्ञेवरून केसोबासांनीं एकत्र केले व अशा रीतीनें 'चक्रधरोक्त सूत्रपाठा'ची सांप्रदायिक संहिता सिद्ध झाली.

या सूत्रपाठाचे संकलनकार केसोबास किंवा केशीराज बास हे मूळचे पापदंडी रामपुरीचे विद्वांस व्याख्याते असल्याचें 'स्मृतिस्थळ' कार सांगतात. नागदेवाचार्यांशीं झालेल्या चर्चेनें केसोबासांच्या अंगीं विरक्ति बाणली व त्यांचें शिष्यत्व पत्करून ते तरुणपणींच पंथांत प्रविष्ट झाले. केसोबासांचें मन पुनः संसाराकडे वळावें म्हणून त्यांच्या सासऱ्यानें प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण सारें व्यर्थ. प्रत्यक्ष त्यांच्या पत्नीनेंहि 'आतां हे

योगिये जाले ' असें म्हणून हात टेकले. भटोबासांनीं मात्र केसोबा यांचें हें तीव्र वैराग्य पाहून ' माझा केशवु शुकयोगींद्र कीं गा ' असें म्हणून परम समाधान मानिलें. केसोबासांची धर्मशास्त्रपटुत्वाविषयींहि ख्याति होती. ' केशवदेया, भटमार्गा वेधले जीव तुमचेया गळां झोंब्रतील गा ' अशा शब्दांत नागदेवाचार्यांनीं त्यांचें धर्मज्ञान गौरविलें आहे ' स्मृतिस्थळ ' कारांनीं पंथाची प्रतिष्ठा राखण्याबद्दल केसोबासांचा गौरव केला आहे. ते म्हणतात, 'एकें अनिष्ट आलेयां आपणेयातें राखिलें: एकें एकातें राखिलें: केशवदेनि मार्गातें राखिलें गा' ( स्मृ. १०६ ). केसोबासांच्या पंथसेवेची योग्यता नागदेवाचार्यांनीं चांगली जाणली होती. ते म्हणत, 'माझें शास्त्र माईंभटां लक्ष्मीधराचेनि नुजळेचि: तें पंडित केशवदेयासि चर्चा करितां उजळे: केशवदेया: मजमागां शास्त्र जाए ना ऐसें तुवां केलें: एणें शास्त्रें पुढां मार्गाचे झगडे तुटतील ' ( स्मृ. ६८, २२४ ). केसोबास हे खरे पंडित होते. ते, राघोभट व पंडित दामादरबास हे तिघेजण सदा शास्त्रचर्चा करीत. कवीश्वरबास त्यांना ' एक मूर्ति त्रये भागा ' असें म्हणत. या तिघांना ' शास्त्रसंवादेंविण जो उठितां बैसतां रिकामेया दाखवील तयासि मी होड सारीन गा ' याप्रमाणें नागदेवाचार्यांनीं एकदां पैज मारली होती ( स्मृ. २५२ ). केसोबास भटोबासांच्या नंतर शके १२३८-मध्यें मरण पावले.

' रत्नमालास्तोत्र ' हा केसोबासांचा पहिला ग्रंथ संस्कृतांत असून त्यांत त्यांनीं म्हाइंभटकृत ' लीळाचरित्रां ' तील अनेक लीळांचा संस्कृत पद्यांत अनुवाद केला आहे. केसोबासांची ही वाक्पूजा नागदेवाचार्यांना मानवली. परंतु ग्रंथरचना संस्कृतांत न करितां ती मराठींत करण्याविषयीं त्यांनीं त्यांस सुचविलें. त्याचा परिणाम होऊन केसोबास संस्कृताकडून मराठीकडे वळले व म्हाइंभटाच्या ' लीळाचरित्रां ' तून त्यांनीं चक्रधरोक्त 'सिद्धांतसूत्रपाठ' सिद्ध केला. सूत्रपाठ हा महानुभाव पंथाचा आदिग्रंथ असून प्रत्येक पंथीयाच्या तो नित्यपठनांत असतो. स्वतः चक्रधरानें एकहि ग्रंथ लिहिलेला नसला तरी हा सूत्रपाठ म्हणजे खरोखर चक्रधराच्याच उक्ती होत. त्यांचा संग्रह करून पंथीयांसाठीं त्याची अधिकृत पाठसंहिता सिद्ध करण्याचें श्रेय तेवढें केसोबासांकडे जातें. म्हणजे सूत्रपाठाच्या बाबतींत केसोबास हे केवळ संकलनकार ठरतात. हें संकलनाचें कार्य त्यांनीं शके १२०२-च्या सुमारास केलें असावें.

चक्रधरोक्त वचनांचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून पुढील महानुभावीय पंडितांनीं सूत्रपाठावर भाष्यें, महाभाष्यें, व्याख्यानें इत्यादि विविध व विपुल रचना केली आहे. पैकीं गुर्जरशिवव्यास व सिद्धांते हरिव्यास यांनीं

शके १३२५-च्या सुमारास रचिलेलें 'आचारस्थळ' महत्वाचें आहे.

**दृष्टांतपाठ ( केसोबास-संपादित )**

चक्रधरोक्त 'सूत्रपाठा', चे संकलनकार केसोबास यांच्याच लेखणींतून 'दृष्टांतपाठ' हा ग्रंथ उतरला आहे. 'दृष्टांतपाठ' हें चक्रधरांच्या उद्धरण-सिद्धांतावरील जणुं एक उपनिषदच असून त्यांत केसोबासांनीं चक्रधरोक्त तत्वज्ञान शास्त्रोक्त पद्धतीनें मांडून दाखविलें आहे. चक्रधरांची वाणी मूळांतच वेधवती होती व त्यांत त्यांच्या श्रोतृवर्गांत समाजांतील सर्व थरांचे प्रतिनिधि असल्यानें आपलें निरूपण सर्वांना समजावें म्हणून त्यांना तें व्यवहारांतील दृष्टांतांनीं सुगम करावें लागे. हे दृष्टांत एकुण ११४ असून ते चक्रधरांनीं आपल्या भ्रमंतींत पैठण, डोमेग्राम इत्यादि गांवीं मुख्यतः भटोबास म्ह. नागदेवाचार्य, महदाइसा, रामदेव आणि बाइसा या चार शिष्यांना अनुलक्षून सांगितले आहेत. दृष्टांतनिरूपणाचा काळ 'लीळा-चरित्रां' तील पूर्वार्ध-उत्तरार्धाचा म्हणजे स्थूलमानानें शके ११९० ते ९५ असा ठरतो. प्रत्येक दृष्टांताचे तीन भाग पडतात. प्रथम शिरोधार्य सूत्र, नंतर उदाहरण किंवा दृष्टांत, व शेवटीं दार्ष्टांतिक. पैकीं सूत्र व दृष्टांत चक्रधरोक्त असून दार्ष्टांतिकच तेवढें केसोबासांचें आहे. चक्रधरोक्त सूत्रें व दृष्टांत यांचा काळ वर लिहिल्याप्रमाणें शके ११९० ते ९५-च्या दरम्यानचा असून केसोबासांनीं आपलें दार्ष्टांतिक चक्रधरांच्या पश्चात् गोविंदप्रभूंच्या सन्निधानांत शके १२०२-च्या आसपास तयार केलें असावें. दोघांच्या भाषा-शैलींत पुष्कळच फरक आहे. चक्रधरांची सरणी जिवंत व अकृत्रिम तर केसोबासांची तर्ककर्कश व पंडिती वळणाची वाटते. असो. 'दृष्टांतपाठा'-वर विवरणात्मक असे पांचपन्नास ग्रंथ असून त्यांत विश्वनाथ बासांचें 'दृष्टांतस्थळ' व मुरारी बासांचें 'दृष्टांतमालिकाभाष्य' हे दोन टीपग्रंथ महत्वाचे आहेत. दृष्टांताचें लक्षण आनेराजांनीं आपल्या 'बत्तीस लक्षणी टीपेंत' केलें असून त्यावर पुढें जी मराठी व्याख्यावृत्ति तयार झाली तींतहि दृष्टांतविषयक चर्चा आढळते. स्वतः केसोबासांनीं दृष्टान्तपाठाचें एक 'लापणिक' म्हणजे विषयानुक्रमें पृथक्करणात्मक अशी अनुक्रमणिका तयार केलेली असून तिची उपयुक्तता निर्विवाद आहे.

**स्मृतिस्थळ ( नरेंद्र-परशराम कृत )**

'स्मृतिस्थळ' हा लीळाचरित्राच्या तोडीचा असा चरित्रग्रंथ आहे. त्यांत महानुभाव पंथाचा आद्य प्रचारक नागदेवाचार्य याचें चरित्र आठ-वणींच्या रूपानें आलेलें असून शिवाय आघाडीच्या मानभाव ग्रंथकारांची माहिती करून देणारा संदर्भग्रंथ म्हणूनहि त्याचें महत्व आहे. स्मृति-

स्थळाचे संपादक वा. ना. देशपांडे यांच्या मतें 'स्मृतिस्थळा'चा लेखक कोणी एक असा नसून अनेकांच्या पाठांचें हें संकलन आहे. तरी पण नरेंद्र व परशराम हें मूळ लेखक किंवा स्मृतिकार, आणि मालोबास व गुर्जर शिवबास हे संस्करणकार असावे असें मानण्यास आधार आहे. 'अन्वयस्थळ'-कार म्हणतात, 'नरेंद्रबासीं रुक्मिणीस्वयंवर केलें: आणि सातसें स्मृती जैसिया वर्तल्या तैस्याचि लिहिल्याः' अर्थात् या सर्व स्मृति आज कोणत्याच पाठांत उपलब्ध नाहीं. 'स्मृतिस्थळा'ची रचना नागदेवाचार्यांच्या मृत्यूनंतर लौकरच झाली असल्यानें त्याचा रचनाकाल शके १२३०-च्या आसपास ठरतो. स्वतः स्मृतिकार ग्रंथरचनेच्या कामांत कुशल दिसतात. पैकीं परशरामबास हा धर्मवार्ता करण्यांत निपुण असून त्याचें व्याख्यान-चातुर्य पाहून आनोबासानें एका समयीं "परशरामाचें बोलणें तें गगना गवसणी कीं" असें म्हटल्याचें प्रसिद्ध आहे. दुसरा स्मृतिकार नरेंद्र हा कवि म्हणून प्रसिद्धच आहे.

श्रीचक्रधर हा जसा 'लीळाचरित्रा'चा त्याप्रमाणें नागदेवाचार्य हा 'स्मृतिस्थळा'चा मुख्य विषय होय. नागदेव किंवा भटोबास हा महानुभाव पंथाचा आद्याचार्य स्वतः लेखक नसला तरी म्हाइंभट, बाइदेवबास, केसोबास इत्यादि थोर ग्रंथकारांचा मार्गदर्शक होता. चक्रधरांच्या मागें त्यांच्या लीला आणि विचार यांचा संग्रह करविण्याचें सर्व श्रेय नागदेवाचार्यांकडे जातें. म्हणजे तो ग्रंथकारांचा ग्रंथकार ठरतो. त्याच्या हयातींत पंथाचा प्रसारहि सपाटून झाला. चक्रधरानंतर एवढी मोठी व्यक्ती मानभावांत दुसरी नाहीं. असो. नागदेवाचार्यांचा मृत्युशक सांप्रदायिकांच्या मतें शके १२२४, वा. ना. देशपांड्यांच्या मतें शके १२३१ व प्रो. कोलत्यांच्या मतें शके १२२८ असा आहे.

**साती ग्रंथः—**

महानुभावांच्या 'साती ग्रंथां'त पुढील काव्यांचा समावेश होतो—

१ वच्छहरण ( दामोदर पंडित ) शके १२००
२ रुक्मिणी-स्वयंवर ( नरेंद्र ) शके १२१४
३ शिशुपालवध ( भास्कर ) शके १२३०
४ उद्धवगीता ( भास्कर ) शके १२३०
५ ज्ञानप्रबोध ( विश्वनाथ बाळापूरकर ) शके १२५३
६ सैह्याद्रि-वर्णन ( रवळो व्यास ) शके १२५५
७ ऋद्धिपूरवर्णन ( नारो व्यास बहाळिये ) शके १२८५

वरील सर्व काव्यें ओंवीबद्ध असून त्यांतील पहिलीं चार कृष्णचरित्रपर,

'ज्ञानप्रबोध' व 'उद्धवगीता' हीं तात्विक व शेवटचीं दोन वर्णनपर आहेत. त्यांचा रचनाकाल तेराव्या शतकाचा बराचसा भाग व्यापून असला तरीं या 'साती ग्रंथां'ची गणना महानुभावांच्या आद्य ग्रंथांत होत असल्यानें त्यांची चर्चा याच प्रकरणांत करणें इष्ट आहे.

'वच्छहरणा'चा लेखक दामोदर पंडित हा महानुभाव पंथांतील एक मोठा अधिकारी पुरुष होऊन गेला. याच्या बायकोचें नांव हिराइसें किंवा हिरांबा. या दोघांनाहि नागदेवाचार्यांपासून 'श्रवण' घडलेलें असलें तरी सर्वसंगपरित्याग करून पंथाची दीक्षा घेण्याचा निर्धार प्रथम हिराइसेनें केला व तसा तो पतीजवळ तिनें बोलूनहि दाखविला. यावर पंडितांनीं उत्तर केलें, 'तुम्ही भीक्षा करा : मी पुत्राचा विवाहो करीन : मग भीक्षा करीन : तुम्ही जा' याप्रमाणें पंडित प्रपंचांतच रमले आणि हिराइसा प्रपंच सोडून पंथांत शिरली. पुढें पुत्रविवाह झाला, पण त्यानंतर ठरल्या-प्रमाणें संसारत्याग मात्र न करितां पंडित त्यांतच गुंतून राहिले. हें पाहून हिराइसा संतापली, आणि 'जिये चुलीची खीर खादली तिये चुलीची काइ राख खाल?' असा कडक निरोप तिनें नवऱ्याला पाठविला. यावर मात्र पंडित वरमले आणि 'आतां ही कोपली' असें पाहून ते सरळ घरांतून निघाले व नागदेवाचार्यांना अनुसरले. यापुढील आपलें सर्व आयुष्य त्यांनीं एका गुरुसेवेंत वेंचलें. दामोदरपंडितापाशीं गाण्याचें अंग चांगलें होतें. इतकें कीं, 'पंडिताचें गीत तें माझें हाकारें गा!' असा अभिप्राय त्यासंबंधीं प्रत्यक्ष नागदेवाचार्यांनीं दिला होता (स्मृ. ८९–९१). असो. नागदेवाचार्यांच्या शिष्यवर्गांत दामोदरपंडित आणि केशीराजबास या दोघांची योग्यता फार मोठी होती असें दिसतें. 'तुम्ही माझे डोळे कीं गा पंडिता केशवद्या' असें नागदेवाचार्य त्यांच्यासंबंधीं म्हणत. तसेंच आपल्या अध्यात्मशास्त्राला या दोघांशिवाय तिसरा कोणीहि उजळा देऊं शकणार नाहीं असा या शिष्यद्वयाच्या पांडित्याबद्दल त्यांना विश्वास होता. दामोदरपंडित हा पंथीयांत केवळ 'पंडित' या नांवानें ओळखला जाई. नागदेवाचार्यांच्या अंतकाळीं त्यांना पुराण वाचून दाखविण्याचा अखेरचा मान या दामोदरपंडितास मिळाला होता आणि गुरूच्या देहपाताची स्पष्ट सूचनाहि त्याला स्वप्नरूपानें झाली होती (स्मृ. २५८–२५९). नागदेवाचार्यांच्या निधनानंतर त्यानें एक 'वियोगधुवा' रचिला आहे. आपला गुरुबंधु केशीराजबास याजविषयीं दामोदरपंडिताच्या मनांत इतका प्रेमादरभाव होता, कीं 'वच्छाहरणा'च्या शेवटीं 'भणे मुनी केशवराजु' (ओंवी ५०२) असें म्हणून ग्रंथकर्तृत्व आपल्या गुरुबंधूकडे देण्याचें सौजन्य

त्यानें दाखविलें आहे. त्याच्या आणि नामदेव शिंप्याच्या भेटीची एक आठवण स्मृतिस्थळांत आली आहे; ती अशी—" एकु दिसु नामदेव सींपा पंडितबासासि भेटलाः चर्चा केलीः पंडितबासीं खंडीलाः मग उपदेसु मागों लागलाः परि नेदीतिचिः मग कृष्ण-अवतारावरि बुधि आणिलीः मग तेणें ' दिस गेले वायावीण ' यें पदें केलीं " ( स्मृ. २४४ ). हा नामा शिंपी कोण ? आठवणीच्या मथळ्यांत ' स्मृतिस्थळ ' कार " वीष्णुदास नामदेया पंडितमुखें वेधु—संक्रमण " असें म्हणतो. अर्थात् हा नामदेव म्हणजे ' नामा विष्णुदास ' या नांवानें ओळखला जाणारा मराठी कवि निश्चित नव्हे. कारण तो दामोदरपंडितांचा समकालीन असणें शक्य नाहीं. असो. नागदेवाचार्यांच्या निधनानंतर कांहीं वर्षांनीं दामोदरपंडित लाजी वैरागराकडे गेले व तिकडेच शके १२२६-च्या सुमारास त्यांचें देहावसान झालें. त्यांची पत्नी हिराइसा ही त्यांच्या मागें जिवंत होती. तिचीहि योग्यता मोठी दिसते. पतिपुत्रनिधनाची वार्ता ऐकून ' भलें केलेंः जे का भवचक्रापासौनि मुंचिले तेहीं ईश्वरपद लाहिलेंः भणओनि मी आजि निश्चितु जालें', असे विवेकयुक्त उद्गार जी स्त्री काढते तिच्या स्थितप्रज्ञतेविषयीं कोण संशय बाळगील ? नागदेवाचार्य तर हिराइसेला 'विरक्ताची कसवटी'च मानत. 'इचां कसीं उतरला तो विरक्त' असा त्यांचा तिजविषयीं अभिप्राय आहे (स्मृ. २४१). हिराइसेच्या अंगीं थोडी कवित्वशक्तिहि असून तिनें एक 'नाममहिमावर्णन' रचिलें असल्याचें भावे-सूचि[1] सांगते.

दामोदर पंडितांच्या नांवावर कांहीं पदें, चौपद्या, अष्टकें, धुवे, आणि ओंव्या आढळतात. किंबहुना या प्रकारच्या उत्स्फूर्त काव्यरचनेंत त्यांचा हातखंडा असावा असें दिसतें. त्यांना स्वतः कवनें रचून तीं गात बसण्याचा छंदच असावा असें ' विजनीं बैसती : आणि धुवा वोवी चौपदी गीतु यैसें आवडे तें म्हणती ' या स्मृतिस्थळांतील उल्लेखावरून वाटतें ( स्मृ. ८८ ). दामोदरपंडिताचें विशेष प्रसिद्ध काव्य म्हणजे ' वच्छहरण '. भागवतांतर्गत दशमस्कंधांतील कथेला धरून रचिलेलें सुमारें पांचशें ओंव्यांचें हें काव्य पंडितांनीं शके १२००-मध्यें रचून पुरें केलें.

**रुक्मिणीस्वयंवर** ( नरेंद्रकृत ):—" साती ग्रंथां"च्या टीपग्रथावरून असें दिसतें, कीं नरेंद्राचें हें काव्य महानुभाव पंथांत आलें तें अपूर्णावस्थेंत आलें. पंथीयांजवळील पोथ्यांतून सर्वत्र या काव्याच्या एकूण ८७९ च ओंव्या आढळतात व तेथें ग्रंथ अपूर्ण राहिलेला स्पष्ट दिसतो. श्रीकृष्णराजदादा पारिमांडल्य यांच्याच संग्रहीं तेवढीं या काव्याची संपूर्ण

---

१. कवि-काव्य सूचि ( वि. ल. भावे ). पृ ३२.

हस्तलिखित प्रत असून तींत एकूण ओव्या २९३४ आहेत. नरेंद्राचें मूळ काव्य १८०० ओव्यांचें होतें. यासंबंधीं 'स्मृतिस्थळ'कार व 'टीप'कार यांत एकवाक्यता आहे. तेव्हां प्रश्न असा, कीं १८०० ओव्यांचा हा मूळ ग्रंथ वाढवून २९३४ ओव्यांचा कोणीं व केव्हां केला? नरेंद्रानेंच स्वतः महानुभाव पंथांत आल्यावर तो वाढविला असेल असें वाटत नाहीं. कारण तसें असतें तर 'स्मृतिस्थळ', 'वृद्धाचार' किंवा 'अन्वयस्थळ' यांपैकीं एका तरी ग्रंथांत या वाढीचा उल्लेख येणें अवश्य होतें. प्रो. कोलते[1] याचें अनुमान असें आहे, कीं पुढें शके १६७७-च्या सुमारास तळेग्रामकर केशवदेयानें मूळ १८०० ओव्यांचा हा ग्रंथ त्यांत स्वतःच्या रचनेची भर घालून तो २९३४ ओव्यांपर्यंत वाढविला असावा. या वाढविलेल्या भागांत जी पुनरुक्ति आढळते ती कां व कशी आली याविषयीं जिज्ञासूंनीं श्री. नेने[2] यांनीं केलेलें विवेचन वाचण्यासारखें आहे.

आज आपणांसमोरील 'रुक्मिणीस्वयंवरा'च्या नरेंद्रकृत ओव्या ८७९ च आहेत एवढें खरें. श्रीकृष्णराजदादांच्या जवळील संपूर्ण प्रतींत आढळणारी शकदर्शक ओंवी नरेंद्राची नाहीं हेंहि उघडच आहे. परंतु ती अविश्वसनीय मात्र नाहीं. त्यावरून या काव्याचा रचनाकाल शके १२१३ असावा असें कै. भावे, य. खु. देशपांडे[3], वा. ना. देशपांडे[4] व ह. ना. नेने यांचें म्हणणें आहे. प्रो. कोलते[5] यांच्या मतें तो शके १२१४ असा आहे. या काव्याशिवाय सातशें आख्यायिकांचा एक 'स्मृति'ग्रंथहि नरेंद्रानें लिहिला असल्याचें 'अन्वयस्थळ'कार सांगतात. असो. नरेंद्राच्या प्रस्तुत काव्याचा थाट महाकाव्यास साजेल असा आहे. भीमकाच्या राजसभेंत रुक्मिणीचें सख्यांसह आगमन, किन्नरानें गायिलेली व रुक्मिणीचें अंतःकरण वेधून टाकणारी कृष्णकथा, रुक्मिणीची विरहावस्था, त्यावरील उपचार, सायंकाळ, चंद्रोदय, वनोपवनें इत्यादींचीं सालंकृत वर्णनें यांवरून नरेंद्राच्या मनांत महाकाव्याची उभारणी करावयाची होती असें वाटूं लागतें. नरेंद्राजवळ अलंकारवैभवानें नटलेलें कल्पनासौंदर्य आहे, त्याप्रमाणेंच भावनेनें ओलावलेलें रसमाधुर्यहि आहे याचा प्रत्यय त्याचें काव्य वाचतांना पदोपदीं येतो. किंबहुना आपली कल्पनासृष्टि त्यानें रसपरिपोषार्थंच उभारिली आहे.

---

१, रुक्मीणी–स्वयंवर ( नरेंद्र ) प्रस्तावना, पृ १७.

२. भा. इ. सं. मं. त्रै. सप्टेंबर, १९३४.

३. 'स्मृतिस्थळ' प्रस्तावना, पृ. ५.

४. भा. इ. सं. मं. त्रै. ( सप्टेंबर, १९३४.)

५. 'रुक्मिणी–स्वयंवर,' प्रस्तावना, पृ. १७.

नवरसांची पाणपोई किंवा स्वर्गसुखाचा सोपानच अशी ही कथा मूळचीच अति गोड. त्यांत नरेंद्राच्या प्रतिभेचा उजळा मिळाल्यानें ती अधिकच सरस उतरली आहे. कृष्णचरित्र हें सुखाचें छत्र असून तें मराठी भाषेंत गाऊन मी जग आनंदाच्या भोजें नाचवीन हें नरेंद्राचें प्रतिज्ञोत्तर खरें ठरलें आहे.

### शिशुपालवध व उद्धवगीता ( भास्करकृत )

भास्करभट्ट कवीश्वराच्या चरित्राविषयीं कै. भावे यांनीं लिहिलेला मजकूर केवळ ऐकीव माहितीवरून लिहिलेला असल्यानें पूर्णपणें विश्वसनीय नाहीं. विशेषतः भास्कराचें पूर्वचरित्र, त्याच्या ग्रंथरचनेचा काळ व त्याच्या नांवावर आढळणारे गद्य चरित्रग्रंथ यांविषयीं 'सारस्वत'कारांनीं दिलेली माहिती अर्धीकच्ची असल्यानें तिची नीट पारख होणें अवश्य आहे. भास्कराचें चरित्र अजमाविण्याचीं विश्वसनीय अशीं साधनें मुख्यतः चार—१ स्मृतिस्थळ किंवा नागदेवचरित्र, २ वृद्धाचार, ३ 'इतिहास' नामक महानुभावीय चरित्रविषयक प्रकरण व ४ 'साती ग्रंथां'च्या तृतीय शोधनीच्या टीपग्रंथांतील भास्करकृत काव्यांच्या पूर्वपीठिकेंतील अल्पस्वल्प उल्लेख. या चार साधनांचा पाया कल्पून त्यावर प्रो. कोलते यांनीं आपल्या भास्करावरील चरित्रग्रंथाची उभारणी केली आहे. त्यांतून पुढील विवेचन देण्यापूर्वी एक खुलासा करणें जरूर आहे. तो असा, कीं ज्या 'भानुविजय' नांवाच्या ग्रंथाच्या आधारानें प्रो. कोलते[1], डॉ. य. खु. देशपांडे[2] यांनीं भास्कराविषयीं पहिलेवहिले लेख लिहिले, तो 'भानुविजय' ग्रंथ अगदीं अलीकडील ठरल्यानें त्यावर उभारलेलें भास्कराचें चरित्र–मंदिर आपोआपच ढासळून पडलें आहे. ही गोष्ट स्वतः प्रो. कोलते यांनाहि मान्य असून त्यांच्या नवीन ग्रंथावरूनच आम्ही पुढील विवेचन करीत आहों.

भास्कराचें मूळ नांव भानुभट असें असून तो बोरी येथील राहणारा. महानुभाव पंथाची दीक्षा घेण्यापूर्वी कलंकी मार्गातील आचार्य असलेला कोणी केशवाचार्य हा त्याचा गुरु होता. एक दिवस, कोणत्या प्रसंगानें तें कळत नाहीं, पण भानुभटास नागदेवाचार्यांचें दर्शन घडलें व त्यानंतर

---

१. विविधज्ञानविस्तार, ऑगस्ट १९३२. व विश्ववाणी ( नागपूर ), डिसेंबर १९३३.

२. भा. इ सं. मं. त्रैमासिक, १०–२.

लौकरच तो त्यास अनुसरून महानुभाव पंथांत शिरला ( स्मृ. ६५ ). ' सारस्वत 'कारांनीं भास्कराचा पूर्ववृत्तांत, काशीयात्रा, कारावास व त्यांतून चक्रधराच्या कृपेनें सुटका याविषयीं दिलेली माहिती वरील चार साधनांत कोठेंहि मिळत नाहीं. अर्थात् ती बनावट असावी. ज्या स्मृतीच्या आधारावर ही माहिती दिली गेली ती स्मृतिहि[1] उघडच बनावट ठरते. असो. भास्करानें महानुभाव पंथाची दीक्षा घेतल्यानंतर एक दिवस कर्मधर्मसंयोगानें त्याची व त्याचा पूर्वाश्रमींचा गुरु केशवाचार्य यांची भेट झाली. त्या भेटींत केशवाचार्यानें त्यास कुत्सितपणानें विचारलें, " भटो, तूं एसणा वीद्वांस : आन आमतें सांडुनि नागदेव-भटांपासि आलासि ! तरि काइ तुज तृतीय शृंग निगालें ? " यावर भास्करानेंहि त्यास रोखठोक उत्तर दिलें कीं, " मां निगालें कीं नाहीं ऐसें पाहा ना कां ! " यावर गुरुशिष्यांत ' उघाणी ' म्हणजे वाद झाला व भास्करास खरोखरच ' तृतीय शृंग ' निघालें अशी खात्री पटल्यावरून केशवाचार्य अनुग्रहार्थ म्हणून नागदेवाचार्यास शरण गेला ( स्मृ. २११ ). नागदेवाची वास्तविक इच्छा नव्हती, पण भास्कराच्या आग्रहास्तव त्यानें केशवाचार्यास उपदेश देऊन त्यास आपणांपाशीं ठेवून घेतलें. इतकें झालें तरी मधूनच त्यांस आपल्या ' सिवसूत्रा ' ची आठवण होई व मग नागदेवाचार्य संतापून त्यास म्हणत, " जळो जळो तुझें सिवसूत्र ! घाली पाणियांतु ! " परंतु हें येथेंच थांबलें नाहीं. केशवाचार्यांची श्रद्धा विचलित झाली आहे असें पाहून नागदेवानें पुढें लौकरच त्यास पंथाबाहेर काढलें ( स्मृ. २१२, २१३ ). भास्कर मात्र आपल्या गुरुकुळाशीं अखेरपर्यंत एकनिष्ठ राहिला. तो वादपटु होता ( स्मृ. २१४, २३६, २३७). तसेंच त्याजपाशीं रसाळ असें वक्तृत्वहि होतें. एक दिवस मठापुढें गंगातीरावर त्याचें पुराण चाललेलें असतांना अवघा लोक कसा वेधून गेला तें 'स्मृति-स्थळ'कार पुढीलप्रमाणें सांगतो. " लोकु वेधला : पाणिवठां बाइला पाणी वाहात होतिया : तिया वेधलिया : तियांचिया डोइचिया घागरी डोइए-सींचि : आन पुराण आइकति : दादुलेयांचिए डोइए कडब्रेयांचे भारे: ते तैसेचि आइकति ... ऐसे अवघे लोकु रसवृत्ती वेधलेः " भास्करास पुराण सांगण्याचें व्यसनच होतें म्हटलें तरी चालेल. त्याचें भागवतावरील व्याख्यान ऐकतांना नागदेवाचार्याचें अंतःकरण ' द्रव आन चंद्रमये होए ' असें स्मृतिकार सांगतो ( स्मृ. २१५ ). इतकेंच नव्हे, तर भागवत सांगून झाल्यावर गीताव्याख्यानास आरंभ करावा ही भास्कराची इच्छा मोडून

१. वि. भि. कोलते: भास्करभट्ट बोरीकर, परिशिष्ट २.

काढतांना नागदेवचार्यांनें जें कारण म्हणून दिलें तें असें–" तूं नको म्हणों: तूं म्हणतासि आन माझें अंतःकरण अवघें चंद्रमए होतें : आन बाइसांचा व्यापारु अवघा प्रतिबंधतो : ऐसा रसु वोडवतो " ( स्मृ. २१६ ). भास्करभट्ट 'रूपें सुंदर' असल्याचें ' स्मृति ' सांगते (स्मृ. २१८). त्याच्या कवित्वाची जाणीव तो पंथांत आल्यानंतर लौकरच नागदेवांस झाली व "भटो शृंगारिया कवी कीं गा " असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले (स्मृ.२२१). भास्कराची ' सरळ मऱ्हाठी ' त्यांना फार प्रिय होती असें दिसतें ( स्मृ. २२२ ). त्याचें शीघ्रकवित्वहि स्मृतिकार वर्णितात. एका प्रसंगीं त्यानें एकच श्लोक दहा प्रकारांनीं लावून दाखविलेला पाहून आश्चर्यानें थक्क झालेल्या प्रतिस्पर्ध्यानें ' तुम्ही कवण ? ' असा प्रश्न केला. त्यास भास्करानें तात्काळ पुढील श्लोकबद्ध उत्तर दिलें—" केचित्खंडनगंडदंडितजगद्वीराधिपाः संस्फुरत्तर्कोत्सर्गकुगर्वपर्वतसमारूढाविमूढामृशं । काव्यालापकलापकेलिकुशला शृंगारवीरावृता, केचित्कृष्णकथासुसुंदरमतिस्तद्भास्करोऽहं कविः ।। " ( स्मृ. २३७ ). भास्कराचा शीघ्र कवित्वाचा हा गुण 'वृद्धाचारां'तील स्मृतींतहि दिसतो ( वृ. ५ ). भास्कर जसा कुशल कवि तसा कडक तपस्वीहि होता. देवासाठीं हाडाचीं काडें करणाऱ्या या कवीश्वराचें ' वृद्धाचारां'त आलेलें चित्र जिज्ञासूंनीं पाहावें (वृ. १९). भास्कराचें निस्पृहत्व व अमानित्व याविषयींची स्मृतिहि वाचनीय आहे ( वृ. २८ ).

भास्कराच्या आप्तस्वकीयांविषयीं विश्वसनीय अशी माहिती मिळत नाहीं. इतकें मात्र कळतें कीं, भास्करास नागाइसा नांवाची एक पुतणी असून ती सुविद्य ग्रंथकर्तीहि होती. ही नागाइसा बालपणींच ' रिक्तहस्ता ' म्हणजे विधवा झाली व पुढें आपल्या चुलत्यापासून दीक्षा घेऊन तिनें महानुभाव पंथांत प्रवेश केला. " कवीश्वराचां नागाइसीं दुसरीं लक्षणें, आनिका माळिका आन सय्यापालना, आन दुभगा हे च्यान्ही प्रमए केलीं : त्यांत माळिका दाइभागवर्ती दवडीलिया " असा तिच्या ग्रंथरचनेविषयीं उल्लेख सोंगोबासाच्या ' अन्वयस्थळां'त मिळतो. चरित्रग्रंथाच्या अनेक पाठांपैकीं मुनीश्रा पाठाचा जनक मुनी राघोबास हा याच नागाइसेचा शिष्य होय. मात्र नातनागाइसा म्हणून प्रसिद्ध असलेली नागदेवाचार्यांची नात व महेश्वरपंडिताची कन्या, आणि भास्कराची पुतणी नागाइसा या दोन व्यक्ती भिन्न आहेत. नात नागाइसा ही नागदेवाची शिष्या व आपली नागइसा ही भास्कराची शिष्या आहे.

भास्कराचे अखेरचे दिवस परिभ्रमणांत गेलेले दिसतात. यासंबंधीं 'इति-

ह्रास ' प्रकरणांतून महत्वाचा भाग पुढें देतों. " पंडितीं देहांतीं लीळांची पोथी कवीश्वराचां हातीं दीधली : मग जें गुरुकुळ ये तें कवीश्वरासि लीळा पुसपुसों घोकी : ऐसें असतां दिलीचेया सुल्तानें चाली केली : तेणें राजीकभेणें कवीश्वर कोकणा गेले : कोकणा जातां मार्गीं चोर उठिले : तेहीं कोकणींचा घाट उतरतां समस्त गुरुकुळ नागविलें... मग कवीश्वर कोकणांत गेले : राजीकें सामलें : देशीं सुभैक्ष जालें : मग मागौतें गंगातीरासि आले... मग स्थीर जालेयानंतरें अनोबास : कमळाइसे : कवीश्वरबास यांसी परस्परें भेटि जाली... मग काळांतरें कवीश्वरांसि देहावसान जालें :[1]" आयुष्यांतील शेवटचा काळ भास्करानें अष्टी ( जि. अहमदनगर ) येथें काढला असावा व तेथेंच त्याचा अंत झाला असा प्रो. कोलते यांचा तर्क आहे.[2]

भास्कराची ग्रंथरचनाः—

इतर कांहीं प्राचीन कवींप्रमाणें भास्कराच्याहि नांवावर अनेक ग्रंथांची नोंद आढळते. परंतु ते सर्वच भास्करानें लिहिलेले नसल्यानें या प्रश्नाची चर्चा करणें जरूर आहे. महाराष्ट्र-सारस्वतांत भास्करानें शिशुपालवध, एकादशस्कंध टीका, पूजावसर, चौपद्या, ईशस्तुति, विरहाष्टक, चक्रपाणिचरित्र, दत्तात्रेयचरित्र, श्रीकृष्णचरित्र व गीताटीका इतके ग्रंथ रचिल्याचा उल्लेख आहे. पैकीं पहिले सहा पद्य असून इतर गद्य आहेत. वरील ग्रंथापैकीं चक्रपाणिचरित्र, विरहाष्टक व चौपद्या यांचा उल्लेख डॉ. य. खु. देशपांडे आपल्या यादींत करीत नाहींत. तेव्हां त्यांच्या मतें हे तीन ग्रंथ भास्करकृत नसावे. वा. ना. देशपांडे यांना सारस्वतकारांची यादी स्थूलमानानें मान्य दिसते. तात्पर्य, श्रीकृष्णचरित्रादि गद्य ग्रंथ भास्करानें लिहिले असावे याविषयीं वरील विद्वानांत साधारणपणें मतैक्य दिसतें.

महानुभावीय ग्रंथ व ग्रंथकार यांजविषयीं विश्वसनीय माहिती मिळविण्याचीं साधनें मुख्यतः तीन. १ नागदेवचरित्र किंवा स्मृतिस्थळ, २ वृद्धाचार, व ३ वृद्धान्वय. पैकीं नागदेवचरित्राच्या आधारें भास्कराचा जीवनवृत्तांत आपण पाहिलाच आहे. उरलीं साधनें दोन; एक ' वृद्धाचार ' व दुसरें ' वृद्धान्वय '. त्यांतील ' वृद्धाचार ' हा अधिक प्राचीन ग्रंथ असल्यानें ' वृद्धान्वया ' पेक्षां तो अधिक विश्वसनीय मानावा लागतो.

---

१. भा. इ. सं मं. त्रैमासिक, १३–२.

२. भास्करभट्ट बोरीकर, पृ. ३०.

३. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. १७ ते २०.

४. विविधज्ञानविस्तार, ऑक्टोबर १९२८ ( पृ. ३९८).

शिवाय महानुभाव पंथांतील निरनिराळ्या आम्नायांचे निरनिराळे वृद्धान्वय असल्यामुळें त्यांतील माहितींत कधीं फरकहि पडतो. म्हणून 'वृद्धाचारां' त न आलेली माहिती 'वृद्धान्वयां'त आली तर ती संशयित वाटते. असो. 'वृद्धाचार' कर्त्याच्या मतें शिशुपालवध, एकादशस्कंध, नरविलापस्तोत्र (संस्कृत), पूजावसर (संस्कृत), आणि पूजावसर (मराठी) या पांचच ग्रंथांचें कर्तृत्व भास्कराकडे जातें. उलट 'वृद्धान्वय'कार वरील यादींत निर्वचनस्तोत्र, गद्यचाली, प्रस्तावश्लोक, ऋद्धिपूरच्या ओंव्या, अवतारषट्क व तीन अष्टकें यांची भर घालून एकूण बारा काव्यें भास्कराच्या नांवावर देतात.

एक गोष्ट स्पष्ट आहे. ती ही, कीं कै. भावे किंवा डॉ. देशपांडे यांनीं दिलेल्या यादींतील चरित्रात्मक गद्य ग्रंथ हे भास्करकृत निश्चित नाहींत. कारण, एकतर वृद्धाचार किंवा वृद्धान्वय यांपैकीं एकांतहि वरील गद्यग्रंथांचा उल्लेख आढळत नाहीं. दुसरें असें, कीं वरील गद्यग्रंथ, निदान त्यांतील बरेच, म्हाइंभटकृत असल्याचें आतां सिद्ध झालें आहे. जी गोष्ट गद्यग्रंथांची तीच गीताटीकेची. कै. भावे यांनीं एक व डॉ. देशपांडे यांनीं एक संस्कृत व एक मराठी अशा दोन गीताटीका भास्कराच्या नांवावर दिल्या आहेत. 'महानुभाव-कविकाव्य-सूची'तहि एक गीताभाष्य भास्कराच्या नांवावर आढळतें. प्रो. कोलते यांच्या मतें भास्करानें अशा प्रकारची गीताटीका रचिलेली नसावी. कारण एक तर 'वृद्धाचारां'त या टीकेचा उल्लेख नाहीं. 'वृद्धान्वयां'त तो आहे, पण संदिग्ध स्वरूपाचा आहे. 'स्मृतीं'त नागदेवाचार्यांसमोर भास्करानें गीतेवर व्याख्यान केल्याचा उल्लेख येतो (स्मृ. २१५); परंतु त्याचें तें व्याख्यान लिखित स्वरूपांत कोठें आढळत नाहीं. प्रो. कोलते म्हणतात त्याप्रमाणें जें व्याख्यान ऐकतांना खुद्द आचार्यांचें अंतःकरण 'चंद्रमय' होत असे तें जर ग्रंथनिविष्ट झालें असतें तर त्याचा उल्लेख 'स्मृतीं'त किंवा 'वृद्धाचारां'त अवश्य येता. तसा तो येत नसल्यानें भास्करकृत अशी गीताटीका मूळांतच नसावी असें वाटतें. मो. स. मोने[१] यांनी महानुभावीय व्याकरणकारांची माहिती देतांना भास्करास मराठीचा आद्य वैयाकरण बनविलें आहे, तेंहि बरोबर नाहीं. कारण भास्करानें व्याकरणावर रचना केल्याचें कोठें दिसत नाहीं. तात्पर्य, आधुनिक इतिहासकारांनीं ज्या अनेक ग्रंथांचें कर्तृत्व भास्कराकडे दिलें आहे; त्यांपैकीं बरेच ग्रंथ त्यानें रचिलेले नाहींत हें उघड आहे.

'वृद्धाचार' व 'वृद्धान्वय' यांतील उल्लेखांचा विचार करितां

१. पंचवार्तिक (पं. भीष्माचार्यकृत), पृ. ३-४.

१ शिशुपालवध, २ एकादशस्कंध किंवा उद्धवगीता, ३ नरविलापस्तोत्र, व ४ संस्कृत श्लोकबद्ध पूजावसर या चार ग्रंथांविषयीं त्यांत कांहीं मतभेद दिसत नाहीं. अर्थात् हे चार ग्रंथ निश्चितपणें भास्करकृत होत. पैकीं 'नर-विलापस्तोत्र' श्रीदत्तलक्षराज कवीश्वर ( माहूर ) यांनीं इ. स. १९०० च्या सुमारास पेशावर येथें प्रसिद्ध केलें आहे. असो. संस्कृत पूजावसराविषयींहि शंका नाहीं. मराठी पूजावसर मात्र भास्करकृतच असेल असें निश्चयानें म्हणतां येत नाहीं. एक तर याची संपूर्ण प्रत उपलब्ध नाहीं. माहूर व रिधपूर या दोन्हीं ठिकाणीं ती अनुपलब्ध आहे. शिवाय कोणत्याहि आम्नायाच्या 'वृद्धान्वयां'त या मराठी पूजावसराचा उल्लेख येत नाहीं. 'वृद्धाचारा'च्याहि सर्व प्रतींत तो आढळतो असें नाहीं. एतदर्थ हा ग्रंथ भास्करकृत नव्हे असें प्रो. कोलते यांचें मत आहे. तसेंच त्यांच्या मतें 'वृद्धाचारां'त अनुल्लेखित व 'वृद्धान्वयां'त उल्लेखित असे जे सात ग्रंथ तेहि भास्कराचे नव्हत. याला अपवाद 'प्रस्ताव श्लोक' किंवा 'चालीसाख्य स्तोत्र' या प्रकरणाचा दिसतो. श्रीकृष्णवर्णनपर असे हे भास्करकृत चाळीस श्लोक त्याच्या पश्चात् कोणा शिष्यानें एकत्र गुंफिले असावे असा प्रो. कोलते यांचा तर्क आहे.[1] सारांश, भास्कराच्या नांवावर मोडणारे चरित्रात्मक गद्यग्रंथ हे त्याचे नव्हत, व शिशुपालवध, एकादश स्कंध, संस्कृत पूजावसर, नरविलापस्तोत्र व चालीसाख्यस्तोत्र हे पांच ग्रंथ निःसंशय भास्करकृत होत असें ठरतें.

**कालनिर्णयः**—महाराष्ट्र—सारस्वतकारांनीं संपादित केलेल्या भास्करकृत 'शिशुपालवधा'च्या अखेरीस त्यांनीं पुढील ओंवी भास्कराची म्हणून दिली आहे—" शके शरांकरुद्रशत रोकडे । श्रीमुख माघमासु चोखडे । तैं श्रीकृष्णाचे पवाडे । वाखिले मियां ॥ " ( १०८८ ) हीच ओंवी कांहीं फरकानें महाराष्ट्र—सारस्वतांतहि आढळते. व तिच्याच आधारानें आजवर बहुतेकांनीं शके ११९५ हा 'शिशुपालवधा'चा लेखनकाल ठरविला आहे. परंतु हा शक प्रो. कोल्ते यांना मान्य नसून त्यांचें म्हणणें थोडक्यांत पुढें देत आहों. शके ११९४ हा चक्रधराचा संप्रदायांत रूढ असलेला प्रयाणकालाचा शक प्रो. कोल्ते यांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें चक्रधराचें प्रयाण शके ११९४-त न होतां तें शके ११९८-मध्यें झालें. आतां चक्रधराचा प्रयाणकाल शके ११९८ हा मानल्यास 'शिशुपालवधा'ची निर्मिति शके ११९५ मध्यें होणें अशक्य ठरतें. कारण भास्कर चक्रधराच्या प्रयाणानंतर कांहीं काळानें नागदेवाचार्याकडे आला व त्यानें

---

१. भास्करभट्ट बोरीकर, पृ. ६४ ते ६६

पंथाची दीक्षा घेतली. चक्रधरांच्या हयातींत तो पंथांत आलेला नव्हता हें 'लीळाचरित्रांतील' त्याच्या अनुल्लेखावरून स्पष्ट होतें. चक्रधरांचा प्रयाणकाल सांप्रदायिक मताप्रमाणें शके ११९४ धरून सुद्धां 'शिशुपाल-वधा'ची निर्मिति शके ११९५-त होणें असंभवनीय ठरतें. कारण चक्रधरांचें प्रयाण माघ वद्य ४-स झालें व भास्करानें आपला ग्रंथ वैशाखांत लिहून पूर्ण केला. आतां भास्करानें पंथांत समाविष्ट होऊन पंथीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून 'शिशुपालवधा'सारखा ग्रंथ निर्माण करणें इतक्या सर्व गोष्टी अवघ्या साडेतीन महिन्यांत घडून येणें अशक्यप्राय आहे. वरील शक हा भास्कराच्या काव्याचा लेखनकाल म्हणून मान्य होऊं शकत नाहीं, यास दुसरा पुरावा 'वृद्धाचारा'चा. चक्रधरांच्या प्रयाणापासून तों नागदेवाच्या मृत्यूपर्यंतचा इतिहास 'स्मृतिस्थळां'त आलेला आहे व नागदेवाच्या मृत्यूपासून तों 'परशरामबासा'च्या अखेरीपर्यंतची प्रमुख घटनांची जंत्री 'वृद्धाचारां'त आढळते. आतां 'शिशुपालवधा'च्या रचनेचा उल्लेख ज्या अर्थी स्मृतिस्थळांत येत नसून वृद्धाचारांत येतो त्याअर्थी हें काव्य भास्करानें नागदेवाच्या पश्चात् म्हणजे शके १२२४ नंतर लिहिलेलें असणार हें उघड आहे. दुसरें असें, कीं या काव्याच्या कोणत्याहि उपलब्ध हस्तलिखित प्रतींत कै. भावे यांनीं आपल्या आवृत्तींत छापिलेली काल-निदर्शक ओवी आढळत नाहीं. अर्थात् ती प्रक्षिप्त असावी. तात्पर्य, हें काव्य शके १२२४-च्या नंतर व बाइदेवबासास मृत्यु येण्याच्या आंत लिहिलें गेलें यांत शंका उरत नाहीं. कारण या काव्यावरील "भटो : ग्रंथु निका जाला असेः परि निवृत्ताजोगा नव्होचिः प्रवृत्ताजोगा जाला असे" हा प्रसिद्ध अभिप्राय स्वतः बाइदेवबासानें दिलेला आहे. बाइदेवबासाचा मृत्यु-शक १२२७ असा आहे. म्हणजे 'शिशुपालवधा'ची रचना शके १२२४ ते १२२७ च्या दरम्यान झाली असणार. हा विचार सांप्रदायिक दृष्ट्या झाला. तोच ऐतिहासिकदृष्ट्या केल्यास प्रो. कोलते यांच्या मतें शके १२३० हा भास्कराच्या काव्याचा लेखनकाल ठरतो.

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती अशी, कीं भास्कराचीं काव्यें हीं सर्वसाधारण समज आहे त्याप्रमाणें ज्ञानेश्वरपूर्वकालीन नसून तीं शके १२३० च्या सुमारास निर्माण झालेलीं आहेत.

**ज्ञानप्रबोध** ( विश्वनाथ बाळापूरकरकृत ):—

विश्वनाथ बाळापूरकरकृत 'ज्ञानप्रबोध' या ओवीबद्ध ग्रंथाची माहिती सारस्वतकारांनीं 'तेराव्या शतकांतील कांहीं ग्रंथकार' या प्रकरणांत

---

१. भास्करभट्ट बोरीकर, प्र. ४.

दिलेलीच आहे. प्रस्तुत ग्रंथाची रचना ' शके बाराशें त्रेपन्नभीतरीं । प्रजापति नाम संवत्सरीं । माघे पंचमी प्रथम प्रहरीं ' संपूर्ण झाली असें कवि ग्रंथाच्या अखेरीस सांगतो. कै. भावे म्हणतात त्याप्रमाणें ही गीताटीका असली तरी ती संपूर्ण गीतेवरील टीका नसून गीतेंतील १३ व्या अध्यायांतील अमानित्वादि ज्ञानलक्षणें सांगणाऱ्या पांच श्लोकांवरील ही ओवीबद्ध टीका आहे. या पांच श्लोकांच्या स्पष्टीकरणार्थ विश्वनाथ पंडितानें सुमारें १२५ ओंव्या लिहिलेल्या असून ग्रंथांतील उर्वरित रचना स्वतंत्र आहे. या सव्वाशें ओंव्या म्हणजे ज्ञानेश्वरीचा उताराच वाटावा इतकें साम्य या दोन टीकांत आहे. ' करोनि गीतेची भिंती । ज्ञानचित्र पाडिलें ' हें कवीचें म्हणणें या सवाशें ओव्यापुरतें खरें आहे. यापुढील भाग रचनादृष्ट्या स्वतंत्र असून त्यांत विश्वनाथपंडिताच्या वक्तृत्वाचा ओघ पूर्णपणें प्रत्ययास येतो. असो. ' ज्ञानप्रबोध' हा ग्रंथ महंत दत्तराज यांनीं चित्रशाळा छापखान्यांत शके १८२९ मध्यें छापला होता. विश्वनाथ पंडिताचे अखेरचे दिवस वऱ्हाडांतील बाळापूर या गांवीं गेले व तेथें त्याच्या नांवाची गादी अद्यापिहि आहे.

' **सैह्याद्रवर्णना**'चा लेखक रवळो व्यास किंवा राघोपाध्याय हा वऱ्हाडांतील पाथरी गांवचा म्हणून पाथरीकर. उपाध्ये आम्नायांतील या कवीची गुरुपरंपरा अशी–श्रीचक्रधर–जानोपाध्ये–कमळाइसे–हिराइसे–रवळो व्यास. गुरूपदेश हिराइसेकडून शके १२५४-च्या सुमारास झाला. गुरुभक्तीमुळें हा आपल्या काव्यांत हिराइसेचें नांव घालीत असला तरी 'सैह्याद्रवर्णना'चा कर्ता हाच आहे.

" तीये हीरांबिकेचा सुतु । राम येणें नामें विख्यातु ।
तेणें हा निर्मिला ग्रंथु । वीतरागांसी " —( सै. ५१६).

याप्रमाणें कविनामाचा —राम (राघव)— उल्लेख स्पष्ट आहे. शके १२५५ हा या काव्याचा रचनाकाल असावा असें बाह्य पुराव्यावरून वाटतें. या काव्याची ओवीसंख्या ७२९ असल्याचें कै. भावे सांगतात, तें बरोबर नसावें. ह. ना. नेने[1] यांना मिळालेल्या प्रस्तुत काव्याच्या चार पोथ्या व त्यावरील टीपग्रंथ यांवरून त्याची ओंवीसंख्या ५१७ ठरते. काव्य ' सैह्याद्रिमाहात्म्य ' या नांवानेंहि ओळखिलें जातें. महानुभावांचा द्वितीय कृष्ण सैह्याद्रीचा श्रीदत्तात्रेयप्रभु याचें लीळाचरित्र हा प्रस्तुत ग्रंथाचा विषय असून कवीनें तो म्हाइंभटकृत ' लीळाचरित्रां'तील सैह्याद्रिलीळांच्या आधारें वर्णिला आहे. श्रीदत्तमूर्तिवर्णन, अलर्कराजा व कार्तवीर्य यांच्या कथा, परशुरामाचें माहूर येथें आगमन व तपश्चर्या, सह्याद्रि-

---

१. एति. संकीर्ण वाङ्मय साहित्य, खं. १. पृ. ७८–९२.

वर्णन, गुंडम राऊळ यांना शक्तिदान, चक्रधरचरित, आणि पंथीय तत्वज्ञान एवढे विषय स्थूलमानानें खळो व्यासाच्या या काव्यांत आले आहेत. कवीनें केलेल्या दत्तात्रेय-वर्णनांत एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही, कीं त्यांतील दत्तमूर्ति सर्वसामान्य म्हणजे एक तोंडाची व दोन हातांची आहे; त्रिमुखी नाहीं. तसेंच त्यांतील श्रीचरणस्पृष्ट स्थानांत मातापूर म्हणजे माहूर, पंचाळेश्वर, मेरुबाळा इत्यादि उल्लेख येतात; परंतु गाणगापूर किंवा नरसोबा वाडी यांचें येत नाहींत. याचा अर्थ सरस्वती गंगाधराच्या 'गुरुचरित्रां'तील दत्तसंप्रदाय महाराष्ट्रांत निर्माण होण्यापूर्वींचा हा महानुभावांचा दत्तसंप्रदाय आहे. दत्तभक्तीचें हें प्राचीनतर स्वरूप आहे. नृसिंह सरस्वतींचा एक व महानुभावांचा एक अशा या दोन दत्तसंप्रदायांतील परस्पर संबंध शोधून काढणें ही स्वतंत्र संशोधनाची बाब आहे. असो. खळोव्यासाचें हें काव्य इतर सहा काव्यांच्या मानानें थोडें फिकें वाटलें तरी त्यांतील कल्पनाविलास हृद्य आहे यांत शंका नाहीं. मात्र तो पारंपरिक दिसतो, स्वतंत्र प्रज्ञेंतून स्फुरलेला वाटत नाहीं. या काळांतील सर्वच महानुभाव कवि सालंकृत वर्णनें व तींहि एका ठराविक पद्धतीनें करितात हें पाहण्यासारखें आहे. त्यांच्या 'साती ग्रंथां'तील अलंकारयोजना व वर्णनपद्धति हीं एकसारखीं वाटतात. त्यांत अग्रपूजेचा मान अर्थात् भास्करभट्ट बोरीकरांकडे जातो व त्याचें अनुकरण सर्व करतांना दिसतात. खळो व्यासास बोल लावण्याचा हेतु नाहीं; परंतु त्याच्या या कृतीवर त्या कवीश्वराच्या कल्पनाविलासाची छाया स्पष्ट दिसते एवढें मात्र खरें. प्रस्तुत काव्याचें नांवहि थोडें फसवेंच आहे. नांवावरून तें सृष्टिवर्णनपर वाटतें; व प्रसंगमानानें कांहीं सृष्टिवर्णनें त्यांत आढळतातहि. पण काव्य मात्र सृष्टिपर नसून चारित्रपर आहे. श्रीदत्तात्रेयाचें लीळाचरित्र सह्याद्रीच्या परिसरांत घडलेलें असल्यामुळें मातापुराजवळील सह्याद्रीच्या फाट्याचीं कांहीं वर्णनें खळो व्यास करतो; परंतु तींहि पुनः पारंपारिकच वठतात. श्रीदत्तात्रेयचरित हें नांव या काव्यास अधिक समर्पक होईल. असो. याच खळोव्यासानें शके १२७५ च्या सुमारास 'सकळ' आणि 'सुंदरी' या दोन सांकेतिक लिपी शोधून काढल्या व महानुभावीय वाङ्मयास पंथीयेतरांपासून दूर केलें.

'**ऋद्धिपूरवर्णन**' हा 'साती ग्रंथां' पैकीं शेवटला असून त्याची रचना कवीश्वराम्नायांतील नारायण व्यास बहाळिये यानें शके १२८५-मध्यें पुरी केली. या काव्याच्या प्रस्तावांत कवीनें आत्मनिवेदन केलें असून त्यावरून त्याचें पूर्वायुष्य दुराचारांत गेलेलें दिसतें ( ओ. ३१ ते ४३ ).

हा कवि मूळचा खानदेशांतील बहाळिये या गांवचा असून पूर्ववयांत त्यानें वाममार्गाचा आश्रय करून कांहीं हिंसा केली होती असें कळतें. पुढें उत्तरवयांत नारोव्यासाला अनुताप झाला आणि तो भटमार्गात आला. मार्गांत आल्यावर आपला गुरुबंधु ' ज्ञानप्रबोध 'कार विश्वनाथ बाळापूरकर याच्या सूचनेवरून त्यानें ' ऋद्धिपूरवर्णन ' लिहिलें. ऋद्धिपूर हें महानुभावांचें महाक्षेत्र असून आजवर अनेक काव्यांचा वर्ण्यविषयहि झालेलें आहे. पैकीं ' ऋद्धिपूरमाहात्म्य ' नागदेवचार्याचा पुत्र महेश्वरपंडित यानें शके १२२४-च्या सुमारास रचिलें असून त्याचा परिचय डॉ. य. खु. देशपांडे यांनीं प्रस्तुत ' ऋद्धिपूरवर्णना 'च्या प्रस्तावनेंत करून दिलेला आहे. तसेंच पुढें सोळाव्या शतकांत उपाध्याय आम्नायांतील दीक्षित वाईदेशकर कृष्णमुनि किंवा कवि डिंभ यानेंहि ' ऋद्धिपूरमाहात्म्य ' या नांवाचा सुमारें ९०० ओव्यांचा ग्रंथ लिहिल्याचें ते सांगतात. तात्पर्य, हा विषय महानुभाव कवींचा आवडता आहे.

प्रस्तुत काव्य वर्णनपर असून त्याची ओवीसंख्या ६४५ आहे. त्यांत कवीची रेखीव शब्दचित्रें काढण्याची चातुरी स्पष्ट दिसते. आर्त जनांच्या संसारश्रमाचें जणुं विसंवणेंच असें तें ऋद्धिपूर त्यानें ' दुरौनिया देखिलें ' आणि त्याची स्थिति रोग्याला अमृतपान किंवा तान्हेल्याला जीवन लाभावें त्याप्रमाणें झाली.

" सासुरवासें शीणली । तिये भेटे जेवि माउली ।
असो हे तैसी परी जाली । श्री ऋद्धिपूर देखिलेआं ॥(ऋ. ४८)

यापुढें ऋद्धिपुरांतील हाट-चौहाट, मढमंडप, राजबिदीवरून ये-जा करणारे भटमहात्मे, महाद्वार, राजमठ व त्यांतील भीतभंग आणि उंबरवट, मर्दनास्थान, रंगमाळिका, आरोगणास्थान, प्रभुमंचक आणि प्रभुमूर्ति इत्यादींचीं अतिसूक्ष्म आणि काव्यरम्य वर्णनें ग्रंथकारानें केलीं आहेत. त्याची वर्णनशैली विशेष असून वर्ण्य वस्तूला आत्मभाव आणि गतस्मृति चिकटविण्याची त्याची रीति मनोहर आहे. इतर यादवकालीन महानुभाव कवींप्रमाणें यानेंहि आत्मनिरूपण केलेलें आढळतें. ' अवघीं प्रपंचाचीं सोइरीं '; त्यांतीलच मी एक. अर्थात् ' मज तो वाह्यमहापथु केवि ठाके '? परंतु आपल्या कोंवळ्या पिलाला पाखवा देऊन पक्षिणी जिवविते त्याप्रमाणें आचार्यांनीं मला पाळिलें आणि त्यांच्याच कृपेनें ऋद्धिपूरदर्शनाचें भाग्य मला लाभलें. नारायण व्यास म्हणतो, याच गुरुकृपेच्या बळावर—

" शब्दरत्ना सोहोज्वळा । जाऊनि साहित्याचिया वेलाउळा ।
भरौनि आणैं खोळां । उन्मेषाचेआं ।। " (क्र. ८२)

आणि खरोखरच त्यानें आपल्या ग्रंथरूपी सुवर्णमुद्रिकेवर भावरूपी माणकाचें ' खेवणें ' बसविलें आहे असें पदोपदीं दिसतें.

अशा रीतीनें त्या पवित्र ऋद्धिपुरास स्मृतिरूपानें उजळा देत देत कवीनें आपला प्रबंध कळसास आणला आहे. बाकी या ग्रंथाची गोडी भाविकांनाच कळणार; भावहीन ' निब्ररडां 'ना तिचें काय होय ? वियोग-घणाच्या घावानें म्हैसवा नांवाच्या अतिकठिण पाषाणालाहि तडा जातो, पण भावहीन मात्र कोरडाच राहतो. नारोव्यास म्हणतो,

" भीतरीं नाहीं प्रेमाची ओल । तया केवि बोलवती वियोगींचे बोल ? "

याशिवाय नारोव्यासाच्या नांवावर ' गीत, अनवेल पद, वनजारा, आरत्या, साइलो पद, अवांका, रुक्मिणी-पत्रिका, रुक्मिणी-स्वयंवर ' एवढी ग्रंथरचना असल्याचें कै. वि. ल. भावे ' कविकाव्यसूची ' त सांगतात. मात्र एक खंडकाव्य आणि कांहीं स्फुट पदें यांखेरीज त्याची दुसरी रचना अद्यापि उपलब्ध नाहीं. पैकीं खंडकाव्याचें नांव ' डंक ' असें असून त्यांत संसारदुःखावर भुजंगदंशाचें म्हणजे डंखाचें रूपक बसविलें आहे. रूपक परंपरित असून तें एकूण १६ पदांतून वर्णिलें आहे. ' डंक ' आणि ' ऋद्धि-पूर ' हीं काव्यांचीं नांवेंच आपणांस सांगतात, कीं हा कवि स्वतंत्र वृत्तीचा असावा. तत्कालीन इतर कवींप्रमाणें तीच ती कृष्णकथाहि तो सांगत सुटला नाहीं, किंवा शिष्टमान्य होऊन बसलेलें गीता-भागवतावरील पुराणहि त्यानें लाविलें नाहीं. तर त्यानें स्वतंत्र बुद्धीनें नवीन मार्ग चोखाळला असें दिसतें. क्षेत्रवर्णन किंवा रूपककाव्य हे विषय सर्वस्वीं अनुच्छिष्ट होते. साह-जिकच नारोव्यासाच्या ग्रंथांना एक प्रकारचा ताजेपणा आलेला असून कांहींतरी नवें पाहिल्याचा आनंद त्यांच्या वाचनानें मिळतो.

### महदायिसा ( शके ११५० ते १२२५ )

महदायिसा, महदंबा किंवा रूपाई अशा तीन नांवांनीं ओळखल्या जाणाऱ्या या आद्य मराठी कवयित्रीच्या जन्ममृत्यूंचे शक दुर्दैवानें उपलब्ध नाहींत. 'इतिहास' आणि ' नागदेव स्मृति ' अर्थात् ' स्मृतिस्थळ ' या दोन ग्रंथांवरून तिचें चरित्रचित्र मात्र कांहींसें रेखाटतां येईल असें दिसतें. गौतमीच्या दक्षिणतीरीं पुरीनामक नगरींत कोणी वामनाचार्य नांवाचा ब्राह्मण आपली भार्या महदायिसा इच्यासह राहत होता. या कुटुंबाकडे देवगिरीचा यादवराजा महादेवराय याचें पौरोहित्य होतें. वामनाचार्याचा वंशविस्तार पुढें देतों—




अर्थात् महानुभावांचा आद्याचार्य नागदेव आणि महदायिसा हीं चुलत भावंडें ठरतात. वि. ल. भावे म्हणतात तसें मावशी–भाच्याचें नातें या दोघांचें नाहीं. महदायिसा लहानपणींच हातरिती म्हणजे विधवा झाली आणि नागदेव चंगीभंगी निघाला. त्यामुळें आबाइसा म्हणजे नागदेवाची आई ही महदायिसेसह विरक्त वृत्तीनें रावसगांवीं गुंफा करून राहूं लागली. पुढें हें सारें कुटुंब चक्रधरांना अनुसरलें आणि तेव्हांपासून नागदेव व महदाइसा हीं दोन भावंडें प्रसिद्धीस आलीं. प्रथम चक्रधरांचें आणि नंतर गोविंदप्रभु व नागदेवाचार्य यांचें निकट सान्निध्य महदाइसेस आमरण लाभलें असून ज्ञानेश्वरमंडळांत जो मान मुक्ताबाईस होता तोच चक्रधरमंडळांत हिला होता असें दिसतें. म्हाइंभटांना 'लीळाचरित्र' रचण्याच्या कामांत महदाइसेचा बराच उपयोग झाला असावा असें 'एकांकां'तील तिनें सांगितलेल्या कांहीं लीळांवरूनें वाटतें. विशेषतः म्हाइंभटाच्या या ग्रंथांतील चक्रधरांच्या आत्मचरित्रपर भागाचें बरेंच श्रेय महदाइसेकडे जातें. ही कवयित्री मोठी बुद्धिमान्, अतिविरक्त आणि परमार्गमर्म जाणणारी असावी असें तिजविषयींच्या आठवणी वाचून वाटतें. चक्रधरांच्या प्रयाणानंतर ती गोविंदप्रभूच्या सेवेंत ऋद्धिपुरांत राहूं लागली. तिच्या गुरुभक्तीची कल्पना म्हाइभटांनीं वर्णिलेल्या स्मृतींवरून[2] कांहींशी येते. चक्रधरांच्या विरहानें उदास होऊन भानखेड्यास निचेष्ट पडलेल्या नागदेवास हिनेंच 'पाटकुळीस वाउनि' ऋद्धिपुरास आणलें. बहिणीच्या या उपकाराची आणि तिच्या मोठेपणाची नागदेवा-

१. लीळाचरित्र, एकांक, ली. ४, १०, १२, १३, १६ इत्यादि.
२. श्रीगोविंदप्रभुचरित्र, ( संपा. कोलते ), क्र. ८५ ते ९२.

चार्यालाहि चांगली जाणीव असावी. ' म्हातारी माझेया धर्मासि रक्षण गा ' असा त्याचा महदाइसेसंबंधीं अभिप्राय आहे. ही धर्मनिष्ठ म्हातारी सर्व पंथीयांना मार्गदर्शनहि करीत असावी. या आद्य मराठी कवयित्रीच्या जन्मशकासंबंधीं नाहीं, परंतु मृत्युशकासंबंधीं मात्र कांहीं अनुमानें बांधतां येतात. महदाइसा नागदेवापूर्वी गेली, हें निश्चित. कारण तिच्या अखेरच्या क्षणीं सन्निध नामदेवाचार्य होते असें ' स्मृतिस्थळ ' म्हणतें. नागदेवाचार्य शके १२३० नंतर जिवंत नव्हता. अर्थात् त्यापूर्वी म्हणजे शके १२२५ च्या आसपास महदाइसा गेली असावी. नागदेव तिला ' म्हातारी ' म्हणतो, यावरून निधनसमयीं तिचें वय चांगलें ७०-७५ इतकें असणार. सारांश, तिचा जन्मशक शके ११५५ च्या जवळ यावा असें वाटतें.

महदाइसेच्या नांवावर 'धवळे', 'मातृकीरुक्मिणीस्वयंवर' आणि ' गर्भ-कांड ओव्या ' एवढी रचना आढळते. पैकीं पहिली दोन काव्यें प्रकाशित आहेत. 'धवळ्यां' चे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असून ते कांहीं प्रसंगानें रचिले गेले आहेत. म्हाइंभट म्हणतात[1], कीं एकदां गोविंदप्रभूंना विवाहप्रवृत्ति होऊन वऱ्हाडाची सर्व सिद्धता झाली असतांना त्यांच्याच आज्ञेनें महदाइसेनें हें रुक्मिणीस्वयंवर धवळ्यांच्या रूपांत गायिलें व गोसाव्यांनीं ते चार दिवसपर्यंत ऐकलें, आणि मग त्यांची विवाहप्रवृत्ति भंगली. उत्तरार्धाचा वृत्तांत थोडा निराळा असून तो ' स्मृतिस्थळां'तील १७४ व्या स्मृतींत आढळतो. एकदां म्हाइंभट व लक्ष्मीधरभट यांनीं महदाइसेस सामोरें म्हणजे पुढचें रुक्मिणीहरण रचण्याचा आग्रह केला तेव्हां ती म्हणाली, ' आतां मज काइ करवैल! तें गोसावीं वरु दीधला म्हणौनि स्फुरलें: आतां मज काइ स्फुरे ना'. यावर त्या दोघां पंडितांनीं ' शब्द घडउं घडउं पदें बांधिलीं ', आणि तीं एकत्र गुंफून हिनें एकत्र गायिलीं. अर्थात् उत्तरार्धाच्या साहित्याची जमवाजमव या पंडितद्वयानें केली असल्यामुळें त्या भागाचें बरेचसें श्रेय उघडच त्यांच्याकडे जातें. तरींहि महदायिसेचा हात या भागावरून फिरलेला दिसतोच. भटांनीं साहित्य पुरविलें आणि यजमानणीनें स्वतः पूजा बांधली असा प्रकार असल्यामुळें या काव्याच्या दोहीं भागांचें कर्तृत्व महदायिसेकडे जावें यांत नवल नाहीं. ' धवळ्यां'चा पूर्वार्ध गोविंदप्रभूंच्या ह्यातींत म्हणजे शके १२०९ च्या पूर्वी आणि उत्तरार्ध शके १२२५च्या पूर्वी निर्माण झाला असावा. अर्थात् महदायिसेच्या काव्य-रचनेचा कांहीं भाग तरी ज्ञानेश्वरीपूर्व ठरतोच.

थोड्यांत गोडी आणण्याचें महदायिसेचें कौशल्य तिच्या ' मातृकी-

---

१. श्रीगोविंदप्रभुचरित्र, क्र. २२४.

रुक्मिणीस्वयंवर' या दुसऱ्या काव्यांत अधिक स्पष्टपणें दिसून येतें. यांत विषय तोच, परंतु निवेदन मात्र अति द्रुतगतीचें आणि आटोपशीर असें आहे. ओवी छंद असला तरी तो मोरोपंतांच्या 'सीतागीता' प्रमाणें अभंगासारखाहि म्हणतां येतो. मात्र यांतील छंदोरचना 'धवळ्यां' पेक्षां अधिक निर्दोष आहे. या काव्यास 'मातृकी' म्हणण्याचें कारण असें, कीं त्यांत बावन्न मातृका प्रत्येक ओवीच्या प्रारंभीं एक याप्रमाणें योजिल्या आहेत. मात्र या योजनेंत थोडी ढिलाई आहे. तसेंच पाहिलें तर या ११० ओव्या म्हणजे 'धवळ्यां' चा शुद्ध प्रतिध्वनि वाटतो. छंद निराळा आणि विस्तार बेताचा आहे, इतकेंच.

या शिवाय याच छंदांत रचिलेलें 'गर्भकांड ओव्या' हें एक आध्यात्मिक प्रकरणहि महदायिसेच्या नांवावर आढळतें. या आद्य मराठी कवयित्रीची ही सारी रचना पाहून कोणासहि कौतुकच वाटेल. साधेपणा हाच तिचा गुण आहे. नागदेवाचार्यांची बहीण महदायिसा आणि ज्ञानेश्वरांची बहीण मुक्ताबाई या दोघी समकालीन. आश्चर्य हें, कीं त्या केवळ आपापल्या भावांच्या नांवावर श्रेष्ठत्व पावलेल्या नसून दोघींच्याहि अंगीं स्वतंत्र असें कर्तृत्व आहे.

**अभ्यासाचीं साधनें:—**

य. खु. देशपांडे : महानुभावीय मराठी वाङ्मय.
ह. ना. नेने : लीळाचरित्र—एकांक व पूर्वार्ध (प्रस्तावना).
ह. ना. नेने : चक्रधरोक्त सूत्रपाठ (प्रस्तावना).
ह. ना. नेने : दृष्टान्तपाठ (प्रस्तावना).
वि. भि. कोलते : नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर (प्रस्तावना).
वि. भि. कोलते : भास्करभट बोरीकर.
य. खु. देशपांडे : ऋद्धिपूरवर्णन (प्रस्तावना).
वि. भि. कोलते : गोविंदप्रभु—चरित्र (प्रस्तावना).
वा. ना. देशपांडे : स्मृतिस्थळ (प्रस्तावना).
वा. ना. देशपांडे : आद्य मराठी कवयित्री.
द. सी. पंगु : वच्छहरण (प्रस्तावना).



## कालनिर्णय

ज्ञानदेवादि चार भावंडांचे कै. भावे यांनीं दिलेले समाधि-शक सर्व-मान्य असले तरी त्यांच्या जन्मशकांसंबंधीं दोन मतें आहेत, तीं अशी—

| | पहिलें मत | दुसरें मत |
|---|---|---|
| निवृत्तिनाथ जन्म | श० ११९५ | श० ११९० |
| ज्ञानदेव ,, | श० ११९७ | श० ११९३ |
| सोपानदेव ,, | श० ११९९ | श० ११९६ |
| मुक्ताबाई ,, | श० १२०१ | श० ११९९ |

म्हणजे पहिल्या मतें या चार भावंडांत दोन दोन वर्षांचें तर दुसऱ्या मतें त्यांच्यांत तीन तीन वर्षांचें अंतर पडतें. पैकीं पहिलें मत कै. भिंगारकर, कै. पांगारकर, कै. बा. अ. भिडे, व प्रा. रा. द. रानडे, यांना मान्य असून या मतास नामदेव, विसोबा खेचर आणि सच्चिदानंदबावा यांच्या अभंगांमुळें बळकटी येते[1]. दुसऱ्या मताचा पुरस्कार कै. वि. ल. भावे आणि प्रो. शं. वा. दांडेकर यांनीं केलेला असून जनाबाईचा एक अभंग त्यांनीं आधारादाखल घेतला आहे. कै. भाव्यांच्या लिहिण्यांत थोडी धरसोड दिसते. महाराष्ट्र–सारस्वतांत पृष्ठ १३४ वर ते दुसरें मत मांडतात व पुढें पृ. १४२ वर म्हणतात, "शके १२१२ मध्यें म्हणजे वयाच्या केवळ पंधराव्या वर्षीं हा ज्ञानेश्वरी ग्रंथ ज्ञानेश्वरांनीं रचून पुरा केला हें केवढें आश्चर्य !" आतां शके १२१२ मध्यें ज्ञान-देवांचें वय १५ वर्षांचें मानलें तर त्यांचा जन्मकाल शके ११९७ ठरतो. आणि परंपरागत कल्पना अशीच आहे. तात्पर्य, कै. भाव्यांचीं विधानें संदिग्ध आहेत. प्रो. दांडेकर ज्या जनाबाईच्या अभंगावरून वर दिलेल्या दुसऱ्या मताचा पुरस्कार करतात त्या अभंगाचा एक भिन्न पाठ उपलब्ध आहे व या पाठभेदावरून असें मानतां येतें, कीं ज्याचा तो आहे तो मूळ अभंगच प्रक्षिप्त असावा. आणि हा अभंग जनाबाईचा नाहीं असें एकदां ठरलें म्हणजे प्रो. दांडेकर यांचें मत निराधार ठरतें. शिवाय पहिल्या मतास परंपरेचा बळकट आधार तरी आहे. नामदेव, विसोबा खेचर आणि सच्चिदानंदबावा या तिघांचीं मतें डावलून जना-बाईचा एक संशयित अभंग आधारास घेणें बरोबर नाहीं. पहिल्या मतास

1. ज्ञानेश्वर चरित्र (पांगारकर), पृ. ४६.

मान्यता देण्याचें दुसरें कारण असें, कीं ज्ञानदेवांनीं बालछंदाच्या आपल्या अभंगांत ' बाळछंदो बात्रीस जन्में । तोडिलीं भवाब्धीचीं कर्में । ' याप्रमाणें आपल्या २२ व्या वर्षी झालेल्या समाधीचा उल्लेख केलेला आहे. आतां त्यांचा समाधिकाल शके १२१८ हा सर्वमान्य असल्यानें वरील मोजणी-वरून पाहतां त्यांचा जन्मकाल शके ११९७ असाच येतो. शिवाय, ज्ञानेश्वरीची रचना त्यांच्या १६ व्या वर्षी झाली असें परंपरा म्हणते, अर्थात् पहिल्या मतास बळकटी आणते. एकूण पाहिलें मतच ग्राह्य असावें आणि त्या अनुसार ज्ञानदेवांचा जन्मकाल शके ११९७ (इ. स.१२७५) हा मानावा हें बरें.

**ज्ञानदेवांची ग्रंथरचना :—**

निभ्रांतपणें ज्ञानदेवांचे म्हणतां येतील असे ग्रंथ म्हणजे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी आणि अभंगांची गाथा हे होत. वारकरी संप्रदाय एवढे चारच ग्रंथ ज्ञानदेवांचे म्हणून मानतो. याशिवाय कै. चांदोरकर यांनीं आपल्या ' कविकाव्यसूचीं ' त ज्ञानदेवांच्या नांवावर ' योगवासिष्ठ ', ' आत्मानुभव ', ' लिखित ' इत्यादि पांचपंचवीस ग्रंथ दिले आहेत. तसेंच धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत ' लेखणी ', 'पंचमुद्रा' आणि ' भक्तराज ' अशीं तीन हस्तलिखितें ज्ञानदेवांच्या नांवावर आढळतात. कै. वि. का. राजवाडे यांनीं ' प्राकृत गीता ' व ' वसिष्ठबोध ' या दोन ग्रंथांचा परिचय ते ज्ञानदेवकृत म्हणून करून दिला आहे.[1] आतां हे सर्व ग्रंथ खरोखरच ज्ञानेदवांचे असतील असें वाटत नाहीं. त्यांतील कांहींचें निराकरण करून त्यांचें अ-ज्ञानदेवत्व डॉ. शं. दा. पेंडसे[2] यांनीं आपल्या ग्रंथांत सिद्ध केलेलें असल्यामुळें येथें त्याचा पुनरुच्चार करण्याचें कारण नाहीं. वरीलपैकीं एखादुसरें प्रकरण ज्ञानदेवांचें असेलहि; पण ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव यांसारख्या दोन भरदार ग्रंथांची रचना केल्यावर ते आणखी किरकोळ रचनेच्या कामांत पडले असतील असें वाटत नाहीं. आणि दुसरें म्हणजे कवि म्हणतो त्याप्रमाणें संदेह उत्पन्न झाला असतां ' अंत:करणप्रवृत्ति ' किंवा मनोमय साक्ष हेंच खरें निर्णायक प्रमाण होय. ही कसोटी लावून वरील ग्रंथ तपासल्यास त्यांत ज्ञानदेव फारसे कोठें आढळणार नाहींत.

ज्ञानेश्वरीच्या अखेरीस एक रचनाकालनिदर्शक ओवी आढळते ती अशी–

' शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाला ॥'

---

१. भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६.

२. ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान, प्र.१२.

परंतु ही ओवी ज्ञानदेवांच्या हातची नसावी असें वाटतें. ते स्वतःचा उल्लेख सर्वत्र 'ज्ञानदेव' असा करीत असतांना याच ठिकाणीं त्यांनीं 'ज्ञानेश्वरें' असें अपवादात्मक कां म्हणावें? त्यांच्या इतर कोणत्याहि ग्रंथांत कालोल्लेख नसतांना येथेंच तो कां असावा? बरें, केलाच तर केवळ शकांक सांगण्यापेक्षां पक्ष, तिथि, वार, संवत्सर यांनीं संपूर्ण असा कां करूं नये? 'पुढती पुढती पुढती। इया ग्रंथपुण्यसंपत्ती। सर्वसुखीं सर्वभूतीं। संपूर्ण होइजे' ही समाप्तीची ओवी लिहून ग्रंथ संपविल्यानंतर पुनः एक ओवी रचिण्याचें प्रयोजन काय? या सर्व शंकांना समाधानकारक उत्तरें नसल्यामुळें ज्ञानेश्वरीच्या अखेरची कालनिदर्शक ओवी ज्ञानदेवकृत नव्हे हें सिद्ध होतें. ज्ञानेश्वरीचा लेखक सच्चिदानंदबावा यानें ती रचिली असण्याचा संभव बराच आहे. पण या ओवीचें कर्तृत्व संशयित असलें तरी तींत आलेला ज्ञानेश्वरीचा रचनाकाल मात्र संशयातीत आहे. कारण रचनेचें स्थळ व तत्कालीन राजवट यांचा स्पष्ट असा उल्लेख ज्ञानदेवांनीं ग्रंथाच्या अखेरीस केलेला असून तो वरील शकांतील परिस्थितीशीं जुळता आहे.

तेव्हां या बाह्य प्रमाणांच्या आधारें शके १२१२ हाच ज्ञानेश्वरीचा रचनाकाल ठरतो. रचनाकालाचा उल्लेख जसा ज्ञानदेवकृत नाहीं, त्याचप्रमाणें 'ज्ञानेश्वरी' 'ज्ञानदेवी', किंवा 'भावार्थदीपिका' यांपैकीं एकहि नांव स्वतः कवीनें आपल्या ग्रंथांस दिलेलें नाहीं. 'केलें ज्ञानदेवें गीतें। देशीकार लेणें' एवढेंच म्हणून तो थांबतो. याचा अर्थ, ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथाचें नामकरण असें केलेंच नाहीं. त्यांचे एक समकालीन संत नामदेव हे मात्र या ग्रंथाचा उल्लेख 'ज्ञानदेवी', 'ज्ञानेश्वरी' आणि 'गीताटीका' अशा तीन प्रकारांनीं करतात. (नामदेव अ. ९०९, ९१२). अर्थात् ज्ञानदेवांची ती ज्ञानदेवी किंवा ज्ञानेश्वरी असें नांव पुढिलांनीं रूढ केलें असावें.

**चांगदेव-पासष्टी** हें प्रकरण ज्ञानदेवांचेंच किंवा आणखी कोणाचें असा वाद पूर्वी झाला होता. त्यांतील 'एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे। दोन्ही डोळस आरिसे' (चां. ६२) या ओवीवरून हें प्रकरण ज्ञानदेवकृत नसून महानुभाव पंथांतील चक्रपाणी चांगा याचें आहे असा पूर्वपक्ष कै. चांदोरकर[1] यांनीं केला होता. त्यास श्री. पांडुरंग शर्मा[2] यांनीं सविस्तर उत्तर देऊन हा ग्रंथ त्यांतील अंतर्गत प्रमाणांवरून ज्ञानेश्वरीकार ज्ञान-

---

१. इतिहास व ऐतिहासिक, वर्ष ४, अंक ३.

२. चित्रमय-जगत्, फेब्रुवारी, १९२३.

देवांचाच होय असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. ज्ञानेश्वरी–अमृतानुभव एका बाजूस व चांगदेवपासष्टी दुसऱ्या बाजूस ठेविली असतां भाषासादृश्य इतकें दिसतें, कीं या सर्व ग्रंथांचें कर्तृत्व एकाकडेच द्यावें लागतें. प्रो. रा. द. रानडे म्हणतात त्याप्रमाणें "पासष्टींतील प्रत्येक ओंवीस ज्ञानेश्वरींतून किंवा अमृतानुभवांतून समानार्थक ओंवी काढून दाखवितां येईल." तत्वज्ञानाच्या दृष्टीनें पाहिलें तरी ज्ञानेश्वरींत आणि अमृतानुभवांत आढळणारी परमात्म्याची अनिर्वचनीयता, नामरूपातीतता, त्रिपुटीची भ्रांतिमूलकता, अजातवाद, स्फूर्तिवाद हींच तत्वें 'चांगदेवपासष्टीं'तहि आढळतात. तात्पर्य, ज्ञानदेवांचाच हा ग्रंथ आहे याविषयीं संशय नसावा.

ज्ञानदेवांच्या 'अमृतानुभवा'स पुढें स्वतंत्र टीकांचा विषय होण्याचा व संस्कृतांत अनुवादिला जाण्याचा मान मिळाला हें कै. भावे यांनीं नमूद केलेंच आहे. अलीकडे प्रसिद्ध कीर्तनकार श्री. दासगणु बोवा यांनींहि या ग्रंथावर एक ओवीबद्ध टीका रचिली असून तिचा उल्लेख येथें करणें अवश्य आहे. तसेंच 'चांगदेवपासष्टी'चीहि एक संस्कृत समश्लोकी उत्तरकाळांत रचिली गेली असावी असें कै. स. म. दिवेकर[1] यांच्या एका टिपणावरून वाटतें. ही समश्लोकी मूळांत एका पासोडीवर लिहिलेली असावी असें त्यांतील 'पंचषष्टिलिखितसूत्रपट्टः समाप्तः' हा समाप्तिदर्शक उल्लेख सांगतो.

### ज्ञानेश्वरीच्या उपलब्ध प्रती

ज्ञानेश्वरीच्या प्रतींचे एकनाथपूर्वकालीन व एकनाथोत्तरकालीन असे दोन वर्ग पडतात. ज्ञानदेवांचे शिष्य सच्चिदानंदबावा यांच्या हातची शके १२१२ मधील ज्ञानेश्वरीची प्रत अद्यापि अनुपलब्ध आहे. या ग्रंथाच्या ज्या छापील प्रती आज दिसतात त्यांपैकीं बहुतेक एकनाथ-संशोधित आहेत. त्यांचें मूळ नाथकालीन आहे, ज्ञानदेवकालीन नाहीं. ज्ञानदेवांनंतर महाराष्ट्राची जी वाताहात झाली तिची झळ ज्ञानेश्वरीसहि पोंचली व पाठांतरांनीं आणि प्रक्षिप्त ओव्यांनीं ती 'शुद्धाबद्ध' होऊन गेली. एकनाथांच्या वेळेस या ग्रंथास सुमारें ३०० वर्षे होऊन गेल्यानें त्याचें संशोधन करण्याची आवश्यकता त्यांस वाटली व ज्ञानेश्वरीची ही 'लेखनकामासाठी' त्यांनीं शके १५०६-मध्यें पैठण येथें पुरी केली. यासाठीं ज्ञानेश्वरीच्या अनेक प्रती त्यांनीं मिळविल्या, त्यांतील पाठभेदांची व प्रक्षिप्त ओव्यांची चांचणी केली, मूळांतील शब्दरूपांना किंचित् स्वकालीन असें वळण दिलें, व इतउपर या ग्रंथांत आपल्या पदरच्या ओव्या घुसडणें म्हणजे अमृताच्या ताटांत नरोटी ठेवणें होय असेंहि स्पष्टपणें बजाविलें. एकनाथांच्या या कृतीपासून जसा लाभ तसा तोटाहि

---

१. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १२. अंक ३.

झाला. ज्ञानेश्वरीचें संशोधन करून तिचें पुनरुज्जीवन करण्याची त्यांची कामगिरी मोठी आहे यांत शंकाच नाहीं. पण त्याबरोबरच एकनाथांनीं ज्ञानेश्वरींतील शब्दरूपांना आधुनिक वळण देऊन तिचें अर्वाचीकरण केल्यानें ज्ञानदेवांच्या मूळ भाषेस आपण मुकलों, हेंहि खरें आहे. ही भाषाविषयक हानि अंशतः दूर करण्याचा प्रयत्न कै वि. का. राजवाडे यांनीं केला. ज्ञानेश्वरीची एक अतिप्राचीन अशी प्रत त्यांना मोगलाईत बीड–पाटांगण येथें मिळाली व ती सच्चिदानंदबावांच्या प्रत्यक्ष हयातींत म्हणजे शके १२४०-च्या आंतबाहेर लिहिलेली असून आद्य मराठी कवि मुकुंदराज यांच्या संग्रहांतील असावी असा आग्रह कै. राजवाडे यांनीं धरला व त्याचा पाठपुरावाहि केला. परंतु ही प्रत कै. राजवाडे म्हणतात तितकी जुनी नसावी असाच कौल बहुतेक सर्व विद्वानांनीं दिला असून या प्रतीसंबंधीं आजवर पुष्कळ चर्चाहि झाली आहे. राजवाडे प्रत छापण्यांत अनेक मुद्रणदोष घडले व त्यामुळें संशयास जागा झाली. मूळ पोथींतील पानाचें त्यांनीं दिलेलें छायाचित्र आणि त्याचें मुद्रित यांत तफावत पडूं लागल्यानें हा संशय बळावला. बरें, मूळ पोथी पहावी तर ती कै. राजवाड्यांनीं संतापाच्या भरांत जाळून टाकली असें कळतें. तात्पर्य, राजवाडे जिला मुकुंदराजी-प्रत म्हणतात तिची चर्चा करणें आज तरी निष्फळ आहे. हें सर्व खरें असलें तरी ज्ञानेश्वरीच्या सर्व उपलब्ध प्रतींत ही राजवाडे–प्रत प्राचीनतम होय यांत कांहीं शंका नाहीं. प्रसिद्ध वैयाकरण कै. गो. कृ. मोडक[१] यांनीं भाषेच्या आधारें या प्रतीचें पुराणत्व सिद्ध केलें असून तें वादातीत आहे. भाषेंतील शब्दरूपांचें जुनेपण, क्षेपक ओव्यांचें अल्पत्व, 'ळ'काराऐवजीं 'ल'काराचें वैपुल्य व एकनाथकृत संशोधनपर अतएव उत्तरकालीन ओव्यांचा अभाव हीं जीं ज्ञानेश्वरीच्या प्राचीनत्वाचीं गमकें तीं राजवाडे–प्रतींत असल्यामुळें ती प्रत नाथपूर्वकालीन होय हें निश्चित. ती ज्ञानदेवकालीन आहे असें मात्र निश्चयानें म्हणतां येत नाहीं. असो. अशाच प्रकारचा आणखी एक प्रयत्न अलीकडे डॉ. रा. ग. हर्षे यांनीं केला असून त्यांना पंढरपूर येथील दत्तमठाचे अधिपति श्री. के. ना. विप्र यांजकडून मिळालेली ज्ञानेश्वरीची सिद्धनाथ–प्रत ही उपलब्ध प्रतींत प्राचीनतम म्हणजे शके १२७२-तील आहे असा त्यांचा दावा आहे. डॉ. हर्षे यांनीं स्वमतसिद्ध्यर्थ भगीरथ प्रयत्न केला असला तरी तो यशस्वी झालेला नाहीं. कारण त्यांस मिळालेली ही प्रत एकनाथोत्तर काळांतील म्हणजे शके १५७२-तील आहे असा निवाडा बहुतेक सर्वांनीं एकमुखानें दिला आहे. ज्ञानेश्वरीच्या उपलब्ध प्रतींची चिकित्सा या दृष्टीनें

१. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १५, अंक १.

मात्र डॉ. हर्षे यांची प्रस्तावना व संशोधक श्री. वि. अं. कानोले[1] यांचा एतद्विषयक लेख अभ्यसनीय आहे.

## अभंगकार ज्ञानदेव

ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव वाचून ज्ञानदेवांच्या अभंगाकडे वळलें म्हणजे एक वेगळीच सृष्टि दिसूं लागते, व एक 'अपूर्व' संतकवि भेटल्याचा भास मनाला होऊं लागतो. या संशयानें कै. भारदेबुवांना ('भारद्वाज') चांगलेंच ग्रासलें होतें, आणि त्यांनीं ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर व अभंगकर्ते ज्ञानदेव असे दोन भिन्न कवि होऊन गेल्याचें समर्थन इ. स. १८९८-९९ सालीं 'सुधारक' पत्रांतून केलेंहि होतें. ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर हे आपेगांवचे असून ते नाथपंथी, हठयोगी, अद्वैतवादी आणि निर्गुणोपासक होते; उलट अभंगकार ज्ञानदेव हे १४-व्या शतकांतील असून ते वैष्णवपंथी, भक्तिमार्गी, द्वैतवादी, आणि सगुणोपासक होते, याप्रमाणें या दोन ज्ञानेश्वरांची व्यवस्था कै. भारद्वाज यांनीं लावून टाकली होती. या पूर्वपक्षाचें खंडण अनेकांनीं केलें. त्यांत कै. भिंगारकरबुवा यांची लेखमाला[2] अति महत्त्वाची आहे. ज्ञानदेव एकच, दोन नाहींत, असा सिद्धांत मांडून त्यांनीं कै. भारद्वाजांच्या पांची मुद्यांना सप्रमाण उत्तरें दिलीं. वस्तुतः हा वाद कै. भिंगारकरबुवांच्या लेखांनीं मिटावयास हवा होता. परंतु अजूनहि दोन ज्ञानदेवांचा पक्ष क्वचित् कोठें मांडलेला दिसून येतो. अगदीं अलीकडे श्री. त्र्यं. गं. धनेश्वर[3] यांनीं कै. भारद्वाजांच्या मताचा पुनरुच्चार केला आहे. तेव्हां अद्यापिहि दोन ज्ञानेश्वरांची विचारसरणी अधूनमधून डोकावतांना पाहून कित्येकांच्या मनांत ती घर करून असावी अशी शंका येते. म्हणून या विषयाचा प्रपंच येथें करावयास हवा. यासंबंधीं कै. पांगारकर[4], प्रो. शं. वा. दांडेकर[5], व प्रो. कृ. वें गजेंद्रगडकर[6] यांनीं केलेलें विवेचन ध्यानीं घेऊनच आम्हीं प्रस्तुत चर्चा करीत आहों.

पहिला प्रश्न भाषेचा. हें खरें, कीं ज्ञानेश्वरीच्या मानानें अभंगांची भाषा अर्वाचीन वाटते. परंतु एक तर अभंगांचीं अस्सल हस्तलिखितें मिळत नाहींत, आणि पुढेंमागें मिळतील अशी आशा नाहीं. मराठी संतकवींची अभंग-

---

१. श्रीज्ञानेश्वर दर्शन, भाग १, पृ. १९७.

२. श्री. र. भिंगारकर, 'इंडियन इंटरप्रेटर', जुलै १९१४.

३. 'ज्ञानेश्वरदर्शन' भाग २, शास्त्रीय खंड, पृ. १९४.

४. 'म. वा. इतिहास,' खं. १.पृ. ५९७ ते ६०१.

५. 'श्रीज्ञानदेव' पृ. ६९ ते ७२.

६. 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' भाग १' साहित्यखंड, पृ. ३०७.

वाणी ही लेखनिविष्ट फारशी नव्हतीच; ती मुखनिविष्ट होती. वारकऱ्यांच्या आणि कीर्तनकारांच्या मुखपरंपरेनें ती आजवर जगली आहे. साहजिकच प्रत्येक पिढीनें आपापल्या काळांतील लोकरूढ वाक्प्रयोग आणि शब्दरूपें वापरल्यामुळें ज्ञानदेवांच्या अभंगांचें मूळचें भाषास्वरूप कालमानानें बदलत गेलें. ज्ञानेश्वरीच्या एकनाथपूर्वकालीन व एकनाथोत्तरकालीन प्रतींत जो फरक आणि ज्या कारणांमुळें दिसतो, तोच फरक त्याच कारणांमुळें ज्ञानेश्वरी आणि अभंग यांतहि दिसेल. शिवाय ही अभंगवाणी आज साडे-सहाशें वर्षें लक्षावधि साध्याभोळ्या, जाणत्यानेणत्या वारकऱ्यांच्या तोंडीं खेळत आहे. तेव्हां भाषेच्या प्राचीन–अर्वाचीनत्वाचें प्रमाण टिकणारें नाहीं. उलट ज्ञानेश्वरींतील कितीतरी तत्कालीन शब्द जसेच्या तसे अभंगांतून आढळतात. वोज, चोज, वोखटें, साउमा, नावेक, कानडा, उगाणा, वालभ, भांगार, खेंव, अव्हाट, इत्यादि शेंकडो शब्द ज्ञानेश्वरींत आणि अभंगांत सारखेच आहेत. शिवाय, ‘ सुखा दोंदुली वाढली ’ (अ. ४०२), ‘ काया काळाचें खाजुकें ’ ( अ. ९४८ ), ‘ उपनिषदांचा गाभा ’ ( अ. १७ ), इत्यादि वाक्प्रयोग दोहीं ग्रंथांतून एकच आहेत. तसेंच ‘ श्रुती मौनावल्या ’, ‘ आनंद घनावला ’, ‘ सुख पाहाळलें ’ यांसारखे नामधातू दोहींकडे आढळतात. एकूण, भाषादृष्ट्या पाहतां हीं दोन्ही प्रकरणें एकाच कवीच्या वाणींतून उतरलीं यांत संशय नाहीं. भाषेप्रमाणें विचारसादृश्यहि ध्यानांत घेण्यासारखें आहे.

**( १ ) रत्नाचिया आशा। घात झाला तया राजहंसा। (अ.५१८)**
**नक्षत्राचिया आभासा–। साठीं घात झाला तया हंसा।**
ज्ञा. ९-१४६

**( २ ) ‘राजयाची कांता काय भीक मागे। ’ (अ. २५२)**
**‘ काय समर्थाची कांता। कोरान्न मागे ’ ( ज्ञा. १२-८५ )**

याप्रमाणें कितीतरी वैचारिक साम्येंहि काढून देतां येतील. या समान कल्पना करणारें कविमन एकच असलें पाहिजे. कांहीं ऐतिहासिक उल्लेखहि अभंगांत असे येतात, कीं त्यांवरून ते ज्ञानेश्वरीकारानेंच केले असल्याचें मनास पटतें. आपण ‘ उत्तरपंथींचे कापडी ’ व ‘ एक दीन नाथपंथी ’ असल्याचा स्पष्ट उल्लेख ज्ञानदेवांनीं अ. ७५५ व अ. ८९५ यांत केला आहे. पंथ आणि गुरुपरंपरा यांचे हे उल्लेख ज्ञानेश्वरींतील प्रमाणेंच आहेत.

आतां ज्ञानेश्वरींत विठ्ठलभक्तीचा स्पष्ट असा उल्लेख नाहीं व अभंगांत तर ‘ बाप रखुमादेवीवरु विठ्ठला ’ चा निर्देश पदोपदीं येतो, असा आक्षेप

घेऊन 'दोन ज्ञानदेवां' ची विचारसरणी मांडणाऱ्यांना प्रो. रा. द. रानडे[1] यांनीं समर्पक उत्तर दिलेलेंच आहे. "ज्ञानेश्वरींत अ. १२, ओवी २१४-२१८ मध्यें कृष्णानें शंकरास आपल्या शिरीं वाहिल्याचा उल्लेख आहे, व पंढरपूरखेरीज कोठेंहि विठ्ठलाच्या मूर्तीवर शिवपिंडी नाहीं. अर्थात् हा उल्लेख पंढरीच्या विठ्ठलासच अनुलक्षून असावा. दुसरें म्हणजे ज्ञानेश्वरींत गीता-प्रासादाचें वर्णन चालू असतां 'ते निजबोधें उराउरी। भेटती आत्मया श्रीहरी ॥' असा पंढरीच्या देवभक्तांच्या भेटीचा गौरवपर उल्लेख ज्ञानदेव करतात (ज्ञा. १८ X ४७). विठ्ठलास 'उराउरी' भेटण्याची पद्धति एक पंढरपुरासच आहे. आणि प्रत्यक्ष विठ्ठल हा शब्द ज्ञानेश्वरींत नसला तरी विठ्ठलसंप्रदायाचे आधारभूत जे संत त्यांचा गौरव 'संत हे माझीं रूपडीं', 'संतातें पाहतां गिंवसावें' याप्रमाणें अनेकदां आला आहे. तसेंच 'कीर्तनाचेनि नटनाचें। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे।' याप्रमाणें कीर्तनभक्तिहि ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं वाखाणली आहे (ज्ञा. ९ X १९७). आतां संत आणि कीर्तन हे शब्द पंढरीच्या वारकरी संप्रदायांत जितके ऐकिवांत आहेत, तितके अन्यत्र नाहींत. शिवाय विठ्ठल आणि कृष्ण यांत ज्ञानेश्वर अभेद मानीत असल्यामुळें ज्ञानेश्वरींत कृष्णाचा उल्लेख घडोघडीं येत असतांना विठ्ठलाचा स्वतंत्र नामनिर्देश होण्याचें विशेष प्रयोजनहि नव्हतें. 'कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामांचे निखिल प्रबंध।' (ज्ञा. ९X२१०) या ओवींत ही अभेदभक्तिच ज्ञानेश्वरांस अभिप्रेत दिसते. तसेंच अभंगांमध्येंहि केवळ विठ्ठलभक्ति 'नसून स्वर्ग जयाची साळोंखा' अशा प्रकारच्या त्रिभुवन व्यापणाऱ्या शिवलिंगाचीहि भक्ति सांगितली आहे. याप्रमाणें प्रो. रानडे यांच्या विवेचनाचा निष्कर्ष आहे. तात्पर्य, ज्ञानेश्वरीच्या बाजूनेंहि विचार करतां दोन ज्ञानेश्वरांची विचारसरणी असत्यच ठरते. ज्ञानेश्वरींत अभंगकार आहेत, आणि अभंगांत ज्ञानेश्वरीकार आहेत, हेंच खरें.

## ज्ञानदेवांचें तत्त्वज्ञान

ज्ञानदेवांच्या तत्वज्ञानाचा विचार करतांना सारस्वतकारांनीं निष्कारण अवडंबर माजविलें आहे. मायावादाचें औदासीन्य ज्यांत भरून राहिलें आहे व चातुर्वर्ण्य ज्यांत मोक्षाच्या आड येत आहे असा पारंपरिक संन्यासमार्ग अर्थात् शंकरमत टाकून ज्ञानदेव नाथपंथाकडे कसे वळले आणि स्वमतसिध्द्यर्थ त्यांनीं पांचरात्र तत्वज्ञानांतील निर्व्यूह मार्गाची, विशेषतः अल्वार साधूंच्या व्याख्यानाची कांस कशी धरली यासंबंधीं कै. भावे यांनीं केलेला विस्तार अप्रस्तुत आहे असें आम्हांस वाटतें.

१. 'ज्ञानेश्वरवचनामृत' प्रस्तावना, पृ. ९ ते ११.

तरी पण ज्ञानेश्वरींतील तत्वज्ञान हा एक विवाद्य विषय असल्यानें त्याची चर्चा येथें करावयास पाहिजे.

पंडित पांडुरंगशर्मा यांनीं ' ज्ञानेश्वरमहाराज व इतर तत्ववेत्ते ' या विषयावर एक लेखमाला लिहून इ. स. १९२१ सालीं प्रस्तुत चर्चेस चालना दिली. त्यावर पुष्कळ वाद होऊनहि त्यांतून निष्पन्न असें कांहींच झालें नाहीं. अगदीं अलीकडे डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं ' ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान ' या ग्रंथांत प्रस्तुत विषयाची सांगोपांग चर्चा केलेली असून वादाचा निर्णयहि केला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्ञानेश्वरी रचतांना ज्ञानदेवांच्या समोर शंकराचार्यांचें गीताभाष्य होतें हें वरवर पाहणाऱ्याच्याहि ध्यानांत येईल. स्वतः ज्ञानदेवांनीं यासंबंधीं केलेलें ' तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसतु ' हें विधान जसें सूचक आहे, तसेंच भेदकहि आहे. हे भाष्यकार म्हणजे कोण ? एकच कीं अनेक ? शंकराचार्य, कीं रामानुजाचार्य, कीं आणखी कोणी ? ' भाष्यकार ' या संदिग्ध अर्थाच्या एका शब्दानें इतके प्रश्न उत्पन्न करून पंडितांना वादास प्रवृत्त केलें आहे. आतां ज्ञानदेवांच्या पूर्वीं ज्यांना भाष्यकार म्हणतां येईल असे दोनच आचार्य झाले; एक शंकर व दुसरे रामानुज. मध्वाचार्यांनींहि गीतेवर भाष्य लिहिलें खरें; पण एक तर ते ज्ञानदेवांचे समकालीन होते. आणि दुसरें म्हणजे त्यांचें द्वैत इतकें स्पष्ट आहे, कीं त्यांचा आणि ज्ञानदेवांचा संबंध कोणीहि जोडीत नाहीं. निंबार्क हे ज्ञानदेवपूर्व असले तरी त्यांनीं गीताभाष्य रचल्याचें प्रसिद्ध नाहीं. तेव्हां शंकराचार्य किंवा रामानुजाचार्य यांपैकीं एकाला किंवा या दोघांना, ज्ञानदेवांनीं वाट पुसली आहे, हें निश्चित. तत्वज्ञानदृष्ट्या गीतेंतील एकूण २१८ स्थलांचा तौलनिक अभ्यास करून डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं निष्कर्ष काढला आहे तो असा– " १४६ ठिकाणीं शंकर व ज्ञानेशांनीं तत्वज्ञानाच्या व अर्थाच्या दृष्टीनें सदृश अशी टीका केली आहे. त्यांपैकीं ४२ ठिकाणीं शंकरांचेच शब्द ज्ञानेशांनीं योजिले आहेत. १० ठिकाणीं दोघांचे दृष्टान्तहि सारखे आहेत व ५७ ठिकाणीं ज्ञानेशांनीं शंकरांचा अर्थ घेऊन रामानुजांचा टाकला आहे. ६८ ठिकाणीं शंकरांचा किंवा रामानुजांचाहि अर्थ न घेतां ज्ञानेशांनी स्वतंत्र अर्थ केले आहेत. ... रामानुजांच्या अनुसरणाचें निरपवाद स्थळ एकच आहे व तें ' यावानर्थ उदपाने ... । ' ( गीता २–४६ ) हा श्लोक होय. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें शंकरांना विरोधी असें एकहि स्थळ नाहीं. " तात्पर्य, ' भाष्यकारातें वाट पुसतु ' यांतील भाष्यकार म्हणजे शंकराचार्यच होत यांत शंका नाहीं. याचा अर्थ ज्ञानदेव

हे शांकरभाष्याचे केवळ भाषांतरकार किंवा क्षिरपे आहेत असा मात्र नव्हे. त्यांनीं मुख्यतः शांकरमताचा अनुवाद केलेला असला तरी त्यांच्या गाढ व्यासंगाचें प्रतिबिंब ज्ञानेश्वरींत पडणें हें अटळ होतें. सूक्ष्मपणें पाहिलें तर असें दिसतें, कीं उपनिषदें, गीता, गौडपादकारिका, योगवासिष्ठ, शांकर-मत, काश्मिरी शैवसंप्रदाय, आणि गुरुपरंपरेनें आलेलें नाथपंथीय तत्वज्ञान अशा सप्तसिंधूंचे ओघ ज्ञानेश्वरीच्या अद्वैत–सागरास येऊन मिळाले आहेत. शिवाय, हें सर्व तत्वज्ञान ज्ञानदेवांच्या स्वतंत्र प्राज्ञच्या तप्त मुशींतून बाहेर पडत असल्यानें त्यावर ज्ञानदेवत्वाची मुद्रा उमटलेली दिसते ती निराळीच. त्यांच्या ठिकाणीं आत्मानुभव आणि प्रज्ञा एकवटली असल्यामुळें ते शंकरा-चार्यांच्यापुढें दोन पावलें जाऊं शकले. आचार्य केवलाद्वैताचा पुरस्कार करण्याकरितां म्हणून तत्सिद्ध्यर्थ मायावादाचा आश्रय करतात व ‘जगन्मिथ्या’ असें निक्षून सांगतात. ज्ञानदेव एवढेंच करून थांबते तर शांकरभाष्याचे एक अनुवादक याहून वरची पदवी त्यांना मिळती ना. परंतु ज्ञानदेव हे एक स्वयंप्रज्ञ भाष्यकार असल्यानें त्यांची स्वतंत्र प्रज्ञा ‘स्फूर्तिवादा’च्या रूपानें ज्ञानेश्वरींत व अमृतानुभवांत आढळते. विश्व हें चिद्विलास आहे किंवा ‘जग असिकीं वस्तुप्रभा’ हा त्यांचा सिद्धांत म्हणजे स्फूर्तिवादाचा गाभा असून या स्फूर्तिवादाचा मायावादाशीं समन्वय करण्यांत त्यांची प्रतिभा दिसून येते.

### ज्ञानदेवांचें जीवितकार्य

ज्ञानदेवांच्या जीवितकार्याचा निराळा असा आढावा घेण्याची आवश्यकता कै. भावे यांना वाटली नाहीं. कारण त्यांच्या वेळीं या विषयास फांटे फुटून तो विवाद्य झालेला नव्हता. आज मात्र हा एक वादविषय झाला असून ज्ञानदेवांचें जीवितकार्य हें मुख्यतः सामाजिक होतें असें भासविण्याचा प्रयत्न होत असल्यानें त्याचा निवाडा करणें अवश्य आहे.

प्रो. न. र. फाटकांनीं आपल्या ज्ञानेश्वरीवरील नवीन ग्रंथांत वरील मताचा पुरस्कार केलेला असून ज्ञानदेवांचें अंतरंग मुख्यतः सामाजिक होतें असें भासविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे.[1] ज्ञानदेवांच्या काळीं इस्लामच्या राक्षसी आक्रमणाची झळ आंतबाहेर लागून सारा महाराष्ट्र देवधर्मासंबंधीं केवळ अगतिकच नव्हे तर अधःपतित झाला होता, व त्याची सामाजिक आणि धार्मिक संघटना करून ज्ञानदेवांनीं त्यास नवधर्मांचें रसायन पाजलें

---

१. ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी, प्र. ३ व ५.

अशी प्रो. फाटकांची विचारसरणी आहे. या विचारसरणींत एक ऐतिहासिक असत्य दिसून येतें. कारण ज्ञानदेवकालीन महाराष्ट्र हें एक सुखसंपन्न राष्ट्र असून इस्लामच्या उत्तरेकडील आक्रमणाची झळ अद्यापि त्यास लागलेली नव्हती; ती ज्ञानदेवांच्या नंतर पांचपंचवीस वर्षांनीं लागूं लागली. अर्थात् मुसलमानीं सत्तेखालीं ज्यांचा देवधर्म रगडला जात आहे अशा हिंदुसमाजाचें 'स्वत्व' राखण्याकरितां म्हणून ज्ञानेश्वरीची रचना झाली, या मतास इतिहासांत आधार नसल्यानें तें मान्य करतां येत नाहीं.

वस्तुस्थिति अशी आहे, कीं ज्ञानदेवांचा दृष्टिकोन येथून तेथवर आध्यात्मिक असून केवळ अनुषंगानें त्याला सामाजिक रंग चढल्यासारखा वाटतो. विशेषतः ज्ञानेश्वरींतील नीतिमीमांसेचें ध्येय आत्मसाक्षात्कार हें असून तिच्या मुळाशीं कोणताहि सामाजिक हेतु असावा असें वाटत नाहीं. आत्मानुभवाच्या पायावर भक्तिज्ञानाचें मंदिर उभारून तें कुळजातीचा विचार न करतां सर्वांना खुलें करणें आणि शुद्ध परमार्थाची वाट उजळून दाखविणें हें ज्ञानदेवांचें जीवितकार्य होय. हें ध्येय त्यांनीं मुख्यतः गीता-टीका लिहून साध्य केलें. ज्ञानदेवांची भूमिका शुद्ध आध्यात्मिक असून ज्ञानेश्वरीस 'अंतरंगचि अधिकारियें' असें 'अध्यात्मशास्त्र' म्हणण्यांत त्यांचा हेतु स्पष्ट होतो. आतां हें शास्त्रच सर्व व्यापक असल्यामुळें त्याच्या पोटांत समाजहिताची कल्पना आपोआप येते आणि तीच ज्ञानदेव मुख्यत्वें-करून मांडीत आहेत असा भास होतो, हें खरें. परंतु सूक्ष्मपणें पाहिल्यास अध्यात्म किंवा परमार्थ हाच त्यांचा प्रतिपाद्य विषय आहे असें दिसून येईल. याचा अर्थ ते समाजहिताविषयीं उदासीन होते असा मात्र नव्हे. उलट, केवळ हिंदुसमाजाच्याच नाहीं तर अखिल मानव्याच्या सुखाशिवाय कोणतीहि अन्य चिंता त्यांना नव्हती. विश्व हेंच ज्यांचें घर झालें अशा ज्ञानदेवांनीं सर्वांची चिंता सर्वकाळ वाहिली आहे. त्यांची शिकवण एका विशिष्ट देशा-पुरती किंवा काळापुरती होती असें मानण्याचें कारण नाहीं. सारांश, ज्ञानदेवांचें चारित्र परमार्थमय असून परमार्थ हेंच सर्वांचें प्रेय व श्रेय होय असें त्याचें सार आहे.

### निवृत्ति, सोपान व मुक्ताबाई यांची ग्रंथरचना

ज्ञानदेवांच्या मानानें त्यांच्या भावंडांची रचना विशेष नसली तरी महा-राष्ट्र-सारस्वतांत तिचा मान राखणें जरूर आहे. पैकीं निवृत्तिनाथांच्या नांवावर 'निवृत्तिसार', 'निवृत्तिदेवी', व 'उत्तरगीताटीका' असे तीन ग्रंथ ऐकूं येत असले तरी त्यांतील एकहि आज उपलब्ध नाहीं. ठाणें येथील संशोधक श्री. रा. म. आठवले यांनीं अलिकडे छापून प्रसिद्ध केलेला

'निवृत्तेश्वरी' हा ग्रंथ निभ्रांतपणें निवृत्तिनाथकृतच होय हें अजून ठरावयाचें आहे. धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत निवृत्तिनाथांच्या नांवावर 'सटीक भगवद्गीता' (बाडांक ३५०) व 'समाधिबोध' (बा. १०५९) अशीं दोन हस्तलिखितें असून शिवाय बा. ४१ मध्यें एका जुन्या ग्रंथांच्या यादींत 'निवृत्तेश्वरी'चा उल्लेख आहे. आज उपलब्ध असे निवृत्तिनाथांचे तीनचारशें अभंग मात्र असून त्यांवरून त्यांच्या कवित्वशक्तीची नीट कल्पना येते. इतरांच्याप्रमाणें त्यांचाहि एक 'हरिपाठ' असून तो आंतबाहेर गोड आहे. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेचे चित्सूर्य असले तरी ज्ञानेश्वरांच्या काव्यांतील वैचित्र्य व कल्पनाविलास त्यांत नाहीं. ज्ञानदेवांची अभंगवाणी काव्यरसांत न्हाऊन निघाली आहे. निवृत्तिनाथांची त्या मानानें थोडी नीरस वाटते. मधूनच 'नाहीं आम्हां काळ नाहीं आम्हां वेळ। अखंड सोज्ज्वळ हरि दिसे' किंवा 'ध्यानेंविण मन विश्रांतिविण स्थान। सूर्यैविण गगन शून्य दिसे' यासारखे सुंदर चरण ते रचितात, हें खरें. परंतु एकंदरींत निवृत्तिनाथांचे अभंग ज्ञानमय वाटतात, काव्यमय वाटत नाहींत, हें मान्य करावें लागेल.

सोपानदेवांची ग्रंथरचना विशेष नाहीं. परंतु जी आहे ती मात्र गोड आहे. त्यांच्या नांवावर 'सोपानदेवी', 'पंचीकरण' व 'प्राकृतगीता' हीं तीन हस्तलिखितें आढळतात.[1] परंतु ही रचना सोपानदेवांचीच असेल असें निश्चयानें सागतां येत नाहीं. त्यांचे असे पांचपन्नास अभंगच काय ते आज आपल्या हातीं असून ते ज्ञानदेवांच्या वाणीनें पोसलेले स्पष्ट दिसतात. सोपानदेवांचे बोल इतरांच्या मानानें अधिक निर्भीड व परखड वाटले तरी प्रसंगीं त्यांत हळुवारपणहि येतें. "चलारे वैष्णवहो, जाऊं पंढरीसी। प्रेमामृत खुण मागों त्या विठ्ठलासी" या त्यांच्या पंढरींतील काल्यावरील प्रसिद्ध पदाचा करुणरम्य शेवट कोणचेंहि अंतःकरण हलवून सोडील असा आहे. वैष्णवांच्या मेळ्यांत विठ्ठलाचे श्रीचरण कासवदृष्टीनें न्याहाळीत निवांत उभे राहणारे सोपानदेव शके १२१८ त सासवड[2] मुक्कामीं

---

१. रामदासी संशोधन, खंड, १, क्र. ३१६, ४४५.

२. नामदेवादि कवि सोपानदेवांची समाधि संवत्सरग्रामीं असल्याचें सांगतात. आज तर ती सासवडास दिसते. [वस्तुस्थिति अशी आहे, कीं सोपानांचे काळांत संवत्सर व सासवड हीं गांवें अगदीं लागून होतीं. पुढें शके १४०१ मध्यें एका कुलकटाचें द्वारा मौजे सासवड मोडून त्याचें कसबे सासवड झालें व त्यांत हीं दोन गांवें एकवटलीं (पहा:– भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ४, पृ. ६२.)

खरोखरीच निवांत झाले !

मुक्ताबाई ही अध्यात्म आणि काव्य या दोहीं बाबतींत ज्ञानेशांच्या अधिक जवळ येते. मी अंध वायां जात असतांना निवृत्तिनाथांनीं मला सावध केलें व तेव्हांपासून ' अवघाचि संसार केला आम्हीं गोड ' असें मुक्ताबाई म्हणते. एकाहून एक श्रेष्ठ अशा भावंडांच्या सहवासांत तिला 'आनंदाचें लेणें' लाभलें व तिच्या स्फूर्तीलाहि उजळा मिळाला. मुक्ताबाईचे अवघे पांचपन्नास अभंगच आपल्या वाट्यास आलेले असले तरी तिच्या काव्यशक्तीची साक्ष देण्यास ते पुरेसे आहेत. स्वतःच्या आध्यात्मिक अनुभवांचें चमत्कृतिपूर्ण वर्णन करण्यांत ती पटाईत आहे. वानगीदाखल एक अभंग देतों.

" मुंगी उडाली आकाशीं । तिनें गिळिलें सूर्यासी
थोर नवलाव जाला । वांझे पुत्र प्रसवला
माशी वियाली घार झाली । देखोनि मुक्ताई हांसली "

मुक्ताबाईचा ' हरिपाठ ' हि काव्यमधुर आहे. तिचे ' ताटीचे अभंग ' सर्वश्रुतच आहेत. तसेंच एका प्रसंगीं मुक्ताबाई आणि जनाबाई या सारख्या वयाच्या व सारख्या अधिकाराच्या कवयित्रींनीं एकत्र बसून म्हटलेल्या ओव्यांतील मुक्ताईची ओवी जशी ज्ञानमय तशीच काव्यमयहि आहे.

" पहिली माझी ओवी । परतूनि पाहिलें
दृष्टीनें देखिलें । निजरूपीं "

येथून प्रारंभ करून योगमार्गातील एकएक खुणा सांगत हा स्वानुभवचित्रपट तिनें पुरा केला आहे. मुक्ताबाईच्या चांगदेवावरील अभंगांत तिचा अध्यात्माधिकार स्पष्ट दिसतो. हे अभंग काव्यदृष्ट्याहि रम्य आहेत. त्यांत चांगयास आपला बाळ कल्पून ती त्यास ज्ञानामृतानें न्हाऊं घालते, अव्यक्तानें विणलेल्या अविनाशी पाळण्यांत टाकते, त्याचें ' नाम 'करण करते, अनुहात टाळी वाजवून त्याला स्वस्वरूपीं निजविते व मनपवनाची दोरी हातीं घेऊन त्याचा डोळा अलक्ष्यीं स्थिर करते. ही रूपकपद्धति मुक्ताबाईनें ज्ञानेश्वरांपासून उचललेली दिसते.

मुक्ताबाईचें समाधिस्थान एदलाबादजवळील माणगांव असें कै. भावे म्हणतात तें तितकें बरोबर नाहीं. तर खानदेशांतील तापी तीरावरील मेहुण नांवाचें गांव हें तिचें समाधिस्थान होय असें नामदेवांच्या अभंगांवरून वाटतें. या गांवीं सोमेश्वराचें देऊळ असून त्याचा स्पष्ट असा उल्लेख नामदेवांनीं आपल्या अभंगांत केला आहे. " तापीचिये तीरीं महत् ग्राम थोर । असे सोमेश्वर पुरातन ". हें देऊळ एदलाबादेंत नाहीं, तें मेहुणगांवीं

आहे. मुक्ताबाईच्या निधनप्रकाराबद्दलहि गैरसमज दिसतो. 'विजेसहित निमाली मुक्ताबाई' या वचनाचा अर्थ मुक्ताबाईवर वीज कडाडून त्यासरशीं ती गुप्त झाली असा करण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. विद्युत्पाताप्रमाणें गगनभेदी अशा अनाहत गर्जनेचा साक्षात्कार होत असतांना तिची प्राणज्योत मालवली असें म्हणणें अधिक युक्त ठरेल.

अभ्यासाचीं साधनें

नामदेव : आदि – समाधि – तीर्थावळी ( नामदेव–गाथा ).
भारद्वाज : ज्ञानदेव व ज्ञानेश्वर ( इ. स. १९३१ ).
श्री.र. भिंगारकर : ज्ञानदेवांचा कालनिर्णय ( इ. स. १९०० ).
शं. वा. दांडेकर : श्रीज्ञानदेव ( इ. स. १९३२ ).
ल. रा. पांगारकर : श्रीज्ञानदेव–चरित्र व ग्रंथविवेचन.
रा. द. रानडे : ज्ञानेश्वरवचनामृत व संतवचनामृत ( प्रस्तावना ).
शं. दा. पेंडसे : ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान.
वि. का. राजवाडे : ज्ञानेश्वरी ( प्रस्तावना ).
न. चिं. केळकर : ज्ञानेश्वरी–सर्वस्व.
न. र. फाटक : ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी.
ज्ञानेश्वर–मंडळ : श्रीज्ञानेश्वर–दर्शन, भा. १–२.
रा. ग. हर्षे : ज्ञानदेवी अ. १ ( प्रस्तावना ).
शि. न. भावे : ज्ञानदेवी शब्दार्थ–कोश ( वर्धा, इ. स. १९५१ ).
शं. गो. तुळपुळे : पांच संतकवि ( ज्ञानदेव ).



**चरित्रविषयक:**– नामदेवांच्या चरित्राविषयीं अनेक प्रकारचे वाद आहेत–त्यांपैकीं कांहींचा निवाडा पुढें करीत आहों. नामदेवांचा जन्म शके ११९२. मध्यें झाला यासंबंधीं सर्वसाधारण मतैक्य दिसतें. परंतु ते पंढरपुरीं जन्मले कीं नरसी–बामणी येथें जन्मले यांविषयीं मतभेद आहेत. कै. भावे व श्री. आजगांवकर यांच्या मतें नरसी–बामणी हें नामदेवांचें जन्मस्थान होय. परंतु तसें नसावें. वस्तुस्थिति अशी दिसते, कीं हें घराणें मूळचें नरसी–बामणीचें असलें तरी नामदेवांच्या जन्मापूर्वीं कांहीं वर्षें त्यांचे आईबाप पंढरपुरास येऊन विठ्ठलभक्ति करीत राहिले होते. नामदेवांचा जन्म पंढरपुरांतच झाला या मतास परंपरेचा बळकट आधार आहे. एकनाथकृत नामदेव–चरित्रांत नामदेवांचें बालपण पंढरपुरांत गेलें असा स्पष्ट उल्लेख असून नामदेवांच्या आईनें म्हणजे गोणाईनें पुत्रप्राप्तीसाठीं जो नवस केला तो कै. भावे सुचवितात त्याप्रमाणें नरसी–बामणीच्या देवास नव्हे तर पंढरीच्या विठोबास केला होता, व हें कुटुंब तेव्हां पंढरपुरांत स्थायिक झालें होतें असें नाथांच्या पुढील अभंगावरून कळून येतें.

"द्वारकेहूनि विठू पंढरीयें आला । नामयाचा पूर्वज दामशेटी वहिला
दामा आणि गोणाई नवसी विठूसी । पुत्र देई आम्हां देवभक्तराशी"

वरील अभंगांतील 'वहिला' या शब्दांतील वर्म जाणते ओळखतीलच. शिवाय नामदेव पंढरपुरीं जन्मले याविषयीं बहुतेक सर्व प्राचीन चरित्रकारांत एकवाक्यता आहे. असो. नामदेवांच्या घराण्याचें मूळ गांव जें नरसी–बामणी तें कोठील यासंबंधींहि दोनतीन मतें आहेत. कै. भावे तें सोलापूरकडील मानतात. पण सोलापूर जिल्ह्यांत या नांवाचीं गांवें नसल्यानें हें म्हणणें टिकत नाहीं. श्री. पाटसकर[1] यांनीं वै. मुळेकृत नामदेव–चरित्राच्या आधारें हें गांव म्हणजे कऱ्हाडजवळील कृष्णाकांठचें नरसिंगपूर होय असें मत मांडलें आहे. हल्लीं 'बहें' व 'कोळें' अशीं दोन गांवें नरसिंगपुरापासून कोसभर अंतरावर असून तीं मुळांत नरसिंगपुरांतच मोडत असावीं असें दिसतें. हीं ब्राह्मणांची नरसी पुढें 'नरसी–बामणी' झाली असें श्री. पाटसकरांचें म्हणणें आहे. या गांवीं नामदेवांच्या पूर्वजांची समाधि असून तिची नित्य पूजाअर्चा तेथील नामदेव समाज करीत असे अशीहि माहिती श्री. पाटसकर देतात. न्या. केशवराव कोरटकर[2] यांचें मत निराळें असून ते ही नरसी-बामणी मोगलाईतील परभणी जिल्ह्यांतील मानतात. हीं दोन

---

१. बालभक्त श्रीनामदेव, पृ. १२–१३.

२. 'नामदेवाची नरसी' (भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ७).

गावें निरनिराळीं असून त्यांत सुमारें दहा कोसांचें अंतर आहे. या दोन गांवांचा संबंध कसा आला तें कळत नाहीं; पण त्या भागांत 'नरसी-ब्रामणी' हें जोडनांव प्रचारांत आहे एवढें मात्र खरें. नामदेवांची एक समाधि व देऊळ नरसी गांवापासून जवळच कयाड नदीच्या कांठीं असून तेथें फाल्गुन वद्य ११-स यात्रा भरत असते. नरसीस नामदेवांच्या घराची जागा दाखविली जाते व त्या गांवीं त्यांच्या अभंगांचीं कांहीं बाडेंहि मिळतात. नामदेवांची नरसी ती हीच असा समज या प्रांतांत पूर्वीपासून रूढ आहे. ज्या गांवीं जाऊन नामदेवांनीं विसोबा खेचराकडून गुरूपदेश घेतला तें नागनाथाचें आवंढें या मोगलाईतील नरसीपासून सारें पांच कोस आहे हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे. आमच्या मतें श्री. कोरट-करांचें मत सत्याच्या अधिक जवळ येतें. असो. नामदेवास उपरति आवंढ्या नागनाथाच्या देवळांत झाली. विठोबाच्या प्रेरणेनें तो विसोबा खेचराकडे गेला व त्याचा अनुग्रह त्यास 'द्वादशीचें गांवीं' म्हणजे बार्शी येथें मिळाला ही सारस्वतकारांनीं दिलेली माहिती बिनचूक वाटत नाहीं. वस्तुस्थिति अशी दिसते, कीं पंढरपुरीं असतांनाच ज्ञानदेवांची कीर्ति कानांवर येऊन नामदेवांनीं त्यांची भेट आळंदी येथें बहुधा शके १२१३ च्या सुमारास घेतली असावी. या भेटीचें सविस्तर वर्णन स्वतः नाम-देवांनीं आपल्या आत्मचरित्रपर अभंगांत केलेलें असून जिज्ञासूंनीं तें मुळांतून पहावें. (नामदेव-गाथा, क्र. १०५७ ते ८४). ज्ञानदेव-नामदेव यांची ही भेट आळंदीसच झाली असें वरील अभंगांतील 'पंढरीचा प्रेमा घरीं आला', 'अतिथी आदर केला मुक्ताबाई', 'पैलपार इंद्रायणी प्राप्त झाला', 'आला उठाउठी पंढरीसी' इत्यादि उल्लेखांवरून निश्चित होतें. प्रथम भेटीचा हा प्रसंग अपेक्षेपेक्षां थोडा निराळा घडला आणि आपली भक्ति व्यर्थ असून अजूनहि आपण अंतरीं कोरेच आहों याची जाणीव होऊन नामदेव या प्रसंगानें अंतर्मुख झाले. त्यांची भक्तीहि आंधळी होती ती जणूं डोळस झाली आणि ज्ञानदेवांच्या सांगण्यावरून आवंढ्या नागनाथास जाऊन त्यांनीं विसोबा खेचरांकडून गुरुपदेश घेतला. या पाठोपाठ ते ज्ञानदेवांच्या मंडळांत शिरून त्यांशीं समरस झालें व या संतमेळ्यासह त्यांनीं एक तीर्थयात्राहि केली. शके १२१८ मध्यें ज्ञानदेवांनीं आळंदीस समाधि घेतली तेव्हां नामदेव सन्निधच होते. त्यानंतर कांहीं काळानें ते उत्तरेकडे गेले व तिकडे भागवतधर्माचा प्रसार त्यांनीं सपाटून केला. पंजाबांत ते साधारणपणें वीस एक वर्षे असावे. नामदेव दीर्घायुषी होते. वयाच्या ८१ व्या वर्षीं म्हणजे शके १२७२-मध्यें त्यांनीं पंढरपूर येथें देह ठेविला.

## नामदेवांचें पूर्वचरित्र

नामदेवांच्या चरित्रांतील पूर्वभागासंबंधीं कांहीं गैरसमज असून त्यांचें निराकरण करणें येथें अवश्य आहे. नामदेव हे तरुणपणीं दरोडेखोर असून पुढें अनुताप होऊन भक्तिमार्गास लागले असा एक प्रवाद असून तो श्री. आजगांवकरांनीं आपल्या 'नामदेव-चरित्रां' त सिद्धांतरूपानें मांडला आहे. सारस्वतकारांनाहि तो मान्य दिसतो. वास्तविक या प्रवादांत तथ्य अगदीं नाहीं. ज्या ५६ चरणी अभंगाचा आधार या मतास ते घेतात तो अभंग नामदेवांचा नाहीं (ना. गाथा ९६८). त्याची रचना, त्यांतील 'बाच्छायें तामजाह पाठविले' हा शुद्ध फारसी शब्दप्रयोग आणि एकंदर घाटणी यांवरून हा अभंग नामदेवांचा नाहीं असेंच कोणीहि म्हणेल. दुसरें असें, कीं नामदेवांच्या जन्माचा व त्यांच्या आणि ज्ञानदेवांच्या भेटीचा काल निश्चित आहे. शके १२१८ मध्यें ज्ञानदेवांचे समाधिकाळीं नामदेवांचें वय २६ वर्षांचें होतें. आतां त्यांचें पूर्वचरित्र कलंकित मानलें तर दरोडेखोरी, बालभक्ति, ज्ञानदेवांची भेट, अनुताप, विसोबा खेचरांकडून उपदेशग्रहण, तीर्थयात्रा, पंढरीचा कीर्तनरंग इत्यादि सर्व घटना त्यांच्या आयुष्यांत अवघ्या २६ वर्षांत घडून आल्या असें मानावें लागतें. अर्थात् हें कोणीहि मान्य करणार नाहीं. तेव्हां या अडचणींतून मार्ग काढण्याकरितां रा. आजगांवकारांनीं नामदेवादि संतांचे जन्मशकच मागें खेचण्याचा वृथा प्रयत्न केला आहे. एक चूक सुधारण्याकरितां त्यांना दुसरी करावी लागली आहे. असो. शिवाय असें, कीं ज्या परखड मुक्ताबाईनीं नामदेवांचा अहंकार उघडा केला त्यांनीं त्यांच्या पूर्वचरिताविषयीं अवाक्षरहि काढलेलें नाहीं उलट, 'अखंड जयाला देवाचा सेजार' असें त्यांजविषयीं त्या म्हणतात. अर्थात् नामदेव पूर्ववयांत खरोखरीचेच दरोडेखोर असते तर मुक्ताबाईनीं या गोष्टीचा उल्लेख खात्रीनें केला असतां. तात्पर्य, नानदेवांच्या पूर्वचारित्र्याविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. रा. आजगांवकरांचें मत पुण्याचे पं. ना. पाटसकरें यांनीं सप्रमाण खोडून या संतकविविषयीं कांहीं मूलगामी विवेचनहि केलें आहे, तें जिज्ञासूंनीं अवश्य पाहावें. या संतकवीविषयीं आणखी एक गैरसमज आहे. डॉ. भांडारकर प्रभृतींच्या मतें ज्ञानदेव आणि नामदेव हे समकालीन नसून त्यांच्यांत एका शतकाचें तरी अंतर असावें, हाच तोच गैरसमज होय. या मताचें सविस्तर खंडन पं. पांडुरंगशर्मा यांनीं नरसी मेहत्यांच्या आधारें केलें असून तें निर्णायक आहे. शके १३३५ मध्यें काठेवाडांत होऊन गेलेले नरसी मेहता

१. 'बालभक्त नामदेव हे दरोडेखोर होते काय ?' (पुणें इ. स. १९३५)

पंढरपूरच्या नामदेवांचा उल्लेख करितात, त्याअर्थी नामदेवांचें चरित्र त्यापूर्वी घडलें असलें पाहिजे. नामदेवांच्या काव्यांत मुसलमानांच्या स्वाऱ्यांचे उल्लेख येतात व ज्ञानदेवांत ते येत नाहींत, तेव्हां या दोन कवींत एका शतकाचें अंतर असावें हा कै. भारद्वाज यांचा मुद्दाहि सहज खोडतां येण्याजोगा आहे. अल्लाउद्दीन खिलजीची दक्षिणेवरील स्वारी शके १२१६ (इ. स. १२९४) मध्यें, म्हणजे ज्ञानदेवांच्या समाधिकालापूर्वी दोनच वर्षे झाली. ज्ञानदेवानंतर नामदेव ५४ वर्षे जिवंत होते, आणि या ५४ वर्षांत मुसलमानांनीं दक्षिणेवर जें आक्रमण केलें त्याचें स्वरूपच असें होतें, कीं कोणाहि कवीच्या कृतींत त्याचे उल्लेख यावे. केवळ याच दृष्टीनें हवें तर ज्ञानदेव–नामदेवांत अर्धशतकाचें अंतर मानावें. परंतु ही जोडी फोडण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. असा प्रयत्न केला गेला यास एक कारण आहे. नरहरि मालू नांवाच्या कवीनें आंवढ्या नागनाथास हरपाळ या नांवाचा एक वाटमाऱ्या होता, त्याच्या आणि ज्ञानदेव–नामदेवांच्या भेटीचा प्रसंग वर्णिला आहे (भक्तकथामृत, अ. १२). महानुभावांच्या 'लीळाचरित्रां' त 'विठ्ठलवीरुकथन' असें एक प्रकरण असून त्यांत 'नेमदेव' नांवाच्या कोळी जातींतील एका वाटमाऱ्यानें मानभाव पंथाची दीक्षा घेतल्याचा उल्लेख आहे. हा 'नेमदेव' विठ्ठल नांवाच्या एका ब्राह्मणाचा मित्र असल्याचेंहि महानुभाव ग्रंथकार सांगतात. (लीळाचरित्र, उत्तरार्ध, ४५८). आतां नरहरि मालूनें सांगितलेली हरपाळ वाटमाऱ्याची हकीकत आणि मानभावांच्या 'नेमदेवा' ची हकीकत अशा दोन्हीं एकत्र मिसळून कै. चांदोरकरांनीं नेमदेव कोळ्याचा नामदेव शिंपी केला, व त्यामुळेंच कदाचित् या संतकवीच्या अंगीं दरोडेखोरी चिकटविली गेली. वस्तुतः मानभावांचा नेमदेव कोळी आणि वारकऱ्यांचा नामदेव शिंपी यांचा एकमेकांशीं कोणताहि संबंध नाहीं. कै. चांदोरकरांना मानभाव पंथांतील पं. बाळकृष्ण महानुभावशास्त्री[1] यांनीं उत्तर दिलेलें असून तें स्पष्ट व समाधानकारक आहे.

## नामदेवांची गाथा.

नामदेवांनीं शतकोटि अभंग रचण्याची प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें बरीचशी रचना केलीहि होती असा एक प्रवाद भाविकांमध्यें रूढ आहे. या कल्पनेस नामदेवांच्या छापील गाथ्यांतून थोडाबहुत आधारहि मिळतो (ना. ११२७–३०). परंतु, 'शतकोटी तुझे करीन अभंग।' यांसारखीं कविवचनें शब्दशः न घेतां तीं भावार्थानेंच घेतलीं पाहिजेत. नामदेवांनीं शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली नसेल असें नाहीं.

१. 'विहंगम' (नागपूर), जुलै, १९३३.

परंतु त्यांतील ' शतकोटि ' या शब्दाचा अर्थ विपुल इतकाच करणें बरें. हें विवेचन येथें करण्याचें कारण असें, कीं आज नामदेवांच्या अभंगांचे एकूण चार छापील गाथे[1] उपलब्ध असून त्यांत साधारणपणें २५०० अभंग त्यांच्या नांवावर दिलेले आढळतात. पैकीं आपल्या नामदेवांचे असे अभंग यांत अवघे ५००–६०० च असतील. इतर सर्व अभंग बहुधा दुसऱ्या एका नामदेवाचे, बहुधा विष्णुदास नाम्याचे आहेत. या गाथ्यांतून अनेक संतांचीं चरित्रें गायिलेलीं असून त्यांत नरसी मेहता, भानुदास, बोधलेबुवा, मिराबाई यांसारखी नामदेवांच्या नंतर होऊन गेलेली मंडळीहि आहेत ! अर्थात् ही सर्व रचना नामदेवांची नव्हे. हरिश्चंद्रादि पौराणिक संतकथांची धाटणीहि या अर्वाचीन कथांच्या सारखीच असून हीं सर्व चरित्रें गाणारा ' विष्णुदास नामा ' आपल्या नामदेवांहून भिन्न ठरतो. आपले नामदेव स्वतःचा उल्लेख ' विष्णुदास ' असा कधींहि करीत नाहींत. ' विष्णुदास नामा ' हा शके १५००-च्या सुमाराचा एक कवि असून तो आपणांस नामा शिंप्यापासून ओळखण्याकरिता ' विष्णुदास ' म्हणवितो. हें नांव साभिप्राय आहे. उलट, नामदेव स्वतःस 'विष्णुदास' ही संज्ञा विशेषनामाच्या अभिप्रायानें कधींच लावीत नाहींत. नामदेव व विष्णुदास नामा या दोन कवींच्या कृतींची अशी कांहीं खिचडी छापील गाथ्यांतून झाली आहे, कीं त्यांतून निवड करणें कठिणच व्हावें. तरीहि कल्पनेची बहार, भावनेची खोली, भाषेचा साधेपणा आणि शब्दरूपांचें प्राचीनत्व या चार वैशिष्ट्यांमुळें नामदेवांची अस्सल कृति कोणती तें अजमावितां येईल. विष्णुदास नाम्यास कूटात्मक रचनेची आवड बरीच दिसते. आपल्या नामदेवांस ती मुळींच नाहीं. त्यांची रचना येथून तेथवर साधी आणि सरळ असून ते वैचित्र्याच्या किंवा चमत्कृतीच्या भरीस पडलेले कोठें दिसत नाहींत. अर्थात्, गाथ्यांतून छापलेलीं ' मुंगी व्याली शिंगी झाली... ' यासारखीं कूटें नामदेवकृत नव्हत, हें निश्चित. दुसरें असें, कीं विष्णुदास नाम्याच्या अभंगांवरून तो हटयोगी असावा असें वाटतें. उलट आपले नामदेव हे एक प्रेमळ भक्त असून त्यांत हटयोगाचा मागमूसहि नाहीं. छापील गाथ्यांत आणखी दोन नामदेव असून त्यांतील एक स्वतःस केवळ ' नामदेव ' तर दुसरा ' नामा यशवंत ' म्हणवितो. हे सर्व कवि ज्ञानदेवांची उसनी ऐट आणतात, हें खरें; पण त्यांच्या हृदयाशीं ते एकजीव झालेले नसल्यामुळें हा सांधा नीट जुळत नाहीं. उलट, दोन जवळिकेचीं सरोवरें उचंबळून एकमेकांत मिसळावीं तशी स्थिति आपल्या नामदेवांची आणि ज्ञानदेवांची

१. गोंधळेकर १८९२, तुकारामतात्या १८९४, आवटे १९२४ व चित्रशाळा १९३१.

होते. त्यांचे शब्द, त्यांच्या कल्पना, त्यांचे दृष्टांत सर्व कांहीं सारखें आहे. 'हृदया हृदय एक' होण्याचा प्रकार ज्ञानदेव–नामदेवांत झाला, व दोन डोळस आरसे परस्परांसमोर ठेवावे त्याप्रमाणें या दोन संतकवींची अवस्था झाली. तेव्हां, छापील गाथ्यांतून नामदेवांची कृति निवडणें ओळखीच्या दृष्टीस विशेष जड जाणार नाहीं. तरी वर सांगितलेले निकष लावून 'नामदेवांचा अस्सल गाथा' निश्चित करणें हें महत्वाचें काम आहे.

**नामदेवांचें पंजाबी कवन**

आयुष्याच्या उत्तरार्धात उत्तरेकडे जाऊन तेथें भागवतधर्माचा प्रसार करीत असतांना नामदेवांनीं गुरुमुखींत जें कवित्व केलें त्यासंबंधीं सारस्वत-कारांनीं मुग्धता स्वीकारलेली दिसते. शिखांच्या 'ग्रंथसाहेबां'त नामदेवांचीं एकूण ६१ कवनें समाविष्ट असून 'भक्त नामदेवजीकी मुखबानी' या नांवानें तीं प्रसिद्ध आहेत. नामदेवांची ही पंजाबी गाथाच आहे म्हटल्यास चालेल. एका पंथाच्या धर्मग्रंथांत समाविष्ट केली गेल्यामुळें तिला चिरंतनत्व लाभलें आहे. नामदेवांच्या पंजाबी वाणीवर मराठीची छाया अधून मधून दिसते. षष्ठीचा 'च' आणि भूतकाळाचा 'ल' हे मराठींतील प्रत्यय ते क्वचित् वापरतात. 'अंतरीचें धांवें स्वभावें बाहेरीं' या न्यायानें नामदेवांची मातृभाषा ते गुरुमुखींत कवन रचतात तेव्हां मधूनच डोकावते. तसेंच, त्यांच्या मराठी काव्यांत आढळणारी सगुणभक्ति, हृदयाचें आर्त, रूपकचातुर्य आणि दृष्टांतयोजना हीं सर्व या हिंदी कवनांतहि आहेत. नामदेवांच्या पंजाबांतील कामगिरीचें आणि 'ग्रंथसाहेबां'तील त्यांच्या ६१ पदांचें सविस्तर विवेचन डॉ. मॅकॉलिफ्[1] व शं. पु. जोशी[2] यांनीं केलें असून तें सर्वच अभ्यसनीय झालें आहे. या कवनांतून मधूनच आढळणारें मराठी वळण, त्यांतील नाममहिमा, विठ्ठलभक्ति, कविचरित्राचे उल्लेख यांवरून हें कवित्व पंढरपूरच्या नामदेवांचेंच आहे याविषयीं शंका उरत नाहीं. उगीच नमुना म्हणून नामदेवांचें गुरुमुखींतील एक पद पुढें देतों—

**मन मेरे गजु जिव्हा मेरी काती। मापि मापि काटऊं जमकी फांसी ॥**
**कहां करऊं जाती कहां करऊं पाती। रामको नाम जपऊं दिनराती ॥**
**रांगनी रागऊं सीवनी सीवऊं। रामनामविनु घरीअन जीवऊं ॥**
**सुइनेकी सूई रूपेका धागा। नामेका चीतु हरिसउ लागा ॥**

मनरूपी गज व जिव्हारूपी कात्री या साधनांनीं आपण मायेचा पाश कसा कापीत आहों तें वरील रूपकांत नामदेव सांगतात. प्रपंचाप्रमाणें परमार्थी-तहि त्यांचें शिंपीकाम चालूच आहे!

---

१. Sikh Religion, Vol. VI.
२. पंजाबांतील नामदेव ( इ. स. १९४० ).

## ५. पंजाबांतील कार्य

नामदेव केवळ कवित्वच करून थांबले नाहींत. याहून अधिक मोलाचें कार्य त्यांना करतां आलें. ज्ञानेदेवांनंतर नामदेवांना आयुष्याचीं चांगलीं ५४ वर्षें लाभलीं, आणि तीं सर्व त्यांनीं भागवतधर्माच्या प्रचाराकरितां वेंचलीं. ज्ञानदेवांच्या संगतींत उत्तर हिंदुस्थानची यात्रा त्यांना एकदां घडलीच होती. त्यांच्या प्रयागानंतर पुनः एकवार नामदेवांनीं उत्तरेकडे संचार केलेला दिसतो. या सुमारास, म्हणजे १४-व्या शतकाच्या प्रारंभीं इस्लामचें आक्रमण उत्तर 'हिंदुस्थानास चांगलेंच भोंवूं लागलें असावें. अशा परिस्थितींत भागवतधर्माचा झेंडा उत्तरेकडे नाचविणारे नामदेव हे पहिले संत होत. पंढरपूरच्या भक्तिमार्गाची लाट त्यांनीं थेट पंजाबांत नेली आणि यांतून पुढें रामानंद, कबीर, नानक, रोहिदास, पीपा इत्यादि संत निर्माण झाले. या सर्वांनीं आपापल्या काव्यांतून नामदेवांचा उल्लेख केला आहे. नामदेवांचें वास्तव्य पंजाबांत सुमारें वीसएक वर्षें झालें असावें. त्यांनीं तिकडे अनेक शिष्य केले. पैकीं विष्णुस्वामी, बहोरदास, जाल्लो, लध्धा आणि केसो कलाधारी हे पांचजण प्रमुख होत. यांतील कांहीं पंढरीसहि आले असावे. आज पंजाबांत गुरुदासपूर जिल्ह्यांतील घोमान या गांवीं नामदेवांचें स्मारकमंदिर असून तें ' गुरुद्वारा बावा नामदेवजी ' या नांवानें प्रसिद्ध आहे. स्वामी नामदेवजी राहत त्याच जागेवर त्यांचा पट्टशिष्य बहोरदास यानें हें मंदिर उभारलें असें तेथील बावा मानतात. मंदिरांत पत्र्यावर कोरलेलें एक नामदेवांचें चित्रहि आहे. घोमान येथें माघ शु० २ स मोठी यात्रा भरते. पंजाबांतील बहुतेक शिंपी नामदेव-संप्रदायी असून त्यांना चिंबा किंवा छिपा असें म्हणतात. हे लोक कापड रंगवितात, छापतात आणि शिवतात. पंजाबांत नामदेवांचीं शेंकडों मंदिरें आहेत. तीं पाहून मन आश्चर्यानें थक्क होतें. मराठ्यांचा भगवा झेंडा पुढें कालांतरानें अटकेपार फडकला, हें खरें. पण त्यापूर्वीं कित्येक वर्षें महाराष्ट्राची आणि भागवतधर्माची पताका नामदेवांनीं पंजाबभर नाचविली हें केवढें आश्चर्य !

**अभ्यासाचीं साधनें:—**


रा. द. रानडे : संतवचनामृत ( प्रस्तावना ).
शं. पु. जोशी : पंजाबांतील नामदेव.
पं. ना. पाटसकर : बालभक्त नामदेव दरोडेखोर होते काय ?
ज. र. आजगांवकर : नामदेव ( महाराष्ट्र–कवि–चरित्र, भा. ८ ).
शं. गो. तुळपुळे : पांच संतकवि ( नामदेव ).
पं. पांडुरंगशर्मा : नामदेवांचा निर्णय (भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ५
Macauliff : Sikh Religion, Vol. VI.




प्रस्तुत प्रकरणांत आलेली ज्ञानेश्वरसमकालीन संतकवींची माहिती कांहीं ठिकाणीं फारच त्रोटक वाटल्यानें तिला पुढील पुरवणी जोडणें अवश्य वाटतें. पैकीं **विसोबा खेचर** हे भुंगी-पैठणचे राहणारे असें सारस्वतकार म्हणतात; परंतु ते परभणी प्रांतांतील आंवढ्याचे राहणारे असावे असें दिसतें. विसोबांच्या मनांत भक्तिमार्गाविषयीं प्रथम अश्रद्धा असल्यानें ज्ञानेश्वरांनीं त्यांना उपहासानें खेचर असें म्हटलें होतें. परंतु पुढें त्यांच्याच कृपेनें विसोबा योगमार्गांत इतके प्रगत झाले, कीं 'खेचर' ही पदवी त्यांना यथार्थतेनें शोभून दिसूं लागली. याच विसोबांनीं आंवढ्या नागनाथाच्या देवळांत नामदेवाला शिवपिंडीचा विश्वव्यापक असा अनुभव देऊन त्यास 'पदपिंडविवर्जित' केला. विसोबांच्या नंदभाषेवरील प्रो. पोतदार यांचें टिपण[1] वाचनीय आहे. **परिसा भागवत** हे नामदेवांचे पहिले शिष्य होत. हे विद्वान ब्राह्मण पंढरपुरांत भागवतावर पुराण सांगत व 'भागवत परिसा' म्हणजे ऐका असें सर्वांना म्हणत. त्यामुळें यांचें नांव परिसा भागवत पडलें असावें असा एक तर्क आहे. कारण यांचें खरें नांव 'परसो भाग्यवंत' असावें असें संताजी जगनाड्यांच्या वहींतील परिसाकृत आरतीच्या पाठावरून वाटतें[2]. आपण ब्राह्मण, अर्थात् वर्णानां गुरुः या कल्पनेनें पछाडलेल्या परिसा भागवतांचा अहंकार नामदेवांनीं दूर केला व तेव्हांपासून ते नामदेवांचे अनन्य भक्त झाले. 'कवित्वापरिस कवित्व आगळें पै आहे। परि ते न कळे सोये नामयाची' हा त्यांचा नामदेवांच्या कवित्वावरील अभिप्राय मोठा मार्मिक आहे. **गोरोबा कुंभार** यांचा ज्ञानेश्वरांच्या संतमंडळांत एवढा अधिकार होता, कीं नामदेव परमार्थांत कच्चा कीं पक्का हें ठरवितांना गोरोबाकाकांचा शब्द प्रमाण मानला गेला व त्यांनींहि आपलें 'अनुभवाचें थापटणें' चालवून योग्य तो निवाडा केला. गोरोबांचे अवघे वीसच अभंग उपलब्ध असून त्यांवरून त्यांच्या अधिकाराची कल्पना येते. 'परब्रह्म म्हातारा निवाला अंतरीं' हें त्यांच्याविषयीं मुक्ताबाईनें काढलेले उद्गार सार्थ वाटतात. **सांवता माळी**[3] हा पंढरपुराजवळील अरण-

---

१. नंदभाषा ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त, शके १८३४, ले. २१).

२. द. वा. पोतदार : जगनाड्यांच्या वह्या ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त, शके १८३४, पृ. २६१.)

३. गो. वि. राऊत : श्रीसांवता-चरित्र.

मेंडीचा राहणारा. त्याच्या बापाचें नांव परसू आणि आईचें नांगिता. मेंड गांवांतील रूपामाळी भानवसे यांची मुलगी जनाबाई ही त्याची बायको. सांवत्याच्या हातचे पांचपंचवीस अभंग आपल्या वाट्यास आलेले आहेत. भक्तीचा मळा करणारा हा संतकवि शके १२१७-मध्यें समाधिस्थ झाला. त्याचा जन्मशक ११७२-असा चरित्रकार देतात. परंतु तो संशयित वाटतो. नरहरि सोनारावरील टीपेंत सारस्वतकार गैबीनाथ किंवा गैनीनाथ हे त्याचे गुरु होत असें सुचवितात. पण तें बरोबर नाहीं. कारण शिवदिन केसरीच्या परंपरेंतील गैनीनाथांचे शिष्य नरहरिदास आणि वारकरी पंथांतील नरहरि सोनार यांचा एकमेकांशीं कोणताहि संबंध नाहीं. यादवकालीन गहिनीनाथांनीं निदान भागवत धर्मीयांत तरी एका निवृत्तिनाथांशिवाय दुसऱ्या कोणासहि उपदेश दिल्याचें ठाऊक नाहीं. तसेंच गैबीनाथ व गैनीनाथ हीं नांवेंहि भिन्न आहेत. परंतु सांप्रदायिक गाथ्यांतून नरहरि सोनारांचे म्हणून जे अभंग दिलेले आढळतात त्यांत शिवदिन केसरींच्या परंपरेंतील नरहरिदास आणि नरहरि मालो या दोन अलिकडील कवींच्या कृतींची भेसळ झालेली दिसते. ही भेसळ काढून टाकली म्हणजे नरहरी सोनारांचे असे अवघे आठदहाच अभंग उरतात. असो. जनाबाईच्या काव्याचा परिचय मागील प्रकरणांत येऊन गेलाच आहे. जनाबाईचा जन्म गोदातीरीं गंगाखेड येथें एका शूद्राच्या पोटीं झाला. तिच्या आईचें नांव करुंड आणि बापाचें नांव दमा. आई लहानपणींच मेली. तेव्हां पोरक्या जनीला तिच्या बापानें पंढरीस दामाशेटीच्या घरीं ठेवलें व तेथेंच ती लहानाची मोठी झाली. बाल नामदेवास तिनें अंगाखांद्यावर खेळविलें व पुढें त्यासच आपलें सर्वस्व मानून ‘ नामयाची दासी जनी ’ या नांवानें ती वावरली. जनाबाईच्या नांवावर सुमारें साडेतीनशें अभंग आढळतात.

ज्यांचा उल्लेख सारस्वतकारांनीं प्रस्तुत प्रकरणांत केलेला नाहीं अशा १३-व्या शतकांतील कांहीं ग्रंथकारांविषयीं येथें लिहिणें अगत्याचें आहे. पैकीं सच्चिदानंदबावा हा ग्रंथकार म्हणून नव्हे, पण ज्ञानेश्वरीचा लेखक म्हणून प्रसिद्ध आहे. याचें उपनांव थावरे असें असून त्याजकडे नेवासें गांवचे कुलकर्ण होतें असें कळतें. ज्ञानेश्वरीच्या अखेरची कालनिदर्शक ओवी सच्चिदानंदबावाच्या हातची असावी असें एक मत आहे. तसेंच त्यानें ‘ ज्ञानेश्वरविजय ’ या नांवाचा एक ग्रंथ रचिला असल्याचे उल्लेख सांपडतात; पण ग्रंथ मिळत नाहीं. याच्या हातचे चारदोन अभंग मात्र प्रो. पोतदार यांना उपरिनिर्दिष्ट जगनाड्यांच्या वहींत उपलब्ध झाले

आहेत. चांगदेव हा या काळांतील एक ठळक ग्रंथकार असून त्याजविषयीं अज्ञानच अधिक दिसतें. कै. चांदोरकर यांनीं एका लेखांत[1] प्रस्तुत चांगदेव व १५-व्या शतकांतील मुधेश चांगा या दोन कवींत चांगलाच घोंटाळा माजवून दिला आहे. वास्तविक चांगदेव, चांगा वटेश्वर आणि वटेश चांगा हे सर्व एकच होत. हे चांगदेव चौदाशें वर्षें जिवंत होते अशी एक समजूत आहे. तिचा अर्थ इतकाच, कीं निळोबा पिंपळनेरकरांनीं म्हटल्याप्रमाणें चांगदेव या नांवाच्या व्यक्तीस चौदा निरनिराळीं नांवें पडलीं होतीं. आणि हें अशक्य नाहीं. कारण अनेक नांवांनीं वावरणारे रामदासांसारखे संतकवि असल्याचें इतिहास सांगतो. असो. चांगदेवाचा जन्मशक ठाऊक नाहीं. परंतु त्यानें शके १२४७-मध्यें गोदावरीतीरीं पुणतांबें येथें समाधि घेतली, हें निश्चित आहे. वटेश्वर हें चांगदेवांचें उपास्य दैवत असावें हा प्रो. रा. द. रानडे[2] यांचा तर्क बरोबर आहे. कारण एकतर तेव्हां वटेश्वर या नांवाचा कोणी संत आढळत नाहीं; आणि दुसरें, मुक्ताबाईकडून उपदेश मिळूनहि ज्याअर्थीं चांगदेव स्वतःचा उल्लेख 'चांगा वटेश्वर' असा करतो त्याअर्थीं वटेश्वर हें त्याचें दैवतच असणार, तो त्याचा गुरु नव्हे. हा चांगदेव प्रथम हठयोगी होता. ज्ञानेश्वरांची कीर्ति ऐकल्यावर त्यांना एक पत्र लिहिण्याचें यानें योजलें. परंतु ज्ञानेश्वरांना 'चिरंजीव' म्हणावें कीं 'तीर्थरूप' म्हणावें याचा निर्णय न झाल्यानें त्यानें पत्र कोरेंच पाठविलें. त्यावर मुक्ताबाईनीं 'चांगदेव अजूनहि कोराच' असा मार्मिक अभिप्राय दिला. पुढें ज्ञानेश्वरांनीं 'चांगदेवपासष्टी'त चांगदेवास अद्वैतज्ञान सांगितलें, व मुक्ताबाईकडून त्यास उपदेशहि देवविला. या 'चांगदेवपासष्टी'त वटेशचांगा आणि चक्रपाणिचांगा अशा दोन नांवांनीं ज्ञानेश्वर चांगदेवास संबोधितात. चांगदेवास अनेक नांवें असल्याचाच वास्तविक हा पुरावा आहे. असो. प्रो. रानडे म्हणतात त्याप्रमाणें चांगदेव आणि ज्ञानदेव यांचा संबंध म्हणजे हठयोग आणि राजयोग यांचा संबंध होय. चांगदेवाच्या अभंगावरून पाहतां त्याचा ओढा रूपकें योजून चमत्कृति निर्माण करण्याकडे फार दिसतो. ज्ञानदेवादि चौघा भावंडांचें वर्महि त्याच्या हातीं आलेलें दिसतें. 'मोतियाचें पाणी रांजण भरिला—' हा त्याचा अभंग या दृष्टीनें श्रवणीय आहे. मुक्ताबाईचा हा शिष्य जसा हठयोगांत तसाच नवलपूर्ण शब्दकुसरींतहि तरबेज असावा असें त्याची वाणी सांगते.

'नोवरीचें पोटीं नोवरा जन्मला । सोहळा जाहला काय सांगों ।
नोवऱ्यानें नोवरी देखिलीच नाहीं । सोहळा होतो सांगों काइ ।'

---

१. भा. इ. स. मं. इतिवृत्त, शके १८३८.

२. Mysticism in Maharastra, p. 45.

अशीं अनेक चमत्कृतिपूर्ण कूटें चांगदेवानें रचिलेलीं असून त्यांचें मूळ मुक्ताबाईच्या वाणींत आहे असें वाटतें. याशिवाय 'तत्वसार' या नांवाचा एक ग्रंथहि त्याच्या नांवावर असून त्याच्या एकूण १०३६ ओव्यांपैकीं चारशेंच काय त्या उपलब्ध झाल्या आहेत. या ग्रंथाची रचना शके १२३४ मध्यें हरिश्चंद्रगडावर ( जि. नगर ) झाली असून त्याचा परिचय प्रो. ह. रा. दिवेकर यांनीं करून दिला आहे.[1]

**सेना न्हावी** हा ज्ञानेश्वरांच्या संतमंडळांतील आणखी एक कवि आहे. न्हावी जातींतील हा संतकवि जबलपूर जवळील बांदूगड येथील राजाच्या पदरीं नौकर होता. याची मातृभाषा हिंदी; पण पंढरीचा वारकरी असल्यामुळें तो मराठी भाषाहि उत्तम जाणे. याचें नांव सैन असून त्याचे अनुयायी पंजाबापासून राजपुतान्यापर्यंत आढळतात. पंजाबांतील न्हावी सैन भक्ताचें नाटक करतात, त्यांतहि तो उत्तरेकडील म्हणूनच दाखवितात. हा अस्सल मराठी असता तर महाराष्ट्रांत त्याचा थोडा तरी संप्रदाय असावयास पाहिजे होता. पण दक्षिणेंतील न्हाव्यांना सेनाचें नांवहि ठाऊक नाहीं आणि उलट उत्तरेकडे याचीं मंदिरें, मठ व अनुयायी कितीतरी आहेत. शिखांच्या 'ग्रंथसाहेबां'त याचें एक पद्य आहे. वरील सर्व पुराव्यावरून सेना न्हावी हा मूळचा महाराष्ट्रीय नव्हे असें मत शं. पु. जोशी[2] यांनीं मांडिलें असून तें मनास पटतें. परंतु आश्चर्याची गोष्ट ही, कीं या हिंदी कवीची सर्व रचना केवळ मराठींतच आहे. तसेंच त्यानें मराठी भाषेचें मर्म जाणलें आहे यांतहि शंका नाही. सेना न्हाव्याचें मराठी भाषेवर प्रभुत्व इतकें होतें, कीं स्वतःच्या धंद्यांतील कांहीं खास शब्द आणि वाक्प्रयोग वापरून त्यानें अध्यात्मावरील रूपकें साधलीं आहेत. आपल्या धंद्याची बोली सेना न्हाव्यानें सांवता माळी किंवा नरहरि सोनार यांच्याप्रमाणें अभंगरूपानें ग्रंथांत आणली हा त्याचा मराठी भाषेवरील मोठाच उपकार म्हटला पाहिजे. या कवीचे सुमारे १५० अभंग आज उपलब्ध आहेत. श्रावण वद्य द्वादशी हा त्याचा समाधिकाल मानला जातो. परंतु ही तिथि कोणत्या वर्षाची असावी तें कळत नाहीं. कै. भावे व शं. पु. जोशी यांच्या मतें मात्र हा कवि इतका प्राचीन नसून त्याचा काळ ते थोडा अलीकडचा मानतात. असो. कूर्मदास या नांवाचा कविहि याच शतकांत होऊन गेला असावा असें वाटतें. हा राहणारा पैठणचा असून जन्मापासून थोटा व पांगळा होता अशी माहिती कविकाव्यसूचिकार देतात. याच्या नांवावर कांहीं पदें असून त्याची समाधि लहुळ

१. Proceedings: 7th Oriental Conference, 1933.

२. पंजाबांतील नामदेव, पृ. २५–२६.

येथें आहे. याशिवाय या शतकांत केव्हांतरी रचिलेल्या **श्रीसुषेणकृत** 'आयुर्वेद महोदधि' या ग्रंथाची पृष्ठमात्रायुक्त एक प्रत मोंगलाईत कन्नड या गांवीं उपलब्ध झाली आहे.

**महानुभावीय वाङ्मयः**—१३-व्या शतकाच्या अखेरीस महानुभावीय वाङ्मयांत एक मोठी क्रांति घडून आली. सह्याद्रिवर्णनकार रवळो व्यास यानें शके १२७५-च्या सुमारास सकळ या नांवाची सांकेतिक लिपी शोधून काढली व तेव्हांपासून या पंथाचें वाङ्मय जें पंथीयेतरांस दुरावलें तें कायमचें. शके १२७५ च्या पूर्वींचें सर्व महानुभावीय वाङ्मय साध्या बालबोध लिपींत आहे. सकळ लिपीच्या पाठोपाठ शके १२८५-मध्यें सुंदरी लिपी, शके १२९०-मध्यें पारमांडल्य लिपी, शके १३२५-मध्यें गुर्जर शिवव्यासकृत कवीश्वरी अंकलिपी याप्रमाणें अनेक सांकेतिक लिप्या निघाल्या. असे संकेत एकूण पांचपंचवीस असले तरी त्यांपैकीं सकळ लिपी ही सर्वांत अधिक रूढ असून तिच्या खालोखाल सुंदरी, पारमांडल्य व कवीश्वरी अंकलिपी या येतात. वज्रलिपी, सुभद्रालिपी, सिंहलिपी याहि क्वचित् आढळतात. या कालखंडांत वाङ्मयीन दृष्ट्या आणखी एक महत्वाची घटना घडून आली. नागदेवाचार्य शके १२२४-मध्यें दिवंगत झाल्यानंतर पंथाचें द्वितीय आचार्यपद कवीश्वर भास्कराचार्य याजकडे आलें. म्हाइंभटाचें लीळाचरित्र व केसोबासकृत चक्रधरोक्त सूत्रपाठ हे दोन ग्रंथ या भास्करापाशीं होते. मध्यंतरीं ' खालसेयाची धाडी ' म्हणजे खिलजीची स्वारी (शके १२३०) देवगिरीवर झाली; त्यांत हे दोन्हीं ग्रंथ भास्करास तो कोकणांत गेला असतां त्यास चोरांनीं लुबाडलें त्यांत नाहींसे झाले. पुढें देशांत थोडें स्थिरस्थावर झाल्यावर भास्करभट, परशराम बास व रामेश्वर बास या तिघांनीं एकत्र बसून स्वतःला मुखोद्गत असणाऱ्या ' सूत्रपाठा ' चें संकलन केलें व पुढें हाच सूत्रपाठ कवीश्वरशाखेंत सर्वमान्य झाला. भास्करभटानंतर परशराम हा पंथाचा तृतीय आचार्य झाला. त्याच्यानंतर कोणी एक प्रमुख असा न राहतां परशरामाच्या संमतीनेंच पंथांतील त्या काळच्या मुख्य अशा अधिकरणांच्या तेरा शाखा किंवा कुळी अस्तित्वांत आल्या. हेच ते प्रसिद्ध असे तेरा आम्नाय होत. पुढें कालान्तरानें या आम्नायांनाहि उपशाखा फुटल्या व सूत्रपाठाचे विशिष्ट पाठ त्या त्या आम्नायांत रूढ होऊन बसले. कवीश्वर आम्नायांतील ' सूत्रपाठा' च्या संकलनाचा उपरिनिर्दिष्ट उद्योग पाहून पारमांडल्य आम्नायांतील प्रवर्तक **गोपाळ पंडित** किंवा **आणो बास** यांचा शिष्य नागनाथ बास यानें आणो बासांस विनविलें, कीं " जैसा कवीश्वर

आम्नायीं द्वादशप्रकरणांसि अन्वयो लाविला असे : तैसा तुम्हीं लावावा : तुम्हांसि गोसावियांचें वरद असे." त्याप्रमाणें आणो बासांनीं 'नवां प्रकरणां अन्वयो लाविला.' पुढें याच आणोबासांनीं 'लक्षणरत्नाकरां'त वर्णिलेलीं 'द्वात्रिंशल्लक्षणें' रचिलीं. "बत्तीस लक्षणें : गोसावीं महाराष्ट्रभाषा म्हाइंभटाप्रति निरूपिलीं होतीं : तींयें संस्कृतें केलीं" म्हणजे आणो बासांनीं चक्रधरोक्त बत्तीस लक्षणांना संस्कृत वेष चढविला. यानंतर सूत्रपाठांतील 'आचार' व 'विचार' या प्रकरणांसाठीं आणो बासांनीं लीळा-चरित्रांतून वचनें निवडून काढिलीं होतीं; परंतु त्यांचा 'अन्वय' लावण्यास ते जगले नाहींत. हे आणो बास म्हणजेच आनेराज किंवा गोपाळ पंडित होत. त्यांची जी माहिती सारस्वकारांनीं पृ. ११७ वर दिली आहे तिला आधार 'नागदेवचरित्रा'तून मिळतो (क्र. ४०, १६८). या आनो बासाचा किंवा गोपाळ पंडिताचा 'लक्षणरत्नाकर' या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ असून अर्थनिर्णयशास्त्रदृष्ट्या तो महत्वाचा आहे. याच ग्रंथाचा अनुवाद पुढें भीष्माचार्यांनें 'पंचवार्तिक' या आपल्या मराठी ग्रंथांत केला. 'लक्षणरत्नाकर' या ग्रंथावरील दोन मराठी टीपग्रंथ उपलब्ध आहेत. एक पंडित शारंगधर पुसदेकर यांचा व दुसरा 'बत्तीस लक्षणांची टीप' म्हणून प्रसिद्ध असलेला भीष्माचार्यांचा. पैकीं दुसरा टीपग्रंथ महाभाष्याच्या स्वरूपाचा असून त्यावरून मूळ ग्रंथाची स्पष्ट कल्पना येऊं शकते. प्राचीन काळांत कोणत्याहि ग्रंथाचा अर्थनिर्णय करण्याची पद्धति काय होती तें आनेराज बासांच्या वरील कृतीवरून कळूं शकतें. यानंतर बाणाइसाचे शिष्य हरि बास यांनीं 'बेळोपूर चरित्र, सिद्धांत सांखळी, मांडणी व मूलसंचरण' या प्रकरणांचा अन्वय लावल्याचा उल्लेख आढळतो. पुढें हरि बासाचे शिष्य तळेगांवकर दत्तोबास यांनीं हिराइसा, रामेश्वर, परशुराम यांचीं मतांतरें लक्षांत घेऊन व हिराइसा-पाठास विशेष महत्व देऊन श्रीकृष्णचरित्र, गोविंदप्रभुचरित्र व चक्रधरचरित्र यांचा मिळून एक चरित्रग्रंथ सिद्ध केला. याशिवाय लीळांच्या आरंभीचे मथळ्यांची नोंद करणें, कांहीं 'प्रमेय' ग्रंथ रचणें, केसो बासांच्या दृष्टान्त-स्तोत्रावरून त्या दृष्टान्तांचा अन्वय लावणें इत्यादि कामें त्यांनींच केलीं. यानंतर दत्तोबास जिवंत असतांनाच, नागनाथ बासाचे शिष्य कवि मालो यांनीं स्मृति, वृद्धाचार, रत्नमालिकास्तोत्रांतील तुटलेला दुवा, पंगुस्तोत्र, नामावळी स्तोत्र इत्यादि ग्रंथ केले. यानंतर वामन बासाचे शिष्य शिवमुनि यांची ग्रंथरचना येते. त्यांनीं दामोदरपंडिताप्रमाणें साठ चौपद्या रचिल्या. महानुभावांच्या पारमांडल्य आम्नायांतील प्रमुख

शिष्यांची व त्यांच्या ग्रंथांची वरील माहिती एका अन्वय स्थळांत मिळते. या काळांतील महानुभावांच्या तात्विक स्वरूपाच्या वाङ्मयाची हकीकत ही अशी आहे. आनो बास आणि भीष्माचार्य यांसारखे पंडित मराठी भाषेंत संस्कृतसम भाष्यवाङ्मय निर्मू पाहत होते व त्यांच्या प्रयत्नानें मराठींत पांडित्य अवतरत होतें. याशिवाय साहित्याचे इतरहि कांहीं प्रकार या शतकांतील मानभाव ग्रंथकार हाताळतांना आढळतात. पैकीं 'स्मृतिस्थळा'सारखें गद्य वाङ्मय व 'साती ग्रंथ' यांचा विचार आपण मागील एका प्रकरणांत केलाच आहे. 'गद्यराज'कार हयग्रीवाचार्या-विषयीं सारस्वतकारांनीं दिलेल्या माहितीस वृद्धाचार (ली. १६), स्मृतिस्थळ (ली. ११३), व नागदेवाचार्यस्मृति (ली. २८) या चरित्र-ग्रंथांतून आधार मिळतो. गद्यराज या काव्याची श्लोकसंख्या कै. भावे म्हणतात त्याप्रमाणें २८० नसून २७९ आहे. वृत्तवैचित्र्य व नियमक रचना हे या काव्याचे विशेष होत. भागवतांतील दशमस्कंधावरील ही मराठी श्लोकबद्ध टीका कवीनें शके १२३८ ते ४६-च्या दरम्यान रचून पुरी केली. हयग्रीवाचार्यांचा जन्मशक ११९७ (य. खु. देशपांडे[1] यांच्या मतें ११८७), अनुग्रह शक १२३१ व मृत्यु शक १२४६ याप्रमाणें आहेत. त्यांचें देहावसान पैठण येथें झालें. 'गद्यराजा'वर कोणा भीष्माचार्यानें रचिलेली एक टीप उपलब्ध असून मूळ ग्रंथ श्री. कानडे यांनीं इ. १९०४-मध्यें सोलापूर येथें बालबोध लिपींत छापून प्रसिद्ध केला होता. कै. राजवाडे[2] यांनीं प्रसिद्ध केलेलें भीष्ममुनीकृत 'गद्यराज' हें प्रकरण निराळें असून त्याचा प्रस्तुत काव्याशीं संबंध नाहीं. तें रचणारा भीष्ममुनि हा तेराव्या शतकांतील एक प्रमुख ग्रंथकार आहे. रामदेवराव यादवाचा आश्रित व प्रसिद्ध पंडित बोपदेव हा या भीष्ममुनीचा विद्यागुरु आणि उपाध्य आम्नायांतील 'हेतुस्थळ' कार न्याय बास हा याचा दीक्षागुरु होय. या भीष्ममुनीच्या नांवावर भावे-सूचि पंचवार्तिक, मार्गप्रभाकर, धनंजयकोशावरील टीका, सिद्धान्तस्थळ इत्यादि अनेक ग्रंथ देते. पैकीं 'पंचवार्तिक' हें या भीष्माचार्यानें रचिलेलें आद्य मराठी व्याकरण असून त्याचें मूळ आनो बासाच्या लक्षणरत्नाकर या संस्कृत ग्रंथांत आहे. या ग्रंथकारास सारस्वतकारांनीं पुढें चौदाव्या शतकांत नेला आहे तें बरोबर नाहीं. याच भीष्माचार्यांनीं जयदेवकृत गीतगोविंद या काव्यावर 'महाराष्ट्र सुबोधिनी' या नांवाची

---

१. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. ३५.

२. एक जुनें मानभावी काव्य (ग्रंथमाला मासिक, अंक ११५).

एक मराठी टीका लिहिल्याचें कळतें. 'मार्गप्रभाकर' हा त्यांचा ग्रंथ स्वतंत्र असून त्याची ओवीसंख्या ८१० आहे. असो. शके १२७५-च्या सुमारास **न्यायबास वाइंदेकर** या उपाध्ये आम्नायांतील ग्रंथकारानें रचिलेला 'हेतुस्थळ' हा ग्रंथहि उल्लेखनीय आहे. ग्रंथ गद्यांत असून त्यांत चक्रधरांनीं निरनिराळीं सूत्रें कोणत्या प्रसंगीं व काय हेतूनें सांगितलीं याचें विवरण असल्यानें त्यास हेतुस्थळ हें नांव मिळालें. न्यायव्यासांच्या नांवावर याशिवाय स्मृतिवृद्धाचार, सिद्धान्तस्थळ इत्यादि आणखीहि कांहीं ग्रंथ आढळतात. वज्रलिपी व सुंदरी लिपी यांचे कर्तृत्व याच न्याय व्यासाकडे जातें. याशिवाय **दाइंबा** यांनीं शके १३००-मध्यें रचिलेलें सव्वाशें ओव्यांचें 'निर्वेद स्तोत्र' व **पंडित ज्ञानदेव** कृत 'पंडुगीता' हीं दोन प्रकरणेंहि उल्लेखनीय आहेत. या शतकाच्या अखेरीस ऐतिहासिक व भौगोलिक दृष्ट्या महत्वाचा असा एक ग्रंथ निर्माण झाला व तो म्हणजे "**स्थानपोथी**" हा होय. हा ग्रंथ म्हणजे महानुभाव पंथास पूज्य अशा चक्रधरस्पार्शित तीर्थस्थानांची एक तपशीलवार नोंद असून त्याची रचना पूर्वाश्रमींचे पंडित कमलाकर अयाचित यांनीं शके १२७५-च्या सुमारास केली. स्थानपोथींत सुमोरे दोनअडीचशें गांवांची नोंद आली असून त्यावरून तत्कालीन महाराष्ट्राची कल्पना येऊं शकते. तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात मुसलमानी अम्मल जेव्हां दक्षिणेकडे चांगला जाणवूं लागला तेव्हां याच मुनिव्यासानें तीर्थस्थानांची दुरुस्ती करून महानुभावांस वंद्य असे ओटे बांधल्याचें 'अन्वय स्थळ'कार सांगतात. प्रस्तुत स्थानपोथीची रचना हें या जीर्णोद्धाराचेंच एक अंग असावें. कारण स्थानपोथींत केवळ स्थाननिर्देश नसून 'लीळा चरित्रां'तील त्या त्या लीळा केव्हां, कोठें व कोणत्या प्रसंगानें घडल्या याचीहि नोंद आहे. तात्पर्य, स्थानपोथी हा चक्रधर-चरित्राचा एक संदर्भ कोशच म्हटला पाहिजे.

## अभ्यासाचीं साधनें

गो. का. चांदोरकर : चांगा वटेश्वराची समाधि (भा. इ. सं. मं. इति. शके १८३६).

रा. द. रानडे : संतवचनामृत (प्रस्तावना).

गं. ब. ग्रामोपाध्ये : संतकाव्यसमालोचन, खंड, १.

ह. रा. दिवेकर : चांगा वटेश्वरकृत तत्वसार, (७ वी ओरिएंटल कॉ.)

ह. ना. नेने : अन्वयस्थळ (भा. इ. सं. मं. त्रै. १७–२).

ह. ना. नेन : लक्षणरत्नाकर ( भा. इ. सं. मं. त्रै. १७–३ ).
मो. स. मोने : पंडित भीष्माचार्यकृत पंचवार्तिक.
ह. ना. नेने : हयग्रीवाचार्यकृत गद्यराज ( भाइसंमं. त्रै. १८–३ ).
ह. ना. नेने : स्थानपोथी ( प्रो. पोतदार स्मारक-ग्रंथ ).
वि. भि. कोलते : स्थानपोथी ( प्रस्तावना ).
पां. म. चांदोरकर : बत्तीस लक्षणी टीका ( भाइसंमं. त्रै.१।२–३ ).
वि. का. राजवाडे : एक जुनें मानभावी काव्य ( ग्रंथमाला ११५ ).



चौदाव्या शतकांत अस्मानी सुलतानीमुळें महाराष्ट्राची वाताहात होऊन लोकांची जी पांगापांग झाली असें सारस्वतकार लिहितात तद्विषयक पुरावा संशोधनान्तीं हातीं आलेल्या कांहीं माहितीवरून उपलब्ध झाला आहे. अराजक आणि दुष्काळ या दोन आपत्तींच्या फेऱ्यांत सांपडून महाराष्ट्रांतील पुष्कळसे लोक पोटासाठीं देश सोडून बाहेर पडले व अन्यत्र स्थायिक झाले. पैकीं कांहीं जण तेलंगणांत गेले असावे असें तेलगू भाषेंतील एका काव्यांत उपलब्ध झालेल्या मराठी कवनावरून वाटतें. हा कवनवजा मराठी उतारा पालकुरिकि सोमनाथ या आंध्र कवीच्या 'मल्लिकार्जुन पंडिताराध्य चरित्र' या नांवाच्या ग्रंथांत उपलब्ध झाला असून तो डॉ. सी. नारायणराव यांनीं An Early Marathi Passage found in Telugu Literature या आपल्या लेखांतून प्रथम उजेडांत आणला.[1] मूळ तेलगू ग्रंथ ताडपत्रांवर लिहिलेला असून त्याचा रचनाकाल रा. सा. हयवदनराव यांचें मतें १५-१६ व्या तर कोणाच्या मतें १२-१३ व्या शतकांतील आहे. प्रो. द. वा. पोतदार आणि श्री. चिं. ग. कर्वे यांनीं ह्या मराठी उताऱ्यावरील आपल्या टिपणांतून[2] त्यास ज्ञानेश्वरकालीन, किंबहुना तत्पूर्वकालीन मानिलें आहे. परंतु उताऱ्याची भाषा इतकी प्राचीन वाटत नसल्यानें आम्ही त्यास १३-१४ व्या शतकांत ठेवीत आहों. वरील तेलगू ग्रंथाचा कर्ता सोमनाथ हा अष्टभाषाकवित्वविशारद म्हणून प्रसिद्ध असून प्रस्तुत काव्यांतील नायक श्रीशैल्याच्या यात्रेस गेला असतांना त्याच्या कानांवर ज्या अनेक भाषा आल्या त्या आपण उद्धृत करीत आहों अशी कल्पना करून सोमनाथानें जो मराठी भाषेंतील उतारा दिला आहे त्याच्या एकूण २२ ओळी असून त्यांपैकीं पहिल्या कांहीं अशा—

'मागार गा नको मज बापु म्हणत । भागवो दे वाटे भक्त म्हणत ।
चरलिंग गुरुलिंग शंभूस म्हणत । पुरवर केत्त दूरि पुरुख म्हणत ।
आखे श्रीकैलास देखीदूरी म्हणत । सुखमुख जालो पुरुख म्हणत । '

वरील कवन तेलगू भाषेंतील 'द्विपद' नांवाच्या वृत्तांत रचिलेलें असून त्यांतील मराठीवरील द्रविडी छाया स्पष्ट आहे. हें कवन म्हणून सामान्य असलें तरी प्राचीन तेलगू ग्रंथांतील मराठी या दृष्टीनें त्यास महत्व आहे.

१. Journal, Andhra Hist. Research Society, Vol. IX.
२. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष २२, अं. ३-४.

चोंभाकृत ' उखाहरण ' या काव्याची एक अपूर्ण प्रत सुमारें ४० वर्षांपूर्वी समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांना नगर जिल्ह्यांतील तिसगांव येथें दिनकर रामदासी यांच्या मठांत मिळाली व तिचें संपादन कै. राजवाडे[1] यांनीं केलें. प्रस्तुत हस्तलिखिताचीं एकुण ४९ पत्रेंच काय तीं उपलब्ध असून त्यांवरून कवीचा ठावठिकाणा समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. हीं ४९ पत्रेंहि सलग नाहींत, खंडित आहेत. काव्यांतील भाषेच्या अंतःप्रमाणांवरून प्रस्तुत काव्याचा रचनाकाळ कै. राजवाडे यांनीं शके १३०० ते १४०० च्या दरम्यानचा मानला व त्यांचा हा तर्क बरोबर आहे. हें काव्य एकूण अडीच एक हजार ओव्यांचें असून त्यांपैकीं चौथा हिस्साच काय तो आपल्या हातीं आलेला आहे. त्यावरून पाहतां काव्याचें नांव ' उषाहरण ' नसून ' उखाहरण ' असावें, असें वाटतें. सदर काव्यावरील श्री. फफे[2] यांचा लेख अभ्यासपूर्ण आहे. या कवीचें नांव रंगनाथ निगडीकरांच्या संतमालिकेंत आढळतें ( ओ. ३९).

पंचतंत्र या संस्कृतांतील सुप्रसिद्ध व लोकप्रिय ग्रंथाचे अनुवादहि मराठी भाषेंत याच सुमारास झाले. अशा प्रकारचे दोन तीन अनुवाद[3] संशोधकांना उपलब्ध झाले असून त्यांवरून पाहतां ज्या पंचतंत्रांचे हे अनुवाद आहेत तीं पंचतंत्रें मूळांतच कांहींशीं भिन्न असावीं असें वाटूं लागतें. किंबहुना प्रो. द. वा. पोतदार[4] स्वसंपादित मराठी पंचतंत्राच्या प्रस्तावनेंत म्हणतात त्याप्रमाणें पंचतंत्राचें मूळचें साधें स्वरूप जाऊन देशकालप्रसंगानुसार त्यास जीं कमजास्त फुगीर स्वरूपें आलीं त्याप्रमाणें जशीं प्रत रूपांतरकाराचें हातीं आली तशी घेऊन हीं रूपांतरें झालीं असणार. मूळ एक संस्कृत व त्याचीं अनेक गद्यपद्य रूपांतरें असा प्रकार झालेला नसून संस्कृत मूळेंच थोडीं भिन्न भिन्न, अर्थात् तदनुगामी मराठी रूपांतरेंहि थोडीं थोडीं निराळीं अशी वस्तुस्थिति आहे. असो. १३–१४ व्या शतकांतील उपलब्ध झालेलीं मराठी भाषेंतील पंचतंत्रें गद्यांत असून त्यांची भाषा साधीसोपी आहे. या गद्य पंचतंत्रावरूनच निर्मळ पाठकानें एक ओवीबद्ध पंचतंत्र रचिलें असावें. गद्य पंचतंत्रांपैकीं एक महानुभाव पंथांतील लेखकानें अनुवादिलेलें आहे. पुढें १५ व्या शतकांत महालिंगदास

---

१. भा. इ. सं. मं. वार्षिक अहवाल, शके १८३३.

२. ऐति. संकीर्ण निबंध, खंड ३, पृ. ११–३६.

३. संपा. वि. ल. भावे ( 'महाराष्ट्र–कवि', शके १८२९ ).

४. संपा. द. वा. पोतदार ( भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष ३. ).

यानेंहि एक ओवीबद्ध पंचोपाख्यान रचिलें आहे.

या कालखंडांतील एक कवि **बहिरा जातवेद** याची भागवताच्या दशमस्कंधावरील टीका प्रसिद्ध असून तिचे एकूण अध्याय ९० व ओवी संख्या ३५,९४५ आहे. हा कवि स्वतःचा उल्लेख 'जातवेद बहिरा' असा करतो व त्याची टीका भैरवी (बहिरवी) टीका या नांवानें ओळखली जाते. बहिरा जातवेद, बहिरंभट पैठणकर व बहिरा पिसा अशीं तीन नांवें या एकाच व्यक्तीचीं आहेत. याचें चरित्र महीपतीनें दिलेलें असून (भक्तिविजय, अ. ४४) प्रो. पोतदारांना मिळालेल्या जगनाड्यांच्या वहींतील एका उल्लेखावरून बहिरा पिसा म्हणजेच बहिरा जातवेद हें स्पष्ट होतें. जातवेद हें त्याचें उपनांव असून पिसा हें त्यास मिळालेलें लोकनाम आहे. असो. जिचा उल्लेख करणें अवश्य आहे अशी या कालखंडांतील एक संतकवयित्री म्हणजे **कान्हुपात्रा** ही होय. हिच्या जन्ममृत्यूचे शक ठाऊक नाहींत; पण ती १४-व्या शतकाचें अखेरीस होऊन गेली असावी असा समज आहे. कान्हुपात्रा ही मंगळ-वेढ्यांतील श्यामा नांवाच्या एका नायकिणीची मुलगी. पण आईचा धंदा पुढें न चालवितां ती भक्तिपंथांत शिरली व या मार्गाचें आचरण करीत असतांच तिनें पंढरीस विठ्ठलाचे पायाशीं देह ठेवला. कान्हुपात्रेचे कांहीं थोडे अभंग उपलब्ध असून त्यांतील आर्त जनाबाईच्या वाणीची आठवण करून देणारें आहे. या शतकाचे अखेरीस जो इतिहासप्रसिद्ध असा दुर्गादेवीचा दुष्काळ पडला त्यांत मंगळवेढ्याचा ठाणेदार दामाजीपंत यानें धान्याचीं कोठारें गोरगरिबांकडून लुटविलीं व त्याप्रसंगीं देवानें एका महारास सद्बुद्धि देऊन त्याजकरवीं दामाजीपंतावरील संकटाचें निवारण केलें, ही कथा सर्वश्रुत आहे. या प्रसंगावरील दामाजीपंताचें एक पद प्रसिद्ध असून त्यावरून व कै. राजवाडे[१] यांस मिळालेल्या एका जुन्या महजरावरून विठनाक महाराची हकीगत हें एक ऐतिहासिक सत्य असल्याचें कळून येतें. असो. या शतकांत एक **वडवाळ सिद्ध नागेश** व दुसरे **अज्ञान सिद्ध नागेश** असे दोन कवि ऐकूं येतात. पैकीं शके १३१३ मध्यें ग्रंथरचना करणाऱ्या पहिल्याचा उल्लेख सारस्वतकारांनीं केलाच आहे. मात्र ते म्हणतात त्याप्रमाणें नागेश हें नांव या कवीचें नसून तें त्याच्या गुरूचें असावें. कवीचें नांव वडवाळ. त्याचा काळ संतकाविकाव्यसूचिकार शके १२९० ते १३४० असा देतात. दुसरा कवि स्वतःचा उल्लेख अज्ञानसिद्ध नागेश किंवा वरद नागेश या नांवानें करीत असून तोहि वरील नागेशाचाच शिष्य

---

१. दुर्गादेवीचा दुष्काळ, (शिवचरित्र साहित्य, खंड, १).

दिसतो. आपल्या गुरूचें नांव नागनाथ असें त्यानें स्पष्टपणें म्हटलें आहे. या अज्ञानसिद्ध नागेशाच्या नांवावर गुरुशिष्यसंवाद, कालज्ञान व पंचीकरण-प्रमेय इतके ग्रंथ आढळतात. पैकीं अखेरचा ग्रंथ अविंध भाषेंत असल्यानें त्यावरून या कवीचा काळ १४ व्या शतकाच्या अखेरीस यावा असा 'सूचि' कारांचा तर्क आहे. एवढें मात्र खरें, कीं या दोन कवींविषयीं विश्वसनीय असा तपशील अद्यापि तरी उपलब्ध झालेला नाहीं, व हीच कथा कांहीं अंशीं ' पाठक ' घराण्यांतील कवींचीहि आहे. त्यांतील वरील-पैकीं एका नागेशशिष्याचा प्रशिष्य कान्हो पाठक याजविषयीं थोडी माहिती सारस्वतकारांनीं दिली आहे. मात्र **कान्हो पाठक** व **कान्हो त्रिमलदास** हे कवि एकच असतील तर त्यांचें ज्ञानेश्वरसमकालीनत्व संशयित वाटतें. पैकीं कान्हो त्रिमलदासाची गुरु परंपरा वडवाळसिद्ध नागेश—पिला—त्रिमल्ल—कान्हो—हरि—नामा पाठक याप्रमाणें आहे. कान्हो पाठकाची परंपराहि हीच असावी. परंतु ' गीतासार ' या ग्रंथांत नागनाथ हे आपले गुरु होत असें हा सांगतो त्यामुळें शंका येते. खेरें, कान्हो त्रिमलदासाचा 'पाताळकांड रामायण' हा ग्रंथ पहावा तर त्यांत तोहि आपले परमगुरु वडवाळसिद्ध नागेश होत असें म्हणतो. वडवाळ नागेशाचा काळ शके १२९० ते १३४० असल्यानें हा कान्हो कवि या शतकाच्या उत्तरार्धांतील असणार. एकूण प्रश्न गुंतागुंतीचा आहे, एवढें खरें[1]. कान्हो त्रिमलदासाचें ' पाताळकांड रामायण ' थोडें विचित्रच असून त्याची छाया पुढें शके १७००-च्या सुमारास कोणा विठ्ठल किंकर नांवाच्या कवीनें रचिलेल्या अशाच एका पाताळकांडावर पडली आहे, हे विशेष होय. असो. सारस्वतकारांनीं उल्लेखिलेला **नामा पाठक** हा वरील कान्हो पाठकाचा जर खरोखरच नातू असेल तर त्याचा काळ थोडा पुढें ढकलणें भाग पडेल. या नामा पाठकाच्या कवित्वाची माहिती सारस्वतांत येऊन गेलीच आहे. प्रो. पोतदारांना[2] मिळालेल्या ' एका मराठी अश्वमेधाचीं कांहीं जीर्ण पानें ' याच कवीच्या अश्वमेधापैकीं असावीं. कारण त्यांतील भाषा निर्विवाद चौदाव्या शतकांतील वळणाची आहे. या शतकाच्या अखेरीस कोणा **दगडो शिवराम** या नांवाच्या एका कवीनें ' निर्वाणसार ' हा ओवीबद्ध ग्रंथ रचिल्याचें ' सूचि ' कार

---

१. श्री. गो. का. चांदोरकर यांचें मतें कान्हु पाठक ज्ञानेश्वरकालीन, कान्हो त्रिमलदास (शके १३५०), व कान्हु पाठक—नागनाथशिष्य याप्रमाणें तीन कान्हो कवि आहेत. (भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३६ ).

२. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, १७–३.

सांगतात. हा दगडो शिवराम एका ठिकाणीं कावडीसिद्ध नागेश्वर यास आपला गुरु म्हणतो, तर दुसरीकडे तापीनाथाचें नांव घेतो. अर्थात् त्याची परंपरा अजमावण्यास कांहीं मार्ग नाहीं. वरील ग्रंथकारांत एक महत्वाची भर अलीकडे प्रसिद्ध संशोधक श्री. वि. अ. कानोले यांच्या प्रयत्नानें पडत आहे.[1] या नव्यानें उपलब्ध झालेल्या ग्रंथकाराचें नांव मुकुंदराज असें असून त्याच्या ग्रंथाचें नांव 'योगमार्तंड' आहे. हा मुकुंदराज ज्ञानेश्वरांच्या खास पठडींतील असून त्यानें आपली परंपरा सोपानदेव-मुचकुंदानंद-अव्यक्त -जनार्दन-अलक्ष-अचिंत्य-त्र्यंबकनाथ-कविदासु अर्थात् मुकुंदराज याप्रमाणें सांगितली आहे. नाथपरंपरेंतील सोपानदेवांच्या मागील नांवें देणारीं पृष्ठें पोथींतून गहाळ झालीं आहेत. वरील परंपरेच्या आधारें प्रस्तुत मुकुंदराज शके १३५०-च्या सुमारास विद्यमान असावा असा श्री. कानोले यांचा तर्क आहे. 'योगविवेकमार्तंड' ही गोरक्षनाथांनीं संस्कृतामध्यें लिहिलेल्या एका ग्रंथावरील ओवीबद्ध टीका असून तिची ग्रंथसंख्या ७७४ आहे. ही टीका रचणारा मुकुंजराज योगमार्गांत प्रवीण दिसतो. तो केवळ ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतील आहे एवढेंच नव्हे, तर त्याचा ज्ञानेश्वरीचा व्यासंगहि चांगला आहे असें त्याच्या या टीकेवर पडलेली ज्ञानेश्वरीची छाया पाहून वाटतें. १४ व्या शतकांतील या नाथपंथीय ग्रंथकाराच्या गुरूचें नांव त्र्यंबकनाथ असें असून हा मुकुंदराज म्हणजे कै. राजवाडे-संशोधित ज्ञानेश्वरीचा संग्राहक मुकुंदराज किंवा मुकुंद असण्याची शक्यता श्री. कानोले यांनीं बोलून दाखविली आहे.

### महानुभावीय वाङ्मय :—

१४ व्या शतकांत जी थोडीफार काव्यरचना महानुभावांचे हातून झाली तिचा परिचय सारस्वतांत आलाच आहे. हें शतक महानुभावीय काव्यांसाठीं नव्हे तर पंथीय तत्वज्ञान विशद करणाऱ्या तात्विक स्वरूपाच्या वाङ्मयासाठीं अधिक प्रसिद्ध आहे. चक्रधरांच्या पश्चात् त्यांचे शिष्य त्यांच्या तत्वज्ञानाचें व शिकवणीचें निबंधन करण्यांत व्यग्र होते असें केसोबास-संकलित सूत्रपाठ, लक्ष्मींद्रभट राजुरकर-विरचित आचारादि नव प्रकरणें, नागांबिकाकृत आचार-विचारमालिका, राघोपंडितकृत दृष्टांत व प्रश्नोत्तरविधायक इत्यादि ग्रंथ पाहून वाटतें. हाच उद्योग आनेराजबास व परशरामबास यांनीं पुढें चालविला आणि त्याची परिणति प्रस्तुत शतकांत **गुर्जर शिवव्यास व सिद्धान्ते हरिव्यास** या विद्वद्वयांच्या कृतींत झाली. या दोघांनीं मिळून चक्रधरोक्त सूत्रांतील 'लक्षण, आचार व विचार' या तीन प्रकरणांतील 'तीन्ही

१. मुकुंदराज व त्याचा 'योगमार्तंड' ( भा. इ. सं. मं. त्रै. २३-४ ).

स्थळांची बांधणी ' शके १३२५-च्या सुमारास पुरी केली. हीं तीन स्थळें म्हणजे सूत्रपाठावरील तीन भाष्येंच असून पंथांत तीं सर्वमान्य होऊन बसलीं आहेत. तीं रचणाऱ्यांपैकीं गुर्जर शिवव्यास हे कवीश्वराम्नायांतील अचळ मुरारी यांचे शिष्य होत. त्यांचें पूर्वाश्रमींचें नांव शिवपाळ असें असून ते श्रीचक्रधर यांच्या गुजराथीं वंशांतील सहावे पुरुष होत.[1] गुजराथेंतून महाराष्ट्रांत पैठण येथें येतांना त्यांनीं बरोबर आपला पुतण्या संगपाळ यासहि आणलें व पुढें तो सोंगोव्यास या नांवानें पंथांत प्रसिद्धीस आला. गुर्जर शिवव्यास यास सूत्रपाठावरील ' तिन्ही स्थळां 'ची बांधणी करण्यास उपाध्य आम्नायांतील धाराशिवकर ओंकारव्यास यांचे शिष्य सिद्धान्ते हरिव्यास यांचें साहाय्य झालें. या भाष्याची थोडी कल्पना यावी म्हणून ' महाराष्ट्रीं असावें ' या चक्रधरोक्त सूत्रावरील स्थळकारांच्या भाष्यांतून कांहीं भाग पुढें देतों—

" महंतराष्ट्र म्हणोनि महाराष्ट्र । महंत म्हणजे थोर । ... एके देशींचीं मनुष्यें राजसें, एके देशींचीं मनुष्यें तामसें । ...... महाराष्ट्र सात्विक । तेथचे जडचेतन पदार्थ तेहि सात्विक । तेथ असतां शारीर मानसिक कव्हणीचि उपद्रव नुपजति । आणिकें देशीं शारीर मानसिक उपद्रव उपजला असे, तो महाराष्ट्रीं असतां शमे । तेथचां अन्नोदकीं शमे । तेथचां औषधीं शमे । तेथचा वारा झडि पाऊस तोहि सात्विक । तेणें सकळ उपद्रव शमेति । महंत भणिजे निर्दोष । आणिक एक देश निर्दोष होति परि सगुण नव्हेति । महाराष्ट्र निर्दोष आणि सगुण । तेथ असतां अनाचार करावेयाची बुद्धि नुपजे । आणि उपनली तर करूं न ल्हाइजे । आपण अनाचार न करी, आणिकांसि करूं नेदिति तें महाराष्ट्र । धर्म सिद्धी जाए तें महाराष्ट्र । " (आचारस्थळ)

महाराष्ट्राचें हें महिम्न स्तोत्र म्हणजे १४-व्या शतकांतील मराठी गद्याचा एक उत्कृष्ट नमुनाच होय. श्रीचक्रधरोक्त वचनांचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून या व पुढील एकदोन शतकांत अशा प्रकारचें विपुल साहित्य निर्माण झालें असून त्यांत स्थळें म्हणजे भाष्यें, बंध म्हणजे महाभाष्यें, हेतुस्थळ, वचनसंबंध, विधायक, पट, प्रमेय, व्याख्यानें इत्यादि विविध प्रकारांचा समावेश होतो. पैकीं पंडित कानउदयकृत सूत्रपाठावरील ' एकादशप्रकरण सूत्रभाष्य ', शिवाचार्यशिष्य गोविंदमुनीकृत ' लक्षणरत्नाकर-भाष्य ' व भीष्माचार्य लासूरकरकृत आनेराजांच्या सुभाषितांताक्षरीवरील मराठी टीप हे ग्रंथ प्रमुख होत. हें सर्व साहित्य गद्यांत असून त्यावरून

१. वंशावळ ( य. खु. देशपांडेकृत महा. मराठी वाड्मय पृ. ५३ ).

प्राचीन मराठी गद्यांतील अर्थाभिव्यक्तीचें सामर्थ्य कळून येईल. हीं भाष्यें-महाभाष्यें रचणारे पंडित संस्कृत विद्येचा रंग देशी भाषेच्या पिचकारींत भरून जो वादविवादाचा खेळ खेळले आहेत तो एकवार मूळांतून पाहण्यासारखा आहे. शास्त्राची सूक्ष्म दृष्टि, खंडणमंडणांतील तार्किक हातवटी, निरूपणांतील विद्वत्तेचें गांभीर्य, इत्यादि तात्त्विक स्वरूपाच्या वाङ्मयांतील सर्व विशेष वरील गद्य भाष्यांतून व्यक्त झाले आहेत. याशिवाय, शाङ्र्गधर भोजने किंवा नवरस नारायणकृत[1] श्लोकबद्ध 'तीर्थमालिका' व कवीश्वर आम्नायांतील गोविंदराज गुरुबल्लाळकृत ओवीबद्ध 'भक्तिप्रबोध' हे दोन ग्रंथहि याच काळांतील आहेत. पैकीं पहिल्यांत श्रीचक्रधरांनीं ज्या ज्या ठिकाणीं लीळा केल्या अशा सुमारें दोनअडीचशें तीर्थस्थानांची माहिती आली असून दुसऱ्यांत श्रीमूर्तीच्या मानसपूजेचें सविस्तर वर्णन आलें आहे. वरील सर्व ग्रंथकारांची माहिती या शतकाचे अखेरीस कोणा कृष्णमुनि अथवा कवि डिंभ यानें रचिलेल्या एका अन्वयस्थळांत मिळते. हा कृष्णमुनि १६-वें शतकांतील मयंकराजशिष्य रुक्मिणीस्वयंवरकार कृष्णमुनीहून किंवा १७ वें शतकांतील दिवाकरशिष्य कृष्णमुनीहून निराळा आहे. दामेराज–सिवराज–बल्लाळ–कृष्णमुनि याप्रमाणें आपली परंपरा देऊन तो स्वतःस कवि डिंभ म्हणवितो. त्याचा काळ श्री. नेने यांच्या मतें शके १४००-च्या सुमारास यावा. या कृष्णमुनींचें ओवीबद्ध अन्वयस्थळ वाङ्मयेतिहासदृष्ट्या महत्वाचें असून शास्त्रांत ढवळाढवळ होऊं नये म्हणून सांकेतिक लिपी शोधून काढणारे रवळोव्यास, पाथरी गांवीं बावीस पक्षकारांचा समन्वय करून 'तिन्ही स्थळां'ची बांधणी करणारे गुर्जर शिव व्यास व सिद्धांते हरिराज, पारमांडल्य आम्नायांतील दत्तोबास तळेगांवकर, मल्हेकोयाबास इत्यादि ग्रंथकारांचे उल्लेख प्रस्तुत 'अन्वयस्थळां'त[2] आले आहेत. महानुभावीय वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें पाहतां कृष्णमुनीच्या या जंत्रीवजा काव्याचें महत्व 'स्मृतिस्थळा'च्या खालोखाल आहे.

---

१. हा नवरसनारायण आपली परंपरा पुढीलप्रमाणें देतो. श्रीदत्त–मुनिदेव –नागार्जुन–कवीश्वर–पटवर्धन–योगेश्वर–जानुभोज–मुकुंदराज–शारंगधर –येल्हन–नारायण. यावरून या कवीचें नांव नारायण व परंपरा महानुभवांची हें स्पष्ट होतें. यानें एक शैल्यपर्व रचिलें असून त्यास पद्मपुराणाचा आधार असल्याचें तो सांगतो. पण प्रत्यक्ष पाहतां ही कथा पद्मपुराणांत नसून कांहीं मानभावी कृष्णचरित्रांत मात्र आढळते.

२. संपा. ह. ना. नेने ( भा. इ. सं. मं. त्रै. २०-२ ).

अभ्यासाचीं साधनें :—


वि. का. राजवाडे : चोंभाकृत उषाहरण ( भाइसंमं. शके १८३३).
य. ग. फफे : चोंभाकृत उखाहरण (ऐति. संकीर्ण निबंध, खं. ३).
द. वा. पोतदार : मराठी पंचतंत्राचीं मुटीं पानें ( भाइसंमं. त्रै. ३ ).
ह. ना. नेने : पंचोपाख्यानाची महानुभावीय प्रत (भाइसंमं. त्रै २२).
द. वा. पोतदार : बहिरा जातवेद ( भाइसंमं. शके १८३४ ).
ह. ना. नेने : चक्रधरसिद्धांतसूत्रें व आचारस्थळ (प्रस्तावना).
ह. ना. नेने : कृष्णमुनीची अन्वयमाळिका ( भाइसंमं. त्रै. २० ).
गो. का. चांदोरकर : कान्हो त्रिमलदास (भा. इ. सं. मं. शके १८३६).
य. खु. देशपांडे : महानुभावीय मराठी वाङ्मय, भाग ३.




महाराष्ट्रांतील दत्तसंप्रदायाचे प्रणेते नृसिंह सरस्वती असले तरी दत्तभक्तीचा प्रसार मुख्यतः सरस्वती गंगाधराच्या 'गुरुचरित्रा'नें केला. नृसिंह सरस्वतींचें हें ओवीबद्ध चरित्र त्यांच्या पश्चात् सुमारें पाऊणशें वर्षांनीं म्हणजे शके १४६०-च्या सुमारास सरस्वती गंगाधरानें लिहून पूर्ण केलें. सिद्धमुनि नांवाच्या स्वामींच्या एका शिष्यानें त्यांचें त्रोटक चरित्र यापूर्वींच संस्कृत भाषेंत रचिलें होतें व त्याचाच मराठी अनुवाद 'गुरुचरित्र'कारानें केला असें वाटतें. सरस्वती गंगाधरास मराठी भाषा चांगली अवगत नसावी असें त्याचे कांहीं उद्गार सांगतात[1]. क्वचित् तो कानडी वळणाचे वाक्प्रयोगहि करतो. यावरून असें वाटतें, कीं जेथें या ग्रंथाची निर्मिति झाली त्या गाणगापूर प्रांतीं १५-व्या शतकांत मराठी भाषा वाढती होती व म्हणूनच सरस्वती गंगाधरानें स्वतःची भाषा कानडी असूनहि आपला ग्रंथ मराठींत लिहिला. गुरुचरित्र चमत्कारांनीं भरलें असलें तरी त्यांत तत्कालीन महाराष्ट्राचें सामाजिक दर्शन घडतें हेंहि कांहीं खोटें नाहीं. महाराष्ट्र-धर्म हा शब्द, संकुचित अर्थानें कां होईना, प्रथम या ग्रंथांत आढळतो. असो. एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी यांचा पंचीकरण किंवा आत्मानात्मविवेकसार हा ओवीबद्ध ग्रंथ अलीकडे प्रो. पोतदार यांस उपलब्ध झाला आहे[2]. नाथांचे पणजे भानुदास हे दामाजीपंतांचे समकालीन म्हणजे १३ वें आणि १४ वें या दोन शतकांमधील संधिकालांतील असावे. विजयनगरच्या कृष्णरायाची राजवट शके १४३० ते ५२ अशी आहे. तेव्हां साहजिकच भानुदास या काळांत हयात असणार. कारण त्यांनीं विजयानगराहून पांडुरंगाची मूर्ति या कृष्णरायाच्या राजवटींतच पंढरीस परत आणली. बाकी पंढरीहून नेलेली मूर्तिच कृष्णरायानें भानुदासांस परत केली किंवा काय याविषयीं संशय वाटतो. कारण यादवकालीन नामदेवकृत पांडुरंगाचे सुप्रसिद्ध आरतींत 'वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा' असें म्हटलें असून आज पंढरीस पांडुरंगाचें वामांगीं रखुमाई कोठें दिसत नाहीं. उलट विजयानगर येथील विजयविठ्ठलाचें मंदिरांत आज कोणतीच मूर्ति नसली तरी कांहीं वर्षांमागें त्या देवळाच्या परिसरांत जिच्या डाव्या कडेवर रुक्मिणीची सूक्ष्म आकृति आहे अशी एक विठ्ठलमूर्ति भग्नावस्थेंत पडलेली

---

१. 'भाषा न ये महाराष्ट्र ।' (गु. च. १-४९; ११;-१०१.).

२. भा. इ. सं. मं. त्रै. १२-२.

आपण पाहिल्याचें डॉ. सी. नारायणराव सांगतात[1]. ही विठ्ठलमूर्ति मूळची पंढरपूरची असून तिची एक प्रतिकृति–रुक्मिणीविरहित–तयार करून ती कृष्णरायानें भानुदासास दिली असावी असा आमचा तर्क आहे. भानुदासाच्या नांवावर कांहीं अभंगरचनाच तेवढी आढळते.

एकनाथांचा जन्म सारस्वतकारांच्या मतें शके १४७०-त झाला. हाच शक परंपरा १४५५ असा मानते. ऐतिहासिक प्रमाणाचा आधार असा कोणत्याच शकास नाहीं. परंतु एक तर परंपरागत म्हणून व दुसरें म्हणजे तो मान्य केला असतां नाथांची हयात ६६ वर्षांची ठरून ग्रंथरचनेस त्यांना भरपूर अवसर मिळतो; म्हणून १४५५ हा नाथांचा जन्मशक मानणें आम्हांस अधिक युक्त वाटतें. नाथांच्या काशीक्षेत्रांतील वास्तव्याविषयीं सारस्वतकारांनीं मौन धरल्यामुळें त्याविषयीं थोडें लिहिणें अवश्य आहे. असें दिसतें, कीं शके १४९२ ते १४९५ हीं तीन वर्षें नाथांचें वास्तव्य काशीक्षेत्रीं होतें. ते काशीस जाऊन पोंचले तेव्हां त्यांच्या 'एकादशस्कंधा'ची पहिली पंचाध्यायी लिहून पुरी झाली होती व 'रुक्मिणी-स्वयंवरा'ची रचना चालू होती. भागवतासारख्या ग्रंथावर प्राकृत टीका रचूं पाहणाऱ्या या संतकवीस काशीच्या कर्मठ पंडितांकडून प्रथम प्रथम सपाटून विरोध झाला. परंतु लवकरच नाथांचें मोठेंपण त्यांस कळून आलें व ज्या कर्मठांनीं त्यांचा छळ मांडला होता त्यांनींच शके १४९५-मध्यें एकनाथी भागवताची समाप्ति झाली तेव्हां या ग्रंथाची काशीक्षेत्रीं पालखींतून मिरवणूक काढली. याप्रमाणें आपल्या संतत्वानें व कवित्वानें काशीकरांस जिंकून नाथ शके १४९५ चे अखेरीस महाराष्ट्रांत परत आले. एकनाथांस एकूण चार अपत्यें झालीं. पैकीं थोरली मुलगी गोदा ही पैठणकर मुद्गलांच्या घराण्यांत दिलेली असून कविवर मुक्तेश्वर हा तिचा मुलगा व नाथांचा नातू होय. त्यांची दुसरी मुलगी उमा ही तंजावर प्रांतीं कोणा नागनाथास दिलेली असून तिचा मुलगा माधवस्वामी हा एक महाकवि होऊन गेला. या माधवस्वामींचे दोन मुलगे रामपंडित आणि कृष्णपंडित, नातू वासुदेव पंडित व नातसून मीनाक्षीआम्मा या सर्वांनीं तंजावर प्रांतीं राहून मराठींत काव्यरचना केली आहे. एकनाथांनीं शके १५२१-च्या फाल्गुन वद्य ६ स देह ठेविला हें बहुतेकांना मान्य आहे. यांत त्यांची कांहीं योजना असावी असें मनास सारखें वाटतें. कारण देहान्तसमयीं त्यांचें 'भावार्थ रामायण' रचण्याचें काम चालू होतें. व तें तसेंच अर्धवट सोडून नाथ आयुष्याच्या पानावरून उठले. म्हणून

१. Summary of Papers, p.114 : 8th Oriental Conference.

वाटतें, कीं त्यांचे गुरु जनार्दनस्वामी यांचा जन्म, आत्मसाक्षात्कार, नाथांवरील अनुग्रह आणि देहत्याग इतक्या चार गोष्टी ज्या तिथीस घडल्या त्याच तिथीस म्हणजे फाल्गुन वद्य ६ स नाथांनीं देह ठेवावा यांत कांहीं संकेत दिसतो.

**एकनाथांची ग्रंथरचना** : एकनाथांच्या ओवीबद्ध काव्यांची ग्रंथसंख्या सुमारें ६०,००० असून त्यांची एकूण कविता पाऊण लाखाच्या घरांत जाते. ही बहुतेक सर्व छापून प्रसिद्ध झाली आहे. बहुतेक सर्व म्हणण्याचें कारण त्यांचा दशमस्कंध उपलब्ध झाल्याचें प्रो. बनहट्टी[1] सांगत असून तो अद्यापि अप्रसिद्ध आहे. अर्थात् एकनाथांनीं दशमस्कंधावर टीका रचल्याचें ऐकिवांत नाहीं, व जरी रचिली असली तरी ती हीच होय असें म्हणण्यासहि आधार नाहीं. असो. एकनाथकृत 'भावार्थ रामायणा'च्या रचनेसंबंधीं थोडें लिहिणें अवश्य आहे. या महापुराणाची रचना चालू असतांनाच ती अर्धवट सोडून नाथांनीं देह ठेविला. या रामायणाचीं पहिलीं पांच कांडें आणि सहाव्याचे ४४ अध्याय रचून झाल्यावर एकनाथांचा अंतकाळ ओढवला, व पुढील रचना आपल्या गावबा नांवाच्या एका भोळ्या परंतु एकनिष्ठ शिष्याकडे सोपवून ते या वाङ्मय-प्रपंचांतून निरहंकार वृत्तीनें दूर झाले. सहाव्याचे उरलेले ४८ अध्याय आणि सातवें उत्तरकांड हा पुढील भाग गावबानें लिहून ग्रंथ पूर्ण केला. 'भावार्थ रामायणा' च्या एकूण २९७ अध्यायांपैकीं पहिले १७२ नाथांचे व पुढील १२५ गावबाचे आहेत. ग्रंथाची ओवीसंख्या ४०,००० च्या आसपास असून पैकीं सुमारें २५ हजार ओव्या नाथकृत आहेत. गावबानें स्वतःचें नांव कोठेंहि येऊं न देतां आपली रचना 'एकाजनार्दन' याच नांवानें केलेली आहे. तसेंच, नाथांच्या मूळ कृतीशीं आपल्या कृतीचा सांधा गावबानें इतक्या बेमालुम रीतीनें सांधला आहे, कीं या ग्रंथाला एकनाथांशिवाय आणखी कोणाचा हात लागला असावा अशी शंकाहि येऊं नये. गुरुशिष्यांचीं ह्रदयें अंतर्बाह्यतः एकरूप झालीं आहेत असें दोघांची भाषा आणि विचार पाहून वाटतें. मात्र नाथांनीं ग्रंथ अपूर्ण सोडल्याचा व दुसऱ्यानें तो पूर्ण केल्याचा अंतर्गत पुरावा उपलब्ध आहे.

'यापरी मी अनाथ । होतों भवदरिद्रें पीडित ।
एकाजनार्दनीं येथ । केला सनाथ त्रिजगतीं ॥ (युद्धकांड-अ. ४५).

हे बोल नाथांचे खास नसून ते गावबाचे असणार. याशिवाय एका तिसऱ्या कवीचाहि अल्पसा हातभार या ग्रंथास लागला असल्याचें पुढें

१. केसरी : ता. ११ नोव्हेंबर, १९२४.

दिसून येतें. एकनाथी रामायणांत अहिरावणाख्यान नाहीं असें पाहून मागाहून कोणींतरी तें रचून ग्रंथपूर्ति केली आहे, असें युद्धकांडांतील ५४-व्या अध्यायावरून वाटतें ( ओ. ३३२–३४० ). हा तिसरा कवि स्वतःचें नांव 'जयरामात्मज' असें सांगतो. त्याचें ठावठिकाण कळत नाहीं. एवढें मात्र निश्चित, कीं गावबा आणि जयरामात्मज या दोन भिन्न व्यक्ति आहेत; ल. रा. पांगारकर[१] सुचवितात त्याप्रमाणें ही एकच व्यक्ति नव्हे. तात्पर्य, तत्वतः पाहिलें तर एकनाथ, गावबा आणि जयरामात्मज अशा तीन कवींच्या वाणींचा त्रिवेणीसंगम या रामायणांत झालेला आहे. पैकीं तिसरा प्रवाह उपेक्षणीय असून पहिले दोन गंगायमुनांच्या ओघां-प्रमाणें एकमेकांत पूर्णपणें मिसळून गेले आहेत.

**अभ्यासाचीं साधनें**

ग. ना. मुजुमदार : विवेकसिंधु-गुरुचरित्र (भाइसंम.इति.श.१८३५).
ज. स. करंदीकर : श्रीगुरुचरित्रांतील ऐतिहासिक माहिती (भा. इ. सं. मं. त्रै. ९–२)
ल. रा. पांगारकर : एकनाथ चरित्र.
रा. द. रानडे : संतवचनामृत ( प्रस्तावना ).
ग. गो. कारखानीस : भावार्थरामायण–परिचय ( रामदासरामदासी ).
गं. बा. सरदार : संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति (प्र. ३ ).
न. र. फाटक : एकनाथ व रामदास (वि. ज्ञा. वि. १९२५ ते२९).
न. र. फाटक : श्रीएकनाथ.
श्रीएकनाथ मंडळ, हैद्राबाद : श्रीएकनाथ-दर्शन.



१. म. बा. इतिहास, खं. २, पृ. ४०९.

या प्रकरणांत आरंभींच ज्याचा उल्लेख आला आहे तो **विष्णुदास नामा** हा अद्यापिहि एक वादविषयच आहे. हा नामा ज्ञानेश्वरकालीन नामदेवाहून भिन्न होय यांत शंका नाहीं. तसेंच तो ब्राह्मण असावा असें त्यानें रचिलेल्या कामाबाईच्या आरतींतील विप्र विष्णुदास या मुद्रिकेवरून वाटतें. तो शके १५१७ मध्यें हयात असावा असें त्याच्या 'शुकाख्यानां' तील कालोल्लेख सांगतो[1]. त्याच्या 'कपोताख्यानां'तील उल्लेखावरून त्याच्या गुरूचें नांव रामभारथी दिगंबर होतें असें कळतें[2]. यानें रचिलेल्या महाभारतांत पहिलीं चार व सौप्तिक अशीं पांच पर्वें नसल्याचें संतकविकाव्यसूचिकार सांगतात व कै. का. ना. साने हीं पांच मुक्तेश्वरांचीं व उरलेलीं तेरा विष्णुदास नामा याचीं मिळून तयार झालेल्या एका अठरा पर्वी भारताचा उल्लेख करून 'सूचि'कारांच्या मतास दुजोरा देतात. याच्या उलट विष्णुदासनामाकृत ओवीबद्ध अठरापर्वी साग्र महाभारत आपणांस खानदेशांत उपलब्ध झाल्याचें सांगून त्यांतील उल्लेखावरून तें शके १५३२-च्या पूर्वी रचिलें गेलें असावें असा तर्क श्री. चांदोरकर करतात[3]. कै. सरदार मेहेंदळे यांना मिळालेल्या द्रोण व भीष्म पर्वांतील 'म्हणे पाठक नामा विष्णुदास' या नामोल्लेखावरून हा कवि आणखी कोणी निराळाच दिसतो[4]. कांहीं अभंगांत 'नामा म्हणे विष्णुदासाचा' अशी मुद्रिका आढळते. तेव्हां या नाम्याचा गुरु कोणी विष्णुदास असावा असें वाटूं लागतें[5]. या नाम्यास जशी कूटात्मक रचनेची तशीच शब्दचमत्कृतीचीहि आवड असावी असें कै. राजवाडे यांनीं उजेडांत आणिलेलें त्याचें 'बावणआक्षरी' हें प्रकरण सांगतें. सारांश, प्रकरण अति घोटाळ्याचें आहे. इतकें खरें, कीं भाषेंतील 'बीजें करणें, गजबजु होणें, वोळगणें, सरणें, बेंबळ जाणें, ठावो ठाकणें,' इत्यादि शब्दप्रयोगांवरून हा कवि एकनाथपूर्वकालीन दिसतो. मात्र हा विष्णुदासनामा महानुभाव कसा तें कळत नाहीं. कै. भावेकृत महानुभाव कविकाव्यसूचींत त्याचें नांव आढळत नाहीं, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. विष्णुदास हें नांवहि अमहानुभावीय वाटतें.

---

१. वि. का. राजवाडे ( भा. इ. सं. मं. इति शके १८३३. पृ. १२२ ).
२. गो. का. चांदोरकर ( भा.इ.सं.मं.इति. शके १८३४, पृ. १७८ ).
३. विष्णुदास नामाकृत साग्र महाभारत. ( भा. इ. सं मं. त्रै. १२-४ ).
४. विष्णुदास नामा पाठककृत द्रोण व भीष्मपर्व. (भाइसंमं.इ.श.१८३८).
५. विष्णुदास नामा ( भा. इ. सं. मं. इति. शके १८३७, पृ. ३४०. ).

एकनाथ-पंचकापैकीं एकनाथांचे गुरुबंधु **जनीजनार्दन** यांचा उल्लेख महिपतिबोवा संतचरित्रांत कोठेंच करीत नाहींत हें कसें? मोरोपंत मात्र सन्माणिमालेंत "ज्यातें जनीजनार्दन ऐसें बहु साधु जाणते म्हणती" याप्रमाणें त्यांना गौरवितात. असो. आपला 'निर्विकल्प' हा ७१६ ओव्यांचा ग्रंथ आपण सकाळीं आरंभून दुपारीं संपविला असें स्वतः जनीजनार्दनांनींच म्हटलें आहे, त्यावरून हे शीघ्रकवि दिसतात. **रेणुकानंदनाचा विठा** यांचीं कांहीं पदें मोगलाईतील कन्नड या गांवीं उपलब्ध झालीं आहेत. या कवीचा काळ कै. राजवाडे शके १५०० च्या सुमारास मानतात व त्याचा उल्लेख संतचरित्रकार महिपति करतात (भक्तिविजय, अ. ५७). यांचीं कांहीं पदें सरदार मिरीकर यांच्या वाडांत आहेत. नाथपंचकांतील तिसरे कवि **रामाजनार्दन** यांची माहिती विशेष नसली तरी ज्ञानेश्वरांवरील एका आरतीनें ते अमर झाले असल्याचें आपणांस ठाऊक आहे. **दासोपंताची** ओळख महाराष्ट्रास प्रथम कै. राजवाडे यांनीं करून दिली[1]. या महाकवीच्या आंबें जोगाई येथील दोन्हीं देवघरांतील मिळून हस्तलिखितांची जी एक यादी सुमारें ३५ वर्षांपूर्वीं श्री. शंकरराव देव यांनीं प्रसिद्ध केली तींत सुमारें पन्नास ग्रंथ आहेत. ही झाली ३५ वर्षांपूर्वींची कथा. आम्ही नुकतेच आंबेंजोगाईस जाऊन आलों. तेव्हां दासोपंती देवघरांतील या अमोल ग्रंथसंपत्तीस गळती लागत चाललेली दिसली. खुद्द 'गीतार्णव' हि आज या देवघरांत संपूर्ण नाहीं. वर पंचीकरण लिहिलेली दासोपंताची 'पासोडी' तर अति जीर्ण झाली आहे. आंबें गांवांतील एक इतिहासप्रेमी सद्गृहस्थ श्री. रामभाऊ पांडे कुळकर्णी यांनीं मेहनत घेऊन या पोसाडीची एक प्रतिकृति मात्र तयार करून ठेविलेली आढळली. दासोपंतांच्या गीतार्णव व पदार्णव यांपैकीं फारच थोडा भाग आजपर्यंत छापून निघाला आहे. 'महाराष्ट्र—सारस्वत' मासिकांत पदार्णवापैकीं १३९४ पदें, 'महाराष्ट्र—कवी'त गीतार्णवाचा अध्याय पहिला, दुसरा, बारावा व तेरावा अपूर्ण आणि श्री. शंकरराव देवांनीं प्रसिद्ध केलेला ग्रंथराज समग्र, एवढाच म्हणजे सरासरीनें एक दशांश दासोपंत आज आपल्या हातीं आहे. उरलेला नऊदशांश दासोपंत झपाट्यानें काळाच्या मुखीं पडत चालला आहे व हीच कथा दासोपंताच्या दशोपनिषदांवरील संस्कृत भाष्याचीहि आहे!

---

१. ग्रंथमाला मासिक, शके १८२४.

## अभ्यासाचीं साधनें

वि. का. राजवाडे : विष्णुदास नामा (भाइसंमं. १८३३ व १८३७).
का. ना. साने : विष्णुदास नामाकृत महाभारत ( भा. इ. सं. मं. इति. शके १८३२. ).
गं. ना. मुजुमदार : विष्णुदास नामा (भाइसंमं. इति. शके १८३७).
वि. का. राजवाडे : जनी जनार्दन ( संकीर्ण लेखसंग्रह ).
शं. श्री. देव : जनी जनार्दन ( भाइसंमं. इति. शके १८३६ ).
गो. का. चांदोरकर : विठा रेणुकानंदन (भाइसंमं. इति. श. १८३६).
गं. ना. मुजुमदार : विठा गुरु रेणुकानंदन (भाइसंमं. इति.श. १८३७).
शं. श्री. देव : दासोपंतांविषयीं माहिती ( भा. इ. सं. मं. इति. शके १८३४ ).
शं. श्री. देव : दासोपंतकृत ग्रंथराज ( प्रस्तावना ).
द. वा. पोतदार : दासोपंत देवघराचे कागदपत्र ( भा. इ. सं. मं. त्रै. १८-१ ).



वास्तविक पाहतां या प्रकरणांत स्थूलमानानें शके १५०० पर्यंतचे कवि यावे व १६-वे शतकांतील कवींचा विचार पुढील प्रकरणांतून व्हावा. परंतु सारस्वतकारांनीं योगवासिष्ठकार रंगनाथ, अवधूतगीता व गणेशगीता यांवरील टीकाकार अनुक्रमें मेरु कवि व निरंजन, रासक्रीडाकार विठ्ठल वगैरे १६-व्या शतकाच्या पूर्वार्धांत ग्रंथरचना करणाऱ्या कवींचा विचार या प्रकरणांत केला असल्यानें आपणहि त्यांजविषयीं येथेंच बोलावें हें बरें. कवींचा अनुक्रमहि सारस्वतांतीलच ठेवूं; व शेवटीं कांहीं नवीन ग्रंथकारांची माहिती देऊं.

पैकीं प्रथमोल्लेखित प्रेमदास हा कोणा कृष्णगोपाळ ज्ञानदासांचा शिष्य असल्याचें कै. भावे सारस्वताच्या द्वितीयावृत्तींत सांगतात (पृ. १३०). त्याच ठिकाणीं सहजनाथशिष्य भोजलिंगकृत 'महात्मसारा'चाहि उल्लेख त्यांनीं केलेला आहे. सारस्वताच्या तृतीयावृत्तींत या भोजलिंगाचा उल्लेख नाहीं. असो. पंचतंत्रादि ग्रंथांना ओवीबद्ध करणारा महालिंगदास आपली ग्रंथरचना गिरणातीरीं वाडें येथें शके १४८७-च्या सुमारास करतांना आढळतो. याच्या सिंहासनबत्तिशींत 'छत्तीसकुळीं'च्या रजपुतांचीं आडनांवें येतात हें विशेष होय. 'बालबोध'[1]कार त्र्यंबकाविषयीं माहिती कै. भावे यांनीं दिलीच आहे. कै. पांगारकर या ग्रंथाचा समाप्तिकाल शके १५०२ असा देतात. ही नजरचूक असावी. कारण 'शके पंधराशें'त असें स्वतः कवीनें स्पष्ट म्हटलें आहे. बाळबोध हा ग्रंथ ज्ञानमय असला तरी काव्यमय मात्र नाहीं. किंबहुना 'नादी, वादी आणि निंदी' यासाठीं आपलें लिहिणेंच नाहीं असें स्वतः त्र्यंबक म्हणतो. 'बाळबोधा'चा एक विशेष हा, कीं त्यांत ग्रंथकारानें स्वकालीन मतमतांतराचें निरसन करतांना लिंगधारी लिंगायत, नास्तिक चार्वाकवादी, केशलुंचन करणारे जैन, भक्ष्याभक्ष्यभेद न करणारे कापालिक, 'लीळा' चरित्राचा उदोउदो करून 'कानफुंकीचीं उत्तरें' एकांतांत बोलणारे पंचकृष्णवादी भटमार्गी महानुभाव इत्यादि पंथांचा उल्लेख आला असून ऐतिहासिकदृष्ट्या तो महत्त्वाचा आहे. मराठी बोधभाषेस त्र्यंबक 'सुखासनाचा मार्ग' म्हणणे हेंहि योग्यच आहे. या ग्रंथाचा थोडाबहुत संस्कार पुढें दासबोधावर झालेला दिसतो. असो. कृष्णदास लोळ्याविषयीं विशेष माहिती नाहीं; परंतु सारस्वताच्या द्वितीयावृत्तींत 'कृष्णदास मुद्गल लोलीं विरचित' युद्धकांडाची एक प्रत

---

१. संपादक : गो. का. चांदोरकर ( सत्कार्योत्तेजक सभा, धुळें इ

विंचूरचे श्री. ना. ब. कुळकर्णी यांजकडे ऐकिवांत असल्याचें कै. भावे सांगतात ( पृ. १३७ ). संशोधकांनीं शोध घ्यावा. कदाचित् कृष्णदास मुद्गल एकच असून तो लोळी गांवचा असण्याचा संभव आहे. कृष्णदास मुद्गलाच्या गुरूचें नांव कृष्ण नसून काशीराज असावें असें त्याच्या युद्धकांडांतील 'श्रीगुरुकाशिराजाय नमः' या उल्लेखावरून वाटतें. तसेंच 'मागें सुंदरकांड संपादिलें । आतां युद्धकांड आरंभिलें' हे उद्गार त्यानें रामायणाचीं मागील कांडेंहि रचिलीं असावीं असें सुचवितात. आज मात्र कृष्णदास मुद्गलाचें युद्धकांडच तेवढें आपल्या हातीं आहे. असो. कृष्णयाज्ञवल्की हे जरी 'कथाकल्पतरू' चे मूळ उत्पादक असले तरी हा ग्रंथ त्यांच्या हातून तडीस गेला नाहीं. पुढें त्यांच्या पश्चात् 'मधुकर' नांवाच्या त्यांच्या शिष्य-कवीला स्फूर्ति होऊन त्यानें हा ग्रंथ शके १५४५-त पूर्ण केला. यावरून कृष्णयाज्ञवल्कीचा काळ शके १४७० ते १५३५ असा कै. पांगारकर मानतात. कृष्णयाज्ञवल्कीचा मुलगा गोपाळ याज्ञवल्की आणि शिवकल्याण यांच्या समकालीनत्वावरूनहि कै. पांगारकर यांच्या वरील अनुमानास बळकटी येते. 'कथाकल्पतरू' चा[1] पूर्वार्ध ( ओवीसंख्या २०,०६८ ) कृष्णयाज्ञवल्कीकृत असून उत्तरार्ध (ओवीसंख्या १८,७००) मधुकरकृत आहे. कृष्णयाज्ञवल्कीनें पूर्वार्धांत त्याचे वेळीं देशभर प्रचलित असलेल्या पांचपन्नास लोकबोलींचे उल्लेख केलेले असून ऐतिहासिक दृष्ट्या ते महत्वाचे आहेत. उत्तरार्धाचा कर्ता मधुकर कवि याचें खरें नांव महादेव असें असून तो राजाश्रित असल्यानें त्यानें वर्णिलेल्या राजे लोकांच्या मौजा साहजिकच मनोरंजक वाटतात. आपण खरैकार सोमवंशांतील शिवराम व चाहिजी यांच्या पोटीं जन्मलों व 'राज्यकाजीं प्रौढबुद्धि' ठेवून मोहरी गांवीं अखंड वास केला असें हा मधुकर कवि सांगतो.

रंगनाथ मोगरेकरांच्या नांवावरील 'योगवासिष्ठा' विषयींचीं मतमतांतरें पाहण्यासारखीं आहेत. सारस्वतकार हें प्रकरण रंगनाथ मोगरेकरांचेंच मानतात. त्यावर कै. पांगारकरांचा अभिप्राय असा, कीं मूळ ग्रंथ न पाहिल्यामुळें कै. भावे असें म्हणत आहेत, व योगवासिष्ठ मोगरेकरांचें नसून निगडीकर रंगनाथाचें म्हणजे थोडें उत्तरकालीन आहे. आतां 'चित्सदानंदलहरीं'तील उल्लेखाप्रमाणें मोगरेकर रंगनाथानें कदाचित् योगवासिष्ठावर टीका रचिली असेलहि; परंतु मोठा मासा लहान माशास गिळून टाकतो त्याप्रमाणें निगडीकर रंगनाथाच्या ग्रंथापुढें ही मोगरेकरी टीका नाहींशी झाली व पुढें कोणींतरी उपद्व्याप करून तिचें कर्तृत्व

१. कथाकल्पतरु : ( जगदीश्वर छापखाना, मुंबई, शके १८१५ ).

संशयित करून टाकिलें असें कै. पांगारकरांचें म्हणणें आहे.[1] सारांश, प्रकरण वादग्रस्त असून त्याचा उलगडा करणें येथें अवश्य आहे. रंगनाथ निगडी-कर व रंगनाथ मोगरेकर या दोघांच्या नांवांवर दोन्ही निरनिराळीं योगवासिष्ठें असल्याचें कै. भावे सांगतात (म.सा. पृ. ३२१ व पृ.४४१). मौज ही, कीं ग्रंथ प्रत्येकीं दहा प्रकरणांचे असून संहिता एकच आहे. 'योगवासिष्ठसारा' च्या मानकरी व जगदीश्वरी दोन्ही छापील प्रती ताडून पाहतां त्यांतील पहिलीं नऊ प्रकरणें दोन्हींकडे सर्वसाधारणपणें सारखींच दिसतात. दहाव्या प्रकरणांत मात्र जगदीश्वरी प्रतींतील १५३ ओव्या मानकरी प्रतींत गाळल्या आहेत व याच ओव्यांत नेमकी रंगनाथ मोगरेकरांविषयींची माहिती येऊन गेली आहे. या व इतर कांहीं कारणां-मुळें सदर योगवासिष्ठाचें कर्तृत्व रंगनाथ मोगरेकरांकडेच द्यावें असें प्रो पोतदार यांना वाटतें. भाषादृष्ट्याहि हा ग्रंथ एकनाथकालीन ठरतो. योगवा-सिष्ठ टीकेच्या देवप्रतीचे[2] संपादक कै. गोविंदशास्त्री दातार यांनींहि 'या ग्रंथाचें कर्तृत्व मोगरेकर रंगनाथाकडेच जाऊं पाहतें' असा आपला अभिप्राय नमूद केला असून निगडी मठांत तें कर्तृत्व बदलण्याचा खटाटोप पुढें केला गेला असावा असा संभवहि प्रदर्शित केला आहे. असो. याविषयीं प्रो. पोतदार यांनीं जोशीकृत श्रीधर–चरित्राच्या प्रस्तावनेंत केलेलें मूलगामी संशोधन अभ्यसनीय आहे. एवंच, रंगनाथ मोगरेकर हा एक विद्वान् आणि आनंद संप्रदायांतील मोठा अधिकारी सत्पुरुष दिसतो. दासपंचा-यतनांतील आनंदमूर्ति हेहि याच गुरुपरंपरेंतील ठरतात. कारण रंगनाथ (मोगरेकर) काशीराज–रघुनाथस्वामी–आनंदमूर्ति अशी परंपरा ब्रह्मनाळ मठांत पठित असल्याचें व या प्रकरणीं कागदपत्रांचा आधार असल्याचें प्रो. पोतदार सांगतात. रंगनाथानें आपली योगवासिष्ठसार टीका शके १५३० मध्यें रचून पुरी केली असें कै. भावे सांगतात, तें बरोबर नाहीं. कारण १५३० हा 'चित्सदानंदलहरी'चा रचनाशक असून याच 'लहरीं'त 'वासिष्ठ टीका' पूर्वीं केल्याचे दोन उल्लेख आहेत (अ. १८-९४; १७३३). असो. शके १७७१ मध्यें रचिलेल्या 'आनंदचरितामृत' या आनंदमूर्ति ब्रह्मनाळकरांच्या ओवीबद्ध चरित्रांत हे रंगनाथस्वामी नाशिक प्रांतीं वाघरें येथें राहत असल्याचें कळतें. म्हणजे रंगनाथ यांचीं वाघरें व मोगरें अशीं दोन गांवें होतात. निरंजन पंढरपुरकरास सुप्रसिद्ध निरंजन माधवापासून वेगळा सारस्वतकारांनीं काढलाच आहे. तसेंच

---

१. मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २, पृ. ५९०.

२. प्रका. गजानन चिंतामण देव, (शके १८२७).

आणखी एका निरंजनापासून त्यास वेगळा काढणें जरूर आहे व ता म्हणजे निरंजन कऱ्हाडकर होय . या कऱ्हाडकर निरंजनाचा काळ थोडा पुढचा म्हणज शके १५५९ ते १६४३ असा असला तरी त्याच्याहि नांवावर प्रस्तुत निरंजन पंढरपुरकराप्रमाणें एक गणेशगीता असल्यानें नामसादृश्या-मुळें घोंटाळा होऊ नये म्हणून त्याचा उल्लेख येथेंच करून ठेवीत आहों. हा निरंजन कऱ्हाडच्या कोणा नरसिंह पाठकाचा मुलगा असून त्याचा नातू भगवान कवि यानें रचिलेलें एक 'निरंजन–चरित्र'हि उपलब्ध आहे[२].

मृत्युंजय किंवा बामणी मुंताजी याची कथा महिपतीकृत भक्तविजयाच्या ४१-व्या अध्यायांत शांतब्राह्मणी नामक बेदरच्या बादशहाची कथा म्हणून आली असून याची ग्रंथसंख्या सुमारें हजारभर आहे. प्रकाशदीप व स्वरूपसिद्धि हीं याचीं दोन प्रकरणें 'महाराष्ट्र कवीं'तून पूर्वी प्रसिद्ध झालेलीं आहेत. याचे गुरु कल्याणीकर. सहजानंद यांचा काळ श्री. शं. श्री. देव यांचें मतें शके १४६० असल्यानें मृत्युंजयाचा काळ शके १४५० ते ८० हा ठरतो. मृत्युंजयाचें नांव उद्धव चिद्घनादि कवींच्या संत-मालिकांतून आढळतें. रंगनाथस्वामींहि त्याचा उल्लेख करतात. मूळचा शांत-ब्राह्मणी व पुढें योगी झालेला हा मृत्युंजय नेमका कोण तें मात्र कळत नाहीं.

या कालखंडांतील संशोधनान्तीं उपलब्ध झालेल्या कवींपैकीं सदानंद (शके १४२० ते ८० सुमारें) हा एक होय. हा कवि १६-व्या शतकां-तील पूर्णानंदशिष्य सदानंदाहून निराळा असून त्याची परंपरा आदिनाथ-दत्त-सदानंद-केमयानंद-विलयानंद-सदानंद याप्रमाणें आहे. म्हणजे आनंद संप्रदायाचा मूळ पुरुष जो सदानंद त्यापासून ज्या दोन शाखा फुटल्या त्यांपैकीं प्रस्तुत सदानंद कवि हा दुसऱ्या शाखेंतील होय. याच्या नांवावर एक जनकयोगिनी-संवाद[३] नांवाचें ओवीबद्ध प्रकरण असून त्यांतील समा-रोपावर ज्ञानेश्वरीची छाया पडलेली दिसते. याच सुमारच्या आणखी एका कवीचें बाड श्री. शं. श्री. देव यांस येकेहाळी मठांत उपलब्ध झालें असून त्याचें नांव रामानंद (शके १४९० सुमारें) असें आहे[४]. या बाडांत ब्रह्मोत्तरखंड (२०००), कार्तिकमाहात्म्य (२०००), राधामाधवविलास, व भारतभागवतांतील कांहीं आख्यानें एवढी कविता असून तिची भाषा

१. वि. का. राजवाडे : निरंजन पंढरपूरकर ( भा. इ. सं. मं. शके १८३२ ). व निरंजन कऱ्हाडकर ( भा. इ. सं. मं. शके १८३६ ).

२. 'महाराष्ट्र—सारस्वत' शके १८३६.

३. सदानंद (गो. का. चांदोरकर : भा. इ. सं. मं. इति. शके १८३५).

४. रामानंद ( शं. श्री. देव : भा. इ. सं. मं. प्रथम संमेलन वृत्त ).

नाथकालीन वळणाची आहे. नीलग्रीव आणि शिवदास हे गुरुशिष्यहि याच काळांत ग्रंथरचना करतांना आढळतात. त्या दोघांनीं मिळून लिहिलेल्या ओवीबद्ध वेताळपंचविशींत एकूण २५ कथा संग्रहित झाल्या असून त्यांचा रचनाकाल शके १५००-च्या आसपास यावो. शांतलिंगप्पा हा लिंगायत कविहि नाथांचा समकालीन असावा असें वाटतें. रामदास पंचायतनापैकीं जयरामस्वामी वडगांवकर यांचे गुरु कृष्णाप्पा व कृष्णाप्पाचे गुरु हे शांतलिंग. स्वतःचा उल्लेख ते शांत नीळकंठ असा करतात, त्यावरून त्यांच्या गुरूचें नांव नीळकंठ दिसतें. या शांतलिंगप्पांनीं कर्णहस्तकी या नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ रचिला असून त्यांत चन्नबसवेश्वरोक्ति म्हणजे लिंगायत पंथाचें तत्वज्ञान साररूपानें आलें आहे.[2]

या शतकांतील महानुभावीय ग्रंथकारांचा विचार करतां त्यांत रुक्मिणीस्वयंवराचा कर्ता संतोषमुनि कृष्णदास हा विशेष प्रमुख दिसतो. हा कवि पारमांडल्य आम्नायांतील असून त्याची परंपरा अशीः—नागदेवाचार्य-आनेराज व्यास—नागनाथमुनी—विरक्त—मल्यनाथ—भीष्माचार्य—बल्लाळमुनी --भिवबा—तुकेराज—भानोव्यास—संतोषमुनी कृष्णदास. शके १४७५—७६ त रचिलेल्या याच्या रुक्मिणीस्वयंवराचे अध्याय मूळांत २५ असून त्याची ओवीसंख्या ३२०५ आहे. पुढें शके १६४१ मध्यें कोणा पोषदाख्य गोपाळमुनीनें या काव्याचें शोधन करून त्यांत आणखी ५३५ ओव्यांची भर घातली व त्याची ओवीसंख्या ३७४० वर नेली. मूळ काव्य संतोषमुनी कृष्णदासानें भागवत व पद्मपुराण यांचें आधारें रचिलें असून त्याचा प्रारंभ गोदातीरीं कुंकुमठाणें येथें व समाप्ति सिन्नर येथील मिहमाचे मठींत पूर्ण झाली असें तो सांगतो. कृष्णदासानें मराठी भाषेची वकिली करतांना व्याकरणदृष्ट्या संस्कृत हा शब्द नपुंसकलिंगी व मराठी स्त्रीलिंगी असल्यानें मराठी थोर ठरून संस्कृत भाषेकडे लघुत्व येते अशा प्रकारचा चतुर कोटिक्रम केला आहे. असो. या शतकांत भिंगारकर बुवा महानुभाव यानें रचिलेली एक संस्कृत गीतार्थबोधिनी नांवाची गीताटीका उपलब्ध असून तिचा मराठी अनुवादहि कोणा समकालीनानें करून ठेवल्याचें कळतें. याच सुमारची आणखी एक गीताटीका प्रसिद्ध असून तिला 'गोपाळदासी' असें म्हणतात. ही टीका कवीश्वर आम्नायांतील पं. गोपाळमुनी दर्यापुरकर यांनीं रचिलेली असून ती गद्यांत आहे हें

---

१. वि. का. राजवाडे, ( भा. इ. सं. मं. इति. शके १८३६).

२. शांतलिंगकृत कर्णहस्तकी ( चांदोरकर, भाइसंमं. शके १८३७ ).

तिचें वैशिष्ट्य होय[1]. गोपाळ मुनी किंवा ' वादींद्र गोपाळदास ' हे चाहे व्यासाचे शिष्य असून वऱ्हाडांत दर्यापूर येथें त्यांच्या नांवाची गादी आहे. याच शतकांत दत्तराज मराठे नांवाच्या महानुभावानें पंथांतील सुप्रसिद्ध ' साती ग्रंथां'वरील आपली ' टीप ' तयार केली. ही टीप म्हणजे साती ग्रंथांतील कठिण शब्दांचा एक कोशच असून तो अकारविल्ह्यानें केलेला नाहीं. तर त्या त्या ग्रंथांत शब्द ज्या क्रमानें आले त्याच क्रमानें त्यांचा अर्थ टीपकारानें विशद केलेला आहे. या सुमारास कवीश्वर आम्नायांतील मुरारमल्ल नांवाच्या महानुभाव पंडितानें गीताभाषादि १२२ प्रमेयें रचिल्याचें श्री. देशपांडे सांगतात.[2] याच आम्नायांतील एक कवि कृष्णमुनि यानें ब्रह्मांडगोळक या ग्रंथाची रचना शके १४३२ ( कीं १४०३ ? ) मध्यें पूर्ण केली. कृष्णानें अर्जुनास अष्टादशाध्यायी गीता सांगूनहि त्याच्या ज्या कांहीं शंका उरल्या त्यांच्या निरसनार्थ कृष्णानें हा १९ वा अध्याय सांगितला, अशी कल्पना करून कृष्णमुनीनें प्रस्तुत ग्रंथ सजविला आहे. याच विषयावर पूर्वोल्लेखित गोपाळदास दर्यापूरकराचा ' निष्कलंकाध्याय ब्रह्मांडगोळक ' हा सुमारें अकराशें ओव्यांचा ग्रंथ उपलब्ध असून हा गोपाळदास मोठा उद्योगी असा संशोधक दिसतो. लक्ष्मीधरकृत मार्ग-प्रभाकर व महाराष्ट्र–काव्यदीपिका, दिवाकर कपाटेकृत मतिबंध आणि पं. भीष्माचार्यकृत गीतगोविंद टीका या ग्रंथांचें शोधन या वादींद्र गोपाळदासानें केल्याचें ठाऊक आहे. त्यानें आपल्या ग्रंथांत गीतेच्या १९ व्या अध्यायाची जी पूर्वपीठिका सांगितली आहे तिचा सारांश असाः—"मूळ निष्कलंकाध्याय ग्रंथ सव्वाशें ओव्यांचा पुरुषोत्तम मुनीनें केला. पुढें देवदासानें त्यांत दीडशें ओव्यांची भर घातली व त्याचें नांव ब्रह्मांडगोलक असें ठेविलें. त्यानंतर गोपाळदास दर्यापूरकरानें शोध करून ग्रंथ दोन टप्प्यांनीं वाढविला व त्याची ओवीसंख्या १११२ वर नेली ( नि. ब्र. ओवी १०९९ ते ११११ )". कृष्णमुनिकृत ब्रह्मांड-गोळक आणि दास श्रीगुरुकृत निष्कलंकाध्याय या दोन्ही ग्रंथांचा अंतर्भाव गोपाळदासाच्या उपर्युक्त ग्रंथांत झालेला आहे. महानुभाव पंडित एकाच विषयाची व ग्रंथाची पाठपुरवणी कशी करतात तें वरील इतिहास सांगतो. असो. या शतकांतील आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे भीष्माचार्य वाइंदेशकर यांनीं शके १४६० मध्यें संकलित केलेला ' निरुक्तशेष ' हा होय[3]. हा ग्रंथ म्हणजे वास्तविक 'लीळाचरित्रा'चे दहा-

१. प्रका० महंत दत्तराज ( लाहोर, इ. स. १९०० ).

२. परिचय : य. खु. देशपांडे (भा. इ. सं. मं. त्रैमासिक, १८–४ ).

द्वारा पाठ एकत्र करून त्यांतून निवडून काढलेल्या पांचशें लीळांचें विषयवारीनें केलेलें एक संकलन आहे. सुमारें १५०० लीळांचें ' लीळाचरित्रां'-तून या ५०० लीळा संकलित करण्यांत भीष्माचार्यांचा हेतु असा दिसतो, कीं केसोबास किंवा आनेराजबास यांनीं तयार केलेल्या चक्रधरोक्त सूत्रपाठास संबद्ध असणाऱ्या मूळ लीळा सुसंगतपणें क्रमवारीनें वाचतां याव्या. म्हणजे म्हाइंभटकृत लीळाचरित्रांतून सूत्रपाठ सिद्ध झाला व उलट सूत्रपाठास आधारभूत म्हणून हा निरुक्तशेष जन्मास आला. भीष्माचार्यांच्या या ग्रंथाची उपयुक्तता निर्विवाद आहे.

**अभ्यासाचीं साधनें:—**

वि. का. राजवाडे : निरंजन कऱ्हाडकर व निरंजन पंढरपूरकर (भा. इ. सं. मं. इति. शके १८३२ व १८३६ ).
य. खु. देशपांडे : महानुभावीय मराठी वाङ्मय, भाग, ४.
य. खु. देशपांडे : भीष्माचार्यकृत निरुक्तशेष ( माइसंमं. त्रै. १८-४ )
गो. का. चांदोरकर : सदानंद ( माइसंमं. इति. शके १८३५ ).
द. वा. पोतदार : श्रीधर-चरित्र ( प्रस्तावना पृ. २३ ते २६ ).



मुक्तेश्वराच्या चरित्रमंदिरांत चहूंकडे नकारघंटा वाजत आहे असा अभिप्राय सारस्वतकारांनीं दिल्यानंतर आज पांचपंचवीस वर्षांत बरेंच संशोधन झालें असूनहि त्याच्या चरित्राचा प्रश्न संपूर्णपणें सुटला आहे असें म्हणतां येत नाहीं. तथापि मुक्तेश्वराच्या चरित्रावर प्रकाश पाडणारीं जीं साधनें उपलब्ध झालीं आहेत त्यांचा विचार करणें अवश्य आहे.

कोडितकर अत्रे यांच्या दप्तरांतील टिपणवही आणि सरंजामे-जंत्री यांतील नोंदींवरून मुक्तेश्वराचा जन्म पैठणास शके १५३१-मध्यें झाला असें मत सारस्वतकारांनीं पंचवीस वर्षांपूर्वी दिलें. त्यास अगदीं अलीकडे श्री. दा. के. ओक[1] यांनीं पाठिंबा दिल्यानें या प्रश्नास चालना मिळाली. श्री. ओक यांना तंजावर येथें गोविंदबाळस्वामीच्या मठांत एकनाथ, रामदास व मुक्तेश्वर यांच्या चरित्रावर प्रकाश पाडणारें एक हस्तलिखित टिपण मिळालें. त्याच्या आधारें रामदास व एकनाथ यांच्यांत कांहीं वांशिक स्वरूपाचें नातें जोडून मुक्तेश्वराचा कालनिर्णय करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. श्री. ओक यांनीं एकनाथ आणि रामदास यांच्या संबंधाविषयीं जीं मतें व्यक्त केलीं आहेत तीं येथें चर्च्य नाहींत. तंजावर येथील हस्तलिखितावरून त्यांनीं अनुमानिलेला मुक्तेश्वराचा जन्मकाल प्रो. पंगु यांना मान्य नसून त्यांनीं तो काल आणखी मागें नेण्याचा प्रयत्न केला आहे. मुक्तेश्वरापासून चौथे पुरुष मुक्तेश्वरबुवा गवई यांना कोल्हापूरच्या छत्रपति महाराजांकडून तेरवाड गांव इनाम मिळाल्याची पहिली सनद शके १६४९ मधील असून दुसरी शके १६८१—तील आहे. यावरून मुक्तेश्वरबुवा गवई यांची आयुर्मर्यादा साठ-सत्तर वर्षांची कल्पून, त्यावरून मागें जात जात मुक्तेश्वराचा जन्मकाल शके १४९६ असा प्रो. पंगु[2] मानतात. श्री. ओक यांनीं पुढें आणलेल्या रंगनाथस्वामी निगडीकर यांच्या संतमालिकेचा[3] पुरावा प्रो. पंगु यांनीं त्यांच्यावरच उलटविला असून या संतमालिकेंतील उल्लेख मुक्तेश्वराचा जन्मकाल शके १४९६ होय या स्वमतास पोषक आहे असें प्रो. पंगु यांचें म्हणणें आहे. प्रो. पंगु यांनीं भाषेच्या प्रमाणाचाहि विचार केलेला असून मुक्तेश्वराची भाषा ही शिवपूर्वकालीन अर्थात् एकनाथी वळणास जवळ असणारी आहे असें

---

१. मुक्तेश्वर—विराटपर्व, ( काव्यसंग्रह, द्वितीयावृत्तीची प्रस्तावना ).

२. प्राचीन मराठी कविपंचक, पृ. १८ ते २५.

३. महाराष्ट्रकवि स्फुटसंग्रह, भाग १ ( संपा. वि. ल. भावे ).

ते मानतात. शिवकालीन कवींत आढळणारे फारसी शब्दांचें प्राचुर्य मुक्तेश्वरांत नाहीं. उलट दळवाडें, नावेक, सुखाडणें, आराणुक, वरिपडा इत्यादि प्राचीन शब्द, पुरुखवेख, हरिख यासारख्या शब्दांतून दिसणारी ष > ख ही प्रक्रिया, सगुणाथिला, बळाथिला यासारखीं भूतकृदन्तें, नवजे यासारखा शब्दप्रयोग, इत्यादि शिवकालांत लोप पावलेलीं भाषारूपें ज्या अर्थी मुक्तेश्वरांत आढळतात, त्याअर्थी तो शिवपूर्वकालीन कवि असला पाहिजे असें प्रो. पंगु म्हणतात. कै. वि. का. राजवाडे यांनीं मुक्तेश्वर-कालाचा विचार केलेला असून त्यांच्याहि मताचा आधार प्रो. पंगु घेतात. मुक्तेश्वर आपल्या आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत व सभापर्वाच्या आठव्या अध्यायांत 'क्रूर फिरंग्यांचा' व 'दंडेल्या इंग्रजांचा' उल्लेख करतो. कै. राजवाडे यांच्या मतें शके १५८२-च्या सुमारास इंग्रज हे शके १५५०–६० च्या मानानें अधिक सभ्यपणा व माणुसकी दाखवूं लागले होते. अर्थात् 'दंडेल' वगैरे विशेषणांना इंग्रज पात्र ठरण्याचे कालीं म्हणजे शके १५८२-च्या पूर्वी मुक्तेश्वरी भारताची रचना झाली असावी असें कै. राजवाडे मानतात. तसेंच मुक्तेश्वर जसा इंग्रज, पोर्तुगीज, डच इत्यादि परकीयांचा उल्लेख करतो तसा तो फ्रेंचांचा करीत नाहीं. हिंदुस्थानांत फ्रेंचांची पहिली वखार सुरतेस शके १५९०-मध्यें स्थापन झाली, त्याअर्थी फ्रेंचांच्या आगमनापूर्वी म्हणजे शके १५९० च्या पूर्वी मुक्तेश्वरी भारताची रचना झाली असली पाहिजे. वरील दोन प्रमाणांनीं मुक्तेश्वरी भारताचा काल कै. राजवाडे यांनीं शके १५७२ हा ठरविला असून कै. पांगारकर[1] यांचीहि त्यास मान्यता आहे. प्रो. पंगु यांना हा काल मान्य नसून मुक्तेश्वर शके १४९६-च्या सुमारास जन्मले व शके १५६७-च्या सुमारास मरण पावले असा कालनिर्णय ते करतात. मुक्तेश्वराच्या ग्रंथांत स्वराज्योन्मुख महाराष्ट्राचें चित्र नसून मुसलमानी सत्तेनें गांजलेल्या महाराष्ट्राच्या मनःस्थितीचें प्रति-बिंब उमटलें आहे हें कै. राजवाडे यांचें मत प्रो. पंगु यांना मान्य दिसतें.

तात्पर्य, कै. भावे यांनीं मांडिलेल्या मतास विरोध करून प्रो. पंगु मुक्तेश्वरास एकनाथोत्तर व शिवपूर्वकालीन ठरवीत आहेत. प्रो. पंगु यांचें मत विचारांत घेण्यासारखें असलें तरी निर्णायक नाहीं. कारण, एकतर ते केवळ अनुमानावर आधारलेलें आहे; आणि कोल्हापुरकरांनीं मुक्ते-श्वराच्या वंशजास दिलेल्या सनदा अस्सल असल्या तरी मुक्तेश्वराच्या काल-निर्णयाच्या दृष्टीनें एक साधन म्हणून त्यांची मातब्बरी विशेष नाहीं. प्रत्येक पिढी पस्तीस वर्षांची मानून मागें जात जात शके १४९६ हा

---

१. मुक्तेश्वर—चरित्र व काव्यविवेचन. पृ. ३१.

मुक्तेश्वराचा जन्मकाल होय असें प्रो. पंगु त्या सनदांवरून मानतात. परंतु दोन पिढ्यांतील अंतर कै. राजवाडे यांच्या मताप्रमाणें थोडें कमी मानल्यास हिशेब बदलतो व मुक्तेश्वर हा शिवकालीन ठरूं पाहतो. तो शिवकालीन असावा असें म्हणण्यास दुसरा एक आधार म्हणजे त्याचा मावसभाऊ व तंजावरस्थ महाकवि माधवस्वामी याचा होय. हा कवि फारसा ज्ञात नसला तरी त्याची अति प्रचंड अशी ग्रंथ रचना तंजावर येथील सरस्वति-महालांत उपलब्ध असून त्याचा ग्रंथरचनेचा उद्योग शके १६१० पासून पुढें पांच-पंचवीस वर्षे चालूं असलेला दिसतो. मुक्तेश्वर आणि माधवस्वामी हे दोघे सख्खे मावसभाऊ असतां त्यांच्यांत साठ-सत्तर वर्षांचें अंतर पडणें संभवनीय नाहीं, आणि माधवस्वामीनें स्वतःच आपला काल दिलेला असल्यानें त्यास मागें ओढणेंहि शक्य नाहीं. अर्थात् मुक्तेश्वरास प्रो. पंगु नेतात तितका मागें न नेतां कै. भावे यांच्या मताप्रमाणें तो आहे तेथेंच त्यास ठेवावा हें योग्य. वरील सर्व परिस्थितीचा विचार करतां कै. भावे यांनीं केलेला मुक्तेश्वराचा कालनिर्णय बदलण्याची आवश्यकता अजून तरी वाटत नाहीं.

वरील मजकूर लिहिल्यानंतर सुप्रसिद्ध संशोधक श्री. अ. का. प्रियोळकर यांचा 'श्रीमुक्तेश्वराचा शोध' हा निबंध आमचे हातीं आला. त्याचें प्रकाशन होण्यापूर्वीच तो उपलब्ध करून दिल्याबद्दल आम्ही श्री. प्रियोळकर यांचे ऋणी आहों. प्रस्तुत निबंधांत त्यांनीं मुक्तेश्वराविषयीं कांहीं मूलगामी संशोधन केलें असून आम्ही तें पुढें साररूपानें देत आहों. जिज्ञासूंनीं श्री. प्रियोळकर-संपादित मुक्तेश्वरकृत आदिपर्वाची चिकित्सक आवृत्ति मूळांतून पहावी. लीला-विश्वंभर हीं मुक्तेश्वराचीं मातापितरें होत व जो चिंतामणि तोच विश्वंभर होय हें रूढ मत श्री. प्रियोळकर यांनीं सप्रमाण खोडून काढलें असून लीलाविश्वंभर या नांवानें कोणतीहि मानवी व्यक्ति सूचित होत नसून मुक्तेश्वराचें उपास्यदैवत जें श्रीदत्त त्याच्या वैकल्पिक नांवाचा हा उल्लेख होय, याप्रमाणें स्वमत मांडलें आहे. ज्या ओवीनें आजवर अनेकांना घोटाळ्यांत पाडलें त्या मुक्तेश्वरकृत सभापर्वातील ओवीचा मूळ पाठ[1] श्री. प्रियोळकर यांना उपलब्ध झाला असून तो या कामीं निर्णायक आहे. सभापर्व आणि वनपर्व यांतहि मुक्तेश्वर स्वतःस 'लीलाविश्वंभरानुग्रहीत' असेंच म्हणवितो. दासोपंत कविहि (श. १४७३-१५३७) श्रीदत्तात्रेयास लीलाविश्वंभर या नावांनें अनेक ठिकाणीं संबोधितो. टेंबेस्वामी (वासुदेवानंद सरस्वतीस्वामी) यांनी श्री दत्तात्रेयाच्या सहाव्या अवतारांत त्याचें नांव लीलाविश्वंभर होतें, असें

१. 'तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभरानुग्रहीत ।'

म्हटलें आहे. हीं व इतर कांहीं प्रमाणें देऊन 'लीलाविश्वंभर' हे मुक्तेश्वराचे मातापिते किंवा गुरु नसून तें त्याचें उपास्य दैवत आहे हें श्री. प्रियोळकर यांनीं सिद्ध केलें आहे. मुक्तेश्वराच्या नांवावरहि त्यांनीं कांहीं प्रकाश टाकला असून मुद्गल हें त्याचें व्यक्तिनाम ( कुलनाम नव्हे ) च मुक्तेश्वर हें त्यानें काव्यासाठीं धारण केलेलें मुद्रा-नाम होय असें श्री. प्रियोळकर यांचें म्हणणें आहे. मुक्तेश्वर हें नांव धारण करण्यापूर्वी तो स्वतःचा उल्लेख 'चिंतामणिसुत मुद्गल' या आपल्या मूळच्या नांवानें करीत असल्याचा पुरावा श्री. प्रियोळकर यांना त्याच्या कांहीं स्फुट कवनांच्या हस्तलिखित प्रतींत मिळाला आहे. मुक्तेश्वर हें नांव त्याच्या उपास्य दैवताचें म्हणजे श्रीदत्तात्रेयाचें असून तें त्यानें महाभारत रचतांना धारण केलें असें त्याच्या आदिपर्वांतील पुढील ओवीवरून दिसतें. "मुक्तेश्वर जो मी अवधूत। माझेनि नामें मुद्रांकित। कथा विस्तारीं भारत। महाराष्ट्रपदबंधीं ॥४४॥" यापुढें सर्वत्र हा मुक्तेश्वर मुक्तेश्वराच्या प्रसादानें काव्यरचना करीत आहे असें तो म्हणतो. मुक्तेश्वराचा हा मुक्तेश्वर शिव-स्वरूप असून अशा प्रकारच्या मुक्तेश्वराचीं देवळें पैठण-वऱ्हाडकडे असल्याचें कळतें. द्रविड देशांत या मुक्तेश्वराचीं अनेक देवळें असून त्यांचाच उल्लेख नमनार्थ म्हणून मुक्तेश्वर कवि प्रामुख्यानें करतो ही गोष्ट त्याचें वास्तव्य कर्नाटकांत असावें या रूढ समजुतीस बळकटी आणते असेंहि श्री. प्रियोळकर यांचें म्हणणें आहे. एकूण, त्यांच्या निबंधांतील संशोधन मूल-गामी व सप्रमाण असून त्यायोगें मुक्तेश्वर कवीविषयीं आज बहुतकाळ रूढ असणारे संकेत बदलावे लागतील असें दिसतें.

**अभ्यासाचीं साधनें:—**

- वि. का. राजवाडे : मुक्तेश्वर ( संकीर्ण लेखसंग्रह, पृ. १–१४ ).
- वा. अ. भिडे : मुक्तेश्वर.
- ल. रा. पांगारकर : कविवर्य मुक्तेश्वर.
- चिं. वि. वैद्य : निबंध आणि भाषणें ( मुक्तेश्वराचें वनपर्व ).
- वा. ब. पटवर्धन : मुक्तेश्वर (इंग्रजींत), फर्ग्युसन् कॉ.मासिक १४-४.
- द. सी. पंगु : प्राचीन मराठी कविपंचक ( मुक्तेश्वर ).
- वि. म. कुलकर्णी : मुक्तेश्वरकृत सभापर्व ( प्रस्तावना ).
- पां. जि. सबनीस : कविवर्य मुक्तेश्वर (" पांगारकर स्मारक ग्रंथ").
- ना. गो. नांदापूरकर : जनाबाई आणि मुक्तेश्वर (प्रो.पोतदार स्मारक ग्रंथ).
- अ. का. प्रियोळकर : मुक्तेश्वराचा शोध ( आदिपर्व–प्रस्तावना ).



रमावल्लभदासांचा काळ कै. पांगारकर शके १५१० ते ७० असा मानतात. परंतु सांप्रदायिक मतें ह्याच काळ शके १५३१ ते ९० असा आहे.[1] रमावल्लभदासांनीं आपल्या नांवाचें स्पष्टीकरण 'वाक्यवृत्ति' ग्रंथांत पुढीलप्रमाणें केलेलें आढळतें—"दास देहास नाम स्वभावीं। वल्लभ अंतरींचा गोसावी। रमा हे स्फूर्तीच प्रगट दावी। रमावल्लभदास म्हणे ॥" गुरूपदेशानंतर कांहीं काळ गोदातटीं राहून आपला बालमित्र कृष्ण गोसावी यासह रमावल्लभदास दाभोळ, रत्नागिरी, सावंतवाडी, गोंवा या मार्गानें कानडा प्रांतांत गेले व तेथें कृष्णभक्तीचा प्रसार त्यांनीं केला. सोलापूरच्या राळेरासकरांपैकीं एक कवि गोकर्ण-कारवारच्या समुद्रपट्टींत प्रसिद्धीस यावा हा योगायोग खराच. त्यांच्या तिकडील शिष्या आवडाबाई यांचा मठ कै. भावे म्हणतात त्याप्रमाणें चंदावरास नसून मल्लापूर येथें आहे व तेथें कृष्णजयंतीचा सोहळा प्रतिवर्षीं होत असतो. ही आवडाबाई मल्लापूरचे नारायणअप्पा कुलकर्णी या सारस्वत ब्राह्मणाची बायको. एक दिवस समुद्रस्नान करतांना तिचें पाण्यांत पडलेलें कर्णफूल रमावल्लभदासांनीं तिला परत मिळवून दिलें. यावरून हरवलेली वस्तु सांपडली म्हणजे 'आवडाबाईचें कर्णफूल तें' अशी म्हणच त्या प्रांतीं पडली आहे. रमावल्लभदासांनीं या आवडाबाईस अनुलक्षून लिहिलेलीं अकरा ओवीबद्ध पत्रें मिळून त्यांचें 'प्रबोधचंद्रिका' हें प्रकरण होतें. असो. या आवडीच्या मठाशिवाय शिराळी येथील राघवदास मठ, हेम्माडी येथील जोगनाडी मठ, हत्यंगडी येथील गोसावी मठ हेहि रमावल्लभदासांच्या ह्यातीपासून कानडा प्रांतांत चालू आहेत. रमावल्लभदासांची पुढील ग्रंथरचना प्रसिद्ध आहे:—बृहद्वाक्यवृत्ति टीका[1], दशकनिर्धार (शके १५५५); गुरुवाळि (शके १५५८); गुरुमहिमा; प्रबोधचंद्रिका; संतनामावळी; वैष्णवगति; चमत्कारी टीका (शके १५५०); पदपदांतरें[2]. याशिवाय मल्लापूर येथील आवडी—मठांत त्यांची कांहीं अप्रकाशित कविता आहे ती निराळीच. रमावल्लभदासांच्या शिष्यांपैकीं राघवदासानें 'बिरुदावळी' या ग्रंथांत आपल्या गुरूचें चरित्र सविस्तरपणें रंगविलें असून या चरित्राचा एकच अध्याय सध्यां उपलब्ध आहे[3].

१. श्री. आनंदघनराम : चमत्कारी टीका (प्रस्तावना, पृ. ३).

२. प्रकाशक : श्रीरामतत्त्वप्रकाश छापखाना, बेळगांव.

३. संपा. मु. गो. उभयकर, हुबळी.

या राघवदासांची कांहीं रचना कानडी भाषेंतहि आहे. याशिवाय रमा-वल्लभदासांचे बालमित्र कृष्ण गोसावी, प्रशिष्य जोगनाणी, पुत्र यादवबुवा आणि नातु त्र्यंबकबुवा यांचीहि कांहीं किरकोळ कविता उपलब्ध आहे. असो. शिवकल्याणांची माहिती सारस्वतकारांनीं दिलीच आहे. एक लाख ओव्यांच्या त्यांच्या दशमस्कंध टीकेपैकीं आज श्रीकृष्णजन्म पंचाध्यायी, रासपंचाध्यायी, ब्रह्मस्तुति व वेदस्तुति एवढीं चारच प्रकरणें काय तीं उपलब्ध असून त्यांची ओवीसंख्या १२,७५८ इतकी भरते. म्हणजे संपूर्ण टीके-पैकीं एक अष्टमांशच काय ती उपलब्ध आहे. वरील चार प्रकरणांचे संपादक मात्र अकोल्यांतील रामदासी मठांत समग्र दशमटीकेची प्रत पाहिल्याचें सांगतात.[1] शिवकल्याणकृत अमृतानुभवावरील टीकेचें नांव नित्यानंदैक्यदीपिका असें आहे; कै. भावे म्हणतात तसें नित्यानंद-दीपिका नाहीं. नित्यानंद हे शिवकल्याणांचे गुरु होत. पूर्वी गोपाळ याज्ञवल्कीस ऐकविलेलें अमृतानुभवावरील व्याख्यानच शिवकल्याणांनीं प्रस्तुत टीकेत ग्रंथनिविष्ट करून टाकलें आहे. श्रवणपठणास सुलभ म्हणून ही ओवीबद्ध टीका आपण पूर्वी तोंडानें सांगितलेल्या व्याख्यानावरून तयार केली असें स्वतः ग्रंथकार सांगतो, तेव्हां तें खरें असणार ( नित्या. १०X३९० ). ही टीका शिवकल्याणांनीं देवगिरीस आरंभिली खरी; पण मध्यंतरीं कांहीं कारणानें ही शब्दओवणी तशीच थांबली व मग पुढें त्यांनीं पंढरपुरास ती संपविली असें दिसतें. ज्ञानेश्वरांच्या मूळ ८०० ओव्यांवर शिवकल्याणांनीं ६४१० म्हणजे सुमारें आठपट ओव्या रचिल्या आहेत. या टीकेचा एक विशेष हा, कीं तींत मूळ ग्रंथाचें नांव सर्वत्र अनुभवामृत असें आढळतें. याचा अर्थ ज्ञानेश्वरांचा हा ग्रंथ १६-व्या शतकापर्यंत तरी अनुभवामृत याच नांवानें ओळखला जात असे. पुढें केव्हां तरी त्याचा अमृतानुभव झाला. असो. शिवकल्याणाच्या या टीकेचें वैशिष्ट्य हें, कीं जुनी परंपरा मोडून एका प्राकृत ग्रंथावर व्याख्यान रचण्याचा प्रयोग करून एक नवीन परंपरा ते उभी करूं पाहत होते. दुर्दैवानें ती मूळ धरूं शकली नाहीं. लोलिंबराजाचें चरित्र भारतवर्षाच्या अर्वाचीन कोशांत आलें असून त्यावरून जुन्नरच्या दिवाकरभट्टाचा हा स्वच्छंदी चिरंजीव पुढें शके १५५२-त सिद्ध होऊन लोकादरपात्र झाला व त्यानें शके १५५५-त वैद्यजीवनादि ग्रंथ रचिले अशी माहिती मिळते.[2]

१६-व्या शतकांतील आणखी कांहीं कवींची माहिती महाराष्ट्र-

---

१. रासपंचाध्यायी, प्रस्तावना, पृ. ७ ( संपा० ग. ब. मोडक अकोला).

२. लोलिंबराज ( द. बा. पोतदार, भा. इ. सं. मं. शके १८३७ ), म. सा. ११९

सारस्वताच्या द्वितीय आवृत्तींत आली होती (पृ.१९५ ते २००). तृतीय व अर्थात् चतुर्थ आवृत्तींत ती नसल्यानें मूळांत कांहीं भर घालून ती येथें उतरवून घेणें जरूर आहे. या कवींत सारस्वतकारांनीं धामणगांवचे बोधलेबुवा, निंबराज दैठणकर, मोरया गोसावी चिंचवडकर, गणेशनाथ, सेना न्हावी, शेख महंमद, शेख सुलताना, शेख फरीद, शेख सय्यद वगैरे कवींचा उल्लेख केला असून त्यांतील कांहींची माहितीहि दिलेली आहे. पैकीं सेना न्हावी हे १३-व्या शतकांतील कवि असल्यानें त्याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. **माणकोजी बोधलेबुवा** या नांवानें प्रसिद्ध असणारा कवि हा मूळचा बालेघाटांतील धामणगांवचा पाटील. याच्या बायकोचें नांव ममताई, मुलाचें यमाजी व सुनेचें भागीरथी. आडनांव जगताप. हें सर्व कुटुंब पंढरीची वारी करी व अभंग म्हणे. या बोधलेबुवांचे **जोतिराम** व **गोपाळनाथ** या नांवाचे दोन शिष्य होते व त्यांचीहि कांहीं रचना आढळते. पैकीं जोतिरामानें बोधलेबुवांवर एक कीर्तिकटाव लिहिला असून त्यांत शेवटीं तो म्हणतो[१]—

‘ धन्य धन्य बहु धन्य बोधला अवतार सद्गुरु स्वामी ।
षड्गुण ऐश्वर्याचा टाळधरी जोतिराम तो मी मी ॥ १३ ॥’

**निंबराज** ( समाधि शके १६०० ) हे दैठणचे राहणारे म्हणून दैठणकर. यांचे वडील मुरारपंत देशपांडे यांनीं पुत्रप्राप्तीसाठीं निंबाचा पाला खाऊन तप केलें म्हणून यांचें नांव निंबाजी ठेवलें व तेच पुढें निंबराज झाले. हे वसिष्ठ गोत्री देशस्थ ब्राह्मण. यांनीं गंगेच्या कावडी रामेश्वरावर चौदा वेळां नेऊन वाहिल्या. एकनाथशिष्य नरहरि हा यांचा गुरु. निंबराजांनीं ज्ञानबोध, जपमाळ वगैरे प्रकरणें रचिलीं असून शिवाय कांहीं पदेंहि लिहिलीं आहेत. पैकीं ‘जपमाळे’ तील एकेक मणि म्हणजे एकेका संताचें गुणगान् असून शेवटीं समारोपांत कांहीं संत इक्षुदंडाप्रमाणें ‘ कांडीं रसाळ व तोंडीं फिके ’ तर कांहीं नारळाप्रमाणें ‘आपुली गोडी आपण राखणारे’ असतात असें सांगून कवीनें ‘आंतबाहेर अवघें गोडें । निंबनाथाऐसें थोडे’ याप्रमाणें स्वतःविषयीं म्हटलें आहे. निंबराजापेक्षां **मोरया गोसाव्यांची** कीर्ति महाराष्ट्रांत फार आहे. यांचे वडील वामनभट हे मूळचे कर्नाटकांतील शालि या गांवचे राहणारे असून तेथून पुणें प्रांतीं कांहीं योगायोगानें आले व शालिग्रामचे राहणारे म्हणून त्यांना शाळिग्राम हें आडनांव मिळालें. तुकोबा गोसावी व मोरया गोसावी हे समकालीन होत, असें त्या वेळच्या पत्रव्यवहार सांगतो. मोरया गोसाव्यांचे चिरंजीव चिंतामणि गोसावी

---

१. वि. का. राजवाडे ( भा. इ. सं. मं. इति शके १८३७, पृ. १३ ).

यांना तुकोबांनीं देव ही पदवी दिली व तेव्हांपासून हा वंश चिंचवडचे देव या नांवानें ओळखला जाऊं लागला. मोरया गोसाव्यांच वडील वामनभट हे गणेशोपासक होते व तीच उपासना पुढें मोरयांत उतरली. किंबहुना मोरया हें नांवहि गणेशकृपेचें द्योतक आहे. मोरया गोसाव्यांचा जन्म मोरगांवास झाला, परंतु त्यांनीं वसति मात्र चिंचवडासच केली. यांचे वंशांत सात औरस पुरुष ओळीनें ब्रह्मनिष्ठ निघाले. चिंचवडास पवनातीरीं या सातहि पुरुषांच्या समाधि शेजारीं शेजारीं आहेत. मुख्य समाधिमंदिर मोरया गोसाव्यांचें असून तें शके १५८० मध्यें बांधण्यांत आलें. मोरयांची कविता विशेष नाहीं. कांहीं गोड पदें व आरत्या आहेत, आणि त्यांतून त्यांची पारमार्थिक तळमळहि उमटली आहे. परंतु स्वतः फारसें कवित्व केलें नसलें तरी अनेक गणेशभक्त कवींचे ते स्फूर्तिस्थान झाले असणार यांत शंका नाहीं. मोरया गोसावी शके १५५७-मध्यें समाधिस्थ झाले. एकनाथांचे शिष्य त्र्यंबक व त्र्यंबकसुत हेहि याच काळांतील असून त्यांची रचना बऱ्यापैकीं आहे. याशिवाय संताजी जगनाडे यांच्या वहींत विठ्ठलदास, धोंगडा, शिवदास कुंडेश, पणाभी विश्वनाथ वगैरे विठ्ठलभक्तांची कविता आढळते; परंतु त्यांची माहिती मात्र मिळत नाहीं. हिंदूप्रमाणें या काळांत अविंधांतहि अनेकजण विठ्ठलभक्ति करूं लागले होते व त्यांपैकीं कांहींनीं मराठी भाषेंत रचनाहि केली आहे. त्यांत शेख महंमदाची रचना विशेष भरदार असून विविधहि आहे. हा अहमदनगर जिल्ह्यांतील श्रीगोंदें किंवा चांभारगोंदें येथील राहणारा. घरची वृत्ति मुलाण्याची. एक दिवस मुलाण्याचें काम करतांना बकऱ्याची तडफड बघून शेख महमदास विरक्ति उपजली व तें काम सोडून देऊन त्यानें पंढरीची वारी धरली. याचे पवनविजय, निष्कलंक-प्रबोध, योगसंग्राम व ज्ञानसागर असे चार ग्रंथ असून शिवाय कांहीं पदें व अभंगहि आहेत. या सर्वांत योगसंग्राम हा ग्रंथ मोठा असून (ओवी-संख्या २५०० ) तो शके १५६७-त रचून पूर्ण झाला. शेख महंमदाच्या रचनेची थोडी कल्पना यावी म्हणून त्याचें एक कवन पुढें देतों.

ऐसें केलें या गोपाळें । नाहीं सोवळें ओवळें ।।
फणसा अंगें करड कांटे । आंत साखरेचे गोटे ।।...
मधमाशांची घोंगाणी । आंत अमृताची खाणी ।।
शेख महंमद विलासी । झाला हरिभक्तीचा रहिवासी ।।

शेखमहंमदाच्या गुरूचें नांव चांद बोधले. परंतु त्याचा उल्लेख विशेष कोठें आढळत नाहीं. शेख महंमदाच्या रेणुका तेलीण या नांवाच्या एका

शिष्येनें मात्र कांहीं अभंगरचना केल्याचें कळतें.

या शतकाच्या अखेरी अखेरीस आणखी एका प्रकारची ग्रंथरचना होत असावी असें मानण्यास जागा आहे. मागील दोनतीन शतकांतील मुसलमानांच्या राजवटीमुळें सर्व राजकीय व्यवहार फारसीमय होऊन गेलेला पाहून शिवाजीमहाराजांनीं तो स्वभाषेंत व्हावा या हेतूनें राजव्यवहार-कोश करवून घेतल्याचें आपणास ठाऊकच आहे. याच हेतूनें त्यांनीं शके १५९६-मध्यें राज्यारोहणप्रसंगीं बाळाजी आवजी चिटणिसांच्या विचारें एक 'लेखनप्रशस्ति'हि तयार केली[1]. या ग्रंथाच्या प्रस्तावांत लेखक म्हणतो, "मुसलमानांच्या पूर्वीचे शिलशिले होते ते पाहून मुसलमानांच्या मायन्यांतून घेण्यासारखें असेल तें घेऊन ही नवीन लेखनप्रशस्ति तयार केली आहे." पुढें मुख्य भागांत हेमाडपंती निर्बंध, रकाने पाडण्याच्या रीती, रेघा काढण्याचें यंत्र म्ह. लेखणी व द्रव्य म्ह. शाई यांची कृति, कांहीं मायने, इत्यादि माहिती आली आहे.

आनंद संप्रदायांतील पहिल्या पहिल्या कवींची थोडीफार माहिती सारस्वतकारांनीं पुढें दासपंचायतनावरील प्रकरणांत दिली ती वास्तविक या ठिकाणीं द्यावयास पाहिजे. कारण सहजानंद व पूर्णानंद हे या परंपरेंतील पहिले कवि १५–१६ व्या शतकांतील आहेत. या आनंद संप्रदायाविषयीं 'सहज पूर्ण निजरंगीं रंगला' असा एक सूचक चरण प्रसिद्ध असून त्यांत अनुक्रमें सहजानंद, पूर्णानंद, निजानंद व रंगनाथ निगडीकर या चार पिढ्यांतील सत्पुरुषांचीं नांवें गुंफिलीं आहेत. पैकीं रंगनाथ निगडीकर हे दासपंचायत-नांतील असल्यानें त्यांचा विचार पुढें व्हावा हें बरोबरच आहे. परंतु सहजानंद व पूर्णानंद हे कवि, एकनाथ–तुकारामांचे समकालीन आहेत. पूर्णानंद हे सहजानंदांचे शिष्य, शिवरामस्वामींचे गुरु व रंगनाथस्वामींचे परमगुरु होत. या गुरुशिष्यांच्या ग्रंथांचे उल्लेख महाराष्ट्र सारस्वतांत आलेच आहेत (पृ. ४३८). सारस्वतांत अनुल्लेखित असा आणखी एक ग्रंथ सहजानंदाच्या नांवावर श्री. चांदोरकर यांना सासवड येथील सोपानमठांत अपूर्णावस्थेंत मिळाला. या ग्रंथाचें नांव योगवासिष्ठ टीका असें असून त्याचें १० वें प्रकरण उपलब्ध झालें आहे त्यावरून तो शके १५१४-मध्यें रचिला गेला असें दिसतें. सहजानंदाचा दुसरा एक शिष्य अच्युताश्रम याचा वैरागर या नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ श्री. शंकरराव देव यांना आपचंद मठांत अपूर्णावस्थेंत मिळाला असून गुरुपरंपरेवरून पाहतां हा कविहि आनंद-

---

१. परिचय–वि. का. राजवाडे (भा. इ. सं. मं. इति. शके १८३२).

संप्रदायीच दिसतो.[1] सहजानंदाचा गुरु जसा ब्रह्मानंद त्याचप्रमाणें त्याचा बंधु आणि पुत्र हेहि ब्रह्मानंदच होते. पैकीं सहजानंदाचा शिष्य ब्रह्मानंद याच्या नांवावर प्रणवविवरण व ब्रह्मांडविवरण असे दोन ग्रंथ तंजावर येथील सरस्वति-महालांत आढळतात.[2] म्हणजे पूर्णानंद, अच्युताश्रम व ब्रह्मानंद अशा तीन सहजानंदशिष्यांची ओळख आपणांस झाली.

संशोधनान्तीं उपलब्ध झालेल्या १६-व्या शतकांतील कवींत नारायणांकित माधवदास हा एक असून त्यानें आपली योगवासिष्ठावरील टीका शके १५१४-मध्यें पुरी केली असें दिसतें. हा कवि विदर्भदेशीय असून पैठणच्या कोणा नारायणस्वामींचा शिष्य होता असेंहि कळतें[3]. शके १५६७-मध्यें रचना करणाऱ्या एका राम कवीचा शोध कै. राजवाडे यांस लागला असून त्याचा प्रदोषव्रतमाहात्म्य हा साडेतीन हजार ओव्यांचा ग्रंथ काव्यदृष्ट्या उत्तम असल्याचें ते सांगतात. हा रामकवि आपल्या बापाचें नांव नृसिंह व आजाचें गोपीनाथ असें देतो. वैकार वंशांतील या कपिल गोत्री कवीची गुरुपरंपरा सिद्धानंद–बालक–माधवदास याप्रमाणें आहे[4]. चांदोरकरकृत कविकाव्यसूचींत रामकवीचा उल्लेख आढळतो. ( पृ. ८९ ). विप्रनारायण हे कविहि याच काळांत ग्रंथरचना करतांना दिसतात. त्यांच्या 'अश्वमेधाख्यान' या ओवीबद्ध ग्रंथाचा ( रचना शके १५८२ ) परिचय प्रो. पोतदार यांनीं करून दिलेला असून[5] त्यावरून पाहतां संतकविकाव्यसूचिकारांनीं पृ. ५७ व पृ. १३१ यांवर उल्लेखिलेले नारायण हेच असावे असें वाटतें. परंतु 'सूचि'कार त्यांना एकदां विश्वनाथशिष्य तर एकदां निरंजनशिष्य म्हणतात हें कसें ! सुमारें साडेसहा हजार ओव्यांचा वरील ग्रंथ या नारायण विप्रानें खानदेशांत तापीतीरीं हातोडें या गांवीं रचून पूर्ण केला असून त्यांत त्यानें आपली वंशावळ दादाजी नागनाथ–गोपजी दामोदर–नारायण याप्रमाणें दिली आहे. हा ग्रंथ आपण मूळ संस्कृतास अगदीं धरून लिहिला असें हा म्हणत असून मूळांत साधे 'भोजन केलें' एवढेच शब्द असतांना त्यावर वर्णनाचा पसारा घालणाऱ्या कवीश्वरांना त्यानें बोल लाविला आहे. याशिवाय त्याच्या नांवावर ज्ञानसागर, शिवमहिम्नस्तोत्र इत्यादि ग्रंथ आढळतात. या शतकाचे अखेरी अखेरीस ग्रंथरचना

---

१. अच्युताश्रम ( भा. इ. सं. मं. इति. शके १८३५).
२. Catalogue of Marathi MSS., Nos. 20, 22.
३. माधवदास ( पां. न. पटवर्धन, भाइसंमं. इति. शके १८३६ ).
४. रामकवि ( वि. का. राजवाडे, भाइसंमं. इति. शके १८३६ ).
५. विप्र नारायण ( भाइसंमं. त्रैमासिक, १४–१ ).

करणारांत शिवसुत मुचकुंद, तुका सुंदरदास, नागेश वेडिया, शामराज, इत्यादि कवि येतात. पैकीं मुचकुंदकृत श्रीभार्गवचरित्र या पांचसहा हजार ओव्यांच्या ग्रंथाचा परिचय श्री. सं. श्री. देव यांनीं करून दिलेला असून[1] त्यावरून हा कवि शके १६०० च्या सुमाराचा दिसतो. परशरामावताराचा हेतु सांगतांना तो साधुजनांचें संरक्षण, दुष्टांचें दंडन व धर्मांचें पालन या गोष्टीवर भर देतो हें विशेष होय. याच सुमारास म्हणजे शके १५९९-मध्यें रचिलेला नासिकेताख्यान हा ग्रंथ छापून निघाला असून[2], त्याचा कर्ता तुका सुंदरदास (श्यामसुंदर भारती याचा शिष्य ) याच्या वाणीवर ज्ञानेश्वरीचा परिणाम स्पष्ट दिसतो. या ग्रंथाचे एकूण अध्याय २१ व ओवीसंख्या १७२५ आहे. स्वतःस नागेश वेडिया म्हणविणारा एक कवि या काळांत असून तो एकनाथांचा शिष्य निंबराज याचा शिष्य दिसतो. मानसपूजा हें त्याच्या ग्रंथाचें नांव. त्यांतील भाषा आणि एकनाथी पद्धतीची साडेचार चरणी ओवी यावरूनहि हा कवि १६००-च्या आसपासचा वाटतो.[3] एकनाथशिष्य शामराज याचाहि उल्लेख येथेंच केला पाहिजे. यानें दशमस्कंधावर ' हरिचरित्र ' या नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्याची ओवीसंख्या ४३४६ आहे. स्वतःस एकनाथांचा शिष्य म्हणविणारा हा शामराज ग्रंथरचनाकाळ शके १६२६ असा देतो याचें मात्र आश्चर्य वाटतें.[4] या काळांतील आणखी एक कवि काशीराजसुत गणेशदास यानें रचिलेली गणेशगीताटीका सरदार मुजुमदारांना उपलब्ध झाली असून तिचा रचनाकाल शके १५५४ असा आहे.[5] अलीकडे उपलब्ध झालेली खलजी वंशांतील जिया दौलतखानाचा मुलगा मुतोजी वजीरुल्मुल्क याची 'संगीत मकरंद' या संस्कृत ग्रंथावरील ओवीबद्ध टीका अनेक दृष्टींनीं महत्वाची आहे.[6] एक तर तिचा विषय जो संगीत तो मराठीस नवीन, आणि शिवाय तिचा कर्ता राजघराण्यांतील एक गाण्याचा दर्दी मुसलमान. या टीकेच्या शेवटीं कर्त्यानें स्वतःचा उल्लेख पुढीलप्रमाणें केला आहे. "श्रीमन्महाराजाधिराज श्रीसंगीतसाहित सिरोमणि श्रीखलचिवंशवर्धन जीया दौलतखानाचा नंदन वजिरुन्मुलुक तेन कृता संगित मकरंदस्या टिका." ही टीका या शतकाचे प्रारंभीं रचिलेली असावी.

१. मुचकुंद शिवसुत ( भाइसंमं. इति, शके १८३६ ).
२. नॅशनल छा. मुंबई, श. १७९५; जगदीश्वर छा. पुणें, श. १८१०.
३. नागेश वेडिया ( पां. मा. चांदोरकर, भाइसंमं. त्रै. १२।३ ).
४. शामराज ( स. म. दिवेकर, भाइसम. त्रै. १२।३ ).
५. भाइसंमं, इति शके १८३७, पृ. १७.
६. परिचयकर्ते : गं. ना. मुजुमदार ( भाइसंमं. त्रै. २०।२ ).

फादर टॉमस स्टीफन्स ( शके १४७१-१५४१ ) हा या शतकांतील एक प्रमुख खिश्चन मराठी कवि आहे. स्टीफन्सचा जन्म इंग्लंडमधील विल्टशायर परगण्यांतील बुल्स्टन या गांवीं इ. स. १५४९-त झाला. धार्मिक शिक्षण युरोपांत रोममध्यें इग्नेशिअस लॉयोलानें स्थापन केलेल्या Society of Jesus मध्यें पुरें करून स्टीफन्सनें ता. ४ एप्रिल १५७९ रोजीं लिस्बन सोडलें व दक्षिण आफ्रिकेला वळसा घालून तो गोव्याच्या किनाऱ्यावर २४ आक्टोबर १५७९ रोजीं येऊन उतरला. हिंदुस्थानांत पाऊल ठेवणारा हा पहिला इंग्रज होय. गोव्यांत त्याचें बस्तान चांगलें बसलें व आयुष्याचीं यापुढील चाळीस वर्षें त्यानें साष्टींतील ब्राह्मण क्रिश्चन कॅथॉलिक समाजांत धर्मोपदेशक म्हणून घालविलीं. गोव्यांत तो अति लोकप्रिय झाला. त्या भागांत तो पाद्री एस्तेवाँ ( Padre Estevam ) या नांवानें ओळखला जातो. याप्रमाणें सारें आयुष्य क्रिश्चन धर्माच्या प्रचारासाठीं वेंचून तो वयाच्या सत्तराव्या वर्षी इ. स. १६१९-त गांवें प्रांतीं मरण पावला. स्टीफन्सनें गोव्यांतील कोंकणी भाषेवर चांगलें प्रभुत्व मिळविलेलें दिसतें. त्यानें कोंकणीचें एक व्याकरण ( Arta de Lingua Canarin ) लिहिलेलें असून तें त्याच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालें. तसेंच पाद्री मार्कस् जॉर्ज यानें पोर्तुगीज भाषेंत रचिलेल्या क्रिश्चन धर्मग्रंथाचें त्यानें कोंकणींत भाषांतरहि केलें आहे. परंतु फादर स्टीफन्सची प्रसिद्धि मुख्यतः त्याच्या 'क्रिस्त पुराण'मुळें आहे. हें पुराण प्रथम पोर्तुगीज भाषेंत रचून पुढें इ. स. १६१४-मध्यें स्टीफन्सनें त्याला मराठी वेष दिला. मूळ पोर्तुगीज ग्रंथाचें नांव 'Discurso Sobre a vinda Jesu Christo Nosso Salvador as mundo' असें होतें. स्टीफन्सचें ओवीबद्ध मराठी भाषांतर प्रथमतः इ. स. १६१६ मध्यें राचोल येथें मूळ पोर्तुगीज मथळ्याखालींच प्रसिद्ध झालें. त्याची दुसरी आवृत्ति इ. स. १६४९-त फादर गास्पर मायगेल यांनीं काढली व त्यांनींच प्रथमः 'पुराण' अशी संज्ञा या ग्रंथाला दिली. त्याची तिसरी आवृत्ति इ. स. १६५४-त निघून पुढें हें पुराण जें गुप्त झालें तें नंतर अडीचशें वर्षांनीं पुनः छापील स्वरूपांत प्रकट होईपर्यंत. इ. स. १९०७ मध्यें अनेक हस्तलिखितांवरून मोठ्या प्रयासानें श्री. सालढाणा यांनीं क्रिस्तपुराणाची एक सुंदर आवृत्ति काढली; पण तीहि आज दुर्मिळ आहे.

'क्रिस्तपुराण' हा ग्रंथ ओवीबद्ध असून तो रोमन लिपींत लिहिलेला व छापलेला आहे. परंतु स्टीफन्सनें स्वतः या ग्रंथाचें देवनागरी लिपींत रूपांतर केलें असावें असें डॉ. जस्टिन ॲबट यांस लंडन म्यूझियममध्यें मिळालेल्या

'क्रिस्तपुराणा' च्या एका देवनागरी लिपींतील प्रतीवरून वाटतें. ग्रंथाचे एकूण सर्ग किंवा 'अवस्वर' ९५ असून ओवीसंख्या प्रत्यक्ष १०,९६२ इतकी आहे. मूळ ग्रंथांत पुढें इ. स. १७२२-त फादर पास्कोल गोम्स द फारिआ यांनीं ४५ ते ५१ अशा सात अवस्वरांत एकूण २३७ ओव्यांची भर घातली आहे, असें डॉ. द. कुन्हा आपल्या कोकणी भाषेवरील ग्रंथांत म्हणतात. परंतु या अधिक ओव्यांचा आज मागमूसहि आढळत नाहीं. या ग्रंथाचे 'पैलें पुराण' व 'दुसरें पुराण' असे दोन भाग असून ते बायबलांतील अनुक्रमें जुन्या व नव्या टेस्टॅमेंटच्या आधारें लिहिले आहेत. 'क्रिस्तपुराणा'स फादर स्टीफन्सनें एक विस्तृत प्रस्तावना जोडली असून ती १६-व्या शतकांतील मराठी गद्याचा नमुना आहे. क्रिस्ती धर्म-प्रसाराचें सुलभ साधन म्हणून जरी स्टीफन्सनें मराठीचा आश्रय केलेला असला तरी ही भाषा त्यानें आत्मसात् करून टाकली आहे, यांत शंका नाहीं. इतकेंच नव्हे, तर ज्ञानेश्वरादि संतकवींच्या तोडीचा अभिमान हा इंग्रज कवि मराठीविषयीं व्यक्त करितांना आढळतो. मराठी भाषेची थोरवी वर्णितांना तो म्हणतो—

'जैसी हरळांमाजीं रत्नकिळा। कीं रत्नामाजीं हिरा निळा
तैसी भासांमाजीं चोखळा। भासा मराठी॥
जैसी पुष्पांमाजीं पुष्प मोगरी। कीं परिमळांमाजीं कस्तुरी।
तैसी भासांमाजीं साजिरी। मराठीया॥
पांखियांमधें मयूरु। वृखियांमधें कल्पतरु।
भासांमधें मानू थोरु। मराठियेसी॥ (१–१२१ ते १२५).

भाषेचें आणि ग्रंथाचें मराठपण सांभाळण्यांत स्टीफन्सनें आपलें चातुर्य-सर्वस्व वेंचलें आहे. यासाठीं त्यानें कांहीं लॅटिन व पोर्तुगीज शब्दांना अस्सल मराठी वेष दिला असून आपलें काव्य सर्वांना समजावें यासाठीं त्यानें पर्वत—डोंगर, पुष्प—फूल, दंधुर—कंदूक अशा संस्कृत-प्राकृत शब्दांच्या जोड्याहि योजिल्या आहेत. काव्य ओवी छंदांत असून ओवीस स्टीफन्स अभंग म्हणत आहे. येशू क्रिस्ताचें चरित्र हा या पुराणाचा गाभा असून त्याच्या अनुरोधानें कवीनें क्रिश्चन धर्माचीं तत्त्वें विशद केलीं आहेत. क्रिस्ती धर्मतत्त्वांस न सोडतां हिंदु मनास पटेल असा पौर्वात्य वेष क्रिस्त-चरित्राला देण्याची अवघड कामगिरी स्टीफन्सनें यशस्वी रीत्या पार पाडली आहे. आंतील मूर्ति तेवढी येशू क्रिस्ताची व बाकी मंदिराचा सारा थाट हिंदुपद्धतीचा अशी या पुराणाची रचना आहे. स्टीफन्सच्या भाषेवर ज्ञानेश्वरीची छाया स्पष्ट दिसते. म्हणजे मराठी भाषाच केवळ नव्हे, तर त्या भाषेंतील पूर्वसूरींचे ग्रंथहि त्यानें आत्मसात् केले होते असें वाटतें.

ही त्याची काव्यकृति मराठींत अनेक दृष्टींनीं अपूर्व आणि कौतुकास्पद आहे. धर्मभेद हा भाषाभिवृद्धीच्या आड येऊं शकत नाहीं हें तत्व स्टीफन्सच्या कृतीनें सिद्ध केलें आहे. त्याचें 'क्रिस्तपुराण' एकेकाळीं कोंकणांतील रोमन कॅथॉलिक समाजाचा जीवनाधार होऊन बसलें होतें. ब्राह्मण कॅथॉलिकांचें घर त्यावांचून सुनें वाटे आणि मुलाच्या सहाव्या म्हणजे सटीच्या दिवशीं तें अशुभनिवारणार्थ वाचलें जाई. सरस्वति गंगाधराच्या गुरुचरित्राप्रमाणें स्टीफन्सच्या 'क्रिस्तपुराणा'स एकेकाळीं असामान्य लोकप्रियता लाभली होती.

स्टीफन्सचें महाकाव्य प्रसिद्ध झाल्यावर त्याचें अनुकरण अनेक लहान थोर जेसुइट कवींनीं केलेलें दिसतें. 'क्रिस्ताचें वधस्तंभारोहण' हा या कवींचा आवडता विषय असून त्यांच्या काव्यांपैकीं कांहींचा परिचय श्री. प्रियोळकर यांनीं करून दिलेला आहे. पैकीं एका काव्याचें नांव A paixao de christo असें असून त्याचा कर्ता अज्ञात आहे. स्टीफन्सच्या 'क्रिस्तपुराणां'तील कांहीं ओळी या काव्यांत जशाच्या तशा घेतलेल्या दिसतात. स्टीफन्सनंतर त्याच्या जागीं आलेल्या फा. एतियेन द ला क्रुवा या फ्रेंच पाद्यानें अशा तऱ्हेचें काव्य लिहिल्याचा उल्लेख इ. स. १६२१-त प्रसिद्ध झालेल्या फा. अलेक्स ऱ्होडस् याच्या प्रवासवर्णनांत आढळतो. फा. क्रुवाचा जन्म फ्रान्समध्यें इ. स. १५७९-त झाला. हिंदुस्थानांत तो इ. स. १६०२-मध्यें आला व ता. २४ सप्टेंबर १६४३ रोजीं गोव्यांत ख्रिस्तवासी झाला. फा. क्रुवा याची प्रसिद्धि मुख्यतः त्यानें रचिलेल्या सेंट पीटरच्या चरित्रावरील महापुराणामुळें असून या पुराणाची ओवीसंख्या सुमारें बारा ते पधरा हजार इतकी आहे. या पुराणांत कवीनें हिंदुधर्मांतील आचारावर कडाडून हल्ला चढावला असून क्रिस्तीधर्माचे गोडवे गायिले आहेत. फा. क्रुवानंतर राचोलच्या जेसुइट कॉलेजचा प्रमुख म्हणून आलेल्या फा. आंतोनियु द सालदान्ज या पाद्यानें लिहिलेलें व इ. स. १६५९-मध्यें मुद्रित झालेलें 'आंतोनीची जीवितकथा' या नांवाचें उपलब्ध झालेलें एक मराठी काव्य आहे फा. गास्पर द मायग्वेल याचें या विषयावरील काव्य सर्वांत मोठें असून त्यांत एकूण तीनहजार कडवीं असल्याचा उल्लेख इ. स. १७४१-मध्यें प्रसिद्ध झालेल्या Diogo Barbosa Machado याच्या Biblioteca Lusitina मध्यें आढळतो. याशिवाय फा. फ्रान्सिस्को व्हिमारे याचेंहि मूळ पोर्तुगीजवरून मराठीच्या वसईकडील बोलींत अनुवादिलेलें एक क्रिस्तपुराण उपलब्ध आहे. याशिवाय जेसुइट पंथांतील अनेककविकृत असें आणखी एक क्रिस्ती पुराण उपलब्ध असून त्याची

एक जीर्ण व अपूर्ण प्रत गोव्यांतील नॅशनल लायब्ररींत आहे असें स्टीफन्सकृत कोंकणी व्याकरणाच्या आपल्या प्रस्तावनेंत द कुन्हा सांगतात. हें पुराण रचणाऱ्यांचीं नांवें ठाऊक नाहींत. परंतु तें मराठी भाषेंत व ओवीछंदांत आहे एवढें निश्चित. जेसुएट कवींच्या या सर्व काव्यांवर ज्ञानेश्वरी, योगवासिष्ठ, उषाहरण व महानुभावीय ग्रंथ या तत्पूर्व मराठी काव्यांतील भाषेचा ठसा उमटलेला असून हीं काव्यें म्हणजे या जेसुइट कवींच्यापुढील आदर्श दिसतो.

स्टीफन्स, क्रूवा, सालदान्ज इत्यादि जेसुइट कवींची मराठी भाषेसंबंधींची आस्था पुढील ग्रंथकारांत टिकली नाहीं, व देशी भाषेची अडगळ वाटून तिचें उच्चाटन करण्यासाठीं त्यांनीं देशी भाषेविरुद्ध इ. स. १६८४-चा सुप्रसिद्ध कायदा रोममार्फत पोर्तुगालच्या राजावर वजन आणवून संमत करवून घेतला. या कायद्याप्रमाणें देशी भाषेचा वापर सर्वांनीं थांबवावा व तीन वर्षांच्या अवधींत सर्वांनीं पोर्तुगीज बोलूं लागावें असें ठरलें होतें. परंतु या कायद्याचा परिणाम मात्र असा झाला, कीं लोकांची बोलभाषा तर बंद पडली नाहींच; उलट गोव्यांतील क्रिस्ती लोकांचा ग्रांथिक मराठीशीं असलेला संबंध हळूंहळूं सुटला, व मराठी नव्हे, तर कोंकणी हीच आपली मातृभाषा असें ते म्हणूं लागले. साहजिकच यापुढील काळांत गोव्यांतील पाद्री मंडळींनीं लिहिलेलें धार्मिक मराठी वाङ्मय उपलब्ध होऊं शकत नाहीं.

१६-व्या शतकांत **महानुभाव** कवींनीं विपुल ग्रंथरचना केलेली दिसते. पैकीं **पंडित लक्षधीर** यांनीं रुक्मिणीस्वयंवर, ज्ञानदर्पण, महाराष्ट्रकाव्यदीपिका व ज्ञानमार्तंड हे चार ग्रंथ याच क्रमानें रचिलेले असून ही ग्रंथनिर्मिति आपण खानदेशांत गंगातीरीं मुल्हेर येथें केल्याचें कवीनें स्वतःच म्हटलें आहे. इंद्रसेन आभीरराव–बचराज–लक्षाधीर अशी या सोमवंशांतील कुळांत जन्मलेल्या कवीची वंशपरंपरा असून तो राहणारा खानदेशांतील साल्हेरचा दिसतो. मुल्हेर आणि साल्हेर हीं गांवें जवळच असून या दोन गडांमधून नळगंगा वाहते. कथाकल्पतरुकार कृष्ण याज्ञवल्की याचा शिष्य मधुकर कवि याच प्रांतांतील. असो. मुरारिमल्लाचा शिष्य कवि लक्षधीर यानें ज्ञानदर्पण हा ग्रंथ आपला मुलगा मल्लिनाथ यास अनुलक्षून शके १५४३ मध्यें लिहिला. या काव्याचे सात उल्लास असून ओवीसंख्या सातशेंचे वर आहे, तर यापुढील ज्ञानमार्तंडाची ओवीसंख्या तीनशें आहे. परंतु लक्षधीर कवीची खरी प्रसिद्धि दुसऱ्याच दोन ग्रंथांमुळें आहे. पैकीं एकाचें नांव ‘कविलक्षण’ असें असून त्यांत देशवळ, आरिखु, आरजु, केवळु, उद्भट, सरळ, बरळ,

द्योतोत्तम, तस्कर, सामान्य आणि प्रेमळ इतके कविप्रकार सांगितले आहेत. नमुन्यादाखल त्यांतील दोघांचीं लक्षणें पुढें देतों—

उद्भट तो कैसा : बोलूं दिगांबरु जैसा
लज्जापडदेंविण तैसा । करीं काव्यप्रबंधु ॥ ५ ॥
मुद्रित उत्तम बोले अन्य कविचें । चोरुनियां प्रबंधु रचे
तो तस्करु न रुचे । व्युत्पत्तिरहितु ॥ ९ ॥

लक्षधीरास प्रसिद्धि देणारा दुसरा ग्रंथ महाराष्ट्र-काव्यदीपिका हा होय. शके १५४०-च्या सुमारास लिहिलेल्या या छोटेखानी ग्रंथांत मराठींतील ओवी छंदाचे लघु चरणी, युक्ता, दीर्घा, अतिदीर्घा इत्यादि विविध प्रकार कवीनें उदाहरणांसह वर्णिले आहेत. थोडा नमुना देतों—

लघूत्तमा—' विषयानंदें : डूलति छंदें : भ्रमले मदें : जीव देखा '

लघु अतिदीर्घा— ' मग ते भवार्णवीं : नरक जोडिलेति नानाविध आर्जवीं :
म्हणौनि अवतरला सर्वज्ञ रावो गोसावी : उद्धरणासि '

पंचचरणीं – ' जे सांडूनि ज्ञानवैराग्यभक्ति : अन्य साधनें करीती :
यथार्थ न मनीती : ते पावती : नरकगति '

ग्रंथाचें नांव महाराष्ट्र-काव्यदीपिका असलें तरी त्यांत ओवीछंदच तेवढा वर्णिला आहे. यावरून महाराष्ट्रकाव्य म्हणजेच ओवी छंद अशी कल्पना त्या काळांत असावी. लक्षधीर कवीनें वर्णिलेले झाडकवि, भ्रष्टा, तुकभ्रष्टा, चौनामी इत्यादि ओवीप्रकार आज तरी अश्रुत असल्यानें ओवीछंदाच्या अभ्यासकांस हा ग्रंथ उपयुक्त वाटेल. लक्षधीर कवीची मुलगी **जयंतिका** हिच्याहि अंगीं कवित्व असून ' सासुरवासिनी ' हें तिचें रूपकपद प्रसिद्ध आहे. एकाचा ग्रंथ दुसऱ्यानें वाढविण्याचा जो प्रकार आपण मागील शतकांत पाहिला तो याहि शतकांत दिसतो. उदाहरणार्थ, मुरारिमल्लाचा शिष्य **दिवाकर कपाटे** यानें वैराटप्रांतीं भिलवडी येथें शके १५११ मध्यें लिहिलेला सुमारें आठशें ओव्यांचा मतिरत्नाकर हा प्रबंध मागाहून कोणा गोपाळदासानें शोधून आगळा वाढविला असें कळतें. उपाध्य आम्नायां-तील ' दर्शनप्रकाश ' कार **मुरारमल्ल** हा वरील मुरारिमल्लाहून भिन्न असून तो शके १५६०-च्या सुमाराचा आहे. उपाध्य आम्नायांतील वाइदेशकर मयंकराज यांचा शिष्य **कृष्णमुनि किंवा कवि डिंभ** हा या शतकांतील एक प्रमुख ग्रंथकार असून त्याच्या नांवावर फलटणमाहात्म्य, ऋद्धिपुरमाहात्म्य इत्यादि ओवीबद्ध प्रकरणें व रंडिकास्तोत्रासारखी कांहीं श्लोकबद्ध रचनाहि आढळते. विशेषतः त्याचे धांवे गोड असले तरी त्याची प्रसिद्धि त्यानें रचिलेल्या श्लोकबद्ध नवखंड रुक्मिणीस्वयंवरामुळें आहे.

कल्पद्रुम या दुसऱ्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या या काव्यांत कृष्णडिंभानें परिचित व अपरिचित अशीं अनेक अक्षरमात्रावृत्तें योजिलीं असून त्यांतील वृत्तवैचित्र्य पाहण्यासारखें आहे. शके १५२४-मध्यें रचिलें गेलेलें हें काव्य छंदःशास्त्रदृष्ट्या अभ्यसनीय आहे. १६-व्या शतकांतील हा कवि महाराष्ट्राची व्याख्या करितांना 'विंध्याद्रिपासोनि दक्षिणदिशेसी। कृष्णा नदीपासुनि उत्तरेशीं। झाडीमंडळापासोनी पश्चिमेसीं। कोंकणपर्यंत' या परिसीमा सांगतो यासहि महत्त्व आहे. अनंतमुनी किंवा आयमुनी कारंजकर या कवीश्वर आम्नायांतील कवीनें शके १५८४-च्या सुमारास रचिलेलीं रुक्मिणीस्वयंवर, बाळक्रीडा, पंचकृष्ण नाममाळा इत्यादि गेय ओवी छंदांतील प्रकरणें उपलब्ध असून त्यानें आपला गुरु कमळाकर किंवा कोमराज याच्या शके १५३० मधील देहान्तसमयाचें केलेलें वर्णन हृदयस्पर्शी आहे. तो म्हणतो, 'वोखटें पैं जालें। कमलाख्यु गेला। धर्मु अंतुरैला। बहुतांचा.' गोपी भास्कर (शके १५१५ ते १६००) हे या शतकांतील आणखी एक कवि असून ते कवीश्वर आम्नायांतील गीताभाष्यादि प्रमेयकार मुरारमल्ल विद्वांस (मृत्यु श. १५२७) यांचे शिष्य होत. पूर्वाश्रमीचे हे नगर येथील मुधोपंत देशपांडे यांचे चिरंजीव. त्यांच्या नांवावर सिद्धांतराजभद्र (श. १६००), आचार महाभाष्य, गीताटीका (श. १५७२), शुकदेव चरित्र (श. १५६९) इत्यादि ग्रंथ आढळतात. आपली गीताटीका ही संस्कृतांतील भिंगारकरी टीकेचा अनुवाद असून मूळ टीका ज्ञानधेनु असेल तर ही भास्करी टीका म्हणजे तिचें वत्स होय असें या कवीचें म्हणणें आहे. तसेंच आपणापूर्वीं झालेल्या गंगाधरी, लक्ष्मीधरी, रामदेवी इत्यादि गीताटीकांचाहि उल्लेख तो करतो. या गोपीभास्कराचा गुरुबंधु जो चाहेराज त्याचा शिष्य मंडळीक एल्हन हा या शतकांतील आख्यानकवि असून त्याच्या नांवावर रुक्मिणीस्वयंवर (ओ. ५२३) व बाळक्रीडा (ओ. ३२०८) हे दोन ग्रंथ आहेत. पैकीं बाळक्रीडा हें काव्य कवीनें पडतूर प्रांतीं वडाली या गांवीं शके १५८०-मध्यें लिहून पुरें केलें. हा मंडळीक एल्हन १४-व्या शतकांतील 'अष्टविवाहवर्णन' कार एल्हणकवीहून अर्थातच निराळा असणार. मंडळीक एल्हन हा शके १५२७-मध्यें समाधिस्थ झालेल्या मुरारमल्ल विद्वांसाचा नातू व प्रशिष्य होय. ध्यानामृतस्तोत्रकार विश्वनाथ व्यास बीडकर हे या शतकांतील एक प्रमुख ग्रंथकार असून त्यांनीं आचारस्थळादि ग्रंथांवर महाभाष्यें व हयग्रीवकृत गद्यराजस्तोत्र आणि पं. दामोदरकृत चौपद्या इत्यादि प्रकरणांवर टीका लिहिल्या आहेत. त्यांनीं हिवरळी येथें शके १५६३-मध्यें रचिलेल्या ध्यानामृतस्तोत्रावर पुढील काळांत अनेक

टीका झाल्या आहेत. विश्वनाथ बीडकराप्रमाणें चक्रपाणि व्यास वर्धनस्थ हाहि या कालांत रचना करतांना आढळतो. हा कवि मूळचा राजपुतान्यांतील व त्याचें पूर्वाश्रमींचें नांव चाल्हण. पुढें महानुभाव पंथाची दीक्षा उपाध्य आम्नायांतील संतराज वर्धनस्थ यांजकडून घेतल्यावर तो रिधपुरास आला व तेथें राहून त्यानें संस्कृत, हिंदी व मराठी या तीनहि भाषांत ग्रंथरचना केली. ही सर्व रचना सांप्रदायिक स्वरूपाची आहे. चक्रपाणि व्यास रिधपूर येथेंच शके १५६५ मध्यें समाधिस्थ झाला. वरील सर्व ग्रंथांहून कांहींसा निराळा व ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा असा या शतकांतील ग्रंथ म्हणजे मेघचंद्रकृत 'यक्षदेव–वृद्धान्वय' हा होय. शके १६०० मधील या ओवीबद्ध ग्रंथांत यक्षदेव आम्नायाचा वृद्धान्वय म्हणजे इतिहास तर मिळतोच; पण त्याशिवाय इतरहि कांहीं ऐतिहासिक माहिती त्यांत आली आहे. विशेषतः मराठी भाषेंतील आद्य कवि मुकुंदराज यांच्या चरित्रावर प्रकाश पडेल अशा प्रकारचे कांहीं उल्लेख या ग्रंथांत आले असून महानुभाव पंथाचा 'विवेकसिंधु'कार मुकुंदराजाशीं कांहीं दूरतः संबंध पोंचत असल्याचेंहि त्यांत ध्वनित झालें आहे. या यक्षदेवानें रचिलेल्या एका आम्नाय आरतींतहि अशाच प्रकारचे उल्लेख आढळतात. (भाइसंमं. १२।२.)

अभ्यासाचीं साधनें—


सु. गो. उभयकर : श्रीरमावल्लभदासांची गाथा (प्रस्तावना)
गो. का. चांदोरकर : सहजानंद व पूर्णानंद (भाइसंमं.इति. श.१८३५)
ह. ना. नेने : लक्षधीरकृत महाराष्ट्रकाव्यदीपिका (भाइसंमं.त्रै१८)
य. खु. देशपांडे : महानुभावीय मराठी वाङ्मय, भा. ५.
जे. एल्. साल्ढाणा : Introduction to Christ Puran (1907).
J. H.da Cunha : Konkani Language and Literature.
गो. वि. तुळपुळे : स्टीफन्स व त्याचें क्रिश्चन पुराण (रत्नाकर,व.३).
वि. का. राजवाडे : स्टीफन्सचें क्रिस्तपुराण (विश्ववृत्त, फेब्रु.१९०८).
अ. का. प्रियोळकर : A Paixao de Christo (Bombay University Journal, Vol. IX).
अ. का. प्रियोळकर : जेजुइटांचें मराठी वाङ्मय कार्य (यशवंत, १९३८).
Justine Abbot : (vide-BSOS, London, Vol. II, p.681).
अ. का. प्रियोळकर : अध्यक्षीय भाषण,म.सा. संमेलन, कारवार, ५१.
फा.फ्रॅन्सिस्को ग्विमारे : क्रिस्तपुराण (Journal BBRAS, Vol. VI.
J. H.da Cunha : Fr. Stephens' Arta da Lingua Canarin.




## प्रकरण : १४ तुकाराम

तुकाराम : चरित्रविषयक–तुकारामांच्या चरित्रांतील पुढील गोष्टी विवाद्य आहेत. १ जन्मशक, २ मृत्युशक, ३ गुरूपदेश, ४ सदेह वैकुंठगमन, ५ शिवाजीशीं संबंध. पैकीं सदेह वैकुंठगमनाविषयीं सारस्वतकारांनीं लिहिलेंच आहे. यासंबंधीं आणखी एक विचार असा, कीं 'गोविंद गोविंद । मना लागलिया छंद, मग गोविंद तें काया । भेद नाहीं देवा तया', या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें किंवा 'सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ?' या ज्ञानेश्वरांच्या वचनाप्रमाणें ( ज्ञा. १८–१६४९ ) तुकाराम सदेह वैकुंठास गेले असें म्हणण्याचा परिपाठ पडला असावा.[1] तुकारामांची गुरुपरंपरा त्यांची शिष्या बहिणाबाई हिच्या मतें ज्ञानेश्वर–सच्चिदानंद–विश्वंभर–राघवचैतन्य–केशवचैतन्य–बाबाजी–तुकाराम याप्रमाणें असून दीनकवीचा या म्हणण्यास पाठिंबा आहे.[2] महिपतीबोवा ( भक्तलीला-५–२९७ ) व रंगनाथस्वामी ( संतमालिका, ९७ ) हेहि वरील मतास दुजोरा देतात. निळोबांचें म्हणणें थोडें निराळें असलें तरी राघव, केशव व बाबाजी या तीन व्यक्ति भिन्न होत याविषयीं त्यांचें मतैक्य आहे. मात्र केशवचैतन्याचेंच नांव बाबाजी होय असेंहि एक मत आहे हें जातांजातां नमूद करून ठेवलें पाहिजे.[3] तुकारामांच्या जन्ममृत्युशकांविषयीं तर फारच मतभेद असून आमच्या दृष्टीनें हा प्रश्न पुढीलप्रमाणें सोडवितां येईल. तुकारामांच्या जन्मकालाविषयीं पुढील भिन्न मतें आढळतात.

(१) कविचरित्रकार कै. जनार्दन रामचंद्रजी व 'सरंजामी जंत्री' यांच्या मतें तुकाराम शके १५१० मध्यें जन्मले. हें मत निराधार आहे.

(२) कै. वि. का. राजवाडे[4] यांनीं वाई प्रांतांतील एका वंशावळीवरून हा जन्मशक १४९० असा मानला असून पुराव्यादाखल तुकोबांचा 'जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी । मृत्यूचिये भेटी जवळी आली' हा अभंग पुढें करून मरणसमयीं ते ८१ वर्षांचे वृद्ध होते असेंहि म्हटलें आहे. तुकारामांच्या अंतकाळीं त्यांची बायको गरोदर होती आणि त्यांचा धाकटा मुलगा नारायण हा त्यांच्या पश्चात् जन्मला ही गोष्ट ध्यानांत आणल्यास राजवाड्यांच्या मनांतील भ्रामकता उघड होते.

---

१. रा. द. रानडे : तुकारामवचनामृत ( प्रस्तावना ).

२. द. वा. पोतदार : बहिणाबाईची गुरुपरंपरा (भाइसंमं. इति श.१८२७).

३. गं. ना. मुजुमदार : बाबाजी चैतन्य (भाइसंमं. त्रै.वर्ष २. पृ.१५०).

४. ग्रंथमाला, अंक ११६.

(३) संतचरित्रकार महिपतिबोवा यांनीं तुकारामांचा आयुष्यक्रम २१ वें वर्षापर्यंत देऊन तेथें 'पूर्वार्ध संपलें येणें रीती' असें म्हटलें आहे. एवढ्यावरून कै. ल. रा. पांगारकर[1] असा तर्क बांधतात, कीं ज्याअर्थी तुकारामांचें निधन श. १५७२-च्या आसपास झालें त्या अर्थी त्यांची हयात ४२ वर्षांची असावी आणि साहजिकच त्यांचा जन्मशक शके १५३० हा असावा. ही गोष्ट संभवनीय असली तरी पांगारकरांचा तो केवळ तर्क आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कारण, तुकाराम श. १५३० त जन्मले असें महिपतीनें कोठेंहि म्हटलेलें नाहीं. 'एकविसाव्यांत विपरीत काळ पातला', आणि 'पूर्वार्ध संपलें येणें रीती' याहून महिपति अधिक कांहींहि सांगत नाहीं. तुकारामांच्या २१-व्या वर्षांतील विपरीत काळ म्हणजेच शके १५५१–५२ तील इतिहासप्रसिद्ध[2] दुष्काळ होय असें पांगारकरांना वाटतें. पण तसें वाटण्याचें खरोखर कारण नाहीं. महाराष्ट्रांत आलटूनपालटून अवर्षण होतच असतें, व अशांतीलच एक दुष्काळ तुकारामांच्या वांट्यास आला इतकेंच. तो अमक्याच वर्षाचा दुष्काळ असें मानण्यास कोणताहि पुरावा नाहीं. तसेंच महिपतीनें 'पूर्वार्ध' हा शब्दहि मोठ्या कांटेकोरपणानें वापरलेला नसून त्याचें हें बोलणें आपण शब्दशः न घेतां भावार्थानें घेतलें पाहिजे. आणि दुसरें असें, कीं महिपतीच्या या संदिग्ध विधानावर आधारलेला पांगारकरांचा तर्क मान्य करून तुकारामांचा जन्मकाल आपण शके १५३० हा मानला तर मग 'जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी' या तुकोबांच्या उक्तीला कांहींच अर्थ उरत नाहीं. तुकारामांसारख्याला वयाच्या ८१-व्या वर्षीं पुत्रलाभ होणें हें जितकें अशक्य, तितकेंच ४०–४१-व्या वर्षीं त्यावर म्हातारपणाची कळा येणें हेंहि असंभवनीय आहे. तात्पर्य, महिपतींचें म्हणणें संदिग्ध व पांगारकरांचें अग्राह्य ठरतें.

(४) देहू आणि पंढरपूर येथील तुकारामांच्या वंशावळींच्या आधारें रा. भारदे यांनीं त्यांचा जन्मकाळ शके १५२० असा दिला असून तोच सर्व दृष्टींनीं मान्य होण्यासारखा आहे. या नोंदींतील शकतिथिवारांची तितकी बरोबर मिळणी होत नाहीं, हें खरें; पण या बाबतींत आपण फारसा आग्रह न धरणेंच बरें. कारण वंशावळींतील नोंदी करतांना असले प्रमाद नेहमीं होतात, हें इतिहासज्ञ जाणतातच. उलट, शके १५२० हा तुकारामांचा जन्मकाळ म्हणून स्वीकारला तर निधनसमयीं त्यांची पन्नाशी उलटून

१. श्रीतुकारामचरित्र प्र. २.

२. वि. का. राजवाडे, 'म. इ. साधनें', खंड १५, ले. ४१३,४१४.

गेल्यामुळें 'जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी' हें त्यांच्या तोंडचें वचन सार्थ ठरतें. तसेंच हा जन्मशक मान्य करून महिपतीचें लिहिणें वाचलें म्हणजे तुकारामांच्या आयुष्यक्रमाचा उलगडा बरोबर होतो. कारण, तुकोबांची हयात मुळांत ४२ वर्षांची मानून तिची २१ वर्षें प्रपंच आणि २१ वर्षें परमार्थ अशी समसमान विभागणी करण्यापेक्षां त्यांना ५२ वर्षांचें आयुष्य कल्पून त्याची २१ वर्षें प्रपंच आणि ३० वर्षें परमार्थ अशी थोडी विषम विभागणी करणें हें अधिक बरें. परमार्थाचें बीं रुजून, त्याचें रोपटें तयार होऊन, त्याला फूलफळ येऊन तें फळ परिपक्व होण्याच्या क्रियेस २१ वर्षांच्या कालावधीपेक्षां ३० वर्षांचा कालावधि केव्हांहि अधिक पोषक ठरणार. तेव्हां सर्व दृष्टींनीं विचार करतां शके १५२० हा तुकारामांचा जन्मकाल म्हणून निश्चित होतो. म्हणजे तुकोबाराय हे रामदासांहून दहा वर्षांनीं वडील ठरतात.

तुकोबांच्या प्रयाणकाळासंबंधींहि मतभेद असले तरी त्यांचा उलगडा करणें फारसें कठिण नाहीं. हे मतभेद असे —

( १ ) तुकारामांचे एक टाळकरी व लेखक संताजी जगनाडे यांचा मुलगा बाळाजी याच्या हातच्या वहींत प्रयाणदिवस फाल्गुन वद्य २ सोमवार शके १५७२ असा दिलेला असून तो कै. भावे यांना मान्य आहे (म. सा. पृ. ३९२).

( २ ) देहूकरांच्या वहींत हाच काल शके १५७१ असा असून तो महिपतिबावांनीं 'भक्तलीलामृतां' त अ. ४० मध्यें स्वीकारला आहे.

( ३ ) फाल्गुन व. २ ला शके १५७०-त सोमवार येत असल्यानें हाच मृत्युशक होय असें वि. का. राजवाडे मानतात (ग्रंथमाला अं. ११६).

वरील तीनहि मतांत तुकारामांचें प्रयाण फाल्गुन व. २ स सोमवारीं झालें या बाबतींत ऐक्य आहे. पण असा योग शके १५७०–७१–७२ यांपैकीं एकाहि वर्षीं येत नाहीं. मात्र प्रयाणापूर्वीं ४–५ दिवसच आधीं तुकोबांनीं आपल्या बायकोस 'पूर्णबोध' म्हणून एकूण अकरा अभंगांत उपदेश केला आहे. त्यावरून पाहतां हा उपदेश फाल्गुन शुद्ध १२-स म्हणजे सोमवारीं केल्याचें दिसतें. असा योग शके १५७१ मध्यें येतो.

तात्पर्य, तुकाराम शके १५२० त जन्मले आणि शके १५७१ त समाधिस्थ झाले, असें आम्हांस वाटतें.

तुकाराम आणि रामदास हे दोन संत अवघ्या दहा वर्षांच्या अंतरानें जन्मले व एकाच प्रांतांत राहून धर्मस्थापनेचें एकच कार्य दोघांनीं केलें. साहजिकच त्यांनीं एकमेकांच्या भेटी घेतल्या नसतील हें मनास पटत

नाहीं. रामदास आपली बारा वर्षांची भ्रमंती पुरी करून शके १५६६-त कृष्णातीरीं येऊन स्थिरावले. शके १५७१-च्या आषाढीस ते पंढरीस गेले होते, व तुकारामांनीं शके १५७१ च्या फाल्गुनांत देह ठेविला. या तीन घटनांवरून रामदास–तुकारामांची भेट शके १५६६ ते १५७१ च्या दरम्यान, आणि बहुधा शके १५७१ च्या आषाढांत पंढरीस झाली असावी असें वाटतें. हनुमंतस्वामीकृत 'रामदासांची बखर', आत्मारामकृत 'दासविश्रामधाम' आणि उद्धवसुतकृत 'समर्थचरित्र' या तीन ग्रंथांतून प्रस्तुत भेटीचा उल्लेख आढळतो. उभयतांच्या मनोरचनेवरून पाहतां तुकारामबोवा हे मुद्दाम उठून रामदासांच्या भेटीस गेले असतील असें वाटत नाहीं. शके १५७१-च्या आषाढी एकादशीस दोघांची गांठ पंढरपूर येथें पडावी हा केवळ एक योगायोग होय.

रामदास-तुकारामांसंबंधींचें वरील प्रमेय केवळ परंपरेवर व अनुमानावर उभें असून त्याला ऐतिहासिक प्रमाण असें नाहीं. तुकाराम आणि शिवाजी यांची भेट मात्र संशयातीत असून या प्रकरणीं कांहीं अस्सल पुरावाहि उपलब्ध आहे. रामदासांनीं शके १५७१-त शिवाजीस अनुग्रह दिला हें वाकेनिशी टिपणावरून आणि बावडा दप्तरांतील अमात्यांच्या वंशवृत्तावरून स्पष्ट होतें. याच वर्षी म्हणजे शके १५७१-च्या आषाढांत तुकाराम-रामदासांची भेट पंढरीस झाली असावी हेंहि आपण पाहिलेंच. अर्थात् तुकाराम व शिवाजी यांची भेट यापूर्वी केव्हांतरी झाली असणार हें निश्चित. किंबहुना हे दोन महापुरुष एकमेकांस एकदांच नव्हे तर चांगले दोनतीनदां भेटले असावे असें मन सांगतें. त्यांची पहिली भेट पुनवडीस झाली असून या प्रसंगीं तुकोबांचें कीर्तन चालूं असतां परचक्र आलें तेव्हां त्यांनीं देवाचा धांवा करून शिवाजीस सोडविलें असें परंपरा म्हणते. उभयतांच्या भेटीचा हा पहिला प्रसंग शके १५६७ ते १५७१-च्या मध्यंतरीं घडला असावा असें 'शिवकालीन पत्रव्यवहारा' वरून वाटतें (क्र. ५५१). या प्रसंगानंतर कांहीं दिवसांनीं शिवाजीनें तुकारामांस सन्मानपूर्वक बोलावणें पाठविलें, त्या प्रसंगीं त्यांनीं शिवाजीस लिहिलेलें अभंगात्मक उत्तर प्रसिद्ध आहे. त्यांत तुकारामांनीं वापरलेल्या 'चातुर्यसागर', 'सर्वज्ञ राजा,' 'गुरुभक्त' इत्यादि विशेषणांवरून दोघांची भेट शके १५७१-च्या ज्येष्ठानंतर लौकरच झाली असली पाहिजे असें वाटतें. ही भेट तुकारामांच्या आयुष्याच्या अखेरीस झाली असावी असें मानण्यास एक अंतर्गत प्रमाणहि आहे. तुकोबा शिवरायास लिहितात–'घेऊनियां भेटी कोण हा संतोष। आयुष्याचे दिस गेले गेले ॥' यावरून तुकारामांचा काळ या प्रसंगीं जवळ येऊन

ठेपला होता असें दिसतें. या वेळीं त्यांचें वय ५१ व शिवाजीचें १९ वर्षांचें होतें.

तुकारामांची गाथा:—तुकारामांस कवित्वस्फूर्ति शके १५४६-त झाली असें मानलें तर त्यांच्या मुखांतून काव्यगंगा साधारणपणें पंचवीस वर्षें अखंड वाहत होती असें दिसतें. या अवधींत त्यांच्या हातून सुमारें पांच एक हजार अभंगांची रचना झाली असावी. "नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें" या काव्यस्फूर्तिविषयक अभंगांत आपणांस नामदेवांनीं त्यांचा शतकोटि अभंगांचा संकल्प पुरा करण्यास सांगितलें असें तुकाराम म्हणतात. नामदेवांच्या ९४ कोटि ४१ लक्ष अभंगांत स्वतःच्या ५ कोटि ५१ लक्ष अभंगांची भर घालून तुकारामांनीं शतकोटीची संख्या पूर्ण केली असें महिपतिबोवाहि सांगतात (भक्तलीलामृत, अ. ३२). याशिवाय कै. पंडित यांनीं इंदुप्रकाश गाथेच्या प्रस्तावनेंत दिलेल्या 'वेदाचे अभंग केले श्रुतिपर....' या गणनात्मक अभंगाच्या कांहीं संप्रदायांत रूढ असणाऱ्या पाठांवरून पाहतां तुकारामांच्या अभंगांची एकूण संख्या पांच कोटि, एक लक्ष, चौतीस सहस्र इतकी येते. तुकारामांची प्रत्यक्ष गाथा पाहावी तर त्यांत अवघे पांचएक हजार अभंग दिलेले आढळतात. आतां पुराणोक्त पांच कोटि व प्रत्यक्ष पांच हजार या दोन संख्यांचा मेळ कसा घालावा? या प्रश्नाचें उत्तर इतकेंच, कीं वरील सर्व कविकल्पना असून त्यांपैकीं एकीसहि तुकारामांच्या वचनांचा अस्सल आधार नाहीं. याचा अर्थ तुकारामांची सर्वच कविता प्रकाशित झाली आहे असाहि करतां येणार नाहीं. इतर प्राचीन कवींप्रमाणें या संतकवीचीहि कांहीं रचना काळाच्या उदरांत गुप्त झाली असण्याचा संभव पुष्कळ आहे. अलीकडे संशोधित झालेल्या 'भानुदासचरित्र'[1] व 'सुदामचरित्र'[2] या तुकारामकृत (?) दोन प्रकरणांवरून वरील विधानास बळकटी येते. अगदीं अलिकडे संशोधक श्री. बेंद्रे यांनीं पूर्वीं अनेकदां छापून निघालेल्या 'मंत्रगीते'चें शास्त्रोक्त संपादन करून तीं तुकारामकृतच होय, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. असो. तुकारामांच्या गाथा आजवर अनेक निघाल्या असल्या तरी त्यांतील तीनच विशेष महत्त्वाच्या आहेत. पैकीं पहिली गाथा इ. स. १८६९ मध्यें सरकारी प्रेरणेनें निघालेली असून या निष्कांचन संतकवीच्या प्रीत्यर्थ सर अलेक्झांडर ग्रांट या तुकारामभक्तानें २४,००० रुपयांची रक्कम सरकारांतून देवविली होती. कै. शंकर पांडुरंग

१. संपादक रा. म. आठवले (भाइसंमं. त्रैमासिक, वर्ष २३, अं ४).
२. संपादक, दा. कें. ओक ( „ „ „ „ ).

पंडित यांची ही ४६२१ अभंगाची गाथा 'इंदुप्रकाश' प्रत या नांवानें ओळखिली जातें. हिंचें पुनर्मुद्रण गतवर्षी मुंबईसरकारनें श्री. पु. मं. लाड यांचें साहाय्यानें केलें. तुकारामांची दुसरी महत्त्वाची गाथा वारकरी संप्रदायांतील एक आचार्य कै. विष्णुबोवा जोग यांनीं इ. स. १९०९ मध्यें संपादित केली असून परंपरेवर आधारलेली असल्यानें ती सर्वमान्य होऊन बसली आहे. महाराष्ट्र-सारस्वतकार कै. भावे यांनीं इ. स. १९२० मध्यें प्रसिद्ध केलेली 'तुकारामांची अस्सल गाथा' ही एका निराळ्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. तुकारामांच्या चौदा टाळकऱ्यांपैकीं संताजी जगनाडे हा त्यांचा लेखक असून त्याच्या हातच्या अभंगांच्या वह्या तळेगांव-दाभाडे येथें त्याच्या वंशजांपाशीं आहेत. अर्थात् या संहितेच्या प्रामाण्यासंबंधीं याहून अधिक लिहिणें न लगे. या अस्सल गाथेंतील भाषा इतर गाथांतील भाषेहून पुष्कळच अशुद्ध, किंबहुना गांवढळ वाटते, हें खरें. परंतु तुकोबांच्या तोंडची आणि संताजीच्या हातची हीच खरी भाषा असून शिवकालीन लौकिक मराठीचा तो अस्सल नमुना आहे.

तुकारामांचें शिष्यमंडळ :—तुकारामांनीं मेघवृष्टीनें उपदेश केला असला तरी त्यांच्या शिष्यांपैकीं फारच थोड्यांचीं नांवें आपणांस ठाऊक आहेत. त्यांतील कांहींनीं थोडेंफार कवित्व केलें असून त्याची दखल घेणें जरूर आहे. पैकीं **गंगारामबुवा मवाळ व संताजी तेली जगनाडे हे** कवि म्हणून जरी नाहींत तरी तुकोबांचे लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत, व त्यांतील संताजीच्या हातच्या अभंगांच्या कांहीं वह्याहि उपलब्ध झालेल्या आहेत. संताजीची समाधि देहूजवळील भंडारा डोंगराच्या पायथ्याशीं सुदुंबरें या गांवीं आहे. आधीं निंदा करून मागाहून तुकारामांचा एकनिष्ठ भक्त झालेला **रामेश्वर भट** हा ग्रंथकार म्हणून प्रसिद्धीस आल्याचें दिसत नाहीं. गाथ्यांतून रामेश्वर भटाच्या नांवावर अवघे चारच अभंग आढळतात. परंतु त्यांतूनहि त्यांची उत्कट तुकारामभक्ति दिसून येते. विशेषतः तुकारामांच्या योग्यतेचें मोजमाप करतांना रामेश्वर भटानें त्यांस अनुलक्षून योजिलेलें 'विश्वसखा' हें विशेषण किती सार्थ आहे! तुकारामांचे धाकटे बंधु **कान्होबा** यांची गणना त्यांच्या चौदा प्रमुख शिष्यांत होत असून त्यांचे शें सव्वाशें अभंग प्रसिद्ध आहेत. तुकोबा वैकुंठवासी झाल्यावर कान्होबा शोकसागरांत बुडून गेले व त्यांच्या तोंडून कारुण्यानें ओथंबलेलीं हीं कवनें बाहेर पडलीं. कान्होबास वारकरी संप्रदायांत जी मान्यता आहे ती त्याचे नाटाचे अभंग, आशीर्वाद, ललित, आणि गौळणी यांवरून विशेष आहे. तुकयाच्या अभंगवाणीचें थोडें पाणी कान्होबासहि लागलें आहे यांत संशय नाहीं. उरले शिष्य तीन. एक बहिणाबाई, दुसरे कचेश्वर

व तिसरे निळोबा, पैकीं बहिणाबाई आणि कचेश्वर् यांची माहिती आपण त्या त्या प्रकरणीं स्वतंत्रपणें घेऊं. निळोबाविषयीं मात्र मुळांत सारस्वतकारांनीं मौन धरल्यामुळें व त्यांचा विचार अन्यत्र कोठें करण्यास अवसर नाहीं म्हणून त्यांची माहिती येथेंच घेऊं.

**निळोबा** हे वारकरी संप्रदायांतील अखेरचे संतकवि होत. हे नगर प्रांतांतील पिंपळनेर या गांवचे राहणारे म्हणून पिंपळनेरकर या नांवानें ओळखले जात. वृत्ति प्रथमपासून उदासीन असल्यामुळें ईशसेवा व राजसेवा या दोहीं गोष्टी एकदम जमणार नाहींत हें पाहून तरुण वयांतच निळोबांनीं कानावरील लेखणी देवाच्या चरणीं वाहिली व विरक्त मनानें त्यांनीं घरदार सोडलें. तीर्थयात्रा करीत ते पंढरीस आले व तेथें भाविकांच्या मेळाव्यांत तुकारामांची कीर्ति कानांवर येऊन आधींच परमार्थप्रवण झालेल्या त्यांच्या मनानें तुकोबांचा एकच छंद घेतला. यावेळीं तुकारामांच्या निर्याणास वीसपंचवीस वर्षे होऊन गेलीं होतीं. अर्थात् निळोबांना त्यांचें प्रत्यक्ष दर्शन घडणें शक्य नव्हतें. परंतु 'मनीं वसे तें स्वप्नीं दिसें' या न्यायानें त्यांना देहूस आलेवेळीं तुकारामांचा स्वप्नसाक्षात्कार व अनुग्रहहि झाला. निळोबांचें ज्ञानेश्वरी, नाथभागवत व तुकोबांची गाथा या ग्रंथांचें वाचन चालूंच होतें, व या तीनहि सत्कवींचा परिपाक त्यांच्या वाणींत आपोआप उतरला. निळोबांनीं कोठें आत्मचरित्र लिहून ठेवलेलें नाहीं; परंतु त्यांच्या वंशजांपैकीं एकानें पुढें या संतकवींचें चरित्र सुमारें साडेतीन हजार ओव्यांत वर्णिलें असून त्याचें हस्तलिखित निळोबांच्या वंशजांपाशीं आहे. तुकारामांच्या काव्यास जसे नामदेव अप्रत्यक्ष रीत्या कारणीभूत झाले त्याप्रमाणें निळोबांचें काव्यहि त्यांच्या तुकारामभक्तींतून स्फुरलेलें दिसतें. म्हणजे निळोबांची आध्यात्मिक परंपरा निराळी असली तरी त्यांची वाङ्मयीन परंपरा नामदेव–तुकाराम–निळोबा अशी आहे. तुकाराम हें त्यांच्या काव्यस्फूर्तीचें बीज होय. तीच भावनेची उत्कटता व शब्दयोजनेंतील ठाकठिकी या गुरुशिष्यांत पहावयास मिळते. निळोबांची तुकाराम-भक्ति किती उत्कट होती हें 'निळा म्हणे आम्ही नोळखूंचि देवा । तुकयाचा धांवा करीतसों' या उद्गारांवरून लक्षांत येईल. तुकारामांच्या स्तुतिपर त्यांनीं कांहीं श्लोकशतकें रचिलीं असून त्यांतील श्लोकांची घडण जरी ओबडधोबड असली तरी त्यांत एक प्रकारचा प्रेमळपणा आहे. एकंदरींतच वारकरी संप्रदायांतील संतकवींना श्लोकरचनेचें थोडें वावडें दिसतें. असो निळोबांची कविता येथून तेथवर एका अधिकारवाणीनें भरलेली असून स्थूलमानानें ती तुकारामांच्या वळणावर गेली आहे. तुकारामांच्या अभंगांतून उमटलेलें त्यांचें सामाजिक मन मात्र निळोबांच्या

गाथ्यांत अनुभवास येत नाहीं. याचें कारण उघड आहे. तुकारामांस आपल्या हीन जातीची जाणीव सतत असल्यानें त्यांच्या वाङ्मयावर जो एक सामाजिक रंग चढला तो निळोबांच्या बाबतींत, ते ब्राह्मण असल्यामुळें चढणें संभवनीय नव्हतें. अर्थात् तुकारामांचें काव्य जसें एकदमच आत्मनिष्ठ व समाजनिष्ठ असें दुहेरी आहे, त्याप्रमाणें निळोबांचें नाहीं. ते केवळ स्वतःशीं बोलतात, समाजाशीं बोलत नाहींत. हा एक भेद सोडल्यास गुरु-शिष्यांची अभंगवाणी अगदीं एक आहे. एका अभंगांत निळोबा म्हणतात —

" मार्ग दाबुनि गेले आधीं । दयानिधी संत ते
येणेंचि पंथें चालों जातां । न पडे गुंता कोठें कांहीं "

याप्रमाणें कृपावंत संतांचा मागोवा घेत आपण वाटचाल करीत. आह्मों असें म्हणणाऱ्या निळोबांनीं स्वतः या मार्गांत अमोल अशा स्वानुभवाची भर घातली आहे यांत शंका नाहीं. तुकारामांचा प्रत्यक्ष सहवास मुळींच लाभलेला नसतांना त्यांच्या अभंगवाणींतून स्फूर्ति घेऊन निळोबांनीं जें वाङ्मयीन व पारमार्थिक कार्य केलें त्यास मराठी साहित्याच्या इतिहासांत दुसरा दाखला नाहीं. तुकारामांच्या संप्रदायाचा म्हणजे वारकरी पंथाचा वारसा शेवटीं निळोबांकडे आला व भागवतधर्माची पताका महाराष्ट्रभर पुनः एकवार नाचविण्याचें महत्कार्य त्यांनीं केलें. वारकरी संप्रदायांत तुकोबांच्या नंतर होऊन गेलेल्या संतकवींच्या वचनांवर कीर्तन किंवा प्रवचन करावयाचें नाहीं असा एक दंडक आहे. परंतु निळोबा हे या नियमास अपवाद असून त्यांच्या अभंगांवर कीर्तनें-प्रवचनें नित्य होत असतात. एक संतकवि या दृष्टीनें त्यांच्या मोठेपणाची खूण याहून दुसरी ती कोणती ?

## अभ्यासाचीं साधनें


महिपतिबोवा ताहराबादकर : भक्तविजय.
ल. रा. पांगारकर : श्रीतुकारामचरित्र.
बा. अ. भिडे : तुकारामबोवा.
रा. द. रानडे : तुकारामवचनामृत ( प्रस्तावना ).
रा. ग. हर्षे : तुकाराम.
वि. का. राजवाडे : तुकाराम ( ग्रंथमाला, अंक ११६ ).
पटवर्धन—केळकर : तुकारामाच्या अभंगांची चर्चा.
वा. सी. बेंद्रे : तुकारामकृत मंत्रगीता ( प्रस्तावना ).
भाइसंमं. मंडळ, पुणें : शिवाजी—निबंधावलि, भा. १.
J. F. Edwards : Tukaram ( Hastings' Encyclo. )




शिवसमर्थयोगः—रामदासांचा शिवाजीशीं असलेला संबंध ही त्यांच्या चरित्रांतील एक महत्त्वाची बाब आहे. याविषयीं श्री. भावे यांनीं प्रस्तुत प्रकरणांत विशेष चर्चा न केल्यानें ती येथें करणें अवश्य आहे. रामदासांच्या निधनानंतर चारच दिवसांनीं लिहिलें गेलेलें 'वाकेनिशी' टिपण, त्यानंतर पांचपंचवीस वर्षांनीं रचिला गेलेला गिरिधरस्वामीकृत 'समर्थप्रताप', हनुमंतस्वामींचे नांवावर ओळखली जाणारी परंतु प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीस आणि चाफळ संस्थानचे कारभारी रंगो लक्ष्मण मेढे यांनीं शके १७१५ मध्यें रचिलेली 'हनुमंतस्वामींची बखर' व सांप्रदायिक कामदपत्रें हीं समर्थचरित्राचीं चार मुख्य साधनें होत. त्यांच्या आधारें शिवसमर्थयोग या विषयाचा विचार आम्हीं पुढें करीत आहों. एकंदर ऐतिहासिक पुरावा पाहतां रामदासांनीं शके १५७१ वैशाख शु. ९ गुरुवार या दिवशीं चाफळ नजीक सिंगणवाडीचे बागेंत शिवाजीवर अनुग्रह केला असें दिसतें (वाकेनिशी प्रकरण, १८). परंतु यासंबंधीं मतैक्य नाहीं. समर्थांनीं शिवाजीवर अनुग्रह केव्हां केला यासंबंधीं महाराष्ट्रांत अलीकडे मोठा वाद माजून गेला; आणि मतमतांतरांनींच केवळ नव्हे, तर जातीयतेनेंहि इतिहासाचें हें विशुद्ध वातावरण कांहीं काळ दूषित करून टाकलें. आज हा वाद तुटला नसला तरी स्मृतिशेष झाला आहे, एवढें निश्चित[1].

या वादाची साधार, सविस्तर मांडणी स. सं. अळतेकर[2] आणि अनंतदास रामदासी[3] यांनीं केलेलीच आहे. इतिहासजमा झालेल्या या वादाची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नसलें तरी एका वादांगाचा उल्लेख मात्र अवश्य करावयास हवा. वाकेनिशी टिपण प्रसिद्ध झाल्यावर त्याला आणि तें प्रमाण मानणाऱ्या राजवाडे-देवांना पहिला जोराचा विरोध गो. चिं.

१. वरील मजकूर लिहिल्यानंतर प्रो. न. र. फाटक यांचें श्रीसमर्थ चरित्र प्रसिद्ध झालें. या ग्रंथांत प्रो. फाटक पुन: एकवार शिवसमर्थ भेट शके १५९४ मध्यें झाली असे सिद्ध करूं पाहत आहेत. त्यांच्या मताचें खंडन श्री. ज. स. करंदीकर यांनीं नुकतेंच केलेलें असल्यानें (सह्याद्रि, ऑगस्ट १९५१) येथें पुन: त्याची चर्चा करणें अनावश्यक आहे.

२. श्रीसमर्थचरित्र, भाग ६ वा.

३. श्रीसमर्थांचा गाथा प्रस्तावना, पृ. ४०–७४.

भाटे आणि गो. का. चांदोरकर यांनीं केला व पुढें 'शिवचरित्र' कार श्री. केळुस्कर, डॉ. बाळकृष्ण, सर जदुनाथ सरकार इत्यादींनीं हा पक्ष उचलून धरिला. विरोधी पक्षाच्या मतें शिवसमर्थांची पहिली भेट शके १५७१-त न होतां ती शके १५९४-मध्यें झाली व त्याच वर्षी समर्थांनीं शिवाजीस अनुग्रह दिला. केवळ कालगणनेचा प्रश्न असता तर या वादांत शिरण्याचें प्रयोजन नव्हतें आणि या दोन मतांच्या दोन टोंकांत कांहीं मेळहि बसण्याचा संभव नव्हता. परंतु वाद दोन संख्यांतील नसून दोन संप्रदायांतील आहे. चाकेनिशी टिपणाच्या आधारें बोलणाऱ्या राजवाडे-देवांचें मत खरें असल्यास शके १५७१ हा शिवसमर्थसंबंधाचा प्रारंभकाल, व समर्थ हे शिवाजीचे मोक्षगुरुच केवळ नव्हे, तर राष्ट्रगुरुहि ठरतात. विरोधी पक्षाचें मत मान्य केल्यास शिवसमर्थसंबंधास फार उशीरानें म्हणजे शके १५९४ पासून प्रारंभ होतो, व शिवाजीच्या स्वराज्यसाधनाचा समर्थांच्या नेतृत्वाशीं कांहींहि संबंध न येतां ते त्याचे केवळ मोक्षगुरु ठरतात. हे दोन संप्रदाय इतके परस्परविरोधी आहेत, कीं त्यांतून मार्ग काढणें कठिण आहे. शिवाय दोहींकडे ऐतिहासिक कागदपत्रांचा पुरावा बळकट असल्यानें हीं दोन्हीं मतें जणुं अभेद्यच आहेत असें वाटतें. तथापि तारतम्यबुद्धीनें पाहिल्यास विरोधी पक्ष लंगडा पडतो. भास्कर गोसावी आणि केशव गोसावी यांनीं अनुक्रमें शके १५८० आणि शके १५९४ मध्यें दिवाकर गोसाव्यांना लिहिलेल्या ज्या दोन पत्रांच्या आधारें विरोधी पक्ष शिवसमर्थ भेटीचा काळ पुढें ढकलतो त्या पत्रांचा अर्थ विरोधक करतात त्याहून फार वेगळा आहे. पैकीं पहिल्या पत्रांत "शिवाजी राजे यांच्याकडे भिक्षेस गेलों. त्यांनीं विचारलें, 'तुम्ही कोठले कोण?' आम्ही बोललों कीं आम्ही रामदासी. श्रीसमर्थांचे शिष्य चाफळास हों...मग ते बोलले कीं ते कोठें राहतात व मूळ गांव कोण?" असा मजकूर असून दुसऱ्यांत "राजे यांची पहिलीच भेट आहे. वाडीचे लोकांस खटपटेस आणावे.... झाडी बहुत आहे...." असा उल्लेख आहे. या दोन पत्रांवरून विरोधी पक्ष असा तर्क करतो, कीं शिवाजीला शके १५८० पर्यंत समर्थांचें नांवगांवहि ठाऊक नसून शके १५९४ पर्यंत दोघांची गांठभेटहि झाली नव्हती. परंतु हें स्थूलबुद्धीचें पाहणें झालें. समर्थांच्या ऐतिहासिक प्रकरणांशीं परिचय असलेल्या सूक्ष्म दृष्टीला वरील पत्रांचा अर्थ निराळा करावा लागेल. एक तर राजवाडे-देवांच्या मतें हीं पत्रें अस्सल नसून नकल आहेत आणि त्यांतील शकनिर्देशहि स्पष्ट नाहीं. तीं अस्सल आहेत असें गृहित धरलें तरी सुद्धां त्यांतून फारसें कांहीं निष्पन्न होत नाहीं. पहिलें पत्र शिवाजीच्या सावधपणाचें द्योतक असून दुसरें उघडउघड सांकेतिक स्वरूपाचें आहे.

तत्कालीन बिकट परिस्थिति ध्यानांत असली म्हणजे शिवाजी सावधपणें आणि रामदास संकेतानें कां बोलत आहेत तें कळून येईल. या दोन पत्रांचें समग्र विवेचन श्री. अनंतदास रामदासी यांनीं केलेलं असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. दुसरें असें, कीं शके १५७२ पासून १५८० पर्यंतच्या आठ वर्षांतील शिवसमर्थांच्या भेटीगांठीचे इतके उल्लेख वारेनिशी टिपणांत आणि हनुमंतस्वामींच्या बखरींत आहेत, कीं या काळांतील शिवाजीच्या राजकारणाचे समर्थ हेच सूत्रधार होत याविषयीं कोणाच्याहि मनांत संशय राहूंच नये. बरें, 'रामवरदायिनी', 'आनंदवनभुवन', आणि यांसारखीं समर्थांचीं इतर ऐतिहासिक प्रकरणें पाहिलीं तरीं तींहि शिवाजीच्या राजकारणालाच अनुलक्षून लिहिलेलीं दिसतात, व त्यांत समर्थांनीं केलेल्या सावधानतेच्या उपदेशाचें महत्व शके १५७२ ते १५८० या काळांतील कार्यमान शिवाजीला जेवढें होतें त्याच्या पाव हिस्स्यानेंहि शके १५९४ मधील कृतकार्य शिवाजीला तें नव्हतें. समर्थांनीं 'दासबोधां'त आणि अन्यत्र शिवाजीस अनुलक्षून काढलेल्या बोलांवरूनहि दोघांचा संबंध जुना म्हणजे शके १५७१ पासूनचा असावा या मतासच पुष्टि मिळते. तसेंच, शके १५८३-मध्यें प्रतापगडावर तुळजा भवानीची स्थापना शिवाजीनें समर्थांच्या हस्तें केली ही गोष्टहि येथें ध्यानांत घेतली पाहिजे. या प्रकरणीं अखेरचा आणि सर्वांत महत्वाचा पुरावा म्हणजे शिवाजीनें शके १६००-मध्यें समर्थांना करून दिलेली सनद होय. ही सनद अशी :—

आश्विन शु. १० शके १६००

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकळतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराजस्वामीचे सेवेसीं:

चरणरज शिवाजीराजे यांनीं चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे मजवर कृपा करुनु सनाथ केलें. आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्य-साधन करून धर्मस्थापना, देवब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुनु, पाळण, रक्षण करावें. हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जें मनीं धराल तें सिद्धिस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करुनु राज्यपरंपरा अक्षइ चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावीं, ऐसें जें जें मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले.

यावरून निकटवास घडुनु वारंवार दर्शन घडावें, श्रीची स्थापना कोठें-तरी होऊनु सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात, गिरिगव्हरीं वास करुनु चाफळीं सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली.

त्यास चाफळीं श्रीची पूजा मोहोछाव ब्राह्मणभोजन अतिथि इमारत सर्व यथासांग घडावें, जेथें जेथें श्रीची मूर्तिस्थापना जाहाली तेथें उछाव पूजा घडावी. यास राज्य संपादिलें. यांतील ग्रामभूमि कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी, तेव्हां आज्ञा जाहली कीं 'विशेष उपाधीचें कारण काय? तथापि तुमचें मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहला त्यास यथा–अवकाश जेथें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें, व पुढें असा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें' याप्रकारें आज्ञा जाहली. इ०..."

या सनदेंत चाफळास श्रीची स्थापना झाल्यापासून म्हणजे शके १५७० पासूनचा शिवसमर्थसंबंधाचा साद्यंत इतिहास आलेला असून पुरावा या दृष्टीनें तो निर्णायक आहे. अर्थात् समर्थ–शिवरायांचा गुरुशिष्यसंबंध प्रथम शके १५७१-मध्यें जडला व तेथून पुढें तीस वर्षें तो अव्याहत चालू राहिला असें समजण्यास विशेष प्रत्यवाय नसावा.

रामदासांची ग्रंथरचना अफाट आहे. तिचें मोजमाप करण्यासहि येथें सवड नाहीं. श्री. शंकरराव देव यांनीं आपलें उभें आयुष्य रामदासी वाङ्मयाच्या संशोधनार्थ वेंचलें असून समर्थांची बहुतेक सारी कविता त्यांनीं छापून काढली आहे. परंतु एवढेंच करून ते थांबलेले नाहींत. रामदासांचे मठ म्हणजे त्या कालांतील विद्यापीठेंच होतीं व त्यांतून महाराष्ट्रांतील सर्व लहानथोर संतकाव्यांच्या प्रती करून ठेवण्याचें काम अखंड चालत असे. हे सर्व मठ धुंडून त्यांतील असंख्य व अमोल हस्तलिखितें श्री. देव यांनीं धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत सुरक्षित ठेऊन दिलीं आहेत. या हस्तलिखितांची वर्णनात्मक विल्हेवारीहि त्यांनीं 'रामदासी संशोधन' या नांवाखालीं दोन खंडांत प्रसिद्ध केली असून तिसऱ्या खंडाचें काम चालू आहे. मराठी वाङ्मयाच्या भावी इतिहासकारास धुळ्यांतील समर्थवाग्देवतामंदिरांत वर्ष दोन वर्षें तळ दिल्यावांचून भागणार नाहीं इतका हा संग्रह अमोल आहे. या संग्रहांत रामदासांच्या हातचें असें एकमेव अस्सल पत्र असून त्याचा ठसा आम्ही महाराष्ट्र-सारस्वताच्या या नवीन आवृत्तींत समर्थांचें हस्ताक्षराचा नमुना म्हणून मुद्दाम देत आहों. हें पत्र रामदासांनीं रघुनाथभटास लिहिलेलें आहे. शके १५९६-च्या चातुर्मासांत रामदास हेळवाकच्या घळींत होते व पुढें तेथें शीतबाधा झाल्यामुळें तिकडील कार्यें दिवाकर गोसाव्यांचे व्याही रघुनाथभट यांजवर सोंपवून ते चाफळच्या उष्ण हवेंत परतले. त्यानंतर लगोलग लिहिलेल्या या पत्रांत रामदास रघुनाथभटाचे उपकार आठवीत आपलें हृदय त्याजपाशीं उघडें करीत आहेत. मूळ पत्रांतून

महत्वाचा भाग पुढें देतों[१]-

"...तुमचा निरोप घेउन् हेलवाकीहून स्वार जालों ते सुखरूप चाफलास पावलों...आपण ते कर्कष सीतलाईमधें बहुतचि श्रम पावलों, तो माझा सकल श्रम घेउनु मज निरोप दिधला तो उपकार देव जाणे. येविसीं चीत चमत्कारलें तें पत्रीं किती म्हणौनु लेहावें ? माझें अरिष्ट तुम्हीं घेउन मज उष्ण देशासी पाठविलें हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला. मज रघुनाथजी वेगलें कोण्ही जिवलग नाहीं...हें इतुकें म्यां आवडीच्या कळवळयानें लिहिलें आहे. मनें मन साक्ष असेल. परंतु तुम्हांस उपचारसा वाटोन रजीस होल तरी न होणें...तुमचा आमचा येकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहितां नयें म्हणौनि ये संधीमधें प्रसंग फावला, पुढें फावेना, म्हणौनि लांबेंकरून लिहिलें. वरकड इतर भाव मनामधें असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्ही रजीस न होणें, आणि जें आहे तें लिहिलें. यामधें मिथ्या स्तुति नाहीं. तुम्ही सर्वज्ञ आहां. तुमचें जें कांहीं आहे तें सकल माझेंचि आहे. म्यां मज माझ्या मनास येईल तैसें लिहिलें. येथे तुमचें काये गेलें ? कांहीं चिंता न कीजे. तुम्ही आमचेचि आहां. तुम्ही आम्ही सकळ देवाचे आहों. शरीर-भेदावरी न जाणें. अंतरस्थिति पाहिल्याउपरी कलों येईल."

अभ्यासाचीं साधनें:—

| | |
|---|---|
| अंताजी गोपाळ वाकनीस | : वाकेनिशी प्रकरण. |
| गिरिधर स्वामी | : श्रीसमर्थप्रताप. |
| हनुमंतस्वामी | : रामदासांची बखर. |
| शं. श्री. देव | : श्रीसमर्थ-हृदय. |
| स. खं. आळतेकर | : श्रीसमर्थ चरित्र. |
| वि. का. राजवाडे | : श्रीसमर्थ रामदास. |
| रा. द. रानडे | : रामदासवचनामृत ( प्रस्तावना ). |
| न. र. फाटक | : श्रीसमर्थ चरित्र. |
| अनंतदास रामदासी | : श्रीसमर्थांची गाथा ( प्रस्तावना ). |
| सत्कार्यो. सभा, धुळें | : श्रीसंप्रदायांचीं कागदपत्रें, खंड १ ते ५. |
| सत्कार्यो. सभा, धुळें | : श्रीसांप्रदायिक विविध विषय, खं. १ ते ४. |
| सत्कार्यो. सभा. धुळें | : श्रीरामदासीचीं ऐति० टिपणें. |
| सत्कार्यो. सभा, धुळें | : सुमनहार, १ ते १०. |
| W. S. Deming | : Ramdas and Ramdasis. |

१. सोबत छापलेल्या ठशांत ' ( याम ) धें मिथ्यास्तुति नाही... ' येथपासून तों अखेरपर्यंतच्या नऊ ओळी आल्या आहेत.

जयरामस्वामींच्या ग्रंथरचनेचे शक अनुक्रमें पुढीलप्रमाणें आहेत. सीतास्वयंवर ( श. १५७० ). रुक्मिणीहरण ( श. १५७६ ), अपरोक्षानुभव ( श. १५९१ ). पैकीं शेवटला ग्रंथ ( ओवीसंख्या १७८० ) म्हणजे शंकराचार्यांच्या मूळ ग्रंथावरील टीका असून स्वामींनीं तो तोंडानें सांगितला व एका शिष्यानें लिहून घेतला असें दिसतें. जयराम स्वामींच्या चरित्राची एक बखर उपलब्ध असून तींत 'एक लंगोटी, अंगावर एक छाटी, खालीं बसावयास पांढरें घोंगडें, पाणी पिण्याचा तुंबा, याशिवाय कांहींएक संग्रह नाहीं, सर्वकाळ आत्मसुखांत निमग्न असावें,' याप्रमाणें स्वामींचे गुरु कृष्णाप्पा यांचें वर्णन आलें आहे. बखरकाराच्या म्हणण्याप्रमाणें कृष्णाप्पांनीं जयरामस्वामीस केलेल्या उपदेशाचें सार 'लोकांत वागावें आणि समाधि तर मोडूं नये' असें आहे. रंगनाथस्वामींचे मुख्य शिष्य दोन. एक अनंत व दुसरे गोपाळ. पैकीं गोपाळाचा समाधिशक १६१२ असून या दोघांनीं मिळून कांहीं काव्यरचना केली आहे. रंगनाथस्वामींच्या आनंदसांप्रदायांतील सहजानंदादि पूर्वकवि १५-१६ व्या शतकांतील आहेत, हें आपण मागें पाहिलेंच. महाराष्ट्रांतील या आनंद संप्रदायानें सहजानंद, पूर्णानंद, सदानंद, अच्युताश्रम, रंगनाथस्वामी, त्यांचे बंधु विठ्ठल किंवा आत्यास्वामी, पुतणे श्रीधर असे अनेक ग्रंथकार मराठी भाषेस दिले आहेत. पैकीं प्रसिद्ध कवि श्रीधर हे रंगनाथस्वामींचे चुलत पुतणे होत. या घराण्याची हकीकत आपण पुढें श्रीधरावरील प्रकरणांत पाहूंच. रंगनाथस्वामींची कविता विपुल आहे. विशेषतः त्यांची पदें फार गोड आहेत[1]. ज्याचा उल्लेख सारस्वतकार करतात तें 'योगवासिष्ठसार' या रंगनाथस्वामीनें कदाचित् रचिलेलें असेलहि. परंतु रंगनाथी योगवासिष्ठसार टीका ही एक घोटाळ्याची बाब कशी होऊन बसली आहे व मुद्रित टीकेचें कर्तृत्व रंगनाथ निगडीकराकडे न जातां तत्पूर्वकवि रंगनाथ मोगरेकर यांजकडे कसें जातें, यासंबंधीं विवेचन मागें ११-व्या प्रकरणाच्या पुरवणींत येऊन गेलेंच आहे. या रंगनाथी योगवासिष्ठाचा गुंता नीटपणें ध्यानांत यावा म्हणून प्रो. पोतदार यांचें एतद्विषयक संशोधन मुळांतून पाहण्याविषयीं आम्ही वाचकांस पुनः एकवार सुचवितों[2]. तुकाविप्राविषयीं सारस्वतकारांनीं फारच त्रोटकपणानें लिहिलें

१. पदसंग्रह ( संपा. निगडीकर, ), कवितासंग्रह ( संपा. भावे, ).

२. प्रो.जोशीकृत श्रीधरचरित्र (प्रस्तावना, पृ. २३ ते२६; ५६ ते ६२).

आहे. वास्तविक पाहतां हे थोर भागवत कवि थोडे उत्तरकालांतील आहेत. परंतु सारस्वतकारांनीं त्यांचा उल्लेख या प्रकरणांत केलेला असल्यानें आपणहि त्यांजविषयीं येथेंच बोलूं. तुका विप्रांचा जन्मशक 'अर्वाचीन कोश'कार १६६२ तर डॉ. हर्षे १६५१ असा देतात. आधार असा कोणत्याच मतास नसला तरी तुका विप्र शके १६५०-च्या सुमारास जन्मले असावे असें आम्हांस वाटतें. तुकाविप्रांचा संबंध एकनाथांशीं पोंचतो हें पुढें त्यांचा मातृवंश डॉ. हर्षे यांच्या ज्ञानदेवीच्या प्रस्तावनेंतून दिला आहे त्यावरून कळून येईल.

मूळ पुरुष — १ भानुदासांचे वडील, २ भानुदास, ३ चक्रपाणी, ४ सूर्य, ५ एकनाथ.
— १ श्रीपती, २ केशव, ३ गोविंद, ४ माधव, ५ यादव, ६ गोविंद, ७ अनंत (एकनाथांचे सांप्रदायिक वारस), ८ विठ्ठल, ९ विप्रनाथ, १० चिमणी, ११ तुकाविप्र.

यावरून दिसतें, कीं एकनाथांचे भागवत-संप्रदायी वारस त्यांच्या चुलत घराण्यांतील पुतण्याचे चिरंजीव जे अनंतबुवा त्यांच्या वंशांतील विप्रनाथ हे एक सत्पुरुष व या विप्रनाथांची मुलगी चिमणाबाई ही तुकाविप्रांची आई होय. तुकाविप्र यांनीं आपल्या नांवास विप्र हें पद जोडलें तें आपल्या नांवाच्या देहूकर तुका वाणी यांच्या नांवाशीं घोटाळा होऊं नये म्हणून नव्हे, तर आपले गुरु विप्रनाथ यांचें नांव त्यांनीं आपल्या नांवास जोडलें आहे. तुकाविप्रांचें संपूर्ण नांव तुकाराम भगवंत विपट, व त्यांच्या आईचे वडिल विप्रनाथ हेच त्यांचे गुरु होत. तुकाविप्र हे साताऱ्याकडील असल्यानें तपश्चर्येसाठीं कृष्णेच्या कांठीं तारगांवास बोरवनांत बसत, म्हणून त्यांच्या वंशजांस बोरवनकर असें नांव पडलें आहे. तुकाविप्रांचें मन कृष्णातीरीं विशेष रमलें असावें असें त्यांचे कांहीं अभंग पाहून वाटतें. त्यांच्या नांवावर 'सूचि' कारांनीं कांहीं किरकोळ प्रकरणांचा उल्लेख केला असला तरी तुकाविप्रांची बरीचशी कविता अप्रसिद्ध आहे. पैकीं कांहीं कीर्तनविषयक अभंग कै. आचार्यांनीं प्रसिद्ध केले असून तुकाविप्र कोंकणांत गेलेवेळीं ही अभंगरचना त्यांचे हातून झाली असावी असें दिसतें. पुढील अभंगांत स्थळ व काळ दोहींचा उल्लेख आहे—

"माघ सुद्ध तीथी षष्ठी भृगुवार । मुरूड नगर सिंधूतीरीं
भगवंतीचिया देउळीं कीर्तन । समस्त दर्शन भूदेवाचें
संवछर नामे विकारी प्रमाण । शक शाळीवान हरिकथा
तुकाविप्र भेटी सत्राशत येक । सिंधुचि कै तुके श्रीहरिचे"

म्हणजे शके १७०१-मध्यें तुकाविप्र कोंकणांत होते. त्यांचा संचार महाराष्ट्रभर होई व जेथें जात तेथें ते कीर्तनभक्तीचा उदो करीत. त्यांच्या मठासाठीं सातारा जिल्ह्यांत नांदगांव, बोरवन व ब्रह्मपुरी; कोंकणांत राजापूर व रत्नागिरी; मोगलाईत अंजनवती व गोंडी इतक्या ठिकाणीं इनामें देण्यांत आलीं आहेत यावरून त्यांच्या संचाराचा व्याप ध्यानांत येईल. याच संचारांत तुकाविप्रांना (त्यांच्या मतें १३-व्या शतकांतील) ज्ञानेश्वरीची सिद्धनाथी प्रत लाभली असें डॉ. हर्षे यांचें म्हणणें आहे. तें कसेंहि असो, तुका विप्रांना तेव्हांच्या काळांत सर्वजण मानीत यांत कांहीं शंका नाहीं. तुकाविप्रांची समाधि अंजनवतीस गोदातीरीं आहे. त्यांचा समाधिकाल शके १६९० असा कै. राजवाड्यांनीं दिला आहे[१] तो बरोबर नाहीं. कारण शके १७१० मध्यें मृत झालेल्या ज्योतिपंत महाभागवतांचा उल्लेख स्वतः तुकाविप्रांनीं केला आहे तो असा– "ज्योतिमाजीं ज्योती मिळाला देखून। करीत गायन तुकाविप्र." म्हणजे तुकाविप्रांचें निधन शके १७१०-च्या नंतर केव्हांतरी ('अर्वाचीनकोश' कारांचें मतें शके १७१२ व डॉ. हर्षे यांचें मतें शके १७१३) झालें असणार. असो. दासपंचायतनांतील तिसरे कवि **आनंदमूर्ति** ब्रह्मनाळकर यांजविषयीं राजारामप्रासादीकृत भक्तमंजरींत पुढील उल्लेख आहे. 'ब्रह्मदेव भट्‌जी ज्योतिषी। आगळगांवीं वृत्ति तयाशी। सावित्रीनाम स्त्रियेसी। निश्चयेसी पतिव्रता॥' सारस्वतकार व 'सूचि'कार दोघांनींहि वरील माहितीचाच अनुवाद केलेला दिसतो. पण ब्रह्मनाळ येथील आनंदमूर्तींच्या मठांतील कुळकट व इतर कागदपत्रें पाहतां वरील माहिती चुकीची दिसते. या कागदपत्रांतून आनंदमूर्तींच्या वडिलांचें नांव बाळंभट बिन भानभट असें असून ते कसबे ढालगांव येथें राहत असा उल्लेख आढळतो. ब्रह्मदेवभट व सावित्री हीं नांवें अनुक्रमें त्यांचे बंधु व भावजय यांचीं आहेत. तसेंच पत्रांवरून आनंदमूर्ति आपले वडील बाळंभट हे हयात असतांनाच वसगडे गांवीं निराळा संसार थाटून राहिले होते, असेंहि कळतें. राजारामप्रसादीनें आनंदमूर्तीस 'गीताकार' म्हटलें आहे. परंतु त्यांनीं रचिलेली गीताटीका अजून तरी उपलब्ध झालेली नाहीं. आनंदमूर्तींच्या नांवांवर एक 'राम-चरित्र' मात्र 'सूचि'कार उल्लेखितात. आनंदमूर्तींची गुरुपरंपरा अशीः– रंगनाथ मोगरेकर–काशीराज–रघुनाथ–आनंदमूर्ती. म्हणजे रंगनाथस्वामी मोगरेकर हे त्यांचे परमश्रेष्ठी गुरु होत. आनंदमूर्तींचे चरित्रकार लिहितात, कीं त्यांचे गुरु रघुनाथस्वामी हे शके १५६७-त आपला कावडीचा नेम चालवीत काशीहून रामेश्वराकडे जात असतां कृष्णाकांठीं निमज-

---

१. 'राजारामप्रासादीकृत भक्तमंजरीमाला' (प्रभात मासिक, १–७)

ढालगांवकडे आले असतां ढालगांवचे कमावीसदार अप्पाजीपंत देशपांडे त्यांचे चरणीं लागले. या प्रसंगाच्या वर्णनांत 'आनंदचरितामृत'-कार म्हणतो:

"प्रत्यहीं एकांतामाजीं जाण । योगवासिष्ठसार विवेचन ।
पंचरत्न गीतासह व्याख्यान । निरूपण चालविलें" (अ. २)

वरील ओवींत योगवासिष्ठसार, पंचरत्न आणि गीता अर्थात् चित्सदानंद लहरी या तीन ग्रंथांचा उल्लेख स्पष्ट असून हीं प्रकरणें रंगनाथ मोगरेकरकृत होत हें आपण मागें पाहिलेंच आहे. यावरूनहि आनंदमूर्ति हे रंगनाथस्वामी मोगरेकरांच्या (रंगनाथ निगडीकर नव्हे) परंपरेंतील होत हें स्पष्ट होतें. आनंदमूर्ति हे एक उत्कट गुरुभक्त असून त्यांच्या गुरुभक्तीचा उल्लेख गिरिधरकृत 'समर्थप्रतापां'त आढळतो (स. १७-९). ब्रह्मनाळ येथें आपले गुरु रघुनाथस्वामी यांचे समाधीवरील वृंदावनासमोर उभे राहून ते कीर्तन करूं लागले, कीं त्यांची गुरुभक्ति पाहून तें अचेतन वृंदावन प्रत्यक्ष डोले असें म्हणतात. खुद्द रामदासांनीं तें डोलल्याचें पाहून पुढील श्लोक रचिला असें हनुमंतस्वामी आपल्या बखरींत सांगतात.

"अचेतना जो बहु डोलवीतो । सचेतना काय न बोलवी तो
जो चिद्घनानंद आनंदमूर्ति । तदाकार राहोच आनंदवृत्ती"

ब्रह्मनाळ येथलें समाधिवृंदावन डोलल्याचा उल्लेख श्रीमंत परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांनींहि केला आहे, तो असा—"आनंदें बहु डोलती अचल जे पाषाण ते स्थावर." तात्पर्य, कथेंत थोडा तरी सत्यांश असावा असें वाटतें. जिज्ञासूंनीं शोध घ्यावा. दासपंचायतनांतील अखेरचे सत्पुरुष केशवस्वामी भागानगरकर यांचे गुरु कोणी काशिराज होत असे सारस्वतकार म्हणतात. खुद्द केशवस्वामींचीं पदें पाहिलीं तर त्यांत पूर्णानंद, सहजानंद व नित्यानंद अशा आनंदसंप्रदायांतील तिघांचे उल्लेख भिन्न भिन्न ठिकाणीं गुरु म्हणून केलेले आढळतात. मग केशवस्वामींचे खरे गुरु कोण ? केशवस्वामींच्या शिष्यकवींत सारस्वकारांनीं उल्लेखिलेल्या शिवराम व संतराज यांशिवाय गुंडा हें आणखी एक नांव आढळतें. हा स्वतःस गुंडा केशव म्हणवितो व त्यांचीं कांहीं पदें धुळें येथील समर्थ वाग्देवतामंदिरांतील बाडांतून आढळतात[१]. केशवस्वामींचीं पांचसहाशें पदें छापलेलीं असून याशिवाय त्यांच्या नांवावर एक 'एकादशीचरित्र'हि आहे.

१. बाडांक ८८, ४४७, ११४५, ११४७, ११६३, ११६५.

अभ्यासाचीं साधनें:—

द. वा. पोतदार : जयरामकृत सीतास्वयंवर ( भाइसंमं. इति शके १८३८ ).

कृ. वि. आचार्य : वडगांव मठाची परंपरा( भाइसंमं. इति.श. १८३७).

खं. चिं. मेहेंदळे : वडगांवकर मठांतील कागद ( भाइसंमं. इति. श. १८३७ )

रा. म. हर्षे : तुकाविप्र ( ज्ञानदेवी, प्रस्तावना पृ. २९ ).

पां. न. पटवर्धन : तुकाविप्रांचा प्रयाणकाल (भाइसंमं. इति.श.१८३४).

कृ. वि. आचार्य : तुकाविप्रकृत अभंग व कालनिर्णय ( भाइसंमं. त्रै. १२–४ ).

ग. ह. खरे : ब्रह्मनाळकर आनंदमूर्ति दप्तर (भाइसंमं.त्रै. १०–३).

(संपा.)श्री. ओक : आनंदचरितामृत ( सांगली ), इ.स. १९३५.



सारस्वतकारांनीं दिलेल्या वेणाबाईविषयक माहितींत कांहीं किरकोळ दुरुस्ती करून थोडी भर घालणें जरूर आहे. वेणाबाईचें माहेर मिरजेस व सासर कोल्हापुरास होतें असें सारस्वतकार म्हणतात. पण वस्तुस्थिति याच्या उलट दिसते. वेणाबाईचा जन्म कोल्हापूर येथील देशपांड्यांच्या कुळांत झाला. अर्थात् कोल्हापूर हें त्यांचें माहेर व मिरज हें सासर होय. वेणूबाईस पहिल्या भेटींत जीं 'चार उपदेशपर वाक्यें' समर्थांमीं सांगितलीं असें सारस्वतकार म्हणतात तीं आज संवादरूपानें उपलब्ध आहेत. या प्रसंगीं वेणाबाईनें केलेले पंचवीस प्रश्न व त्यांचीं आपण दिलेलीं उत्तरें अशीं दोन्ही ध्यानांत घेऊन स्वतः समर्थांनीं रचिलेले दोन अभंग प्रसिद्ध आहेत[१]. 'समर्थप्रताप'कार गिरिधर यांनीं दिलेल्या माहितीवरून वेणाबाईकडे मठांतील उपाहाराची व्यवस्था असावी असें कळतें. तसेंच उभे राहून कीर्तन करण्याचा अधिकार स्त्रियांमध्यें फक्त वेणाबाईसच होता असेंहि गिरिधर सांगतात (स. प्र. २०-३१). वेणाबाईच्या मिरज मठाची हकीकत देणारी शके १७५२ मधील एक 'यादी' प्रसिद्ध झाली असून तींत मठस्थापनेपासून पुढील सर्व इतिहास आला आहे.[२] या यादीवरून असें दिसतें, कीं रामदास व जयरामस्वामी वडगांवकर असे उभयतां कसबे मिरज येथें गेले असतां तेथील मुसलमान किल्लेदार दिलेलखान याचे आग्रहावरून समर्थांनीं वेणाबाईस मिरज मुक्कामीं मठस्थापना करून दिली. ही घटना 'शके १५७८ दुर्मुख नाम संवत्सरे श्रावण वद्य पक्षीं' झाल्याचें यादी सांगते. वेणाबाईच्या दोन काव्यांचा परिचय सारस्वतांत आलाच आहे. याशिवाय 'श्रीरामगुहसंवाद' हें आणखी एक रामचरित्रविषयक प्रकरण तिच्या नांवावर आढळतें. गिरिधरकृत 'समर्थप्रतापां'तील "समर्थ देवें वेणाबाईसी वरदानें दिधलीं। सीतास्वयंवरें रामायणें वदविलीं" (स. प्र. ११-४४) या ओवीवरून वेणाबाईनें एकादें रामायण रचिलेलें असावें व 'संकेत' रामायणाचीं पहिलीं सहा कांडें वेणाबाईकृत आणि शेवटचें गिरिधरकृत असावें अशी कल्पना शं. श्री. देव यांची होतीच[३]. अलीकडे या कल्पनेस थोडा आकार आला असून धुळें येथील समर्थ-वाग्देवतामंदिरांतील बाडांक ७४५ हें वेणाबाईकृत रामायण म्हणून प्रसिद्धहि

१. श्रीरामदासांची कविता, खं. १, पृ. २४२, अ. ६४; पृ. २३०, अ. ३९.
२. श्रीरामदासोचीं ऐतिहासिक टिपणें, पृ. ५३ ते ५६.
३. गिरिधरकृत 'समर्थप्रताप' व 'संकेतरामायण' (प्रस्तावना).

झालें आहे. या रामायणांतील प्रत्येक ज्ञाताच्या शेवटीं वेणाबाईंचा नामनिर्देश असून त्याचीं पहिलीं पांचच कांडें या कवयित्रीनें रचिलेलीं दिसतात. कारण वेणाबाईच्या या सुमारें दीडहजार श्लोकांच्या रामायणांत युद्ध आणि उत्तर हीं दोन कांडें अजीबात नाहींत. रचना मात्र प्रेमळ असून ती वाचतांना 'श्रवताति नीरें नयनारविंदें' हा अनुभव पदोपदीं येतो. याखेरीज 'सिंहासन' व 'उपदेशरहस्य' अशीं दोन प्रकरणें वेणाबाईनें रचिल्याचें 'दासविश्रामधाम'कार सांगतात. गिरिधरस्वामी हे वेणाबाईच्या शाखेंतील असून त्यांची गुरुपरंपरा रामदास—वेणाबाई—बाइयाबाई—गिरिधर याप्रमाणें आहे. असो. जिचा उल्लेख मात्र सारस्वतकारांनीं केला ती **अंबाबाई** किंवा **अंबिकाबाई** 'समर्थप्रतापा' वरून पाहतां मूळची विजापूरची असून करवीरप्रांतीं मठ करून राहिलेली दिसते (स. प्र. ११–२०). तिचा मठ कोल्हापूरप्रांतीं राशिवड्यास असून तेथें तिची कविता मात्र उपलब्ध होत नाहीं. तुकारामशिष्या **बहिणाबाई** हिच्या नवऱ्याचें नांव रत्नाकर पाठक असें असून त्याचें घराणें शाक्तांचें होतें. बहिणाबाईस प्रापंचिक सुख विशेष लाभलेलें दिसत नाहीं. तिच्या आत्मचरित्रपर अभंगांवरून पाहतां तिला तुकारामांचा स्वप्नदृष्टांत शके १५६२ कार्तिक वद्य ५ स रविवारीं झालेला दिसतो. तुकारामांच्या निर्याणसमयीं बहिणाबाई देहूस नसावी असें वाटतें. त्यांच्या पश्चात् तिनें कांहीं वर्षें रामदासांच्या सहवासांत काढलीं व त्यामुळें तिचें नांव जसें तुकारामांच्या तसेंच रामदासांच्याहि शिष्यमंडळांत आढळतें. मध्यंतरीं बहिणाबाई ही वारकरी कीं रामदासी, कीं बहिणाबाई दोन इत्यादि शंका निघाल्या होत्या. परंतु कै. पांगारकर यांनीं शिऊर येथील पोथ्या व कागदपत्रें पाहून बहिणाबाई एकच व त्या तुकारामांच्या शिष्या होत असा निर्णय दिला व तो बरोबर आहे. रामदासांच्या सान्निध्यांत त्या उत्तरवयांत होत्या हें मात्र खरें. रामदासांनीं त्यांना दिलेली दासमारुतीची मूर्ति बहिणाबाईच्या शिऊर येथील राममंदिरांत पूजेंत आहे. बहिणाबाईच्या अभंगाचा गाथा श्री. उमरखाने यांनीं प्रसिद्ध केला असून त्यांत आत्मचरित्राचे ५३ व निर्याणाचे ३५ असे एकूण ८८ अभंग असून त्याशिवाय भक्तिपर सुमारें ४०० आहेत. निर्याणाचे अभंग तिनें मरणापूर्वीं कांहीं काळ आपला मुलगा विठोबा यास स्वमुखानें सांगितलेले असून त्यांत बहिणाबाईनें स्वतःच्या बारा पूर्वजन्मांची हकीकत तपशीलवार दिली आहे.

"संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ १ ॥

ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ २ ॥....

तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥ ५ ॥
बहेणी फडकती ध्वजा । निरूपण केलें वोजा ॥ ६ ॥

हा भागवत धर्माची परंपरा सांगणारा सुप्रसिद्ध अभंग बहिणाबाईचा असून एवढा एकच अभंग लिहूनहि त्यांची कीर्ति अमर व्हावी इतकें त्याचें मोल आहे.

## अभ्यासाचीं साधनें

शं. श्री. देव : वेणाबाईकृत सीतास्वयंवर (प्रस्तावना).
शं. श्री. देव : वेणाबाईचा मिरजमठ (रामदासीची ऐति. टिपणें).
ग. शं. देव : वेणाबाईकृत रामायण (प्रस्तावना).
"अनुचर" : अंबिकाबाई, मठ राशिवडें. श्रीसांप्र. विविध विषय, खं. २.
वि. का. राजवाडे : बयाबाई रामदासी (भाइसंमं. इति. शके १८३३).
उमरखाने : बहिणाबाईच्या अभंगांची गाथा.
शि. म. परांजपे : पुनर्जन्म व पूर्वजन्म (साहित्यसंग्रह, भा. २).
ज.र. आजगांवकर: महाराष्ट्र संतकवयित्री.



## वामन पंडित

स्वचरित्राविषयीं मौन धरणाऱ्या प्राचीन कवींपैकीं वामन पंडित हा प्रमुख होय. त्यांतच वामन या नांवानें रचना करणारे एकाहून अधिक कवि व वामनाच्या म्हणून सांगितल्या जाणाऱ्या दोन समाधि यामुळें वामनाच्या चरित्रांत बरीच गुंतागुंत झाली आहे. तसेंच, केवळ कांहीं कल्पना व ओळी सारख्या दिसल्यानें दोन स्वतंत्र रचना एकाच वामनाच्या आहेत असें मानण्याची चूक कांहींनीं केली, तर थोडें निराळें वैशिष्ट्य दिसतांच तो निराळाच कवि असला पाहिजे असें कांहींनीं मानलें. या अनुमानपद्धति सदोष आहेत. प्रसिद्ध कवीच्या कल्पनांचें व शैलीचें अनुकरण दुसऱ्या एकाद्या कवीनें करणें हें जितकें स्वाभावक आहे तितकेंच एकाद्या कवीच्या समृद्ध काव्यकृतींत विविधता व वैचित्र्य प्रगट होणें हेंहि स्वाभाविक आहे.

वामन पंडिताच्या बाबतींत दोन गोष्टी निश्चित करणें आवश्यक आहे. ' यथार्थदीपिका ' कार वामन हाच मराठी वाङ्मयांतील मुख्य वामन असून त्याची रचना कोणती, त्याचा काल कोणता हें ठरविलें पाहिजे; आणि त्याची नसलेली कोणती रचना त्याच्या नांवावर घुसडली गेली आहे हें पाहून ती बाजूला काढली पाहिजे. ही अ–वामनी रचना कोणाची हा विचार या ठिकाणीं अप्रस्तुत आहे. वामन पंडितावर आतांपर्यंत भावे, भिडे, देशमुख, राजवाडे, हंस, पंगु, साकळे, आठवले, ओक इत्यादि विद्वानांनीं जी टीका लिहिली आहे ती वाचून आणि मूळ ग्रंथ पाहून असें वाटतें, कीं यांतील बरीचशी टीका अनावश्यक असून वामनासंबंधींचें संशोधन वाटतें तितकें गुंतागुंतीचें नाहीं. वामन एक कीं दोन हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. कारण एका नांवाचे दोन कवि असणें स्वाभाविक आहे. महत्त्वाचा प्रश्न हा आहे, कीं या वामानचा काल कोणता ? त्याचे ग्रंथ कोणते ? या दृष्टीनें प्रस्तुत उल्लेखनीय वामन म्हणजे शिवकालीन वशिष्ठ गोत्री, शेषे उपनामाचा, यथार्थदीपिकाकार वामन हाच होय. भागवतांतील श्रीकृष्णचरित्रें रसाळपणें गाणारा, 'निगमसारां'त ब्रह्मसाक्षात्काराचा अनुभव सांगणारा आणि आयुष्याच्या शेवटीं शेवटीं यथार्थदीपिका लिहिणारा वामन म्हणजेच सुप्रसिद्ध वामन पंडित होय.

या वामन पंडिताची रचना कोणती तें निश्चित करण्यासाठीं आपणापाशीं आधीं कांहीं निकष पाहिजेत. असें म्हणतां येईल, कीं ज्या रचनेंत वामनाचें नांव व गोत्र यांचा स्पष्ट उल्लेख आहे, व ज्या रचने-

विषयीं त्यानें आपल्या अन्य ग्रंथांतून स्पष्ट असा उल्लेख केलेला आहे ती रचना निःसंशय वामनाचीच होय. याशिवाय अनेक प्रकरणें अशीं आहेत, कीं ज्यांत वामनाचीं संपूर्ण वैशिष्ट्यें स्पष्ट होत असल्यामुळें तींहि त्याचीं मानावीं लागतात. या दृष्टीनें पाहतां रसानुकूल, नादवती, सहजानुप्रासात्मक वर्णरचना, कांहीं विशेष शब्द व दृष्टांत, शृंगारांतहि भक्तीचें मिश्रण, अध्यात्मप्रवणता हे वामनी काव्याचे विशेष ज्या काव्यांत दिसून येतात तीं काव्यें, म्हणजे उदाहरणार्थ, अपरोक्षानुभूति, तत्त्वमाला, अनुभूतिलेश, सिद्धांतविजय, गजेंद्रमोक्ष, वामनचरित्र, भरतभाव, द्वारकाविजय, अहिल्योद्धार, लोपामुद्रासंवाद, राधाविलास, राधाभुजंग, हरिविलास रासक्रीडा, रुक्मिणीविलास, शुकरंभासंवाद, कात्यायनीव्रत, बालक्रीडा, कृष्णजन्म, मृत्तिकाभक्षण, दशावतारचरित्र, वामनपंडितकृत कवितासंग्रहाच्या तिसऱ्या भागांतील पदें, इत्यादि रचना होय. या साऱ्या ग्रंथांतून सहज रचना, प्रसंगसाम्य, भाषासरणी, चित्रयमकांचा अभिमानपर उल्लेख इत्यादि विशेष दिसत असल्यानें ही रचना वामनाचीच आहे असें म्हणतां येईल. राधाविलास, राधाभुजंग इत्यादि उत्तान शृंगारिक रचना यथार्थदीपिकेसारखा वेदांतप्रवण ग्रंथ लिहिणाऱ्या वामनाच्या नांवावर कशी टाकावी या भीतीनें कै. भिडे यांनीं निराळाच एक शृंगारप्रिय वामन कल्पिला आहे. परंतु असें करण्याचें कारण नाहीं. कारण शृंगारिक रचना करतांनाहि त्यांत वामनाचें भक्तिप्रवण मन व पांडित्य हीं दिसतातच. कै. भाव्यांनीं हीं प्रकरणें वामनाचींच मानलीं आहेत. इतकेंच, कीं उघडा शृंगार वर्णन केल्याबद्दल त्यांनीं खेदोद्गार काढले आहेत.

यानंतर वामनाच्या नांवावर घुसडले गेलेले ग्रंथ पाहूं. ही रचना निवडून काढणें फारसें अवघड नाहीं. ज्या रचनेंत नांव व गोत्र यांचा उल्लेख नाहीं, वामनी काव्याचे विशेष नाहींत, अथवा अन्य संप्रदायाचीं लक्षणें स्पष्ट आहेत ती रचना वामनाच्या नांवावर कोणींतरी घुसडली आहे असें समजावें. या दृष्टीनें पाहतां भीष्मयुद्ध, भीष्मशरपंजर, भीष्मभक्तिभाग्य, जयद्रथवध, विराटपर्व यांतील शिथिल रचना व पांडित्याचा अभाव, आरंभीं गणेशसरस्वतीस वंदन व शेवटीं हरिवामन अथवा हरिदिक्षित असा नामोल्लेख या गोष्टी हेंच दर्शवितात, कीं ही रचना वामनाची नाहीं. शतकत्रयाचा अनुवाद कै. भाव्यांच्या मतें वामनानें केलेला आहे; परंतु त्यांतहि शेवटीं "हरिदीक्षितकृत संपूर्णमस्तु" असा स्पष्ट उल्लेख आहे. गोरसविक्रय, स्थालिपाक, पार्थभाग्य, रसनास्तुति, नाममहिमा, भक्तिमाहात्म्य, भगवद्दास्य इत्यादि प्रकरणांविषयीं निश्चित सांगणें कठिण आहे. तथापि ही

रचना वामनाची नसावी हें मत अधिक ग्राह्य वाटतें. मनास बोध, हनुमंतस्तव, करुणाष्टक, रामस्तव, रामाचा धांवा ही स्फुटरचना रामदासी वामन गोसावी याची असावी. वामन पंडिताची कांहीं कविता अद्याप अप्रसिद्ध असावी असेंहि कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे.

वामनाच्या कवितेप्रमाणेंच त्याची चरित्रविषयक माहितीहि गुंतागुंतीची होऊन बसली आहे. शिवकालांत वामन पंडित हे संतमंडळांत व राजमंडळांत वंदनीय होते असें प्रो. पंगु मानतात. वामन पंडिताची आध्यात्मिक व पांडित्यविषयक थोरवी स्पष्टच आहे. परंतु ज्या इनामपत्राचा हवाला देऊन ते राजमंडळांतहि मान्य होते असें प्रो. पंगु मानतात तें इनामपत्र तितकें स्पष्ट नाहीं. विश्वात्मक गोसावी (प्रो. पंगूंच्या मतें वामनशिष्य) याला वामनाच्या पुण्यतिथीचा महोत्सव चालविण्यासाठीं वामननिधनोत्तर रामचंद्रपंत अमात्य व राजाराम छत्रपति यांनीं जी जमीन इनाम दिली आहे तिच्या इनामपत्रांत विश्वात्मक गोसाव्याच्या गुरूचें नांव मुळींच नसून 'आपले गुरु बहुत थोर सत्पुरुष' असा मोघम उल्लेख आहे. वामन पंडितांसाठींच हें इनामपत्र असतें तर तसें त्यांत स्पष्टपणें म्हटलें असतें. तेव्हां हा उल्लेख वामनाच्या चरित्राच्या दृष्टीनें महत्त्वाचा नाहीं. तसेंच राजारामप्रासादीनें 'भक्तमंजरीं'त वामनाच्या भविष्यकालीन ब्रह्मराक्षसयोनीची व त्याच्या गर्विष्ठपणाची दिलेली आख्यायिका म्हणजे वामनाची जाणूनबुजून केलेली कुचेष्टाच होय हें प्रो. पंगु यांचें विधानहि मान्य होणें कठिण आहे. राजारामप्रासादीनें दिलेल्या आख्यायिका निराधार अतएव असत्य आहेत यांत शंकाच नाहीं. परंतु त्या देण्यांत राजारामप्रासादीचा फक्त भावडेपणाच व्यक्त होतो असें वाटतें. शिवाय वामन पंडिताच्या वृत्तींत एक प्रकारचा ताठरपणा होता हेंहि कांहीं खोटें नाहीं. आयुष्याच्या शेवटीं शेवटीं त्यानें लिहिलेल्या यथार्थदीपिकेंत तो वारंवार प्रत्ययास येतो. राजाराम प्रासादीनें वामन पंडित हा विजापूरचा होता असें जें म्हटलें आहे त्यास दुजोरा देणारा एक संशोधनात्मक लेख नुकताच श्री. वि. अं. कानोळे यांनीं लिहिला आहे. त्यांत त्यांनीं वामन पंडिताचें घराणें म्हणजे नांदेडचें शेष घराणें होय असें सांगून वामन पंडिताचा एक पुत्र रघुनाथ ऊर्फ रघुपति हाहि एक चांगल्यांपैकीं कवि होता असें म्हटलें आहे. महिपतीनें याचीच थोर कीर्तनकार, व भगवद्भक्त म्हणून 'भक्तविजयां'त वाखाणणी केली आहे. या रघुनाथानें नैषध काव्याची एक पोथी लिहिली असून दशमस्कंधावर 'कृष्णकौतुक' या नांवाची त्याची एक श्लोकबद्ध टीका आहे. या ग्रंथाच्या एकंदर १० सर्गांपैकीं

आठ संपूर्ण व पहिला आणि शेवटचा अर्धवट इतके उपलब्ध आहेत. एकूण एक हजारावर श्लोक उपलब्ध असून त्यांची रचना थेट वामनी थाटाची आहे असें श्री. कानोले लिहितात.

वामनचरित्रांतील एक वादाचा मुद्दा विचारांत घ्यावयास हवा. तो म्हणजे वामनाचा गुरु कोण हा होय. 'निगमसारां'त वामनानें मलयाचला-वरील गुरूपदेशाच्या प्रसंगाचें विस्तृत वर्णन केलेलें आहे. श्री. रा. म. आठवले यांच्या मतें वामनाला 'भार्गववारुणी' विद्या देणारे सच्चिदानंद यति म्हणजे शृंगेरी पीठावरील शंकराचार्य होत व या भेटींचा काळ शके १५८४ ते १५९१-च्या दरम्यानचा होय. श्री ओक यांनीं हे यति म्हणजे साक्षात् भगवंतच होते असें आग्रहानें प्रतिपादिलें आहे. प्रत्यक्ष भगवंतांनीं गुरूपदेश देण्याच्या या चमत्कारावर ओकांचा विश्वास बसतो. परंतु वामन पंडितांनीं निर्वाणीचा उपाय म्हणून कड्यावरून देहत्याग केला व मग भगवान प्रगट झाले या चमत्कारावर मात्र ते विश्वास न ठेवतां हें केवळ कविकल्पनेंतील वर्णन आहे असें म्हणून देव भक्ताची कसोटी पाहतो, अंत नाहीं, असा सिद्धांतहि मांडतात. या बाबतींत प्रो. पंगु यांनीं श्री. आठवले यांच्या मताचें समर्थन केलें असून तेंच अधिक सयुक्तिक वाटतें.

वामनाचा निश्चित जन्मशक कोठेंहि सांपडत नसल्यानें केवळ अनुमाना-वर विसंबून बसावें लागतें. पंडितांचा निर्वाणकाल शके १६१७ हा मात्र सर्वमान्य आहे. आतां जन्मशक ठरवितांना त्यांच्या सबंध आयुष्याचा व आयुष्यांतील घटनांचा विचार करून त्या त्या घटनांच्या दृष्टीनें त्यांचें वय त्या त्या वेळीं काय असावें यासंबंधीं अनुमान केल्यास तें पुष्कळच बरोबर ठरेल असें वाटतें. या दृष्टीनें रा. ओक यांच्या मतें वामनाचा जन्मकाल शके १५२५ ते १५३०-च्या दरम्यान यावा. प्रो. पंगु यांनीं रंगनाथस्वामी निगडीकर यांच्या संतमालिकेंतील रामीरामदासानंतर वामनस्वामींच्या आलेल्या उल्लेखाचा निर्देश करून वामनस्वामी हे रामी-रामदासापेक्षां लहान व समर्थांपेक्षां मोठे असावे असें मत मांडलें आहे. वरील दोन्ही मतांचा साकल्यानें विचार करतां वामनांचा जन्मशक १५३०, गुरूपदेश शके १५९२ (म्हणजे वयाच्या ६२ व्या वर्षीं) आणि निर्याण शके १६१७ मध्यें (म्हणजे वयाच्या ८७ व्या वर्षीं) असें मानणें योग्य वाटतें

अभ्यासाचीं साधनें

वा. ना. हंस : वामन पंडितावरील निबंध.
वा. अ. भिडे : वामन पंडित—वृत्त व ग्रंथ.
दा. के. ओक : वामन पंडितकृत कवितासंग्रह भाग १ ते ३ [प्रस्तावना]
रं. के. साकळे : वामन पंडित दोनच [महाराष्ट्र, ता. १०-९-४४ ]
मा. गो. देशमुखः शतकत्रयकार वामन [ सह्याद्रि, ४-३ ].
रा. म. आठवले : वामन पंडितांवर कांहीं नवीन प्रकाश [ रत्नाकर, सप्टें. १९३२ ]
रा. म. आठवलेः वामन पंडिताचे गुरु कोण ? [ चित्रमय जगत्—मार्च-एप्रिल १९३२ ]
द. सी. पंगु : प्राचीन मराठी कविपंचक, प्र. २.
वि. अं. कानोले : नांदेडचें शेष घराणें [ प्रो. पोतदार स्मारक ग्रंथ ].



## प्रकरण : १९ नागेश व विठ्ठल

**नागेश** हा कवि वास्तविक पाहतां सामराजाचा समकालीन आहे. किंबहुना आपलें काव्य रचतांना त्यानें सामराजाचा कित्ता समोर ठेवलेला दिसतो. सामराजाचें रुक्मिणीहरण शके १५७५-च्या सुमारास पूर्ण झालें; तेव्हां तें समोर ठेऊन ग्रंथरचना करूं पाहणाऱ्या नागेशाचीं काव्यें शके १५७५-च्या नंतर व शके १६०४-च्या आंत निर्माण झालीं असावीं. सीतास्वयंवर हें त्याचें अखेरचें काव्य आहे आणि तो स्वतः सामराजाहून दहापांच वर्षांनीं लहान होता या दोन गोष्टी ध्यानांत घेतां त्याचा काल शके १५४५ ते शके १६१०-च्या दरम्यानचा ठरतो. सारस्वतकारांनी उल्लेखिलेल्या शके १५९१ मधील महजरावरूनहि नागेशाचा काळ स्थूलमानानें हाच येतो. या कवीचें मूळचें नांव नागभट्ट जोशी असें असून तो नागेश, नामदेव, नागेंद्र, नागजोशी व नागकवि इतक्या पांच नांवांनीं ओळखला जातो. नागेशाचे वडील मोरजोशी हे स्वतः थोडें फार कवित्व करीत व तोच गुण पुढें त्यांच्या चिरंजिवांत उतरला. कविकाव्यसूचिकार नागेशाच्या नांवावर 'आर्याटीका' हें आणखी एक प्रकरण देतात, तें कोणतें असावें? सूचिकारांनीं दिलेले नागशाचे ग्रंथरचनाशक बरोबर वाटत नाहींत [ सूचि, पृ. ५४ ].

**अभ्यासाचीं साधनें—**

वि. ल. भावे : नागेश कवीचा काल [ भाइसंम. इति. शके १८३४ ].
वि. ल. भावे : नागेश—सीतास्वयंवर [ महाराष्ट्र-कवि, शके १८२५ ].
द. सी. पंगु : नागेशकृत सीतास्वयंवर [ प्रस्तावना ].
मा. गो. देशमुख : नागेशकृत सीतास्वयंवर [ प्रस्तावना ].
द. सी. पंगु : प्राचीन मराठी कविपंचक [ नागेश ].
द. सी. पंगु : विठ्ठल बीडकरकृत सीतास्वयंवर [ प्रस्तावना ].



# प्रकरण : २० देवदास, शिवराम वगैरे कवि

या प्रकरणांत सारस्वतकारांनीं प्रारंभीं कांहीं रामदासी कवींचा विचार केलेला असल्यानें आपणहि प्रथम त्यांचीच माहिती पुढें कांहींशा विस्तारानें घेऊं. पैकीं **कल्याणस्वामी** (शके १५४० ते १६३६) हे रामदासांचे पट्ट शिष्य होत. अंबाजी या नांवानें ओळखला जाणारा हा मुलगा लहानपणीं थोडा वेडसर होता असें कांहीं समर्थचरित्रकार म्हणतात. शके १५६७-त अंबाजीस त्याच्या आईनें रामदासांच्या झोळींत घातलें व तेव्हांपासून तो समर्थांचा कल्याण झाला. ही गोष्ट कोणी सिंगापुरास तर कोणी कोल्हापुरास घडल्याचें सागतात. यापुढील ३३ वर्षें कल्याण समर्थांपाशीं छायेप्रमाणें होते. रामदासांच्या कवितेचें लेखन मुख्यत: कल्याणस्वामी करीत. 'समर्थें बोलावें, येणें लिहावें' असा प्रकार होता. यासंबंधीं 'स्वामींचा कवितासमुद्र अवघा कल्याण लीहीतसे' अशी समर्थशिष्य अनंत कवि यांची साक्ष असून स्वत: कल्याणांनीं दासबोधावरील आरतींत स्वत:चा उल्लेख 'लेखक' म्हणून केला आहे. कल्याणास समर्थांनीं घालून दिलेला एक लेखनाचा कित्ता अद्यापि डोमगांव मठांत आहे. याच मठांत कल्याणांच्या हातचें एक प्रचंड बाडहि आहे. शके १६००-मध्यें समर्थांच्या आज्ञेनें जगदोद्धार करण्यासाठीं म्हणून कल्याणस्वामी डोमगांवीं गेले ते अखेरपर्यंत तेथेंच होते. यानंतर समर्थांच्या जडदेहाचें दर्शन त्यांना पुनः घडलें नाहीं. समर्थांच्या पश्चात् कल्याणस्वामी ३३ वर्षें डोमगांवींच मठ करून होते. आणि शेवटीं योगायोग असा, कीं ज्या दिवशीं समर्थांच्या अस्थि गंगेस पोंचविण्याकरितां म्हणून चाफळ येथील वृंदावनांतून बाहेर काढण्यांत आल्या, त्याच दिवशीं इकडे परंड्यास कल्याणांनीं देह ठेविला. गुरुशिष्यांच्या अस्थि बरोबरच डोमगांवा-वरून काशीस नेण्यांत आल्या. समर्थ–कल्याणांच्या जडदेहांची ही अखेरची भेट शके १६३६-मध्यें घडली. म्हणजे कल्याणस्वामी एकूण ९६ वर्षें जगले ! समर्थांच्या पश्चात् संप्रदायांत जे वाद सुरू झाले त्यांत कल्याण पडलेले दिसत नाहींत. उलट, चाफळ मठाच्या पारपत्याधिकारा-बाबत दिवाकर आणि उद्धव यांत जो तंटा झाला त्यांतील कल्याणांची भूमिका त्यांच्या कीर्तीस साजेशीच आहे. यासंबंधीं लिहितांना एका पत्रांत दिवाकर गोसाव्यांना ते म्हणतात,

"... श्री याची आज्ञाप्रमाणें वर्तावे हें उचित. ..... वडीलपणाची निती जे परंपरागत उपासना स्थापना केली आहे ते भजन चालवावे.

येथें कलहास कारण नाहीं. ....यांच्या कलहामुळें श्रीच्या धर्मस्थापनेस अंतर पडे ऐसें न करणें...." ( श्रीसांप्रदायिक कागदपत्रें, पृ. ८५ ). कल्याणस्वामींची उपलब्ध कविता बरीच असून ती धुळ्याच्या संग्रहांतून अलीकडे ग. श्री. देव यांनीं प्रसिद्ध केली आहे. अध्यात्मपर प्रकरणें, चौचरणी ओव्या, स्फुट श्लोक, अष्टपद्या, सवाया, भूपाळ्या, आरत्या, आणि पदपदांतरें याप्रमाणें ही विविध रचना दीड हजारांच्या घरांत जाईल एवढी आहे. पैकीं " महावाक्यपंचीकरण " सर्वांत मोठें असून त्याचीं शतकें सात व ग्रंथसंख्या ७७१ आहे. छंद अभंग व विषय अध्यात्म. 'सोलीव सुख' हें ओवीबद्ध प्रकरण अनुभवाचें असून त्यांत कल्याणांचा पारमार्थिक अधिकार स्पष्ट दिसतो. तत्कालीन समर्थ संप्रदायावर प्रकाश पाडणाऱ्या ओव्या कल्याणांच्या कवनांतून अधूनमधून आढळतात. उदा०

" वृथा भांडतीं निंदिती येकमेका ।
भरा दुर्भराकारणें शिष्यशाखा ॥ ( शुकाख्यान, १५ )

हा उल्लेख उद्धव-दिवाकरांतील तंट्यासंबंधीं असावा. कल्याणकृत 'संतमाळा' थोडी मौजेची आहे. यांत श्रीरामाच्या मूर्तीवर अनेक सत्पुरुषांची कल्पना करून एक रूपक बसविलें असून त्यांत रामदास म्हणजे रामहृदय व कल्याण आणि त्यांचे बंधु दत्तात्रेय म्हणजे श्रीरामाचीं पावलें असा भाव व्यक्त केला आहे. कल्याणांनीं अनेक आरत्या व भूपाळ्या रचिल्या असून समर्थांच्या आज्ञेनें जिच्या कांठीं त्यांनीं ३६ वर्षें वास केला त्या श्रमहरणी किंवा सीना नदीवर त्यांची एक आरती आहे. कल्याणकृत दासबोधाची आरती प्रसिद्धच आहे.

**कल्याणांचा शिष्यसमुदाय** फार मोठा होता आणि त्यांत कविहि पुष्कळ होते. पैकीं कांहींच्या कवित्वाचा विचार येथेंच उरकून टाकूं. या सर्वांत तडवळे मठाचे अधिपति **जगन्नाथबोवा ऊर्फ जगज्जीवन** ( समाधि शके १६७० ) यांचें कवित्व अति प्रचंड आहे. स्फुट रामायणी प्रकरणें, पौराणिक कथा, आख्यानें अशी यांची रचना असून ग्रंथसंख्या तीन हजारांवर जाईल. हें सारें काव्य कीर्तनासाठीं निर्माण झालें असावें असें त्यांतील वृत्तांची आणि छंदांची विविधता पाहून वाटतें. रामजन्मोत्सवांत करण्यासाठीं म्हणून अनेक कथा जगज्जीवनांनीं रचिल्या असून वाल्मीकि-चरित्रापासून तों रामराज्याभिषेकापर्यंतचा भाग यांतून वर्णिला आहे. या कथांत अधूनमधून एकनाथ, समर्थ, मध्वमुनीश्वर, वेणाबाई इत्यादिकांच्या काव्यांतील निवडक व अनुरूप असे उतारे कवीनें घेतलेले आढळतात. डोमगांवच्या आसपास या कथा अजूनहि होतात. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतें या कथांचीं

---

१. बाडांक : ८०, १०६, १३१, १६३, २४२, इत्यादि.

बरींच बाडें आहेत. **शामजी** गोसावी जवळेकर ऊर्फ **शाम** कल्याण हेहि कल्याणशिष्यांपैकींच एक असून त्यांच्या व नरहरि, दिगंबर, केशव, निरंजन, नारायण बाहेकर, जना, सामराज इत्यादि कल्याणशिष्यांच्या कवितेचा परिचय श्री. देव यांनीं करून दिला आहे तो जिज्ञासूंनीं पहावा. याशिवाय एक अपूर्ण 'कल्याणचरित्र' उपलब्ध असून 'श्रीरामवंशावळी' या समर्थचरित्रांतहि कोणा कल्याणशिष्यानें आपल्या गुरूचें चरित्र सांगितलें आहे. कल्याणांच्या पश्चात् डोमगांवच्या मठाची परंपरा उज्ज्वल राखली जाऊन तो मठ सर्वांकडून मानलाहि गेला. कल्याणशिष्य मुद्गलस्वामी यांच्या निधनानंतर, म्हणजे शके १६७१-मध्यें, भालगांवचे मठपति खंडेराव हे आपल्या सांत्वनपर पत्रांत भीमाजी गोसाव्यांस लिहितात—

"श्री परधामवासी जाले. तेणेंकरून बहुत असमाधान जालें तें हृदयवासी परस्परें साक्ष असे. त तों ब्रह्मानंदघन; परंतु देहसंमंधैक उर्मि आवरत नाहीं... उपासनेचा अभिमान श्रींस आसे. आपण खेद टाकून त्यांच्या पादुकांचा ध्यास करणें. सर्व निर्वाह तेचि करितील. कांहीं चिंता न करणें. आम्हांसहि तुम्हांवेगळें आन नाहीं. बहुत बहुत प्रकारें आपलें शरिर रक्षिणें. अशनीं भाषणीं वस्त्रग्रहणी परस्छळीं स्वस्छळी सावध असणें.... आतां जें भजन कराल तें समर्थांस बहुतसे मान्य आसे. तुम्ही जे परमार्थरक्षणीं ध्वजा असा...." (सांप्र. विविध विषय, खं. २, क्र. १३).

**उद्धवस्वामी** हे समर्थांचे पहिले शिष्य होत. यांचा मुख्य मठ मोगलाईत इंदूरबोधन येथें असून दुसरा नासिक—पंचवटीजवळ टाकळीस आहे. उद्धवांची कविता विशेष नाहीं. त्यांनीं एक समर्थचरित्र लिहिल्याचा उल्लेख ग्रंथांतरीं आढळतो, परंतु अद्यापि तरी तें उपलब्ध झालेलें नाहीं. ग्रंथरचनेच्या दृष्टीनें उल्लेखनीय असे समर्थांचे शिष्य म्हणजे **दिनकर स्वामी**. यांच्या जन्ममृत्युकालाची नोंद कोठें मिळत नसली तरी शके १५५० ते १६२० च्या दरम्यान हे विद्यमान असावे असें वाटतें. यांचें मूळचें नांव बहिणंभट. पुढें समर्थांनीं उपदेश देऊन त्यांचें नांव दिनकर ठेविलें व तेंच संप्रदायांत रूढ झालें. दिनकरांचा जन्म नगरजवळील भिंगार या गांवीं पाठककुलांत झाला. या घराण्यांत विद्वत्ता परंपरागत चालत आलेली होती. दिनकरांच्या वडिलांचें नांव नरहरि व आईचें द्वारका. दिनकरांस समर्थांचा स्वप्नदृष्टांत शके १५७५ व प्रत्यक्ष अनुग्रह १५७६ फाल्गुन पौर्णिमेस झाला. त्यांचा मठ तीसगांवीं असून समर्थांच्या चौदा प्रमुख मठांतील तो एक आहे. दिनकरस्वामींच्या पश्चात् त्यांचा पुत्र रामचंद्र यानें संप्रदाय पुढें चालविला. या रामचंद्राचा 'श्रीसीताराम-

संवाद ' म्हणून एक ओवीबद्ध ग्रंथहि उपलब्ध आहे. पितापुत्रांच्या समाधि तीसगांवाजवळच आहेत. दिनकरांची स्फुट कविता बरीच असून ' स्वानुभव दिनकर ' ( रचना शके १६१६ ) हा त्यांचा मुख्य ग्रंथ होय. या ग्रंथाचे एकूण १६ कलाप असून ओवीसंख्या ६७५० आहे. दिनकरांची कविता अस्सल रामदासी थाटाची वाटते. रामदासांप्रमाणें तेहि स्वकालीन देशस्थितीचें चित्र थोडेंफार रेखाटतात. रामदासी कवितेचा त्यांचा व्यासंग किती जबर असला पाहिजे हें रामदासांच्या आवडत्या प्रमाणिका छंदांत दिनकरांनीं रचिलेल्या पुढील स्फुटावरून कळून येईल.

जयाकडे समर्थ राम । तयासि काय धामधूम
मुढांसि हे परंपरा । त्यजूनि निश्चयो खरा
सहाय राम तो कुळीं । करील काय रे हुली
उगेचि कां भरीं भरा । त्यजूनि निश्चयो खरा

**बाळकराम** हे रामदासांचे दुसरे शिष्य. बल्लाळ–केशव–गणेशप्रसादतः पुत्र–बाळकराम अशी यांची वंशपरंपरा आहे. यांचा मठ वऱ्हाडांत कारंजा येथें आहे. बाळकरामांनीं दिनकरांप्रमाणें मोठ्या प्रमाणावर ग्रंथरचना केलेली नसली तरी त्यांची पौराणिक स्वरूपाची बरीचशी स्फुट कविता कारंजा मठांत आहे. या कवितेंत ' बाळकराम सद्गुरुचा । अंकित रामदासाचा ' असा स्वतःचा उल्लेख कवि पदोपदीं करतांना दिसतो. बाळकरामाचें एक गोड पद पुढें देतों –

अध्यात्मश्रवण कुंडलें श्रवणीं । राघोबानें लेणीं लेवविलीं
रामदासहात शिरीं पिंपळपान । कुरवाळे प्रीतीनें रामराये
ऐसी रामदासी माउली स्नेहाळ । घडे घडे बाळराम पाहे

बाळकरामांचे पुत्र व शिष्य **रोकडाराम** (समाधि शके १६८८) हेहि थोडेंफार कवित्व करीत. कारंजा मठांतील बहुतेक बांधकामें या रोकडारामांनीं केवळ भिक्षेच्या बळावर केलीं असें म्हणतात. या संबंधीं त्यांचे कांहीं श्लोक आहेत त्यांतील एक असा –

बहू फीरतों पाहिले सर्व गाऊ । बरे लोकही पाहिले म्यां सदेउ
सदा सर्वदा रोकडा राम गाऊं । बरी भीक द्या देउळा काम लाऊं

समर्थशिष्य **देवदासाविषयीं** सारस्वतकारांनीं लिहिलेंच आहे. दुसरे एक समर्थशिष्य **त्रिंबकराज** यांचा मठ मोगलाईत सुकना नदीच्या कांठीं भालगांव येथें असून मठांत त्रिंबकराज व त्यांचे शिष्य **हरिहर** यांची थोडीफार कविता आहे. तसेंच सारस्वतकारांनीं उल्लेखिलेल्या शिवरामाहून भिन्न

असे दुसरे एक **शिवरास्वामी**[1] असून त्यांचा मठ तेलंगणांत होता अशी माहिती 'समर्थप्रताप'कार गिरिधर देतात [स. प्र. १०–६९]. पुढील मौजेचें डफगाणें याच शिवरामांचें असावें.

देवें लग्न केलें नाहीं । म्हणउनि पोर झालें नाहीं ।
पोराचेंहि लग्न नाहीं । म्हणवुनि बरें ॥...
पोरालाहि पोर नाहीं । पोरासाठीं कर्ज नाहीं ।
कर्जासाठीं व्याज नाहीं । म्हणवुनि बरें ॥
व्याजासाठीं दिवाण नाहीं । दिवाणाचा दंड नाहीं ।
दंडासाठीं मालें नाहीं । म्हणवुनि बरें ॥ ...
मागण्यासाठीं येळित नाहीं । म्हणवुनि प्राण देत नाहीं ।
एकासाठीं एक नाहीं । म्हणवुनि बरें ॥

योगी सर्वस्वीं मोकळा असतो हें वरील डफगाण्याचें तात्पर्य आहे. या शिवरामांची जी थोडीं स्फुट कवनें श्री. देव यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत त्यांवरून त्यांची कविता अस्सल रामदासी थाटाची वाटते. असो. बाळकरामाप्रमाणें **मुसळराम** या नांवाच्या एका समर्थशिष्याचे कांहीं अभंग[2] उपलब्ध आहेत. त्याचा उल्लेख 'समर्थप्रतापां'त आहे (स. प्र. १०–५१). मुसळरामाचा मठ गोदातीरीं आंबडचे दक्षिणेस गवराई येथें होता याहून अधिक माहिती मिळत नाहीं. मोगलाईतील नीलंगें मठाचे अधिपति व समर्थशिष्य **आण्णाप्पा** यांचेंहि थोडेंफार कवित्व असून त्यांचें चरित्र 'पादुकाख्यान' या मथळ्याखालीं त्यांच्या कोणा शिष्यानें लिहिलेलें दिसतें.[3]

आतां ज्या कवींविषयीं सारस्वतकारांनीं लिहिलें आहे त्यांपैकीं कांहींची जी अधिक माहिती मिळते ती देऊन हा भाग संपवितों. **दीन दत्तपदांकित मुकुंद** या कवीचा जन्मकाल शके १५७५ च्या सुमाराचा असून त्याची सर्व ग्रंथरचना शके १६०५ ते १६३२ च्या दरम्यानची आहे. यानें एक श्लोकबद्ध आत्मचरित्र लिहिलें असून याशिवाय त्याच्या नांवावर श्रीदत्तजन्म, ब्रह्मलिखित सुंदरकांड, अंकुशपुराण इत्यादि पांच-पंचवीस ग्रंथ आहेत. याची बहुतेक सारी रचना श्लोकबद्ध असून चामर वृत्तांतील त्याच्या एकाक्षरी सवायांत शब्द चमत्कृतिहि आहे. या सवाया

---

१. श्रीसमर्थांचे शिवराम (श्रीसांप्र. वि. वि. खंड, २, पृ. १४५).
२ श्रीसमर्थशिष्य मुसळराम (श्रीसांप्र. वि. वि. खंड, २, पृ. ८३).
३. श्रीसमर्थशिष्य आण्णाप्पा (श्रीसांप्र. वि. वि. खंड, २, पृ. १०५).

ब्रिज, नेमाडी, अभीर, बागलाणी, खानदेशी इत्यादि विविध भाषांत असून त्यांवरून जसें कवीचें अनेकभाषापटुत्व कळतें तसें त्याच्या 'छंदोरत्नाकर' या ग्रंथावरून त्याचें छन्दःशास्त्रपटुत्वहि ध्यानांत येतें. याच्या ग्रंथांचा परिचय श्री. चांदोरकर[1] यांनीं विस्तारशः करून दिला आहे. सारस्वत-कारांनीं उल्लेखिलेला **अवचित सुत काशी** हा कवि जातीनें मराठा आहे हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. 'सूचि'कार त्याचा काळ शके १५८४ असा देतात. **शिवरामस्वामींचा** मठ निजामी राज्यांतील कल्याणी येथें असून तेथेंच त्याचा अति प्रचंड असा ग्रंथसंग्रहहि आहे. याशिवाय एकेहाळी आणि आपचंद मठांतहि त्यांची कविता आढळते. शिवरामस्वामींची ग्रंथसंख्या शंभराचे वर असून त्यांपैकीं एकादश स्कंधावरील टीका ( शके १६०४ ) व अध्यात्मरामायण ओवीबद्ध ( संख्या ५५००; रचना शके १६०७ ) हे दोन ग्रंथ विस्तारानेंहि मोठें आहेत. सदानंद ( श. १३३० )-रामानंद ( श. १३५० )-अमलानंद ( श. १३७० )-गंभीरानंद ( १४०० )-ब्रह्मानंद (१४३०)-सहजानंद ( श. १४६० ) पूर्णानंद ( श. १४९० )-ब्रह्मानंद [ श. १५३० ]- नारायण उर्फ पूर्णानंद ( श. १५७० )-शिवराम याप्रमाणें स्वामींची परंपरा शं. श्री. देव देतात[2]. सारस्वतकारांनीं उल्लेखिलेल्या 'संदेहहरण' या ग्रंथाचा कर्ता स्वतःस **राघवरंक** म्हणवितो व रंगराम-गुरुनाथ-गिरिलाल-गिरिनाथ भवानी-त्रिमलनाथ-राघव अशी आपली परंपरा सांगतो. याचा ग्रंथ ओवीबद्ध असून ग्रंथसंख्या ४०४० आहे. **गंगाधर कोकिळ** हे कवि राजाराम प्रासादी म्हणतात त्याप्रमाणें केशवस्वामी भागानगरकरांचे सम-कालीन दिसत नाहींत. ते कांहींसे उत्तरकालीन असावे. धुळें येथील श्रीसमर्थ वाग्देवतामंदिरांतील बाडांतून या गंगाधर कोकिळांचीं शेंदीडशें कवनें आहेत. पैकीं एका बाडांत [ क्र. ६७९ ] नृहरिसुतकृत 'श्रीमुकुंद-रामचरित्र' आलें असून त्यावरून गंगाधर कोकिळ हे या मुकुंदराजाचे गुरु होत, असें दिसतें. ते नृसिंह क्षेत्रीं म्हणजे गोदातीरीं सायखेडें येथें राहात. सायखेड्यास गोदा दुभंग होऊन मध्यें बेट बनलें आहे. त्या बेटांत नृसिंहाचें देवालय आहे. वरील चरित्रग्रंथावरून पाहतां कोकिळशिष्य मुकुंदराज ( चतुर्थाश्रमींचे ब्रह्मानन्द ) यांनीं आपल्या गुरूचे पश्चात् पैठण येथें शके १६९७ मध्यें समाधि घेतली असें दिसतें. म्हणजे गंगाधर कोकिळांचा काळ यावरून १७ व्या शतकाचा उत्तरार्ध ठरतो.

---

१. भाइसंमं: इतिवृत्त, शके १८३४, ले. ५६, ५८.
२. पूर्णानंदाचे शिवरामस्वामी (भाइसंमं. इति. श. १८३४.)

अभ्यासाचीं साधनें

ग. शं. देव : श्रीसमर्थशिष्य कल्याण [ प्रस्तावना ].
शं. श्री. देव : दिनकरकृत स्वानुभवदिनकर [ प्रस्तावना ].
शं. श्री. देव : दिनकरांची कविता, भा. १–२ [ प्रस्तावना ].
शं. श्री. देव : श्रीसांप्रदायिक विविध विषय, खंड १–२–३
गो. का. चांदोरकर : दीनदत्तपदांकित मुकुंद [भाइसंमं. इति. श. १८३४]
वि. का. राजवाडे : शिवरामकृत गीताचंद्रिका [ भाइसंमं. इति. श. १८३३ ].
शं. श्री. देव : श्रीसमर्थांचे शिवराम [श्रीसांप्र. वि. वि. खं. २].
शं. श्री. देव : राघवकृत संदेहहरण [ भाइसंमं. इति. श. १८३३, ले. ३९ ].
शं. श्री. देव : हे कोकिळ कोण ? [भाइसंमं. इति. श. १८३४].



प्रस्तुत प्रकरणांत सारस्वतकारांनीं उल्लेखिलेल्या तंजावरकडील रामदासी कवींत तपशिलाच्या दृष्टीनें भर घालणें समर्थभक्त श्री. शं. श्री. देव यांच्या परिश्रमामुळें शक्य झालें आहे. पैकीं भीमस्वामींचा मठ खुद्द तंजावरांत असून शिवाय त्यांचे प्रमुख शिष्य झोळिरामबावा, गोविंदबाळस्वामी व अण्णाजीबावा यांचेहि मठ तंजावरांतच आहेत. भीमस्वामींचा कै. भावे यांनीं दिलेला जन्मशक १५६४ हा बरोबर नसावा. कारण शके १५६७-त त्यांना समर्थांचा उपदेश मिळाला. अर्थात् उपदेशकालीं त्यांचें वय सात आठ वर्षांचें तरी असणार. भीमस्वामींनीं स्वतंत्र ग्रंथ रचिल्याचें ऐकिवांत नाहीं. त्यांचीं स्फुट कवनें मात्र श्रवणीय आहेत. भीमस्वामींच्या मठांत त्यांच्या हातची वर कागदाचीं अकरा वेष्टनें असलेली दासबोधाची एक प्रत आहे. तंजावरास गेलेले दुसरे समर्थशिष्य अनंत मौनी हे मन्नारगुडी येथें मठ करून होते. प्रसिद्ध ग्रंथकार मेरुस्वामी हे यांचेच शिष्य होत. मेरुस्वामी हे मूळचे कृष्णातीरच्या मेरुलिंगचे. तेथून तीर्थयात्रा करीत करीत ते अरुणाचलम् येथें आले व तेथेंच त्यांची अनंतमौनीशीं गांठ पडली. मेरुस्वामींचा मठहि मन्नारगुडीसच असून त्यांच्या नांवावर भीमोपदेश, रामसोहळा, अवधूतगीता, स्वानंदलहरी, आत्मसाक्षात्कार, तत्वपट, पूर्णामृतकरषोडशकळा, ब्रह्मसंविति, अनंतवाल्मीकिरामायण व स्फुट पदें इतकी रचना आढळते. पैकीं पहिले दोन ग्रंथ धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केले असून इतरांचीं हस्तलिखितें तंजावरांतील सरस्वतिमहालांत आहेत. स्वामींची एकूण कविता १५–२० हजारांच्या घरांत जाईल. पैकीं 'रामसोहळा' या एका ग्रंथाची ओवीसंख्याच ९४२७ इतकी भरते. ११ रुद्र व प्रत्येक रुद्रांत पुनः ११ उल्लास अशा रीतीनें एकूण १२१ प्रकरणांत विभागलेला हा ग्रंथ सर्वसंग्राहक स्वरूपाचा असून त्यांत अनेक विषयांची गल्लत झाली आहे. मधूनमधून ग्रंथाची अनुक्रमणिका आणि उपक्रमोपसंहार लेखक देतो म्हणून वाचकांची थोडी तरी सोय होते. नाहींपेक्षां हा 'रामसोहळा' समग्र पाहणें कठिणच ! बाकी मेरुस्वामींनीं समर्थांच्या व्यक्तित्वाचा अदमास अचूकपणें घेतलेला दिसतो.

"सूर्य जया देशासि गेला । तेउता प्रकाशाचि जाला ।
प्रकाशघन समर्थकीर्तीला । काय म्हणोनि वर्णावें ॥
समर्थें सर्वकाळ वनांतरीं । केली श्रीरामेंसीं सरी ।
स्वामी परिस सेवकाची थोरी । रामदास पुरुषार्थें ॥

रामासि एक शर तन्हि असे। दासापाशीं शस्त्राचि नसे ।
दासबोध वज्रचपेट । थापेसरिसें करिती सपाट ।
ज्ञानसक्त उत्कट । या समर्थांची ॥ " (राम. १-१०).

रामसोहळा या ग्रंथांतील कांहीं भाग ज्ञानेश-मुक्तेशांची आठवण करून देईल इतका सरस आहे, हें खरें. परंतु पुनरुक्ति, विस्कळितपणा, रूपकांचा अतिरेक यांसारखे कांहीं दोषहि त्यांत आहेत. भीमोपदेश या मेरुस्वामींच्या दुसऱ्या ग्रंथाविषयींहि हेंच म्हणतां येईल. याची ओवीसंख्या सुमारें ७००० असून तो एकूण १४४ कलांत विभागला आहे. मेरुस्वामींचीं दोन-अडीचशें पदें[1] मात्र कानामनास गोड लागतील अशीं आहेत. विशेषतः,

" अरे हा सद्गुरु भजा ॥ ध्रु. ॥
भ्रांति त्यजा रे, निज उमजा रे, लावूं मोक्षध्वजा ॥ १ ॥

यासारखीं त्यांचीं पदें फार लोकप्रिय आहेत. मेरुस्वामींच्या कवितेंत कोठें कोठें 'इंद्रियें देऊनि आंवरीं' ती 'गोदावरी' यासारखे कोटिक्रम आढळतात हें विशेष होय. स्वामींच्या एका नाटकाचा उल्लेख वर आलाच आहे. हें प्रकरण 'हरिहर नाटक' या नांवानें तंजावर येथील सरस्वति-महालांत आम्हांस पहावयास मिळालें (हस्तलिखित, क्र. ९८६). वास्तविक हें नाटक नसून पदें, श्लोक, कटाव इत्यादींनीं युक्त असें नाट्यात्मक कथा-निरूपण आहे. एकंदरींत दोघांचे संस्कार मेरुस्वामींच्या कवितेवर झालेले दिसतात; एक ज्ञानेश्वरांचा व दुसरा रामदासांचा. पैकीं पहिल्याची रूपक-पद्धति स्वामींनीं उचलली आहे. ज्ञानेश्वरांचा संयम मात्र मेरुस्वामींत नाहीं. आणि हें साहाजिकच आहे. कारण मेरुस्वामी हा रामदासी पंथांतील कवि असून संयमाचा अभाव व रचनेंतील शिथिलता हीं या पंथांतील कवितेचीं वैशिष्ट्यें आहेत. असो. मेरुस्वामी मन्नारगुडी येथेंच शके १६५५-मध्यें समाधिस्थ झाले.

श्रीसमर्थ तंजावर प्रांतीं एकूण तीनदां गेले असावे असें इतिहास सांगतो. प्रथम त्या द्वादश वर्षांच्या तीर्थाटनांत केव्हां तरी, नंतर शके १५७७-त, आणि शेवटीं देह ठेवण्यापूर्वीं म्हणजे शके १६००-मध्यें, याप्रमाणें एकूण तीनदां त्यांचे चरण तंजावरास लागले. पैकीं शके १५७७-तील दुसरी भेट समर्थ-संप्रदायाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाची आहे. या भेटींत समर्थांनीं तंजावर प्रांतीं तीन मठ स्थापून तेथें महतांची योजना केली. पैकीं भीमस्वामी खुद्द तंजावरास, राघवस्वामी जवळच पांच कोसांवर कोनूर

---

१. श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें, बाडांक १२७६ व १३११.

या गांवीं आणि अनंतमौनी मन्नारगुडीस याप्रमाणें योजना झाली. समर्थांनीं दक्षिणेच्या द्वारीं लावलेलीं हीं तीन 'इवलींशीं रोपें' पुढें चांगलींच फोफावलीं आणि समर्थसंप्रदायाचा वेल त्यांनीं 'गगनावरि' नेला. या तीन मठांतील सांप्रदायिकानीं संप्रदायाच्या प्रचारार्थ म्हणून मराठी भाषेंत पुष्कळच रचना केली आहे. 'सरस्वति महाल' या तत्रस्थ रामदासी कवींनीं खचून भरलेला असून त्यांच्या कार्यांची साक्ष देत तो अजूनहि उभा आहे. कोणी जाणता येईल, आणि महाराष्ट्रापासून अति दूर अशा प्रांतीं राहून मराठी भाषेची व समर्थांची सेवा करणाऱ्या या तंजावरी कवींची आस्थेनें चौकशी करील म्हणून जणुं तो 'महाल' तपश्चर्याच करीत आहे. माधवस्वामी हा या कवींपैकींच एक आहे. समर्थांनीं कोनुरास प्रस्थापित केलेल्या मठाचे अधिपति राघवस्वामी यांचे माधवस्वामी हे शिष्य होत. म्हणजे समर्थांचे ते प्रशिष्य ठरतात. तसेंच व्यंकोजीनंतर तंजावरच्या गादीवर आलेला त्याचा मुलगा दुसरा शहाजी व माधवस्वामी हे दोघे समकालीन आहेत. इतकेंच नव्हे, तर त्या दोघांत गुरुशिष्यसंबंध आहे. शहाजीच्या राजवटीचा काळ शके १६०६ ते शके १६३० असा असल्यानें माधवस्वामींचा कालहि स्थूलमानानें हाच ठरतो. शहाजी हा विद्येचा पोशिंदा असून त्यानें 'तिरुविसनल्लुर' हें गांव त्यास शहाजी-राजपुरम् असें नांव देऊन ४६ विद्वानांना आंदण दिलें असल्याचें प्रो. श्रीनिवासन् आपल्या ग्रंथांत सांगतात[१].

समर्थ हे माधवस्वामींचे आजेगुरु, तर प्रसिद्ध संतकवि एकनाथ हे त्यांचे खरोखरीचे आजे ठरतात. हरि पंडित हा मुलगा आणि गंगा, गोदा व उमा या मुली, अशीं एकूण चार अपत्यें नाथांना होतीं. पैकीं प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर हा गंगाबाईचा मुलगा म्हणजे नाथांचा नातु हें सर्वांना ठाऊकच आहे. गोदावरीची माहिती मिळत नाहीं. नाथांची तिसरी कन्या उमाबाई ही तंजावर प्रांतीं कोणा नागनाथास दिली होती, व तिचा मुलगा म्हणजेच आपले माधवस्वामी होत. म्हणजे माधवस्वामी हे एकनाथांचे नातु व मुक्तेश्वरांचे मावसबंधु होत. माधवस्वामी विवाहित असून त्यांच्या घराण्यांत कवित्व विपुल झालेलें आढळतें. रामपंडित आणि कृष्णपंडित हे पुत्रद्वय, वासुदेवपंडित हा नातु, मीनाक्षीअम्मा ही नातसून, अंबाजी हा पणतु याप्रमाणें त्यांच्या कुटुंबांतील बऱ्याच जणांनीं काव्यरचना केली आहे. पैकीं पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र यांची रामायण–

---

१. Maratha Rule in the Carnatic (Annamalai University, 1944).

भारत--भागवतावरील रचना विपुल असून ते महाकवींच्या पंक्तीस बसण्याच्या योग्यतेचे आहेत. माधवस्वामींची नातसून तिम्मगुढीची मीनाक्षी-अम्मा हिनें रचलेलीं कृष्णावरचीं गाणीं कानामनाला गोड वाटतील अशीं आहेत. ती सदा काव्यमग्न असे म्हणून तिला 'मंत्रवादीण' असें म्हणत. मोरोपंतांप्रमाणें कोळशानें भिंतीवर लिही आणि काव्याच्या शेवटीं पतीची नाममुद्रा करी. हिचीं कांहीं गोड पदें आमचेपाशीं आहेत. असो. एकनाथांची काव्यपरंपरा मुक्तेश्वराप्रमाणें आपल्या माधवस्वामींनींहि सांभाळली. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या नातवांनींहि तिला हातभार लावला. नामदेवांप्रमाणें एकनाथ हेहि एक मोठे कुटुंबकवि ठरतात. पुढील वंशावळ माधवस्वामींच्या भावी चरित्रकारास उपयोगी पडावी.




तात्पर्य, माधवस्वामींत दोन भिन्न प्रवाह एकवटले आहेत. एक रामदासांचा व दुसरा एकनाथांचा. पैकीं पहिला वैचारिक स्वरूपाचा असून दुसरा वांशिक आहे. देह नाथांच्या हाडामांसापासून बनलेला तर आत्मा समर्थांनीं घडविलेला, असा कांहींसा अपूर्व प्रकार माधवस्वामींसंबंधीं आहे. त्यांच्या काव्यकृतींवर मात्र नाथवाणीचा ठसा उमटलेला आहे, समर्थ-वाणीचा नाहीं.

माधवस्वामींचें बहुतेक सारें आयुष्य तिरुवेळंदूर या गांवांत गेलें असावें. हें गांव तंजावरपासून सुमारें ३५ मैलांवर असून साउथ इंडियन रेल्वेच्या मायावरम् या स्टेशनापासून अवघें दोन मैल आहे. या गांवचा उल्लेख माधवस्वामी त्रिवंदूर असा करतात. हें त्रिवंदूर किंवा तिरुवेळंदूर आणि मायावरम् या दोन गांवांमधून कावेरी नदी वाहते. गांवांत

स्वतः माधवस्वामींनीं स्थापिलेलें एक राममंदिर असून त्या मंदिरांतच स्वामींची ग्रंथरचना झाली. या स्थळांचा उल्लेख ते आपल्या बहुतेक सर्व ग्रंथांतून पुढीलप्रमाणें करतात—

प्रसिद्ध जें का गौरीमायोर। त्या समीपचि त्रिवंदूर।
उभय ग्रामांमध्यें नीर। वाहे कावेरीचें॥
तिचीये वामभागीं सुंदर। लघु देवालय मनोहर।
माजीं लक्ष्मण सीतेसीं रघुवीर। वस्ती निरंतर करीतसे॥

माधवस्वामींची ग्रंथरचना प्रचंड असून तिचा बहुतेक सर्व भाग 'सरस्वति महालां'त संग्रहित आहे. कांहीं तंजावरांतील रामदासी मठांतून मिळाला. पैकीं वेदांत विषयांत अनुगीता, भगवद्गीता व योगवासिष्ठ हीं तीन प्रकरणें येतात. त्यांतील अखेरचें सर्वांत मोठें असून माधवस्वामी त्यास 'भावार्थ योगवासिष्ठ' म्हणतात. याची ओवीसंख्या १२,३३९ असून "सरळ मोतियांची जैसी गोंवी। तैसी वोवीमागें गुंफिली वोवी" हें कविवचन त्यांत पदोपदीं अनुभवास येतें. आपण पाल्हाळ न करतां संक्षेपानें बोलत आहों हें कवीचें म्हणणें मात्र तितकें खरें नाहीं. कारण विस्तार हें माधवस्वामीं-च्या रचनेचें वैशिष्ट्य असून तें त्यांच्या रामायण—महाभारतांत तर चांगलेंच प्रत्ययास येतें. त्यांच्या रामायणाची ओवीसंख्या १८,९७५ व महा-भारताची ८८,२७४ इतकी आहे. 'ओव्यांचें नाहीं येथें गणित' हें माधवस्वामींचें म्हणणें विस्ताराच्या दृष्टीनें अक्षरक्षः खरें आहे. ही महाभारतावरील रचना त्यांनीं शके १६२५-त आरंभिली व चार वर्षांनीं म्हणजे शके १६२९-त संपविली. या माधवी भारताची पर्वसंख्या १८ नसून २१ आहे याचें कारण असें दिसतें, कीं जो भाग लिहावयाचें विस्मृतीनें राहून गेलें तो त्यांनीं पुढें स्वतंत्र पर्वरूपानें जोडला. याचा अर्थ माधवस्वामींची रचनापद्धति अव्यवस्थित किंवा गबाळ होती असा मात्र नाहीं. उलट त्यांचें लिहिणें टापटिपीचें असून भारतांतील आदिपर्वांतर्गत सातवा अध्याय हा त्यांच्या सबंध भारताची एक अनुक्रमणिकाच असल्यानें त्यांनीं त्यास 'सर्वसंग्राहक व्यवस्था' असें म्हटलें आहे. 'रचनेच्या मानानें या ग्रंथाची गोडी जितक्यास तितकीच आहे' हें सारस्वतकारांचें विधान कांहीं अंशीं खरें असलें तरी माधवस्वामींनीं केलेला पुढील खुलासाहि अगदींच खोटा नाहीं.

सहस्रांचा स्वयंपाक येकी। करणार तिची न धरावी चुकी।
जें लवण कोण्ही येके शाकीं। नाहीं मीनलें म्हणोनियां॥

ज्याचा विशेष गुण अंतरीं । तेविं ये रामायणसागरीं ।
अपार शब्दांची भरोबरी । परोपरी पाहतां ॥ (युद्धकांड, प्र. ७९)

कवीचें हें म्हणणें खरेंच आहे. जी सहस्रभोजनाचें साहित्य एकटीच करणार तिच्या आणि दोन माणसांचा टामटुम संसार करणारणीच्या स्वयंपाकाची तुलना कशी करतां येईल? सहस्रभोजनांत भाजीला मीठ लागलें किंवा नाहीं हें कोणी पाहत नाहीं. तेव्हां आपल्या या प्रचंड काव्यसागरांत वाचकांनीं सहस्रभोजनभावानें विहार करावा हें माधवस्वामींचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. याशिवाय माधवस्वामींच्या नांवावर कांहीं किरकोळ पौराणिक आख्यानेंहि आढळतात. त्यांचें एक काव्य उल्लेखनीय आहे व तें म्हणजे 'प्रबोध–चंद्रोदय' ही नाटककथा होय. अशा प्रकारच्या चारपांच नाटककथा 'सरस्वति महालां'त असून ही प्रथा खास तामिळनाडांतील दिसते.

माधवस्वामींची ही प्रचंड रचना पाहून अनेक विचार मनांत येतात. महाराष्ट्रापासून शेंकडों योजनें दूर अशा तामीळनाडांत कावेरीतीरीं तिरुवेळंदूर येथील राममंदिरांत बसून जन्मभर ग्रंथरचनेचा उद्योग करणारा हा महाकवि आजवर उपेक्षित किंबहुना अज्ञात असला तरी महाराष्ट्र-सारस्वताच्या इतिहासांत त्यास मानाचें स्थान दिलें जाईल यांत शंका नाहीं. रामदासी संप्रदायांतील असला तरी माधवस्वामी काव्यापुरता एकनाथी वळणावर गेला आहे. तसेंच एकनाथांप्रमाणेंच तो कुटुंबकविहि आहे. त्याच्या माधवभावाच्या म्हणजे मुक्तेश्वराच्या भारताचीं पांचच पर्वें मिळतात, आणखी मिळत नाहींत म्हणून आपण हळहळतों. पण मुक्तेश्वराच्या शतपटीनें ग्रंथरचना करणाऱ्या माधवस्वामींची चिंता आपण आजवर कितीशी वाहिली? ज्या ठिकाणीं बसून या कवीनें आपलीं महाकाव्यें लिहिलीं तें तिरुवेळंदुरांतील राममंदिर अजून तरी उभें आहे व तसेंच तें आणखी कांहीं काळ उभें राहील. पण माधवस्वामींच्या ग्रंथांचीं सुंदर अक्षरांतील हस्तलिखितें मात्र झपाट्यानें काळाच्या मुखीं पडत चाललीं आहेत हें आपलें दुर्दैव होय.

वर माधवस्वामींच्या वंशांतील अनेकांनीं कवित्व केल्याचा उल्लेख आला आहे. पैकीं माधवात्मज किंवा माधवसुत यानें हरिवंशावर एक अतिविस्तृत म्हणजे ३०,८२० ओव्यांची टीका रचिलेली असून तिचें काम शके १६६९ ते ७२ अशीं तीन वर्षें चालू होतें. या कवीच्या नांवावर एक दशमस्कंधहि असून (ओवीसंख्या १०,८५५) त्याची रचना हरिवंशाचे अगोदर म्हणजे शके १६५८-मध्यें पूर्ण झालेली दिसते. आपला बाप माधवस्वामी याची महाभारतकार म्हणून झालेली कीर्ति

या चिरंजिवाचे डोळ्यांपुढें असावी असें त्याचे पुढील उद्गार सांगतात. हरिवंशाच्या प्रारंभीं माधवस्वामीस नमन करतांना तो म्हणतो—

त्या ईश्वरानुग्रहें अचाट । कवनबोध चालिला सैराट ।
जैसा भागीरथीचा थोर लोट । धांवे अलोट तेणें परी ॥
ज्याच्या कवित्वासि बसे स्वरडा । नाहीं बळिहरणाचा फलस्डा ।
सर्वांसि कळेसा अर्थ उघडा । चाले घडघडां वाचक जेथें ॥
सुलभ असोनि बहुसाळ । जें अमृताहूनहि रसाळ ।
नित्यनूतन अबाळगोपाळ । थोर थोर भूपाळ ऐकती जें ॥
अविमुक्त रामसेतुपर्यंत । जें प्रख्यात जालें अत्यंत । ...

वरील उद्गारांवरून माधवस्वामींच्या भारताची कीर्ति त्यांचे वेळींच सर्वत्र पसरली होती असें दिसतें. असो. या माधवात्मजा (म्ह. राम पंडित) प्रमाणेंच त्याचा भाऊ कृष्णपंडित हाहि कवि असावा असें त्याचा मुलगा म्हणजे माधवस्वामींचा नातू वासुदेव यानें आपल्या बापाविषयीं काढलेल्या 'जयाची उपन्यासधारा । जणूं अमृताचीच गारा' या उद्गारांवरून वाटतें. कृष्णपंडिताचें काव्य मात्र आम्हांस उपलब्ध झालें नाहीं. त्याचा मुलगा वासुदेवपंडित यानें रचिलेल्या भागवत टीकेपैकीं कांहीं स्कंध 'सरस्वति-महालां'त आहेत. स्वतःस कृष्णात्मज म्हणविणाऱ्या या कवीनें आपल्या ग्रंथांच्या प्रारंभीं आपली वंशपरंपरा दिलेली असून तो स्वतः तंजावरनृप तुळजेंद्र याचा आश्रित होता असें दिसतें. तो म्हणतो—'जयाचिये अन्नप्रभावें । निपजले प्रबंध स्वभावें'. अर्थात् हे प्रबंधहि आश्रिताचे असावे इतक्याच बेताचे आहेत. एकनाथ हे या कुटुंबाचे स्फूर्तिदाते कवि असल्याची जाणीव मात्र वासुदेवपंडितानें अनेक ठिकाणीं व्यक्त केली आहे.

त्याचिया कृपाबळें । निपजलीं प्रबंधकमळें ।
मद्दृशीं अति तुंबळें ।... ... ॥
जीवाचें करूनि निंबलोण । वोवाळीन एकनाथांचे चरण ।
कृतार्थ आत्मा मानीन तेणें । लाभेन केणें भक्तीचें ॥

हीं वासुदेव पंडिताचीं वचनें इतिहासास महत्वाचीं आहेत. शके १७१६-च्या सुमारास ग्रंथरचना करणाऱ्या या कवीच्या हातून दशमस्कंध पूर्ण झाला नाहीं, म्हणून त्याच्या आतेचा नातू अंबाजी पंडित यानें त्यांत अष्टमाध्यायाची भर घालून तो पूर्ण केला असें दिसतें. याच सुमारास रचिलेली आणखी एक भागवतटीका 'सरस्वति-महालांत' त उपलब्ध

आहे[1]. मात्र तींत ११-व्या स्कंधावरील कवींचें भाष्य नसल्यानें तिला संपूर्ण म्हणतां येणार नाहीं. एकादशस्कंधावर एकनाथांची सुविख्यात टीका असल्यानें आपण तो स्कंध वगळून उरलेल्या स्कंधांवर टीका लिहीत असल्याचें स्वतः कवीनेंच सांगितलें आहे. ही टीका शिवरामेंद्राचा शिष्य गंगाधर यानें शके १६८७-मध्यें आरंभिली व शके १६९४-मध्यें रचून पुरी केली. याचा अर्थ लिहें काम सतत सात वर्षे चालू होतें असा मात्र नव्हे. कारण मध्यंतरीं दीड वर्ष कांहीं विघ्न आल्यानें लेखन थांबलें होतें असें स्वतः ग्रंथकारानेंच म्हटलें आहे. तंजावरकडील हे कवि बहुतेक करून आपल्या ग्रंथाचे शेवटीं ग्रंथरचनेचा तपशील देतात व त्याप्रमाणें वरील कवीनेंहि दिला आहे. इतकेंच, कीं ग्रंथरचनेचें स्थळ, काळ इत्यादि माहिती अपेक्षेप्रमाणें टीकेच्या अखेरीस नसून ती दशम-स्कंधाच्या शेवटीं आली आहे. याचें कारण असें, कीं कवीनें दशमस्कंधाची रचना अगदीं शेवटीं केली व त्यामुळें हा तपशील तेथें देणें त्यास भाग पडलें. या तपशीलावरून असें दिसतें, कीं गंगाधरानें ही भागवत टीका तंजानगरीं म्हणजे तंजावरीं 'प्रसन्न वेंकटेशाचे' परिसरांत लिहून संपविली. तिची ओवीसंख्या १६,८०० असून पैकीं एकट्या दशम-स्कंधावरच १३,५३० ओव्या आहेत. गंगाधर कवीच्या या ग्रंथाचा एक विशेष हा, कीं स्वतः कवि तामीळनाडांतील असल्यानें त्याच्या हातून तिकडील चालीरीतींचीं वर्णनें न कळत उतरलीं आहेत. विशेषतः श्रीकृष्णाचीं बालक्रीडा वर्णितांना शिडवें म्हणजे चेंडू, डचा, भोंवरा, गजगाचे 'अगळ, चप्पहि व चंडिमार' हे तीन प्रकार, इत्यादि खेळांची माहिती या गंगा-धरानें आपणांस सहज जातांजातां करून दिली आहे. पैकीं नमुन्यादाखल म्हणून भोंवऱ्याच्या खेळाचें वर्णन पुढें देतों —

परस्परें भोंवरे घेवोनि । जाटी तयासि गुंडाळोनि ।
चक्राकारें तये क्षणीं । रेषा वोढोनि भूमीवरी ॥
माजीं खडा ठेवोनि एक । धरोनिमां त्याचा रोख ।
खड्यासि मारितां सम्यक । जे कां मेख भोंवऱ्याची ॥
तदग्रमार्गें खडा उडवोनि । गरगराटें भोंवरा फिरोनि ।
रेघामाजि न राहतां क्षणीं । जाय सरकोनि दुरी जरी ॥
तरी तेणें जाणिजे जिंतिलें । इतरीं होय हारविलें ।
एवं त्या खड्यासि मारितां भलें । लक्ष चांगलें चुकोनि तें ॥

---

१. हस्तलिखित, क्र. १४६२ ते ६९, व १४७७.

ज्याचा उल्लेख सारस्वतकारांनीं दासानुदास असा केला आहे तो कवि अनंतपुत्र, केशीराजदास, राम व दासानुदास या चार नांवानीं कविता करतो असें 'सरस्वतिमहालां'तील हस्तलिखितें पाहतां आढळून आलें. या कवीचे ज्ञानामृत, सिद्धानुभव, गर्भगीता, कायजीवाचें लग्न, ज्ञान-संन्यास असे दहापांच ग्रंथ उपलब्ध असून त्यांची रचना शके १६२२–२३-च्या सुमारास झालेली दिसते. हा कवि आपली माहिती प्रत्येक ग्रंथाचे अखेरीस देतो व त्यावरून पाहतां ही सर्व ग्रंथरचना त्यानें कावेरीतीरीं श्रीरंगपट्टणाचे परिसरांतील हेरपुर, कुळघाण, देवपट्टण व मुक्ततीती या चार गांवीं आळीपाळीनें राहून केली असें कळतें. कायजीवाचें लग्न हें त्याचें प्रकरण विशेष रोचक उतरलें असून त्यांतील रूपकपद्धति उघडउघड एकनाथी वळणाची आहे. या रामकवीच्या रचनेची थोडी कल्पना यावी म्हणून मातेच्या उदरांत गर्भाची वाढ कशी होते याचें त्यानें केलेलें वर्णन पुढें देतों—

बिंदु मातेगर्भीं पडिला । शुक्रित रक्ता समरस जाला ।
हानि मृत्य यश लाभला । तैं पासुनी ।।
तेव्हांचि कायजीवालग्न । जालें नेमस्त जाण । . . .
स्वाधिष्ठाना हो भीतरीं । मणिपुरा माझारीं ।
या दोहींचें अंतरीं । पिंड वाढिला ।।
मध्यें पिंड हा वाढत । वरी अमृतधारा पडत ।
तेणें करूनि टवटवीत । असे तेथें ।।
पहिले मासीं गोलाकार । दुसरे मासीं होये सीर ।
तिसरे मासीं चंद्रसूर्य । प्रगट होती ।। . . .[1]

वर उल्लेखिलेल्या काव्यांखेरीज सारस्वताचें कांहीं अगदीं नवीन असे प्रकार तंजावरस्थ कवींच्या रचनेंत पहावयास मिळतात. विशेषतः डौर, कोर्वंजी इत्यादि तामीळनाडांतील नाट्यप्रकारांचा परिणाम होऊन मराठींतील तंजावरी नाटकें कशीं निर्माण झालीं तें आपण पुढें पाहूंच. येथें 'डोलोत्सव गीत' या नांवाच्या एका काव्याचा परिचय करून देतों. हें गीत लिहिणारा कोणी शेष नांवाचा कवि असून विवाहानंतर वधुवर डोल्यावर म्हणजे हिंदोळ्यावर बसून झोंके घेतात तेव्हां म्हणावयाचीं हीं गाणीं आहेत. अशा प्रकारचे डोलोत्सव तामीळनाडांत नवरात्रामध्येंहि होतात व तेव्हां हीं गाणीं गायिलीं जातात. पैकीं मंडोळीचें म्हणजे मुंडावळीचें गाणें पुढें देतों.

१. Catalogue of M. MSS., No. 1754.

"नवरत्नें हें घडियेलीं । नागरिक हे मंडोळी ।
झगझग सुतजें झळाळी । मंगळदा बांधिन तुझें भाळीं
सुमनीं बरवी गुंफियेलीं । सुमनीं कुशलीं विरचीलीं ।
सुमनो वरदासें वार्णिली । कमनीय गुणा बांधिन भाळीं ॥ . . . "

याच शेषकवीच्या नांवाच्या 'हालास्य-माहात्म्य' म्हणून ७००० ओव्यांचा एक स्वतंत्र ग्रंथ आम्हांस तंजावर येथील महाराष्ट्र समाजाच्या संग्रहांत मिळाला. ग्रंथकार शिवभक्त असावा याहून त्याची अधिक माहिती मिळत नाहीं. आणखी एक नवीन प्रकरण 'सरस्वतिमहालां'त मिळालें. त्याचें नांव मुद्राराक्षसनाटककथा. ही कथा कोणा आश्रितानें प्रतापसिंह राजास सांगितलेली असून ती प्रतापसिंहाच्या नांवावर आढळते. इंग्रजींत ज्याप्रमाणें शेक्सपीअरचीं नाटकें कळण्यास सोपें जावें या हेतूनें चार्लस लँबनें तीं गोष्टीरूपानें मांडलीं त्याप्रमाणेंच प्रस्तुत कथाहि 'जंवरी नाटककथा न कळली। तंवरी नाटकाची भावखोली । कळेना. . . ।' म्हणून लिहिलेली आहे. प्रकरण ओवीबद्ध असून त्यांत साडेसहाशें ओव्या आहेत. संस्कृतांतील नाटकांचा परिचय मराठी वाचकांस कथारूपानें करून देण्याचा हा प्रयत्न नवीन आहे. अशा प्रकारच्या आणखीहि कांहीं नाटककथा त्या प्रांतीं रचिल्या गेल्या. बारामास काव्य किंवा षड्ऋतुवर्णन यांसारखीं काव्येंहि या तंजावरकडील कवींनीं लिहिलेलीं दिसतात.[1] पैकीं एक शाहा भूपतीच्या नांवावर असलें तरी तें रचणारा त्याचा कोणी आश्रित कवि असावा. या काव्यांतून सर्वत्र शहाजी राजाच्या विरहानें झुरणाऱ्या विरहिणींचीं चित्रें असून शेवटीं फाल्गुनांत पतिराजांच्या आगमनानें विरहिणी संतोष पावते अशा प्रकारचीं वर्णनें आहेत. काव्य या दृष्टीनें हीं प्रकरणें सामान्य वाटतात. यांतून एक विरहचित्र पुढें देतों—

"अतीव सुंदर अमित गुणाकर आणि सखी आजि शाहाराजा ।...
विरह वो अभिळाशे पुरवी सखि माझा वो ॥ धृ ॥
स्मर करितो मार शरांनीं मज फार ।
स्मरणही नसे माझें रमणाला ॥
हारा नको घालुं, वारा सये घन सारा, . . . बाई
दुरी माळा योजिसी गे गळ्यासी ॥
करिसि मज सुखाचा यत्न तो व्यर्थ होतो ।
पतिविण मजला गे अन्यथा होत जातो ॥ ..... "

तंजावरकडील कवि मोठे उद्योगी दिसतात. आपल्या ग्रंथांतून नाना-

---

१. Catalogue of M. MSS., 1677,1688.

प्रकारचे तपशील तर ते देतातच. पण शिवाय सारस्वताच्या अभ्यासास उपयोगी पडताल अशाहि प्रकारचे कांहीं उद्योग त्यांनीं करून ठेवल्याचें दिसतें. रामकवीचा 'भाषाप्रकाश' हा एक अशाच प्रकारचा प्रयत्न आहे. तामीळनाडांत राहणाऱ्या व कोळेनृसिंहदास म्हणविणाऱ्या या कवीनें मराठी भाषेच्या अभ्यासार्थ म्हणून हा ग्रंथ तयार केला असून त्याचें स्वरूप छंदोबद्ध शब्दकोशाचें आहे. या कोशाचे एकूण २३ वर्ग पाडलेले असून वर्गांचीं नांवें दानवर्ग, वाग्वर्ग, संख्यावर्ग, काळवर्ग याप्रमाणें आहेत. नमुन्यासाठीं म्हणून शब्दवर्ग व नानार्थवर्ग यांतून प्रत्येकीं एक कारिका पुढें देतों—

(शब्द वर्ग) नूपुरीं खुळ्खुळा शब्द, घागऱ्यांमाजिं घुघ्घुळ।
कंकणांचा कणत्शब्दु, पादुकांचा चटक्फटक्॥

(नानार्थ वर्ग) म्हणीतल्या आडकित्ता, तो हा पोफळखंडिता।
आणीकही अडाकिता, रोधिता म्हणवेल तो॥

रघुनाथ पंडिताच्या काव्याचें मार्मिक समालोचन सारस्वतकारांनीं केलें असलें तरी कविविषयक माहिती त्यांनीं दिलेली नाहीं, व ती देणेंहि थोडें कठिण आहे. कारण रघुनाथ पंडित हा महाराष्ट्र सारस्वतांतील एक वादविषय आहे. आपल्या आयुष्याच्या अखेरीस रोजच्या भाताची तजवीज व्हावी म्हणून एक श्लोक म्हणत हा कवि गांवभर भिक्षा मागत फिरे, किंवा पेशवाईच्या अखेरीस होऊन गेलेल्या देवनाथ कवीची आणि या शिवकालीन रघुनाथ पंडिताची भेटगांठ झाली होती इत्यादि कल्पना अजूनहि क्वचित् रूढ दिसतात. मुख्य वाद रघुनाथ पंडित कोण हा असून याविषयीं एकूण तीन मतें आढळतात. पैकीं पहिलें असें, कीं ज्याअर्थी दमयंती-स्वयंवराच्या कारवार प्रतींत शेवटीं 'कथा ऐसी चंदावरकर रघूनाथचि करी' असे उद्गार आढळतात व ज्याअर्थीं याच्या काव्यांत कांहीं कोंकणींतील शब्द आहेत त्याअर्थीं हा कवि कारवारकडील चंदावरचा सारस्वत ब्राह्मण असावा. या मताचा पुरस्कार ज. र. आजगांवकर व शणै गोंयबाब (वालावलीकर) यांनीं मुख्यतः केला. परंतु हें मत टिकलें नाहीं. अ. का. प्रियोळकर यांचें म्हणणें कीं, रघुनाथ पंडित म्हणजे शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं न्यायशास्त्री पंडितराव पदारूढ रघुनाथ पंडितच होय, व तो मूळचा तंजावरचा देशस्थ ब्राह्मण असून शहाजीनें त्याला शिवाजीकडे पाठविला. परंतु असें म्हणण्यांतहि कांहीं अडचणी आहेत. एक तर नलोपाख्यानाचा कर्ता म्हणजेच शिवाजीचा प्रधान होय हा सिद्धांत श्री. प्रियोळकर ज्या पंडितराव बखरीच्या आधारें

मांडतात ती बखर अगदीं अलीकडील असल्यानें तितकी विश्वसनीय नाहीं. शिवाय, सदर बखरनवीसहि रघुनाथ पंडित आणि शिवाजीचा न्यायमंत्रि हे एकच होत असें कोठें म्हणत नाहीं. श्री. प्रियोळकरांचें हें संशोधन 'हेत्वाभासमूलक व अपसिद्धांतमय' वाटल्यानें द. सी. पंगु यांनीं आपलें मत स्वतंत्रपणें मांडलें व हेंच तिसरें मत होय. प्रो. पंगूंच्या मतें नलोपाख्यानकार रघुनाथ पंडित म्हणजे शिवाजीच्या पदरचे 'राजव्यवहार-कोश'कार रघुनाथ नारायण हणमंते हे होत. या हणमंत्यांचें शिवाजीच्या कर्नाटकांतील राजकारणांत प्रधान अंग असून शिवाजीनें त्यांना चंदी चंदावरचे कारभारीहि नेमले होते. संशोधक कै. द. वि. आपटे हेहि राजव्यवहार-कोशकार आणि नलोपाख्यानकर रघुनाथ नारायण एकच होत असें मानतात. यांनाच रघुनाथपंडित म्हणत असें तत्कालीन पत्रव्यवहारहि सांगतो.[1] खुद्द शिवाजीनें त्यांना पंडित या नांवानें संबोधून त्यांच्या राजकारणकौशलाची तारीफ व्यंकोजीस लिहिलेल्या एका पत्रांत केली आहे.[2] त्यांत शिवाजी लिहितो "रा. रघुनाथपंडित त्या प्रांतें आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आम्हांस मानितात तैसे तुम्हांस मानितात." प्रो. पंगूंचें हें मत गो. रा. राजोपाध्ये यांना मान्य नसून प्रस्तुत रघुनाथ नारायण हा बेमुर्वतखोर व खुनशी असल्यानें तो नलोपाख्यानासारख्या प्रेमळ काव्याचा कर्ता असूं शकणार नाहीं असें त्यांनीं म्हटलें आहे. आम्हांस या म्हणण्यांत विशेष अर्थ दिसत नाहीं. तसेंच श्री. प्रियोळकर व प्रो. पंगु यांच्या परस्परविरुद्ध मतांतून कांहीं निर्णय लागेल असेंहि वाटत नाहीं. दोघांच्याहि विचारसरणींत कांहीं कच्च्या जागा आहेतच. इतकें मात्र खरें, कीं हा कवि तंजावरचा होता व तो राजकारणपटुहि होता. रघुनाथ पंडितानें एकूण तीनच काव्यें रचिलीं—१ रामदासवर्णन, २ गजेंद्र मोक्ष, व ३ दमयंती स्वयंवर. या काव्यांची रचना कवि शिवाजीच्या पश्चात् तंजावरास येऊन राहिला तेव्हां म्हणजे शके १६०७ ते १६१२ चे दरम्यान झाली असावी. पैकीं रामदासवर्णन हें त्याचें पहिलें काव्य असणार. रघुनाथ पंडित मोठे समर्थभक्त होते व समर्थांच्या आज्ञेवरून त्यांनींच शके १६०३-मध्यें तंजावराहून रामलक्ष्मणांच्या मूर्ति सज्जनगडा वर पाठविल्या होत्या. 'रामदासवर्णना'चे श्लोक अवघे अकरा असून त्यांत रामदासांच्या 'डोंगरीं गिरिंदरीं' फिरण्याचा, त्यांच्या कपाळावरील आवाळाचा व ते नेहमीं 'लेखणीसहित कागद दौती' बरोबर ठेवीत याचा

१. शिवकालीन पत्रसारसंग्रह, भा. २, क्र. २२७५, २२५९.
२. इतिहास-संग्रह मासिक, इ. स. १९११.

उल्लेख आहे. हें स्तोत्र काव्यदृष्ट्या मात्र सामान्य आहे. रघुनाथ पंडित आणि राज्यव्यवहारकोशकार हे जर एकच असतील तर त्यांच्या या कार्याचाहि उल्लेख मुद्दाम केला पाहिजे. देवगिरीकर यादवांच्या अखेरी-पासून तों शिवकालापर्यंत सुमारें तीनशें वर्षें महाराष्ट्रावर मुसलमानांची सत्ता असल्यामुळें सरकारदरबारांत व व्यवहारांतहि फारसी भाषेची मिजास वाढली होती. हें पाहून स्वराज्य आणि स्वधर्म याबरोबर स्वभाषेचेंहि रक्षण करणें शिवाजीस ओघानें आलें व हें काम त्यानें संस्कृत व फारसी या दोन्ही भाषा जाणणाऱ्या रघुनाथ पंडिताकरवीं पार पाडिलें[1]. या संस्कृत–फारसी कोशाचे एकूण दहा भाग व ३८४ श्लोक असून त्यांत कांहीं दरबारी फारसी शब्दांना संस्कृत पर्याय दिले आहेत. थोडा नमुना पुढें देतों.

कार्यस्थानं तु कारखाना, नामतः परिभाषितम् ।
कोशागारं खजाना स्यात्, जामदारः कोशरक्षकः ॥ ३४ ॥ ....
पोतदारो नाम बुधैर्ज्ञेयो द्रव्यपरीक्षकः ।
द्रव्यं तु नख्त संज्ञं स्यात् वराटो होन उच्यते ॥३८॥

प्राचीन मराठी वाङ्मयांतील एक उणीव तंजावरी नाटकांनीं दूर केली असल्याचें आपणांस ठाउकच आहे. दक्षिणेकडील विद्या-कलांचें माहेरघर म्हणून तंजावरची ख्याति फार जुनी असून तींत व्यंकोजीनंतरच्या मराठी राजांनीं चांगलीच भर घातली. शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी किंवा एकोजी हा इ. स. १६८५-मध्यें मरण पावल्यानंतर तंजावरचें राज्य त्याचा वडील पुत्र शहाजी किंवा शाहराज याजकडे आलें. हा शाहराज व तत्पश्चात् गादीवर येणारे अनुक्रमें सरफोजी, तुकोजी, प्रतापसिंह, तुळोजी, अमरसिंह इत्यादि राजे विद्या–कलांचे भोक्ते व पोशिंदे होते. तंजावर येथील मासभराच्या मुक्कामांत आम्हांस तेथें उपरिनिर्दिष्ट राजांच्या नांवांवर चांगलीं पांचपंचवीस नाटकें आढळून आलीं. हीं नाटकें पौराणिक असून ज्या राजांच्या नांवांवर तीं मोडतात त्यांनींच तीं रचिलीं असतील असें निश्चयपूर्वक म्हणतां येत नाहीं. कोणा आश्रित कवीनें काव्य रचावें व तें यजमानाच्या नांवें घालून आपण स्वतः 'नाम' शेषहि उरूं नये हा प्रकार सनातन आहे, व तसें येथें झालें असणें असंभवनीय नाहीं. उलटपक्षीं त्या त्या नृपवरांनीं ही नाट्यरचना केलीच नसेल असेंहि म्हणवत नाहीं. कारण श्री व सरस्वति एका ठायीं नांदल्याचीं उदाहरणें तंजावर प्रांतीं अनेक आहेत. हीं नाटकें शरफेंद्र म्ह. सरफोजी, शाहराज व प्रतापसिंह या तिघांच्या

१. शिवचरित्रप्रदीप ( भाइसंमं. पुणें ), पृ. १३७.

नांवांवर मुख्यत्वेंकरून आढळतात. पैकीं 'गणेशलीलार्णव' नाटकाच्या शेवटीं कविनाममुद्रिका आहे ती अशी :— "इति श्रीभोंसल-कुलदुग्धसागरसुधाकर श्रीचंद्रमौलीश्वरप्रसादलब्ध चौलसिंहासनसंपत्संतति राजाधिराज छत्रपति भूलोकदेवेंद्र श्री शरभेंद्र भूपालविरचित गणेश-लीलार्णव नाटके पंचमोंकः।" सर्व मुद्रिका स्थूलमानानें याच धर्तीवर आहेत. एका नाटकावर मात्र खऱ्या लेखकाच्या नांवाचा कांहींसा पुसट उल्लेख आढळला. शरभेंद्रकृत 'गणेश-विजय' नाटकाच्या एका प्रतींतील दुसऱ्या अंकाच्या मागील पानावर 'गणेश नाटक प्राकृत रंगनाथ कवि दुपट्टी दुगाचारे कृत' असा तो उल्लेख आहे. याच नाटकाच्या दुसऱ्या प्रतींतहि[1] असाच उल्लेख आढळतो. अर्थात् रंगनाथकवि दुपट्टी हाच खरा नाटककर्ता असावा. तसेंच शाहराजकृत 'गंगाकावेरी' नाटकाच्या प्रारंभीं कोणा 'पूर्णानंद-शिष्या'चा उल्लेख आहे. 'राजकन्यापरिणय' हें नाटक तर उघडच 'शाहराज महाराजाश्रित त्रिंबक ज्योतिर्विद' यानें रचिलेलें दिसतें[2]. तात्पर्य, या तंजावरी नाटकांचें कर्तृत्व संशयित आहे. तीं रचणारे लेखक भिन्न भिन्न असावे यांत मात्र शंका नाहीं. कारण तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यास शाहराजाच्या नांवावरील नाटकें इतरांच्या मानानें थोडीं ग्राम्य किंबहुना अश्लील वाटतात. उलट प्रतापसिंहाच्या नांवावरील नाटकांचा दर्जा निःसंशय उच्च असून त्यांची रचनाहि प्रौढ आहे. १८-व्या शतकाचा पूर्वार्ध हा या नाटकांचा रचनाकाळ होय. तीं कांहीं प्रसंगानें रचिलीं जात असें दिसतें. सरफोजी राजे वार्षिक गणेशोत्सव व प्रतापसिंह शारदोत्सव करीत आणि त्याप्रसंगीं हीं नाटकें होत. 'सरस्वति-महालां'त 'नाटक-प्रस्तावना' या नांवाचें एक प्रकरण आहे[3]. त्यांत महाराज एकदां तंजावरजवळील मध्यार्जुनास गेल्यावेळीं कमलापुराहून रत्नांगद या नांवाचा एक नट तेथें येतो व 'सुभद्रापरिणय' नाटक करून दाखवितो अशी नाटककथा आहे. तिचा प्रारंभ असा:—"महाराज पुण्यस्नानास मध्यार्जुनास गेले असतां तेथें पौर्णिमेचें स्नान करून सायंकाळीं बुधजन-सहवर्तमान माडीवरी विटनटगायकवेश्यापरिहासकभाट वरकडाशीं सह-वर्तमान बसले असतां इतक्यांत पूर्ण चंद्रोदय झाला असतां, मलयानिल वाहत असतां...कमलापुरवासी रत्नांगद नामक नट आला आहे....इ."

---

१. Catalogue MSS. in Saraswati Mahal, No. 1710-11.

२. Catalogue of M. MSS No. 1733.

३. Catalogue of M. MSS. No. 1953.

हीं नाटकें गद्यपद्यात्मक आहेत. त्यांत 'दरुवु' म्ह. पदें खूप असून हा तामीळ नाट्याचा परिणाम होय. तंजावरी नाटकांत डौर व कोर्वेजी हे दोन मौजेचे प्रकार आढळले. पैकीं केशवनाथ डौरे यांचे डौर समाजांतील विविध थरांतील सोंगांनीं युक्त असून तमाशा आणि नाटक यांमधील हा दुवा महाराष्ट्रांतहि रूढ होता असें एकनाथी भारुडांवरून वाटतें. 'कोर्वेजी' हा नाट्यप्रकार खास तामिळी आहे. तामिळी 'कुरवंची'त कुरव जातीची शकुन सांगणारी बाई नायिकेसमोर येऊन नायकाचें स्तुतिस्तोत्र गाते असा प्रसंग असतो. तामीळमध्यें 'सरफोजीराज कोरवंची' प्रसिद्ध असून तिचे प्रयोग तंजावर येथें प्रतिवर्षीं होतात. तामीळच्या साहचर्यानें रचिलेलीं मराठी भाषेंतील दोन कोर्वेजीं नाट्यें आम्हांस तंजावरीं मिळालीं. पैकीं एकांत महामाया ही बुरडिणीच्या वेषानें येऊन इंद्राणीस शकुन सांगते व भूगोलवर्णन करते असा प्रसंग आहे. तात्पर्य, तंजावरी मराठी नाटकांवर तामिळी नाट्याचा बराच परिणाम झालेला दिसत असून हीं नाटकें काव्यदृष्ट्या सामान्य असलीं तरी त्यांचें ऐतिहासिक महत्त्व हें मान्य करावेंच लागेल.

### अभ्यासाचीं साधनें


शं. श्री. देव : रामदासी संशोधन, खंड २ (तंजावर संग्रह).

सी. के. श्रीनिवासन् : Maratha Rule in the Carnatic, 1944.

टी. रामचंद्रराव : Descriptive Catalogue of Marathi MSS. in Sarasvati Mahal, Tanjore, Vols. 1, 2, 3.

व्ही. श्रीनिवासचारी : A Note on the Marathi MSS. in Sarasvati Mahal (Journal, Sarasvati Mahal, Vol. I, No. 1).

शं. गो. तुळपुळे : माधवस्वामी तिरुवेळंदूरकर (रामदास—रामदासी, रौप्यमहोत्सव अंक).

अ. का. प्रियोळकर : नलदमयंती स्वयंवर (प्रस्तावना).

ज. र. आजगांवकर : महाराष्ट्र-कविचरित्र, भा. १.

शणै गोंयबाब : गोंयकारांची गोयांभायली वसणूक.

अ. का. प्रियोळकर : रघुनाथपंडित (वि. विस्तार, १९३१).

द. सी. पंगु : प्राचीन मराठी कविपंचक (रघुनाथ पंडित).

गो. रा. राजोपाध्ये : रघुनाथपंडित (लोकशिक्षण, डिसेंबर १९३१).

प्र. श्री. कानिटकर : रघुनाथपंडित (वि. विस्तार, ६४–७).




कचेश्वराविषयीं माहिती सारस्वतकारांनीं त्यानें लिहिलेल्या आत्मचरित्रांतून दिलीच आहे. हें चरित्र 'आदि बाबाची' या नांवानें प्रसिद्ध आहे. कचेश्वरानें शके १६०७-मध्यें पाऊस पाडल्याचा जो उल्लेख सारस्वतकार करतात त्यास आधार पुढील ऐतिहासिक पत्रांत मिळतो. पत्र असें आहे—

"स्वस्ति श्रीनृप शालिवाहन शके १६०७ क्रोधननाम संवछरे. माघ-शु. सप्तमी बुधवार ते दिनीं वेदमूर्ति राजेश्री कचेश्वरभट ... स्वामींनीं कथा आरंभिताच पर्जन्य अहोरात्र पडला, पुरे पुरे केलें, आम्ही समस्त सुख पावलों ..." (भाइसंमं. इति. शके १८३५).

निरंजन माधवाविषयीं सारस्वतकारांनीं दिलेल्या माहितीशिवाय आणखी कांहीं माहिती त्यानंतर उपलब्ध झाली आहे. निरंजन माधवाचा बाप महादो बनाजी हा नसून त्याच्या बापाचें नांव 'माधव तिमाजी' होतें असें प्रो. पोतदार मानतात;[1] तर बनाजी हें त्याचें नांव नसून उपनांव असावें असें सारस्वतकार म्हणतात. पेशवे दप्तराच्या आधारें त्याच्या चरित्रावर प्रकाश पाडणारे प्रो. पंगु मात्र बनाजी हें त्याचें खरें नांव असून महाविद्याप्राप्तीनंतर त्यानें निरंजन हें नांव धारण केल्याचें सांगतात व त्याच्या वडिलांचें नांव माधव असें 'सांप्रदायपरिमळा'च्या आधारें मानतात. या 'सांप्रदायपरिमळ' ग्रंथावरून असें दिसतें कीं, वयाच्या २२ व्या वर्षी त्याला महाविद्या प्राप्त झाली व याच वेळीं बाजीरावसाहेबांनीं त्याला तंजावरची कामगिरी दिली. शाहूच्या आज्ञेवरून बाजीराव शके १६४७ व १६४८-मध्यें दोनदां कर्नाटकांत स्वारीला गेला होता. त्या आधीं म्हणजे शके १६४६-त त्यानें बनाजीस तंजावरास पाठविलें असावें असें दिसतें. तेव्हां शके १६४६-त निरंजन माधव जर २२ वर्षांचा असेल तर त्याचा जन्मशक १६२४ हा मानावा असें प्रो. पंगु यांचें प्रतिपादन आहे. पेशव्यांचा वकील म्हणूनहि त्यानें यशस्वी कामगिरी केल्याचें दिसतें. बाजीरावाच्या मृत्यूनंतर नानासाहेबांनीं बनाजीस आपल्या पदरीं ठेवून घेतलें व त्यास दक्षिणेंतच कामगिरी दिली. मध्यंतरीं कांहीं काल नानासाहेबांची त्याच्यावर गैरमर्जी झाल्याचें दिसतें. तथापि पुनः त्यांनीं बनाजीस अधिकार देऊन मोठ्या सन्मानानें श्रीरंगपट्टणास वकील म्हणून

१. द. वा. पोतदार: सांप्रदायपरिमळाचा कर्ता कोण? (म.सा.प.वर्ष १लें.)

पाठविलें. पेशवे दप्तरांतील पत्रव्यवहारावरून एकंदरींत असें दिसतें, कीं निरंजन माधव वयाच्या बाविसाव्या वर्षापासून पुढें ३४-३५ वर्षें अव्याहत राजकारणांत होता. मात्र त्याची प्रवृत्ति प्रामुख्यानें पारमार्थिक असल्यानें या राजकारणाचा त्याच्या काव्यावर कांहीं परिणाम झाल्याचें दिसत नाहीं. शके १६८० पर्यंत राजकारणें करून आपलें उर्वरित आयुष्य त्यानें ग्रंथरचनेंत घालविलेलें दिसतें. त्याचा पहिला ग्रंथ 'कृष्णानंद-सिंधु' शके १६६८-७४ पर्यंत केव्हां तरी समाप्त झाला असला तरी त्याची सुरवात मात्र त्यानें शके १६५७-तच केली होती. यापुढील त्याची ग्रंथरचना शके १६८० ते शके १६९४ या दरम्यानची दिसते. पेशवे दप्तरांतील त्याचा पत्रव्यवहार म्हणजे त्यानें केलेली दरबारी भाषेंतील गद्य रचनाच होय (पेशवे दप्तर-भाग २६). त्याच्या ग्रंथरचनेपैकीं 'सांप्रदायिक परिमळा'च्या कर्तृत्वाबद्दल आजवर विद्वानांत बराच वादविवाद झाला असून कोणतेंच मत खात्री पटविणारें वाटत नाहीं. निरंजन माधवाच्या नांवावर मोडणारा 'सांप्रदाय परिमळ' हा ग्रंथ निरंजन माधवाचाच असावा असें पांगारकर, भावे, निफाडकर व चिं. नी. जोशी म्हणतात; तर हा ग्रंथ त्याचा नसून त्याच्याच निरंजनदास नांवाच्या कोणा शिष्यानें तो रचिला असावा असें पोतदार, सबनीस व पंगु याचें मत आहे.

**सामराजाची** माहिती सारस्वतकारांनीं दिल्यानंतर बरेंच संशोधन होऊन त्याच्या चरित्रावर जो प्रकाश पडला त्याच्या आधारें आम्ही या कवीस पुढील पुरवणी जोडीत आहों. सामराजाच्या वंशाचे मूळ पुरुष श्रीमुद्गलाचार्य गोसावी हे असून या वंशांतील तेरावा पुरुष लक्ष्मण यास दोन बायकांपासून दोन मुलगे होते. वडील पत्नीचा मल्हारभट व धाकटीचा शामभट. मल्हाररावापासून साताऱ्च्या पंडितरावांची शाखा सुरू झाली व शामभटापासून कोल्हापूरच्या राजोपाध्यांच्या शाखेला आरंभ झाला. कोल्हापूरच्या शाखेस प्रथम पन्हाळकर असें नांव होतें व तें या शामभटा-पासूनच पडलें. हा शामभट म्हणजेच 'मुद्गलाख्याना'चा व 'रुक्मिणी-हरणाचा' कर्ता शामराज. हें घराणें ऋग्वेदी आश्वलायन सूत्री शाकल्य गोत्राचें आहे. तुळजापूरची देवी व जेजुरीचा मल्लारी हीं या घराण्याचीं कुलदैवतें आहेत. आर्वीचा मुद्गलेश्वर हाहि यांचें कुलदैवत किंवा कुलस्वामी आहे. या घराण्याचे मूळ पुरुष मुद्गलाचार्य गोसावी हे उदेपूरच्या भोसले घराण्याचे पुरोहित होते असें म्हणतात. शिवाजीमहाराजांचे पणजे बाबाजी भोसले यांचेबरोबर शामभटाचे आजे मल्हारभट हे होते. यांचे पुत्र लक्ष्मण-

भट यांनीं मालोजी भोसल्यांचें लग्न फलटणचे निंबाळकर नाईक देशमुख यांच्या बहिणीशीं ठरविलें. लक्ष्मणभट मालोजीबरोबर खानदेश, नगर, सातारा वगैरे प्रांतीं फिरत असतांना शामभट त्यांचेबरोबर होते. राज्याभिषेकापूर्वी शिवाजीमहाराजांनीं बाळंभट नांवाच्या ब्राह्मणाची पूजा केल्याचा उल्लेख सभासदी बखरींत आहे. या बाळंभटास शामभटाचे वंशांतील रामेश्वरभटांचे चिरंजीव प्रभाकरभट ह्यांनीं दत्तक घेतलें होतें. हें दत्तकपत्र शके १५९६, आनंदनाम संवत्सर, आषाढ शुद्ध ११ शुक्रवार या मितीचें आहे. या कागदावर साक्षीदारांच्या सह्यांत शामभटाची सही आहे, त्यावरून ते शिवाजीमहाराजांचे दरबारीं गेले असावे असें दिसतें. ‘ मुद्गलाख्यानां’त सामराजानें एक तीर्थयात्रा प्रकरण घातलें आहे. या तीर्थयात्रेचें इतकें सुसंगत वर्णन कवीला स्वतः यात्रा किंवा प्रवास केल्याशिवाय करतां येणार नाहीं. पुढें शामभट राजाराम महाराजांबरोबर पन्हाळ्यास गेले, व त्यावरून त्यांना पन्हाळकर हें नांव पडलें. शेवटीं ते राजाराम महाराजांबरोबर सिंहगडास गेले व तेथेंच त्यांचा अंत झाला.

भोसले वंशांतील बाबाजी, मालोजी, शहाजी यांचे समकालीन त्यांच्या उपाध्यायांचे वंशांतील मल्हारभट, लक्ष्मणभट व लक्ष्मणभटांचे चिरंजीव मल्हारभट हे अनुक्रमें होते. हे सरासरीनें समवयस्क मानण्यास हरकत नाहीं. शके १५७५ च्या सुमारास म्हणजे ‘ राधामाधवविलासचंपू’त वर्णिलेल्या शहाजीच्या दरबारच्या कालाचे सुमारास शहाजीचें वय, त्याचा जन्मशक १५२४ धरल्यास, अदमासें ५० वर्षांचें होतें. मालोजीस शहाजी प्रौढ वयांत झाला होता. तो मल्हारभटापेक्षां वयानें थोडा लहान असावा. मल्हारभटाचें वय तेव्हां ५७।५८ असावें. त्याचा सावत्र भाऊ शामभट हा त्याच्यापेक्षां १५।२० वर्षांनीं लहान असल्यास शामभटाचें वय ४०।४२ धरावें लागतें. यावरून त्याचा जन्म शके १५३५-च्या सुमारास झाला असावा. मालोजी व शामभटाचे वडील लक्ष्मणभट हे समवयस्क मानल्यास लक्ष्मणभटाचें वय ५५।६० येतें. मल्हारभट श. १६१०-चे सुमारास निवर्तला. त्याचें वय ९०।९५ असावें. शामभट श. १६२२-च्या सुमारास कैलासवासी झाले. त्यांचें वय त्यावेळीं ९० चे सुमारास असावें[1].

गो. रा. राजोपाध्ये यांच्या वरील मताहून प्र. धों. कानिटकर यांचें मत किंचित् निराळें आहे. सामराजाच्या कालनिर्णयासाठीं त्यांनीं त्याच्या काव्यांतील अंतर्गत प्रमाणांचा आधार प्रामुख्यानें घेतला असून त्यांच्या अभ्यासाचा निर्णय असा, कीं सामराज हा तुकाराम, रामदास, वामन

१. गो. रा. राजोपाध्ये : सामराजकृत मुग्दलाख्यान (प्रस्तावना)

पंडित, नागेश, जयराम पिंड्ये व शिवभारतकार परमानंद यांचा समकालीन ठरतो. यासंबंधीं सामराजाचे आणखी एक अभ्यासक प्रो. पंगु यांचें मत असें, कीं "सामराज वामनाचा समकालीन असून त्यानें पंडितांची काव्यकृति पाहिली असावी. यास अनुसरून श्री. राजोपाध्ये यांनीं गीताचंद्रिकेवरून श. १६०५ हा जो त्याचा काल ठरविला आहे तोच ग्राह्य ठरतो. अर्थात् शके १६०५ हा सामराजाच्या उतारवयाचा काल होय, हें लक्षांत घेतलें पाहिजे. तस्मात् शके १५५०–१६०० या कालांत सामराजानें आपलें 'रुक्मिणीहरण' रचिलें असावें" ('सामराज', प्रथमावृत्ति, पृ. ५९). तात्पर्य, सामराज हा कवि सारस्वतकार मानतात त्याप्रमाणें शाहुकालीन नसून शिवकालीन असावा असें दिसतें.

या काळांतील संशोधनान्तीं उपलब्ध झालेल्या कांहीं ग्रंथकारांची माहिती आपण येथेंच करून घेऊं. पैकीं 'दीपरत्नाकरा'चा कर्ता **रत्नाकर स्वामी**[1] याचें उपनांव सदावर्ते व गोत्र भार्गव. महादबा–हिराजी–हरिहर–रत्नाकर याप्रमाणें याची वंशपरंपरा आहे. याच्या बायकोचें नांव सावित्री. रत्नाकरानें प्रथम यवनांच्या पदरीं शेकदारी, अमीनी वगैरे दर्जाच्या नौकऱ्या केल्या व पुढें उपरति होऊन मुल्हेरकर उद्धवस्वामींचे गुरु जे रामानंद त्यांस तो शके १६२५-त शरण गेला. गुरूपदेशानंतर तीर्थाटन करून खानदेशांत पिंपळनेर तालुक्यांत मुल्हेरच्या शिवेशेजारीं पानखेडें म्हणून गांव आहे तेथें सद्गुरुसमाधिसन्निध 'दीपरत्नाकरा'ची रचना करून कांहीं काळानें म्हणजे शके १६४१ आश्विन वद्य १३-स त्यानें गुरुसन्निध देह ठेविला. पानखेड्यास रामानंद व रत्नाकर या गुरुशिष्यांच्या समाधि अद्यापि आहेत. रत्नाकरानें वरील 'दीपरत्नाकरा' शिवाय आणखी दहावीस ग्रंथ रचिले असून शिवाय त्याचीं दीडदोन हजार स्फुट कविताहि आहे. त्याची कांहीं रचना गुजराथी व व्रिज या भाषांतहि आहे. विशेषतः गुजराथी भाषेंतील त्याचें भागवत उल्लेखनीय आहे. रत्नाकराची शिष्यशाखा खानदेशांत व

---

१. दीपरत्नाकर हा ग्रंथ कोणाचा यासंबंधीं दोन मतें आहेत. श्री. पुरंदरे तो रामनंदाचा म्हणतात. (भाइसंमं. त्रै. २१–२), तर श्री. कर्वे व प्रो. पोतदार तो रत्नाकराचा ठरवितात (भाइसंमं. त्रै. २२–२). पैकीं दुसरें मत ग्राह्य धरून आम्ही वरील पुरवणी लिहिली आहे. यास अंतर्गत प्रमाणें आहेतच. पण शिवाय धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील क्र. १७१६ चें बाडांत 'दीपरत्नाकरा'चें हस्तलिखित असून त्यांत हा ग्रंथ रत्नाकरकृत असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. ग्रंथ इ. सं. १९१९ त पुरंदरे मंडळीनें छापून प्रसिद्ध केला आहे.

गुजराथेंतहि असून त्याचा एक मठ कळवण येथें असल्याचें कळतें. रत्नाकरकृत 'दीपरत्नाकरा'ची ओवीसंख्या तीन हजाराचे वर आहे. ग्रंथ वेदांतपर असून त्याची मांडणी दासबोधाच्या धर्तीवर केलेली दिसते. या रत्नाकराची गुरुपरंपरा अशीः– मुक्ताबाई – चांगदेव – विमलानंद–जनकानंद–नरसिंहानंद–पुरुषोत्तम–मुक्तानंद–येकानंद–पुरुषोत्तम–सिद्धानंद––रामानंद–रत्नाकर.

**यादवेंद्रस्वामी** हे कवि गृहस्थाश्रमी असून प्रथम ते विजापुरीं अदिलशहाच्या नौकरींत होते. पुढें विरक्त होऊन ते पन्हाळगडीं येऊन राहिले व जवळचा पैका एक अन्नछत्र चालवून त्यांनीं धर्म केला. यादवेंद्रांच्या नांवावर सागरेशाची भूपाळी व कांहीं किरकोळ कवनें असून त्याचा निर्याणकाळ शके १६२९-असा आहे[१]. यांचे शिष्य कोणी गुळवणी घराण्यांतील आपदेव म्हणून असून त्यांचें घराणें अद्यापि पन्हाळगडीं आहे. शके १६३०-मध्यें ग्रंथरचना करणारे **निजानंद** याच काळांतील होत. त्यांचा सुमारें १६०० ओव्यांचा ज्ञानाब्धितरंग हा ग्रंथ उपलब्ध असून त्यांचा परिचय कै. राजवाडे यांनीं करून दिला आहे[२]. 'सिद्धान्तसारा'ची रचना शके १६३५-मध्यें झालेली असून त्याचा कर्ता कोणी सिद्ध संप्रदायांतील असावा असें त्यांत आलेल्या रेवणसिद्ध, काडसिद्ध इत्यादि परंपरेवरून वाटतें[३]. अद्वैतमत मांडणारा हा लिंगायत ग्रंथकार जयरामस्वामींचे गुरु शांतलिंगप्पा यांची आठवण करून देतो. अनंतसुत संत पुरोहित **तुकदेव** हेहि याच काळांतील. यांच्या ग्रंथरचनेस कावेरीतीरीं श्रीरंगपट्टण येथें आरंभ होऊन जवळच इरापूर येथें तिची समाप्ति झाली असल्यानें हे कवि वास्तविक तंजावरकडील होत. शके १६४० मध्यें लिहिलेला 'स्वात्मानुभवतरंगिणी' हा त्यांचा ग्रंथ ओवीबद्ध असून त्यास आधार शंकराचार्यांच्या अपरोक्षानुभूतीचा दिसतो. कवीनें आपली परंपरा पुरुषोत्तम–विनायक–अनंत–तुकदेव याप्रमाणें दिली आहे[४]. भट्टभट्टात्मज **शिवराम अकोलकर** यांनीं शके १६७८-त रचिलेली 'चैतन्यचंद्रिका' हीहि शंकराचार्यांच्याच एका कृतीवरील म्हणजे 'सदाचारा'वरील टीका असून ती श्लोकबद्ध आहे. वरील सर्व कवींहून भगवान कवि कऱ्हाडकर

१. 'यादवेंद्र स्वामी' (भाइसम. त्रै. १६–१).
२. 'निजानंद' ( भाइसंमं. इति. शके १८३६ ).
३. 'सिद्धांतसार' ( भाइसंमं. त्रै. १२–३ ).
४. अनंतसुत तुकदेव (भाइसंमं. इति. शके १८३५).
५. शिवराम अकोलकर (भाइसंमं. इति. शके १८३६).

याची रचना संख्येनें अधिक येते. आपण मागें ज्याचा उल्लेख केला त्या निरंजन कऱ्हाडकराचा हा नातू असून त्यानें आपल्या आजाचें एक ओवीबद्ध चरित्रहि रचिलें आहे[1]. या भगवान कवीचें सुमारें ३००० ओव्यांचें एक विनायक–माहात्म्य असून त्याची रचना शके १६७३ मधील दिसते.

या काळांतील कांहीं महानुभाव ग्रंथकारांचा उल्लेख करून आपण हा भाग संपवूं. पैकीं **शिवराम किंकरकृत** 'गोपिकास्वयंवर' हें ओवीबद्ध काव्य अपूर्णावस्थेत उपलब्ध असून त्याचा रचनाकाल निश्चितपणें ठाऊक नसला तरी तें १७-व्या शतकांतील असावें असें भाषेवरून वाटतें. या काव्याचा १०-वा अध्याय 'विजय माहात्म्य' म्हणून म. भक्तराजबावा औरंगाबादकर यांनीं शके १८३३-मध्यें छापविला होता. गोपीराज विद्वांस यांचे शिष्य **शिवमुनि** यांनीं लिहिलेली 'दानव्रतकथा' याच शतकांतील असून तींत अनेक वृत्तांची योजना करण्यांत आलेली आहे. दीपराजशिष्य **राघवमुनि** यानें रचिलेलें 'वत्सलास्वयंवर' हें थोडें उत्तरकालीन म्हणजे शके १६७६-तील असून त्याच्या प्रस्तावांत कवि म्हणतो—

व्यासोच्छिष्ट कथा परीसुनि यथा म्यां योजिली भारथा ।
शब्दाच्या चळथा करोनि उलथा वेष्टन केला जथा ॥
ग्रंथींहि जरि पाहतां परमिता आक्षेपवी तर्किता ।
नाहीं या बहुन्यूनता म्हणवुनी प्रार्थी कवी पंडिता ॥ ३३ ॥

कवीनें केलेली ही वकिली व्यर्थ आहे असें त्याची रचना पाहून वाटतें. **अवचितसुत काशी** या कवीचा उल्लेख आम्हीं मागें केलाच आहे. तसेंच सारस्वतांतहि तो येऊन गेला आहे. पुरावा कोणता तें कळत नाहीं, पण महानुभावपंथीय हा कवि आपला मानतात. आपली जात-कुळी या अवचितसुत काशीदासानें स्पष्ट सांगितली आहे, ती अशी—
"मऱ्हाटी टीका देशभाषा मऱ्हाटी । मऱ्हाटी कुळी जन्मवानी मऱ्हाटी ।
गुरुग्रंथही सेविला म्यां मऱ्हाटी । करावी क्षमा न्यूनते पूर्णदृष्टी ॥"
या कवीच्या "द्रौपदीस्वयंवरा'ची एक प्रत तंजावर येथील सरस्वति–महालांत आहे ( हस्तलिखित क्र. ११९१ ).

**अभ्यासाचीं साधनें**

वि. का. राजवाडे : चाकण–ब्रह्मे (कचेश्वर) म. इ. साधनें, खं.१५.
पां. न. पटवर्धन : कचेश्वर –आत्मचरित्र ( भाइसंमं. इति. शके १८३५ ).

---

१. प्रकाशन : 'महाराष्ट्र–सारस्वत' मासिक, १८३६.

वि. का. राजवाडे : कचेश्वर ( सरस्वति मंदिर द्वैमासिक, ८-८).
चिं. नीं. जोशी : सांप्रदायपरिमळाचा कर्ता कोण(पांगारकर स्मा.ग्रंथ -
ल. रा. पांगारकर : निरंजन माधवाची कविता ( प्रस्तावना ).
द. सी. पंगु : प्राचीन मराठी कविपंचक ( निरंजन माधव ).
पां. जि. सबनीस : निरंजन माधव ( वि. विस्तार, ५९–८ ).
नाथ निफाडकर : सांप्रदाय परिमळाचा कर्ता (म. सा. पत्रिका, ३ -४).
वि. ल. भावे : सामराजकृत रुक्मिणीहरण–प्रस्तावना ( महाराष्ट्र-कवि, इ. १९०५ ).
प्र. धों. कानिटकर : रुक्मिणीहरण–निरीक्षण.
द. सी. पंगु : सामराज ( द्वितीयावृत्ति, इ. स. १९४१ ).
गो. रा. राजोपाध्ये : सामराजकृत मुद्गलाख्यान ( प्रस्तावना ).
गो. वि. तुळपुळे : सामराजकृत 'रुक्मिणीहरण', आ. २ री(प्रस्तावना).
वा. म. जोशी : रुक्मिणीहरण–चर्चा ( वि. विस्तार १९२७ ).
प्र. धों. कानिटकर : सामराजकवीचा काल ( मुमुक्षु, व. ८).
गो. रा. राजोपाध्ये : सामराज–चर्चा (मुमुक्षु, व. ८ व ९ ).
द. वा. पोतदार : दीपरत्नाकर ग्रंथ कोणाचा? (भाइसंमं. त्रै. २२-२)
गो. का. चांदोरकर : रत्नाकरस्वामी ( भाइसंमं. इति. श. १८३४ ).
ज. र. आजगांवकर : महाराष्ट्र कविचरित्र, भा. २.
शं. श्री. देव : रत्नाकरकृत समश्लोकी गीता ( रामदासी संशोधन, खं. १ क. ४३६ ).



कृष्णदयार्णवांचे गुरु गोविंद हे रायगडावर पालखीपदस्थ होते, इत्यादि माहिती सारस्वतकारांनी 'हरिवरदे' तून दिलेलीच आहे. हे गोविंद कोण तें कळत नाहीं. कृष्णदयार्णवांच्या ग्रंथाची एक हस्तलिखित पोथी पैठण येथील त्यांच्या मठांत आहे. 'हरिवरदा' या ग्रंथाशिवाय दत्तजननोत्साह, विचारचंद्रिका व तन्मयानंदबोध हीं तीन प्रकरणें संतकविकाव्यसूचिकार श्री. चांदोरकर कृष्णदयार्णवांच्या नांवावर देतात. यांखेरीज त्यांचीं ६५ स्फुट कवनें अलीकडे श्री. काटे यांनीं छापून प्रसिद्ध केलीं आहेत. कृष्णदयार्णवांचे एकूण सोळा शिष्य असून त्यांपैकीं उत्तमश्लोक हे प्रमुख होत. हे कृष्णदयार्णवांचे लेखक असून 'हरिवरदे'चें लेखन यांनींच केलें. हे मूळचे माधवराव व्यापारी. पुढें गुरूंनीं यांचें नांव उत्तमश्लोक असें ठेविलें. उत्तमश्लोकांचा 'प्रबोधसार' या नांवाचा ग्रंथ उपलब्ध असून त्याची ओवीसंख्या ३२१ व रचनाकाल शके १६८२ असा आहे. उत्तमश्लोक शके १७०८-मध्यें समाधिस्थ झाले. त्यांचा मठ वऱ्हाडांत उमरखेड येथें आहे. कै. भावे यांनीं तळटीपेंत दिलेला १७५८ हा शक उत्तमश्लोकांच्या निर्याणाचा नसून त्यांचे शिष्य व कृष्णदयार्णवांचे नातू काशीनाथ यांच्या निर्याणाचा आहे. या तिघांच्याहि समाधी पैठणास शेजारींच असून त्यांवरील लेखांवरून त्यांचे समाधिशक निश्चित करतां येतात.

**श्रीधर** :—महाराष्ट्र-सारस्वतकारांनीं श्रीधराच्या काव्याची केलेली परीक्षा अचूक असली तरी श्रीधरविषयक ऐतिहासिक स्वरूपाच्या प्रश्नांचा विचार त्यांनीं केलेला दिसत नाहीं. याविषयीं संशोधक कै. का. ना. साने यांचीं दोन मौलिक स्वरूपाचीं टिपणें उपलब्ध असून त्या टिपणांत कांहीं नवीन भर घालून कै. चिं. नी. जोशी यांनीं लिहिलेला श्रीधरावरील ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथास प्रो. द. वा. पोतदार यांची संशोधक प्रस्तावनाहि आहे. वरील साधनांच्या आधारें श्रीधराच्या चरित्राची मांडणी पुढीलप्रमाणें करतां येईल.

श्रीधराचा जन्म ज्या नाझरेकरांच्या घराण्यांत झाला तें घराणें प्रथम मोगलाईत चौसाळे महालांत खडकी येथें राहत असल्यानें 'खडके' या नांवानें ओळखलें जात असे. या घराण्यांतील एक पुरुष रामोपंत हा तेथून विजापूरच्या दरबारीं नोकरीनिमित्त गेला व पुढें तो घोडदळावरील

अधिकारी झाल्यानें त्यास सर्वजण 'घोडके' असें म्हणूं लागले आणि कालांतरानें तेंच त्याच्या कुळाचेंहि उपनांव म्हणून रूढ झालें. पुढील पिढ्यांत शिपाईगिरीचा पेशा सुटला तरी जुन्या नांवाची आठवण श्रीधरापर्यंत कायम होती असें त्याच्या पुढील उद्गारांवरून वाटतें.

" आम्ही ' खडके ' आमुची कीर्तनगंगा असे पुरातन हो ।
भावें श्रवण करी जो वास कदा त्यास यमपुरांत न हो ॥ "

असो. पुढें राघोपंत हे नाझर महालाचे देशकुलकर्ण मिळवून तेथें राहण्यास आले व तेव्हांपासून ते 'नाझरेकर' झाले. म्हणजे श्रीधराच्या घराण्यास खडके, घोडके व नाझरेकर अशीं तीन आडनांवें कारणपरत्वें पडल्याचें दिसतें. पैकीं कागदपत्रांतून शेवटल्या दोहोंचाच उल्लेख असून खडके हें नांव पुढें लुप्त झालें. नाझरे येथें राघोपंतानंतर चंद्राजीपंत, दत्तोपंत व रंगोपंत अशा तीन पिढ्या झाल्यावर रंगोपंतास रामाजी, बोपाजी, कृष्णाजी व दत्तात्रेय असे चार मुलगे झाले. पैकीं रामाजी व कृष्णाजी हे निपुत्रिक वारले. बोपाजीचा मुलगा म्हणजे प्रसिद्ध साधु रंगनाथस्वामी निगडीकर व दत्तात्रेयाचा मुलगा म्हणजे श्रीधरपिता ब्रह्मानंद हा होय. अर्थात् रंगनाथस्वामी हे श्रीधराचे चुलत चुलते होत. हें सर्व कुटुंब नाझरें येथें चारपांच पिढ्या एकत्र होतें. पण शके १५६४-त बोपाजीनें जलसमाधि घेतल्यानंतर रंगनाथ हा निगडीस जाऊन राहिला व निगडीकर झाला. यानंतर या दोन शाखा एकमेकींपासून दुरावल्या. बाकीचें कुटुंब मात्र नाझऱ्यासच राहिलें. या नाझरें गांवावर श्रीधराची व त्याहूनहि त्याचा पिता ब्रह्मानंद याची फार भक्ति दिसते. उभयतांची जन्मभूमि तीच. तेथील माण नदीच्या परिसरांत हें कुटुंब लहानाचें मोठें झालें. ब्रह्मानंदाच्या एका पदांत[1] त्याचें मायभूमीवरील प्रेम उत्कटत्वानें व्यक्त झालेलें दिसून येतें. श्रीधरानेंहि नाझऱ्याचा उल्लेख अनेक ठिकाणीं केलेला आढळतो.[2] श्रीधराचा आजा दत्तानंद याजविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं. त्याचा समाधिकाल शके १५९० असावा असें त्याचा पुत्र ब्रह्मानंद यानें रचिलेल्या 'आत्मप्रकाश' या ग्रंथांतील पुढील उल्लेखावरून वाटतें.

" नाझरें नाम नगरीं । माणगंगेचिये तीरीं
आनंदमठा अंतरीं । समाधिस्थ दत्तात्रय ॥
माघ मास दशमीं वद्यीं । संवत्सर किलक तधीं
दत्तात्रेय समाधि- । सुखीं पूर्ण पहुडले ॥

---

१. चि. नी. जोशी : श्रीधर, चरित्र आणि काव्यविवेचन, पृ ६.

१. रामविजय ४०-२०२; हरिविजय ३६-२५०; पांडवप्रताप ६४-१८९.

वरील योग शके १५९० त येतो. दत्तानंदाच्या निधनानंतर त्याचा पुत्र ब्रह्मजीपंत निदान आठदहा वर्षें तरी नाझरें येथें राहात असावा व पुढें शके १६०० च्या सुमारास तो पंढरपुरास गेला असें वाटतें. कारण शके १६०४ मध्यें रचिलेल्या 'आत्मप्रकाश' या आपल्या ग्रंथांत तो स्वतःचा उल्लेख 'ब्रह्मानंद यति-स्वामी' असा करतो. त्यावरून वाटतें, कीं पंढरपुरीं जाऊन तेथें संन्यासदीक्षा घ्यावी या हेतूनें त्यानें नाझरें गांव शके १६०० च्या सुमारास सोडलें असावें. श्रीधरहि हरिविजयांत म्हणतो, कीं "पुढें पंढरपुरास जाऊन । मग केलें संन्यासग्रहण". या ब्रह्मानंदानें शके १६१५ मध्यें भीमातटीं म्हणजे पंढरपूर येथेंच समाधि घेतली याविषयीं खुद्द श्रीधरानें केलेला उल्लेख असा—

"श्रीधर म्हणे पंढरीयें भीमातटीं । स्वामी माझा वाळवंटीं ।
समाधिस्थ जगजेठी । ब्रह्मानंद यतिराज ॥
श्रीमुख संवत्सर सतेज । मार्गेश्वर शुद्ध बीज ॥
ब्रह्मानंद महाराज । समाधिस्थ पांडुरंगीं ॥"[1]

ब्रह्मानंदाचीं कांहीं पदें व 'आत्मप्रकाश' या नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ उपलब्ध आहे. हा ग्रंथ ब्रह्मानंदानें श्रीधरास अनुलक्षून लिहिला असावा असें त्यांतील पुढील ओव्या[2] सांगतात:—

"हा ग्रंथ व्हावयास कारण । श्रीधरें केले होते प्रश्न ।
मज जें केलें निरोपण । तैसाचि ग्रंथ पूर्ण लिहिजे जी ॥
पूर्वाश्रमींचा निजपुत्र । सत् शिष्यहि परम चतुर ॥
त्या श्रीधराचेन प्रश्न समग्र । 'आत्मप्रकाश' प्रकाशिला ॥

शके १६०४ मध्यें रचिलेला सुमारें एक हजार ओव्यांचा हा ग्रंथ एकूण चौदा प्रकरणांत विभागलेला असून तो वेदांतपर आहे. ब्रह्मानंदाच्या भाषेवर ज्ञानेश्वरीची छाया पडलेली असून श्रीधराची अलंकारिक शैली येथें बीजरूपानें प्रत्ययास येते.

**श्रीधराचा जन्मकाल:**—'नवनीत'कारापासून पुढें सर्वजण शके १६०० हा श्रीधराचा जन्मकाल म्हणून धरून चालले आहेत. कै. साने व कै. भावे यांनाहि विरुद्ध पुराव्याचे अभावीं वरील शक मान्य दिसतो. परंतु हें परंपरागत मत अलीकडे कै. प्रो. जोशी यांनीं आपल्या श्रीधरावरील ग्रंथांत सप्रमाण खोडून काढलें असून त्यांच्या म्हणण्यांत बराच तथ्यांश आहे. शके १६०४ मधील 'आत्मप्रकाश' हा ग्रंथ आपण आगल

१. ज्ञानेश्वर-चरित्र ( श्रीधरकृत ), २-२६१।२.
२. आत्मप्रकाश, १३-६१ ते ६६.

पूर्वाश्रमींचा पुत्र व आतांचा सच्छिष्य श्रीधर यानें विचारलेल्या प्रश्नांस उत्तररूप म्हणून लिहिला असें ज्याअर्थी ब्रह्मानंद सांगतो त्याअर्थी श्रीधराचें वय तेव्हां निदान विशीच्या तरी आंतबाहेर असलें पाहिजे. या ग्रंथास स्वतः श्रीधरानें गुरुस्तुतिपर अशी एक पुरवणी जोडली असून त्यावरून शके १६०४ च्या सुमारास त्याच्या कवित्वशक्तीस अंकुर फुटल्याचें स्पष्ट दिसतें. आतां परंपरेप्रमाणें श्रीधराचा जन्मशक १६०० असा मानला तर वरील प्रसंगीं त्याचें वय अवघें चार वर्षांचें ठरून अनवस्था संभवते. तात्पर्य, श्रीधराचा जन्मकाल थोडा मागें नेणें अवश्य असून तो शके १५८० च्या आसपास यावा असें वाटतें.

श्रीधराविषयीं रूढ असलेल्या कांहीं दंतकथांचें निराकरण येथें करणें अवश्य आहे. वास्तविक श्रीधराचा पिता ब्रह्मानंद हाच त्याचा गुरुहि होय. परंतु याविषयीं राजारामप्रासादीकृत 'भक्तमंजरीमाला' या चरित्र-ग्रंथाच्या आधारानें एक दंतकथा रूढ झालेली असून ती खरी मानल्यास श्रीधराचें गुरुत्व त्याचा चुलता रंगनाथस्वामी यांजकडे जातें. लहानपणीं खंड्या किंवा खंडोबा या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या श्रीधराच्या जिभेवर रंगनाथस्वामींनीं पंढरी मुक्कामीं तुकाराम, वामन पंडित, रामदास इत्यादि संतमंडळीसमक्ष 'श्री' कार लिहिला व त्याचें श्रीधर असें नामकरण करून त्याजकरवीं कीर्तन करविलें असा वरील कथेचा सारांश आहे. खंड्याचा 'श्रीधर' कसा झाला व त्याच्या जिव्हाग्रीं वाग्देवता कशी येऊन राहिली याविषयीं एक आर्याहि निगडीकर घराण्यांत ऐकू येते. ती अशी—

श्री जिव्हेवरि लेहुनि श्रीधर हें नांव ठेविलें त्यास ।
श्रीगुरुचरणा वंदुनि उत्तम कवि जणुं जुनाट हरिदास ॥

वरील कथा नाझरें गांवांत सर्वतोमुखीं असून कै. साने यांनींहि तिज-विषयीं संशय व्यक्त केलेला नाहीं. हें सर्व खरें असलें तरी ही कथा सर्वथा कल्पित, अतएव खोटी आहे. कारण एकतर या प्रसंगीं शके १५७१ तच समाधिस्थ झालेले तुकाराम हजर असणें शक्य नाहीं. दुसरें असें, कीं स्वतः श्रीधर ब्रह्मानंदास आपला गुरु मानतो, रंगनाथस्वामीस मानीत नाहीं. वेदांतसूर्य या आपल्या ग्रंथांत ब्रह्मानंदानेंच आपलें श्रीधर असें नांव ठेवल्याचें त्यानें स्पष्टपणें म्हटलें आहे. बरें, ही कथा खरी असती तर आपल्या 'संतमालें'त रंगनाथस्वामीकृत चमत्कारांत वरील चमत्काराची नोंद श्रीधर जरूर करता. पण तसें त्यानें केलेलें

---

१. सं. अ. १९.

म. सा. १२८

नाहीं. तात्पर्य, वरील कथा ही केवळ दंतकथा असून तींत सत्यांश मुळींच नाहीं.

श्रीधर हा संन्यासमार्गी असून त्यानें वयाच्या चौदाव्या वर्षी संन्यास घेतला होता हाहि एक असाच लोकभ्रम आहे. श्रीधराच्या गृहस्थाश्रमाविषयीं पुरावा म्हणून शाहूनें त्याच्या पुत्रद्वयास दिलेल्या सनदेचा उल्लेख सारस्वतकारांनीं केलाच आहे. या कामीं दुसरा पुरावा म्हणजे श्रीधराच्या पश्चात् शके १६५९ त त्याच्या मुलांनीं आपसांत केलेलें फारकतपत्र हा होय. हें पत्र पंढरपूरच्या दप्तरांत असून त्यांत "याखेरीज पार्वतीबाई मातोश्रीपाशीं तोळा व मासा आहे तो तीमाधारा दों ठाई करून घ्यावा" असा मजकूर आहे. त्यावरून श्रीधराच्या पत्नीचें नांवहि कळून येतें. तात्पर्य, श्रीधर हा गृहस्थाश्रमी असून त्याच्या संन्यासग्रहणासंबंधींची हकीकत पूर्णपणें खोटी आहे. ही भ्रांत कल्पना प्रथम 'नवनीत'कारांनीं मांडली व पुढें तिची पुनरावृत्ति होत गेल्यानें समाजांत ती रूढ होऊन बसली. तिचें निरसन कै. साने यांनीं आपल्या उपर्युक्त लेखांतून केलें आहे. श्रीधर गोसावी ही पदवी केवळ पूज्यत्वदर्शक आहे, संन्यासदर्शक नाहीं. संन्यासग्रहणोत्तर व्हावा त्याप्रमाणें श्रीधराचा श्रीधरानंदहि झालेला दिसत नाहीं. नाझरेकर मंडळीहि या मतास विरोधी आहेत. अलीकडे कै. जोशी यांना श्रीधराच्या दप्तरांत त्यांचा पणतू मनोहर यानें शके १७४४-त लिहिलेलें 'श्रीधराची समाधिकथा' या नांवाचें एक प्रकरण मिळालें असून त्यांतील पुरावाहि संन्यासग्रहणकल्पनेच्या विरुद्धच जातो.

**श्रीधराचा अंतकाळ:**—श्रीधराच्या जन्मकालाप्रमाणें त्याच्या अंतकालाविषयींहि कांहीं गैरसमज रूढ होता. 'नवनीत' कारांस अनुसरून डॉ. केतकरांपर्यंत सर्वजण शके १६५० हा श्रीधराचा मृत्युकाल म्हणून धरून चालले होते. याविषयीं सत्यान्वेषण प्रथम कै. साने यांनीं श्रीधराच्या समाधीवरील लेखाच्या आधारानें केलें. तो लेख खंडित असला तरी पंढरपूर दप्तरांतील एका बाडांत 'श्रीधरस्वामी प्रयाणकाल' या मथळ्याखालीं जो श्लोक कै. जोशी यांना मिळाला त्याच्या आधारें वरील लेख पूर्ण करतां येतो. किंबहुना, समाधीवरील लेख व बाडांतील श्लोक एकच आहेत. तो असा—

भूप्राणांगमही मिते शुभ शके सौम्याब्द सौम्यायने ।
माघे मासि असिते द्विजे गुणतिथौ ब्राह्मे मुहूर्ते यमे ॥
भीमातीरगते सुपंढरपुरे श्रीविठ्ठलाधिष्ठिते ।
श्रीमत् श्रीधर सद्गुरु सुखघनः सच्चित् समाधौ स्थितः ॥ १ ॥

याप्रमाणें भू = १, प्राण = ५, अंग = ६, व मही = १ या नियमानें व 'अंकानां वाम गतिः' या सूत्राधारें श्रीधराचा मृत्युशक १६५१ हा ठरतो. श्रीधरपुत्र दत्तात्रेय यानें रचिलेल्या आरतींतहि वरील शकास पाठिंबा मिळतो. ही आरती अशी[1]—

जयदेव जयदेव श्रीधर गुरुस्वामी ।
जडजीव पावन जाले तव गुणरूपनामीं ॥ ध्रु. ॥
सुमाघ वद्य तृतीया शशिवासर उदई ।
सुसौम्यवत्सरीं सौम्यायनिं विठ्ठलपाई ।
सोळशत एकावन अर्यमउडुसमई ।
पंढरपुर सत्क्षेत्रीं समाधि ते ठाईं ॥

तात्पर्य, श्रीधराचा जन्म शके १५८०-च्या सुमारास होऊन त्याचा मृत्यु शके १६५१-त झाला. ब्रह्मानंद व श्रीधर या अनुक्रमें पितापुत्रांच्या समाधि पंढरपुरांत आहेत.

श्रीधराच्या मृत्यूपूर्वीं एकच वर्ष म्हणजे शके १६५०-मध्यें शाहूनें त्यास टाकळी ( परगणे माण ) हा गांव इनाम दिल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. या इनामपत्रांत श्रीधराचा उल्लेख 'हरिभक्तिपरायेण रा. श्रीधर गोसावी बिन ब्रह्मानंद गोसावी उपनांव घोडके नाझरेकर... हालीं वास्तव्य क्षेत्र पंढरपूर हे भले थोर सत्पात्र' याप्रमाणें आला आहे. पुढें श्रीधराचे पश्चात् टाकळी गांवाचें इनामी उत्पन्न अपुरें पडूं लागल्यानें त्याचे पुत्र दत्तात्रेय व मनोहर यांच्या विनंतीवरून शाहूनें त्यास मौजे तडवळें हा गांव शके १६५४-त इनाम दिल्याची सनदहि उपलब्ध आहे.[1] श्रीधराचे पश्चात् त्याच्या पुत्रपौत्रांनीं किरकोळ कवन केल्याचें आढळतें. परंतु तें अगदीं सामान्य प्रतीचें असल्यानें विचारांत घेण्याचें कारण नाहीं.

**श्रीधराची ग्रंथरचना** :—श्रीधरानें एकुण सव्वा लाख कविता केल्याचें त्याचा पुत्र मनोहर आपल्या आरतींत सांगतो. महाराष्ट्र-सारस्वतकारांच्या मतें ही संख्या अर्धलक्षाहून अधिक भरावी. प्रत्यक्ष मोजदाद केली असतां श्रीधराची प्रसिद्ध व अप्रसिद्ध कविता साठ हजारांच्या घरांत येते. तिचा तपशील पुढीलप्रमाणें —

---

१. पां. न. पटवर्धन : भाइसंमं. इतिवृत्त, शके १८३७, क्र. १७६.

१. भाइसंमं. अहवाल, शके १८३३, लेखांक १३.

| | ग्रंथनाम | अध्याय | स्थळ | काळ | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | हरिविजय | ३६ | पंढरपूर | श. १६२४ | ८१३९ |
| २ | रामविजय | ४० | पंढरपूर | श. १६२५ | ९१४७ |
| ३ | वेदांतसूर्य | १२ | सिद्धाश्रम | श. १६२५ | २४१४ |
| ४ | पांडवप्रताप | ६४ | पंढरपूर | श. १६३४ | १३,३९७ |
| ५ | जैमिनी अश्वमेध[1] | ९६ | पाथरी | श. १६३७ | ९८७६ |
| ६ | शिवलीलामृत[2] | १४ | बारामती | श. १६४० | २४५० |
| ७ | पांडुरंग माहात्म्य | १० | | | ७४८ |
| ८ | व्यंकटेश माहात्म्य | १० | | | ६५० |
| ९ | मल्लारि माहात्म्य | २ | | | ३५५ |
| १० | ज्ञानेश्वर चरित्र | २ | | | ३०० |
| ११ | अंबिकाउदय | | | ( अनुपलब्ध ) | ......... |
| १२ | स्फुट प्रकरणें | | | | ४०४२ |
| १३ | संस्कृत कविता | | | | ३०० |
| १४ | पदें वगैरे | | | (सुमारें) | ६०० |
| | | | | | ५७८१८ |

'हरिविजय' हा श्रीधराचा पहिला ग्रंथ असून 'शिवलीलामृत' हा अखेरचा दिसतो. याचा अर्थ त्याचा ग्रंथरचनेचा उद्योग सुमारें १५-२० वर्षे चालू होता.

---

१. 'जैमिनीअश्वमेध' हा ग्रंथ श्रीधरकृत नसण्याची शक्यता प्रो. पोतदार यांनीं सूचित केली आहे. कारणें अशीं:– १. या ग्रंथाच्या एका प्रतींत अंतीं कवठ्याचा बिन्हाडसिद्ध हें ज्याचें कुलदैवत अशा त्र्यंबकानुज श्रीधराचा उल्लेख आढळतो. आपल्या श्रीधराचें कुलदैवत तर मल्लारी आहे. २. इतर कांहीं प्रतींतूनहि त्यानें कपित्थ म्हणजे कवठें येथील सिद्धनाथास आपलें कुलदैवत म्हणून वंदिलें आहे. ३. ग्रंथसमाप्तीचें स्थळ मात्र पाथरी हेंच सर्वत्र आढळतें. ४. ग्रंथरचनेच्या कालोल्लेखांतहि ('इंदुकला शतांकित शक। मुनित्रयाब्दें जाण अधिक') कांहीं घोटाळा आहे. तात्पर्य, हा ग्रंथ आपल्या ब्रह्मानंदी श्रीधराचा नसून दुसरा कोणी त्र्यंबकानुज श्रीधर असण्याचा संभव फार आहे. (पहा–प्रो. पोतदार : श्रीधरचरित्र प्रस्तावना, व कै. भारद्वाज : विविधज्ञानविस्तार, मार्च १९१४. ).

२. 'शिवलीलामृत' या लोकप्रिय ग्रंथाच्या छापील प्रतींतून एक पंधरावा अध्याय आढळतो तो श्रीधरकृत नव्हे. मूळ ग्रंथ १४ अध्यायांचा

[ पुढील पान पहा. ]

श्रीधराचा जम पंढरींत चांगला बसलेला दिसतो. तेथील राहतें घर त्यानें अप्पाजी विठ्ठल काटे यांजकडून शके १६३९-त सव्वादोनशें रुपयांस घेतल्याचें खरेदीखत उपलब्ध झालें असून त्यावर पन्नास जणांच्या साक्षी आहेत. पंढरपुरांत श्रीधराचा पेशा मुख्यतः पुराणिकाचा व कीर्तनकाराचा असावा. त्याच्या अनेक सुहृदांनीं व शिष्यांनीं आपापल्या पदांतून त्याच्या कीर्तनकौशल्याची तारीफ केली आहे. मानपुरी गोसावी या तत्कालीन हिंदी साधूनें " कीर्तनकी तेरी ढाल लगी है । श्रवन करत हम रीझो " या शब्दांत श्रीधराची कीर्तनकला गौरविली आहे. श्रीधराचें शिष्यमंडळ मोठें दिसतें. पंढरपूर येथील त्याच्या संग्रहांत एक जुनरी बाड उपलब्ध झालें असून त्यांत श्रीधराच्या कांहीं शिष्यांनीं त्यास वाहिलेल्या पुष्पांजली व लिहिलेलीं पत्रें आहेत. पैकीं साम्रराज नांवाच्या एका शिष्यानें वाहिलेली पुष्पांजली संस्कृत भाषेत असून तींत श्रीधराचें उत्कृष्ट असें शब्दचित्र आलें आहे. पत्रबद्ध पत्रें लिहिणारांत शिवराम, मानपुरी गोसावी, मध्वमुनीश्वर, हिंदूराव, आनंदराव, संकोबा अशी कांहीं मंडळी असून त्यांपैकीं कांहींना श्रीधरानें धाडलेल्या उत्तरांच्या नकलाहि वरील बाडांत आहेत.

श्रीधराचें हस्ताक्षर म्हणून 'शिवलीलामृतां'तील जो उतारा महाराष्ट्र-सारस्वताच्या मागील आवृत्तींत दिलेला होता तो श्रीधर-लिखित नसावा. स्वतः कै. भावे यांनींहि त्याविषयीं संशयच व्यक्त केला आहे. अलीकडे श्रीधरचरित्रकार कै. जोशी यांचे चिरंजीव श्री. वि. चिं. जोशी यांनीं पंढरपूर मठांतील कागदपत्रें पाहून संशोधकांच्या संमतीनें श्रीधराच्या हस्ताक्षराचे दोन नमुने प्रसिद्ध केले आहेत. पैकीं श्रीधराच्या स्वतःच्या पाठांतरवहीवरील शके १६१७-मधील श्रीधर-लिखित मजकूर अधिक विश्वसनीय आहे.

गिरिधरस्वामींविषयीं सारस्वतकारांचीं लिहिलेंच आहे. रामदासी

---

[ पान १०२० वरून ]

असून हा पंधरावा अध्याय कोणीतरी मागाहून घुसडून दिलेला, अर्थात् बनावट आहे. (पहा:– पां. मा. चांदोरकर : भाइसमं. पंचम संमेलनवृत्त). श्रीधराच्या ग्रंथास त्याच्या वेळींच लोकप्रियता लाभली होती हें शके१६६४ मध्यें म्हणजे श्रीधराच्या पाठोपाठ कोणा रघुकवीनें रचिलेल्या 'ब्रह्मोत्तरखंड' या ग्रंथावरून कळून येतें. रघुकवीचा हा ग्रंथ म्हणजे श्रीधरी शिवलीलामृताची वाढवून काढलेली आवृत्तिच आहे. ( पहा:– पो. का. चांदोरकर: भाइसमं. अहवाल, शके १८३७.)

परंपरेंत यांच्याइतकी प्रचंड ग्रंथरचना दुसऱ्या कोणाची नाहीं. त्यांची एकूण कविता २४,००० चे वर जाते. बीड येथील सीताराम मठांत गिरिधरांच्या ग्रंथांचा संग्रह असून शिवाय त्यांना सारा दासबोध मुखोद्गत असावा हें दर्शविणारी ग्रंथराजाची एक स्मरणवही तेथें आहे. गिरिधरांच्या ग्रंथांपैकीं तेरा ग्रंथ 'रामदास–रामदासी' मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतील एकाचा उल्लेख मुद्दाम करावासा वाटतो. हा ग्रंथ म्हणजे हकीकत वाके. हें १४७ कडव्यांचें एक गद्य प्रकरण असून त्यांत गिरिधरांनीं दहा वाके म्हणजे हकीकती समर्थांना पत्ररूपानें कळविल्या आहेत. समर्थांच्या दरबारांतील हा वाकानवीस सर्वत्र संचार करून आपल्या निदर्शनास आलेली स्थितिगति दरबारास रुजु करीत आहे. वाक्यांचा मायना एकत्र असून तो पहाण्यासारखा आहे—

" स्वस्ति श्रीमत्सच्चिदानंदैक्यघन ब्रह्मानंदैकजीवन परमानंद परमपुरुष परावर परात्पर सकळचराचर आगमनिगमांतर अक्षर अपार परातीत निर्गुण गुणातीत निरंजन सदोदित शुद्धबुद्ध शब्दातीत भावगर्भ भावातीत आदिपुरुष आत्माराम सगुणनिर्गुण पूर्णकाम अनंतकोटिब्रह्मांडनायक नाम श्रीरामजयरामजयजयराम स्वामीसमर्थांचे सेवेसी ।।

दासानुदास परंपरेंक गिरिवरनामैक अणुरेणैक निजपदैक येकैककृत साष्टांग विज्ञापना परिहार ।।..."

हे वाके रचनेच्या दृष्टीनें अगदीं नवीन वाटतात. त्यांतील प्रासात्मक गद्य मोठें कर्णमधुर आहे. शेवटले दोन वाके फिर्यादरूप असून त्यांत गिरिधरांनीं कांहीं तक्रारींची दाद समर्थांपाशीं मागितली आहे. एकनाथांच्या 'अर्जदास्ते'ची छाया या वाक्यांवर थोडी दिसते. या रचनेचा थोडा नमुना पुढें देतों. 'निवेदनी' नांवाचा एक वाका आहे त्यांत गिरिधर फिर्याद मांडतात,

" त्या देशिचे राजे कांहि न्याय अन्याय वर्तता आहेति. त्यांच्या फिरादि येता आहेती. तरी समर्थ न्यायसुबा साहेबसुबा परमार्थियांसि राजाज्ञा हुकुम केलियां नितिन्यायें विवेक उपायें शासनतंबि पोहोचेल......।। ३ ।।.........

एवं हकीकत साकार सरकार मायापुर देहाय ब्रह्मांडपरमणे कुल्ल अब्रह्म भुवनात् ......... विद्यमान स्वामियांचे शेवेसि । त्यांत राजशासनि वर्तमान हालि निवेदन केलें.........। पुढें आणखी वर्तमान तारिख चंद्र अकरा पासुनि जें जें होईल तें तें रोजबरोज डाक चौकि नळवे सरे राहा राजमार्गे त्रयोदय अक्षरि मोहरेनसीं हुजुर करार वाकेवाके पोहोचले

जातील। गिरिधर वाकानिविस सर्फराज होतिल। भाषाभेद पंडितजन क्षमा करितिल। अर्थभेद विद्वज्जन जाणोनि घेतील ॥ १० ॥"

## अभ्यासाचीं साधनें

कृष्णदयार्णव—

कृष्णदयार्णव : हरिवरदा (संपा. प्रभु-तेंडुलकर, मुंबई, श. १८१२).
रा. गो. काटे : कृ. कृत वेदस्तुति आणि स्फुट कविता (प्रस्तावना).
गं. ना. मुजुमदार : उत्तमश्लोक-विरचित प्रबोधसार ( भाइसंमं. त्रै. १२–४ ).

श्रीधर—

का. ना. साने : टिपणें (भाइसंमं. अहवाल शके १८३३, ले. १३; शके १८३७, ले. १७७; विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९१४ इ.).
पां. ना. पटवर्धन : टिपण (भाइसंमं. इतिवृत्त, श. १८३७, ले. १७६).
द. अ. आपटे : कविचरित्र, खं. २ भाग २.
चिं. नी. जोशी : श्रीधर-चरित्र आणि काव्यविवेचन.
द. वा. पोतदार : प्रो. जोशीकृत श्रीधरचरित्र (प्रस्तावना).



## महाराष्ट्रांतील एक मोठी परंपरा

'ग्रंथकर्तृत्वाची सुरवात' या प्रकरणास पुरवणी जोडतांना नाथपंथा-विषयीं आम्हीं बुद्धयाच मौन धरलें होतें. हेतु असा, कीं कांहीं नवीन माहिती मिळेल व तिचा उपयोग पुढें त्या त्या प्रकरणीं यथावकाश करून घेऊं. तसा समय प्रस्तुत प्रकरणीं आला आहे. परंतु खेदाची गोष्ट, कीं नाथपंथ व त्याचें वाङ्मय यावर प्रकाश पाडूं शकतील अशा प्रकारचीं साधनेंच म्हणण्यासारखीं हाताशीं येऊं शकलीं नाहींत. वस्तुस्थिति अशी आहे, कीं या विषयासंबंधानें एकदरींत आपलें अज्ञानच अधिक आहे. नाथपंथाच्या गेल्या आठशें वर्षांच्या अखंड परंपरेंतील कांहीं मोजके तारे मधूनच लुकलुकतांना दिसतात, क्वचित् त्यांच्याहि अस्तित्वाविषयीं संशय येतो, क्षितिजावर नवीन तारा असा उगवतच नाहीं, आणि एकदरींत सर्वत्र काळोख माजला आहे असें वाटूं लागतें. तात्पर्य, परिस्थिति निराशाजनक आहे, हें खरें. तरीपण जें उपलब्ध आहे तें पुढें करणें हें आमचें काम असल्यानें कांहीं विचार पुढें मांडीत आहों. या पंथास अलीकडे कानफाटे पंथ असें नांव मिळालें असलें तरी या दोन पंथांतील आचार व विचार भिन्न असल्यामुळें नाथपंथास कानफाटे पंथ म्हणणें बरोबर नाहीं. शिवाय नाथपंथाची परंपरा अति प्राचीन म्हणजे आदिनाथापासून चालत आलेली असून त्या मानानें १४ व्या शतकांतील धर्मनाथापासून सुरू झालेला कानफाटे पंथ अर्वाचीन आहे. या धर्मनाथांनीं कच्छ प्रांतीं धीनोधर मठ व काठेवाडांत गोरखमठी असे दोन मठ स्थापन केले. पैकीं धीनोधर मठांतील पंथीयांत योगी व पीर असे दोन भेद असून त्यांतील पीर हा मुसलमानी शब्दच सांगतो, कीं या कानफाटे पंथाची स्थापना यादवोत्तर काळांत म्हणजे मुसलमानी राजवटींत झालेली असणार. याचा अर्थ, कानफाटे पंथ हा मूळ नाथपंथास उत्तर काळांत फुटलेला एक फांटा असून आज या दोन पंथांत कोणतेंहि साम्य उरलेलें नाहीं.

नाथसंप्रदायावर अगदीं अलीकडे डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी यांचा पांडित्यपूर्ण प्रबंध हिंदी भाषेंत प्रसिद्ध झाला असला तरी महाराष्ट्रांतील नाथपंथाचा इतिहास अजमाविण्याच्या दृष्टीनें या ग्रंथाचा विशेष उपयोग होईल असें वाटत नाहीं. कारण एक तर डॉ. हजारीप्रसाद यांचा भर सांप्रदायिक तत्वज्ञानावर अधिक आहे, व दुसरें म्हणजे या नाथसंप्रदायाची महाराष्ट्रांतील वाढ त्यांनीं विशेष ध्यानांत घेतलेली नाहीं. मराठी भाषेंत 'नवनाथभक्तिसार' व 'नाथलीलामृत' हे

दोन ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांतील पहिला तर लोकप्रियहि आहे. गोरक्षकिमयागार या ग्रंथाच्या आधारें धुंडीसुत मालु नरहरि यानें शके १७४१-त काढलेलें हें नवनाथभक्तिसार नानाविध चमत्कारांनीं खचून भरलेलें असून ऐतिहासिक दृष्ट्या त्याची किंमत शून्य आहे. दुसऱ्या ग्रंथाबद्दलहि हेंच म्हणतां येईल. वरील ग्रंथांतून ज्ञानेश्वरपूर्वकालीन सोमनाथांची हकीगत आली असली तरी ती भाबडेपणानें लिहिलेली आहे, चिकित्सक बुद्धीनें नाहीं. सारांश, हीं दोन साधनें इतिहासास निरुपयोगी आहेत. प्रत्यक्ष नाथपंथांतील ग्रंथकारांनीं केलेले उल्लेख पाहतां ज्ञानेश्वर आपण एक 'दीन नाथपंथी' आहों याहून अधिक कांहीं म्हणत नाहींत. ज्ञानेश्वरांपूर्वी नाथपंथीयांनीं रचिलेले 'गोरक्ष-अमर संवाद' व 'गोरक्ष गीता' हे दोन ग्रंथ मराठींत उपलब्ध आहेत, परंतु त्यांचेंहि कर्तृत्व पुनः संशयित वाटतें. शके १६०० च्या सुमारास होऊन गेलेल्या सत्यामलनाथांच्या 'सिद्धान्तसार' या अभंगबद्ध ग्रंथाचा उल्लेख सारस्वतकारांनीं प्रस्तुत प्रकरणांत केलाच आहे. याच सुमारास म्हणजे शके १६३५ मध्यें रचिला गेलेला आणखी एक 'सिद्धान्तसार' कै. सरदार मेहेंदळे यांना मिळाला असून तोहि सिद्ध अर्थात् नाथपंथांतीलच दिसतो. ग्रंथ ओवीबद्ध असून त्याची मांडणी शिवपार्वती संवादात्मक आहे. विषयाची मांडणी संस्कृतांतील आगम किंवा तंत्र ग्रंथाप्रमाणें दिसते[1]. ग्रंथांत नाथसंप्रदायाच्या खुणा स्पष्ट असून रेवणसिद्ध, मरळसिद्ध, एकोराम, पंडिताराध्येरसिद्ध व काडसिद्ध या पंचसिद्धांचीं नांवेंहि त्यांत आलीं आहेत. असो. ज्यांची ओळख सारस्वतकारांनीं विस्तारानें करून दिली आहे त्या **शिवदिनकेसरी** नाथांचा 'ज्ञानप्रदीप' हा ओवीबद्ध अलीकडे प्रो. पोतदार यांनीं छापून प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथाची रचना शके १६९२ मध्यें आषाढ वद्य ४-स पूर्ण झाली असून तो लिहिल्यानंतर चारच वर्षांनीं म्हणजे शके १६९६ मध्यें शिवदिन समाधिस्थ झाले. वयाच्या ७२ व्या वर्षी रचिलेल्या या ग्रंथांत मराठी भाषेची वकिली करतांना जे उद्गार कवीनें काढले आहेत ते पुढें देतो—

"अनामिका चर्मपिसवींत । द्रव्यधातु पोतें येत ।
विटाळ म्हणऊन त्यागांत । अनुरागांत नाहीं कोन्ही ॥ ८६७ ॥
तैसा देशभाषापरत्वें । यातिस्पर्शशब्दार्थत्वें ।
वेदसिद्धांतरहस्यत्वें । शुद्ध वक्तृत्वें सरस्वति ॥ ८६८ ॥

अस्पृश्याच्या हातून सरकारी पोतेंभरणा झाला तर तें द्रव्य जसें

१. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १२, अंक ३, पृ. १६९.

विटाळत नाहीं, तसेंच ज्ञान यावनी भाषेंत विटाळत नाहीं ही शिवदिनांची कल्पना मोगलाईची छाया पैठण क्षेत्रावर किती दाट पडलेली होती याची साक्ष देईल. शिवदिनांची पदरचनाहि मोठी ठसकेबाज असून ‘ भाव धरा रे, अपुलासा देव करा रे ’ किंवा ‘ अर्जि तुम्ही ऐका, सखा सहोदर म्हणजे पैका ’ यासारखीं त्यांचीं पदें फार लोकप्रिय आहेत. ज्याचा उल्लेख सारस्वकारांनीं केला आहे व ज्याच्या मठांत नरहरिशिष्य महीपति यांचा वास कांहीं काळ होता त्या दत्तनाथाचा मठ उजैनींत अजूनहि आहे. या मठांत शिवदिनकेसरी, गोपाळनाथ, महीपति, देवनाथ इत्यादि नाथपंथीय कवींची कविता संग्रहित असून शिवाय दत्तनाथाचीहि कांहीं कविता तेथें आहे. हा दत्तनाथ महिपतीचा समकालीन असून तो मूळचा राहणारा राक्षसभुवनचा होता असें दिसतें. महादजी शिंद्याबरोबर तो उत्तर हिंदुस्थानांत जाऊन मथुरा, ग्वाल्हेर इत्यादि मुक्कामीं असल्याचे उल्लेख मठांतील कागदपत्रांत मिळतात. पाथरगडच्या लढाईंत तो महादजी-बरोबर होता व तेथून त्यानें आणलेले दोन ढोलहि उज्जैनी मठांत असल्याचें श्री. भालेराव लिहितात. या दत्तनाथानें आपली परंपरा पुढील अभंगांत सांगितली आहे—

दत्त परंपरा अनंत सोयरा । जोडील निर्धारा मायबाप
वेडा जगन्नाथ, निंबराज नरहरि । प्राप्त गिरिधारी जनार्दन
तेथें एकनाथ विनटला पाई । दत्त भावा तोहि दत्तवरहि
भाऊ दत्त भावा, केशव, अनंत । दत्तमठीं राहत राक्षसभुवनीं
परंपरा वरी, दत्त नारायण । दत्तगुरु चरण भेटी जाहाल्या

याच दत्तनाथांच्या मठांत कांहीं वर्षें काढून महीपति पुढें ग्वाल्हेरास गेला व तेथें शके १७४४ पौष शुद्ध १३-स समाधिस्थ झाला. महीपतीचा मठ ग्वाल्हेरास असून मठांत प्रतिवर्षी वरील तिथीस महिपत्तनाथांच्या नांवानें भंडारा होत असतो. या मठास ढोलीबुवाचा मठ असें म्हणतात याचें कारण तेथें असणारा प्रचंड ढोल. दत्तनाथ उज्जैनीकरांच्या मठांतहि असेच दोन ढोल असल्याचें आपण मागें पाहिलेंच. ग्वाल्हेर येथील ढोलीबुवाच्या मठांत रोज सकाळसायंकाळ आरति होते, तेव्हां हा ढोल वाजवून महिपत-नाथांचीं पदें अजूनहि म्हटलीं जातात. सुमारें पांच वर्षांपूर्वीं ग्वाल्हेरीस

जाण्याचा योग आल्यावेळीं अलाहाबाद विद्यापीठांतील प्रो. रा. द. रानडे यांचे समवेत वरील ढोलीबुवांचे मठांत आम्ही जाऊन आलों व तेथें महीपतीचीं कांहीं कविताहि ऐकली. ती उतरवून घेण्यास विद्यमान ढोलीबुवांची थोडी नाराजी दिसल्यानें तें जमलें नाहीं. महिपतनाथांची कविता श्रवणमधुर असून शिवाय पारमार्थिक अनुभूतीनें परिपूर्ण आहे.

**अभ्यासाचीं साधनें—**

ना. य. मिरीकर : ज्ञानेश्वरांचा नाथपंथ [ ज्ञानेश्वरदर्शन, भा. १ ]
भा. रा. भालेराव : दत्तनाथ उज्जनीकर [भाइसंमं. इति. श. १८३८].
भा. रा. भालेराव : महीपति उज्जनीकर [भाइसंमं. इति. श. १८३७].
द. वा. पोतदार : शिवदिनकृत ज्ञानप्रदीप [ प्रस्तावना ].
ज. र. आजगांवकर : महाराष्ट्र कविचरित्र, भाग, ३.
हजारीप्रसाद द्विवेदी : नाथसंप्रदाय [ हिंदुस्तानी ॲकॅडमी, अलाहाबाद, इ. स. १९५०. ]



'मध्वमुनीश्वरांची कविता' या संग्रहास त्याचे संपादक श्री. गुब्बी यांनीं 'कवितेंतून निष्पन्न होणारी माहिती, विश्वसनीय वृद्ध गृहस्थांकडून मिळालेली तोंडी माहिती आणि कांहीं जुनीं टांचणें' यांच्या आधारें मध्वमुनींचें जें संक्षिप्त चरित्र लिहिलें आहे त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें देतों. मध्वमुनि हे नाशिकचे राहणारे. त्यांचें मूळचें नांव त्र्यंबक, वडिलांचें नांव नारायणाचार्य व आईचें द्वारावती.[1] नारायणाचार्य हे देशस्थ, ऋग्वेदी, माध्वसंप्रदायी कट्टे वैष्णव; परंतु त्र्यंबकेश्वराच्या कृपेनें पुत्र झाला म्हणून त्याचें नांव त्र्यंबक असें ठेवलें. त्र्यंबकास गुरूपदेश प्रत्यक्ष श्रीशुकाचार्यांनीं दिला व त्यास भेदाभेदातीत केलें. वैष्णवांना हें न खपून त्यांनीं मध्वाचार्यांस पाचारून त्यांच्यापुढें त्र्यंबकास उभें केलें. परंतु त्यासमयीं झालेल्या प्रश्नोत्तरांवरून त्र्यंबकाची योग्यता मध्वाचार्यांस कळून आली व त्यांनीं त्यास मध्वमुनीश्वर असें नांव देऊन त्याचा गौरव केला. यानंतर तीर्थाटन करीत करीत मध्वमुनि औरंगाबादेस आले. तेथें कोणी निपट निरंजन या नांवाचे सत्पुरुष राहत. त्यांचे आश्रमांत मध्वमुनींनीं ज्ञानेश्वरी सांगितली त्याप्रसंगीं निपटनिरंजन, मानपुरीबुवा, सुभानशहा व शाहनूर हमषी ही मंडळी हजर होती. औरंगाबादेहून मध्वमुनि सेंदुरवाड्यास गेले व तेथें ते बरींच वर्षें होते. शेवटीं पुनः एकदां वेरूळ, दौलताबाद, टोकी वगैरे गांवांना भेटी देऊन ते सेंदुरवाड्यास परतले व तेथेंच त्यांनीं शके १६५३ मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस सायंकाळीं अमृतरायांचें कीर्तन चालू असतांना देह ठेवला. मध्वमुनीस सत्यनाथ या नांवाचा एक मुलगा होता. परंतु तो व त्यांचें कुटुंब हीं दोहीं त्यांच्या हयातींतच निवर्तलीं. मध्वमुनीश्वरांच्या शिष्यवर्गांत अमृतराय, भोजराज, लक्ष्मणराव वगैरे मंडळी होती. त्यांच्या सेंदुरवाड्यांतील मठास पेशवे व निजाम यांच्याकडून इनामी उत्पन्नहि होतें. सध्यां मठांतील उत्सव मध्वमुनींचे सांप्रदायिक श्रीनाथरावसाहेब जहागीरदार मु. औरंगाबाद यांचें घराणें चालवीत असतें.

मध्वमुनीश्वरांच्या कवितेस जोडलेल्या पुरस्करांत प्रो. पोतदार लिहितात, "...तुकारामरामदासांची अंतर्भेदी वाणी स्तब्ध झाली

---

१. कविकाव्यसूचिकार श्री. चांदोरकर यांच्या मतें मध्वमुनि हे नोराकाठीं कळबोळी येथील राहणारे, त्यांचें मूळ नांव महादेव, जन्मशक १६११ व नेहमीं राहणें वडगांवीं. ( सूचि, पृ. ७२ ).

आणि कंकणांचे रुणत्कार व नूपुरांचे झणत्कार वाङ्मयांत ऐकूं येऊं लागले. अशा काळांत मध्वमुनीश्वर व अमृतराय वगैरेंनीं आपापला वाग्विलास केला. मध्वमुनीश्वरांच्या गाथेंत कांहीं स्फुट पदें, कांहीं चरित्रें, कांहीं आरत्या, आणि थोडीशी हिंदी व संस्कृत कविता आहे. ...त्यांच्या कवितेची मुख्य ठेवण हरिदासी स्वरूपाची आहे. सभोंवतालच्या अधम हरिदासगणाचें जें स्पष्टोक्तिपूर्ण चित्र मध्वमुनींनीं काढलें आहे तें खरोखरीच लक्षांत घेण्यासारखें आहे. समाजाच्या व इतिहासाच्या अभ्यासकांस मध्वमुनींचीं हीं वचनें फारच उद्बोधक वाटतील. नानापंथवादी हरदास नवीं नवीं कवनें करून लोकांस कसे झुलवीत याविषयीं ते म्हणतात—

" ओव्या श्लोकपदें प्रबंध रचना हे तों निघाली नवी
टप्पे ख्याल कितेक गाति यमकें जाले फुकाचे कवी
गीता भारत वेदशास्त्र न रुचे गेली जनाची चवी
ऐसें देखुनि मध्वनाथ म्हणतो देवा मला वांचवी "

असे तडाखे त्यांनीं जागोजाग दिले आहेत ...... त्यांच्या कवितेंत जसा अनेक ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख आढळतो तसा जुन्या मराठी कवींत प्रायः आढळत नाहीं......मध्वनाथ हे उत्तम कीर्तनकार असले पाहिजेत अशी खात्री त्यांची गाथा वाचतांच होते....त्यांचीं कित्येक पद्यें मधाच्या पोळ्याप्रमाणें मधुर रसानें थबथबलेलीं आहेत. "

मध्वनाथांच्या कवितेचें बाड प्रथम कै. प्र. व्यं. गुब्बी यांना मिळालें व तें कै. पांगारकरांनीं 'मुमुक्षु'त इ. स. १९२६–२७–२८ मध्यें छापून काढलें. श्री. चांदोरकरांनीं उजेडांत आणलेल्या 'गुरुचरित्रा'चा कर्ता मध्वनाथ हा वरील पदकार मध्वमुनीश्वरांहून अर्थात् भिन्न असणार. गुरुचरित्रकार मध्वनाथ हा एकाजनार्दनाचा उल्लेख आपला गुरु म्हणून करतो. मध्वमुनीश्वरांचे गुरु एकनाथ दिसत नाहींत [ पहा...भाइसंमं. इति. शके १८३७, ले. २८ ].

अभ्यासाचीं साधनें—

प्र. व्यं. गुब्बी : मध्वमुनीश्वरांची कविता [ प्रस्तावना, इ. ].
गो. का. चांदोरकर : अमृतराय व मध्वमुनि [ कविकाव्यसूचि, पृ. ९ व ७२ ].
गो. वि. तुळपुळे : प्राचीन मराठी कवींचीं पदें [ 'रत्नाकर' इ. स. १९३२. ]

---

१. सारस्वतकारांनीं अमृतरायांवरील आख्यानात दिलेले 'माझ अछड बछड......' हें प्रसिद्ध पद अमृतरायाचें नसून मध्वमुनीश्वरांचें आहे.

अनेक संतांचीं चरित्रें लिहिण्याचा मान जसा महिपतिबोवांकडे जातो तसा अनेक चरित्रग्रंथांचा विषय होण्याचा मान रामदासांचा आहे. प्राचीन काळांत समर्थांचीं लहानमोठीं अशीं जीं दहाबारा चरित्रें लिहिलीं गेलीं त्यांपैकीं कांहींचा परिचय प्रस्तुत प्रकरणीं करून देणें अवश्य आहे. पैकीं 'स्वानुभव-दिनकरां'तील समर्थचरित्र हें कालानुक्रमानें पहिलें ठरणारें असून त्याची रचना दिनकरस्वामींनीं समर्थनिधनोत्तर शके १६१६ मध्यें केली हें आपण मागें पाहिलेंच. कालानुक्रमानें पाहतां यानंतर गिरिधर-कृत 'समर्थप्रताप' (रचनाकाल शके १६४४ ते ५१) हा ग्रंथ येतो. उद्धवसुत हे रामदासांचे आणखी एक चरित्रकार असून श्री. देव यांच्या मतें हें चरित्र त्यांनीं शके १६९६-च्या पूर्वीं लिहिलेलें असावें. त्र्यंबक-मल्हारी-उद्धव अशी यांची वंशपरंपरा असून हें घराणें मूळचें क-हाडांतील सुर्जी अंजनगांवचें. उद्धवाचे वडील मल्हारपंत यांना समर्थांचा अनुग्रह होता व त्यांचें समर्थप्रेम पुढें उद्धवांत उतरलें. समर्थ-चरित्र याच उद्धवांनीं लिहिलें आहे. असें असतांना ते स्वतःला उद्धवसुत कां म्हणवितात तें कळत नाहीं. रामदास-माधव-केशव-उद्धव याप्रमाणें उद्धवांची गुरुपरंपरा आहे. त्यांनीं लिहिलेल्या ओवीबद्ध समर्थचरित्राचे एकूण ५१ अध्याय असून त्यांतील अखेरच्या दोन अध्यायांत त्यांनीं थोडें आत्मचरित्र दिलें आहे. याशिवाय उद्धवांचीं कांहीं पदेंहि आहेत. ज्यांत समर्थचरित्र आलें आहे असे महिपतिकृत 'संतविजय' (शके १६९६) व भीमस्वामीकृत 'भक्तलीलामृत' (शके १७१९) हे दोन ग्रंथ यानंतर येतात. आकाराच्या दृष्टीनें सर्वांत मोठें समर्थचरित्र लिहिणारे आत्माराम यांनीं आपला 'दासविश्रामधाम' हा ग्रंथ शके १७२५-३०च्या सुमारास रचिला असें श्री. देव मानतात. समर्थांचे पट्टशिष्य कल्याण यांच्या शिष्यशाखा दोन; एक आपचंद मठाची व दुसरी तडवळें मठाची. पैकीं आपचंद मठपति रामचंद्रबोवा यांचे आत्माराम हे शिष्य होत. रामदास-कल्याण-शिवराम-रामचंद्र-आत्माराम अशी त्यांची गुरुपरंपरा आहे. आत्मारामांचें ओवीबद्ध चरित्र त्यांच्या कोणा रंक नांवाच्या एका शिष्यानें लिहिलें असून त्यावरून आत्मारामांची माहिती मिळते ती अशी. आत्मारामांचें मूळ नांव तिपण्णा. पुढें त्यांचे आत्माराम झाले. ते राहणारे मोगलाईतील नाघोर या गांवचे. त्यांच्या वडिलांचें नांव निर्वाणी-पंत व आईचें उमाबाई. आत्माराम लहानपणापासूनच एकांतप्रिय असत.

पुढें योगायोगानें त्यांची व आपचंद मठपति रामचंद्रबावा यांची भेट झाली व ते समर्थसंप्रदायांत आले. आत्मारामांनीं लिहिलेल्या समर्थचरित्राचें नांव 'दासविश्रामधाम' असें असून या प्रचंड ग्रंथाची ओवीसंख्या सोळा हजारांचे वर आहे. याशिवाय ग्रंथांत समर्थांची, स्वतः आत्मारामांची व इतर कवींची स्फुट कविता उतरली जाते ती निराळीच. श्री. शं. श्री. देव या ग्रंथास 'एन्सायक्लोपीडिआ रामदासिका' म्हणजे रामदासी संप्रदायाचा विश्वकोश म्हणतात तें बरोबरच आहे. कारण आत्मारामांच्या या ग्रंथांत समर्थांचें चरित्र तर आलें आहेच, पण त्याशिवाय आणखी किती तरी समर्थसंप्रदायविषयक गोष्टी त्यांत वाचावयास मिळतात. ग्रंथ ओवीबद्ध असला तरी आत्मारामांची ओवी गद्यरूप वाटावी इतकी साधी आहे. आत्माराम व त्यांचे शिष्य 'रंक' यांनीं रचिलेलीं असंख्य पदेंहि उपलब्ध आहेत. 'दासविश्रामधाम' धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें चार खंडांत छापून काढला असून तो रचणाऱ्या आत्मारामांचा मठ बिदर जिल्ह्यांत येळेहाळी येथें आहे. आत्मारामांचे एक शिष्य नरसोबा यांचा मठ भालकी येथें असून त्यांच्या कवित्वाचा परिचय आपण पुढें 'पेशवाईअखेरचे कवि' या प्रकरणांत करून घेऊं. या सुमारास रचिलें गेलेलें आणखी एक समर्थचरित्र म्हणजे सुप्रसिद्ध हनुमंतस्वामीकृत बखर होय. शके १७१५ मध्यें रचून शके १७४० मध्यें सुधारून वाढविलेल्या या बखरीचाहि विचार आपण पुढें गद्यप्रकरणीं करूं. राजाराम-प्रासादीकृत भक्तमंजरीमालेंत (रचना शके १७५६) समर्थचरित्र आलें असून या चरित्राचा परिचय सारस्वतकारांनीं करून दिलाच आहे. येथें आत्मारामबुवा चोरेगांवकरांनीं लिहिलेल्या समर्थचरित्राचा उल्लेख करून आपण या चरित्रकारांची रजा घेऊं. हें ओवीबद्ध चरित्र चोरेगांव मठाचे अधिपति आत्मारामबोवा यांनीं अगदीं अलीकडे म्हणजे शके १७८९-त लिहिलें आहे. या चरित्राशिवाय आत्माराबोवांची विपुल कविता उपलब्ध असून धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील क्र. ६२५-चें बाड याच कवितेचें आहे. त्यांत आत्मारामांची परंपरा मिळते ती अशी :— रामदास—कल्याण—जगन्नाथ तडवळेकर-यादव-दत्तात्रय कोयाळकर-रामचंद्र कोयाळकर-आत्माराम.

वरील चरित्रग्रंथांचा आढावा घेऊन त्यांचें ऐतिहासिक दृष्ट्या मोजमाप प्रो. न. र. फाटक यांनीं आपल्या ' समर्थचरित्रां ' तील पूर्वभागांत केलें आहे, तें जिज्ञासूंनीं मुद्दाम पहावें.

## अभ्यासाचीं साधनें

शं. श्री. देव : श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें (प्रस्तावना), शके १८२८.

शं. श्री. देव : गिरिधरकृत ' समर्थप्रताप ' (प्रस्तावना).

शं. श्री. देव : आत्मारामकृत दासविश्रामधाम (प्रस्तावना).

न. र. फाटक : श्रीसमर्थचरित्र (इ. स. १९५१).



मोरोपंतांवर आतां लिहिण्यासारखें म्हटलें तर कांहीं नाहीं, म्हटलें तर पुष्कळ आहे. इ. स. १९०८ सालीं कै. पांगारकरांनीं परिश्रमपूर्वक अस्सल साधनें मिळवून लिहिलेलें ' मोरोपंत – चरित्र ' अजूनहि प्रमाण मानलें जावें, इतकी त्याची थोरवी आहे. या चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेंत कै. पांगारकरांनीं मयूरभक्तांचें एक संमेलनच भरविलें व पंतांच्या पश्चात् पंतकवितेचा बोज हरदासांनीं, विद्वानांनीं व रसिकांनीं कसा काय राखला याचा आढावा घेतला. मुंबईस कै. रा. रा. भागवतांनीं स्थापन केलेला ' मोरोपंती आखाडा ' होताच. तो पाहून किंवा काय ठाऊक नाहीं, पण पुण्यांतहि एक ' मयूरचर्चामंडळ ' निघालें व त्यांत पंतकाव्याची छाननी नित्यनेमानें होऊं लागली. लौकरच मोरोपंतांचे वंशज रा. पराडकर यांनीं पंतकवितेच्या अस्सल हस्तलिखितांवरून ' मोरोपंतांचे समग्र ग्रंथ ' छापून काढले व त्यांस प्रो. पोतदार, बाळशास्त्री खुपेरकर, रियासतकार सरदेसाई, इत्यादि पंडितांच्या प्रस्तावनांची जोड करून दिली. या प्रस्तावनांतून पंतचरित्रांतील कांहीं महत्त्वाच्या घटनांविषयीं तात्विक खल झाला आणि त्यामुळें पंतकाव्याच्या अभ्यासास नवीन दिशा व चालना मिळाली. उदाहरणार्थ, ' हरिवंशा ' च्या रचनाकाळाविषयीं रूढ असणारीं विविध मतें [ पांगारकर शके १७०७ ते १०, काव्यसंग्रहकार भिडे शके १७०३, शि. म. परांजपे शके १७०४ ते ०९ ] खोडून पंतांनीं हरिवंश शके १७०८-च्या अखेरीस लिहून पूर्ण केला असें रियासतकार सरदेसाई यांनीं प्रमाणांनिशीं सिद्ध केलें [ खंड ४, प्रस्तावना ]. प्रो. पोतदारांनीं भागवताच्या मराठी अवतारांतील मोरोपंती मंत्रभागवताचें स्थान स्पष्ट करून या ग्रंथाची बांधणी कशी होत गेली तें दाखवून दिलें. पंतकवितेच्या अभ्यासाचे विविध दृष्टिकोनहि प्रो. पोतदारांनीं समजावून दिले [ खंड ५, प्रस्तावना ]. मध्यंतरीं प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनीं भागवती काव्यांचें सखोल निरीक्षण करून ' मयूरकाव्यविवेचन ' हा आपला ग्रंथ अभ्यासकांचे हातीं दिला. तात्पर्य, मोरोपंतांस दिवस बरे येत चालले आहेत व त्यांच्या कवितेचें चीज होण्याची आशा वाटत आहे.

पंतचरित्राचा आराखडा डोळ्यांपुढें यावा या हेतूनें त्यांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या घटनांची शकावळी पुढें देतों—

शके १६३५ पंतांचे वडील रामाजीपंत पराडकर कोंकणांतून पन्हाळगडावर आले.

शके १६५१ मोरोपंतांचा पन्हाळगडावर जन्म.

शके १६६२ रामाजीपंत हे बाबूजी नाईक यांच्या आश्रयास आले व मोरोपंत पन्हाळगडीं केशव पाध्ये व बाबा पाध्ये यांजपाशीं संस्कृत शिकूं लागले.

शके १६६५ बाबूजी नाईक हे बारामतकर झाले.

शके १६७४ मोरोपंत बाबूजी नाइकांच्या आश्रयास बारामतीस आले.

शके १६७६ मोरोपंतांचा प्रथम पुत्र रघुनाथ याचा जन्म.

शके १६७४ ते ८३ मोरोपंतांचा संस्कृत काव्यनाटकांचा अभ्यास व ब्रह्मोत्तरखंड, कुशलवचरित्र, हरिश्चंद्राख्यान इत्यादि अनुवादांची रचना.

शके १६८२ मोरोपंतांचा द्वितीय पुत्र रामकृष्ण याचा जन्म. मोरोपंत चतुर्मासांत पंढरीस जाऊन आले.

शके १६८० ते ९२ मंत्ररामायण, कृष्णविजय, संशय-रत्नावलि, आर्याकेकावलि, नामसुधाचषक इत्यादि स्फुट प्रकरणें व साधुसंत आणि तीर्थक्षेत्रें यांजवरील मोरोपंतकृत स्तोत्रांची रचना.

शके १६९३ ते १७०३ आर्याभारतरचनाकाल.

शके १७०२ पंतांचे यजमान बाबूजी नाईक यांचा मृत्यु.

शके १७०३ ते ०७ भागवती प्रकरणें व मंत्रभागवत यांची रचना.

शके १७०७ ते १० रामायणें रचण्यास प्रारंभ.

शके १७०८ हरिवंश पूर्ण झाला.

शके १७१० पंत कार्तिकांत काशीयात्रेस निघाले. पुत्र रामकृष्णपंत यांस जगतापराव निंबाळकरांनीं तीस बिघे जमीन ‘पंत सत्पुरुष आहेत हें जाणोन’ इनाम दिली.

शके १७११ पंतांची काशीयात्रा. गंगावकिली इत्यादि वकिल्या, स्तोत्रें व मंत्ररामायण यांची रचना.

शके १७१३ पंतांचे मित्र विठोबादादा चातुर्मासे यांचें निधन.

शके १७१५ काशीयात्रा करून मोरोपंत वैशाखांत बारामतीस परत.
'केकावली'ची रचना.

शके १७१६ चैत्र शुद्ध १५-स म्हणजे हनुमान जयंतीस सूर्योदयीं
मोरोपंत वयाच्या ६५ व्या वर्षी मरण पावले.

पंतकवितेचा परिचय सारस्वतकारांनीं करून दिलाच आहे. मराठीच्या दृष्टीनें एक सांगण्यासारखी गोष्ट अशी, कीं मोरोपंतकृत मंत्रभागवताच्या पूर्वार्धातील कांहीं भाग व केकावलि या दोन ग्रंथांवर शके १७०७-च्या सुमारास रचिलेली संस्कृत टीका 'काव्यसंग्रहकारां'स मिळाली होती असें त्यांच्या सांगण्यावरून दिसतें (का. सं. २, पृ. ६). तसें असेल तर हा मराठी भाषेचा मोठाच विजय म्हटला पाहिजे. पंतांचें मित्रमंडळ मोठें होतें व त्यांशीं त्यांचा पत्रव्यवहारहि असे. पैकीं विठोबादादा चातुर्मासे यांना पंतांनीं स्वहस्तें लिहिलेलीं सुमारें चाळीस पत्रें कै. पांगारकरांना उपलब्ध झालीं होतीं. त्यांतून एका पत्रांतील कांहीं भाग पंतांच्या गद्याची कल्पना यावी म्हणून पुढें देतों.

"श्रीमद्भगवद्भक्तवर्य रा. रा. विठोबादादा यांचे शेवेसी, विद्यार्थी मयूर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती.....विजयादशमी जाल्यावरि येणें ग्हणोन आज्ञा. ती मस्तकीं धरून यावयाच्या उद्योगातें करितों. श्रीमंताजवळ हरिवंश होतो ऐसें आहे. श्रीमंत जों ग्रहीं असतात पर्जन्यकाळीं, तोंच आपलाही समाज श्रीक्षेत्रीं. यांस सोडून यावें तरी यांच्या चित्तानुकूळतें-करून! अशास तुमच्या कृपेनें घडेल तें पहावें. सुश्रुतग्रंथ श्रीबाबा उपाध्याय यांशीं पावता करावा. तुम्हांस कांहीं पुस्तकें पाठविलीं पहावीं. श्रीद्रोणपर्व श्रीगुरुपुत्रांकडील आलें नाहीं. आल्यावरी आपणाकडे येईल. शांतिपर्व राजधर्मपर्व प्रारंभ झाला आहे. सांप्रत वर्षाकाळीं बुद्धीस आळस आला, राहिलें. खोकला झाला आहे. आपणही चार दिवस धीर धरावा. वर्षा-काळीं असें बुद्धिमांद्य किंचित् होतें. वृद्धपणीं शक्त्युत्साह उणा पडतो. श्रीज्ञानदेवाचें चरितार्चें कीर्तन झालें. पुढेंही चालेल. मीही यावयाच्या यत्नांत आहे. संसारीं नवनवेच गुंते पडतात. देव कृपा करील तरीच सत्समागम घडोन अत्युत्सवपात्र जन होतो. बहुत काय लिहिणें. दया करावी

हे विनंति...श्रीमद्भगवद्भक्त भैराळबाबा स्वामीचे शेवेशीं साष्टांग नमस्कार. गतशोक न करावा. तीर्थरूपांच्या हृदयाशीं तोषवावें हे विनंति. ''

**अभ्यासाचीं साधनें :**

ल. रा. पांगारकर : मोरोपंत – चरित्र आणि काव्यविवेचन.
दादोबा पांडुरंग : यशोदा पांडुरंगी ( केकावलि–टीका ).
परशरामपंततात्या गोडबोले: केकादर्श.
बाबाजी अनंत तेंडोलकर : 'मयूर कवि' मासिक ( शके १८११ ते पुढें )
श्री. वि. परांजपे : केकावलि ( प्रस्तावना ).
बा. म. हंस : मोरोपंतांवरील निबंध.
विष्णुशास्त्री चिपळूणकर : मोरोपंतांची कविता ( निबंधमाला ).
श्री. ना. बनहट्टी : मयूरकाव्यविवेचन.
रा. द. पराडकर : मोरोपंतांचे समग्र ग्रंथ, भाग १ ते ९ (प्रस्तावना )
ल. रा. पांगारकर : महाभारताचे मराठी अवतार ( सरस्वति-मंदिर, द्वैमासिक, इ. स. १९०४ ).



मोरोपंतांच्या आर्येचे पडसाद त्यांच्या समकालीन कविमंडळांतून कसे उठले तें सारस्वतकारांनीं दाखवून दिलेंच आहे. येथें आपण पंतांच्या काव्याविषयीं त्यांच्या मित्रमंडळांतून जे गद्यपद्य अभिप्राय व्यक्त झाले आहेत ते पाहूं. पंतांच्या मित्रमंडळांत विठोबादादा चातुर्मासे, सदाशिव पाध्ये, बाळंभट काजळे, रामजोशी, विठोबा ताहराबादकर, रामचंद्र बडवे, भैराळबाबा, चिंतामणि जोशी वगैरे मंडळी होती व त्यांचा पंतांशीं झालेला जो पत्रव्यवहार कै. पांगारकरांनीं उजेडांत आणला आहे तो पाहिल्यास तत्कालीन काव्यसमीक्षणाची थोडीफार कल्पना येऊं शकेल. पैकीं विठोबादादा चातुर्मासे यांना मोरोपंतांनीं पाठविलेल्या पत्रांपैकीं जीं चाळीस पत्रें उपलब्ध झालीं आहेत त्यांचा उल्लेख आपण मागील प्रकरणीं केलाच आहे. विठोबादादा मोरोपंतांपूर्वीं तीनचार वर्षें म्हणजे शके १७१३ मध्यें पंढरपूर येथें मरण पावले. त्यांचा मठ पंढरींत भीमातीरीं असून अद्यापिहि वारकरी संप्रदायांत चातुर्मासे बोवांचा नांवलौकिक मोठा आहे. विठोबादादांचे चिरंजीव भैराळबोवा यांचेंहि मन पंतांच्या कवितेवर बहुत होतें व त्यामुळें पंतकाव्याचा फार मोठा संग्रह चातुर्मासे यांच्या घरीं आज उपलब्ध होऊं शकतो. मोरोपंतांचे आणखी एक चाहते व संतचरित्रकार महीपतिबोवा ताहराबादकर यांचे पुत्र विठोबा ताहराबादकर यांची पंतकवितेवरील अपार भक्ति त्यांनीं मोरोपंतांस पाठविलेल्या पुढील पत्रांतून व्यक्त झाली आहे. विठोबा लिहितात,

"श्रीहरिभक्तिपरायेण महाराज मोरोपंतबाबा स्वामीच्या शेवेशीं— अपत्य चरणरज विठोबा गोसावी पायांवर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति...स्वामींस धोतरजोडा एक पाठविला आहे. वस्त्र स्वामींस योग्य नाहीं तरी याचा स्वीकार करावा म्हणजे दासाचा मनोरथ पूर्ण होईल. स्वामी साक्षात् पंढरीनाथ मग तेथें न्यून काय! परंतु दीनाची आवड पूर्ण करावी हें महाराजांस उचित...प्रस्तुत घरींच आहे. आणि लेखक अनुकूल यास्तव उद्योगपर्व भीष्मपर्व येथें प्रती करावयास पाठवावीं..." पंतकवितेचा आणखी एक भक्त बाळंभट ऊर्फ यादव काजळे यानें नगरच्या किल्ल्यांतून त्यांना दोन पत्रें पाठविलीं आहेत. पैकीं गद्यात्मक पत्रांत तो म्हणतो—

"श्रीरामचंद्रचरणांबुजावलंबस्वांतरोलंबसौजन्यपारावर सकलकवीशमौलिभूषण राजमान्य राजेश्री सुहृद्धुरीण सद्गुरुवर्य राजेश्री मोरोपंत बाबा वाडिलांचे शेवेशीं—

विद्यार्थी बाळंभट काजळे, मुक्काम नगरदुर्ग, चरणावर मस्तक ठेवून कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि......आपण पूर्वी पत्रप्रेषणेकरून बाळकविरहतापनिरसन केलें. दर्शनलाभास तों द्वादश वर्षे अतिक्रांत झालीं. ... मी तत्रभवद्दर्शनमात्राविषयीं उत्सुक आहें. ... हय्यंगवीनाधिक मृदुमानसास बाळकाविषयीं इतकी उपेक्षा न व्हावी...पक्षरहित बाळकास पक्षिणी माताच उपेक्षूं लागली तर त्याचा उपाय काय?..."

दुसऱ्या आर्याबद्ध पत्रांत हा यादव काजळे मोरोपंती आर्येचा गौरव करतांना म्हणतो—

आर्या प्रसन्न मजला हो, आर्यांचा सदा घडो संग ।
आर्याछंदीं मति हो, मार्यां न रुचो, असेंच द्या सांग ॥

पंतांची कीर्ति ऐकून रामचंद्र अद्वैत या नांवाच्या एका संस्कृताभिमानी रसिकानें लिहिलेलें पत्रहि उल्लेखनीय आहे. मोरोपंतांस 'श्रीमद्विदेहराजनंदिनीहृदयानंदकररघुनंदनचरणारविंदमिलिंदायमानस मोरोपंत बाबास' याप्रमाणें संबोधून तो पुढे लिहितो—

"...'श्रुत्वा तु दूरे भवदीय कीर्ति' या श्लोकाचा जसा पूर्वार्धाभिप्राय तसा या श्रोत्रनेत्रांकारणें विवाद पडला आहे. तो परिहार कधीं होईल हा दैवयोग न कळे. भवच्चरणारविंदसंदर्शनलाभानंद इंदुचकोरन्यायसा वाटतो. मी तों अकिंचन. वंचना न करितां माझ्या ठायीं पुत्रवात्सल्य विशेष राखिला पाहिजे हे विज्ञापना."

तसेंच कोल्हापूरच्या देवीचे दाजीबा पुजारी पंतकवितेविषयीं आपला अभिप्राय व्यक्त करतांना म्हणतात—

ज्यां श्रीमयूरकविपरि न परिसिला सकल कवि महीवरता ।
साजेना कां तैशा त्या कविला सकलकविमहीवरता ॥

पंढरपूरच्या बडवे मंडळीपैकीं अमृतानुभवाचे भाषांतरकार प्रल्हादबोवा बडवे यांचे प्रपौत्र रामचंद्र बडवे हे मोरोपंतांचे समकालीन असून त्यांच्या आर्येचे भोक्ते होते. त्यांनीं रचिलेल्या मयूरस्तुतिपर चौतीस आर्या म्हणजे पंतांच्या एक समकालीन रसिकानें लिहिलेलें अति मार्मिक असें अभिप्रायपत्रच आहे. 'सुश्लोक वामनाचा' ही प्रसिद्ध आर्या रामचंद्र बडवेकृत आहे. प्रसिद्ध शाहिर राम जोशी सोलापूरकर यांचा व मोरोपंतांचा संबंध सर्वश्रुत असल्यानें येथें त्याविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

या प्रकरणांतील इतर कवींपैकीं ज्योतिपंतदादा महाभागवत या कवीविषयीं अलीकडे अधिक माहिती मिळाली आहे ती अशी. ज्योतिपंतांचा

जन्म शके १६३८-मध्यें झाला. पुढें पुण्यास येऊन पेशव्यांकडे कारकुनी फडावर नौकरी करीत असतां ज्योतिपंतांची नेमणुक प्रथम पुरंदरच्या फडणिशीवर व नंतर उत्तरेकडील कामगिरीवर झाली. अंतर्वेद व बुंदेलखंड या प्रांतांतील पेशव्यांचे कमाविसदार गोविंदपंत बुंदेले यांच्या वसुलाच्या भानगडी मिटविण्यासाठीं पुण्याहून जनार्दनपंत एरंडे यांची रवानगी झाली असतां त्यांनीं बरोबर मदतनीस म्हणून ज्योतिपंतांस नेलें असें दिसतें. पुढें इ. स. १७६०-च्या मार्चांत जनार्दनपंत दक्षिणेकडे परतले तरी ज्योतिपंत उत्तरेंतच राहिले असावे हें त्यांनीं जनार्दनपंतास लिहिलेल्या चार पत्रांवरून[1] स्पष्ट होतें. हें कारकुनी राजकारण करीत असतांनाच एकाएकीं कांहीं दृष्टान्त होऊन ज्योतिपंतांनीं कानावरील लेखणी खालीं ठेवली व नोकरीचा राजीनामा देऊन ते काशीस आले. तेथें कांहीं काळ राहून पुढें महाराष्ट्रांत आल्यावर आपलें उर्वरित आयुष्य त्यांनीं भागवत धर्माच्या प्रचारार्थ वेंचलें व त्यासाठीं त्यांनीं एक मोठा दौराहि काढला. इ. स. १७५८-च्या सुमारास उत्तरेकडे गमन, इ. स. १७७३ पर्यंत अंतर्वेदींत पेशव्यांची नौकरी, पुढील एकदोन वर्षें काशीक्षेत्रीं वास, इ. स. १७७५-त दक्षिणेंत आगमन, यापुढील तेरा वर्षें भक्तिमार्गाच्या प्रचारार्थें सर्वत्र संचार व शेवटीं इ. स. १७८८-मध्यें (शके १७१०) कृष्णातीरीं चिंचणेर येथें समाधि याप्रमाणें स्थूलमानानें ज्योतिपंतांच्या उत्तर आयुष्याचा आराखडा आहे. अंतकाळीं ज्योतिपंतांचें वय ७२ वर्षांचें होतें, कै. चांदोरकर[2] म्हणतात याप्रमाणें १०२ वर्षांचें नव्हतें. ज्या 'प्रकृतिनिवृत्ति ऐक्यता रत्नावलि' या ज्योतिपंतकृत गद्य-ग्रंथाच्या आधारें कै. चांदोरकर त्यांस वरील आयुर्मान कल्पितात त्या ग्रंथांतील रचनाकालदर्शक आंकडा नजरचुकीनें शके १६१३ असा पडला असून वास्तविक तो शके १६९३ पाहिजे हें प्रो. बनहट्टी यांनीं दाखवून दिलेंच आहे. असो. ज्योतिपंतांच्या ग्रंथरचनेविषयीं लिहितांना त्यांनीं समग्र भागवतावर ओवीबद्ध टीका रचिल्याचें सारस्वतकार सांगतात. हें कदाचित् खरेंहि असेल. परंतु निदान आज तरी या समग्र टीकेपैकीं फारच थोडा भाग उपलब्ध आहे. रहिमतपूर येथील मठांत पहिले दोन स्कंध व वेदस्तुति या तीन प्रकरणांवरील ओवीबद्ध टीका व त्यांच्या वंशजांकडील बाडामध्यें कांहीं स्कंधांचा अभंगानुवाद एवढीच काय ती ज्योतिपंतांची भागवती टीका उपलब्ध झाली आहे. यावरून समग्र टीका त्यांनीं रचिलीच नसावी असें अनुमान निघतें. त्यांच्या गद्य ग्रंथाचा उल्लेख वर आलाच आहे. ज्योति-

---

१. राजवाडे : म. इ. साधनें, खं. १; ले. १८५, २९५, २९६, २९७.

२. भाइसंमं. इतिवृत्त, शके १८३५.

पंतांचें एक ओवीबद्ध चरित्र त्यांचे पणतू रघुनाथबुवा यांचे शिष्य श्री. सखारामपंत ब्राकरे यांनीं लिहिलेलें असून (शके १८२३) तें प्रसिद्ध झालें आहे.

या सुमारास रचिलेलीं व सारस्वतकारांनीं न उल्लेखिलेलीं आणखी कांहीं राजस्तुतिवर्णनपर काव्यें अलीकडे उपलब्ध झालीं असून त्यांतील एकाचें नांव 'श्रीशाहुराज कीर्तिप्रभा मंजरी' असें आहे. शिवभारतकार परमानंद कवीचा नातू गोविंद यानें हें काव्य शके १६६७-च्या सुमारास रचिलेलें असावें. हा गोविंदकवि शाहुराजा व त्याची राणी सकवारबाई यांचा आश्रित असल्यानें या दोघांची स्तुति त्यानें वारेमाप केलेली असली तरी त्याच्या या काव्यास थोडेंफार ऐतिहासिक महत्वहि आहे. या श्लोकशतकांत कवीनें प्रहर्षिणी हें कांहींसें अपरिचित वृत्त योजिलेलें असून त्याची रचना एकंदरींत सामान्यच आहे. या काव्याचा प्रथम सर्गच तेवढा उपलब्ध असला तरी कवीच्या मनांतून शाहू राजावर एक महाकाव्य रचावयाचें होतें असें त्याच्या अखेरच्या श्लोकावरून वाटतें. या श्लोकांत कवीची परंपराहि आली आहे—

"श्री गोविंद पहा जयासि पणजा आनंद आजा जया।
जाला दत्तहि तात आणि चुलता हे श्रीधराख्या जया॥
या काव्यीं पहिलाच सर्ग वहिला तेणें असें गुंफिला।
श्रोत्यांनीं हृदयीं दया धरुनिया आतां असे मानिला॥"

परंतु गोविंदकवीचा हा मनोरथ येथेंच थांबला व त्यानें गायिलेला हा स्तुतिपाठ फुकट जाऊन जगणें अशक्य झाल्यानें देहत्याग करण्याचा प्रसंग त्यावर आला. कारण हें काव्य निपजल्यानंतर लौकरच शाहु व सकवारबाई हीं दिवंगत होऊन साताऱ्चा कारभार पुण्याकडे आला व तेथें या कवीची वर्णी लागूं शकली नाहीं. गोविंदकवीनें शके १७०४-मध्यें जलसमाधि घेतली असें त्यानें या वर्षी नारायण दीक्षित बापटास लिहिलेल्या पत्रावरून कळतें. त्यांत तो म्हणतो—"आमचा वृद्धापकाळ जाला. पोटीं संतान नाहीं. बहुत जीर्ण जालों. यास्तव चतुर्थाश्रम संपादून माहुली संगमीं जलसमाधिस्त होणार. जवळ रामचंद्राच्या मूर्ती आहेत, त्या आपण संभाळाव्या..." (पेशवे दप्तर, भा. ४३, क्र. १६). अशाच प्रकारचें दुसरें काव्य भगवंतराव यादवराव मुनशी यानें शके १६८२-मध्यें रचिलेलें असून सारस्वतकारांनीं त्यासंबंधीं लिहिलेंच आहे. काव्य साधारण बरें असलें तरी कवीची भूमिका लालची याचकाची आहे हें ध्यानांत बाळगून तें वाचलें पाहिजे. हेंच नव्हे, तर या काळांतील

अनेक काव्यें नानासाहेब पेशव्यांस अर्पण केलीं जात असें दिसतें. कारण नानासाहेब हे वाङ्मयाचे रसिक भोक्ते होते. त्यांनीं संस्कृत भाषेंत केलेलें एक गणेशस्तवन नुकतेंच उपलब्ध झालें आहे. कोंकणांतील सृष्टिसौंदर्याचें वर्णन त्यांनीं एका स्नेह्यास लिहून पाठविल्याचें कळतें. अशा रसिकाचें मन आकर्षित करून घेण्याचा एक उपाय म्हणून काव्यरचनेचा आश्रय कांहीं अर्थार्थी मंडळींनीं केला असला तर त्यांत नवल नाहीं. पैकीं श्रीधर व श्रीधर शिवराम यांचीं काव्यें उल्लेखनीय आहेत. त्यांतील 'पंतप्रधानाख्यानम्' या काव्याचा कर्ता, सारस्वतकार म्हणतात त्याप्रमाणें शैव मोरेश्वर हा नसून, श्रीधर म्हणून कोणी असावा असें वाटतें. श्रीधर शिवराम हा कवि निराळा असून त्यानें 'नानासाहेबांस उपदेश' म्हणून रचलेले नऊ श्लोक प्रसिद्ध झाले आहेत[1]. अलीकडे अलीबागचे संशोधक श्री. अवळसकर यांना अशा प्रकारचीं कांहीं स्फुट काव्यें उपलब्ध झालीं असल्याचें कळतें. वर उल्लेखिलेला भगवंतराव यादव आपण 'अपसव्य' भाषेंत म्हणजे उलटीकडून लिहिल्या जाणाऱ्या फारसी भाषेंत निजामाचीहि स्तुति केल्याचें सांगतो—

"अपसव्ये यवनाधिराज स्ताविला त्यानें मला दींधली ।
संतुष्टूनि बहूत मन्‌सब सदित् तज्वीज ही लाधली ॥

या काळांतील आणखी कांहीं कवींची थोडी अधिक माहिती घेऊन आपण पुढें जाऊं. पैकीं योगवासिष्ठकार हरिदास व हरिबुवा रामदासी यांची ओळख सारस्वतकारांनीं थोडीफार करून दिलीच आहे. त्यांतील हरिदासांचे गुरु कोणी मानससरोवरनिवासी शांतानंद म्हणून असून आपली योगवासिष्ठावरील टीका आपण संवत १६१०-मध्यें (?) लिहिली असें हा कवि म्हणतो. या ग्रंथाची प्रत आपणास आपचंद मठांत मिळाली असें श्री. देव सांगतात. ग्रंथपरिचयहि प्रथम त्यांनींच करून दिला. हरिबुवा शिंपी हे पिढीजात वारकरी असून त्यांनीं रामदासी संप्रदायाची दीक्षा घेतली होती हें त्यांचें वैशिष्ट्य होय. या हरिबुवांचें एक ग्रहणावर पद असून त्यांत राहूकेतू सूर्याचा ग्रास करतात ही कल्पना मिथ्या असल्याचें बुवा सांगतात हें एक आश्चर्यच म्हटलें पाहिजे. दोनशें वर्षांमागील श्रद्धायुगांतहि क्वचित् कोठें चिकित्सा होती म्हणावयाची! याच सुमारास म्हणजे शके १६९९-मध्यें पुण्यानजीक फुरसुंगी येथील कोणा नारायण कवीनें लिहिलेल्या 'भक्तप्रताप' या ओवीबद्ध ग्रंथाचा परिचय प्रो. पोतदार यांनीं करून दिला आहे. हा नारायण कवि आपल्या आईबापांचीं नांवें अनुक्रमें संताई व बाल्होजी अशीं

१. अनेककविकृत कविता, भाग ३ ( काव्यसंग्रह ).

देतो. याचें उपनांव हारपळे. 'भक्तप्रतापा' च्या प्रस्तावांत तो म्हणतोः—

" वरुशाकाळीं गंगा हारुश । घने गर्जता मयोर उल्हास ।
वसंतीं आनंद कोकिळास । कमळविकास रवि देखता ॥
तैसी माझी वागेश्वरी । आनंदली जैसी कल्हारी ।
दृष्टांत योजावया मती पुरी । केवि सामोग्री मजपाशीं ॥
तयांत माझे आरुश बोल । तथापि कृपेचा वरुशाव कराल ।
ग्रंथरोप वाढी लागेल । फळें येतील अपूर्व ॥"

नारायणकवीची रचना बरी असली तरी ती परपुष्ट वाटते, स्वतंत्र वाटत नाहीं. असो. वेंका मुंगी, दिनकरराव, हरिराज शेंडे, बलवंत, पूर्णब्रह्म इत्यादि कविहि याच काळांतील असून स्थूलमानानें समकालीन आहेत. पैकीं वेंका मुंगी हा एक मराठी बोलणारा माध्व होता. याचा गुरु सत्याधिराज हा माध्वयति असून तो मद्रासप्रांतीं वेल्लूर येथें राही. या कवीचें नांव व्यंकु व उपनाम मुंगी. स्वतःचा उल्लेख तो पुढीलप्रमाणें करतो—

" पिपीलिक ( मुंगी ) उपनामा व्यंकु तो उद्धरावा "
" मुंगी असोन वदतों बहु चापलें हो "

वेंका मुंगीनें रचिलेल्या 'सत्याधिराज प्रशस्ति' या काव्यांतील पूजाअर्चा, नैवेद्यभोजनादि थाट, इत्यादि वर्णनांवरून हा कवि दक्षिण हिंदुस्थानांतील असावा असें वाटतें. कै. राजवाडे यांच्या मतें याचा काल शके १७००-च्या आसपास यावा.[1] दिनकराव हा कवि ब्राह्मणेतरांपैकीं असून त्याचें 'शिवरात्रिकथा' या नांवाचें एक पदबद्ध प्रकरण उपलब्ध झालें आहे. शंभर ओव्यांत योगवासिष्ठाचें सार सांगणारा बळवंतराव माणकेश्वर चाफळकर हा रामदासी पंथांतील असून त्यानें हें सार शके १७२४-त वटपुरीं [?] तयार केलें.[2] याचा गुरु कोणी जयराम म्हणून होता असें कळतें. पूर्णब्रह्म हा कोणा नागेश पंडिताचा कनिष्ठ पुत्र. त्याचें आडनांव जोजार. 'रसप्रकरण' हें त्याचें श्लोकबद्ध काव्य रसायनविषयक असून त्यांत सोनें तयार करण्याची कृति वर्णिली आहे. ज्याचा उल्लेख सारस्वतकार पुढें 'पेशवाईअखेरील कवि' या प्रकरणांत करतात तो हरिराज शेंडे हा मुद्गलभटकृत रामायणाचा मराठींत अनुवाद करणारा कवि इतका उत्तरकालीन नसून शके १७००-च्या सुमाराचा असावा असें कै. राजवाडे यांचें म्हणणें आहे[3]. जिवाशिवाकृत महाभारताचा उल्लेखच तेवढा

---

१. वि. का. राजवाडे : वेंका मुंगी व दिनकरराव ( भाइसंमं. इति. श. १८३६ ).
२. गं. ना. मुजुमदार : बळवंत व पूर्णब्रह्म ( भाइसंमं. इति. शके १८३६ ).
३. वि. का. राजवाडे : हरिराज शेंडे ( भाइसंमं. इति. शके १८३५ ).

सारस्वतकार करतात. परंतु या ग्रंथाचा परिचय अलीकडे प्रो. पोतदार यांनीं करून दिला आहे. त्यावरून असें कळतें, कीं त्याचे कर्ते हे कै. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें जिवा व शिवा या नांवाचे दोन बंधु नसून जिवाशिवा हें जोडनांव गुरुशिष्यांचें आहे. शिव हा गुरु व जिवा हा त्याचा शिष्य. हा जिवा पंढरपूरजवळील क्षेमावती येथील वृत्तिवंत जोशी असून त्याच्या बापाचें नांव शिवराम व आईचें नांव उमा. या जिवानें आपला गुरु चैतन्यसांप्रदायीं शिव याचें नांव आपल्या नांवापुढें जोडून जिवा-शिवा असें जोडनांव धारण केलें आहे. मुक्तेश्वरी भारत पूर्ण करण्याची खटपट विष्णुदास नामा, मोरेश्वर, चंद्रात्मज, रुद्र, नरहरि मोरेश्वर, नवरस नारायण, पद्मनाथ, शंभुदास इत्यादि ज्या कांहीं कवींनीं केली त्यांतीलच प्रस्तुत जिवाशिवा हा एक आहे. किंबहुना या जिवाशिवाचें महाभारत म्हणजे अनेक कवींच्या कृतींची तयार केलेली एक गोधडीच आहे असें म्हटल्यास चालेल. कारण या भारतांतील पहिलीं चार पर्वें मुक्तेश्वराचीं, पांचवें उद्योगपर्व उद्बोध गोपाळनाथाचें, सहावें अश्वमेधपर्व श्रीधर पंडिताचें व यापुढील उरलेलीं बारा पर्वें स्वतः जिवाशिवानें रचिलेलीं आहेत. मुक्तेश्वरादि कविश्रेष्ठांचीं भारतपर्वें हीं भरजरी वस्त्रासारखीं असतील तर आपलीं बारा पर्वें म्हणजे खेडवळांसाठीं विणलेली जाडीभरडी खादी किंवा घोंगडी समजावी, याप्रमाणें स्वतःच्या कृतीची वकिली करतांना हा जिवाशिवा म्हणतो—

मुक्तेश्वरें विणिले श्रेष्ठ पट । चारी हात प्रमाण प्रगट ।
तया दसोडे जोडून सदट । विणिलें येक हात गोपाळें ॥
येक हात श्रीधरें । ऐसें सहा हात पूर्वीं विणिलें ।
यावरी शिवकृपें जिवें सुतविलें । मोठें विणिवलें गोत्ररें ॥
घोंगडें विणिलें बारा हात । शोभे तया बरलत्व त्यांत ।
साबडे शब्द बोबडी मात । जाले वस्त्रांत घट्टतन ॥
शीतउष्णपर्जन्यकाळ । पाप ताप संताप कुकाळ ।
निवारावया वस्त्र विसाळ । आत्मा रसाळ सुख भोगी ॥

जिवाशिवाच्या भारताचा एक विशेष असा, कीं त्यांतील अठराव्या 'महाप्रस्थान' पर्वांत पांडवांना पंढरीस विठ्ठलरूपानें कृष्णदर्शन झाल्याचें वर्णन आलें असून हें पर्व आपण मूळ भारतांतून न घेतां मूर्तिसार नांवाच्या ग्रंथांतून घेतलें आहे, असें कवि म्हणतो. जिवाशिवाच्या एकूण भारताची ओवीसंख्या दहा हजारांचें वर असून त्याचा काळ निश्चितपणें ठाऊक नसला तरी तो श्रीधरानंतर होऊन गेलेला अर्थात्

पंतसमकालीन कवि असावा असें प्रो. पोतदार यांचें मत आहे. असो. वरील ग्रंथकाराप्रमाणें कोंडु किंवा कुंडलीश हाहि कवि आपणांस अपरिचित असून त्यानें 'सप्तऋर्षीचें वसतेंस्थान' म्हणजे सातारा येथें शके १७१३-मध्यें रचिलेल्या 'आत्मबोध' व 'आत्मसुख' या दोन प्रकरणांची ओळख प्रथम कै. राजवाडे यांनीं करून दिली[1]. हा कोंडू कवि कोणा धुंडिराजाचा मुलगा असून त्याच्या दोन्ही ग्रंथांवर दासबोधाची दाट सावली पडलेली आहे. त्याच्या दोन्हीं ग्रंथांची मिळून ओवीसंख्या आठशेंच्या घरांत यावी.

या काळांतील जयराम नांवाच्या कवीनें रचिलेला 'जयबोध' हा ग्रंथ अलीकडे उपलब्ध झाला आहे.[2] ग्रंथाची ओवीसंख्या १९,०७४ म्हणजे नाथभागवताहून थोडी अधिकच आहे. अखेरच्या म्हणजे २०-व्या अध्यायांत कवि आपली गुरुपरंपरा देत आहे, ती अशी:—श्रीज्ञानेश्वर-सदाशिवनाथ-गणेशनाथ—उद्धवनाथ—केशवनाथ—बाळनाथ—दीनानाथ—मयोरेश्वर—जयराम. अर्थात् कवि नाथपंथी दिसतो. याच अध्यायांत त्यानें स्वचरित्रहि दिलें आहे. प्रथम वैराग्य आलें, ज्ञानेश्वरी आणि नाथभागवत यांचा छंद मनानें घेतला, तरीहि समाधान नाहीं, लहानपणींच कोणा द्वारकारामस्वामींनीं दिलेल्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप चालू होता, त्यायोगें जीव ज्ञानार्त झाला, पांडुरंगाच्या चरणीं माथा ठेवला, देहभान गळालें, सद्गुरु प्रगटले, 'आळंदीस कार्य होईल' असा शब्द झाला, आळंदीस गेले, पूर्ण प्रत्यय येऊन 'समाधीचें समाधान' लाभलें, असें हें कविचरित्र आहे. हा कवि पुण्याचा असून त्याची ग्रंथरचनाहि पुणेंप्रांतींच झालेली आहे. 'जयबोधा'चा प्रथमाध्याय शके १६९१-त आरंभून कवीनें ग्रंथसमाप्ति आळंदीस शके १७०१-मध्यें केली. असें असलें तरी ग्रंथाचा मुख्य भाग शके १७०१-मध्यें अवघ्या सहा महिन्यांत, आणि तोहि खुद्द पुण्यांतच रचून झाला असें दिसतें. 'मुकाम शहर पुणें, पेठ शनिवार, अस्रमंत नदीचा पूल, शक १७०१...' असा रचनेच्या स्थळाकाळाचा उल्लेख कवीनें ग्रंथांत अनेक ठिकाणीं केलेला आहे. हा ग्रंथ म्हणजे रामदासांच्या 'दासबोधा'वरील एक ओवीबद्ध टीकाच आहे असें म्हटल्यास चालेल. मूळ 'दासबोधां'तील सुमारें तीन हजार ओव्या जयरामानें आपल्या 'जयबोधां'त जशाच्या तशा उतरल्या असून असून याशिवाय आणखी दोनचार हजार ओव्या

१. वि. का. राजवाडे : कुंडलीशकृत आत्मबोध (भाइसमं इति. शा. १८३६).
२. ग्रंथ अप्रकाशित असून त्याची एक संपूर्ण हस्तलिखित प्रत धुळ्याच्या 'श्रीसमर्थवाग्देवतामंदिरां'त आहे (क्र. १५९१).

रामदासांपासूनच पण किंचित् फरकानें त्यानें उचलल्या आहेत.

या काळांत अध्यात्माशिवाय इतर कांहीं विषयांवरहि ग्रंथरचना होत असावी असें 'बाजनामा' ऊर्फ 'पक्षीसंजीवनी' यासारखीं प्रकरणें पाहून वाटतें.[1] हें प्रकरण उद्धव नांवाच्या कोणा शाहुराजाच्या आश्रितानें लिहिलेलें असून तें अनुवादात्मक आहे. मूळ ग्रंथाचें नांव 'दौलतनामा' असें असून तो दिल्लीचा सुलतान फेरोजशहा यानें आपल्या पदरच्या वैद्याकडून फारसी भाषेंत लिहविला होता. शाहुराजास पक्षी, कुत्रीं वगैरे पाळण्याचा नाद असून त्यानें अशा प्रकारच्या ग्रंथांचे अनुवाद करण्यास प्रोत्साहन द्यावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. प्रकरणांत विषयाचें नावीन्य आहे, एवढें खरें. अशाच प्रकारचें आणखी एक काव्य म्हणजे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रहीं असलेलें 'कृष्णामाहात्म्य' हें होय. स्कंद पुराणांतील कृष्णा-माहात्म्याचा हा मराठी अनुवाद असून त्यांत कवीनें कृष्णेच्या तीरावरील प्राचीन तीर्थांचा व अर्वाचीन देवळांचा नामनिर्देश स्वतंत्रपणें केला आहे. तीर्थांतीर्थांमधील अंतरें, गांवांचीं नांवें, वगैरे माहितीनें भरलेला असा हा कृष्णातीरचा वाटाड्याच आहे म्हटलें तरी चालेल. राजघराण्यांतील कवित्वाचा उल्लेख सारस्वतकारांनीं केलेलाच आहे. पैकीं परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांचा उल्लेख मागें एका प्रकरणांत येऊन गेला आहे. प्रतिनिधि घराण्याचा हा संस्थापक स्वतः कवि असून त्याच्या नांवावर शिव-पार्वतीचा धांवा व कांहीं आरत्या आढळतात. पैकीं धांवा संकटपरिहारार्थ रचिलेला असावा असें कै. राजवाडे यांचें मत आहे.[2] खुद्द राघोबादादा पेशवे यांच्या अंगीं इतर गुणाबरोबर कवित्वाचाहि गुण होता असें दिसतें. त्यांचें शंकरावरील एक कवन देतो.[3]

मन शिवपदकमळींचें भृंग।
यजयागतपध्यानधारणा भस्मोद्धूलित अंग ॥ ध्रु ॥
नमक चमक मुखिं गाति वाजती करिं शिवपार्थिव लिंग ॥१॥
सारिगमपधनिसा गंधर्व गायन वाजे टाळ मृदंग ॥२॥
भृंगी नाचे थय्थय् थय्थय् चरणकमलमन भृंग ॥३॥
चरणशरण रघुनाथ निरंतर मागे हाचि अभंग ॥४॥

या काळांतील तंजावरकडील एका कवीचा उल्लेख करून हें प्रकरण आपण संपवूं. या कवीचें नांव चिंदवड शंकर[4]. तंजावरांत 'मराठ्यांचा

१. कृ. वि. आचार्य : बाजनाम ( भाइसमं. त्रै. १२-४ ).
२. वि. का. राजवाडे : परशुराम त्र्यंबक (भाइसमं. चतुर्थ संमेलनवृत्त).
३. गं. ना. मुजुमदार : पेशव्यांचें कवित्व (भाइसमं. इति. शके १८३५).
४. चि. ग. कर्वे : चिंदड शंकर (भाइसमं. त्रै. २०-१).

मठ ' म्हणून जो आहे तो चिंदवडनाथाचा. हा चिंदवडनाथ व्यंकोजीचा मुलगा शहाजी याच्या कारकिर्दींत तंजावरीं मठ करून होता. या चिंदवडनाथाचें आडनांव गरुड असें असल्यामुळें त्याच्या मठास गरुड-मठ असेंहि म्हणतात. चिंदवडनाथाचा शिष्य म्हणजे चिंदवड शंकर. या शंकर कवीच्या नांवावर गोरख-दत्तात्रय संवाद, मनाचे श्लोक, स्वानंदसिंधु असें कांहीं ग्रंथ आहेत. त्यांचीं रचना शके १६७५ ते ८० च्या दरम्यानची असावी. चिंदवड शंकराची बरीच रचना व्यंकोजीची पट्टराणी दीपांबा हिच्या प्रशस्तिपर असून त्याची तिच्या ठिकाणीं खरी भक्ति दिसते. तंजावरकडील लढायांवरहि त्यानें कांहीं कवित्व केलें आहे. त्याच्या कवितेचा नमुना म्हणून त्याचें एक पद पुढें देतों—

" गुरुचा नफर मी नफर मी नफराचा चाकर मी ।
घेउनि विवेक फौजा प्रपंच मारुनि करितों मौजा ॥
अरे चढोनि बोध तुरक्या होउनि मारी मनाच्या खुरक्या ।
अरे छिंदड गुरुच्या संगीं गिरजेसहित शंकर उरजी ॥ "

अभ्यासाचीं साधनें—


पां. ना. पटवर्धन : ज्योतिपंत महाभागवत (भाइसंमं. इति श.१८३४).
गो. का. चांदोरकर : ज्योतिपंत महाभागवत (भाइसंमं. इति श.१८३५).
श्री. ना. बनहट्टी : एकावळी, ले. १. ( ज्योतिपंत महाभागवत ).
राजारामप्रासादी : भक्तमंजरीमाला, अ. ६२, ६३.
स. कृ. बाकरे : श्रीस्वयंज्योतिकथामृत.
ल. रा. पांगारकर : मोरोपंत-चरित्र ( प्रस्तावना व प्रकरण, ७ ).
गो. स. सरदेसाई : श्रीशाहुराज कीर्तिप्रभामंजरी(प्रो.पोतदार स्मारकग्रंथ).
पां. न. पटवर्धन : पेशव्यांच्या स्तुतिपर काव्य(भाइसंमं.इ.श.१८३७).
द. वा. पोतदार : एक उपेक्षित ऐति. मराठी काव्य (चापेकर संस्मृति).
द. वा. पोतदार : पंतप्रधानाख्यानम् (भाइसंमं. ग्रंथमाला).
शं. श्री. देव : हरिदास योगवासिष्ठकार (भाइसंमं. इ.श. १८३५).
शं. श्री. देव : हरिबुवा रामदासी (श्रीसांप्र. विविध विषय, खं. १).
द. वा. पोतदार : हरिबुवा शिंपी रामदासी ( भाइसंमं. त्रै. १३-३).
ल. रा. पांगारकर : महाभारताचे मराठी अवतार ( सरस्वति मंदिर, द्वैमासिक, शके १८२६ ).
द. वा. पोतदार : शिवाशिवाचें मराठी महाभारत(भाइसंमं.त्रै ११-१).
शं. श्री. देव : जयरामकृत जयबोध(रामदास-रामदासी, सु.द्वा.५वा)




पोवाडे आणि लावण्या यांचा संग्रह करण्याचा प्रथम प्रयत्न मराठींत इ. स. १८६९ पर्यंत तरी कोणीं केलेला दिसत नाहीं. १७-व्या शतकाच्या सुरवातीलाच तुळजापूरच्या अंबा भवानीचा संप्रदाय सर्व महाराष्ट्रभर पसरलेला होता. या भवानीचे भक्त असणारे गोंधळी पोवाडे रचून गांवोगांवीं म्हणत असत. हे पोवाडे अर्थातच लिहिलेले नसत. केवळ पाठांतरानें त्यांचें अस्तित्व टिकविलें जाई व ही पद्धत एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत चालू होती. परंतु त्यानंतर मात्र अनेक विद्वानांनीं पोवाड्यांचे संग्रह करण्याच्या कामीं पुष्कळ श्रम घेतले. विविधज्ञानविस्ताराचा जन्म झाल्यावर प्रथम इ. स. १८७२-त नारायणरावाचा वध हा पोवाडा त्यांतेसंपादकांनीं प्रसिद्ध केला. पुढें इ. स. १८७५-त कोल्हापूरकर आबासाहेबांच्या खुनाचा, इ. स. १८७७-मध्यें खर्ड्यांच्या लढाईचा, इ. स. १८७८-मध्यें सातारकर जंगली राजाच्या जन्माचा आणि इ. स. १८७९-मध्यें प्रभाकराचा खर्ड्यांच्या लढाईचा पोवाडा, असे पोवाडे विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झाले. यानंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'भाऊसारखा मोहोरा' हा रामा सटवा याचा व त्याचप्रमाणें बाजीरावाच्या निधनाचा असे दोन पोवाडे निबंधमालेंतून प्रसिद्ध केले. या दृष्टीनें विविधज्ञानविस्तारानें, निबंधमालेनें आणि काव्येतिहाससंग्रहानें फार मोलाची कामगिरी केली आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं या वाङ्मयाचें महत्त्व ओळखलें होतें आणि त्यांच्यापासूनच या वाङ्मयाचा पहिला संग्रह प्रसिद्ध करणारे श्री. शालिग्राम यांना स्फूर्ति मिळाली. त्यांनीं १८७९ सालीं एक पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला. मराठींतील हा पहिला संग्रह होय. या संग्रहांत एकूण त्रेचाळीस पोवाडे होते. नारायणरावाच्या वधाचा मूळ सात चौकी अस्सल पोवाडा व बाजीरावाच्या वनवासासंबंधींचा पोवाडा हे पोवाडे प्रथम यांत प्रसिद्ध झाले. याच वेळीं एक इंग्रज अधिकारी श्री. ऑकर्थ हेहि पोवाड्यांचा संग्रह करण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांना श्री. शालिग्रामांनीं प्रसिद्ध केलेल्या संग्रहाबद्दल कळतांच त्यांनीं त्यांना सहकार्यासाठीं बोलवलें. श्री. ऑकर्थ व श्री. शालिग्राम या दोघांनीं मिळून १८९० सालीं जुन्यानव्या पोवाड्यांतील निवडक पोवाड्यांचा एक संग्रह प्रसिद्ध केला. ह्या संग्रहाच्या बऱ्याच आवृत्त्याहि निघाल्या. यानंतरचा स्वतंत्र प्रयत्न म्हणजे श्री. शितूत यांचा. त्यांनीं शंभर संपूर्णतः नवीन अशा पोवाड्यांचा एक संग्रह अत्यंत श्रमपूर्वक काम करून प्रसिद्ध

केला. इतिहासाचें साधन म्हणून यांतील कांहीं पोवाडे फार महत्त्वाचे ठरले. उदा० डभईच्या लढाईचा अथवा दिलेरखानानें पुरंदर किल्ल्याला दिलेल्या वेढ्याचा वृत्तांत प्रथम या पोवाड्यांतून उपलब्ध झाला. ॲकर्थ साहेबांच्या बरोबर पोवाड्यांचा एक संग्रह प्रसिद्ध केल्यावर शालिग्रामांनीं नंतर स्वतंत्रपणें होनाजीबाळ, परशराम, अनंतफंदी व रामजोशी यांच्या लावण्यांचेहि संग्रह त्या त्या शाहिरांच्या चरित्रांसह प्रसिद्ध केले. पुण्याच्या चित्रशाळेनेंहि अनेक शाहिरांच्या लावण्यांचे संग्रह याच सुमारास प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणें रावसाहेब गुप्ते यांनीं 'होळकरशाहींतील पोवाडे' म्हणून १९ पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला.

शाहिरांचा जुन्यांत जुना उल्लेख शके ११०० सुमारच्या महिकावतीच्या बखरींत सांपडतो. त्यानंतर शहाजीच्या कालापर्यंत यांचा उल्लेख होत नाहीं. तेथून पुन्हां यांचा उत्कर्ष पेशवाईअखेरपर्यंत झालेला दिसतो. पेशवाईनंतर आजहि शाहीर व गोंधळी दिसले तरी त्यांना कसलेंहि महत्त्व आतां राहिलेलें नाहीं. अथवा त्यांच्याहि हातून चांगल्या वाङ्मयाची निर्मिति होत नाहीं. कोठें आगगाडी तर कोठें मोटार यासारख्या विषयावर अधूनमधून त्यांनीं केलेलीं गाणीं ऐकूं येतात, तेवढींच.

परंतु शिवकालापासून पेशवाईअखेरपर्यंत निर्माण झालेल्या शाहिरी काव्याचें महत्त्व अनेक दृष्टींनीं आहे. सुरवातीला इतिहासाचें एक साधन म्हणून या शाहिरी वाङ्मयाच्या संशोधनाचा उद्योग सुरू झाला. एकट्या शालिग्राम-शितुतांनींच अडीचतीनशें पोवाडे व चारपांचशें लावण्या उपलब्ध करून दिल्या आहेत. इतिहाससंशोधनाची एक नवीन शाखा म्हणून हें वाङ्मय आतां सर्वांना मान्य झालें आहे. कै. राजवाडे यांनीं आपल्या साधनांच्या चौथ्या खंडांत पोवाड्यांचें ऐतिहासिक निरीक्षण करून बखरीपेक्षां पोवाडे अधिक ग्राह्य आहेत असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें प्रो. पोतदार यांनींहि 'ऐतिहासिक पोवाडे' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे, कीं "ज्याप्रमाणें इतिहासांत काव्य असूं शकेल त्याचप्रमाणें काव्यांतहि इतिहास असूं शकतो". बखर पुरावा हा अनेक दोषांनीं युक्त असतो. त्यांत विसंगति, व्युत्क्रम व कल्पना यांचें मिश्रण पुष्कळ वेळां दिसतें. पोवाडा म्हणजे केवळ पद्यमय बखर असें पुष्कळांना वाटतें. परंतु बखरीपेक्षां तो अधिक विश्वसनीय आहे. तो समकालीन असल्यास उत्तमच. आजवर उपलब्ध झालेल्या पोवाड्यांत सगनभाऊचा पानिपतचा पोवाडा विषमकालचा आहे. तानाजीचा पंचावन्न चौकी पोवाडा रचणारा शाहीर तुळशीदास हा पवाड्याचे शेवटीं आपणांस पंतोजीकाकानें पुण्याहून बोलावून घेतलें, आपण पोवाडा

रचला व त्याबद्दल एक हजार रुपयांचा तोडा आपल्या हातांत घातला असें स्वतः म्हणतो. यावरून, तुळशीदास हा तानाजीचा समकालीन असावा असा सर्वत्र समज आहे. परंतु हा शाहीर शिवकालीन नसून पेशवेकालीन आहे असा निवाडा प्रो. पोतदारांनीं त्याच्या पोवाड्याचें अंतरंग तपासून दिला आहे [ भाइसंमं. त्रैमासिक, १९–१ ]. त्यामुळें हे दोन पोवाडे सोडून बाकीचे बहुतेक सर्व समकालीन आहेत असें म्हणतां येईल. या समकालीन शाहिरी वाङ्मयांत इतिहासाचे सुवर्णकण सांपडतात. राजकीय स्थितिदर्शक असे हे पोवाडे रचणाऱ्या शाहिरांनींच लावणी–वाङ्मय निर्माण केलें असून पोवाड्यांहून लावण्यांची संख्या कितीतरी अधिक आहे. त्यांचें प्रमाण साधारणपणें १०० : ५ असें पडेल. पोवाडे हे राजकीय स्थितिदर्शक म्हटले तर लावण्या समाजस्थितिदर्शक म्हणतां येतील. लोकसमजुती, आचारविचार, ग्रह, विवाह, स्त्रीपुरुष-संबंध, सौंदर्याच्या कल्पना, स्त्रीपुरुषांचे पोषाख, अलंकार, उत्सव, सण, नवस-सायास, कुटुंबांतील परस्परसंबंध यासंबंधींची विश्वसनीय, तपशीलवार, व सूक्ष्म माहिती या लावण्यांतून मिळते.

हें महत्त्वपूर्ण वाङ्मय अनेक संशोधकांच्या श्रमानें उपलब्ध झालें असलें तरी तें मिळविण्याचे प्रयत्न शास्त्रीय पद्धतीनें व अचूक झाले होते असें म्हणतां येणार नाहीं. शाळिग्राम, शितूत यांनीं ग्राह्याग्राह्य विचार फारसा न करतां जें मिळेल तें प्रसिद्ध करून टाकलें. त्यामुळें या उपलब्ध साहित्यांतून प्रमादांच्या राशी आढळतात. मोडी वाचनाच्याच केवळ नव्हे तर बालबोध वाचनाच्याहि चुका, चुकीची शब्द-तोड इ. प्रकार त्यांनीं केले आहेत. गोंधळी, भराडी वगैरे ज्या असंस्कृत जातींपाशीं हें वाङ्मय पाठांतराच्या परंपरेनें आलें होतें त्यांनीं पाठांतर करतांना फार अशुद्धें केलीं होती. तें लिहून घेणाऱ्यांना ऐतिहासिक ज्ञान नसल्यानें व भाषेंतहि अंतर पडल्यानें पुन्हां त्यांत असंख्य चुकांची भर पडली. या दृष्टीनें या साहित्याचा ऐतिहासिक साधन म्हणून उपयोग करण्यापूर्वीं त्याचें आमूलाग्र शुद्धीकरण करणें आवश्यक होतें. हें महत्त्वाचें काम अलीकडे श्री. य. न. केळकर यांनीं फार परिश्रमपूर्वक केलें आहे.

आजवर उपलब्ध झालेल्या सुमारें तीनशें पोवाड्यांपैकीं सहासातच काय ते शिवकालीन असून सुमारें दीडशें पेशवेकालीन व बाकीचे अव्वल इंग्रजींतील आहेत. शिवकालीन पोवाड्यांत शिवाजीसंबंधीं दोन, तानाजीचा एक व बाजी पासलकराचा एक असे असून शाहुकालांत शाहूच्या मृत्यूचे दोन व बाजीरावासंबंधीं तीन आहेत. या तीन पोवाड्यांत कर्नाटकां-

तील स्वारीचा, त्रिंबकराव दाभाड्याशीं झालेल्या युद्धाचा व त्याच्या मृत्यूचा असे पोवाडे आहेत. या काळांत लावण्या दिसत नाहींत. पोवाडे रचणारे शाहीर हे मराठेच असल्यानें या कालांतील रचना गद्यप्राय, खेडवळ व अडाणी अशी आहे. चौक कांहीं ठिकाणीं तर चारदोन चरणांचेच दिसतात. मात्र भाषा साधी असली तरी तडफदार आहे.

दुसऱ्या कालखंडांत एकूण पोवाड्यांपैकीं निम्याहून अधिक निर्माण झालेले आहेत. या कालखंडांतील पोवाड्यांची सुरवात पानिपतनें होऊन समाप्ति खडकी-अष्टीनें झाली आहे. सवाई माधवराव व दुसरे बाजीराव यांच्या कारकीर्दींतील प्रसंगांवर सुमारें चाळीस, नानासाहेबांच्या कारकीर्दींतील प्रसंगांवर सहा, पानपतचे चार, पुणें-वर्णन एक व नानांच्या मृत्यूचा एक असे पोवाडे या कालांत मिळतात. माधवरावांच्या मृत्यूचा एक अर्धवट पोवाडा उपलब्ध आहे. नारायणरावाच्या खुनाचा पोवाडा प्रसिद्धच आहे. सवाई माधवरावांच्या कारकीर्दींतील त्यांच्या जन्माचा, रंगाचा, मृत्यूचा, कर्नाटकांतील मोहिमांचा, खर्ड्यांच्या लढाईचा असे पंधरावीस पोवाडे आहेत. या कालांत अगणित लावण्या निर्माण झाल्या. एकट्या सवाई माधवरावासंबंधींच पांचपन्नास लावण्या आहेत. शेवटल्या दोन पेशव्यांच्या कारकीर्दींत पेशव्यांपेक्षां शिंदे, होळकर, गायकवाड, आंग्रे, धुळप इत्यादि थोर सरदारांवरच काव्यें अधिक निर्माण झालीं. या कालखंडांतील शाहिरांत भराडी, गोंधळी इत्यादि ब्राह्मणेतर जातीं-प्रमाणेंच ब्राह्मण जातींतहि शाहीर निर्माण झाले. कवनांच्या चाली बदलल्या. त्यांत रागरागिण्यांचा प्रवेश झाला. गीर्वाण वाणीचा प्रसार होऊन रचना बांधेसूद दिसूं लागली.

तिसऱ्या कालखंडांत स्वातंत्र्यसूर्यास जें इंग्रजांचें ग्रहण लागलें त्याची अशुभ छाया या शाहिरी वाङ्मयावर पडलेली स्पष्ट दिसते. या कालखंडांतील शाहिरी वाङ्मयांत दुःखाची, वैतागाची, भयचकितपणाची संमिश्र भावना आढळते. त्यांत गत स्वराज्याची हळहळ जशी आहे, तशीच लाचार कवींनीं इंग्रजांची केलेली स्तुतिहि दिसते. पुण्याऐवजीं मुंबईचें महत्त्व वाढूं लागलेलें दिसतें. एकंदरींत पोवाड्याची निपज व दर्जा कमी झाला हेंच खरें. कारण त्यांचा परामर्श घेणारा राजेसरदारांचा वर्गच नाहींसा झाला. पेशवाईनंतरहि बरींच वर्षे हे शाहीर कोणातरी लुंग्यासुंग्याची स्तुति करीत आणि कसल्या तरी सामान्य विषयावर लिहीत कसेबसे जिवंत होते.

अभ्यासाचीं साधनें :

| | |
|---|---|
| ऑक्वर्थ व शाळिग्राम | : ऐतिहासिक पोवाडे. |
| गो. ब. शितूत | : ऐतिहासिक व इतर पोवाड्यांचा संग्रह. |
| शं. तु. शाळिग्राम | : थोर पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे. (इ. १८७९) |
| पुरंदरे आणि मंडळी, मुंबई | : मराठे आणि पेशवे यांचे पोवाडे. |
| वि. ल. भावे | : अज्ञानदासकृत अफझलखानाचा पोवाडा. |
| शं. तु. शाळिग्राम | : अनंतफंदीकृत कविता. |
| शं. तु. शाळिग्राम | : परशराम कवीच्या लावण्या. |
| शं. न. जोशी | : प्रभाकरकृत पोवाडे व लावण्या. |
| शं. तु. शाळिग्राम | : रामजोशीकृत लावण्या. |
| शं. तु. शाळिग्राम | : होनाजी बाळाकृत लावण्या. |
| गो. गो. अधिकारी | : सगनभाऊकृत लावण्या व पोवाडे. |
| य. न. केळकर | : ऐतिहासिक पोवाडे (भाग १ व २). |
| अ. ब. कोल्हटकर | : मराठी काव्याची प्रभात (कोल्हटकर. लेखसंग्रह, भा. १). |



प्रस्तुत प्रकरणांतील गद्य सारस्वताचे सरळच दोन भाग पडतात—एक यादवकालीन गद्य व दुसरा मराठेशाहींतील गद्य. पैकीं यादवकालांतील गद्याची माहिती आपण 'महानुभावांचे आद्य ग्रंथ' या प्रकरणीं घेतलीच आहे. मराठेशाहींतील गद्याविषयींहि सारस्वतकारांनीं दिली आहे याहून अधिक माहिती महत्वाची अशी देतां येणार नाहीं. फक्त थोडाफार तपशील भरून कांहीं तात्विक स्वरूपाचें विवेचन करणें एवढेंच येथें शक्य आहे.

मराठेशाहीच्या पूर्वकाळांत रचिल्या गेलेल्या शालिवाहनाची बखर, मानभाव (?) कृत सिंघणादि यादवांच्या बखरी, हेमाडपंताची बखर अशा कांहीं प्राचीन बखरींचीं नांवें ऐकिवांत असलीं तरी त्यांविषयीं विश्वसनीय अशी माहिती मिळत नसल्यानें त्यांचा विचार न करतां मराठेशाहीपासूनच आरंभ करणें बरें. मराठेशाहींत बखर हा शब्द माहिती देणें या अर्थानें रूढ झालेला दिसतो. कारण 'चरित्र' म्हटलें तरी त्याला जोडून बखर हा शब्द वापरलेला आढळतो. 'इतिहास' म्हटलें तरी त्यासहि बखर शब्द जोडल्याचीं उदाहरणें आहेत. शिवाजीराजा छत्रपती असें म्हणून पुनः त्यास पादशहा हा शब्द जोडण्याची जशी रूढि होती, त्याप्रमाणेंच चरित्राची, इतिहासाची बखर अशा प्रकारचे शब्दप्रयोगहि रूढ होते. फार काय, श्रीमद्भागवत बखर असेंहि म्हटल्याचें आढळतें. तात्पर्य, बखर या अरबी शब्दांतील पहिल्या दोन वर्णांचा विपर्यय होऊन बनलेला बखर[1] हा शब्द उत्तर मराठेशाहींत फार चलन पावला होता. मराठींतील बखरींचे एकूण दहा बारा प्रकार कल्पितां येतात. ते असेः— १ व्यक्तींचीं चरित्रें ( उदा० शिवाजी, संभाजी इ. एकेका व्यक्तीवरील बखरी ); २ घराण्यांच्या हकीकती ( उदा. पेशव्यांची बखर, नागपूरकर भोंसल्यांची बखर, हरिवंश, इ. ); ३ एकेका प्रसंगाची हकीकत ( उदा. खर्ड्याची लढाई, पानिपतची बखर, ब्रह्मेंद्रस्वामींच्या निधनाची बखर); ४ स्थलविषयक माहिती देणाऱ्या बखरी ( उदा. महाबळेश्वर, साष्टी, चेऊल, इ. ); ५ संप्रदाय बखरी (उदा. जयरामस्वामीची मठपरंपरा); ६ विशिष्ट काळांतील हकीकती ( उदा. पेशवाईची अखेर, शके १७४० ची हकीकत ); ७ शिक्षणार्थ लिहिलेल्या बखरी ( उदा. सवाई माधवरावांच्या शिक्षणासाठीं म्हणून लिहिलेली बकासुराची बखर, रामायणाची

---

१. कै. राजवाडे बखर हा शब्द 'बक्' (बोलणें) या धातूपासून व्युत्पादितात तें बरोबर नाहीं (म. इ. साधनें, खं. ६, प्रस्तावना).

बखर, नलोपाख्यान, इ. ); ८ मुसलमान-अनुकरणी बखरी [ उदा. ९१ कलमी ); ९ उत्पन्न चालू राहावें यासाठीं लिहिलेल्या बखरी ( उदा. करिना, कैफियत, इ. ); १० केवळ बातमी या दृष्टीनें झालेलें लेखन ( उदा. शके १७४० तील माहिती, वगैरे ); ११ भाषांतरित बखरी ( उदा. बुंदेल्याची बखर—हें इ. स. १७९४-मध्यें मूळ फारसीचें स्कॉटनें इंग्रजींत भाषांतर केलें त्याचें हें मराठी रूपांतर आहे. ); १२ आत्मचरित्रें ( उदा. नाना फडणीस, बापू कान्हो, गंगाधरशास्त्री पटवर्धन, खांडेकर, इ. ).

मराठींतील बखरवाङ्मयाची कल्पना येऊन अभ्यासकांची सोय व्हावी या हेतूनें पुढें बखरींची एक यादी विषयवारीनें देत आहों. ही यादी भारत इतिहास संशोधक मंडळांतील सुप्रसिद्ध संशोधक श्री. शं. ना. जोशी यांनीं तयार केली असून प्रस्तुत ग्रंथाची निकड लक्षांत घेऊन ही यादी तांतडीनें व आस्थेनें करून दिल्याबद्दल आम्ही श्री. जोशी यांचे फार ऋणी आहों. श्री. जोशी यांचा इतिहासक्षेत्रांतील अधिकार ध्यानांत घेतां त्यांनीं केलेली ही याद जशीच्या तशीच देणें इष्ट वाटतें[1].

श्री शिवाजी राजांच्या स्वतंत्र बखरी ( एकूण नऊ ):—

१. कृष्णाजी अनंत सभासदकृत शिवछत्रपतींचें चरित्र. रूढ नांव, ‘सभासदी बखर’. लेखनकाल शके १६१९. लेखनस्थळ चंदी.

२. रघुनाथ यादव चित्रेकृत ‘चित्रगुप्तविरचित बखर.’ ही बखर म्हणजे सभासदी बखरीची काढविलेली आवृत्ति आहे. लेखनकाल शके १६८३. लेखनस्थळ, सामान्यतः तोरगल-चिकोडी ( ? )

३. दत्ताजी त्रिमल वाकेनवीस व अनाजी रंगनाथ मलकरेकृत ‘९१ कलमी बखर’—लेखनशक १६८२ ते ९२. लेखनस्थळ—?

४. मल्हार रामराव चिटणीसकृत ‘सप्तप्रकरणात्मक चरित्र’, लेखनशक १७३२. लेखनस्थळ, बोरगांव सातारा.

* ५. गणपतराव गोविंदराव चरवेकृत ‘मराठी साम्राज्याची छोटी बखर.’ लेखनशक १७३९. लेखनस्थळ—?

६. खंडो बल्लाळ चिटणीसकृत ‘शिवदिग्विजय.’ लेखनशक १७४०, लेखनस्थळ ‘नर्मदादाक्षिण तटे’—?

---

१ कै. राजवाडे यांच्या वेळेपर्यंत छापून निघालेल्या मराठी बखरींची एक यादी त्यांनीं म. इ. साधनें, खंड १, प्रस्तावना पृष्ठ ३ वर दिली आहे तीहि जिज्ञासूंनीं पहावी.

नक्षत्रांकित बखरींतून पुढील छत्रपतींचीहि माहिती आहे.

* ७. शेडगांवकर बखर. लेखक— ? लेखनशक १७७६.

८. शिवप्रताप. लेखक— ? लेखनशक १७५१.

९. राजवाडे खंड ४ मधील शिवाजीची हकीकत. लेखनशक १७०४.

इतर बखरी:—

| बखरींचें नांव | बखरकार | रचनास्थल व काल |
|---|---|---|
| १. तालिकोटची बखर. | वेंकटाद्रि तक्रेल निसिंदा. | हुबळी, परगणे संपगांव. शके १४८८. |
| २. महाबळेश्वरची जुनी माहिती. | ... | ... |
| ३. ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र. | ... | धावडशी. |
| ४. श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत | ... | ... |
| ५. भाऊसाहेबांची बखर. | कृष्णाजी शामराव[1] (?) | इंद्रप्रस्थ. |
| ६. होळकरांची थैली. | ... | ... |
| ७. पानिपतची बखर. | रघुनाथ यादव. | पुणें, शके १६८४. |
| ८. गायकवाड यांची हकिकत. | ... | शके १६९४. |
| ९. पेशव्यांची बखर. | बाळाजी गणेश, कारकून. | शके १७०४. |
| १०. छत्रपति संभाजी बखर. | मल्हार रामराव चिटणीस. | कोरगांव-सातारा, शके १७३२. |
| ११. थोरले छत्रपति राजाराम यांचें चरित्र. | " " " | शके १७३२. |
| १२. शाहूमहाराज बखर. | गोविंद खंडेराव चिटणीस | ... |
| १३. धाकटे रामराजे यांचें प्रकरण. | मल्हार रामराव चिटणीस. | शके १७३२ |
| १४. धाकटे शाहू छत्रपति यांचें चरित्र. | " " " | " " |
| १५. वडगांवकर जयरामस्वामी व त्यांचे शिष्यप्रशिष्य यांचें चरित्राची बखर. | ... | शके १७३०-३५. |
| १६. शके १७३८ सालची हकीकत. | ... | शके १७३९. |
| १७. पेशव्यांची बखर. | नारो मेघश्याम. | शके १७३९. |

---

१. ग्वाल्हेरचे आनंदराव भाऊ फाळके यांच्या मतें भाऊसाहेबांच्या बखरीचें खरें नांव 'शिंदे यांची बखर' असें असून चिंतो कृष्ण वळे हा तिचा लेखक असावा.

| | | |
|---|---|---|
| १८. दाभाडे सेनापति यांची हकीकत. | ... | शके १७३४–४१. |
| १९. पेशवाईच्या अखेरची अखबार. | वेंकट बल्लाळ. | शके १७३४–४१. |
| २०. चेऊलची बखर. | ... | शके १७४०. |
| २१. नागपूरकर भोसले यांची बखर. | चिटणीस गुप्ते, काशीराव राजेश्वर. | शके १७४०. |
| २२. आंग्रे यांची हकीकत. | नारायण खंडेराव डबीर. | ... |
| २३. पटवर्धनी वाका. | ... | ... |
| २४. होळकर कैफियत. | ... | शके १७४९. |
| २५. हरिवंशाची बखर. | बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन. | आंबे, शके १७६४. |
| २६. ठाण्याची बखर. | ... | ... |
| २७. पेशव्यांची बखर. | कृष्णाजी विनायक सोहनी. | शके १७४०. |
| २८. खर्ड्यांच्या स्वारीची बखर. | ... | ... |
| २९. बुंदेल्याची बखर, (भाषांतरित). | ... | ... |
| ३०. पेशवाईची अखेर. | ... | शके १७४०. |
| ३१. आत्मचरित्रें. | नाना फडणवीस, गंगाधर-शास्त्री पटवर्धन, बापु कान्हो. | ... |

**हस्तलिखित अप्रसिद्ध बखरग्रंथः—**

१. नलोपाख्यान—हस्ताक्षर महादजी विश्वनाथ जोशी. पृ. १–६०. लेखकशक १७४५.

२. श्रीमद्भागवत बखर—पृ. ४-७७. पुढील पृष्ठें गहाळ. लेखनकाल शके १७४३. हस्ताक्षर, गणेश वासुदेव पटवर्धन.

३. कृष्णजन्मकथा बखर—पृ. १-२४८. लेखनकाल ? हस्ताक्षर, केशवराव त्र्यंबक अभ्यंकर.

४. रामायण बखर, अश्वमेध बखर, माघमाहात्म्य, गोपीचंदाची बखर. पृ. १–२९. लेखक रामाजी अनंत भागवत.

वरीलपैकीं बहुतेक सर्व महत्त्वाच्या बखरींची नोंद महाराष्ट्र-सारस्वतांत येऊन गेली आहे. त्यास एकादी दुरुस्ती किंवा पुस्ती जोडणें एवढेंच येथें शक्य आहे. पैकीं सारस्वतकार जिला शहाण्णव कलमी बखर म्हणतात तीच वाकेनिशी बखर या नांवानेंहि ओळखली जाते. सभासदी

बखरींचा लेखक जो कृष्णाजी अनंत त्याचें गोत्र काश्यप व उपनांव हिरेपारखी. शिवाजीपासून राजारामअखेरपर्यंत तो दरबारी सभासद असल्यानें सभासद या नांवानें ओळखला जातो. याचें बखरीचें काम तीन वर्षेपर्यंत चालू होतें. ही बखर एका समकालीन जाणत्या माणसानें लिहिलेली असल्यानें बरीच विश्वसनीय आहे. 'भाऊसाहेबांची बखर' कृष्णाजी शामजीच्या नांवावर मोडते खरी, परंतु तिचें कर्तृत्व संशयित आहे. शिंद्यांच्या नौकरींतील कोणी चिंतो कृष्ण वळे—फडणीस हा सदर बखरीचा लेखक असावा असें मत ग्वाल्हेरचे श्री. आनंदराव फाळके यांनीं मांडलें असून प्रो. शेजवलकर यांचा त्यास पाठिंबा आहे. प्रश्न विवाद्य वाटतो. इतकें मात्र खरें, कीं लेखक सिंद्यांचा पक्षपाती असावा असें बखरीचा एकंदर थाट सांगतो. मराठेशाहीचा प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीस यानें केवळ शिवचरित्रच नव्हे तर अनेक मराठे राजांच्या बखरी मोठ्या परिश्रमानें रचिल्या आहेत. हा मल्हारराव म्हणजे पेशव्यांचे सरदार सखाराम हरि गुप्ते अंबेगांवकर यांचा जांवई व सातारच्या प्रतापसिंह छत्रपतींचा चिटणीस. याच्या बखरींचा रचनाकाल शके १७३५-च्या आसपास आहे. हनुमंतस्वामीकृत रामदासांच्या बखरीचा इतिहास कै. भावे यांनीं दिलाच आहे. हे हनुमंतस्वामी म्हणजे रामदासांचे वडील बंधु जे श्रेष्ठ त्यांच्या नातवाचे नातू होत. ही बखर हनुमंतस्वामींच्या नांवावर प्रसिद्ध असली तरी ती त्यांनीं स्वतः लिहिलेली नाहीं. त्यांच्या आज्ञेवरून चाफळ संस्थानचे रंगो लक्ष्मण मेढे व प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीस यांनीं जुनीं सांप्रदायिक कागदपत्रें वगैरें पाहून ही बखर प्रथम शके १७१५-त रचिली व पुढें शके १७४०-मध्यें ती सुधारून वाढविली. रामदासांचे नातू जे गंगाधरस्वामी त्यांनीं रचिलेल्या समर्थचरित्राच्या आधारें आपण प्रस्तुत बखर लिहीत आहों असें स्वतः बखरकार म्हणतात. असो. जें 'आज्ञापत्र' रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्या नांवावर कै. भावे देतात तें अमात्यकृत नसावें असें वाटतें. कारण आज्ञापत्राच्या प्रारंभीं तें शंभु छत्रपतींनीं (म्हणजे राजारामास राजसबाईपासून झालेल्या संभाजीनें) रामचंद्रपंत अमात्यास उद्देशून लिहिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. प्रो. कोलते यांच्या मतें शंभु छत्रपतींचा पंतप्रधान निळकंठ मोरेश्वर पिंगळे हा आज्ञापत्राचा खरा लेखक असावा. या प्रश्नाचें सविस्तर विवेचन जिज्ञासूनीं आज्ञापत्रास जोडलेल्या प्रो. पांढरीपांडे व प्रो. कोलते यांच्या प्रस्तावनांत[1] पहावें. या खेरीज मराठेशाहींत शके १७०४ पर्यंतची

१. आज्ञापत्र (वीणा प्रकाशन, नागपूर, इ. स. १९४५).

पेशव्यांची बखर, रायरी येथील बखर, दलपतराय यांची बखर, गोविंदपंत बुंदेल्यांची कैफियत, दाभाड्यांची हकिकत इत्यादि अनेक बखरी व तत्सम साहित्य रचिलें गेलें. पैकीं दोनतीन बखरींचा उल्लेख येथें करणें अवश्य आहे. पेशवाईचा अस्त झाल्यावरसुद्धां सातारकर प्रतापसिंहाच्या सावलींत कांहीं मराठी लेखक प्रसन्नपणें लिखाण करीत होते. अशा लेखकांपैकीं माधवराव मुनशी म्हणून एक असून त्यानें इ. स. १८१८ ते १८३९-च्या दरम्यान केव्हांतरी सभारंजनी[1] नामक एक ग्रंथ लिहिला, तो 'भारतवर्ष' मासिकांत छापून प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ म्हणजे शेरअल्ली मुनशी यांनीं उर्दू भाषेंत लिहिलेल्या आरायेष महफिल या ग्रंथाचा मराठी भाषेंत केलेला तर्जुमा आहे. अद्‌भुत व इतिहास यांचें या 'सभारंजनीं'त पुष्कळ संमिश्रण झालें असलें तरी ग्रंथ वाचनीय आहे. सभानीति म्हणून दुसरा एक राजनीतिविषयक छोटा ग्रंथ श्रीमंत प्रतापसिंह यांनींच करविला होता. आयव्यय प्रकरणीं असाच एक ग्रंथ त्यांनीं करविलेला भारत इतिहास संशोधक मंडळांत आहे. कै. भावे यांनीं न उल्लेखिलेली दुसरी एक बखर म्हणजे हरिवंशाची होय. हरभट हा जो पटवर्धन घराण्याचा मूळ पुरुष त्याच्या वंशजांच्या म्हणजे पटवर्धन सरदारांच्या हकीकती या बखरींत असल्यामुळें तिला हरिवंशाची बखर असें म्हणतात. बखरीचा लेखक बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन आंबेकर हा असून बखरीचा लेखनकाल 'शके १७६४ शुभकृन्नाम संवत्सरे वैशाख शुद्ध ५ इंदुवार' असा आहे. ग्रंथसमाप्ति 'मु. आंबें, नजीक श्रीक्षेत्र पंढरपूर श्रीभीमातीर, श्रीउत्तरेश्वर सन्निध' झाली असून बखर अव्वल इंग्रजींत रचिली गेली हें उघड आहे. आणखी एक उल्लेखनीय बखर म्हणजे तंजावरची. मराठेशाहीची ही बखर म्हणजे एक अतिदीर्घ असा शिलालेख असून तो तंजावर येथील श्री बृहदीश्वराचें देवळांतील भिंतीवर सभोंवार खोदलेला आहे. हें खोदकाम मार्गशीर्ष वद्य १५ शके १७२५ ( १३ डिसेंबर इ. स. १८०३ ) या दिवशीं पूर्ण झालें असून या शिलालिखिताच्या शेवटीं जी लेखकाच्या नांवाची नोंद आहे ती अशी—"प्रथम वर्ण (ब्राह्मण) महाराष्ट्र जाति भगवंतरायाचे पौत्र, विठ्ठलरायाचे पुत्र, प्रस्तुत चोळदेशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज छत्रपती शरफोजी महाराज यांचे निजसेवक......" हा उल्लेख कोरक्याचा नसून लेखकाचा आहे. हें शिलालिखित अति प्रचंड म्हणजे छापील पृष्ठें शेंसवाशें भरतील इतकें असून त्यांतील सर्व मजकूर पुन्हां शेजारींच तामीळ भाषेंतहि खोदलेला आहे. मराठी लेखांतील भाषा तंजावरी वळणाची अर्थात् अशुद्ध

१. द. वा. पोतदार: मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, (प्रस्तावना पृ. २)

आहे. मराठेशाहीचा समग्र इतिहास देणारी ही शिलालिखित बखर ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत अविश्वसनीय आहे. एक अतिविस्तृत असें शिलालिखित मराठी गद्य एवढेंच तिचें महत्व. या शिलालिखिताचें वाचन आणि प्रकाशन तंजावरचे श्री. सांबमूर्तिराव यांनीं इ. स. १९०७ मध्यें केलें आहे.

वर तंजावरी बखरीसंबंधीं जें म्हटलें तेंच थोड्या फार प्रमाणांत सर्व बखरींविषयीं म्हणतां येईल. मराठेशाहींतील सुमारें पन्नासएक लहानमोठ्या बखरी आजवर छापून निघाल्या आहेत. महाराष्ट्रांत स्वदेशाच्या इतिहासाची आस्था १८-व्या शतकांत बरीच होती व तत्समाधानार्थ या सर्व बखरी निर्माण झाल्या. हिंदुस्थानांत इतिहास असा दोनच भाषांत लिहिलेला आढळतो. एक फारसींत व दुसरा मराठींत. कारण संगतवार इतिहास ज्यांचा अभिमानानें सांगतां येईल अशीं दोनच प्रौढ राज्यें या देशांत झालीं, एक मुसलमानांचें व दुसरें मराठ्यांचें. पैकीं मुसलमानांना इतिहासाची गोडी पूर्वींपासूनच आहे. त्यांच्या सहवासानें, त्यांच्या 'तत्वारिखा'पाहून मराठ्यांनींहि बखरींचा उपक्रम सुरू केला. खुद्द पेशव्यांच्या पदरीं बखरनवीस असत व जुने कागदपत्र पाहून बखरी सजविणें हें त्यांचें कामच असे. कांहीं बखरी प्रांतोप्रांतींच्या माहितगारांनीं कर्णोपकर्णीं ऐकून लिहिलेल्या आहेत. त्यांत सत्यापलाप साहजिकच अधिक आहे. खुद्द पेशव्यांच्या येथील खास लिहवून घेतलेल्या बखरींतून यद्यपि कालानुक्रम सांभाळला आहे, तथापि त्यांतहि कालविपर्यासाचा दोष हा आहेच. कै. राजवाड्यांच्या मताप्रमाणें हा दोष पुराणांच्या संसर्गानें व ऐतिहासिक सत्यासत्यतेसंबंधीं लोकांत असलेल्या औदासीन्यामुळें बखरींतून शिरला आहे. पौराणिक कथांच्या श्रवणानें विचारांत अतिशयोक्तीचें प्राबल्य फार झालें व कालाच्या पौर्वापर्याचें महत्त्व बखरनविसांच्या लक्ष्यांतून सुटलें. 'भाऊसाहेबांच्या बखरीं'त हा कालविपर्यासाचा दोष अत्यल्प असून सोहनीकृत 'पेशव्यांच्या बखरीं'त तो अमूप आहे. ऐतिहासिक बखरींचा दुसरा दोष हा, कीं त्यांत निरानिराळ्या प्रसंगांचें अन्योन्य महत्त्व दर्शविलेलें नसून क्षुल्लक गोष्टींचा निरर्थक पाल्हाळ मात्र केला आहे. तसेंच कोणत्याहि मोहिमेची वा राजकारणाची संगतवार हकीकत या बखरींतून मिळूं शकत नाहीं. जी कांहीं थोडीबहुत मिळते ती असंबद्ध, परस्परविरोधी, संदिग्ध आणि प्रायः अविश्वसनीय अशी आहे. शिवाय या बखरींतून जो मजकूर खरा असतो तो त्यांतील खोट्या मजकुरापासून अलग काढतां येत नाहीं. सर्व बखरी मिळून

ऐतिहासिक सत्य गवसेल म्हणावें तर तेंहि शक्य नाहीं. अनेक असत्यें मिळून एक सत्य कसें सिद्ध होणार ? उदाहरणार्थ, एक पानिपतचा प्रसंग घेतला तर त्यावर भाऊसाहेबांची बखर, कैफियत, रघुनाथ यादव-कृत पानपतची बखर, काशीराजकृत बखर या प्रमाणें चारपांच बखरी उपलब्ध आहेत. परंतु त्यांपैकीं प्रत्येकींत तपशीलाचा थोडाफार फरक पडतो, व त्या सर्व बखरी मिळून सत्यदर्शन घडतेंच असें नाहीं. म्हणून कै. राजवाडे[1] बखरींचें तीन वर्ग करतात. पहिला वर्ग समकालीन बखरनविसांचा असून त्यांत सभासदकृत शिवचरित्र किंवा भाऊसाहेबांची बखर व कैफियत यांसारख्या बखरी येतात. समकालिनांनीं रचिलेल्या या बखरी पुष्कळच विश्वसनीय खऱ्या, पण त्यासहि कांहीं मर्यादा आहेत. पैकीं सभासदी बखर केवळ स्मृतीवर हवाला ठेऊन चंदीसारख्या दूर प्रांतीं लिहिली गेल्यामुळें तींत कालानुक्रम सांभाळलेला नाहीं. या बखरींतील शके १५८१ पर्यंतची हकीकत धरसोडीची, त्रोटक, तुटक व कालविपर्यस्त अशी आहे. दुसऱ्या वर्गातील बखरी म्हणजे कर्णोपकर्णीं ऐकलेल्या हकीकतींचीं बाडें होत. या सदरांत सोहनीकृत पेशव्यांची बखर येते. ती रचणारास सत्यासत्यनिर्णयाचें ज्ञान नसल्यामुळें 'मिळेल ती माहिती व सुचेल ती स्फूर्ति' असा येथील प्रकार होतो. तिसऱ्या वर्गातील बखरींत जुन्या बखरकारांनीं दिलेली माहिती जशीच्या तशी किंवा कांहीं फेरफार करून इष्ट तेवढी दिलेली असते. उदा० मल्हार रामराव चिटणीसकृत शिवछत्रपतींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र. एकूण, ऐतिहासिक सत्यदर्शनाच्या दृष्टीनें या बखरींचें महत्त्व फार थोडें आहे. स्थल, काल आणि प्रसंग यांचा विपर्यास, संगतवार व तपशीलवार माहितीचा अभाव, संदिग्ध, असंबद्ध व परस्परविरुद्ध विधानें इत्यादि दोष कमीजास्त प्रमाणांत सर्वच बखरींतून आढळतात. ऐतिहासिक निर्णयाच्या दृष्टीनें पाहतां केवळ बखरींचा आधार घेतल्यास तो अपुरा व पोकळ ठरतो. ग्रँट डफ्ला हें उमगलें नाहीं व त्यानें बखरींतील मजकूर परमार्थानें घेतला. वरील सर्व अभिप्राय ध्यानांत आणून कै. राजवाडे म्हणतात, कीं एक अस्सल चिटोरें सर्व बखरींच्या बहुमतास हाणून पाडण्यास बस्स आहे (ऐतिहासिक प्रस्तावना, खंड ३, पृ. ४).

मराठेशाहींतील ऐतिहासिक पत्रव्यवहार हाहि खरोखर प्राचीन गद्याचा एक उत्कृष्ट मासला असून तो उपलब्ध करून देण्याचे कामीं आजवर अनेक मातबर संशोधकांचे जीवित-श्रम खर्ची पडले आहेत. हीं पत्रें म्हणजे खरोखर त्या त्या लेखकाचें अंतश्चरित्रच होय इतकीं त्यांतील कांहीं

1. ऐतिहासिक प्रस्तावना, खंड ४.

साहित्यदृष्ट्या सरस आहेत. शिवाजी महाराजांनीं जो स्वराज्याचा वृक्ष लावला तो पुढें शेसवाशें वर्षेपावेतों चांगलाच फोफावला. महाराष्ट्राचें महत्तर राष्ट्र या काळांत झालें व सर्वत्र महाराष्ट्राचा वचक बसला. त्या काळांतील बाळाजीपंत नाना, बाजीराव, नानासाहेब, हरिपंततात्या, भाऊसाहेब, चिमाजी अप्पा, नाना फडणवीस, शिंदे, होळकर, आंग्रे, रास्ते, गायकवाड, रघुनाथरावदादा, गोपिकाबाई, आनंदीबाई, जिवबादादा, पानसे इत्यादि शेकडों वीर मुत्सद्यांचीं हजारों पत्रें मिळालीं असून त्यांचे पांचपन्नास खंड छापूनहि निघाले आहेत. हीं पत्रें वाचून पाहतां फारसी भाषा पोटीं पचवून पुनरपि संस्कृताभिमुख होऊन आमचे वीर मुत्सद्दी कशी डौलदार, घाटदार व ऐटबाज भाषा बोलूं लिहूं लागले होते याचा प्रत्यय येतो. प्रो. पोतदार लिहितात, "स्वराज्याचें साम्राज्य झालें ! व्यवहार अफाट झाला. राजकारणें दाही दिशांस खेळूं लागलीं ! त्यामुळें वाणीला वैभवाचें तेज चढलें ! तिला विलासाची चटक लागली व ती अधिक नटवी, लज्जतदार व प्रौढ झाली. नानासाहेब पेशवे, चिमाजी अप्पा, नाना फडणीस इत्यादिकांचीं पत्रें, खलिते वगैरे वाचतांना युरोपियन मुत्सद्यांच्या डिस्पॅचेसची आठवण होते." हे वीर मुत्सद्दी वाङ्मयसेवा करण्यासाठीं प्रवृत्त झालेले नसून परस्परांचीं मनोगतें एकमेकांस कळविण्यासाठींच लिहीत होते हें खरें. तरीपण त्यांच्या पुष्कळशा पत्रांतून जिवंत साहित्याचा अनुभव वाचकांस पदोपदीं येतो यांतहि कांहीं शंका नाहीं.

## अभ्यासाचीं साधनें

वि. का. राजवाडे : मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, प्रस्तावना, खंड १, ४, ६.
का. ना. साने : 'काव्येतिहाससंग्रहां'त छापून निघालेल्या मराठ्यांच्या बखरींस लिहिलेल्या प्रस्तावना.
नी. ज. कीर्तने : ग्रांट डफ्कृत मराठ्यांच्या बखरीवर टीका.
द. वा. पोतदार : मराठी इतिहास व इतिहास-संशोधन.
शं. ग. दाते : मराठी ग्रंथ-सूचि, खंड १, पृ. ९९०–९९३.



# पेशवाईअखेरील कवि

प्रस्तुत प्रकरणांतील सारस्वतकारांचीं एकदोन विधानें दुरुस्त करून घेऊन या काळांतील आणखी कांहीं ग्रंथकारांची माहिती आपण घेऊं. बहेरु कवींबरोबर ज्या चतुर साबाजीचा उल्लेख सारस्वतकार करतात तो पुरुष पेशव्यांच्या नौकरींत नसून मलिकंबरकडील मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध असल्यानें हा साबाजी कवि अगदीं निराळा मानावा लागतो. दुसरी दुरुस्ती कोंकणस्थ कवींपैकीं भावार्थसिंधुकार विष्णु गोखले यांजविषयीं करणें जरूर आहे. हे ग्रंथकार म्हणजे दुसरेतिसरे कोणी नसून अव्वल इंग्रजींतील सुप्रसिद्ध विष्णुबोवा ब्रह्मचारी हेच होत. त्यांचा भावार्थसिंधु हा ग्रंथ प्रथम शके १७७८-त छापला गेला. अर्थात् विष्णु गोखले यांचें नांव पेशवाईअखेरील कवींबरोबर घेणें बरोबर नाहीं.

पेशवाईअखेरील कवींत ज्यांचा उल्लेख प्रथम करणें अवश्य आहे अशांपैकीं 'दासविश्रामधाम' कार आत्मारामबोवा यांचे शिष्य नरसोबा हे एक होत. हलखाळी गांवच्या पाटलाचे हे चिरंजीव आमरण ब्रह्मचारी राहून भालकी येथील रामदासी मठाचे अधिपति झाले. नरसोबा हे जातीनें मराठा असून त्यांच्या मठाची परंपरा आजतागायत मराठ्यांकडेच आहे. नरसोबांच्या जन्ममृत्यूचे शक उपलब्ध नाहींत; पण एवढें खरें, कीं त्यांनीं पेशवाईची अखेर व इंग्रजीचा आरंभ पाहिला होता. श्रावण वद्य १ ही त्यांची पुण्यतिथि. मठांत नरसोबांच्या अभंगांची एक वही व त्यांच्या कोणा अनंत नांवाच्या गुरुबंधूनें लिहिलेला 'वरप्रसाद' हा लहानसा ओवीबद्ध ग्रंथ एवढाच संग्रह आहे. वरप्रसादांतील दोन ओव्या मौजेच्या वाटल्या तेवढ्या पुढें देत आहों. सच्छिष्यलक्षणें सांगतांना हा अनंत कवि म्हणतो—

> गुरुआश्रमीं पादरक्षा घालों नये । सैरावैरा फिरों नये ।
> फिरों नये म्हणोन स्वस्थ बसों नये । कांहीं श्रवण करावें ॥
> कृतनिश्चय करूनि गुरुसि कांहीं देतो । पुन्हा लोभ धरूनि मागतो ।
> तो मार्जार होऊनि घरोघरीं फिरतो । अन्न मिळेना समयासी ॥

नरसोबांच्या वहींत चौचरणी ५७ व दोचरणी ७९ मिळून १३६ अभंग आहेत. स्वतःस 'कुणबी नरसोबा' म्हणविण्याऱ्या या कवीच्या वाणीचा थोडा नमुना पाहून आपण पुढें जाऊं. आपले गुरु आत्माराम यांची थोरवी वर्णितांना तो म्हणतो—

कुबेर नाम मुखीं सांगे । घरोघरीं भीक मागे
ऐसा नव्हे सद्गुरु माझा । पूर्ण योगियांत राजा
आत्माराम नाम साजे । त्रिभुवनीं कीर्ति गाजे
दासविश्रामधामांत । पाहा महिमा अद्भुत
रामदासाचा अवतार । खूण दाविली निर्धार
नर कुणबियाचा पोर । हातीं पादुका समोर

जयरामजजांकित हा या काळांतील आणखी एक कवि असून तो दुसऱ्या बाजीरावाचा समकालीन दिसतो. स्वतःचा उल्लेख तो ' जयरामजसुत-अंकित ' याप्रमाणें करतो. याचे गुरु चिदंबरस्वामी गुर्लहासूरकर हे इतिहास-प्रसिद्ध सेनानी बापू गोखले यांचेंहि गुरु होते. या जयरामजजांकिताच्या नांवावर साधुलक्षण, पतिव्रतास्तुति, होरी, फाग, धांवे इत्यादि प्रकरणें असून शिवाय त्यानें एक ' पंतप्रधानस्तुति ' हि रचिली आहे. ही स्तुति दुसऱ्या बाजीरावाची असून त्यांत तो म्हणतो.

" दानशूर जेंवि कर्ण, उपनाम वाटे पूर्ण, द्रव्यलाभें होती गार ॥ २ ॥ शूर धीर बुद्धिवान, न दिसे विद्वत्समुदाय तूर्ण कोण्ही समान पावती न, सत्कर्मीं मान, दुष्कर्मिया न लगे थार ॥ ३ ॥. ... जयरामजजांकित कृपे केला नामांकित होउनि तत्पदांकित करीत आनंदें विहार ॥ ६ ॥ "

एकूण दुसऱ्या बाजीरावाचेंहि गुणगान करणारा निघाला म्हणावयाचा ! असो. काशीराज या नांवाचे एकूण चार कवि आपणांस आतांपर्यंत ठाऊक झाले आहेत. एक अवचितसुत काशी, दुसरा काशीकवि, तिसरा ' पवनविजय ' कर्ता काशीराज व चवथा नुसता काशीराज. हे चारहि कवि स्थूलमानानें १६-व्या शतकांतील आहेत. या ठिकाणीं ज्या काशीराजाचा किंवा काशीसुंदराचा परिचय करून घ्यावयाचा तो कवि पेशवाई व इंग्रजी यांच्या संधिकाळांतील असून त्यानें ' अध्यात्मानुभव ' हा आपला ओवीबद्ध ग्रंथ शके १७४२-मध्यें रचून पूर्ण केला. ग्रंथ सामान्य आहे. .

येथून पुढें पेशवाई आणि इंग्रजी यांच्या संधिकाळांतील कांहीं कवींचा विचार करूं. पैकीं जयराम अनंत वाबळे[१] ( शके १६८७–१७८४ ) हे नगरच्या वाबळे–देशमुखांच्या घराण्यांतील. अध्यात्मविषयाचा ठेवा यांना वाडवडिलांपासूनच मिळाला होता, आणि त्यांत यांनींहि स्वतः वाङ्मय-रूपानें कांहीं भर टाकली. चैतन्यसंप्रदायांतील कोणा विठ्ठलाचे हे दास

१. ' महाराष्ट्र कविचरित्र, ' भाग ५ वा.

झाले आणि पुढें जन्मभर गीताभागवतावर निरूपण करूं लागले. जयराम-नावांची दशमस्कंधावर एक ओवीबद्ध टीका असून शिवाय त्यांनीं अनेक पदपदांतरें रचिलीं आहेत. त्यांचें एक उपदेशपर पद असें—

" गोविंद गोविंद बोल गे । प्रेमानंदें डोल गे ।
मायामोह प्रपंच जैसें हरभऱ्याचें फोल गे ॥ ध्रु० ॥
वैराग्याची कास गे । धरीं साक्कास गे ।
माऊबंध घर सखे सोड यांची आस गे ॥

अव्वल इंग्रजींतील रा. सा. करंदीकर, गोपाळराव देशमुख यांसारखीं विद्वान मंडळी यांनाच्या भजनीं होतीं. व्यंकटराव माधवराव गोळे ऊर्फ दाजी कवि ( शके १७०२–१७७३ ) यांच्या घराण्याचे मूळ पुरुष मोरो गोपाळ हे पेशव्यांचे नातलग होते. दाजी कवींचे वडील माधवराव यांना कवित्वाचा थोडा नाद होता आणि तोच पुढें मुलांत उतरला. पेशवाईत दाजीबा हे भक्त्याच्या मामलतीवर होते. पुढें पेशवाई बुडाल्यावर साताऱ्याजवळील मर्ढें या आपल्या इनाममांवीं राहून ते व्यापारधंदा करूं लागले. पंढरीची वारी घरचीच होती, आणि त्यांत त्यांच्या पाठांतराची भर पडल्यामुळें दाजीबा अभंगामागून अभंग रचूं लागले. शके १७५६-त त्यांनीं संन्यास घेतला व तेव्हांपासून 'दाजीमहाराज' या नांवानें ते ओळखले जाऊं लागले. त्यांचे वंशज मर्ढेकर गोळे यांजकडे दाजीबांच्या साठ वह्या असून प्रत्येकींत सुमारें एक हजार कविता आहे. यावरून त्यांच्या विपुल रचनेची कल्पना येईल. त्यांचे 'मनाचे श्लोक' एकूण १३०० असून त्यांपैकीं २८१ श्लोक 'काव्यसंग्रह'कारांनीं छापून प्रसिद्ध केले आहेत. इतर कविता अप्रसिद्ध आहे. परंतु ती सामान्य असावी असें प्रकाशित 'मनाच्या श्लोकां'वरून वाटतें. रामदासांच्या भाषेची आणि विचारांची सावली या श्लोकांवर दिसते. या दाजीकवीची समाधि साताऱ्याजवळ कृष्णेकांठीं ओरखळ येथें आहे.

मौनीस्वामी ऊर्फ नारो भिकाजी पारखी [शके १७०४-१७९६] हे या काळांतील संतकवि मूळचे नाशिक जिल्ह्यांतील सिन्नरचे. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत हे दफ्तरदार असून पुढें अव्वल इंग्रजींत जामनेर येथें फडणीस म्हणून होते. त्याच सुमारास प्रसिद्ध सत्पुरुष नाशिकचे श्री रघुनाथभटजी महाराज यांस ते शरण गेले आणि तेव्हांपासून त्यांनीं विरक्ति व मौन पत्करलें. पुढें वयाच्या ६३-व्या वर्षीं त्यांनीं दंडग्रहणपूर्वक संन्यासदीक्षा घेतली आणि 'नारायणेंद्र सरस्वतीस्वामी' हें चतुर्थाश्रमींचें नांव धारण केलें. उतारवयांत ते मुंबईस राहून तेथें भक्ति-

मार्गाचा प्रसार करीत. त्यांच्या शिष्यमंडळींत डॉ. कुंटे, डॉ. भाऊदाजी, नाना शंकरशेट, श्रीधर विठ्ठल दाते, महादेव चिमणाजी आपटे यांसारखीं बडीं धेंडें होतीं. मौनीस्वामी मोठे विद्वान् होते. त्यांच्या नांवावर 'लघुबोध', 'स्वात्मबोध', 'पंचीकरण' आणि 'समाधिप्रकरण' असे चार ओवीबद्ध वेदांतपर ग्रंथ आहेत. शिवाय पदरचना आहे ती निराळीच. त्यांचीं पदें कानाला गोड लागतात पैकीं एक असें—

तो नर सुस्ती । श्रीहरिशीं करितो मस्ती ॥ धृ० ॥...
अंगीं तारुण्याचा ताठा । बोलण्याचा ठसका मोठा ।
बहुत सोंगटीचा चटका । सांपडे मस्तीं ॥ २ ॥...
काढुनि पागोट्याची बिनी । धोतर चापचोपी चुनी ।
अंगडें तंगबार घालुनी । लाकितो दस्ती ॥ ६ ॥
वनिता देखुनि थरकी घोडा । करती पाहुनि चावी विडा ।
पगडीबाहेर केस बुचडा । दोघे हंसती ॥ ७ ॥
ऐसा दुर्बुद्धीचा जोर । भगवद्भजनाविषयीं चोर ।
मौनी म्हणे पुढें घोर । काळ कुस्ती ॥ ८ ॥

स्वामींचें पद्यात्मक चरित्र त्यांचे पुत्र वामनराव आप्पा यांनीं रचिलें असून तें 'काव्यकोशां' त प्रसिद्ध झालें आहे. स्वामींनीं शके १७९८-त देह ठेविला. त्यांची समाधि मुंबईस ठाकुरद्वारांत कोळ्याच्या वाडींत आहे.

कवि दयाळनाथ [ शके १७१०–१७५८ ] हे व्हाडांतील प्रसिद्ध संतकवि देवनाथ यांचे शिष्य होत. वयाच्या पांचव्या वर्षींच या हरीला त्याच्या आईबापांनीं देवनाथांच्या पायांवर घातलें, आणि त्यांनीं मुलाचा प्रेमळ भाव पाहून त्याला 'दयाळ्या' म्हणून संबोधिलें. हाच हरि पुढें दयाळनाथ झाला, आणि गुरुप्रमाणें आपणहि कीर्तनें करूं लागला. मराठी-हिंदी-उर्दू या तिहीं भाषांवर प्रभुत्व, विपुल पाठांतर, शीघ्रकवित्व आणि गोड गळा हे कीर्तनकाराला अवश्य असणारे सर्व गुण दयाळनाथांत होते. त्यांनीं शके १७५८ त हैद्राबाद येथें देह ठेविला. दयाळनाथांचीं शेंदीडशें पदें, धांवे, गौळणी, आख्यानें अशी कविता उपलब्ध असून ती गोड आहे.

गोविंद श्रीनिवास सरदेशपांडे ( शके १७१३–१७७३ ) हे या काळांतील एक संतकवि कमलाकर किंवा मुकुंदसुत या नांवानें काव्य-रचना करीत. हे मोंगलाईतील नांदेडचे असून त्यांचें सारें आयुष्य दारिद्र्यांत गेलें. कोणा शुकानंदाचा त्यांवर स्वप्नांत अनुग्रह झाला व पुढें वृद्धाप-काळीं चतुर्थाश्रम धारण करतेवेळीं त्यांनीं 'नित्यानंदस्वामी' हें नांव

घेतलें. या मुकुंदसुतांचा संस्कृतमराठीप्रमाणें फारसीचाहि अभ्यास होता व त्यांनीं मराठीप्रमाणें उर्दूतहि कांहीं रचना केली आहे. स्वतःच्या वंशावर त्यांनीं एक बखर लिहिलेली असून ती ओवीबद्ध आहे. शिवाय त्यांच्या स्फुट रचनेची कल्पना यावी म्हणून त्यांचें भक्तिकरुणपूर्ण असें एक पद पुढें देतों—

रामा करिं माझा प्रतिपाळ ॥ धृ० ॥
तुजविण मातें कोण न त्राता। म्हणविसि दीनदयाळ ॥ १ ॥
जेविं नदीजळ जाय पळोपळ। ने आयुर्बळ काळ ॥ २ ॥
या संसारीं श्रमलों भारी। डंखिति विषयव्याळ ॥ ३ ॥
**मुकुंदात्मज** विनवी चरणीं। ब्रीद तूंच सांभाळ ॥ ४ ॥

यांचे गुरु **वसमतकर श्रीशुकानंद** (मृत्यु शके १७४९) हेहि एक संतकवि असून त्यांची कविता 'काव्यसंग्रह' मासिकांत प्रसिद्ध झाली आहे. **नारायणबोवा जालवणकर** (शके १७१५–१७९०) हेहि या काळांतील एक संतकवि होत. प्रसिद्ध संतकवि निरंजन रघुनाथ यांचे हे शिष्य असावे. गुरुशिष्यांनीं जोडीनें गिरनार पर्वतावर तपश्चर्या केलेली दिसते. नारायणबोवा मोठे अधिकारी पुरुष होते. मुमुक्षूच्या विविध अवस्था ध्यानांत आणून त्यांनीं 'सप्तसागर' नांवाचा एक प्रचंड ओवीबद्ध ग्रंथ रचिला आहे. याचीं एकूण सात प्रकरणें असून त्यांतील विषयांची रचना पाहिल्यास ही मोक्षधर्माची एक सप्तपदीच आहे असें वाटतें. ग्रंथाची ओवीसंख्या १७,६७२ इतकी आहे. याशिवाय 'गुरुपादुकाष्टक', 'चिद्रत्नमाला', 'बोधाष्टक', 'विचारमाला', 'निर्वाणपंचक' अशीं अनेक स्फुट प्रकरणें बोवांनीं लिहिलीं असून तीं 'मुमुक्षू'त प्रसिद्ध झालीं आहेत. या कवीच्या कर्णमधुर वाणीचा, कल्पनाशक्तीचा आणि वर्णनशैलीचा प्रत्यय त्याचें पुढील पद वाचून येईल—

चाल चाल रे मना वना जाऊं। रम्य काननीं एकटे सुखी राहूं॥धृ०॥
पुण्यारण्याची महाशोभा पाहूं। शोभा पाहतां श्रीहरिगुण गाऊं।
वन्यतरूंचीं सुपर्णफळें खाऊं। इच्छाविहारी त्या मृगासंगें धावूं॥१॥
दिव्यसरितांचें जळ तृष्णा हारी। मलयमारुत हा स्वयें वारा वारी।
पर्णशय्येतें मृदु निद्रा करी। स्थिर नोहे अंतरीं धीर धरीं ॥२॥
रात्रिं लावूं सोज्ज्वळ चंद्रदीप। विरक्तिकांतेचें पाहुं गौररूप।
रूप पाहतां आलिंगि आपोआप। दूर करितें स्वयें सर्व ताप ॥३॥
ऐशा सुखाची त्या वनीं आहे खाण। तेथें राहतां सांपडे त्याची खूण।
नेटेंबोटें दाखवि नारायण। अंगें भेटवि तो सखा नारायण॥४॥

याच सुमारास आणखी एक थोर संतकवि होऊन गेले. त्यांचें नांव हंसराज ( शके १७२०–१७७७ ). हे हंसराज मोगलाईतील परभणीच्या गंगाधरपंतांचे चिरंजीव. त्यांचें मूळचें नांव नारायण. तरुणवयांतच कन्याकांता गेल्या आणि नारायणाचे नारायणबोवा होऊन विरक्तावस्थेंत त्यांनीं घर सोडलें. पुढें पंढरीस येऊन त्यांनीं संन्यास घेतला व 'नारायणतीर्थ' हें नांव धारण केलें. वृद्धापकाळीं शरीर लुळें पांगळेंझालें तेव्हां स्वामींनीं शके १७७७-त परंडा येथें देह ठेवला. 'हंसपद्धति' नांवाच्या ग्रंथांत स्वामींचें विस्तृत चरित्र आलें आहे. हंसराजांच्या प्रचंड रचनेची कल्पना त्यांच्या ग्रंथांची पुढील यादी वाचून होईल—

१ **वेदेश्वरी**—शिवगीतेवरील ओवीबद्ध टीका, ग्रंथ १०,०००.
२ **कथाकल्पलता**—वेदांतविषयक रूपकें, ग्रंथ १०,०००.
३ **आगमसार**—औपनिषदिक तत्वविवेचन, ग्रंथ ३५००.
४ **सदाचार टीका**—आचार्यांच्या ग्रंथावरील टीका, ग्रंथ २१००.
५ **बृहद्वासिष्ठांतर्गत चूडालाख्यान**—अभंग २२००.
६ **लघुवाक्यवृत्ति टीका**—आचार्यांच्या ग्रंथावरीलटीका. ग्रंथ १०००.
७ **अमृतानुभव टीका**—ग्रंथ १०००.
८ **संकेतकुवडी**—श्रीदासबोधभावार्थ, ग्रंथ ५००.
९ **ईशावास्योपनिषद् टीका**—ग्रंथ ५००.
१० **वेदनामक वेदावरील अभंग**—ग्रंथ ३००.

या शिवाय 'गुरुभक्तिसार' आणि 'गद्यरूप तत्वझाडी' हे त्यांचे गद्यग्रंथहि आहेत. म्हणजे, स्वामींची ग्रंथरचना सुमोंर ३५,००० घरांत जाते. हंसराजांचा पुढील उतारा वाचण्यासारखा आहे. सद्गुरुकृपेमुळें होणारी शिष्याची धालेपणाची स्थिति ते या ठिकाणीं वर्णीत आहेत—

आतां मज काय भय । सद्गुरूनें दिधलें अभय ।
आतां कासया संशय । तरणोपायाचा ।।
जेव्हां माथां ठेविला कर । तेव्हांचि जालों असे अमर ।
आतांचि हा भवसागर । करीन कोरडा ।।
आतां बळ चढलें अपार । करीन अवघ्यांचा संहार ।
आवेशें रगडूनि अधर । कर चुरून बोले ।।
कामातें जीवें मारूं । कीं क्रोधाचा घात करूं ।
आसडून पाडूं मत्सरू । मोहा हाणूं लाथा ।।...
इच्छेचा मोडूं बडगा । कीं आशेचा करूं गलगा ।
वासनेशीं करूं शिमगा । लावूं देशधडी ।।...

विष्णु शिव दोन्ही धरूं । हृदयामाजीं सगळे भरूं ।
कीं कांखेमाजीं आवरूं । ब्रह्मदेवा ॥...

वरील उताऱ्यांतील वाणी साधीसुधी, पण ओजस्वी आहे. हंसराज हे स्वतः रामदासी पंथांतील असल्यानें त्यांच्या ग्रंथांवर दासबोधाच्या साध्या, सरळ भाषापद्धतीचा ठसा उमटलेला दिसावा यांत कांहींच आश्चर्य नाहीं. परंतु नवल हें, कीं मधूनच ज्ञानेश्वरींतील वर्णनपद्धति येथें डोकावतांना आढळते, आणि रामदासांप्रमाणें हंसराज हे ऱ्हस्वदीर्घांची ओढाताणहि करीत नाहींत. त्यांच्या काव्यांत दडपेबाजी अगदीं नाहीं. तसेंच 'मागुती, आपैसें, बोलिजे' यांसारखीं आर्षरूपें त्यांच्या भाषेंत ठिकठिकाणीं दिसून येतात. हंसराजांचे ग्रंथ म्हणजे कवीच्या अध्यात्मपारंगततेचा, दीर्घोद्योगाचा, विद्वत्तेचा आणि लोकहितवादित्वाचा एक प्रचंड असा पुरावाच आहे.

या काळांतील मोरोपंतांचें अनुकरण करणाऱ्यांत **नागेश महादेव मटंगे** ( शके १७२३–१७५५ ) या सातारकर कवीची गणना होते. मटंगे घराणें मूळचें कीर्तनकारांचें आणि प्रस्तुत कवीची सारी रचनाहि कथाकीर्तनांच्या अंगानेंच झाली. यांचें 'नंदिकेश्वरजननाआख्यान' हें चतुराध्यायी काव्य बऱ्यापैकीं असून त्याच्या एकूण आर्या १८५ आहेत. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध संतकवि उद्धवचिद्घन यांचे गुरु चिद्घनस्वामी यांच्या भागिनीच्या वंशांत जन्मलेले **भैरव अवधूत** (मृत्यु शके १७६५) हे कवि याच काळांतील होत. यांची आजी निराबाई ही चिद्घनस्वामींची बहीण. भैरवबुवांचे पूर्वज हे विट्याचे जोशी-कुलकर्णी असून त्यांच्याकडे पयकीचा अधिकार होता. बुवांचें आडनांव ज्ञानसागर असून ते दत्तोपासक होते. भैरव अवधूतांची कविता हजाराच्या आंतबाहेर असून तिचा विषय एकच व तो म्हणजे अध्यात्म हा आहे. रचनेंत मात्र थोडें नावीन्य दिसतें. त्यांच्या पदरचनेवर शिवदिनकेसरींच्या वाणीची छाया पडली आहे. बुवांचा 'ज्ञानसागर' नांवाचा ३१५ ओव्यांचा एक आध्यात्मिक ग्रंथ असून त्याच्या समाप्तींत त्यांनीं स्वचरित्र आणि गुरुपरंपरा दिली आहे.

या काळांत महाराष्ट्राप्रमाणें महाराष्ट्राबाहेरहि काव्यवल्ली वाढीस लागलेली दिसते. विशेषतः तंजावरकडील कांहीं कवींचा परिचय करून दिल्यावांचून हें प्रकरण संपवितां येणार नाहीं. तंजावरचें मराठी राजघराणें विद्याकलांचें मोठें होतें हें आपण मागें पाहिलेंच. या घराण्यांतील अखेर अखेरचा राजा शरफोजी ( शके १७२० ते ५५ ) याची कारकीर्द अनेक दृष्टींनीं महत्वाची झाली. गादीवर आल्यानंतर दुसऱ्याच वर्षी म्हणजे शके

१७२१-त त्यानें ईस्ट इंडिया कंपनीशीं तह करून मांडलिकत्व पतकरलें व आपलें लक्ष राजकारणांतून काढून सांस्कृतिक विकासाकडे लाविलें. स्वीडिश मिशनरी स्वार्ट्झ् याच्या तालमींत तयार झालेल्या शरफोजीनें शके१७२७-मध्यें तंजावरास देवनागरी ठशांचा एक छापखाना काढला. इतकेंच नव्हे, तर मानवदेहाचा एक सांगाडा, एक वायुयंत्र व एक विद्युत्यंत्र अशा नवलाईच्या वस्तूंची जोड आपल्या अजबखान्यास त्यानें करून दिली. नाना तऱ्हेचीं फुलें व फुलपांखरें गोळा करण्याचा नादहि त्यास होता. इंग्रजी भाषा तो सफाईनें बोलूं शकतो अशा अर्थाचा अभिप्राय लॉर्ड व्हॅलेंटाइन यांनीं आपल्या प्रवासवृत्तांत नमूद करून ठेविला आहे. तात्पर्य, शरफोजी हा जरी पेशवाईअखेरच्या काळांत नांदत असला तरी त्याच्या मनावर व बुद्धीवर झालेले संस्कार इंग्रजी वळणाचे होते.[1] पण आश्चर्याची गोष्ट ही, कीं शरफोजीनें जें वाङ्मय निर्माण केलें तें सर्व जुन्या वळणाचें आहे. त्याच्या नांवावर कुमारसंभवचंपु या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ, संस्कृतांतील सुप्रसिद्ध नाटकाच्या आधारें रचिलेली मुद्राराक्षसकथा, कांहीं मराठी नाटकें व गजशास्त्रभाषाप्रबंध हा एक भाषांतरित ग्रंथ एवढें वाङ्मय आढळतें. ज्या पेशवाईअखेरच्या काळांत महाराष्ट्र पवाडे आणि लावण्या यांच्या रंगांत नादावून गेला होता त्याच काळांत खालीं दक्षिणेंत तंजावर येथें मराठ्यांचा अखेरअखेरचा राजा शरफोजी आपली जुनी परंपरा टिकवून तिला इंग्रजीं संस्कृतीचा उजळा देऊं पहात होता हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. दुर्दैवानें तंजावरचें राज्य शरफोजीच्या पश्चात् लौकरच खालसा झालें आणि दोन संस्कृतींचा संगम करण्याचा त्याचा हा प्रयत्न तेथेंच थांबला. असो. या काळांतील तामीळनाडांतील एका महाराष्ट्रीय कवयित्रीचा परिचय आपण येथेंच करून घेऊं. या कवयित्रीचें नांव **मीनाक्षीअम्मा** ( श. १७२२–१७७२ ). ही सुप्रसिद्ध माधवस्वामींच्या नातवाची म्हणजे वासुदेव पंडिताची बायको व एकनाथांच्या नातवाची नातसून. वासुदेव पंडित हे कुंभकोणजवळ तिम्मगुडी येथें राहत.

---

१. आपला विद्यागुरु फा. श्वार्टझ् याच्या मृत्यूनंतर शरफोजीनें त्याच्या स्मृतीवर जें कवन इंग्रजी भाषेंत रचिलें आहे त्यांतील कांहीं भाग पुढें देतों–

Firm was thou, humble and wise,
Honest, pure, free from disguise ....
Blessing to Princes, to people, and to me;
May I, my father, be worthy of thee,
Wisheth and prayeth thy Sarbojee.

मीनाक्षीअम्मा ही सदा काव्यमग्न असे म्हणून तिला ' मंत्रवादीण ' म्हणत. मोरोपंतांप्रमाणें ती कोळशानें भिंतीवर सहज सुचलेले काव्यचरण लिहून ठेवी. मात्र स्वतःची कविता ती नवऱ्याच्या नांवानें रचते. तिच्या एका पदांत सवंगड्यांच्या लावून खोचून बोलण्यांनीं कोमेजून गेलेल्या आपल्या कृष्णफुलास यशोदा वात्सल्यानें जवळ घेते आणि म्हणते—

कोणें गांजियलें सांग कुवलयदळ श्यामा ।। धृ० ।।...
मुक्ताहार एकावळि पडिला कां गुंता ।
वैजयंति विखुरलि कां सांग रमानाथा ।।...
म्लान दिसे वदनचंद्र नेत्र दिसति लाल ।
कज्जलजल गळुनि मलिन दिसति तव कपोल ।।
कोण गडी उणं उत्तर बोलियले तुजला ।
शिक्षण मी त्यांलागुनि सांग रमालीला ।।
' पुत्र तुझा नव्हे म्हणवुनि गडि बोलति मजला ।
ऐकताचि वचन असे जळ श्रवलें डोळां ' ।।
धांवुनि हरि मिठि घाली जननीचे कंठीं ।
स्फुंदत अति जननीप्रति सांगत गुजगोष्टी ।।
सांतवोनि श्रीहरिसी अमित सुखविं जननी ।
गडि सकळहि अनृत तुज वदति चक्रपाणी ।।
सुंदर तूं श्रीमंत म्हणुनि गडि करितिल हेवा ।
जननि तुझी मीच सत्य जाण वासुदेवा ।।

हें करुणरम्य गीत ऐकून कोणत्या सांसारिकाचे डोळे ओलावणार नाहींत ! या कवयित्रीनें 'हळदेउटन' या नांवाचीं कांहीं सौभाग्य-गाणींहि तिकडील पद्धतीप्रमाणें रचिलीं आहेत.

शुभरायबुवा[1] [ मृत्यु शके १७४२ ] हे कवि मूळचे बंगळूरचे. त्यांची जात ब्राह्मण आणि भाषा कानडी. टिपू सुलतानाच्या पदरीं ते कांहीं काळ नायब दिवाण म्हणून असावेत. पुढें कांहीं कारणानें शुभराय विरक्त झाले आणि सर्वसंगपरित्याग करून भ्रमंती करीत करीत सोलापुरास येऊन राहिले. सध्यांचा सोलापुर येथील बुवांचा मठ त्यांच्या हयातींत म्हणजे शके १७०७-मध्यें बांधला गेला. मठांतील पांडुरंगाची मूर्ति वालुकामय असून बुवांना ती पंढरीस चंद्रभागेच्या पात्रांत स्वयंभू स्थितींत लाभली असें परंपरा सांगते. दुसरे बाजीराव पेशवे बुवांच्याकडे चालून आले होते, परंतु बुवांची निःस्पृहता ढळली नाहीं. रमावल्लभदासांच्या वंशांतील हरिपंततात्या राळेरासकर, शाहीर रामजोशी आणि शुभरायबुवा ही मंडळी

१. 'श्रीशुभराय महाराज यांचें चरित्र आणि पदें ' (वि. न. जक्कल)

समकालीन असून एकाच गांवांत राहत. साहजिक त्यांच्या भेटीगांठी नित्य होत असाव्या. ' इटातटानें पटा रंगवुनि जटा धरिसिं कां शिरीं...... ' ही प्रसिद्ध लावणी रामजोशांनीं शुभरायबुवांना अनुलक्षून रचली असा प्रवाद आहे. दोघांचे संबंध खरोखर कसे होते तें कळण्यास मार्ग नाहीं. अध्यात्म, चित्र, गायन आणि काव्य अशा चार कला शुभरायांना अवगत होत्या. त्यांनीं काढलेलीं चित्रें अद्यापि मठांत आहेत. मातृभाषा कानडी असूनहि बुवांनीं चांगलीं दीडदोनशें पदें मराठींत रचिलीं आहेत. पदांचे विषय पारमार्थिक असून रचना ठाकठिकीची वाटते. प्राचीन मराठी काव्य बुवांच्या वाचनांत चांगलें असावें. कारण तेंच त्यांच्या मुखांतून पुनः एकवार आलें आहे. नावीन्य अर्थात् नाहीं. पण गोडी आहे. विशेषतः,

' अंत त्या सुखासि नसे म्हणुनि म्हणति संत रे ।
घडे यापरि जेव्हां स्वरूपीं सत्वाचा एकांत रे ॥ '...

यासारखीं त्यांचीं पदें लोकप्रिय झालीं असलीं पाहिजेत.

पेशवाईअखेरील कवींत **निरंजन रघुनाथ** (शके १७०४ ते ७७) यांचाहि उल्लेख करणें अवश्य आहे. मूळचे हे बालाघाट प्रांतांतील कळंबचे अवधूत श्रोत्री. पुढें गुरूपदेश झाल्यावर निरंजन या नांवानें प्रसिद्धीस आले. पूर्वायुष्यांत त्यांनीं कांहीं दिवस पुण्यास नोकरी केली, पण लौकरच ठाकुरदासांचें हरिकीर्तन ऐकून ते विरक्त झाले, आणि सेवाधर्म टाकून परमार्थाकडे वळले. पुढें ते मिरजेस श्रीमंत गंगाधरराव पटवर्धन यांच्या आश्रयास येऊन राहिले होते. शके १७७७-त त्यांनीं कृष्णानदींत जलसमाधि घेतली. यांचे समग्र ग्रंथ अलीकडे छापून निघाले आहेत.[1] ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर निरंजनांनीं 'पद-बोधिनी' या नांवाची गद्य टीका[2] रचिली असून या काळांतील मराठी गद्याचा तो उत्तम नमुना आहे. ही टीका रहस्योद्ग्राही पद्धतीनें केलेली असून तिच्या शेवटीं टीकाकार म्हणतात–

" हे श्रीगुरु ज्ञानोबा, तुम्हीं कृपा केली म्हणोन हे टीका जाली. नाहीं तर खुंटली होती मति माझी ... मूळचा ग्रंथ परम दुर्बोध, त्याचें व्याख्यान करावयाचें माझें सामर्थ्य नाहीं. परंतु मनांत फार हौस जे या अनुभवामृताचा अर्थ आपणास कळावा. याजकरितां श्रीअळंकापुरीं जाऊन लेंकरासारिखें रडून प्रार्थना श्रीज्ञानेश्वरपदीं केली, त्याजवरून या ग्रंथावरि टीका करण्याविषयीं स्वप्नांत प्रसाद जाला. अस्तु. आपण आपणास अर्थ कळावयासाठीं लिहिता जालों. "

---

१. ' श्रीनिरंजन रघुनाथांचे ग्रंथ, ' संपा. य. व्यं. कोल्हटकर.
२. प्रकाशक का. म. थत्ते, ( शिळाप्रेस, इ. स. १८८२ ).

त्यांची 'केनोपनिषदावरहि अशीच एक गद्य टीका आहे. 'आत्म-बोध प्रकाशिनी' ओवीबद्ध असून ती कृष्णातीरीं वडुथग्रामीं शके १७३८-त सिद्ध झालेली दिसते. 'स्वात्मप्रचीति' आणि 'साक्षात्कार' हीं अनुक्रमें पांच व सात अध्यायांचीं प्रकरणें असून त्यांत पुण्याची नौकरी सोडल्यापासून तों गिरनार पर्वतावरील दत्तसाक्षात्कारापर्यंतचा स्वामींचा वृत्तांत आला आहे. साहजिकच हीं प्रकरणें आत्मचरित्रात्मक असून मोठीं प्रेमळ व रसाळ उतरलीं आहेत. ठाकुरदासांचें कीर्तन ऐकून विरक्त झालेला हा अवधूत देवाकरितां वणवण भटकूं लागला तेव्हां त्याच्यासंबंधीं लोक काय बोलत तें पहा—

> 'एक म्हणती झाला वेडा । एक म्हणती निःसंग उघडा ।
> एक म्हणती बुद्धि प्रौढा । वेडा कैसा म्हणावा ॥
> एक म्हणती मंत्र चळला । एक म्हणती भांग प्याला ।....
> लोक म्हणती वेड्यासि वेडा । भेटी कां जैसी दगड दगडा ।...'
> (स्वात्म. १–८८ ते ९८)

परंतु जननिंदेबरोबर अवधूताची देवभक्ति उलट वाढतच गेली, आणि तिचा कळस गिरनार पर्वतावर झाला. याशिवाय 'केशवचैतन्य-कथातरु' हा ग्रंथ व तीनचारशें पदें निरंजन रघुनाथाचें नांवावर आहेत.

## अभ्यासाचीं साधनें

शं. श्री. देव : नरसोबा आत्माराम (श्रीसांप्रदायिक विविध विषय, खं. २, क्र. ७८–७९).
शं. श्री. देव : जयरामजजांकित (भाइसंमं. पंचम संमेलन वृत्त).
द. वा. पोतदार : जयरामजजांकित (भाइसंमं. त्रै. ३–१).
ग. न. देशमुख : श्रीजयराम महाराज यांचें चरित्र.
रा. कृ. देशपांडे : श्रीमौनीचरितामृत (मुंबई, शके १८५८).
व्ही. श्रीनिवासचारी : Maharaja Serfoji-the Scholar Prince. (Journal, Saraswati Mahal Library, Tanjore, Vol. I, No. 2)
Hickey : Tanjore Maratha Principality.



## थोडी दुरुस्ती, थोडी पुस्ती—

'महाराष्ट्र-सारस्वता' च्या पुरवणीचें काम छापखान्याच्या निकडीमुळें अतिशय घाईनें उरकावें लागलें. त्यामुळें कांहीं महत्त्वाचे उल्लेख अनवधानानें राहून गेले, ते मुख्य पुरवणीस आणखी एक छोटी पुरवणी जोडून आम्ही पुढें करीत आहों. मूळ सारस्वतांतहि कांहीं ठिकाणीं ग्रंथ व ग्रंथकार यांचे निर्देश मागेंपुढें झाल्यानें व सारस्वताची प्रस्तुत चतुर्थ आवृत्ति ही ज्या तृतीय आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे ती तृतीय आवृत्तिहि जशी निघावी तशी न निघाल्यानें 'पुरवणी' सदोष होणें स्वाभाविक होतें. आत्मसमर्थन करणें नाहीं, परंतु कांहीं दोष जसा आमचा तसा कांहीं मूळ ग्रंथाच्या तृतीय आवृत्तीचा हें नाकबूल करतां येणार नाहीं. असो. मुख्य पुरवणीस जी पुस्तीदुरुस्ती करणें अवश्य वाटते ती अशी—

( १ ) ज्ञानेश्वरपूर्वकालांत कोणा ब्रह्मदेव नांवाच्या कवीनें 'शैवशक्ति' किंवा 'शैवशास्त्रसंग्रह' या नांवाचा ग्रंथ रचिला असल्याची माहिती सरदार चंद्रचुडांच्या दप्तरांतील एका बाडांतील पुढील उल्लेखावरून मिळते—"शैवशक्ति ग्रंथवर्णन ब्रह्मदेव ज्ञानदेव याचे पुर्वि आळंदीचे केले ॥ अळंकावतीचे केले." संशोधकांनीं या ब्रह्मदेवाचा शोध घ्यावा.

( २ ) सारस्वताच्या द्वितीय आवृत्तींतील महानुभावविषयक मजकूर सारस्वतकारांनीं, ज्यांचें छायाचित्र प्रस्तुत आवृत्तीच्या प्रारंभीं जोडलें आहे, त्या महंत श्रीदत्त लक्षराज यांजकडे अभिप्रायार्थ पाठविला होता. त्यांचें कै. भावे यांना याबाबत जें उत्तर आलें त्यांतील कांहीं भाग महानुभाव महंतांचें अधिकृत म्हणणें सर्वांना कळावें या बुद्धीनें पुढें देत आहों.

"स्वस्ति श्री विद्यार्णव रा. रा. विनायक लक्ष्मण भावे यांस अनेकधा जय श्रीकृष्ण. तुम्हीं लिहिलेला ग्रंथ पाहिला. त्यांतील महानुभाव धर्मासंबंधीं लिहिलेल्या मजकुरासंबंधीं माझें म्हणणें पुढीलप्रमाणें आहे.

१. महानुभावी लोक चातुर्वर्ण्य मानितात.

२. वेदांतील हिंसेचा भाग आम्हांस मान्य नाहीं. बाकी भाग आम्हांस पूज्य आहे. श्रीकृष्ण परमात्म्यास आम्ही मानतों. त्याच्या नकलेस आम्ही मानीत नाहीं.

३. आश्रमव्यवस्था आम्हांस मान्य आहे.

४. विठ्ठलादिकांना आम्ही ईश्वर समजत नाहीं.

६. कृष्णभटांनीं काढलेल्या पंथाशीं महानुभाव पंथाचा संबंध नाहीं. तो पंथ ' मातंगी भटपंथ ' या नांवानें मोडतो व तो भिन्न आहे.

८. आमच्या ग्रंथांच्या लिपीची मोड सद्भाविकांना दाखविण्यास आमची हरकत नाहीं. तुम्हीं हा महाराष्ट्र–सारस्वत ग्रंथ शुद्ध मनानें लिहिला आणि सत्य जाणण्याची तुमची इच्छा आहे असें दिसल्यावरून या लिपीची मोड तुम्हांस कळवितों.

ता. २–६–१९१९ इ. ( सही ) महंत श्रीदत्त-लक्षराज कवीश्वर महानुभाव.

(३) ' १६ व्या शतकांतील कांहीं कवि ' या प्रकरणास जोडलेल्या पुरवणींत आम्हीं गोंव्याकडील ख्रिस्ती कवि फा. थॉमस स्टीफन्स याजविषयीं विस्तारानें लिहिलें आहे. तो मजकूर लिहिल्यानंतर सारस्वताच्या द्वितीयावृत्तीस कै. भावे यांनीं जोडलेलें परिशिष्ट आमच्या वाचनांत आलें व त्यावरून पाहतां सारस्वतकारांनीं या परिशिष्टांत फा. स्टीफन्सविषयीं भरपूर माहिती दिल्याचें आढळून आलें. आमच्यासमोर सारस्वताची तृतीय आवृत्ति होती व तिच्यांत वरील मजकूर नसल्यानें फा. स्टीफन्सविषयीं पुरवणी जोडणें आम्हांस भाग पडलें. पुरवणी हवीच होती, कारण सारस्वताच्या प्रस्तुत चतुर्थावृत्तींत वरील मजकूर नाहीं. तेव्हां पुरवणींत फा. स्टीफन्सच्या ' क्रिस्त पुराणा'चा परिचय करून देणें हें आमचें कामच होतें व तें आम्हीं केलें. वाईट इतकेंच वाटतें, कीं या प्रकरणीं आमचे हातून सारस्वतकारांस न कळत पण विनाकारण बोल लागला. कारण फा. स्टीफन्सविषयीं आम्हीं पुरवणीच्या रूपानें जें लिहिलें तें सारस्वतकारांनीं द्वितीयावृत्तीच्या परिशिष्टांत अगोदरच लिहून ठेवलें होतें. आम्हास मात्र त्याची कल्पना नव्हती. बाकी सारस्वतकारांचे पश्चात् त्यांच्या ग्रंथाची तृतीय आवृत्ति काढणाऱ्या मंडळींनीं स्वतः ग्रंथकारानें द्वितीयावृत्तीस जोडलेल्या परिशिष्टांतील महत्त्वाचा भाग तेवढा गाळून टाकावा हा प्रकार म्हणजे संपादनाचा एक अजब नमुनाच म्हटला पाहिजे ! असो. जें झालें त्यास इलाज नाहीं.

( ४ ) ख्रिस्ती ग्रंथकारांप्रमाणें मुसलमान ग्रंथकारांनीं निर्माण केलेल्या महाराष्ट्र भाषेंतील सारस्वताचे उल्लेख मूळ ग्रंथांत एक दोन ठिकाणीं आले आहेत. एतत्प्रकरणीं सारस्वतकारांनीं दिलेल्या माहितींत थोडी भर घालणें आज शक्य आहे. प्रथम उल्लेख विजापूरचा सुलतान इब्राहिम अदीलशहा याचा केला पाहिजे. याचा ओढा हिंदुधर्माकडे असून त्याचीं जीं फर्मानें उपलब्ध होतात त्यांजवर ' श्रीसरस्वती ' हीं अक्षरें बहुधा आढळून येतात. शके १५१०-च्या सुमारास त्यानें विजापूरच्या किल्ल्यांत एक संगीतमहाल बांधून तेथें सरस्वतीची स्थापनाहि केली होती. या

इब्राहिम अदिलशहानें कांहीं मराठी कविता रचिली होती व तिचें बाड विजापूर येथील बांगी मिया शमसुद्दीन वल्लद यांजपाशीं होतें असें श्री. चांदोरकर लिहितात. दुसरा उल्लेखनीय मुसलमान ग्रंथकार **हुसेन अंबर** हा होय. यानें रचिलेली एक ओवीबद्ध गीताटीका उपलब्ध असून ती 'अंबर हुसेनी' या नांवानें ओळखली जाते. हिला टीका म्हटण्यापेक्षां समओवी म्हणणें अधिक बरोबर होईल. कारण मूळ गीतेंतील सातशें श्लोकांवर हुसेन अंबर यानें ८१६ ओव्या रचिल्या आहेत. म्हणजे प्रत्येक श्लोकास एक ओवी असें प्रमाण स्थूलमानानें पडतें. रचना सामान्य आहे. प्रारंभीं गणेश-शारदा व सद्गुरु यांना वंदन केलेलें आढळतें हें तिचें वैशिष्ट्य होय. अंबरखान हें या ग्रंथकाराचें उपनाम असून अंबर—याकूत—हुसेनी याप्रमाणें त्याची वंशपरंपरा आहे. ही गीताटीका त्यानें शके १५७५-मध्यें रचिली असून यापूर्वीं रचिल्या गेलेल्या अच्युताश्रम व निवृत्तिनाथ यांच्या समओवी टीकांतून संपूर्ण श्लोकार्थ उघड न झाल्यानें आपण ही नवीन समओवी शंकराचार्यांचें भाष्य व श्रीधरस्वामींचें व्याख्यान पाहून लिहीत आहों असें हुसेन अंबर म्हणतो. यावरून तो चांगला व्युत्पन्न असावा असें वाटतें. **अलमखान** हा मुस्लीम कवींपैकीं आणखी एक असून त्याचा परिचय सरदार मुजुमदार यांनीं करून दिला आहे.[2] या कवीचा काळ निश्चितपणें कळत नाहीं, परंतु त्याची भाषा दोनअडीचशें वर्षांमागील दिसते. याचा गुरु कोणी नागेश्वर म्हणून असावा. या अलमखानाचें 'मन' या विषयावरील एक पद पुढें देतों—

मन हा बहुरंगी । चाळक तिहीं जगीं ॥ धृ० ॥
संकल्प विकल्प करी मन । चेष्टवि विषयालागि ॥
मन छळले सिद्ध संन्यासी । नाथपंथी मुनी योगी ॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर । नाचती मनासंगी ॥
मन आपणाते पर्तुनि पाहिलें । मग जाला बैरागी ॥
**अलमखान** म्हणे विनती । ऐक मना गुरुचरणीं लाग वेगी ॥

हे व शेख महंमद, शेख सुल्तान, जिंदो फकीर, दादु पिंजारी, शाहा बेग वगैरे ज्ञात व अज्ञात असे एकूण पांचपन्नास मुसलमान कवि मराठी भाषेंत काव्यनिर्मिति करीत असें दिसतें. परंतु यांपैकीं बहुतेक सर्व कवि विठ्ठलभक्त असल्यानें भागवतधर्मीय संतकवींचें अनुकरण करून लिहिलेली त्यांची कविता मराठी भाषेंत असली तरी तींत मुसलमानांच्या

---

१. कवि इब्राहिम अदिलशहा ( माइसंमं. त्रै. वर्ष ६, पृ. १७२ ).
२. अलमखान ( माइसंमं. इति. शके १८३७, पृ. २७९ ).

चालीरीतींचें व संस्कृतीचें प्रतिबिंब पडलें नसल्यानें ही मुसलमानांची जातीय कविता होय असें म्हणतां येणार नाहीं. किंबहुना या कवितेंतील कवीची नाममुद्रिका काढून टाकली तर ती मुसलमानी कविता आहे हें कळूनहि येणार नाहीं. इतकी ती हिंदु वळणाची आहे. अर्थात् हें मुसलमानांचें जातीय साहित्य नव्हे. त्यासाठीं कांहीं मुस्लीम कवींनीं हिंदु शाहिरांचें अनुकरण करून मोहरमच्या सणांत 'करबल'मध्यें म्हणण्यासाठीं म्हणून ज्या 'रिवायती' रचिल्या आहेत त्या पाहिल्या पाहिजेत. या रिवायती रचणाऱ्या कवींत अबदुल, महंमद हानिफ, आबालाल, दारा, फतिशा, शेख मिराजी, जोव्हारशा, करीम, कासम वगैरे सुमारें वीसएक कवि असून त्यांच्या रिवायतींचा परिचय अलिकडे पै. शिकंदरलाल अतार यांनीं करून दिला आहे. या रिवायती म्हणजे नानाप्रकारच्या चालींवर रचिलेलीं पद्यें असून तीं मोहरमच्या 'करबल'मध्यें म्हणजे मेळ्यांतून म्हटलीं जातात. अली खलिफांचे पुत्र व महंमद पैगंबराचे नातू हसन-हुसेन यांनीं करबलच्या रणक्षेत्रावर यजदाशीं जंग करून धारातीर्थीं देह ठेवला त्याचें वर्णन या रिवायतींतून येत असल्यानें त्या करुण व वीर या दोन रसांनीं परिपूर्ण असतात. अरबी भाषेंत या रणसंग्रामाचें यथातथ्य वर्णन करणारें 'जंगनामा' म्हणून एक काव्य आहे व त्याच्या उर्दू भाषांतरावरून महाराष्ट्रीय मुसलमान कवींनीं या रिवायती रचिल्या आहेत. या कवनांतून मुसलमानी आणि मराठी अशा दोन्ही भाषांची खिचडी दिसत असली तरी इतिहास व धार्मिक आणि सामाजिक चालीरीती यांच्या अभ्यासकांस रिवायतींचें महत्त्व फार आहे. करुण आणि वीर या दोन रसांचा परिपोषहि त्यांत चांगला झालेला अनुभवास येतो. पैकीं गरीब अबदुल या नांवानें कवित्व करणाऱ्या एका कवीच्या दोन रिवायती पुढें देतों. हा 'गरिब अबदुल' कोणा राजे भास्कराचा आश्रित असावा असें दिसतें. पहिली रिवायत सलामीची असून दुसरींत हसन व हुसेन यांच्या आईचा पुत्रशोक व्यक्त झाला आहे.

प्रथम सलाम सर्वांला ॥ लहान थोर साऱ्या सभेला ॥ चित्त देऊन ऐका ह्याला ॥ सत्तगुरुच्या वचनाला ॥ १ ॥ फकिर झालों मि मोहरमचा ॥ प्रवरते शाहे हुशेनीचा ॥ निवरति आहे निरंजनाचा ॥ फकीर मी सात दिवसाचा ॥ २ ॥ घालून विरशाचा लंगोटा ॥ घेउन हिंमतीचा हातीं सोटा ॥ ध्यान नामाचा आहे मोठा ॥ भक्ति जपमाळ घेऊन बोटा ॥ ३ ॥ ... सयलि आमुची पंचरंगी झोळी हाजार ठिगळाची ॥ लाऊनि राख दर्शनाची ॥ धुनि लाविली मीं पंची ॥ मी पंची केली धुनी ॥ ४ ॥

मोडून घेतल्या सात शेनि ॥ पंच राख करूनिया अगनी ॥ निरंकार पेटलि धुनी ॥ ५ ॥ इरादा एक आहे अमुचा ॥ निघुन करबला जाण्याचा ॥ हुकुम घेऊन नबाबाचा ॥ अंतरि भेद समज ह्याचा ॥ ६ ॥ गरिब आबदूल असे म्हणि ॥ घ्यावे गुरुपुत्र समजोनि ॥ आरे लेकाच्याहो मैदानि ॥ येऊ आला वा खेळुनि ॥ ७ ॥

रंगित पाळना हौसन केला रेसमी दोऱ्यां लाउनी त्याला ॥ माझा झुलनार निघुन गेला ॥ आता हालऊन बघुं कुनाला ॥ १ ॥ माझ्या बाळाची हैास मोठी ॥ दागिना मोडून केलि पेटी ॥ माझा झुलनार निघुन गेला ॥ आता हालऊन बगु कुनाला ॥ २ ॥ आंगडे टोंपडे आसगराला ॥ पिंपळपान शोभे कपाळाला ॥ माझा लेनार निघून गेला ॥ आता हालऊन बगु कुनाला ॥ ३ ॥ आसगर माझा लहान होता ॥ पौर्णिमेचा चंद्र दिसत होता ॥ माझा झुलनार निघुन गेला ॥ आतां हालऊन बगु कुनाला ॥ ४ ॥ पोक्त रिवायत गमाचि झाली ॥ गरिब आबदुल यानें केलि ॥ राजे भास्कराची दया झाली ॥ गरिब आबदुल यानें केलि ॥ ५ ॥

( ५ ) शिवराम म्हणजेच उद्धवः—२० व्या प्रकरणास जोडलेल्या पुरवणींत आपण एक समर्थशिष्य व त्याचें डफगाणें यांची ओळख करून घेतली आहे. ही पुरवणी लिहिल्यानंतर ‘ रामदासी संशोधना ’च्या प्रथम खंडांतील टांकळी संग्रहास श्री. देव यांनीं लिहिलेली प्रस्तावना पुनः एकवार वाचली तेव्हां कळून आलें, कीं हें डफगाणें रचणारे शिवराम म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून समर्थांचे पहिले शिष्य उद्धवस्वामी हेच होत. उद्धवांचे मठ दोन; एक टांकळीचा व दुसरा तेलंगणांतील इंदुर-बोधनचा. पैकीं टांकळी मठांतील उद्धवस्वामींचा कवितासंग्रह पाहतां ते शिवराम या नांवानेंहि ओळखले जात हें कळून येतें. समर्थांच्या पश्चात् दिवाकर आणि उद्धव यांच्यांत जो तंटा झाला त्यांतील उद्धवांची बाजू या संग्रहांत त्यांच्या मुखानें ऐकावयास मिळते.

( ६ ) एकनाथ–पंचकांतील जनीजनार्दनांचा परिचय आपण मागें करून घेतलाच आहे. या कवीविषयीं श्री. अनंतदास रामदासी अधिक माहिती देतात ती अशीः—“ या कवीचें मूळ नांव जनार्दन. जनी किंवा जनाबाई हें त्याच्या आईचें नांव. मातृभक्त असल्यामुळें आईचें नांव आपल्या मागें जोडून ‘ जनीजनार्दन ’ झाले. यांचें आडनांव देशमुख. भूम ही त्यांची जन्मभूमि. शेवटीं बीड येथें सहकुटुंब राहूं लागले. जनी-जनार्दनांस एक मुलगा व पांच नातू होते. नातू पुढें वेगळे होऊन एका समायिक आंगणाच्या पांच घरांत राहूं लागले. या ‘पाचांगणा’चेंच पुढें

'पाटांगण' झालें (?). जनीजनार्दनांचा मुलगा त्यांच्या हयातींतच काशीस वारला. त्यानंतर त्यांनीं भूम येथें म्हणजे आपल्या जन्मभूमीस येऊन देह ठेवला. भूम येथील त्यांच्या समाधीवर 'श्रीमंत्रमूर्ति ढुंढिराज' असा गणपतिदर्शक उल्लेख आहे. गिरिधरकृत 'समर्थप्रतापां'तील 'ढुंढि जनार्दन ढुंढिराजयातें' हा उल्लेख त्यांचाच असावा. जनीजनार्दन गाणपत्य होते हें प्रसिद्धच आहे. त्यांचे वंशज बीड येथें आहेत." (श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, इ. खंड, ६).

(७) पुरवणींत कांहीं ठळक ग्रंथांचा परिचय करून देण्याचें राहून गेलें, तो पुढें करून देत आहों. पैकीं, मराठी 'पद्मपुराण'[1] रचणारा **पंडित दामोधर** नांवाचा महानुभाव कवि उपाध्ये आम्नायांतील सेवलेकर वंशांतील असून १५-व्या शतकांत तो काव्यरचना करीत होता. हें पद्मपुराण त्यानें कोणत्या संस्कृत ग्रंथाच्या आधारें रचिलें तें समजत नाहीं. 'संस्कृत पूर्वीचें । तें मऱ्हाठी बोलवों वाचे' असें कवि म्हणतो; पण त्यानें वर्णिलेला कथाभाग संस्कृतमधील सुप्रसिद्ध पद्मपुराणाहून निराळा आहे. यादव-कालांतील नरेंद्रकृत 'रुक्मिणीस्वयंवरां'त आढळणारा कल्याणकीर्ति-किन्नर—वृत्तांत मात्र या पद्मपुराणांत दिसावा ही गोष्ट महत्वाची आहे. या कथा-भागाच्या ओव्या दामोधर पंडिताच्या प्रस्तुत काव्यांत पुढीलप्रमाणें आहेत.

'मागां वेदघोका श्रापु घडला । तो कीनरु वनीं जाला ।
कल्याणकीर्तीनं देखिला । तो आला कौंडन्यपुरा ।।
तो बंदीजन नागारीं । राय वर्निले परोपरी ।
परी दुषन ठेवीली निर्धारीं । समस्त रायासी ।।
कीनरु वर्णी गोपाळा । म्हने श्रीकृष्ण परब्रह्माचा पुतळा ।
तो रुक्मिणी बाळा । वरीजे ।।' (ओ. २२६९ ते ७१).

म्हणजे १३-व्या शतकांतील नरेंद्रकवि व १५ व्यांतील पंडित दामोधर या दोघांनींहि वरील कल्याणकीर्ति—किन्नर प्रसंग एकाच पद्मपुराणांतून घेतला व हें पद्मपुराण संस्कृतमधील सुप्रसिद्ध पद्मपुराणाहून भिन्न असावें. तेव्हां प्रो. कोलते[2] म्हणतात त्याप्रमाणें महानुभाव पंथाचें एकादें वेगळेंच पद्मपुराण असावें व त्याचा आधार या पंथीय कवींनीं घेतला असावा. बाकी हें मराठी पद्मपुराण पंडित दामोधरानें केवळ महानुभाव पंथाच्या मतप्रतिपादनासाठींच रचल्याचें स्पष्ट दिसतें. दशावतारांत श्रीकृष्णावतार सर्वश्रेष्ठ असून त्याच्या 'सन्निधानानें'च मोक्ष मिळतो असें कवीचें सर्वत्र

१. अप्रकाशित. (हस्तलिखित पोथी श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयांत आहे).
२. रुक्मिणी स्वयंवर' (नरेंद्रकृत), प्रस्तावना, पृ. २५.

सांगणें आहे. या मराठी पद्मपुराणाची भाषा अशुद्ध असून ग्रंथ सामान्य वाटतो.

मुद्गलदादोसुतकृत 'जैमिनी भारता'चाहि परिचय करून देण्याचें मुख्य पुरवणींत राहून गेलें. यांत मुख्यतः अश्वमेधपर्वांतील कुशलवोपाख्यान आलें असून त्याचा रचनाकाल शके १५०० व रचनास्थळ 'मुचकुंदेच्या तीरावरील सौभाग्यनाम नगरी' असें आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या साडेतीन हजारांचे वर असून त्यांत एकूण २७ प्रसंग आहेत. या कवीच्या गुरूचें नांव नृसिंह व त्याची जोड आपणांस आपली आई काशी हिच्यामुळें झाली असें त्यानें कृतज्ञतापूर्वक म्हटलें आहे. त्याचें काव्य वरच्या दर्जाचें असून त्यांतील रूपकपद्धति एकनाथी वळणाची आहे. ग्रंथाच्या समारोपांत ही पद्धति विशेष रीतीनें अनुभवास येते. तेथें आपल्या मनोभूमिकेवर क्षेत्राचें रूपक करून कवि म्हणतो-"माझ्या षड्विकारयुक्त क्षेत्राचा अंगिकार करून सद्गुरूनें त्याला ज्ञानाग्नि लावून दिला व त्यायोगें सर्व तृणाची होळी केली, वैराग्याची कुऱ्हाड घालून कामक्रोधांचे वृक्ष तोडले, मग बोधाच्या नांगरानें हें शेत त्यानें नांगरलें, त्यांत साहजिकच आशातृष्णा चूर्ण झाल्या, कामनेच्या गर्ता बुजल्या, व अशा रीतीनें विशुद्ध झालेल्या भूमीवर गुरुकृपेची अमृतवृष्टि झाली आणि त्यामुळें त्रिताप पळाले.

पुढें वापसा जाला पूर्णतेचा । पेरा केला ब्रह्मबिजाचा ।
रामकथालक्षणअंकुराचा । उद्भव जाला तये काळीं ॥
पीक पिकलें अपार । सामावितां न पुरे अंबर ।
तेथें रक्षण राहिले स्वानुभवी नर । सावध असती अहोरात्र ॥
निजध्यास गोफणेचे पांगोरे । वेगें फोडिती आनंदभरें ।
झणीं येतील तेथें पाखिरें । आलस्यनिद्रा तेंचि ॥
पुढें रासी जाली अभिनव भारी । सांटवितां न माये ब्रह्मांडोदरीं ।
तेथें वक्ता होऊनिया मापरी । माप करी शक्तीनुसार ॥

सिद्धकविकृत "कृष्णामृतनट" हा अलिकडे उपलब्ध झालेला मराठवाड्यांतील एक अज्ञात ग्रंथ आहे.[१] शके १६६२-च्या सुमारास रचिलेल्या या ग्रंथांत हा सिद्धकवि आपण एकनाथांच्या परंपरेंतील असल्याचें सांगतो —

येका जनार्दन वरदे । चक्रभारार्थ प्रसादे ।
श्रीदत्ताचिया निजबोधें । सिद्ध आनंदें डुल्लत ॥

याहून अधिक माहिती त्याच्याविषयीं मिळत नाहीं. 'कृष्णामृतनट'

१. चित्रमयजगत्, पुणें, वर्ष ३७, अं. ११ (नोव्हेंबर, १९४६).

या ग्रंथाचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असून एकूण ओवीसंख्या ३८,७३२ आहे. ग्रंथांत त्या नाटकी कृष्णाच्या अमृतमधुर लीला वर्णिल्या असल्या तरी त्यांत केवळ कृष्णचरित्रच आलें आहे असें मात्र नाहीं. उलट या ग्रंथाचें स्वरूप थोडें सर्वसंग्राहक आहे. कारण त्यांत कृष्णचरित्राबरोबर भारत-भागवतांतर्गत इतर कथांचाहि समावेश कवीनें केलेला आहे. इतकेंच नव्हे, तर एकनाथांच्या एकादश स्कंधावरील टीकेचा आणि त्यांच्या रुक्मिणीस्वयंवराचा सरळ अनुवादहि त्यांत आढळतो. 'दासविश्रामधाम' कर्ते आत्मारामकवि हे ज्याप्रमाणें रामदासांचे ग्रंथ जसेच्या तसे उतरवून आपला ग्रंथ फुगवितात, त्याप्रमाणेंच हा सिद्धकवि एकनाथांचे ग्रंथ आपल्या काव्यांत संक्षिप्त रूपानें उतरून घेतो. कारणाकारणांनीं कां होईना, पण आपलें हें काव्य. पैसावत चालल्याची जाणीव कवीला आहे, व ती त्यानें मोठ्या चातुर्यानें बोलूनहि दाखविली आहे. तो म्हणतो --

"आधींच हा कृष्णामृतनट जाण। गगनचुंबित विस्तार गहन।
डळमळों लागला आपण। तंव दिधलें टेंकण भागवताचें॥
श्रीकृष्णउद्धव मिळणी। तेचि डिळ दिधली टेंकणी।
येणें ग्रंथासी उभारणी। थाट धरुनी उंचावला॥
या वृक्षाच्या मूळ निर्वाणीं। रामकीर्ति रामायणीं।
खोडक धरलें अवरोनि। तेणें वाड गगनीं उसळे॥
जेर फांद्या जाण भारत। आणिक टालेटोले कथार्थ।
गिरिजे ते जाण पात। यथार्थ या वृक्षाचे॥
या वृक्षाचिये पोटीं। भगवद्गीतेची गाभाटी।
जे भारताचे रणवटीं। देवें किरीटी प्रबोधिली॥"

तात्पर्य, हा ग्रंथ म्हणजे भागवधर्माचा 'दासविश्रामधाम' किंवा एक ज्ञानकोशच आहे. ग्रंथकार मुसल्मानी राजवटींतील असल्यानें त्याच्या भाषेंत फारसी शब्दांचें प्रमाण सपाटून आढळतें. जुन्या मराठी शब्दांबरोबर ताफा, आस्करा, खबर, जहर, मुस्तद, हमेशा, मोईन इत्यादि फारसी शब्द तो सर्रास वापरतांना आढळतो. मुसल्मानी चालरीत त्याच्या अंगीं मुरली आहे असें त्याच्या ग्रंथांतील राजसभांचीं वगैरे वर्णनें वाचतांना पदोपदीं वाटतें.



# सूचि

## अ


अक्षयबोध ६९१
अग्निदास (अज्ञानदास) ७१२
अफजलखानाच्या
वधाचा पोवाडा ७१२-७१४
अग्निपुराण ३३७ (टी)
अग्निहोत्र ५५०
अग्निहोत्री ३३१
अचळपूर (इलिचपूर) ६६
अच्युत अनंत ५१३
अच्युत पंथ ७६, ८५३
अच्युत सी. साठे ८०३
अच्युताश्रम ९४८
अजानवृक्ष २६
अज्ञानदास (अग्निदास) ७१२
अज्ञानसिद्ध नागेश ९२०
अठरा आंकडा ६६४
अडगुळें मडगुळें २१६
अतीत ५३४
अत्रे कोडितकर ३२८
अद्वयानंद ६९१
अद्वैतप्रकाश ३२४
अध्यात्मशास्त्रीं इये अंतरंगाचि
अधिकारिये १४१
अनंतकवि १०५७
अनाजी रंगनाथ मलकरे ७०१
अनाम ६०१
सावकार अख्यान ६०१
अनार्य ६
अनुगीता ९९६
अनुभवलहरी ५९७-५९९
अनुभवशतक ६१८
अनुभवसार ३२४, ४५७ (टी), ५१७
अनुभवानंद २६६
अनुभूतिलेश ४६१
अनेक वृत्तात्मक पद्यरचना-
आद्यमान १०७
अनंत ९७१
अनंत कवि ५२०, ५२२
रामदास स्तुति ५२०
सुलोचना आख्यान ५२०
सुलोचना गहिंवर ५२०
अनंतचतुर्दशी ६२७
अनंततनय (= त्र्यंबक) ६८९
महाभारत, उद्योगपर्व ६९०
अनंत पट २६५
अनंत पंडित - रसमंजरी
महाराष्ट्र संजीवनी,
शृंगार कल्लोलिनी ५०१
अनंतपुत्र १०००
अनंतफंदी (अनंत भवानी

बुवा घोलप-१६६६ )
७०५, ७०९,
७२६, ७३६
अहिल्याबाई भेट ७०७
पवाडे
माधवानिधन ग्रंथ ७०२
सदाशिव माणकेश्वर ७०७
अनंत भुजाची आरती २९६
अनंतमुनि ९५६
अनंत वाल्मिकी रामायण ९९२
अनंत स्वामी ५१७
अन्नपंचक ४३३
अन्वय व्यतिरेक १५४
अन्वयस्थळ ८७६
अपभ्रंश ९, ८३५, ८३६
अपरादित्य १६,३३
अपराधनिवेदन स्तोत्र ६२९
अपरोक्षानुभव ४३६, ९७१
अपरोक्षानुभूति ४७४
अफजलखानाचा पोवाडा ७१२-
७१४
अब्दुल गरीब १०७५
अंबर हुसेनी १०७४
अभिलषितार्थ चिंतामणि ८३८
अभीर ५०५
अमरनाथ संवाद ४४
अमरनाथ हटयोग ३११-३१२
अमृत फाजखां ७६०
अमृतराय ( शंकर ) ६०५-६०९,
८०६ (टी)
अविनाश संदेह हरण ६०६
कटाव ६०८
नानासाहेब पेशवे ६०८
मृत्यु १६७५
अमृतराव ओक – शतमुख
रावण वध ८१४
अमृतानुभव ४४, ४५, १५४,
१५५, २५५, २७२,
३५८, ४३८,८८९
अमृतानुभव टीका १५४, ३५८,
४३८
अमृतानंद ५३७
अवधूतनिरंजन ५३७
कापिलगीता ५३७
स्वरूप निर्णय ५३७
अमृतसर ३२४
अरणभेंडी १८९
अयाचित (पंडित कमलाकर) ९१६
अरणी ५२३
अरणीचा शिपाई ५२४
अराजक १६१, २१३
अर्जदास्त २६७
अर्वाचीन कोशकार ५४
अलमखान १०७४
अलवार १५१
अल्लाउद्दीन खिलजी ९०५
अल्लाउद्दीन शाह बहामनी २५१
अवचितसुत काशी(सोळंखी) ५०७
९९०, १०१२
द्रौपदी स्वयंवरें ५०७

अवधूतगीता ९९२
अवधूतगीताटीका ३२२, ४३८
अवधूतनिरंजन ५३७
कपिलगीता ५३७
अवधूतराज ३०६
अवरखेड ५५२
अवांका ८८४
अश्वचिकित्सा ७८९
अश्वदरी ८४६
अश्वलायन प्रश्नमाला ३६१
अश्वपति ३०९
अश्वमेध २४५, ५१७, ५६७
अश्वमेधाख्यान ९४९
अष्टनायिकाविवाहाचा वृतांत ६४८
अष्टविधा भक्ति ३१५
अष्टविवाह २३४-२३७
अष्टावक्र ५१९
अहमदनगर ४८५
अहल्याबाई ६७५, ७०७

## आ

आऊबाई १७८
आउसा ८६५
आक्काबाई ४१७
आगाशी (शिलालेख) ८४२
आचारपद्धति ८३४
आचारस्थळ ८६९
आज्ञापत्र ७८५, १०५६
आटकमाटक २१६
आण्णाप्पा ९८९
आणोबास ९१३
आंतोनीजी जीवित्वकथा
आत्मचरित्र
कचेश्वर ६१३
गंगाधरशास्त्री पटवर्धन १०५५
नाना फडणीस ७९३, १०५५
निरंजन माधव ६१३
बापू कान्ही १०५५
आत्मप्रकाश ५६९, १०१५
आत्मानुभव ८८९
आत्माराम १०३०
आत्मारामबुवा १०३०
आत्मसाक्षात्कार ९९२
आत्यास्वामी ५६९
आदी १९१
आदिनाथ १३०
आदिनाथ शाहीर ७२६
आदिबावाची १००७
आनेराज ८६९
आनंदतनय (गोपाळ) ५२१
पूतनावध ५२२
राधाविलास ५२२
सीतास्वयंवर ५२२
आनंदमूर्ति बाळंभट
ब्रम्हनाळ्कर (मृत्यु १६४८)
४४२, ५३७, ९७३
आनंदसांप्रदाय ८, ३२१, ३२३, ४३७, ५११, ५१२, ५३९, ५४८, ५६८

आनंदलहरी २६६
आंध्रदेश १२
आपा तांबोळी ७६३
आपेगांव १३०
आप्पासाहेब सांगलीकर ७२७
आबासाहेब मुजुमदार २५४ (टीं)
आंबवडें २१२
आंबिये सोहिरोबा ६९१, ६९२
आंबे जोगाई (मोमिनाबाद) २९७, ८४२
आम्नाय (प्रसिद्ध तेरा) ९१३
आयमुनि ९५६
आयरणी ४४८
आयुर्वेद महोदधी ९१३
आरण्यकें ५
आर्य २, ४, ६,
आर्यागीति ६४३
आर्याभारत ६५६–६६४
आर्याभारतांतील रस ६६०
आर्याभारत व मुक्तेश्वर ६६४
आराध्य (श्रीमुकुंदराज) ८५९
आवडाबाई उभयकर ३५४
आवडाबाई (रमावल्लभदासशिष्या) ९४४
आंवढ्या नागनाथ १६५, १७०, १७५
आवली ३६९
आहिणी ४४८
आळेगांव ७६३
आळंदी १३३, १५८, २६९

इ

इडा ३१२
इतिहास ८८४
इब्राहिम अदिलशहा १०७३
इसापनीति २२४

उ

उखाहरण ९१९
उत्तरमानस ५४३, ५४९
उत्तमश्लोक ५५२, १०१४
उद्योतनसुरि ८३७
उद्धरणपट ७७३
उद्धव ४१३, १०७६
उद्धव (सदाशिव दशपुत्र) ५०२
उद्धवगीता ६८, ८७४
उद्धवचिद्घन (कोकीळ) ६१६
अनुभवशतक ६१७
गीतार्थमंजरी
चरित्रें (नागनाथ, हेमराज, वहिरंभट, गोरा कुंभार, मृत्युंजय)
भक्त कथामृतसार
शुकरंभासंवाद
संतमाला
उद्धवसुत १०३०
उद्धवस्वामी ९८७
(उद्धव मल्हार ठिपसे)
उद्बोधनाथ (मृत्यु १६०९) १४२(टीं), ५८३
उनकेश्वर (शिलालेख) ८४१
उपदेशरहस्य ३२२

उपदेशरहस्य (वेणाबाई) ९७७
उपनिषदर्थप्रकाश ३०६
उपनिषदें ५
उपादान ४६३
उपासना (सगुण व निर्गुण) ३१०
उंबरगांव १२
उंब्रज ५३४
उमामहेशसंवाद ५३७
उमारामायण ६६६
उमाविलास (शिवउमाविलास) ८१३

## ऋ

ऋग्वेद परिशिष्ट १४७ (टी)
ऋतुपर्ण ३४८
ऋद्धिपूर ६५
ऋद्धिपूरचरित्र ८६६
ऋद्धिपूरमाहात्म्य ९५५
ऋद्धिपूरवर्णन २०२, ८८२
ऋषिपंचमी ६२७
ऋषिरामायण ६६७

## ए

एकनाथ १५४, १६३, २५२, २५४-- ३१६, ३२७--३२९, ३३१, ३५१, ४३९, ५०६, ५११ (टी), ५१३ (टी), ५४८, ५४९, ७२०, ९२६.
- अनुभवानंद
- आनंदलहरी
- गाढवाला कावड २७९
- गीतासार
- गुरु जनार्दनस्वामी
- गांवबाकडून रामायण पूर्ति २८२
- ग्रंथ ८
- जन्म १४७०
- जलसमाधि ? २८२ (टी)
- थोरवी २८०-८१
- पिता सूर्यनारायण
- प्रल्हादचरित्र
- बालक्रीडा
- भागवत (एकाकार टीका) २६०
- भावार्थ रामायण २७२-२७६
- भारुडें २८०
- भाषा ८, २६२, २६३
- मुद्राप्रकाश २६६
- रुक्मिणी स्वयंवर २६३
- शुकाष्टक
- साडेचार चरणी ओंव्या २०१
- स्वात्मसुख
- हस्तामलक टीका
- ज्ञानेश्वरीप्रतिशुद्धि २६९

एकनाथचरित्र ३२८
एकनाथ (नाथपंथी) ८०३
एकनाथ (महानुभव) २८३
एकनाथ (माधवेंद्र स्वामींचा शिष्य)

एकनाथ स्तोत्र (तुका विप्र) ४४२
एकनाथ (पंचक) ९३०
एकशेंआठ रामायणें ६६५--६७४
एका जनार्दन (एकनाथ) ४८९
एका जनार्दनी टीका ३५३
एकादशप्रकरण सूत्रभाष्य ९२३
एकादशस्कंधटीका (भास्कर) ८७७
एकादशी चरित्र ४४३
एकादशी माहात्म्य ६२५
एन्थोवेन आर्. ई. ८५३
एलिचपूर नबाब ८०४
एल्फिन्स्टन साहेब १७
एल्हण २३४--२३७
अष्टविवाह
एहोळी लेख (इ. स. ६३४)
८३४

ओ

ओक अमृतराव ८१४
ओंकार चोरमागे ५००
लक्ष्मणास्वयंवर ५००
ओंकारव्यास (धाराशिवकर) ९२३
ओटे ८०
ओटे गोटे ८६१
ओतूर ७६४
ओवीछंद ७, १३, १४

औ

औडक चौडक २१६
औदुंबर प्रांत २५१
औरंगजे (झे) ब ६१,८०,५०५
औरंगळ ६६
औरंगाबाद ५१४,६०१
औरंगाबादकर वि. आ. ८००
नागपूरकर भोसल्यांची बखर

अं

अंकोळकर त्र्यंबक ५०४
अंताक्षरी टीका २३९
अंताजी माणकेश्वर ७९०
पानपतची बखर ७९०
अंबरनाथ ४९
अंबरीषचरित्र ६४३
अंबाजी ५३३
अंबाजी पंडित ९९८
अंबा नगरी (अंभोर) ३०,४१
अंबानगरी ८४४
अंबापुर ३५८
अंबाबाई ३६१, ४५२, ९७७
अंबिका उदय १०२०
अंबिकाबाई ९७७
(अंभोर) ४९
अंबेजोगाई ८४४

क

कचेश्वर-आत्मचरित्र ६१३,
९६३, १००७
कचेश्वर सिद्धेश्वर ब्रह्मे ५३२
गजेंद्रमोक्ष ५३४
पदें ५३४

सुदाम चरित्र ५३४
कडगंची २५० (टी)
कण्यांची दशमी ३८६
कथाकल्पतरू ३९,३१९,३२०
कथासारामृत ६२४
कनकाई ३६३
कपिगीता ५३७
कपोत आख्यान २८८, ९३०
कबीर ९०८
कबीर आख्यान ६८१
कबीर कथा ६८१
कबीरपंथ २३१
कमला २०७
कमलादेवी ६३
कमलाकर (मुकुंदसुत) १०६४
कमळनाईक ६६
कमळाकर ३१५
कमळाकर अयाचित कोठी ८०
करहाटकर (कऱ्हाड) ४३९, ५१६, ५४८
कर्णशल्यसंवाद ६५८
कर्णसुंदरी ४९६
कर्णहस्तिकी ४३५
कर्नाटक ५३९
कर्पूरमंजरी ९
कर्मतत्त्व ४५३, ४५५
कर्ममेळा १९७
कऱ्हाडे २१४, २१५
कलगीचा फड ७२८
कलगीतुऱ्याचें लगीन ७६३
कल्पद्रुम ९५६
कल्याण-पदें ५०२
कल्याण ४१३
कल्याण चरित्र ९८७
कल्याण पत्रिका (ज्ञानेश्वर) १५४
कल्याणपत्रिका (मुक्ताबाई) १५५
कल्याणस्वामी ९८५
कल्याणी ४४२, ४९५
कविप्रियरामायण ६६९
कविलक्षण ९५४
कवीश्वर चक्रधरशिष्य ८८, ८६८
कसरे जयराम भिकाजी ४३६
कंची ५३९
काककारिका २२२
काजळे बाळंभट ६८४
कातकरी १, ४
कात्यायनीव्रत ४६९
कादर जंगबहारकर्ता ७१९
कादर बुढण ७६८
कानउदय (पंडित) ९२३
कानडा देशा न वचावे ७४(टी)
कानफाटे ४३, १०२४
कान्हो ७५९
कान्हो त्रिमलदास ९२१
कान्हो पाठक २४४, ९२१
अभंग २४४
गीतासार २४४
कान्होपात्रा १९६, ९२०
कान्होबा ९६३
कापडशुद्धि २९०

कामराज--सुदर्शनचरित्र ५८
कामराज २०३--२०४
कामाइसा ११७
कायस्थप्रभू २१४
कायाजीव लग्न ५१९
कारंजकरबुवा ८६३
कार्तिकमहात्म्य ९३६
कार्तिकव्रत ६२४
कॉर्नवालिस, लार्ड ५२
काल्वार (शिला) ८४१
कालज्ञान ९२१
कालिदास ३३३, ३३५
कावेरी ५१८
कावेरीमहात्म्य ५१८
काव्यमार्तंड २४७
काव्यमार्तंड दीपिका २४७
काव्यमीमांसा ३२
काव्यसंग्रह ६८१, ६८३
काव्यसंग्रहकार ७९९
काव्येतिहाससंग्रह बखरी ७९०
काशिकवी ७००
काशिनाथ ५५५ (टी)
काशिनाथ बाबा पाध्ये ६४१
काशिराज ( आत्मारामी ) ५६
काशिराज रंगनाथ मोगेरकर ३२२
काशिराजस्वामी गर्भगीता ४४३
काशी ३३४, ५४३, ५४९
काशीकवी अवचित सोळखे ५०७
द्रौपदी स्वयंवर ५०७
काशीबाई ४५५
काशीराज (काशीसुंदरी) १०६२
काशीरामा ७५९
काशीरामा महिपति ७५९
काशीरामायण ६६७
काशीस्तुति ६७५
काश्मीर ४९६
कांबळे महिपति दादोपंत
( ताहराबादकर ) ६२०
कीलहार्न डॉक्टर २२
कुबेरलक्ष्मीगर्वहरण ६९९
कुमारसंभव ३३५
कुवलयमाला ८३७
कुशा(बा)माळी ७६२
इतर लावण्या ७६३
कलगीतुऱ्याचें लगीन ७६३
वेदांतपर भेदिक लावण्या ७६२
कुंडलिनी ३१२
कुंडलीश १०४४
कुंभेरी ७९०
कूटलिपि ५०
कूटश्लोक ४९१ (टी)
कूटात्मक रचना ७६२
कुशाबा माळी ७६२
विठ्ठल ७६२
कूपखनन ७८८
कूपखनन लक्षण ७८९
कूर्मदास कृष्णजन्म १८३, ९१२
क्रिस्तपुराण ९५१
कृष्णदयार्णव ( नरहरि नारायण
१५९६ ते १६६२) ५४८,

८४६, १०१४
अभंग पदें ५५५
तन्मयानंदबोध ५५५
हरिवरदा ५५२
कृष्ण, दोन कथा ५३६
कृष्णदास ६९९
सुदामचरित्र
कृष्णदास २४५, ८१०
कृष्णदास अनेक ८११
कृष्णदास ( जयराम ) ८११
कृष्णदास नृसिंह मुद्गल
३१६, ९३३
रामायण ३१८
रामायण युद्धकांड ३१६
रामायण सुंदरकांड ३१८
कृष्णदास लोळ्या ३१६, ९३३
रामायण युद्धकांड ३१६
कृष्णदास ( विश्वनाथ, विप्र,
विप्रनाथ ) ३१९, ३५१
अभिमन्यु विवाह ३१९
कृष्णपंडित ९९८
कृष्णमुनि ( कृष्णराज ) ८९,
९२४, ९३८
कृष्णमूर्ति ब्रह्मनाळकर—पदें ४४२
कृष्णयाज्ञवल्की ९३४
कृष्ण अंबरीष याज्ञवल्की
( शके १५०० ) ३१९, ३२०
कथा कल्पतरु ३१९
देवीमाहात्म्य ३१९
कृष्णराजदादा लासूरकर १२५(टी)
कृष्णराव खटावकर
विष्णुसहस्रनाम ५३७
कृष्णराव ( व संभाजी ) २२६
कृष्णविजय ६४३, ६४५,
६५०
कृष्णस्वामी
( मृत्यु १५४५ ) ४३५
कृष्णा ४४०, ५४८
कृष्णाजी अनंत सभासद ७८४
सभासद बखर ७८४
कृष्णाजी विनायक सोहोनी ८००
कृष्णामृतनट (सिद्धकृत) १०७८
पेशव्यांची बखर ८००
कृष्णाजी शामराव ७९०
भाऊसाहेबांची बखर ७९०
कृष्णानंद ४८१
कृष्णानंद निमग्न,राधाविलास ६८०
कृष्णानंद सिंधु ५४०
केकावली ६७७--६७८
केम ३२६
केरकर विठ्ठल ६८१
केशवदास--एकनाथचरित्र ३२८
केशवदेव (तळेग्रामकर) ८७३
केशवनाथ डौरे १००६
केशव पाध्ये ६४१
केशव पंडित ( रत्नमाला ) १२२
केशवराज व्यास
( चक्रपाणिभट ) ७७१
गुढे ७७२
मूर्तिप्रकाश ७७२

दृष्टांत ७७१
सूत्रपाठ ७७१
केशवराज सुरी ( वरचाच ) ७०, ७७, ९५, ११८
गुटे १२०
मूर्तिप्रकाश ७०, ११८
लापनिक १२०
सिद्धांतसूत्रपाठ १२०, १२१
केशवस्वामी--गुरुस्तुति ५३७
केशवस्वामी आत्माराम भागानगरकर( समाधि १६०४ ) ४४२, ५१२, ९७४
एकादशी चरित्र ४४३
पदें व अभंग ४४३
केशिराज बास ८६७
केशीराजदास १०००
केसरीनाथ--सिद्धांतसार ५८४
केसो कलाधारी ९०८
केसो व्रास ८६७
केंदूर २४६
कैफियती ७७९
बुंदेले ८०१
मलिकअंबर ७७९
विजापूर पादशाहा ७७९
सुलतान निजामशाह ७७९
कैवल्योपनिषद्भाष्य ३६२
कोकशास्त्र ५४५
कोकिळ ( गंगाधर ) पदें ५१३
कोडितकर अत्रे ३२८
काडुं १०४४
कोण्या हो सुभागाची मदनमंजिरी ७३१
कोपर्डे ५४८
कोर्वंजी १००६
कोयना ४४०, ५४८
कोल्हापूर ४५३, ४८३
कोशे रघुनाथ गणेश ६८५
कोळी १, ४, ५
कोंकण १६
कोंकणी ११
कोंकणस्थ २१४
कौल ४४९
कौसल्येचे डोहळे ४४१
कौस्तुभ ५५२ (टी)
क्षीरसागर विठ्ठल अनंत ४८८

ख

खटावकर कृष्णराव ५३७
खडके ४३९
खड्यांचा पोवाडा ७३७
खड्यांची लढाई ७२२
खानदेशी ५०५
खांडववन ३४३
खेचर (विसोबा) ९०३, ९०९
खेड ५३३
खेडलें ४०
खेडवाकी ५३४
खोलनाएक ८४८
खोलेश्वर ८४७
खंडू नारायण ७५९

खंडू संत ७२०
खंडोबाची पाली ३१५
खंडो भगवंत परभू ८००
नागपूरकर भोसले बखर
ख्रिस्त पुराण ७८०, ७८१, ९५१
ख्रिती मिशनरी ५०३

**ग**

गउडवहो ५
गजगौरी व्रत ५३७,६०१
गजेंद्रमोक्ष ४४१,४६९,५०३, ५२७,५३४
गजेंद्रमोक्ष (रघुनाथ) १००३
गणपतराव मुनशी ५४
गणपतिस्तोत्र २०२
गणपति स्वयंवर ६९९
गणेशगीता ३२२, ७८७
गणेशगीता टीका ९५०
गणेशचरित्र ८२०
गणेशदास ९५०
गणेश दैवज्ञ ३२
गणेशनाथ ६२४
गणेश पाध्ये ६४१
गंगाप्रार्थना, गंगाविज्ञप्ति
गंगास्तव
गणेशपुराण ५१७, ६२७
गणेशलीलार्णव १००५
गणेशवरेण्य संवाद २०२,३२२
गणेश-विजय नाटक १००५
गद्यचाली ८७८
गद्यराज ९१५
गर्भकांडआव्या ८८६-८८७
गर्भगीता ४४३
गवळी राऊळ ७०६,७५६
गाणपत्य २०२
गाथासप्तशती ५
गांधी लालचंद ८३८
गायध्वनि ३६३ (टी)
गायत्री रहस्य १५४
गारदौंड १४, ३१
गारधौंड ३३
गारुडें २६६
गावबा ( नित्यानंद )८०३,९२८
भावार्थरामायण
गिरजा ३१०
गिरणा ३१०
गिराबाई ४५८
गिरिधर ४१७, १०२२
समर्थ प्रताप ४१७
गिरिधरनाथ २५२ (टी)
गीतगोविंद २३९
गीता ५५०
गीताटीका ८९०
श्रीमद्भगवद्गीता प्रकाश
आर्या २०३
गद्य भाषांतरें ७८९
गीतार्णव २९७,३०५
गीतार्णवसुधा ४६३

गीतार्थबोधचंद्रिका २९७
गीतार्थमंजिरी ६१८
गीतासार २६६
चमत्कारी ३५३
चित्सदानंदलहरी ३२१
देवदासकृत ५०४
निवृत्तिदेवी
भगवद्गीता ५९६
मधुसूदनाचार्यकृत ३२१
यथार्थदीपिका ४६४
यक्षदेवी २०२
शामाराध्यकृत ३६१
शंकराचार्यकृत ३२१
समश्लोकी ४६१
सहा टीका २९७
सोपानेश्वरी
संकेतगीता २३७-२३८
ज्ञानप्रबोध २०५
ज्ञानेश्वरी
गीतार्णव २९७, ९३१
गीतार्णवसुधा ४६३
गीतार्थबोध चंद्रिका २९७
गीतार्थमंजिरी ६१८
गीतासार २६६, ९२१
गुडे ३६, १२०, ७७२
गुप्तलिपी ५०
गुरुगीता ४४१
गुरुगोपाळ ६८८
गुंज ६३४
गुंडम राऊळ ८८२
गुप्तना I ( गंगाबाई ) ५८२
गुरुचरित्र ८८२, ९२६
गुरु रामायण ६७०
गुरुलीला ३२४
गुरुवळी ९४४
गुरुशिष्यसंवाद ९२१
गुरुस्तुति ५३७
गुर्जर शिवव्यास ८६८, ८७०, ९२२, ९२३
गुर्जरी ५०५
गुळवे ३६४
गैनीनाथ गोरक्षगीता ४३, ४५, ४६, १३०, १३१
गैबीनाथ (गैनीनाथ?) १९१(टी), ५८२
अभंग व पदें
गोखले विष्णु ८१४, १०५७
गोंधळ २२१
गोडबोले ३४९
गोणाई १६५, १७२, १७३
गोदावरी ३२८
गोंदनाक महार २२६
गोंदा १७९
गोपाळ ३५०, ६८७, ९७१
महाभारत
गोपाळ ( व मुक्तेश्वर ) ६८८
गोपाळगिरि ५०७
गोपाळनाथ ( गो. गो. घोलप ) ८०३, ९४६
समाधिबोध ८०४

सिरोमणि ८०४
गोपाळनाथ चरित्र ८०४
गोपाळपंडित
( गोपाळचक्रपाणी=परमंडल्य
मृत्यु १२६२ ) ११६,
११७, ९१३
चौपद्या
दृष्टान्तलक्षण
दृष्टान्तव्याख्या
निर्वचनस्तोत्र
सुभाषित अंताक्षरी
गोपाळ मुद्गल ४१
गोपाळमुनि (पौषदाख्य) ९३७
गोपाळमुनि (दर्यापूरकर) ९३७
गोपाळदासी ९३७
गोपाळनाथ १०२६
गोपाळात्मज ( विनोद ) ८१२
गोपिकाबाई पेशवे ७९०
बखर
शिक्षा प्रकरण ७९६
गोपिकास्वयंवर १०१२
गोपिनाथ ८२०
लावण्या, कटाव
गोपिचंदाख्यान ५३५, ६८२
गोपीचंदाची गोष्ट ६९९
गोपीचंद--मैनावती ४३
गोपिनाथ शाहीर ७२६
गोपी भास्कर ९५६
गोमांतक ३५४
गोमांतक ६९१, ६९२
गोरक्ष अमरसंवाद ४३, ४५
गोरक्ष किमयागार ४३
गोरक्षगीता ( त ? ) ४३, ४५
गोरक्षनाथ ४३, ३११
गोरखथडी ४३
गोरखनाथ ( गोरक्षनाथ ) ४३,
३११
गोरक्ष अमरसंवाद ४३, ४५,
१०२५
गोरक्ष किमयागार ४३,१०२५
पदें ४३
गोरख दत्तात्रय संवाद
( चिंदवड शंकर ) १०४६
गोरखपूर ४३
गोरा कुंभार ( जन्म १२८९ )
१८७, १८८, ९०९
गोरा कुंभार चरित्र ६१८
गोविंद ( परमानंदाचा नातू )
१०४०
गोविंद कवि ५८
शेणवईपणाचें मेस्तक
गोविंदनाथ ( परांजपे ) ८०५
पदें
गोविंदनाथ शाहीर ७२६
गोविंदपंत (ज्ञानेश्वरांचा आजा) ४६
गोविंदप्रभु ६५, ६६
गोविंदप्रभु चरित्र ८६६
गोविंदराज गुरुवल्लाळ ९२४
गोविंद विध्वंस ८१४
गोविंदा जोशी ८१४

गोविंदानंद ५४८, ५४९
अष्टकें ५४९(टी)
गोविंद शाहीर
(गोविंद भिकाजी भागवत)७६४
गोसावी जनी जनार्दन २९५
गोसावीनंदन
( वासुदेव गोस्वामी ) ५३०
सीतास्वंयवर ५३०
ज्ञानमोदक ५३०
गोळे, दाजिबा ८१४, १०६३
गौडगांव २५० (टी)
गौरीमयूर ५१८
गंगाराय १२
गंगाकावेरी नाटक १००५
गंगाधर ९९९
गंगाधर कोकिळ ५१३, ९९०
गंगाधर माधव चिटणीस ८००
गंगाधरशास्त्री पटवर्धन ७४२
गंगाधर शाहीर ७०२
गंगाबाई ३२८
गंगामसलें २९४
गंगारामबुवा मवाळ ९६३
गंगारामायण ६६७
गंगालहरी ४७४
गंगू हैबती ७०३, ७३७,
७४०, ७४१
गंगे गोदे यमुने ६८१
ग्रंथकर्तृत्वाची सुरवात ८४४
ग्रंथसाहेब १८४ (टी), ९१२

घ

घटांचे भेद २९९
घनश्याम सुंदरा ७५५
घूसर ८०४
घोडेदरी ८४९
घोडे व मराठे ७४९
घोलप ( अनंतफंदी ) ७०५
घंटाळीची देवी ७३८

च

चक्रधर ६०, ८५, ९५, ७७०,
८५२
( हरपाळ—विशाळदेव ×
कमळादेवी, हंसांबा, उमादेवी
श. १०७५ )
अनुयायांची निष्ठा ७२
गोविंदप्रभु भेट, उपदेश ६५,
६६
चक्रधरोक्त सूत्रपाठ ८३४, ८३५,
८६०, ८६७
दूत, यात्रा ६४-६६
पद्मनाभीस शिक्षा ७२,७३
पंथाचे निर्बंध ७३-७४
प्रयाण (११९४)व शोध ७०
भीक्षा विधि ७४,७५
मठाची व्यवस्था ६९
व मातंगी ८५
चक्रपाणी चांगा ८९०, ९११
चक्रपाणी व्यास वर्धनस्थ ९५७
चचा भतीजा लढे आपसमे ७०२

चणेभरड ८४९
चतुरबुडी ७६३
चतुर साबाजी ८१०
पदें व आख्यानें
चतुर्मतरामायण ६८३
चतुःश्लोकी भागवत २५६, ४७४
चमत्कारी टीका ९४४
चमत्कृति ३३४
चरमगुरुमंजरी ४६३
चरित्रग्रंथ (म्हाइंभटकृत) ८६५
चाकण ५३४
चांगदेव ६२८, ९११
चांगदेवचरित्र ६२८(टी.)
चांगदेव ज्योतिषी २२,३२,४८
चांगदेव पासष्टी १५४, ८८९, ८९०, ९११
चांगदेवाचा मठ २२
चांगदेवाचा शिलालेख ३१
चांजें (शिलालेख) ८४१, ८४२
चांगा वटेश्वर ९११
चांगा मुधेश ९११
चांडोली ५३४
चाणक्यनीति ३०९
चातुर्वर्ण्य ८२, ८५, १६२–१६४, २७६
चांदोरकर ४४
चार्वाक ३३१
चालीसाख्यस्तोत्र ८७९
चालुक्य (चाळके) १३, १४ ४९५, ८३३
चाल्हणपंडित २३७
शास्त्रसंबोधिनी
सत्त्वानुवाद
ज्ञानप्रकाश
चावुण्डराज १२, १३, ३१
चाळके ४९५
चाळीसगांव २५१
चिकुर्डे ताम्रपट २४, ८४०
चिंचणेर ६५
चिटणिस गंगाधर माधव ८००
भोंसले बखर
चिटणीस बाळाजी आवजी ९४८
चित्रगुप्ताची बखर ७९८
चित्ररामायण ७६८
चित्रे रघुनाथ यादव ७९८
चित्सुधा ४५७,(टी)४६१
चिदानंद ५४८
चिदंबरस्वामी गुर्लेहासूरकर १०६२
चिदंबरी ५१९
चिद्बोधरामायण ५४०
चिंतानिवारण ४४३
चिंतामणराव अप्पा सांगलीकर व रामजोशी ७३०
चिंतामणि गोपीचंदाख्यान-सीतास्वयंवर ६८२
ध्रुवाख्यान-गणपतीवर आर्या
चिंदवड शंकर १०४५
चिपळूण (शिलालेख) ८४२
चिपळूणकर, मालाकार ८०२
(चिपळूणकर) विष्णुशास्त्री ६३०

चिमाबाई व रामजोशी ७२९
चिरंजीवपद २६८
चिळू सुतार ७६३
चैतन्यचंद्रिका १०११
चोखा मेळा (× सोयरा) १९६-१९९
बहीण निर्मळा
मुलगा कर्मामेळा
विवेकदर्पण
चोंभा (उखाहरण) २४६,९११
चोरमागे (ओंकार) ५००
लक्ष्मणा–स्वयंवर
चौदावें शतक २११-२४९
चौपद्या १०७-११७, ८७७
चौवारा (शिलालेख) ८४७
चौरपंचाशिका ४९६
चौऱ्यांशीचा शिलालेख २३-४८
चौल राजाची कथा ६०१
चंडिका ३१५
चंदी चंदावर ५१५-७८४
चंद्रकला (शशिलेखा) ४९५
चंद्रपूर ३०६
चंद्रभागा नगरी ६७
चंद्रम्मा ४४०
चंद्रात्मज रुद्रकृत श्रीखंड्याचें चरित्र ५०४
चंद्रावती २५५
चंद्रावळी ६८०
चंद्रावळीवर्णन २३१

## छ

छत्तीस यक्षिणी ९८८
छप्पन्न भाषा १०
छेकापन्हुती ७३३
छन्दोमंजरी ८१५, ८१९
छन्दःशास्त्र ५०६, ५१८, ५४१, ८१५

## ज

जगजीवन २४५,३९९,९८६
जगनाडे (संताजी) ९६३
जगनाडे (पंडित) ३३५, ४७४
जगन्नाथ ५९३-५९७,९८६
बोधवैभव
भगवद्गीता
वाक्यसुधा टीका
शशिसेना काव्य
ज्ञान बत्तिशी
जगमित्र नागा (नागेश जगमैत्र) १९३
जर्जरीबक्ष ५८५ (टी)
जनार्दन ६८०, ६८९
दामाजीपंत चरित्र
जनकयोगिनींसंवाद ९३६
दामाजीचरित्र
जनार्दन ६८९
महाभारत, व्यासाश्रमपर्व
जनार्दनपंत गोडक ६४१
जनार्दन शाहीर ७२०
जनार्दनस्वामी २५०, २५१

दत्तस्तुतिपर ग्रंथ २५२,९२६
जनार्दनस्वामी (नाथपंथीय) ८०३
जनाबाई ३३, ९१०
जनी जनार्दन २९०, ९३१
१०७६
निर्विकल्प ग्रंथ २९२, २९३,
पदें २९४
महावाक्य विवरण २९४
समाधि १५२३
सीतास्वयंवर २९४
हिंदी रचना २९४
जनी, दासी १७७,१८१
जपमाळ ९४६
जयकृष्णीय पंथ ७६, ८५३
जयदेव ३३५
जयबोध १०४४
जयराम १०४४
जयराम पिंड्ये ८५६
जयराम रामदासी ५०८, ९७१
जयराम स्वामींची बखर ७९७
जयरामस्वामी वडगांवकर ४३४-
४३६, ४५६
जयरामजजांकित १०६२
जयरामात्मज ९२९
जयंतपाळ ( जैत्रपाळ ) ३७
जयंतिका ९५५
जाखमाता १
जाखिणवाडी १
जातदेव ( बहिरापिसा ) २४१
जाधवराव माळेगांवकर ७१८
जालगांव ( ताम्रपट ) ८४१
जालवणकर नारायणबोवा १०६५
जाल्हो ९०८
जिजाई (× तुकाराम) ३६४
जिजाबाई ७१३
जिवाशिवा ६८७, १०४२
अनुभवलहरी ५९७
जीवनदास ६९
जुन्नर ५३२, ६२०, ७६४
जेजि ( ज ) या ८०, ८१, ५४४
जेजुरी ७५७
जेसुइट कवी ९५३
जैपपाळ ८५०
जैत्रपाळ ( जयंतपाळ ) ३७, ४१,
८५०
जैन अपभ्रंश ८३५
जोगवा २२६
जोगाईचें आंबें ४०, १९४,
२१४, ३५८, ५८४
जोगा परमानंद १९१
जोतिपंत गोपाळ महाभागवत
६९२-६९५,१०३८
जोतिराम ९४६
जोशी गोविंदा ८१४
जोशी राम ( रामजोशी ) ६८४
जोशी श्रीपाद गोपाळ ७३६(टी)
जंगबहादर ७१८
जंगम २०१, ४३४

जंगमाची गादी ४३४
ज्ञानचंद्रिका २०५
ज्ञानदर्पण २४७, ९५४
ज्ञानदेवी २६, २७, १३४
ज्ञाननाथ ८, ४५, १४२(टी)
ज्ञानप्रकाश २३७
ज्ञानप्रदीप ५८६, १०२५
ज्ञानबत्तिशी ५९६
ज्ञानप्रबोध २०५
ज्ञानबोध ९४६
ज्ञानमार्तंड ९५४
ज्ञानमोदक ५३०
ज्ञानसागर ६७, ५१९, ९४९
ज्ञानसंन्यास ५१९
ज्ञानाब्धितरंग ५०७, १०११
ज्ञानामृत ५१९
ज्ञानीभक्तसंवाद ४३६
ज्ञानेश्वर २६, १९५, १९६, ३३३, ३५१, ५४९,
पंढरपूर १५६
राजवाडे प्रत १४५
रेडा वदविला, शुद्धिपत्र १३५
समाधि ( १२१८ ) १५६
ज्ञानेश्वर (–ची आरती ) २९६
ज्ञानेश्वरांच्या पादुका ८४५
ज्ञानेश्वर व एकनाथ २७५
ज्ञानेश्वर आत्माराम तर्खडकर १७
ज्ञानेश्वर चरित्र ६१३, १०२०
ज्ञानेश्वर विजय ६२३, ९१०
ज्ञानेश्वरी ४, ८, ९, ४५, ७८, १३४, १३६, ५२५, ३३३ ४३५, ५५०, ८८९
उपलब्ध प्रति ८९१
काव्यगुण १३८
भाषा १३७
रचना १४२
शृंगारावर शांतरस १४०
ज्ञानेश्वरी व भागवत २५७-२५८
ज्ञानेश्वरी शुद्धीकरण ( एकनाथ) २६
ज्ञानोदयसिंधु ३६१
ज्यालाणस्वामी ८१२


### झ


झाडी–मंडळ ६९


### ट


टाळकरी ( तुकारामाचे ) ३७४
टीपग्रंथ ७७४


### ठ


ठाणें, कचेरीवर्णन ७४३
ठाणें, घंटाळी देवी ७३८
ठाण्याची बखर ७७८
ठिपसे ( उद्बोधनाथ ) ५८३
ठोसर ( रामदास ) ४३२


### ड


डफ्, ग्रांट १०५७
डफगाणें ९८९, १०७६
डहाणू ११

डंक (नारोव्यास) ८८४
डिंभ कवि ८८३, ९२४
डोईपट्टी ५५४
डोलोत्सवगीत १०००
डौर १००६

ढ

ढोलीबुवा ९४७

त

तत्त्वपट ९९२
तत्त्वसार ९११
तन्मयानंदबोध ५९५, १०१४
तरुणी शिक्षण नाटिका ४९५
तळेगांव दाभाडे ६९४(टी)
तळें घोसाळें २१२
ताटीचे अभंग १५५, १५६, ९००
तानाशा ४४३
तांभेर ६२१
तांभेरकर भैरोबा ६२१
ताम्रपट १८, १९, ८४१, ८४२,
ताराबाई ५०५
तासगांव ( ताम्रपट ) ८४१
तालीकोट ७७९, ७८०
ताहराबादकर महीपतिबोवा ६२०
तिथिनिर्णय ७८८
तिमण्णा दीक्षित ५११
तीर्थमालिका ९२४
तीर्थावळि १६१, ६२३
तुकदेव १०११
तुका केशव ४८९
तुकाराम बोल्होबा आंबिले ८६,
१६३, १७८, ३६३, ४४५
५३३, ४५८, ९५८
अभंग जलार्पण ३७३
कचेश्वर ब्रह्मे ३८५
काव्यरचनाविशेष ३८३
काव्यगुण ३७९, ३८०, ३८१
गाथा ९६२
गुरूपदेश ३७०, ३९३
१४ टाळकरी ३७४ (टी.)
छत्रपतींशीं संबंध ३८२,
जन्मकाल ३९६-३९७, ९६०
तुकाराम व भागवत २६२
निर्याण ३८५-३९३
बालक्रीडेचे अभंग
भागवत धर्म ३९८-३९९
रामदास व तुकाराम ४०१
शिष्यमंडळ ९६३
संताजी जगनाडे ३८४,
तुका विप्र ४४१, ९७१
एकनाथस्तोत्र ४४२
तानाशा ४४३
पदें, अभंग आरत्या ४४२
तुका सुंदरदास ९५०
तुक्याचा फड ७२८
तुळशीदास शाहीर ७१४,
सिंहगडचा पोवाडा १०४९
तुळसीमाहात्म्य ६२७
तेर [शिलालेख] ८४२

तेरटोकी १८८
तंजावर ५२३, ५३१, ५३९
त्रिमल्लदेव ६३
त्रिवेणी ५४३
त्रिसप्तनारायण ६६८
त्रुटित रामायण ६७२
त्र्यंबक ९४७
त्र्यंबक—प्रल्हादचरित्र ६०४
त्र्यंबक अंकोळकर ५०४
त्र्यंबकजी डेंगळे ७५५(टी)७६८
त्र्यंबक भगवंत यादव ६८६
त्र्यंबक भैरव ( कृष्णदेव ) ३१३
बालबोध ( बालावबोध )३१३
त्र्यंबकी ३१५
त्र्यंबक मुळे ४८५
त्र्यंबकराज ८५४
त्र्यंबकसुत ९४७
त्र्यंबकी ३१५
त्र्यंबकेश्वर २५६
त्र्यंबक ज्योतीर्विद १००५

थ

थालीपाक १८३
थोरले नानासाहेब ६८५
थोरले बाजीराव २५४(टी)
थोरले माधवराव ७०९

द

दक्षिणमानस ५४३, ५४९
दगडो शिवराम ९२१
दत्तकवि ६०१
दत्तजननोत्साह १०१४
दत्तराज मराठे ९३८
दत्ताजी वाकेनिवीस ७८१
दत्तात्रयचरित्र ६२७
दत्तात्रय श्रीधर ५७०
दत्तोबास तळेगांवकर ९१४
दमयंती स्वयंवर १००३
दमाजी शाहीर ७६३
दयाळनाथ ८०७, १०६४
दर्शनप्रकाश ८५५
दशकनिर्धार ९४४
दक्षिणापथ ८३२
दाइंबा ९१६
दाजीबा गोळे ८१४
दाजीबा पुजारी ६८४,१०३८
दादावीर ७०३, ७२६, ७३९, ७४०
दादू गोपाळ ७६७
दादू पंथ २३१
दादेगांव ५०३
दादोबा पांडुरंग १७
दादोसुत मुद्गल २४५
दानव्रतकथा १०१२
दानावर्त ८०८
दामरामायण ६६९
दामाजीची रसद ५३७, ६११
दामाजीपंत २२७,२९५,९२०
दामाजीपंत चरित्र ६८०
दामाशेट ( × गोणाई ) १६५,

१७४
दामोदरपंडित ( × हिरांबा ) १२१, १२२
दामोदरबास [पंडित] ८६८,८७०
दामोधर पंडित १०७७
दावलमलक ४०९
दासगीता ४२६
दासपंचायतन ४३४, ९७१
दासबोध ४२२, ५०८
दासमल ७५९
दासमालू ७५९-७६०
दासविश्रामधाम १०३०
दासानुदास ( राम अनंत ) ५१८ १०००
कायाजीव लग्न ५१९
सिद्धानुभव ५१९
ज्ञानसागर ५१९
ज्ञानसंन्यासटीका ५१८
ज्ञानामृत ५१९
दासोपंत ( दिगंबर ) २२७,२९७-३०७, ७८०, ९३१
दासो दिगंबर १२६, १६९(टी) ६२०
दिंडी ७
दिनकर १०४२
दिनकरस्वामी ९८७
दिवटे बच्याजी ७४०
दिवाकर कपाटे ९५५
दिवे-आगर ( ताम्रपट ) ८४२
दिव्य रामायण ६६९
दीक्षित ( हरि ) ४८०
दीनकवि ४५५(टी)
दीपरत्नाकर १०१०
दुर्गादेवीचा दुष्काळ २१५,२२७
दुर्भगाप्रमेय ७७३
दुष्काळ २१५, २९५
दृष्टान्त ७७१
दृष्टान्त ग्रंथ ७७
दृष्टांतपाठ [केसोबास] ८६९
दृष्टान्त प्रकरण ९६
दृष्टांत मालिकाभाष्य ८६९
दृष्टान्त लक्षण ७७३
दृष्टान्त व्याख्या ७७३
दृष्टांतस्थळ ८६९
देऊबाई १८९
देमाइसा ८६५
देवगड २४२
देवगांव ४५३
देवगिरी ३८,१८९,२१४-२५६( टी
देवदास चैतन्य ५०४
देवदास रामदासी ५०३
गजेंद्रमोक्ष ५०३
देवनागरी ४९, ५०
देवनाथ (नाथपंथी) १०२६
देवनाथ महाराज ( देवराव राजोपंत ) ८०३-८०८
देवळवाडी ७६
देवीमाहात्म्य ३१९, ६४२
देशी छंद ७

देहु ३६४ (टी)
दौलताबाद २५२
दंडकारण्य ४, ६,
द्रौपदीवस्त्रहरण ४८८, ५३५, ६९८
द्रौपदी स्वयंवर ५०७
द्वात्रिंशल्लक्षणें ९१४
द्वादशी ( बारशी ) १७५
द्वितीय शिवरामायण ६६८
द्विवेदी ( डॉ. हजारी प्रसाद ) १०२४
द्विसप्तरामायण ६६७

**ध**

धनेश्वर चरित्र ६०१
धनंजय टीका २३९
धनंजय कोशावरील टीका ९१५
धर्मरामायण ६६९
धवळे ७७१, ८६६, ८८६
धाकूर ६२०
धुंडिराज ६८०
धोंडी शाहीर ७२८
धोंड्या शाहीर ७६३
धोशा ७६५
ध्यानमाला ४७४
ध्रुवाख्यान ६८२
ध्रुवचरित्र ४८४, ५६८, ६८३

**न**

नऊ खऊ २१६
नमन १५४, १५५
नरविलापस्तोत्र ८७८
नरसिंह सामुद्रिक ३०९
नरसी ब्राह्मणी १६५
नरेसाबा १०३१, १०५७
नरहरि (शंकर व्यास) ५८७(टी)
नरहरि कवि ६८३,
नरहरि ऊर्फ ढोलीबुवा ४७
नरहरि धुंडिराज मालु ६३५,९०५
मुक्तेश्वराचीं चार पर्वें ६८८(टी)
नरहरि शकुनवंती ७८८
नरहरिनाथ (शिवदिननाथ) ५८७
नरहरि ( दिनानाथ ) सोनार १८९, ९१०
नरेंद्र १२३-१२५, ८६९,८७०
रुक्मिणी स्वयंवर १२३,१२९
नरेंद्र व रामदेवराव १२४
नलकूबर ६५६
नलदमयन्ती स्वयंवर ५२५
नलोपाख्यान ३८, १२३
नवनाथभक्तिसार ४३, १०२४
नवनीतकार ३४९
नवरस ६११
नवरसनारायण ( शार्ङ्गधर भोजने ) २३४, ९२४
नव्वद कलमी बखर ७८१
नहुष १४
नाईक पांडुरंगराव ६५३
नाग २,४,८३१

नागदेवाचार्य ६, ७०, ७३, ७४, ७७, ९९, ११७, १२४, २०२, ७७०
नागदेवाचार्यचरित्र ७७, ११७(टी)
नागदेवाचार्य स्मृति ८५३, ८८४
नागनाथ ८५०, ९१३
नागनाथ चरित्र ६१८
नागपाडा २
नागंबा ७७३
नागाइसा ८७६
नागांबा ( महेश्वरकन्या ) ९९
नागांबिका ६९
नागार्जुन ६९, ७०, ७७७
नागांव २
नागीदासी १७८( टी )
नागेश ( मोर मुळे ) ४८२, ४८५, ५४६, ९८४
चंद्रावळी ४८५
रसमंजरी ४८७
शारदा ( सरस्वती ) विनोद ४८७
रुक्मीणीस्वयंवर ४८७
सीतास्वयंवर ४८७
नागेश ( शाहिरी संप्रदाय ) ७२५, ७२८
नागोठणें २
नागेश वेडिया ९५०
नाटक प्रस्तावना १००५
नाटकें ( शहू महाराज ) ७८८
नात नागाइसा ८७६
नाथपंचक २९०
नाथपंथ ३५८, ५३६, ५८१, ५९२, १०२४
नाथलीलामृत १०२४
नाथ संप्रदाय ८, ४२, ४३-४७, १३१, १४७-१४८, १७०, १९१, ३१३, ६९१, ७५३, १०२४
नाथोबा ६
नानक ६०८
नाना फडणीस ७९३
भावगती वेंचें ७९६
नानासाहेबास उपदेश १०४१
नानासाहेब पेशवे ६०८
नाभाजी ६१४
केवळ नामावळी ६१८
भक्तमाला ६१४
नामदेव ( चक्रधरांचा शिष्य ) ८८
नामदेव ४६, १६०, १८५, ३०२, ३५१, ३७०
आदि ४६
तीर्थावळी १६१
दासी जनी १७७
नामदेव शिंपी २८३-८७२, ९०२
अभंग ८७२
नामदेव महाभारतकार (विष्णुदास) २८२
नामदेवाची गाथा ४६, ९०५
नामदेवाचे पूर्वचरित्र ९०४

नामदेवाचे पंजाबी कवन ९०७
नाममहिमा ४७६
नाममहिमावर्णन (हिराइमा) ८७२
नामदेवांचे पंजाबांतील कार्य ९०८
नाममाळा २३८
नामरसायन ६७७
नावरत्नमाळा २४५
नामविभक्ति २३९
नामसुधाचषक ६७७
नामांकरामायण ६६७
नामाचे ठाय ११०
नामाचे दस ठाय ७७३
नामा पाठक २४५, ९२१
नामार्या ६७७
नामा यशवंत ९०६
नामावळीस्तोत्र ९१४
नामा विष्णुदास २४५(टी), ३५०, ९०६-९३०
नारळी प्रसाद ८२१
नारा १७९
नारायण महीपति ६३२
नारायण ६८१
नारायण (भक्तप्रतापकार) १०४१
नारायणगांव ६७
नारायणपेठ २९७
नारायण पंडित (बाहाळे नारोव्यास) २०६
नारायणबोवा ३६३(टी)
नारायणराव (डॉ. सी.) ९१८
नारायणरावांचा वध ७९५
नारायण विप्र २४५
नारायण व्यवहारशिक्षा ७९६
नारायण सिद्धेश्वर ५३७
नारोव्यास बहाळिये ८५७, ८८२
नासिकेताख्यान ९५०
निकुंभ वंश २२
निगमसार ४५९
निजामउल्मुल्क ८९७
निजसुख ५१९
निजानंद १०११
निजानंद बोपाजी ४३९
नित्यदिनीलीळा ८६७
नित्यानंद (गांवबा) ३५८, ८०३
नित्यानंदैक्यदीपिका ३५८, ९४५
नित्यानित्यविचार ३६१
निबंधमाला ८०२
निंबराज ९४६
निंबार्क ८९६
निमगांव येथील टांचण ३८८
निरोष्ठ रामायण ६७०
निरंजन १५४, ५०४, ५१३
निरंजन कऱ्हाडकर ९३६
निरंजन पंढरपूरकर ९३५
निरंजन ३२२
निरंजन --गणेशगीता ७८७
निरंजनचरित्र ७८७, ८२०, ९३६
निरंजन माधव ५३२, ५३८, ६१३, ७८७, ८५३, १००७
आत्मचरित्र ६१३

कृष्णानंदसिंधु ५४०
चिद्बोधरामायण ५४०
निर्वोष्ठराघवचरित ५४१
प्रवासवर्णन ५४३
मंत्ररामचरित ५४१
रामकर्णामृत ५४०
वृत्तमुक्तावलि ५४१
वृत्तावतंस ५४१
संप्रदायपरिमळ ५१८
सुभद्राचंपू ५४१, ७८७
ज्ञानेश्वर विजय ५४०
स्तोत्रें ५४२
निरंजन रघुनाथ १०७०
निरंजनस्वामी ३२२
निरुक्तशेष ९३८
निर्मळ पाठक २४४
निर्मळा १९७
निर्वचनस्तोत्र ७७३, ८७८
निर्वाणसार ९२१
निर्विकल्प ग्रंथ २९२, ९३१
निर्वेदस्तोत्र २०२, ९१६
निर्वोष्ठराघवचरित ५४१
निर्व्यूह पांचरात १५०, १५१
निलंगाबाद ५२०
निवृत्तदेव ( यक्षदेव ) २०२
निवृत्ति १३५
निवृत्तिदेवी, निवृत्तेश्वरी १५५
निवृत्तिसार १५५
समाधि, त्र्यंबकेश्वर १५९
हरिपाठ १५५
कालनिर्णय ८८८
निवृत्तिसार १५५
निवृत्तिदेवी १५५
निवृत्तेश्वरी १५५-८९९
निष्कलंक प्रबोध ९४७
निष्कलंकाध्याय ९३८
निळोबा ९६४
नीलकंठशास्त्री थत्ते ६४१
नीलग्री ९३७
नृसिंह २३७
नृसिंह ३५, ४७६
नृसिंह (महानुभाव) अयाचित १२३
नृसिंहराजा २७
नृसिंह सरस्वती २५०, २५७
नृसिंह सरस्वती नाथपंथी ८०३
नेमदेव ( महानुभाव ) २८८
नेमाडी ६०५
नेवासें ४३, ७६५
नेवासें ( शिलालेख ) ८४१
नैय्यायिक ३३१
नैषधकाव्य ५२५ (टी)
नंदभाषा १८६
न्यायबास ९१५
न्यायमूर्ति रानडे २६२, २८१

प

पटवर्धन ६५, ८०३
पटवर्धन गंगाधर शास्त्री ७२,७४२
पंतप्रधान स्तुति १०६२
पदार्णव ३०६,९३१

पद्मनाभी ७२
पद्मपुराण ( दामोधरकृत ) १०७७
पद्मपुराणांतील कार्तिकव्रत ६२४
पद्मगीता ३४९
पन्हाळगड ६४१
परभू खंडो भागवत ८००
परमानंद ( जोगाचा गुरु ) १९१
–टीका रंगनाथ मोगरेकर ३२२
परमार्ग ८५३
परमामृत ८४६
परशाराम ( चक्रधराशिष्य ) ८८
–नागदेवाचार्यचरित्र ७७
परशारामबास ८५३,८६९,८७०
परशुराम ७६७
परशुराम चरित्र ६८५
परशुराम त्रिंबक प्रतिनिधि ५३७, १०४५
परशुराम शाहीर ( शिंपी ) ७६७
मुंबईकर इंग्रजांवर पोवाडा ७६८
राजकारणी पुरुषांचे पोवाडे ७६८
परसा भागवत १८७, १८८, १९५, ९०९
परळचा शिलालेख २५,३१,८४१
परळी १९४
परंतु रामायण ( मोरोपंत ) ६६९
पल्लीपतन कारिका २२२
पवनविजय ४२, ९४७
पवनविजय व स्वरोदय ४२
पवाडे व लावण्या ५१९, ७१०-७१२, ७२३-७२५,१०४७
पहाडासिंग ५००
पळशी ५००
पळसदेव १४, १५
पळसदेवाचा शिलालेख ८, १४, २५, ३१,३३,८४२
पांगारकर ल. रा. ६४०(टी)
पांचरात सिद्धान्त १५०
पांचालीस्तवन ४८८
पांचालेश्वर ७६५
पाटण ( शिलालेख ) १९, २० २२, २५,३१, ८४१
पाटणकर, शंकर ८१४
पांडवप्रताप ३५१,५६१,१०२०
पांडववाडी ४७
पांडुरंग ४८१, ६९९
पांडुरंग–गयगंधर्वाख्यान ६९९
पांडुरंग–माहात्य ६२०, १०२०
पांडुरंगराव नाईक ६५३
पांडोबा पेंडसे ८१४
पांडोबा शाहीर ७६५
पाणिनी २, ५,७
पाताळकांड रामायण ९२१
पातालखंड-वामन ८१०( टी )
पाध्ये काशिनाथबावा ६४०
पाध्ये केशव ६४०
पाध्ये गणेश ६४०
पानपत बखरी ७९०
पानपतवरचा पोवाडा
पानपत संग्राम व जोतिपंत ६९३

पावळी ७६३
पारनेर ६९७
पारमांडल्य (गोपाळ चक्रपाणी) ११७
पाल्कुरिकी सोमनाथ ९१८
पाल पेंबरें ३१५
पाली (खंडोबाची) ३१५
पासोडी (दासोपंताची) ९३१
पिंगल कारिका २२२
पिंगला ३१२
पिंपळगांवकर शिवराम ७१९
पिंपळनेर ५५०
पिरंगुट १९३
पिशाच्च लिपी ४९
पीपा ९०८
पुजारी दाजिबा ६८४
(पुणतांबें) पुणस्तंभ ५०१ (टी)
पुणें ६३, ७०७
पुणें वर्णन ७४८
पुंडलीक भट-पूतनाआख्यान ६९८
पुण्यांतील रंगाचा पोवाडा ७३७
पुत्रादाण २४२-२४३
पुराणें ३२०, ३२५
कथाकल्पतरु ३२०
पुरंदर ६९३
पुलकेशी सत्याश्रय ८३३
पुसदेकर (पंडित शारंगधर) ९१४
पूजा-अवसर ११०, ८६६, ८७७
पूतनाख्यान ६९९
पूतनावध ५२४
पूर (शिलालेख) ८४१
पूर्णब्रह्म १०४२
पूर्णाक्षरी ६८९
पूर्णानंद (नारायण तिमण्णा दिक्षित) ४३८, ४३९
अवधूत गीताटीका ५११
शिवपार्वती परिणय ५११
पूर्णानंद-शिष्य १००५
पूर्णामृतकर षोडशकळा ९९२
पूर्वी ९६
पृष्ठमात्रा १५, २०, २१३, ३२०
पेंडसे, पांडोबा ८१४
पेशव्यांची बखर (सोहोनी) ८००
पेशावर ३
पैठण १२, १३५, १५७, २५२, २५८, ३३४, ५३८, ५८५, ६०१
पै, भगवंत ६२ (टी)
पैशाचदेश ३
पैशाचपूर ३
पैशाची ३
पैशाची अपभ्रंश ३, ९
पोवाडे १०४७
अनंतफंदी ७२७, १०४८
आगिनदास ७१२
आदिनाथ ७२६, ,७५६
आप्पा तांबोळी ७६३
कादर बुढण ७६३
काशीरामा ७५९
काशी महिपती ७५९
कान्हो ७५९

कुशा माळी ७६२
खंडू नारायण ७५९
खंडू संतू ७२०
गोपीनाथ ७२०
गोविंदनाथ ७२६, ७५६
गोविंदा ( भिवाजी ) ७६४
चिळू सुतार ७६३
जनार्दन ७२०
तुळशीदास ८१४
दामाजी ७६३
दादा वीर ७२७
दासमल ७५९
धोंड्या ७६३
धौशा ७६५
नागेश संप्रदाय ७२५
परशराम ७६७, १०४८
पांडोबा ७६५
पिंपळगांवकर शिवराम ७१९
प्रभाकर ७२७
बचू फंदी ( बच्याजी दिवटे ) ७४०
बहिरू न्हावी ७६४( टी )
बापू कोन्हेर ७२७
बाबू सवाई ७२७
बाळा बहिरू ७४३
बाळा राघू ७५९
बिबन ७५९
मनछाराम ७६३
महादेव कवीश्वर ७४०
माधवसुत ७२०
मोतिराम ७६५
रामजोशी ७२७,१०४८
रामा सटवाजी ७१९
रंगनाथ ७१९
लहरी मुकुंदा ७२०
सगनभाऊ ७५६, ७५८
साताप्पा ७२६, ७४३
सिद्धनाथ ७२६, ७५६
होनाजी बाळा ७२२,७४३, १०४८
शिवकालीन १०४९
पंगुस्तोत्र ९१४
पंचकृष्ण ९६
पंचतंत्र २९, ३६, २४४, ७७८, ९१९
पंचमुद्रा ८८९
पंचरत्न टीका ३२१, ३३२
पंचवार्तिक २३०, २३९, २४१, ३०९, ७७४, ९१४-९१५
पंचीकरण ४१, ६७, १५४, १५५, ३०९, ४२६, ४४१, ४५५ (टी.)
पंचीकरण(जनार्दन स्वामी) ९२६
पंचीकरण (सोपानदेव) ८९९
पंचीकरण प्रमेय ९३१
पंचोपाख्यान (महालिंगदास) ३०९
पंजाब ३
पंडित ५०९
पदें, श्लोक ५०९, ५१०
पंडित ज्ञानदेव ९१६

